# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.

( शरीरखंड. )

हा ग्रंथ

श्रीधर व्यंकटेश केतकर; एम्. ए. पीएच्. डी.

यांनीं

मंडळांतील अनेक साहाय्यकांच्या मदतीनें तयार केला.

## विभाग चवदावा

जलपैगुरी—तपून

ज्ञानं राष्ट्रधनं महत्तममिदं ब्राह्मण्यसंरक्षकम् ।
लोके क्षत्रियवैश्यकार्यघटनासौकर्यसंस्थापकम् ॥
कर्तृत्वागमबोधको ननु भवेज्ज्ञानार्थयत्नोऽधुना ।
ज्ञात्वा नागपुरे सुपण्डितजनैः संघः शुभो निर्मितः ॥

१९२५

मुद्रक—डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांनीं ज्ञानकोश छापखाना ८४१ सदाशिव पेठ पुणें येथें छापला.

प्रकाशकः—महाराष्ट्रीय ज्ञानकोशमंडळ लिमिटेड नागपूर, तर्फे श्रीधर व्यंकटेश केतकर,
८४१ सदाशिव पेठ, पुणें.




## अं त रं ग प रि च य.

या विभागांत ज, झ, ञ, ट,ठ,ड, ढ, ण ह्रीं अक्षरें पुरीं झालीं असून,'त'चीं२०पृष्ठें झालीं आहेत. त्यांचें वर्गीकरणः--

### जलपैगुरी—ज्वालामुखी.

**हिंदुस्थान,इतिहास**--वै दि क-जाबाल,ज्योतिष्टोम.पौ रा णि क-जन्हु,जांबवान,जाबाळ,जैमिनी.मु सु ल मा नी.—जलालुद्दिन महंमद बल्खी, जलालुद्दिन सयुति, जवानबख्त मिर्झा, जसवंतसिंग, जहांगीर, जहांदरशहा, जहानआरा बेगम, जहूलण, जानीबेग मिर्झा, जाफरखान, जावेरखान, जोधबाई. म रा ठी.—जहाजफिरंगी, जाधव घराणें, जाधवराई, जिऊमहाला, जिजाबाई, जिवबादादा बक्षी, जेधे. जोत्याजी केसकर, जोशी. इं ग्र जी अ म दा नी.—जांभेकर, जांबजी दादाजी, जिन्सीवाले, जोग, जोशी. सा मा न्य.–जहागीरदारी, जामदारखाना,जिराइतखाना, जोशी जोहार. जा ती.—जाट, जादम, जालारी,जिनगर, जिप्सी, जुझोतिया, जैसवाय, जोगी, जोनगन, ज्वागपादुआ.

**प्रादेशिक इतिहास व भूगोल**—.मुं ब ई.—जव्हार, जसदन, जळापूर ता., जाकोबाबाद, जाखाऊ, जाति, जाफराबाद, जांबुघोडा, जामखेड, जामनेर, जामराव, जालिआ, जावळी, जळगांव, जिरळ कामसोळी, जीवधन किल्ला, जुनागड, जुनापादर, जुन्नर, जुवो, जुमखा, जेऊर, जेजुरी,जेतपुर,जेयोर, जेसर, जेसरी, जोगेश्वरी, जोनिवाचा डोंगर, जोरिया. है द्रा बा द.–जालना,सं यु क्त प्रां त.–जलाली, जसपुर, जसवंतनगर, जळापूर, जानसथ, जाफराबाद, जालौन, जेवर, जैरू, जोनपूर, जोशी मठ. व ऱ्हा ड म ध्य प्रां त.–जलंब, जशपूर, जाजगीर, जांभळी, जामखेड, जामगड, जिरार, जुनापाणी, जुनोना, जूब. म ध्य हिं दु स्था न.—जसो,जाबड, जावरा, जिगणी, जोरा, जोबत. बं गा ल.—जलेश्वर, जल्पे, जहानाबाद, जालापहाड, जियागंज, जेम्स मेरीसँड्स, जेलेपला, जेसोर. आ सा म.—जिंजीराम, जैंटिया, जैंटियापूर, जोवई, जोहार. बि हा र.—जामतारा. पं जा ब रा ज पु ता ना.—जामपूर, जालंदर, जालोर, जुनोध, जुवळ, जेसलमीर, जेसोल, जैतो जोधपूर,म द्रा स.–जबारिडोंगर, जिंजी, जोरिया. अ फ गा णि स्ता न.—जलालाबाद. सि लो न —जाफना. प्रा चीं न.—जेजाकभुक्ति.

**आशिया, हिंदुस्थानेतर**—प्रा दे शि क.--जावा, जुडा, जुडिया, जेझील, जेबील,जेरिको, जेरिझिम, जेरुसलेम, जेरेसा, जेऱ्हा, जोक्जाकर्ज. **आफ्रिका**—जितुलिया, जोहानीसबर्ग. **अमेरिका**—जॉर्जिया, जेम्सटाउन. **यूरोप**—प्रा दे शि क.–जर्जेटाऊन, जॉर्जिया, जासी, जिनीव्हा, जिनोआ, जुगोस्लाव्हिया, जेना, जेव्हर्लंड, जोहानस्वर्ग; ऐ ति हा सि क.—जस्टीन, जस्टिनियन, जॉन,जॉनसन, जॉनसन डॉ., जॉर्ज राजे, जाव्लोस्काव्ह, जीन, जुपीटर, जुव्हेनल, जूनो, जेकब, जेफर्सन, जेसुइट, जेहोव्ह, जोन ऑफ आर्क

**वाङ्मय**—बौ द्ध.–जातक. जै न.–जैन संप्रदाय, जिनप्रभ, जिनसूरि. सं स्कृ त, चरित्रें.-- जोनराज, जोन्स. ता मी ळ.-जीवक चिंतामणी; म रा ठी.–जालवणकर, जीवनमुक्त, जोगीपरमानंद.

**शास्त्रें** —वै द्य क.—जलमस्तिष्क, जलसंत्रास, जलोदर, जलोपचार, ज्वर; र सा य न.—चरित्रें–जुल; व्या क र ण शा स्त्र.—जैनेंद्र व्याकरण. व न स्प ति.—जव, जवस, जाई, जांब, जांभूळ, जायफळ, जासवंद, जासुंद, जिरें, जीवनकार्यविचार, जुई,जेपाळ, जेष्टमध, ज्वारी. धा तु.—जस्त. अ र्थ शा स्त्र.–चरित्र– जेव्हॉन्स; प्रा णि शा स्त्र.–जळू. ज्योतिष.– ज्योति, ज्योतिःशास्त्र. स मा ज शा स्त्र.–जातकर्म, जातिभेद, जारकर्म, जुगार. का य दा-जस्टिनियन, जामीनकी, जारकर्म, जुगार. भू शा स्त्र.– ज्वालामुखी. औ द्यो गि क.– जाहिरात, जिलेटिन. क्रि डा शा स्त्र.– जुजुत्सु. प दा र्थ वि ज्ञा न शा स्त्र.– जादूचा कंदील, जाव्लोस्काव्ह.

### झ—झोला.

**हिंदुस्थान,इतिहास**—द क्षि ण हिं दु स्था न.–झामोरीन. मु सु ल मा नी—झिनत उन निसा बेगम, झियाउद्दीन-बरनी, झुब्द तुल निसा बेगम, झुलिपकारखान, झेब--उन् निसा--बेगम, झैनखान कोक, झैनाबादी महाल, झैनुल अबिदीन. र ज पू त–झामसिंग. जा ती–झाबेल, झारगर झींनवर, झैमुख्त.

**प्रादेशिक इतिहास व भूगोल**—मुं ब ई इ ला खा-- म हा रा ष्ट्र, झालरपाटण, झोडगे; का ठे वा ड.—झांझमेर, झामपोदर, झालावाड, झिंझुवाडा. म ध्य प्रां त.—झगरपूर, झारापाआ, झुवा.सं यु क्त प्रां त.—झमानिया, झांशी, झूसी,

# संपादकमंडळ

## मुख्य संपादक

डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर, एम्. ए. पीएच्. डी.

## संपादकीय कार्यव्यवस्थापक

रा. रा. यशवंत रामकृष्ण दाते, बी. ए. एल्‌एल्. बी.

## उपसंपादक

रा. रा. सर्वोत्तम वासुदेव देशपांडे, बी. ए.

रा. रा. चिंतामण गणेश कर्वे, बी. ए.

रा. रा. लक्ष्मण केशव भावे, बी. ए. एल्‌एल्. बी.

हौत्रवेत्ते वेदशास्त्रसंपन्न चिंतामणभट्ट शंकर दातार.

डॉ. भास्कर गोपाळ नेने, एल्. एम्. एस्.

मिस्. एच. कोह्नन, बी. ए. ( लंडन )

## शाखासंपादक

| | |
|---|---|
| रा. सा. विनायक त्र्यंबक आगाशे एल. सी. इ. | स्थापत्यशास्त्र |
| रा. ब. गणेश केशव केळ[illegible] | कृषिकर्म |
| प्रो. विनायक नानाभाई | प्राणिशास्त्र |
| प्रो. रघुनाथ विष्णु दामले | वनस्पतिशास्त्र |
| प्रो. त्र्यंबक विष्णु मोने एम. ए. | गणितशास्त्र |
| प्रो. दत्तात्रय लक्ष्मण सहस्रबुद्धे एम. एजी. | भूस्तरशास्त्र |
| वैद्यभूषण गणेशशास्त्री जोशी | आर्यवैद्यक |
| कै. विनायकशास्त्री खानापूरकर | आर्यज्योतिषशास्त्र |
| रा. रा. दिवाकर यशवंत फाटक | यंत्रशास्त्र |

या विभागांतील विशिष्ट लेख व लेखकः—ज्योतिःशास्त्र प्रो. वि. ब. नाईक.

ज्या विषयावर शाखासंपादक नाहींत त्या विषयाची जबाबदारी संपादकमंडळावर आहे असें समजावें.



—:*S*:—

बहुतेक सर्व भागांत मळीची जमीन आहे. बक्साच्या पश्चिमेस सुमारें अर्ध्या मैलावर तांब्याची खाण आहे. त्याचप्रमाणें शानसिंग नांवाच्या चहाच्या मळ्याच्या उत्तरेस चार मैलांवर तांब्याच्या खाणी आहेत.

तिस्ताच्या पश्चिमेकडील भागांत जंगल कमी आहे. शेवरी, शिसवी, आंबा, फणस, पिंपळ, चिंच यांचीं झाडें सांपडतात. सुपारी व बांबूंचीं झाडें पुष्कळ उगवतात. दुआरच्या उत्तरेस जंगल पुष्कळ असून त्यापैकीं बराच भाग सुरक्षित आहे. येथील उष्णमान कधींहि फार नसतें. साधारणपणें उन्हाळ्यांत ( एप्रिलमध्यें ) ९०° अंशावर पारा असतो. पाऊस पुष्कळ पडतो. जलपैगुरी येथें १२२ इंच व बक्सा २०९ इंच पर्यंत पडतो. इ. स. १९०२ च्या सप्टेंबर महिन्यांत येथें मोठा पूर आला होता त्यावेळीं बरेंच नुकसान झालें.

इतिहास.—प्राचीन काळीं या भागांत प्राग्ज्योतिष अथवा कामरूप नांवाचें राज्य होतें. कोणी जल्पेश्वर नांवाच्या राजानें ज्या ठिकाणीं जल्पे नांवाचें देवालय आहे, तेथें पूर्वी एक देऊळ बांधलें होतें व जल्पे लिंग त्याच वेळीं जमिनींतून वर आलें. भितारगड नांवाचा शूद्र राजा पिरथु याची पूर्वीची राजधानी या भागांत होती. त्या ठिकाणीं प्राचीनत्व दाखविणारे पुष्कळ अवशेष सांपडतात. पुढें बंगालमधील पाल राजांनीं हा भाग घेतला. पुढें खेन राजांच्या ताब्यांत हा भाग गेला. नीलध्वज नांवाच्या खेन राजानें कुचविहार संस्थानांत असलेलें कामातापूर वसविलें पुढें हा भाग विश्वसिंगनें स्थापन केलेल्या कोच राज्याचा भाग झाला. या राज्याचा नाश झाल्यावर पश्चिमेकडील प्रदेश मोंगल राज्यांत सामील झाला. इ. स. १७६५ मध्यें ईस्ट इंडियाकंपनीकडे या भागाचा दिवाणीचा कारभार आला. याच्या अंतर्भागांत व्यवस्था ठेवणें मुष्किलीचें झाल्यामुळें फार चोऱ्या वगैरे होऊं लागल्या; परंतु इ स. १७८९ मध्यें तेथील कलेक्टरनें त्याचा बंदोबस्त केला.

दुआर भाग भोतियांच्या हातांत पडला होता व ते कुचविहारच्या संस्थानास फार त्रास देत असत. या ठिकाणीं दंगेधोपे नेहमीं होत असत. १८६५ सालीं भूतान युद्ध झाल्यानंतर हा भाग ब्रिटिश राज्यास जोडण्यांत आला. लोकसंख्या ( १९२१ ) ९३६२६९. पश्चिम दुआर भागांत वस्ती झपाट्यानें वाढत आहे.

येथील शेंकडा ७७ लोक बंगालीची पोटभाषा रंगपुरी अथवा राजवंशी बोलतात. चहाच्या मळ्यावर बाहेरील लोक फार येत असल्यामुळें हिंदी, मेक, खास, मुंडारी, संताळी वगैरे भाषाहि प्रचलित आहेत.

इ. स. १८७२ पासून मुसुलमानांच्या वस्तीचें प्रमाण कमी होत चाललें आहे. येथील हिंदुमुसुलमान आपसांत न भांडतां रहातात. एकाच घरांत हिंदु व मुसुलमान कुटुंबें राहिलेलीं येथें दृष्टीस पडतात.

शेतकीः—मळीची जमीन फार सुपीक असून भात, गळिताचीं धान्यें, बटाटे, एरंडी, सुपारी वगैरे येथें विकें होतात. तिस्ताच्या पश्चिमेस ताग, गहूं, तांदुळ पिकतात. या प्रदेशाचें मुख्य पीक तांदूळ हें आहे. चहाची लागवड इ. स. १८७४ मध्यें सुरू झाली. इ. स. १९०३ मध्यें २०७ चहाचे मळे होते. येथें मळ्यासाठीं मजूर मिळविण्याकरितां कांहीं एक कायदा करावा लागलेला नाहीं. कारण येथें मजूर पुष्कळ मिळतात. चहाच्या मळ्यांत नेपाळी मजूर पुष्कळ येत असून ते छोटा नागपुरांतील मजुरांची जागा घेत आहेत. कांहींनीं आपलीं घरें याच भागांत केलीं आहेत. तागाची लागवड देखील बरीच वाढत चाललेली आहे. गुरांची अवलाद खुजी व अशक्त आहे. त्यांत सुधारणा करण्याचा प्रयत्न कोणी करीत नाहीं. गुरचरण पुष्कळ आहे.

जंगलः—येथें संरक्षित जंगलें आहेत. इ. स. १९०३–०४ मध्यें जंगलापासून झालेलें उत्पन्न ११८००० रुपये होतें. येथें चुनखडीचा दगड व तांबें सांपडतें. बक्सापासून दोन मैलांवर असलेली तांब्याची खाण पूर्वी कांहीं नेपाळी लोक चालवीत होते. बागराकोट येथें दगडी कोळसा सांपडतो.

व्यापार व रस्ते वगैरेः—येथें तरट तयार होतें. चहाच्या व्यापारामुळें इतर व्यापारहि फार वाढला आहे. धान्यास भाव चांगला येतो. भूतानशीं देखील थोडा फार व्यापार चालतो. कापड, यंत्रें, लोखंडी पत्रे या भागांत येतात. तांदूळ, ताग, चहा, तंबाखु वगैरे बाहेर जातात. या भागांतून ईस्टर्न बंगाल स्टेट रेलवे जाते. इतर रस्तेहि चांगले आहेत. या जिल्ह्याचे दोन विभाग आहेत. जलपैगुरी आणि अलीपुर. जिल्ह्यांत कचेऱ्या वगैरे सर्व सोयी आहेत.

वि भा ग.—जलपैगुरी जिल्ह्याचा एक विभाग. उ. अ. २६°२७' व पू. रे. ८८° २०' ते ८९°७'. क्षेत्रफळ १८६८ चौ. मै. व लो. सं. (१९११) ६९९९५९. यांत एक गांव व २०३९ खेडीं आहेत. हा भाग सपाट मैदान असून यांत जंगल पुष्कळ आहे. भित्तरगड व जल्पे येथें पुष्कळ प्राचीन अवशेष सांपडतात. या विभागांत जलपैगुरी, टिटाळ्या, बाडरा आणि मैनागुरी हीं व्यापारी ठिकाणें आहेत.

गां व.—जलपैगुरी विभागाचें मुख्य ठिकाण. उ. अ. २६°३३' व पु. रे. ८८° ४३, लोकसंख्या (१९११) १४६९०. गांव जरी लहानसाच आहे तरी तो भरभराटीस येत आहे. ईस्टर्न बंगाल स्टेट रेलवे येथून जाते. इ स. १८८५ मध्यें येथें म्युनिसिपालिटीची स्थापना झाली. येथें सर्व कचेऱ्या, तुरुंग, दवाखाने, शाळा वगैरे आहेत.

**जल्पे**—बंगाल इलाखा. जलपैगुरी जिल्हा. उ. अ. २६° ३१' व पू. रे. ८८° ५२'. लोकसंख्या ( १९०१ ) २०८८. सुमारें तीनशें वर्षांपूर्वी बांधलेलें एक शिवाचें देवालय

झेदपूर. वं गा ल.-झंझरपूर, झालकाटी, झेनिद, झेरिआ. आ सा म.-झिरी. बि हा र ओ रि सा.-झलीदा. पं जा व.-झज्जर, झांगझिरा, झुंझुन, झेलम. का श्मी र-झारगर. ब्र ह्म-दे श.—झलून, झिगकालिंग हिकमति, झिगन.

**आशिया, हिंदुस्थानेतर**—ऐ ति हा सि क.—झकरी मुल्ला, झमानशहा, झुवेदाखातून. प्रा दे शि क.—झमींनदवार, झाबुलिस्तांन, झालवान, झिवारत, झोटून, झुंगेरिया, झोव.

**यूरोप**—झामोरा, झार, झारा, झारोन, झालेयूकस, झोतामीर, झल्झि, झीलंड, झूरिच, झेनागा, झेनाटा, झेनीविया, झेपेलिन, झेरवस्ट, झेनोविट्स, झैसान. **आफ्रिका**—झांझीबार, झांवेसी, झुलुलंड. **अमेरिका**—झाकाटेकस.

**वाङ्मय**—पा र शी-झरथुष्ट्र, झेंद अवेस्ता, ग्री क.-झीनॉफानेज, झेनोफोन; फ्रें च.-झोला.

**शास्त्रे**-प्रा णि शा स्त्र—झुरळ, झेब्रा. वि मा न.—झेप्पेलिन. **अक्षरविकास**—झ.

ञ.

**अक्षरविकास**—ञ.

ट—ट्रेन

**हिंदुस्थान, इतिहास**—मु स ल मा नी-टिप्पू सुलतान. इं ग्र जी.—टागोर देवेंद्र, टागोर सौरेंद्र मोहन, टाटा जमशेटजी, टाटा रतन, टिळक. जा ती.—टिपरा, टोवला, टोग्थू.

**प्रादेशिक इतिहास व भूगोल**—मुं व ई—टंकारी टाकळी, टाकळी बुद्रुक, टावी, टिवा, टेंभुरणी. म ध्य प्रां त.—टाकळघाट, टिपगड, टिलोताखैरी. म ध्य हिं दु स्था न.—टिकमगड, टोरी फतेपूर. वं गा ल.—टिटागड, टिप्पेरा. पं जा व.—टाक्री, टेक्र, टोशाम. वा य व्य स र ह द्द.—टांक; टोचीनदी. ब्र ह्म दे श—टझी, टाँगपेंग, टौंगी, टौंगुथ, टौंगू, टोग्थ.

**आशिया हिंदुस्थानेतर**-प्रा दे शि क.-टर्नेट, टांगकिंग, टायग्रे, टार्सस, टिडोर, टिफ्लीस, टिवेस्टी, टीरिआ, टुलूझ, टूर्ने, टूलाँ, टेसफॉन, टैनशान, टोकियो, ट्राय, ट्रॅविझांड; ट्रिनीदाद, ऐ ति हा सि क.—टॉलेमी. **आफ्रिका**—टांगानिका, टान्जीर, टिंवक्टू, टिम्माड, टेग्यूसीगलपा, टेवलवार, टोगोलंड, ट्यूनिझिया, ट्रान्सव्हाल, ट्रिपोली.

**अमेरिका**—टेक्सस, टेनिस्सी, टेराडेलफ्यूगो, टोलेडो.

**यूरोप**—प्रा दे शि क.—टनाव्रिजवेल्स, टस्कुलम्, टायवर, टायबेरियस, टायर, टारक्विनी, टारांटो, टारेंटम, टार्के, टार्नो, टिरोल, टिल्सिट, टीजीआ, टेगर्नसी, टेंपलवार, टेमेश्वार, टोरांटो, टोलेडो, ट्रीएस्टे, ट्रेंट, ट्विकनहॅम. ऐ ति हा सि क.—टॉलस्टॉय, टॅलेरंड, टासमन, टोन.

**वाङ्मय**—हिं दी—टेकचंद मुनशी. इं ग्लि श.—टेलर. अ मे रि क न.—ट्वेन. फ्रें च.—टर्गो, टव्हर्नियर. इटालियन—टॅसॉटस, टासो.

**शास्त्रे**—ना ण क शा स्त्र.—टका. ख नि ज —टरपेल, टांकणखार. प्रा णी.—टिटवी, टोळ. व न स्प ति.—टाकळ, टाकळा, टापिओका, टोमाटो. प दा र्थ वि ज्ञा न-टारीसेली, टिंडाल टेट. फो टो ग्रॉ फी.—टालवॅाट. ग णि त.—टॉडहंटर, टॉलेमी. ोति ष.—टायकोब्राही. इ ति हा स.—टॉड, टेन, ट्रीट्चके. औ द्यो गि क—टोपल्या. यं त्र शा स्त्र—ट्राम्वे. **अक्षरविकास**—ट.

ठ—ठाणें.

**हिंदुस्थान, इतिहास**—मुं व ई.—ठठा, ठाणें. वंगा ल.—ठाकूरगांव. सं यु क्त प्रां त.—ठाकूरद्वार, ठाणभवान. जा ती.—ठग, ठाकूर. वा ङ्म य.—ठाकूरदासबोवा. अक्षरविकास—ठ.

ड—ड्विन्स्क.

**हिंदुस्थान, इतिहास**—फ्रें च.-डुप्ले. म रा ठे.-डफळे, डिंगणकर, डी वॉइने. इं ग्र जी अ म दा नी.—डफरीन, डलहौसी. जा ती.—डूम, डोगरा, डॉंबारी, डोम, डोमल, डोहूर.

**प्रादेशिक इतिहास व भूगोल**—मुं व ई.—डंवल, डभई, डाकोर, डांग, डांगची, डाहाणू, डीसा, डोंमगांव. म ध्य प्रां त.—डोंगरगड. वं गा ल.—डमडम, डाका. सं यु क्त प्रां त.—डेरापूर, डेहराडून. म ध्य हिं दु स्था न.—डावी. म द्रा स.—डॉलफिन्सनोज. पं जा ब व रा ज पु ता ना—डीग, डेरागाझीखान, डेरागोपिपूर, डेराजात, डेरानानक, डोंगरपूर. वा य व्य स र ह द्द.—डेराइस्माइलखान. ब्र ह्म-दे श.—डायमंड.

**आशिया, हिंदुस्थानेतर**—डुकी, डुराझो, डोमीनिका.

**यूरोप**—प्रा दे शि क.—डंडी, डंकर्क, डँझींग, डंबार्टन, डब्लिन, डरहॅम, डर्बी, डॉन, डान्यूब, डार्टमाउथ, डार्डनेल्स डुलचेन्यो, डेडिऑगच, डेन्मार्क, डेलफॉय, डेव्हनपोर्ट, डोब्रूजा, डोव्हर, डयूसेल्डॉर्फ, ड्रस्डेन, ड्रोघडो, ड्विन्स्क, ऐ ति हा सि क.—डिडीमी डेकॅपोलिस, डयूडरनेक, जा ती.—डेन. **अमेरिका**—डलास, डेन्वर, डेलवेअर.

**आफ्रिका**—डहोमे, डिंक, डेमिएटा.

**वाङ्मय**—म रा ठी.—डोंगरे. ग्री क.—डायोजिनीस, डेमॉक्रिटस, डेमॉस्थेनीस. इं ग्लि श.—डिकन्स, डिक्वेन्सी, डीफो, ड्रायडन. इ टा लि य न.—डांटे, फ्रें च.—डिडेरोट, डेकार्टे, डयूबाविएरी, डयूमा. ज र्म न.—ड्रायसन.

**शास्त्रे**—प दा र्थ वि ज्ञा न.—चरित्रें—डॅनिअल, डॉग्वेले, डार्विन, डाल्टन, डी अर्लेवर्ट. व न स्प ति शा स्त्र.—डवलवीन, डाळिंब, डिकेमाली, डिंगरी, डुक्करकंद, डुरिअन, डोरली. यं त्र शा स्त्र.—डॉक; वै द्य क.—डांग्या खोकला. प्रा णि.—डास, डुकर. र सा य न—चरित्रें.-डिवार, डयूमास, डूलाँग, डेव्ही, डोबरनेर. खो द का म.—चरित्रें—डोनाटेलो, डयूरट. औ द्यो गि क—डामर. **अक्षरविकास**—ड.

ढ—ढोर.

**हिंदुस्थान, इतिहास**, सा मा न्य.—ढालगज, ढालाइत. जा ती.—ढीमर, ढुंढये, ढेरा, ढोर. **वाङ्मय**—ढक्की भाषा. **शास्त्रे**-प्रा णि शा स्त्र.—ढेकूण. **अक्षरविकास**-ढ.

ण.

**अक्षरविकास**—ण.

त—तपून.

**हिंदुस्थान, प्रादेशिक इतिहास व भूगोल**—मुं व ई तंडो, तंडो अडाम, तंडो अलाहयार, तंडो वागो, तंडो महंमदखान. म द्रा स.—तंजावर, तनुक. वं गा ल.—तंडागांव. सं यु क्त प्रां त.—तनकपूर. वा य व्य प्रां त.—तनावल. आ सा म.—तंगेल. ब्र ह्म दे श.—तगौंग, तपून. जा ती.—तडवी. **वाङ्मय**—पौ रा णि क—तंत्रग्रंथ. जै न तपागच्छ, तत्त्वज्ञान. **शास्त्रे**—व न स्प ति.—तगर, तत्रक. औ द्यो गि क.—तपकीर. **अक्षरविकास**—त.

येथें आहे. येथील लिंग अनादि असून कामरूप राज्याच्या वायव्येस कोठेंतरी महादेव लिंगरूपानें अवतरले असें कालिका पुराणांत वर्णन आहे. दर महाशिवरात्रीस येथें जत्रा भरत असते त्यावेळीं व्यापारहि येथें पुष्कळ चालतो.

**जलंब**—वऱ्हाड, मध्यप्रांत. बुलढाणें जिल्हा, खामगांव तालुका. हें खेडेंगांव खामगांवच्या उत्तरेस ८ मैलांवर असून जी. आय. पी रेल्वेचें एक स्टेशन आहे. येथूनच खाम गांवास जाण्याकरितां रेल्वेचा फांटा आहे. लो. सं. ( १९०१) २३०८ होती.

**जलमस्तिष्क रोग**—मस्तिष्क अथवा मेंदूचा छेद केला असतां त्याच्या प्रत्येक अर्धभागामध्यें पार्श्वकोश नांवाची पोकळी असते, तींत अतिशय जलसंचय होऊन हा रोग होतो. याचे दोन प्रकार आहेत; ( १ ) तीव्र व ( २ ) दीर्घकालीन. यांपैकीं तीव्र विकार क्षयजंतुजन्य मस्तिष्कावरण-दाह नांवाच्या रोगांत अंतर्भूत होतो व त्यांत थोड्या अवधींत पुष्कळ जलसंचय होऊन रोगी दगावण्याचाच संभव जास्त असतो. त्याचें वर्णन सदर रोगांत सांपडेल. येथें फक्त दीर्घकालीन रोगाचें वर्णन दिलें आहे. कारण तशीं माणसें मोठ्या–डोक्याचीं बरींच पहाण्यांत येतात. जलसंचय कोठें होतो हें वर सांगितलेंच आहे. गर्भावस्थेंत गर्भासच कांहीं विकृति झाल्यामुळें असें होतें. अथवा त्याच्या वेष्टणास कांहीं रोग होऊनहि असें होतें. याचा केवल शुद्धदाहाशीं अगर क्षयजंतुजन्यदाहाशीं कांहींएक संबंध नसतो. हा रोग उपजत झाला असल्यास प्रसूतिसमयीं बरीच अडचण होते. परंतु त्याचा उद्भव बहुतकरून मूल उपजल्यानंतर सहा महिन्यांच्या आंत होतो. यापेक्षां अधिक वयाच्या मुलांमध्यें अगर मोठ्या माणसांमध्येंहि तो होतो पण हें अपवादात्मक आहे.

लक्षणें —प्रथमतः शरीर व चेहरा यांच्या आकारमानास विशोभित दिसेल इतकी डोक्याची कवटी हळूहळू मोठी होऊं लागते. या वयामध्यें मस्तकाचे निरनिराळे अस्थी एकत्र जुळून आलेले नसतात व त्यांतील फटी मोकळ्या असतात. यामुळें डोकें वाटेल तितकें मोठें होण्यास कांहींच प्रतिबंध नसतो. व अस्थींमधील फटी मात्र मोठमोठाल्या होतात. अशा विशिष्ट प्रकारच्या माणसाची मस्तकसंबंधी कुरूपता विचित्रच दिसते; ती अशीः—कपाळाचा वरील भाग फुगून बराच पुढें येऊन डोळ्याच्या खळग्यांतील वरच्या पातळ अस्थी पुढें फुगून तिरकस झालेल्या असतात. त्यामुळें दृष्टी भूमीकडे वळलेली असते, व बुबुळाची हालचाल कशीशीच गरागरा डोळे फिरविल्याप्रमाणें असते. डोकें मोठें आणि चेहरा बारीक यामुळें हें मूल एखाद्या आगोबाप्रमाणें दिसतें. हाडें बारीक व अशक्तच असल्यामुळें शरीर अगदीं किरकोळ असतें. डोकीवर बारीक व थोडीशी लव असते. दांत नसतातच.असले तरी नासके किडके असतात. डोक्याचा घेर मोजला असतां सरासरीनें २२ इंच भरतो. चांगल्या मुलाच्या डोक्याचा घेर अर्थात् याहून बराच कमी म्हणजे १८ इंच असतो. एका तीन महिन्याच्या लाच्या डोक्याचा घेर २९ इंच व दुसऱ्या एका इंग्लंडांतील ३ लाच्या डोक्याचा घेर ३२ इंच भरला. असलीं डोकीं त्या मुलांस पेलत नाहींत; व म्हणून तीं मुलें पडूनच असतात. मस्तकाचीं हाडें विस्तरणशील असल्यामुळें या वाढत्या जलसंचयाचा दाब मेंदूवर फारसा सांपडत नाहीं. पण जो थोडा पडतो त्याचा परिणाम मात्र बराच होतो. पार्श्वकोष्ठ फुगून बाहेरील भागामधील भेगा बुजल्यासारख्या होतात. एखाद्या वेळीं हा जलसंचय मस्तकाच्या कवटींत प्रवेश करून मेंदूस खालीं दाबतो. मग मेंदूच्या क्रियेस अडथळा होऊन मुलाच्या मानसिक स्थितींत बिघाड होऊं लागतो. कशांत लक्ष नाहीं, चिडखोर व अर्धवट वेडसर बुद्धिहीन असें तें होऊं लागतें. दाब जास्त पडत गेल्यावर दृष्टि जाते, ऐकूं येईनासें होतें. असलीं मुलें बहुधा फार वर्षे वांचत नाहींत. पण असलीं माणसें म्हातारपणापर्यंत जगल्याचीं उदाहरणें नाहींत असें मात्र नाहीं. यांतहि सौम्य असे बरेच भेद असतात व त्या तऱ्हेचीं मुलें जरी मोठ्या डोक्यांचीं असलीं व इतर लक्षणेंहि त्यांना असली तरी कालांतरानें तीं कमी कमी होत जाऊन मुलाची प्रकृति सुधारते व डोक्याचीं फुगलेलीं पातळ हाडें, लहान होऊन तींहीं कालांतरानें टणक व मजबूत होतात.

उ प चा र.—यावर पुष्कळ उपाय व औषधें उपयोजून पाहिलीं आहेत पण म्हणण्यासारखा उपयोग होत नाहीं असाच अनुभव आला. डोकें पट्ट्यानें आंवळून बांधणें, जलसंचय जिरून जावा म्हणून पाऱ्याचीं औषधें व भस्में देऊन पाहिलीं. फटींतून पोकळ सुईसारख्या नालिकेनें टोंचून जलसंचय मधून मधून त्यामार्गें कमी करून पाहिला पण व्यर्थ. पार्श्वकोष्ठांतील जलसंचयाचा निकाल व संबंध मस्तिष्कावरणाच्या पोकळीशीं व्हावा आणि कमरेंतील पृष्ठवंशाच्या पोकळींतल्या जलाचा संबंध व निकाल उदरांत व्हावा अशा हेतूनें शस्त्रक्रिया केल्या, परंतु व्यर्थ. शेवटीं हाच उपाय उत्तम ठरला कीं पौष्टिक व पचण्यास सुलभ असें अन्न, दूध, वगैरे पथ्यकारक पदार्थ व लोह, फॉस्फेट, कॉडलिव्हर तेल हीं व इतर शक्ति व पुष्टिवर्धक औषधें व उत्तम भाज्या आणि विपुल हवेमध्यें मुलास विहार करूं देणें या स्वल्प व स्वाभाविक उपायांनींच वरील तीव्र उपायांपेक्षां कार्यसिद्धी अधिक होते.

**जलयंत्रशास्त्र**—पाणी व प्रवाही पदार्थ यांच्या गति–स्थिति–विषयीं तत्त्वें प्रतिपादणारें हें शास्त्र आहे. या शास्त्राचे जलस्थिति व जलगतिशास्त्र असे दोन भाग आहेत. या भागांतील वस्तू घन अथवा भरीव किंवा प्रवाहरूपी असतात. लांकूड, दगड वगैरे पदार्थ भरीव होत; व पाणी, हवा वगैरे पदार्थ प्रवाहरूपी होत. प्रवाहरूपी पदार्थांचे जलरूपी व वायुरूपी असे दोन भाग असतात. या दोहीं-

मधील मुख्य फरक म्हणजे जलरूपी पदार्थ दुःसंकोच्य व वायुरूपी पदार्थ संकोच्य असतात. जलरूपी पदार्थ एखाद्या भांड्यांत ठेवतां येतात व एका भांड्यांतून दुसऱ्या भांड्यांत ओढतां येतात.परंतु वायुरूपी पदार्थांचा व्याप अनियमित व अमर्याद असल्यामुळे सर्व बाजूंनीं कोंडलेल्या भांड्यांतच वायुरूपी पदार्थ ठेवतां येतात. प्रवाहरूपी पदार्थांच्या समतोलतेचा विचार जलस्थितिशास्त्रांत केलेला असतो. एखाद्या प्रवाहरूपी पदार्थावर निरनिराळे दाव असले व तो स्थिर असला तर तो प्रवाहरूपी पदार्थ समतोल स्थितींत आहे असें म्हणतात.

पाणी असणाऱ्या एका भांड्याला एके ठिकाणीं भोंक पाडलें व त्या भोंकावर एक पट्टी बसविली तर ती पट्टी त्या ठिकाणीं स्थिर रहाण्याकरितां आपल्याला आपल्या बोटाचा किंवा कसला तरी दाव लावावा लागतो. म्हणजे पाणी अगर प्रवाहरूपी पदार्थ दुसऱ्या पदार्थांनां दाबूं शकतात. प्रत्येक दावाला नियमित दिशा असते हें सांगण्याचें कारण नाहीं. पाणी अगर प्रवाहरूपी पदार्थांचा दाव नेहमीं लंबात्मक असतो. वर दिलेल्या उदाहरणांत पट्टीला लंब काढला तर लंबानें दाखविलेल्या दिशेनें पाणी पट्टीस ढकलतें. एखाद्या पिचकारीचें तोंड गोल असून त्याला पुष्कळ छिद्रें आहेत अशी कल्पना करूं या पिचकारींतून पाणी उडविण्याचा प्रयत्न केला तर सर्व छिद्रांतून सारख्याच जोरानें पाणी बाहेर येतें असें दृष्टोत्पत्तीस येईल. यावरून प्रवाहरूपी पदार्थांच्या पृष्ठभागाला दाव दिला असतां तो सर्व ठिकाणीं सारख्या प्रमाणांत पोंचतो हा सिद्धांत काढून येईल. पाणी फक्त खालून वर किंवा वरून खालीं अशा एकाच दिशेनें दाबूं शकतें असें नाहीं. प्रवाहरूपी पदार्थांचा दाव सर्व दिशेनें असतो. जलरूपी पदार्थ खालून वर पदार्थ तोलून धरतात हें विशेष रीतीनें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. जलरूपी पदार्थांत दाव किती असतो हें समजण्याकरितां पुढील सिद्धांत दिले आहेत.

( १ ) क्षितिजाशीं समांतर असणाऱ्या पातळींत सर्व बिंदूंच्या ठिकाणीं समान दार्ढ्य असलेल्या जलरूपी पदार्थांचा दाव सारखा असतो.

( २ ) हवेचा दाव सोडून दिला तर समान-दार्ढ्य-जलरूपी पदार्थांचा दाव जसजसें खालीं जावें तसतसा वाढतो. जलरूपी पदार्थांचें एका घनफुटाचें वजन जर 'व' आहे असें समजलें तर कोणत्याहि बिंदूच्या ठिकाणचा दाव पुढील सूत्रानें काढतातः-

दाव = व×( खोली ).

हवेचा दाव धरला तर या सूत्रांत पुढील फरक करितातः—

दाव = व×( खोली )+हवेचा दाव.

प्रत्येक चौरस इंचावर हवेचा दाव साधारण १५ पौंडांच्या वजनाइतका असतो.

( ३ ) कोणत्याहि स्थिर जलरूपी पदार्थाचा पृष्ठभाग क्षितिजाशीं समांतर असतो.

( ४ ) भिन्न दार्ढ्य असलेल्या दोन किंवा अधिक जलरूपी पदार्थांत बिंदूच्या ठिकाणचा दाव पुढीलप्रमाणें काढतात. समजा कीं दोनच पदार्थ आहेत; वरच्या पदार्थाची खोली 'ख' फूट असून खालच्या पदार्थांत बिंदूची खोली 'खं' फूट आहे व वरच्या पदार्थांच्या घनफुटाचें वजन 'व',व खालच्या पदार्थाचें 'वं' आहे. तर त्या बिंदूच्या ठिकाणचा

दाव = व ख+वं खं, असेल.

जलरूपी पदार्थांत दुसरा पदार्थ बुडविला असतां तो तरंगेल कां बुडेल हें पुढील सिद्धांतावरून समजेलः—

एखाद्या जलरूपी पदार्थांत एखादा घन पदार्थ बुडविला असतां जितका जलरूपी पदार्थ बाजूस सारला जाईल त्याच्या वजनाइतक्या जोरानें भोंवतालचा जलरूपी पदार्थ त्या घन पदार्थास वर उचलतो किंवा तोलून धरतो. किंवा हेंच तत्त्व जास्त विशद रीतीनें पुढीलप्रमाणें सांगता येईलः—

( अ ) पदार्थाच्या व्यापाएवढ्या पाण्याचें वजन पदार्थाच्या वजनापेक्षां अधिक असलें तर तो पदार्थ पाण्यांत तरतो आणि त्याच्या वजनाइतकें पाणी एकीकडे सरतें.

( आ ) पदार्थाच्या व्यापाराएवढ्या पाण्याचें वजन पदार्थाच्या वजनापेक्षां कमी असलें तर तो पदार्थ पाण्यांत बुडतो आणि त्याच्याइतकें पाणी एकीकडे सरतें.

( इ ) पदार्थाच्या व्यापाएवढ्या पाण्याचें वजन पदार्थाइतकेंच असेल तर तो पदार्थ पाण्यांत पाहिजे त्या ठिकाणीं राहूं शकेल. हें तत्त्व "आर्किमिडीजचें तत्त्व" या नांवानें प्रसिद्ध आहे. या तत्वाचा उपयोग करून पदार्थांचें दार्ढ्य किंवा घनत्व काढितात. [ प्रो. वि. आ. आपटे ]

**जलसंत्रास**—हा पिसाळलेल्या जनावराच्या दंशानें अगर संसर्गानेंच केवळ माणसास होणारा भयंकर रोग आहे. व तो सांसर्गिक आहे हें निराळें सांगावयास नकोच. कोल्हे, लांडगे, मांजरें, गाई, बैल, घोडे यांस तर हा होतोच. पण कुत्र्यांत तो विशेषेकरून आढळतो. माणसास रोग होण्याचें कारण पिसाळलेल्या कुत्र्यानें दांतांनीं दंश केला कीं, त्या जखमेंतून त्याची सांसर्गिक असलेली लाळ रक्तांत प्रवेश करून माणसास हा रोग होतो. इतर प्राण्यांनां व विशेषतः कुत्र्यांनां हा रोग होतो. त्याचे प्रकार पुढें वर्णिल्याप्रमाणें आहेत.

उ ग्र ज ल सं त्रा स.—यांत कुत्रा प्रथम सुस्त, भित्र्यासारखा व कोठें हिंडण्याफिरण्यास नाखुष असा असतो. नंतर द्वितीयावस्थेंत त्याच्या जवळ जें कोणी जाईल त्याजकडे भीति व संशययुक्त, क्रूर, पिसाळलेल्या मुद्रेनें पाहून एकदम चिडून एका विशिष्ट रडक्या आवाजानें भोंकत भोंकत त्यास चावे घेण्याची त्याची बळकट प्रवृत्ति असते. नेहमीचें खाणें पुढें ठेविलें असतां त्यास तो तोंड लावीत नाहीं; आणि कोठें गवत,माती, केंस,कपडे, लांकडें इत्यादि जिनसांचे लचके तोडून चावीत बसतो. नंतर हातपाय, जबडा व सर्वांगास

पक्षाघाताप्रमाणें दौर्बल्य येऊन खालचा जबडा लोंबता व उघडा रहातो व त्यास चारी पायांवर उभें रहातां येत नाहीं, अन्न गिळतां येत नाहीं व मृत्यू येतो. मूकोन्माद रोगामध्यें पहिल्या वरील भेदांत जी पिसाळल्याप्रमाणें उन्मादावस्था असते ती नसते; आणि सर्वांगांत पक्षाघातावस्था एकदम लवकर प्राप्त होऊन मृत्यूहि लवकर येतो. या रोगास जें माणसास होणाऱ्या लक्षणावरून नांव पडलें आहे तें लक्षण म्हणजे पाण्याची भीति. हें लक्षण या दोन्हीं भेदांमध्यें कुत्र्यांत मुळींच नसतें.

कारणें:—पिसाळलेलें कुत्रें जितक्या लोकांनां चावतें त्यांतील सुमारें अर्ध्या लोकांनांच या रोगाची भावना पुढें होते असा अंदाज आहे. हात, पाय, तोंड इत्यादि वस्त्रहीन अंगास दंश झाला असतां लक्षणें हटकून कांहीं काळीं उद्भवतात; पण जर दंशाच्या भागांमध्यें कपडा अडकला असेल तर त्याच्या योगानें विषसंसर्ग होण्यास सर्व जरी नाहीं तरी कांहीं रोग्यांत तरी प्रतिबंध होतो. त्वचा किंचित् खरचटली असली असतां तेथें अगर श्लेष्मावरण त्वचेच्या ठिकाणीं रोगोत्पत्ति झालेल्या कुत्र्यानें प्रेमानें चाटलें तरी माणसास विषबाधा होते. हें विष प्राण्यांत टोंचून घातलें असतांना प्रयोगावरून असें सिद्ध होतें कीं हें विष शरीरांत मुख्य मज्जास्थानें आणि लालापिंड, अश्रुपिंड, स्तन व पँक्रिया पिंड यांच्या रसांच्या ठिकाणीं पसरून हीं इंद्रियें दूषित करतें. प्रयोगानें असें सिद्ध केलें आहे कीं हें विष दूरःस्थ मज्जातंतूच्या मार्गें शरीरांत पसरत जाऊन मध्यवर्ती मज्जास्थानांत प्रवेश करतें. हा रोग सर्व वयांच्या माणसांस होणें संभवनीय असतें. परंतु पुरुषाचें कुत्र्याशीं सांनिध्य विशेष रीतीनें घडत असल्यामुळें स्त्रियांत हा रोग कमी प्रमाणांत आढळतो.

लक्षणें:—दंशानें अगर संसर्गानें विषप्रवेष झाल्यानंतर रोग बराच कालपर्यंत गर्भावस्थेंत असतो. हा काळ बहुधां दोन ते नऊ आठवडे असतो. परंतु कित्येक महिनेंपर्यंतहि कधीं कधीं लांबतो व या काळामध्यें कांहीं एक रोगाचें चिन्ह नजरेस येत नाहीं. लक्षांत येण्यासारखें पहिलें लक्षण म्हणजे हें कीं दंश बरा होऊन जेथें वण असतो तेथें कांहीं चमत्कारिक तऱ्हेची वेदना भासूं लागते. कधीं तर ही वेदना अति तीव्र स्वरूपांत असते व तो वणहि किंचित लालसर झालेला आढळतो; व त्यावर बोट लाविलें असतां तेथें दुखतें. पण हींहि चिन्हें कांहीं रोग्यांनां मुळींच होत नाहींत; आणि मग प्रथम पुढील लक्षणें होऊं लागतात. हात पाय गळाल्यासारखे होऊन मनास व शरीरास चैन पडेनासें होतें. अंगाची उलघाल होणें, झोंप न लागणें, चिडखोरपणा, अन्नावर वांछा कमी कमी होणें व घशांत गुदमरल्यासारखें होऊन त्या ठिकाणीं अस्वस्थता वाटणें. यानंतर पुढील अवस्थेंत झटके व आंचके सुरू होतात व ते विशेष प्रकारचे असतात.रोग्यानें पाणी पिण्यासाठीं भांडें उचलण्याचा अवकाश किंवा पाणी अगर पाण्याचें भांडें नजरेस पडणें अथवा कोणी रोग्याला अमळ पाणी पाजा असें नुसतें म्हटलें तरी हे आंचके येतात. कांहीं कालानंतर एखादी पाण्याची झुळूक अगर एकदम लख्ख प्रकाश नजरेस पडला असतां अथवा कानावर एकदम मोठा ध्वनि ऐकूं आला असतां व अशासारख्या अन्य बाह्य कारणानेंहि आंचके येण्यास निमित्त पुरें होतें. अन्ननलिकेच्या स्नायूमध्यें हे आंचके येऊन अन्न अगर पाणी त्या नळीवाटे खालीं जात नाहीं. शिवाय श्वसनक्रिया ज्या स्नायूंच्या योगें होते त्या स्नायूंनांहि आंचके येतात व ते आपल्या नजरेस पडतात. रोगी एकदम हुंदका आल्याप्रमाणें अगर उसासा टाकल्याप्रमाणें एक दीर्घ श्वास झटकन घेतो. त्यावेळीं त्याचे खांदे उंच होतात; छाती विस्तृत होते व मानेचे मोठाले स्नायू श्वास आंत घेण्यासाठीं खूप ताठतात. रोग्यास वळेच पाणी पाजण्याचा यत्न केल्यास तें थुंकून टाकण्याची रोगी आपण होऊन पराकाष्ठा करतो आणि त्या पाणी पाजण्यानें आपण अत्यंत भेदरून गेलों असें दर्शवितो. यानंतर हे आंचके शरीरांत सर्वच स्नायूंमध्यें सुरू होतात. व ते धनुर्वातांतील आंचक्याप्रमाणें सतत असल्यामुळें सर्वांग ताठतें. रोग्याची गिळण्याची शक्ति नष्ट झालीं हें अन्य तऱ्हेनें लक्षांत येतें. तें असें कीं तोंडांत स्वाभाविक जी थोडी लाळ असते तिचे या रोग्यास मधून घुटके गिळतां न आल्यामुळें ती तोंडांत जमते व तिच्या फेसाळ अशा दाट चुळा तो चोहोंकडे कफ खाकरून बाहेर टाकल्या सारख्या सदा टाकीत असतो. यानंतर या आंचक्यांची तीव्रताहि उत्तरोत्तर वाढत जाते व त्यामुळें रोगी अधिकच चिरडखोर होऊन बोलत सुटतो अगर वात होऊन बरळतो किंवा वेडा होऊन जवळच्या माणसास इजा करण्याची प्रवृत्ति दाखवितो. कधीं त्यास विलक्षण मतिविभ्रम होऊन नाना तऱ्हेचे त्यास मिथ्याभास होतात. ज्वर वाढतो, रोग्यास खाऊं घालण्याचे सर्व श्रम वाया जातात. रोग्याच्यानें फारच मनोनिग्रह करून आंचके क्षणभर थांबवून धरलें तर एखादा दुधाचा घोट गेला तर जातो.अशी कठिण अवस्था प्राप्त होते.थोड्याच अवधींत या निरशनानें शरीर भयंकर कृश होतें, व ग्लानि येत जातें हें सांगण्यास नकोच. कधीं कधीं अगदीं शेवटीं शेवटीं हे आंचके थांबतात. आणि मृत्यू समीप आला असतांना रोग्यास बरेंचसें अन्न जातें. पण तें जाऊन कांहीं मृत्यु टळत नाहीं. त्यानंतर पक्षघात होऊन बेशुद्धि येते. कांहीं रोग्यांस त्यामुळें हात पाय हलविण्याची शक्ति, अगर स्पर्श जाणणें, गुदगुल्या होणें, डोळे फुंकर घातला असतां मिटणें या सर्व क्रिया नष्ट होतात. इतकीं सर्व लक्षणें होऊन मरण येण्यास दोनपासून चार दिवस बहुधां लागतात. रोग फारच लांबला तरी दहा दिवस फार तर रोगी जगतो; व कोणताहि रोगी बरा होत नाहीं. इंद्रियें

फारशीं बिघडलेलीं आढळून येत नाहींत. मस्तिष्कपृष्ठरज्जुजल वृद्धिंगत झालेलें बहुधां आढळतें. मस्तिष्काचा बहिर्भाग पृष्ठरज्जु व विशेषतः मेडाला ऑबलांगेटा या भागामध्यें पुढील सूक्ष्म फरक फक्त सूक्ष्मदर्शक यंत्रानेंच दिसणारे होतात ते असेः—रक्तवाहिन्यांचें विस्तरण व त्या भोंवतीं पेशींचे समुदाय. इतर ठिकाणीं असेच पेशींचे समुदाय व रक्तवाहिन्यांत गोंठलेले रक्तवाहिन्यांतून झालेले वारिकसारीख रक्तस्राव, पांढऱ्या पेशींचे समुदाय, लालापिंड व मूत्रपिंडाच्या ठिकाणीं बरेच आढळतात. नेग्री नांवाच्या शोधकानें कांहीं विशिष्ट कण मज्जापेशींत असलेले सिद्ध केले आहेत व ते जंतुकोटींपैकीं असावेत किंवा काय याविषयीं चर्चा सुरू आहे, कारण ते या रोगांत या ठिकाणीं सांपडतातच.

नि दा न.—जखम पूर्वी झाली होती व कुत्रें चावलें होतें हा पूर्वेतिहास माहीत असला म्हणजे हा रोग ओळखण्यास अडचण कांहींच नसते. या रोगाची मधली अवस्था धनुर्वाताप्रमाणें भासण्याचा संभव असतो; पण त्या वातामध्यें येवढी मनाची भ्रमिष्ट व बेभान स्थिति झालेली नसते. भीतिजन्य वातोन्मादाच्या रोग्याचें, विशेषतः त्यास अगोदर एखादा कुत्रा चावून हा रोग होण्याची धास्ती त्यास पडली असेल तर या रोगाशीं पुष्कळ साम्य असतें. त्या रोगांत असणाऱ्या उन्मादकंदुकवातानें या रोगांत असणाऱ्या गलसंकोचन या लक्षणाशीं बरेंच सादृश्य रोग्यास भासून तो विनाकारण भितो. अशा काल्पनिक भीतीनें कांहीं काळपर्यंत जलसंत्रासभ्रम अशा प्रकृतीच्या माणसामध्यें होऊं शकतो. याचें खात्रीनें निदान होण्यासाठीं या रोगानें मृत झालेल्या प्राण्याचा मेडाला ऑबलांगेटा नांवाचा मस्तिष्कांतील मगजाचा दाट द्रव तयार करून तो एखाद्या सशाच्या मस्तिष्कावरणाखालीं टोंचतात. आणि मग त्यास हा रोग झाला म्हणजे रोगाच्या निदानास बळकटी येते. दंश करणाऱ्या कोणत्याहि प्राण्यांमध्यें हा रोग आहे किंवा नाहीं याची सत्यता या पद्धतीनें नेहमीं सिद्ध करितां येते. हिपोकँपस मेजर नांवाचा एक भाग या मगजांत असतो त्याचे पातळ पापुदरे कातरून सूक्ष्मदर्शक यंत्रांतून तपासूनहि हा रोगाचें निदान ठरवितात.

उ प चा र.—रोग दिसूं लागल्यावर कोणत्याहि उपायाची मात्रा त्यावर चालत नाहीं असा अनुभव आहे. फक्त मार्फिया हें औषध मधून मधून टोंचिल्यानें अगर क्लोरोफार्म हुंगविल्यानें रोगी गुंगून पडतो व त्याचे क्लेश कमी झाल्यासारखे होतात. पण ही स्थिति येऊं नये यासाठीं पुढील प्रतिबंधक उपाय करणें श्रेयस्कर होयः—दंश झाल्यावरोबर दंशाचे जरा वरील भागावर तावडतोब एका दोरीनें ( दंश हातपायादिकांस झाला असल्यास ) घट्ट बांधावें; व नंतर ज्या माणसाच्या ओंठाची त्वचा शाबूत असेल त्यानें ती जखम चोखून रक्त थुंकून टाकावें व वरचेवर साध्या पाण्यानें चुळा खुळखुळवून टाकीत जाव्या. नंतर दंशाच्या ठिकाणीं नैट्रिक आसिडानें अगर लोखंड लाल होईतों तापवून भाजावें. अथवा शस्त्रानें जखमेचा भाग कापून काढून नंतर रोग्यास पास्टयूर संस्थेमध्यें रोगप्रतिबंधक औषधोपचार करून घेण्यासाठीं पाठवावें.

पास्टयूरच्या प्रतिबंधक उपायांचें त्रोटक वर्णनः—पिसाळलेल्या कुत्र्याचें विष अनेक सशांच्या शरीरांत टोंचून घालून नंतर त्यांस हवा लागेल अशी योजना करून नंतर तें विष रोग्यास टोंचितात. यासाठीं प्रथम सशाच्या डोक्याच्या कवटीस भोंक पाडितात. आणि पिसाळलेल्या कुत्र्याच्या पृष्ठरज्जूचा कांहीं भाग घेऊन त्याचा दाट द्रव तयार करून या भोंकाच्या मार्गें मस्तिष्कावरणाखालीं टोंचितात; म्हणजे मग तो ससाहि पिसाळतो. पण रोगचिन्हें दिसूं लागण्यास पंधरा दिवस लागतात. या वेळास रोगाच्या गर्भावस्थेचा काळ म्हणतात. या पहिल्या सशाचें विष दुसऱ्या सशास व दुसऱ्या सशाचें तिसऱ्या सशास याप्रमाणें टोंचीत गेल्यानें उत्तरोत्तर रोगाच्या गर्भावस्थेचा काळ कमी कमी होत जाऊन अखेरीस तो सात दिवसांवर येतो. या सशाच्या पृष्ठरज्जूच्या सर्व भागांत हें विष पसरलेलें असतें; परंतु तिचा एखादा तुकडा कापून तो कोरड्या हवेंत ठेविला असतां त्यांतील विष हवामिश्रित झाल्यामुळें उडून कमी होऊन हीनवीर्य होतें व शेवटीं त्या तुकड्याचें आकारमान आणि हवेचें उष्णमान या दोहोंच्या मानानें थोड्या अगर फार अवधीनंतर त्या तुकड्यांतून तें विष साफ नाहींसें होतें. प्रतिबंधक उपाय करण्यासाठीं जो दाट द्रव तयार करतात त्यासाठीं असे पृष्ठरज्जूचे तुकडे कोरडी हवा असलेल्या निरनिराळ्या बाटल्यांतून ठेवितात व हे सशाच्या शरीरांतून घेतलेले असतात. कोणता तुकडा कोणत्या दिवशीं त्या बाटलींत ठेवला गेला आहे त्याची नोंद त्या बाटलीवर एक कागद डकवून त्यावर करितात. अशा तऱ्हेनें या बाटल्यांतील पृष्ठरज्जूंचे तुकडे कमी अगर अधिक दिवसांचे जुने असल्यामुळें त्यांतील विषाच्या तीव्रतेतहि कमीजास्तपणा असतो. आतां समजा कीं एखादा तुकडा पंधरा दिवस ठेवलेला आहे आणि त्याचा थोडासा भाग एखाद्या निरोगी कुत्र्याच्या शरीरांत त्वचेखालीं टोंचून घातला; व त्यानंतर वरीलप्रमाणें चवदा दिवस वाळलेल्या तुकड्याचा अंश दुसऱ्या दिवशीं, तिसऱ्या दिवशीं तेरा दिवस वाळलेला; चवथ्या दिवशीं बारा दिवस वाळलेला; अशा क्रमानें एकच दिवस फक्त जो तुकडा वाळला आहे असा जलाल विष असलेला तुकडा शेवटीं टोंचण्यांत येतो. नंतर असा चमत्कार अनुभवास येतो कीं, अशा कुत्र्यास या रोगाची विषबाधा होत नाहीं. पिसाळलेलें कुत्रें चावलेल्या माणसास या प्रकारानेंच कित्येक दिवस टोंचून प्रतिबंधक उपाय करतात. मात्र दंश झाल्यानंतर व रोगलक्षणें दिसूं लागण्याच्या अगोदर जितक्या लवकर हा

उपाय करतां येणें शक्य असेल तितक्या लवकर तो उपाय करावा हें चांगलें. म्हणजे मग या प्राणघातक रोगापासून रोग्याचा बचाव खात्रीनें होतो. कांहीं रोगी जास्त तीव्रतेच्या लक्षणांनीं पीडित असे आढळल्यास त्यांस टोंचण्यासाठीं वरीलप्रमाणेंच परंतु अधिक तीव्रशक्तीचा घट्ट द्रव तयार करून टोंचतात व टोंचण्याची क्रिया वरचेवर अधिक वेळां करावी लागते.

बुडापेस्ट येथील एका डाव्‍..नें या प्रातिबंधक उपायाची वेगळी तऱ्हा शोधून काढली आहे ती अशीः— प्रथम ज्या सशांत हा रोग कृत्रिम रीतीनें उत्पन्न केला आहे अशा सशाची पृष्ठरज्जू घेऊन तिचा १:१०० या प्रमाणांत असलेला असा पातळ द्रवार्क तयार करावयाचा. नंतर त्यांत अधिकाधिक पाणी घालून १:१०००० प्रमाणापर्यंत निरनिराळ्या विषशक्तीचे द्रवार्क तयार करून ठेवावयाचे. रोगी आला म्हणजे त्यास प्रथम अत्यंत हीनशक्तीच्या द्रवार्कांनें टोंचण्यास आरंभ करून दररोज अधिकाधिक तीव्रतेचें प्रातिबंधक औषध टोंचून शेवटीं अत्यंत तीव्र द्रवार्क टोंचावयाचा. रोगलक्षणें सुरू झाल्यावर तो बरा करण्याच्या लशी कित्येक शोधकांनीं तयार केल्या आहेत पण त्या या विशिष्ट विषावर अचूक गुण दाखवितातच असें नाहीं. त्या सामान्य जंतुविनाशक असल्यामुळें थोडासा गुण वाटतो एवढेंच. पास्टयूरनें जी हल्लीं रूढ असलेली पद्धति शोधून काढली आहे तिची सर या लशींनां मुळींच नाहीं. फार तर तावडतोब पास्टयूर संस्थेंत एकदम जाणें शक्य नसल्यास मधल्या मुदतींत त्याचा उपयोग करणें रास्त होईल.

एखाद्या वस्तींत पिसाळलेलें कुत्रें असलें म्हणजे तें मरेपर्यंत दुसऱ्या कुत्र्यांस व प्राण्यांस दंश करकरून जनतेमध्यें संसर्ग फैलावण्यास कारण होतें. यासाठीं असे एक दोन कुत्रे आढळल्याबरोबर घरच्या सर्व पाळीव कुत्र्यांस, लोकांस दंश करतां येऊं नये अशा तजविजीच्या तारेच्या मुसक्या घातल्याच पाहिजेत अशी सक्ति इंग्लंडांत कायद्यानें करितात. व अशीं पिसाळलेलीं कुत्रीं अगदीं आढळत नाहींत असें झालें म्हणजे ही सक्ति काढून टाकतात. आपल्या देशांत फक्त बिनपाळीव कुत्रीं कुचल्याच्या सत्त्वाचें विष घालून ठार करणें एवढीच खबरदारी घेतात.

**जलारपेठ**—मद्रास, सालेम जिल्हा, तिरुपत्तुर तालुका. उ. अ. १२°३५′ व पु. रे. ७८°३४′ लो.सं. (१९०१) २०५०. मद्रास सदर्न मराठा रेल्वे आणि साऊथ इंडियन रेल्वे यांचे हें जंक्शन असल्यामुळें यास महत्त्व आलें आहे. हा गांव मद्रासपासून १३२ मैल व बंगलोरहून ८७मैल आहे.

**जलालखेड**—मध्यप्रांत, नागपूर जिल्हा, काटोल तहसील. काटोलच्या वायव्येस १४ मैल व नागपुराहून ५३ मैलांवर वर्धा नदीतीरीं हें खेडेगांव आहे. लोकवस्ती सुमारें दोन हजार आहे. या ठिकाणीं मराठ्यांनीं बांधलेला एक चांगला किल्ला आहे. एके काळीं हें भोसले राज्यांतील पश्चिम सरहद्दीवरील ठाणें होतें. वर्धा नदींतील एका खडकाळ बेटावर हा किल्ला बांधलेला असून तीन बाजूंनीं खडकांचे सुळके असून ते नदींत आहेत. चवथ्या बाजूस दरवाजा असून त्यास खडकांतच खोदलेल्या नागमोडी रस्त्यानें जावें लागतें;व त्याचें रक्षण करण्याकरितां दोन बुरूज आहेत.

**जलालाबाद**—या नांवाचा अफगाणिस्तानांतील एक प्रांत असून त्याच नांवाचें एक शहर आहे. हें शहर काबूल नदीच्या दक्षिणेकडील मैदानांत समुद्रसपाटीपासून १९५० फुट उंचीवर काबूलपासून ९६ मैल अंतरावर व पेशावरपासून ७६ मैलांवर आहे. तेथील लोकसंख्या सुमारें ४००० आहे. पेशावर व या शहरामध्यें खैबरघाट आहे व काबूल व जलालाबादमध्यें जगडालक, खुर्दकाबूल वगैरे घाट आहेत. ही जागा बाबरनें पसंत केली व त्यानें या ठिकाणीं कांहीं बगीचे लाविले. परंतु हें शहर त्याचा नातू अकबरशहा यानें इ. स. १५६० मध्यें वसविलें. काबूलच्या धर्तीवर बांधलेलें हें एक छोटेखानी शहर आहे. येथें एक मुख्य बाजार आहे; व येथील रस्ते साधारणतः फार अरुंद आहेत. या शहराच्या इतिहासासंबंधीं विशेष ध्यानांत ठेवण्याजोगी गोष्ट म्हटली म्हणजे पहिल्या अफगाण लढाईच्या वेळीं स. १८४१ नोव्हेंबरपासून इ. स १८४२ एप्रिलपर्यंत सर राबर्ट सेल यानें या शहराचा केलेला प्रसिद्ध बचाव ही होय. हें शहर इ.स.१८४२मध्यें सोडून दिल्यानंतर जनरल पोलक यानें या शहराची तटबंदी पाडून टाकली. पण १८७८ मध्यें ती फिरून बांधण्यांत आली. आतां या शहराला मजबूत भिंतीची तटबंदी असून तिला बुरूज व झरोके आहेत. जलालाबादचा प्रांत सुमारें ८० मैल लांब व ३५ मैल रुंद असून त्यामध्यें काबूल नदीच्या उत्तरेकडील लाघमन जिल्हा व दक्षिणेकडील निंग्राहार जिल्हा यांचा समावेश होतो. येथील हवा पेशावरसारखी आहे. व्यूहरचनाशास्त्रदृष्ट्या जलालाबाद हें अफगाणिस्तानांतील एक अतिशय महत्त्वाचें ठाणें आहे; कारण येथून लाघमन व कुनारखोऱ्यांच्या प्रवेशद्वारांवर नजर ठेवितां येते व येथून खैबरघाटाच्या उत्तरेस चित्रळ व हिंदुस्थान यांचे रस्ते, तसेंच काबूल–पेशावर रस्ता यांच्यावर ताबा ठेवितां येतो.

येथील कोरीव लेणीं गया येथील कोरीव लेण्यांसारखीं हुबेहुब दिसतात कीं त्यांमध्यें कांहीं तरी संबंध असला पाहिजे असें विल्यम सिम्सन् साहेबास वाटतें. [ इंडियन अँटिक्वरी, पुस्तक ८ पान २२९, आगष्ट, १८७९ ]

**जलालाबाद**, तहसील.–संयुक्तप्रांतांतील शहाजहानपूर जिल्ह्याची नैर्ऋत्येकडील तहसील असून तिचें क्षेत्रफळ ३२४ चौरस मैल आहे. उ. अ. २७°३५′ ते २७°५३′ व पू. रे. ७९°२०′ ते ७९°४४′. लोकसंख्या (१९११) १७३७५५. या तहसिलींत एक गांव व ३५६ खेडीं आहेत. इ. स.१९०३–४ मध्यें जमीनमहसूल २१७००० रुपये होता. तहसिलीच्या

नैऋत्येस गंगा नदी वहात असून ती रामगंगा तहशिलींतूनच वहात जाते.

गांव.—संयुक्तप्रांत. शहाजहानपूर जिल्हा. वरील तहसीलीचें मुख्य ठिकाण. उ. अ. २७°४३' व पू. रे. ७९°४०'. लोकसंख्या (१९११) ६२६० हा गांव जलालुद्दीन फिरोझशहा यानें वसविला असें म्हणतात. या गांवाजवळून रेल्वे जात नसल्यामुळें याचें महत्त्व कमी होत चाललें आहे.

**जलालाबाद्**—संयुक्तप्रांत. मुझफरनगर जिल्हा कैराण तहसील. मुझफरनगरपासून २१ मैलांवर हा गांव आहे. उ. अ. २९°३७' व पू. रे. ७७°२७'. लोकसंख्या (१९११) ५१६६. अवरंगझेबाच्या कारकीर्दीत जलालखान नांवाच्या पठाणानें वसविलें असें म्हणतात. जवळच एका मैलावर नजीबखान रोहिल्यानें बांधलेल्या घोसगड किल्ल्याचे अवशेष आहेत. झाबितखानाच्या कारकीर्दीत हा गांव पुष्कळ वेळां मराठ्यांनीं लुटला होता. अद्यापि एका मराठ्यास तेथें थोडेसें इनाम आहे.

**जलाली**—संयुक्तप्रांत, अलिगड जिल्हा, अलिगड तहसील. अलिगडच्या आग्नेयीस ११ मैलांवर हें एक सात आठ हजार लोकवस्तीचें गांव आहे. उ. अ. २७°५२' आणि पू. रे. ७८°१६' यांमध्यें आहे. येथील अधिकारी मुसुलमान (सैय्यद) असून ते शिया पंथाचे आहेत. ते कोणा कमालुद्दीनाचे वंशज असून त्यांनीं सन १२९५ च्या सुमारास येथें वसाहत केली असें म्हणतात. यांनीं पठाण जमीनदारांनां हांकून देऊन गांवचे सर्व हक्क आपण बळकाविले. ते अद्यापि त्यांच्याकडे चालत आहेत. येथें व्यापार फारसा नाहीं.

**जलालुद्दीन मुहम्मद वल्खी**—हा जातीचा कुफिक मुसुलमान असून बल्खचा रहिवासी होता. हा १२०७ त जन्मला. लहानपणीं हा बापासह बलख सोडून निशापुरास आला. तेथून ते मक्का जेरूसलेम करून तुर्कस्थानांत गेले. त्यावेळीं सेलजुक घराण्यांतील अल्लाउद्दीन हा राजा होता. तो जलालुद्दीनाचा शिष्य बनला. जलालचा गुरू शम्सुद्दीन म्हणून एक औलिया होता. जलालचा पट्टशिष्य व लेखक हिसाम म्हणून होता. जलालनें गुरूच्या स्मरणार्थ हिंडणाऱ्या दरवेशांचा एक पंथ स्थापिला. या पंथाला याचेंच नांव पडलें. हा पंथ अद्यापीहि तुर्कस्तानांत आहे. हिसाम हाच जलालच्या पुढें या पंथाच्या गादीवर बसला. जलाल हा कवि होता. त्याच्या काव्यग्रंथाचें नांव मसनवी. हा ग्रंथ सहा अध्यायांचा असून त्यांत निरनिराळे विषय, कथा, पौराणिक गोष्टी, कुराणांतील वचनें वगैरेंचा संग्रह असून त्यांत कुफी तत्त्वज्ञान प्रमुखपणें सांगितलेलें आहे. याचा दुसरा ग्रंथ दिवाण (काव्यग्रंथ) म्हणून आहे. मृत्यूच्या वेळीं यानें पुढील आज्ञा आपल्या शिष्यांनां केली. ईश्वराची भीति बाळगा, मिताचरणी बनून ईश्वराची प्रार्थना करा, निरिच्छ होऊन मानापमान सहन करा व सत्समागम मिळवून मानव जातीच्या उपयोगीं पडा. याचा मुलगा सुलतान हा कवि होता. जलाल हा स. १२७३ त मेला. [इंडियन ॲंटिक्वरी, पु. ४]

**जलालुद्दीन सयुती**—हा ईजिप्त देशचा रहिवासी असून स. १५०५ त मरण पावला. यानें लहान मोठे सुमारें ४०० ग्रंथ लिहिले होते. त्यांत लुब्ब-उल्-लुबाब हा ग्रंथ नांवाजण्यासारखा आहे. यांत त्याच्या पूर्वी होऊन गेलेल्या अरबी ग्रंथकारांनां ज्या ज्या लोकांनीं आश्रय दिला होता, त्यांचीं नांवें व चरित्रें दिलीं आहेत. त्यावेळीं अरबी ग्रंथकाराचें स्वतःचें नांव फारसें पुढें येत नसे, तर त्याच्या आश्रयदात्यांचेंच नांव पुढें येई. याप्रमाणें हें पुस्तक म्हणजे एक प्रकारचा ग्रंथकार-कोश आहे. याशिवाय काशफुस-सलसल-उन्-वसफुज-झलझल या नांवाचा एक ग्रंथ त्यानें केला आहे. त्यांत इ. स. ७१२ पासून १५०० पर्यंत झालेल्या एकंदर भूकंपांची माहिती दिलेली आहे. याचें (मूळचें अरबी भाषेंतील) इंग्रजी भाषांतर डॉ. स्प्रिंजर यानें केलें आहे. [बील—ओरि. बायॉ. डिक्श. जर्नल एशियाटिक सोसायटी, पु १७ भा. २]

**जलेश्वर** (जेलासोर)—बंगाल, बलसोर जिल्हा. सुवर्णरेखा नदीवर उत्तर अक्षांश २१° ५१' व पूर्व रेखांश ८७° १३' यांवर हें खेडें वसलेलें आहे. कलकत्याच्या रस्त्यावर हें खेडें असून बंगाल नागपूर रेल्वेचें हें स्टेशन आहे पूर्वी मुसलमानांच्या अमदानींत मिदनापूर सुभ्याची राजधानी होती. अठराव्या शतकांत ईस्ट इंडिया कंपनीची एक फॅक्टरी येथें होती.

**जलेसर**, त ह सी ल.—संयुक्तप्रांत, इटा जिल्हा. उत्तर अक्षांश २७° १८' ते २७° ३५' व पूर्व रेखांश ७८° ११' ते ७८° ३१'. क्षेत्रफळ २२७ चौरस मैल. सन १९११ मध्यें लोकसंख्या १२४६७२. या तहसीलींत १५७ खेडीं व दोन गांवें आहेत. जमीन सपाट असून सुपीक आहे. बागाइतीकरितां कालव्याचें पाणी मिळतें.

गांव.—हें जलेसर तहशिलीचें मुख्य ठिकाण असून ईस्ट इंडिया रेल्वेच्या जलेसर रोड नांवाच्या स्टेशनपासून ८½ मैलांवर आहे. उ. अ. २७° २८' व पू रे. ७८° १९.' सन १९११ त लोकसंख्या १३२८३. गांवाचे दोन भाग आहेत; एक किल्ला, व दुसरा गांव. किल्ला पंधराव्या शतकांत मेवाडच्या राण्यानें बांधला असें म्हणतात. हल्लीं किल्ल्याच्या जागेवर सर्व सरकारी कचेऱ्या आहेत. गांवांतील रस्ते अतिशय अरुंद आहेत. सन १८६६ मध्यें म्युनिसिपालटी मिळाली. येथें व्यापार फारसा नाहीं. एक सोऱ्याचा कारखाना आहे.

**जलोदर** (उदर)— शरीरांतील कोणत्याहि भागांत रोगामुळें पाणी सांचून सूज येते तेव्हां त्यास उदर किंवा जलोदर झालें आहे असें म्हणतात. व या लेखांत जलोदर (पोटांतील) व शरीरावरील सूज यांचें वर्णन मुख्यतः येईल. हे दोन्ही रोग बहुतकरून एकाच वेळीं झालेले असतात. ज्या

हातापायांवर अगर चेहऱ्यावर सूज आलेली असते तेथें बोटानें दाबलें असतां खळगा पडतो व बऱ्याच वेळानें तो आपोआप बुजून येऊन पुन्हां सूज दिसते. रोग्यास उताणा निजवून त्याच्या पोटावर आडवीं बोटें ठेवून बोटांनीं ठोकून पाहिलें असतां निरोगी मनुष्याच्या पोटाप्रमाणें नगाऱ्यासारखा अगर पोकळ आवाज न येतां, आंत पाणी असल्यामुळें बद्द आवाज येतो व एखाद्या वेळीं हें पाणी फारच असून पोट फार मोठें झालेलें असतें. या रोगांत अंत्रावरणाचे पडद्यांत पाणी सांचतें. ह्यास स्वतंत्र रोग मानीत नाहींत; तर हृदय, यकृत अथवा मूत्रपिंड या रोगांचें पर्यवसान या भयंकर लक्षणांत होतें. याचीं इतर कारणें वरींच आहेत; पण मुख्यतः तीन प्रकारचीं वर सांगितलेलीं आहेत त्यांपासून बहुतकरून हा होतो.

यकृतविकारामुळें होणारें जलोदरः—यकृतामध्यें पोर्टेलव्हेन नांवाची मोठी शीर, जाठर व आंतडीं यांतील रक्त यकृतांत पोंचविणारी असते. या शिरेवर यकृताच्या नाना तऱ्हेच्या रोगामुळें दाब पडतो. उदाहरणार्थ अट्टल दारुबाज लोकांत या यकृताचें संकोचन होतें अथवा जुनाट हिंवतापांत ही शीर व तिच्या सर्व शाखा दबल्या जातात व भराभर जलोदर होऊं लागतें. अगर यकृताजवळील भागांत ग्रंथिरोग नांवाचा असाध्य रोग होऊन त्याचा दाब या शिरेवर पडूनहि हें जलोदर होतें. पोट घागरीएवढें होतें. एखाद्या वेळीं कावीळहि होते. उलटया होतात, मलावरोध असतोच, पोटावर निळसर शिरा फुगलेल्या दिसतात. पाणी फार वाढल्यावर श्वास घेणें, निजणें, बसणें, हलणें, हें सर्व कष्टानेंच होतें. ब्रँडीसारखी कडक दारू अति पिणारांना हा रोग विशेष होतो. व तो उपचार करूनहि कष्टसाध्य अगर शेवटीं असाध्यच असतो.

रक्ताशय विकृतीमुळें होणारें जलोदरः—यामध्यें पोटांत पाणी होण्याचे अगोदर पावलांवर व पायांवर सूज येते. रोग्यास खोकला, दम व छाती धडधडणें, हीं लक्षणें अगोदरपासून असतात. खोकल्याबरोबर क्वचित् रक्त येतें. रोगी धापा टाकतो. चांगली झोप येत नाहीं. स्वप्नें पडतात. खोकल्यामुळें वरचेवर उठावें लागतें. धास्ती वाटते. अन्न पचत नाहीं. पायाचे घोटे व डोळ्यांचीं पोटें यांवर सुजेची टापशी दिसूं लागते. व नंतर पोटाचें जलोदर झालेंच तर तें शेवटीं होतें व तें औषधोपचारानें बरें होतें.

मूत्रपिंडाच्या व्याधीमुळें होणारें जलोदरः—या रोगांत रोगी सकाळीं जागा झाल्यावर सूज प्रथम डोळ्यांच्या भोंवतीं व तोंडावरच प्रथम दिसते. यामुळें बहुधा ती रोग्यास प्रथम न कळतां त्याच्या आप्तांसच प्रथम समजते. नंतर सर्व शरीरहि हलुहलु सुजूं लागतें. लघवी थोडी होऊं लागून तींत रक्त व आलब्यूमिन नांवाचा पदार्थ जाऊन शरीर अशक्त होतें. जुनाट रोग असल्यास रक्त जात नाहीं. एखाद्या वेळीं पापण्या सुजेनें इतक्या जाड होतात कीं त्यांमुळें डोळेहि झांकून जातात. हात, पाय, शिश्न व वृषण हे अवयवहि अतिजाड होऊन त्यांवरील सूज फुटून पाणी पाझरूं लागतें. हीं लक्षणें नवीन विकारांत विशेष होतात व यांतच पोटांतहि जलोदर होतें. हें जलोदर औषधोपचारांनीं बरें होण्याचा पुष्कळ संभव असतो. याशिवाय लहान मुलाच्या पोटांत डबारोग होऊन, अथवा म्हाताऱ्या माणसांत ग्रंथिरोगामुळें अगर पंडुरोगामुळें रक्तनाश फारच होऊन अंत्रावरणाचा दीर्घकालीन दाह सुरु होऊनहि जलोदर होतें. पण हीं कारणें क्वचितच घडतात व फारशीं नजरेस येत नाहींत. व जीं येतात तीं असाध्य असतात.

उपायः—हा स्वतंत्र रोग नसल्यामुळें मूळ ज्या रोगामुळें तें झालेलें असतें तो रोगच बरा करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. नुसतें पोटांतील पाणी काढून टाकण्यानें उपयोग होत नाहीं. कारण तें पुन्हां लवकरच भरतें. वरील सर्व कारणांस एकच उपाय लागू पडणार नाहीं हें उघड आहे. यासाठीं अनुभविक माणसाकडून औषध घ्यावें. शरीरांतील विकृत पाणी बाहेर निघून गेलें पाहिजे हें सर्व उपायांत मुख्य तत्त्व आहे. यकृताच्या विकारांत तें पाणी विशिष्ट रेचक औषधें देऊन कोठ्याच्या मार्गानें पडून जाईलसें करतात. हृदयामुळें होणाऱ्या जलोदरांत मूत्रमार्गानें पाण्याचा निकाल व्हावा असा उद्देश असतो व मूत्रपिंडाच्या व्याधीमुळें होणाऱ्या जलोदरांत विशिष्ट रेचक, औषधें, घाम आणणारीं औषधें व मूत्र वाढविणारीं औषधें देऊन या सर्व मार्गांनीं म्हणजे कोठा, त्वचा, व मूत्रपिंड यांच्या वाटें सांचलेलें पाणी निघून जातें. कित्येक वेळां मूळ रोगच इतका तीव्र असतो कीं, त्यांत रोग्याचा अंत झाल्यावांचून रहात नाहीं. अशा वेळीं जलोदराचें पाणी शस्त्र टोंचून त्याच्या नळीच्या मार्गें बाहेर काढतात. त्यामुळें रोग्यास कांहींसा आराम वाटतो व श्वासास अडचण पडणें कमी होतें. पण पुढें अशक्तता येते व पुन्हां पोट पाण्यानें भरून जातें. अन्न व पाणी याच्या ऐवजीं दुधावर राहिल्यानें उदररोगांत पुष्कळ फायदा होतो. सर्व प्रकारच्या जलोदरांत हें पथ्य चांगलेंच आहे पण विशेषतः मूत्रपिंड विकृतिजन्य जलोदरांत या पथ्याचा विशेष गुण दिसतो. गोमूत्रप्राशन, वाफारा, व जुलाब हे उपाय देशी वैद्यकांत सांगितलेले आहेत. गोमूत्र नुसतें, अगर इतर औषध अगर काढे यांबरोबर देतात. घाम निघाल्यानें रोग्यास फार बरें वाटतें. जितका घाम निघेल तितकें पाणी त्वचेच्या द्वारें निघून जातें. अति घाम काढल्यानेंहि कधीं कधीं शक्ति कमी होते. कोरडा वाफारा घेऊन घाम काढण्याचा एक प्रकार आहे. वाफारा गरोदर स्त्रियांस, मेंदूचे विकार असतांना, हृदय फार अशक्त झालें असल्यास अगर जेवणानंतर लागलीच देऊं नये. तसेंच रोगी अत्यवस्थ स्थितींत असल्यास हा उपचार करणें तहकूब ठेवावें.

आ यु र्वे दी य वि वे च न.—पोटाच्या कुशी मोठ्या होणें यास सामान्यतः उदर म्हणतात. दोषांनीं शरीरांतील खालचीं व वरचीं जलवाही स्रोतसें बंद झालीं आणि त्यामुळेंच प्राण व अपान वायू आणि अग्नि हे दुष्ट झाले म्हणजे दोष, त्वचा व मांस यांच्या मध्यमार्गी गेले असतां पोटाच्या कुशी मोठ्या होतात.

हा रोग अतिशय उष्ण, खारट, क्षारयुक्त, विदाही, आंबट, रुक्ष, मलिन, अशा खाण्यानें तसेंच ओकारीचीं व रेचक औषधें घेतल्यानंतर योग्य पथ्य न केल्यानें, मलमूत्रादिकांचे वेग धारण केल्यानें, पानथरी, मूळव्याध, संग्रहणी, यांनीं कृशता आल्यानें, पंचकर्माचा अनुक्रम चुकल्यानें, आंतडें फुटलें किंवा फाटल्यानें, मलसंचयानें गुदद्वारांतील वळींत मळ अडकल्यानें व अजीर्णानें होतो. प्रायः या रोगास अग्निमांद्य हेंच कारण आहे.

हा रोग आठ प्रकारचा आहे. ( १ ) वातोदर, ( २ ) पित्तोदर, ( ३ ) कफोदर, ( ४ ) सन्निपातोदर, ( ५ ) प्लीहोदर, ( ६ ) बद्धोदर ( ७ ) क्षतोदर, व ( ८ ) जलोदर असे ते आठ प्रकार आहेत.

या रोगानें पीडिलेला मनुष्य तालु व ओंठ सुकून गेलेला, हात, पाय, व पोट सुजलेला, बारीक, कुशी फुगलेला, आहार व शक्ति कमी झालेला, हिंडण्याफिरण्यास असमर्थ असून जणूं काय प्रेतच असा दिसतो. उदर होण्याच्या पूर्वी खालीं लिहिल्याप्रमाणें पूर्वचिन्हें होतातः—

भूक लागत नाहीं. खाल्लेलें अन्न लौकर पचत नाहीं. पुष्कळ वेळानें पचतें व तें पचतांना अंगाची व पक्षाची आग होते. थोडेंसें जरी जास्त अन्न खाल्लें तरी पोटाला तडस लागते. अन्न जिरलें किंवा न जिरलें हें समजत नाहीं. एकदम शक्ति कमी वाटते, थोडेंसें चाललें तरी दम लागतो, अंड मोठा होतो, शौचाला होत नाहीं, थोडी पायाला सूज येते, हलकें व थोडें अन्न खाल्लें किंवा मुळींच अन्न न खातांहि ओटीपोटांत दुखतें व ताण वसतो. पोटावर शिरा दिसूं लागतात. पोटाच्या वळ्या मोडतात.

उदराचीं लक्षणें:—डोळ्यांवर झांपड, अंग गळणें, मळाचा अवरोध, अग्निमांद्य, दाह, सूज, पोट फुगणें व शेवटीं पाणी होणें. उदरात पाणी होण्यापूर्वी पोटाचा रंग अरुण असतो, त्यास सूज नसते, तें फार जड वाटत नाहीं, शिरांनीं गुंडाळलेलें दिसतें,आणि त्यांत नेहमीं गुडगुड आवाज होत असतो. बेंबी व आंतडीं यांस फुगवून त्यांतून वायु जोरानें फिरतो, व नाहींसा होतो. त्यानें हृदय, कंबर, बेंबी, गुदद्वार आडसंधी, हीं दुखतात. अपानवायू सरतांना आवाज होतो. शौचास होत नाहीं, लघ्वीस थोडें होतें, अग्नि फारसा मंद नसतो, खाण्यावर फार असक्ति असते, व तोंड बेचव नसतें.

वातोदरः—वातोदरांत हात, पाय, वृषण व कुशी सुजतात. कुशी, बरगड्या, पोट, कंबर, व पाठ, यांत शूळ होतो. हाडांचे सांधे फुटतात. कोरडी ढांस येते, अंग दुखतें, कंबरेच्या खालचा भाग जड वाटतो. मळाचा अवरोध-त्वचा, डोळे, नखें, हात, पाय, हीं काळसर आरक्त होतात. पोट एकाएकीं वाढतें व लहान होतें, पोटांत टोंचण व फाटल्यासारखी वेदना होते. बारीक व काळ्या रंगाच्या शिरा पोटावर दिसतात. पोटावर टिचकी मारली असतां फुगलेल्या पखालीसारखा आवाज निघतो. आणि वायु शूळ व शब्द करीत पोटांत चोहोंकडे फिरतो.

पित्तोदरः—यांत ताप, मूर्छा, दाह, तहान, तोंड तिखट होणें, भ्रम, जुलाब, त्वचा, डोळे, नखें हीं पिवळीं होणें, पोट हिरव्या रंगाचें होणें, पिवळ्या व तांबूस रंगाच्या शिरांनीं पोट आच्छादित होणें,पोटास घाम येणें, तें कढत लागणें, त्यांत दाह होणें,त्यांतून धूर निघाल्यासारखें वाटणें,पोट हातास मऊ लागणें, लौकर पाणी होणें व दुखणें हीं लक्षणें असतात.

कफोदरः—कफोदरांत अंग गळाल्यासारखें वाटतें, स्पर्श समजत नाहीं, सूज येते, अंग जड वाटतें, झोंप जास्त येते, मळमळतें, अरुचि, श्वास व खोकला असतो, त्वचा, डोळे व नखें हीं पांढरीं होतात. हातास पोट गुळगुळीत लागतें, निश्चल असतें, पोटावर पांढऱ्या शिरा दिसतात, तें मोठें होतें, हातास कठिण लागतें, सावकाश वाढतें, गार लागतें, व जड वाटतें, हीं लक्षणें असतात.

सन्निपातोदरः—त्रिदोषांचा प्रकोप करणाऱ्या कारणांनीं, बायकांनीं वश करण्याकरितां दिलेलें रज, किंवा नाक, कान, इत्यादिकांतील मळ पोटांत गेल्यानें, सर्पादिकांचें विष किंवा दुषी विष ( कृत्रिम विष ) पोटांत गेल्यानें, वात, पित्त, कफ, व रक्त हे संचित होऊन कोठ्यांत येतात; तेथें विकृत होऊन सान्निपातिक (त्रिदोषजन्य) उदर उत्पन्न करतात.यांत तीन्ही दोषांच्या उदरांचीं लक्षणें असून शिवाय शोष,मूर्छा व भ्रम हे विकार उत्पन्न होतात. हें उदर भयंकर आहे. यांत पाणी फार लवकर होतें. थंडी पडली, जोराचा वारा सुटला किंवा आभाळ आलें असतां फार त्रासदायक होऊन हें विकोपास जातें.

प्लीहोदरः—फार जेवून लगेच घोडा,गाडी, इत्यादि वाहन किंवा अशाच दुसऱ्या व्याधीनें क्षीण झाल्यानें,डाव्या कुशींतील पाणथरी आपल्या स्थानापासून सुटून वाढते. किंवा रसादि धातूंनीं वाढलेलें रक्त तिला वाढवतें. ती आरंभीं अठळीसारखी कठिण असून नंतर कांसवाच्या पाठीसारखी हळूहळू कुशींत वाढून उदररोग उत्पन्न करते.

प्लीहोदराचीं लक्षणें:—दमा, खोकला, तहान, तोंड बेचव होणें, पोट फुगणें व दुखणें,ताप, पांडुरकेपणा,ओकारी, बेशुद्धी, वेदना, दाह व मोह हे विकार उत्पन्न होतात.पोटाचा रंग बदलतो, बहुतकरून पोट आरक्त होतें. आणखी त्यावर निळ्या व पिवळ्या रेषा उठतात. प्लीहोदरांत उदावर्त, पोटशूळ व पोटफुगी हीं लक्षणें असतां वायु; मोह, तहान, दाह, व ताप हीं असतां पित्त व जडत्व, अरुची व कठिणपणा हीं असल्यास कफ यांचें आधिक्य आहे असें समजावें.

यकृदुदरः—पाणथरीप्रमाणेंच उजव्या कुशींतील यकृतहि आपल्या स्थानापासून सुटून उदर उत्पन्न करतें.त्याचीं लक्षणें वर लिहिलेल्या प्लीहोदराप्रमाणेंच आहेत.

बद्धगुदोदरः—अन्नाबरोबर केंस पोटांत गेल्यानें, मुळव्याधीच्या मोडांनीं, उदावर्तानें किंवा दुसर्‍या कोणत्याहि आंतड्यास चिकटून रहाणार्‍या पदार्थांनीं गुदद्वार बंद झालें असतां कुपित झालेला अपानवायु, मळ, पित्त, कफ यांचा अवरोध करून उदर ( बद्धोदर ) उत्पन्न करतो. यांत दाह, तृषा, ताप, शिंका, खोकला, दमा, मांड्या गळणें, डोकें,हृदय, बेंबी व गुद यांत शूळ, मलावरोध, अरुचि, वांती व वायू कोंडणें हीं लक्षणें होतात व पोट ताठतें. पोटावर निळ्या तांबूस शिरा उठतात किंवा मुळींच उठत नाहींत व बेंबीच्या वर पोट गाईच्या शेपटासारखें होतें.

छिद्रोदरः—हाड, कांटा, खडा वगैरे शल्यें अन्नाबरोबर पोटांत गेल्यानें किंवा फार खाण्यानें आंतडें फाटतें किंवा पिकतें, त्यामुळें त्या आंतड्यास भोंकें पडतात. त्या भोंकांतून अपक्व अन्नरस मळाबरोबर बाहेर येतो. तो बुळबुळीत, पिंवळा व लाल असून त्यास प्रेतासारखी घाण येते. त्यांतून थोडथोडा रस गुदांतून बाहेर पडतो व बाकीचा सर्व पोटांत भरून भयंकर उदर उत्पन्न करतो.यांत बेंबीच्या खालीं पोट वाढतें. व पाणी फार लवकर होतें. यांत कुपित झालेल्या तीनहि दोषांचीं लक्षणें असतात. दमा, तहान व भ्रम हे विकार होतात. यास छिद्रोदर व कांहीं आचार्य परिस्रावी उदर असें म्हणतात.

जलोदरः—स्नेहन व स्वेदन वगैरे क्रिया करीत असतां मध्येंच एकाएकीं थंड पाणी प्याल्यानें किंवा अग्नि मंद असून शक्ति क्षीण असून अथवा शरीर अतिशय क्षीण असून अतिशय पाणी प्याल्यानें त्या पाण्यांत मिसळलेले कफ व वायू जलवाहक स्रोतसें बंद करून पोटांत राहून तें सांचलेलें पाणी उदकस्थानांतून म्हणजे क्लोमांतून वाढवितात. त्यामुळें उदर होतें. यांत तहान, गुदस्राव, गुदशूळ, खोकला, दमा व अरुचि हे विकार होतात.पोटावर नाना रंगाच्या शिरा उठतात. पोट पाण्यानें भरलेल्या पखालीप्रमाणें हातास लागतें. टिचकी मारली असतां तसाच आवाज होतो. दाबल्यानें पखालीप्रमाणेंच आंत पाणी भरल्यासारखें दिसतें व पखालीसारखेंच तें डुचमळतें. पोट मोठें, गुळगुळीत, ताठ असतें व बेंबी वर येऊन भोंवतालून गरगरीत वाटोळी होते. हें जलोदर होय.

कोणत्याहि उदराची हयगय केली असतां आपल्या स्थानापासून सुटलेले व पक्व होऊन पातळ झालेले वातादि दोष संधी व स्रोतसें यांच्या तोंडासहि पातळ करतात. बाहेरचीं स्रोतसें बंद झाल्यामुळें घामाची बाह्य गति बंद होऊन तो पुनः पोटांत कुशींत सांचतो. अगोदरच पोटात सांचलेल्या पाण्यांत आणखी भर घालून त्याची पिच्छा (बुळबुळीत मळ) उत्पन्न करतो. या योगानें पोट जड, ताठ, वाटोळें व मऊ होतें. बोटानें ठोकलें असतां वाजत नाहीं. त्याच्या वरच्या शिरा नाहींशा होतात, बेंबीवर दाबलें असतां सगळें पोट एकदम हलल्यासारखें भासतें. नंतर यांत पाणी होऊन पूर्वीपेक्षां पोट मोठें होतें. शिरा दिसेनाशा होतात. व जलोदराचीं सर्व लक्षणें होतात.

वातोदर, पित्तोदर, कफोदर, प्लीहोदर, सान्निपातोदर व जलोदर हीं अनुक्रमें एकाहून एक अधिक कष्टसाध्य आहेत. बद्धोदर व छिद्रोदर हें झालें असतां बहुतकरून पंधरा दिवसांनीं रोगी मरतो.

*उदर आरंभापासूनच कष्टसाध्य असतें. त्यांतून रोगी* बलवान असतां पाणी ( अजतांबु ) न झालेलें उदर नवें असतां यत्नानें बरें होतें. डोळ्यास सूज, शिस्न वांकडें, त्वचेवर पांढरे पापुद्रे येऊन त्यांतून पाणी येणें, शक्ति, रक्त, मांस व अग्नि यांचा अतिशय नाश, अन्नद्वेष, सूज, अतिसार हीं लक्षणें तीव्र असतां उदररोग बरा होत नाहीं. रेचक औषधांनीं हलकें झालेलें पोट पुनः भरलें तर तेंहि असाध्य जाणावें.

चि कि त्सा—उदर हा रोग रेचक औषधांनीं बरा होतो. दोष अतिशय वाढल्यानें स्रोतांचीं तोंडें बंद होऊन उदररोग उत्पन्न होतो. म्हणून यांत रोग्यास नेहमीं रेचक द्यावें. एक किंवा दोन महिनेपर्यंत गोमुत्र किंवा दूध घालून एरंडेल तेल पाजावें. अन्न न खातां गाईच्या किंवा उंटिणीच्या दुधावर रहावें. दाह, पोटफुगी, अतिशय तहान व मूर्छा हे विकार असतील त्यानें विशेषेंकरून याप्रमाणें वागावें. ज्याच्या अंगीं रुक्षता आहे, वात फार वाढला आहे व दोषांची शुद्धि व्हावी अशी इच्छा आहे त्यांच्यासाठीं *स्निग्धता आणून उदराचा नाश करतील अशा घृतांची* योजना करावी. घृतांनीं स्निग्ध झालेल्या रोग्यास शक्ति आली,वायू दबला आणि दोषाशय शिथिल झाला म्हणजे त्यास रेचकें द्यावीं.

जुलाब झाल्यावर हळूहळू हलकेसें अन्न सुरु करून क्रमानें साळीचा भात वेतानें खाऊं लागावें. उदररोग्यानें शिल्लक राहिलेला दोष निखालस काढून टाकण्याकरितां पुढील औषधें घ्यावीं. गोमुत्राच्या पुष्कळशा भावना दिलेले हजार हिरडे रोज एक किंवा दोन याप्रमाणें खाऊन वर दूध प्यावें. वर्धमान पिंपळी सेवन करावी. शिलाजित खाऊन नुसत्या दुधावर रहावें. गुग्गुळ घ्यावा.

रेच होऊन पोट उतरलें व नरम झालें म्हणजे त्यास साल्वणादि शेक करून कपड्याचा पट्टा बांधावा. या योगानें पुन्हां पोटांत वारा भरून तें फुगणार नाहीं.

चांगले जुलाब होऊनहि पुन्हां ज्याचें पोट फुगते त्यास बरेच स्निग्ध, आंबट व खारट असे निरुहवस्ती द्यावे. जो रेचन देण्यास योग्य नसेल अशा उदर रोग्यास वस्ती, दूध

व घृतें हे शामक उपाय करावे. वातोदरांत विशेषेंकरून वातघ्न औषधांचे वस्ती द्यावे. शक्ति येण्याकरितां दूध द्यावें. पित्तोदरांत रोगी सशक्त असल्यास रेचकें व पित्तघ्न औषधांचे वस्ती द्यावे. रोगी अशक्त असेल तर अनुवासन वस्ती देऊन रेच होण्याकरितां दुधाचे वस्ती द्यावे. दुध, वस्ती आणि रेचकें वरचेवर घेऊन वेतानें वागलें म्हणजे पित्तोदर खात्रीनें बरें होतें.

कफोदर झालेल्या सशक्त रोग्यानें रेचकें घेऊन तिखट, क्षारयुक्त व कफनाशक अशा अन्नाचा उपयोग करावा. स्तैमित्य, अरुचि, मळमळ, अग्निमांद्य हे विकार असून कफानें पोट घट्ट व स्थिर झाल्यास व रोगी मद्य पिणारा असल्यास अरिष्टें व क्षार द्यावे. अशक्त मनुष्याचें कफोदर अरिष्ट, गोमुत्र, चूर्णे, क्षारयुक्त तेलें यांनीं बरें करावें.

त्रिदोषात्मक उदरावर रोगी बरा होण्याची आशा सोडून वचनाग वगैरे स्थावर विष किंवा ज्याच्यावर रागावलेल्या सर्पानें विष टाकलें आहे असें फळ खाण्याच्या पदार्थांतून द्यावें. तें विष तीव्र प्रमाथी म्हणजे शरीरांतील सर्व स्रोतांत घुसून दोषांस बलात्कारानें ओढून काढणारें असल्यामुळें निश्चल व धात्वादिकांस चिकटून बसलेल्या दोषसमूहास बाहेर काढल्या. दोष निघून गेल्यावर त्यास थंड पाण्यानें स्नान घालून थंड दूध किंवा कण्हेरी पाजावी. पालेभाज्या, आंबट,खारट किंवा तेलतूप न घालतां अर्धवट शिजवून खाव्या. एक महिनापर्यंत अन्न न खातां या भाज्यांवरच रहावें. तहान लागल्यास याचाच स्वरस घ्यावा एक महिन्यानंतर उंटिणीचें दूध प्यावें.

प्लीहोदरांत दोषानुरूप स्नेहन, स्वेदन करून दहींभात खाऊ घालून डाव्या हाताची शीर तोडावी. रेचकें व रोहितक घृत ( वा. चि. स्था. ) द्यावी. या उपायांनीं बरें न वाटल्यास व तींत पाणी झालें नसल्यास गुल्मावर सांगितलेल्या पद्धतीनें डाग द्यावा.

यकृतावर पानथरीसारखीच चिकित्सा करावी. मात्र शीर तोडणें झाल्यास उजव्या हाताची तोडावी.

बद्धोदर झालेल्या रोग्यास घाम काढून अनुवास व वस्ती देऊन गोमुत्र, तीक्ष्ण औषधें तेल व सैंधव यांसह निरुह वस्ती द्यावा. व पुन्हां अनुवासन वस्ती द्यावा. त्यास सारक अन्न व तीव्र रेचक द्यावें तसेंच उदावर्त नाशक असून वातशामक असणारे सर्व उपाय करावे.

छिद्रोदराची चिकित्सा स्वेद खेरीजकरून बाकी सर्व कफोदराप्रमाणेंच करावी. पाणा जमलें कीं लगेच काढून टाकावें. याप्रमाणें वरचेवर करून तें बरें करावें.

जलोदरांत प्रथम जलमिश्रित दोष काढून टाकणारीं तीक्ष्ण औषधें गोमुत्र व अनेक प्रकारचे क्षार घालून योजावीं आणि रोग्यास अग्निदीपक व कफनाशक आहार द्यावे.

बद्धोदर, छिद्रोदर व जलोदर हीं बरीं न झाल्यास शस्त्रप्रयोग करावा.

बद्धोदर व छिद्रोदर या दोहोंत रोग्याचें शरीर स्निग्ध व स्विन्न करून बेंबीच्याखालीं डाव्या बाजूस चार बोटें जागा सोडून चारच बोटें पोट फाडावें त्या छिद्रांतून आंतडीं बाहेर काढून बद्धोदरांत त्यांस केंस, मळ, कांहीं असेल तें काढून टाकावें. व छिद्रोदरांत शल्य असेल तें काढून आंतड्यांत जो स्राव झाला असेल तो पुसून काढावा. नंतर त्या छिद्रांस डोंगळे डसवावे. ते डसले म्हणजे त्यांचीं डोकीं राखून धडें ओढून काढावीं आणि आंतड्यांस मध व तूप लावून तीं जागच्या जागीं बसवावीं. बाहेरचा व्रण शिवून त्यावर जेष्टमधाचें चूर्ण व काळी माती हीं मिसळून त्यांचा लेप करून पट्टा बांधावा. नंतर त्यास निर्वात जागेंत स्नेहानें भरलेल्या पिपांत बसवून नुसत्या दुधावर ठेवावें.

जलोदरांत वातनाशक तेलें चोळून ऊन पाण्यानें पोट शेकून काखेपर्यंत पोटास वस्त्र गुंडाळावें. नंतर बद्धोवर व छिद्रोदर यांवर सांगितलेल्या जागीं एक छेद करावा व त्या छिद्रांत नळी घालून पोटांतील अर्धें पाणी काढून टाकावें. नंतर नळी काढून त्या व्रणावर सैंधवमिश्रित तेल चोळून पट्टा बांधून पोटास वस्त्र गुंडाळावें. पुढें तिसऱ्या चवथ्या दिवसापासून सोळा दिवसांपर्यंत थांबून थांबून शिल्लक राहिलेलें अर्धें पाणी थोडें थोडें करून काढावें. आणि जसजसें पोट सैल होईल तसतसें तें कपड्यानें घट्ट गुंडाळून बांधावें. याप्रमाणें सर्व पाणी निघून गेल्यावर रोग्यास उपास घालून किंचित् तूप व सैंधव घातलेली कण्हेरी पाजावी. पुढें सहा महिने नुसत्या दुधावर रहावें. यापुढें दुधांत शिजलेली कण्हेरी प्यावी; आणि शेवटीं जुने सांवे किंवा हरीक यांचा थोडथोडा भात दुधाबरोबर किंवा फळांचें आंबट घालून केलेल्या मांसरसाबरोबर खावा. याप्रमाणें एक वर्षभर पथ्य केलें असतां जलोदर बरें होतें. सर्व प्रयोगाच्या मागून दूध पाजावें. कारण तें रसादि सर्व धातूंस स्थिर करणारें शक्ति देणारें व शिल्लक दोषांस काढणारें आहे. तसेंच औषधें घेऊन घेऊन ज्यांचें शरीर कृश झालें आहे, अशा मनुष्यांस दूध हेंच अमृताप्रमाणें गुणकारी आहे. उदरांत ताकहि प्रशस्त आहे. जडत्व, अरुचि, पोटफुगी, अग्निमांद्य व अतिसार हे विकार असतां तें द्यावें. अतिशय उष्ण, आंबट, खारट, जड, गूळ, तेलाची फोडणी दिलेले पदार्थ,पाणी पिणें, श्रम, मार्ग चालणें, दिवसा निजणें व गाडींतून किंवा घोड्यावरून फिरणें या गोष्टी वर्ज्य कराव्या.

**जलोपचार**—(शीतोष्ण जलबाष्पचिकित्सापद्धति)रोगचिकित्सेच्या या प्रकाराचें हें नांव जनतेमध्यें परिचित व रूढ असलें तरी तें नांव सदोष व मिथ्याभास उत्पन्न करणारें आहे. कारण या चिकित्सेमध्यें नुसतें थंड पाणीच नव्हे. तर थंड, कोमट व कढत पाणी व वाफारा यांचा उपयोग जरूरीप्रमाणें होत असल्यामुळें " शीतोष्ण जलबाष्प चिकित्सापद्धति " हें नांव अन्वर्थक होईल. ही कल्पना आस्ट्रियांतील एका खेडेगांवीं प्रीसनित्झ नांवाच्या एका

यकृद्दुदरः—पाणथरीप्रमाणेंच उजव्या कुशींतील यकृतहि आपल्या स्थानापासून सुटून उदर उत्पन्न करतें.त्याचीं लक्षणें वर लिहिलेल्या प्लीहोदराप्रमाणेंच आहेत.

बद्धगुदोदरः—अन्नाबरोबर केंस पोटांत गेल्यानें, मुळव्याधीच्या मोडांनीं, उदावर्तानें किंवा दुसऱ्या कोणत्याहि आंतड्यास चिकटून रहाणाऱ्या पदार्थांनीं गुदद्वार बंद झालें असतां कुपित झालेला अपानवायु, मळ, पित्त, कफ यांचा अवरोध करून उदर ( बद्धोदर ) उत्पन्न करतो. यांत दाह, तृषा, ताप, शिंका, खोकला, दमा, मांड्या गळणें, डोकें,हृदय, बेंबी व गुद यांत शूळ, मलावरोध, अरुचि, वांती व वायू कोंडणें हीं लक्षणें होतात व पोट ताठतें. पोटावर निळया तांबूस शिरा उठतात किंवा मुळींच उठत नाहींत व बेंबीच्या वर पोट गाईच्या पुच्छासारखें होतें.

छिद्रोदरः—हाड, कांटा, खडा वगैरे शल्यें अन्नाबरोबर पोटांत गेल्यानें किंवा फार खाण्यानें आंतडें फाटतें किंवा पिकतें, त्यामुळें त्या आंतड्यास भोंकें पडतात. त्या भोंकांतून अपक्व अन्नरस मळाबरोबर बाहेर येतो. तो बुळबुळीत, पिंवळा व लाल असून त्यास प्रेतासारखी घाण येते. त्यांतून थोडथोडा रस गुदांतून बाहेर पडतो व बाकीचा सर्व पोटांत भरून भयंकर उदर उत्पन्न करतो.यांत बेंबीच्या खालीं पोट वाढतें. व पाणी फार लवकर होतें. यांत कुपित झालेल्या तीनहि दोषांचीं लक्षणें असतात. दमा, तहान व भ्रम हे विकार होतात. यास छिद्रोदर व कांहीं आचार्य परिस्रावी उदर असें म्हणतात.

जलोदरः—स्नेहन व स्वेदन वगैरे क्रिया करीत असतां मध्येंच एकाएकीं थंड पाणी प्याल्यानें किंवा अग्नि मंद असून शक्ति क्षीण असून अथवा शरीर अतिशय क्षीण असून अतिशय पाणी प्याल्यानें त्या पाण्यांत मिसळलेले कफ व वायू जलवाहक स्रोतसें बंद करून पोटांत राहून तें सांचलेलें पाणी उदकस्थानांतून म्हणजे क्लोमांतून वाढवितात. त्यामुळें उदर होतें. यांत तहान, गुदस्राव, गुदशूळ, खोकला, दमा व अरुचि हे विकार होतात.पोटावर नाना रंगाच्या शिरा उठतात. पोट पाण्यानें भरलेल्या पखालीप्रमाणें हातास लागतें. टिचकी मारली असतां तसाच आवाज होतो. दाबल्यानें पखालीप्रमाणेंच आंत पाणी भरल्यासारखें दिसतें व पखालीसारखेंच तें डुचमळतें. पोट मोठें, गुळगुळीत, ताठ असतें व बेंबी वर येऊन भोंवतालून गरगरीत वाटोळी होते. हें जलोदर होय.

कोणत्याहि उदराची हयगय केली असतां आपल्या स्थानापासून सुटलेले व पक्व होऊन पातळ झालेले वातादि दोष संधी व स्रोतसें यांच्या तोंडासहि पातळ करतात. बाहेरचीं स्रोतसें बंद झाल्यामुळें घामाची बाह्य गति बंद होऊन तो पुनः पोटांत कुशींत सांचतो. अगोदरच पोटात सांचलेल्या पाण्यांत आणखी भर घालून त्याची पिच्छा (बुळबुळीत मळ) उत्पन्न करतो. या योगानें पोट जड, ताठ, वाटोळें व मऊ होतें. बोटानें ठोकलें असतां वाजत नाहीं. त्याच्या वरच्या शिरा नाहींशा होतात, बेंबीवर दाबलें असतां सगळें पोट एकदम हलल्यासारखें भासतें. नंतर यांत पाणी होऊन पूर्वीपेक्षां पोट मोठें होतें. शिरा दिसेनाशा होतात. व जलोदराचीं सर्व लक्षणें होतात.

वातोदर, पित्तोदर, कफोदर, प्लीहोदर, सान्निपातोदर व जलोदर हीं अनुक्रमें एकाहून एक अधिक कष्टसाध्य आहेत. बद्धोदर व छिद्रोदर हें झालें असतां बहुतकरून पंधरा दिवसांनीं रोगी मरतो.

उदर आरंभापासूनच कष्टसाध्य असतें. त्यांतून रोगी बलवान असतां पाणी ( अजतांबु ) न झालेलें उदर नवें असतां यत्नानें बरें होतें. डोळयास सूज, शिस्न वांकडें, त्वचेवर पांढरे पापुद्रे येऊन त्यांतून पाणी येणें, शक्ति, रक्त, मांस व अग्नि यांचा अतिशय नाश, अन्नद्वेष, सूज, अतिसार हीं लक्षणें तीव्र असतां उदररोग बरा होत नाहीं. रेचक औषधांनीं हलकें झालेलें पोट पुनः भरलें तर तेंहि असाध्य जाणावें.

चि कि त्सा—उदर हा रोग रेचक औषधांनीं बरा होतो. दोष अतिशय वाढल्यानें स्रोतांचीं तोंडें बंद होऊन उदररोग उत्पन्न होतो. म्हणून यांत रोग्यास नेहेमीं रेचक द्यावें. एक किंवा दोन महिनेपर्यंत गोमुत्र किंवा दूध घालून एरंडेल तेल पाजावें. अन्न न खातां गाईच्या किंवा उंटिणीच्या दुधावर रहावें. दाह, पोटफुगी, अतिशय तहान व मूर्छा हे विकार असतील त्यानें विशेषेंकरून याप्रमाणें वागावें. ज्याच्या अंगीं रुक्षता आहे, वात फार वाढला आहे व दोषांची शुद्धि व्हावी अशी इच्छा आहे त्यांच्यासाठीं स्निग्धता आणून उदराचा नाश करतील अशा घृतांची योजना करावी. घृतांनीं स्निग्ध झालेल्या रोग्यास शक्ति आली,वायू दबला आणि दोषाशय शिथिल झाला म्हणजे त्यास रेचकें द्यावीं.

जुलाब झाल्यावर हळूहळू हलकेंसें अन्न सुरु करून क्रमानें साळीचा भात वेतानें खाऊं लागावें. उदररोग्यानें शिल्लक राहिलेला दोष निखालस काढून टाकण्याकरितां पुढील औषधें घ्यावीं. गोमुत्राच्या पुष्कळशा भावना दिलेले हजार हिरडे रोज एक किंवा दोन याप्रमाणें खाऊन वर दूध प्यावें. वर्धमान पिंपळी सेवन करावी. शिलाजित खाऊन नुसत्या दुधावर रहावें. गुग्गुळ घ्यावा.

रेच होऊन पोट उतरलें व नरम झालें म्हणजे त्यास साल्वणादि शेक करून कपड्याचा पट्टा बांधावा. या योगानें पुन्हां पोटांत वारा भरून तें फुगणार नाहीं.

चांगले जुलाब होऊनहि पुन्हां ज्याचें पोट फुगते त्यास बरेंच स्निग्ध, आंवट व खारट असे निरुहवस्ती द्यावे. जो रेचन देण्यास योग्य नसेल अशा उदर रोग्यास वस्ती, दूध

व घृतें हे शामक उपाय करावे. वातोदरांत विशेषेंकरून वातघ्न औषधांचे वस्ती द्यावे. शक्ति येण्याकरितां दूध द्यावें. पित्तोदरांत रोगी सशक्त असल्यास रेचकें व पित्तघ्न औषधांचे वस्ती द्यावे. रोगी अशक्त असेल तर अनुवासन वस्ती देऊन रेच होण्याकरितां दुधाचे वस्ती द्यावे. दुध, वस्ती आणि रेचकें वरचेवर घेऊन बेतानें वागलें म्हणजे पित्तोदर खात्रीनें बरें होतें.

कफोदर झालेल्या सशक्त रोग्यानें रेचकें घेऊन तिखट, क्षारयुक्त व कफनाशक अशा अन्नाचा उपयोग करावा. स्तैमित्य, अरुचि, मळमळ, अग्निमांद्य हे विकार असून कफानें पोट घट्ट व स्थिर झाल्यास व रोगी मद्य पिणारा असल्यास अरिष्टें व क्षार द्यावे. अशक्त मनुष्याचें कफोदर अरिष्ट, गोमुत्र, चूर्णे, क्षारयुक्त तेलें यांनीं बरें करावें.

त्रिदोषात्मक उदरावर रोगी बरा होण्याची आशा सोडून वचनाग वगैरे स्थावर विष किंवा ज्याच्यावर रागावलेल्या सर्पानें विष टाकलें आहे असें फळ खाण्याच्या पदार्थांतून द्यावें. तें विष तीव्र प्रमाथी म्हणजे शरीरांतलि सर्व स्रोतांत घुसून दोषांस बलात्कारानें ओढून काढणारें असल्यामुळें निश्चल व धात्वादिकांस चिकटून बसलेल्या दोषसमूहास बाहेर काढल्या. दोष निघून गेल्यावर त्यास थंड पाण्यानें स्नान घालून थंड दूध किंवा कण्हेरी पाजावी. पालेभाज्या, आंबट,खारट किंवा तेलतूप न घालतां अर्धवट शिजवून खाव्या. एक महिनापर्यंत अन्न न खातां या भाज्यांवरच रहावें. तहान लागल्यास याचाच स्वरस घ्यावा एक महिन्यानंतर उंटिणीचें दूध प्यावें.

प्लीहोदरांत दोषानुरूप स्नेहन, स्वेदन करून दहींभात खाऊ घालून डाव्या हाताची शीर तोडावी. रेचकें व रोहितक घृत ( वा. चि. स्था. ) घावी. या उपायांनीं बरें न वाटल्यास व तींत पाणी झालें नसल्यास गुल्मावर सांगितलेल्या पद्धतीनें डाग द्यावा.

यकृतावर पानथरीसारखीच चिकित्सा करावी. मात्र शीर तोडणें झाल्यास उजव्या हाताची तोडावी.

बद्धोदर झालेल्या रोग्यास घाम काढून अनुवास व वस्ती देऊन गोमुत्र, तीक्ष्ण औषधें तेल व सैंधव यांसह निरुह वस्ती द्यावा. व पुन्हां अनुवासन वस्ती द्यावा. त्यास सारक अन्न व तीव्र रेचक द्यावें तसेंच उदावर्त नाशक असून वातशामक असणारे सर्व उपाय करावे.

छिद्रोदराची चिकित्सा स्वेद खेरीजकरून बाकी सर्व कफोदराप्रमाणेंच करावी. पाणी जमलें कीं लगेच काढून टाकावें. याप्रमाणें वरचेवर करून तें बरें करावें.

जलोदरांत प्रथम जलमिश्रित दोष काढून टाकणारीं तीक्ष्ण औषधें गोमुत्र व अनेक प्रकारचे क्षार घालून योजावीं आणि रोग्यास अग्निदीपक व कफनाशक आहार द्यावे.

बद्धोदर, छिद्रोदर व जलोदर हीं बरीं न झाल्यास शस्त्रप्रयोग करावा.

बद्धोदर व छिद्रोदर या दोहोंत रोग्याचें शरीर स्निग्ध व स्विन्न करून बेंबीच्याखालीं डाव्या बाजूस चार बोटें जागा सोडून चारच बोटें पोट फाडावें त्या छिद्रांतून आंतडीं बाहेर काढून बद्धोदरांत त्यांस केंस, मळ, कांहीं असेल तें काढून टाकावें. व छिद्रोदरांत शल्य असेल तें काढून आंतड्यांत जो स्राव झाला असेल तो पुसून काढावा. नंतर त्या छिद्रांस डोंगळे डसवावे. ते डसले म्हणजे त्यांचीं डोकीं राखून धडें ओढून काढावीं आणि आंतड्यांस मध व तूप लावून तीं जागच्या जागीं बसवावीं. बाहेरचा व्रण शिवून त्यावर जेष्टमधाचें चूर्ण व काळी माती हीं मिसळून त्यांचा लेप करून पट्टा बांधावा. नंतर त्यास निर्वात जागेंत स्नेहानें भरलेल्या पिपांत बसवून नुसत्या दुधावर ठेवावें.

जलोदरांत वातनाशक तेलें चोळून ऊन पाण्यानें पोट शेकून काखेपर्यंत पोटास वस्त्र गुंडाळावें. नंतर बद्धोवर व छिद्रोदर यांवर सांगितलेल्या जागीं एक छेद करावा व त्या छिद्रांत नळी घालून पोटांतील अर्धे पाणी काढून टाकावें. नंतर नळी काढून त्या व्रणावर सैंधवमिश्रित तेल चोळून पट्टा बांधून पोटास वस्त्र गुंडाळावें. पुढें तिसऱ्या चवथ्या दिवसापासून सोळा दिवसांपर्यंत थांबून थांबून शिल्लक राहिलेलें अर्धे पाणी थोडें थोडें करून काढावें. आणि असजसें पोट सैल होईल तसतसें तें कपड्यानें घट्ट गुंडाळून बांधावें. याप्रमाणें सर्व पाणी निघून गेल्यावर रोग्यास उपास घालून किंचित् तूप व सैंधव घातलेली कण्हेरी पाजावी. पुढें सहा महिने नुसत्या दुधावर रहावें. यापुढें दुधांत शिजलेली कण्हेरी प्यावी; आणि शेवटीं जुने सांवे किंवा हरीक यांचा थोडथोडा भात दुधाबरोबर किंवा फळाचें आंबट घालून केलेल्या मांसरसाबरोबर खावा. याप्रमाणें एक वर्षभर पथ्य केलें असतां जलोदर बरें होतें. सर्व प्रयोगाच्या मागून दूध पाजावें. कारण तें रसादि सर्व धातूंस स्थिर करणारें शक्ति देणारें व शिल्लक दोषांस काढणारें आहे. तसेंच औषधें घेऊन घेऊन ज्यांचें शरीर कृश झालें आहे, अशा मनुष्यांस दूध हेंच अमृताप्रमाणें गुणकारी आहे. उदरांत ताकहि प्रशस्त आहे. जडत्व, अरुचि, पोटफुगी, अग्निमांद्य व अतिसार हे विकार असतां तें द्यावें. अतिशय उष्ण, आंबट, खारट, जड, गूळ, तेलाची फोडणी दिलेले पदार्थ,पाणी पिणें, श्रम, मार्ग चालणें, दिवसा निजणें व गाडींतून किंवा घोड्यावरून फिरणें या गोष्टी वर्ज कराव्या.

**जलोपचार**—(शीतोष्ण जलबाष्पचिकित्सापद्धति)रोगचिकित्सेच्या या प्रकाराचें हें नांव जनतेमध्यें परिचित व रूढ असलें तरी तें नांव सदोष व मिथ्याभास उत्पन्न करणारें आहे. कारण या चिकित्सेमध्यें नुसतें थंड पाणीच नव्हे. तर थंड, कोमट व कढत पाणी व वाफारा यांचा उपयोग जरूरीप्रमाणें होत असल्यामुळें " शीतोष्ण जलबाष्प चिकित्सापद्धति " हें नांव अन्वर्थक होईल. ही कल्पना आस्ट्रियांतील एका खेडेगांवीं प्रीसनिट्झ नांवाच्या एका

शेतकऱ्यानें स. १८२९ मध्यें काढली. व हळूहळू त्याजकडे येणाऱ्या रोग्यांची संख्या वाढत चालली. याच्या अगोदर याच विषयावर दोघा इंग्रज डाक्टरांनीं (१६४९–१७३४ व १७५६–१८०५) ग्रंथ प्रसिद्ध केले व त्यांचीं जर्मन भाषेंत भाषांतरें झालीं होतीं. पहिल्या ग्रंथाच्या थोड्या वेळांत ६ आवृत्त्या निघाल्या होत्या. या तत्त्वाचा पुरस्कार करणारा ह्नान्ह हा डॉक्टर आस्ट्रियांत प्रसिद्धीस येऊन हे उपचार करणाऱ्या संस्था वाढत चालल्या. प्रीसनिट्झ शेतकऱ्याकडे तर रोगी फार येऊन त्याची कीर्ति वाढली. या येणाऱ्या लोकांत डॉक्टर लोकांची संख्या मोठी होती. यांपैकीं कांहीं मौज पाहण्यासाठीं येत तर कांहीं खऱ्या ज्ञानलालसेमुळें येत. पण पुष्कळजण स्वतःस असलेल्या व स्वतःच्या उपायांनीं बऱ्या होत नसलेल्या व्याधी बऱ्या करून घेण्याच्या आशेनें येत. या सर्वांचें या चिकित्सेविषयीं जें मत पुढें प्रसिद्ध झालें तें त्यांतील अतिशयोक्ति वगळली असतां देखील सर्वथैव अनुकूल असेंच झालें. त्यानंतर चौघा डाक्तरांनीं १८४०–१८८४ दरम्यान ग्रंथ लिहून व संस्थांकडून या पद्धतीचा उपक्रम व प्रसार इंग्लंडांत केला. हा प्रसार पुढें जर्मनी, फ्रान्स व अमेरिका देशांत झपाट्यानें वाढला आहे व हिंदुस्थानांत या पद्धतींचीं चिकित्सालयें विद्यमान् असून हळूहळू वाढत आहेत. यामुळें जुने डॉक्टर व हे नवीन पद्धतीवाले यांमध्यें वैर उत्पन्न होऊन शिव्यागाळी, दोषारोप, फिर्यादी अर्यादी यांचा सुकाळ होऊन शेवटीं सरकारमार्फत चौकशीसाठीं कमिशन नेमण्यांत येऊन त्याचाहि निकाल नवीन पद्धतीस अनुकूल होऊन ती लोकप्रिय होत असल्याचें निदर्शनास आलें. ही पद्धति नवीन असल्यामुळें इतके दिवस अत्यावस्थ व अति अशक्त रोग्यांवर ही चिकित्सा करून पहाण्यास डॉक्टर लोक भीत असत. जुनाट व कंटाळलेले रोगी, जे कसलेंहि कडक पथ्य व निर्बंध पाळण्यास तयार असत, त्यांजवर ही चिकित्सा-पद्धति अमलांत आणीत. स्मेडले नांवाच्या इंग्रज कारखान-दारानें स्वतःच्या रोगांत या पद्धतीचा अनुभव उत्तम तऱ्हेनें घेतल्यामुळें आपल्या कारखान्यांतील कामदारमंडळींत जे सौम्य व भयंकर स्वरूपाचे रोग येत ते बरे करण्यासाठीं एक स्वतःचें चिकित्सालय बांधलें. विषमज्वरामध्यें व ज्वरा-तिशयामध्यें ज्वर बिनधोकपणें कमी करण्यासाठीं पोटावर अतिशीं [illegible] हें प्रथम जर्मनींत १८६०–१८७० [illegible] तो हल्लीं पूर्ण शास्त्रसंमत [illegible] यास थंड चिरगुटांत [illegible] ईत अति उत्तमपणें [illegible] ०५ पासून १८७७ [illegible] करण्याच्या [illegible] ठरल्या. [illegible] ण्यास कांहीं हरकत नाहीं कीं ही टर्कीश बाष्पस्नानपद्धति, सकाळीं कमरेइतक्या थंड पाण्यांत बसण्याची पद्धति, व जलपान पद्धतशीर करण्याची पद्धति, यांमुळें आरोग्य उत्तम राख-ण्यास बहुमोल मदत झाली आहे. शरीरास शीत व उष्ण उपचार करून रोग दूरण करण्यासाठीं पुढील साधनसामुग्रीचा मुख्यतः उपयोग केला जातो:—(१) अति थंड अगर कढत पाण्यांत भिजवून ,अमळ पिळून काढलेलीं वस्त्रें गुंडाळून बांधणें. हें वस्त्र शरीराभोंवतीं गुंडाळून त्यावरून एक दोन गरम मऊ घोंगड्यांनीं शरीर घट्ट आच्छादणें व जरूर तर त्या सर्वांवरून मेणकापडानें आच्छादून हीं सर्व आवरणें सुमारें एक तासभर टेवून नंतर सचैल स्नान रोग्यास करा-वयाचें असतें. याचा उपयोग मस्तकांतील दूषित रक्तसंचय कमी होऊन मेंदूंत शांतता येणें, घर्मरंध्रें मोकळीं होऊन त्या मार्गें घामाच्या रूपानें शारीरमलविसर्जन होणें हा होय. हीं वस्त्रें बांधण्याच्या अनेक तऱ्हांपैकीं एक प्रकार हा कीं, वस्त्र थंड व एकच असून तें ढिलेंच गुंडाळणें. हेतु हा कीं तें सुकावें व मग तें पुनः ओलें करून बांधावें व हा क्रम वाटेल तितका कालपर्यंत सुरू ठेवणें. दीर्घकाल टिकणाऱ्या ज्वरामध्यें याचा फार उपयोग होतो. पोट, छाती, मस्तक वगैरे ठिकाणीं लहान वेताच्या आकाराचीं ओलीं वस्त्रें गुंडाळून त्यांच्या भागांतील रक्तसंचय कमी करणें, शमन करणें, उत्तेजन आणणें हे हेतू साधतां येतात. (२) कढत हवेनें अगर वाफेनें युक्तयंत्रसामुग्री व उपकरणांच्या साह्यानें शेकणें. याचा मुख्य प्रकार म्हणजे टर्किश बाष्पस्नान हा होय. यांमध्यें उष्णता १२९° ते २१२° पर्यंत असलेल्या दोन कोठड्या असतात. परंतु रोगचिकित्सेसाठीं १५०° हें मान ठीक असतें. या उष्णतेमध्यें रोग्यास सोसेल अगर कार्य घडवा-वयाचें असेल त्यामानानें अर्धा ते दोन तासपर्यंत बाफारा देण्यांत येऊन नंतर साबण व आंग रगडणें यासह अगर याशिवाय साधें सचैल स्नान रोग्यास घालतात. हें स्नान परम उत्तेजक, स्वेदक, गुणकारी, दुष्टरक्तसंचयहारक व शरी-राची झीज बरीच करून नवजीवन व नवीन शरीरपेशीहि उत्पन्न करणारें हितावह आहे. त्यायोगें खोल इंद्रियांत सांखळून राहिलेलें रक्त शरीराच्या पृष्ठभागीं येऊन त्यांतील व्याधि मोडते, घर्मोत्सर्जनानें रक्तशुद्धि करितें व एकदां अति गरम व नंतर अति थंड अशा बदललेल्या उष्णतामानानें रक्तवाहिन्या व मज्जापेशींना उत्तेजक व शक्तिदायक क्रिया आहे. शरीरांतील दूषित होत असलेले रस व धातु, नवीन वाढणारे रोग, संधिवात, पादांगुष्ठवात, रोगसिकता प्रमेहरोग वगैरे स्थितींत यापासून फार गुण वाटतो. पूर्वी उष्णस्ना-नानें गुण वाटतो एवढें ठाऊक होतें पण हें टर्किश बाष्प-स्नान व थंडवस्त्र गुंडाळणें या दोन्ही इलाजांनीं त्या जुन्या उपायाची हकालपट्टीच केली आहे. याचे लहानसहान व दिव्याच्या योगानें हवा कढत करण्याचे व वाफ तयार करण्याचे प्रकार निघाले आहेत; पण मुद्दाम बांधून तयार

केलेल्या टर्किश बाष्पस्नानगृहाप्रमाणें त्यापासून उत्तम गुण वाटत नाहीं. (३) थंड अगर कढत पाण्याचें सचैल स्नान.याचेहि भेद आहेत.सुईइतकी बारीक धार अगर सूक्ष्म तुषार,उथळ पाण्यांतील,बुडी मारण्याचा,बोटाएवढी धार सोडून,लाटेप्रमाणें पाणी अंगावर घेऊन,सकाळीं ओल्या वस्त्रानें अगर स्पंजानें अंग पुसण्याचा, विन पिळलेलें थंड वस्त्र अंगाभोंवतीं गुंडाळणें, एकदां थंड व एकदां कढत पाण्यांत भिजवलेल्या वस्त्रानें अंग चोळणें हे स्नानाचे प्रकार असून त्यांत अगोदर वर्णिलेल्या प्रकारांपैकीं बरेच गुणधर्म आहेत.

नियमित शरीरभागस्नान म्हणजे फक्त कमर व ढुंगण पाण्यांत बुडवून पाटीच्या कण्यास स्नान, मस्तकस्नान, पादस्नान हे प्रकार थंड अगर कढत पाण्यानें करावयाचे असतात. व ते प्रत्येक अवयवास वेगळ्या वेळीं, अगर एके वेळीं अगर एका इंद्रियस्नानानंतर दुसरें या क्रमानें उपक्रमांत येतात. ढुंगण, मस्तक व पाय हे भाग भांड्यांतील पाण्यांत नुसते बुडवून न ठेवतां वहात्या पाण्यांत ते ठेवण्याची योजना असते. उन्हाची झळ लागणें व मस्तिष्कावरणदाह हे लिटरच्या नलिकांत वर्फाचें थंड पाणी घालून त्या नळ्यांचा थंड टोप मस्तकीं धारण करून बरे होतात. एकदम अति थंड व कढत असा बदल केल्यानें दूषितरक्तसंचय व मज्जादौर्बल्य व जडत्व घालविणारें व सुख आणि दाहशामक आहे. जुनाट दाहयुक्त रोगावर हा इलाज फार उपयुक्त आहे.

कोरड्या अगर ओल्या घड्या, पट्ट्या, अगर वेष्टनें रोगग्रस्त भागास बांधणें. याचा पहिला प्रकार थंड पट्ट्याचा म्हणजे बाष्पीभवन होऊन तो भाग थंड व्हावा अशासाठीं आहे. दुसऱ्या प्रकारामध्यें बाष्पीभवन होऊं नये म्हणून त्यावर जाड कापड बांधून ठेवितात. पोटिसें, ओल्या नारळांचा कीस, जवसाचें पोटिस बांधून ठेवून तें सकाळसंध्याकाळ बदलणें हें या प्रकारांपैकींच होय. व यांतील शेक टिकून रहातो हा एक जास्त फायदा आहे. शेकणें, पोटिस लावणें, मोहरी वाटून लावणें, टरपेणसारख्या उष्ण तेलांत वस्त्र भिजवून तें बांधणें, कढत घड्या ठेवणें, उष्ण तेलें चोळून रोगग्रस्त भागांत लाली आणणें,फोड आणणें,चोळणें, रगडणें, दाबणें,चंपी करणें,रोगग्रस्त भागास व्यायाम व तालीम करणें, व त्यास विजेचे उपचार करणें हे असले उपचार या सदराखालीं येतात. इकडे अशा संस्था सांताक्रूझ येथें एका पारशी डाक्टरानें व कल्याण येथें डाक्टर नेने या गृहस्थांनीं काढल्या आहेत. इतरत्रहि हिंदुस्थानांत मधून मधून आढळतात.

**जव**—या झाडास लाटिनमध्यें हॉर्डिअम व्हल्गारे, इंग्रजींत बार्ली, संस्कृतमध्यें यव, सक्तु, मराठींत जव, सातु, हिंदींत सत्तु, इत्यादि नांवें आहेत.

**मू ल स्था न.**—हें २ ते ३ फूट लांबीचें तृणधान्य पृथ्वीवरील समशीतोष्ण भागांत सांपडतें. हिंदुस्थानांत हें झाड सवाटीच्या प्रदेशांत. त्याचप्रमाणें समुद्रसपाटीपासून १४००० फूट उंचीच्या भागापर्यंत सांपडतें. या झाडाच्या पुष्कळ जातींपैकीं हिंदुस्थानांत हेक्झास्टीकॉन या जातीची लागवड सामान्यैकरून करतात.

**इ ति हा स.**—ऋग्वेदादि ग्रंथांत जवाचा उल्लेख आहे. यावरून फार प्राचीन काळापासून हिंदुस्थानांत जवाची लागवड होत आहे हें सिद्ध होतें. चिनी बादशहा शेन–नंग यानें लावलेल्या पांच खाद्यधान्यांत जव हें एक धान्य होतें. थिओफ्रेस्टस याला जवाचे बरेच प्रकार माहीत होते; व सालोमनच्या वेळीं (इ. स. १०१५) जव हें महत्त्वाचें खाद्य द्रव्य होतें असें बायबलवरून दिसतें. मिसर देशांतील अत्यन्त प्राचीन अशा थडग्यांत ' हेक्झास्टीकॉन ' जातीचे जव सांपडले आहेत. त्याचप्रमाणें स्वित्झरलंड व सेव्हॉय येथील इमारतींच्या अवशेषांतहि जव आढळतात. दक्षिण इटलींतील खि. पू. ६ व्या शतकांतील, मेटॉपाँटोज शहराच्या प्रतिमांवर या जातीच्या झाडाचें चित्र आहे. स्टीन यानें करडाँग येथें एकत्र केलेले नमुने हे हिंदुस्थानांतील जवाचे अत्यंत प्राचीन नमुने होत. इन्द्राला " जवाचें पीक फळास आणणारा ईश्वर " असें म्हटलें आहे, व जन्म, विवाह आणि मृत्यु या संबंधींच्या धार्मिक विधींत जवाचा उपयोग हिंदुलोकांत करतात यावरूनहि त्यासंबंधीच्या ज्ञानाचें प्राचीनत्व सिद्ध होतें. ' ऐने–ई–अकबरींत ' जव हें अफगाणिस्तान व काश्मीर येथील महत्त्वाचें पीक होय असें म्हटलें आहे.

**ला ग व ड.**—जव हें रब्बी पीक आहे. हें आक्टोबर अथवा नोव्हेंबर महिन्यांत पेरतात व मार्च किंवा एप्रिल या महिन्यांत त्याची कापणी करतात. हिंदुस्थानांतील पश्चिमेच्या भागांत जव, गहूं, वाटाणे अथवा हरभरे यांच्या पिकांत पेरतात. हलक्या, वालुकामय, व थोडें खत दिलेल्या जमिनींत जवाचें पीक चांगलें येतें. एकराला ८० ते १२० पौंडांपर्यंत बीं लागतें. या पिकाला पाणी देण्याची फारशी गरज पडत नाहीं. एक एकर पिकाच्या लागवडीस कांहींच्या मतें १८ रु. ८ आ., कांहींच्या २० रु–१२ आ. व गुजराथेंत ५१ रु. ८ आ. खर्च येतो.

संयुक्तप्रान्त व बंगालमध्यें या पिकाची सर्व प्रांतापेक्षां जास्त लागवड करण्यांत येते. यांच्या खालोखाल पंजाब, वायव्य सरहद्द, अजमीर–मेरवाडा, मुंबई, मध्यप्रांत, सिंध आणि मद्रास वगैरेंचा नंबर लागतो. ब्रिटिश हिंदुस्थानांतील एकंदर जवाचें पीक १९०५–६ सालीं ७३२६७५५ एकर होतें. त्याच वर्षी एतद्देशीय संस्थानांत हें क्षेत्र ४१८४६३ एकर होतें. हें क्षेत्र मुख्यतः जयपूर, अलवार, भरतपूर व ग्वालेर या संस्थानांतून विभागलें गेलें होतें.

बंगालः—येथील मध्य व उत्तर जिल्ह्यांतच विशेषतः या पिकाची लागवड आहे. दक्षिण बिहारमध्यें जव हें अत्यंत स्वस्त खाद्य होय. उत्तर बिहारमध्यें जवाला तितकें महत्त्व नाहीं. खुद्द बंगाल व ओरीसामध्यें या पिकाचा बहुतेक

शेतकऱ्यानें स. १८२९ मध्यें काढली. व हळूहळू त्याजकडे येणाऱ्या रोग्यांची संख्या वाढत चालली. याच्या अगोदर याच विषयावर दोघा इंग्रज डाक्टरांनीं (१६४९–१७३४ व १७५६–१८०५) ग्रंथ प्रसिद्ध केले व त्यांचीं जर्मन भाषेंत भाषांतरें झालीं होतीं. पाहिल्या ग्रंथाच्या थोड्या वेळांत ६ आवृत्त्या निघाल्या होत्या. या तत्त्वाचा पुरस्कार करणारा हान्ह हा डॉक्टर आस्ट्रियांत प्रसिद्धीस येऊन हे उपचार करणाऱ्या संस्था वाढत चालल्या. प्रीसनित्झ शेतकऱ्याकडे तर रोगी फार येऊन त्याची कीर्ति वाढली. या येणाऱ्या लोकांत डॉक्टर लोकांची संख्या मोठी होती. यांपैकीं कांहीं मौज पाहण्यासाठीं येत तर कांहीं खऱ्या ज्ञानलालसेमुळें येत. पण पुष्कळजण स्वतःस असलेल्या व स्वतःच्या उपायांनीं बऱ्या होत नसलेल्या व्याधी बऱ्या करून घेण्याच्या आशेनें येत. या सर्वांचें या चिकित्सेविषयीं जें मत पुढें प्रसिद्ध झालें तें त्यांतील अतिशयोक्ति वगळली असतां देखील सर्वथैव अनुकूल असेंच झालें. त्यानंतर चौघा डाक्टरांनीं १८४०–१८८४ दरम्यान ग्रंथ लिहून व संस्थांकडून या पद्धतीचा उपक्रम व प्रसार इंग्लंडांत केला. हा प्रसार पुढें जर्मनी, फ्रान्स व अमेरिका देशांत झपाट्यानें वाढला आहे व हिंदुस्थानांत या पद्धतीचीं चिकित्सालयें विद्यमान् असून हळूहळू वाढत आहेत. यामुळें जुने डॉक्टर व हे नवीन पद्धतीवाले यांमध्यें वैर उत्पन्न होऊन शिव्यागाळी, दोषारोप, फिर्यादी वगैरे यांचा सुकाळ होऊन शेवटीं सरकारमार्फत चौकशीसाठीं कमिशन नेमण्यांत येऊन त्याचाहि निकाल नवीन पद्धतीस अनुकूल होऊन ती लोकप्रिय होत असल्याचें निदर्शनास आलें. ही पद्धति नवीन असल्यामुळें इतके दिवस अत्यावस्थ व अति अशक्त रोग्यांवर ही चिकित्सा करून पहाण्यास डॉक्टर लोक भीत असत. जुनाट व कंटाळलेले रोगी, जे कसलेंहि कडक पथ्य व निर्बंध पाळण्यास तयार असत, त्यांजवर ही चिकित्सापद्धति अमलांत आणीत. स्मेडले नांवाच्या इंग्रज कारखानदारानें स्वतःच्या रोगांत या पद्धतीचा अनुभव उत्तम तऱ्हेनें घेतल्यामुळें आपल्या कारखान्यांतील कामदारमंडळींत जे सौम्य व भयंकर स्वरूपानें रोग येत ते बरे करण्यासाठीं एक स्वतःचें चिकित्सालय बांधलें. विषमज्वरामध्यें व ज्वरातिशयामध्यें ज्वर बिनधोकपणें कमी करण्यासाठीं पोटावर अतिशीतोपचार करणें हें प्रथम जर्मनींत १८६०–१८७० सालीं व नंतर इंग्लंडांत रूढ होऊन तो हल्लीं पूर्ण शास्त्रसंमत इलाज मानण्यांत येतो. तापाच्या रोग्यास थंड चिरगुटांत गुंडाळणें हा उपाय फ्रांकोजर्मन लढाईंत अति उत्तमपणें अनुभवसिद्ध ठरला गेला. यानंतर स. १८०५ पासून १८७७ पर्यंत टर्किश पद्धतीनें उष्ण व बाष्पस्नान करण्याच्या संस्था इंग्लंडांत प्रचारांत येऊन फार उपयुक्त ठरल्या. या सगळ्यांचा निष्कर्ष म्हणून असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं कीं ही टर्कीश बाष्पस्नानपद्धति, सकाळीं कमरेइतक्या थंड पाण्यांत बसण्याची पद्धति, व जलपान पद्धतशीर करण्याची पद्धति, यांमुळें आरोग्य उत्तम राखण्यास बहुमोल मदत झाली आहे. शरीरास शीत व उष्ण उपचार करून रोग दूर करण्यासाठीं पुढील साधनसामुग्रीचा मुख्यतः उपयोग केला जातोः—(१) अति थंड अगर कढत पाण्यांत भिजवून अमळ पिळून काढलेलीं वस्त्रें गुंडाळून बांधणें. हें वस्त्र शरीराभोंवतीं गुंडाळून त्यावरून एक दोन गरम मऊ घोंगड्यांनीं शरीर घट्ट आच्छादणें व जरूर तर त्या सर्वांवरून मेणकापडानें आच्छादून हीं सर्व आवरणें सुमारें एक तासभर ठेवून नंतर सचैल स्नान रोग्यास करावयाचें असतें. याचा उपयोग मस्तकांतील दूषित रक्तसंचय कमी होऊन मेंदूंत शांतता येणें, घर्मरंध्रें मोकळीं होऊन त्या मार्गें घामाच्या रूपानें शारीरमलविसर्जन होणें हा होय. हीं वस्त्रें बांधण्याच्या अनेक तऱ्हांपैकीं एक प्रकार हा कीं, वस्त्र थंड व एकच असून तें सैलच गुंडाळणें. हेतु हा कीं तें सुकावें व मग तें पुनः ओलें करून बांधावें व हा क्रम वाटेल तितका कालपर्यंत सुरू ठेवणें. दीर्घकाल टिकणाऱ्या ज्वरामध्यें याचा फार उपयोग होतो. पोट, छाती, मस्तक वगैरे ठिकाणीं लहान वेताच्या आकाराचीं ओलीं वस्त्रें गुंडाळून त्यांच्या भागांतील रक्तसंचय कमी करणें, शमन करणें, उत्तेजन आणणें हे हेतु साधतां येतात. (२) कढत हवेनें अगर वाफेनें युक्तयंत्रसामुग्री व उपकरणांच्या साह्यानें शेकणें. याचा मुख्य प्रकार म्हणजे टर्किश बाष्पस्नान हा होय. यांमध्यें उष्णता १२९° ते २१२° पर्यंत असलेल्या दोन कोठड्या असतात. परंतु रोगचिकित्सेसाठीं १५०° हें मान ठीक असतें. या उष्णतेमध्यें रोग्यास सोसेल अगर कार्य घडवावयाचें असेल त्यामानानें अर्धा ते दोन तासपर्यंत बाफारा देण्यांत येऊन नंतर साबण व आंग रगडणें यासह अगर याशिवाय साधें सचैल स्नान रोग्यास घालतात. हें स्नान परम उत्तेजक, स्वेदक, गुणकारी, दुष्टरक्तसंचयहारक व शरीराची झीज बरीच करून नवजीवन व नवीन शरीरपेशीहि उत्पन्न करणारें हितावह आहे. त्यायोगें खोल इंद्रियांत सांखळून राहिलेलें रक्त शरीराच्या पृष्ठभागीं येऊन त्यांतील व्याधि मोडते, घर्मोत्सर्जनानें रक्तशुद्धि करितें व एकदां अति गरम व नंतर अति थंड अशा बदललेल्या उष्णतामानानें रक्तवाहिन्या व मज्जापेशींना उत्तेजक व शक्तिदायक क्रिया आहे. शरीरांतील दूषित होत असलेले रस व धातु, नर्वीन वाढणारे रोग, संधिवात, पादांगुष्ठवात, रोगसिकता प्रमेहरोग वगैरे स्थितींत यापासून फार गुण वाटतो. पूर्वी उष्णस्नानानें गुण वाटतो एवढें ठाऊक होतें पण हें टर्किश बाष्पस्नान व थंडवस्त्र गुंडाळणें या दोन्ही इलाजांनीं त्या जुन्या उपायाची हकालपट्टीच केली आहे. याचे लहानसहान व दिव्याच्या योगानें हवा कढत करण्याचे व वाफ तयार करण्याचे प्रकार निघाले आहेत; पण मुद्दाम बांधून तयार

केलेल्या टर्किश बाष्पस्नानगृहाप्रमाणें त्यापासून उत्तम गुण वाटत नाहीं. (३) थंड अगर कढत पाण्याचें सचैल स्नान.याचेहि भेद आहेत.सुईइतकी बारीक धार अगर सूक्ष्म तुषार,उथळ पाण्यांतील,बुडी मारण्याचा,बोटाएवढी धार सोडून,लाटेप्रमाणें पाणी अंगावर घेऊन,सकाळीं ओल्या वस्त्रानें अगर स्पंजानें अंग पुसण्याचा, विन पिळलेलें थंड वस्त्र अंगाभोंवतीं गुंडाळणें, एकदां थंड व एकदां कढत पाण्यांत भिजवलेल्या वस्त्रानें अंग चोळणें हे स्नानाचे प्रकार असून त्यांत अगोदर वर्णिलेल्या प्रकारांपैकीं बरेच गुणधर्म आहेत.

नियमित शरीरभागस्नान म्हणजे फक्त कमर व ढुंगण पाण्यांत बुडवून पाटीच्या कण्यास स्नान, मस्तकस्नान, पादस्नान हे प्रकार थंड अगर कढत पाण्यानें करावयाचे असतात. व ते प्रत्येक अवयवास वेगळ्या वेळीं, अगर एके वेळीं अगर एका इंद्रियस्नानानंतर दुसरें या क्रमानें उरकण्यांत येतात. ढुंगण, मस्तक व पाय हे भाग भांड्यांतील पाण्यांत नुसते बुडवून न ठेवतां वहात्या पाण्यांत ते ठेवण्याची योजना असते. उन्हाची झळ लागणें व मस्तिष्कावरणदाह हे लिटरच्या नलिकांत बर्फाचें थंड पाणी घालून त्या नळ्यांचा थंड टोप मस्तकीं धारण करून बरे होतात. एकदम अति थंड व कढत असा बदल केल्यानें दूषितरक्तसंचय व मज्जादौर्बल्य व जडत्व घालविणारें व सुज आणि दाहशामक आहे. जुनाट दाहयुक्त रोगावर हा इलाज फार उपयुक्त आहे.

कोरडया अगर ओल्या घडया, पट्टया, अगर वेंधनें रोगग्रस्त भागास बांधणें. याचा पहिला प्रकार थंड पट्टयाचा म्हणजे बाष्पभिवन होऊन तो भाग थंड व्हावा अशासाठीं आहे. दुसऱ्या प्रकारामध्यें बाष्पीभवन होऊं नये म्हणून त्यावर जाड कापड बांधून ठेवितात. पोटिस, ओल्या गारळांचा कीस, जवसाचें पोटिस बांधून ठेवून तें सकाळसंध्याकाळ बदलणें हें या प्रकारांपैकींच होय. व यांतील शेक टिकून रहातो हा एक जास्त फायदा आहे. शेकणें, पोटिस लावणें, मोहरी वाटून लावणें, टरपेणसारख्या उष्ण तेलांत वस्त्र भिजवून तें बांधणें, कढत घड्या ठेवणें, उष्ण तेलें चोळून रोगग्रस्त भागांत लाली आणणें,फोड आणणें,चोळणें, रगडणें, दाबणें,चंपी करणें,रोगग्रस्त भागास व्यायाम व तालीम करणें, व त्यास विजेचें उपचार करणें हे असले उपचार या सदराखालीं येतात. इकडे अशा संस्था सांताक्रूझ येथें एका पारशी डाक्टरानें व कल्याण येथें डाक्टर नेने या गृहस्थांनीं काढल्या आहेत. इतरत्रहि हिंदुस्थानांत मधून मधून आढळतात.

जव—या झाडास लाटिनमध्यें हॉर्डिअम व्हलगारे, इंग्रजींत बार्ली, संस्कृतमध्यें यव, सक्तु, मराठींत जव, सातु, हिंदींत सत्तु, इत्यादि नांवें आहेत.

मूलस्थान.—हें २ ते ३ फूट लांबीचें तृणधान्य पृथ्वीवरील समशीतोष्ण भागांत सांपडतें. हिंदुस्थानांत हें झाड सपाटीच्या प्रदेशांत त्याचप्रमाणें समुद्रसपाटीपासून १४००० फूट उंचीच्या भागापर्यंत सांपडतें. या झाडाच्या पुष्कळ जातींपैकीं हिंदुस्थानांत हेक्झास्टीकॉन या जातीची लागवड सामान्येंकरून करतात.

इतिहास.—ऋग्वेदादि ग्रंथांत जवाचा उल्लेख आहे. यावरून फार प्राचीन काळापासून हिंदुस्थानांत जवाची लागवड होत आहे हें सिद्ध होतें. चिनी बादशहा शेन–नंग यानें लावलेल्या पांच खाद्यधान्यांत जव हें एक धान्य होतें. थिओफ्रेस्टस याला जवाचे बरेच प्रकार माहीत होते; व सालोमनच्या वेळीं (इ. स. १०१५) जव हें महत्त्वाचें खाद्य द्रव्य होतें असें बायबलवरून दिसतें. मिसर देशांतील अत्यन्त प्राचीन अशा थडग्यांत ' हेक्झास्टीकॉन ' जातीचे जव सांपडले आहेत. त्याचप्रमाणें स्वित्झरलंड व सेव्हॉय येथील इमारतींच्या अवशेषांतहि जव आढळतात. दक्षिण इटलीतील ख्रि. पू. ६ व्या शतकांतील, मेटॅपाँटोज शहराच्या प्रतिमांवर या जातीच्या झाडाचें चित्र आहे. स्टीन यानें करडॉंग येथें एकत्र केलेले नमुने हे हिंदुस्थानांतील जवाचे अत्यंत प्राचीन नमुने होत. इन्द्राला " जवाचें पीक फवास आणणारा ईश्वर " असें म्हटलें आहे, व जन्म, विवाह आणि मृत्यु या संबंधींच्या धार्मिक विधींत जवाचा उपयोग हिंदुलोकांत करतात यावरूनहि त्यासंबंधींच्या ज्ञानाचें प्राचीनत्व सिद्ध होतें. ' ऐने–ई–अकबरींत ' जव हें अफगाणिस्तान व काश्मीर येथील महत्त्वाचें पीक होय असें म्हटलें आहे.

लागवड.—जव हें रब्बी पीक आहे. हें आक्टोबर अथवा नोव्हेंबर महिन्यांत पेरतात व मार्च किंवा एप्रिल या महिन्यांत त्याची कापणी करतात. हिंदुस्थानांतील बऱ्याचशा भागांत जव, गहूं, वाटाणे अथवा हरभरे यांच्या पिकांत पेरतात. हलक्या, वालुकामय, व थोडें खत दिलेल्या जमिनींत जवाचें पीक चांगलें येतें. एकराला ८० ते १२० पौंडांपर्यंत बीं लागतें. या पिकाला पाणी देण्याची फारशी गरज पडत नाहीं. एक एकर पिकाच्या लागवडीस कांहींच्या मतें १८ रु. ८ आ., कांहींच्या २० रु–१२ आ. व गुजराथेंत ५१ रु. ८ आ. खर्च येतो.

संयुक्तप्रान्त व बंगालमध्यें या पिकाची सर्व प्रांतापेक्षां जास्त लागवड करण्यांत येते. यांच्या खालोखाल पंजाब, वायव्य सरहद्द, अजमीर–मेरवाडा, मुंबई, मध्यप्रांत, सिंध आणि मद्रास वगैरेंचा नंबर लागतो. ब्रिटिश हिंदुस्थानांतील एकंदर जवाचें पीक १९०५–६ सालीं ७३२६७५५ एकर होतें. त्याच वर्षीं एतद्देशीय संस्थानांत हें क्षेत्र ४१८४६३ एकर होतें. हें क्षेत्र मुख्यतः जयपूर, अलवार, भरतपूर व ग्वालेर या संस्थानांतून विभागलें गेलें होतें.

बंगालः—येथील मध्य व उत्तर जिल्ह्यांतच विशेषतः या पिकाची लागवड आहे. दक्षिण बिहारमध्यें जव हें अत्यंत स्वस्त खाद्य होय. उत्तर बिहारमध्यें जवाला तितकें महत्त्व नाहीं. खुद्द बंगाल व ओरिसामध्यें या पिकाला बहुते

अभावच आहे. पाटणा, भागलपूर, व छोटा नागपूर हीं मुख्य यवक्षेत्रें होत.

संयुक्तप्रांतः—या पिकाच्या बावतींत या प्रांताचा नंबर पहिला लागतो. आग्रा, अयोध्या, गोरखपूर, बनारस, लखनौ व अलाहाबाद हीं मुख्य यवक्षेत्रें होत. स. १९०५–६ मध्यें येथील एकंदर यवक्षेत्र ४१२७९३६ एकर होतें.

मध्यप्रांत व वऱ्हाडः—स. १९०५–६ मध्यें एकंदर क्षेत्र ११६०८ एकर होतें.जबलपूर, दमो, बिलासपूर, चांदा हीं मुख्य जवक्षेत्रें होत.

राजपुतानाः—अजमीर–मेरवाड हें या पिकाच्या दृष्टीनें महत्त्वाचें ठिकाण होय. पाणी दिलेल्या जमिनींत एकराला सरासरीनें ७.३४ हंड्रेडवेट पीक येत असून पाणी न दिलेल्या जमिनींत एकराला सरासरीनें १·४६ हं. पीक निघतें.

*पंजाब व वायव्य सरहद्दप्रांतः—या ठिकाणीं जवाची* इतर कोणत्याहि पिकांत लागवड न करतां स्वतंत्र लागवड करतात. स. १९०५—६ मध्यें एकंदर सस्यक्षेत्र पंजाबांत १२०५६७८ एकर व वायव्यसरहद्दीवरील प्रांतात ३१५२७२ एकर होतें. फिरोझपूर, हिसार, गुरगांव, पेशावर, हझारा, व बन्नू हीं मुख्य यवक्षेत्रें होत.

काश्मीरः—येथें जव चांगल्या प्रतीचें होत नाहीं; व लोक काळजीपूर्वक लागवडहि करीत नाहींत. येथील कित्येक उच्च प्रदेशाच्या ठिकाणीं ‘ ग्रिम ’ अथवा ‘ तिबेटी जव ’ म्हणून जो एक प्रकार आहे तो होत असतो. मे व जून या महिन्यांत पेरणी होऊन पीक आगस्ट व सप्टेंबरमध्यें तयार होतें. एका एकराला सरासरीनें ८॥ मण जव व ४ मण ‘ग्रिम’ इतकें पीक निघतें.

मुंबईः—येथें फार मोठ्या प्रमाणांत जवाची लागवड होत नाहीं. १९०५–६ मध्यें एकंदर क्षेत्र २३१०३ एकर होतें. अहमदाबाद, खेडा, सातारा, सोलापूर व पंचमहाल हीं मुख्य यवक्षेत्रें होत. गुजराथेंत गहूं व जव यांची मिश्र लागवड करतात. पण साधारणतः तें स्वतंत्रपणेंच पेरण्यांत येतें.

मद्रासः—या प्रांतांत हें अत्यन्त कमी महत्त्वाचें पीक आहे. १९०५–६ मध्यें एकंदर क्षेत्र ३२००० एकर काय तें होतें. म्हैसूरमध्यें १९०५–६ मध्यें १३३८ एकरांत जवाची लागवड केली होती.

उ प यो ग.—जवाच्या भाकरी अथवा चपात्या करून व भाजून खातात. प्रथम जव कांडून पाखडतात व नंतर मोगरीनें बडवतात. नंतर दळून त्याचें पीठ करतात व त्या पिठाच्या भाकरी करून खातात. पचविण्याला थोडें कठीण असल्यामुळें अशक्त मुलांनां हें खाद्य देणें ठीक नाहीं. हिंदुस्थानांतील पुष्कळ भागांत जवापासून दारू तयार करतात. त्याचप्रमाणें घोड्यांनां व गुरांनां घांसदाणा म्हणून जव देतात.

गु ण ध र्म.—चर्च यानें जवाचें खालीलप्रमाणें पृथक्करण दिलेलें आहे.—पाणी १२·५, औजसद्रव्यें ११·५, पिष्टसत्व ७०·०, चरबी १·३, तन्तु २·६, क्षाररक्षा २·१. औषधांत जवाचा फार उपयोग होतो.तें एक पित्ताची जळजळ (शामक) किंवा सूज कमी करणारें औषध आहे. रोग्यांनां तें मुद्दाम पथ्य म्हणून देतात.

*व्या पा र.—व्यापारी आंकड्यांवरून जवाच्या निर्गतींत* स.१९०१ पासून १९०४–५ पर्यंत धीरेधीरे वाढ होत होती असें दिसतें. पण स. १९०५–६ मध्यें ही निर्गत एकाएकी खालावली. स. १९०४–५ मध्यें मुंबईतून सर्वांत जास्त माल म्हणजे २३१०३७ हं. बाहेरदेशीं गेला. त्याचवर्षी सिंधनें ८६०७० हं. व बंगालनें ५९३०७ हंड्रेडवेट मालाची निर्गत केली.

**जवस**—( संस्कृत-उमा, गुजराथी–अळशी, हिंदी–अलशी, कानडी–अगशी, लॅटिन–लिनस उसिटा सिसिमय ). या पिकाची लागवड हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून होत आहे. हिंदुस्थानांत हें पीक फक्त बियांकरितां पिकवितात. आयर्लंड, बेलजियम, रशिया व अमेरिका वगैरे ठिकाणीं हें पीक देठापासून निघणाऱ्या धाग्याकरितां व बियांकरितां करितात. याच्या धाग्यापासून केलेला कपडा फारच मौल्यवान व टिकाऊ असतो. या कपड्याला लिनन क्लॉथ असें म्हणतात. धाग्याकरितां निरनिराळ्या ठिकाणचें बी आणून त्याजबद्दल प्रयोग ईस्ट इंडियाकंपनीपासून हिंदुस्थानांत ( बंगाल्यांत ) चालू आहेत. ते अद्यापि सफल झालेले नाहींत. बहार प्रांतांत १९०७ साली मि. ॲलेक्झांडर करकोल्ड नांवाचा एक तज्ज्ञ आणून लागवड करण्यांत आली. धाग्याकरितां बाजूला फांद्या न फुटणारी जात असते. ती पसंत करितात व त्या फुटूं नयेत म्हणून याचा पेरा दाट ( एकरीं १०० पौंडांवर ) करावा लागतो. फांद्यांचा दोर आंखूड निघतो. सर्व हिंदुस्थानांत दरवर्षी सरासरीनें तीस लक्ष एकरवर क्षेत्र जवसीखालीं असतें. यापैकीं बारा लक्षांवर क्षेत्र मध्यप्रांतांत व वऱ्हाडांत मिळून असतें. याच्या खालोखाल बंगाल व ओरिसा प्रांताचा नंबर लागतो. सन १९१४।१५ त जवसीखालीं मुंबई इलाख्यांत ११८,२९० एकर क्षेत्र होतें व निझामच्या राज्यांत २३४,००० एकर क्षेत्र जवसीखालीं होतें. या पिकाचें क्षेत्र वर्षानुवर्ष वाढत असून, १९१६।१७ सालीं तें ३५ लक्षांवर गेलें आहे. मध्यप्रांतांत नागपूर व छत्तीसगड या भागांत हें पीक फार महत्त्वाचें आहे. सन १९१५।१६ सालीं भंडारा ९८००० एकर,नागपूर ७८००० एकर,व चांदा ६८००० एकर याप्रमाणें क्षेत्र असून वऱ्हाडांत-यवतमाळ २३००० व अकोला ११००० एकर क्षेत्र होतें. मुंबई इलाख्यांत १९१६।१७ सालीं एकंदर १६०,७२५ एकर क्षेत्र होतें. त्यापैकीं विजापूर ७८२१४ एकर, नाशिक २२९९६ एकर, सोलापूर १९५८७ एकर, अहमदनगर ११८५० एकर व धारवाड १३६४७ एकर

क्षेत्र जवसाखालीं होतें. जवस बहुतेक परदेशीं रवाना होतो. मार्च १९१४ अखेर पांच वर्षांची सरासरी पहातां दरवर्षी सात कोटि अठ्याणव लक्ष नव्वद हजार रुपयांचा माल परदेशीं रवाना झाला. १९१५।१६ सालीं ७००,००० टन जवस किंमत १०२६००० रुपये याप्रमाणें माल बाहेर देशीं गेला.

जा ती.—याच्या दोन जाती आहेत. नेहमींची काळसर तांबूस असून तिला नीळसर फुलें येतात. दुसरी एक पांढुरक्या रंगाची जात आहे. तिचा पेरा मध्यप्रांतांत फारच तुरळक आढळतो. जवसाचें पीक रब्बी हंगामांतील असून त्याला काळी, खोल, ओल धरून ठेवणारी अशी जमीन लागते. हें पीक गहूं, हरबरा व शाळू यांच्याशीं आळी-पाळीनें पेरितात; व कित्येक वेळां या पिकांतून जवसाचे पाटे घालतात. मध्यप्रांतांत जवस एकटाच पेरितात. तथापि हें पीक गहूं, हरबरा वगैरेंशीं मिसळूनहि पेरितात. या पिकाला खत देण्याची फारशी वहिवाट नाहीं. जमीन एक दोन वेळ नांगरून व वरच्यावर कुळवून तयार झाल्यावर आक्टोबर महिन्यांत पाभरीनें पेरणी करितात. दोन ओळींत अंतर सुमारें एक फूट असतें. एकरी बीं सुमारें दहा बारा पौंड लागतें. हें पीक पेरल्यानंतर पुढें निंदणी टिपणी कांहीं देत नाहींत. फेब्रुवारी महिन्यांत पीक तयार होतें. तें तयार झाल्यावर विळ्यानें कापितात व त्याच्या लहान पेंढ्या बांधून ढीग घालून ठेवितात. नंतर खळ्यांत नेऊन पसरून ठेवितात व वाळल्यानंतर मोगऱ्यानें झोडून ते पाखडतात. म्हणजे धान्य तयार होतें.

दर एकरीं सरासरी उत्पन्न ४००।६०० पौंडपर्यंत येतें. बियांचें तेल काढितात,पोटिस करितात व चटणी करून खातात. गुरास जुलाब व्हावा म्हणून जवसाचें तेल पाजितात. वऱ्हाडांत या तेलाचा स्वयंपाकांत फार उपयोग करितात. त्याचा रंगांत व व्हारनिसांत फार उपयोग होतो व छापण्याची शाई तयार करण्यांतहि त्याचा उपयोग होतो. पेंड गुरांस खावयास घालतात. ती फार पौष्टिक असते.

**जवादि डोंगर**—मद्रास इलाखा. उत्तर अर्काट जिल्ह्यांतील नैऋत्य दिशेकडे असलेले डोंगर. उत्तर अक्षांश १२° १८' ते १२° ५४' व पूर्व रेखांश ७८° ३५' ते ७९° ११'. पूर्वेकडील डोंगर आणि जवादि डोंगर यांमध्यें पालार नांवाचें खोरें आहे. यांत मलयाली नांवाची डोंगरी जात रहात असून यांची संख्या साधारण १०००० आहे. येथील हवा साधारण वाईट असून हिंवतापाची सांथ येथें नेहमीं उद्भवते. वेलोरपासून याच डोंगराच्या एका कैलासगड नांवाच्या डोंगरावर उन्हाळ्याकरितां पुष्कळ बंगले बांधले आहेत. या डोंगरांत पूर्वी फार जंगल असे. परंतु हल्लीं तें बहुतेक नाहींसें केलें आहे. येथें शिकार पुष्कळ सांपडते. गवा, सांबर, चित्ते, ठिपक्यांचे हरिण, वाघ वगैरे वन्यपशू सांपडतात. या ठिकाणीं सरकारी परवाना घेऊन गांजाची लागवड करतां येते. कॉफी लावण्याच्या प्रयत्न कांहीं भागांत होत आहे. कांहीं हिंदू देवळांचे अवशेष व कांहीं शिलालेख येथें सांपडतात.

**जवानबख्त मिर्झा**, प हि ला.— हा शहाआलम बादशहाचा वडील पुत्र. याचा जन्म स. १७४९ त झाला. याला पानिपत झाल्यानंतर अहमदशहा अबदालीनें मोंगली साम्राज्याचे ( रीजंट ) राजप्रतिनिधि नेमिलें होतें. त्यानें हा कारभार आपला बाप पुन्हां गादीवर स्थानापन्न होईपर्यंत ( १७७१ ) चालविला. याचें दुसरें नांव शहाजादा जहांदरशहा असें होतें. पुढें याचें व याच्या बापाचें न पटल्यानें हा दिल्लीहून पळून लखनौस गेला ( १७८४ ). त्यावेळीं तेथें वॉरन हेस्टिंग्ज हा दिल्लीचा वजीर असफउद्दौला यांच्याशीं कंपनीच्या बाबतींत कांहीं करार वगैरे करण्याच्या कामासाठीं आला होता. जवानबख्त हा हेस्टिंग्जकडे गेला व त्याच्याबरोबर पुढें बनारसला कायमचा जाऊन राहिला. हेस्टिंग्जनें वझीराकडून खटपट करवून याला दरसाल पांच लाख रु. ची नेमणूक करवून दिली. हा बनारस येथेंच, आपल्या वयाच्या ३९ वे वर्षी मेला ( ३१ मे १७८८ ). त्याची कबर तेथेंच आहे. त्याच्या प्रेतास बादशाही मान देण्यांत आला होता. याला तीन मुलें होतीं. तीं व इतर सारें कुटुंब त्यानें इंग्रजांच्या देखरेखीखालीं ठेविलें. त्याचा वंश आतांपर्यंत बनारस येथें नांदत होता व त्याला इंग्रजसरकार कांहीं रक्कमहि देत होतें. यानें केलेला बयाज इनायेत मुर्शिदझादा नांवाचा एक ग्रंथ ब्रिटिश म्यूझियम ( इंडियन हाऊस )मध्यें आहे. यानें लिहून ठेवलेली हकीकत स्कॉटनें भाषांतर करून हेस्टिंग्जच्या तत्कालीन सरकारी रिपोर्टांत छापली आहे.

दु स रा.—हा दुसरा जवानबख्त मिर्झा, दिल्लीचा शेवटचा बादशहा बहादूरशहा याचा सर्वांत धाकटा मुलगा होय. याला आपल्या बापाबरोबरच रंगून येथें राजकीय कैदी म्हणून ठेवण्यांत आलें होतें. ( १८५८ ). हा मरेपर्यंत ( १८८४ ) तेथेंच होता. याची बेगम इमानी हिला इंग्रजसरकारनें दरमहा २५० रु. पोलिटिकल पेन्शन दिलें होतें. [ बील— ओरि. बायॉ. डिक्श. ]

**जवासिया**—मध्यहिंदुस्थान. माळवा एजन्सींतील एक ठाकुरात.

**जव्हार**, सं स्था न.—मुंबई इलाख्यांत, ठाणें जिल्ह्यांत हें लहानसें संस्थान उ. अ. १९°४३' ते २०°५' व पू. रे. ७२°५५' ते ७३°२०' यांच्या दरम्यान असून त्याचें क्षेत्रफळ ५०० चौ. मै. लोकसंख्या ( १९२१ )४९६९३ व उत्पन्न ३।। लाख आहे. याच्या उत्तरेस डहाणू, मोखाडे, पूर्वेस मोखाडे, दक्षिणेस वाडें व पश्चिमेस डहाणू व माहीम हे ठाणें जिल्ह्यांतील तालुके आहेत. पूर्वी या प्रदेशासन्न कोळवन

म्हणत. संस्थानचा बहुतेक प्रदेश म्हणजे एक हजार फूट उंचीवरील सह्याद्रीचें पठार असून तो सर्वत्र टेकड्या व डोंगर आणि बारीकसारीक नाले व नद्या यांनीं व अरण्यानें व्याप्त आहे. सूर्य, पिंजळी, वाघ व देहर्जी या नद्या मुख्य आहेत. संस्थानांत मलमाड ( १५० चौ. मै. ), कर्यात हवेली ( ३६० चौ. मै. ) व गंजाड ( ३० चौ. मै. ) या नांवाचे तीन महाल आहेत. खुद्द जव्हार येथें पाण्याचा तुटवडा पडे, त्यामुळें माजी राजानें सूर्यनदीच्या पाण्याचा पुरवठा शहरास केला आहे. संस्थानची हवा मलेरियाची व तापसराईची आहे. येथें सालिना १२० इंचांपर्यंत पाऊस पडतो. पर्वताच्या पायथ्याशीं उन्हाळा जास्त कडक असतो. बांधकामास लागणारा दगड विपुल आढळतो. साग, शिसू, पळस, तिवस वगैरे झाडें फार आहेत. सागाचा व्यापार फार असून तो नोव्हेंबर ते जूनपर्यंत चालू असतो. झाड तोडण्यापूर्वी शेंकडा २५ टक्के ( किंमतीच्या ) रक्कम सरकारांत भरावी लागते, म्हणजे तोड करण्यास परवाना मिळतो. तोडींची तपासणी महालकरी करितो व मग लांकूड बाहेर जाऊं देतात. दरेक गाडीमागें ३८८ ते ३८१२ पर्यंत दस्तुरी घेतात. संस्थानाला सर्वांत जास्त उत्पन्न याच ( जंगल ) खात्याचें आहे. एकंदर उत्पन्नांपैकीं हें उत्पन्न जवळ जवळ ८१ ते ८२ हजारांचें आहे. जंगलांत वाघ, चित्ते, अस्वलें, तरस, खोकडें, सांवरें व कोळसुंदे वगैरे जनावरें आढळतात. लोकसंख्येपैकीं शेंकडा ८४·६३ वन्यजातीचे लोक ( वारली, ठाकूर, काथोडी ) असून बाकीचे कोळी कुणबी व इतर लोक आहेत. वारली, ठाकूर वगैरे लोक गरीब असून शेती व मजुरी यावर त्यांचा निर्वाह होतो. हे लोक दारू फार पितात. कोळ्यांत चार पोटजाती आहेत ( राजकोळी, महादेव, मल्हार व ढोर ). संस्थानिक हा महादेव कोळी जातीचा असल्यानें महादेव हेच आपल्यास राजकोळी म्हणवितात. मेलेलीं जनावरें खावयास लागल्यानें व कातकऱ्यांशीं सोयरिकी केल्यानें ढोर कोळी ही पोटजात निर्माण झाली. ठाकूर कोळी हे राजकोळ्यांच्या दर्जाचे असून त्यांचे मठाकूर व कठाकूर असे दोन भेद आहेत. पहिले लोक बोलतांना नेहमीं म हें अक्षर व दुसरे लोक क हें अक्षर ( कार्यकारण नसतांना ) उपयोगांत आणितात. तसेंच मठाकूर आपलीं लग्नें लावण्यास ब्राह्मण आणतात तर कठाकूर आणीत नाहींत. कातकरी गोमांस लोक खातात असें म्हणतात.

पूर्वी या संस्थानांत ( व्यभिचारी ) जारज प्रजेस गुलामाप्रमाणें राबविण्याची शिक्षा देत व त्यांचा भरणा जव्हारच्या राजाच्या पदरीं दास व दासी या जागांवर करीत. मलवाड व गंजाड भागांशिवाय इतरत्र जमीन नापीक आहे. मुख्य पीक भात, नाचणी व ताग असून सरकार आपल्या हुकमती खालीं तंबाखूचा पेरा करवितें, व पुढें ठराविक भावानें तंबाखू विकत घेतें.

प्रदेश डोंगराळ व सडका कमी त्यामुळें व्यापार फारसा नाहीं. डहाणू रेल्वेस्टेशनपासून जव्हार येथें जाण्यास मात्र एक सरकारी सडक चांगली बांधलेली आहे. याशिवाय चिंचउतार, गोंडे, धोंडमारे, शीर, तळासरी, कासतवाडी व डेंग या घाटांतून बारीकसारीक गाडीरस्ते आहेत. निर्गत मालावरील जकातीचें बरेंचसें उत्पन्न संस्थानला मिळतें; तें व जंगलखात्याचें उत्पन्न मिळूनच बहुधा संस्थानची जमाबंदीची रक्कम होय.

इतिहास.—मुसुलमानी अंमल ( दक्षिणेंत ) होण्यापूर्वी उत्तरकोंकणचा बराचसा भाग कोळी व वारली जहागिरदारांच्या ताब्यांत होता. जव्हार येथें पूर्वी वारली राजा होता. कोळी लोक पुढील दंतकथा सांगतात. पापेरा अथवा जयबा नांवाचा एक कोळी थळघाटाजवळ मुकर्णे या गांवीं एक गढीबंद जमीनदार होता. या घराण्याला तेव्हांपासून मुकर्णे हें आडनांव मिळालेलें आहे. तो एकदां पिंप्री येथें देवीच्या दर्शनास गेला असतां तेथील पांच कोळी साधूंनीं त्याला राजा होण्याबद्दल अशीर्वाद दिला. त्यावर जयाबनें कोळी लोक जमवून पेंढ, धरमपूर हीं गांवें काबीज करून काठेवाडांत घुसून तो तिकडे सात वर्षें राहिला. नंतर परत येऊन जव्हार येथें गेला व तेथील वारली राजास त्यानें बैलाच्या कातड्यानें व्यापली जाईल इतकी जमीन मागितली; ती राजानें कबूल केल्यावर त्यानें कातड्याच्या अगदीं बारीक तांती काढून त्यांच्या मोजणींत राजाचें सारें राज्य घेतलें ( बहुधा जयबानें वारल्यापासून धूर्ततेनें प्रदेश लुबाडला असावा असा या गोष्टीचा संदर्भ निघतो ) व त्याला जव्हारपासून ६ कोसांवरील गंभीरगड व त्याच्या भोंवतालचा थोडासा प्रदेश जहागिरीदाखल दिला.

जयबाला दोन मुलें नेमशहा व होळकरराव या नांवाचीं होतीं. पैकीं नेमशहा हा जयबाच्या मागें राजा झाला. दिल्लीच्या मुसलमान पातशहांस या डोंगराळ प्रदेशांत स्वारी करून तो हस्तगत करतां येईना म्हणून त्यांनीं या नेमशहास ५ जून स. १३४३ रोजीं शहा हा किताब देऊन त्याच्या ताब्यांतील २२ किल्ले असलेला व ९ लाख उत्पन्नाचा मुलूख त्यास स्वतंत्र तोडून दिला. तेव्हां नेमशहानें या दिवसापासून आपला एक स्वतंत्र शक सुरू केला व तो आजसुद्धां संस्थानांत सरकारी कागदपत्रीं वापरीत असतात. गुजराथच्या नवाबाच्या ताब्यांत चेऊल नागोठाण्यापर्यंतचा प्रदेश आला असतांहि त्यांनीं जव्हारकरांस मुळींच उपसर्ग दिला नाहीं. सतराव्या शतकाच्या मध्यांत फिरंगी लोकांनीं मात्र यांच्या प्रदेशास बराच त्रास देऊन, अशेरी किल्ला व कांहीं महत्वाचीं ठाणीं काबीज केलीं होतीं. मात्र त्यांनां जव्हारकरांबरोबर सतत भांडावें लागलें व नेहमीं चकमकी कराव्या लागल्या. त्यांत " हे कोळी लोक आमचें नुकसान करून भराभर या झाडावरून त्या झाडावर वानरासारखे असे नटकन पसार होत " अशी

माहिती फिरंग्यांनीं दिली आहे). या वेळीं जव्हारकरांकडे माहुली (किल्ला त्यांच्याच ताब्यांत होता) पासून भिवंडी-पर्यंतचा प्रांत होता. त्याशिवाय तवर (दमण जवळील), वर्से (वासिंद) व दरिळें (उंवरगांवजवळील) हीं तीन शहरें त्यांच्या हातीं होतीं. फिरंग्यांच्या उतरत्या काळांत कोळयांनीं आपली सत्ता पुन्हां वाढविली (१६५०). औरंगझेवानें जव्हारकरांस त्रास दिला नाहीं.

मराठ्यांच्या कारकीर्दीत प्रथम मोरोपंत पिंगळे यांनीं जव्हारच्या राज्यावर स्वारी केली होती. तेव्हां (१६७२) विक्रमशहा हा पळून मोंगलाईंत गेला. पुढेंहि मराठ्यांनीं जव्हारवर तीन चार वेळां स्वाऱ्या केल्या. जव्हारकरानेंहि फिरंग्यांवर स्वारी करून त्यांचा प्रदेश लुटला (१६९०). अठराव्या शतकाच्या प्रारंभीं फक्त समुद्रकिनाऱ्याशिवाय बाकीचें सर्व उत्तरकोंकण (वसई ते दमण व भिवंडीपर्यंत) जव्हारच्या हातीं होतें व त्यांत १० किल्ले असून त्याचा वसूल ३॥ लाखांचा होता. पुढें जव्हारकर हा मराठ्यांचा मांडलिक बनला व त्याच्या हातीं थोडासाच प्रांत उरला. पेशव्यांनीं त्याच्यावर स्वदेशमुखी व बाबती हे कर बसविले. एकदां तर कोळयांचें बंड त्याला मोडतां येईना म्हणून त्याला दरसाल १ हजारांचा नजराणा पेशव्यास द्यावा लागे. विक्रमशहास १७४२ त वारल्यावर त्याच्या वडील राणीनें घेतलेला दत्तक धाकट्या राणीनें ठार मारविला. तेव्हां संस्थानची सर्व सत्ता पेशव्यांनीं आपल्या हातीं घेतली. या प्रमाणेंच स.१७५८व१७६१ मध्यें जव्हार पेशव्यांच्या ताब्यांत होतें. पुढें त्यांनीं १७८२ त जव्हारकरास १५ ते २० हजारांचा मुलुख तोडून दिला. पतंगशहा दुसरा हा स.१७९८ त वारल्यावर त्याचा मुलगा विक्रमशहा तिसरा हा पेशव्यांच्या अनुज्ञेनें गादीवर आला व त्यावद्दल त्यानें ३ हजार रु. नजराणा पेशव्यांना देऊन त्र्यंवकच्या मामलेदाराच्या साह्यानें राज्यकारभार चालविण्याचें कबूल केलें. पुढें स.१८०५ त राजगडकडे भिल्लांचा दंगा झाल्यानें पेशव्यांनीं राजाला आपल्या लष्करी अधिकाऱ्याचे देखरेखीखालीं ठेविलें. तिसरा विक्रमशहा हा स. १८२१ त वारल्यानंतर थोड्याच दिवसांत त्याला मुलगा (पतंगशहा) झाला; परंतु गादीवद्दल विक्रमच्या दोन भावांत तंटा लागला. तेव्हां इंग्रजांनीं तिसऱ्या पतंगशहासच गादीवर बसविलें. हा स. १८६५ त निपुत्रिक वारल्यानंतर त्याचा चुलत पुतण्या नारायण यास दत्तक घेऊन त्याचें नांव चवथा विक्रमशहा ठेऊन त्याला गादीवर बसविलें. तो एक महिन्यानेंच वारला. तेव्हां कृष्णशहाच्या शाखेंतील मल्हारराव नांवाच्या मुलास दत्तक घेऊन त्याचें नांव चवथा पतंगशहा ठेविलें. हे पतंगशहा त्यावेळीं १० वर्षांचे होते. दत्तकावद्दल इंग्रजसरकारनें २० हजार रु. नजराणा घेतला. हे राजे २८ मार्च स. १८६७ त गादीवर बसले. त्यांना पूर्ण अख्त्यार जानेवारी स. १८७७ त मिळाला. यानां पुणें हायस्कुलांत इंग्रजी शिक्षण मिळालेलें होतें. कै. मंडलीक व कै. बापुसाहेव आठल्ये यांची सल्लामसलत हे नेहमीं घेत असत. हे विद्वानांचे चहाते होते. गरीव प्रजेस धान्याची मदत करणें, रस्ते, विहिरी वांधणें वगैरे लोकोपयोगी कामें त्यांनीं वरींच केलीं. यांची राणी ही नाशिक जिल्ह्यांतील कलुस्ते गांवच्या कोळी पाटलाची मुलगी होय. हे पक्षघातानें सन १९०५ मध्यें वारले. त्यांच्यामागें त्यांचे वडील पुत्र श्री. राजे कृष्णशहा ऊर्फ बाळासाहेव हे गादीवर बसले. हेच हल्लीं संस्थानाधिपति आहेत. यांचा जन्म सन १८७९ च्या सुमारास झाला. यांचें इंग्रजी शिक्षण मुंबईस एल्फिस्टन हायस्कुलांत होऊन वडिलांच्या हाताखालीं त्यांनीं राज्यकारभाराचें शिक्षण घेतलें. यानां एक बंधु, एक वहीण आणि दोन मुलें आहेत. संस्थानला न्यायमनसूब्याचे, दिवाणी व फौजदारी सर्व हक्क आहेत. गादीवर वसतांना फक्त इंग्रजसरकारास नजराणा द्यावा लागतो. त्याखेरीज खंडणी द्यावी लागत नाहीं. दत्तक घेण्यास इंग्रजांची परवानगी लागते. शेतजमीन ही सर्व संस्थानची मालकीची गणिली जाते. पूर्वीं जमीनमोजणी नांगरावर होत असे. बैलाची एक जोडी जितकी जमीन नांगरील तितकी एक नांगर जमीन होय. एका नांगरावर ५ ते ८ रु. पर्यंत सरकारसारा असे. शिक्षणावर ३ ते ३॥ हजार रु. खर्च होतो.

गां व:—ही संस्थानची राजधानी असून येथें पांचशें घरांची वस्ती आहे. गांव समुद्रसपाटीपासून १ हजार फूट उंचीच्या पटारावर असल्यानें हवा थंड व निरोगी आहे. हल्लीच्या संस्थानिकांनीं गांवची पुष्कळ सुधारणा केली. लोकांनां नवीन व व्यवस्थितपणें घरें वांधण्यास लांकूड फुकट पुरविलें. हल्लींच्या राजवाड्याजवळच पूर्वीचा राजवाडा व नगारखाना पडक्या स्थितींत उभा आहे. तो १७५० त कृष्णशहानें बांधला होता. तो इ. स. १८२२ त जळाला. व या नवीन गांवाजवळ प्राचीन जव्हार गांव होतें. येथून ५ कोसांवर एक भोपटगड नांवाचा पडका किल्ला आहे.

या राजघराण्याचा वंशवेल असा:—१ पापेरा ऊर्फ जयवा-२ नेमशहा पहिला (धुळवाराव)-३ भीमशहा-४ महंमदशहा-५ कृष्णशहा पहिला (दत्तक)-६ नेमशहा दुसरा-७ विक्रमशहा पहिला-८ पतंगशहा पहिला-९ कृष्णशहा दुसरा (दत्तक)-१० विक्रमशहा दुसरा-११ कृष्णशहा तिसरा-१२ पतंगशहा दुसरा (दत्तक)-१३ विक्रमशहा तिसरा-१४ पतंगशहा तिसरा-१५ विक्रमशहा चवथा (दत्तक)-१६ पतंगशहा चवथा (दत्तक)-१७ श्री. कृष्णशहा चवथे (विद्यमान). [ नेने- कोंकण; बॉम्बे. गव्हर्नमेंट सिलेक्शन्स, पु २६; पेशवाज् स्टेट् डायरीज्-एथरीज कृत; मॅकेन्झी म्यानिस्क्रिप्ट्स्; ठाणें ग्याझेटियर ]

**जशपूर, संस्थान.**—हें संस्थान मध्यप्रांतांत उ. अ. २२° १७' ते २३° १५' आणि पू. रे. ८३° ३०' ते ८४° २४' यांत वसलें असून १९६३ चौरस मैल क्षेत्रफळाचें आहे.

या संस्थानांतील हवा एकंदरींत बरी आहे. उन्हाळा कडक असून हिवाळ्यांत घाटांवर मात्र फार थंड हवा असते. पण सखल प्रदेशांत आरोग्यदायक व सुखावह असते; मात्र पावसाळ्यांत अतिशय सर्द हवा असल्यामुळें जंगली तापाचा उद्रव करणारी असते. घाटांवर ६७ इंच पाऊस पडतो.

येथील जंगलांत साल, टेंबुरणी हीं मौल्यवान झाडांचीं अरण्यें असून लाख, टसर रेशीम, मधमाशांच्या पोळ्याचें मेण हेहि पदार्थ उत्पन्न होतात. मोहो चोहोंकडे असून प्रत्येक खेड्याजवळ आंबराई असतेच. रेल्वेपासून हें संस्थान दूर असल्यामुळें वन्यपदार्थांचा चांगला व्यापार चालत नाहीं. संस्थानिकास जंगलचें उत्पन्न बरेंच आहे.

प्राचीन वस्तूंपैकीं फक्त खुरीया पठाराच्या एका अवघड सुळक्यावर बांधलेलें "खुरिया राणी" चें देऊळ कायतें आहे. उच्चप्रदेशावरील कोरवा लोक या राणीचे वंशज आहेत असें म्हणतात. हें देऊळ बौद्धधर्तीचें दिसत असून आंतील मूर्तीहि बुद्धाचीच दिसते पण लोक ती देवीच समजून तिची पूजा करितात. लोकसंख्या (१९२१) १५४१५६. संस्थानिकांनीं संस्थानांतील पुष्कळशी पडित जमीन वहाण्यास मोकळी करून दिली व उंस आणि गहूं यांच्या लागवडी सुरू झाल्यावरून बाहेरून फार लोक आले.

ओरअना, रौतिया, कोरवा, अहीर किंवा गौळी,नागवंशी चिक, कोर वगैरे अनेक जाती व पोटजाती येथें रहात असून अलीकडे यांपैकीं पुष्कळ लोक बाटून ख्रिस्ती झाले आहेत. यांतील निम्याच्यावर हिंदू व बाकीचे ख्रिस्ती व इतर आहेत. संस्थानची सामान्य भाषा छत्तिसगडीसारखी हिंदीचीच पोटभाषा आहे. ओरावन व कोरवा यांची स्वतंत्र भाषा आहे. लोक फार रानटी स्थितींत आहेत. या संस्थानांतील मुख्य घराणीं पांच इलाखदारांचीं आहेत खुरिया (कोरवा), फर्सबहार (ओरांगोंड), बंदरचुआ (कवार), आरा आणि खेर्तदिह (रौतिया) यांत खुरियाखेरीज सर्व इलाखदारांच्या जमीनी संस्थानांत विरळ विरळ अशा पसरलेल्या आहेत. एकाचा सर्व जमीन एकाच भागांत नाहीं.

सर्वसाधारण तांदुळाचेंच मुख्य पीक असून त्याच्या ११५ जाती लोकांना माहीत आहेत. चराईचें दांडगें उत्पन्न आहे. या संस्थानांतील व्यवहार पैशानें क्वचितच होतो. जो माल घ्यावयाचा त्याच्या मोबदल्यांत तांदूळ, फार तर कापूस देण्यांत येतो. इब नदीच्या कांठीं थोड्या प्रमाणावर सोनें सांपडतें. तें गोंड लोक जमा करून राजास देतात. व इतरत्र लोखंडहि सांपडतें, तें फिरते व्यापारी मीठ, कापड वगैरेच्या मोबदल्यांत परप्रांतीं नेतात.

एकंदर जमीनीचे दोन विभाग आहेत. (१) "खालसा" व (२) 'इलाखदारी'. संस्थानचा वसूल सुमारें एक लाखाचा आहे. सर्व साधारण राजकारभार संस्थानिक दिवाणाच्या मदतीनें करीत असतो संस्थानिकास इंग्रजाकडून १८९९ सालीं जी सनद मिळाली, तीच १९०५ सालीं पुन्हां नवी करून देण्यांत आली. तिच्या अन्वयें संस्थानचा सर्व अधिकार संस्थानिकाकडे राहून त्यास इंग्रजाच्या सामंतांपैकीं एक समजण्यांत आलें.

गां व.—जशपूर संस्थानचें राजधानीचें गांव. यास जगदीशपूर असेंहि म्हणतात. उ. अ. २२° ५३′ व पू रे. ८४° ८′. रांचीपासून ९० मैल असून येथील लोकसंख्या १९०१ सालीं १६५४ होती. येथें संस्थानिकाचा वाडा, शाळा, डाकबंगला व सबपोस्ट आफिस आणि तुरुंग आहे.

**जसदन संस्थान**—मुंबई इलाखा, काठेवाडांतील एक संस्थान. उ. अ. २१° ५६′ ते २२° १७′ व पू. रे. ७१°८′ ते ७१° ३५′. क्षेत्रफळ ५८३ चौ. मै. यांत एकंदर १६ खेडीं आहेत. लो. सं. (१९०१) २५७२७. उत्पन्न रु. १२३०००. काठेवाडांतील तिसऱ्या दर्जाचें हें संस्थान आहे. पूर्वीच्या क्षत्रिय राजांपैकीं स्वामी चष्टन यापासून जसदन हा अपभ्रंश असावा. जुनागडच्या घोरींनीं येथें एक किल्ला बांधला होता; व त्यास घोरगिड असें म्हणत. पुढें हा खेर्डाच्या खुमानांच्या हातांत गेला. त्यांच्यापासून विका खाचर यानें इ. स. १६६५ च्या सुमारास जिंकून घेतला. पुढें वजसूर खाजर याच्या अमदानींत हा भावनगरकडे गेला. नंतर नवानगरनें बळकावला. पुढें जामजसजीच्या लग्नप्रसंगीं नवानगरच्या जामनें वचसूर खाचर याच्या हवाली केलें. वचसूर खाचर यानें इ. स. १७०७–८ मध्यें ब्रिटिशांशीं स्नेह संपादिला. याच वंशाकडे हल्लीं हें संस्थान चालत आहे. संस्थानांत जसदन हें मुख्य ठिकाण आहे.

सं स्था न चा अ र्वा ची न का र भा र, शिक्षणः— १९२३ सालीं प्राथमिक शिक्षण मोफत देण्याची व्यवस्था संस्थानांत करण्यांत आली. जासपुर येथें एक नवीन शाळा उघडण्यांत आली. त्याचप्रमाणें संस्थानच्या राणीसाहेबांनीं दुय्यम प्रतीच्या इंग्रजी शाळांतील नादार विद्यार्थ्यांचें प्रमाण शेंकडा २६ पर्यंत वाढविलें.काठी जातीच्या मुलांमुलींनीं शाळेंत नांवें दाखल केलीं आहेत. प्राथमिक शिक्षण जरी मोफत करण्यांत आलें आहे तरी तें अद्याप सक्तीचें केलें गेलें नाहीं. खेडेगांवांतून शाळा उघडण्यासाठीं भाटयांना उत्तेजन दिलें जातें. सर्व शाळांतून विद्यार्थ्यांच्या आरोग्याचीहि परीक्षा पहाण्यांत येते (१९२३).

जमीनीची लागवडः--१९२३ सालीं संस्थानांत एकंदर ४ तलाव असून, त्यांच्या योगानें अदमासें २२,७०० एकर जमीन लागवडीखालीं जात असे. १८९९--१९०० सालीं पडलेल्या दुष्काळांत, शेतकऱ्यांना पाणी पुरवण्याकरितां अलनुसागर हा तलाव बांधण्यांत आला असून तो वरील चार तलावांपैकीं सर्वांत मोठा आहे. याचें क्षेत्रफळ २५ चौरस मैल असून या तलावाच्या पाण्याच्या योगानें अदमासें ११००० एकर जमीनीची लागवड करतां येईल परंतु पुढें आळीपाळीनें विहिरीचें पाणी व तलावाचें पाणी, शेती कामांत उपयोगांत आणण्याचें ठरलें; नव्या विहीरी खोद-

त्यांच्या कामास उत्तेजन यावें म्हणून पुढील खुबीदार योजना करण्यांत आली. एखाद्या उद्योगी शेतकऱ्यास एक विहीर आणि तिच्या पाण्याच्या योगानें भिजणारी १५ विघे जमीन वहाल करण्यांत येई. ही जमीन विकण्याचा अगर गहाण देण्याचा त्यास पूर्ण अधिकार असे. मात्र तत्पूर्वी त्यानें स्वतःच्या खर्चानें त्या जमिनींत एक तरी विहीर खोदविली पाहिजे. या कल्पक योजनेमुळें जमीन निरुद्योगी व अडाणी शेतकऱ्यांच्या ताब्यांतून उद्योगी व शोधक शेतकऱ्यांच्या ताब्यांत जात आहे व विहिरी पुष्कळ बांधल्या जात आहेत. १९०३ सालीं संस्थानांतील विहिरींची एकंदर संख्या १५७९ होती. त्यांपैकीं १२८० विहिरी कच्च्या व २९९ पक्क्या होत्या.

रेल्वेः—भावनगर संस्थानशीं झालेल्या एका करारान्वयें जसदन संस्थानास, भावनगर स्टेट रेल्वेच्या बोलद–जसदन शाखेचा ८ आण्यांचा भाग (शेअर) विकत घेण्याचा हक्क प्राप्त झाला आहे. धंधुक रेल्वेलाईन पूर्ण झाल्यास तिनें जसदन, एका बाजूस राजकोट आणि दुसऱ्या बाजूस अहमदाबाद या शहरांस जोडलें जाईल.

सामाजिकः–लहानसहान कज्जे कोर्टाच्या मदतीवांचून मिटविण्याच्या पद्धतीस संस्थानातर्फे उत्तेजन दिलें जात असून या बाबतींत संस्थानाकडून होणारे प्रयत्न बऱ्याच अंशानें यशस्वी होत आहेत. या योजनेमुळें पुष्कळ गरीबांचा कोर्टलढा लढण्यास लागणारा अनाठायीं पैसा वांचत आहे. मालमत्तेच्या सुरक्षिततेकरतां, इमारतींच्या स्थानांवरील मालकी हक्क नांवानें करून देण्याची योजना जसदन आणि विंच्छियापासून तो सर्व खेड्यांपर्यंत वाढविण्यांत आली असून लोकांना ती फार पसंत पडली. १९२३ सालीं वेठ (सक्तीचें काम) आणि कांहीं किरकोळ करवसूली रद्द करण्यांत आली. संस्थानांत मद्यविक्रीस बंदी करण्यांत आली आहे. १९२२ सालीं मद्यविक्रीचा परवाना कोणासहि देण्यांत आला नव्हता. या नियमाविरुद्ध संस्थानच्या हद्दींत मद्य आणणाऱ्यास संस्थानतर्फे शिक्षा देण्यांत येते. या मद्यविक्रीच्या बंदीमुळें संस्थानाच्या उत्पन्नांत प्रतिवर्षी अदमासें १२०० रुपयांची तूट येत आहे. तथापि मद्यविक्रीस बंदी केल्याबद्दल कोणीहि ओरड केली नाहीं. १९२३ सालींहि संस्थानाच्या हद्दींत मद्यविक्रीचें एकहि नवें लायसेन्स दिलें गेलें नाहीं. दरबार श्री आला खाचर यांनीं संस्थानांत समारंभाप्रसंगीं दारू व अफू यांचा उपयोग करण्याची बंदी केली आहे (१९२५ मार्च).

**जसपुर**—संयुक्तप्रांत. नैनीताल जिल्ह्याच्या काशीपुर तहसीलींतील एक गांव. उत्तर अक्षांश २९° १६' व पूर्व-रेखांश ७८° ५०.' इ. स. १९११ मध्यें ६६१० लोकसंख्या होती. गांव अगदीं अलीकडील असून येथें मुसुलमान कोष्टी हातमागावर कापड काढतात. त्याचप्रमाणें साखर आणि इमारती लांकूड यांचाहि व्यापार येथें चालतो.

**जसवंतनगर**—संयुक्तप्रांत. इटावा जिल्हा व तहसीलींतील एक गांव असून, ईस्टइंडियन रेल्वेचें एक स्टेशन आहे. उत्तर अक्षांश २६° ५३' व पूर्व रेखांश ७८° ५३'. इ. स. १९११ मध्यें ३४८० लोकसंख्या होती. मणिपुरहून कोणी जसवंतराय नांवाचा कायस्थ इ. स. १७१५ मध्यें येथें येऊन राहिला त्याच्या नांवावरून गांवास हें नांव मिळालें आहे. इ. स. १८५७ च्या बंडांत बंडवाल्यांची एक लष्करी घोडेस्वारांची तुकडी येथील एका लहानशा देवळांत उतरली होती. येथें व्यापार बराच आहे. नक्षीदार पितळेचीं भांडीं येथ तयार होतात.

**जसवंतसिंह, महाराणा** (इ. स. १६३८–१६७८)—हा आपला बाप गजसिंग याच्या मृत्यूनंतर जोधपूरच्या गादीवर आला (१६३८). तेव्हांपासून सन १६५८ पर्यंत म्हणजे वीस वर्षे, तो औरंगझेबाबरोबर मुख्यत्वेंकरून दक्षिणेंतच कामगिरीवर होता. तेथें तो पुष्कळ प्रसिद्धीस आला. सन १६३८ मध्यें शहाजहान दुखणेकरी पडला तेव्हां त्याचा वडील पुत्र दारा हा सर्व राज्यकारभार पाहूं लागला. त्यानें याला (यानें दाराचा पक्ष घेतल्यामुळें) माळव्याचा सुभेदार नेमिलें. पुढें औरंगझेब दारावर चालून आला असतां त्याचा पराभव करण्याकरितां दारानें जसवंतसिंहास त्याच्यावर पाठविलें. जसवंतसिंहाचा पराभव झाला, तो त्याच्या गैरसुतसहीपणामुळें. मुराद हाहि सैन्य घेऊन इकडेच येत आहे असें समजल्यावरून उभयतां बंधूंस एकदमच जिंकूं असें ठरवून औरंगझेबाशीं युद्ध न करतां तसाच स्वस्थ बसला. इतक्या अवकाशांत औरंगझेबानें त्याच्या सैन्यांतील मुसुलमानांस फितूर केलें व धरमपूर येथें त्याचा पराभव झाला. तरीपण शेवटीं औरंगझेबाची फळी फोडून तो जोधपुरास निघून गेला (१६५८). या पराभवामुळें त्याच्या राणीनें त्याची निर्भर्त्सना केली; व स्वतः सती जाण्यास निघाली तेव्हां त्यानें औरंगझेबाची खोड मोडण्याचें वचन तिला दिलें व त्याप्रमाणें तो औरंगझेबाच्या नेहमीं विरुद्ध वागे. औरंगझेबानें गादीवर बसल्यावर जयसिंहाकडून भीड घालून जसवंतसिंहास आपल्या बाजूस वळवून घेतलें. परंतु त्याचा अंतस्थ हेतु औरंगझेबाचा सूड उगविण्याचा होता. पुढें उभयतां बंधूंच्या सैन्याची अलाहाबाद व इटावा यांच्या दरम्यान खजवा येथें लढाईत तोंड लागण्याच्या सुमारास गांठ पडली. जसवंतसिंहानें आपल्या फौजेनिशीं अकस्मात औरंगझेबावर उलटून सैन्याच्या पिछाडीवर हल्ला केला व त्याचा गोट लुटला. परंतु सुजा वेळेवर येऊन न मिळाल्यामुळें युद्ध टाळून त्यानें जी लूट मिळविली होती, ती सर्व घेऊन आग्र्याची वाट धरिली. पुढें सुजाचा पराभव झाला. इकडे जसवंतसिंह आग्र्याजवळ दारा याची वाट पाहात बसला. कारण दारास गादी मिळवून द्यावयाची असा त्याचा निश्चय होता. परंतु दारास सवड

होईना. जसवंतसिंहानें पुष्कळ वाट पाहिली, आणि शेवटीं तो जोधपुरास गेला. तेथें आपली सारी संपत्ति ठेवून मेडत येथें जाऊन तो दाराला भेटला. परंतु आतां उपयोग नव्हता. पूर्वीची संधी दाराच्या आळसानें फुकट गेली. औरंगझेब सुजाचा पराभव करून मोठ्या थोरल्या सैन्यासह त्यांच्यावर चालून आला. पण आपण जय मिळवूंच असा त्याला भरंवसा वाटेना. तेव्हां जसवंतसिंहास निरोप पाठविला कीं तुझा पूर्वीचा कोणताहि अपराध मनांत ठेवीत नाहीं, व जर तूं आमच्या ह्या भाईबंदी तंटयांतून अंग काढून बाजूस स्वस्थ राहशील तर तुला पुन्हां गुजराथची सुभेदारी सांगतो;व सात हजारी मनसब देतो. जयवंतसिंह त्या गोष्टीस कबूल झाला, आणि शहाजादा मोअझ्झम शिवाजी महाराजावर स्वारी करण्याकरितां निघाला होता, त्याच्या हाताखालीं रहाण्याचें कबूल करून तिकडे निघून गेला.

जसवंतसिंहाच्या मनांत औरंगझेबाशीं इमानानें वागावें असें मुळींच नव्हतें. दक्षिणेंत जाऊन पोहोंचतांच त्यानें शिवाजीबरोबर पत्रव्यवहार सुरू करून शाइस्तेखानाची फजिती करण्याचें आणि मोअझ्झमला बादशहा बनविण्याचें कारस्थान शिजविलें ( १६६३ ). हें औरंगझेबास कळल्यावर त्यानें जसवंतसिंहाला दख्खनमधून काढून जयपूरचा राजा जयसिंह याची त्याच्या जागीं नेमणूक केली ( तरी सुद्धां शिवाजीचा व जसवंताचा शिलशिला अंतस्थरीतीनें चालूच होता ).

त्या वेळेपासून उभयतांच्या मनांत एकमेकांविषयीं अविश्वास उत्पन्न झाला. तरी पण औरंगझेबानें जसवंतसिंहाला पुन्हां दक्षिणदेशीं पाठविलें ( १६६८ ), तेव्हां त्यानें तिकडे जाऊन मोअझ्झमास फितवून, पूर्ववत् कारस्थान सुरू केलें. यामुळें औरंगझेबाला भय पडून त्यानें जसवंतसिंहाला गुजराथच्या सुभ्यावर नेमिलें. त्याप्रमाणें तिकडे जात असतां अहमदाबादेस त्याला समजलें कीं, आपल्याला अधिकारावरून दूर करण्याकरितां बादशहानें हें कपट केलें आहे. त्याबरोबर तो परभारें जोधपुरास निघून गेला. याचवेळीं शिवाजीनें याच्या सहाय्यानें औरंगझेबाशीं तात्पुरता तह करून घेतला होता. जसवंतसिंह याप्रमाणें घरीं जाऊन बसला; तरी औरंगझेबाला त्याच्या सैन्याची व कारस्थानाची भीति वाटत होती. म्हणून त्याला दूरदेशीं पाठवावें असें ठरवून त्यानें काबुलांत बंड उत्पन्न झालें होतें तें मोडण्याकरितां जसवंतसिंहास काबूलच्या सुभेदारीवर नेमिलें. त्याप्रमाणें जसवंतसिंहानें आपला पुत्र पृथ्वीसिंह यास राज्य सांभाळण्यास सांगून तो तिकडे निघून गेला.

जसवंतसिंह काबूलास गेल्याबरोबर मागें त्याच्या कुळाचा विध्वंस करण्याचा कपटपटू औरंगझेबानें विचार करून पृथ्वीसिंहास आपल्या दरबारीं बोलावून नेलें व बाह्यात्कारी त्याजवर फार प्रीति दाखवून, आपल्या कृपेचें चिन्ह म्हणून त्यास पोशाख दिला. परंतु पोषाख अंगांत घातल्यावर थोड्याच वेळांत पृथ्वीसिंहानें तडफडून प्राण सोडला; कारण पोषाखाला विष लाविलें होतें. हें वर्तमान जसवंतसिंहाच्या कानीं जातांच त्याची कंबर खचली. त्याच सुमारास त्याचे दुसरे दोघे पुत्र जगत्सिंह व दलथमन हे काबूलच्या कडक थंडीनें मेले; तेव्हां त्याच्या दुःखाची परमावधी होऊन तो त्या शोकामुळें १० डिसेंबर सन १६७८ रोजीं वारला. यानंतर तेथून त्याचा कबिला व बाकीचीं मुलें हीं परत निघालीं. त्यांनां औरंगझेबानें जबरीनें दिल्लीस नेऊन मुसलमान करण्याचा प्रयत्न केला. पण राजकुटुंबाच्या अंगरक्षक रजपुत सरदारांनीं मोठ्या शौर्यानें औरंगझेबाच्या विरुद्ध जाऊन राजकुटुंबास जोधपुरास पोहोंचविलें. औरंगझेबानें पाठलाग केला; त्यांत पुष्कळ रजपूत मेले; पण राजकुटुंब हातीं लागलें नाहीं. याच प्रसंगीं दुर्गादास राठोड प्रसिद्धीस आला. शेवटपर्यंत महाराणी चंद्रावती व राजकुमार अजितसिंह औरंगझेबाच्या हातीं लागले नाहींत. औरंगझेब अगर त्याचे भाऊ यांचा पक्ष जसवंतसिंह हा घटकेंत धरी व सोडी याचें कारण यांचा विश्वासघात करावा असें नसून आपल्यास मुसुलमानांस हांकून देण्याचें सामर्थ्य नाहीं तर त्यांच्यांत भेद उत्पन्न करून त्यांनां निर्जीव करावें हें धोरण होय व याच हेतूनें त्यानें शिवाजीशीं शेवटपर्यंत मित्रत्वाचें नातें ठेविलें होतें. यानें आग्र्यास यमुनेकांठीं एक सुंदर महाल बांधला होता. तो अद्यापि ( पडक्या अवस्थेंत ) तेथें दिसतो. [ मनुची—स्टोरिओ ड मोगोर; नुसेतिनेसलातिन; म्यालेसन—हिस्टॉरिकल स्केच ऑफ धि नेटिव्ह स्टेट्स ऑफ इंडिया; टॉड—राजस्थान, पु. २; मुसुलमानी रियासत; गोडबोले—एतद्देशीय संस्थानें. ]

**जसोल**— राजपुताना. हें जोधपुर संस्थानांतलि मलानी जिल्ह्याच्या जसोल जहागिरीचें मुख्य ठिकाण असून जोधपूर-बिकानेर रेलवेच्या बालोत्रा स्टेशनपासून २ मैल आहे. इ. स. १९०१ मध्यें २५४३ लोक संख्या होती.जसोल जहागिरींत एकंदर ७२ खेडीं असून तेथील ठाकूर जोधपूर संस्थानास २१०० रुपये खंडणी देतो. येथें प्राचीन राठोड लोकांचे वंशज आहेत.

**जस्टिन**—हा रोमन इतिहासकार ॲन्टोनाइन्सच्या काळांत होऊन गेला असावा. त्याचा स्वतःचा इतिहास मुळींच उपलब्ध नाहीं. हिस्टोरियेरम फिलिपि कॅरम लिब्रि नांवाचें त्याचें एक पुस्तक आहे.

हें पुस्तक म्हणजे पॉम्पीअसनें ऑगस्टसच्या काळीं लिहिलेल्या पुस्तकांतील महत्त्वाचा व मनोरंजक लेखसंग्रह होय असें त्यानेंच आपल्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे. पॉम्पीअसचें पुस्तक आज उपलब्ध नाहीं. जस्टिन यानें आपल्या पुस्तकांत मूळ ग्रंथाचें सार दिलें नसून, निवडक उतारे दिले आहेत. या पुस्तकांत पुष्कळ महत्त्वाची माहिती मिळते. त्याची भाषा जरी पूर्णत्वास पोहोंचलेली नसली तरी सफाईदार व सहज समजणारी आहे. मध्ययुगांत याच्या पुस्तकाचा फैलावा बराच झाला होता.

**जस्टिनियन** ( ५६५ )—हा सुप्रसिद्ध व थोर—' दी ग्रेट '—रोमन बादशहा इलीरिकम प्रांतांत टॉरेशियम येथें जन्मला. त्याच्या आईबापांविषयीं किंवा बालपणाविषयीं माहिती नाहीं. त्याचा चुलता रोमचा बादशहा पहिला जस्टिन यानें त्याला दत्तक घेतल्यामुळें जस्टिनियन मोठ्या योग्यतेस चढून चुलता ५२७ मध्यें मरण पावल्यानंतर बादशहाहि झाला. पूर्ववयांत कान्स्टांटिनोपल येथें राहून त्यानें उत्तम शिक्षण संपादन केलें होतें. त्याचें स.५२३ मध्यें सुप्रसिद्ध थेओडोराबरोबर लग्न झालें होतें. राणी या नात्यानें ती सर्व राजकारणांत भाग घेत असे.जस्टिनियनच्या चरित्रांतील गोष्टींचीं चार मुख्य सदरें पडतात तीं—( १ ) कायदेसुधारणा, ( २ ) साम्राज्यसरकार, ( ३ ) धार्मिक धोरण व ( ४ ) युद्धें व परराष्ट्रीय धोरण.

( १ ) आधुनिक जगाला जस्टिनियन हा मोठा कायदेकार म्हणून परिचित आहे. त्याच्या वेळीं रोमन कायद्यांत सर्व गोंधळ झाला होता. कायद्याचे जुने व नवे असे दोन भेद पडून जुन्या कायद्यांत रोमन लोकसत्ताक राज्याच्या वेळचे कायदे व कायदेपंडितांनीं लिहिलेले ग्रंथ वगैरेंचा, आणि नव्या कायद्यांत रोमन बादशहांनीं केलेले हुकूम व कायदे यांचा समावेश होत असे. जुन्या व नव्या कायद्यांत परस्पर विरोधी गोष्टी पुष्कळ होत्या. त्यामुळें सर्व कायद्यांची फेरतपासणी करून व निरुपयोगी भाग गाळून अद्भुर ते सर्व कायदे एकत्र करण्याकरितां स ५२८ मध्यें एक व नंतर५३० मध्यें दुसरें कमिशन नेमलें. व ' कोडेक्स कॉन्स्टिटयूशनम् ' व ' डायजेस्ट ' असे दोन मोठे कायदेग्रंथ तयार केले. पण हे ग्रंथहि फार मोठे झाल्यामुळें सर्वसामान्य उपयोगाचा असा ' इन्स्टिट्यूट्स ऑफ जस्टिनियन ' नांवाचा तिसरा लहान ग्रंथ तयार करण्यांत आला व हाच ग्रंथ हल्लीं विद्यार्थ्यांना अभ्यासावा लागतो.

( २ ) साम्राज्याच्या जमाखर्चीं कारभारांत तो फार अपव्ययप्रवण व उधळ्या होता. स्वतःचें नांव व वडेजाव वाढावा म्हणून अनेक राजवाडे, ख्रिस्तालयें ( चर्चें ) वगैरे बांधलीं व पुष्कळ खर्चाचीं सार्वजनिक कामें केलीं. या कामांनां आणि युद्धांनां व सरहद्दीवरील रानटी टोळ्यांचा त्रास चुकविण्याकरितां लांच देण्याला त्याला जो पैसा लागला तो त्यानें लोकांवर कर बसवून गोळा केला. त्यामुळें राज्यांत अनेक बंड झालीं. त्यांपैकीं ५३२ मध्यें झालेल्या एका मोठ्या बंडांत तीस हजार लोक मेले. शिवाय असल्या गैरसोयीच्या गोष्टी करण्याकरितां जस्टिनियननें राज्यकारभाराचें प्रातिनिधिक स्वरूप बदलून शक्यतों त्याला अनियंत्रित स्वरूप दिलें.आणि अनियंत्रित राज्यकारभार यशस्वी करण्याकरितां लायक व इमानी असे दिवाण नेमले. ट्रिबोनियन, जॉन ऑफ कॅपाडोसिया वगैरे त्याचे कर्तबगार मंत्री होते.

( ३ ) धार्मिक बवतींतहि जस्टिनियननें पुष्कळ उलाढाली केल्या. त्यावेळीं ख्रिस्ती धर्ममतांत दुफळी माजून मॉनॉफिसाईट पक्ष व चाल्सेडोनियन ( पुराणमतवादी ) पक्ष असे पक्ष भांडत होते. जुनें ( चाल्सेडोनच्या कौन्सिलचें )मत असें कीं, ख्राईस्ट या विभूतीमध्यें मानवी व अतिमानवी ( डिव्हाईन ) हीं दोन्हि स्वरूपें आहेत. उलटपक्षीं मॉनॉफिसाईट म्हणत कीं ख्राईस्ट फक्त एकाच स्वरूपांत अवतरला आहे. या दोन पक्षांचें एकीकरण करण्याचा जस्टिनियननें अनेक वर्षें प्रयत्न केला व स्वतःच्या अधिकारांत पुष्कळ आज्ञापत्रें ( एडिक्ट्स ) काढलीं. पण कोणताहि पक्ष खुष झाला नाहीं व दोघांची एकीहि झाली नाहीं व ख्रिस्तेतर समाजासहि त्यानें कडक कायदे करून दुखविलें.पूर्वीच्या बादशहांनीं धार्मिक बाबतींतहि फारसें लक्ष घातलें नव्हतें. पण जस्टिनियनच्या सक्तीच्या कायद्यामुळें आशियामायनर या एकाच प्रांतांत ७०००० लोकांनां सक्तीनें बाप्तिस्मा देण्यांत आला. अथेन्स येथें जुन्या मूर्तिपूजक धर्माच्या अनुयायी विद्वानांनीं वरीच विद्यालयें चालविलीं होतीं. तींहि जस्टिनियननें बंद पाडलीं इजिप्त व सीरिया देशांतील लोकहि जस्टिनियनच्या धार्मिक बाबतींतील सक्तीमुळें फार असंतुष्ट झाले होते व त्यामुळेंच पुढें मुसुलमानांनां हे प्रांत जिंकणें सोपें गेलें.

( ४ ) जस्टिनियननें तीन मोठालीं युद्धें केलीं. त्यांपैकीं एक इराणबरोबर झालें. त्याचा महत्त्वाचा परिणाम कांहींच झाला नाहीं. मात्र त्यामुळें जस्टिनियन सांपत्तिक अडचणींत अधिकच सांपडला. दुसरें व तिसरें युद्ध अनुक्रमें व्हॅंडाल व गॉथ लोकांबरोबर झालेल्या युद्धामुळें उत्तर आफ्रिकेचा कांहीं भाग, दक्षिण स्पेन व इटाली हे देश रोमन साम्राज्याला मिळाले. या तीन युद्धांशिवाय डॅन्यूबनदीकडील स्लाव्ह व हूण या रानटी टोळ्यांबरोबर जस्टिनियनच्या सैन्याला वरचेवर सामने द्यावे लागत असत.

याप्रमाणें जस्टिनियनची सर्व कारकीर्द अनेक प्रकारच्या कार्यांत गेली. तो स्वतः हुषार, विद्वान् व विद्येचा पुरस्कर्ता होता व निरलस कार्यकर्ता होता. तथापि ' दी ग्रेट ' या पदवीला लागणारा उदारपणा, दूरदृष्टि वगैरे उच्च गुण त्याच्या अंगीं नव्हते. इतकेंच नव्हे तर थेओडोरा राणीच्या व दुसऱ्या कांहीं निकटवर्ती इसमांच्या सल्ल्याप्रमाणें तो वागत असे. त्याला औरस संतति नसल्यामुळें त्याचें राज्य त्याच्या पुतण्यास मिळालें.

**जस्त**—( परमाणु भारांक ६५.३७ ) हें एक धातुरूप मूलद्रव्य आहे. त्याचा रंग निळसर पिवळा असून नवीन कापलेला तुकडा चकचकीत असतो. जस्त ४१५° सें. ला वितळतें व १०४०° सें. उष्णमान झाल्यावर उकळूं लागतें. शुद्ध जस्तांतील ओढून तार काढतां येते. बाजारी जस्तावर घणाचे घाव घातले असतां त्याचे तुकडे होतात; परंतु १००° किंवा १५०° सें. पर्यंत तापविल्यानंतर त्याचे पातळ पत्रे तयार करतां येतात; आणि थंड झाल्यावर ते पत्रे सहज वाकूं शकतात. २००° सें. उष्णमान असतां ही धातु

इतकी ठिसूळ होते की, खलबत्त्यांत घालून तिची भुकटी करतां येते. जस्ताचें विशिष्टगुरुत्व ६.९१५ तें ७.१९१ पर्यंत असतें. याचा लंबप्रसारगुणक ०.०००२९८५ आहे. हवेनें जस्तावर गंज चढत नाहीं. तें उकळूं लागेपर्यंत तापविल्यास पेट घेऊन जळूं लागतें. व त्याचें प्राणिद तयार होतें. अगदीं शुद्ध जस्ताची कांडी पातळ गंधकाम्लांत ठेवली असतां तिजवर फारच थोडा परिणाम होतो. परंतु त्याच्या जवळ प्लाटिनम्, तांबें किंवा दुसरी एखादी जास्त धन वैद्युतिक धातु आणल्यास तें तावडतोब द्रवतें व उज्ज वायु निघून जातो. सामान्य अशुद्ध धातु तावडतोब द्रवते थंड व पातळ नत्राम्लांतहि जस्त द्रवतें आणि नत्रस प्राणिद निघून जातो. उष्णमान जास्त असल्यास किंवा अम्ल तीव्र असल्यास नत्रप्राणिद तयार होतें.

सांपडण्याचें ठिकाण—निसर्गांत जस्त हें स्वतंत्र रीतीनें आढळत नाहीं. परंतु संयोगीस्थितीत पुष्कळ ठिकाणीं सांपडतें. जस्ताची मुख्य अशोधित धातु म्हणजे त्याचें गंधकिद होय. कलखापरी हा खनिज पदार्थ जस्ताचा एक अशोधित धातु आहे. जस्त विशेषतः जर्मनी, आस्ट्रिया-हंगेरी, बेल्जम, संयुक्तसंस्थानें व इंग्लंड या देशांत गंधकिद-रूपांत आढळतें. जस्ताचें कर्बित स्पेन, सायलेशिया व संयुक्तसंस्थानें ह्यांत सांपडतें. हिंदुस्थानांत मदुरा, पंजाब व बलुचिस्तान या ठिकाणीं जस्ताचे दगड सांपडतात.

पैदास.—१८३३ पर्यंत जस्ताचा सर्व पुरवठा जर्मनींतून होत असे. त्यानंतर रशिया, बेल्जम, इंग्लंड व संयुक्तसंस्थानें या देशांतहि क्रमाक्रमानें जस्ताची पैदास होऊं लागली.

धातुविद्या.—अशोधित धातूपासून जस्त तयार करण्याची रीति थोडक्यांत येणेंप्रमाणें देतां येईल. (१) पहिल्यानें अशोधित धातूचें प्राणिद बनविणें; (२) नंतर प्राणिदाबरोबर कर्ब मिसळून त्या मिश्रणाचें ऊर्ध्वपातन करणें जस्ताचें प्राणिद कोळशाबरोबर (कर्बनाबरोबर) तापविलें असतां इतर जड धातूंच्या प्राणिदाप्रमाणें याचेंहि संस्करण होऊन जस्त मिळतें. जस्त हें निकेलपेक्षांहि जास्त धन वैद्युतिक असल्यामुळें वैद्युतिक रीतीनें त्याचें पृथक्करण करण्यापूर्वी अशोधित धातूंत असणाऱ्या इतर सर्व जड धातू प्रथम निराळ्या काढणें जरूर असतें.व त्यामुळें या रीतीनें शुद्ध धातु तयार करण्याचें काम बरेंच कठीण आहे. जस्ताचे रासायनिक संयुक्तपदार्थ बरेच होतात.जस्ताच्या संयुक्तपदार्थांपैकीं प्राणिद अम्लजित, हरिद, गंधकिद, गंधकित, व कर्बित हीं मुख्य आहेत.

पृथक्करण.—जस्ताच्या लवणांच्या शिथिल द्रावणांतून गंधकीकृत उज्जवायूच्या योगानें तें गंधकिदाच्या रूपानें खालीं पडतें. गंधकिदाच्या साक्याचा रंग पांढरा असून तें खनिज अम्लांत द्रवतें. परंतु सिरकाम्लांत द्रवत नाहीं. हा साका तापविला असतां त्याचें प्राणिद बनतें. तापलेलें असतां प्राणिदाचा रंग पिवळा असून तें थंड झाल्यावर रंग पांढरा होतो. व तें कोबाल्ट नत्रिताच्या द्रावणानें ओलें करून पुन्हां तापविल्यास थंड झाल्यानंतर त्याचा रंग हिरवा होतो.

उपयोग.—लोखंडी पत्र्यांना गंज चढूं नये म्हणून ते पत्रे जस्ताच्या रसांत बुडवून काढितात. पितळ, पिंचबेक नांवाचें खोटें सोनें, टोंबॅक वगैरे मिश्रधातू करण्याकरितां जस्ताचा उपयोग होतो. रोजच्या व्यवहारांतील पत्रे, नळ, पिपें व भांडींहि जस्ताचीं तयार करितात. नकाशे, चित्रें वगैरेंचे ब्लॉक जस्ताचे करण्याचा प्रघात आहे.

औषधीविज्ञान व भेषज प्रकरणः—जस्ताचें हरिद फार दाहक आहे. हें विष पोटांत गेलें असल्यास वांतिकारक औषध देऊन पोट मोकळें केल्यावर कोंबडीच्या अंडींतील बलक किंवा दुसरा एखादा डिंकासारखा चिकटपदार्थ खावयास द्यावा. जस्ताचें गंधकित, प्राणिद, कर्बित, ओलिएट आणि सिरकित या लवणांच्या योगानें जखम बरी होण्यास मदत होते.

**जस्सो**, संस्थान.—मध्यहिंदुस्थानांतील एक लहानसें सनदी संस्थान. उत्तर अक्षांश २४° २०' ते २४° ३४' व पूर्व रेखांश ८०° २८' ते ८०° ४०'. क्षेत्रफळ ७२ चौरस मैल. उत्तरेस, पूर्वेस आणि दक्षिणेस नागोड संस्थान; पश्चिमेस अजयगड संस्थान. इ. स. १९११ सालीं ८०८६ लोकसंख्या होती. जहागिरदार हा बुंदेल रजपूत असून पन्ना संस्थानचा संस्थापक छत्रसाल याचा वंशज आहे. छत्रसाल मरण पावल्यावर जस्सो आणि बांधोरा या जहागिरी त्याचा चौथा पुत्र भारतीचंद यास मिळाल्या. तो त्यावेळीं जैतपुरचा संस्थानिक जगतराज (भारतीचंदचा भाऊ) याचा मांडलिक होता. भारतीचंदानें बांधोरा जहागीर आपला वडील मुलगा दुर्जनसिंग यास व जस्सो जहागीर आपला दुसरा मुलगा हरिसिंग यास दिली. दुर्जनसिंगानंतर त्याचा पुत्र मेदिनीसिंग हा गादीवर बसला. परंतु मेदिनीसिंग निपुत्रिक वारल्यामुळें बांधोरा जहागिर जस्सो जहागीरींत समाविष्ट झाली. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं ही जहागीर बांदाच्या अलीबहादुरानें बळकाऊन जस्सोचा संस्थानिक चेतसिंग याच्या एका गोपाळसिंग नांवाच्या बंडखोर नोकरास दिली. परंतु गोपाळसिंगानें चेतसिंगाचा अज्ञान पुत्र मूरतसिंग याचा पक्ष घेऊन त्यास गादीवर बसविलें. ब्रिटिश अंमल सुरू झाल्यावर जस्सो हें अजयगडाचें मांडलिक आहे असें समजत असत, परंतु जस्सो हें स्वतंत्र आहे असा निकाल पुढें लागला; व मूरतसिंगास इ. स. १८१६ मध्यें त्याप्रमाणें सनद मिळाली. जगतराजसिंग हा इ. स. १८८८ मध्यें गादीवर बसला. परंतु इ. स.१८९९सालीं त्यानें राज्यकारभारांतून आपलें अंग काढून घेतल्यामुळें त्याचा अज्ञान पुत्र गिरवारसिंग याच्या नांवानें कारभार चालत आहे.या संस्थानांत एकंदर ६८ खेडीं असून

२९ चौरस मैल जमीन लागवडीखाली आहे. एकंदर उत्पन्न २३००० रुपये आहे.

गांव.—उ. अ. २४° ३०' व पूर्व रे. ८०° ३०' जशेश्वरीनगर याचा अपभ्रंश जसो आहे असें म्हणतात. तसेंच पुर्वी यास मेहेन्द्री नगर, अधरपुरी, इरदी-नगर हीं नांवें होतीं. एक विचित्र लिंग, सतीचे दगड गांवांत दिसतात. जैन आणि हिंदूचे प्राचीन अवशेष येथें पुष्कळ आहेत असें कनिंगहॅम म्हणतो ( आर्कि. सर्व्हे रिपोर्ट, पु. २१ ).

**जहांगिराबाद**—हें शहर संयुक्तप्रांतात बुलंद जिल्ह्यांत आहे. हें शहर अनुपराय नांवाच्या माणसानें बांधलें व त्याला जहांगीर बादशहाचें नांव दिलें. हें शहर सखल खोलगट जागीं असल्यामुळें पूर्वी रोगांचें माहेरघर होतें पण हल्लीं ह्या शहरचें आरोग्य सुधारलें आहे. ह्या शहरची लोकसंख्या जवळ जवळ साडेअकरा हजार आहे. ह्या शहरीं धान्याचा व्यापार जोरांत चालतो. ह्या ठिकाणीं चिटें छापण्याचा कारखाना असून चिकाचे पडदे व कापड तयार होतें.

**जहागीर, जहागिरदार**—जहागिरींचे दोन प्रकार असत. पहिल्या प्रकारांत शेतजमीन तोडून देत अथवा सरकारसाऱ्यापैकीं रोख कांहीं रक्कम वसूल नेमून देत. फौज पदरीं बाळगून सरकारचाकरी करण्याकरितां एक देत व दुसरी त्या त्या व्यक्तीसाठीं अथवा कुटुंबासाठीं देत. पहिल्यास सरंजाम, इनाम अथवा तैनात:इनाम व दुसऱ्यास जातइनाम म्हणत. जात इनाम अगदीं मोफत असे. त्यावर सरकारदेणें कांहींच नसे. सरंजामजहागिरीस सरकारदेणें म्हणजे कांहीं तरी सरकारचाकरी ( फौज घेऊन वगैरे ) करणें, हें द्यावें लागे.

दक्षिणेंत ( महाराष्ट्रांत ) इंग्रजकंपनीनें आपलें वर्चस्व स्थापिलें. त्या वेळीं महाराष्ट्रांतलि जहागिरदारांची पुढील-प्रमाणें वर्गवारी व्यवस्था लावण्यांत आली. पहिल्या प्रतीच्या सरदारांत ( फर्स्टक्लास ), शिवाजीनें राज्य स्थापण्यापूर्वी जे जहागिरदार होते त्यांची गणना केली; हे म्हणजे फलटणचे निंबाळकर, जतचे डफळे, मुधोळचे घोरपडे इ. होत. दुसऱ्या प्रतीच्या सरदारांत शिवाजीनें व छत्रपतींनीं निर्माण केलेले अधिकारी ( व त्यांचे वंशज ) येतात; उदा० प्रधान, सचीव, प्रतिनिधी, अक्कलकोटकर वगैरे. तिसऱ्या प्रतीचे सरदार म्हणजे पेशव्यांनीं निर्माण केलेले, हे होत [ एल्फिन्स्टन-डिस्पॅचेस; ग्रँटडफ पु. २ ]

**जहांगीर**—या नांवाचें बेट बंगालमध्यें भागलपूर जिल्ह्यांत आहे. या ठिकाणीं एक लिंग, देऊळ व दगडावर कोरलेलीं बरींच चित्रें आहेत. [ इंपे. ग्याझे ].

**जहांगीर बादशहा**(१६०५–१६२७)— अकबर मरण पावल्यावर त्याचा वडील पुत्र सलीम हा नुरुद्दीन महंमद जहांगीर पातशहा गाझी हें नांव धारण करून तख्तावर बसला ( ता. २४ आक्टोबर स. १६०५ ). जहांगीर ( जगज्जेता ) च्या अंगांत अकबराच्या सद्गुणांचा लेशहि नव्हता. तो विषयासक्त, निष्ठुर, स्वच्छंदी, स्वार्थसाधु व बालिश होता. अकबराच्या वेळच्या अनुभविक कामदारांस मात्र त्यानें कायम ठेविलें होतें. जकातीच्या नियमांत उपयुक्त फेरफार करून सर्व अर्जदारांची दाद लागावी म्हणून साठ सोन्याच्या घंटा जिला अडकविलेल्या होत्या अशी एक सांखळी राजवाड्याच्या बाहेर सोडली होती. खुस्रू, पर्वीझ, खुर्रम् ( शहाजहान ) व शहर्यार असे जहांगीरला चार मुलगे होते. हे सर्व सावत्र भाऊ होते. वडील पुत्र खुस्रू याचें व जहांगीरचें कधींहि पटलें नाहीं. पर्वीझ हा केवळ मद्यपी असून दुर्बुद्ध व गर्विष्ठ होता. खुर्रम् हा धूर्त, महत्त्वाकांक्षी, कावेबाज व तीव्र बुद्धीचा होता, तोच पुढें शहाजहान या नांवानें प्रसिद्ध झाला. शहर्यारचें नाव विशेष महत्त्वाचें नाहीं. कारकीर्दीच्या अखेरीस झालेल्या उलाढालींत त्याचें विशेष अंग होतें. जहांगीरची पहिली बायको जोधपुरच्या राजाची मुलगी जोधबाई हिचें लग्न स. १५८८त होऊन तिला खुस्रू व एक मुलगी झाली. दुसरी बायको बिकानेरच्या रामसिंग राजाची मुलगी. तिसरी राजा मालदेवाचा मुलगा उदयसिंग याची; हिचाच मुलगा शहाजहान. ही स. १६१९ त मेली. चौथी पर्विझची आई; ही १५९८ त मेली. पांचवी केशवदास राठोडची मुलगी. सहावी जहांदरची व सातवी शहर्यारची आई. आठवी राजा अतिरायची मुलगी. नववी राजा मानसिंगाची नात. दहावी नूरजहान; हिला मूल झालें नाहीं. याशिवाय ब्लोकमननें आणीक दहा बायकांचीं ( त्यांत २ रजपूत ) नांवें दिलीं आहेत.

जहांगीर गादीवर बसल्यावर लवकरच त्याचा वडील पुत्र खुस्रू यानें त्याच्याविरुद्ध बंड केलें. रजपूत लोकांनीं त्याचा पक्ष घेऊन जहांगीर यास पदच्युत करण्याची खटपट चालविली. परंतु जहांगीरनें त्याला पकडून कैदेंत ठेविलें; व त्याच्या साथीदारांस क्रूर शिक्षा दिल्या. नूरजहान ( मिहरुन्निसाखानम् ) व तिचा भाऊ आसफखान यांच्या मनांतून जहांगीरच्या पश्चात् खुर्रम् यास बादशाही तख्त मिळावें असें असल्यामुळें, खुस्रूला जगांतून नाहींसें करण्याची त्यांनीं खटपट चालविली. परंतु त्यांत त्यांस यश आलें नाहीं. आसफखानाची मुलगी मुम्ताजमहाल ही खुर्रम् यास दिली होती. खुर्रमनें खानखानाननामक सरदाराच्या नातीशीं दुसरें लग्न लाविल्यामुळें नूरजहानची खुर्रमवर इतराजी झाली. आपली ( पहिल्या नवऱ्यापासून झालेली ) मुलगी खुस्रूस देऊन त्याच्याशीं सख्य करावें असा तिनें विचार केला; परंतु खुस्रूनें ही गोष्ट कबूल केली नाहीं, यामुळें त्याचें तिच्याशीं वांकडें आलें. पुढें आपली मुलगी शहर्यार यास देण्याचें ठरवून त्यास राज्य मिळवून देण्याची खटपट नूरजहान करूं लागली. खुर्रम् दक्षिणेंत गेला असतां त्यानें खुस्रू यास आपल्याबरोबर नेलें. त्या-

ठिकाणीं खुर्रमच्या अनुमतीनें खानखानानच्या लोकांनीं खुस्रूचा खून केला. हें वर्तमान जहांगीर यास कळतांच, खुस्रूचा मुलगा बुलकी यानें आपल्या पश्चात् गादीवर बसावें असें त्यानें ठरविलें. जयपूर व मारवाड येथील राजांचें जहांगीरशीं सख्य होतें; उदेपूरच्या राजाशीं मात्र त्याला युद्ध करावें लागलें. उदेपूरच्या घराण्यानें मोगलांचें स्वामित्व कबूल केलें नव्हतें; जहांगीरनें आपली फौज उदेपुरावर पाठविली. परंतु रजपुतांनीं तिचा अनेकदां पराभव केला पुढें जहांगीरनें खुर्रम यास रजपुतांवर पाठविलें; त्यानें रजपुतांचा पराभव करून त्यांस तह करण्यास लाविलें. उदेपूरचा राजपुत्र कर्ण बादशहास शरण गेला; अशा प्रकारें या युद्धाचा शेवट झाला. ( १६०८–१४ ).

नूरजहानचा आजा, ख्वाजा महंमद शरीफ हा खुरासानच्या सुलतानाचा वजीर होता. इराणचा शहा तहमास्प यानें त्यास यज्द प्रांताचा कारभार दिला. त्याचा मुलगा घ्यासबेग यास कष्टदशा प्राप्त झाल्यामुळें तो इराणांतून पळून गेला. त्याची मुलगी नूरजहान स. १५७६ त कंदाहार येथें जन्मली. नंतर घ्यासबेग आपल्या कुटुंबासह हिंदुस्थानांत येऊन अकबरास भेटला. अकबरानें त्यास आपल्या दरबारीं नोकरी दिली. नूरजहानवर जहांगीरचें मन बसलें; परंतु अकबरास ही गोष्ट न आवडून त्यानें शेर अफगाणखाननामक पठाणाशीं नूरजहानचें लग्न करून त्याला बंगालप्रांतीं पाठविलें परंतु जहांगीर तख्तनशीन झाल्यावर त्यानें शेरखानाचा खून करून नूरजहानला आग्र्यास आणविलें. परंतु लग्नाची गोष्ट तिला पसंत पडली नाहीं. सुमारें चार वर्षे तिनें मोठ्या हालांत दिवस काढिले. तिच्या खाण्यापिण्याचीहि नीट व्यवस्था नव्हती. कपडे शिवून व कशिदा काढून ती आपला निर्वाह करी. अखेरीस तिनें बादशहाचें म्हणणें कबूल केलें. तेव्हां जहांगीरनें तिच्याशीं लग्न करून तिला आपली पट्टराणी केली (१५१०). तिचा बाप घ्यासबेग यास मुख्य वजीराचें काम मिळालें. घ्यासबेग उदार, धार्मिक व राज्यव्यवहारांत कुशल होता. त्याचा पुत्र आसफखान ( पहा) पुढें फार प्रसिद्ध झाला. आसफखानाची मुलगी मुमताजमहाल ही शहाजहानची बायको. यूरुफ्खानाचा मुलगा शाएस्तेखान हा औरंगझेबाच्या कारकिर्दींत प्रसिद्धीस आला. नूरजहानवर जहांगीरची फार मर्जी होती. तो प्रत्येक बाबतींत तिच्या तंत्रानें वागूं लागला. तिनें आपल्या नातलगांस मोठमोठीं कामें दिलीं. राज्याचा सर्व कारभार नूरजहान पाहूं लागली. बादशहानें तिचेंहि नांव नाण्यांवर खोदविलें. नूरजहाननें अनेक अनाथ मुलींचा सांभाळ केला. जहांगीराच्या लहरी व जुलमी वर्तनावर तिनें चांगला दाब ठेवून उत्तम बंदोबस्त केला. तिनें सर्व राज्यास एक विशेष प्रकारची शिस्त लाविल्यामुळें राज्याची भरभराट झाली. स्त्रीवर्गाची स्थिति सुधारण्याचे तिनें अनेक प्रयत्न केले. राज्यकार्यास लागणारे बहुतेक गुण तिच्या अंगीं होते. तथापि तिच्या महत्त्वाकांक्षेमुळें ( जहांगीरच्या पाठीमागें तख्तावर कोणास बसवावें याबद्दल तिनें अनेक भानगडी व उलाढाली उपस्थित केल्यामुळें ) सर्वत्र बेंडाळी उत्पन्न झाली. दक्षिणच्या सुभ्यावर खानखानान याची नेमणूक झाली होती. परंतु त्याच्या हातून दक्षिणचा बंदोबस्त नीट झाला नाहीं. मलिकंबर यानें खानखानानचा पराभव करून अहमदनगर परत घेतलें. तेव्हां स. १६१६ त बादशहानें खुर्रम यास तिकडे पाठविलें. त्यानें मलिकंबरचा पराभव करून अहमदनगर काबीज केलें. या कामगिरीबद्दल जहांगीरनें खुर्रम यास शहाजहान असें नांव दिलें.

इ. स. १६०८ त कॅप्टन हॉकिन्स नांवाचा एक इंग्रज इंग्लंडच्या राजाचें पत्र घेऊन जहांगीरच्या भेटीस आला होता. जहांगीरनें त्याला सुरतेस वखार घालण्याची परवानगी दिली. पुढें इंग्रजांच्या व्यापाराची वृद्धि करण्यासाठीं हॉकिन्सनें बरीच खटपट केली. परंतु कित्येक लोकांनीं इंग्रजांविरुद्ध ओरड केल्यामुळें बादशहानें त्यांस व्यापार करण्याची बंदी केली; यामुळें हॉकिन्स निराश होऊन परत गेला ( १६११ ). मोंगल बादशहाच्या वैभवाविषयीं हॉकिन्सनें कित्येक गोष्टी विलायतेस कळविल्यावर तेथील लोक अगदीं थक्क झाले. जहांगीरच्या राज्याचा वसूल ५० कोटी रुपये होता. त्यावेळीं इंग्लंड व स्कॉटलंडचा वसूल फक्त एक कोटी होता. पुढें कांहीं दिवसांनीं सर टॉमस रो नांवाचा एक गृहस्थ इंग्लंडचा वकील म्हणून जहांगीरकडे आला. दोघांचें व्यापाराबद्दल बोलणें झालें व जमिनीवर इंग्रज व्यापाऱ्यांपासून जकात घेऊं नये असें जहांगीरनें फर्माविलें. रोनें जहांगीरास कायमच्या तहाबद्दल विनंति केली; परंतु तह घडूं द्यावयाचा नाहीं असा दरबारच्या मंडळींचा निश्चय होता. इंग्रजांस वाटेल तेथें व्यापार करण्याची मोकळीक देण्याविषयीहि रोनें बोलणें लाविलें; परंतु खुर्रम व आसफ्खान यांनीं हरकत केली; यामुळें त्याचें ( तह करण्याचें ) काम सिद्धीस गेलें नाहीं. हळूहळू रो लोकांस अप्रिय होऊं लागला. यापुढें त्याच्या हातून महत्त्वाचें कांहीं एक काम न झाल्यामुळें त्याचा निरुपाय होऊन स. १६१८त विलायतेस निघून गेला जहांगीरचे शेवटचे दिवस फारच कष्टप्रद गेले. बादशहाचे चार मुलगे व नूरजहान यांनीं राज्यव्यवस्थेबद्दल फार उलाढाली केल्या. शिवाय महाबतखान, खानखनान, आसफखान वगैरे बलाढ्य सरदारहि आपआपल्या मर्जीप्रमाणें वागत असत. शहाजहान यास बादशाही मिळावी अशी आरंभीं नूरजहानची इच्छा होती. परंतु तो आपल्या तंत्रानें वागणार नाहीं असें पाहून तिनें शेरखानापासून झालेली आपली मुलगी शहर्यार यास देऊन त्यास राज्यपद देण्याची खटपट केली. व इतर तिन्ही शहाजाद्यांचा नाश करण्याचा तिनें घाट घातला. आसफ्खानानें शहाजहानाचा पक्ष उचलिला. अशा प्रकारें बादशहाचें विलष्ट पडलें. खानखानानहि शहाजहा-

नास मिळाला. मात्र महाबतखानानें जहांगीराचा पक्ष सोडिला नाहीं. शहाजहाननें सरकारी खजिना आपल्या ताब्यांत घेण्याचा प्रयत्न चालविला. परंतु तो उघडकीस आल्यामुळें त्यानें जहांगीराची माफी मागितली. तथापि पुनः लवकरच त्यानें बंड केलें; तेव्हां महाबतखान व पर्वीझ यांनीं त्याचा पराभव केल्यामुळें तो दक्षिणेंत गेला. इ. स. १६२६ त पर्वीझ मद्यातिरेकानें मरण पावला. पुढें लवकरच जहांगीरहि आजारी पडला व ता. २८ ऑक्टोबर रोजीं दम्याच्या विकारानें मरण पावला. जहांगीरच्या मृत्यूनें जिकडे तिकडे गडबड चालू झाली. नूरजहानची सर्व सत्ता नष्ट झाली व तिचे तेजहि ढासळलें. आसफखानानें तूर्त बुलकीस तख्तावर बसवून शहर्यार यास कैद केलें; व एक भरंवशाचा मनुष्य दक्षिणेंत शहाजहानाकडे पाठवून त्यास तांबडतोबीनें आग्र्यास बोलाविलें. ता. २४ जानेवारी १६२८ रोजीं शहाजहान आग्र्यास येऊन पोंचला; बहुतेक सर्व सरदार त्यास मिळाले. शहाजहान यानें खुस्रूचे मुलगे बुलकी दावरबक्ष व गर्शास्प; दानियालचे मुलगे तहमुरास व होशंग; व शहर्यार या सर्वांचा खून करविला. ता. ५ वारी स. १६२८ रोजीं त्याचा राज्यारोहणविधि होऊन त्याच्या नांवानें खुत्बा वाचण्यांत आला.

अकबराची राज्यव्यवस्था जहांगीरनें कायम ठेविल्यामुळें त्याची कारकीर्द सुखावह झाली. त्याच्या अंगीं कांहीं सद्गुण होते. शिकारींत व युद्धकलेंत तो प्रवीण होता. त्याचें वजन १६२ पौंड होतें. त्याला खुशामत व डामडौल प्रिय होता. आरंभीं त्याचा स्वभाव क्रूर होता, परंतु पुढें तो बराच सौम्य बनला. तो मद्यपी असून अफूचें सेवन करी. तथापि इतर लोकांनीं मद्यपान करूं नये असा त्यानें नियम केला होता. तो नियम मोडणारास कडक शिक्षा देई. त्यानें सर्व प्रकारच्या विद्येस उत्तेजन दिलें. त्यानें केलेल्या राज्यकारभाराच्या नियमांना दस्तुरूल अंमल म्हणतात. शिल्पकला व सृष्टिसौंदर्य यांची त्याला आवड होती. गादीवर येण्यापूर्वी त्यानें अनेक क्रूर कृत्यें केलीं होतीं. क्रूर स्वभावामुळें कित्येक वेळां क्षुल्लक अपराधासाठीं त्यानें कडक शिक्षा दिल्या होत्या. त्याचें आत्मचरित्र अगदी साध्या भार्षेत लिहिलेलें असून त्यांत त्यानें आपले दुर्गुण व व्यंगें स्पष्टपणें कबूल केलीं आहेत. या चरित्रांत १२ वर्षांची हकीकत आहे; त्यापुढील हकीकत मुतामदखानानें लिहिली असून त्या ग्रंथाचें नांव इकबालनामा असें आहे. जहांगिराच्या आत्मचरित्रास तुझुकई जहांगिरी हें नांव आहे. तो बेफिकीर होता. लहर लागेल त्याप्रमाणें क्षणांत हिंदु, क्षणांत पारशी, क्षणांत मुसुलमान तर क्षणांत ख्रिस्ती अशी त्याची धरसोड चाले. फलज्योतिषावर त्याचा विश्वास होता अकबरानें चालू केलेले हिंदु आचारविचार त्यानेंहि पुढें चालविले; तथापि अनेक प्रसंगीं देवळें व मूर्ती फोडणें इत्यादि कृत्यें केलीं. त्याचा वाढदिवस मोठ्या समारंभानें साजरा करण्यांत येई. सोनें, चांदी, मोतीं, रेशमी कापड, धान्य व लोणी या सहा पदार्थांनीं त्याची तुला होई. जहांगिरला तुर्की भाषा चांगली येत होती. मुसुलमान लोक नाण्यांवर सुद्धां कधीं प्रतिमा कढावयाचे नाहींत, मद्य तर त्यांच्या धर्मांत वर्ज्य आहे, असें असून जहांगीरनें स. १६२१ त जी मोहोर पाडिली, तिच्या एका बाजूस ओठा दारूचा प्याला लाविलेल्या स्वतःचें चित्र असून दुसऱ्या बाजूस सूर्य काढिलेला आहे. याच्या वेळींच हिंदुस्थानांत तंबाखूचा प्रसार झाला असें म्हणतात.

महंमद हादी यानें जहांगिराच्या कारकीर्दीचा एक इतिहास लिहिला आहे. तसेंच कामगार हुसेनी यानें मसिर इ-जहान्गिरी ही बखर लिहिली असून तींत त्याच्या जन्मापासून राज्यारोहणापर्यंतची हकीकत आहे. [इतिहाससंग्रह-ऐति. गोष्टी, भा. १; स्मिथ-ऑक्सफोर्ड हिस्टरी; इलियट, पु. ६; ग्लाडविन-रेन ऑफ जहांगीर; फॉस्टर-रोज एम्बसी; टॉड-राजस्थान; पिटरमुंडी—टूल्व्हलस; मुसुलमानी रियासत.]

**जहाज फिरंगी**—हा यूरोपियन माणूस असून याचें खरें नांव जॉर्ज थामस असें होतें. मराठे लोक त्याला जहाज फिरंगी म्हणत. हा हिंदुस्थानांत आला त्यावेळीं खलाशी म्हणून एका गलबतावर होता. किनाऱ्यावर उतरल्यानंतर तो धंदा सोडून यानें महादजी शिंदे याच्या पदरीं सैनिकाची नौकरी पतकरिली ( १७८२ ). पुढें शिंद्याची नौकरी सोडून सारधाना ( श्रीधन ) येथील बेगम सुमरूच्या पदरीं तो राहिला. थोड्या दिवसांनीं पदरीं बरेचसे लोक बाळगून त्यानें सुमरूला सोडून लुटालूट करून कांहीं प्रांत (हरियण भागांत) बळकाविला. त्यानें आपलें मुख्य ठाणें हंसी येथें करून तेथें एक किल्ला बांधिला. रोहटकच्या दक्षिणेस १० कोसांवर दुसरा एक जॉर्जगड नांवाचा किल्ला बांधिला. त्यास तत्रस्थ लोक जहाजगड म्हणतात. पुढें मराठ्यांनीं त्याच्या या जहाजगडास वेढा घातला. त्यांत त्याचा सेनापति हॉपकिन्स हा ठार होऊन त्याचा पुरा परभव झाला व तो एकटाच पळून ( ३० कोसांवरील ) हंसीस गेला. मराठे त्याच्या मार्गे लागले, तेव्हां तो पळून अनुपशहरीं असलेल्या एका इंग्रज तुकडीच्या आश्रयास गेला. तेथून पुढें तो यूरोपांत ( इंग्रजांच्या सोबतीनें ) जाण्यास निघाला असतां, गंगेच्या कांठीं मरण पावला. याचें एक चरित्र फ्रँकलिन नांवाच्या एका इंग्रजानें लिहिलेलें आहे. [कीन—फॉल ऑफ थि मोगल एम्पायर, भा. ३; बील—ओरि. बायो डिक्शनरी.]

**जहाजपुर**—उदेपुर संस्थानांत त्याच नांवच्या जिल्ह्याचें हें मुख्य ठिकाण आहे. येथील लोकसंख्या तीन हजारांवर आहे. या शहराजवळ एका ओसाड डोंगरावर एक मोठा किल्ला आहे. हें शहर पूर्वी उदेपूरच्या प्रतापसिंह राजाच्या ताब्यांत होतें तें १५६७ सालीं अकबरानें घेतलें व फितुर झालेल्या ( प्रतापसिंहाचा भाऊ ) जगमल यास जहागिर म्हणून दिलें. १८०६ सालीं कोटयाचा दिवाण

झालिमसिंग यानें तें शहर आपल्या ताब्यांत घेतलें, पण इंग्रज सरकारच्या मध्यस्तीनें पुनः त्यानें उदेपुरच्या राण्याला परत दिलें. ह्या जहाजपूर जिल्ह्यांत हें शहर व इतर ३०६ खेडीं आहेत.

**जहांदरशहा**—याचें मुहम्मद मुईझ्झुद्दीन हें मुख्य नांव असून हा बहादुरशहाचा वडील मुलगा व अवरंगझेबाचा नातु होय. याचा जन्म दख्खनमध्यें ८ एप्रिल स. १६६३ त झाला. बहादुरशहा स. १७१२ त वारल्यानंतर त्याच्या मुलांमध्यें गादीबद्दल तंटा लागला. अझीमउश्शान व जहानशहा आणि रफिउश्शान यांचीं परस्पर भांडणें होऊन ते मारले गेल्यानंतर, जहांदर हा लाहोर येथें १० एप्रिल स.१७१२ त गादीवर बसला. हा दुर्बळ, अतिशय क्रूर, चैनी, उद्धट व राज्यकारभारांत अनभिज्ञ होता. त्यानें भावांच्या व चुलत्यांच्या सर्व मुलांनां ठार केलें. त्यानें एकदां तर एका लाल कुंवर नांवाच्या कंचनी( नर्तकी )ला आपलें सारें राज्य अर्पण केलें होतें. यानें सारे नऊ महिने राज्य केलें. याला याचा पुतण्या ( अझीमउश्शानचा मुलगा) फरुखसियर यानें आग्र्याजवळ लढाईंत कैद करून स. १७१३ च्या जानेवारींत त्याचा खून केला. त्याचें प्रेत लोकांनां पाहण्यासाठीं उघड्यावर ठेवून नंतर दिल्ली येथील हुमायूनच्या कबरीच्या आवारांत पुरलें. दिल्ली येथील ज्या राजपुत्रांचा खून होई त्यांचीं प्रेतें याच आवारांत नेहमीं पुरण्याची चाल होती [ बील—ओरि. बायॉग्रा. डिक्श; मुसु. रियासत. ]

**जहानआरा बेगम**—ही मुम्ताजमहल बेगमेच्या पोटीं झालेली शहाजहान बादशहाची मुलगी. हिचा जन्म २३ मार्च स. १६१४ रोजीं झाला. ही विनोदी, उदार, विद्वान व सुंदर होती. एके दिवशीं तिच्या ओढणीच्या पदरास आकस्मिक आग लागून तिचें अंग पुष्कळ ठिकाणीं भाजलें. बरेच दिवस तिच्या जगण्याची आशा नव्हती. सुरत येथील ग्याब्रिएल बाऊटन नांवाच्या एका इंग्रज डॉक्टरानें शहाजहानच्या हुकुमानें तिला बरें केलें. त्याबद्दल त्यास बरींच बक्षिसें देऊन त्यांबरोबरच ( बाऊटनच्या विनंतीवरून ) पातशहानें इंग्रज व्यापाऱ्यांनां आपल्या राज्यांत आयातजकात माफ केली; त्यानें तिच्या दुखण्यांत स्वतःहि फार मेहनत घेतली होती. हिनें स १६४८ मध्यें आग्र्यास एक लाल (दगडांची) मशीद बांधिली, ती आग्र्याच्या किल्ल्याशेजारीं आहे. तिला ५ लाख रु. खर्च आला. जहानआरा ही औरंगझेबाच्या कारकीर्दीत (सप्टेंबर १६८०) मेली. तिची कबर निजामुद्दीन अवलिया याच्या दर्ग्यांत ( दिल्ली येथें ) आहे. ही दाराच्या बाजूची होती, त्यामुळें औरंगझेब तिचा द्वेष करी. शहाजहान कैदेंत असतांना हिनें आपलें सारें आयुष्य त्याच्या सेवेंत घालविलें. हिच्यामुळेंच औरंगझेबाच्या अनन्वित छळापासून शहाजहान पुष्कळदां बचावला. बापाबरोबर आपण होऊन तिनें कैदखाना पत्करला. तिच्या थडग्यावर एक लेख कोरलेला असून त्यांत आपल्या थडग्यावर वेलीशिवाय कांहींहि आच्छादन न उभारण्याबद्दल सांगून तिनें स्वतःस फकीर म्हणविलें आहे. जहानआरा म्हणजे जगाला भूषविणारी. शहाजहान तिला नेहमीं बक्षिसें देत असे. तो पातशहा असतांना दरबारांतील प्रत्येक उलाढालींत तो तिचें मत घेत असे. तिच्यावर त्याची बहाल मर्जी होती. त्याचें भोजन तिच्या देखरेखीखालीं तयार होई. शहाजहानची या मुलीवर वाईट दृष्टी होती असाहि बोभाटा त्यावेळीं झाला होता ( मुसु. रिया. पु. ६३९-४० ). दरबारांत तिचें वजन पुष्कळ होतें. तिची नेमणूक फार मोठी असून सरदारांकडून वारंवार नजर मिळाल्यानें तिजपाशीं अपार संपत्ति सांठली होती. दाराची सारी भिस्त त्या संपत्तीवर होती व तिचेंहि त्यास पाठबळ होतें. ती शेवटपर्यंत अविवाहितच राहिली. मुम्ताजमहाल मेल्यानंतर ३०-३५ वर्षें सर्व जनानखान्यावर तिचाच ताबा होता औरंगझेब तिचा द्वेष्टा होता तरी त्यानें तिचा इतमाम (शहाजानच्या मागेंहि) कायम ठेविला. [ जदुनाथ सरकार—हिस्टरी ऑफ औरंगझेब; बील-ओरि. बायॉग्रा. डिक्शनरी; मुसुलमानी रिसायत.]

**जहानाबाद,** पो ट वि भा ग.—हा बंगाल प्रांतांत गया जिल्ह्यांतील पोटविभाग आहे. येथील लोकसंख्या सुमारें चार लाख आहे. ह्या भागांतील जमीन मोठी सुपीक असून येथें पुष्कळ नद्या असल्यामुळें शेती उत्तम पिकते ह्या विभागांत जहानाबाद शहर मुख्य असून १०७८ गावें आहेत. पुराणवस्तुसंशोधनास उपयोगी अशा पुष्कळ वस्तू येथें सांपडतात.

गां व—हें शहर मोरहर नदीच्या कांठीं असून येथील लो. सं. सात हजारांवर आहे. अठराव्या शतकांत हें शहर कापडाबद्दल प्रख्यात होतें. त्यावेळीं ७०० कोष्ट्यांचीं घरें व हजारों माग असत. पुढें मँचेस्टरच्या स्वस्त मालापुढें निभाव न लागून हा धंदा बसला. सध्या हा धंदा किंचित् जीव धरून आहे.

**जह्नु**—सोमवंशी एक राजर्षि. भगीरथाच्या रथामागून येणाऱ्या गंगेच्या ओघामुळें याची यज्ञभूमी बुडून गेली, म्हणून त्यानें गंगानदीचें प्राशन केलें. पुढें आपल्या कानांतून त्यानें गंगेला मुक्त केलें म्हणूनच गंगेला जान्हवी—जन्हूची कन्या असें नांव पडलें. [ वा. रा. १. ४३; वा. पु. ९१]

**जह्लण**—देवगिरीच्या सम्राट कृष्णदेव यादव याचा जह्लण हा मुख्य मंत्री होता. हा विद्वान व हुशार असून, त्यानें लिहिलेला सूक्तिमुक्तावलीनामक सुभाषित ग्रंथ हल्लीं उपलब्ध आहे. जह्लणचा काल इ. स. १२५०-१२६० चा आहे.

**जळगांव**—वऱ्हाड. हा तालुका बुलढाणें जिल्ह्यांत उत्तरअक्षांश २९° ३' आणि पूर्वरेखांश ७६° ३५' च्या दरम्यान आहे. तालुक्याचें मुख्य ठिकाण याच नांवाचें असून तें नांदुरा स्टेशनपासून १६ मैलांवर आहे. उत्तरेस ८ मैलांवर सातपुडा डोंगर लागतो. खानदेशांतहि एक जळगांव आहे. त्यासाठीं यास जळगांव-जामोद असें म्हणतात. एने-

ई-अकबरीमध्यें ह्या गांवाचा नरनाळाच्या सरकारांतील ( जिल्ह्यांतील ) परगण्याचा गांव म्हणून उल्लेख केला आहे. येथील लो. सं. दहा हजारांपर्यंत आहे.

हें कापसाच्या व्यापाराचें मुख्य ठिकाण असून येथें सरकी काढण्याचे व कापूस दावण्याचे कारखाने आहेत. येथें कापसाची उतारपेठ आहे. विड्याच्या पानांचा व्यापार येथें बराच चालतो. गांवाच्या वायव्येस राजा भर्तृहरीचें देऊळ असून त्याप्रीत्यर्थ नागपंचमीस जत्रा भरते. येथें एक लहानशी मशीद असून तीवर एक फारसी शिलालेख आहे. वऱ्हाडांतील सर्वांत लहान तालुका हा (जळगांव) असून यांत ८ इनाम गांवें व २१७ खालसा गांवें आहेत. या तालुक्यांतील जमीन सुपीक असून कापसाकरितां प्रसिद्ध आहे. बागबागाईतहि बरीच आहे; त्यामुळें या तालुक्यास पश्चिम वऱ्हाडची बाग असें म्हणतात. या तालुक्याच्या सभावार पूर्णानदी आहे. [ बुलडाणें ग्याझे. ]

**जळगांव**-हें मुंबई इलाख्यांतील पूर्व खानदेश जिल्ह्याचें व जळगांव तालुक्याचें मुख्य ठिकाण. जी . आय. पी. रेलवेचें एक स्टेशन असून येथील लो.सं. पंचवीस हजारांपर्यंत आहे. या जिल्ह्यांत व गांवाच्या आसपास कापुस फार पिकतो. म्हणून हा गांव कापसाच्या व्यापाराची एक मोठी उतार पेठ असून यास व्यापारी महत्व फार आलें आहे. १८६२-६५ सालीं ज्यावेळीं अमेरिकेंत लढाई चालू होती त्यावेळीं सर्व खानदेशांतील कापसाचा बाजार येथें भरत होता. या जिल्ह्यांतील मुख्य पिकें, कापूस, ज्वारी, भुईमूग, तीळ हीं आहेत. येथील म्युनिसिपालिटी १८६४ सालीं अस्तित्वांत आली.

येथें जिल्ह्याच्या कचेऱ्या, दवाखाने, शाळा, हायस्कूल वगैरे आहेत. मुळजीजेठा व भगीरथ या नांवाच्या दोन कापड तयार करणाऱ्या गिरण्या असून इतर १५।१७ कारखाने ( कापूस दावण्याचे व सरकी काढण्याचे ) आहेत. येथें एक हायस्कूल आहे. पेशवाईअखेर हा गांव तीन कोसांवरील नशिराबाद गांवाच्या परगण्या खालीं होता. येथून तापीव्हाली रेलवेचा फांटा फुटला आहे. वऱ्हाडांत एक जळगांव असल्यानें याला जळगांव मेहरूण असें म्हणतात. मेहरूण हें खेडें जवळ दीड कोसावर असून तेथें एक मोठा तलाव असून त्याचेंच पाणी जळगांवला नेण्यांत आलें आहे. तालुक्याचें क्षेत्रफळ ३२० चौरस मैल असून त्यांत ९० गांवें आहेत; उत्पन्न पाउण लाखावर आहे. उत्तरेकडील जमीन काळी व सुपीक असून हवापाणी उत्तम निरोगी आहे. [ इं. ग्याझे; खानदेश ग्याझे. ]

**जळापूर**--( १ ) संयुक्त प्रांतांतील फैजाबाद जिल्ह्यापैकीं अकबरपूर तहशिलींत उ. अ. २६° १९'व पू. रे. ८२° ४५' या दरम्यान हा गांव असून याची लो. सं. साडेसात हजारांपर्यंत आहे. तान्सा नदीच्या तीरावर हा गांव वसला आहे. गांवाबाहेर ४००० रुपये खर्चून अठराव्या शतकांत एक इमामवाडा बांधला आहे. येथें विणकामाचा धंदा चालतो. तथापि येथील मुसुलमान कोष्टी, मुंबई, कलकत्ता, कानपूर वगैरे ठिकाणीं गिरण्यांत काम करण्याकरितां जातात.

( २ )—पंजाब, गुजराथ जिल्हा व गुजराथ तहशील. गुजराथच्या ईशान्येस ८ मैलांवर हा गांव आहे. लोकसंख्या ( १९११ ) ११६१५. सियालकोट, झेलम, जम्मू आणि गुजराथ यांचे रस्ते या ठिकाणीं मिळत असल्यानें येथील बाजारास जरा महत्त्व आलें आहे. येथें शाली तयार होतात. १८३३ सालच्या दुष्काळानंतर येथें कांहीं काश्मिरी लोकांनीं वसाहत केली; तेच लोक शाली विणीत असतात. इ. स. १८६७ मध्यें म्युनिसिपालिटी स्थापिली गेली; तिचें उत्पन्न नऊ हजारांपर्यंत आहे गांवांत इंग्रजी व्हर्न्याक्युलर शाळा व दवाखाने आहेत.

( ३ )—पंजाब. झेलम. तहशील पिंड-दादनखानमध्यें हें गांव उ. अ. ३२° ३९' व पू. रे. ७३° २८' याच्या दरम्यान आहे. हें खेडें झेलम नदीच्या दक्षिण तीरावर वसलेलें असून लो. सं. ( सन १९०१ )३१६१ आहे. हें खेडें बुकेफाला नांवाचें प्राचीन गांव असावें असें कनिंगह्याम याचें म्हणणें आहे हें बुकेफाल अलेक्झांडर दी ग्रेट यानें आपल्या घोड्याच्या स्मारकाप्रीत्यर्थ वसविलें परंतु हेंच तें खेडें असावें कीं नाहीं याविषयीं बराच संशय आहे. या भागांत ग्रीको-बॅक्ट्रियन राजांच्या वेळचीं नाणीं सांपडतात. अकबराच्या वेळीं हा गांव हल्लींच्या चौपटीनें मोठा होता. परंतु पिंडदादनखान येथें वसाहत झाल्यामुळें व नदीचा ओघ दोन मैल पूर्वेकडे गेल्यामुळें हल्लीं गांव मोडकळीस येत चालला आहे. [ इंपे. गॅझे. पु. १४ ]

**जळापुर तालुका**—मुंबई इलाख्यांतील सुरत जिल्ह्यांतील उ. अ. २०°४५' ते २१°०' व पू. रे. ७२° ४७' ते ७३° ८' या दरम्यान हा तालुका असून याचें क्षेत्रफळ १८८ चौ. मै. व लो सं. सुमारें पाऊण लाख आहे. या तालुक्यांत एकंदर ९१ खेडीं असून जमीनमहसूल व इतर कर मिळून ३.६ लाखावर उत्पन्न होतें ( १९०४ ). जमीन सुपीक व मळीची असून ती समुद्राकडे उतरती आहे. किनाऱ्यावर मधून मधून लहान लहान वाळूच्या टेकड्या दिसतात. किनाऱ्यावरील खारी जमीन सोडली तर इतर जमीन सुपीक आहे. खेडीं मोठीं असून लोक सुखवस्तु आहेत. पूर्णा आणि अंबिका या नद्यांच्या किनाऱ्यावर देखील खारी जमीन आहे. या जमिनीपैकीं कांहीं जमीनींत भात पिकतें. ज्वारी, बाजरी आणि भात हीं मुख्य पिकें असून डाळीचीं धान्यें, हरभरा, गळिताचीं धान्यें, ऊंस, केळीं वगैरे दुय्यम पिकें होतात. हवा निरोगी आहे. [ इंपे. ग्याझे. पु. १४ ]

**जळू**—हे वलयान्वित प्राणी जमिनीच्या आश्रयानें राहणारे असतात. यांचें शरीर जंतासारखें लांबट, वाटोळें असतें; पण तें अनेक वलयें एकमेकांस जोडून झालेलें असतें. या प्राण्यांत गांडूळ व जळू अशा दोन जाती आहेत.

जळू हा प्राणी उष्ण प्रदेशांतील दलदलीच्या जमिनींत व डबक्यांत आढळतो. याची रचना ३३ वलयांनीं झालेली असून त्यावर पातळ त्वचा असते. या प्राण्यास मागें पुढें असे दोन आंकडे असतात. पुढचा आंकडा हेंच त्याचें तोंड होय. त्यास करवतीसारखे तीन दांत असून त्यायोगें हा प्राणी एखाद्या प्राण्यास दंश करून रक्त शोषून घेतो. आपल्या शरिराचा आकार तिप्पट होईल इतकें रक्त जळू शोषून घेते व तें तिला पुढें कित्येक आठवडेपर्यंत पुरतें असें म्हणतात. जळूच्या घशांतील पिंडाच्या रसामुळें हें रक्त पातळ रहात व गोठून जात नाहीं. तोंडाकडील ५ वलयांवर डोळ्यांच्या ५ जोड्या असतात. शरीरांतील अशुद्ध रक्त बाहेर काढून टाकण्यासाठीं कांहीं लोक जळवा बाळगतात. रक्त पिऊन फुगल्यावर जळवा पिळून तें रक्त काढतां येतें. गळवें, मूळव्याध वगैरे त्वग्रोगांवर जळवा लावण्यापासून चांगला उपयोग होतो. जळूच्या कांहीं जाती आहेत त्या पिण्याच्या पाण्याबरोबर घशांत जाऊन उपद्रव करितात. म्हणून पिण्याचें पाणी गाळून घेण्याची काळजी घेणें इष्ट असतें.

**जाई**—या झाडास लॅटिन भाषेंत जास्मिनम, इंग्रजींत जास्मिन, संस्कृतमध्यें जातिपुष्प, मराठींत जाई, गुजराथींत चमेली इत्यादि नांवें आहेत. या वेलाच्या सुमारें १५० जाती आहेत. त्यांपैकीं ४० पेक्षां जास्त जाती इंग्लंडमधील बगीच्यांत लागवड केलेल्या आहेत. या वेलीचें मूलस्थान आशियाखंडांतील उष्ण देशच आहे. फुलांच्या रंगावरून जाईचे दोन प्रकार होतील. एक पांढरी व दुसरी पिवळी. या पुष्पांच्या सुगंधामुळें हें झाड फार प्राचीन काळापासून अरब लोकांनां व आर्य लोकांनां माहीत होतें असें दिसतें. आपल्या संस्कृतवाङ्मयांतील नाटकें, पुराणें, चंपू आदिग्रंथांतून जातिपुष्पांचीं वर्णनें आलीं आहेत. ‘ पुष्पाणां प्रकरः स्मितेन रचितो नो कुंदजात्यादिभिः ’ असलीं कित्येक स्थळें या फुलाच्या वर्णनासंबंधीं दाखवितां येतील. जाईचा वेल मोठा होतो. कित्येक ठिकाणीं मोठमोठ्या वृक्षांवर चढलेले जाईचे जुनाट वेल फार उंच वाढत गेलेले दृष्टीस पडतात. जाईचीं फुलें पांढरीं असून सुकुमार, नाजूक व सुवासिक अशीं असतात. जाईच्या पानाचा रस व्रणशोधक आहे असें आर्यवैद्यकाचें मत आहे. ऊर्ध्वपातनक्रियेनें जाईच्या फुलांचें अत्तर निघतें. जाई किंवा चमेलीचीं सुवासिक तेलें तयार करतात. त्यांची कृति ‘ अत्तरें ’ या लेखांत सांपडेल.

**जाकोबाबाद**, ता लु का—सिंधप्रांतांत हा तालुका आहे. याचें क्षेत्रफळ ४६० चौरस मैल आहे. या तालुक्यांत मुख्य शहर जाकोबाबाद हें असून ९८ खेडीं आहेत. येथील लोकसंख्या वाढती आहे; व सन १९११ मध्यें ती ७८४५४० होती. या तालुक्याचें उत्पन्न १९०३–४ सालीं ३·५ लाख रुपये होतें. या तालुक्याला बेगारी कालवा व डेझर्ट कालवा या दोन कालव्यांचें पाणी मिळतें.

श ह र.—जाकोबाबाद तालुक्याचें हें मुख्य ठिकाण आहे. या ठिकाणीं जाण्यास नॉर्थ वेस्टर्न रेल्वेच्या सिंध-पिशिन शाखेनें जावें लागतें. या शहराची लो. सं. सन १९११ मध्यें ११३६८ होती. हें शहर जनरल जॉन जेकब यानें वसविलें आहे. तें दोन मैल लांब व एक मैल रुंद आहे. या ठिकाणीं देशी घोडेस्वारांची एक मोठी तुकडी आहे. शिवाय दिवाणी व फौजदारी कचेऱ्या, दवाखाना, तुरुंग, व्हिक्टोरिया क्लॉक टावर व व्यापारी काफिल्याकरितां सोयी आहेत. येथून धान्य, तूप व कातडीं यांचा मोठा व्यापार रेल्वेमार्गानें चालतो. सन १९०३–४ सालीं या शहराचें उत्पन्न ७० हजार व खर्च ७६ हजार होता. येथील उष्णमान सर्व हिंदुस्थानांत अधिक असतें.

**जाखाऊ**—कच्छांतील ( मुंबई इलाखा ) हें एक बंदर असून भुजच्या नेऋत्येस ६० मैलांवर आहे. उ. अ. २३° १४' व पू. रे. ६८° ४५'. लोकसंख्या (१९०१) ५०५९. गांव किनाऱ्यापासून तीन चार मैल आंत वसलेला असून सभोंवतालच्या प्रदेशांत पिकें चांगलीं येतात. ज्या ठिकाणीं जहाजें लागतात ती जागा समुद्रापासून पांच मैल आंत आहे. तिला गोदिया खाडी असें नांव असून भरतीच्या वेळीं ८ ते १२ फुटांपर्यंत पाणी खाडींत असतें. २० ते २५ टन वजनाचीं जहाजें येथें येऊं शकतात. मुंबईशीं या बंदराचा व्यापार पुष्कळ चालतो.

**जाखन**—मुंबई. काठेवाड. भोइका ठाण्यांतील एक स्वतंत्र खंडणी देणारें लहानसें संस्थान. तालुकदार झाला असून लिमडीचे भायाद आहेत.

**जांजगीर**—मध्यप्रांत. बिलासपूर जिल्ह्यांतील पूर्वेकडील तहसील. उत्तर अक्षांश २१° ३७' ते २२° ५०' व पूर्वरेखांश ८२° १९' ते ८३° ४०'. यांत खालसा व जमिनदारी असे दोन भाग आहेत. खालसा तहसिलीचें क्षेत्रफळ १२०३ चौ. मै. असून लो. सं. ( १९११ ) ३७६८२९ आहे. यांत ७४१ खेडीं आहेत. जमीनदारी तहसिलींत ६१३ खेडीं असून लो. सं. १५४८९५ होती. याचें क्षेत्रफळ खालसापेक्षां जास्त ( १७५२ चौ. मै. ) आहे. इ. स. १९०२–३ मध्यें तहसिलीचें उत्पन्न १.४२ लाख रुपये होतें.

**जाजमाउ**—संयुक्तप्रांतांतील कानपूर जिल्ह्यापैकीं कानपूर तहसिलीचें पूर्वीचें नांव.

**जाट**—यांची मुख्य वस्ती पंजाबमध्यें असून तेथें हे शेतीचा धंदा करतात. दक्षिणेंतील कुणब्यांच्या धंद्याचें व यांच्या धंद्याचें साम्य आहे. मध्यप्रांतांत यांची संख्या १०००० आहे. एकंदर जाट लोकांची संख्या ४९५६५२६ आहे. जाट हे हिंदु, मुसलमान व शीख या तिन्ही धर्मांत आहेत. जाटांच्या उत्पत्तीबद्दल बराच वाद आहे. कनिंगहॅम

व टॉड यांस हिंदीशक ( इंडो सिथियन ) म्हणतात. कनिंगहॅम म्हणतो कीं हे ऑक्सस नदीवरून पंजाबांत आले. महाभारतांत वाहीक लोकांचें वर्णन आहे; तें जाटांचेंच वर्णन असावें असा विलसनचा तर्क आहे. तसें असल्यास जाट लोक पंजाबांत ख्रि. पू. २०० ते इ. स. च्या ५ व्या शतकापर्यंत आलेले असावेत. कांहीं लोक म्हणतात कीं महाभारतांतील जरठ हेच जाट होत. रिस्लेच्या मतें जाट शब्द जथ ( जमा करणें ) यापासून निघाला आहे. निरनिराळ्या लढणाऱ्या लोकांच्या समूहाला जाट असें म्हणत असावेत; तो जातिवाचक नसून वर्गवाचक शब्द असावा असेंहि तो म्हणतो. इबेटसनच्या मतें जाट व रजपूत यांच्या रक्ताचा फारच निकट संबंध आहे. त्यांचा शारीरिक बांधा; चेहऱ्याची ठेवण रजपुतांसारखीच आहे. जाट लोकांनीं पुढें शीख मताचा अवलंब करून रजपुतांशीं चढाओढ करून शीख राज्यांत वर्चस्व मिळविलें. पण विधवाविवाह वगैरे गोष्टींमुळें वनिया व खत्री लोकांच्याहि खालीं त्यांची गणना होऊं लागली. इबटसन आणखी म्हणतो कीं आर्य व शक लोक हिंदुस्थानांत वसाहत करण्यास आले त्यांच्याबरोबरच हे जाट आले.पण त्यांचे सेनानायक रजपूत असल्यामुळें त्यांचा दर्जा रजपुतांच्या खालीं लागला. कोणी जाटांची उत्पत्ति ब्राह्मणांपासून झाल्याचें मानितात. जाटांतील सांसी पोटजात सांसी या गुन्हेगार जातीप्रमाणें दिसते. याच पोटजातींत महाराजा रणजितसिंगासारखे पराक्रमी पुरुष निघाले. इतिहासांत जाटांचा उल्लेख प्रथम इ. स. ९१२ पूर्वी इब्नखुर्दादिबमध्यें आढळतो. किरमान आणि मनसुरा यांमधील प्रदेशावर हे 'झाट' देखरेख करीत असत असें खुर्दाद्ब म्हणतो. अरब लोक हिंदूंना जाट म्हणत असे मुजमिल उत्-तवारीखमध्यें लिहिलें आहे. जाटांतील लग्नविधींवरून ते शुद्ध बीजांचे नसावेत असें रोज म्हणतो ( ए. रि. ए. मधील 'जाट' लेख पहा ).

यांच्या चालीरीती गुजर व अहीर लोकांप्रमाणेंच आहेत. जाट लोक स्वतःची उत्पत्ति दक्षयज्ञाचा विध्वंस करण्याकरितां महादेवानें जटेंतून जे दोन वीर निर्माण केले त्यांच्यापासून झाली असें सांगतात.

यांच्यांत विवाह शनिवारीं करतात. प्रथम वरास विधवेबरोबर लग्न करावयाचें असलें तर त्याला प्रथम पिंपळाभोंवतीं सात प्रदक्षिणा घालाव्या लागतात. विधवेला आपल्या दिराबरोबर लग्न करतां येत नाहीं.

नवरा मेल्यास त्याची बायको नवऱ्याच्या प्रेताभोंवतीं उलट दिशेनें सात प्रदक्षिणा घालून कांहीं बांगड्या फोडून टाकते, व १२ व्या दिवशीं सर्व बांगड्या फोडून चुलींत टाकते.

पेंद नांवाचा उत्सव हे लोक फार थाटानें करतात. घरांतील कर्ता पुरुष किंवा त्याची बायको मेली अथवा मुलीचें लग्न व्हावयाचें असलें तर हा उत्सव करतात. त्यावेळीं ४० फूट लांबीच्या सागवानाच्या लांकडाचा एक खांब जमिनीवर ठेऊन त्याची बुधानें पूजा करतात. त्याच्या वरच्या टोंकास गाडीचें चाक बांधून मग तो जमीनीवर उभा करितात; आणि तीन दिवस मेजवानी व गाणेंबजावणें करतात. मर्तिक झालें असल्यास गाईची वासरी व गोऱ्हा यांचें लग्न लावतात व त्यांच्या अंगास तेलहळद लावून त्यांच्याकडून या खांबास ७ प्रदक्षिणा घालवितात.

हे लोक लग्नें करण्यास ब्राह्मण उपाध्यास बोलावितात व ब्राह्मणांचा मंत्रोपदेशहि घेतात. मध्यप्रांतांतले जाट पक्षी खात नाहींत व मांसदुद्धां खाण्याचें असल्यास घराच्या बाहेर खातात. हे दाढी व केंस कापीत नाहींत. हे काळ्या गाईचें दूध पीत नाहींत. बायका नाक टोंचीत नाहींत, व कांचेच्या बांगड्या घालीत नाहींत. हे आपल्या घरांत तुळशीचें झाड लावीत नाहींत. तुळशीची पुजा बाहेर जाऊन करतात. मध्यप्रांतांतील सागर जिल्ह्यांत यांचा धंदा गवंड्यांचा आहे. आग्नेय पंजाबांत शिवगोत्री व कासवगोत्री असे दोन वर्ग आहेत. यांत लग्नव्यवहार होतात. या जाटांना स्वतंत्र धर्म नाहीं. मध्यपंजाबांत ते शीख आहेत. पश्चिम भागांत बहुतेक मुसलमान आहेत. पंजाबी जाटांत अरबी नांवाची एक पोटजात आहे. पंजाबांत हे लोक शेती करितात व कांहींजण सैन्यांत नौकरी करितात. काश्मीरसंस्थानांत यांची संख्या १४१४१९ पर्यंत असून, तेथें ते मुसलमान, हिंदु व शीख या तिन्ही जातींचे आहेत. मीरपूर जिल्ह्यांत तर कोणत्याहि मुसुलमान शेतकऱ्याला जाट असें नांव देतात. आसामांत हे लोक फारच थोडे ( १३५ ) आहेत. म्हैसूरकडे हिंदु जाट कोलारच्या खाणींत काम करतात तर मुसुलमान जाट सैन्यांत नौकरी करितात. पंजाबांत हे प्रथम आल्यावर एके जागीं न रहातां सर्वत्र लवकर पसरले. मोठमोठ्या घराण्यांना पुष्कळ वेळां गांवांचीं नांवें दिलेलीं आढळतात. अकबरानें एका जाट मुलीशीं लग्न केलें होतें व त्यावेळीं जालंदर व बारीदुआबांतील ३५ जाट व ३५ रजपूत गांवांना पाचारण केलें होतें असें म्हणतात. फेरोजपूर व लुधियानाकडील जंगली जाट हे गरीब आहेत, रणजितसिंग त्यांना शिपायांची नौकरी सहसा देत नसे. पूर्वी या लोकांत बालहत्येची चाल असावी.

इ. स. १७५९ त जाट लोकांनीं जालंदरदुआब जिंकला. त्यावेळीं प्रजेशीं त्यांची वर्तणूक मगरूरीची असे. त्यावेळीं पंजाबमध्यें पुढील म्हणी प्रचलित होत्या. ( १ ) जाटाला उलट जबाब देऊं नका, नाहींतर ते तुमचें डोकें फोडतील. ( २ ) जाटांच्याकडे करवसुलीचें काम जाणें म्हणजे ईश्वरी कोपच होय. ( ३ ) जाट हा आपल्या धर्मगुरुशींहि भांडण्यास कमी करीत नाहीं व बोलतांनाहि शिवीगाळीशिवाय बोलत नाहीं; वगैरे. [ इंडियन अँटिक्वरी, पु. १४; सेन्सस ऑफ इंडिया, स. १९११, पु. १४, २०, २१; रोज-ग्लॉसरी, पु. २; कुक-ट्राइब्ज अँड कास्ट्स, पु. ३;. दुर्शंगाबाद सेटलमेंट रि.; इबटसन-पंजाब एथ्नॉग्राफी; कूक. ]

**जाटपु**—" डोंगराळ भागांत खोंड भाषा आणि मैदानांत तेलगु भाषा बोलणाऱ्या सुधारलेल्या खोंड लोकांचा हा एक वर्ग आहे" अशी १९०१ सालच्या मद्रासच्या सेन्सस रिपोर्टांत जाटपूंची माहिती मिळते. स.१९११ च्या खानेसुमारींत यांची संख्या ९३२७३ भरली. पैकीं ९२५२० मद्रास इलाख्यांत होते. सापांचें मांस आणि गोमांस भक्षिणाऱ्या खोंड लोकांपेक्षां, जाटपु हे आपणांस श्रेष्ठ समजतात. 'कोंड जाटपु डोरलु' ( खोंड जातीचे धनी ) या नांवाचें जाटपु हें संक्षिप्तरूप आहे असें मानण्यांत येतें. यांच्यांत निरनिराळ्या प्राण्यांच्या देवकांवरून पोटजाती पडल्या आहेत. उदा.थोरिक किंवा थोयिक; कादिक; मामदंगी इ.

आपल्या आतेच्या मुलीशीं लग्न करण्याचा प्रत्येकाचा हक्क असतो. खेडवळ अथवा खालच्या दर्जाच्या तेलगु लोकांच्या विवाहपद्धतीप्रमाणेंच हे लोक विवाहसमारंभ साजरा करतात. विधवाविवाहास पूर्ण मोकळीक आहे. विधवा आपल्या धाकट्या दिराशींहि लग्न करते. घटस्फोटासहि प्रतिबंध नसून, काडी मोडून दिलेल्या स्त्रियांनांसुद्धां पुन्हां लग्न करतां येतें. मृतांनां बहुधां पुरतात. तथापि सर्पदंशानें मेलेल्या मनुष्यास दहन करावें असें शास्त्र सांगतें.

जाकरा देवता ही जाटपूंची कुलदेवता होय. धान्याच्या मळणीच्या वेळीं या देवतेस प्रथम पीकाचा भाग अर्पण करण्याचा प्रघात आहे. यांच्या जातीच्या मुख्यास 'नायडु' किंवा 'सामंथ' अशी संज्ञा आहे. [ थर्स्टन; से. रि.]

**जाटपोल**—हैदराबाद संस्थान. महबूबनगर जिल्ह्याच्या दक्षिणेस असलेलें एक संस्थान. यांत एकंदर ७९ खेडीं असून क्षेत्रफळ ३५६ चौरस मैलांचें आहे. इ. स. १९११ मध्यें ३८३१० लोकसंख्या होती. एकंदर उत्पन्न १.९ लक्ष रुपये असून निजामसरकारास ७३५३७ रुपये खंडणीबाबत दिली जाते.

शिलालेखांवरून असें दिसतें कीं, इ स. १३४३ मध्यें क्षत्रपोटा नायडू यानें ही इस्टेट बळाकावून पांगल व दुसरे आणखी किल्ले सर केले. याच्या वंशजांनीं बरींच शतकें राज्य केलें. अठराव्या शतकाच्या अखेरीस राजा जगन्नाथराव निपुत्रिक वारला व त्यानें पाखालच्या राव वंशांतील लछमाराव हा दत्तक घेतला. इ. स. १८३१ मध्यें लछमाराव यास जाटपोल हा परगणा निजामाकडून मिळाला व ७०००० रुपये खंडणी द्यावी असें ठरलें. ८० वर्षांपूर्वी जाटपोल हें मुख्य ठिकाण होतें.

**जातक**—बौद्धवाङ्मयांतील एक प्रकारच्या ग्रंथाला हें नांव आहे. त्यांत बोधिसत्वाच्या म्हणजे बुद्धाच्या पूर्वीच्या अनेक जन्मांची कथा सांगितलेली आहे. ' जातक ' म्हणजे पूर्वजन्म. तिपिटक ग्रंथाचा जातक हा एक पोटभाग आहे. जातक कथांची रचना व इतिहास व त्यांचें स्वरूप ' बुद्धोत्तर जग ' या विभागांत तिपिटकाचें विवेचन करतांना दिलें आहे.

धर्मतत्त्वांचा उपदेश सामान्य जनसमूहाला रूक्ष व कंटाळवाणा होऊं नये म्हणून मधूनमधून गोष्टी सांगणें किंवा सर्व उपदेश गोष्टींच्या रूपानें करणें, ही सर्व धर्मप्रचारकांची युक्ति आहे. हिंदुधर्मांतील सर्व ' पुराण ' वाङ्मयाचा हाच उद्देश आहे. ख्रिस्ती धर्मोपदेशकहि आपल्या ' सर्मन' मध्यें (प्रवचनांत ) ' उदाहरणांचा ' म्हणजे सत्पुरुषांच्या चरित्रांतील गोष्टींचा अन्तर्भाव करतात. बुद्धानेंहि स्वधर्मोपदेशांत हा प्रकार सुरू केला. बुद्धाचे अनेक पूर्वजन्म झाले होते; त्यांत राजा, व्यापारी, सरदार, अस्पृश्य किंवा हत्ती, किंवा असलाच कोणी मानव किंवा मानवेतर प्राण्यांचे जन्म बुद्धानें घेतले होते. पूर्वकालीन कोणतीहि एखादी गोष्ट घेऊन त्यांतील कथाविषयक एखादी स्पृहणीय व्यक्ति म्हणजेच बुद्ध होय, असें सांगणें सोपें होतें. याप्रमाणें जातक कथांची उत्पत्ति झाली. ' जातक ' म्हणून ज्या कथा पुढें बनविण्यांत आल्या, त्या कथा सुत्तांमध्यें आहेतच; पण त्यांत बोधिसत्त्वाचा निर्देश नाहीं. शिवाय सुत्तामध्यें ' जातक ' कथाहि कांहीं आहेत. उदा. कूटदंतसुत्त, महासुदस्सनसुत्त, महादेवसुत्त. ' जातक ' हा बौद्धांच्या धार्मिक ग्रंथांपैकीं आहे. कारण तो पवित्र ग्रंथाच्या नऊ अंगांपैकीं एक अंग आहे. जातकग्रंथ हा गाथांचा समुदाय असून त्याचे २२ निपात आहेत. हा ग्रंथ बहुतेक पद्यमय पण कांहीं ठिकाणीं गद्यमय आहे. गद्य बरेंच दुर्बोध आहे. शिवाय या मूळ कथांवर टीका लिहिलेली असून हल्लीं ' जातक गाथा ' म्हणून जो ग्रंथ उपलब्ध आहे तो मूळ कथा व त्यावरील टीका मिळून बनलेला आहे. त्याला ' जातकट्ठवण्णना ' असें पाली नांव आहे.

बौद्धवाङ्मयांत जातक हा ग्रंथ फार जुना व महत्त्वाचा आहे. यांतील बऱ्याचशा कथा पंचतंत्र, कथासरित्सागर व इतर गोष्टींचीं संस्कृत पुस्तकें यांत सांपडतात. कांहीं कथांचें रामायण व महाभारत यांतील कथांशीं साम्य आहे, व कांहींचें जैनवाङ्मयांतील कथांशीं आहे. यांतील कथांचें ख्रिस्ती कथांशीं किंतपत साम्य आहे तें आर. गार्बेनें ( कॉंट्रिब्युशन्स ऑफ बुद्धिझम टु ख्रिश्चानिटी ) व एम्. विंटरनिझनें ( हिस्ट्री ऑफ इंडियन लिटरेचर ) दाखविलें आहे. विंटरनिझचें म्हणणें आम्ही ज्ञानकोशाच्या ४ थ्या विभागांत ( पृ. २२० पासून पुढें ) मांडलें आहे.

' चरिया पिटक ' हें तिपिटकांतील खुद्दक निकायमधील शेवटचें पुस्तक आहे. त्याचा उद्देश बोधिसत्त्व पूर्वीच्या कोणकोणत्या जन्मांत दहा ' पारमिता ' ( गुणाची पूर्णता ) मिळवूं शकला होता तें सांगण्याचा आहे.

' निदानकथा ' ही जातक टीकाग्रंथाला प्रस्तावना म्हणून जोडली आहे. ' जातककथा ' हा सर्व ग्रंथच गौतमबुद्धाच्या आत्मचरित्रपर असून ' निदानकथा ' ही खुद्द

गौतमबुद्धाचेंच चरित्र आहे. पालीवाङ्मयांतलें बुद्धाचें हेंच पहिलें चरित्र होय.

'अवदान' नांवाचा दुसरा एक कथांचाच ग्रंथ आहे. त्यांत साधु पुरुषांच्या गोष्टी असून " चांगल्या कृत्यांचें फळ चांगलें मिळतें व वाइटाचें वाईट मिळतें " हा उपदेश ठसविण्याचा मुख्य उद्देश आहे ( अवदानें पहा ). 'जातक' व 'अवदान' या दोन ग्रंथांत मुख्य फरक असा आहे कीं, जातकांत बोधिसत्त्वाबद्दलच्या म्हणजे बुद्धाच्या पूर्वजन्माबद्दच्या सर्व कथा आहेत; आणि 'अवदान' ग्रंथांत इतर अनेक सत्पुरुषांच्या कथा आहेत, व कांहीं बोधिसत्त्वाबद्दलहि आहेत.

'बोधिसत्त्वावदानमाला' ऊर्फ 'जातकमाला' हा संस्कृत गद्यपद्यमय ग्रंथ आर्यशूर नांवाच्या कवीचा आहे. 'जातकमाला' नांवाचे दुसरेहि अनेक ग्रंथ आहेत, पण आर्यशूराचा ग्रंथच सर्वांत उत्तम आहे. हा ग्रंथहि बोधिसत्त्वाच्या गुणवर्णनपर आहे.

जातकग्रंथांतील कथा मनोरंजक आहेत. या कथांची व जातकग्रंथाची अधिक माहिती ज्ञानकोशाच्या चवथ्या भागांत दिली आहे ( बुद्धोत्तर जग प्र. ११ पान २२० ).

[ व्ही. फौसबोलनें सटीक जातक ७ भागांत प्रसिद्ध केलें आहे. ऱ्हीस डेव्हिड्सनें जातक कथांचें भाषांतर केलें आहे. याखेरीज विंटरनिझ, ओल्डनबर्ग, शार्पेंटियर यांच्या ग्रंथातून जातकाविषयीं माहिती आढळेल. ]

**जातकर्म**—हिंदु लोकांतील एक संस्कार. बालक जन्मास येतांच पित्यानें त्याचें मुखावलोकन करणें व गर्भाशयामध्यें बालकास जें गर्भांबुपान घडलें असेल त्या दोषाचें निरसन करणें हा जातकर्माचा उद्देश आहे. कुमार जन्मास आल्याचें वृत्त कळतांच पित्यानें स्नान करावें आणि ( त्या बालकास दुसऱ्या कोणी स्पर्श करावयाच्या पूर्वी व त्याचें नालछेदन होण्यापूर्वी ) मध आणि तूप यामध्यें सुवर्ण उगाळून तें बालकाकडून प्राशन करवावें. या प्राशनानें गर्भांबुपानाचा दोष नाहींसा होतो असें कांहींचें मत आहे.

या संस्काराच्या अंगभूत असा ( बालकाच्या बुद्धीची वाढ होण्यास ) 'मेधाजनन' नामक संस्कार कांहीं सूत्रकारांनीं दिला आहे. प्रयोगकारांनीं याचा उल्लेख केला नाहीं. यांतील विधि म्हणजे बालकाच्या कानावर सोनें ठेवून मेधा वृद्धिंगत करणाऱ्या 'मेधां ते' इत्यादि मंत्रांचा जप करावयाचा असतो. [ मनु—याज्ञवल्क्य स्मृति; आश्वलायनसूत्र; निर्णयसिंधु; धर्मसिंधु; वगैरे ]

**जाति**—मुंबई, सिंधप्रांत. कराची जिल्ह्याचा एक तालुका. उ. अ. २३°२५' ते २४°३८' व पू. रे. ६८° १' ते ६८°४८' क्षेत्रफळ २१४५ चौरस मैल. एकंदर खेडीं १२४; यांत गांव एकहि नाहीं. लोकसंख्या १९११ सालीं ३५८४७ या जिल्ह्यांतील सर्व तालुके घेतले तर या तालुक्यांत फार विरळ वस्ती आहे. दर चौरस मैलांत फक्त १५ माणसें हें प्रमाण पडतें. जमिनीवर क्षार असल्यामुळें पुष्कळ जमीन ओसाड पडली आहे म्हणून लोकवस्ती कमी आहे. उत्पन्न इ. स. १९०३–४ मध्यें एक लाख रुपये होतें. सिंधु नदीच्या कालव्यांचें पाणी या तालुक्यास मिळतें. भात, बाजरी, बार्ली, तीळ आणि गळिताचीं धान्यें हीं मुख्य पिकें होतात.

**जातिभेद**—" जाति " या शब्दाचा मूळ अर्थ जन्म. कधीं कधीं हा शब्द " जन्मसिद्ध स्वरूप " दाखविण्यासाठीं संस्कृत ग्रंथांत योजला आहे. आणि त्यावरून घोडा, सिंह वगैरे प्राण्यांच्या वर्गासहि जाति हा शब्द लावण्यांत येत आहे व ज्याअर्थी जाति म्हणजे जननवैशिष्ट्य मूलक सादृश्य किंवा समुच्चय ही कल्पना प्रचलित झाली त्याअर्थी जाति हा शब्द सादृश्यार्थानेंहि लावण्यांत येऊं लागला. प्रस्तुत प्रसंगीं " जाति " हें नांव ज्या प्रकारच्या मनुष्यसमूहास लावण्यांत येतें तेच समूह फक्त विवेचनाचा विषय आहे.

जातींचें शास्त्रीय विवेचन करावयाचें म्हटलें म्हणजे त्या विवेचनाचे तीन भाग करतां येतील. एक भाग म्हटला म्हणजे अस्तित्वांत असलेल्या जातींची याद आणि वर्णन. ही याद जरी पद्धतशीर व नीट झाली नाहीं तरी तशी तयार करण्याचे प्रयत्न अनेक प्रांतांत बरेच झाले आहेत. व प्रत्येक प्रांतानें आपलें एथ्नोग्राफिकल खातें ठेवलें आहे, त्या खात्यांतून हें काम होत आहे. जातिभेदाच्या अभ्यासाचें दुसरें अंग म्हटलें म्हणजे या अनेक जाती मिळून जी पद्धति होते तिचें वर्णन, म्हणजे तदंतर्गत अन्योन्याश्रयाचें सोपानरचनेचें क्रोध, द्रोह, ईर्षा असूया इत्यादि भावनांचें वर्णन. तिसरा भाग म्हटला म्हणजे जाति हा एक प्रकारचा संघ या दृष्टीनें विचार करून त्या संघाची अंतर्घटना, व स्वयंशासन व इतर संघांशीं व एकंदर समाजाशीं संबंध या दृष्टीनें अभ्यास. या अभ्यासामध्यें जाति, वर्ग, राष्ट्रजाति इत्यादि गोष्टींची तुलना येईल. या समुच्चयांच्या अभ्यासाचें ऐतिहासिक अभ्यास हें महत्त्वाचें अंग आहेच. त्यामध्यें जातींची घटनाविघटना इत्यादि गोष्टींचा विचार करावा लागतो. हा सर्व घटनाशास्त्रीय अभ्यास झाला. हिंदु समाजाचा एकंदर इतिहास या अभ्यासाचें हें उपांग आहे. हिंदुसमाजघटनेचा इतिहास द्यावयाचा म्हटला म्हणजे एक अधिकच व्यापक विवेचन करावें लागणार. यासाठीं येथें अत्यंत स्थूल गोष्टींचाच उल्लेख करून मोकळें झालें पाहिजे. अनेक जातींचीं वर्णनें ज्ञानकोशांत त्या त्या जातींच्या नांवाखालीं आलींच आहेत. आतां अनेक जाती मिळून जी पद्धति होते त्या पद्धतीकडे लक्ष देऊं.

अनेक निरनिराळ्या राष्ट्रजाती म्हणजे भिन्न राष्ट्रें हीं एकत्र आलीं म्हणजे त्यांचा एकमेकांशीं संबंध मनुष्यस्वभावाच्या नियमानुसार उत्पन्न झालेल्या

संघटित होतो. त्या नियमांचा शोध करणें म्हणजे पद्धतीचें स्वरूप वर्णन करणें होय.

जातिभेद हा शब्द इंग्रजी राज्यांत रूढ झाला आहे. तो समाजाचे जातिमूलक भेद किंवा माणसामाणसांतील जातिमूलक भिन्नता किंवा द्वैत या अर्थानें वापरला जातो. आपल्याकडे जातिभेद आणि चातुर्वर्ण्य या गोष्टी एकच अशी समजूत होऊन जातिभेदास धार्मिक पाठिंबा आहे अशा तऱ्हेची समजूत झाली. चातुर्वर्ण्य आणि जातिमय समाज या गोष्टी एक आहेत असेंच लोकांस वाटत होतें व त्यास कांहीं अंशीं कारण असें होतें कीं जाती एकंदर किती आहेत, त्या किती भिन्न स्वरूपांच्या आहेत इत्यादि गोष्टींविषयीं कल्पना अशी होती कीं तात्त्विक चार वर्ण ते जातीच आहेत त्यांच्यांत पोटजाती पडल्या असतील आणि कांहीं जाती संकरानें उत्पन्न झाल्या असतील व कांहीं कर्मलोपानें किंवा दुसऱ्या कांहीं कारणांनीं तुकडे पडत जाऊन वाढल्या असतील. जातिमय समाजाची स्थिति सरकारचें मानवशास्त्रखातें व शिरोगणती खातें यांनीं पद्धतशीर पहाणी केल्यापूर्वी जातिभेदाचें खरें स्वरूप लोकांस अवगतच नव्हतें असें म्हणतां येईल; व याच खात्यांनीं जातींच्या पद्धतशीर अभ्यासास प्रारंभ केला आहे; व खासगी पंडितांनीं फार तर त्यांच्या साहित्यावरून निराळे निर्णय काढणें, किंवा ऐतिहासिक अभ्यासांत भर घालणें या गोष्टी केल्या आहेत.

जाति हा एक सदृश मनुष्यांचा समुच्चय होय. या समुच्चयामध्यें आपल्या एकत्वाची व इतरांपासून भिन्नत्वाची भावना असते, व यामुळें जातीचें हिताहित हें व्यक्तीस आपलें हिताहित असें कांहीं अंशानें वाटतें. जातीची व्याख्या करण्याचे प्रयत्न अनेक झाले आहेत. त्यांमध्यें सर्वांस लागू पडणारें असें स्थूल लक्षण म्हटलें म्हणजे " जन्मना जायते संघे प्रवेशो नान्यतः क्वा । संघमर्यादितं क्षेत्रं विवाहे जातिरुच्यते ॥" असें देतां येईल. याचा अर्थः—ज्या विशिष्ट संघामध्यें प्रवेश जन्मानेंच होतो आणि दुसऱ्या कोणत्याहि कारणानें होत नाहीं व ज्या संघांतील लोकांस त्या संघाबाहेर लग्न करतां येत नाहीं त्या संघास जाति म्हणावें असा आहे जात व पोटजात हे शब्द वारंवार वापरले जातात व हे परस्परापेक्ष आहेत. उदाहरणार्थ कोंकणस्थ ब्राम्हण ही महाराष्ट्रीय ब्राम्हणांची पोटजात होईल. पण महाराष्ट्रीय ब्राम्हण ही पंचद्राविड ब्राम्हणांची पोटजात होईल. पंचद्राविड ब्राह्मण ही ब्राह्मजातीची पोट जात होईल. सामान्यतः ब्राह्मण, महाराष्ट्रीय ब्राह्मण व कोंकणस्थ ब्राह्मण [illegible] सें म्हणतात. जेव्हां अंतर्विवाह म्हणजे [illegible] देशांत रूढ असतो म्हणजे [illegible] असतात तेव्हां त्या [illegible] भावना असते. कधीं [illegible] कारण असतो व कधीं [illegible] कांहीं

वर्गांत आपण इतरांपेक्षां निराळे आहोंत किंवा उच्च आहोंत अशी भावना उत्पन्न झाली म्हणजे स्वतःस उच्च समजणारा समाज इतरांपासून आपलें पृथक्त्व स्थापूं पहातो. ज्या अनेक वन्य व खेडवळजातींतील कांहीं लोक नगरवासी होतात व आचारविचार यांमध्यें सुधारले जातात तेव्हां त्यांच्यामध्यें इतरांपासून वियुक्त होण्याची प्रवृत्ति दिसूं लागते. एवंच अंतर्विवाह व उच्चनीच भाव यांचा अन्योन्याश्रय आहे. उच्चनीच भाव असला म्हणजे कोणत्यातरी तत्त्वावर त्याचें समर्थन व्हावें लागतें. यासाठीं सामाजिक पदवी, राजकीय महत्व किंवा आचारांतील उच्चनीचता या गोष्टींवर दोन समाजांतील पृथक्त्व रक्षिलें जातें. " अ " समाज " ब " समाजाहून उच्च कां ? तर 'अ' अधिकारी समाज आहे म्हणून, किंवा जमीनदार समाज आहे म्हणून, किंवा तो राजवंशांतील आहे म्हणून, किंवा तो रहाणीनें श्रेष्ठ आहे म्हणून. या तऱ्हेच्या विचारांनीं भिन्न समाजांमध्यें उच्चनीचता स्थापन करणाऱ्या कल्पना चोहोंकडे प्रचलित आहेत. भारतीयांस किंबहुना एशियाटिक लोकांस दक्षिण आफ्रिकें व अमेरिकेंत कनिष्ठता याच कल्पनानुसार प्राप्त झाली आहे. हिंदुस्थानामध्यें आर्थिक, राजकीय व आनुवंशिक पदवी या कारणांचें महत्त्व आहेच; पण त्या कारणांस प्राधान्य मिळालेलें नाहीं. उच्चनीचतेचें अगदीं निराळ्या कारणानें स्पष्टीकरण करण्यांत आलें आहे. आणि तें कारण म्हटलें म्हणजे पावित्र्यापावित्र्यविचार होय. अमुक जात उच्च कां तर ती अधिक पवित्र आहे म्हणून; आणि अमुक जात कनिष्ठ कां तर ती कमी पवित्र किंवा अपवित्र आहे म्हणून. याचा अर्थ असा नव्हे कीं सांपत्तिक स्थिति किंवा शिक्षण यांवर जातींची उच्चनीचता हिंदुस्थानांत ठरत नाहीं. त्यांच्यावर उच्चनीचता ठरतेच; पण ती प्रत्यक्ष न ठरतां त्यांच्यावर पावित्र्यापावित्र्य ठरून नंतर ठरते. या पावित्र्यापावित्र्याच्या तत्त्वास हिंदुस्थानांत प्राधान्य मिळालें. त्याचें कारण ब्राह्मणजातीचें प्रथमस्थान होय. या प्राचीन काळीं दक्षिणेवर अवलंबून असणाऱ्या जातीचें प्रथमस्थान कोणत्याहि दुसऱ्या तत्वावर सिद्ध करतां आलें नसतें. शिवाय ब्राह्मण हा ईश्वराशीं विशिष्ट संबंध सांगणारा वर्ग असल्यामुळें त्याचें प्राधान्य लोकांस मान्य असणें व त्याचें पावित्र्य अधिक वाटणें या गोष्टी स्वाभाविकच होत्या. ब्राह्मणी धर्मशास्त्राच्या इतिहासांत क्रमाक्रमानें आचारधर्मास देखील प्राधान्य मिळालें. तें ब्राह्मणजातीच्या उच्चतेचें व दृश्य आचरणावर व्यक्तींची उच्चता असावी या तत्त्वाचें समर्थन करण्यासाठीं मिळालें. जर क्षत्रियवर्गानें आपलें प्राधान्य देशावर स्थापित केलें असतें तर त्याबरोबर आचारधर्माव्यतिरिक्त पण उच्चनीचतानिर्णायक निराळें तत्व समाजांत सुरू करावें लागलें असतें; आणि त्यामुळें येथील जातिभेद इतर देशांतील जातिभेदासारखाच दिसूं लागला असता. आणि तो मोडणें किंवा

कमी करणें या क्रिया करण्यास राजसत्ता समर्थ झाली असती. पण राजाचें सामाजिक महत्त्व बऱ्याच अंशीं त्याच्या क्षत्रियत्वावर आणि त्याचें क्षत्रियत्व त्याच्या संस्कारावर व त्याची संस्कारार्हता ब्राह्मणांच्या इच्छेवर अशी परिस्थिति उत्पन्न झाल्यामुळें देशांतील क्षत्रियवर्ग फेरफार करण्यास पूर्णपणें दुर्बल ठरला. पावित्र्यापावित्र्यावर सामाजिक महत्त्व रचलें गेलें असल्याकारणानें आणि पावित्र्यापावित्र्यनिर्णायक आचारधर्म उत्पन्न झाल्यामुळें जगांतील एकंदर वस्तूंचें, व रिवाजांचें पावित्र्याच्या तत्त्वावर वर्गीकरण करणें भाग पडलें आणि एकंदर सामाजिक विचारास जगापासून निराळें असें कांहीं वळण मिळालें.

अनेक जातींचें अस्तित्व, त्यांत ब्राह्मणजातीचें प्राधान्य व जातींची उच्चनीचता व तिचें स्पष्टीकरण करणारी पावित्र्यापावित्र्यतेची कल्पना या गोष्टी जातिभेदाच्या मुख्य घटक म्हणून धरण्यास हरकत नाहीं. ब्राह्मणजातीच्या उच्चतेचा एक लांबलचक इतिहास आहे (ब्राह्मण पहा). पावित्र्यापावित्र्याच्या कल्पना वेदकाळापासून पराशरस्मृतीपर्यंत एकसारख्या वाढत कशा गेल्या याचें स्पष्टीकरण अन्यत्र केलेंच आहे ("पावित्र्य" पहा). उच्चनीचतेच्या कल्पनांना चातुर्वर्ण्याच्या कल्पनेमुळें थोडाबहुत पाठिंबा मिळाला. परंतु समाजाच्या एकंदर इतिहासांत उच्चनीचतानिर्णायक दुसऱ्या अनेक गोष्टी होऊन गेल्या आहेत. एका जातीनें दुसऱ्या जातीवर विजय मिळविणें आणि त्या प्रदेशांत राहणें तसेंच एका वसलेल्या प्रदेशांत निराळी जात केवळ वस्तीसाठीं मागाहून येणें व नवागतांचे आचारविचार स्थानिकांहून भिन्न असणें यामुळें नवागतांची उच्चता किंवा नीचता निर्णित झाली आहे. जेते स्थानिकांहून श्रेष्ठ होणार व केवळ वस्तीसाठीं आलेले स्थानिकांहून हलके ठरणार असा नियम दिसतो. जातींचे कांहीं लोक परक्या प्रदेशांत जाऊन आचारभिन्नत्व पावले म्हणजे ते दोन वर्ग पुनः संबंध आला असतां एकमेकांस हलके समजणार. पुष्कळ प्रसंगीं एका विशिष्ट वर्गाचा ज्या जातीशीं संपर्क येतो त्या जातीच्या उच्चनीचतेवर त्याशीं संबंध ठेवणाऱ्या वर्गाची उच्चनीचता ठरते आणि प्रसंगीं अशा कारणानें एखाद्या जातीचे तुकडेहि पडतात. एवंच अनेक कारणांचा उच्चनीचता ठरविण्यांत परिणाम झाला आहे. हीं कारणें प्रत्येक प्रसंगीं कोणकोणतीं होतीं हें विशिष्ट जातींचें इतिहास लिहितांनाच पहावें लागेल. सामान्यतः जगांत विशिष्ट वर्गांची, राष्ट्रांची किंवा जातींची उच्चनीचता ठरण्यास ज्या गोष्टी कारण झाल्या आहेत त्याच हिंदुस्थानांत कारण झाल्या आहेत. आतां जातींच्या अनेकत्वाचा किंबहुना असंख्यत्वाचा विचार करूं. समाजाचे तुकडे पडत जाऊन जातिभेद वाढत गेला अशी लोकांची समजूत आहे. पण ज्या मोठ्या समाजाच्या आज ४००० जाती पडतील इतका मोठा समाज पूर्वी कधींच अस्तित्वांत नव्हता. अनेक समाज एकत्रित केले गेले पण त्यांचें पूर्ण एकीकरण न झाल्यामुळें हा चार हजार जातींचा समाज तयार झाला आहे. तथापि मोठ्या समाजाचे तुकडे पडत जाण्याची क्रियाहि झालेली आहे. ब्राह्मण म्हणविणाऱ्या जातींची संख्या सुमारें ८०० आहे. यांतील बहुतेक जाती आद्यब्राह्मणवर्णाचे तुकडे पडत पडत झाल्या आहेत यांत संशय नाहीं.

जातींचें वर्गीकरण करण्याचे प्रयत्न अनेक झाले आहेत. जातींचें कर्म पाहून क्षत्रियवैश्यादि वर्णांत घालणें ही वर्गीकरणाची जुनी पद्धत झाली. जातींचें, आज त्यांचा आयुष्क्रम पाहून प्रगत, मध्यम व मागासलेले असेंहि वर्गीकरण राजकारणांत करण्यांत येतें. जातींचें वर्गीकरण त्यांच्या उत्पत्तिवैशिष्ट्यावरून किंवा स्वरूपवैशिष्ट्यावरून करण्यांत आलें आहे. या तत्त्वाप्रमाणें सेन्ससवाल्यांनीं जातींचे सात वर्ग पाडले आहेत ते येणेंप्रमाणेः—( १ )राष्ट्रजातिस्वरूपी जाति, ( २ ) कर्मनिर्णित जाति, ( ३ ) सांप्रदायमूलक जाति, ( ४ ) संकरमूलक जाति, ( ५ ) राष्ट्रस्वरूपी जाति, ( ६ ) स्थानांतरमूलक जाति, व ( ७ ) भिन्नाचारमूलक जाति.

यांमध्यें राष्ट्रजातिस्वरूपी जाति व राष्ट्रस्वरूपी जाति यांचें वर्गीकरण आकारावर केलें आहे व तें त्या समुच्चयाच्या प्रयोजनावरहि आहे. उदाहरणार्थ बंजाऱ्यांची जात घ्या. ही जात अनेक निरनिराळ्या जातींतील माणसें एकत्रित होऊन तयार झाली व ही जात भटकी असल्यामुळें हिला थोडेसें राजकीय पृथक्त्वाचें स्वरूपहि आलें होतें. पण ती जात राष्ट्र कधींच बनली नव्हती. उलटपक्षीं मराठा आणि नेवार या जातींना राष्ट्रस्वरूपी जाती म्हटलें आहे. कां कीं, यांचें राजकीय स्वरूप अधिक स्पष्ट होतें.

बहुतेक जातींमध्यें जातीनें नेमलेली एक सभा असते. वरिष्ठ जातींमध्यें केव्हां केव्हां अशा प्रकारची सभा आढळून येत नाहीं. वरिष्ठ जातींत किरकोळ बाबतींत, जातींचा त्या जातींतील व्यक्तींवर फारसा अंमल नसतो, पण महत्त्वाच्या बाबतींत मात्र खालच्या जातीप्रमाणेंच कडक अंमल असतो.

जातीनें निवडून दिलेल्या पांच लोकांची मिळून जात—पंचायत बनते व त्या पंचायतीकडे जातीमधील तंटेबखेडे तोडण्याचें काम असतें. कांहीं जाती या पंचायतीवर एक सरपंच निवडतात. जातीमधील उपजातींमध्येंहि स्वतंत्र पंचायती असतात. एखाद्या प्रश्नासंबंधीं ज्यावेळी वाद उत्पन्न होतो तेवढ्या वेळेपुरतेच हे पंच एकत्र जमून आपला निर्णय देतात. एका जातीच्या अगर उपजातीच्या निरनिराळ्या पंचायतीहि असलेल्या आढळतात.

ज्या गुन्हेगाराला एखाद्या प्रश्नाचा निकाल लावून घ्यावयाचा असेल तो या पंचांना समक्ष भेटून अगर पत्रद्वारें एके ठिकाणीं जमवितो. पंच जमल्यानंतर ज्यानें ती सभा बोलावली असते तो आपलें गाऱ्हाणें पुढें मांडतो. गाऱ्हाणें मांडण्यापूर्वी त्यानें आपला गुन्हा कबूल केला तर पंच त्याला जी

संघटित होतो. त्या नियमांचा शोध करणें म्हणजे पद्धतीचें स्वरूप वर्णन करणें होय.

जातिभेद हा शब्द इंग्रजी राज्यांत रूढ झाला आहे. तो समाजाचे जातिमूलक भेद किंवा माणसामाणसांतील जातिमूलक भिन्नता किंवा द्वैत या अर्थानें वापरला जातो. आपल्याकडे जातिभेद आणि चातुर्वर्ण्य या गोष्टी एकच अशी समजूत होऊन जातिभेदास धार्मिक पाठिंबा आहे अशा तऱ्हेची समजूत झाली. चातुर्वर्ण्य आणि जातिमय समाज या गोष्टी एक आहेत असेंच लोकांस वाटत होतें व त्यास कांहीं अंशीं कारण असें होतें कीं जाती एकंदर किती आहेत, त्या किती भिन्न स्वरूपांच्या आहेत इत्यादि गोष्टींविषयीं कल्पना अशी होती कीं तात्त्विक चार वर्ण ते जातीच आहेत त्यांच्यांत पोटजाती पडल्या असतील आणि कांहीं जाती संकरानें उत्पन्न झाल्या असतील व कांहीं कर्मलोपानें किंवा दुसऱ्या कांहीं कारणांनीं तुकडे पडत जाऊन वाढल्या असतील. जातिमय समाजाची स्थिति सरकारचें मानवशास्त्रखातें व शिरोगणती खातें यांनीं पद्धतशीर पहाणी केल्यापूर्वी जातिभेदाचें खरें स्वरूप लोकांस अवगतच नव्हतें असें म्हणतां येईल; व याच खात्यांनीं जातींच्या पद्धतशीर अभ्यासास प्रारंभ केला आहे; व खासगी पंडितांनीं फार तर त्यांच्या साहित्यावरून निराळे निर्णय काढणें, किंवा ऐतिहासिक अभ्यासांत भर घालणें या गोष्टी केल्या आहेत.

जाति हा एक सदृश मनुष्यांचा समुच्चय होय. या समुच्चयामध्यें आपल्या एकत्वाची व इतरांपासून भिन्नत्वाची भावना असते, व यामुळें जातीचें हिताहित हें व्यक्तीस आपलें हिताहित असें कांहीं अंशानें वाटतें. जातीची व्याख्या करण्याचे प्रयत्न अनेक झाले आहेत. त्यांमध्यें सर्वांस लागू पडणारें असें स्थूल लक्षण म्हटलें म्हणजे " जन्मना जायते संघे प्रवेशो नान्यतः कदा । संघमर्यादितं क्षेत्रं विवाहे जातिरुच्यते ॥" असें देतां येईल. याचा अर्थः—ज्या विशिष्ट संघामध्यें प्रवेश जन्मानेंच होतो आणि दुसऱ्या कोणत्याहि कारणानें होत नाहीं व ज्या संघांतील लोकांस त्या संघाबाहेर लग्न करतां येत नाहीं त्या संघास जाति म्हणावें असा आहे जात व पोटजात हे शब्द वारंवार वापरले जातात व हे परस्परापेक्ष आहेत. उदाहरणार्थ कोंकणस्थ ब्राम्हण ही महाराष्ट्रीय ब्राम्हणाची पोटजात होईल. पण महाराष्ट्रीय ब्राम्हण ही पंचद्राविड ब्राम्हणांची पोटजात होईल. पंचद्राविड ब्राह्मण ही ब्राह्मजातीची पोट जात होईल. सामान्यतः ब्राह्मण, महाराष्ट्रीय ब्राह्मण व कोंकणस्थ ब्राह्मण या सर्वांस जात असें म्हणतात. जेव्हां अंतर्विवाह म्हणजे संघातल्या संघांतच विवाह हा देशांत रूढ असतो म्हणजे देशामध्यें अनेक अंतर्विवाही समाज असतात तेव्हां त्या निरनिराळ्या संघांमध्यें उच्चनीचतेची भावना असते. कधीं-कधीं अंतर्विवाह हा उच्चनीचतेचें कारण असतो व कधीं कधीं परिणामहि असतो. म्हणजे एखाद्या जातीमध्यें कांहीं वर्गांत आपण इतरांपेक्षां निराळे आहोंत किंवा उच्च आहोंत अशी भावना उत्पन्न झाली म्हणजे स्वतःस उच्च समजणारा समाज इतरांपासून आपलें पृथक्त्व स्थापूं पहातो. ज्या अनेक वन्य व खेडवळजातींतील कांहीं लोक नगरवासी होतात व आचारविचार यांमध्यें सुधारले जातात तेव्हां त्यांच्यामध्यें इतरांपासून वियुक्त होण्याची प्रवृत्ति दिसूं लागते. एवंच अंतर्विवाह व उच्चनीच भाव यांचा अन्योन्याश्रय आहे. उच्चनीच भाव असला म्हणजे कोणत्यातरी तत्त्वावर त्याचें समर्थन व्हावें लागतें. यासाठीं सामाजिक पदवी, राजकीय महत्व किंवा आचारांतील उच्चनीचता या गोष्टींवर दोन समाजांतील पृथक्त्व रक्षिलें जातें. " अ " समाज " ब " समाजाहून उच्च कां ? तर 'अ' अधिकारी समाज आहे म्हणून, किंवा जमीनदार समाज आहे म्हणून, किंवा तो राजवंशांतील आहे म्हणून, किंवा तो रहाणीनें श्रेष्ठ आहे म्हणून. या तऱ्हेच्या विचारांनीं भिन्न समाजांमध्यें उच्चनीचता स्थापन करणाऱ्या कल्पना चोहोंकडे प्रचलित आहेत. भारतीयांस किंबहुना एशियाटिक लोकांस दक्षिण आफ्रिकें व अमेरिकेंत कनिष्ठता याच कल्पनानुसार प्राप्त झाली आहे. हिंदुस्थानामध्यें आर्थिक, राजकीय व आनुवंशिक पदवी या कारणांचें महत्त्व आहेच; पण त्या कारणांस प्राधान्य मिळालेलें नाहीं. उच्चनीचतेचें अगदीं निराळ्या कारणानें स्पष्टीकरण करण्यांत आलें आहे. आणि तें कारण म्हटलें म्हणजे पावित्र्यापावित्र्यविचार होय. अमुक जात उच्च कां तर ती अधिक पवित्र आहे म्हणून; आणि अमुक जात कनिष्ठ कां तर ती कमी पवित्र किंवा अपवित्र आहे म्हणून. याचा अर्थ असा नव्हे कीं सांपत्तिक स्थिति किंवा शिक्षण यांवर जातींची उच्चनीचता हिंदुस्थानांत ठरत नाहीं. त्यांच्यावर उच्चनीचता ठरतेच; पण ती प्रत्यक्ष न ठरतां त्यांच्यावर पावित्र्यापावित्र्य ठरून नंतर ठरते. या पावित्र्यापावित्र्याच्या तत्त्वास हिंदुस्थानांत प्राधान्य मिळालें. त्याचें कारण ब्राह्मणजातीचें प्रथमस्थान होय. या प्राचीन काळीं दक्षिणेवर अवलंबून असणाऱ्या जातीचें प्रथमस्थान कोणत्याहि दुसऱ्या तत्वावर सिद्ध करतां आलें नसतें. शिवाय ब्राह्मण हा ईश्वराशीं विशिष्ट संबंध सांगणारा वर्ग असल्यामुळें त्याचें प्राधान्य लोकांस मान्य असणें व त्याचें पावित्र्य अधिक वाटणें या गोष्टी स्वाभाविकच होत्या. ब्राह्मणी धर्मशास्त्राच्या इतिहासांत क्रमाक्रमानें आचारधर्मास देखील प्राधान्य मिळालें. तें ब्राह्मणजातीच्या उच्चतेचें व दृश्य आचरणावर व्यक्तीची उच्चता असावी या तत्त्वाचें समर्थन करण्यासाठीं मिळालें. जर क्षत्रियवर्गानें आपलें प्राधान्य देशावर स्थापित केलें असतें तर त्यावरोबर आचारधर्माव्यतिरिक्त पण उच्चनीचतानिर्णायक निराळें तत्व समाजांत रुरू करावें लागलें असतें; आणि त्यामुळें येथील जातिभेद इतर देशांतील जातिभेदासारखाच दिसूं लागला असता. आणि तो मोडणें किंवा

कमी करणें या क्रिया करण्यास राजसत्ता समर्थ झाली असती. पण राजाचें सामाजिक महत्त्व बऱ्याच अंशीं त्याच्या क्षत्रियत्वावर आणि त्याचें क्षत्रियत्व त्याच्या संस्कारावर व त्याची संस्कारार्हता ब्राह्मणांच्या इच्छेवर अशी परिस्थिति उत्पन्न झाल्यामुळें देशांतील क्षत्रियवर्ग फेरफार करण्यास पूर्णपणें दुर्बल ठरला. पावित्र्यापावित्र्यावर सामाजिक महत्त्व रचलें गेलें असल्याकारणानें आणि पावित्र्यापावित्र्यनिर्णायक आचारधर्म उत्पन्न झाल्यामुळें जगांतील एकंदर वस्तूंचें, व रिवाजांचें पावित्र्याच्या तत्त्वावर वर्गीकरण करणें भाग पडलें आणि एकंदर सामाजिक विचारास जगापासून निराळें असें कांहीं वळण मिळालें.

अनेक जातींचें अस्तित्व, त्यांत ब्राह्मणजातीचें प्राधान्य व जातींची उच्चनीचता व तिचें स्पष्टीकरण करणारी पावित्र्यापावित्र्यतेची कल्पना या गोष्टी जातिभेदाच्या मुख्य घटक म्हणून धरण्यास हरकत नाहीं. ब्राह्मणजातीच्या उच्चतेचा एक लांबलचक इतिहास आहे (ब्राह्मण पहा). पावित्र्यापावित्र्याच्या कल्पना वेदकाळापासून पराशरस्मृतीपर्यंत एकसारख्या वाढत कशा गेल्या याचें स्पष्टीकरण अन्यत्र केलेंच आहे ("पावित्र्य" पहा). उच्चनीचतेच्या कल्पनांना चातुर्वर्ण्याच्या कल्पनेमुळें थोडाबहुत पाठिंबा मिळाला. परंतु समाजाच्या एकंदर इतिहासांत उच्चनीचतानिर्णायक दुसऱ्या अनेक गोष्टी होऊन गेल्या आहेत. एका जातीनें दुसऱ्या जातीवर विजय मिळविणें आणि त्या प्रदेशांत राहणें तसेंच एका वसलेल्या प्रदेशांत निराळी जात केवळ वस्तीसाठीं मागाहून येणें व नवागतांचे आचारविचार स्थानिकांहून भिन्न असणें यामुळें नवागतांची उच्चता किंवा नीचता निर्णित झाली आहे. जेते स्थानिकांहून श्रेष्ठ होणार व केवळ वस्तीसाठीं आलेले स्थानिकांहून हलके ठरणार असा नियम दिसतो. जातीचे कांहीं लोक परक्या प्रदेशांत जाऊन आचारभिन्नत्व पावले म्हणजे ते दोन वर्ग पुनः संबंध आला असतां एकमेकांस हलके समजणार. पुष्कळ प्रसंगीं एका विशिष्ट वर्गाचा ज्या जातीशीं संपर्क येतो त्या जातीच्या उच्चनीचतेवर त्याशीं संबंध ठेवणाऱ्या वर्गाची उच्चनीचता ठरते आणि प्रसंगीं अशा कारणानें एखाद्या जातीचे तुकडेहि पडतात. एवंच अनेक कारणांचा उच्चनीचता ठरविण्यांत परिणाम झाला आहे. हीं कारणें प्रत्येक प्रसंगीं कोणकोणतीं होतीं हें विशिष्ट जातींचे इतिहास लिहितांनाच पहावें लागेल. सामान्यतः जगांत विशिष्ट वर्गांची, राष्ट्रांची किंवा जातींची उच्चनीचता ठरण्यास ज्या गोष्टी कारण झाल्या आहेत त्याच हिंदुस्थानांत कारण झाल्या आहेत. आतां जातींच्या अनेकत्वाचा किंबहुना असंख्यत्वाचा विचार करूं. समाजाचे तुकडे पडत जाऊन जातिभेद वाढत गेला अशी लोकांची समजूत आहे. पण ज्या मोठ्या समाजाच्या आज ४००० जाती पडतील इतका मोठा समाज पूर्वी कधींच अस्तित्वांत नव्हता. अनेक समाज एकत्रित केले गेले पण त्यांचें पूर्ण एकीकरण न झाल्यामुळें हा चार हजार जातींचा समाज तयार झाला आहे. तथापि मोठ्या समाजाचे तुकडे पडत जाण्याची क्रियाहि झालेली आहे. ब्राह्मण म्हणविणाऱ्या जातींची संख्या सुमारें ८०० आहे. यांतील बहुतेक जाती आद्यब्राह्मणवर्णाचे तुकडे पडत पडत झाल्या आहेत यांत संशय नाहीं.

जातींचें वर्गीकरण करण्याचे प्रयत्न अनेक झाले आहेत. जातींचें कर्म पाहून क्षत्रियवैश्यादि वर्णांत घालणें ही वर्गीकरणाची जुनी पद्धत झाली. जातींचें, आज त्यांचा आयुष्यक्रम पाहून प्रगत, मध्यम व मागासलेले असेंहि वर्गीकरण राजकारणांत करण्यांत येतें. जातींचें वर्गीकरण त्यांच्या उत्पत्तिवैशिष्ट्यावरून किंवा स्वरूपवैशिष्ट्यावरून करण्यांत आलें आहे. या तत्त्वाप्रमाणें सेन्ससवाल्यांनीं जातींचे सात वर्ग पाडले आहेत ते येणेंप्रमाणें:—( १ ) राष्ट्रजातिस्वरूपी जाति, ( २ ) कर्मनिर्णित जाति, ( ३ ) सांप्रदायमूलक जाति, ( ४ ) संकरमूलक जाति, ( ५ ) राष्ट्रस्वरूपी जाति, ( ६ ) स्थानांतरमूलक जाति, व ( ७ ) भिन्नाचारमूलक जाति.

यांमध्यें राष्ट्रजातिस्वरूपी जाति व राष्ट्रस्वरूपी जाति याचें वर्गीकरण आकारावर केलें आहे व तें त्या समुच्चयाच्या प्रयोजनावरहि आहे. उदाहरणार्थ बंगाल्यांची जात घ्या. ही जात अनेक निरनिराळ्या जातींतील माणसें एकत्रित होऊन तयार झाली व ही जात भटकी असल्यामुळें हिला थोडेंसें राजकीय पृथक्त्वाचें स्वरूपहि आलें होतें. पण ती जात राष्ट्र कधींच बनली नव्हती. उलटपक्षीं मराठा आणि नेवार या जातींना राष्ट्रस्वरूपी जाती म्हटलें आहे. कां कीं, यांचें राजकीय स्वरूप अधिक स्पष्ट होतें.

बहुतेक जातींमध्यें जातीनें नेमलेली एक सभा असते. वरिष्ठ जातींमध्यें केव्हां केव्हां अशा प्रकारची सभा आढळून येत नाहीं. वरिष्ठ जातींत किरकोळ बाबतींत, जातींचा त्या जातींतील व्यक्तींवर फारसा अंमल नसतो, पण महत्त्वाच्या बाबतींत मात्र खालच्या जातीप्रमाणेंच कडक अंमल असतो.

जातीनें निवडून दिलेल्या पांच लोकांची मिळून जात—पंचायत बनते व त्या पंचायतीकडे जातीमधील तंटेबखेडे तोडण्याचें काम असतें. कांहीं जाती या पंचायतीवर एक सरपंच निवडतात. जातीमधील उपजातींमध्येंहि स्वतंत्र पंचायती असतात. एखाद्या प्रश्नासंबंधीं ज्यावेळीं वाद उत्पन्न होतो तेवढ्या वेळेपुरतेच हे पंच एकत्र जमून आपला निर्णय देतात. एका जातीच्या अगर उपजातीच्या निरनिराळ्या पंचायतीहि असलेल्या आढळतात.

ज्या गुन्हेगाराला एखाद्या प्रश्नाचा निकाल लावून घ्यावयाचा असेल तो या पंचांना समक्ष भेटून अगर पत्रद्वारें एके ठिकाणीं जमवितो. पंच जमल्यानंतर ज्यानें ती सभा बोलावली असते तो आपलें गाऱ्हाणें पुढें मांडतो. गाऱ्हाणें मांडण्यापूर्वी त्यानें आपला गुन्हा कबूल केला तर पंच त्याला

शिक्षा द्यावयाची ती देतात. पण गुन्हा कबूल केला नाहीं तर त्याच्या विरुद्ध बाजूच्या साक्षीदारांच्या जबान्या होतात. व नंतर त्याच्या बाजूच्या साक्षीदारांच्या जबान्या होतात. त्यानंतर वादविवाद होऊन मग पंच निर्णय देतात. नर्मदेच्या कांठच्या प्रदेशांत एखादा माणूस अपराधी अगर निरपराधी ठरविण्याच्या बाबतींत 'रामरामायणकी चिठी' हा उपाय अंमलांत आणला जातो. तो प्रकार असाः—एका चिठ्ठीवर राम व दुसऱ्या चिठ्ठीवर रावण अशीं अक्षरें लिहून त्या चिठ्या देवाच्या मूर्तीवर ठेवतात व गुन्हेगाराला चिठ्ठी उचलण्यास सांगतात. गुन्हेगारानें उचलेली चिठ्ठी रामाची असली तर तो निर्दोषी ठरला जातो व रावणाची असेल तर तर त्याला शिक्षा सांगण्यांत येते. कांहीं कांहीं खालच्या जातींत एखाद्या बाईवर व्यभिचाराचा आरोप आला असल्यास तिचा हात उकळत असलेल्या तेलांत घालण्यांत येतो. हात भाजल्यास ती अपराधी व न भाजल्यास तिला निरपराधी ठरविण्यांत येतें. याशिवाय अनेक प्रकारच्या शिक्षा गुन्हेगाराला देण्यांत येतात. कांहीं ठिकाणीं गुन्हेगाराकडून, दंड अगर ज्ञातिभोजन घेण्यांत येतें तर कांहीं कांहीं ठिकाणीं एक मिशी काढणें, बायकांच्या बाबतींत केंस भादरणें इत्यादि शिक्षा देण्यांत येतात. ही शिक्षा गुन्हेगारानें न पाळल्यास त्याला ज्ञातींतून बाहेर टाकल्यांत येतें.

पूर्वी जातपंचायतीचा जातीवरील ताबा अबाधित स्वरूपांचा असे. पण हल्लीं तो ढिला होत चालला आहे. ब्रिटिश अमदानींत रेल्वे, मोटारी इत्यादि साधनांची सोय झाल्यानें एखाद्याला जातीनें बाळींत टाकलें तर तो चटकन दुसरीकडे जाऊन रहातो. तो आपल्या जातीची पर्वाच करीत नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्याचें नसतें स्तोम माजल्याचा हा परिणाम होय. पण अशा रीतीनें जातपंचायतीचा ताबा शिथिल झाला असला तरी या जातपंचायतीच्या जागीं जातसभा अस्तित्वांत येऊं लागल्या आहेत. या जातसभांचा उद्देश आपल्या जातीची उन्नति करणें हा असून जातीनिर्बंध ठरविण्याच्या बाबतींत या सभा पुष्कळ ठराव करतात, व ते ठराव पाळण्याचें सभासदांकडून वचन घेण्यांत येत असतें. उदाहरणार्थ, बहारमध्यें गोलाळ जातीच्या सभेनें बालविवाहनिषेधाचा ठराव पास केला आहे व बायकांनीं दूध अगर भाजी न विकण्याचा ठराव पसार केला आहे. दोसढ जातीमधील चोरी करणाऱ्या इसमाला जातीबाहेर टाकण्याचा ठराव पसार झालेला आहे. जातपंचायतींनां मुख्यतः खालील स्वरूपाच्या प्रश्नांवर निर्णय द्यावा लागतोः—

( १ ) खालच्या जातीच्या माणसाबरोबर भोजन अगर धूम्रपान करणें; ( २ ) गाय, घार इत्यादि पवित्र वस्तूंची हिंसा; ( ३ ) स्वजनवध अगर हिंसा; ( ४ ) एखाद्याचा कान अगर नाक कापणें; (५ ) खालच्या जातीकडून जोडा खाणें; ( ६ ) वडील माणसांनां शिवीगाळी देणें; ( ७ ) निषिद्ध धंदे करणें; ( ८ ) जातिनिर्बंध न पाळणें; ( ९ ) पुनर्विवाह करणें वगैरे.

एतद्देशीय अंमलाखालीं जातिविषयक प्रश्नांचा निकाल लावण्याच्या कामीं राजा हा सर्वांत श्रेष्ठ गणला जात असे. राजाच्या हातांत एखाद्या जातीला श्रेष्ठ ठरविण्याची अगर कनिष्ठ ठरविण्याची मुभा असे. बंगालचा राजा बल्लाळसेन यानें कांहीं जातींनां मान्यता दिली होती व कांहीं जातींनां कनिष्ठ ठरविलें होतें. मुसुलमानी अंमलाखालीं संस्थानिक जमीनदार यांच्या हातांत वरील प्रकारची सत्ता केंन्द्रीभूत झाली होती. हल्लीं देखील एतद्देशीय संस्थानिक व जमीनदार यांच्या हातांत जातिविषयक प्रश्नांचा निर्णय करण्याची सत्ता थोड्याफार अंशानें आहे. याचें उत्तम उदाहरण नेपाळमध्यें दिसून येतें. नेपाळमध्यें एखाद्या मनुष्यानें कांहीं जातिविषयक गुन्हा केला तर संस्थानविरुद्ध तो गुन्हा समजण्यांत येऊन संस्थानच्या न्यायकोर्टाकडून त्या गुन्ह्याची चौकशी केली जाते. राजपुतान्यांतील मारवाड, खुशालगड आणि बुंदी या संस्थानांमध्यें दरबारकडून प्रत्येक जातीच्या पंचायतीचा अध्यक्ष नेमला जातो. मणिपूर संस्थानांत जातिविषयक प्रश्नांचा निर्णय देण्याच्या बाबतींत राजा सर्वांत श्रेष्ठ समजला जातो. दक्षिण मलबारमधील नंबुद्री ब्राह्मणांमध्यें जातिविषयक तंटा तोडण्याचें काम कोचीनच्या राजाकडे देण्यांत आलें आहे. ओरिसा प्रांतांतील संस्थानांमध्येंहि अशाच प्रकारची पद्धत अमलांत असल्याचें आढळून येत.

एकेका जातिसंबंधाची ही व्यवस्था वर्णन केली. पण पूर्वी अनेक जातीसंघाची एक परिषद असे व तिच्याकडे निरनिराळ्या जातींमधील तंटे तोडण्याचें काम असे असें प्राचीन इतिहासावरून दिसून येतें. बुद्धधर्माच्या अमदानींत अशा प्रकारच्या धर्मसभा असल्याचें आढळतें. अद्यापि गुजराथमध्यें व्यापारी जातींपैकी कांहीं कांहीं जातींमध्यें अशा प्रकारच्या सभा आढळतात. मनुस्मृतींत अशा प्रकारच्या परिषदेचें वर्णन आलेलें आहे. ज्या प्रश्नावर धर्मशास्त्राचा स्पष्टपणें निर्णय झालेला नसतो असे प्रश्न या परिषदेनें सोडवावयाचे असतात असें मनूचें मत दिसतें. या परिषदेमध्यें तीनपासून दहापर्यंत लोक असतात व त्यांत चारी वर्णांच्या माणसांचा समावेश होत असे असें मनूनें दिलेल्या वर्णनावरून दिसतें. तें कांहींहि असो हल्लीं कांहीं ठिकाणें सोडून हिंदुस्थानांत जातपंचायतसंस्था नामशेष झाली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

दख्खनमध्यें मुसुलमानी व मराठी साम्राज्यांत जातिविषयक तंटेभांडणें तोडण्याचें काम त्या जातीच्या जातगंगे-( जातिसंस्था )कडे असे. ही जातीची पंचायत आपल्या जातीच्या नियमांचें उल्लंघन करणारास जातिबहिष्कृति अथवा देहदंडन किंवा नुसता पैशाचा दंड वगैरे शिक्षा देत असे. निरनिराळ्या दोन जातींचें भांडण असल्यास पैठण किंवा

कऱ्हाड अशासारख्या एखाद्या प्रसिद्ध क्षेत्राच्या ठिकाणीं असलेल्या धर्ममहासभेकडे तें सोपविण्यांत येई. या धर्ममहसभेंत बहुधां वेदशास्त्रपारंगत व श्रुतिस्मृतिज्ञ असे ब्राह्मण पंडीतच मुख्यत्वेंकरून असत व ते याज्ञवल्क्यादि स्मृती धर्मसिंधु, मयूख वगैरे ग्रंथांधारें व पूर्वापार चालत आलेल्या वहिवाटीप्रमाणें त्या तंट्यांचा निकाल लावीत असत आणि मग त्या निकालावरहुकुम अंमल बजावणी सरकारी अधिकाऱ्यांच्या देखरेखीखालीं होई.

जातींचा दुसऱ्या जातीशीं विवाहसंबंध असतो असें जरी विधान करण्यांत आलें आहे. तरी ज्या राष्ट्रजातिस्वरूपी जाती आहेत त्यांनां तें लक्षण लागू पडत नाहीं व त्या जातींमध्यें बाहेरच्यांचा प्रवेशहि होतो हें कैकाडी, भिल्ल, वंजारी इत्यादि अनेक जातींसंबंधानें अवलोकन करून सरकारी मानवशास्त्रवेत्त्यांनीं म्हटलें आहे. तीच गोष्ट इतर जातींसंबंधानेंहि थोडक्या अंशानें खरी आहे असें म्हणतां येईल. व याचीं अनेक उदाहरणें पहिल्या विभागांत समाजरूपांतराचे नियम आणि हिंदु समाजाचें भवितव्य या प्रकरणांत दिलीं आहेत आणि त्याच प्रकरणामध्यें जुन्या जाती मोडल्या जाऊन नवीन नवीन जाती कशा बनतात यासंबंधानें तत्त्वेंहि दिलीं आहेत ( पृष्ठ ३४५ पहा ). जातियुक्त समाजांत दिसून येणारा उच्चनीचभाव व त्याचें समर्थन करणारी परंपरा हीं मागें वर्णिलींच आहेत. जातिमत्सर, जात चोरणें म्हणजे आपण भिन्न जातीचे आहोंत असें सांगणें यांसारख्या क्रिया अनेक भिन्न मनुष्यसमुच्चय असलेल्या प्रत्येक देशांत आढळून येतात. त्यांत भारतीय नाविन्य असें कांहीं नाहीं. उदाहरणार्थ चिनी व गोऱ्या अशा भिन्न रक्तांची प्रजा आपणास अमेरिकेंत मेक्सिकन म्हणवून घेत. पुष्कळ ठिकाणीं यहुदी लोक आपण यहुदी आहों हें लपवूं पहातात. तर तसल्या क्रिया भिन्न देशांत होण्यास जीं कारणें असतात तींच कारणें हिंदुस्थानांत जात लपविण्यास लोकांस प्रवृत्त करतात.

हिंदुसमाजाच्या इतिहासामध्यें ज्या मोठ्या परिणामकारी गोष्टी झाल्या आणि ज्या जातींच्या इतिहासांतहि महत्त्वाच्या आहेत अशा गोष्टी म्हटल्या म्हणजे ब्राह्मणजातींची स्थापना, तिचे विभाग होणें, तिनें इतर सर्व समाजास संस्कारबद्ध करण्याचा प्रयत्न करणें आणि सर्व जातींची उत्पत्ति देण्याचा प्रयत्न करणें व या तऱ्हेच्या खटपटींनीं सर्व राष्ट्रांत एकवंशसंभवत्वाची कल्पना उत्पन्न करणें या होत. ब्राह्मणजातीचें महत्व कमी करण्याचे जे प्रयत्न झाले तेहि सामाजिक इतिहासांत विचारार्ह होत. यांमध्यें बौद्ध, जैन, लिंगाईत, महानुभाव इत्यादि संप्रदायांची गणना करण्यांत येईल. या संप्रदायांस ब्राह्मणजातीचें महत्त्व मोडण्याच्या खटपटींत अपयश कसें काय आलें हें त्या त्या संप्रदायांच्या विवेचनांत स्पष्ट केलें आहे. अनेक जाती एकत्र करणारीं राष्ट्रें जीं मधूनमधून जन्मास आलीं त्यांचा इतिहास अजून शोधला जावयाचा आहे. त्यामध्यें अत्यंत महत्त्वाचीं राष्ट्रें म्हटलीं म्हणजे रजपूत व मराठे हीं होत. संप्रदायांचें या बाबतींत कार्य फारसें यशस्वी झालें नाहीं. तथापि जेव्हां संप्रदायास राजकीय स्वरूप येऊं लागतें तेव्हां तें कार्य जोरानें होऊं लागतें असाहि नियम, जर शीखांस राजकीय प्रामुख्य कांहीं दिवस जास्त मिळतें तर घालतां आला असता. सध्यांची जी राष्ट्रीय भावना सर्व देशभर जागृत झाली आहे तिचें पर्यवसान एक मोठी जात निर्माण करण्याकडे होईल किंवा नाहीं. हा प्रश्न भवितव्याच्या अंधःकारांत लपला आहे.

**जादम**—नर्मदेच्या खोऱ्यांत राहणाऱ्या यदुवंशीय क्षत्रियांची ही एक जात बनली आहे. ५६ कोट यादवां पैकीं सर्वांचा नाश झाल्यानंतर एकच बाई शिल्लक राहिली व तिचाच मुलगा पुढें मथुरेचा राजा झाला असें म्हणतात यादवांचीं मुख्य घराणीं करौली संस्थान व जैसलमीर संस्थानची राजघराणी होत. यांच्यांत कछोटिया व अधोटिया असे दोन वर्ग आहेत. कछोटिया हे स्वैर संबंधाची संतति आहेत; अधोटिया हे त्यांच्याशीं लग्नव्यवहार करीत नाहींत. यांचीं कुलनांवें बहुतेक स्थानिक आहेत. पण 'सेमरिया' नांवाचें कुल शिवरीच्या झाडास फार मान देतें. स्वजातीयांबरोबर व्यभिचार करून एखादी कुमारी गर्भवती झाली तर तिचा विवाह त्याच माणसाबरोबर ' गुंड ' विधीनें करतात. वधूनें वराच्या हातांत अंगठी घालून त्याच्या गळ्यांत माळ घातली कीं लग्न लागतें. हे विधवाविवाहास 'कुकरगौना' असें म्हणतात. काडी मोडण्याची पद्धतीहि या लोकांत जारीनें चालू आहे. जारानें जारिणीच्या नवऱ्यास लग्नाचा खर्च मात्र भरून द्यावा लागतो. कांहीं कांहीं बायकांनीं दहा दहा वारावारा नवरे केल्याचीं देखील उदाहरणें आहेत. यांच्या बायका ' सवंग ' नांवाचा पोषाक करतात. त्या एक लहान परकर नेसतात व एक लांब उत्तरीय कमरेवरून गुंडाळून खांद्यावर घेतात. व कपाळावर फार मोठी टिकली लावतात. या बायकांनां यांच्या समाजानें बरीच मोकळीक दिली आहे. जादम लोक मालगुजार, कास्तकार, शेतांत काम करणें वगैरे धंदे करतात व आपल्या धंद्यांत चांगलें प्रवीण असतात. रानडुकर व मांसे खाण्यास यांस प्रतिबंध नाहीं. हे जिझोटिया व सनाढ्य ब्राह्मणांच्या हातची ' कच्ची ' रसोई खातात. ब्राह्मण लोक यांच्या हातचें पाणी धातुपात्रांतून पितात; मृत्तिका पात्रांतून पीत नाहींत. हंटर म्हणतो कीं हे पूर्वी फार शूर शिपाई असत पण यांच्या भित्रेपणाबद्दल ' पत्ता खटका जादम सटका ' अशी म्हण पडली आहे. [रसेल व हिरालाल-कास्ट्स अँड ट्राइब्स इन सी. पी.]

**जादू**, प्रा स्ता वि क.—जादु या शब्दाची व्युत्पत्ति यातु या शब्दापासून लावतात. झोरोआस्तरचे अनुयायी जे मग त्यांच्यापासून मॅजिक हा जादुवाचक इंग्रजी शब्द निघाला आहे. इ. बी. टेलर हा जादूविषयीं असें लिहितो कीं, जादूला

अतींद्रियशास्त्र ( ऑकल्ट सायन्स ) अगर मिथ्याशास्त्र ( सूडो-सायन्स ) असें नांव देतात. रानटी लोकांची चिन्हात्मक जादू व नवीन युगांतील ब्रह्मवाद या दोघांची उत्पत्ति मिथ्याज्ञानांत असून, त्यांचा परिणाम अंधश्रद्धेप्रमाणें अपायकारक होतो. कांहीं पंडित म्हणतात कीं जादू व धर्म एकच. जादूचे संस्कार जरी धर्मसंस्कारासारखे नसले तरी त्यांची संगति एकसारखीच असते. सर्व संस्कारांच्या मार्गे एकच पौराणिक कल्पना आहे आणि ती कल्पना आत्म्याची होय. आत्म्यापासून क्रमशः ज्या पद्धती निघाल्या त्या देवपूजा, जादू, निर्जीववस्तुपूजा आणि देवकपूजा या होत.

प्राथमिक पूजा म्हणजेच जादू; जादूची कल्पना धर्म अस्तित्वांत येणाच्या पूर्वीची आहे. कार्यकारणभाववर जादूचें अस्तित्व बरेंच अवलंबून आहे. ख्रिस्ती देशांतून प्रार्थनामंदिरांत पाळावयाचे संस्कार ज्या विशिष्ट हेतूंनीं उत्पन्न झाले तसल्याच हेतूंनीं मध्यऑस्ट्रेलियांतील देवळें निर्माण झालीं. कोणी देवळांच्या कल्पनेस प्राथमिक धर्म म्हणतात, तर कोणी या देवळांनां जादूंत ढकलतात.

'ठरलेल्या कारणांचा नेहमीं ठरलेला परिणामच घडेल' असें शास्त्रज्ञ जादूगारदेखील गृहीत धरीत नाहींत. जादूगार बहुशः एखाद्या विशिष्ट शक्तीची मदत घेऊन, आपला कार्यभाग उरकतो. यालाच टेलरनें गूढशास्त्र म्हटलें आहे.

[ या विषयाचें तात्त्विक विवेचन बऱ्याच ग्रंथद्वारें करितां येईल. पैकीं पुढील ग्रंथ प्रमुख होतः–टेलर-रिसर्चेस इन् टु दि अर्ली हिस्टरी ऑफ मनूकाईंड; जेव्हॉन्स—इन्ट्रोडक्शन टु दि हिस्टरी ऑफ रिलिजन; लँग-मॅजिक अँड रिलिजन. ]

हिं दु स्था नां ती ल जा दु वि द्या.–प्राचीन हिंदुस्थानांतील पवित्र धार्मिक विधींमध्यें जादुविद्येचा बराचसा अंश आढळून येतो विन्टरनिझच्या मतें जादुविद्या मूल धार्मिक विचाराच्या अनेक रूपांपैकीं एक आहे व धर्माच्या हलक्या प्रतीच्या रूपांपासून ती भिन्न नाहीं.

सर्व प्रकारचे मानसिक व शारीरिक रोग पिशाच्यांच्या कृत्यांनीं उत्पन्न होतात असा इतर देशांतल्याप्रमाणें हिंदुस्थानांतहि समज आहे. म्हणून रोग बरे करण्याकरितां मंत्रांचा व भारलेल्या वस्तूंचा उपयोग करण्यांत येतो. मंत्राशिवाय, वनस्पती व हस्तस्पर्श ह्यांचाहि रोगांपासून मुक्त होण्याकरितां उपयोग केला जातो. हिंदुस्थानांतील मंत्रांचा सर्वांत प्राचीन संग्रह अथर्ववेदांत आढळून येतो ( वेदविद्या–अथर्ववेद प्रकरण पहा ). ह्या मंत्रांबरोबर जे विधी करावयाचे असतात ते देखील कांहीं प्राचीन ग्रंथांत आढळून येतात. रोगांनां सजीव प्राणी समजून त्यांचें व त्यांच्या चिन्हांचें केलेलें वर्णन सुश्रुत वगैरे वैद्यकग्रंथांत आढळून येतें. वनस्पती व सजीव प्राण्यांमध्यें रोग उतरवून तो बरा करणें व पाण्याच्या प्रवाहाबरोबर तो काढून टाकणें ही पद्धतीहि आढळते. समानधर्मी वस्तूंचा रोगांवर व्यापार घडवून त्या योगानें रोग बरे करणें हें सहानुभूतिक चिकित्सेचें तत्त्व आर्यांनां माहीत होतें.

रोग आणि जादुविद्या यांच्यांशीं संबंध असलेले देव वरुण व रुद्र हे आहेत. तथापि सामान्येंकरून राक्षसांचा व पिशाच्चांचा त्या गोष्टींशीं संबंध आहे असें मानितात. अग्नि हा सर्व पिशाचांचा नाशकर्ता आहे अशी समज आहे. म्हणून अग्नीला आहुति अर्पण करणें, सुगंधी वस्तू जाळणें व त्यांचा धूर घेणें या गोष्टी पिशाचें व त्यांनीं उत्पन्न केलेले रोग नाहींसे करण्यास समर्थ आहेत असा प्राचीन लोकांचा समज होता. राक्षसपिशाच्चांखेरीज अप्सरा व गंधर्व मर्त्यप्राण्यांनां भुलवून व फशीं पाडून त्यांचा नाश करितात. सुगंधी वनस्पतींच्या साहाय्यानें ह्या अप्सरांनां व गंधर्वांनां पळवून लावितां येतें.

ज्याअर्थी पिशाचें मनुष्यजातीचे नैसर्गिक शत्रू आहेत त्याअर्थी लहान मूल किंवा गर्भ यांनां त्यांच्याकडून दुखापत होण्याची फार भीति असते. म्हणून माता व बालक यांचें दुष्ट पिशाचापासून रक्षण करणारे पुष्कळ मंत्र व विधी आढळतात. चौक व उंबरठा हें भुतांचें आवडतें स्थान होय. सुवर्णाचा जन्म अग्नीपासून झालेला आहे, ह्या समजामुळें सुवर्णालादेखील मंगलकारक धर्म प्राप्त झाले आहेत.

नांव समजल्याशिवाय भुतांनां कांहींहि अपकार करितां येत नाहीं, ह्या हिंदु लोकांच्या समजामुळें पहिल्या मुलाचें नांव गुप्त ठेवण्याची चाल आहे. शस्त्रांनीं देखील पिशाचांनां हांकून लावितां येतें. शृंगारिक प्रेमाविषयीं मंत्र आणि विधी ज्यांत आहेत असा स्त्रीवशीकरणाचा भाग भारतीयांच्या जादुविद्येंत आढळून येतो.

दुसऱ्या मनुष्याला ताब्यांत आणण्याकरितां मंत्र व विधी सांगितले आहेत. त्याचप्रमाणें शत्रूचें उन्मूलन करण्याकरितां राजानें करावयाचे विधी देखील आढळून येतात. मेणाच्या आकृतीवर जादू करून त्या मनुष्याला इजा करतां येते. त्याप्रमाणें एखाद्या मनुष्याचीं नखें, केंस, अथवा पायाखालची माती यांवर चेटूक करून त्या मनुष्याला त्याचे दुष्परिणाम भोगावयाला लावितां येतात अशीहि समजूत दृष्टीस पडते.

ज्यांनां योगी अशी संज्ञा आहे. तो वर्ग धंदेवाईक जादुगारांचा म्हणतां येईल. आपणाला किमया अवगत आहे असा बहाणा करून हे भोळ्या लोकांपासून बराच पैसा उपटतात. तसेंच मांत्रिक लोक होत.

विवाह, गर्भारपण, बाळंतपण या कालीं जादूसारखे विधी कांहीं जातींतून करण्यांत येतात. दुष्काळांत बायकांनीं नागव्यानें जमीन नांगरली असतां चांगलें पीक येतें अशी जी कोठें कोठें समजूत असते तिचाच अवशेष दक्षिण हिंदुस्थानांतील बलिजा, पल्ली, कम्मा वगैरे जातींतील विवाहप्रसंगीं दृष्टीस पडतो. आपल्यांतील बऱ्याचशा धार्मिक चाली जादुविद्येच्या सदरांत पडण्यासारख्या आहेत.

उदाहरणार्थ, लग्नांतील घाणा भरण्याचा विधि, पुंसवनविधि, वास्तुशांति, इत्यादि. गळ्यांत ताईत, हातांत गंडे, रुद्राक्ष वगैरे घालण्याचीं कारणें उघड आहेत. या वस्तू जादूनें भारलेल्या असल्यानें वापरणाऱ्याला बाधा होत नाहीं अशी समजूत असते. कांहीं जादूचीं गणितीं कोष्टीं असतात; त्यांतील उभी, आडवी, तिरपी बेरीज कांहीं ठराविक असते. हीं कोष्टीं गुणकारक असतात असें मानण्यांत येतें. कांहीं स्तोत्रांतहि विशेष शक्ति असते अशी समजून आहे. लढाईच्या वेळीं शिवकवच, हनुमानकवच इत्यादि लहान स्तोत्रें कागदावर लिहून ते कागद ताईतांत घालून दंडांत बांधण्याची वहिवाट पेशवाईंतहि असल्याचें आढळतें. सर्प वगैरेवरील मंत्र, मूठ मारणें इत्यादि प्रकार जे आज आपणांस ऐकूं येतात ते जादूचेच अवशेष आहेत. सटीची पूजा, देवक बसविणें, मातृकापूजा, चौसष्ट योगीनी अथवा बावनवीर यांची पूजा हे सर्व पिशाच्चपूजेचे अथवा जादूचेच अवशेष आज आपणांत उरले आहेत. ज्याच्या अंगीं हें मंत्रसामर्थ्य आहे त्यास फार कडक निर्बंध पाळावे लागतात अशी समजूत आहे. उदाहरणार्थ, सर्पाचा मंत्र जाणणारानें पडवळीची भाजी खातां कामा नये; रजस्वला स्त्रीचा शब्द विशेषतः जेवतांना-ऐकूं नये;इ.लहान मुलाच्या अगर बाळंतपणांत मृत झालेल्या स्त्रीच्या कबरीच्या ठिकाणीं अद्भुत सामर्थ्य असतें अशा तऱ्हेच्या अनेक भ्रामक समजुती आज आपणांत प्रचलित दिसतात. जादूचा मंत्र बहुधा म्हणांत पाठ करतात. जादूचा प्रयोग करण्यास काळोखी रात्र, विशेषतः अमावास्या फार योग्य समजतात. जादूचा प्रयोग मंतरलेलें पाणी किंवा उडदासारखें धान्य फेंकून, किंवा मंतरलेला विडा अगर एखादी वस्तु खावयास देऊन, किंवा कांहीं विशिष्ट आकृति ओलांडल्यामुळें लागू होतो अशी समजूत आहे. कानफाटे, अघोरी व इतर वैरागी तसेंच वांझ अथवा मुलें न जगणाऱ्या स्त्रिया चेटुक करतात अशी सार्वत्रिक समजून दिसते. [ वेदग्रंथ; ज्ञानकोश विभाग ३; हिलेब्रांट—रिचुअल लिटरेचर; मॅक्डोनेल्ड-वेदिक मायथॉलॉजी; ए. रि. ए. मधील 'मॅजिक' वरचा लेख; थर्स्टन-कास्ट्स अँड ट्राईब्स ऑफ सदर्न इंडिया; सेक्रेड बुक्स ऑफ दि ईस्ट, पु. ४२; इं. अँ., पु. २८; एथॉग्राफिकल सर्व्हे ऑफ बाँबे; सेन्सस रिपोर्ट ]

अ सु री-बा बि लो नी जा दू.—जादूवरील बाबिलोनी ग्रंथांचा मुख्य उद्देश म्हटला म्हणजे धर्माधिकाऱ्यांना भुता खेतांवर ताबा राखितां यावा व त्यांच्या दुष्ट शक्तीस बळी पडलेल्या प्राण्याला वांचवितां यावें. ज्या आजाऱ्याला भूतानें पछाडलें असेल त्या भुताचा नामनिर्देश करावा लागतो. असल्या प्रसंगीं जादुगार पुष्कळ भुतांचीं राक्षसांचीं नांवें घेऊन त्यांना आव्हान करतो. अशा प्रसंगीं आव्हान करावयाच्या बाबिलोनी भुताखेतांची यादी उपलब्ध झालेली आहे.

जादूविषयक बाबिलोनी ग्रंथांतून सांगितलेले संस्कार प्रार्थनेंतून वर्णन केलेल्या विषयांशीं संलग्न असतात. कांहीं ग्रंथांतून जादूची कृति व पाठ सांगितले आहेत. जादूगार जादूच्या क्रियेसाठीं केव्हां केव्हां प्रतिमांचा उपयोग करीत. या प्रतिमा जाळून रोगनाश होतो अशी भावना असते.

जादूच्या प्रसंगीं वापरल्या जाणाऱ्या वस्तू पुष्कळ असत. कांहीं प्रसंगीं जादुगार पाण्यानें भरलेलें मडकें वापरीत असत. तसेंच कांहीं प्रसंगीं मातीची प्रतिमा पछाडलेल्या माणसाच्या शरीरावर चिटकवून नंतर ती काढून घ्यावयाची असे. म्हणजे रोगाचा रोग प्रत्यक्ष वस्तूच्या रूपानें बाहेर काढला जातो अशी त्यांची समजूत झालेली असे. बाबिलोनी जादूचे अवशेष फारसे उरलेले दिसत नाहींत. [ थॉम्पसन—सेमिटिक मॅजिक; किंग—बाबिलोनियन मॅजिक अँड सॉर्सरी; मॉटगॉमेरी—अरेमाइक इन्कँटेशन टेक्स्ट फ्रॉम निप्पुर.]

ई जि प्शि य न जा दू.—जेव्हां निर्जीव वस्तू अवज्ञा करतात, आणि सजीव प्राणी विनंतीचा अनादर करतात अशा प्रसंगीं इजिप्शियन लोक आपले हेतू साध्य करून घेण्यासाठीं जादूचे प्रयोग करीत. यासच ते हीके म्हणत.धर्म म्हणून कांहीं निराळी भावना ईजिप्शियनांत नसून जें कांहीं आहे तें हीके आहे अशी त्यांची कल्पना असे. बहुशः देव आणि मृत पितर उग्र स्वरूपाचे असतात अशी त्यांची समजूत असे. तेव्हां त्यांच्याशीं करावयाचे व्यवहार थोड्याफार प्रमाणांत हीकेच्या स्वरूपाचे असत.

ईजिप्शियन लोकांची हीकेची कल्पना हीच मुख्य कसोटी मानून चालल्यास धर्मविषयक कल्पनेला जागाच उरत नाहीं, कारण जें कांहीं धर्मविषयक म्हणून मानावयाचें त्यांचा अंतर्भाव बहुतेक हीकेंत न होतो.

ईजिप्ती जादूचें कार्यक्षेत्र माणसांच्या इच्छाक्षेत्राइतकें मोठें होतें व ज्या इच्छा सहजासहजीं साध्य करून घेतां येत नाहींत, त्या जादूच्या साहाय्यानें हस्तगत करतां येतात, अशी इजिप्शियन लोकांची समजूत असे. संरक्षक, रोगनिवारक, इच्छापूरक वगैरे प्रकार या जादूंत असत.

ईजिप्शियन लोकांत चांगली जादू व दुष्ट जादू असले भेद आढळत नाहींत; तरी पण जादूचा दुष्ट उपयोग करणाऱ्यास कायद्याच्या कार्चात पकडलें जाई. याचे पुन्हां दोन प्रकार आहेत. प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष. प्रत्यक्ष जादूक्रियेसाठीं उपयोगांत आणिल्या जाणाऱ्या वस्तूंत रोपें, दगड, धातू, रंग इत्यादि येतात; तसेंच मेण, चिकणमाती यांचाहि उपयोग केला जात असे. अप्रत्यक्ष जादू म्हणजे जादूगाराला कांहीं विशिष्ट नियमांचें बंधन पाळावें लागे; पुष्कळ जादूचे मंत्र फार उपयुक्त वाटल्यानें, ईजिप्शियन लोकांनीं या जादूमंत्रांचा वैद्यकाकडे उपयोग करण्याचा परिपाठ पाडला.

थॉथ हा ईजिप्तमधील फार प्रसिद्ध जादूगार मानला गेला आहे. थॉथच्या जादूगारींतील कसबावरोबरच चित्रलिपिशास्त्र, खगोलशास्त्र व गणितशास्त्रांचा बोधक असें

अतींद्रियशास्त्र ( ऑकल्ट सायन्स ) अगर मिथ्याशास्त्र (सूडो-सायन्स ) असें नांव देतात. रानटी लोकांची चिन्हात्मक जादू व नवीन युगांतील ब्रह्मवाद या दोघांची उत्पत्ति मिथ्याज्ञानांत असून, त्यांचा परिणाम अंधश्रद्धेप्रमाणें अपायकारक होतो. कांहीं पंडित म्हणतात कीं जादू व धर्म एकच. जादूचे संस्कार जरी धर्मसंस्कारासारखे नसले तरी त्यांची संगति एकसारखीच असते. सर्व संस्कारांच्या मार्गे एकच पौराणिक कल्पना आहे आणि ती कल्पना आत्म्याची होय. आत्म्यापासून क्रमशः ज्या पद्धती निघाल्या त्या देवपूजा, जादू, निर्जीववस्तुपूजा आणि देवकपूजा या होत.

प्राथमिक पूजा म्हणजेच जादू; जादूची कल्पना धर्म अस्तित्वांत येणाच्या पूर्वींची आहे. कार्यकारणभावावर जादूचें अस्तित्व बरेंच अवलंबून आहे. ख्रिस्ती देशांतून प्रार्थनामंदिरांत पाळावयाचे संस्कार ज्या विशिष्ट हेतूंनीं उत्पन्न झाले तसल्याच हेतूंनीं मध्यऑस्ट्रेलियांतील देवळें निर्माण झालीं. कोणी देवळांच्या कल्पनेस प्राथमिक धर्म म्हणतात, तर कोणी या देवळांनां जादूंत ढकलतात.

'ठरलेल्या कारणांचा नेहमीं ठरलेला परिणामच घडेल' असें शास्त्रज्ञ जादूगारदेखील गृहीत धरीत नाहीं. जादूगार बहुशः एखाद्या विशिष्ट शक्तीची मदत घेऊन, आपला कार्यभाग उरकतो. यालाच टेलरनें गूढशास्त्र म्हटलें आहे.

[ या विषयाचें तात्त्विक विवेचन बऱ्याच ग्रंथद्वारें करितां येईल. पैकीं पुढील ग्रंथ प्रमुख होतः-टेलर-रिसर्चेस इन् टु दि अर्ली हिस्टरी ऑफ मन्काईंड; जेव्हॉन्स—इन्ट्रोडक्शन टु दि हिस्टरी ऑफ रिलिजन; लँग-मॅजिक ॲंड रिलिजन. ]

हिं दु स्था नां ती ल जा दु वि द्या.-प्राचीन हिंदुस्थानांतील पवित्र धार्मिक विधींमध्यें जादुविद्येचा बराचसा अंश आढळून येतो विन्टरानिझच्या मतें जादुविद्या मूल धार्मिक विचाराच्या अनेक रूपांपैकीं एक आहे व धर्माच्या हलक्या प्रतीच्या रूपांपासून ती भिन्न नाहीं.

सर्व प्रकारचे मानसिक व शारीरिक रोग पिशाच्यांच्या कृत्यांनीं उत्पन्न होतात असा इतर देशांतल्याप्रमाणें हिंदुस्थानांतहि समज आहे. म्हणून रोग बरे करण्याकरितां मंत्रांचा व भारलेल्या वस्तूंचा उपयोग करण्यांत येतो. मंत्राशिवाय, वनस्पती व हस्तस्पर्श ह्यांचाहि रोगांपासून मुक्त होण्याकरितां उपयोग केला जातो. हिंदुस्थानांतील मंत्रांचा सर्वांत प्राचीन संग्रह अथर्ववेदांत आढळून येतो ( वेदविद्या-अथर्ववेद प्रकरण पहा ). ह्या मंत्रांबरोबर जे विधी करावयाचे असतात ते देखील कांहीं प्राचीन ग्रंथांत आढळून येतात. रोगांनां सजीव प्राणी समजून त्यांचें व त्यांच्या चिन्हांचें केलेलें वर्णन सुश्रुत वगैरे वैद्यकग्रंथांत आढळून येतें. वनस्पती व सजीव प्राण्यांमध्यें रोग उतरवून तो बरा करणें व पाण्याच्या प्रवाहाबरोबर तो काढून टाकणें ही पद्धतीहि आढळते. समानधर्मी वस्तूंचा रोगांवर व्यापार घडवून त्या योगानें रोग बरे करणें हें सहानुभूतिक चिकित्सेचें तत्त्व आर्यांनां माहीत होतें.

रोग आणि जादुविद्या यांच्याशीं संबंध असलेले देव वरुण व रुद्र हे आहेत. तथापि सामान्येंकरून राक्षसांचा व पिशाच्चांचा त्या गोष्टींशीं संबंध आहे असें मानितात. अग्नि हा सर्व पिशाचांचा नाशकर्ता आहे अशी समज आहे. म्हणून अग्नीला आहुति अर्पण करणें, सुगंधी वस्तू जाळणें व त्यांचा धूर घेणें या गोष्टी पिशाचें व त्यांनीं उत्पन्न केलेले रोग नाहींसे करण्यास समर्थ आहेत असा प्राचीन लोकांचा समज होता. राक्षसपिशाच्चांखेरीज अप्सरा व गंधर्व मर्त्यप्राण्यांनां भुलवून व फशी पाडून त्यांचा नाश करितात. सुगंधी वनस्पतींच्या साहाय्यानें ह्या अप्सरांनां व गंधर्वांनां पळवून लावितां येतें.

ज्याअर्थी पिशाचें मनुष्यजातीचे नैसर्गिक शत्रू आहेत त्याअर्थी लहान मूल किंवा गर्भ यांनां त्यांच्याकडून दुखापत होण्याची फार भीति असते. म्हणून माता व बालक यांचें दुष्ट पिशाचापासून रक्षण करणारे पुष्कळ मंत्र व विधी आढळतात. चौक व उंबरठा हें भुतांचें आवडतें स्थान होय. सुवर्णाचा जन्म अग्नीपासून झालेला आहे, ह्या समजामुळें सुवर्णालादेखील मंगलकारक धर्म प्राप्त झाले आहेत.

नांव समजल्याशिवाय भुतांनां कांहींहि अपकार करितां येत नाहीं, ह्या हिंदु लोकांच्या समजामुळें पहिल्या मुलाचें नांव गुप्त ठेवण्याची चाल आहे. शस्त्रांनीं देखील पिशाचांनां हांकून लावितां येतें. शृंगारिक प्रेमाविषयीं मंत्र आणि विधी ज्यांत आहेत असा स्त्रीवशीकरणाचा भाग भारतीयांच्या जादुविद्येंत आढळून येतो.

दुसऱ्या मनुष्याला ताब्यांत आणण्याकरितां मंत्र व विधी सांगितले आहेत. त्याचप्रमाणें शत्रूचें उन्मूलन करण्याकरितां राजानें करावयाचे विधी देखील आढळून येतात. मेणाच्या आकृतीवर जादू करून त्या मनुष्याला इजा करतां येते. त्याप्रमाणें एखाद्या मनुष्याचीं नखें, केस, अथवा पायाखालची माती यांवर चेटुक करून त्या मनुष्याला त्याचे दुष्परिणाम भोगावयाला लावितां येतात अशीहि समजूत दृष्टीस पडते.

ज्यांनां योगी अशी संज्ञा आहे. तो वर्ग धंदेवाईक जादुगारांचा म्हणतां येईल. आपणाला किमया अवगत आहे असा बहाणा करून हे भोळ्या लोकांपासून बराच पैसा उपटतात. तसेंच मांत्रिक लोक होत.

विवाह, गर्भारपण, बाळंतपण या कालीं जादूसारखे विधी कांहीं जातींतून करण्यांत येतात. दुष्काळांत बायकांनीं नागव्यानें जमीन नांगरली असतां चांगलें पीक येतें अशी जी कोठें कोठें समजूत असते तिचाच अवशेष दक्षिण हिंदुस्थानांतील बलिजा, पल्ली, कम्मा वगैरे जातींतील विवाहप्रसंगीं दृष्टीस पडतो. आपल्यांतील बऱ्याचशा धार्मिक चाली जादुविद्येच्या सदरांत पडण्यासारख्या आहेत.

उदाहरणार्थ, लग्नांतील घाणा भरण्याचा विधि, पुंसवनविधि, वास्तुशांति, इत्यादि. गळ्यांत ताईत, हातांत गंडे, रुद्राक्ष वगैरे घालण्याचीं कारणें उघड आहेत. या वस्तू जादूनें भारलेल्या असल्यानें वापरणाऱ्याला बाधा होत नाहीं अशी समजूत असते. कांहीं जादूचीं गणितें कोष्टीं असतात; त्यांतील उभी, आडवी, तिरपी बेरीज कांहीं ठराविक असते. हीं कोष्टीं गुणकारक असतात असें मानण्यांत येतें. कांहीं स्तोत्रांतहि विशेष शक्ति असते अशी समजूत आहे. लढाईच्या वेळीं शिवकवच, हनुमानकवच इत्यादि लहान स्तोत्रें कागदावर लिहून ते कागद ताईतांत घालून दंडांत बांधण्याची वहिवाट पेशवाईंतहि असल्याचें आढळतें. सर्प वगैरेवरील मंत्र, मूठ मारणें इत्यादि प्रकार जे आज आपणांस ऐकूं येतात ते जादूचेच अवशेष आहेत. सटीची पूजा, देवक बसविणें, मातृकापूजा, चौसष्ट योगीनी अथवा बावनवीर यांची पूजा हे सर्व पिशाच्चपूजेचे अथवा जादूचेच अवशेष आज आपणांत उरले आहेत. ज्याच्या अंगीं हें मंत्रसामर्थ्य आहे त्यास फार कडक निर्बंध पाळावे लागतात अशी समजूत आहे. उदाहरणार्थ, सर्पाचा मंत्र जाणणारानें पडवळीची भाजी खातां कामा नये; रजस्वला स्त्रीचा शब्द विशेषतः जेवतांना ऐकूं नये;इ.लहान मुलाच्या अगर बाळंतपणांत मृत झालेल्या स्त्रीच्या कबरीच्या ठिकाणीं अद्भुत सामर्थ्य असतें अशा तऱ्हेच्या अनेक भ्रामक समजुती आज आपणांत प्रचलित दिसतात. जादूचा मंत्र बहुधां ग्रहणांत पाठ करतात. जादूचा प्रयोग करण्यास काळोखी रात्र, विशेषतः अमावास्या फार योग्य समजतात. जादूचा प्रयोग मंतरलेलें पाणी किंवा उडदासारखें धान्य फेंकून, किंवा मंतरलेला विडा अगर एखादी वस्तु खावयास देऊन, किंवा कांहीं विशिष्ट आकृति ओलांडल्यामुळें लागू होतो अशी समजूत आहे. कानफाटे, अघोरी व इतर वैरागी तसेंच वांझ अथवा मुलें न जगणाऱ्या स्त्रिया चेटूक करतात अशी सार्वत्रिक समजूत दिसते. [ वेदग्रंथ; ज्ञानकोश विभाग २; हिलेब्रांट—रिचुअल लिटरेचर; मॅक्डोनेल्ड-वेदिक मायथॉलॉजी; ए. रि. ए. मधील 'मॅजिक' वरचा लेख; थर्स्टन-कास्ट्स अँड ट्राईब्स ऑफ सदर्न इंडिया; सेक्रेड बुक्स ऑफ दि ईस्ट, पु. ४२; इं. अँ., पु. २८; एथ्नॉग्राफिकल सर्व्हे ऑफ बाँबे; सेन्सस रिपोर्ट ]

असुरी-बाबिलोनी जादू.—जादूवरील बाबिलोनी ग्रंथांचा मुख्य उद्देश म्हटला म्हणजे धर्माधिकाऱ्यांना भुता खेतांवर ताबा राखितां यावा व त्यांच्या दुष्ट शक्तीस बळी पडलेल्या प्राण्याला वांचवितां यावें. ज्या आजाऱ्याला भुतानें पछाडलें असेल त्या भुताचा नामनिर्देश करावा लागतो. असल्या प्रसंगीं जादुगार पुष्कळ भुतांचीं राक्षसांचीं नांवें घेऊन त्यांना आव्हान करतो. अशा प्रसंगीं आव्हान करावयाच्या बाबिलोनी भुताखेतांची यादी उपलब्ध झालेली आहे.

जादूविषयक बाबिलोनी ग्रंथांतून सांगितलेले संस्कार प्रार्थनेंतून वर्णन केलेल्या विषयांशीं संलग्न असतात. कांहीं ग्रंथांतून जादूची कृति व पाठ सांगितले आहेत. जादूगार जादूच्या क्रियेसाठीं केव्हां केव्हां प्रतिमांचा उपयोग करीत. या प्रतिमा जाळून रोगनाश होतो अशी भावना असते.

जादूच्या प्रसंगीं वापरल्या जाणाऱ्या वस्तू पुष्कळ असत. कांहीं प्रसंगीं जादुगार पाण्यानें भरलेलें मडकें वापरीत असत. तसेंच कांहीं प्रसंगीं मातीची प्रतिमा पछाडलेल्या माणसाच्या शरीरावर चिटकवून नंतर ती काढून घ्यावयाची असे. म्हणजे रोग्याचा रोग प्रत्यक्ष वस्तूच्या रूपानें बाहेर काढला जातो अशी त्यांची समजूत झालेली असे. बाबिलोनी जादूचे अवशेष फारसे उरलेले दिसत नाहींत. [ थॉम्पसन—सेमिटिक मॅजिक; किंग—बाबिलोनियन मॅजिक अँड सॉर्सरी; मॉंटगॉमेरी—अरेमाइक इन्कँटेशन टेक्स्ट फ्रॉम निप्पुर.]

ईजिप्शियन जादू.—जेव्हां निर्जीव वस्तू अवज्ञा करतात, आणि सजीव प्राणी विनंतीचा अनादर करतात अशा प्रसंगीं ईजिप्शियन लोक आपले हेतू साध्य करून घेण्यासाठीं जादूचे प्रयोग करीत. यासच ते हीके म्हणत.धर्म म्हणून कांहीं निराळी भावना ईजिप्शियनांत नसून जें कांहीं आहे तें हीके आहे अशी त्यांची कल्पना असे. बहुशः देव आणि मृत पितर उग्र स्वरूपाचे असतात अशी त्यांची समजूत असे. तेव्हां त्यांच्याशीं करावयाचे व्यवहार थोड्याफार प्रमाणांत हीकेच्या स्वरूपाचे असत.

ईजिप्शियन लोकांची हीकेची कल्पना हीच मुख्य कसोटी मानून चालल्यास धर्मविषयक कल्पनेला जागाच उरत नाहीं, कारण जें कांहीं धर्मविषयक म्हणून मानावयाचें त्यांचा अंतर्भाव बहुतेक हीकेंत न होतो.

ईजिप्ती जादूचें कार्यक्षेत्र माणसांच्या इच्छाक्षेत्राइतकें मोठें होतें व ज्या इच्छा सहजासहजीं साध्य करून घेतां येत नाहींत,त्या जादूच्या साहाय्यानें हस्तगत करतां येतात, अशी ईजिप्शियन लोकांची समजूत असे. संरक्षक, रोगनिवारक, इच्छापूरक वगैरे प्रकार या जादूंत असत.

ईजिप्शियन लोकांत चांगली जादू व दुष्ट जादू असले भेद आढळत नाहींत; तरी पण जादूचा दुष्ट उपयोग करणाऱ्यास कायद्याच्या कात्रींत पकडलें जाई. याचे पुन्हां दोन प्रकार आहेत. प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष. प्रत्यक्ष जादूक्रियेसाठीं उपयोगांत आणिल्या जाणाऱ्या वस्तूंत रोपें, दगड, धातू, रंग इत्यादि येतात; तसेंच मेण, चिकणमाती यांचाहि उपयोग केला जात असे. अप्रत्यक्ष जादू म्हणजे जादूगाराला कांहीं विशिष्ट नियमांचें बंधन पाळावें लागे; पुष्कळ जादूचे मंत्र फार उपयुक्त वाटल्यानें, ईजिप्शियन लोकांनीं या जादूमंत्रांचा वैद्यकाकडे उपयोग करण्याचा परिपाठ पाडला.

थॉथ हा ईजिप्तमधील फार प्रसिद्ध जादूगार मानला गेला आहे. थॉथच्या जादूगारींतील कसबाबरोबरच चित्रलिपिशास्त्र, खगोलशास्त्र व गणितशास्त्रांचा शोधक

त्याचें वर्णन आढळतें. इसिस ही प्रसिद्ध जादूगारीण असल्याचा उल्लेख आहे. तसेंच होरस हा इसिसचा मुलगा व एक प्रसिद्ध इजिप्शियन जादूगार मानला आहे. [ बज— ईजिप्शियन मॅजिक; साईस–दि रिलिजन्स ऑफ एन्शंट ईजिप्त अँड बाबिलोनिया. ]

ग्रीक व रोमन जादू.—ग्रीस व रोममध्यें इतर ठिकाणांप्रमाणें, जादूवर सामान्य माणसाचा देखील विश्वास असे. जादूच्या सिद्धांतास आणि क्रियाविषयक वाङ्मयास प्रारंभ होमरच्या वेळेपासून झाला.

ग्रीस व रोममधील देवतापूजन शिष्टसंमत ठरलें असल्यानें तो धर्म व जें पाखांडी देवतापूजन तीं जादू असा निर्णय दिला जात असे. म्हणजे ग्रीको–रोमन धर्माव्यतिरिक्त धर्म जादूच्या स्वरूपाचे ठरतात. सर्व कालांत जादूला समाजांत जें वाईट स्थान प्राप्त झालें,त्याचें कारण वर केलेली ग्रीक–रोमन कसोटीच कारण झाली. जादू गैरकायदेशीर अविश्वसनीय व अनीतिमान ठरली जात असे. जेव्हां ख्रिस्ती धर्माचा प्रसार ग्रीस व रोममध्यें झाला, तेव्हां तर हें स्पष्टच ठरलें कीं ख्रिस्ती धर्म तेवढा शिष्टसंमत व इतर धर्म पाखंडी म्हणजे जादूच्या स्वरूपाचे. जादूच्या उत्पत्तीविषयीं प्लीनीचें असें मत आहे कीं वैद्यकाच्या कालाबरोबरच जादूस सुरुवात झाली, व जादूच्या वाढीचें कारण तिशीं झालेलें धर्म व ज्योतिष यांचें मिश्रण होय. अशाच तऱ्हेनें किमयाशास्त्र व भविष्यकथन यांच्या मिश्रणानें जादूची प्रगति झाली.

ग्रीक दंतकथेंतील जादूगारांत, तेलचिनीस, दक्तिली, क्युरेटेस आणि कॉरिबँतेस प्रमुख गणले आहेत. पहिले तीन जादूगार ग्रीसचे रहिवाशी असून त्यांचें अस्तित्व हेलेनिक कालापूर्वींचें असल्याचा दाखला आहे. हे जादूगार देवांचे सेवक मानले जात, इतकेंच नव्हे तर त्यांची पूजा देखील केली जाई. इतकें असून देखील त्यांनां जादूगार ठरविलें आहे. ग्रीक पुराणांतील प्रसिद्ध जादूगार प्रोमेथ्यिअस, अगामेदस, मेलांपस, ओनोने, पॅसिफी, सरसी,आणि मीडिआ होत. या सर्वांत सरसी आणि मीडिआ या प्रमुख मानल्या आहेत.

ग्रीक जादूच्या पद्धतीचा वैद्यकाशीं फार निकट संबंध आहे. सरसीनें आपले बळी मनुष्यरूप करण्यासाठीं लेपांचा उपयोग केला होता. कांहीं विशिष्ट पेय देण्याचाहि प्रघात दिसतो. पेय पाजून प्रेम उत्पन्न करणें ही पद्धत फार प्राचीन कालापासून माहीत असल्याचें दिसतें. जादूची कांडी हें एक प्रसिद्ध साधन सर्वश्रुत आहेच. व्रणविरोपणकला हें एक जादूचें अंग समजलें जातें. मृतांनां बोलाविणें, वशीकरण मंत्र, इत्यादि गोष्टी जादूच्या पद्धतींत सामील करतां येतील.

ग्रीस व रोम यांतील जादूवर कोलचिस, ईजिप्त, थेसली आणि आयर्लंड या देशांतील जादुविद्येचा परिणाम झाल्याचें दिसतें. या सर्वांत थेसलीची छाया ग्रीको–रोमन जादूवर जास्त पडली. अरिस्टोफेनीस काळांत थेसलीची भूमि जादू व जादूगार या संबंधीं फार प्रसिद्ध होती.

इटालियन जादू.—रोममधील ‘ टेल्व्ह टेबल्स ’चा कायदा हाच जादूच्या अस्तित्वाचा मुख्य पुरावा समजला जातो. या कायद्यानें एखाद्याच्या शेतांतील पीक जादूनें आपल्या शेतांत नेण्याची बंदी केली आहे. त्या काळांत अशी समजूत होती कीं चेटकिणींचा एक संघ शेतांतील सर्व पीक काढून आकाशयानांत भरून ‘ मगोनिया ’ म्हणून नांव असलेल्या प्रदेशांत नेत असे. असल्या कृत्यास बंदी करणें कायद्यानें भाग पाडलें.

ज्याप्रमाणें ग्रीस देश जादूच्या बाबतींत थेसलीवर अवलंबून होता, त्याचप्रमाणें इटलीनें इट्रुरियाकडे आपलें गुरुत्व दिलें होतें. रोमची जादू बराच कालपर्यंत विदेशी धर्मांनीं विचलित झाली खरी, पण ती स्थिति दुसऱ्या प्यूनिक युद्धानें निवळली. पण रोमच्या जादूचे मुख्य पुरस्कर्ते कवी होते, व हे कवी विशेषेंकरून ग्रीक दंतकथांचा अनुवाद करीत; याचा परिणाम असा झाला कीं केटोच्या काळानंतर नुसती ग्रीक जादू, अगर नुसतीच रोमन जादू आपणास आढळत नसून ग्रीको–रोमनसंबंधीं उल्लेखच अधिक आढळतात. इटलींत जादूवरील ग्रंथांची वाढ, विशेषेंकरून तत्ववेत्त्यांकडून झाली. आगस्टसच्या काळांत रोम शहरीं बारा निरनिराळ्या मतांच्या जादूगारांनीं वस्ती केली होती; त्यांत अति हीन दर्जाच्या सागापासून उच्च दर्जाचे खाल्डिअन जादूगार असत. आगस्टसच्या काळापूर्वीं तीन शतकापासून धार्मिक चळवळीची लाट सारखी चढतच होती. याच काळांत इटलींत व सर्व यूरोपभर जादूची फार झपाट्यानें वाढ झाली.

यूरोपमध्यें मध्ययुगांत जादू व चेटकावरील विश्वास बराच वाढलेला दिसतो. एखाद्या खेड्यांत जी सर्वांत वृद्ध स्त्री असेल ती चेटकी असावयाचीच अशी समजूत असे. समुद्रावरील वादळें, लढाया वगैरे चेटकी स्त्रियाच उत्पन्न करतात अशी समजूत असे व त्यामुळें अशा सार्वजनिक आपत्तींच्या प्रसंगीं वृद्ध स्त्रियांचें जीवित विशेष धोक्यांत असे; कारण त्यांस चेटकी समजून तावडतोब जीवंत जाळण्यांत येत असे. जोन ऑफ आर्क या शूर स्त्रीला इंग्रजांनीं चेटकी म्हणून जाळल्याचें उदाहरण इतिहासप्रसिद्धच आहे. [ एन्सायक्लो. ए. रि. ए. मधील किर्बी फ्लॉवर स्मिथचा ‘मॅजिक’ ( ग्रीक अँड रोमन ) हा लेख विस्तृत असून त्यांत या विभागावरील संदर्भग्रंथ आढळतील. ]

इराणी जादू.—धर्म व जादू यांच्या मिश्रणाचें प्रमाण मझ्दाच्या धर्मांत विशेष दृष्टोत्पत्तीस येतें. गाथांतून फक्त आहुरमझ्दालाच ईश्वर मानिलें आहे; आणि तत्कालीन अस्तित्वांत असलेलीं हीन दर्जाचीं धार्मिक मतें, व जादूचे संस्कार यांच्याशीं स्पष्ट विरोध दाखविला आहे. गाथानंतरच्या अवेस्तांतील धर्मग्रंथांतून जादूगार व चेटकिणी यांनां जरी शाप दिले असले तरी, झोरोआस्टरनें

जादूगार व चेटकिणीसंबंधीं जे संस्कार उल्लेखिले होते, त्यांचा समावेश वरील ग्रंथांतून केलेला आढळतो. या मिलाफाचा परिणाम म्हणजेच झोरोआस्टरच्या धर्मांतील द्वैतवाद होय.

सद्गुण विरुद्ध दुर्गुण यांच्या लढाईंत ज्या क्रिया घडत, त्या क्रिया आणि जादू यांच्यांतील फरक लक्षांत घेतां असें दिसून येईल कीं जादूच्या योगानें प्राप्त होणारी ऐहिक सुखें थंड पडावयाचीं; कारण मझ्दाचीं बहुतेक धार्मिक कृत्यें उच्च व पवित्र स्वरूपाचीं असल्यानें त्यांपासून निष्पन्न होणारी प्राप्ति अत्यंत शाश्वत असूं शकेल आणि दुर्गुणाचीं फळें अशुद्ध असणार आणि त्यांचा नाश व्हावयाचाच. अशा तऱ्हेचें या संप्रदायाचें मत आहे.

चि नी जा दू.—चिनी वाङ्मयांत जादूची मीमांसा व विधि यांचें वर्णन विस्तरानें आढळतें. कन्फ्यूशियसच्या काळापूर्वी जादूगारांचा दर्जा समाजांत मोठा होता. राजदरबारांत त्यांकडे कांहीं धार्मिक कृत्यें करण्याचे अधिकार दिले होते आणि सार्वजनिक उत्सवप्रसंगीं शुभकथन व अशुभ निवारण्याचें काम सोपविलें होतें.

जादूच्या कल्पना पुढें ताओ संप्रदायाच्या लोकांनीं आपल्यांत सामील करून घेतल्या. चीन देशांत स्वतंत्र वृत्तीचे जादूगारहि पुष्कळ आहेत. ह्या स्वतंत्र वर्गास चिनी समाजांत कोठेंच स्थान नव्हतें व त्यांचा धंदा तर बिनहरकत चाले, म्हणून जादूविरुद्ध कडक कायदे अस्तित्वांत आले असावेत.

प्राचीन काळीं अवर्षणाच्या काळांत एक कुरूप मनुष्य व एक चेटकीण जिवंत जाळण्याची पद्धत होती. या कृत्यानें स्वर्गीय देवतांना साहजिक दुःख होणारच. व ह्या देवता त्या दुर्दैवी प्राण्यावर दया दाखविणार म्हणजेच वर्षाव करून त्या दुर्भागी प्राण्यांच्या दुःखाचें परिमार्जन करणार; तोच फलदायी परिणाम चेटकिणींच्या जीवंत जाळण्यानें अगर उन्हांत उघडें बसविण्यानें होणार असें मानण्यांत येई.

चीनमधील सार्वत्रिक उत्सवाचे हेतु निःसंशय जादूच्या स्वरूपाचे आढळतील. म्हणजे उत्सव करण्यानें अवर्षण, रोगराई आणि दुर्दैव यांचें निराकरण, उत्तम पीकपाण्याची सोय आणि सुदैवप्राप्ति लाभणार ही कल्पना होती. चिनी कुटुंबांतील रोजच्या आचरणांत देखील जादूच्या कल्पना वावरत असल्याचें दिसून येईल. दारावर विवक्षित दिवशीं विवक्षित रोपें लटकविलेलीं आढळतील; लहान मुलांच्या दंडांतून लाल दोरा बांधलेला दिसेल; या गोष्टींचें मूळ जादूविषयक कल्पनांत आहे.

चीन देशांतील जादूगारांचें गिऱ्हाईक गरीब जनता नसून थोर लोक असत. यावरून पाहतां जादूवरील श्रद्धा निव्वळ गरीब लोकांतच होती असें दिसत नाहीं. दुष्ट जादूसंबंधीं मांचु राजांनीं केलेले कडक कायदे सर्वश्रुत आहेत तथापि चिनोंतील जादूविषयक कडक कायद्याखालीं एकहि जादूगार जिवंत मारला गेला नाहीं. सतराव्या शतकांतील सुमारलेले यूरोप व अमेरिका यांत देखील चेटकिणी जाळण्याची सांथ असल्याचें इतिहासांत नमूद आहे. [ ग्रूट—रिलिजिअस सिस्टिम ऑफ चायना; लेगे-चायनीज क्लासिक्स; डेनीस—फोकलोअर ऑफ चायना. ]

ज पा नी जा दू.—जपानी लोकांतील जादूचें शास्त्र व त्यावरील वाङ्मय इतकें विस्तृत आहे कीं, त्यासंबंधानें विस्तृतपणें विचार करणें देखील अशक्य आहे. या शास्त्राचे भाग आणि विभाग पाडून याला इतकी सूक्ष्मता आणली आहे कीं, त्यासंबंधानें नुसती सूचि देण्यास एक लहानसा ग्रंथ लिहावा लागेल.

एंजिशिकी पुस्तकांत जो जादूचा पहिला विधि दिला आहे त्याचें नांव "तोशी नोही नो मुतसरी" असें आहे; या विधींत जादूमय देवतांचा उल्लेख आला आहे. हा विधि पेरणीच्या सुमारास करतात. त्यायोगानें चांगलें पीक येतें असा समज आहे.

या विधींत अर्पण करण्याच्या वस्तूंत शुभ्र अश्व, श्वेत वराह आणि पांढरा कोंबडा हीं आहेत. आणखी एका विधीचें नांव "इडझुमो नो कुनी नो मियाको नो कामू योगोटो" असें आहे, व त्याचा अर्थः—'इडझुमो देशांतील प्रमुखास उत्तम दैव ( नशीब ) प्राप्त होण्याचे शब्द' ( मंत्र ) असा आहे.

या सर्व विधींना एकेकाळीं कांहीं अर्थ असेल. परंतु हे विधी सहानुभूतिकपद्धति अथवा समचिकित्सा या तत्त्वापासून उत्पन्न झाले असेंच अनुमान काढणें भाग पडतें ( व हेंच तत्त्व अगदीं पुराण स्थितींतील मनुष्यांनीं अमलांत आणलें होतें ). यावरून असें दिसून येतें कीं, प्राचीन शिंतो धर्मा(जपानी धर्मा)त जादूचा बराच अंश होता व असें अनुमान काढण्यास जुन्या ग्रंथांचा उत्तम आधार आहे.

या धर्मांतील विधींनें मूलस्वरूप जादूमय आहे, ज्या देवतांस उद्देशून हे विधी आचरिले जात असत, त्या देवता जादूच्या आहेत व त्या विधींचे संस्कर्ते जादूचे पुरोहित आहेत. जपानच्या राष्ट्रीय धर्माच्या संस्कृतीच्या मुळाशीं जादू आहे. धर्माचा तुलनात्मक दृष्टीनें अभ्यास करणारास वरील तत्त्व त्या धर्मांत प्रथित झालेलें दिसेल.

आ र बी व मु स ल मा नी.—कुराणांत जादूसंबंधीं पुष्कळ माहिती आली आहे. 'सिहर' ( जादू ) प्रथमतः हारुत व मारुत या दोन देवदूतांना कळलें, व त्यांनीं तें मानवी प्राण्यांना शिकविलें. सिहरचा परिणाम अंतर्बाह्य होत असावा असें कुराणांत स्पष्ट नमूद केलेलें दिसत नाहीं. तरी दोन्ही तऱ्हेचे परिणाम होत असावेत असा टीकाकारांचा समज आहे.

मुसुलमानांच्या दंतकथांचा जो संग्रह केरो येथें केला आहे त्यावरून जो पुरावा निघतो, तो असाः—मुसुलमानांनीं दृष्टीवर, सर्पाच्या विषावर आणि सामान्य रोगावर मंत्र अथवा जादूचा इलाज कबूल केला आहे. कुराणांतील असल्या मंत्राचा प्रयोग करणारा रोग्यांकडून द्रव्य घेतो व त्या

द्रव्याचा कांहीं अंश धर्मसंस्थापकाला द्यावा लागतो. रुक्या हे ते मंत्र होत. [ कुराण; अरेबियन नाइट्स; लेन—मॅनर्स अँड कस्टम्स ऑफ दि मॉडर्न ईजिप्शियन्स ].

**जादूचा कंदील** (मॅजिक् लॅन्टर्न)—हें यंत्र ई.स.१६४६ च्या सुमारास कर्चर नांवाच्या जर्मनानें शोधून काढलें असा तज्ज्ञांचा समज आहे. या पूर्वींहि कांहीं काळ लोकांनां हें यंत्र अत्यंत प्राथमिक अवस्थेंत असलेलें माहीत असावें असा अंदाज आहे. जुन्या काळीं जादूगार लोक पिशाचें दाखविण्यास या कंदिलाचा पुष्कळदां उपयोग करीत. अलीकडे या कंदिलांत पुष्कळ सुधारणा झाल्या आहेत. वस्तूंचे फोटो घेऊन त्यांपासून कांचा ( स्लाइड्स ) तयार करण्यांत येऊं लागल्या आहेत. यामुळें हातानें रंगवून कांचा (स्लाइड्स) तयार करण्याचे श्रम वांचले आहेत व फोटोच्या योगानें कामहि सुबक होतें.सूक्ष्मदर्शक यंत्रांतून दिसणारे देखावे फोटोग्राफीनें घेऊन पडद्यावर दाखवितां येतात. सूक्ष्मदर्शक यंत्रांतून एकाच वेळीं फार थोड्या लोकांस जी गोष्ट पहातां येते तीच गोष्ट पडद्यावर दाखवून एकाच वेळीं मोठ्या जनसमूहास समजाऊन सांगतां येते. या रीतीनें पदार्थविज्ञानशास्त्र, रसायनशास्त्र, प्राणिशास्त्र, वनस्पतिशास्त्र, भूस्तरशास्त्र, मंतुशास्त्र इ. इ. अनेक शास्त्रांतील महत्त्वाचे प्रयोग किंवा गूढ प्रमेयें उघड करून सांगतां येतात. चलच्चित्रें ( सिनेमा ) हीं जादूच्या कंदिलाचीच एक सुधारलेली आवृत्ति आहे.

*कं दि ला ची ज्यो त.*—या कंदिलांत तीव्र प्रकाश उत्पन्न करावा लागतो. त्याकरितां राकेलतेल किंवा वनस्पतिजन्य तेलें पूर्वी फार करून वापरीत असत. परंतु यांचा उजेड बेताचा असतो. राकेलच्या शेजारीं शेजारीं येतील अशा दोन तीन ज्योती असल्यास त्यांचा बराच उजेड पडतो. आक्सिहाड्रोजनच्या ज्योतींत खडूचा तुकडा ठेविल्यास खडू अति तप्त होऊन त्या योगानें देदीप्यमान प्रकाश पडतो. याला इंग्रजींत "लाइमलाइट" अशी संज्ञा आहे. लाइमलाइटचा पुष्कळ दिव्यांत उपयोग केलेला आढळतो. ईथरचा सुद्धां उपयोग करितात. विजेच्या दिव्यांपैकीं कार्बन किंवा प्लाटिनमचे तंतू असलेल्या दिव्याचा बहुधा उपयोग करीत नाहींत. परंतु नर्स्ट याच्या विद्युद्दीपाचा उपयोग करितात. कार्बनच्या दोन शलाकेंतून जोरदार विद्युत्प्रवाह पाठविल्यास अत्यंत तेजस्वी प्रकाश पडतो. या प्रकाशास इंग्रजींत "आर्कलाईट" अशी संज्ञा आहे. या आर्क लाइटचाच बहुतेक ठिकाणीं ( शक्य असल्यास ) उपयोग करितात. या कंदिलांतील भिंगाची ( लेन्सची ) रचना सोईप्रमाणें निरनिराळ्या तऱ्हेची असते; एक मोठें भिंग (लेन्स) ज्योतीपासून कांहीं अंतरावर ठेविलेलें असतें. ह्याचें "केन्द्रांतर" अल्प असून त्याच्यावरोवर केंद्रांत ज्योत येईल इतक्या बेतानें तें भिंग ( लेन्स ) बसविलेलें असतें. या योगानें प्रकाशाचे किरण समान्तर होतात. ही समान्तर प्रकाशकिरणांची शलाका कांचेच्या (स्लाइडच्या) मधून जाते; नंतर हा प्रकाश दुसऱ्या एका भिंगांतून (लेन्समधून) जाऊन पडद्यावर पडतो. यायोगें पडद्यावर चित्रें दिसूं लागतात. या दुसऱ्या भिंगाच्या ( लेन्सच्या ) योगानें चित्र मोठें होऊन पडद्यावर पडतें.

**जाधव,** *मा ळे गां व क र.*—हें घराणें धनाजी जाधवाच्या एका मुलापासून निघालें. धनाजीला दोन बायका होत्या. एकीचा मुलगा संताजी व दुसरीचे चंद्रसेन व शंभुसिंग. धनाजीनंतर चंद्रसेनास शाहूनें सेनापति करून शंभुसिंगास त्याची मुतालकी दिली. पुढें चंद्रसेन उघडपणें शत्रूस मिळाल्यावरून कांहीं दिवस शंभुहि त्याच्या बरोबरच शत्रूकडे होता. परंतु या दोघांत वितुष्ट येऊन शंभु हा शाहूछत्रपतीकडे आला. त्यानें त्याचा मान करून त्यास संभाजीवरील एका स्वारींत प्रतिनिधीबरोबर पाठविलें. तेथें त्यानें उत्तम कामगिरी केली जंजिऱ्यावरील एका स्वारींत प्रतिनिधीबरोबर शंभूस पाठविलें होतें. नंतर शाहूनें त्याला माळेगांव हें इनाम करून दिलें ( स. १७३२ ). अद्यापि हा गांव या घराण्याकडे चालत आहे. कर्नाटकच्या १७३९ तील स्वारींतहि हा हजर होता. हा स. १७६० त मेल्यावर त्याचा मुलगा अमरसिंग यानें माळेगांवास राहून दौलतीचा कारभार केला. यानें कवि मोरोपंत पराडकरास आपल्या बरोबर काशीयात्रेस नेलें होतें. हा १८१७ त मरण पावला. त्याचा मुलगा रत्नसिंह हा १८७६ त मेल्यावर ( याला इंग्रजींत २० हजारांचें उत्पन्न होतें ) त्याचा पुत्र अमरसिंह हा जहागिरीवर आला. तो १८७८ त वारला. त्यानंतर त्याचे दत्तक चिरंजीव शंभुसिंह हे हल्लीं विद्यमान जहागिरदार आहेत. [ दळवी—मराठी कैफियती; वाड—कैफियती ].

*वा घो ली क र.*—हें घराणें पिलाजी जाधवाच्या वंशजांचें होय. पिलाजीस थोरल्या शाहूनें पुणें प्रांतीं मौजे दिवे व नांदेड या गांवीं जहागीर इनाम दिलें; पुढें कन्नड, फुलंब्री वगैरे अवरंगाबाद प्रांतांतहि जहागीर मिळाली. दमाजी थोरातांच्या हातून बाळाजी विश्वनाथास यानें सोडवून आणिलें. हा पेशव्यांच्या बरोबर पुष्कळ मोहिमांत हजर असे. निजामानेंहि याला गोळेगांव, मरकळ वगैरे गांव इनाम दिले. छत्रसालच्या वेळीं बाजीरावाबरोबर यानें मदत केल्यामुळें याला सागरप्रांतीं पांच गांव इनाम मिळाले. वसईचे मोहिमेंत कामगिरी बजावल्यानें तेथेंहि याला कांहीं इनाम मिळालें. नानासाहेब पेशवे याला काका म्हणत. पेशव्याचा व या घराण्याचा घरोबा विशेष होता. फौज व जातसरंजाम, स. १७१८ च्या सुमारास वाघोली वगैरे गांवांचा दीड लक्षाचा प्रथम मिळाला. यास उत्तरहिंदुस्थानांतील महालांचें उत्पन्न लाखाचें होतें. एकूण फौजेस व जातीस अडीच लक्षांचा सरंजाम होता. पिलाजीस सटवाजी म्हणून पुत्र होता. त्याला सुभानजी व जोत्याजी या नांवाचे दोन पुत्र होते. जोत्याजीचा वंश वाईस हयात आहे. सुभानजीचा वंश वाघोलीस नांदतो. त्याला संभाजी व मळोजी असे दोन पुत्र होते. संभाजीचा पुत्र पिलाजी व मळोजीचा पुत्र लक्ष्मणराव हे स. १८३२ त

हयात होते. या दोघांस मिळून या साल अखेरीस कन्नड परगण्यांतून तेरा गांवांचे साडेचोवीस हजार व वाघोली परगण्यांच्या मोकाश्यांतून एक हजार तीनशे रुपये इतकी रक्कम मिळत असे. [ वाड–कैफियती ]

वा डी क र.—पिलाजी जाधवाच्या वंशजांचें हें एक घराणें आहे. वाघोलीकर घराण्यांत याची थोडी माहिती आली आहे. पिलाजीचा पुत्र सटवाजी, त्याचा धाकटा पुत्र जोत्याजी, त्याचा पुत्र लाडोजी; हा स. १८३२ मध्यें हयात होता. रावबाजीनें याच्या सर्व जहागिरीची जप्ती स. १८१५ च्या सुमारास केली होती; त्यामुळें १८३२ च्या सुमारास जात अगर फौजसरंजाम लाडोजीस कांहीं शिल्लक राहिला नाहीं; खासगत इनाम मात्र राहिलें. पुढें इंग्रजी झाल्यावर कंपनीनें कांहीं गांवें सोडून जहागिरीदाखल दिलीं. लाडोजीचा वंश हल्लीं वाडी, तालुके पुरंदर, जि. पुणें येथें नांदत आहे. [ वाड–कैफियती ]

शि द खे ड क र.—मोंगलाईतील हें शिंदखेडचें घराणें आपणांस दौलताबादच्या यादवघराण्यापैकीं म्हणवितें. यांच्या कांहीं शाखा देऊळगांव, औरंगाबाद या भागांत आहेत. बहामनी राज्यांत गोविंदजी व ठाकूरजी जाधवांचीं नांवें येतात. विठोजी जाधव हा तालिकोटच्या लढाईंत मुसुलमानांतर्फे लढत होता. लुखजीस पैठण परगण्यांतील लासनेर गांव इनाम होतें. शिंदखेड हें दौलताबादेजवळ असून पूर्वी मेहकर सरकारांत मोडत असे. लुखजीनें शिंदखेडच्या मूळच्या ढोणे देशमुखास ठार मारून तेथील देशमुखी मिळविली. लुखजीस भुताजी म्हणून एक भाऊ होता. लुखजी हा फौजबंद सरदार होता. त्यानें निजामशहाची चाकरी केली. निजामशहानें त्याला शिंदखेड, पडतुर, खेरडें वगैरे प्रांत खाजगत खर्चास व फौजेच्या सरंजामास, त्याला पंचहजारी सरदार करून, वैजापुर, गांडापुर, फुलंबर, कन्नड, पैठण, मेहकर वगैरे महाल लावून दिले. त्याचा व निजामशहाचा फार घरोबा होता. त्याच्या बायकोनें एकदां शहाला भाऊबीजेची ओवाळणी केली; तेव्हां त्यानें दौलताबाद सरकारची देशमुखी इनाम दिली. लुखजीकडे २७ महाल व ५२ चावड्यांचा अधिकार होता. लुखजीस चार पुत्र होते. त्यांनीं चार ठिकाणीं शाखा स्थापिल्या. दत्ताजीनें अडगांव, अचलोजीनें मेहुणें, बहादुरजीनें किनगांव व राघोजीनें शिंदखेड येथें आपलें ठाणें दिलें. शिंदखेडचीच शाखा पुढें देऊळगांवास आली. या गांवच्या पाटिलक्या व देशमुखी यांच्याकडे आहेत. लुखजीनें मलिकंबरास वऱ्हाडचा भाग मोंगला(दिल्लीवाले)कडून परत मिळविण्यांत बरीच मदत केली होती. परंतु पुढें त्याचें व अंबराचें वांकडें येऊन तो मोंगलास मिळाला. त्यामुळें दक्षिण वऱ्हाडावर मोंगलाची पकड बसली. लुखजीचें मूळ नांव लक्ष्मणसिंह. चांदबिबीनें नगर लढविलें त्यावेळीं लुखजीनें शौर्य गाजविलें होतें. तिचा खून झाल्यावर व नगर मोंगलांच्या हातीं पडल्यावर लुखजीनें इतर सरदारांच्या मदतीनें अज्ञान निजामशहास संभाळून निजामशाही कांहीं दिवस वांचविली. यावेळीं तो दसहजारी मनसबदार होता. याचवेळीं मालोजी भोंसले लुखजीच्या पदरीं राहिला ( १५७७ ). पुढें शिंदखेड येथें प्रसिद्ध रंगपंचमीची गोष्ट घडली. शिंदखेडास अद्यापि या घराण्याच्या मोठमोठ्या इमारती, महाल, समाधी, हौद वगैरे पडक्या स्थितींत आहेत. त्यांपैकीं एका महालास रंगपंचमीचा महाल म्हणतात. या प्रसंगीं शहाजी पांच वर्षांचा व जिजाबाई तीन वर्षांची होती. दोघे एकमेकांवर गुलाल फेंकू लागल्यानें लुखजीनें विनोदानें हा जोडा ठीक शोभतो असें म्हटलें तेंच खरें धरून मालोजीनें जिजाबाईची मागणी केली. परंतु लुखजीनें आपली बायको म्हाळसाबाई हिच्या आग्रहामुळें मागणीस रुकार दिला नाहीं. तेव्हां मालोजीनें द्रव्य व लौकिक मिळविला. निजामशहानें त्याला पंचहजारी राजे करून शिवनेरी वगैरे किल्ले व पुणें वगैरे प्रांत जहागीर दिला; आणि लुखजीस आग्रह करून जिजाबाई ही शहाजीस देवविली. हें लग्न खुद्द निजामशहाच्या देखरेखीखालीं झालें ( १६०४ ). मालोजी जिवंत असेपर्यंत जाधव–भोंसल्यांत भांडण नव्हतें. पुढें मूर्तिजा निजामशहा हा गादीवर आला, तेव्हां तो अज्ञान असल्यानें त्याची आई कारभार पाही;व ती शहाजीच्या तंत्रानें पाही; त्यामुळें त्याचें वजन वाढलें तें लुखजीस खपलें नाहीं. याच सुमारास शहाजहाननें त्याला आपल्या पक्षास मिळवून घेण्याची खटपट चालविली व त्याप्रमाणें लुखजी हा त्याला जाऊन मिळाला (१६२१). शहाजाद्यासहि न मिळणारा मान, म्हणजे चोवीसहजारी ( २४ हजार स्वार व १५ हजार पायदळ ) मनसब शहाजहाननें त्याला दिली. नंतर मोंगल, लुखजीच्या साहाय्यानें दौलताबादेवर चालून आले. तेव्हां मूर्तिजा व त्याची आई यांस शहाजीनें तेथून काढून कल्याणजवळील माहुलीच्या किल्ल्यांत नेऊन ठेविलें आणि आपण मलिकअंबरासह मोंगलांशीं लढूं लागला. या वेळच्या भातवडीच्या लढाईंत ( सन १६२४ ) मलिकंबरानें मोंगलांचा ( लुखजीचाहि ) पराभव केला; लुखजी पळून गेल्यामुळें वांचला. पुढें लुखजीनें माहुलीस वेढा दिला व मूर्तिजाची आई आपण होऊन त्याला मिळाली. तेव्हां शहाजीनें तेथून निघून दुसरीकडे धुमाकूळ घातला. याचवेळीं तो दौडत असतां जिजाबाई लुखजीच्या हातीं लागली. तिला त्यानें शिवनेरीस पोहोंचवून दिलें. निजामशाही अजिबात न बुडतां मूर्तिजाचा मुलगा हुसेन हा गादीवर आला. त्यानें लुखजीस राजकारणाच्या मिषानें दौलताबादच्या किल्ल्यांत बोलावून आणलें व त्याचा खून केला ( १६३० ). लुखजीनें निजामशहास त्याचा वजीर फत्तेखान याच्या त्रासांतून सोडविलें होतें. लुखजी आपल्याबरोबर आपला भाऊ जगदेव यास घेऊन सैन्यासह दौलताबादेस आला. ठरलेल्या दिवशीं आपले पुत्र, नातु, आप्त यांच्यासह तो किल्ल्यांत गेला. तेथें त्याला आधीं निःशस्त्र करून मग निजामशहाच्या भेटी

नेलें. दरबार झाल्यावर निजामशहा उठून गेला व एकदम वरेचसे मारेकरी लुखजी व त्याच्या मंडळींवर तुटून पडले. या मंडळीजवळ फक्त कट्यारीच होत्या. शेवटपर्यंत लुखजी व त्याची मंडळी यांनीं लढून शेवटीं प्राण दिले. यावेळीं लुखजीचीं मुलें अचलोजी व राघोजी आणि नातु यशवंतराव हे मेले. ही वातमी समजतांच जगदेव व त्याचा मुलगा बहादुर आणि गिरिजा उर्फ म्हाळसा ही मंडळी शिंदखेडास परत गेली. याच्या पूर्वीच (स. १६२३) खंडागळ्याच्या हत्तीच्या प्रकर्णावरून शहाजी व लुखजी यांच्यामध्यें जी कटकट ( भांडण ) झाली तींत लुखजीचा पुत्र दत्ताजी मारला गेला. यानंतरच लुखजी मोंगलास जाऊन मिळाला व भातवडीची लढाई झाली. लुखजीनेंच दौलतावादचा किल्ला मोठ्या युक्तीनें निजामशहाकरितां कावाज केला होता.लुखजी मेला तेव्हां त्याचें वय ८० होतें. पुढें भतोजी उर्फ जगदेव यास मोंगलानें पंचहजारी मनसब दिली. त्याचा मुलगा बहादूर व नातु मानसिंग हेहि मोंगली मनसवदार होते. स. १६३३ च्या लढाईंत जगदेवानें मोंगलातर्फे निजामशहाविरुद्ध पराक्रम गाजविला होता. त्यामुळें लुखजीची देशमुखीसनद व जहागीर जगदेवाला मिळाली व शिवाय रुस्तुमराव हा किताब मिळाला. जगदेवाच्या वेळीं जिजाबाई बालशिवाजीसह एकदां माहेरीं आली होती. लुखजीचा मुलगा बहादूर यास जगदेवानें दत्तक घेतलें होतें. त्याचें घराणें किनगांवराजा येथें नांदत आहे. मानसिंग रुस्तुमरावाची मुलगी थोरल्या शाहूस ( अवरंगझेबाच्या कैदेंत असतां )दिली होती. तिचें नांव अंबिकाबाई ( माहेरचें राजसबाई ) होतें. ही थोड्याच दिवसांत मेली. मानसिंग मोंगलाकडेच राहिला.

लुखजीचा पुत्र अचलोजी दौलतावादच्या दंग्यांत मेला. त्याचा पुत्र संताजी ( सुजनसिंह ) व अचलोजीची बायको यांसह म्हाळसाबाई शिवाजीकडे गेली. संताजी हा संभाजी ( शिवाजीचा वडील भाऊ ) बरोबर कनकगिरीच्या लढाईंत ठार झाला. त्याचा मुलगा संभाजी तो शिवाजीच्या कार्यांत हातभार लावीत असे.

लुखजीचा वडील पुत्र दत्ताजी, याची शाखा अडगांव येथें आहे. तिची विशेष प्रसिद्धि नाहीं. लुखजीचा सर्वांत धाकटा पुत्र राघोजी हा देऊळगांव येथें असे. या शाखेपैकीं दत्ताजी हा मोंगलाकडेच होता. त्याच्यातर्फे लढतांना कर्नाटकांत हा स. १६६४ त मेला. त्याचा मुलगा जगदेव; यानेंच देऊळगांव येथें बालाजीचें देवस्थान स्थापिलें. देऊळगांवांस यानें गढी, वाडें, पेठा वगैरे वसविल्या. यास मोंगलाकडून छत्री—चवरीचा मान होता. हा १६९९ त मेला. हा गिरीच्या बालाजीचा भक्त होता. त्यानें शिंदखेडास बालाजीची स्थापना केली. देऊळगांवची मूर्ति अंगुष्ठप्रमाण पंचधातूची आहे. संस्थान हल्लीं ंचांच्या ताब्यांत असून, त्याचें उत्पन्नहि बरेंच आहे. जगदेवाला राघोजी म्हणून मुलगा होता. त्यास सातारकर राजाराम छत्रपति यांची कन्या अंबिकाबाई दिली होती. आंदण म्हणून राजारामानें शिंदखेड, शिरपुर, मेहकर वगैरे गांवचे सरदेशमुखी हक्क जांवयास दिले. साखरखेडें येथें निजाम व दिल्लीचा सरदार मुबारीज यांच्यांत जी लढाई झाली तींत राघोजी हा मुबारीजच्या बाजूनें लढत असतां मेला ( १७२४ ). पुढें निजामानें शिंदखेड व देऊळगांव येथें राघोजीच्या कुटुंबास पकडण्याचा प्रयत्न केला असतां, त्याची आई दुर्गा, बायको अंबिका व पुत्र मानसिंग हे तेथून निसटून साताऱ्यास शाहूच्या आश्रयास गेले. कांहीं दिवसांनीं शाहूनें निजामाची समजूत करून मानसिंगाची जहागीर ( निजामानें जप्त केली होती ती ) सोडविली. शाहूच्या पश्चात मानसिंग हा ताराबाईच्या पक्षास मिळाला व रामराजाच्या विरुद्ध कारस्थान करूं लागला पुढें (१७५१) ताराबाईचा व पेशव्यांचा तह झाल्यावर हा देऊळगांवकडे निघून गेला. या शाखेंतील अखेरचा प्रसिद्ध पुरुष बाजीराव होय. त्याच्या हाताखालीं अरब शिबंदी होती. एकदां त्याची व इंग्रजांच्या तैनाती फौजेची लढाई होऊन कांहीं इंग्रज अधिकारी मारले गेले. या भांडणांत आपला कांहीं संबंध नसून अरबांचा पगार थकल्यामुळें ते इंग्रजावर उलटले असें बाजीराव म्हणे ( अशीं उदाहरणें पगार थकल्यामुळें सैन्यानें दंगल माजविल्याचीं त्याकाळीं पुष्कळ घडत असत ). परंतु त्याचें म्हणणें न ऐकतां त्याचें सर्व वतन खालसा करून ( स. १८५१ ) त्याला मरेपर्यंत दौलतावादच्या किल्ल्यांत कैदेंत ठेविलें ( १८५९ ). त्याचा औरस मुलगा मानसिंग व लेकवळा रासोजी होता. या रासोजीनें बाजीरावाची निजामाकडील जहागीर खटपट करून सोडविली.त्याचें वजन सहन न होऊन मानसिंगाची आई अहिल्याबाई व तिचे कारभारी यांनीं त्याला विषप्रयोग केला असें म्हणतात ( सं. १८६९ ). एवढेंच नव्हे तर कारभाऱ्यांनीं मानसिंगासहि थोड्या दिवसांनीं विषप्रयोग केला ( स.१८७८ ). मानसिंगाचा मुलगा बाजीराव हा स्त्रैण व व्यसनी होता, तो ( १९०६ ) औरंगाबादेस एकाएकीं वारला. हल्लीं दत्ताजीराव ( बाजीरावाचा पुतण्या) व बाजीरावाचा पुत्र आनंदराव हे हयात आहेत. या जाधव घराण्यांतील इमारती वगैरेंच्या खुणा शिंदखेड, देऊळगांवराजा, जानेफळ, किनगांवराजा, अडगांवराजा व मेहुण येथें आढळतात.जगदेवानें(पहिल्या) शिंदखेडास एक तलाव, वाडा व गांवास काळाकोट बांधला. देऊळगांवास जगदेवाच्या(तुळजाऊ) बायकोची मोतीसमाध नांवाची सुंदर इमारत आहे. जानेफळास जाधवांची एक गढी, साखरखेड्यास मानसिंहानें बांधलेली वेस व शिंदखेडास लुखजीची समाधि आहे.

[संदर्भग्रंथ—फेरिस्ता; जाधव घराण्याची कैफियत; भारतवर्ष—शिवाजीची बखर; नव्वद कलमी बखर; अहमदनगर गॅझेटियर; खरे-मालोजी व शहाजी; तंजावरचा शिलालेख; बुसातिने सलातीन; पातशहानामा; डफ; चिटणिशी बखर; राजवाडे खं. ६; काळे—वऱ्हाडचा इतिहास. ]

**जाधवराई**--सोलापूर जिल्ह्यांतील करमाळें तालुक्यांत असलेल्या निंबगांव येथें हें जहागिरदार घराणें आहे. हे मूळचे भालची चिटगुप्याचे होते. हे ब्राम्हण आहेत. धनाजीचा मुलगा चंद्रसेन याच्या पदरीं सदाशिवराव म्हणून कारभारी होता; पुढें त्यास दोनशें स्वारांची मनसब मिळाली. तो जाधवरावाबरोबर असतां एका लढाईत मेला. त्याचा पुत्र माधवराव, यानें निजामाकडे बरीच कामगिरी केल्यानें त्याला स. १७६८ त तीन गांव मिळून पांच हजारांची जहागीर मिळाली. निजामाकडून पेशव्यांच्या दरबारीं हा वकील होता. पुढें यानें पेशव्यांची नोकरी पत्करिली. त्यावर याला अर्काटच्या नवाबा( महंमदअल्ली )कडून थकलेली खंडणी आणण्याच्या कामावर ( मोहीम करून ) पेशव्यांनीं पाठविलें. त्यानें जाऊन खंडणी वसूल केली ( सन १७७१ ). याच्या मार्फत मद्रासकर इंग्रज, तंजावर, गदवाल व सुरापुर या संस्थानांचीं बोलणींचालणीं ( पेशव्यांशीं ) होत असत. याला फौजसरंजाम कांहीं नव्हता. मात्र वकिलीच्या कामासाठीं हत्ती, हलकारे व जासूदजोड्या वगैरे सरंजाम याच्या पदरीं असे. त्याची नक्त नेमणूक सरकारी असे. निजामाकडून यास स. १७६९ त पंधरा हजारांची जातसरंजाम जहागीर मिळाली. पेशवे सरकार दरसाल तैनातीचे पांच हजार देत असत. निंबगांव, टाकळी, वडगांव, वाघोली वगैरे मिळून ही पंधरा हजारांची जहागीर होती. रावबाजीनें यांपैकीं बरीचशी जहागीर जप्त केली. माधवराव सन १७८६ च्या सुमारास वारला. त्याचा पुत्र गणपतराव हा १८५२ मध्यें हयात होता. मूळचे चंद्रसेन जाधवाच्या पदरचे म्हणून यांना जाधवराव हा किताब अद्यापपर्यंत चालू आहे. [वाड-कैफियती]

**जॉन**--हें नांव ख्रिस्ती असून या नांवाचे अनेक देशांतले राजे व रोमचे पोप होऊन गेले आहेत.

**जॉन पोप**.--जॉन नांवाचे एकंदर २३ पोप इसवी सन ५२३ ते १४१५ या काळाच्या दरम्यान झाले. यांपैकीं पुष्कळसे राजकारणांत पडणारे होते. पहिल्या पोपला रोमन बादशहा जस्टिन याच्या दरबारीं धर्ममतस्वातंत्र्य ( टॉलरेशन ) एरियन लोकांकरितां मिळवितां आलें नाहीं म्हणून थिओडोरिकनें तुरुंगांत टाकलें होतें व तेथेंच तो मरण पावला. त्यानंतरचे ५। ६ जॉन पोप महत्त्वाचे नव्हते पुढें ८ वा जॉन ( ८७२-८८२ ) यानें राजकारणांत उलाढाल फार केली. यूरोपीय राजांमध्यें पोपकडून बादशाही मुकुट स्वतःस मिळावा म्हणून त्या काळांत विशेष स्पर्धा असे. या स्पर्धेत सांपडल्यामुळें या जॉनला ८७८ मध्यें कार्लोमन राजाकडून कैद भोगावी लागली. आणि धरसोडीच्या धोरणामुळें कोणाहि राजाची मदत पोपला मिळाली नाहीं. अखेर तो स्वतःच्या आश्रित इसमांकडून मारला गेला. पुढील ९ ते २१ व्या पोपपर्यंत कोणीहि पोप महत्त्वाचे नव्हते.

२२ वा जॉन पोप (१३१६-१३३४):--यानें कायद्याचा व वैद्यकीचा अभ्यास करून शिवाय इतर अनेकांगी विद्वत्ता संपादन केली होती. पोप झाल्यावर त्यानें पोपचें परावलंबित्व शक्य तितकें कमी करण्याचा प्रयत्न केला. त्यानें कर बसवून लोकांकडून पुष्कळ पैसा जमविला पण स्वतःकडे फार थोडा खर्च केला. त्याचें शेवटपर्यंत बव्हेरियाच्या लुईबरोबर भांडण चालू होतें.

२३ वा जॉन पोप (१४१०-१४१५):--हा खरा पोप नसून पोपला विरोधी पोप ( अँटि-पोप ) असा उत्पन्न झाला होता; त्यानें लांचलुचपत वगैरे अनेक गैरमार्गांनीं पोपपद मिळविलें. पुढें ७४ आरोप ठेवून त्याची चौकशी झाली, त्यांत जुलूम, अनीति वगैरे आरोप शाबीत होऊन तो पदभ्रष्ट झाला.

**जॉन राजे, पूर्वरोमन साम्राज्याचे जॉन बादशाहः**--ह्या नांवाचे सात राजे ९२५ ते १४४८ च्या दरम्यान झाले. त्यांत विशेष महत्त्वाचा ६ वा जॉन बादशह (११९२-१३८३)होय. यानें १३२०-१३५६पर्यंतचा इतिहास स्वतःच लिहून ठेवला आहे. साम्राज्याचा खरा वारस पॅलिओलोगास याच्याबरोबर तुर्कांच्या मदतीनें युद्ध करून तो बादशहा झाला. पण कराच्या ओझ्यामुळें प्रजा नाखुप झाली आणि पुन्हां झालेल्या लढाईत( १३५४ ) खरा वारस विजयी झाला. तेव्हां जॉननें उरलेलें आयुष्य लेखनव्यवसायांत घालविलें.

**इंग्लंडचा जॉन राजा ( ११६७--१२१६ )**:--या नांवाचा एकच राजा इंग्लंडांत झाला. तो अनियंत्रित राज्यकारभार करणारा खुनी व जुलमी निघाला. अत्यंत वाईट राजा म्हणून गणला गेल्यानेंच पुढें हें नांव इंग्लंडांत कोणाहि राजास दिलें नसावेंसें वाटतें. त्याचें राजकीय चरित्र 'इंग्लंड' या लेखांत पहा. सामाजिकदृष्ट्या याच्या चरित्रांतील महत्त्वाच्या गोष्टी म्हणजे त्याचा ५ व्या वर्षीच एक वाङ्निश्चय झाला होता. पुढें त्यानें विशेष कारण नसतांहि पहिली बायको टाकून दुसरें लग्न केलें होतें. त्याच्या या दुसऱ्या बायकोनें जॉन वारल्यावर पांच मुलें असतांहि पुनर्विवाह लावला. जॉनला औरस संततीखेरीज दोन मुलगे व एक मुलगी अशी अनौरस संततीहि होती.

**फ्रान्सचे जॉन राजेः**--फ्रान्समध्यें जॉन नांवाचे दोन राजे १३१६ ते १३६४ च्या दरम्यान झाले. पैकीं पहिला जॉन हा १० व्या लुईचा मुलगा बापाच्या मृत्यूनंतर जन्मास येऊन फक्त सात दिवस जिवंत होता, व तो पुढें चुलत्याकडून मारला गेला असें म्हणतात.

दुसरा जॉन ( १३१९-१३६४ ) हा लहान वयांतच राज्यावर आला. त्याचें मंत्रिमंडळ चांगलें नव्हतें, त्यांनीं राजाचा पैसा खाऊन प्रजेवर जुलुम केला. यावेळीं इंग्लंडबरोबर चालू असलेल्या युद्धांतील पॉइटायर्स येथें लढाई होऊन तींत इंग्लंडच्या ब्लॅक प्रिन्सनें जॉनचा पराभव करून त्याला कैद करून इंग्लंडांत नेलें. पुढें ३० लक्ष क्राऊन किंमत देण्याचें ठरवून जॉननें सुटका करून घेतली. पण ती रक्कम

फेडतां न आल्यामुळें तो स. १३६४ मध्यें पुन्हां इंग्लंडमध्ये कैदी म्हणून स्वतः होऊन गेला व तेथेंच मरण पावला.

पोर्तुगालचे जॉन राजेः—या नांवाचे सहा राजे १३५७ ते १८२६ च्या दरम्यान झाले. यांपैकीं पहिला जॉन विशेष प्रसिद्ध झाला. तो त्याचा भाऊ पहिला फर्डिनंड मरण पावल्यावर राज्यावर आला. त्याला कॅसलचा ( स्पेन ) पहिला जॉन हा प्रतिस्पर्धी होता. पण लढाईंत जॉन विजयी झाला. त्यानें मूर लोकांवरहि विजय मिळविले. हा 'दि ग्रेट' व 'फादर ऑफ हिज कंट्री' या नांवानें प्रसिद्ध आहे. यानंतरचे (दुसरा ते पांचवा जॉन हे) राजे फारसे महत्त्वाचे नाहींत. पुढील सहावा जॉन ( १७६९-१८२६ ) याच्या कारकीर्दींत महत्त्वाची गोष्ट म्हणजे स.१८२० मध्यें अनत्याचारी राज्यक्रांति होऊन जबाबदार राज्यपद्धति स्थापना झाली व ती मान्य करण्याची जॉननें शपथ घेतली. या सर्व जॉन राजांची एक विशेष गोष्ट म्हणजे त्या प्रत्येकानें ५०।६० वर्षें राज्य केलें.

इतर देशः—याशिवाय ॲरेगॉन, बोहेमिया, हंगेरी, जेरुशलेम, पोलंड, सॅक्सनी, वगैरे देशांत ह्या नांवाचे कांहीं राजे होऊन गेले. त्यांपैकीं पोलंडचा तिसरा जॉन हा महत्त्वाचा होता.

**जानसथ,** तहशील.—संयुक्तप्रांत. मुझफरनगर जिल्ह्यांतील तहशील. उ. अ. २९° १७' ते २९° २६' व पू. रे. ७७° ३६' ते ७८° ६' क्षेत्रफळ ४५० चौरस मैल. लो. सं. ( इ. स. १९११ ) १९९८६४. ह्यांत चार गांवें व २४९ खेडीं आहेत. इ. स. १९०३-४ मध्यें साऱ्याचें उत्पन्न ३.६ लाख व इतर करांचें उत्पन्न ४७००० रुपये होतें. हिच्या पूर्वेकडे गंगा नदी असून तिच्या तीरावरील प्रदेश दलदलीचा आहे. यांतून अपरगंजेस मेन कॅनॉल गेला आहे. इ स. १९०३-४ मध्यें एकंदर ३०७ चौरस मैल जमीन लागवडीखालीं असून ११५ चौरस मैल कालव्याखालीं होती.

गांव.—जानसथ तहसिलीचें हें मुख्य ठिकाण असून मुझफरनगरहून १८ मैलांवर आहे. उ. अ. २९° १९' व पू. रे. ७७° ५१.' इ. स. १९११ मध्यें येथें ५९३२ लोकसंख्या होती. अठराव्या शतकाच्या प्रारंभीं ज्या जानसथ सय्यदांनीं मोंगल साम्राज्यांत आपल्या हातीं मुख्य सत्ता ठेविली होती त्यांचें हें राहण्याचें ठिकाण होतें. इ. स. १७३७ मध्यें वझीर कमरुद्दीनच्या हुकमानें रोहिला सैन्यानें हा गांव लुटला व पुष्कळ सय्यदांस ठार मारलें व हद्दपार केलें. तरी अद्यापि त्यांचे कांहीं वंशज हल्लीं या गांवांत आहेत.

**जॉनसन अँड्रू** ( १८०८-१८७५ )—हा युनैटेड स्टेट्स ( अमेरिका )चा सतरावा अध्यक्ष इ. स. १८०८ मध्यें जन्मला. त्याचा बाप त्याच्या चवथ्या वर्षीच वारल्यामुळें तो लहानपणींच एका शिंप्याकडे नौकर राहिला व फावल्या वेळांत शिक्षण मिळवूं लागला. स. १८२६ मध्यें त्यानें लग्न केलें. बायकोचें कुळ व शिक्षण दोन्हीं जॉनसनच्यापेक्षां अधिक दर्जाचीं असल्यामुळें तिनेंच त्याला शाळेंतील निरनिराळ्या विषयांचें शिक्षण दिलें. या वेळीं याचा धंदा शिंप्याचाच होता. तो राहत असलेल्या टेनेसीप्रांतांत पुष्कळ शेतकरी राहात असून त्या गरीब व दुबळ्या शेतकरी लोकांची दैन्यावस्था सुधारण्याकडे त्याचें लक्ष गेलें. त्यांचा पुढारी म्हणून तो प्रथम राजकारणांत शिरला; लवकरच तो ग्रीनव्हिल येथील मेयर होऊन पुढें प्रतिनिधिसभेचा व १८४१ त सेनेटसभेचा सभासद झाला. दोन्हींहि सभांत त्यानें 'जनते'च्या फायद्याच्या गोष्टींचा पुरस्कार केला. तेथें तो दहा वर्षें सभासद होता. नंतर गव्हर्नरच्या जागीं तो दोनदां निवडून आला. त्यावेळीं त्याची लायकी व निःपक्षपातीपणा पूर्ण दिसून आला तो सार्वत्रिक शिक्षणाचा पुरस्कर्ता असून कामकरीवर्गाबद्दल कांग्रेसमध्यें नेहमीं झगडत असे; परंतु तो गुलामपद्धतीच्या तर्फेचा होता. दक्षिणेकडील संस्थानांसंबंधाचें प्रे. लिंकनचें वर्तन फार अन्यायाचें आहे, तरी पण यूनियन मोडून दक्षिणी संस्थानांनीं स्वतंत्र होऊं नये असें त्याचें मत होतें. यादवी सुरू असतां शेवटपर्यंत यूनियन सरकारशीं तो राजनिष्ठ राहिला. स. १८६२ मध्यें टेनेसीसंस्थानचा लष्करी गव्हर्नर असतां त्यानेंहि तेथें बरीच अरेरावी चालवून यूनियनसरकारची सत्ता प्रस्थापित केली. स. १८६४मध्यें डेमोक्रॅटिक पक्षाला व सरहद्दीवरील संस्थानांना खूष करण्याकरितां तो उपाध्यक्षाच्या जागेकरतां उमेदवार झाला. स १८६५ मध्यें प्रे. लिंकनचा खून झाल्यावर याजकडे अध्यक्षाचें व यूनियनसरकाच्या पुनर्घटनेचें अवघड काम आलें. त्यावेळीं युध्यमान पक्षाला कठोरपणें न वागवितां त्यानें लिंकनचेंच सौम्यपणाचें धोरण चालविलें. त्यांत नीग्रोंच्या हक्कांचा प्रश्नच मुख्य महत्त्वाचा होता. सर्व गुलामांना एकदम राजकीय हक्क देण्याच्या तो विरुद्ध होता. दक्षिणी संस्थानांनींहि नीग्रोंना राजकीय हक्क दिले नव्हते; तेव्हां कांग्रेसनें दक्षिणी संस्थानांतील प्रतिनिधी घेण्याचें नाकारलें. प्रे. जॉनसननें कांग्रेसचे ठराव व्हेटोच्या जोरावर रद्द केले. उलट कांग्रेसनें एक्स-कॉन्फिडरेटरना राजकीय हक्कहीन व नीग्रोंना हक्क देण्याचें धोरण स्वीकारलें. शिवाय कांग्रेसच्या संमतीशिवाय कोणाहि अधिकाऱ्याला अध्यक्षानें नोकरीवरून दूर न करण्याबद्दलचा ठराव व लष्करी बाबतींतील अध्यक्षतेच्या अधिकारावर कांग्रेसचा अधिकार प्रस्थापित करण्याचा ठराव पास केला; या कारणामुळें अध्यक्षाचा स्वतंत्र अधिकार लुप्तप्राय झाला. तेव्हां आपल्या मंत्रिमंडळांतील आपल्या विरुद्ध असलेल्या सभासदांना त्यांची मुदत भरण्यापूर्वीच काढून टाकण्याचा जॉनसननें प्रयत्न केला. त्यावर नोकरीच्या मुदतीचा कायदा मोडल्याबद्दल जॉनसनवर आरोप ठेवून त्याला अध्यक्षपदावरून दूर करण्याचा कांग्रेसनें उपक्रम केला. पण आरोप इतका क्षुल्लक व पुरावा इतका लंगडा होता कीं, शाबितीकरितां लागणारें

दोनतृतीयांश मतांचें मताधिक्य न झाल्यामुळें जॉनसन निर्दोषी ठरला. यापुढें त्याच्या कारकीर्दीत विशेष महत्त्वाच्या गोष्टी कांहींच झाल्या नाहींत. स. १८६९ मध्यें मुदत खलास होतांच तो स्वस्थ घरीं बसला व शेवटीं स. १८७५ जुलै ३१ रोजीं तो मरण पावला.

जॉनसननें अँड्रू जॅकसनला आपला राजकीय गुरु केलें होतें. त्याचें शिक्षण अव्यवस्थित व उच्च दर्जापर्यंत झालेलें नसल्यामुळें त्याला दूरदृष्टि नव्हती; त्यामुळें राजकारणांत तो मागासलेलाच राहिला. लिंकनचा खून झाल्यामुळें अध्यक्षाची जागा त्याच्या गळयांत आकस्मिक पडली आणि त्या जबाबदारींतून सुटतां सुटतां त्याच्या नाकीं नव आलें. तो वक्ता होता तरी त्याचीं भाषणें सामान्य प्रतीचीं होत. त्याला दारूचें व्यसन फार होतें. कांग्रेसमधील एखाद्या पक्षाचा पुढारी होण्याचीहि पात्रता त्याच्या अंगीं नव्हती; मात्र त्याचा प्रामाणिकपणा व धैर्य हे दोन गुण त्याच्या शत्रूंनीहि मान्य केले आहेत. [ एनसाक्लो. ब्रिटा. पु. १५ ]

**जॉनसन, डॉ. साम्युएल** ( १७०९–१७८४ )— हा सुप्रसिद्ध ग्रंथकार व शब्दकोशकार इंग्लंडांतील स्टाफर्डशायरमध्यें लिचफील्ड गांवीं गरीब पण सालस व संभावित घराण्यांत जन्मला. जॉनसनचा बाप पुस्तकें विकणारा दुकानदार होता. जॉनसनला लहानपणीं ' स्क्राफ्युला ' नांवाचा रोग झाला होता. तो अनेक औषधांनीं किंवा तत्कालीन समजुतीप्रमाणें, इंग्लंडची राज्यकर्त्री ॲन राणी हिच्या हस्तस्पर्शानेंहि बरा झाला नाहीं. जॉनसनचा आरंभीं विद्याभ्यास लिचफील्ड गांवीं झाला. त्याची बुद्धि अति चलाख व स्मरणशक्ति विलक्षण असल्यामुळें जें एकदां वाचलें किंवा ऐकिलें तें त्याच्या कायम लक्षांत राहात असे. तथापि तो शरीरानें भला भक्कम व धष्टपुष्ट असल्यामुळें उनाड पोरांच्या दांडगाईंत त्याचा पहिला नंबर असे. त्यामुळें शाळेंत मास्तरांचा मार त्याला वारंवार खावा लागे. या तत्कालीन शिक्षापद्धतीबद्दल जॉनसन शेवटपर्यंत म्हणे कीं, पंतोजींनें जर मला मरेमरेतों खूप मारलें नसतें तर माझ्या हातून कांहीं शिकणें झालें नसतें. असो. पुढें १९ व्या वर्षी तो ऑक्सफोर्ड युनिव्हर्सिटीच्या पेंब्रोक कॉलेजांत राहिला. पण पुढें तीन वर्षांनीं खर्च न झेपल्यामुळें डिग्री घेण्यापूर्वीच तो घरीं परत आला. तथापि लहानपणापासून बापाच्या दुकानांतले ग्रंथ वाचण्याचा नाद लागल्यामुळें जॉनसनला लॅटिन, ग्रीक, इटालियन या भाषांचें सुद्धां इतकें ज्ञान झालें होतें कीं, त्याच्या कॉलेजांतील प्रोफेसरहि अचंबा करीत असत.

याच सुमारास त्याचा बाप वारला. पुस्तकविक्रीचें दुकान चांगलें चालत नसल्यामुळें जॉनसननें चरितार्थाकरितां एका शाळेंत नोकरी धरली; पण तेथें न जमल्यामुळें त्यानें बर्मिंगहॅम येथें जाऊन 'अबिसिनिया देशाची सफर ' या नांवाच्या फ्रेंच ग्रंथाचें भाषांतर करून पांच पौंड मिळविले. पुढें एका लॅटिन कवीचे ग्रंथ छापण्याविषयीं जाहिरात त्यानें दिली पण त्यास आश्रय मिळाला नाहीं. बर्मिंगहॅम येथें असतांना जॉनसनचा एका व्यापाऱ्याच्या एलिझाबेथ पोर्टर नांवाच्या विधवेशीं प्रेम जमून विवाह झाला, त्यावेळीं त्या बाईचें वय जॉनसनच्या वयाच्या दुप्पट म्हणजे अठ्ठेचाळीस वर्षांचें होतें. लग्नसमयीं बायकोकडून आठशें पौंड त्यास मिळाले, त्या पैशावर जॉनसननें एक स्वतःचें विद्यालय सुरू केलें. त्यांत इंग्लंडचा सुप्रसिद्ध नट गॅरिक हा एक विद्यार्थी होता, तो पुढें या जॉनसनजोडप्याच्या मजेदार नकला करीत असे. जॉनसनच्या अंगीं शिक्षकाला लागणारे गुण नसल्यामुळें त्याचें विद्यालय लवकरच मोडलें आणि या उद्योगांत जॉनसनला बायकोकडून मिळालेला सर्व ऐवजहि संपला.

पुढें स. १७३७ मध्यें जॉनसन, लेखणीवर चरितार्थ चालविण्याचें ठरवून गॅरिकसह लंडनला आला. येथें त्यानें फ्रेंच, इटालियन, लॅटिन वगैरे ग्रंथांचीं भाषांतरें, नव्या ग्रंथांवर टीका, प्रसिद्ध पुरुषांचीं चरित्रें, निरनिराळ्या विषयांवर निबंध व कविता, नाटककारंभींच्या सामाजिक विज्ञापना, ग्रंथार्पणपत्रें, पुस्तकालयांतील ग्रंथांची विषयवार याद, याप्रमाणें जो जो उद्योग सांपडेल तो तो त्यानें केला. तथापि लंडनमधील त्याचीं पहिलीं पंचवीस वर्षे विपत्तींतच गेलीं. पोटाची चिंता कधीं सुटली नाहीं, कधींकधीं तर त्याला दोनदोन दिवस अन्नावांचून काढावे लागले. कर्जामुळें दोनदां नाझरच्या शिपायानें पकडलें असतां त्याला त्याचा मित्र प्रख्यात कादंबरीकार रिचर्डसन यानें उसने पैसे देऊन सोडविलें. अशा विपन्न स्थितींत त्याला ऐन उमेदीचे व भर तारुण्याचे दिवस काढावे लागले. तरी पण त्याची नीति व सदाचरण हीं सुटलीं नाहींत. जॉनसननें लंडनमध्यें आल्यावर ' लंडन ' व ' मानवी आशेचें वैफल्य ' हीं दोन काव्यें, ' ऐरिन ' नांवाचें नाटक, सॅव्हेज नामक मित्राचें चरित्र वगैरे ग्रंथरचना केली व तेवढ्यानें त्याची प्रसिद्धि बरीच झाली. नंतर १७४७ सालीं जॉनसनला लंडनमधील कित्येक पुस्तकवाल्यांनीं मिळून ' इंग्रजी भाषेचा कोश ' तयार करण्यास सांगून १५७५ गिनी देण्याचें कबूल केलें. या कोशाला पूर्वसंकल्पित दोनतीन वर्षे न पुरतां ७।८ वर्षे लागलीं पण मोठ्या चिकाटीनें व परिश्रमपूर्वक जॉनसननें हा तीसचाळीस हजार शब्दांचा कोश तडीस नेला. या कोशांत कांहीं शब्दांचे फार चमत्कारिक अर्थ दिले आहेत. जॉनसन ' टोरी ' पक्षाचा असल्यामुळें ' टोरी ' म्हणजे परंपरागत धर्माला व राज्यव्यवस्थेला पाठिंबा देणारा, 'व्हिग' म्हणजे धर्माची व राज्याची उलथापालथ करणारा, ' कोशकार ' म्हणजे. एक प्रकारचा निरुपद्रवी हमाल, 'देशभक्ति' म्हणजे सर्व प्रकारच्या लवाड्यालाचाड्या करून त्या फुकट गेलेल्या पाहून पाजी लोक ज्या शेवटच्या लबाडीचा उपयोग करतात ती लबाडी, वगैरे अर्थ दिले आहेत. तथापि हा इंग्रजी भाषेचा पहिलाच कोश असल्यामुळें येथपासून त्याची संपत्ति व कीर्ति हीं वाढत जाऊन त्याचें पुढील आयुष्य बरेंच सुखानें व स्वस्थतेंत गेलें.

कोशाच्या कामगिरीच्या काळांतच जॉनसननें 'रँबलर' व 'ऐडलर' हे दोन निबंधसंग्रह लिहिले. कोशानंतरचा ग्रंथ प्रसिद्ध कादंबरी 'रासेलस' हा होय. हिचें संविधानक अगदीं लहान व सार्धे असलें तरी भाषेचा भारदस्तपणा व डौल, वर्णनाची मोहक शैली व आयुष्यांतील स्थित्यंतरांचें यथार्थ व चित्तवेधक विवेचन या गुणांमुळें ही कादंबरी इतकी लोकप्रिय झाली कीं लवकरच तिचें भाषांतर यूरोपांतल्या साऱ्या भाषांतून झालें. कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीं याचें उत्कृष्ट मराठी भाषांतर केलें आहे. १७६० सालापासून जॉनसनची सांपत्तिक स्थिति चांगली सुधारत गेली. तिसऱ्या जॉर्ज राजानें मंत्रिमंडळाच्या सल्ल्यावरून जॉनसनच्या ग्रंथकर्तृत्वाबद्दल त्याला सालीना तीनशें पौंड वर्षासन सुरू केलें. येथपासून जॉनसन तत्कालीन पंडितमंडळांत अग्रगण्य ठरून मोठमोठे विद्वान व ग्रंथकार त्याच्याशीं शिष्याप्रमाणें वागूं लागले. जॉनसनला वादविवादाची विशेष हौस असल्यामुळें याच सुमारास त्यानें एक क्लब काढला, तो 'जॉनसन्स क्लब' म्हणून ५०-६० वर्षें चालू होता. या क्लबांत जॉनसनचा समकालीन प्रसिद्ध राजकारणी पुरुष बर्क, इतिहासकार गिबन, नटवर्य गॅरिक, कादंबरीकार गोल्डस्मिथ, चित्रकार रेनॉल्डस्, प्रख्यात वक्ता फॉक्स, भाषाभिज्ञ सर विल्यम जोन्स वगैरे मंडळी असून तीं दर आठवड्यास एकदां एकत्र जमत व तेथें जेवण व संभाषण हीं दोन्ही कामें बरोबर चालत. संभाषण बहुधां जुन्या व नव्या ग्रंथकारांबद्दल चालें. जॉनसनचें चरित्र लिहिणारा सुप्रसिद्ध बॉसवेल हा या क्लबचा अनेक वर्षें सभासद होता व त्यानें जॉनसनच्या व त्याच्या मित्रमंडळीच्या भाषणरत्नांचा संग्रह 'जॉनसनचें चरित्र' या ग्रंथांत मोठ्या चातुर्यानें करून ठेवला आहे.

सांपत्तिक स्थिति सुधारतांच जॉनसनचा पोष्यवर्गहि वाढला. त्याची बायको स. १७५२ मध्येंच वारली होती पण जॉनसननें आपल्या घरीं कित्येक पंगु, निराश्रित स्त्रीपुरुषांना आश्रय दिला होता. तो स्वतः मात्र थ्रेल नांवाच्या श्रीमंत इसमाच्या घरीं रहात असे. कारण मिस्टर व मिसेस थ्रेल यांनीं त्यास भक्तिपूर्वक ठेवून घेतलें होतें.

१७७३ सालीं जॉनसननें बॉसवेलबरोबर हिब्रिडीज बेटांची सफर केली व तिचें वर्णन प्रसिद्ध केलें. नंतर त्यानें शेक्सपीअरच्या नाटकांची सटीक आवृत्ति मोठ्या प्रस्तावनेसह काढली. जॉनसनचा शेवटचा ग्रंथ 'कविचरित्रें' हा त्यानें १७७७ सालीं म्हणजे वयाच्या सत्तराव्या वर्षीं हातीं घेतला. त्यांत सॅव्हेज, कौले, ड्रायडन, पोप, ग्रे, मिल्टन वगैरे दहा कवींचीं चरित्रें लिहून स. १७८१ मध्यें ग्रंथ पुरा केला. जॉनसनच्या एकंदर ग्रंथांत हा सर्वोत्कृष्ट असून तो तात्वडतोब लोकप्रिय झाला. यापुढील जॉनसनच्या आयुष्याचीं वर्षें इष्टमित्रांचें वियोगदुःख व वार्धक्यक्लेश यांत जाऊन तो जलोदरानें स. १७८४ मध्यें मरण पावला. त्याचें शव वेस्टमिनिस्टरच्या विख्यात स्मशानभूमींत ठेवण्यांत आलें आणि त्याचा पुतळा सेंट पॉल चर्चमध्यें अग्रभागीं स्थापिला आहे. जॉनसनच्या मागें त्याची एक सावत्र मुलगी होती. त्यानें आपली सर्व जिंदगी व सुमारें पंधरा हजारांचा ऐवज आपल्या फार वर्षें जवळ असलेल्या शिद्दी चाकरास दिला. जॉनसनचें शरीर दांडगें होतें, पण उतार वयांत तर तें अवजड, चेहरा शस्त्रक्रियेमुळें विद्रुप आणि त्यांची दृष्टि अधू बनली होती. शिवाय त्याला एक मेंदूचा रोग जडला होता त्यामुळें त्याचा स्वभाव त्रासिक व कांहींसा भ्रमिष्टासारखा बनला होता. तो मूळपासूनच तापट, सत्यप्रिय, निस्पृह व मानी होता. त्याची कल्पनाशक्ति फारशी सूक्ष्म व चलाख नसून बोजड व अवजड अशा तऱ्हेची होती पण तर्क उर्फ विवेचनशक्ति मात्र विशेष प्रखर बनली होती. त्यामुळेंच काव्यकादंबरीनाटक यापेक्षां टीकात्मक ग्रंथाबद्दल व वादविवादपटुत्वाबद्दल त्याची कीर्ति फार आहे. जॉनसन हा इंग्रजसमाजाचा प्रतिनिधिभूत इसम गणला जातो. म्हणजे जॉनसनच्या अंगचे गुण व त्याचप्रमाणें दोष हे सर्वसाधारणतः एकंदर इंग्रज समाजाच्या अंगीं दिसून येतात.

[ बॉस्वेलनें स. १७९१ त प्रसिद्ध केलेलें जॉनसनचें चरित्र; मिसेस पिओझी, रेनॉल्डस् वगैरेंच्या आठवणी; मेकालेचा जॉनसनवरील निबंध व त्याचाच विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं निबंधमालेंत केलेला अनुवाद, इत्यादि संदर्भग्रंथ होत. ]

**जानसार बावर**—हें संयुक्तप्रांतांतील एका परगण्याचें नांव असून डेहराडून जिल्ह्यांतील चक्रात तहशील यानें व्यापिली आहे.

**जॉन, सेंट**—हें डॅनिश वेस्ट इंडीजमधील बेट सेंट टॉमसच्या पूर्वेस ४ मैलांवर आहे. हें १० मैल लांब व ४॥ मैल रुंद असून याचें क्षेत्रफळ २१ चौ. मैल आहे. हें बेट डोंगराळ पण चांगलें सुपीक असून यांत पाण्याचा पुरवठा चांगला आहे. येथें व्यापार फारच थोडा चालतो. लोकसंख्या सुमारें एक हजार आहे.

**जानीबेग तुर्खन मिर्झा**—हा ठठ्ठाचा नबाब होय. हा त्याच्या आजाच्या मागून स. १५८४ मध्यें नबाब झाला. हा गादीवर बसल्यानंतर आपल्या भेटीस येईल अशी अकबरशहास खात्री वाटत होती. पण हा गेला नाहीं. तेव्हां अकबरानें याच्यावर अबदुल रहीम यास पाठविलें (१५९१). अबदुलनें प्रथम जानीबेगचा पराभव केला व पुढें पुढेंहि त्याच्या सैन्याचा नाशच होत गेला म्हणून त्यानें अकबराचें मांडलिकत्व पत्करलें. तो स्वतः अकबरास जाऊन भेटला (१५९२). तेव्हां त्यानें त्याला मोठी अमिरी दिली. मात्र तेव्हांपासून सिंधप्रांत मोंगलांच्या साम्राज्यांत मोडूं लागला. जानी हा बुऱ्हाणपुरास स. १५९९ त मेला; व त्याच्या मागून त्याचा पुत्र मिर्झा गाझी हा ठठ्ठयाचा नबाब बनला. [ बील ]

**जानेफळ**—वऱ्हाड–मध्यप्रांत. तालुका मेहकर, जिल्हा बुलढाणें. मेहकरच्या उत्तरेस सुमारें १० मैलांवर हें खेडेंगांव आहे. लोकसंख्या सुमारें दोन हजार. गांवास गढी आहे. पूर्वी हा गांव देऊळगांव ( राजाच्या ) जाधव घराण्याकडे होता. गांवाच्या मध्यभागीं एक दिपमाळ आहे. येथें मुकुंदराज नांवाच्या एका साधूची जुनी समाधी आहे. हा मुकुंदराज प्रख्यात विवेकसिंधुकार मुकुंदराज नसून दुसराच असावा. येथील पाटिलकी शिंदखेडकर जाधवराव घराण्यांत पूर्वापार होती. येथें या जाधवांनीं एक गढी बांधली आहे. बुलढाणा जिल्हा होण्यापूर्वी या गांवींच ( अव्वल इंग्रजींत ) जिल्ह्याचें मुख्य ठिकाण होतें. [ काळे–वऱ्हाडचा इतिहास ]

**जानोजी निंबाळकर**—हा मोंगलाई ( निजामचें राज्य ) मधील रावरंभा निंबाळकर घराण्याचा मूळपुरुष.याचा बाप सुलतानजी. हा पेशव्यांच्या राजकारणांत पेशव्यांच्या बाजूनें पुष्कळ वेळां पडत असे. मोंगलाईंत सर्वांत मोठी मराठ्यांची जहागीर या रावरंभाचीच आहे. निजामुलमुल्क मेल्यानंतर गाजीउद्दीन यास गादीवर बसवून मोंगलाई हाताखालीं आणण्याच्या नानासाहेब पेशव्यांच्या मसलतीला याची अनुकूलता होती. ताराबाईनें निजामाकडे केलेलें पेशव्यांच्या विरुद्ध कारस्थान ( १७५१ ) मोडून सलाबतजंगाचा व नानासाहेबांचा स्नेहाचा तह याच जानोजीनें पानगळ येथें घडवून आणला. या कामासाठीं जानोजी त्या सालच्या आगष्ट महिन्यांत पुण्यास पेशव्यांच्या दरबारीं वाटाघाटी करण्यास पुष्कळ दिवस येऊन राहिला होता. जानोजी बहुधा करमाळें येथें राहत असे. नानासाहेब पेशवे व बुसी यांचें एक कारस्थान निजामचें राज्य सपशेल बुडवावें असें होतें, त्यास जानोजी मधून मधून मदत करी; परंतु हें कारस्थान शेवटास गेलें नाहीं. विश्वासराव पेशव्यानें सिंदखेडची जी स्वारी निजामावर केली, तींत जानबा हा निजामातर्फे हजर होता, ( १७५७ ). उद्गीरच्या लढाईंत हा हजर नसून घरींच राहिला होता. [ राजवाडे खंड, १, ३; भाऊसाहेबांची बखर; नानासाहेबांची रोजनिशी; सानेे–पत्रें, यादी. ]

**जाफना**—या शहराचें तामिळ नांव यह्नानस् असें आहे. हें सीलोन बेटांतील एक गांव आहे. येथील लोकसंख्या १९११ सालीं ४०४४१ होती. येथील नारळांची वाढ अलीकडे खुंटली आहे. येथील मूळचे रहिवाशी तंबाखु उत्पन्न करून ती परदेशीं पाठवितात. येथें दर आठवड्यास आगबोट येत असल्यामुळें येथील व्यापारास बरेंच उत्तेजन मिळालें आहे. १९०० सालीं या शहरीं आगगाडी चालू करण्यांत आली. येथें सरकारी एजंट व जिल्हान्यायाधीश राहतात. येथें वरिष्ठ फौजदारी न्यायकचेरीची बैठक असते. तेथील ताडाच्या झाडांपासून एक प्रकारचें सूत काढतात.

हें शहर तामिळ लोकांनीं खि. पू. २०४ या वर्षी स्थापन केलें. येथें स. १६१७ पर्यंत तामिळ राजे राज्य करीत होते; परंतु १६१७त हें पोर्तुगीज लोकांनीं घेतलें. स. १५४४ मध्यें सेंटझेवियर यानें येथील कांहीं लोकांस ख्रिस्ती धर्माची दिक्षा दिली.येथें जेसुइट लोकांचें एक विश्वविद्यालय असून डोमिनेकन पंथाचा एक मठ होता.१६५८सालीं डच लोकांनीं पोर्तुगीज लोकांस हाकून लाविलें येथें १८१८ त इंग्रज मिशनरी व स. १८२२ त अमेरिकन मिशनरी मंडळाचा प्रवेश झाला.

**जाफरखान**—या उमदत्–उल्–मुल्क हा किताब होता. याचा बाप सादिकखान हा शहाजहान याचा मीरबक्षी होता. शहाजहाननें जाफरखान यास पंचहजाराची मनसब दिली व औरंगझेबानें त्याला आपला मुख्य वझीर केलें ( १६६२ ). हा शहाणा व दूरदृष्टीचा होता. हा स. १६७० त दिल्ली येथें मेला, पुढें कांहीं दिवसांनीं त्याच्या अस्थि दिल्लीहून काढून आग्रा येथें नेल्या. हल्लीं आग्र्यास यमुनेच्या उजव्या तीरावर याचें थडगें आहे. [ मआसीर–ई–अलमगिरी; बील—ओरि. बायाग्रॉ. डिक्शनरी ]

**जाफराबाद**, संस्थान.—मुंबई इलाख्यांत काठेवाड पोलिटिकल एजन्सीमध्यें हें संस्थान आहे हें संस्थान कोंकण किनाऱ्यावर जंजिऱ्याच्या नवाबच्या अमलाखालीं आहे. मुंबईपासून हें संस्थान १६५ मैल आहे. येथें दरवर्षी २५ इंच पाऊस पडतो. ज्यावेळीं मोंगल बादशहांची सत्ता काठेवाड मुलखांत कमी कमी होऊं लागली त्यावेळीं म्हणजे स.१७३६ च्या सुमारास ठिकठिकाणचे ठाणेदार स्वतंत्र झाले व त्यांनीं मुसुलमान लोकांची शिबंदी व मूळचे कोळी लोक ह्यांस घेऊन चांचेगिरी सुरू करून सुरतेच्या व्यापारास बराच प्रतिबंध केला. तेव्हां जंजिरा येथील शिद्दी हिलाल यानें ह्या लोकांचें बंड मोडून टाकलें, त्यांचीं जहाजें नाहींशीं केलीं व जाफराबादच्या ठाणेदारांकडून जबर खंडणी मागितली.ही खंडणी देण्याचें सामर्थ्य ठाणेदारांत नसल्यामुळें त्यानें जाफराबाद संस्थान शिद्दीस विकलें. परंतु त्या शिद्दीस त्या संस्थानची व्यवस्था राखतां न आल्यामुळें त्यानें हें संस्थान १७६२ मध्यें जंजिऱ्याच्या नवाबाच्या ताब्यांत दिलें व आपण त्या नवाबातर्फे त्या संस्थानचा सुभेदार झाला.

ह्या संस्थानची लोकसंख्या सन १९११ मध्यें १२३७३ होती. ह्या संस्थानचीं मुख्य पिकें बाजरी, कापूस व गहूं हीं होत. येथें इमारती बांधण्यास उपयोगी दगड पुष्कळ मिळतात व जाडेभरडें कापडहि तयार होतें. एकंदर संस्थानचें उत्पन्न सन १९०३–४ मध्यें ६२००० हजार होतें. ह्या संस्थानांत मुख्य शहर जाफराबाद आहे व तेथें म्युनिसिपालिटी आहे.

शहर.—जाफराबाद संस्थानचें हें मुख्य शहर आहे. येथील लोकसंख्या ( १९११ ) ५५८८ असून हें समुद्रकिनाऱ्यापासून एक मैलावर रणाई नदीच्या तीरावर आहे व ही नदी दळणवळणास फार सोयीची आहे. त्यामुळें ह्या शहराचा व्यापार मोठ्या प्रमाणांत चालतो. ह्या शहराचें हें नांव गुजराथच्या मुझफर नांवाच्या नबाबावरून पडलेलें

आहे. ह्या शहरीं जंजिऱ्याच्या नवाबाचा प्रतिनिधि म्हणून एक मामलतदार असतो व त्यास न्यायाधीशाचा व मुलकी कामगाराचा असे दोनहि अधिकार आहेत.

**जाफराबाद**—संयुक्तप्रांत, जोनपूर जिल्हा व तहशिलींतील हें शहर गोमती नदीच्या उजव्या किनाऱ्यावर वसलेलें असून औध—रोहिलखंड रेल्वेवर जोनपूर शहरापासून ५ मैल आहे. येथून नुकताच एक फांटा अलाहाबादला नेला आहे. याची लो. सं. १९०१ सालीं ३६१८ होती. या शहरासंबंधीं दंतकथा बऱ्याच आहेत. १३२१ सालांत ग्यासुद्दीन तघलखनें आपला मुलगा जाफर याजला रजपुतांचा मोड करण्याकरितां जाफराबादेस पाठविलें होतें. त्यानें लढाईच्या ऐवजीं धर्मावर चर्चा करून पुष्कळ रजपुतांस मुसुलमान केलें. पुढें जाफरखानाने तेथील सुभा देऊन गांवचें नांव जाफराबाद ठेविलें. १३५९ सालीं फिरोझ तघलखनें दुसरें शहर वसविण्याचा प्रयत्न केला होता. तेथें देवळें, इमारती, थडगीं वगैरे बरीचशीं आढळतात. पूर्वी येथें कागद तयार करण्याचे कारखाने बरेच होते. आतां कांहीं एक नसून कारागीर लोक गांव सोडून कलकत्ता वगैरे ठिकाणीं उदरनिर्वाहाकरितां गेलेले आहेत. येथें ३ शाळा आहेत.

**जांब**—हें नांव कांहीं ठिकाणीं पेरूस व काजूच्या फळास लावतात. परंतु ह्याखेरीज जांब नांवाचें निराळें झाड आहे व त्याच्या दोन जाती असून एकीस आंबट जांब व दुसरीस गोड ( मलाखी ) जांब असें म्हणतात. आंबट जांबाचें झाड उंच असतें व त्यास तांबड्या रंगाचीं फुलें येतात; व त्याचीं फळें पांढरीं व मोठीं असतात. व तीं मार्गशीर्ष व पौष या महिन्यांत येतात. मलाखी जांबाचें झाड बहुतकरून मलाका बेटांतून आलें असावें. हें झाड उंच वाढत नाहीं. यांस पांढऱ्या रंगाचीं फुलें येतात व फळें पिंवळसर असतात. तीं मधुर असून त्यांस सुवासहि येतो. हीं झाडें वर्षांतून दोन वेळ पिकतात. " पेरू " व " काजू " या शब्दांखालील लेखहि पाहावेत.

**जांबवान**—ब्रह्मदेवाच्या जांभईपासून उत्पन्न झालेला वानर हा मोठा पराक्रमी होता व रामावतारीं यानें रामाला पुष्कळ सहाय्य केलें. हा कृष्णावतार होईपर्यंत होता असें वाटतें. याशीं किंवा याच्या वंशांतील कोणा एका जांबवानाशीं कृष्णाचें स्यमंतकमण्याच्या प्रसंगानें युद्ध होऊन त्यानें आपली कन्या जांबवती कृष्णास दिली होती. [ वा. रा. बाल व युद्धकांड .]

**जाबाल**—एक ऋषि. याचेंच सत्यकाम असें दुसरें नांव आहे. याच्यासंबंधीं छांदोग्य व बृहदारण्यक उपनिषदांत आलेली कथा ज्ञानकोश विभाग २, पृष्ठ १६६ येथें दिली आहे. ऐतरेय ब्राह्मणांत ( ८ ७ ) क्षत्रियांनां होणाऱ्या राज्याभिषेकप्रसंगीं पठण करावयाच्या मंत्रासंबंधीं जाबालानें आपलें एक विशिष्ट मत दिल्याचा उल्लेख आहे.

जा बा ल शा खा.—शुक्लयजुर्वेदापैकीं वाजसनेयी यांच्या सतरा भेदांपैकीं जाबाल हा एक शाखाभेद असल्याचा उल्लेख चरणव्यूहांत आहे (चरणव्यूह पहा ). जाबाल शाखेबद्दल माहिती पूर्वी ज्ञानकोश वि. २ पृष्ठ १९६ येथें दिली आहेच. चरणव्यूहाच्या एका हस्तलिखित प्रतींतील टीकेंत दिलेल्या कालिकापुराणांतील एका अवतरणांत ' जमदग्नीचा पुत्र जय व जयाचा जाबाल ' असा उल्लेख दिला आहे व त्याच टीकेंत सह्याद्रिखंडांतील एका उताऱ्यांत ' जाबाल हे पंक्तिपावन असून त्यांची वस्ती पयोष्णी नदीतीरीं असल्याचा उल्लेख केलेला आढळतो. वऱ्हाडांत अकोला जिल्ह्यांत " जाबालसंघ " नांवाची एक संस्थाहि असल्याचें समजतें.

जा बा लो प नि ष द्.—जाबालाच्या नांवावर एकंदर तीन उपनिषदें आहेत. एक जाबालदर्शनोपनिषद्, दुसरें बृहज्जाबालोपनिषद् व तिसरें जाबाल्युपनिषद्. पहिल्यामध्यें योगाभ्यासासंबंधीं माहिती असून दुसऱ्यांत प्रजापतीपासून उत्पन्न झालेल्या भुसुंडीनें भस्ममहिमा कथन केला आहे व त्याला त्या उपनिषदांतच 'बृहज्जाबालाभिधा मुक्तिश्रुति' असें म्हटलें आहे. तिसऱ्यांत जाबालीनें पैप्पलादीस भस्मधारणमाहात्म्य सांगितलें आहे. या उपनिषदांत जाबाल या व्यक्तीचा उल्लेख नसून जाबालि असें नांव आढळतें. परंतु उपनिषदांतील विषयसाम्यामुळें कदाचित जाबाल व जाबालि या व्यक्ती दोन नसून एकच व्यक्ति असावी अशी कल्पना होते.

**जांबु घोडा**—मुंबई, रेवाकांठा. नारूकोट संस्थानचें मुख्य ठिकाण. हें वायव्येस सुमारें १।२ मैलांवर झोटवार येथें येथील सरदार राहतो. येथें स. १८५८ त रुपा व केवळ यांच्या पुढारीपणाखालीं नाइकांनीं एका ब्रिटिश तुकडीवर हल्ला केला होता. येथें एक शाळा व रुग्णालय आहे.

**जाब्लोस्काव, पाल** ( १८४७–१८९४ )-या रशियन विद्युच्छास्त्रज्ञाचा जन्म रशियांतील सरडाब्स्क गांवीं झाला. १८७१ सालीं त्याला रशियनसरकारनें तारायंत्रखात्यावर डायरेक्टर नेमलें होतें; परंतु १८७५ सालीं त्यानें या जागेचा राजीनामा देऊन विद्युद्दीपांत लक्ष्य घातलें. १८७६ सालीं तो पॅरीस शहरीं रहावयास गेला, व या वर्षाच्या अखेरीस त्यानें एक वैद्युतिक मेणबत्ती शोधून काढली; या मेणबत्तीस त्याचेंच नांव दिलें आहे. कार्बनच्या कांड्या समान्तर ठेवून त्यांच्या दरम्यान योग्य विद्युद्रोधक पदार्थ बसवून त्या कांड्यांतून विद्युत्प्रवाह पाठवून एक प्रकारचा दीप तयार करतां येतो, असें त्यानें दाखवून दिलें. कांहीं काळपर्यंत या दिव्यांचा प्रसार झाला. परंतु याहिपेक्षां जास्त उपयुक्त अशा विद्युद्दीपाची युक्ति निघाल्यामुळें हे दिवे मागें पडले. जाब्लोस्काव यानें विद्युच्छास्त्रांत दुसरे कांहीं शोध लावले आहेत, परंतु तो रशियांत परत गेल्यावर दारिद्र्यांत मृत्यु पावला.

**जांभळी जमीनदारी**—मध्यप्रांत, भण्डारा जिल्हा, साकोली तहसिलीच्या वायव्येस ही जमीनदारी असून हिचें

एकंदर क्षेत्रफळ १५ चौरस मैल आहे. पैकीं ⅔ जंगल आहे. जमीनदार राजगोंड असून मांडला राजांच्या वेळेपासून ही जमीनदारी यांच्याकडे चालत आहे. उत्पन्न १३०० रु. व टाकोळी ३७५ रुपये.

**जांभूळ**—या वृक्षास संस्कृतमध्यें जंबूवृक्ष,राजजंबू; मराठींत जांभूळ; गुजराथींत जांबुडा इत्यादि नांवें आहेत. हिंदुस्थानांत जांभळीचीं झाडें सर्वत्र होतात. हा वृक्ष फार उंच वाढतो. याचीं पानें बकुळीच्या पानांप्रमाणें असतात. जांभळीच्या झाडास वैशाख–ज्येष्ठांत फळें येतात. या फळांचा रंग बाहेरून काळसर व आंतून तांबूस असतो. जंगली जांभळीचीं फळें बारीक असतात. परंतु बगीच्यांतील झाडांचीं फळें मोठीं असून गोड असतात. त्या झाडांस रायजांभूळ असें म्हणतात. जांभूळ हें शरीरास हितकारक आहे. जांभळीची छाया फार थंड असून सुखदायक असते. जांभळीचें लांकूड फार चिवट असतें. तें पाण्यांत कुजत नाहीं. हें लांकूड इमारतकामासहि उपयोगी पडतें. जांभळीच्या लांकडांत पाणी स्वच्छ करण्याचा मोठा गुण आहे. ज्या तळ्यांत शेवाळ वगैरे झालें असेल त्यांत जांभळीचे ठोकळे टाकले तर पाणी स्वच्छ होतें. याचे औषधी उपयोगहि बरेच आहेत.

**जांभेकर, बाळ गंगाधर** ( १८१०—१८४६ )—एक महाराष्ट्रीय पंडित व ग्रंथकार. राजापुराजवळ पोंभुर्लें गांवीं यांचा जन्म झाला. याना इंग्लिश, संस्कृत, कानडी, फारशी वगैरे भाषा येत असून भारतीय व पाश्चात्य ज्योतिष व इतर विद्यांतहि हे निष्णात होते.स.१८२९ मध्यें एलफिन्स्टन विद्यालयांत गणितशास्त्र व ज्योतिष शिकविण्याला यानां प्रोफेसर नेमिलें. मुंबईंतील जिऑग्रफिकल व रॉयल एशियाटिक सोसायटी यांच्या विद्यावृद्धीच्या प्रगतीला बाळशास्त्रयानीं पुष्कळ मदत केली. यानीं कित्येक ग्रंथ तयार केले, त्यांपैकीं बालव्याकरण, नीतिकथा, सारसंग्रह, भूगोलविद्या, इंग्लंड देशाचा इतिहास, एलफिन्स्टनकृत हिंदुस्थानच्या इतिहासाचा संक्षेप, इत्यादि होत. भूगोलशास्त्र व गणितभाग या ग्रंथांचे मराठी भाषेंत उतारे त्यानींच केले. शिवाय मरेचें व्याकरण शोधिलें.

दर्पण नांवाचें साप्ताहिक पत्र यानीं कित्येक वर्षे चालविलें. हें पत्र मराठी व इंग्लिश भाषांत होतें. दिग्दर्शन नांवाचें मासिक पुस्तक यांच्याच आश्रयानें कांहीं वर्षें निघत होतें.

**जामखेड**—मुंबई. अहमदनगर जिल्ह्याचा एक तालुका. उत्तर अक्षांश १८° ३३′ ते १८° ५२′ व पूर्व रेखांश ७५° ११′ ते ७५° ३५′. क्षेत्रफळ ४६८ चौरस मैल. यांत एक गांव व ७५ खेडीं आहेत. लोकसंख्या १९११ मध्यें ७८९६७ होती. स. १९०३-४ सालीं उत्पन्न १०७००० रु. होतें.जामखेड हें ठाण्याचें गांव असून तेथें सरकारी कचेऱ्या आहेत. जवळच रामेश्वर महादेवाचें स्थान आहे.

**जामगड**—वऱ्हाडांतील मेळघाट प्रांतांत जामगड ही एक लहानशी जहागीर आहे. तिचें उत्पन्न साडेचार हजार रुपयांचें आहे हा प्रांत बहुतेक डोंगराळ असून शेतीचें उत्पन्न कमी येतें. शेती वाहणाऱ्या कुळांनां विशेष हक्क नाहींत. येथील जहागीरदारास राजा म्हणतात; त्याच्या मर्जीस येईल तेव्हां तो कुळाकडून जमीन काढून घेतो. या भागांत शिक्षण फार कमी आहे. प्रख्यात तंट्या भिल्ल हा या मेळघांटांतच वावरत होता. [ काळे–वऱ्हाडचा इतिहास ]

**जामतारा**—बिहारओरिसा. संताळ परगण्याचा नैर्ऋत्येकडील एक पोटविभाग. उत्तर अक्षांश २३° ४८′ ते २४° १०′ व पूर्व रेखांश ८६° ३०′ ते ८७° १८′. क्षेत्रफळ ६९३ चौरस मैल. हा प्रदेश खडकाळ आहे. लोकसंख्या ( १९११ ) २०५६४६. यांत एकंदर १०७७ खेडीं आहेत.

**जामदारखाना**, जा व ता.—जामदारखाना म्हणजे राजाचें प्रावर्णागार (वस्त्र व कापडलत्त्याची कोठी ); हा कारखाना अठरा कारखान्यांपैकीं एक आहे ( 'अठरा कारखाने' पहा ). यावरील अधिकाऱ्याचें काय काम असे व त्याबद्दल सरकारांतून त्याला काय सन्मान व काय हक्क मिळत त्याची यादी खालीं दिली आहे. हे नियम साताऱ्याचे प्रतापसिंह छत्रपति यांनीं तयार करविले होते. प्रतापसिंहानें याप्रमाणें अठरा कारखान्यांचे व इतरहि राज्यकारभारांतील अनेक खात्यांचे धोर (नियम) बांधून दिले होते. जामखान्यावरील मुख्य अधिकाऱ्यास जामदार म्हणत. हल्लीं जामदार हें एक आडनांव आहे. दरोगा म्हणजे व्यवस्थापक; हल्लीं ज्यास सुपरिंटेंडेंट म्हणतात तसल्या दर्जाचा अधिकारी. १ दरोगे व कारकून व जामदार यांनीं एकंदर कापड शिलकी व खरेदी वगैरे जमा लिहून, जामदार यास यादीप्रमाणें रुजू करून देऊन खर्च, देणगी, मेजवानी व हुजूर पोशाख एकंदर यादीवर लिहून नंतर कापड, आज्ञेप्रमाणें खर्च होणें तें व्हावें. या कामांत कांहीं लबाडी न करतां इमानेंइतबारें सावधगिरीनें वर्तोन, कापडाचा जमाखर्च चूक लागो न देतां वरचेवर सरकारांत हिशेब दाखवून, शिल्लक बाकी कळवीत जावी. सदरहू लिहिलेप्रमाणें बंदोबस्त जलदीनें हुशारी राखोन व चाकरी करून दाखवील त्याजवर सरकार मेहेर होईल. स्वच्छतेनें असत जावें. घरास वगैरे जातां येतां हर्जीरनीस यास रुजू होऊन जात जावें. एक असामी कारकून यानीं बारीप्रमाणें हुजूर नेहमीं असावें. ज्याची विनंति व रदबदली करणें ती त्याचे समक्ष करूं नये. कारखाने मजकूरचे कामगिरीचे इरादे आहेत ते चालतच आहेत. परंतु सरकारचे मनांत जो कामांत वाकब दिसेल त्यास कामगारीस धाडतील. तो कारखान्याना इरादा नव्हे. सरकारांतून कायदे चालवयाचे. कापड खरेदी करणें व दरपेठेहून आणावयाचें जाहल्यास, खरेदी करावयास जाईल त्याजबरोबर कारकून व जामदार चौकस, सरकार किफायत करील, त्यास पाठविलें जाईल. रावत्यास सणगे लागतील तीं कारखान्यांतून घ्यावीं. खासे पोशाख व दागिने सणगाचे सरकारांत तयारी करून द्यावे.

कारखान्यांत जामदार व शिंपी व पटवेगार व परीट यांजपासून सरकारकाम घेत असावें. शेले दुपट्टे व चादरा ( छत्रपतींच्या ) अंगावर घालणें त्या जामदार यांनी चुणून द्याव्या.

जामदारखान्याकडून वस्त्रे पदार्थी न्यावयाची तेथें व लग्नपुत्रोत्साहानिमित्त वगैरे आहेर न्यावयाचे ते, कारकून व जामदार यांनी घेऊन जावे. कारखान्याकडे दागिने घेतून द्यावयाचे ते कारखानदार याच्या गुजारतीनें द्यावे.संक्रांतीच्या थैल्या व देवघराकडे शिलाईचें सामान, रेशीम, कलावतू वगैरे जें लागेल तें खरेदी करून काम करीत जावें. ज्या कारखान्याकडे लागेल तसें द्यावें. रेशीम, कलावतू खरेदी करून जवाहीरखान्याकडे वगैरे लागेल तसें देत जाणें. १ कापड देणगीस व कारखान्याकडे सणगें खर्च होणें तीं व दागिने सणगाचे घेतून देणें व तयार करून देणें त्यासुद्धां कारखान्यांपैकीं खर्च व्हावा. [ इतिहाससंग्रह पु. ६, अंक ७।८।९. ]

**जामनगर**—मुंबई, काठेवाडांतील एक संस्थान व त्याचें मुख्य ठिकाण ( नवानगर पहा ).

**जामनेर**, ता लु का—मुंबई. पूर्वखानदेश जिल्हा. व याचें क्षेत्रफळ५२७ चौ.मै. असून, त्यांत १५७ गांवें आहेत. एकंदर लोकसंख्या १ लाख असून, उत्पन्न अडीच लाखांवर आहे. पाणीपुरवठा बरा असल्यानें तालुक्यांत बागायत जमीन पुष्कळ आहे. हवा निरोगी आहे. अजिंठ्याचा घांट जवळच आहे.

शहर.—मुंबई इलाख्यांतील पूर्व खानदेश जिल्ह्यांतील कान नदीवर हें गांव असून याच नांवाच्या तालुक्याचें ठाणें आहे. पूर्वी गांवासभोंवतीं तट असून एक भुईकोट किल्ला असल्यामुळें हें महत्त्वाचें ठिकाण होतें. येथें पूर्वी मोठे वाडे असून आतां ते मोडकळीस आलेले आहेत. पेशवाईंत हें गांव रास्त्यांकडे सरंजामादाखल होतें. या तालुक्याची जमीन अत्यंत सुपीक आहे. दुष्काळ क्वचित्‌च पडतो. संस्थानांतील जामठी या गांवची ज्वारी प्रसिद्ध आहे. पांचसात कोसांवर अजिंठ्याचीं लेणीं आहेत.इल्लीं कापसाचा व्यापार येथें पुष्कळ चालतो. सरकी ( कापसाची ) काढण्याचे व गठ्ठे बांधण्याचे कारखाने येथें ७।८ आहेत.[ खानदेश ग्याझे ].

**जामपुर**, त ह शी ल.—पंजाब. डेरागाझीखान जिल्ह्याची ही तहशील उत्तर अक्षांश २९ ° १६' आणि २९ ° ४६' व पूर्व रेखांश ७० ° ४' आणि ७० ° ४३'. क्षेत्रफळ ८३१ चौरस मैल. या तहशिलीच्या पूर्वेस सिंधूनद असल्यामुळें सिंधूस पूर आला म्हणजे या भागालाहि पूर येतो. तसेंच लागवडीस याचेंच पाणी मिळतें. लो. सं. (सन१९२१ मध्यें) ८५४९६.पाऊस अनिश्चित असतो. हींत दोन गांवें व १४१ खेडीं आहेत. हींत असलेलें हरंद नांवाचें खेडें इतिहासदृष्ट्या थोडेसें महत्त्वाचें आहे. इ. स. १९०३–४त तहसिलीचें उत्पन्न १.५ लाख होतें.

गां व.—जामपुर तहशिलीचें हें मुख्य ठिकाण आहे. उत्तर अक्षांश २९ ° ३९' व पूर्व रेखांश७० ° ३९'. डेरागाझीखान गांवाच्या दक्षिणेस ३२ मैलांवर हें ६५१७ (इ. स. १९११) लोकवस्तीचें गांव आहे. येथून मुलतान व सक्कर या बाजूस पुष्कळ नीळ रवाना होते. इ. स. १८७३ मध्यें येथें म्युनिसिपालिटीची स्थापना झाली.

**जामराव कालवा**—मुंबई इलाखा.सिंधप्रांतांतील हैदराबाद, थर आणि पारकर या जिल्ह्यांतून गेलेला एक कालवा. हा नार नदीचा असून त्यानें सरासरी १३० मैल लांब व १० मैल रुंद इतकी जमीन भिजते. कालव्याची एकंदर लांबी ११७ मैल असून त्याचा एक फांटा ६३ मैल लांब आहे.

नवंबर २४ इ. स. १८९९ रोजीं हा कालवा उघडण्यांत आला. यास एकंदर खर्च ८४.६ लाख रुपये आला. इ. स. १९०३–४ मध्यें खर्चेंच वजा जातां ४.३ लाख रुपये उत्पन्न झालें. त्या सालीं ४५१ चौरस मैलांना पाणी मिळालें होतें. कालवा उघडण्यापूर्वी पुष्कळ जमीन ओसाड होती. आतां पंजाब, कच्छ, जोधपूर, जैसलमीर, कोहिस्तान वगैरे भागांतील लोकांनीं येथें वसाहत केली आहे. विनाव कालव्याच्या धर्तीवर येथें वसाहत करणारांस जमीन दिली आहे.

**जामी** (१४१४–१४९२)—नूरुद्दीन अब्दुर-रहमान बिन अहंमद हा इराणी कवि व गूढतत्त्ववादी खोरासानमध्यें जाम येथें जन्मास आला. तो आपल्या कवितेंत जाम शब्दावर द्व्यर्थी कोटी करीत असे. एक जामी हें त्याचें नांव असून त्याचा दुसरा अर्थ दारूचा प्याला असा आहे. इराणांतील अभिजात असा हा शेवटचाच कवि होय.हा सुफी तत्त्वज्ञानवादी होता. त्याच्या तीन दिवाणांत भावपूर्ण व बोधपर लघुकाव्यें यांचा समावेश होतो. बहारिस्तान ( वसंतोद्यान ). हा त्याचा प्रमुख गद्य ग्रंथ होय. हॅफ्ट औरंग ( सात सिंहासनें ) हें त्याचें एक अद्‌भुत काव्य आहे.

**जामीनकी**—जामीन हा शब्द फारशी असून या अर्थाचा संस्कृतमधील शब्द 'प्रतिभू' असा आहे.कायद्यामध्यें जामीनकी ( ग्यारंटी ) म्हणजे एका मनुष्यानें दुसऱ्या एखाद्या माणसाला कर्जफेड किंवा इतर कांहीं कर्तव्य करणें असेल तें त्यानें न केल्यास, त्याबद्दल स्वतः कर्ज फेडण्याचा किंवा दंड देण्याचा करार करणें, असा अर्थ आहे. अशा करारांत मूळ धनको, दुसरा ऋणको आणि तिसरा जामीन असे तीन इसम नेहमीं असावेच लागतात. शिवाय जामीनाला कर्जफेड करावी लागल्यास ऋणको कर्तव्यमुक्त होत नाहीं. तर तो जामीनाला जबाबदार होतो. फौजदारी कायद्यांत आरोपी किंवा वारंट सुटलेला साक्षीदार हजर रहाण्यासंबंधानेंहि जामीनकी घेतात व त्याला इंग्रजींत ' बेल ' म्हणतात.

जामीन रहाणें म्हणजे दुसऱ्याकरितां विनाकारण त्रास घेणें असल्यामुळें जामीनकीविषयीं हिंदूंच्या जुन्या कायदेकारांनीं प्रतिकूल वृत्ति दाखविली आहे; आणि व्यवहारांतहि ' जामीन कोणा राहू नये ' असा उपदेश रूढ आहे. मनुस्मृतींत जामीनकीसंबंधीं पुढील वचनें आहेतः—

प्रतिभाव्यं वृथादानमाक्षिकं सौरिकं च यत् ।
दण्डशुल्कावशेषंच न पुत्रो दातुमर्हति ॥
× × ×
त्रयः परार्थे क्लिश्यन्ति साक्षिणः प्रतिभूः कुलं ।
( मनु. अ. ८ श्लो. १५९ व १६९ )

ब्रिटिश अमदानींत जामीनकीबद्दलचा कायदा, कराराच्या कायद्या ( इंडियन कॉंट्रॅक्ट अॅक्ट ) मध्यें आहे, आणि जामीनकी हाहि एक प्रकारचा करार असल्यामुळें सामान्य कराराप्रमाणेंच दोन किंवा अधिक वयांत आलेले व करार करण्यास पात्र असे पक्षकार लागतात व त्यांनीं उभयतांच्या सम्मतीनें योग्य मोबदला ठरवून जामीनकीचा करार करावा लागतो. आणि त्यांत कपट, लबाडी, गैरसमजाविशीं वगैरे गैर गोष्टी असल्यास तो करार रद्द करतां येतो. जामीन राहाणाराची जबाबदारी सामान्यतः मूळ ऋणकोइतकी असते, आणि ऋणको आपली जबाबदारी पार पाडण्यास असमर्थ ठरल्यावर मग जामीनदाराला जबाबदार धरतां येतें. प्रचलित हिंदु कायद्यांतहि जामीनकीबद्दलचें बापाचें देणें फेडण्याची मुलावर जबाबदारी पडत नाहीं.

फौजदारी कायद्यांत ( १ ) जामीनाचे व ( २ ) बिनजामीनाचे असे गुन्ह्यांचे दोन वर्ग असतात, आणि बिन जामीनीच्या गुन्ह्यांतहि सबळ पुरावा नसल्यास आरोपीला जामीनावर खुलें करावें असा कायदा आहे ( क्रिमि. प्रोसीजर, कलम ४९७ ).

हल्लींचा ब्रिटिश हिंदुस्थानांतील कायदा इंग्लंडच्या कायद्यासारखा असून इतर पाश्चात्य देशांतहि जामीनकीचा कायदा अशाच प्रकारचा आहे.

**जामोद**—वऱ्हाड. जिल्हा बुलढाणें, तालुका जळगांव. जळगांवच्या वायव्येस ६ मैलांवर हें ३१२८ लोकसंख्येचें गांव आहे. पूर्वी हा गांव विड्याच्या पानांकरितां फार प्रसिद्ध होता. हल्लीं देखील येथें पानांचा व्यापार चालतो. गांवाच्या उत्तरेस महादेवाचें देवालय आहे. देवळाच्या दक्षिणेस एक पाण्याचा साठा आहे. त्यांतील पाणी कधीं आटत नाहीं. येथें पीर पवलादशहाचा दरगा असून तो दिल्लीचा बादशहा अल्लाउद्दीन घोरी याच्या वेळेस बांधला आहे असें म्हणतात. बकर-ईदच्या वेळेस येथें उरुस भरतो. हें ठिकाण मुसुलमानी कारकीर्दींत महत्त्वाचें होतें. येथें त्या कालीं एक टांकसाळ होती. येथील जामोदी पैसे इंग्रजी अमदानीरंभीं चालत येथील किल्ला एलिचपुरच्या नबाबाच्या कारकीर्दीतील बांधलेला आहे. इ. स. १८४१ त मुगुटराव नांवाच्या एका मराठ्यानें मी शिंद्याच्या घराण्यांतील आहे असें प्रसिद्ध करून जामोदचा किल्ला निजामाकडील लोकांपासून हिसकावून व बरेचसे लोक जमवून बंड उभारलें; मोठ्या प्रयासानें निजामानें तें मोडलें. [ बुलढाणा ग्याझे. ]

**जाम्बिया**—मध्यहिंदुस्थानांतील भोपावर एजन्सींतील भुमियात.

**जायफळ, जायपत्री**—या झाडास लॅटिनमध्यें मिरिस्टिका फ्रेग्रन्स, इंग्रजींत नटमेग, संस्कृतांत जातिफल, मराठींत जायफळ, गुजराथींत, व हिंदींत जायफल इत्यादि नांवें आहेत. हें नेहमीं हिरवें राहणारें झुडूप आहे. याची मूळ उत्पत्ति मलाक्का येथील होय. हिंदुस्थानांत याची लागवड फार थोडी करितात.

लागवडीचा प्रकार.–निचरा असलेल्या चिक्कण मातीच्या जमीनींत याची लागवड चांगली होते. वालुकामय आणि पाणी सांचणाऱ्या जमीनींत हें चांगलें वाढत नाहीं. याला उष्ण आणि सर्द हवा लागते व तसेंच ६० किंवा ७० इंच पाऊस दरवर्षी लागतो. नव्या बियांपासून रोपें तयार करून तीं रोपें संवर्धनगृहांत लावितात आणि त्यांचा ऊन आणि वारा यांच्यापासून बचाव करितात. कोरडी हवा असली म्हणजे या रोपांना रोज पाणी घालावें लागतें. हीं दोन तीन फूट उंच झालीं म्हणजे त्यांचें स्थानांतर करून २५ पासून तीस फुटांच्या अंतरांवर तीं पुन्हां लावतात. लहान झाडांचा तण व इतर गुरफटून टाकणाऱ्या वेलींपासून बचाव केला पाहिजे. फुलें येऊं लागलीं म्हणजे नर कोणता व मादी कोणती हें ठरवून, १० मादीगणिक, हवा ज्या दिशेनें येते तिकडे, एक नर ठेवावा म्हणजे हवेमुळें पुंकेसर स्त्रीकेसरांत येऊन मिळतात. सातव्या वर्षी झाडांनां फळें येऊं लागून, झाड १५ वर्षांचें होईपर्यंत फळांचें उत्पन्न वाढत असतें. हें झाड फार सुंदर दिसतें व फळें पक्क झालीं म्हणजे पेरूएवढीं होतात.

उत्पन्न.—उत्तम फळें आलेल्या झाडाचीं १५०० पासून २००० पावेतों फळें गोळा करावयास सांपडतात. आंत जायफळाच्या सभोंवतीं जायपत्री असते. वरील जायपत्री काढून घेऊन आंतील फळें विस्तवावर सावलींत वाळवितात. नंतर वरची कवची काढून आंतील जायफळाला कीड लागूं नये म्हणून चुना लावतात. तसेंच जायपत्री चटईवर पसरून वाळवितात. जशी नारळाला बाहेरून करोटी असते तसें जायफळासहि बाहेरून पातळ कवच असतें. तें फोडलें म्हणजे जायफळ बाहेर पडतें. जायफळापासून न उडणारें व पत्रीपासून फार उपयोगी असें तेल निघतें. तेलाचा सुगंधी तेल करण्यासाठीं उपयोग करितात. वैद्यशास्त्राप्रमाणें जायफळ हें उत्तेजक, पाचक व वायुनाशक आणि जास्त प्रमाणांत घेतल्यास कैफ आणणारें आहे. याचा यूरोपियन पाकशास्त्रांत वराच उपयोग करतात.

मेणबत्तीचें झाड ( जंगली अक्रोड ).—यालाहि जायफळ असें नांव आहे.

वस्तुक्षेत्र:—हिंदुस्थान, ब्रम्हदेश, व मलायाद्वीपकल्प येथें हें सांपडतें. व्यनद येथें हीं झाडें विपुल असल्यामुळें तेथें तीं आपोआप उगवतात असें म्हणतात; परंतु वास्तविक

तीं मूळचीं हिंदुस्थानांतील नसून शहरांत व खेड्यांत बागेमध्यें किंवा रस्त्याच्या बाजूनें हीं झाडें लावलेलीं आढळतात. हिंदुस्थानच्या पूर्व भागांत जून ते आगस्टच्या दरम्यान या झाडांचीं फळें पिकतात; परंतु पश्चिम भागांत मात्र हिंवाळ्यापर्यंत पिकत नाहींत. फळांमध्यें शेंकडा ५० याप्रमाणानें तेल असतें. दिव्याकरितां हें तेल वापरतात. पॉलिनेशिया येथून मेणबत्त्याकरितां तें यूरोपमध्यें जातें. कित्येक वेळां फळांचा मगज बारीक वांबूस बांधून नैसर्गिक मेणबत्त्यांप्रमाणें जाळतात; व म्हणूनच या झाडास मेणबत्तीचें झाड असें नांव आहे. सिलोनमध्यें या तेलास केकुन हें नांव असून तेथून तें परदेशी रवाना होत असे. गेल्या दहा वर्षांच्या शोधांवरून असें दृष्टोत्पत्तीस आलें आहे कीं हीं झाडें हिंदुस्थानांत सर्वत्र सांपडतात. पण तेलाचा व्यापार सुरू करण्याइतकीं तीं विपुल नाहींत. शानसंस्थानाखेरीज हिंदुस्थानांत इतर कोठेंच यांपासून तेल काढीत नाहींत. ब्रम्हदेशांतील कांहीं भागांत लाखेच्या रंगाबरोबर याचा रोगणाकरितां उपयोग करतात. पण तीळ किंवा सरसूं यांच्या तेलापेक्षां यांत कोणतेच ज्यास्त गुण नाहींत. बाजारांत चांगली किंमत येईल असें या बीजांपासून तेल काढण्याची रीत व निरनिराळ्या प्रदेशांत हें झाड किती उत्पन्न देतें आणि त्यापासून कितपत फायदा होईल या दोन दृष्टीनें या झाडाचा विचार करणें अगदीं जरूर आहे. [ वाट; पदे. ]

**जारकर्म** ( अॅडल्टरी )—विवाहित पुरुषानें किंवा स्त्रीनें अन्य स्त्रीशीं किंवा पुरुषाशीं संबंध करणें या गुन्ह्याला कायद्यांत जारकर्म म्हणतात. या गुन्ह्याला शिक्षा ठेवण्यांत विवाहसंस्थेचें संरक्षण हा मुख्य हेतु आहे. हिंदु समाजांत विवाह ही धार्मिक संस्था समजतात आणि स्त्रीचें पातिव्रत्य हा सर्वोच्च गुण फार प्राचीन काळापासून मानला गेला आहे. पातिव्रत्याचें अत्यंत महत्त्व व जारकर्माची अत्यंत निंदा वैदिक काळींहि केलेली दिसते. देवांचा राजा इंद्र यानें वृषणश्वाच्या बायकोशीं, अत्रेयीऋषींच्या अपाला नामक स्त्रीशीं आणि गौतमऋषींच्या अहिल्या नामक पत्नीशीं जारकर्म केल्याचा व त्यामुळें त्याच्या अंगाला एक हजार क्षतें पडल्याचा उल्लेख आहे. अश्वीदेवांनीं च्यवनाच्या सुकन्या नामक भार्येशीं जारकर्म केल्याची कथा आहे. रामायणांतील रामाचें चरित्र हें उच्च वैवाहिक नीतीचा केवळ आदर्श आहे. महाभारतांतील द्रौपदी,सावित्री, दमयंती वगैरे अनेक स्त्रियांच्या कथांत पातिव्रत्य-गुणाचें स्तोत्र गायिलें आहे. स्मृतिग्रंथांत कायदेशास्त्रज्ञांनीं या गुन्ह्याला कडक शिक्षा सांगितल्या आहेत. जारकर्मामुळें समाजावर अत्यंत घोर परिणाम होतात असें सांगून मनूनें जारकर्मी स्त्रीप्रमाणें पुरुषालाहि घोर शिक्षा सांगितली आहे; इतकेंच नव्हे तर, परस्त्रीसंभाषण, अंगस्पर्श वगैरे गोष्टींनांहि दण्ड सांगितला आहे.

परदाराभिमर्शेषु प्रवृत्तान्नॄन्महीपतिः ।
उद्वेजनकरैर्दण्डैश्छिन्नयित्वा प्रवासयेत् ॥
तत्समुत्थोहि लोकस्य जायते वर्णसंकरः ।
येन मूलहरोऽधर्मः सर्व नाशाय कल्पते ॥
× × ×
न संभाषां परस्त्रीभिः प्रतिषिद्धः समाचरेत् ।
× × ×
भर्तारं लंघयेद्या तु स्त्रीज्ञातिगुणदर्पिता ।
तां श्वभिः खादयेद्राजा संस्थाने बहुसंस्थिते॥
पुमांसं दाहयेत्पापं शयने तप्त आयसे ।
( मनुस्मृति, अ. ८ श्लो. ३५२ ते ३७८ ).

इतर गुन्ह्याप्रमाणें यांतहि जात्यनुसार शिक्षेचा कमीअधिकपणा अवलंबून आहे. मनुस्मृतीच्या नियमानुसारच मध्ययुगीन हिंदुराज्यांत व मोंगल-मराठेशाहींत अम्मल चालू होता.

सदरहू हिंदु समाजव्यवस्थेवर परकीय विद्वानांचे अनेक आक्षेप आहेत. वध, अवयवछेदन या शिक्षा फाजील, कडक व जात्यनुसार शासनभेद हें तत्त्व अन्याय्य असें सर्व साधारण आक्षेप असून इंद्रादि देवादिकांचीं जारकर्मकृत्यें व कामसूत्रांतील स्त्रियांच्या नीतिमत्तेविषयींचे उल्लेख, पुत्रांचे क्षेत्रजादि दहाबारा प्रकार या गोष्टी कनिष्ठ नीतिमत्ता दर्शवितात. शिवाय बहुभार्यापद्धति, जरठकुमारीविवाह, वगैरे रूढी वैवाहिक नीतिमत्ता शिथिल करणाऱ्या आहेत. हे सर्व आक्षेप लक्षांत घेऊन इंडियन पीनल कोडाची रचना आधुनिक पाश्चात्त्य कायदेपद्धतीवर करून जारकर्माच्या गुन्ह्याला ५ वर्षें कैद व दण्ड किंवा नुसता दण्ड अशी शिक्षा सांगितली आहे. शिवाय या गुन्ह्यांत बदकर्मी स्त्रीला शिक्षा न करतां फक्त पुरुष गुन्हेगाराला शिक्षा व्हावी, असें ठरविण्यांत आलें ( पीनल कोड, कलम ४९७ ).

बा ह्य-इ ति हा स.—प्रागैतिहासिक काळांत जेव्हां विवाह ही संस्था नीट अस्तित्वांत आली नव्हती, तेव्हां रानटी स्थितींतील पुरुष स्त्रियांवर मालमत्तेप्रमाणें हक्क सांगत, व स्त्री पळविणाऱ्यास चोरीच्या गुन्ह्याप्रमाणें शिक्षा करीत. जारकर्मामुळें नीतिभ्रष्टता येते किंवा वैवाहिक करार मोडतो वगैरे कल्पना त्या काळीं नव्हत्या. वानर, कोंबडीं वगैरे पशुजातींचे नर ज्याप्रमाणें कांहीं मायांनां स्वसत्तेखालीं घेऊन इतरांनां प्रतिकार करतो त्याप्रमाणें आद्य मानवी स्थिति असली पाहिजे. पुढें विवाहसंबंध जोडण्याची कल्पना रूढ होऊन एकाच वेळीं एका पुरुषानें अनेक स्त्रिया किंवा एका स्त्रीनें अनेक नवरे करण्याची चाल प्रचारांत आली. तेव्हां स्त्रीयांनां परपुरुषसंबंध न होऊं देण्याबद्दल पुरुषवर्ग अधिकच दक्ष बनला व बदकर्मी स्त्रीला देहांत शिक्षेसारख्या कडक शिक्षा होऊं लागल्या. इतकेंच नव्हे तर आफ्रिकेंतील एका निग्रो जातींत स्त्रियांकडून चारित्र्यशुद्धीचा पुरावा म्हणून नियतकालिक दिव्य करविण्याची पद्धत आहे ( मिस् किंगस्ले-ट्रॅव्हल्स इन

वेस्ट आफ्रिका, ४९७ ). पुरुषांची परपुरुषसंबंधाविषयींची ही तीव्र मत्सरबुद्धि हा मानवसमाजांत एका आद्य अवस्थेंत अनिर्बंध स्त्रीपुरुषव्यवहारस्थिति ( प्रॉमिस्क्युइटी ) होती, असा या मताला प्रतिकूल पुरावा आहे. बहुतेक रानटी जातींत या गुन्ह्याला वध, अवयवच्छेदन वगैरे शिक्षा रूढ असलेल्या आढळतात. नवऱ्याचें वदकर्म हा वायकोविरुद्ध गुन्हा असून तिला त्यावद्दल दाद मागतां येते, अशी स्थिति फार थोड्या समाजांत आढळते. या गुन्ह्यावद्दल विवाहसंबंध तोडण्याचा ( डायव्होर्स ) हक्क वायकोला कांहीं रानटी समाजांतहि दिलेला आढळतो.

ईजिप्तमध्यें फार प्राचीन कालीं सुद्धां जारकर्म हा गुन्हा मानला जात असे. याला पुरावा ५ वा रामेसिस ( खि. पू. ११५० ) याच्या कारकीर्दीतील एका लेखावरून मिळतो. अथेन्स येथील प्राचीन ग्रीक कायद्यांत जारकर्मावद्दल पुरुष व स्त्री दोघांनांहि गुन्हेगार धरीत. तथापि स्त्रियांच्या बावतींत कायदा फार कडक होता. कारण शुद्ध ग्रीक घराण्यांत रक्ताची भेसळ होऊं नये असा ग्रीकांचा कटाक्ष होता. जारकर्माची व्याख्याहि पुढें व्यापक करून विवाहित स्त्रीप्रमाणें कुमारिकांशीं किंवा विधवांशीं वदकर्म करणेंहि गुन्हा समजण्यांत येऊं लागला. गुन्हा करतांना पकडलेल्या गुन्हेगाराला एकदम ठार मारण्याचा हक्क कायद्यानें नवऱ्यास दिला होता. पण त्याहून कमी किंवा केवळ नुकसानभरपाई दाखल द्रव्य मागण्यास सवलत असे. जारकर्मी वायकोला नवऱ्यानें सोडचिठ्ठी देणें भाग असे व तिला सार्वजनिक देवालयांत मज्जाव असे. ज्यू उर्फ यहुदी लोकांमध्यें वहुभार्यापद्धति वंद होऊन एकपत्नीक पद्धति सुरू झाली तरी जारकर्मासंबंधी कायद्यांत फरक झाला नाहीं. विवाहित स्त्रीशीं वदकर्म करणें यालाच जारकर्म समजतात. अविवाहित स्त्रीच्या बावतींत हा गुन्हा होत नसे; कारण अशी स्त्री त्या पुरुषाची वायको होणें शक्य असे, इतकेंच नव्हे तर असा संबंध झाल्यास त्या स्त्रीपुरुषांचा कायदेशीर विवाहच मानला जात असे. मोझेस कायद्यांत जारकर्माला दगड मारून ठार करण्याची शिक्षा सांगितली आहे. पण पुढें ही शिक्षा वंद पडली. वैवाहिक हक्क नष्ट करून सोडचिठ्ठी देण्यास भाग पाडणें तसेंच वदकर्मी स्त्री व पुरुष यांनां आपसांत लग्न लावण्यास परवानगी न देणें, या शिक्षा नंतरच्या कायद्यानें ठरविल्या.

इस्लामी कायद्यांत जारकर्माला, दगड मारून वध करण्याची जुन्या यहुदी कायद्यांतील शिक्षा आहे. पण महंमद पैगंबराच्या आयेशा नांवाच्या वायकोवद्दल संशयाचा प्रसंग आला, त्या वेळीं जारकर्मावद्दल शंभर फटक्यांची शिक्षा द्यावी, असे महंमदाचे श्लोक कुराणांत आहेत; यामुळें कायदेपंडितांत या शिक्षेवद्दल मतभेद आहे. प्रत्यक्ष गुन्हा करतांना पकडल्यास नवऱ्यानें दोघांनांहि ठार मारावें अशी कायद्याची मुभा आहे. शिवाय विवाहसंबंध तोडण्याचा हक्क नवऱ्याला आहे. कोणी साक्षीदार नसला तरी नुसती शपथ घेतल्यानें नवऱ्याला ही परवानगी मिळते; या घटस्फोटाच्या प्रकाराला 'लायान' असें म्हणतात.

खिस्ती धर्मग्रंथांतील दहा सुप्रसिद्ध आज्ञांमध्यें "तूं आपल्या शेजाऱ्याच्या वायकोचा अभिलाष धरितां कामा नये" अशी एक आज्ञा आहे. डोंगरावरील प्रवचनांतहि येशूखिस्तानें 'व्यभिचार करूं नये' असें सांगितलें आहे. इ. स. ३०५ मध्यें इलिवेरिसच्या कौन्सिलनें जे ठराव केले त्यांत व्यभिचाराला शिक्षा सांगितल्या आहेत; त्यांत वधाची शिक्षा नाहीं. पण कॉन्स्टन्टाईन वादशहानें वधाची शिक्षा पुन्हां सुरू केली. पण ती रानटी शिक्षा अप्रिय ठरून पुन्हां जस्टिनियननें वधाची शिक्षा वंद केली. व्यभिचार हें घटस्फोट करण्याला पुरेसें कारण नेहमींच मानण्यांत आलें आहे. पण इंग्लंडच्या कायद्यांत वायकोला नवऱ्याविरुद्ध घटस्फोट मानण्यास हें कारण पुरेसें मानीत नाहींत.

पारश्यांच्या ग्रंथांत या गुन्ह्याची फार व्यावहारिक दृष्टीनें चर्चा केली आहे. जारकर्म व विशेषतः कुमारिकांनां कुमार्गप्रवृत्त करणें हा भयंकर गुन्हा मानला आहे. कारण त्यामुळें वंशभ्रष्टता होते, माणसाचें संयमन नष्ट होतें व नवऱ्याच्या कायदेशीर हक्काला बाध येतो. ह्या गुन्ह्यामुळें खुनाकडेहि प्रवृत्ति होते, कारण जारकर्मी स्त्रिया गर्भपात करतात. व्यभिचारकर्मानें सर्व समाजाला कीड लागते; कारण पुरुषाला जारकर्मज संतति पोसणें भाग असल्यामुळें त्या संततीच्या संगतीनें औरस संतति विघडते. या पापाला प्रायश्चित्त म्हणून कांहीं धार्मिक विधी, अनाथसंगोपन, दानधर्म, वगैरे सत्कृत्यें करण्यास सांगितलें आहे.

**जॉर्ज टाऊन**—हें शहर ब्रिटिश ग्वायनाची राजधानी व वसाहतसरकारचें ठिकाण असून डेमेरारा नदीच्या मुखावर उ. अ. ६°–२९'–२४" व प. रे. ५८°–११'–३०" यांच्यावर आहे. डच लोकांच्या ताब्यांत असतांना याचें नांव स्टॅब्रोक होतें व स. १८१२मध्यें जॉर्ज टाऊन नांव पडलें. या भागांतील हें फार छानदार शहर आहे. येथील रस्ते रुंद व सरळ असून मध्यभागीं लिलिपुष्पाच्छादित कालवे असलेले दुहेरी रस्ते आहेत. रस्त्याच्या दोन्ही वाजूस गवताळ पट्टया व छायेचीं झाडें आहेत. मुख्य घरें वगीच्यांनीं वेष्टलेलीं आहेत. येथील घरें विटांच्या चवुत्र्यावर लांकडांचीं वांधलेलीं आहेत. मुख्य इमारती म्हटल्या म्हणजे शहरच्या मध्यभागीं असलेल्या सार्वजनिक कचेऱ्या, न्यायकचेऱ्या, नगरमंडप, अँग्लिकन व रोमन कॅथोलिक कॅथीड्रल, कित्येक छानदार प्रार्थनामंदिरें, स्थानिक पेढ्या, विमागृहें, भिक्षागृह, इस्पितळ, पदार्थसंग्रहालय, पुस्तकालय, वाचनगृह, वनस्पतिसंग्रह ह्या होत. शहराच्या मध्यभागीं हवा खाण्यास वाग व रस्ते वांधलेले आहेत. येथील राज्यव्यवस्था मेयर व नगरकौन्सिल यांच्या ताब्यांत आहे. लोकसंख्या सुमारें ५०,००० आहे. वार्षिक उत्पन्न

५०००० पौंड आहे. खर्चाच्या बाबी नगरसफाई, आगीचे बंब, रस्ते, पाणीपुरवठा, रस्त्यांची रोषनाई व मोऱ्या ह्या आहेत. टेलिफोन, व पोष्टऑफिसें आहेत. दोन चांगले लोखंडाचे कारखाने,शुष्क गोदी, तांदूळ, विडया, साबण, बूट, चाकोलेट, मेणबत्त्या, व बर्फ यांचे कारखाने येथें आहेत. हें शहर रेल्वे व बोटी यांनीं न्यू ॲमस्टरडॅम व डेमेरॉराचा पश्चिम किनारा यांशीं जोडलेलें आहे व बाकीच्या जिल्ह्यांशीं आगबोटीनें दळणवळण सुरू आहे.

**जॉर्ज राजे**—या नांवाचे राजे यूरोपांतील इंग्लंड, ग्रीस या देशांत आणि हॅनोव्हर व सॅक्सनी या प्रांतांत झाले आहेत, पण इंग्लंडखेरीज सर्व ठिकाणचे जॉर्ज राजे विशेष महत्त्वाचे नाहींत. इंग्लंडच्या इतिहासांत या नांवाचे चार राजे असून ते बहुतेक महत्त्वाचे आहेत. त्यांच्यासंबंधीं राजकीय गोष्टींची माहिती त्या देशाच्या इतिहासांत दिली आहे. या ठिकाणीं त्यांचा खासगी जीवनक्रम देण्यांत आला आहे.

प हि ला जॉ र्ज ( १६६० ).—हा जर्मनींतील हॅनोव्हर प्रांताच्या राजघराण्यांत स. १६६० मध्यें जन्मला. त्याचा इंग्लंडच्या राजघराण्याशीं नजीकचा आप्तसंबंध असल्यामुळें तो इंग्लंडची ॲन राणी बिनवारसी वारल्यावर इंग्लंडच्या गादीवर आला ( १७१४ ). तत्पूर्वी त्यानें इंग्लंडचा राजा तिसरा विल्यम व व्हिगपक्ष यांच्यांशीं सख्य ठेवून स्पॅनिश-वारसा–युद्धांत इंग्लंडला मदत केली होती. पण त्याचें कौटुंबिक वर्तन प्रथमपासून आक्षेपार्ह होतें. स.१६८२ मध्यें त्याचें लग्न सोफियाबरोबर झालें होतें. पण व्हर्सैलेस ( फ्रान्स) च्या राजदरबारी वागणूकीप्रमाणेंच जर्मनींतील राजदरबारी पुरुषांची वागणूक फार अनीतीची असे. अनेक उपस्त्रिया ठेवण्याची राजे लोकांची चाल असे. त्याप्रमाणें जॉर्जनेंहि उपस्त्रिया ठेवल्या, त्यामुळें सोफिया राणी वदचालीची निघाली, व अखेर दोघांचा घटस्फोट झाला. दुसरी गोष्ट म्हणजे जॉर्ज परदेशांतच वाढल्यामुळें इंग्लंडच्या राज्यकार-भारपद्धतीची त्याला माहिती नव्हती, त्यामुळें तो राजा झाल्यावर इंग्लंडांत प्रधानमंडळाची सत्ता वाढली. इंग्रजी भाषा त्याला येत नसल्यामुळें त्यानें इंग्लंडांत वरेच जर्मन चाकरनोकर व उपस्त्रिया आणल्या होत्या. तरीहि त्याला इंग्लंडांत चैन पडत नसल्यामुळें तो वरचेवर हॅनोव्हर प्रांतांत जाऊन रहात असे. तथापि त्यानें एक मोठ्या शहाणपणाची गोष्ट केली, ती व्हिगपक्ष व वालपोल यांच्या हातीं पूर्ण विश्वासानें सत्ता दिली, त्यामुळें त्याची सर्व कारकीर्द निर्विघ्नपणें पार पडली.

दु स रा जॉ र्ज ( १६८३–१७६० ).—हा पहिल्या जॉर्जचा मुलगा. बाप इंग्लंडचा राजा झाला त्यावेळीं हा एकतीस वर्षांचा होता. त्याचें बापाशीं पटत नसे व तें भांडण दुसऱ्या जॉर्जच्या एका मुलाला बाप्तिस्मा देण्याच्या वेळीं धर्मपिता ( गॉड फादर ) नेमण्याच्या प्रश्नावरून विकोपास गेलें. त्यावरून पहिल्या जार्जनें त्याला कांहीं काळ कैदेंत ठेवलें. नंतर तो लीस्टर हाऊसमध्यें स्वतंत्र राहूं लागला व दरबारी समारंभांत सामील होण्याची त्याला मनाई झाली होती. त्याचा विवाह स. १७०५ मध्यें ॲनस्पॅचची कॅरोलाईन हिच्याशीं झाला. ती मोठी राज-कारणी होती. बापलेकांच्या भांडणामुळें दुसरा जॅार्ज बापाचा प्रधान वालपोल यास अधिकारावरून काढून टाक-णार होता व त्याकरितां स.१७२७मध्यें राज्यावर येतांच सर स्पेन्सर कॉमटन यास त्यानें राजा या नात्याचें पहिलें भाषण लिहून तयार करण्यास सांगितलें. पण कॉमटन यास तें साधेना म्हणून त्यानें वालपोलचीच मदत घेतली. या गोष्टीचा फायदा घेऊन कॅरोलाईन राणीनें वालपोललाच प्रधान कायम ठेवण्याबद्दल राजाचें मन वळविलें. याची बुद्धिमत्ता अगदींच सामान्य प्रतीची होती. एखाद्या कर्तव्य-निष्ठ कारकुनाप्रमाणें वक्तशीरपणानें वागणें व खर्चांत काटकसर करणें यांतच त्याला सगळा मोठेपणा वाटे. आपल्या तिजो-रींतला एकेक पौंड मोजीत बसण्यांत त्याला मोठा आनंद होत असे. त्याचा एक उपयुक्त गुण हा होता कीं, स्वतः-पेक्षां अधिक हुषार व कर्तबगार इसम कोण आहे हें त्याच्या झटकन् ध्यानांत येत असे व अशा माणसांचा सल्ला तो अगदीं विनतक्रार मान्य करीत असे. यामुळेंच दुसरा जॉर्ज स्वतःची अधिक हुशार राणी कॅरोलाईन व अधिक राजकारणकुशल प्रधान वालपोल यांच्या तंत्रानें निमूटपणें वागत असे. पण पुढें पार्लमेंटांत वालपोलला विरोधी असा एक प्रबळ पक्ष निर्माण होऊन स्पेनबरोबरच्या युद्धांत वॉल-पोल राष्ट्रांत अत्यंत अप्रिय बनला; आणि स. १७३७ मध्यें कॅरोलाईनच्या मृत्यूनंतर लवकरच सर्व आधार तुटून वाल-पोल प्रधान पदच्युत झाला.पुढें आस्ट्रियन–वारसा–युद्धा सुरू झाल्यावर हॅनोव्हर प्रांताच्या रक्षणाकरितां दुसरा जार्ज स्वतः यूरोपांत लढाईवर गेला आणि रणांगणावर इंग्रजांच्या-पेक्षां हॅनोव्हेरियनांच्या हिताकडे अधिक लक्ष्य दिलें गेल्यामुळें जॉर्ज राजा इंग्लंडांत अप्रिय झाला. मुख्य प्रधानहि पार्लमें-टाच्या ( राष्ट्राच्या ) इच्छेप्रमाणें नेमणें त्याला भाग पडलें. स. १७४५ नंतरच्या बहुतेक राजकीय महत्त्वाच्या व राष्ट्रहि-ताच्या गोष्टींचें श्रेय जॉर्जला नसून त्याच्या प्रधानांना आहे.

ति स रा जॉ र्ज ( १७३८–१८२० ).—हा दुसऱ्या जॉर्जचा नातु व फ्रेडरिकचा मुलगा दुसऱ्या जॉर्जनंतर गादी-वर आला. फ्रेडरिक वारल्यानंतर ( १७५१ ) त्याचें शिक्षण त्याची आई व तिचा प्रियजन सल्लागार अर्ल ब्यूट यांच्या देखरेखीखालीं चैनी जगापासून अलिप्त अशा स्थितींत झालें. बॉलिंब्रोकनें लिहिलेल्या 'पेट्रियट किंग' (देशभक्त राजा) या पुस्तकांतील तत्त्ववचनें त्याला शिकविलीं. व्हिगपक्षाचें वर्चस्व नष्ट करून स्वतःच्या हातीं अधिकारसूत्रें घेणें हें आयुष्याचें इतिकर्तव्य होय असें त्याच्या मनावर बिंब-विण्यांत आलें होतें. स्वतः इंग्रजी भाषा जाणणारा व इंग्रजी राजकारणांत वाढलेला असल्यामुळें प्रजेचें हृद्गत जाणणारा

होता. वैवाहिक बाबतींतहि मागील जार्ज राजांपेक्षां तो फार स्तुतिपात्र झाला, कारण केवळ राजकारणाकरितां प्रेमविषय दुय्यम ठरवून त्यानें प्रेमपात्र बनलेल्या लेडी सारा लेनॉक्स-ऐवजीं चार्लोटीसोफीयाबरोबर विवाह केला. राज्यावर आल्या-वर लवकरच त्यानें हरयुक्तीनें पार्लमेंटांत राजाच्या आज्ञे-नुसार मतें देणारा असा 'किंग्ज फ्रेंडस्' (राजाचे मित्र)अशा नांवानें संबोधला जाणारा पक्ष बनविला. अशा स्थितींत कोणतेंहि राष्ट्रधोरणी प्रधानमंडळ फार वेळ अधिकारारूढ राहणें शक्य नसल्यामुळें दहा वर्षांत सात वेळां प्रधानमंडळ बदललें. अनियंत्रित सत्ताभिलाषी राजा व लोकसत्ताप्रेमी राष्ट्र यांमधील हें भांडण विकोपास गेलें असतें, पण जॉर्जच्या सुदैवानें अमेरिकेबरोबरच्या भांडणांत कर बसविण्याचा अधिकार सागण्यांत राजा व राष्ट्र यांचें ऐकमत्य झालें आणि शासनशास्त्रांतील तत्त्व व व्यवहार या दोन्ही दृष्टींनीं चूक असलेला हा लढा लढण्यांत जॉर्जराजा लोकप्रियच बनला. विद्वान् राजकारणी पुढारी या लढ्याला विरोधी होते तरी युद्ध झालेंच व त्यांत इंग्लंडला पूर्ण अपयश आलें. त्याबरोबर राष्ट्र पुन्हां राजपक्षाऐवजीं प्रधानपक्षीय बनलें. जॉर्जनें कांहीं वेळ नमतें घेतलें पण स.१७८४मध्यें संधि साधून स्वतःच्या पसंतीचा धाकटा पिट यास प्रधान नेमिलें. पिटच्या विशेष यशस्वी कारकीर्दीचें श्रेय जॉर्जला आतायासें मिळालें.

जॉर्जला शेतकीची आवड असे. स. १७८८ मध्यें त्याच्या मेंदूंत विकार होऊन तो वेडा झाला. पण डॉ. विलिस याच्या सौम्यपणाच्या उपायांनीं स. १७८९ मध्यें तो बरा झाला. फ्रेंच राजक्रांतीच्या सर्व राजकीय बाबी त्यानें पिटवर सोंपविल्या. पण आयरिश युनियन (संयुक्त पार्लमेंट) नंतर पिटनें कॅथॉलिक लोकांवरील राजकीय नियंत्रणें दूर करण्याचें ठरविलें. त्यास जॉर्जनें विरोध केला व पिटचा राजीनामा स्वीकारून अॅडिंगटन यास प्रधान नेमलें. कॅथोलिक लोकांस कांहींहि हक्क द्यावयाचे नाहींत या अटीवर त्यानें पुन्हां पिटला, तो वारल्यावर फॉक्सला, फॉक्स वारल्यावर पोर्टलंडच्या ड्यूकला प्रधान नेमलें. इ. स. १८०४ मध्यें जॉर्जचें डोकें पुन्हां बिघडलें, पण तो लवकरच बरा झाला होता. १८११ मध्यें पुन्हां त्याला वेड लागलें व दृष्टीहि गेली व अशा स्थितींत नऊ दहा वर्षांनीं तो स. १८२० मध्यें वारला. या काळांत ४ था जॉर्ज प्रिन्स रीजंट (राजप्रतिनिधी) होता जॉर्जला सोफिया राणीपासून नऊ मुलगे व सहा मुली झाल्या. त्याला वैवाहिक शांति व सुख उत्तम लाभलें.

चवथा जॉर्ज (१७६२–१८३०).—हा तिसऱ्या जॉर्जचा थोरला मुलगा १८२० मध्यें राज्यावर आला. तो जात्या हुषार असून त्याला ग्रीक,लॅटिन, यांचें चांगलें शिक्षण मिळालें होतें, शिवाय तो फ्रेंच, इटालियन व जर्मन बोलूं शके. गायन व इतर कला यांची अभिरुचि त्याला असे. प्रथम आईबापांच्या कडक शिस्तींत वाढून पुढें स्वैरवृत्तीनें चैनी करूं लागला व अखेर पक्का दुर्वर्तनी बनला. प्रथम त्याचा मेरी रॉबिनसनशीं प्रेमसंबंध होता, पण मेरी अॅन फिट्झरबर्ग या रोमन कॅथोलिक विधवेवर अत्यंत आसक्त होऊन कायद्यास न जुमानतां त्यानें तिच्याशीं स.१७८५मध्यें गुप्तपणें विवाह केला. तरी स. १८११ पासून तो लेडी हर्टफोर्ड व १८२१ नंतर लेडी कोनिंघॅम यांच्या प्रेमपाशांत तो गुरफटला होता.या गैरकायदासंबंधाखेरीज त्यानें १७९५ त ब्रन्स्विकची प्रिन्सेस कॅरोलाइन हिच्याशीं कायदेशीर विवाह लावला, व स.१८२१ मध्यें ती मरेपर्यंत या विवाहचें मोठेंच प्रकरण माजलें होतें. तो फार चैनी व उधळ्या असल्यामुळें कर्ज करी. परंतु व्हिगपक्षाची बाजू त्यानें धरल्यामुळें फॉक्स, शेरिडन वगैरे पुढारी त्याला अनुकूल असत व पार्लमेंट त्याच्या कर्जफेडीकरितां रक्कमा मंजूर करीत असे. पण या सर्व गोष्टींमुळें तिसऱ्या जॉर्जशीं त्याचें पक्कें वांकडें आलें होतें. तसेंच त्याच्या दुराचरणामुळें व उधळेपणामुळें सामान्य जन-तेंत तो अत्यंत प्रिय झाला होता, इतका कीं रस्त्यांतून जातांना लोक त्याला हंसत व स.१८१७ मध्यें तर तो पार्ल-मेंटमध्यें जात असतांना लोकांनीं त्याच्या गाडीची तावदानें फोडलीं.

स.१८२१ मध्यें गादीवर आल्यावर त्याच्या विवाहाच्या प्रकरणास पुनः रंग आला. राज्याभिषेकादि समारंभांत कॅरो-लाइन राणीवर जॉर्जनें बहिष्कार घालण्याचें ठरविलें. विवा-हानंतर पहिल्या अपत्यजन्माच्या वेळींच जॉर्जनें राणीवर दुराचरणाचा आरोप ठेवून तिला विभक्त ठेवली. स.१८१४ ते १८२०पर्यंत ती इटालींत राहिली.आणि जॉर्ज राज्यावर येतांच परत इंग्लंडांत येऊन राज्याभिषेकादि समारंभांत सामील होण्याचा तिनें प्रयत्न सुरू केला. उलट जॉर्जनें तिच्यावरील पूर्वीपासूनच्या जारकर्माच्या आरोपाची चौकशी करून निकाल करण्याचें काम एका कमिटीकडे सोंपविलें व त्याचा निकाल जॉर्जला अनुकूल झाला. पण १८२१ मध्यें तीच मरण पाव-ल्यानें हें प्रकरण कायमचें मिटलें. राज्यारोहणानंतर आय-र्लंड व स्कॉटलंड या देशांस भेट देऊन जॉर्जनें तिकडे बरीच लोकप्रियता संपादली.पण इंग्लंडमध्यें तो अखेरपर्यंत लोकांत अप्रिय राहिला. तो १८३० मध्यें मरण पावल्यावर त्याचा भाऊ चवथा विल्यम राजा झाला. सध्यांचा पांचवा जॉर्ज, राजा सातव्या एडवर्डचा मुलगा असून त्याच्या मृत्यूनंतर स.१९१० त गादीवर आला.

**जॉर्जिया**—पूर्वीं हें ट्रान्सकाकेशियामधील राज्य असून ऐतिहासिकदृष्ट्या २००० वर्षांपेक्षां जास्त पुरातन काळचें आहे. त्याचें पहिलें प्राचीन नांव कार्थ्लि किंवा कार्थ्व्हेलि हें होय. इराणी आणि ग्रीक रोमन लोकांनां याची अनुक्रमें गुर्जिस्तान आणि आयबेरिया या नांवांनीं माहिती होती. याचें व्हस्थान हें आर्मोनियन आणि ग्रुझिया हें रशियन नांव आहे. कार्थ्लि आणि ककेटिया या दोन प्रदेशांचा अंतर्भाव करणाऱ्या खऱ्या जॉर्जियाच्या मर्यादाः—उत्तरेस ओस्से-टिया आणि दाघिस्तान; दक्षिणेस एरिव्हन आणि कार

संस्थानें, पश्चिमेस गुरिया आणि इमेरेटिया अशा होत्या. या राज्यांत निरनिराळ्या वेळीं गुरिया, मिंग्रेलिया, अवखासिया, इमेरेटिया आणि दाघिस्तान हे प्रांतहि मोडत असत व याचा विस्तार उत्तरेस काकेशसरांगेपासून दक्षिणेस आरासपर्यंत असे. १९१७ सालपर्यंत टिफ्लीस आणि कुटैस या दोन रशियन प्रांतांत जॉर्जियाची विभागणी झाली होती. पण महायुद्धांत रशियाच्या साम्राज्याचा नाश झाल्यानंतर जॉर्जियानें आपल्याला स्वातंत्र्य प्राप्त करून घेतलें. प्रथम कांहीं दिवस ट्रॅन्स्कॉकेशियस फेडरल रिपब्लिकमध्यें याची गणना होत असे पण पुढें जॉर्जियाचें रिपब्लिक अगदीं स्वतंत्र स्थापन झालें.

या जॉर्जियाच्या रिपब्लिकमध्यें टिफ्लिस, कुटैस, बाटुम, अर्ट्विन या प्रदेशांचा समावेश होतो. याच्या उत्तरेस कॉकेशियस पर्वताची रांग, पश्चिमेस काळा समुद्र व तुर्कस्थानची सरहद्द असून दक्षिणेस व पूर्वेस अनुक्रमें, एरिव्हन, व अझरबैजनचीं रिपब्लिक संस्थानें होतीं. अद्यापिहि या रिपब्लिकच्या भौगोलिक मर्यादा संपूर्ण व स्पष्ट तऱ्हेनें आंखल्या गेलेल्या नाहींत. टिफ्लिसच्या टापूंत कुरानदी वहात गेली असून ती कास्पियन समुद्राला मिळाली आहे. कुटैस, बाटुम इत्यादि मुलुखांतून लहान लहान नद्या वहात गेल्या असून, त्या काळ्या समुद्राला मिळाल्या आहेत. डोंगराळ प्रदेश सोडून बाकीचा सर्व प्रदेश सुपीक आहे. जंगल मुबलक आहे. मँगेनीज, कोळसा, तांबें वगैरे खनिज संपत्तीहि पुष्कळ आहे.

क्षे त्र फ ळ.—जॉर्जियाचें हल्लींचें क्षेत्रफळ २८००० चौ. मैल आहे. एरिव्हन व अझरबैजनच्या संस्थानांच्या सरहद्दीवरील मुलुखासंबंधीं अद्यापि लढा सुरू असल्यानें त्यांतून जो प्रदेश जॉर्जियाच्या वांट्यास येईल त्याचें क्षेत्रफळ वरील संख्येंत जमा करावें लागेल. लोकसंख्येचीहि तीच स्थिति. स. १९१६ च्या खानेसुमारीप्रमाणें वादग्रस्त टापूंतील लोकसंख्या वगळतां बाकीच्या मुलुखांतील लोकसंख्या २७७०००० होती.; व यामध्यें, जॉर्जियन, रशियन, यूरोपियन, आर्मेनियन, मुसुलमान व इतर कांहीं जातीचे लोक होते. वादग्रस्त टापूंतील संख्या १५००० भरेल असें वाटतें.

द ळ ण व ळ ण.—जॉर्जिया एरिव्हन, अझरबैजन किंबहुना सर्व मध्यआशियाचें प्रमुख बंदर बाटूम असून तें जॉर्जियाच्या ताब्यांत आहे. त्यामुळें वरील सर्व प्रदेशाचें नाकच जॉर्जियाच्या ताब्यांत आहे म्हटलें तरी चालण्यासारखें आहे. या बंदरापासून एरिव्हन, एरेझम, बाकू, टॅब्रिझ, आशियामायनर इत्यादि ठिकाणीं रेल्वे गेली आहे. बाटुम बंदरामुळें जॉर्जियाला विलक्षण महत्त्व प्राप्त झालें आहे.

लो क व स्त्री.—जॉर्जियन लोक कोणच्या वंशाचे असावे याविषयीं पूर्वी बरेंच मतवैचित्र्य होतें परंतु आतां असें निश्चित झालें आहे कीं, हे लोक पाम्वक नांवाच्या उंच प्रदेशांतील मूळच्या लोकांचे वंशज आहेत आणि हे बहुतकरून पश्चिमेकडील डोंगरपठारावरून आशियामायनर आणि यूरोप या ठिकाणीं आलेल्या आर्य लोकांच्या त्रासामुळें आग्नेयीकडून चार पांच हजार वर्षांपूर्वी येथें आले हे लोक काकेशसमधील अतिशय जुन्या संस्कृतीचे असून त्यांच्यांत कांहीं अत्युत्तम मानसिक गुण आहेत. हे फार धैर्यवान् असतात आणि यांना गाण्यावजावण्याचा अतिशय शोक असतो अशी यांची ख्याति आहे. तथापि हे फार क्रूर आणि दुष्ट असून अति मद्यपान करणारे असतात. हे देखणे असून कसरती बांध्याचे असतात. मुसुलमानांचें राज्य असतांना येथून तुर्कझनान्यासाठीं दासी आणि ओस्मानली सैन्यासाठीं शिपाई पुरविण्यांत येत असत. रशियन अम्मल सुरू होण्यापूर्वी येथील समाजांत उमरावांच्या व बड्या लोकांचें फार प्राबल्य होतें. कोणाचेंहि बरेंवाईट करण्याचा आपला हक्क आहे असें समजत व त्या हक्काची बजावणीहि करीत असत. पण आतां जॉर्जियन लोकांनां सुस्थिति प्राप्त झाली असून ते उद्योगी बनले आहेत व सर्व तऱ्हेनें त्यांनीं आपली प्रगति केली आहे.

ट्रॅन्सकॉकेशियन टापूंतील इतर सर्व जातींच्या लोकांपेक्षां जॉर्जियन लोक हल्लीं अधिक सुधारलेले आहेत. शिवाय आपल्या पराक्रमानें मिळविलेल्या स्वातंत्र्याची ताजी परंपरा त्यांच्या मागें असल्यानें जॉर्जियन लोकांकडे लोकांचें विशेष लक्ष्य ओढलें जात आहे. या लोकांमध्यें जातिविषयक अभिमानापेक्षां राष्ट्रीय अभिमानच अधिक आढळतो व या दृष्टीनें ट्रॅन्सकॅकेशियन लोकांमध्यें जॉर्जियन लोकांत हा मोठा फरक आहे. अनुभवान्तीं शहाणपण या न्यायानें पारतंत्र्यशृंखलेमध्यें अखंड दुःखें भोगावीं लागल्यामुळें स्वतःच्या आत्मविश्वासाच्या अनुभवाच्या जोरावर आपलें स्वातंत्र्य मिळविल्यावर जॉर्जियन लोकांनीं आपला राज्यकारभार मोठ्या कुशलतेनें चालविला आहे. समाजसत्तावादाकडे यांचा कल असला तरी हे लोक बोल्शेविकपंथाच्या तत्त्वाला सर्वस्वी प्रतिकूल आहेत; व त्यांनीं संधि सांपडेल तेथें व तेव्हां बोल्शेविकांनां कसून विरोध केला आहे.

चवथ्या शतकाच्या आरंभीं कान्स्टंटाइन दी ग्रेट यानें पाठविलेल्या धर्मोपदेशकांनीं येथें ख्रिस्ती धर्माचें बीजारोपण केलें. त्या वेळेपासून भोंवतालच्या मुसुलमानीं धर्माला दाद न देतां येथील लोक अजून ख्रिस्ती धर्माच्या पुराणमतवादी पंथालाच चिकटून आहेत.

येथील लोक कार्थली भाषा बोलतात. या भाषेचा आणि इन्डोयूरोपियन भाषांच्या कुळाचा मूळापासून संबंध नाहीं इतकेंच नव्हे तर तिचा दोन उत्तर काकेशिअन वर्गांशीं देखील वर्णोच्चाराशिवाय कोणच्याच प्रकारचा संबंध दिसून येत नाहीं. मध्य आणि पश्चिम काकेशिअन प्रांतांतील भाषांची आणि या भाषेची वर्णोच्चारपद्धति एक असल्यामुळें या भाषेंत त्या कदाचित् लिहितां येतील. ही भाषा उच्चारण्यास सुलभ नसल्यामुळें कानाला मधुर लागत नाहीं व बोलतांना श्रम होऊन अडखळल्यासारखें होतें. व्याकरणाचे नियम चांगले असल्यामुळें लिहितांना त्रास होत नाहीं.

जॉर्जियन लिपी आर्मेनियन लिपीवरून तयार केली असून ती तद्देशीय मूळाक्षरांत लिहितात. या मूळाक्षरांचे दोन प्रकार आहेत व या दोन्हींचें स्वरूप इतकें वेगळें आहे कीं हे दोन्ही निरनिराळ्या दोन लिपींचे प्रकार आहेत असा भास होतो. पांचव्या शतकांत या भाषेंत बायबलचें भाषांतर केलें असें म्हणतात. याशिवाय मोंगली काव्यें, महाकाव्यें आणि धार्मिक ग्रंथहि या भाषेंत रचले आहेत.

इ ति हा स.—महायुद्ध सुरू झाल्यापासूनच्या पहिल्या दोन वर्षांत जॉर्जिया हा रशियाचा प्रांत म्हणून गणला जात होता. आपला देश लवकरच स्वतंत्र होईल अशी प्रत्यक्ष जॉर्जियन लोकांनांहि महायुद्धाच्या प्रारंभीं कल्पना नव्हती. पण काळाचा महिमा अतर्क्य आहे. या काळाच्या आनुकुल्यामुळें स. १९१७ च्या वसंत ऋतूंत रशियांत लवकरच क्रांति घडून येण्याचीं चिन्हें दृग्गोचर होऊं लागलीं व या क्रांतीमध्यें आपल्या भावी स्वातंत्र्याचीं बीजें रुजलीं आहेत असें जॉर्जियन लोकांनां वाटूं लागलें. सबंध ट्रान्सकॉकेशियाच स्वतंत्र होईल कीं काय अशा प्रकारचे कयासहि बांधण्यांत येऊं लागले होते. आणि खरोखरच त्याप्रमाणें घडून आलें. स. १९१७ च्या सप्टेंबरमध्यें रशियांत राज्यक्रांतीचा शेवट होऊन रशिया हें रिपब्लिक बनलें. अर्थातच ट्रान्सकॉकेशियन प्रांतांनांहि आपलें भवितव्य ठरविण्याची संधि येऊन ठेपली.

ही संधि त्या टापूंतील लोकांनीं वाया जाऊं दिली नाहीं. जॉर्जियन व आर्मेनियन लोकांमध्यें स्वातंत्र्याची लालसा उत्पन्न झाल्यामुळें त्यांच्यामध्यें चटकन ऐक्य झालें. पण याशिवाय या टापूंत तार्तर लोकांचाहि भरणा होता.त्यांनांहि आपल्या मसलतींत ओढून घेणें भाग आहे असें जॉर्जियन व आर्मेनियन लोकांनां वाटत होतें व तें योग्यहि होतें. यासाठीं टिफ्लिस येथें स. १९१७ च्या आगस्टमध्येंच ट्रॅन्सकॉकेशियन लोकांनीं निवडून दिलेल्या प्रतिनिधींची बैठक भरली व त्यांनीं स.१९१७ च्या सप्टेंबरमध्यें आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें. या बैठकींत जॉर्जियन लोकांनीं प्रामुख्यानें भाग घेतला होता.

पण अशा रीतीनें या टापूंतील लोकांनीं आपलें संयुक्त रिपब्लिक स्थापन केलें तरी तें फार दिवस टिकणार नाहीं अशी भीति प्रथमपासूनच वाटत होती. टापूंतील निरनिराळ्या संस्थानांमध्यें परस्परांमध्यें द्वेषाग्नि धुमसत होता. संयुक्त रिपब्लिकमध्यें जॉर्जयाचें प्राबल्य असल्यामुळें इतर संस्थानांनां या जॉर्जियाविषयीं हेवा वाटत होता. फक्त एकाच बाबतींत या सर्व संस्थानांचें ऐकमत्य होतें व तें म्हणजे बोल्शेविझमच्या तीं सर्व राष्ट्रें विरुद्ध होतीं हें होय.

स. १९१७ च्या नोव्हेंबरमध्यें लेनिन, ट्रॉट्स्की हे अधिकारारूढ झाल्यामुळें त्यांनीं तुर्की सरहद्दीवरील आपलें सैन्य काढून घेण्यास सुरुवात केली. त्यामुळें तुर्कांचा या टापूंत जोर होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. याविरुद्ध आपलें रक्षण करण्याकरितां ट्रॅन्सकॉकेशियन लोकांनीं आपलें सैन्य उभारलें व आपल्या संरक्षणाची तजवीज सुरू केली.

लेनिनच्या मनांत ट्रान्सकॉकेशियन टापू आपल्या ताब्यांत असावा असें होतें व त्यासाठीं त्यानें या प्रांतावर अधिकार चालविण्याकरितां एक सुभेदार पाठवून दिला. पण टिफ्लिस येथें येतांच या सुभेदाराला अर्धचंद्र मिळाला. त्यामुळें चिडून जाऊन या सुभेदारानें १०००० आर्मेनियन बंडखोरांच्या सहाय्यानें व बोल्शेविक आरमाराच्या सहाय्यानें या टापूंत बोल्शेव्हिकांचा अंमल बसविला. व तार्तार लोकांची एकजात कत्तल केली. या कृत्यामुळें जॉर्जियन व आर्मेनियन लोकांचें तार्तार लोकांशीं ऐक्य होण्याची संधि मात्र नष्ट झाली.

याचीं फळेंहि लौकरच दिसून आलीं. स १९१८ च्या मार्चमध्यें ब्रेस्ट लिटोव्हस्क येथें रशिया व जर्मनी यांच्यांत तह होऊन त्या तहान्वयें आर्मेनियाचा कांहीं प्रदेश, जॉर्जिया प्रांत व बाटूमचा कांहीं भाग तुर्कांनां देण्याचें या दोघां राष्ट्रांनीं ठरविलें. त्याप्रमाणें आपला भाग ताब्यांत घेण्याकरितां तुर्की सैन्य त्या भागांत आलें. बाटूम हें तुर्कांच्या हातांत तावडतोब पडलें. या ट्रान्सकॉकेशियन लोकांत ऐक्य असतें तर त्यांनीं तुर्कांनां विरोध केला असता. पण यांच्यामध्येंच दुही असल्यामुळे आपलें स्वातंत्र्य जाहीर करण्यापलीकडे यांच्या हातून तुर्कांनां विरोध झाला नाहीं. १९१८ च्या मे महिन्यांत, संयुक्त रिपब्लिक मोडलें व प्रत्येक संस्थानानें आपलें वैयक्तिक स्वातंत्र्य जाहीर केलें. अर्थातच या संस्थानांनां आपापलें स्वातंत्र्य स्वतःच्या जोरावर राखणें भाग पडलें. पण तशी तयारी कोणत्याच एका संस्थानाजवळ नव्हती. अशा स्थितींत जॉर्जियानें शहाणपणानें जर्मनीशीं सूत बांधलें. जर्मनी व जॉर्जिया यांच्यामध्यें तह होऊन जॉर्जियन रिपब्लिकचें संरक्षण करण्याचें जर्मनीनें कबूल केलें. बाटूम बंदर तुर्कांच्या ताब्यांत होतें तरी तेथील जॉर्जियाचे हितसंबंध सुरक्षित राखण्याचेंहि अभिवचन जर्मनीकडून जॉर्जियाला मिळालें व हें वचन जर्मन सैन्य या टापूंत असे तों जर्मनीनें पाळलेंहि.

पण महायुद्धाची तहकुबी झाल्यानंतर सर्वच परिस्थिति बदलली. दोस्तराष्ट्रांनीं जर्मन व तुर्की सैन्याचें या ट्रान्सकॉकेशियन टापूंतून उच्चाटण करून, आपलें वर्चस्व तेथें स्थापित केलें. पण दोस्तांनीं जॉर्जियाच्या रिपब्लिकच्या कारभारांत अडथळा आणला नाहीं. रेल्वे मात्र आपल्या ताब्यांत घेण्याशिवाय त्यांनां गत्यंतरच नव्हतें.

या अवधींत सरहद्दीवरील कांहीं मुलुखांसंबंधीं एरिव्हान व जॉर्जिया यांमध्यें तंटा झाला. पण ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या मध्यस्थीनें तो कसाबसा मिटवण्यांत आला. पुढें स. १९१९ मध्यें पॅरिस येथें शांततापरिषद भरली. त्या परिषदेंत जॉर्जियाचें प्रतिनिधिमंडळ हजर होतें. ट्रान्सकॉकेशियन प्रश्नाचा या परिषदेंत काळजीपूर्वक विचार केला जाईल असें

वाटत होतें. पण रशियाच्या संमतीशिवाय या प्रश्नाचा निकाल लावता येणें शक्य नव्हतें. रशियांतच अद्यापि स्थिरस्थावर झालें नसल्यामुळें या प्रश्नाचा सांगोपांग विचार करण्याला रशिया तयार नव्हता. त्यामुळें या प्रश्नाचा काळजीपूर्वक विचार करण्याचा वेत या परिषदेनें पुढें ढकलला. फक्त ट्रान्सकॉकेशियन प्रांतांतील संस्थानें स्वतंत्र आहेत व निरनिराळ्या संस्थानांच्या सरहद्दी ठरविण्यांत याव्यात एवढेंच या परिषदेंत ठरविण्यांत आलें. १९१९ च्या ऑगस्टपर्यंत या टापूंत दोस्तांचें सैन्य होतें. पण त्यानंतर कांहीं थोड्या सैन्याशिवाय सगळें सैन्य काढून घेण्यांत आलें.

१९१९ सालीं जनरल डेनिकिननें बोल्शेविक रशियाविरुद्ध जोराची चळवळ सुरू केली. या बाबतींत त्याला पुष्कळच अनुयायी मिळाले. हा डेनिकिन ट्रान्सकॉकेशियन संस्थानाच्या स्वातंत्र्याविरुद्ध होता. विशेषतः या टापूंतील रशियन वर्चस्वाला पुढें मार्गे जॉर्जियाकडून विरोध होईल या भीतीनें जॉर्जियाचें स्वातंत्र्य नष्ट करण्याचें त्याच्या मनांत होतें. पण डेनिकिनचा बोल्शेव्हिकांनीं पराभव केल्यामुळें डेनिकिनची भीति नष्ट झाली खरी. तथापि बोल्शेव्हिकांनीं आपला अंमल ट्रान्सकॉकेशियन टापूंत बसविण्याची चळवळ सुरू केल्यानें हें निराळेंच संकट जॉर्जियावर आलें. बोल्शेव्हिकांनीं, अझरबैझन, एरिव्हन संस्थानें काबीज करून तेथें आपला अंमल बसविला व जॉर्जियावर स्वारी केली. पण ही स्वारी जॉर्जियानें शौर्यानें परतविली. पुन्हां बोल्शेविक लोक जॉर्जियावर स्वारी करावयाचेच पण पोलंडवर मोहीम सुरू करण्याची रशियाला अधिक जरूरी भासल्यामुळें रशियानें जॉर्जियावर सैन्य पाठविण्याचें रहित केलें; व जॉर्जियाशीं तात्पुरता तह केला. या तहान्वयें बाटुमचा प्रांत व बंदर जॉर्जियाच्या ताब्यांत आलें.

राष्ट्रसंघानें बाटुम हें स्वतंत्र न करण्याचें याच सुमारास ठरविल्यानें राष्ट्रसंघानें हा टापू जॉर्जियाच्या ताब्यांतच ठेवण्याचें ठरविलें. फक्त एरिव्हन व अझरबैजन प्रांतांना मात्र तें बंदर खुलें असावें अशी अट घातली.

जॉर्जियाच्या ताब्यांत हा टापू आल्यावर त्यानें मुत्सद्दीपणानें या टापूंतील अजेरियन नांवाच्या मुसलमान जातीला स्थानिक स्वातंत्र्य देऊन टाकून आपल्या बाजूला वळवून घेतलें. पण अशा रीतीनें जॉर्जियाला आपल्या टापूंतील अंतर्गत कारभार व शांतता प्रस्थापित करतां आली तरी बोल्शेविक रशिया व तुर्कस्तान या दोन्ही राष्ट्रांचा बागुलबोवा जॉर्जियाला चैन पडूं देत नव्हता. लौकरच त्या बागुलबोवानें डोकें वर काढण्यास सुरुवात केली. एकीकडून तुर्कांनीं व दुसरीकडून रशियनांनीं या ट्रान्सकॉकेशियन टापूवर चाल केली; व आर्मेनिया वगैरे भागांत रशियनांनीं आपला अंमल स्थापन केला. जॉर्जिया एकटा या हल्ल्यांना तोंड देण्यास समर्थ नव्हता. तेव्हां त्याला नमतें घेण्याशिवाय गत्यंतरच उरलें नाहीं. पण त्यांतल्यात्यांत तुर्कांच्या ताब्यांत बाटूम बंदर राहूं देण्यापेक्षां व आपला प्रदेश तुर्की अमलाखालीं जाण्यापेक्षां आपल्या राष्ट्राचें नशीब रशियन लोकांच्याच हातीं देणें जॉर्जियाला अधिक सोईस्कर वाटलें व त्याप्रमाणें १९२१ सालीं जॉर्जियामध्यें रशियन बोल्शेविक अंमल चालू झाला.

इ. स. १९२४ च्या सप्टेंबरांत जॉर्जियाच्या प्रजासत्ताक राज्यामध्यें, जॉर्जियन आणि सोव्हिएट लोक यांच्यामध्यें कडाक्याचें युद्ध झालें. बंडखोरांनीं, ट्रान्सकॉकेशियन रेल्वे आपल्या ताब्यांत घेतली आणि सबंध कॉकेशसभर लष्करी कायदा प्रस्थापित करण्यांत आला. बोल्शेव्हिक लोकांचा या युद्धांत अनेक वेळां पराभव झाला; आणि बंडखोरांनीं, टिफ्लीस आणि कुटैस हीं शहरें व्यापिलीं. ब्रिटिश, फ्रेंच आणि बेल्जियन सभासदांनीं जॉर्जियांत चाललेली ही अंदाधुंदी बारकाईनें पहाण्याची, राष्ट्रसंघास ( लीग ऑफ् नेशन्स ) विनंति केली. त्याचप्रमाणें देशांत पुनश्च शांतता प्रस्थापित करण्याची खटपट करण्याचीहि राष्ट्रसंघास विनंति करण्यांत आली. सोव्हिएट लोकांच्या तत्त्वांवर विश्वास नसणाऱ्यांनीं सोव्हिएटांची बदनामी करण्याच्या हेतूनें पुष्कळ वेळां सोव्हिएटांनीं केलेल्या कत्तलींचीं वर्णनें अतिशयोक्तीपूर्ण अशीं केलीं असणें शक्य आहे.

जॉर्जियांतील ह्या राज्यक्रांतीचा पूर ओसारतो न ओसरतो तोंच अझरबैजनमध्यें एक नवें बंड उपस्थित झालें. बकूच्या तेलाच्या खाणींत काम करणाऱ्या हजारों मजूरांनीं व शेतांत राबणाऱ्या शेतकऱ्यांनीं हें बण्ड उभारलें होतें. याचीं कारणें-( १ ) रशियन लोकांकडून खाणींत काम करणाऱ्या मजूरांना मिळणारी मजूरी अगदींच अल्प व अपुरी होती. ( २ ) शेतकऱ्यांनीं पिकविलेल्या गव्हाला अगदीं थोडी किंमत येई.

राष्ट्रसंघानें ( लीग ऑफ् नेशन्स ) केलेल्या मध्यस्थीबद्दल सोव्हिएट सरकारास मनांतून खूप संताप आला व पश्चिम युरोपियन राष्ट्रांनीं, सोव्हिएट सरकाराविरुद्ध झालेल्या बंडास सहानुभूति दर्शविली असा सोव्हिएट सरकारनें निष्कर्ष काढला. सोव्हिएट सैन्य डोंगरी मुलुखांत जबरीनें परत पाठविण्यांत आलें. सप्टेंबर महिन्याच्या अखेरीस, सोव्हिएट सैनिक टिफ्लीस शहरांत शिरले. त्यावेळीं, टिफ्लीस शहरांतील कित्येक रहिवाशांना चेकाकडून फाशीं देण्यांत आलें.

**जॉर्जिया**—अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं एक संस्थान. या संस्थानचें क्षेत्रफळ ५९२६५ चौ. मै. असून, त्यापैकीं ५४० चौ. मैलांचा भाग पाण्यानें व्यापिला आहे. लो. सं. ( जुलै १९१८ ) २९३५६१७. 'ॲटलान्टा' हें राजधानीचें शहर आहे.

बॅप्टिस्ट आणि मेथॉडिस्ट या पंथांच्या लोकांची संख्या फार असून सबंध संस्थानांतील लोकसंख्येच्या निम्म्याहून अधिक लोक बॅप्टिस्ट पंथाचे आहेत. प्राथमिक शिक्षण सक्तीचें झालें नाहीं. 'स्टेट स्कूल कमिशनर' नांवाचा लोकनियुक्त अधिकारी शिक्षणखात्यावरील मुख्य असतो. दर

दोन वर्षांनीं हा नवा निवडतात. प्रत्येक परगण्या(कौन्टी)वर एक 'सुपरव्हायझर,' असतो 'युनिव्हर्सिटी ऑफ जॉर्जिया, अथेन्स, जॉर्जिया स्कूल ऑफ् टेक्नॉलॉजी आणि नॉर्थ जॉर्जिया अग्रिकल्चरल कॉलेज या उच्च शिक्षण देणाऱ्या तीन प्रमुख संस्था आहेत.

कापूस, मका, ओट, गहूं हीं महत्त्वाचीं पिकें आहेत. उंसाची लागवडहि दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणांत होत आहे. या संस्थानांत पाईन वृक्षांचीं दाट अरण्यें असून त्यांनीं ४२००० चौ. मैलांचा प्रदेश व्यापिला आहे. घोडे, खेचर, गाय, मेंढी व डुक्कर हीं संस्थानांत आढळणारीं प्रमुख जनावरें होत. शेतीच्या कामाकरितां, पहिल्या दोन जातींच्या जनावरांचा मुख्यत्वेंकरून उपयोग होतो.

मासे मारण्याचा धंदाहि संस्थानांतील महत्त्वाच्या धंद्यांपैकीं एक आहे. सोनें, चांदी, कोळसा, लोखंड, मँगॅनीजधातू, बॉक्साईट ग्रॅफाईट, चुनखडी, नैसर्गिक सिमेंट, काविनी माती, शंखजिरे वगैरे खनिज पदार्थ संस्थानांत विपुल सांपडतात. जॉर्जियांत सांपडणारा संगमरवरी दगड सुबकपणाबद्दल प्रसिद्ध आहे. १९१५ सालीं संस्थानांतून ५७९४६८८ डॉलर किंमतीचा खनिज मालाची निर्गत झाली. संस्थानांत कापडाचे, कापूस दाबण्याचे व गठ्ठे बांधण्याचे अनेक मोठमोठे कारखाने आहेत.

जलमार्गानें आणि खुष्कीच्या मार्गानें प्रवास करण्याचीं साधनें पुष्कळ आहेत. सावन्ना हें मुख्य बंदर असून मोठमोठीं जहाजें सुद्धां आंत येऊं शकतात. १९१३ सालीं या बंदरांतून, १०५६७०७ पौंड किंमतीच्या मालाची आयात व २०१३९९४८ पौंडांची निर्गत झाली. कापूस, सरकीचें तेल व पेंड या जिनसा निर्गतींतील मुख्य होत. टर्पेंटाईन तेल आणि इमारती लांकूडहि येथून पुष्कळ रवाना झालें. १९१५ सालीं येथें ७४८२ मैलांचा वाफेच्या गाडीचा व ४८५ मैलांचा विजेच्या गाडीचा रस्ता तयार होता. १९१७ सालीं, जॉर्जियांत, १९ सेव्हिंग्ज बँका असून त्यांत '५०००० लोकांनीं ठेवी ठेविल्या होत्या.

जॉर्जियाची ( दुसऱ्या जॉर्ज राजाच्या नांवावरून ) वसाहत, १७३३ सालीं स्थापण्यांत आली. ४४ सभासदांचें वरिष्ठ मंडळ(सेनेट) आणि १८९ सभासदांचे प्रतिनिधिमंडळ ( हाऊस ऑफ रिप्रेझेंटेटिव्हज् ) असतें. दर दोन वर्षांनीं वरिष्ठ मंडळ आणि प्रतिनिधिमंडळ यांतील सभासदांची नवी निवड होते. कॉंग्रेसमध्यें या संस्थानतर्फे सेनेटमधील आणि 'हाऊस ऑफ रिप्रेझेंटेटिव्हज्' मधील अनुक्रमें दोन आणि बारा सभासद पाठविले जातात [ संदर्भग्रंथ दि स्टेटमन्स इयर बुक, १९१९; संस्थानांतील वेगवेगळ्या खात्यांचे रिपोर्ट, इ.]

**जालंदर**, जि ल्हा.—पंजाब; जालंदर विभागांतील एक जिल्हा. उ. अ. ३०° ५६' ते ३१° ३७' व पू. रे. ७५° ५' ते ७६° १६'. क्षेत्रफळ १३४२ चौरस मैल. हा जिल्हा बियास आणि सतलज या दोन नद्यांमध्यें आहे. दक्षिणेस सतलज नदी असून पलीकडे लुधियाना, फेरोजपुर जिल्हे; ईशान्येस होशिआरपुर जिल्हा. सतलज नदीचें खोरें जरा उंचावरच आहे तरी प्रदेश सर्व सपाट आहे पश्चिमेस बिआस नदीकडे या प्रदेशास थोडा उतार आहे. हा प्रदेश सुपीक असून शीख लोक या भागास 'पंजाबची बाग' असें म्हणत असत.

सर्व प्रदेश मळईचा असल्यामुळें भूस्तरशास्त्रदृष्ट्या या भागांत विशेष कांहीं नाहीं. त्याचप्रमाणें शेती या भागांत बरीच वाढल्यामुळें नैसर्गिक वनस्पतीची वाढ फार नाहीं. आंबे आणि बोरें यांची या भागांत लागवड करतात. लांडगे, काळवीट, ससे, शेतांतील उंदीर मनस्वी असून पिकास फार त्रास देतात.सपाटीवर येथील हवा समशीतोष्ण आहे.जून आणि जुलई महिन्यांत उन्हाळा असतो. परंतु फार भासत नाहीं. पावसाळ्यांत हिंवतापाची सांथ लोकांस बरीच त्रास देते. पावसाची सरासरी २४ इंच आहे.

इतिहासः—श्रीशंकरानें जालंधर राक्षसाचा पराभव या भागांत केला अशी एक कथा आहे. त्यावरून या भागास हें नांव मिळालें असें म्हणतात. ख्रिस्ती शकाच्या आरंभीं कनिष्काच्या कारकीर्दींत भरलेल्या बौद्धसंगीतीसंबंधांत जालंदराचा उल्लेख आलेला आहे. सातव्या शतकांत जालंधर त्रिगर्तांच्या राजधानीचें शहर असून तें रजपूत राज्य होशिआरपुर व कांग्रा हे जिल्हे आणि चंबा, मंडी व सुकेत हीं संस्थानें यांनीं व्यापलेल्या प्रदेशावर होतें असें चिनी प्रवासी ह्युएनत्संग म्हणतो. नवव्या शतकांत काश्मीरचा राजा शंकरचंद्र यानें त्रिगर्तांचा राजा पृथ्वीचंद्र याचा पराजय केला असा उल्लेख 'राजतरंगिणींत' आहे. इ. स. १०८८ च्या सुमारास इब्राहिमशहा घोरीनें तें शहर काबीज केलें. त्यावेळेपासून हा प्रदेश लाहोरच्या सुभ्यांत मोडत असून त्यावर मुसुलमानी अंमल होता असें दिसतें. सय्यद घराण्याच्या कारकीर्दींत ( १४१४-५१ ) या भागांवर त्यांची सत्ता विशेष नव्हती; त्यामुळें येथें त्या सुमारास बरीच गडबड झाली. त्यांत खोक्करचा राजा जसरथ यानें आरंभलेली मोहीम प्रसिद्ध आहे. इ. स. १५५५ मध्यें हुमायूनच्या निशाणाखालीं मोगल सैन्य येथेंच जमा झालें व याच्या आसपास १५६०सालीं हुमायूननें बहिरामखानाचा पराजय केला. जालंदरचा शेवटचा व प्रसिद्ध सुभेदार अदीनाबेग हा होय. अहमदशहा दुराणीनें नूरमहाल व कर्तारपुर या दोन शहरांची लूट केली होती. विशेषतः कर्तारपुर शहरांतील पवित्र स्थानें दुराणीनें भ्रष्ट केली. या गोष्टीचा सूड म्हणून शिखांनीं जालंधर शहर इ. स. १७५७त जाळलें.

मोंगली पातशाहीस शिखांनीं ज्यावेळीं विरोध सुरू केला त्यावेळीं त्यांस या जिल्ह्यांत पुष्कळ अनुयायी मिळाले. पुष्कळ छोटे छोटे सरदार त्यांस मिळाले व तलवारीच्या

जोरावर आपली स्वतंत्र सत्ता दुआवच्या निरनिराळ्या भागांवर त्यांनीं प्रस्थापित केली. इ. स. १७६६ मध्यें जालंदर शहर फैजुल्लापुरिआ मिसलच्या ताब्यांत गेलें. त्यावेळीं या समूहाचा पुढारी खुशालसिंग नांवाचा होता. याचा पुत्र बुधसिंग यानें जालंदरास भुईकोट किल्ला बांधला. याप्रमाणें निरनिराळ्या ठिकाणीं या भागांत पुष्कळ गांवांस तटबंदी निरनिराळ्या लहान लहान राजांनीं केली. मध्यंतरीं रणजितसिंग हा सर्वांत प्रबल होता. इ. स. १८११ मध्यें महाराजा रणजितासिंगानें हा प्रदेश जिंकला. पहिली शीख लढाई संपल्यानंतर जालंदर दुआब ब्रिटिशांकडे आला.

१८५७ सालच्या बंडांत जालंदर व फिल्लर येथील काळ्या सैन्यानें बंड उभारलें होतें. त्यावेळीं कुपुरथळाचा राजा रणधीरसिंग यानें या भागांत शांतता ठेवण्यांत बरीच मदत केली. नकोदर येथील दर्गे व नूरमहाल येथील नूरजहानची सराई हीं प्राचीन ठिकाणें या जिल्ह्यांत पहाण्यासारखीं आहेत. लोकसंख्या ( १९२१ ) ८२२५४४. या जिल्ह्यांत चार तहसिली आहेत व ८ म्युनिसिपालिटया आहेत. या जिल्ह्यांत मुसुलमान शेंकडा ४५, हिंदु शेंकडा ४० व शीख शेंकडा १४ आहेत. या जिल्ह्यांत सर्व लोक पंजाबी भाषा बोलतात. या जिल्ह्यांतील बहुतेक जमीन लागवडीखालीं आहे. येथें गहूं, हरभरा, जव व मका हीं मुख्य पिकें आहेत. ऊंसाची लागवड येथें करतात.

इ. स. १९०३-४ मध्यें एकंदर १३५७ चौरस मैल जमीनीपैकीं १०९३ चौरस मैल जमीन लागवडीखालीं होती. आतां याउपर जास्त जमीन लागवडीखालीं येईल असें दिसत नाहीं. या भागांत विहिरी पुष्कळ आहेत. गुरांची अवलाद या जिल्ह्यांत चांगली नसल्यामुळें दरवर्षी इतर जिल्ह्यांतून शेतकामाकरितां पुष्कळ गुरें विकत आणावीं लागतात. ऐनी-इ-अकबरीमध्यें जालंदर दुआबांतील घोड्यांची अवलाद प्रसिद्ध आहे असा उल्लेख आहे. परंतु हल्लीं तसें दिसत नाहीं. येथें फक्त ८८५ एकर जमीन संरक्षित जंगल म्हणून असून त्यांत शिसवी व कीकर यांची लागवड केलेली आहे. या भागांत कंकर विपुल आहे. क्षारयुक्त जमीनींतून सोरा तयार करतात.

सुती विणकामाचे हातमाग या जिल्ह्यांत बरेच चालतात. खुद्द जालंदर शहरांत रेशमी विणकामाचे २५० हातमाग इ. स. १८९९ मध्यें होते. लांकडी सामान, खुर्च्या वगैरे येथें बरेंच तयार होतें. या जिल्ह्याचा बहुतेक व्यापार शेतकीविषयकच आहे. गहूं, कापूस, सुती व रेशमी कापड वगैरे पदार्थ येथून बाहेर जातात. नॉर्थ वेस्टर्न रेल्वे या जिल्ह्यांतून गेली असून तिचे या भागांत कांहीं ठिकाणीं फांटे होणार आहेत. या जिल्ह्यांतील रस्ते चांगले आहेत. पावसाळ्यांत सतलज नदीवर होड्या चालतात. ब्रिटिश अमदानी सुरू झाल्यापासून या जिल्ह्यांत कधीं दुष्काळ पडला नाहीं.

जिल्ह्याचा अधिकारी डेप्युटी कमिशनर असतो. अकबराच्या कारकीर्दींत हा जिल्हा लाहोर सुभ्यांतील दुआब बिस्ट जालंदर नामक सरकारांत मोडत होता. अकबरानंतरच्या मोंगल बादशहांनीं राजा तोडरमल यानें सुरू केलेली नगदी सारापद्धति बंद केली व जो कोणी जास्त पैसा देण्याचें कबूल करील त्यास त्या भागांतील खेडीं खंडानें देऊं लागले. शिखांच्या अमदानींत तर हेंहि बंद झालें व ज्यास जितकें ज्यास्त मिळेल तितकें घेण्याची प्रवृत्ति होऊं लागली. महाराजा रणजितसिंगानें कांहीं सुधारणा करण्याचा प्रयत्न केला. इ. स. १८४६ मध्यें हा भाग ब्रिटिशांकडे आला. त्यावेळीं झालेल्या पहाणींत १३॥ लाख रुपये उत्पन्नाचा हा जिल्हा होता. १९०३-०४ सालीं सरकारसारा १४०५ हजार व एकंदर उत्पन्न २०२५ हजार रुपये होतें.

या जिल्ह्यांत जालंदर, करतारपुर, अलवालपुर, फिल्लर, नूरमहाल, राहोण, नवाशहर, बंग आणि नकोदर अशा ९ म्युनिसिपालिटया आहेत.

तहसील.— जालंदर जिल्ह्याची उत्तरेकडील तहसील. उत्तर अक्षांश ३१ १२′ ते ३१° ३७′ व पूर्व रेखांश ७५° २६′ ते ७५° ४१′. क्षेत्रफळ ३९० चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) २८९३९६. जालंदर हें मुख्य ठिकाण असून शिवाय करतारपुर आणि अलवालपुर हीं गांवें व ४०५ खेडीं आहेत. १९०३-०४ सालीं या तहसिलीचें एकंदर उत्पन्न ४.८ लाख रुपये होतें.

शहर.—पंजाब, जालंदर विभाग व जिल्हा. उ. अ. ३१° २०′ व पू. रे. ७५° ३५′. हें नॉर्थ वेस्टर्न रेल्वेवर स्टेशन असून मुंबईहुन १२४७ मैल आहे. लो. सं. (१९११) ६९३१८. जालंदर दैत्याच्या पाठीवर हें शहर वसविलें आहे असें पुराणें सांगतात. शहराच्या भोंवतालचा भाग पवित्र मानला जात असून त्याची यात्रा पुण्यफलदायक होते असें सांगतात.

ह्युएनत्संग दोन वेळां, ( एकदां इ. स. ६३४ मध्यें व दुसऱ्यांदां इ. स. ६४३ मध्यें ) जालंधरला आला होता. त्यावेळीं हें उत्तर हिंदुस्थानांतील राजधानीचें शहर होतें असें वर्णन आहे. हर्षशिलादित्यानें ह्युएनत्संग चीनला परत जातांना त्याला पोहोंचविण्याकरितां मुद्दाम जालंदरच्या राजास बरोबर दिलें होतें. कोठल्या तरी काळांतल्या एका बीननांवीं जालंधर राजाला बौद्धधर्माच्या वरिष्ठ अधिकाऱ्यानें सबंध हिंदुस्थानांतील बौद्धधर्मशासनाचा व भिक्षूंनां शिक्षा व बक्षिसें देण्याचा अधिकार देऊन ठेविला होता. हाच राजा सर्व हिंदुस्थानभर हिंडून जागजागीं त्यानें स्तूप व मठ बांधिले, पण या विधानाची सत्यता सिद्ध करण्यास कांहीं एक पुरावा सांपडत नाहीं. उत्तर हिंदुस्थानांत सातव्या शतकांत बहुतेक ठिकाणीं जरी बौद्ध धर्मास उतरती कळा लागली होती तरी जालंदर येथें त्या धर्माची चढती कमान होती. तेथील

पन्नासांहून अधिक असलेल्या बौद्ध मठांत दोन हजारांहून जास्ती भिक्षू होते. पण इकडे शैव पंथाच्या तीन ब्राह्मणी देवस्थानांत अजमासें सारे पांचशेंच उपासक होते. ११ व्या शतकांत मुसुलमानी सत्ता हा भाग हस्तगत करीपर्यंत बुद्धोपासना तेथें टिकून राहिली होती. जालंदर येथील भिक्षूंनीं अभिधर्माचा विशेष अभ्यास केलेला असे. ह्युएनत्संग ६३४ मध्यें जो अभिधर्म भाष्य शिकला तो येथील चंद्रवर्ण नांवाच्या आचार्यापाशीं होय. इ. स. १०० च्या सुमारास सम्राट् कनिष्कानें भाष्यें रचण्याकरितां जी परिषद बोलावली होती ती तारानाथादिकांच्या मतें जालंदर येथील एका मठांत भरली होती, पण ह्युएनत्संग यांचें म्हणणें असें कीं ही सभा काश्मीरमध्येंच नक्की भरली. कदाचित् असेंहि असेल कीं प्रथम जालंदर येथें ही सभा भरून पुढें उन्हाळ्यानिमित्त त्याचीं अधिवेशनें काश्मीर येथें झालीं.

जालंदरला ब्रिटिश सैन्याची छावणी आहे.येथें स.१८६७त म्युनिसिपालिटीची स्थापना झाली.येथें ५।६ हायस्कुलें व एक कॉलेज आहे. स्त्रियांसाठीं कन्यामहाविद्यालय नांवाची एक संस्था आहे.

**जालना,** ता लु का.—हैद्राबाद संस्थान. औरंगाबाद जिल्ह्यांतील अगदीं पूर्वेकडचा तालुका असून त्याचें क्षेत्रफळ ७४४ चौरस मैल आहे. लो. सं. ( १९११ ) १३०६८१.या तालुक्यांत दोन गांवें आणि २५० खेडीं आहेत. पैकीं ५२ खेडीं जहागीर आहेत. जमीनमहसूल इ. स. १९०१ मध्यें २·५ लाख होता. जमीन काळी असून उत्तरेकडे आणि पूर्वेकडे थोडी डोंगराळ आहे.

श ह र.—जालना तालुक्याचें मुख्य ठिकाण असून तें कुंडालिका नदीच्या दक्षिण तीरावर वसलेलें आहे. उ. अ. १९° ५१' व पू. रे. ७५° ५४'. १९११ सालीं १८९९४ लोकसंख्या असून पैकीं १२८९१ हिंदू होते. रामराजाच्या वेळीं जालना अस्तित्वांत आलें अशी स्थानिक दंतकथा आहे. सीता या ठिकाणीं राहिली होती म्हणून यास जानकापूर म्हणत असत. परंतु पुढें एका मुसुलमान श्रीमंत कोष्टयानें त्याचें नांव जालना असें ठेवलें.अकबराचा मंत्री अबूल फझल हा कांहीं दिवस येथें राहिला होता. व औरंगझेब दक्षिणेचा सुभेदार असतांना वारंवार येथें येत असे. इ. स. १६७९ त शिवाजीनें हें शहर लुटलें. तेथें पुष्कळ लूट मिळाली. त्याला अडविण्यास शहाजादा शहाअलम व त्याचे सरदार यांनीं संगमनेरनजीक लढाई दिली. पण तींत मोंगलांचा पुरा पराभव झाला. शिवाजीनें पट्टा किल्ला व तेथून आडवाटेनें रायगडास ती लूट सुखरूप पोंहोंचविली. पुढें राजारामानेंहि हें शहर इ.स.१७००च्या सुमारास लुटलें.या वेळीं मोंगल त्याच्यावर चालून आले असतां त्यानें त्यांचा पराभव केला. याला जालनापूर असेंहि नांव होतें. या गांवींच स. १५९७ त आदिलशहानें मोंगल सेनापति खानखानान व राजा जगन्नाथ यांचा पराभव केला होता. स. १७५७–५८ त हा परगणा शिंद्यांच्या ताब्यांत होता. येथें एक मशीद व एक सराई पहाण्यासारख्या आहेत. त्या स. १५६८ मध्यें बांधल्या असल्या असें त्यावरील शिलालेखांवरून दिसतें. हिंदु देवळांमध्यें आनंदस्वामींचें देऊळ साधारण मोठें आहे. स. १७२५ मध्यें जालना येथें किल्ला बांधला होता. परंतु हल्लीं तो मोडकळीस आलेला आहे.जालन्यांतील बागांत फळफळावळ पुष्कळ पिकते. ती सर्व मुंबई व इतर ठिकाणीं रवाना होते. जालनाचें लष्करी ठाणें स. १८२७ मध्यें बांधलें होतें व त्या ठिकाणीं स. १९०३ पर्यंत निजामची कांहीं फौज होती. आतां हें लष्करी ठिकाण नाहीं.

**जालवणकर, नारायणबोवा**—एक महाराष्ट्रीय संतकवि. यांचा जन्म शके १७१५ त झाला व शके १७९० आषाढ वद्य ५ मी रोजीं ते समाधिस्त झाले. हे बाळपणापासूनच चांगले वैराग्यसंपन्न होते. यांनीं गिरनार पर्वतावर बारा वर्षें राहून तीव्र तपश्चर्या केली. यांनीं मुमुक्षूंचे सप्तसागर रचले आहेत ते येणेंप्रमाणेंः—( १ ) ज्ञानसागर, (२) विज्ञानसागर, ( ३ ) बोधसागर, ( ४ ) कैवल्यसागर, ( ५ ) आनंदसागर, ( ६ ) शांतिसागर, व ( ७ ) करुणासागर.

नारायणबोवाचे हे सर्व ग्रंथ ओवीबद्ध आहेत. सप्तसागरांपैकीं करुणासागर हा ग्रंथ फार चित्तवेधक आहे. यांचे शिष्यप्रशिष्य काशी, लष्कर, भेलसा, धार, देवास, पुणें इत्यादि ठिकाणीं आहेत. वरील ग्रंथांशिवाय गुरुपादुकाष्टक, चिद्रत्नमाला, बोधाष्टक, विचारमाला, निर्वाणपंचक वगैरे अनेक स्फुट प्रकरणें यांनीं लिहिलीं आहेत. शिवाय अभंग, पदें वगैरे बरीच आहेत. नारायणबोवांची कविता फार साधी, सुलभ आणि अध्यात्मज्ञानपरिपूर्ण आहे, असें रा. आजगांवकर लिहितात. [ महाराष्ट्र कविचरित्र. ]

**जालापहाड**—बंगाल, दार्जिलिंग जिल्हा. दार्जिलिंग स्टेशनच्या वर असलेली टेंकडी. उ. अ. २७° १' व पू. रे. ८८° १६'. दार्जिलिंग येथील लष्करी ठिकाण येथें आहे. येथील परेड ग्राउंड समुद्रसपाटीपासून ७५२० फूट उंच आहे.

**जालारी**—मद्रास इलाख्यांतील एक जात. वस्ती सुमारें २४ हजार आहे. हे मुख्यतः तेलगु कोळी, भोई ( पालखी वाहणारे), आणि शेतावर नांगर धरणारे गडी असतात. जाल ( जाळें ) या शब्दापासून जालारी या नांवाची व्युत्पत्ति झाली असावी असें कांहीं मानतात. सांप्रत, गंजम आणि विझगापट्टम् या जिल्ह्यांतून यांची वस्ती आढळते. मासे मारणें हा यांचा मुख्य धंदा आहे. यांनां गंगावसुलु (गंगेचे लोक) असें नांव असून कब्बेरा कोळ्यांच्या जातीला यांच्या प्रमाणेंच गंगमक्कलु असें ज्ञातिनाम आहे. जातिविषयक आचारकर्म, धार्मिक समारंभ इत्यादि बाबतींत जालारी लोकांचें मीला लोकांशीं निकट साम्य आहे.

जालारी लोकांत दोन वर्ग असून दोन्हीहि स्वज्ञातिशरीरसंबंध करणाऱ्या आहेत. पनरेन्डु कोटला (बारा खांब) आणि

एडुकोटला (सात खांब) अशी मांडवाच्या खांबांच्या संबंधावरून या वर्गांचीं नांवें पडलीं आहेत.पनेरेन्डुकोटला हे आपणांस एडुकोटला ज्ञातीपेक्षां श्रेष्ठ समजतात. कारण एडुकोटला शाखा ही अधर्मसंतति आहे असें ते समजतात. इतर तेलगू जातीप्रमाणें जालारी लोकांचेंहि एक ज्ञातिमंडळ असून त्याच्या अधिपतीस पिल्ला असें म्हणतात.डोलोवेहूर नामक एक कनिष्ठ अधिकारी असतो.

ओरिया जातीच्या रिवाजाप्रमाणें जालारी जातीची विधवा धाकट्या दीराशीं लग्न करते. पेड्डपट्टण, विझगापट्टण, बिमलीपट्टण आणि रावलपट्टण या चार शहरांतील प्रतिनिधींना प्रत्येक लग्नसमारंभास आमंत्रण असतें.

धार्मिक कृत्यांत जालारी हे वाडांचें अनुकरण करतात. संग्रहित केलेल्या जालारांच्या मृण्मूर्तीपैकीं कांहीं अशाः—

बंगाली बाबुः—हा काळ्या रंगाच्या घोड्यावर आरूढ झालेला असून मासे मारणाऱ्या कोळ्यांनां आशीर्वाद देत आहे असें दाखविलें आहे.

सामलम्माः— अंगांत हिरव्या रंगाचा अंगा घातला असून तापाच्या सांथीपासून ही कोळ्यांचें रक्षण करीत आहे.

राजन्याः—ही एका स्त्रीची मूर्ति असून, हिच्या उजव्या हातांत तलवार आहे, व ही काळ्या हत्तीवर आरूढ झालेली दाखविली आहे. वांझ स्त्रियांनां ह्या देवतेच्या कृपाप्रसादानें पुत्र होतात असा समज आहे.

येरनम्माः—हिच्या डाव्या हातांत तरवार असून ही अश्वारूढ आहे. ही देवता कोळ्यांचें, बुडणें वगैरे अपघातांपासून रक्षण करते.

भागीरथाम्माः—हिला आठ अथवा बारा भुजा असून ही गजारूढ आहे. पटकी, हगवण इत्यादि आजारांपासून ही देवता कोळ्यांचें रक्षण करते.

नुकलम्माः—ही देवता देवीच्या आजारापासून कोळ्यांनां रक्षिते.

ओरोसोन्डी अम्मवारुः— ही देवता वादळापासून बोटींचें रक्षण करते.

भागदेवीः—ही व्याघ्रारूढ असून कोळी जातीचें पटकीपासून संरक्षण करते.

वयीकनुल अम्मवारुः—ह्या देवतेला सहस्र डोळे असून ( एका मातीच्या कुंभाला हजार भोकें पाडून हे डोळे दाखविले आहेत. ) ही कोळी लोकांच्या स्वास्थ्याकरितां व कल्याणाकरितां अहर्निश झटते. [थर्स्टन]

**जालिआ**—मुंबई, काठेवाड. (१) जालिया आम्राजी चौकठाण्यांतील निराळी खंडणी देणारा तालुका.येथील तालुकदार सखैया रजपूत आहेत.

( २ ) जालिआ मानजी. चोकठाण्यांतील दुसरा एक स्वतंत्र खंडणी देणारा तालुका. ग्रासिया सरवैया रजपूत आहेत.

( ३ ) जालिआ देवाजी. हालार जिल्ह्यांतील निराळी खंडणी देणारा तालुका. यांत १० खेडीं आहेत. तालुकदार ध्रोलचा भायाद आहे. त्याचा मूळ पुरुष देवजी नांवाचा होता. जालिआ शहर उंड नदीच्या पूर्व तीरावर नवानगरपासून सुमारें २० मैलांवर वसलें आहे.

**जालोर**—राजपुताना. जोधपूर संस्थानांतील जालोर जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. जोधपूरच्या दक्षिणेस ७५ मैलांवर आहे. उ. अ. २५ ° २१' व पू. रे. ७२ ° ३७'. लोकसंख्या ( १९११ ) ७६२४. येथें पोस्ट शाळा, दवाखाना या सोयी आहेत. येथें सुती कापड, उंटाचीं जिनें व पंचरसी धातूंचीं नक्षी काढलेलीं पाण्याचीं भांडीं तयार होतात. याच्या दक्षिणेस टेंकडीवर किल्ला असून तो राजपुतान्यांत प्रसिद्ध आहे. परमार रजपुतांनीं तो बांधला असून अद्यापि तो चांगल्य स्थितींत आहे. किल्ला ८०० फूट लांब व ४०० फूट रुंद असून किल्ल्याची चढण सुमारें ३ मैल आहे. रस्ता दगडी असून निसरडा आहे. बाराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत किल्ला परमारांकडे होता. त्यानंतर नडोलच्या चव्हाण राव कीर्तिपाल यानें घेतला व तेथें आपली राजधानी केली. पुढें त्याचा नातू उदेसिंग याच्या हातून शमशुद्दीन अल्तमश यानें इ. स. १२१० च्या सुमारास घेतला होता. परंतु पुन्हां त्याच्या हवालीं परत केला. यानंतर शंभर वर्षांनीं अल्लाउद्दीनानें वेढा घालून खंडेराव चव्हाणकडून घेतला. याच वेळीं अल्लाउद्दीनानें बांधलेली तीन घुमटांची मशीद अद्यापि सुस्थितींत आहे. सन १५४० च्या सुमारास किल्ला व आसपासचा भाग जोधपूरचा राजा मालदेव याच्या अमलाखालीं आला.

**जालौन**, जिल्हा.—संयुक्तप्रांत, अलाहाबाद विभाग. उत्तर अक्षांश २५° ४६' ते २६° २७' व पूर्व रेखांश ७८° ५६' ते ७९° ५२'. क्षेत्रफळ १४८० चौरस मैल. हा जिल्हा ब्रिटिश बुंदेलखंडाचा अगदीं उत्तरेकडचा प्रदेश असून त्याच्या चारी दिशांस यमुना नदी व यमुनेस मिळणाऱ्या बटवा आणि फूज नद्या आहेत. बुंदेलखंडच्या सपाट मैदानानें हा जिल्हा व्यापलेला आहे. जमीन मळीची असून चुनखडी किंवा कंकर येथें सांपडतो. येथें वनस्पती फारशा नाहींत. बाभूळ आणि खैर हीं झाडें दृष्टीस पडतात. काल्पीजवळ कानपूर येथील कातडीं कमावण्याच्या कारखान्यास पुरवठा करण्याकरितां जंगलखात्यानें बाभळीची लागवड केली आहे.

प्राणीः—रानडुकरें, काळवीट,चित्ते, हे पुष्कळ सांपडतात. वाघ इकडे नाहींत. नद्यांत मासे सांपडतात. हवा उष्ण व कोरडी असून निरोगी आहे. वर्षाचें पावसाचें सरासरी प्रमाण ३२ इंच आहे. १८६८-६९ सालीं फक्त १३ इंच पाऊस पडला होता.

इतिहासः—या जिल्ह्याचा प्राचीन इतिहास उपलब्ध नाहीं. अठराव्या शतकापासून या भागानें राजकीय इतिहासांत भाग घेतला आहे. ११९६ सालीं कुतबुद्दीन

यानें काल्पी शहर जिंकलें होतें. यमुनपार होण्याकारितां काल्पी हें महत्त्वाचें ठिकाण असल्यामुळें येथें आसपास पुष्कळ लढाया झाल्या आहेत. बाबरच्याविरुद्ध लढण्याकरितां हिंदू राजे या ठिकाणीं जमले होते. येथूनच त्यांनीं बाबरवर चाल केली व त्यांचा फत्तेपुर शिक्रीच्या लढाईंत बाबरानें पराजय केला. अकबराच्या कारकीर्दींत हें 'सरकारचें' मुख्य ठिकाण होतें. अकबराच्या कारकीर्दीच्या अखेरीस बुंदेल्यांनीं काल्पी शहर हस्तगत करून घेतलें होतें. वीरसिंग देवानें या जिल्ह्याचा भाग जिंकून घेतला होता व त्याचें या प्रदेशावरील स्वामित्व जहांगीर बादशहानें कबूल केलें होतें. शहाजहानाच्या अमदानींत यानें बंड केलें. त्यांत त्याचा पराजय झाल्यामुळें तो हवे प्रदेश गमावून बसला. याच बुंदेल्यांच्या एका शाखेनें हमीरपूर जिल्ह्यांत डोकें वर काढलें आणि त्यांचा पुढारी छत्रसाल यानें आपल्या राज्यांत जालौन जिल्हा सामील केला. अठराव्या शतकाच्या आरंभीं जेव्हां अलहाबादच्या सुभेदारानें छत्रसालवर स्वारी केली तेव्हां त्यानें मराठ्यांची मदत मागितली होती. इ. स. १७३४ मध्यें हा मरण पावला. त्यावेळीं त्यानें आपल्या राज्याचा एकतृतियांश भाग मराठ्यांच्या स्वाधीन केला. मराठ्यांच्या कारकीर्दींत येथें वारंवार बंडाळी होत असे. इ. स. १७९८ मध्यें ब्रिटिशांनीं काल्पी काबीज केलें होतें. परंतु त्यावेळीं त्यांनीं तें सोडलें. वसईच्या तहानंतर एक वर्षानें झालेल्या तहांत पेशव्यांनीं सन १८०३ मध्यें लष्करखर्चाकरितां म्हणून हें ब्रिटिशांच्या हवालीं केलें. यमुनेजवळचा प्रदेश हिंमतबहाद्दराच्या हवालीं केला होता. कारण त्यानें ब्रिटिशांस चांगली मदत केली होती. जालौन जमीनदारीची व्यवस्था समाधानकारक नसल्यामुळें ब्रिटिश सरकारनें सन १८३८ पासून सर्व व्यवस्था आपल्या हातांत घेतली. सन १८५७ च्या बंडांत या भागांत फारच गडबड उडाली होती. सन १८९१ पर्यंत 'नॉन रेग्युलेशन' प्रमाणें या जिल्ह्याचा कारभार होत होता.

या जिल्ह्यांत प्राचीन इमारती फारशा नाहींत. ओरई तहसिलींतील अकोरी गांवीं दिल्लीचा राजा पृथ्वीराज आणि बुंदेलखंडचा राजा चंदेल यांची लढाई झाली होती. काल्पी येथें पुष्कळ मुसुलमानांचीं थडगीं आहेत.

या जिल्ह्यांत ५ गांवें आणि ८३६ खेडीं आहेत. बुंदेलखंडाच्या बदलत्या हवापाण्यामुळें लोकसंख्येची नेहमी चढउतर होत असते. लोकसंख्या (स. १९२१) ४०५४३९. या जिल्ह्यांत चार तहसिली आहेत. ओरई, काल्पी, जालौन, आणि कुंच. हिंदूंची वस्ती शेंकडा ९४ असून मुसुलमान शेंकडा ६ आहेत. सर्व लोक पाश्चात्य हिंदी भाषा बोलतात. पोटभाषा बुंदेली आहे.

शेती:—येथें गहूं चांगला पिकतो. चांगला पाऊस पडला तर पाणी द्यावें लागत नाहीं. कान्स नांवाचें तण शेतांत फार उगवत असल्यामुळें पिकाची फार नासाडी होते. उत्तरेकडे पिंगट व पिवळी जमीन आढळते. अहीर लोक तुपाचा धंदा करतात. या जिल्ह्यांतील जमीनदारी आणि पातिदारी या जमीनमहसूल पद्धती आहेत.

ज्वारी, गहूं, अरहर, बाजरी हीं धान्यें येथें पिकतात. गळिताचीं धान्यें व कापूस देखील येथें पिकतो. बुंदेलखंडांतलि इतर भागांप्रमाणें जालौन जिल्ह्यांतहि शेतकीचा धंदा फार अनिश्चित आहे. शेतकीच्या सुधारणा करण्याचा प्रयत्न चालू आहे.

येथील गुरें हलक्या प्रतीचीं आहेत. इ. स. १८८६ पर्यंत शेतीकरितां पाण्याचा पुरवठा फक्त विहिरीपासूनच होत असे. हल्लीं बटवा कॅनॉल सुरू झाल्यापासून बागायती जमीनीचें क्षेत्र वाढत आहे.

कंकर आणि सोरा हे खनिज पदार्थ या जिल्ह्यांत सांपडतात. पूर्वी येथें सुती कापड तयार होत असे. परंतु कानपूरचें गिरणींत झालेलें कापड मिळूं लागल्यामुळें हा धंदा बसला. येथून हरभरा, गळिताचीं धान्यें, कापूस आणि तूप बाहेर जातात. बाभळीची साल कानपूरला कातडीं कमावण्याकरितां पाठवितात. या जिल्ह्यांतून जी. आय. पी. रेल्वेचा एक फांटा जातो.

**त ह सी ल.**—संयुक्तप्रांत. जालौन जिल्ह्याची अगदीं उत्तरेकडील तहसील उ. अ. २६° ते २६° २७' व पू. रे. ७९° ३' ते ७९° ३१'. क्षेत्रफळ ४८१ चौ. मै. व लो. सं. (१९११) १६२१९१. या तहसिलींत दोन गांवें व ३७५खेडीं आहेत. १९०३-४सालीं जमीनधाऱ्याचें उत्पन्न३१६०००आणि इतर करांबद्दल ५१००० रुपये होतें. १९००-१ सालीं २७५ चौरस मैल कोरडवाहू लागवडीखालीं असून २५ चौ. मै. बागाइती होती.

**गां व.**—जालौन तहसीलीचें मुख्य ठिकाण असून ओराईपासून १३ मैलांवर आहे. उ. अ. २६° ८' व पू. रे. ७९° २१'. लो. सं. (१९११) ८२७७. अठराव्या शतकांत जालौन हें त्यावेळीं असलेल्या मराठी राज्याची राजधानी होतें. अद्यापिहि तेथील वजनदार लोक मराठी ब्राह्मणच असून पुष्कळांनां इनामी जमीन आहे. तहसिली, कचेऱ्या, दवाखाना, शाळा वगैरे सोयी येथें आहेत.

**जावजी दादाजी चौधरी** (स. १८३९-१८९२)—एक महाराष्ट्रीय छापखानदार. जातीनें मराठे. जन्म मुंबईंत (१८३९). हे छापखान्याच्या धंद्यांत केवळ स्वपराक्रमानें उदयास आले. आरंभीं हे तीन रुपयांवर नोकर होते. तेच पुढें स्वतः मालक होऊन दरमहा चार चार हजार रूपये लोकांस पगार वाटू लागले. १८६४ सालांत यांनीं स्वतंत्रपणें टाईप पाडून विकण्याचा धंदा आरंभिला. १८६९ त स्वतःचा छापखाना घातला. याच सुप्रसिद्ध छापखान्याचें नांव 'निर्णय सागर' होय. नवीन सुंदर अनेक प्रकारचे टाईप करण्यांत आणि पुस्तकें सुबक छापण्यांत यांनीं मोठी कीर्ति मिळविली. गुणी ग्रंथकारांनां यांनीं यथाशक्ति सहाय्य केलें संस्कृत

मराठी, हिंदी, गुजराथी व इंग्रजी भाषेत महत्त्वाची शेंकडों पुस्तकें प्रसिद्ध करून वाङ्मयांत अमूल्य भर घातली; व ग्रंथकारांस चांगलें उत्तेजन दिलें. यांच्या निर्णयसागर छापखान्याचा लौकिक अद्यापि कायम आहे मृत्यु ५ एप्रील १८९२.

**जावड**—मध्यहिंदुस्थान. ग्वाल्हेर संस्थान. मंदासागर जिल्ह्यांतील एक गांव. उत्तरअक्षांश २४° ३६′ व पूर्वरेखांश ७४°५२′. इ. स. १९११ त ६५१५ लोकवस्ती होती. मेवाडच्या संस्थानिकांनीं सुमारें ५०० वर्षांपूर्वी हा गांव वसविला. राणा संग्रामसिंह व त्याच्यामागून गादीवर वसलेला जगत्‌सिंह यांच्या कारकीर्दीत गांवासभोंवती असलेला कोट बांधण्यांत आला. १८१८ त पेंढारी लढाईत शिंद्याच्या हाताखालीं असलेल्या यशवंतराव भाऊच्या हातांत हा भाग होता. यानें पेंढारी लोकांच्या छटू नायकास आणि फाझलखानास मदत दिल्यावरून ब्रिटिशांनीं हा गांव त्या सालीं सर केला. परंतु पुन्हां हा गांव शिंद्यास परत देण्यांत आला. इ. स. १८४४ सालीं ग्वाल्हेर येथें ठेवलेल्या लष्कराच्या खर्चाकरितां तो ब्रिटिश सरकारकडे आला. परंतु तो पुन्हां इ. स १८६० त शिंद्याकडे गेला.

येथें व्यापार बराच चालतो. पूर्वी येथें रंग तयार होत असे. परंतु पाश्चात्त्य कृत्रिम रंग बाजारांत येऊं लागल्यामुळें हा व्यापार बसला आहे.

**जावरा, संस्थान**.—मध्यहिंदुस्थानांतील माळवा एजन्सींतील एक संस्थान. क्षेत्रफळ ५६८ चौरस मैल. या संस्थानाचे भाग बरेच ठिकाणीं विभागलेले आहेत. यांतील मुख्य भाग उत्तर अक्षांश २६° ३०′ ते ३४° ५५′ व पूर्व रेखांश ७५° ०′ ते ७५° ३०′ यांत आहे. याचे सभोंवती इंदूर संस्थान, ग्वालेरचा कांहीं भाग, रतलाम संस्थान, राजपुतान्यांतील प्रतापगड आणि पिपलोदियाची ठाकुरात हीं आहेत. जावरा गांव याचें मुख्य ठिकाण असून त्यापासून संस्थानास हें नांव मिळालें आहे. चंबळा आणि क्षिप्रा या नद्या या संस्थानांतून वहातात.

इतिहासः—गफुरखान हा स्वात येथील अफगाण होता. याचा आजा अबदुल मजीदखान हा नशीब काढण्याकरितां प्रथम हिंदुस्थानांत आला. याच्या दोन मुलांनीं ( अवदुल हमीद आणि अवदुल रास ) गुलाम कादीरखान याच्याकडे नोकरी धरली. या गुलाम कादीरखानानेंच इ. स. १७८८ मध्यें वृद्ध बादशहा शहाअलम याचे डोळे फोडले होते. पुढें शिंद्यानें गुलाम कादीराचा वध केल्यावर हे दोघे रोहिलखंडांत वस्ती करून राहिले. गफुरखान हा अवदुल हमीद याचा सर्वांत धाकटा मुलगा होय. यानें महंमद आयाझखानच्या मुलीशीं लग्न केलें. हा अयाझखान जोधपूर दरबारीं एक मानकरी होता. जयपूर आणि जोधपूर या दोन संस्थानांच्या संस्थानिकांमध्यें उदेपुरच्या कृष्णाकुमारीबद्दल लढा पडला असतां अमीरखानानें मध्यस्थी केली होती. त्या मध्यस्तीत अयाझखानानें अमीरखानास मदत केली होती. पुढें अयाझखानानें आपली एक मुलगी अमीरखानास दिली. यानंतर अमीरखानानें गफुरखानास आपल्याकडे नोकरीस ठेविलें व आपण दूर स्वारीस गेला असता त्यास होळकर दरबारीं आपला विश्वासू वकील म्हणून नेमलें. नंतर २१ डिसेंबर सन १८१७ रोजीं महिदपुरची लढाई झाल्यानंतर मंदासोरचा जो तह झाला त्यांतील बाराव्या कलमान्वयें असें ठरलें कीं, नवाब गफुरखानाकडे संजीत, मल्हारगड, टाल, जावरा आणि बराढा यांची मालकी यावी व पिपलोदापासून खंडणी घेण्याचा अधिकार असावा. त्याचप्रमाणें गफुरखानानें ब्रिटिशांस त्यांनीं दिलेल्या मदतीदाखल ५०० घोडे, ५०० पायदळ व चार तोफा याव्या असें ठरलें होतें. अमीरखानानें गफुरखान हा आपल्या वतीनें मुखत्यार असल्यामुळें तो मालक होऊं शकत नाहीं अशी तक्रार केली; परंतु त्याचें कांहीं एक चाललें नाहीं.

. स. १८२५ त गफुरखान मरण पावला. याच्यामागें याचा अज्ञान मुलगा घास महंमदखान ( इ. स. १८२५-६५ ) मसनदीवर वसला. या वेळीं होळकरास दोन लाखांचा नजराणा देण्यांत आला. प्रथमतः सर्व कारभार गफुरखानाच्या विधवा स्त्रीकडे होता. परंतु गैरव्यवस्था झाल्यामुळें तो अधिकार दोन वर्षांनीं तिजकडून काढून घेण्यांत आला. इ. स. १८४२ मध्यें घास महंमदखान यास सर्व अधिकार मिळाले. यानें इ. स. १८५७च्या बंडाच्या वेळीं चांगली मदत केली होती. १·४ लाखाची खंडणी यास द्यावी लागते. याच्या अमदानींत मुसलमानी कायद्याप्रमाणें दत्तक घेण्याची सनद मिळाली हा इ. स. १८६५ मध्यें वारल्यावर याचा अज्ञान मुलगा महंमद इस्माएलखान मसनदीवर वसला. याहि वेळीं होळकरांस दोन लाख रुपयांचा नजराणा देण्यांत आला. या नवाबास सर्व अधिकार इ. स १८७४ मध्यें मिळाले. याची कारकीर्द संस्थानला चांगली गेली नाहीं व संस्थानास १६ लाख रुपयांचें कर्ज झालें. याशिवाय ब्रिटिश सरकारचें तीन लाख रुपये कर्जाऊ घेतलें होते. हा इ. स. १८९५ मध्यें मरण पावल्यावर याचा मुलगा इफ्तिखार अलीखान हा गादीवर वसला. हा या वेळीं बारा वर्षांचा असल्यामुळें सर्व कारभार याचा चुलता यार महंमदखान याजकडे सोंपविण्यांत आला. इ स. १९०६ त सर्व अधिकार या नवाबास मिळाले. यास हिज हायनेस आणि फकीरउद्दौला नवाब सालतजंग या पदव्या असून १३ तोफांच्या सलामीचा मान आहे. लोकसंख्या ( १९११ ) ७५९५१. या संस्थानांत हिंदु शेंकडा ७४, मुसुलमान शेंकडा १९, जैन शेंकडा ४ आणि वन्य जातीय शेंकडा ३ या प्रमाणांत आहेत.

माळव्यांतील उत्कृष्ट जमीन या संस्थानांत आहे. ज्वारी, कापूस, मका, गहूं वगैरे पिकें येथें होतात. अफूची लागवड येथें पूर्वी फार होत असे. राजपुताना-माळवा-रेल्वे, बी. बी. सी. आय रेल्वेचा फांटा, रतलाम-गोध्रा-बरोडा रेल्वे

या संस्थानांतून जातात. या संस्थानाच्या सात तहशिली आहेत. जावरा, बाराडा, बारखेड, मल्हारगड, नवाबगंज, संजीत आणि टाल मंडावळ. जमिनीची पहाणी अद्यापि झालेली नाहीं. संस्थानचें उत्पन्न साडेआठ लाख आहे.

गां व.—मध्यहिंदुस्थानांतील जावरा संस्थानची राजधानी असून अजमीर-खांडवा-रेल्वेचें स्टेशन असून मुंबईहून ४३२ मैल लांब आहे. उ. अ. २३° ३८' व पू. रे. ७५° ८'. लोकसंख्या (१९११) १८०५४. येथें अवश्य असलेल्या कचेऱ्या वगैरे आहेत.

**जावळी**, ता लु का.—हा मुंबई इलाख्यांतील सातारा जिल्ह्याचा उत्तरेकडील तालुका. उत्तर अक्षांश १७°३२' ते १७°५९' व पूर्व रेखांश ७३°३६' ते ७३°५९' या दरम्यान असून त्याचें क्षेत्रफळ ४२३ चौ. मैल आहे.यांत मालकमपेठ या लहानशा विभागाचा समावेश केला आहे. आहे. यांत एकंदर गांवें २४९ असून याची लो. सं. ७० हजारांपर्यंत आहे व एकंदर उत्पन्न १ लक्ष रुपये आहे. उन्हाळ्यामध्यें हा भाग थंड असतो. तालुक्याचें मुख्य ठिकाण मेढें गांव असून तेथें पाऊस सरासरीनें ८१ इंच पडतो. याच तालुक्यांत महाबळेश्वर, प्रतापगड वगैरे ठिकाणें आहेत.

गां व.—जावळी हें खेडें प्रतापगडापासून पूर्वेस एका ओहोळाच्या कांठीं ३ मैल आणि मालकमपेठेच्या वायव्येस ३ मैल अंतरावर आहे. जावळीजवळचे डोंगर वारणा नदीपर्यंत पसरलेले आहेत. हें खोरें मुसुलमानांच्या अमदानीच्या आधींपासून मराठ्यांच्या ताब्यांत होतें. पूर्वी हें शिर्के नांवाच्या घराण्याकडे होतें; व हल्लींहि त्या घराण्याच्या वंशजाकडे, सातारा जिल्ह्याच्या दक्षिणेकडील कांहीं खेडीं आहेत. विजापूरचा पहिला राजा युसुफ आदिलशहा यानें मोरे नांवाच्या एका मराठे सरदारास १२००० पायदळ देऊन हें खोरें शिर्क्यांपासून काबीज करण्यास पाठविलें. त्यानें शिर्क्यांस तेथून काढून लावून त्याच्या बाजूचे गुजर, महाडिक आणि मोहिते या लोकांची पुंडाई बंद केली. त्यामुळें मोरे यांस "चंद्रराव" ही पदवी बादशहानें दिली. त्याच्या यशवंतराव नांवाच्या मुलानें अहमदनगरच्या बुऱ्हाण निजामशहाच्या फौजेशीं पंढरपूरजवळ जी लढाई झाली तींत पुष्कळ शौर्य दाखवून शत्रूचा बावटा जिंकून आणल्यामुळें, त्यास त्याच्या बापाच्या जागेवर नेमिलें, व त्यालाहि चंद्रराव पदवी दिली. या घराण्याच्या सात पिढ्यांनीं या प्रांतावर अंमल गाजविला. विजापुरच्या मुसुलमान राजांनीं त्याच्या स्वामिभक्तीबद्दल तो प्रांत केवळ नांवाला खंडणी घेऊन त्याच्याकडे सोंपविला होता. प्रथम शिवाजीनें मोऱ्यास आपल्या बाजूस वळविण्याचा प्रयत्न केला परंतु तो वळला नाहीं. त्यानें विजापूर सरकारकडून शिवाजीस कैद करण्यास आलेल्या शामराज नांवाच्या इसमास जेव्हां वाट दिली तेव्हां शिवाजीनें त्यास शत्रू मानिलें. मोऱ्याजवळचे लोक बळकट असून त्याचा मुलगा, भाऊ आणि कारभारी हिंमतराव हे शूर होते. शिवाजीनें 'देशमुखांचा जमाव बरोबर घेऊन जमावाच्या बळें युद्ध करून जाऊली घेतली' (जेधे शकावली). स. १६५५ मध्यें ही गोष्ट घडली. पुढें दुसऱ्या वर्षी चंद्ररावापासून रायरीचा किल्ला घेतला. त्यावर चंद्ररावानें आदिलशहाशीं शिवाजीविरुद्ध मसलत चालविल्यानें त्याची चौकशी करून शिवाजीनें त्याला व त्याच्या मुलांना देहांत शासन केलें व सर्व जावळी प्रांत खालसा केला. [सातारा ग्याझे.; जेधे शकावली; मोऱ्यांची बखर.]

**जावा**—मलायाद्वीपकल्पाच्या सुंदा बेटाच्या समूहांतील एक मोठें बेट. या बेटाची लांबी पश्चिम ते पूर्व ६२२ मैल व रुंदी ५५ मैल आहे. डच ईस्ट इंडीज सरकारची वसाहत या नात्यानें जावाला महत्त्व आलें आहे. मदुरा व इतर किरकोळ बेटें धरून जावाचें क्षेत्रफळ ५०९७० चो. मै. आहे. पुलौ पनैटन हें मुख्य बेट सुंदा सामुद्रधुनींत असून त्याचें क्षेत्रफळ ४७ चौ. मै. आहे.बटेवियाच्या उत्तरेस 'द्वीपसहस्र' वसलेलें आहे. पश्चिमेस सुंदा सामुद्रधुनीनें जावा व सुमात्रा अलग केलीं आहेत तर पूर्वेस बली सामुद्रधुनीमुळें बलिद्वीपकल्प व जावा हीं वेगळीं झालीं आहेत. जावाच्या दक्षिणेस हिंदी महासागर व उत्तरेस जावाचा समुद्र आहे.

जावाचे तीन भाग पाडण्यांत येतात. पश्चिम जावांत बंटम, क्रवंग व प्रेयंगर रीजन्सी आहेत व या सर्वांचें मिळून १८००० चौ. मै. क्षेत्रफळ आहे. या भागांत दक्षिणेकडील प्रदेश उंच व उत्तरेकडील सखल आहे. प्रेयंगरचा पर्वत या भागांत असून त्यावर बंदोम, पेकलोंगम, तेगल, वडंग, गुरुत इत्यादि पठारें आहेत. प्रेयंगर या बटेव्हिया व बंटम यांच्या सरहद्दीला चिकटून हलीमन पर्वताची रांग गेली आहे.

मध्यजावा हा सर्वांत लहान भाग आहे. याचें क्षेत्रफळ १३२०० चौ.मै.आहे. यांत तेगळ,पेकलोंगम,बन्यूमास, वगेन, केडू, जोकजकर्ता, सुरकर्ता या मुलुखांचा अंतर्भाव होतो. पूर्व जावांत रेंबंग, मदियन, केदिरी, सुरबय, पसुरुण, बेसुकी इत्यादि प्रदेश मोडत असून त्याचें क्षेत्रफळ १७५०० चौ. मै. आहे.

क्षेत्रफळाच्या दृष्टीनें पहातां जावाचा प्रदेश पुष्कळ ज्वालामुखी पर्वतानें युक्त आहे. डॉ. व्हर्बेकच्या मतें जावामध्यें १२५ ज्वालामुखी डोंगर आहेत. पश्चिम जावांत ११ ज्वालामुखी असून ते सर्व हल्लीं निःसत्व झाले आहेत. प्रेयंगरमध्यें यांची संख्या ५० असून त्यांपैकीं ५ काय ते जिवंत आहेत. मध्यजावामध्यें अवघे ५ जिवंत आहेत. मध्यजावामध्यें ६ पैकीं २ जिवंत असून पूर्वजावामध्यें२१पैकीं ५ जिवंत आहेत. चेरी, यान, मूरियो, लहू, विलिस येथें प्रत्येकीं २ ज्वालामुखी असून ते सर्व निर्जीव झालेले आहेत. स्लामेटमधील २ ज्वालामुखींपैकीं एक मात्र अद्यापि जिवंत आहे. जावामधील प्रदेशाच्या निरनिराळ्या भागांत, सुपीकता व नापीकता यांचें,तसेंच उंचसखलतेचें प्रमाण भिन्न आहे.मध्या

व पश्चिम जावामधील किनाऱ्यालगतचा टापू सखल,दलदलीचा असून बाकीचा लागवडीला योग्य व सुपीक आहे. बन्यूमस व बगेलनच्या प्रदेशांत वाळवंट आहे, तथापि कांहीं भागांत तांदूळ उत्तम पिकतो. पूर्वजावांत ही वरील प्रकारची स्थिति आहे.

न द्या.—पश्चिम जावामध्यें चीतरम व चीमनुक या मुख्यतः दोन नद्या आहेत. त्यांमधून नावामार्फत कॉफी व मिठाची नेआण होते. मध्य जावामध्यें पमली, चोमल, प्रोगो, सेरयू बोगावंतु, उपक इत्यादि नद्या आहेत. यांच्या कांठचा प्रदेश फार सुपीक आहे. या नद्यांमध्यें दगड खडक वगैरे असल्याकारणानें या नद्यांमधून नावा चालणें दुष्कर होतें. पूर्वजावामध्यें लहान लहान नद्या पुष्कळ आहेत. सोलो, गेंटग, ब्रँटस या त्यांतल्यात्यांत मोठ्या नद्या असून त्या नद्यांमधून नौका चालवितां येतात.

भू स्त र.—*जावामधील बहुतेक सर्व भागांत तृतीय* अगर चतुर्थ युगांतील अवशेष सांपडतात. क्वचित एओसीन युगांतील अवशेष, रेताड दगड, खडूचे दगडहि सांपडतात.

ह वा मा न.—पश्चिम जावामधील हवामान निश्चितपणें सांगतां येतें पण इतर भागांतील हवामानामध्यें वारंवार बदल होत असल्यामुळें त्यासंबंधीं नक्की अनुमान काढतां येत नाहीं. एकंदरीनें हवा उष्ण आहे. त्यांतल्यात्यांत पूर्वजावा व मध्यजावाचा कांहीं भाग हे विशेष उष्ण आहेत. जावामध्यें उन्हाळा व पावसाळा असे दोनच ऋतू आहेत. यूरोपप्रमाणें येथें वेगवान वारे सुटत नाहींत. मेघगर्जना, विजा वगैरे प्रकार नेहमीं आढळतात, पण विजांपासून प्राणहानि क्वचित् घडून येते. जानेवारी, फेब्रुवारी, मार्च इत्यादि महिन्यांत पाऊस जोरानें पडतो. पूर्व व मध्य जावामध्यें उत्तर किनाऱ्यापेक्षां दक्षिण किनाऱ्याच्या बाजूच्या प्रदेशांत अधिक व जोराचा पाऊस पडतो. मध्यजावामध्यें इतर सर्व भागापेक्षां पर्जन्याचें मान अधिक आहे.

प्रा णी.—जावामध्यें सरक, डुकरें, बँटेंग व रसा जातीचीं हरिणें, कांतजिल नांवाचा कस्तुरीमृगासारखा असणारा प्राणि, वाघ, चित्ता, जंगली मांजर, शिकारी कुत्रे, कलोंग नांवाचा एक प्राणि, कुविन, बुक, लुटंग, कोळी या जातीचीं माकडें, ससा, उंदीर, अस्वल इत्यादि प्राणी आढळतात.

१९०० सालीं जावामध्यें ४१० प्रकारचे पक्षी होते असें व्होर्डरमन नांवाच्या एका संशोधकानें म्हटलें आहे. यांपैकीं पुष्कळसे पक्षी मनुष्यवस्तीच्या भागांत क्वचितच आढळतात. समुद्राच्या, सरोवराच्या अगर नदीकिनाऱ्याच्या प्रदेशांत बदकें, ससाणे इत्यादि पक्षी आढळतात. घुबडाचेंहि येथें अस्तित्व आहे. जावामधील मोर हिंदुस्थानांतील मोरापेक्षांहि सुंदर असतो. पोपटाच्या येथें दोन जाती आढळतात. पोपटांनांहि अनुकरण व बोलण्याची नक्कल करणें या बाबतींत मागें टाकणारा व केवळ जावामध्येंच सांपडणारा असा एक पक्षी आहे. मधमाशांच्या व भुंग्यांच्या निरनिराळ्या जाती येथेंच आढळतात. कॅन्रिलन नांवाच्या पक्ष्याची गोड आवाजाबद्दल फार प्रसिद्धी आहे.

जावाच्या पाण्यांमध्यें माशांच्या हजारों जाती आहेत असें तज्ज्ञांनीं सिद्ध केलें आहे. हे मासे निरनिराळ्या रंगाचे व निरनिराळ्या तऱ्हेचे असतात. बटेव्हियाच्या भागांत जवळ जवळ ८० प्रकारचे मासे खाण्यासाठीं उपयोगांत आणले जातात. सापाच्या २४ हून अधिक जाती आहेत. किड्यांचे प्रकार तर अगणीतच आहेत.

व न स्प ती.—निरनिराळ्या वनस्पती, झाडें, लता इत्यादिकांची जावा येथें समृद्धि आहे. वनस्पतिशास्त्राच्या अभ्यासकाला जावाहून दुसरें महत्त्वाचें स्थान मिळणें कठीण आहे. बुइटेनझोर्ग येथील वनस्पतींची बाग अतिशय प्रसिद्ध असून त्यांत हरएक तऱ्हेचे वृक्ष, लता, वनस्पती यांची समृद्धि आहे. जुन्या काळच्या अरण्याची यथार्थ कल्पना यावी *यासाठीं छिबोडास येथें अरण्य राखून ठेवण्यांत आलें आहे* व तें वाटेल त्याला पहावयाला मोकळीक मिळते. सुमारें तीन हजार इतक्या निरनिराळ्या प्रकारच्या वनस्पती जावामध्यें आढळतात. उन्हाळ्यांत सर्वत्र हिरव्यागार पल्लवराजीनें खेडींपाडीं व शहरें आच्छादलेलीं असतात.

लो क सं ख्या.—यावद्वीपसंस्कृतीचा सविस्तर इतिहास पहिल्या विभागांत ( प्रक. ६ वें ) आलाच आहे. या ठिकाणीं थोडक्यांत गोषवारा व इतर माहिती आढळेल. १९०५ सालच्या खानेसुमारीवरून पहातां जावाची लोकसंख्या ( मदुराप्रांत धरून ) ३००९८००८ होती. येथील वस्ती मुख्यतः जावानीज, सुंडानीज व मदूरीज अशा तीन जातींच्या लोकांची आहे. जावानीज व सुंदानीज यांच्यामध्यें स्थूल फरक म्हटला म्हणजे जावानीज लोकांवर हिंदुधर्माचा परिणाम झालेला दिसतो व तो सुंदानीजवर झालेला दिसत नाहीं हा होय. तीन्हीहि जातींचे लोक मलयवंशाचे आहेत. पण परिस्थितीमुळें या तीन्ही जातींमध्यें थोडाफार फरक पडला आहे. सुंदानीज लोकांच्या शरीराची ठेवण व त्यांची राहणी मलयवंशीय लोकांसारखी अद्यापि आहे. हे लोक पश्चिम भागांत रहातात. पूर्व जावामध्यें व विशेषतः मदुराबेटांत व त्याच्या आसपास मदुरीज लोक रहातात. तेगलपेक लॅगन, बगेलन, केदु, सेमरंग, जपुरा, सुरकर्ता, बन्यूमास इत्यादि ठिकाणीं जाव्हानीज लोकांची वस्ती आहे. या तीन्ही जातींच्या लोकांत जावानीज लोक अधिक सुधारलेले आहेत. संख्येनेंहि त्यांचाच नंबर पहिला लागतो.

जावामधील लोक वर्णानें पीत पिंगट रंगाचे आहेत. त्यांतल्या त्यांत जावानीज हे अधिक कृष्णवर्णीय आहेत. या लोकांचे डोळे भुरे अगर काळे असून त्यांचे केंस लांबलचक काळेभोर व राठ असतात. वक्षस्थलावर अगर इतर अवयवांवर केंस आढळत नाहीं. अंगाबांध्यानें जावानीज हा सुंदानीजपेक्षां उंच असतो पण सुंदानीज हा अधिक धष्टपुष्ट असतो. मदुरीज लोक उंच व धष्टपुष्ट असतात. सुंदानीज

लोकांचे डोळे तिरकस असतात. जावांतील लोकांचें नाक चपटें व लहान असतें पण नाकपुड्या फुगीर असतात. ओठ जाड असतात. दांत जात्या पांढरे पण निगा न राखल्यानें पिवळे झालेले असतात. दिसण्यांत जावानीज व मदुरीज हे सुंदानीजपेक्षां तरतरीत दिसतात. पुरुषांपेक्षां बायका अशक्त असतात. पीतवर्ण हा बायकांच्या सौंदर्याचा निदर्शक समजला जातो. जावांतील लोक पूर्वी युद्धनिपुण व शूर लोक होते पण हल्लीं ते शांत, साधे व मेहनती बनलेले आहेत.

जावामधील घरें बहुतेक बांबूचीं असतात. कांहींचीं घरें लांकडाचींहि असतात. श्रीमंतांचीं दगडी घरें असतात. या लोकांचें मुख्य खाद्य तांदूळ आहे. हे लोक मासे व मांसहि खातात. यांची कौटुंबिक पद्धतीची रहाणी आहे. वरिष्ठ वर्गांत बहुपत्नीकत्वाची चाल रूढ आहे. पण खालच्या वर्गांत बहुधा एकपत्नीकत्वच रूढ आहे. जावामधील लोक मुसुलमान आहेतसे वाटतात. पण ते खरेखुरे बुद्धधर्मीय आहेत. त्यांचे आचारविचार मुसलमानी आचारांपेक्षां पुराणवन्यधर्माच्या आचारविचारांशीं जुळते आहेत. वरिष्ठ जातींची रहाणी मात्र इस्लामी पद्धतीची आहे. मक्केला जाणें हें पवित्र कर्तव्य होय अशी जावांतील लोकांची समजूत आहे. प्रत्येक शहरांत एक तरी मशीद आहेच. ख्रिस्ती उपदेशकांची येथें फारशी डाळ शिजलेली दिसत नाहीं.

जावाची राजधानी बटेव्हिया असून तिची लोकसंख्या सवालक्ष आहे. याशिवाय सेरंग, अंजेर, पंडेग्लंग, टंगेरंग, बूटेंझोर्ग, क्रवंग, वन्यस, बंडग, चेंजर, सुक्यूमी, सुकेदंग जरुत, तसीकमलय, इत्यादि शहरें आहेत. पंडेग्लंग येथें गंधकाचे व उष्ण झरे आहेत. बुटेंझोर्ग येथें सुंदर बागा आहेत. प्रेयंगर जिल्ह्यांत धबधबे पुष्कळ आहेत. सुकबूमी हें हवेचें ठिकाण आहे. चिचलेंका येथें कॉफी मोठ्या प्रमाणांत तयार होते. तसिकमलयाचा टापू सृष्टिसौंदर्याच्या दृष्टीनें अत्यंत मनोहर आहे. चेरीबोन येथें जुन्या सुलतानांचे राजवाडे, चिनी देवालय, ख्रिस्ती उपासनामंदीर, मिठागरें आढळून येतात. इंद्रमयू बंदर तांदुळाच्या व्यापाराबद्दल प्रसिद्ध आहे. तेगल येथें साखरेचे पुष्कळ कारखाने आहेत. पेकलोंगन व बंटग हीं शहरेंहि व्यापाराबद्दल प्रसिद्ध आहेत. सेमरंग येथें प्रिन्स ऑफ ऑरेंज किल्ला, कॅथॉलिक चर्च, प्रॉटेस्टंट चर्च, मशीद व एक लष्करी दवाखाना आहे. येथें नुकतीच रेल्वे सुरू करण्यांत आली असल्यानें या शहराचें वैभव वाढत आहे. डेमक हें शहर पुराणप्रसिद्ध आहे. येथें स. १८४५ मध्यें, तेथील सुलतानानें एक सुंदर मशीद बांधली होती. तिचा कांहीं भाग अद्यापि राखून ठेवण्यांत झाला आहे. सात वेळां डेमकला गेल्यास मक्कायात्रेचें श्रेय मिळतें. या ठिकाणीं पुष्कळ थडगीं आहेत. सलतिग येथें लष्कराची राहण्याची जागा आहे. कॅदल हे साखरेबद्दल फार प्रसिद्ध आहे. कुदस येथें कापड तयार होतें. जपरा हें १७ व्या शतकांत मतरम राजांच्या राजधानीचें शहर होतें. जोगका हें शहर मोतीं व माणकें यांच्या व्यापाराबद्दल फार प्रसिद्ध आहे. पसरगदेह येथें जुन्या राजघराण्यांतील पुरुषांचीं थडगीं आहेत.

शे ती.—जावाच्या एकंदर जमीनीपैकीं शेंकडा ४० एकर जमीन शेतकीची आहे. जावामध्यें मुख्य पीक तांदुळाचें आहे. त्याशिवाय साखर, सिंकोना, कॉफी, तंबाखू, चहा, नीळ, इत्यादि वस्तूहि येथें पिकतात. साखरेचे कारखाने जावांत पुष्कळच आहेत. जावामध्यें १९०५ सालीं १० २८३५७ टन म्हणजे सुमारे १५०००००० पौंडांची साखर तयार झाली. साखरेखालोखाल निळीचें उत्पन्न येथेंच पुष्कळच आहे.

जावामध्यें म्हशी, गाई, बैल, घोडे, कुत्री मांजरें पुष्कळ आहेत. म्हशीचा प्रवेश जावांत हिंदूंच्या मार्फत झाला असावा. जावा येथील घोडे खुजे पण सुरेख असतात. जावामधील लोक घोड्यावर बसण्यांत फार तरबेज आहेत; व ते घोड्याच्या उत्पत्तीच्या बाबतींत फार काळजी घेतात.

ख नि ज सं प त्ति.— खनिजसंपत्तीच्या बाबतींत मात्र जावा फार मागें आहे. सोन्याचांदीचा जावांत अभाव आहे. जोकजकर्ता येथें व इतर कांहीं भागांत मँगनीजच्या खाणी आहेत. चिलचप येथें लोहतुंबकाच्या रेताड खाणी आहेत. कोळसा पुष्कळ ठिकाणीं पण थोड्या प्रमाणांत सांपडतो. डे ग्रोटनें जावांत पेट्रोलियमचा शोध लावल्यामुळें हा एक महत्त्वाचा धंदा जावांत सुरू झाला आहे. याशिवाय गंधक व मिठ यांच्या खाणीहि जावामध्यें आहेत.

द ळ ण व ळ ण.—सपाट प्रदेशावर, पठारावर व कांहीं ठिकाणीं ज्वालामुखींच्या टापूंतूनहि रेल्वे गेली आहे. समरंग-जोकजकर्ता, बटेव्हिया-बूटेंझोर्ग हे रेल्वेचे फांटे प्रमुख आहेत. याशिवाय सुरबय-पसुरुअन, बंगील-मुलंग, सिडोर्जो--परन, कर्टोसोनो--तुलंग, बुटेंझोर्ग--चियंझर, वगैरे बरेच रेल्वेचे फांटे आहेत. सुमारें ३५०० मैलांच्या टापूंत तारा पसरलेल्या आहेत. नौकानयन सुरू आहे. गांवांत ट्रामवे चालू आहेत.

रा ज्य व्य व स्था.—खेडें हें सगळ्यांत धाकटें परिमाण होय. अशा कांहीं खेड्यांचा मिळून एक जिल्हा, अशा कांहीं जिल्ह्यांचें मिळून एक खातें, अशीं कांहीं खातीं मिळून, एक रेसीडेन्सी होते. प्रत्येक रेसीडेन्सीवर एक उच्च मनुष्य मुख्य असतो, व त्याच्या हाताखालीं एक असिस्टंटरेसीडेंट, एक कंट्रोलर व कांहीं अधिकारी असतात. सुरकर्ता व जोकजकर्ता या संस्थानांचा कारभार रेसिडेंटच्या देखरेखीखालीं सुलतान पहातात.

भा षा, वा ङ्म य व सं स्कृ ति.—'हिंदुस्थान व जग' ज्ञानकोश, विभाग १ ला- यावद्वीपसंस्कृति हें प्रकरण पहा.

प्रा ची न अ व शे ष.—जावामध्यें फार प्राचीन कालचे अवशेष फारसे सांपडत नाहींत. मधून मधून दगडी हत्या-

यांचे अवशेष दृष्टीस पडतात. हिंदूराजांचा अंमल जावावर असतांना त्यांच्या अमदानींत जीं देवालयें व मठ बांधले गेले त्यांचे अवशेष मात्र पुष्कळ सांपडतात व त्यांवरून तत्कालीन शिल्प किती उच्च दर्जाचें होतें याची साक्ष पटते. पूर्व व मध्य जावामध्यें हिंदूपद्धतीचीं देवालयें दृष्टीस पडतात; पण या दोन ठिकाणच्या देवालयांत फरक आढळतो. मदुरेंत एकहि हिंदू देवालय नाहीं. केडलरीजन्सीमध्यें जीं गांवें आहेत त्या गांवांचीं नांवें पाहिलीं असतां पूर्वी त्या ठिकाणीं शैवांचीं व बौद्धांचीं देवालयें होतीं असें वाटतें. बुद्धांचीं देवालयें आठव्या ते दहाव्या शतकाच्या दरम्यान बांधलीं गेलीं असावीत असा झ्झरमनचा तर्क आहे. मध्यजावामधील देवालयांपेक्षां पूर्व जावांतील देवालयें नंतरचीं दिसतात महाराजा धीरथ आदित्यधर्मानें सातमजली विहार बांधल्याचा जो उल्लेख मेनंगकावू शिलालेखांत आहे, तो विहार ' बोरोबुदर ' होय असें कित्येक मानतात. ८४० सालच्या एका ताम्रपटांत डिएंग हा जावामधील एक पवित्र डोंगर होय असें म्हटलें आहे.

जावामधील देवालयांची रचना चालुक्य तऱ्हेची आहे असें फर्ग्यूसननें म्हटलें आहे, पण झ्झरमननें फर्ग्यूसनचें म्हणणें चुकीचें आहे असें दाखवून, देवलयांचा घाट द्राविडी पद्धतीचा आहे असें स्पष्ट व सप्रमाण सिद्ध केलें आहे. डिएंग पठारावर शिव, दुर्गा, गणेश यांचीं देवालयें दृष्टीस पडतात. त्याचप्रमाणें चंडीअर्जुनी, चंडीश्रीखंडी, चंडीपंतदेव, चंडी परकोसिता यांचीं देवालयें आहेत. या पठाराच्या ईशान्येस दरवती व परकेसिता यांचीं देवालयें आहेत. पूर्वेस पडकी देवालयें आहेत. वायव्येस पुष्कळ देवालयें असून त्यांत संचकीचें देवालय चांगलें आहे. दक्षिणेस चंडीभीमाचें उत्कृष्ट देवालय असून त्या देवळाचा आकार मनोऱ्यासारखा आहे. या एका देवळाची रचना चालुक्य पद्धतीची आहे. जावामध्यें जीं हिंदु देवालयें आहेत त्यामध्यें बोरोबुदर देवालय हें सर्वांत भव्य व कलाकौशल्याच्या दृष्टीनें जगांतील अति प्रसिद्ध देवालयांमध्यें मोडण्यासारखें आहे. हें केडू रेसिडेन्सीमध्यें प्रोगोच्या पश्चिमेस थोड्या फार अंतरावर आहे. हें देवालय एका डोंगरावर असून त्याकडे जाण्यासाठीं चार मोठे जिने चढावे लागतात. या देवळांकडे जातांना मधून मधून दागोबा उभारलेले आहेत. या देवालयाचें शिल्प अशा तऱ्हेनें केलें आहे कीं तें पहातांच मनुष्याचें मन संसारापासून परावृत्त व्हावें. पायथ्यापासून तो शिखरापर्यंतचा महायान पंथाचीं तत्त्वें खोदलेलीं आहेत. या देवालयांत बुद्धाच्या मूर्ती पसरलेल्या आहेत.

सुरकर्ता संस्थानांत प्रंवनन येथें हिंदू देवळें पुष्कळ आहेत. येथील देवालयांच्या समुहाभोंवतीं तिहेरी तट पसरला आहे. दुसऱ्या व तिसऱ्या तटाच्या मध्यें १५७ लहान लहान देवालयें आहेत. पश्चिमेकडील तटाच्या मध्यभागीं एक मोठें देवालय असून त्यामध्यें कालस्वरूपी शिव,गणेश,दुर्गा इत्यादि देवतांच्या मूर्ती आहेत. दक्षिणेच्या बाजूला चतुर्मुख ब्रह्मदेवाचें व उत्तरबाजूला विष्णूचें देवालय आहेत. याशिवाय चंडीसेवू, चंडी लेंग इत्यादि पुष्कळच देवालयें आहेत. कांहीं कांहीं देवालयांवर लेख खोदलेले आढळतात.

पनवरम येथेंहि देवालयांचा समूह आहे. येथील मुख्य देवालय खोदकामाचा नमुना म्हणून प्रसिद्ध आहे. बाहेरच्या द्वारपालांच्या मूर्तीचा पोशाख चिनी शिल्पकलेचा अवशेष या नात्यानें प्रेक्षणीय आहे. चिनी लोकांचें या देशाशीं पुष्कळ दळणवळण असल्यामुळें चिनी शिल्पाचे अवशेष येथें सांपडतात. व त्याचा अभ्यास करणें मनोरंजक व उपयुक्त आहे.

इ ति हा स.—यावद्वीप या नांवावरून जावा हें नांव पडलें असावें असें दिसतें. जावा देशाचा इतिहास देखील विश्वसनीय असा मिळत नाहीं. बावद उर्फ पुराणें यांच्यावरून जो थोडा फार इतिहास उपलब्ध होईल तेवढाच. जावामध्यें १५ व्या शतकापर्यंत हिंदू लोकांची सत्ता प्रचलित होती. या हिंदूसत्तेच्या कालाचे मुख्यतः तीन विभाग पडतात. ते म्हणजे ( १ ) बौद्धकाल, ( २ ) शैवकाल व( ३ ) संधिकाल. जावामध्यें ज्या अनेक राजघराण्यांनीं राज्य केलें त्यांमध्यें मजपहित नांवाचें राजघराणें फार प्रबल म्हणून प्रसिद्ध होतें. या राजघराण्याच्या सत्तेखालीं जावाराष्ट्राची सत्ता परमुलुखावर देखील पसरली होती. त्यानंतर मुसलमान लोकांच्या स्वाऱ्यांना आरंभ झाला. यांनीं कांहीं कालपर्यंत आपला अंमल जावावर बसविला पण त्यानंतर युरोपियन लोकांची टोळधाड जावावर येऊं लागली. १५२० सालीं पोर्तुगीज लोकांनीं येथील रहिवाश्यांकडून व्यापाराची परवानगी मिळविली. पुढें या शतकाच्या अखेरीस डच लोकांनीं आपला पाय रोवण्यास सुरुवात केली. या सुमारास जावावर मतरमचें राजघराणें राज्य करीत होतें. या राजघराण्यांतील राजे आपल्याला जावाचे सम्राट म्हणवून घेत असत. त्यांच्या अमदानींत जावाची राजधानी कर्तसुरा ही होती. यांच्या अमदानींत डच लोकांनीं जकत्रा व त्याच्या आसपास आपला अंमल बसवला होता. १७०५ सालीं डच लोकांनीं जावाच्या राजाशीं तह करून प्रेयंगरचें शहर मिळविलें.स. १७४५ मध्यें चेरीबॉन ते बन्यूनंगीपर्यंतचा सर्व मुलूख डच लोकांनीं आपल्या ताब्यांत आणला. स. १७५५ मध्यें मतरमच्या राजघराण्यांत बेबंदशाही माजून सुरकर्त व जोक्जकर्त अशीं दोन राज्यें पडलीं.स.१८०८ मध्यें वर्तमानचें राज्य डच लोकांनीं जिंकलें.

स. १८११–१८१८ या अवधींत इंग्लिशांनीं जावावर आपली सत्ता प्रस्थापित केली. यावेळीं जावाच्या राजघराण्यांतील दीपनेगर या धाडशी व चतुर पुरुषानें या परकीयांच्या ताब्यांतून आपलें राज्य सोडविण्याचा प्रयत्न केला. पण दुर्दैवानें तो फसला व डच लोकांची सत्ता जावावर पूर्णपणें प्रस्थापित झाली. डच इंडियन सैन्यानें दीपनेगरला पकडण्यासाठीं सतत पांच वर्षे धडपड चालविली होती. या

कामांत डच लोकांचें १५००० सैन्य कामाला आलें. पण दीपनेगर सांपडला नाहीं.हा असामान्य पुरुष स. १८५५ मध्यें मरण पावला. अद्यापिहि याची स्मृति जावानीज लोकांमध्यें ताजी आहे; व डच लोकांनां हांकून लावून पुन्हां एतद्देशीयांची सत्ता प्रस्थापित करण्यासाठीं दीपनेगर हा पुन्हां पृथ्वीवर अवतरणार अशी अद्यापिहि लोकांची भावडी समजूत आहे. या भावड्या समजुतीला बळी पडून कांहीं कांहीं पुढाऱ्यांनीं तीन चार वेळां बंडेंहि केलीं पण त्याला यश आलें नाहीं. १८५० सालापासून डच लोकांची सत्ता पूर्णपणें प्रस्थापित होऊं लागली. त्यांनीं डच कायदा या भागांत चालू केला. व्यापाराला त्यांनीं उत्तेजन दिलें. त्यांनीं मुत्सद्दीपणानें, जावामधील संस्थानें खालसा न करतां तीं एतद्देशीय राजघराण्यांतील पुरुषांच्याच ताब्यांत ठेवलीं. तेथील रहिवाश्यांशीं मिळतें घेण्याचा प्रयत्न केला. शिक्षणाचा आस्ते आस्ते फैलाव करण्यास सुरुवात केली. याशिवाय इतर बाबतींतहि बऱ्याच सुधारणा घडवून आणल्या व अशा तऱ्हेनें आपली सत्ता चिरस्थायी केली.

[ संदर्भग्रंथ—हिंदुस्थान आणि जग-ज्ञानकोश विभाग, स्टॅंफोर्ड रॅफ़्लीस–हिस्टरी ऑफ जावा ( लंडन १८३० ); जंगहून–जावा; सिडमोर–दि गॉर्डन ऑफ दि ईस्ट, न्यूयॉर्क १८९८; डे–दि पॉलिसी अँड दि अॅडमिनिस्ट्रेशन ऑफ दि डच इन जावा ( लंडन १९०८ ). ]

**जाविद्खान**—मराठी ऐतिहासिक कागदपत्रांत याचें नांव जावितखान असें येतें. हा मूळचा खोजा असून अहमदशहा ( दिल्लीचा ) व त्याची आई यांचा मोठा आवडता होता. त्यांनीं याला मोठा अधिकार देऊन व अमीर करून नबाब बहादूर ही पदवीहि दिली. याचें वजन पातशहावर असलेलें दरबारी मंडळीस पहावेना. शेवटीं त्यांपैकीं नबाब सफदरजंग यानें त्याला मेजवानीस बोलावून आणून त्याचा खून करविला ( आगष्ट १७५२ ).

**जासवंद**—हें फुलझाड आहे. तें सुमारें पुरुषभर वाढतें. त्यास संस्कृतमध्यें जपा, मराठींत जासवंद हीं नांवें आहेत. ह्या झाडाच्या पांढरी, तांबडी, भगवी अशा सुमारें १८ जाती आहेत. जासवंदीचें झाड मूळचें चीन देशांतील असून हल्लीं सपाट प्रदेशांतील सर्व बगीच्यांत हीं झाडें लावलेलीं आढळतात. या झाडाच्या सालीपासून धागा निघतो व याच्या फुलांपासून रंग तयार होतात. फुलांचा एतद्देशीय औषधांतहि उपयोग होतो.

**जासी**—जासी हें याच नांवाच्या रुमानियाच्या भागाचें मुख्य ठिकाण असून, बहलुइ नदीच्या कांठीं आहे. येथील लोकसंख्या सन १९१४ मध्यें ७६१२० होती. जासीचें गॅलॅटजकिशीनें यांच्याशीं आगगाडीनें दळणवळण आहे. ही मोल्डेव्हियाच्या राज्यकारभाराची व रोमन कॅथॉलिक धर्माच्या मुख्य अध्यापकाची जागा आहे. येथें स. १८६४ मध्यें प्रिन्स कुझानें विश्वविद्यालय स्थापिलें; व त्यांत वाङ्मय, तत्त्वज्ञान, कायदा, शास्त्र व वैद्यकी या शाखा आहेत. याशिवाय येथें लष्करी शिक्षणाची शाळा, गायनशाळा व व्यापारी शाळा आहेत. येथें पेट्रोलियम, मीठ, धातू, इमारतीचें लांकूड, फळें वगैरेंचा व्यापार आहे.

सन १५६४ मध्यें प्रिन्स अलेक्झांडर लॅपसनीनु यानें जासी मोल्डेव्हियाची राजधानी केली. हें शहर पूर्वीपासून विवेकरतां प्रसिद्ध आहे. जासी तार्तर लोकांनीं स.१५१३ त, तुर्क लोकांनीं १५३८ त व रशियन लोकांनीं स.१५८६ त जाळलें. १७९२ मध्यें जासीच्या तहानें दुसऱ्या रुसो-टर्किश युद्धाचा शेवट झाला. स. १८२१मध्यें ग्रीक लोकांनीं केलेल्या बंडामुळें तुर्क लोकांनीं हें शहर सन १८२२ त हल्ला करून घेतलें. १८६१ मध्यें बुखारेस्टला राजधानी नेल्यामुळें या शहराचें बरेंच नुकसान झालें.

**जासुंद**—ह्या झाडास लॅटिनमध्यें अँटिआरिस टॉक्सिकॅरिआ, इंग्रजींत उपास ट्री व इतर भाषांत जासुंद, करवत, अळी इत्यादि नांवें आहेत. हीं झाडें ब्रह्मदेश, पश्चिमघाट व सिलोन यांमधील जंगलांत आढळतात. या झाडापासून पांढरी राळ निघते, तिचा विषारी बाण करण्याकडे उपयोग करतात. आंतरसालीपासून केलेल्या वाखाचे दोर मजबूत होतात. तंतू काढून त्याचे दोर करतात. साल ( ताग ) पाण्यांत भिजवून ती आपटून वाख काढण्यांत येतो. ( बूड म्हणून झाडाचें थोडें खोड ठेवून झाडाची सबंध साल काढून तिचा धान्य ( पोतीं तयार होत असल्यामुळें ) भरून ठेवण्याकरितां उपयोग करतात. यावरून पश्चिम हिंदुस्थानांत या झाडांनां " पोत्याचीं झाडें " असें म्हणतात. बिया तापहारक व आमांशप्रतिबंधकहि आहेत.

**जाहिरात**—विसावें शतक हें जाहिरातीचें युग असें मानतात व तें पुष्कळ अंशीं खरेंहि आहे. आधुनिक व्यापारीजगांत जाहिरातीला अंदाजाबाहेर महत्त्व प्राप्त झालें आहे. ' कलियुगांतील पंचरावी विद्या ' असें जें रा. न. चिं. केळकर यांनीं एके ठिकाणीं जाहिरातीचें वर्णन केलें आहे तें अगदीं समर्पक आहे. पाश्चात्य देशांतच काय पण भौतिक सुधारणेंत फार पाठीमागें असलेल्या आपल्या हिंदुस्थानांतहि शहरांतूनच नव्हे तर खेडोपाडींहि जाहिरातींचा सुळसुळाट झालेला दृष्टीस पडतो; व प्रत्यहीं जाहिरातींची लोकप्रियता व प्रसार वाढत चालल्याचें दिसून येतें.

फायद्याशिवाय अथवा जरूरीशिवाय कोणीहि एखादी नवी गोष्ट करीत नाहीं, हा मनुष्यमात्राचा स्वभावधर्म आहे. जाहिरातीमध्यें वरील कोणता तरी हेतु साध्य होत असल्याशिवाय त्याची इतकी वाढ झालीच नसती. जाहिरातीला आज जें विलक्षण महत्त्व प्राप्त झालें आहे त्याचें कारण जाहिरात देण्याची आज जरूरी भासूं लागली आहे एवढेंच नसून जाहिरातीपासून बराच फायदा आहे अशी लोकांची खात्री पटत चालली आहे हेंहि दुसरें आणि महत्त्वाचें कारण होय. जाहिरातींची उपयुक्तता लोकांनां पटत चालल्यामुळें,

अमेरिकेंत या शास्त्राचा शिक्षणक्रमांत समावेश करण्यांत आला आहे; व या विषयाचा शास्त्रीय पद्धतीनें अभ्यास करण्याचा प्रयत्न सुरू झाला आहे. व्यापाराच्या वाढीला जाहिरात हें महत्त्वाचें साधन होऊन बसल्यामुळें त्या साधनाचा शास्त्रीय पद्धतीनें अभ्यास करण्याची जरूरी विद्वानांनां भासूं लागली आहे.

जाहिरातीचा उगम अगदीं अलीकडे झाला ही गोष्ट खरी आहे. पण पूर्वीच्या काळींहि जाहिरातीची कल्पना अगदींच अपरिचित होती असें नाहीं. हल्लीं ज्याप्रमाणें या साधनाला महत्त्व प्राप्त झालें आहे व त्याला शास्त्रीय स्वरूप देण्यांत आलें आहे, त्या प्रकारची स्थिति प्राचीन काळीं नव्हती; पण जाहिरातीच्या मुळाशीं असलेलें तत्त्व प्राचीन काळींहि लोकांनां संमत होतें असें दिसून येतें. पूर्वीच्या काळचे व्यापारी लोक आपल्या मालाचा खप वाढविण्यासाठीं, निरनिराळ्या लोकांनां आपला माल दाखविणें, आपल्या परिचयाच्या मंडळींकडून त्या मालाची शिफारस करविणें इत्यादि उपाय अंमलांत आणीत असत. निरनिराळ्या उत्सवाच्या प्रसंगीं अगर यात्रांच्या प्रसंगीं आपला माल तेथें नेऊन त्या ठिकाणीं जमलेल्या, निरनिराळ्या स्थानाहून आलेल्या लोकांत आपल्या मालाचा प्रसार करीत असत. तात्पर्य या ना त्या कोणत्यातरी स्वरूपांत या जाहिरातीची कल्पना तत्कालीन लोकांत प्रसृत होती. फक्त इतर साधनांची त्यावेळीं अनुकूलता नसल्यामुळें त्या कल्पनेच्या वाढीला यथोचित अवसर मिळाला नाहीं. प्राचीन काळीं हल्लींप्रमाणें दळणवळणाचीं साधनें विपुल नव्हतीं. मुद्रणकलेचा जन्म अद्यापि झाला नव्हता. वृत्तपत्रांची सोय नव्हती. अर्थात् जाहिरातीला अत्यंत उपयुक्त साधनांचा त्या वेळीं अभाव असल्यानें या शास्त्राला हल्लींचें स्वरूप प्राप्त होणें अशक्य होतें.

१५व्या शतकांत मुद्रणकलेचा जन्म झाल्यानंतर जाहिरातीची कला झपाट्यानें वाढूं लागली. इंग्लंडमध्यें स. १६२२ च्या मे महिन्यांत पहिलें वृत्तपत्र प्रसिद्ध झालें. त्यानंतर २५ वर्षांनीं म्हणजे स. १६४८ मध्यें वृत्तपत्रांतून पहिली जाहिरात फडकली. ही जाहिरात खालीलप्रमाणें होती. ‘ डिव्हाईन चर्च ऑफ इंग्लंड या नांवाचें इंग्लंडच्या पाद्र्यांनीं नांवाजलेलें, लंडन शहरांतील प्रसिद्ध अधिकाऱ्यांनीं संग्रहित केलेलें, दुरुस्त्या करून वाढविलेलें, इंग्लंडच्या प्रधानमंडळाविरुद्ध घेतल्या गेलेल्या आक्षेपांनां समर्पक उत्तरें ज्यांत सांपडतील असें, जोसेफ हॅनस्कॉट आणि जॉर्ज कॅल्व्हर्ट यांच्याकरितां छापून प्रसिद्ध केलेलें पुस्तक आहे. याच्या प्रती स्टेशनर्स हाल व ओल्ड चेंजमधील गोल्डन फ्लीस येथें मिळतील. ’

प्रथम प्रथम पुस्तकांच्या व औषधांच्याच जाहिराती वर्तमानपत्रांतून चमकत असत. पण पुढें सर्व प्रकारच्या जाहिराती वृत्तपत्रांतून चमकूं लागल्या. मुद्रणकलेचा प्रसार सर्व राष्ट्रांतून होतांच जाहिरातीच्या कलेचाहि प्रसार झपाट्यानें होऊं लागला. या विषयांत अमेरिकेनें सगळ्यांत आघाडी मारली. जाहिरातीला शास्त्रीय स्वरूप देण्याचें सर्व श्रेय अमेरिकेला दिलें पाहिजे. अमेरिकेंत सालिना जाहिरातींवर ६० ।७० कोटी डॉलर्स खर्च होतात. इंग्लंडमध्यें जाहिरातींवर सालिना दहा कोटी पौंड खर्च होतात. यावरून जाहिरातींचा व्याप किती प्रचंड आहे हें दिसून येतें.

इतका अतोनात खर्च जाहिरातींवर करण्यांत जाहिरातीपासून काय फायदे होतात असा कोणी प्रश्न केल्यास तो अयोग्य होणार नाहीं. पण जाहिरातीपासून कोणते फायदे होतात हें पहाण्यापूर्वी जाहिरातीचें प्रयोजन काय हें थोडक्यांत पाहिलें पाहिजे. जाहिरातीचे मुख्य उद्देश म्हणजे ( १ ) आपला माल गिऱ्हाइकाच्या नजरेस प्रामुख्यानें आणणें व ( २ ) तो ज्याची विकत घेण्याची इच्छा नसेल त्याच्याहि गळीं उतरविणें: हे दोन्हीहि उद्देश महत्वाचे असले तरी त्यांतल्यात्यांत दुसरा उद्देश अधिक महत्वाचा आहे. कारण माल कितीहि चांगला असला अगर लोकांच्या डोळ्यांत तो भरला तर प्रत्येकजण तो घेईलच असें नाहीं. फार झालें तर तो त्या मालाची शिफारस करील पण नुसत्या तोंडी शिफारसीनें त्या मालाचा खप व त्यापासून व्यापाऱ्यांनां द्रव्यप्राप्ति थोडीच होणार आहे. अर्थात् तो माल जेणेंकरून गिऱ्हाइक विकत घेईल अशा प्रकारची युक्ति अमलांत आणली पाहिजे. यासाठीं गिऱ्हाइकाला मोह पडेल अशा प्रकारची जाहिरात देणें हा एक महत्त्वाचा उपाय आहे. अर्थात् ज्या मानानें ज्याची जाहिरात लोकांनां अधिक पसंत पडेल त्याचाच माल अधिक खपणार हें उघड आहे. यामुळें कोणती जाहिरात लोकांनां पसंत पडेल इकडे व्यापाऱ्यांचें लक्ष्य जाऊं लागलें. त्यामुळें या जाहिरातीच्या विद्येचा शास्त्रीय रीतीनें अभ्यास करण्याची आवश्यकता भासूं लागली. गिऱ्हाइकांनां कोणत्या प्रकारची जाहिरात पसंत पडेल या विषयाचा विचार करतां करतां मनुष्याच्या मनोवृत्तीचें अध्ययन करण्याची जरुरी उत्पन्न होणें क्रमप्राप्तच झालें. अशा रीतीनें या विद्येचा निरनिराळ्या अंगांनीं अभ्यास सुरू झाला. या विद्येच्या अभ्यासकांच्या मतें जाहिरातीमध्यें खालील गोष्टींचा समावेश झाला पाहिजे.

( १ ) जाहिरात चित्ताकर्षक असली पाहिजे. हें जाहिरातीचें आद्य लक्षण होय. जाहिरात जर चित्ताकर्षक नसेल तर लोकांचें लक्ष्य तिकडे वेधणार नाहीं;व त्यामुळें जाहिरात देणाऱ्याचा माल फार खपणार नाहीं. हल्लीं तर जिकडे तिकडे जाहिरातींनां पीक आल्यामुळें, लोक जाहिराती वाचण्याचा कंटाळा करतात. अशा वेळीं त्यांचें लक्ष्य त्यांची इच्छा नसतांहि ज्यामुळें वेधलें जाईल अशा चित्ताकर्षक तऱ्हेची जाहिरात असली पाहिजे. हल्लींच्या व्यापारी चढाओढीच्या युगांत ज्याची जाहिरात अधिक भपकेदार त्याच्या वस्तूचा खप अधिक अशी स्थिति झाली आहे. त्यामुळें जाहिरात देणाऱ्या व्यापाऱ्यानें आपल्या प्रतिस्प-

र्‍यांच्या जाहिरातीपेक्षां आपली जाहिरात कशी भपकेदार होईल, कोणत्या स्थळीं, अगर कोठें दिली असतां ती लोकांच्या चटकन नजरेंत भरेल या सर्वांचा काळजीपूर्वक विचार करून जाहिरात दिली पाहिजे. नवीन नवीन साधनांच्या व सुधारणांच्या वाढीबरोबर जाहिरातीचें क्षेत्र व्यापक झालें आहे. नवीन नवीन जाहिरातीचीं साधनें अस्तित्वांत आलीं आहेत. चित्रांच्या द्वारें, विद्युत्प्रवाहाच्या सहाय्यानें, फोनोंच्या द्वारें, अशा अनंत तर्‍हांनीं मालाची जाहिरात देण्यांत येऊं लागली आहे. यामुळें जाहिरात देण्याचें काम दररोज कठीण होत चाललें आहे. (२) जाहिरात मार्मिक व सूचक असली पाहिजे.जाहिरात द्यावयाची ती अगडबंब शब्दांनीं व भाकड वर्णनांनीं भरली नसली पाहिजे. तर जाहिरात चटकदार असली पाहिजे. जाहिरात वाचतांच वस्तूचे फायदे काय आहेत हें तावडतोब गिऱ्हाइकाच्या लक्ष्यांत आलें पाहिजे. (३) जाहिरात लोकांच्या मनांत कायम राहील अशा प्रकारची असली पाहिजे. (४) जाहिरातीवरून लोकांना त्या वस्तूच्या गुणाबद्दल खात्री पटली पाहिजे. (५) जाहिरात लोकांच्या मनोवृत्तींना बरोबर पटेल अशी असली पाहिजे.( ६ ) जाहिरात जुन्या वस्तूंचा खप वाढविणारी व नवीन वस्तू वापरण्याची चटक लावणारी असली पाहिजे.

जा हि रा ती चीं सा ध नें.—जाहिरातीचीं मुख्य लक्षणें सांगितल्यावर जाहिरातीचीं साधनें कोणतीं आहेत त्यांचा विचार करूं. हल्लीचा जाहिरातदार मुख्यतः खालील साधनांचा उपयोग करतांना आढळतो. (१)मासिकें, वृत्तपत्रें इत्यादि; (२)भिंती, दिवे, फळे, इत्यादि; (३) पत्रें व माहितीपत्रें; (४) कॅटलॉग, व (५)नाटकें, सिनेमा, इत्यादि.

यांत वृत्तपत्रें, मासिकें यांचा नंबर सर्वांत पहिला लागतो. पाश्चात्त्य व पौर्वात्य देशांतहि वर्तमानपत्रें व मासिकें यांचा खप वाढत्या प्रमाणावर असल्याकारणानें वृत्तपत्रवाचकांची संख्या सारखी फुगत असल्यामुळें अशा वृत्तपत्रांतून व मासिकांतून जाहिरात देणें हें फार फायद्याचें असतें. हल्लींच्या वृत्तपत्रांच्या उत्पन्नाची जाहिरात ही मोठी बाब होऊन बसली आहे. वृत्तपत्रकार जाहिरातदारांच्यासाठीं पुष्कळ सवलती द्यायला तयार असतात, याचें कारण त्यांना वर्गणीदारांपेक्षां जाहिरातदारांच्या जाहिरातीपासून होणारें उत्पन्न अधिक असतें. ज्या वृत्तपत्राचा अगर मासिकाचा खप सर्वांत मोठा असेल त्याच वृत्तपत्राकडे व मासिकाकडे जाहिरातदार जातात; त्यामुळें, वृत्तपत्रांना उत्तम जाहिरातदार मिळतात, वाचकांना अगदीं थोडक्या किंमतींत पुष्कळसा मजकूर वाचावयास मिळतो व जाहिरातदाराला जाहिरात दिल्यापासून फायदा होतो. असें हें परस्परावलंबनाचें नातें आहे.

या वृत्तपत्रांच्या व मासिकांच्या साधनाशिवाय दुसरें जाहिरातीचें साधन म्हणजे गांवांतील मुख्य मुख्य भागांतून भिंतीवरून जाहिराती लावावयाच्या अगर त्या भिंतीवरच जाहिरात रंगवावयाची; आगगाड्यांमधून, गाड्यांच्या बाहेरच्या बाजूवर जाहिराती चिकटवावयाच्या अशा एक ना दोन, पुष्कळच तर्‍हा सांगता येतील. अशा प्रकारच्या भिंतींवर अगर फळ्यांवर जाहिराती देण्यानें मालाचा खप पुष्कळ वाढतो. रस्त्यानें जाणाऱ्या येणाऱ्यांच्या नजरेस नित्य तीच जाहिरात पडत असल्यामुळें ती जाहिरात पहाणाऱ्यांच्या मनांत ताजी रहाते व त्यामुळें, त्या जाहिरातींतील माल एखाद्यास खरेदी करावयाचा असल्यास तो त्याच दुकानांत नेमका जातो. वृत्तपत्रांतून अगर मासिकांतून जाहिरात देण्याइतकाच या प्रकारानें फायदा होतो. पण घरांच्या अगर सार्वजनिक भिंतीवर चित्रें काढणें, जाहिराती चिटकाविणें, यामुळें शहराचा साधेपणा व सौंदर्य कमी कमी होत जातें, असें कांहीं विद्वानांनीं प्रतिपादन करण्यास सुरुवात केली आहे. कांहीं कांहीं भिंतीवरच्या चित्रांत अश्लीलपणा असतो. त्यामुळें लोकांच्या मनावर वाईट परिणाम होण्याचा संभव असतो. या दोन दृष्टींनीं ही दुसरी पद्धत अनिष्ट असल्यामुळें त्याला आळा घालण्यासाठीं प्रयत्न सुरू करण्यांत आले आहेत. निदान अगदीं अश्लील जाहिरात असेल तर ती कायद्यानें बंद करता येते. स १८९३ मध्यें लंडन येथें स्कापा नांवाची सार्वजनिक ठिकाणीं जाहिरात देण्याच्या अनिष्ट परिणामाला आळा घालण्यासाठीं एक राष्ट्रीय सभा स्थापन झाली. या संस्थेनें आपलें हें कार्य सुरू केल्यामुळें या प्रकाराला आळा बसत चालला आहे. स१८९४ च्या लंडन बिल्डिंग्स ॲक्टनें, लंडन कौंटी कौन्सिलनें इमारतीच्यावर तीन फुटांपेक्षा अधिक उंचीवर अगर मोठा खांब रोवून त्याच्यावर जाहिरात लावण्याला बंदी केली आहे. त्याचप्रमाणें दुसऱ्या एका कायद्यानें, विद्युत्प्रकाशद्वारां अगर सर्च लाईटच्या सहाय्यानें लोकांच्या नजरेस आपली जाहिरात आणण्याची मनाई केली आहे. स १८५३ मध्यें गाड्यांच्या अगर मोटारीच्या दोन्हीं बाजूंवर जाहिराती छापण्याला प्रतिबंध करण्यांत आला. सार्वजनिक जागीं मोठ्या अक्षरानें जाहिरात देण्यानें जर त्या भागाचें सौंदर्य कमी होत असेल तर ती जाहिरात लावूं न देण्यासाठीं एडिंबरोमध्यें स्वतंत्र कायदा करण्यांत आला व इंग्लंडमध्यें तसाच कायदा होण्याचीं चिन्हें दिसत आहेत.

सार्वजनिक भिंतीवर, जाहिराती डकविण्याच्या बाबतींतहि हळू हळू कायदे होऊं लागले आहेत. स. १८३९ च्या मेट्रोपोलिटन पोलीस ॲक्टान्वयें अनधिकृत जागीं जाहिराती डकविण्याला बंदी करण्याचा हक्क पोलिसांना देण्यांत आला आहे. दि इंडिपेंडंट ॲडव्हर्टाइझिंग ॲक्टान्वयें अश्लील जाहिरातीबद्दल खटला करण्याचा हक्क नागरिकांना देण्यांत आला आहे. स्टेशनावर ज्या अनेक जाहिराती चिकटविण्यांत येतात त्यानें उतारूंचा गोंधळ उडतो या

सववांवर त्यांनां आळा घालण्याचीहि चळवळ सुरू झाली आहे. पण या चळवळीस अद्यापि यश आलेलें नाहीं व येण्याचाहि रंग दिसत नाहीं.

याशिवाय गिऱ्हाइकाकडे आपल्या मालाच्या वर्णनाचीं पत्रें पाठविणें, आपल्या मालाचा कॅटलाग पाठविणें, इत्यादीहि अनेक प्रकार आहेत.

सार्वजनिक जागीं जाहिरात देण्याबद्दलचे नियम इतर देशांतूनहि झाले आहेत त्यांचीहि थोडक्यांत माहिती देणें जरूरीचें आहे.

फ्रान्सः—खासगी इमारतीवर जाहिरात चिकटवूं देणें न देणें हें त्या इमारतीच्या मालकाच्या मर्जीवर अवलंबून असतें. सार्वजनिक जागीं सरकारी जाहिरातींशिवाय कोणत्याहि इतर जाहिराती चिकटविण्याची बंदी आहे. सरकारी जाहिराती पांढऱ्या कागदावर व इतर जाहिराती रंगीत कागदावर लिहिलेल्या असल्या पाहिजेत असा कायदा आहे. जाहिरातीचा आकार, वगैरे बाबी ठरविण्याचा म्युनिसिपालिटयांनां अधिकार आहे. अश्लील अगर आक्षेपार्ह जाहिराती लावूं न देण्याचा पोलीसांनां पूर्ण हक्क आहे. शोभिवंत स्थानाच्या सौंदर्याचा नाश होत असेल तर तेथें जाहिराती लावण्यांत येऊं नये अशा प्रकारची चळवळ करण्यासाठीं १९०१ सालीं एक संस्था स्थापन झाली आहे.

जर्मनीः—इंपीरियल कमर्शिअल ऑर्डिनन्सच्या जुन्या कायद्यान्वयें, सार्वजनिक जागीं जाहिरात देण्याला पोलीसपरवानगी लागते. जाहिरातीसाठीं मुद्दाम खांब वगैरे पुरण्यांत आले आहेत; व त्याच विवक्षित ठिकाणीं जाहिराती चिकटविल्या पाहिजेत. स्वतःच्या मालाच्या अगर इतर बाबींसंबंधांत घरवाल्यांनां जाहिराती चिकटवण्याचा अधिकार आहे. सार्वजनिक वाहनांच्यावर जाहिराती चिकटविण्याला पूर्ण बंदी आहे. सौंदर्यविनाशक जाहिरातींनांहि मनाई आहे.

ऑस्ट्रियाः—जर्मनीप्रमाणेंच ऑस्ट्रियांतहि जाहिरातीसंबंधाचे कायदे आहेत. हंगेरीमध्यें यासंबंधांत कोणत्याहि प्रकारचा कायदा करण्यांत आला नसून जाहिरातीसंबंधांतील सर्व अधिकार म्युनिसिपालिटयांनां देण्यांत आले आहेत.

इटलीः—हंगेरीप्रमाणेंच इटलीमध्येंहि जाहिराती कोणत्या स्थळीं लावाव्यात इत्यादिसंबंधाचे नियम ठरविण्याचा म्युनिसिपालिटयांनां अधिकार देण्यांत आला आहे.

स्वित्झर्लंडः—स्वित्झर्लंडमधील सर्व प्रांतांनां एकाच प्रकारचे जाहिरातीचे नियम लागू नाहींत. निरनिराळ्या कँटन्सनीं आपापले नियम ठरविले आहेत. झूरिचमध्यें जाहिरात देण्याचीं स्थळें ठरविण्याचा पोलिसांनां अधिकार देण्यांत आला आहे. बर्नमध्यें तो अधिकार म्युनिसिपलिटीचा आहे. ल्यूर्सनमध्यें खोटया वर्णनाच्या अगर हलक्या मालाच्या जाहिराती जाहीर ठिकाणीं लावण्याची बंदी करण्यांत आली आहे. स्थानसौंदर्यहानिकारक जाहिरातींनां बंदी करण्यांत यावी अशा प्रकारची चळवळ करण्याकरितां स्वित्झर्लंडमध्यें संस्था स्थापन झाली आहे.

अमेरिकाः—अमेरिकेंतील सर्व संस्थानांनां आपल्या संस्थानांत जाहिरातीसंबंधींचे नियम करण्याचा अधिकार आहे. या संस्थानांपैकीं पुष्कळ संस्थानांनीं आपल्या संस्थांनांतील म्युनिसिपॅलिटयांकडे हा अधिकार सोंपविला आहे. प्रत्येक संस्थानचे नियम येथें देणें शक्य नाहीं. पण त्यांतल्या त्यांत विशेष महत्वाचे नियम पुढीलप्रमाणें आहेत. न्यूयॉर्क संस्थाननें, लॉटरीच्या जाहिरातींनां बंदी केली आहे. सार्वजनिक रस्त्याच्या बाजूनें जाहिराती लावण्यास मॅसॅच्यूसेटस्‌नें बंदी केली कोलंबियानें सार्वजनिक जागीं जाहिराती वाटण्याला देखील बंदी केली आहे. शिकॅगो, बोस्टन या संस्थानांनीं जाहिरातींच्या संबंधांत फार कडक नियम केले आहेत. फ्रान्स, बेल्जम, इटली, स्वित्झर्लंडमधील कांहीं प्रांत व युनैटेडस्टेट्समधील कांहीं संस्थानांनीं सार्वजनिक जागीं जाहिरात लावण्यास कर बसविला आहे.

जा हि रा त सं स्था.—जाहिरातींचा अतिशय व्याप वाढल्यामुळें व व्यापाऱ्यांनां तर जाहिराती उत्तम रीतीनें तयार करतां येत नसल्यामुळें या कामासाठीं स्वतंत्र संस्था उदयास आल्या आहेत. इंग्लंडमध्यें व अमेरिकेमध्यें तर या संस्था हजारोंनीं मोजण्याइतक्या स्थापन झाल्या आहेत. या संस्थांत जाहिराती उत्कृष्ट रीतीनें जाहिरातदारांनां तयार करून देण्यांत येतात. यासाठीं उत्कृष्ट लेखक व चित्रकार या संस्थांनीं गुंतविलेले आहेत.

जा हि रा ती चे फा य दे व तो टे.—जाहिरातीमुळें तोटयांपेक्षां फायदे अधिक होतात हें निःसंशय आहे. कांहीं विद्वानांनीं यासंबंधांत एक आक्षेप उपस्थित केला आहे: व तो म्हणजे पैशाचा व्यय होय. या विद्वानांचें म्हणणें असें आहे कीं एखादी नवी वस्तू अगर एखादा नवीन शोध लागला तर तो लोकांनां कळावा यासाठीं जाहिरात देण्यास हरकत नाहीं पण प्रत्येक जुन्या पुराण्या वस्तूंचीहि जाहिरात देणें अर्थशास्त्रदृष्टया हानिकारक आहे. याचें कारण जाहिरातीवर जाहिरातदार जो पैसा खर्च करतो त्या मानानें तो त्या वस्तूची किंमत वाढवितो व त्यामुळें जाहिरातदाराचें नुकसान न होतां जाहिरातीचा खर्च वास्तविक गिऱ्हाइकावर पडतो; पण हें म्हणणें खरें नाहीं. कारण ज्या मानानें एखाद्या वस्तूची जाहिरात व गाजावाजा अधिक होईल त्या मानानें त्या वस्तूचा खप अधिक होतो व मालाचा खप अधिक होत गेल्यास तो माल अधिक स्वस्त दरानें देणें व्यापाऱ्याला परवडतें. तात्पर्य वरील आक्षेप खरा नाहीं. दुसरा आक्षेप असा आहे कीं या जाहिरातींच्या योगानें कमी प्रतीचा मालहि खपला जातो व त्यामुळें अशा प्रकारच्या कमी दर्जाच्या मालाला अधिक उत्तेजन मिळतें. पण हेंहि म्हणणें खोटें आहे. कारण या व्यापारी चढाओढीच्या काळांत कमी दर्जाचा माल केवळ भपकेदार जाहिरातींच्या योगानें

कांहीं काळ खपला तरी शेवटीं अस्सल व उंची मालाचीच सरशी होते व कमी दर्जाचा माल बाजारांत खपेनासा होतो.

मालाची जाहिरात देतांना देखील सत्याचाच अवलंब करणें फायदेशीर व आवश्यक आहे असें अलीकडे अनुभवास येत चाललें आहे. जाहिरातींचे फायदे सांगण्याची विशेष आवश्यकता नाहीं. कारण जाहिरातींचे फायदे पुष्कळच आहेत व ते सर्वांना विदितच असतात. जाहिरातींनें नवीन मालाची माहिती होते, कोणता माल कोणत्या ठिकाणीं मिळतो तें कळतें, वस्तूंचा खप अधिक होऊं लागतो, राष्ट्रीय व्यापाराची प्रगति होते; मनुष्याच्या गरजा वाढतात व त्यामुळें जागतिक सुधारणेस मदत होते. जाहिरातींचा शैक्षणिक दृष्टयाहि फार फायदा आहे.

हिंदुस्थानः—या विषयांत हिंदुस्थान हा अद्यापि इतर राष्ट्रांच्या फार मागें आहे. पण ही स्थिति सुधारण्यासाठीं हिंदुस्थाननें नेटाचा प्रयत्न केला पाहिजे. जागतिक व्यापारी चढाओढींत हिंदुस्थान टिकावयाचा असेल तर तो पाश्चात्त्यांच्या निरनिराळया कला साध्य करून घेण्यानेंच टिकेल हें निर्विवाद आहे. हिंदुस्थानांत कांहीं कांहीं वस्तू पाश्चात्त्यांच्या वस्तूंइतक्या उत्कृष्ट तयार होतात. पण त्या वस्तूंची जाहिरात दिली न गेल्यानें लोकांना त्या वस्तू कोठें तयार होतात व कोठें मिळतात हें समजतच नाहीं. व त्यामुळें परदेशी माल घेण्याकडे लोकांची प्रवृत्ति जाते. मुर्शिदाबाद येथें तयार होणाऱ्या रेशमी हातरुमालासंबंधाची गोष्ट या दृष्टीनें मननीय आहे. इंग्लंडमधील एका गृहस्थानें मुर्शिदाबाद येथें तयार झालेला हातरुमाल इंग्लंडमधील एका कंपनींतून विकत घेऊन बंगालमधील एका अधिकारी मित्राकडे पाठवला व तशा प्रकारचे आणखी कांहीं हातरुमाल पाठवून देण्यासंबंधानें त्याला लिहिलें. या अधिकाऱ्यानें हा हातरुमाल कोठें होतो यासंबंधीची खूप चौकशी केली. पण त्याला पत्ता लागेना; शेवटीं हे हातरुमाल कोठें तयार होतात यासंबंधींची माहिती इंग्लंडमध्यें ज्या कंपनींतून इंग्लंडमधील गृहस्थानें हा हातरुमाल घेतला होता त्या कंपनीला विचारण्यास त्यानें आपल्या इंग्लंडमधील मित्राला लिहिलें. त्यानें चौकशी करून हे हातरुमाल मुर्शिदाबाद येथें तयार होतात असें त्या कंपनीनें कळविलें. आश्चर्य हें कीं हा मुर्शिदाबाद प्रांतावरचाच अधिकारी होता व असें असूनहि याला मुर्शिदाबाद येथें हातरुमाल होतात ही कल्पनाहि नव्हती. याचें कारण या मुर्शिदाबादमधील कंपनीनें स्वतःच्या मालाची जाहिरात मोठमोठ्या वर्तमानपत्रांतून कधींच दिली नव्हती. तात्पर्य हिंदुस्थानांतील प्रत्येक व्यापाऱ्यानें आपापल्या मालाची लोकांना जाहिरातींच्या द्वारें माहिती करून देणें आवश्यक आहे. जाहिरातींत पैसे घालणें म्हणजे व्यापारांत भांडवल घालण्यासारखेंच आहे. त्याचा एकदम जरी फायदा दृष्टीस पडला नाहीं तरी त्याचा अखेरीस फायदा झाल्याशिवाय रहात नाहीं. जाहिरातींच्या योगानें व्यापाराचें क्षेत्र विस्तृत होतें. मालाचा सर्वत्र बोलबाला होण्याला जाहिरातीशिवाय आजकाल दुसरें कोणतेंहि सुलभ साधन नाहीं ही गोष्ट आपल्या व्यापाराची उन्नति व्हावी अशी इच्छा बाळगणाऱ्या प्रत्येक हिंदी इसमानें लक्षांत ठेवली पाहिजे.

इतर देशांत जाहिरातींसंबंधानें जे नियम करण्यांत आले आहेत तशा प्रकारचे नियमहि हिंदुस्थानांत झालेले आढळत नाहींत. स्थानिक म्युनिसिपालिटयांनीं त्या बाबतींत फारसें लक्ष घातलेलें दिसत नाहीं त्यामुळें वाटेल त्या ठिकाणीं जाहिराती चिटकविण्यांत येतात. क्वचित् अश्लील जाहिरातीहि चिकटलेल्या आढळतात. तर म्युनिसिपालिटयांनीं यासंबंधींचा नियम करणें अत्यंत जरूर आहे.

[ संदर्भग्रंथः—ई. एस्. होल-ॲडव्हर्टायझिंग ॲन्ड प्रोग्रेस; डिल स्कॉट–दि थीयरी ॲन्ड प्रॅक्टिस ऑफ ॲडव्हर्टायझिंग; ट्रुमन ए डेवीज–प्रॅक्टिकल पब्लिसिटी; प्रो. हेस–प्रॉडक्टिव्ह ॲडव्हर्टायझिंग; दावर–बिझिनेस आर्गनिझेशन; ऑस्बोर्न-हँडबुक ऑफ ॲडव्हर्टायझिंग; मार्शमन–बिझिनेस ॲन्ड ट्रेड; केतकर–संकीर्ण लेख. ]

**जिऊ महाला**—शिवाजी व अफजल यांच्या भेटीच्या प्रसंगांत जिऊ महाला हा शिवाजीचा अंगरक्षक असून खानाच्या मृत्यूनंतर त्याचा सरदार सय्यद बंदा हा शिवाजीवर चाल करून आला, तेव्हां जिऊचा यानेंच बंदा यास ठार केलें. जिऊवा हा महाबळेश्वराजवळील ( सातारा जिल्ह्यांतील ) कोंडवळें येथील रहिवासी. हा गांव वाईमहाबळेश्वरच्या जुन्या वाटेवर बेलंगनजीक आहे. तेथें जिऊवाचे वंशज आहेत. त्यांचें आडनांव सकपाळ जिऊवाचा मुलगा सीताराम यास ( बेद्या ) शिवछत्रपतीनें जोरखोऱ्यांत ३१४ गांवीं इनाम दिलें. महाला म्हणजे न्हावी. जिऊवा हा जातीनें न्हावी होता. ' होता जिवा म्हणून वाचला शिवा ' अशी एक म्हण अफजलप्रकरणांतील वर सांगितलेल्या प्रसंगावरून पडली होती. हुकुमाची अमर्यादा केल्यामुळें शिवाजीनें पुढें जिऊवास कामावरून दूर करून देहांत शिक्षा दिल्याची हकीकत एका बखरींत आढळते. जिऊवाचे वंशज आज २५० वर्षे न्हावीपणाचा धंदा करीत नाहींत. [ शिवदिग्विजय; भा. इ. सं. मंडळ—पंचमसंमेलनवृत्त. ]

**जिगणी**—मध्यहिंदुस्थान, बुंदेलखंड एजन्सींतील एक छोटें सनदी संस्थान. क्षेत्रफळ २२ चौरस मैल. उत्तर अक्षांश २५ ४५' व पूर्व रेखांश ७९ ° २५' यांवर असून लोकसंख्या (१९०१) १७०० आहे. येथील जहागीरदार बुंदेला रजपूत असून, छत्रसाल राजाचा पुत्र राव पद्मसिंग हा या जहागिरीचा संस्थापक होय. पूर्वी ही जहागीर बरीच मोठी होती. परंतु मराठ्यांच्या स्वाऱ्या व इतर कारणांमुळें बरीच कमी झाली आहे. हिचें उत्पन्न १३००० रुपये आहे. हींत जिगणी हें मुख्य गांव आहे.

**जिजाबाई**—मराठी साम्राज्याचा संस्थापक जो शिवाजी त्याची ही आई. निजामशाहींतील सरदार शिंदखेडचा रहाणारा लुखजी जाधव याची जिजाबाई ही मुलगी. हिच्या आईचें नांव म्हाळसाबाई. जिजाबाईचा जन्म स. १५९५ त झाला. ही चार वर्षांची असतां ( १५९९ ), शिमग्याच्या सणांत रंगपंचमीच्या दरबारांत मालोजी भोंसले वेरूळकर ( हा लुखजीच्या पदरीं नौकर होता ) याचा पुत्र शहाजी व ही यांचा जोडा पाहून थट्टेनें लुखजीनें त्यांचें लग्न लावावें असें म्हटलें. तेंच खरें धरून मालोजीनें जिजाला मागणी घातली; परंतु लुखजीनें म्हाळसाबाईच्या सांगण्यावरून तें नाकारिलें. तेव्हां मालोजीनें निजामशहाकडून लुखजीस प्रेष लावून हें लग्न घडवून आणलें ( १६०४ ). पुढें शहाजी हा निजामशाहीचा सर्वाधिकारी झाल्यावर त्याचें व जाधवांचें वांकडें आलें. माहुली किल्ल्यावरून शहाजी विजापुराकडे परत जात असतां दिवस भरत आल्यामुळें जिजाबाईस शिवनेरी येथें शहाजीनें ठेविलें; शिवनेर त्याच्या ताब्यांत होती. नवऱ्याचें व बापाचें वांकडें आल्यामुळें जिजाबाई सदोदित शहाजीबरोबरच ( स्वाऱ्याशिकाऱ्यांतहि ) असे. तिला शिवाजीच्या पूर्वी तीन चार मुलें झालीं होतीं; परंतु तीं अल्पवयी होऊन वारलीं. नंतर संभाजी हा पुत्र झाला ( १६२३ ). त्याचें लग्न शिवनेरीच्या किल्लेदाराच्या मुलीशीं झालें (१६३०). या सुमारास जिजाबाई ही लुखजीच्या हातीं लागली होती. परंतु तिनें शिंदखेडास जाण्याचें नाकारल्या-वरून त्यानें शिवनेरीसच तिला ठेविलें. संभाजीच्या लग्नाच्या प्रसंगींच शिवाजीचा जन्म मित्ती शके १५५१ फाल्गुन वद्य ३ स (१९ फेब्रुवारी स. १६३० जुनी पद्धति) झाला. या सालीं शहाजीनें तुकाबाई इच्याशीं लग्न लाविलें होतें. पुढें जिजाबाईस तिचा चुलता जगदेव यानें आपल्या घरीं नेलें. मध्यंतरीं मोंगलांनीं शहाजीचा अपमान करण्याकरितां तिला शिवाजीसह पकडलें होतें ( १६३३ ). परंतु जगदेवाच्या सांगण्यावरून त्यांनीं तिला मुक्त केलें. तेव्हां शहाजीनें तिला पुणतांब्यानजीक विजापूर येथें सुरक्षित नेऊन ठेविलें(१६३४). निजामशाही नष्ट झाल्यावर स्वतंत्र राज्य स्थापण्याचा शहाजीचा विचार होता व त्यास अनुसरून त्यानें अनेक उलाढाल्या केल्या. त्या व लुखजीच्या बहुतेक उलाढाल्या जिजाबाईच्या डोळ्याखालून गेल्या होत्या. राजकारणाचें शिक्षण तिला शहाजीकडून प्राप्त झालें होतें. शहाजीला अनेक कारणांमुळें स्वतंत्र राज्य स्थापितां आलें नाहीं. तेव्हां शिवाजीकडून स्थापवावें असें ठरवून शहाजीनें ती कामगिरी जिजाबाईच्या हातून ( आपल्या अंतःस्थ मद-तीच्या जोरावर ) करविण्याचें ठरविलें व ती तिनें पार पाडली असें कै. वासुदेवशास्त्री खरे वगैरे इतिहासज्ञांचें मत आहे. गागाभट्टानें तिला शिवराजप्रशस्तींत जनजीवनदानहेतु व सकलारिविनाशिनी हीं विशेषणें लाविलीं होतीं. महाबळेश्वरास ता. ६ जानेवारी १६६५ रोजीं सूर्यग्रहणाच्या दिवशीं जिजाबाईची तुला झाली होती.

जिजाबाई ही मानी, निश्चयी, धाडसी व स्वतंत्रवृत्तीची होती. शहाजीच्या सल्ल्यावरून ती शिवाजीस लहानपणा-पासून घेऊन पुणें येथें राहिली. तिनें शिवाजीस राजास अवश्यक असें सर्व प्रकारचें शिक्षण दिलें. महाभारत, रामायणादि पुराणांतील कथा व आपल्या पूर्वजांच्या शौर्याच्या गोष्टी सांगून, तसेंच भोंसल्यांच्या कुळांत शककर्ता निर्माण होऊन तो हिंदूंचें स्वतंत्र राज्य स्थापन करणार आहे असा देवीचा वर मालोजीस मिळाल्याचीहि गोष्ट सांगून तिनें बालशिवाजीच्या मनांत राज्यसंस्थापकाचे गुण व शककर्ता तो मीच ही भावना निर्माण केली. कथापुराणें, साधुसंतांचीं दर्शनें वगैरे धार्मिक गोष्टींकडेहि तिनें त्याचें चित्त लाविलें होतें. ती स्वतः शूर असून, तिला लिहितां वाचतां येत असे. तिनें स्वतःच्या अखत्यारींत पुष्कळ कारभार उरकले होते. शहाजी कर्नाटकांत असतां व शिवाजी लहान असतां, पुण्याकडील जहागिरीचा सर्व कारभार ती जातीनें पहात असे; तिनें न्यायनिवाडेहि केले होते. शिवाजी मोठा झाल्यावरहि मोठमोठ्या मसलतींत ( ड. शहाजीची कैद ) व महत्त्वाच्या घडामोडींत तो तिची सल्लामसलत घेत असे. समाजसुधारणेच्या बाबतींतहि तिनें त्या काळीं अघाडी मारली होती. फलटणचा बजाजी निंबाळकर हा मुसुलमान झाल्यानंतर जिजाबाईनें समस्त मराठामंडळ मिळवून, त्याला शुद्ध करवून त्याच्या मुलास ( महादजी ) आपली नात ( शिवाजीची मुलगी सखुबाई ) दिली ( १६५७ ). पुढें शिवाजीशीं तह करण्याकरितां विजापूर दरबारनें शहाजीस पाठविलें. त्यावेळीं या पतिपत्नींची ( जवळ जवळ १५।२० वर्षांनीं ) भेट झाली. आपण मनांत धरलेला स्वराज्य-स्थापनेचा हेतु, जिजाबाईनें शिवाजीकडून पार पाडविल्याचें पाहून शहाजीला फार समाधान वाटलें ( १६६२ ). सहा महिने शहाजी इकडे राहून नंतर परत गेला. पुढें थोडक्याच दिवसांत शहाजी वारल्यामुळें ( १६६४ ), जिजाबाई सती जात असतां तिला शिवाजीनें मोठ्या आग्रहानें राहविलें. अफझलच्या युद्धांत ( कदाचित् अनिष्ट घडल्यास ) राज्याचा बंदोबस्त कसा करावयाचा, याची निरवानिरव हिच्याच सल्ल्यानें शिवाजीनें केली होती. अफझल मेल्यावर या एकंदर प्रसंगावर जिजाबाईनें अज्ञानदास (पहा) शाहिराकडून एक पोवाडा रचविला. शिवाजीनें तिच्या तैनातीसाठीं ( देवता चैन, दानधर्म वगैरेचें ) एक स्वतंत्र खातें ( दिवाण, चिटणीस, फडणीस, पोतनीस, पुराणिक ) च ठेविलें होतें. प्रजेचा परामर्श शिवाजीपेक्षांहि ती जास्त घेई. सईबाई वारल्यामुळें लहानग्या संभाजीची काळजी सर्व प्रकारें जिजाबाईच करी. पुढें मनांत बाळगलेला शेवटचा हेतु (शिवाजीचें राज्यारोहण) ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशी शके १५९६ रोजीं पाहून, अकरा दिवसांनीं ज्येष्ठ वद्य नवमीस बुधवारीं दोन प्रहरीं रायगडच्या

खालीं पाचाड येथें राजमाता जिजाबाई दिवंगत झाली ( ता. १७ जून १६७४ ). तिच्या नांवाची जिजापूर म्हणून एक पेठ पुणें शहरापासून जवळ असलेल्या पाषाण नांवाच्या गांवाजवळ वसलेली होती, तेथील महादेवाच्या देवळाचा जीर्णोद्धार तिनें केला होता. [ शिवदिग्विजय,समप्रकरणात्मक चरित्र; मराठी रिसायत, पु. १; तुसातनेसळातीन तंजावरचा शिलालेख; भा. इ. सं. मं. चतुर्थसंमेलनवृत्त. ]

**जिजाबाई ( धाकटी )**—ही कोल्हापुरकर पहिल्या संभाजीची बायको व ताराबाईची सून. या सासवासुनांचें फार वांकडें होतें. हिचा व इचलकरंजीकर अनूबाईचा ऋणानुबंध असे. वारणातीरीं झालेल्या लढाईंत श्रीनिवासराव प्रतिनिधीनें संभाजीचें सर्व कुटुंब कैद केलें होतें, त्यांत ही होती पुढें हिला व हिच्या सवतींनां पन्हाळयास पोहोंचविण्यांत आलें. ही बाई फार हुशार व राजकारणी होती. संभाजी बहुधा हिच्याच सल्यानें वागे. हिनें भगवंतराव अमात्यास लिहिलेलीं राजकारणविषयपर बरींच पत्रें प्रसिद्ध आहेत. ही स्वभावानें क्रूर असून कडक शिक्षा करणारी, फार धोरणी, स्वकार्यसाधनांत मार्गाच्या न्याय्यान्यायाकडे न पहाणारी, संशयी अशी होती. कोल्हापुरचें राज्य स्थापण्याचें बरेंचसें श्रेय तिला आहे.शाहूच्या वेळीं व पुढें थोरल्या माधवरावाच्या वेळीं कोल्हापुरराज्याचा बचाव हिच्याचमुळें झाला.ताराबाईप्रमाणें ही हट्टी नसून प्रसंगीं तडजोड करून कार्य साधणारी होती. इ. स १७३० च्या सुमारास तिनें व राजमंडळाचें वांकडें आलें होतें. ही जुलुमी होती. एकदां तर हिनें करवीरच्या शंकराचार्यांच्या मठाच्या जागेंतच स्मशानाच्या भिंती घातल्या. त्यावद्दल आचार्यांनीं थेट पुण्यास पेशव्यांकडे फिर्यादी केल्या; पेशव्यांनीं तिला याबद्दल सांगितलें. पण तिनें आपला हेका तडीस नेला. ती थोडीशी ब्रह्मद्वेष्टीहि होती. हिनें नानासाहेब पेशवे यांच्याकडून कोल्हापुरचें राज्य राखीन असें वचन घेतलें होतें. या वचनामुळेंच पुढें रावबाजीच्या कारकीर्दींत कोल्हापुरकरांनीं पेशव्यांच्या राज्यांत अतिशय धुमाकूळ घातला असतां, व कोल्हापुरचें राज्य नामशेष करण्याचें सामर्थ्य परशुरामभाऊसारख्या सेनापतीच्या अंगीं असतांहि हें राज्य खालसा करण्याचें पेशव्यांच्या मनांत आलें नाहीं. नानासाहेब पेशव्यानीं या बाईला पुण्यास आणून तिचा मानसन्मान केला होता. हिचें माहेर तोरगलकर शिंदे घराण्यांतील होतें. हिच्याच भीतीनें रामराजास पानगांवीं गुप्तपणें ठेवण्यांत आलें होतें. त्याला ठार मारण्यासाठीं तिनें एकदां बावड्यावर स्वारीहि केली. संभाजी निपुत्रिक मेल्यावर हिनें शिवाजी नांवाचा पुत्र दत्तक घेऊन राज्यकारभार आपल्या हातीं घेतला. प्रथम पेशव्यांनीं या दत्तकास हरकत घेतली होती. हिच्याच कारकीर्दींत इंग्रजांनीं मालवणचा किल्ला घेऊन कोल्हापुर दरबाराशीं तह केला. मालवण गेल्याबद्दल तिला फार वाईट वाटलें व तिनें तो परत घेण्याबद्दल सक्तीचे हुकूम सोडले. ही पन्हाळयाच्या देवीला जिवंत माणसाचा बळी नेहमीं देत असे. " बळी देण्यासाठीं नवीं नवीं माणसें मिळविण्याकरितां जिजाबाई रात्रीं नेहमीं पन्हाळयाच्या आसपास हेरांच्या टोळ्या रवाना करी आणि गडाच्या आंतील एका गर्तेत एका ठिकाणीं बळी देत. " ही स. १७७२ त मरण पावली. [ इचलकरंजीचा इतिहास; डफ; मराठी रियासत भा. २; मोडककृत कोल्हापुर ग्याझेटियर; म. इ. सा. खंड ८.]

**जिजिराम**—आसाम प्रांतांत गोलपारा जिल्ह्यांत उगम पावून या जिल्ह्याच्या दक्षिण भागांत सुमारें १०० मैल वहात गेल्यावर ब्रह्मपुत्रा नदीस मिळते. हिच्या तीरावर लाखीपुर, दक्षिण सालमारा आणि सिंगीमारी हीं गांवें आहेत. उन्हाळ्यांत होड्या सिंगीमारीपर्यंत येऊं शकतात.

**जिंजी**—हा किल्ला मद्रास इलाख्यांत मद्रासच्या नैर्ऋत्येस ४० कोसांवर दक्षिण अर्काट प्रांतांत आहे. हल्लींचें जिंजी खेडें ५०० वस्तीचें आहे. किल्ला राजगिरी, कृष्णगिरी व चंद्रायदुर्ग अशा तीन टेंकड्या मिळून बनवला आहे. त्यांत राजगिरी टेंकडी मुख्य व उंच आहे.तिन्ही बाजूंनीं सरळ उंच कडे आहेत व उत्तरेकडून एक लहानशी वाट आहे. किल्ल्याभोंवतीं तिहेरी मजबूत तट असून वर जाण्याची वाट मजबूत व अरुंद केली आहे. सतराव्या शतकांतील लढाईच्या पद्धतीनें व सामुग्रीनें दहा माणसें दहा हजार जणांनां रोखून धरतील अशी भक्कम व्यवस्था येथें दिसून येते. हा किल्ला केव्हां व कोणी बांधला हें समजत नाहीं. पण तो एकंदरींत विजयानगरच्या राजांच्या हातीं होता यांत संशय नाहीं. या तीन टेंकड्यांभोंवतीं त्यांनां एकमेकांनां जोडून तटबंदी केलेली आहे. बाहेरून दगडांचा तट व आंतून विटांचा तट व मध्यें पहारेकरी वगैरेंसाठीं जागा, अशी त्याची रचना आहे. किल्ल्यांत कित्येक सुंदर इमारतींचे अवशेष आहेत.त्यांत दोन देवळें, कल्याणमहाल व कोठारें वगैरे पहाण्यासारखीं आहेत. कल्याणमहालाच्या मधल्या चौकांत आठ मजली मनोऱ्यासारखी एक इमारत आहे. याशिवाय स्नानाचे चौरंग, तोफा, व कैद्यांची विहीर वगैरे पहाण्यासारखीं आहेत. चक्किलीदुर्ग नांवाची चवथी टेंकडी आहे पण ती वरील तीहींशीं जोडलेली नाहीं.

तामिल लोकांत जिंजीवर एक पोवाडा आहे. तो तिकडे फारच लोकप्रिय आहे. येथें देशिंग राजा होता. तो स्वतंत्र बाण्याचा व करारी असे. त्यानें कोणालाहि खंडणी वगैरे दिली नाहीं. तो खंदा घोडेस्वार होता. त्यामुळें औरंगझेबाला त्याचा अभिमान वाटे. कर्नाटकच्या नबाबाला हें सहन न होऊन त्यानें स्वारी केली. कांहीं दैवघटनेनें देशिंग राजाचा पराभव झाला व त्याची राणी सती गेली, वगैरे कथा या पोवाड्यांत आहे. १६६५ सालापर्यंत येथें हिंदू सत्ता होती. त्या सालीं तालीकोटाची प्रसिद्ध लढाई होऊन जिंजी मुसुलमानांच्या ताब्यांत गेली. स. १६४९ त शहाजीनें हा किल्ला सर केला.

कर्नाटकच्या मोहिमेंत आदिलशहाच्या ताब्यांतून शिवाजीनें हा काबीज केला.व त्याचा बंदोबस्त केला(मे१६७७)व तेथें

सुभा स्थापून रघुनाथपंत हणमंतयास तेथील सुभेदारी दिली आणि सात लाख होनांचा जिंजीचा सुभा व्यंकोजीस दूधभातास जहागीर दिला. पुढें संभाजीनें रघुनाथपंतास काढून शामजी पुंडे व हरजी महाडीक यांस सुभेदारी दिली ( १६८१). नंतर राजाराम महाराष्ट्रांतून निघून येथें आल्यावर (१६८९नवंबर) ७ वर्षें औरंगझेबानें किल्ल्यास वेढा देवविला. परंतु राजाराम त्याच्या हातीं लागला नाहीं. वेढ्याचें काम झुल्फिकरखानाकडे होतें; त्यानें सन १६९० च्या आगष्टांत वेढ्यास प्रारंभ केला. इतके दिवस किल्ला पडला नाहीं यावरून त्याची मूळचीच बळकटी, आंतील युद्धसामुग्रीची व धनधान्याची विपुलता वगैरे गोष्टी लक्ष्यांत येतात. अनेक डोंगर साधून हा किल्ला बांधलेला आहे. त्यांपैकीं दोन तर फारच उंच आहेत. एक एक मोंगलसरदारानें एक एक डोंगर वांटून घेतला. सुरुंग लावणें व तोफा चढविणें इत्यादि सर्व उपाय त्यांनीं केले. परंतु उपयोग झाला नाहीं. शिवाय आजूबाजूचे सरदार व धनाजी संताजी हे सेनापती वारंवार त्यांच्यावर तुटून पडत; त्यांना लुटीत व रसद मिळूं देत नसत व औरंगझेबास जिंजीची बातमीहि कळूं देत नसत ( डिसें. १६९१ ). राजारामास संभाजी ( कोल्हापूर घराण्याचा संस्थापक ) नांवाचा मुलगा येथेंच झाला ( १६९३ ). शहाजादा कामवक्ष हा मराठ्यांना मिळेल म्हणून झुल्फिकरनें त्यास कैद केलें. त्याच वेळीं संताजीनें झुल्फिकरचा पराभव केला. तेव्हां त्यानें संताजीशीं तह केला व तो वांदिवाशकडे निघून गेला ( १६९३ जाने. ). त्याच्या सैन्याची इतकी हलाकी झाली कीं बारा कोसांच्या मजलीस एक महिना लागला. औरंगझेबानें सांगितल्यावरून पुनः ( १६९३ सप्टेंबर ) जिंजीस झुल्फिकरनें वेढा घातला. तेव्हां संभाजीनें पुनः त्याच्यावर हल्ले करून त्याला इ. स. १६९६ च्या एप्रिलांत वेढा उठविण्यास भाग पाडिलें. त्यावेळीं झुल्फिकर खालीं कर्नाटकांत गेला. शहाजी तंजावरकर हा राजारामास मदत करी, म्हणून त्यानें त्याला तंबी देऊन कर्नाटकांतील मराठ्यांचा प्रांत काबीज केला. पुन्हां औरंगझेबानें जिंजी घेण्याचा सक्तीचा हुकूम सोडल्यानें झुल्फिकरनें स.१६९७ च्या नोव्हेंबरांत वेढा दिला. शेवटीं राजाराम हा सर्व मंडळींसह किल्ल्यांतून निसटल्यावर ( डिसेंबर ) रिकामा किल्ला मोंगलानें घेतला. या वेढ्याचें महत्त्व तत्कालीन यूरोपियन लोकांस फारच वाटत होतें. त्यांनीं त्याला ग्रीस देशांतील ट्रॉयच्या वेढ्याची उपमा दिली आहे. रा. सरदेसाई म्हणतात कीं, जगांतील प्रसिद्ध वेढ्यांत याची गणना झाली पाहिजे. मोंगलांनां येथील हवा मानवेना म्हणून त्यांनीं जिंजी सोडून अर्काट हें ठाणें केलें. पुन्हां मराठ्यांनीं हा किल्ला केव्हां काबीज केला तें समजत नाहीं. पण तो त्यांच्याकडे २२ वर्षें होता. पुढें तो फ्रेंचांनीं घेतला आणि मागाहून हैदरानें स.१७८० च्या सुमारास घेतला. मराठे लोक (व मराठी कागदपत्रें ) यास चंदी म्हणत असत. [ डफ—पु. १; रियासत, पु १: वेरिंग—बुंदेला; विल्क्स—म्हैसूर भा. इ. सं. मं. चतुर्थसंमेलनवृत्त; इंपे. गॅझे. पु. १२ ].

**जितुलीया**—जितुलीया हा उत्तर आफ्रिकेंतील प्राचीन जिल्हा असून रोमन ग्रंथकार ह्यांत माऊंट आरास व ॲटलास यावर रहाणारे लोक व साहारा मैदानाच्या उत्तर भागांतील ओलाव्याची जागा यांचा समावेश करतात. हे लोक नीग्रो नसून बर्बर वंशांतील असावे. येथें रहाणारे सांप्रतचे लोक त्याच वंशांतील असून ते अद्यापि भ्रमणवृत्तीच आहेत. घोडे पाळण्याबद्दल त्यांची प्रसिद्धि होती. ते कातडीं अंगावर घेत असत व मांस व दूध घेत असत. पिंवळा रंग करण्याबद्दल या लोकांची फार ख्याति होती. या जिल्ह्यांतील लोकांचा प्रथम उल्लेख जुगुर्थाइन युद्धांत येतो. खि. पू. २५ त ऑगस्टसनें मॉरेटॅनियाच्या राज्याबरोबर जितुलीयाचा कांहीं भाग दुसऱ्या जुबाला दिला होता. जितुलीयन लोकांनीं बंड करून रोमन लोकांची कत्तल केली. ६ व्या शतकांत त्यांचा कोससनें पराभव केल्यामुळें ते राजाला शरण आले. इ.स. ४० त मॉरेटॅनिया हा रोमन प्रांत झाल्यावर रोमन गव्हर्नर जितुलियांत स्वारी करीत असत. नायगर व इथिओपियाच्या सरहद्दीपर्यंतचा सर्व जितुलीया रोमन साम्राज्यांत समजत. येथील लोक सैन्यांत दाखल होत असत. या प्रदेशावर रोमन सत्ता असली तरी रोमन संस्कृतीचा यावर कांहींच परिणाम झाला नाहींसें वाटतें.

**जिंतूर**—हैदराबाद संस्थान. परभणी जिल्ह्याचा उत्तरेकडील तालुका. क्षेत्रफळ १४५६ चौरस मैल. लो. सं. ( १९११ ) १२९५४४. या तालुक्यांत एकंदर ३२० खेडीं आहेत पैकीं ३१ जहागीर आहेत. इ. स. १९०१ मध्यें जमीनमहसूल ३·२ लाख रुपये होता.

**जिंद, संस्थान.**—हें पंजाब इलाख्यांतील फूलकियान संस्थानांपैकीं एक संस्थान असून याचें क्षेत्रफळ १२६८ चौ. मैल आहे. या संस्थानांत संग्रूर, जिंद आणि दाद्री या तीन तहसिली असून त्या अगदीं निरनिराळ्या वसलेल्या आहेत. त्यांच्यामध्यें इतर संस्थानांचा अगर खालसा मुलूख आहे. संग्रूर हें राजधानीचें ठिकाण आहे. या संस्थानांत मोठी नांव घेण्यासारखी अशी नदी नाहीं. बहुतेक सर्व प्रदेश सपाट आहे. संस्थानची लोकसंख्या ( १९२१ ) ३०८१८३ आहे. दर चौ. मैलास, लो. सं. चें प्रमाण २२२ आहे. संस्थानचें उत्पन्न १५ लाख आहे.

कर्नाळ व राहटक भागांप्रमाणें येथील वनस्पती असून वन्य प्राणी पतियाळा संस्थानांप्रमाणें आहेत. संस्थान निरनिराळ्या ठिकाणीं वसलें असल्यामुळें हवा एकसारखी नाहीं. जिंद तहसिलींत हवा दमट व रोगट आहे. इतर दोन्हीं तहसिलींत हवा कोरडी व निरोगी आहे. पावसाची सरासरी १० इंचांपासून १२ इंच आहे.

*इतिहास.*—या संस्थानाचा स्वतंत्र इतिहास इ. स. १७६३ सालापासून आहे. जिंदचा राजा हा फुलकियान

वंशांतील मुळपुरुष जो फूल त्याचा नातू सुखचेन याच्या शाखेंतील आहे. या सुखचेनास तीन पुत्र होते. सुखचेन इ. स. १७५१ मध्यें मरण पावला. त्यानंतर राज्याचे तीन भाग झाले. त्या पुत्रांपैकीं गजपतिसिंग अधिक साहसी होता. इ. स. १७६६ मध्यें जिंद ही त्यानें आपली राजधानी केली. त्यावेळीं हा दिल्ली पातशाहीचा मांडलिक असून दिल्लीपातशाहीस खंडणीहि देत असे. इ. स. १७७२ मध्यें त्याला दिल्लीवाल्यानें राजा हा किताब दिला इ. स. १७७४ मध्यें नाभा संस्थानचा राजा व गजपतिसिंग यांचें वैमनस्य आलें व गजपतिसिंगानें नाभासंस्थानांतील आमलोह, भाडसन आणि संग्रूर हे परगणे काबीज केले. पुढें पतिआळच्या राजानें पहिले दोन परगणे परत केले. परंतु संग्रूरचा जिंदसंस्थानांतच समावेश झाला. पुढील वर्षी दिल्लीच्या पातशहानें जिंद सर करण्याचा घाट घातला होता. परंतु सर्व फुलकियन राजे एकत्र झाल्यामुळें तो बेत साधला नाहीं. इ. स. १७६५ मध्यें गजपतिसिंगानें जिंदचा किल्ला बांधला व लवकरच पतिआळच्या राजास रोहटकच्या स्वारींत मदत केली. त्यावेळीं त्याचें फार नुकसान झालें. तथापि पुन्हां त्यानें इ. स. १७८० सालीं मिरतवर चाल केली. परंतु त्या वेळींहि त्याचा पराजय झाला व त्यास मुसुलमान सेनापतीनें कैद केलें. बरीचशी खंडणी दिल्यावर त्याची सुटका झाली. इ. स. १७८९ मध्यें तो मरण पावला. त्यास दोन पुत्र होते. राजा बाघसिंग यास जिंद व सफिदन हे भाग मिळाले व भूपसिंगास बदुखान भाग मिळाला.

ब्रिटिशांविरुद्ध जीं जीं कारस्थानें त्या काळांत झालीं, त्यांत राजा बाघसिंगानें मुळींच भाग घेतला नाहीं. हा प्रख्यात रणजितसिंगाचा मामा होता. लॉर्ड लेक याला फार मानीत असे. सतलजच्या कांठचीं संस्थानें जिंकून घेण्याच्या हेतूनें रणजितसिंगानें स्वारी केली असतां ( त्याच्या विरुद्ध ) हा पतिआळाच्या राजास मिळाला. यानें पुढें ब्रिटिशांस पुष्कळ मदत केली. हा १८१९ मध्यें मरण पावला. त्याच्या मागून त्याचा पुत्र संगतसिंग गादीवर बसला. तो १८२२ सालीं मरण पावला. त्याच्यामागून त्याचा पुत्र फत्तेसिंग गादीवर आला. यावेळीं या प्रांतांत फार धामधूम चालली होती. म्हणून फत्तेसिंगास कांहीं काल राजधानीचा त्याग करावा लागला. हा १८३४ सालीं निपुत्रिक मरण पावला. तेव्हां त्याच्यामागून १८३७ सालीं त्याचा चुलत भाऊ सरूपसिंग हा गादीवर बसला. यावेळीं गजपतिसिंगाकडे असलेले जिंद व इतर नऊ परगणे त्याच्याकडे असून त्यांचें सालिना उत्पन्न २३६००० रुपये होतें. बाकीचा गजपतिसिंगानंतर मिळविलेला सालिना १८२००० रुपये उत्पन्नाचा मुलुख ब्रिटिशांनीं आपल्याकडे घेतला.

सरूपसिंग पतियाळाच्या राजाशीं मित्रत्वानें वागत असून ब्रिटिश सरकारशीं प्रथम प्रथम त्याचें वर्तन मित्रत्वाचें नव्हतें. पुढें मात्र तो ब्रिटिशसरकारचा दोस्त झाला. पहिल्या शीख लढाईंत त्यानें इंग्लिशांस चांगली मदत केली. १८४७ सालीं या संस्थानास खंडणी माफ केली. दुसऱ्या शीख लढाईंत सरूपसिंग हा स्वतः ब्रिटिशांच्या बाजूनें लढत होता. १८५७ सालच्या बंडांत बंडवाल्यांनीं दिल्ली काबीज केली असतां हाच प्रथम दिल्लीवर चालून गेला. नंतर त्याच्या मागून इंग्रजी सैन्य गेलें. या कामगिरीबद्दल बहादुरच्या नबाबाचा खालसा केलेला दाद्री प्रदेश, दोन लाख रुपये ( सालिना ) उत्पन्नाचा व कुळाराम परगण्यांतील १३८००० रुपये उत्पन्नाचीं १३ खेडीं (एकंदर ६०० मैलांचा प्रदेश) यास बहाल करण्यांत आलीं; व राजास ११ तोफांच्या सलामीचा मान आणि इतर फुलकियन संस्थानिकांप्रमाणें दत्तकाचे अधिकार देण्यांत आले.

राजा सरूपसिंग इ. स. १८६४ मध्यें मरण पावला. त्याच्यामागून त्याचा पुत्र रघुबीरसिंग गादीवर बसला. यानें देखील निरनिराळ्या प्रसंगीं ब्रिटिशसरकारास चांगली मदत केली. याच्या कारकीर्दींत नवीन धारापद्धति अमलांत आल्यामुळें सुमारें ५० खेड्यांतील लोकांनीं बंड उभारलें, परंतु त्याचा तत्काळ मोड केला. इ. स. १८७८ मध्यें या राजानें अफगाण लढाईंत मदत दिली होती. याप्रीत्यर्थ या राजास राजा–इ–राजगण हा किताब वंशपरंपरेनें मिळाला.

त्यानें लोकोपयोगी कामें केलीं व संग्रूर गांव जयपुर शहराच्या पद्धतीवर वसविण्याचा प्रयत्न केला. संस्थानची राजधानी संग्रूर हीच आहे. याच्याच प्रयत्नामुळें फुलकिअन संस्थानांत या संस्थानास अग्रेसरत्वाचा मान मिळाला आहे. हा १८८७ सालीं मरण पावला. याच्या नंतर त्याचा अज्ञान नातु राजा रणवीरसिंग गादीवर बसला. हा अज्ञान असतांना राज्याचा कारभार कौन्सिल ऑफ रिजन्सीकडे होता. १८९९ सालीं त्याला राज्याचा कुलअखत्यार मिळाला; हाच हल्लीं गादीवर आहे. याचा जन्म १८७९ सालीं झाला. याला जी. सी. आय. ई. व के. सी. एस्. आय. या पदव्या आहेत. जिंदराज्यांतील जिंदच्या आसपासचा भाग प्राचीन कुरुक्षेत्राच्या हद्दींत मोडतो. या राज्यांतील सफिदनभोंवतालच्या प्रदेशांत पुष्कळ प्राचीन काळच्या इमारती वगैरे आहेत. महाभारतांतील कथांचा येथील पुष्कळ ठिकाणांशीं संबंध दाखविण्यांत येतो. या संस्थानांत ७ गांवें आणि ४३९ खेडीं आहेत. या संस्थानांत दोन निझामती ( जिल्हे ) आहेत. यांपैकीं संग्रूर निझामतींत संग्रूर तहसील असून जिंद निझामतींत जिंद आणि दाद्री या तहसिली आहेत. येथें सुमारें ⅘ वस्ती हिंदूंची आहे व शेंकडा १०.६ शीख लोकांची आहे. जिंद ही निझाम संस्थानच्या आग्नेयेकडे असून तिचें क्षेत्रफळ १०८० चौ. मै. असून तींत जिंद, सफिदन, दाद्री, कलियाण आणि बरांद हीं गांवें व ३४४ खेडीं आहेत. जिंद तहसील ही ४८९ चौ. मै. ची असून तींत २ गांवें व १६३ खेडीं आहेत व वसूल

२॥ लाखांचा आहे. मुख्य पिकें गहूं, जवस, हरभरा, कापूस, ऊंस वगैरे आहेत. संस्थानांत सोन्याचांदीच्या कलाकुसरीचे जिन्नस, कमावलेल्या कातड्याचें सामान,लांकडी कांतीव काम व कापड तयार होतें. सरहिंद कालव्यावर शेंकडा ७.६ इतकी मालकी संस्थानची आहे. १९०३-०४ साली १२१ चौरस मैल जमीन या कालव्याच्या पाण्यानें भिजली होती. लुधिआना-धुरी-जाखल रेलवे १९०१ सालीं संस्थानांत सुरु करण्यांत आली. या रेल्वेचें चारपंचमांश भांडवल संस्थाननें दिलें असून सर्व व्यवस्था नॉर्थ-वेस्टर्न रेल्वेकडे सोंपविली आहे. याबद्दल एकंदर उत्पन्नापैकी शेंकडा ५५ रेल्वे घेते. संग्रूर हें ठिकाण याच रेल्वेवर आहे. या संस्थानांत टांकसाळ असून संस्थानला नाणें पाडण्याचा हक्क आहे. परंतु नाणीं क्वचितच पाडण्यांत येतात. येथील रुपयाची किंमत सुमारें १२ आणे आहे. येथें सोन्याचीं नाणीं देखील पाडण्यात येतात. निरनिराळ्या मंत्र्यांचें एक कौंसिल असून त्याच्या मदतीनें राजा हा राज्यकारभार पहातो.

गांव.—हें जिंद निझामतीचें व तहसिलीचें मुख्य ठिकाण. उत्तर अक्षांश २९°२०' व पूर्व रेखांश ७६°१९' या दरम्यान असून ते सदर्न पंजाब रेल्वेचें स्टेशन आहे. येथील लोकसंख्या जवळ जवळ ८ हजार आहे. हें पूर्वी संस्थानच्या राजधानीचें ठिकाण होतें. अद्यापिहि राज्यारोहणसमारंभ येथेंच होतो. कुरुक्षेत्रांत हें गांव वसलें असून पांडवांनीं या ठिकाणीं 'जयंतीदेवी'चें देऊळ बांधलें असें म्हणतात. पुढें या देवळासभोंवतीं गांव वसला व त्यास जयंतपुरी हें नांव पडलें ( त्याचाच जिंद हा अपभ्रंश होय ). मुसुलमानी काळांत यास फार महत्व नव्हतें; परंतु १७५५ सालीं जिंदचा पहिला राजा गजपतिसिंग यानें हा गांव जिंकल्यापासून याचा उर्जित काळ आला. १७७५ सालीं दिल्लीच्या बादशहानें रहीम दादखान यास हा गांव सर करण्याकरितां सैन्य देऊन पाठविलें होतें; परंतु त्याचा पराभव होऊन तो मारला गेला. येथें प्राचीन देवळें पुष्कळ आहेत. येथील फत्तेगड किल्ला राजा गजपतिसिंग यानें बांधला; हल्लीं त्याचा तुरुंगाप्रमाणें उपयोग केला जातो. येथें स्थानिक व्यापार बराच आहे. [ इंपे० ग्या. पु. १४; गोडबोले-एतद्देशीय संस्थानचा इतिहास; टाईम्स-इंडियन ईयर बुक, १९२२. ]

**जिनकीर्ति**—एक जैन ग्रंथकार. सोमसुंदरच्या पांच शिष्यांपैकीं जिनकीर्ति एक होता. चंपकश्रेष्ठिकथानक नांवाचें पुस्तक जिनकीर्तीनें लिहिलें असून वेबरनें त्याचें भाषांतर केलेलें आहे. 'धन्यशालिचरित्र' याचा कर्ता जिनकीर्तीच होता. याच्या हस्तलिखित प्रतीवर संवत् १४९७ ही जी मिती दिली आहे तीच बहुधा ग्रंथरचनेची असावी, शिवाय जिनकीर्तीनें संवत् १४९४ मध्यें नमस्कारतत्त्व नामक ग्रंथ लिहून त्याजवर टीकाहि लिहिली. जिनकीर्तीचे दानकल्पद्रुम, व श्रीपालगोपाल कथा हे आणखी दोन ग्रंथ आहेत असें क्लाटचें म्हणणें आहे. [ पीटर्सन रिपोर्ट, ४ ( बॉ. ब्रँ रॉ. ए. सो १८९४ ).]

**जिनगर**—यांची बहुतेक वस्ती मुंबई इलाख्यांत मराठी जिल्ह्यांतून आहे. जिनें करणारे ते जिनगर; म्हणून या लोकांना चांभाराप्रमाणें हलके समजतात. कांहीं न्हावी यांची हजामत करीत नाहींत. यांच्यांतच दुसरा एक करजगार किंवा कारंजकार ( कारंजीं करणारे ) म्हणून वर्ग आहे कारंजकार कातड्याचें काम करीत नाहींत. जिनगर व करजगार यांच्यांत रोटीबेटीव्यवहार चालतो. जिनगरांत चित्रकार, सुतार, लोहार, कासार वगैरे धंदे चालतात. यांचे उपाध्ये ब्राम्हण असतात. ज्यांना इतक्या दिवस 'जिनगर' म्हणून संबोधिले जात असे त्या 'आर्य क्षत्रिय सोमवंशी' लोकांची माहिती 'सोमवंशी क्षत्रिय' या लेखांत स्वतंत्र दिली आहे; शिवाय 'चितारी' पहा.

बाराव्या शतकांत, मंगळवेढ्याच्या दामाजीपंतानें धान्याचीं कोठारें लुटल्याचीं व विठ्या महारानें पंताला सहाय्य केल्याची गोष्ट खरोखर घडली; त्यावेळीं त्या विठ्या महारास ( ही ऐतिहासिक व्यक्ति होती; विठ्ठल म्हणजे पंढरपुरचा विठोबा देव नव्हे ) बेदरच्या बादशहानें महारांचे पूर्वापार बावन हक्क करार करून दिले. त्या बावन्नांमध्यें जिनगर जातीकडून महारांना पुढील वस्तु हक्कादाखल देण्याबद्दलचा करार होता. जिनगरानें लग्न झाल्यास २। रु., मर्तिक झाल्यास ३। रु., नांगराचा बैल मेल्यास आठ आणे ( ओढून नेण्यास ) महारास द्यावेत; तसेंच मेलेल्या बैलाचें व म्हशीचें कातडेंहि महारास द्यावें. महाराच्या घरीं लग्न असल्यास त्याला जिनगरानें करा व मुंडावळी फुकट द्याव्यात. याप्रमाणें महार या बलुतेदारास गांवांतील प्रजेकडून जे अनेक हक्क होते, त्यांत जिनगराकडून वरील हक्क मिळत असत. [ भा. इ. सं. चतुर्थ संमेलन वृ. पृ. ६०, ६१ ]

मद्रास इलाख्यातहि कांहीं जिनगर आहेत;त्यांची माहिती जी थर्स्टननें दिली आहे तिचा गोषवारा देत आहों. यांची विशेष वस्ती चंद्रगिरी तालुक्यांत आहे. तेथें हे चित्रें रंगविण्याचें काम करतात. एके काळीं ते शिल्पकार आणि कारागीर होते असें म्हणतात. हे मूळचे राजु असून, उत्तर सरकारांतून ते चंद्रगिरीच्या राजाच्या पदरीं नोकरीकरितां म्हणून आले. राजाच्या पदरीं चाकरीस असलेल्या कम्माल जातीच्या नोकरांवर योग्य नजर ठेवण्याच्या कामीं राजानें यांना ठेवून घेतलें. कालांतरानें कम्माल जातीच्या लोकांची त्यांच्या उद्धटपणामुळें राजदरबारांतून हकालपट्टी होऊन, त्यांच्या जागीं राजु हे कामें करूं लागले. नवाबाच्या अमलाखालीं त्यांनीं हा क्रम सोडून दिला व ते घोड्याचें खोगीर वगैरे करण्याचा धंदा करूं लागले. या जिनाच्या धंद्यावरूनच त्यांस जिनगर हें नांव पडलें. बल्लारी जिल्ह्यांत, जिनगर लोक लांकडावर खोदकाम करण्याचा धंदा करतात. ही कला त्यांनीं कित्येक मुसुलमानांस

शिकविली असून, मुसुलमान लोक या कलेंत फार वाकबगार झाले आहेत.

कर्नूल जिल्ह्यांत जिनगरांनीं रोंगण देऊन तयार केलेलें लांकडी सामान अतिशय उच्च दर्जाचें असतें. नेलोर जिल्ह्यांत, जिगिगा-वान्डलु हे लोक मुलांचीं खेळणीं, लांकडी चित्रें, व कोरीव मूर्ती करतात. त्रिचनापल्ली येथें हिंदूंचीं पवित्र देवळें, कृत्रिम पुष्पें, बैलगाड्या इत्यादिकांच्या हुबेहुब नमुन्याचीं लांकडी चित्रें तयार केलीं जातात.

**जिनप्रभ**—हा रुद्रपल्लीय गच्छापैकीं होता. संघतिलकाचा तो विद्यागुरु होता म्हणून उल्लेख आहे. त्यानें ' सम्यक्त्वसप्तटीका ' ग्रंथावर टीका केली आहे. संघतिलक असें सांगतो कीं, जिनप्रभानें दिल्लीस राज्य करणाऱ्या शाहि महंमदास ' षड्दर्शनी ' ग्रंथाच्या योगानें जैन बनविलें. व ' शाककुलक्ष्मापालचूडामणि ' अशी त्याला पदवी दिली. हा दिल्लीचा राजा महंमद तघलक असला पाहिजे. त्यानें संवत् १३८१ पासून १४०७ पर्यंत राज्य केलें. जिनप्रभकृत षड्दर्शनीवरून त्याच्या शिष्यानें ( राजशेखरानें ) ' षड्दर्शनसमुच्चय ' नांवाचें पुस्तक लिहिलें. तेव्हां जिनप्रभ संवत् १४०० च्या सुमारास होऊन गेला. [ पीटर्सन रिपोर्ट, ४ था ( जॉ. रॉ. ए. सो. १८९४. ) ]

**जिनीव्हा**—हें सर्वांत मोठें सरोवर यूरोपच्या मध्यभागीं आहे. याचें क्षेत्रफळ २२३ चौ. मै. असून याचा आकार चंद्रकोरीसारखा आहे. लांबी सुमारें ४०१४५ मै. आहे. याचीं पश्चिम व पूर्व टोंकें अनुक्रमें जिनीव्हा व व्हेले यांत असून सर्व दक्षिण किनारा फ्रान्स देशांत मोडतो; सरोवराचा बाकीचा सर्व भाग स्वित्झर्लंडमध्यें येतो. प्रसिद्ध ऱ्होन नदी पूर्व टोंकाजवळ आंत शिरून पश्चिमेस बाहेर पडून जिनीव्हा शहरांतून वहात जाते. याचें पाणी सर्व ठिकाणीं निळें असून ज्या ठिकाणीं ऱ्होन शिरते तेथून जसजसें पुढें यावें तसतसें तें निवळत गेलें आहे. येथें स्वित्झर्लंडांतील इतर सरोवरांप्रमाणें पुष्कळ मासे सांपडत नाहींत. सरोवरांत बांधलेल्या प्राचीन काळच्या वसतिगृहांचे अवशेष येथें विपुल सांपडतात. याच्या उत्तर व दक्षिण किनाऱ्यावरून रेल्वे गेली आहे. येथील सृष्टिसौंदर्य अत्यंत रमणीय व आल्हादकारक आहे.

**जिनीव्हा**—हें स्वीत्झरलंड देशांतील एक शहर. येथें प्रॉटेस्टंट पंथाचें एक सुंदर देवालय आहे. या देवालयाजवळ शिलेखाना आहे. या शिलेखान्यांत अलिकडे ऐतिहासिक पदार्थसंग्रहालय आहे. येथें १७०९ बांधलेली पॅलेरेस डी जस्टीस नांवाची एक इमारत आहे. याशिवाय स. १५५९ त बांधलेली येथील विद्यापिठाची इमारत पाहण्यासारखी आहे. येथील आणखी इमारती म्हटल्या म्हणजे व्हिक्टोरिया गायनशाळा, नाटकगृह, रशीयन देवालय वगैरे होत. येथें एक नवीन सभ्य पदार्थसंग्रहालय बांधलें आहे. तसेंच एक वेधशाळा असून घड्याळें, रसायनशास्त्र, औषधें, व्यापार, ललितकला वगैरे औद्योगिक शिक्षण देणाऱ्या शाळा आहेत. येथें पुष्कळ दानधर्म करणाऱ्या संस्था आहेत. प्रवाहापासून वीज उत्पन्न करण्याचा कारखाना आहे. लो. सं. (१९१८) १३५५००. हें पहिल्यानें रोमन लोकांच्या ताब्यांत होतें. ५ व्या शतकांत हें बर्गंडीयन लोकांच्या हातीं आलें. पुढें १०३२ सालीं दुसरा कोनॅरड बादशहानें घेतलें व धर्मगुरूस बक्षीस केलें. ११६२ त हाच धर्मगुरू स्वतःला या शहराचा राजा म्हणवूं लागला. यानंतर १२६३ त हें सॅव्हॉयराजघराण्यांत आलें. १५३६ सालीं येथें जॉन काल्व्हीन नांवाचा धर्मसुधारक रहावयास आला व कांहीं दिवस त्यानें या शहरावर सत्ता चालविली. १८१४ सालीं प्रातिनिधिक सत्ता स्थापन झाली. पुढें १८४७ सालीं प्रजासत्ताक पद्धति अमलांत आली, व ही पद्धति थोडेफार फरक होऊन अद्यापि चालू आहे.

**जिनेश्वरसूरि**—एक जैन ग्रंथकार. याचा गुरु चंद्रकुलांतील'वर्धमान'नांवाचा असून जिनचंद्र, अभयदेव व जिनभद्र नांवाचे याचे शिष्य होत. 'बुद्धिसागर ' त्याचा बंधु किंवा आप्त होता. 'खरतरसाधुसंतति' त्याजपासून झाली. ( पहा ). 'अष्टकवृत्ति' नांवाचा ग्रंथ त्यानें संवत् १०८०मध्यें रचिला. त्यावेळेस तो जावालपुर येथें रहात असे. एका वाग्युद्धांत जय मिळाल्यावरून राजापासून त्याला ' खरतर ' ही पदवी मिळाली. गुजराथेंत ' दुर्लभ राजा ' राज्य करीत असतां ' पंचलिंगिप्रकरण ' नांवाचें पुस्तक केलें. ' वीरचरित ' ग्रंथ जिनेश्वरसूरिकृत असून संवत् १०९२ मध्यें आशापल्ली येथें ' लिलावतीकथा ' नामक ग्रंथ व दिंडयानकग्राम येथें ' कथानककोश ' नांवाचा असे तीन ग्रंथ प्रस्तुत ग्रंथकाराचे होत. याचें मूळचें नांव शिवेश्वर असून बापाचें नांव ब्राम्हणसोम होतें. ज्या वेळेस त्यानें दीक्षा घेतली त्यावेळेस जिनेश्वर हें नांव मिळालें. ' खरतरगच्छ ' पहा. [ पीटर्सन रिपोर्ट ४. ]

**जिनोआ**—इटली. याच नांवाच्या प्रांताचें राजधानीचें शहर व लिगुरियाचें बंदर. हें लेगहॉर्नच्या वायव्येस रेल्वेनें ११९ मैल आहे; कॉम्युनची लोकसंख्या ( १९१५ ) ३००१३९ आहे. हें व्यापाराचें शहर असून आर्चबिशपचें रहाण्याचें ठिकाण आहे. येथें एक विश्वविद्यालय आहे. इसवी सन १६२६ पासून १६३२ पर्यंत सेव्हाय येथील ड्यूकांनीं जिनोआचें स्वातंत्र्य हिराऊन घेण्याचे प्रयत्न केले, परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. जिनोआनीं मध्ययुगांत बांधलेलीं प्रार्थनामंदिरें फार सुबक आहेत. ११२६ सालीं सेन्ट मॅटिओचें मंदिर बांधलें गेलें. सेन्ट लॅरेन्झो मंदिर फार सुबक असून तें पोप दुसरा गिलेशीयस ह्यानें ११९८ सालीं पावन केलें. सेन्ट अँड्र्यू आणि सेन्ट इमेशिअस हीं दोन मोठीं मंदिरें आहेत.

जिनोआमध्यें असलेल्या पंधराव्या शतकांतील इमारती जरी इतक्या सुबक नसल्या तरी कांहीं खासगी घरांमध्यें उत्कृष्ट कारागिरीचे अवशेष अजून दृष्टीस पडतात. येथें पॅलेझोरोसो आणि पॅलेझोबिआन्को हे दोन प्रसिद्ध राजवाडे आहेत.

पहिल्यांत वाचनालयें आणि चित्रांच्या गॅलऱ्या आहेत. दुसरा तर कलाकौशल्याचा खजिनाच आहे. सन १४७१मध्यें येथें एक विश्वविद्यालय स्थापिलें गेलें.

या विश्वविद्यालयांत कायदा, वैद्यक, सृष्टिशास्त्र, तत्त्वज्ञान या शाखा आहेत. या विश्वविद्यालयाला जोडूनच एक वाचनालय, वेधशाळा आणि वनस्पतिशास्त्राभ्यासाकरितां एक बाग आहे. येथें मोठमोठाली कलाभुवनें आणि गायनशाळा आहेत. टिब्राझाफेरारी ही व्यापारी पेठ आणि ट्रामगाडींचें केंद्र आहे. व्हाया रोमा हें दुसरें व्यापाराचें स्थान आहे. येथलि सडका रुंद असून फार चांगल्या आहेत. कापूस कांतण्याचे आणि कातडीं कमावण्याचे धंदे सर्वत्र आहेत. कोळसा, कापूस आणि धान्य ही परगांवाहून जिनोआस येतात. प्राचीन काळापासून जिनोआ हें व्यापारी बंदर आहे. पहिल्यानें ग्रीक लोक येथें आले. त्याच्यानंतर रोमन लोक आले, जिनोआनें साऱ्या लोकांविरुद्ध वऱ्याच लढाया केल्या. पिसाच्या मदतीनें जिनोआच्या लोकांनी सार्डीनी यांतून मुसलमान लोकांनां हांकून लाविलें. यामुळें दोन प्रजासत्ताक राष्ट्रांत लढाई जुंपली आणि त्यांत पिसाचा सर्वतोपरी नाश झाला. काळया समुद्राच्या किनाऱ्यावर लेव्हन्टामध्यें आणि इतर ठिकाणीं तटबंदी किल्ले बांधले गेले. मध्ययुगांत जिनोआच्या लोकांनां व्यापारांत आणि दर्यावर पुष्कळ जय मिळाले.जिनोआच्या लोकांत आपसांत फार दुही होती.कांहीं लोक घिबेलाइनच्या बाजूस मिळाले तर कांहीं यूलेफच्या बाजूस मिळाले. पण त्यांनीं परकीय सत्ता कबूल केल्याबरोबर त्यांचें विशेष नुकसान झालें नाहीं.१३८०सालीं जिनोआच्या लोकांनीं व्हेनीसच्या लोकांचा शिओजी येथें पराभव केला. स. १५२८ मध्यें अँड्रिआ डॉरीआनें फ्रेंचांची सत्ता झुगारून दिली. १६व्या शतकाच्या आरंभीं प्रसिद्ध जिनोआ येथील खलाशी ख्रिस्तोफर कोलंबसनें स्पॅनिश लोकांनां नवीन जगाचा शोध लावून दिला.

१७ व्या शतकांत जिनोआवर फ्रेंच लोकांच्या तोफांचा मार झाला आणि पिओझाच्या पराजयानंतर जिनोआचे लोक ऑस्ट्रेलियाला मिळाले. परंतु लवकरच ऑस्ट्रियन लोकांनां आपला ताबा सोडावा लागला. दोस्त राष्ट्रांकडून प्रजासत्ताकांनां स्वातंत्र्य दिलें जाईल एवढ्या लॉर्ड बेन्टिंक साहेबानें दिलेल्या खात्रीवरून जिनोआच्या लोकांनीं फ्रेंचाविरुद्ध १८१४ सालीं बंड केलें, परंतु जिनोआनें सार्डिनिआच्या अन्तर्गत रहावें या पॅरीस येथें झालेल्या तहांतलि अटीनें जिनोआंतील लोकसत्ताक राज्यपद्धति नष्ट केली. ही गोष्ट घडून पाडण्याकरितां जोसेफ मॅझिनीला पुष्कळ प्रयत्न करावे लागले. परंतु त्यांचा कांहीं फायदा झाला नाहीं.

**जिन्सीवाले, श्रीधर गणेश** ( १८५२—१९०३ )— एक महाराष्ट्रीय पंडित. यांचें बाळपण अत्यंत हालआपेष्टेंत गेलें. स्वभाव फार करारी असे, तसेंच आचरणहि फार कर्मठ असे. स. १८७६ त हे एम्. ए. झाले; कांहीं वर्षें शिक्षकाचें काम करून हे विल्सन कॉलेजांत संस्कृतचे प्रोफेसर झाले; अधिकाऱ्यांचा व यांचा एका सामाजिक बाबतींत बेबनाव होऊन यांनीं १८९० सालीं राजिनामा दिला; पुढें राहिलेलें सारें आयुष्य त्यांनीं विद्याव्यासंगांत घालविलें.

**जिप्सी**—या बहुतेक जगभर पसरलेल्या भ्रमणशील जातीची चांगली सविस्तर माहिती पहिल्या विभागांत ८ व्या प्रकरणांत दिलेली आहे. या लोकांची सद्यःस्थिति, यांचा यूरोपांत होणारा छळ, भारतीयांशीं सादृश्य, जिप्सी भाषा व इतिहास या सर्वांचें विवेचन त्या ठिकाणीं आलें आहे. हिंदुस्थानांतलि वंजारी व झिंगारी जात ही एक जिप्सी शाखा असावी अशाबद्दल पुरावे तेथें दिले आहेत. तसेंच जाट व डोम हे जिप्सी आहेत कीं काय या प्रश्नाचा विचार केला आहे. जिप्सींची मूलभाषा ही गुजराथी व राजस्थानी यांची प्रकृतिरूप भाषा होय असें जें रमणभाईनीं दाखविलें आहे त्याचाहि या प्रकरणांत उल्लेख केला आहे.

**जिब्राल्टर**—भूमध्यसमुद्राच्या पश्चिमप्रवेशभागीं जिब्राल्टर नांवाचा ब्रिटिशांचा किल्ला आहे. जिब्राल्टर ही एक राजवसाहत आहे. जिब्राल्टरची दक्षिणोत्तर लांबी तीन मैल असून रुंदी पाव ते पाऊण मैल आहे. जास्तींत जास्त उंची १४३९ फूट आहे. येथील किल्ला ७४६ सालीं बांधिला गेला. येथील खडकच अडीच मैल लांब असून उत्तरटोंकाच्या ठिकाणीं तो सुळकेदार आहे व त्याच्या पलीकडे असलेल्या एका रेताड पट्टीनें तो स्पेनला जोडला गेला आहे. जिब्राल्टर खडकाच्या सर्वांत उंच टोंकाला " ओ हाराज टावर " असें म्हणतात.

जिब्राल्टरची हवा निरोगी असून हिंवाळ्यांत समशीतोष्ण व उन्हाळ्यांत साधारण उष्ण असते. दरवर्षी साधारणतः ३४.४ इंच पाऊस पडतो.

हल्लींचें जिब्राल्टर शहर अलिकडे वसविलेलें आहे. जिब्राल्टरचे रहिवाशी मिश्र महावंशाचे असून स. १९११ च्या खानेसुमारीच्या वेळीं तेथील लोकसंख्या २५३६७ होती. जिब्राल्टर ही वसाहत असल्याचें वर सांगितलेंच आहे. येथें स्थानिक राज्यव्यवस्था मुळींच नाहीं. येथें शिक्षण सक्तीचें नाहीं तरी शाळेंत जाणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या ( १९१७–१८ ) २८१६ होती. १९१७ सालचा वसूल १२५८७६ पौंड असून खर्च ११९६३६ पौंड होता. सर्वांत जास्त उत्पन्न जकातीचें आहे. येथें व्यापार मुळींच नाहीं. जिब्राल्टरचा मुख्य धंदा म्हणजे तेथून जाणाऱ्या आगबोटींनां कोळसा पुरविणें हा होय. यामुळें हजारों लोकांनां रोजगार मिळाला आहे. येथें उपयोगांत असलेलीं नाणीं, वजनें व मापें हीं सर्व ब्रिटिश आहेत.

२० व्या शतकाच्या आरंभींच जिब्राल्टरच्या संरक्षणाच्या साधनांत बरेच फरक करण्यांत आले. नव्या तऱ्हेच्या

तोफा आणून त्या उंच ठिकाणीं ठेवण्यांत आल्या आहेत. या योगानें तोफांचे गोळे फेंकण्याचा टापू वाढला आहे. जिब्राल्टर येथें नवीन धक्का बांधल्यामुळें आरमारी ठाणें म्हणून त्याचें महत्त्व जास्त वाढलें आहे. नवीन धक्क्याला न्यू मोल म्हणतात. बंदरानें ४४० एकर जागा व्यापली आहे. त्यापैकीं २५० एकरात आहोटीच्या वेळीं सुद्धां ३० फूट पाणी असतें.

१४ व्या शतकाच्या आरंभीं हा किल्ला लिऑन व कॅस्टाईलच्या राजाच्या ताब्यांत होता. नंतर तो मोरोक्कोच्या राजाच्या ताब्यांत गेला. पंधराव्या शतकाच्या आरंभीं जिब्राल्टरचा किल्ला ग्रॅनेडाच्या राजाच्या ताब्यांत गेला, व त्याच शतकाच्या मध्यंतरीं तो स्पेनच्या ताब्यांत गेला. स्पेनच्या ताब्यांत असतांना त्या किल्ल्याची तटबंदी इतकी मजबूत करण्यांत आली कीं सर्व युरोपभर हा किल्ला अभेद्य मानला जात होता.

स्पेनच्या वारसासंबंधीं झालेल्या ब्रिटन व स्पेन या दोन राष्ट्रांमधील युद्धांत जिब्राल्टरचा किल्ला ब्रिटिशांच्या ताब्यांत गेला. स्पेननें हा किल्ला परत घेण्याचे बरेच प्रयत्न केले. अमेरिकेनें स्वातंत्र्याकरितां केलेल्या युद्धाच्या वेळीं स्पेननें जिब्राल्टरला वेढा दिला( १७७९ ); तो सन१७८३ पर्यंत चालू होता. परंतु स्पेनला त्यांत यश आलें नाहीं. त्यानंतर सन १८०१ मध्यें पुन्हां स्पेननें जिब्राल्टर घेण्याचा प्रयत्न केला पण याहि वेळेस स्पेनचा पराभव झाला.

**जियागंज**—बंगाल इलाखा, मुर्शिदाबाद जिल्हा. लालबाग विभागांतील हें एक खेडें असून मुर्शिदाबाद शहराच्या उत्तरेस ३ मैलांवर भागीरथी नदीच्या डाव्या तीरावर आहे. उत्तर अक्षांश २४ ° १५' व पूर्व रेखांश ८८ ° १६'. लोकसंख्या ( १९०१ ) ८७३४. येथील व्यापार जरी पूर्वीच्या मानानें कमी झालेला आहे तरी ताग, तांदूळ, रेशीम, साखर इत्यादींचा व्यापार बराच चालतो. नदीच्या दुसऱ्या तीरावरील अझीमगंज हें ईस्ट इंडियन रेल्वेचें स्टेशन असून या दोन गांवांमध्यें फेरी बोट नेहमीं चालु असते व अझीमगंज म्युनिसिपालिटीचा ताबा या गांवावर आहे.

**जिरंग**—आसाममधील खासी डोंगरांतील एक छोटें संस्थान.

**जिरळ कामसोळी**—मुंबई इलाखा. रेवाकांठामधील छोटें संस्थान. यांत दहा गांवें असून वार्षिक उत्पन्न अजमासें चार पांच हजारांचें आहे. त्यांत पुन्हां तीन वांटण्या आहेत.

**जिराफ**—चतुष्पाद जनावरांत हा बराच उंच प्राणी असून हरीण, काळवीट व उंट यांच्यासारखा तो दिसतो. इतर प्राण्यांशीं तुलना केली असतां, जिराफचे बरेच विशेष असलेले आढळून येतात. लांबी, बारीकपणा व मानेचा लवचीकपणा या बाबतींत इतर चतुष्पादांपेक्षां हा एक विशिष्ट असा प्राणी असून वालुकामय प्रदेशांत संचार करण्यास योग्य अशीच त्याची एकंदर रचना आहे. त्याचें डोकें उंटासारखें असून त्याच्या नाकपुड्यांजवळ केंस असतात. वालुकामय प्रदेशांतून जातांना वावटळीमुळें उडणारी धूळ त्याच्या नाकात जाऊं नये म्हणूनच कीं काय, निसर्गानें त्याच्या नाकातोंडासमीप केंसांची वाढ केलेली दिसते. इतर कोणत्याहि चतुष्पादापेक्षां जिराफाच्या डोळ्यांनां फार दूरवर दिसतें व चरतांना मागें वळून पाहिल्यास त्यास मागचेहि पदार्थ फार लांब अंतरावरून पहातां येतात. आत्मसंरक्षणाचें ह्याचें मुख्य साधन म्हटलें म्हणजे त्याचीं शिंगें व खूर हे होत. मान वळवून नंतर त्याला आपल्या शिंगांचा उपयोग करितां येतो; परंतु त्याच्या पायांत एवढें सामर्थ्य असतें कीं लाथेसरशीं जिराफ हा सिंहासहि लोळवितो असें म्हणतात. त्याची चालण्याची पद्धत फारच विचित्र असते. आपली मान वर करूनहि न सांपडणाऱ्या वृक्षांच्या डहाळ्या तो जिभेनें सहज आपल्या आटोक्यांत आणतो.

नुकताच जन्मास आलेला जिराफ सहा फूट उंच असतो. दक्षिण आफ्रिकेंत बरेच जिराफ आढळतात. जमिनीपासून सुमारें १८ फूट उंचीवर असलेलें त्याचें डोकें, त्याची खालीं घसरत येणारी पाठ, व काळे ठिपके असलेला व हरिणाच्या रंगासारख्या असलेला त्याच्या शरिराचा रंग या सर्व गोष्टींमुळें या प्राण्यास पाहणारांस मोठें कौतुक वाटतें. कांहीं खातांना व पितांना त्याला आपले पुढील पाय पसरावे लागतात. कांहीं संकट आलें कीं, हा प्राणी आपल्या लांब तंगड्यांच्या जोरावर पुष्कळ वेगानें पळूं शकतो. ओकापी नांवाच्या एका जातींतील जिराफाच्या पायावर झिब्राघोड्याप्रमाणें पट्टे असतात.

**जिरार**—मध्यप्रांत. जिल्हा वर्धा. हिंगणघाट तहशील. हिंगणघाटपासून २० मैलांवर हें मोठें खेडें आहे. क्षेत्रफळ ४००० एकर. लोकसंख्या (सन १९०१) २२००. येथें शेख ख्वाजा फरीद नांवाच्या फकीराचें थडगें आहे. येथें खाण्याचीं पानें होतात. पूर्वी हें परगण्याचें ठिकाण होतें. हातमागावरील कापड व घोंगड्या येथें तयार होतात.

**जिराईतखाना**, जा व ता— जिराईतखाने यांनीं प्रातःकाळीं अंघोळ करून, आपले कारखान्यांत येऊन, सरकारी हत्यारें, पट्टा, भाला, बर्ची, गुप्ती, गुर्दा व खांडा व तेगा, पेशकबज व फरसटाळ, फिरंग व तीरकमान, छांगसुर्इ, कट्यार, बुकभाला, पिस्तुल, वाकमार व गलेफ ढालाचे व बंदुकीचे व हुद्दे तरवारांचे व दुर्बिणी व घड्याळें वगैरे सदरहूची देखरेख रोजचे रोज झाडून पुसून, गंज लागला न लागला हें पाहून, वरचेवर शिकल करवून, गलेफ नवे जुने करावयाचे जाहल्यास व तरवारांची म्यान व नथण्या, ज्या हत्यारास जसें असावयाचें तसें करण्याची आज्ञा होईल त्या प्रमाणें, कारभारी यांनकडून सरंजाम घेऊन, तयार करून, ज्या हत्याराचे त्यास माफजतीनें येऊन बंदोबस्त राखीत जावा. ज्या समयीं जें हत्यार आणावयाचा हुकूम होईल त्या वेळेस तें हजर करीत जावें. व ज्याचे तसलमातीस नें हत्यार

असेल त्याची चौकशी पंधरा पंधरा दिवसांनीं राखीत जावी. स्वारीच्या समयीं हत्यारें हरकोणाकडे यावयाची आज्ञा होईल त्याप्रमाणें देऊन स्वारी आल्यानंतर तीं हत्यारें मागतीं चौकशीनें पाहून घेऊन कारखान्यांत ठेवीत जावीं; व व हत्यारांचा झाडा सावधगिरीनें राखीत जावा. शिकलगार व जिनगर व लोहार वगैरे कामगार यांजकडे जें काम ज्याचें असेल तें त्याजकडून चौकशीनें सरकारमर्जीपसंत असें करवून कारखान्याचा बंदोबस्त शाबूत ठेवीत जावा. कामगार आपलें काम हुशारीनें करणार नाहीं, त्यास ताकीद करून नीट करवावें. ताकिदीप्रमाणें न वागतां, सरकारकाम गैरउपयोगी करूं लागल्यास सरकारांत समजावून बंदोबस्त करून घेत जावा. हुशारीनें वागल्यास मान व कानूकायदे चालवावयाचे वितपशील:—

१ पूजा भवानीची व नैवेद्य पूर्वींपासून चालत आला त्याप्रमाणें सरकारांतून पावत जाईल. १ कारखान्याची पूजा व दक्षणा पावत जाईल. १ कारखाने मजकूरचे घटास खेंडा व बकरें व खर्चास रुपये सरकारांतून चालविले जाईल.१ हुद्याची पूजा व खेंडा व नैवेद्य व नारळ, हुजर याजकडे निमें व जिराईतखानेकडे निमे शिरस्तेप्रमाणें करीत जाणें.१ निशाण भगवें व जरीपटक्यास बकरें व नैवेद्य येतो त्यांपैकीं केसरकर यास मुंडी व फरा एक, बाकी निमे राहील तें भोसले निमे व जिराईतखाने निमे करणें. १ सरकाराचा घट उठतेवेळेस बकरें मारावयाचें त्यास तरवार जिराईतखान्याकडून घ्यावयाची रुमाल भरल्यावर जिराईतखान्याकडे येतो तो पावत जाईल. १ नैवेद्य श्रीअंबाबाईचा पावेल. १ शिकलगार व जिनगर व कारंजकर यास बकरें व नैवेद्य पावेल. १ हुजरे यांजकडील इनामाची व सतका याची वांटणी एक असामीची घेत जाणें. १ प्रथम तरवारीची परीक्षा करून सरकार चौरंग बकरें याचा करून मारतील; तें बकरें फरास यांचें व सरकारच्या अंगावरील शेला शिकलगार याचा. १ शिके कटयार सरकारांतून सरदारास देतील. त्यांजकडून इनाम यावयाचा तो मागून घ्यावा. १ सरकारांतून ढालतरवार कोणास बक्षीस देतील, त्याजपासून इनाम यावयाचा, तो घेत जाणें.१ गोकुळअष्टमीस निशाण व लोणी व गणेशचतुर्थीबद्दल नैवेद्य व घुगऱ्या मेसकुमाय राणीच्या व दिपवाळीबद्दल तेल, अरगजा व फराळास शिवरात्री व आषाढीकार्तिकी व तुळशीचें लग्नाबद्दल ऊस, आवळे व होळीचा नारळ व खोबरें व संक्रांतीबद्दल तीळ व गुळ व खण दसरियांत व नागपंचमीस नाह्याची आट्टी व दरमाहा पौर्णिमेस सवाष्ण व खण व राखीपौर्णिमेबद्दल पोवती सालाबाद शिरस्तेप्रमाणें सर्वांबरोबर पावत आल्याप्रमाणें पावत जाईल. 'अठरा कारखाने' पहा [ संदर्भग्रंथ:—इतिहाससंग्रह पु. ६ अं. ७।८।९ ]

**जिरें** ( गोडें )—लॅटिनमध्यें क्युमिनम सिमिमम, इंग्रजींत क्युमिन, संस्कृतांत जीरक, मराठींत जिरें, हिंदींत जिरा, इत्यादि नांवें आहेत. बंगाल व आसामखेरीज इतर सर्व हिंदुस्थानांतील भागांत याची लागवड होते. हिंदुस्थानांत हीं झाडें स्थानिक व आपोआप उगवलेलीं ( रानटी ) जरी दिसलीं तरी हीं मूळचीं येथील नव्हत.

खरें जिरें इजिप्त व भूमध्यसमुद्रानजीकचा प्रदेश यांमध्यें होतें. उत्तम प्रकारचें जिरें माल्टा येथून येतें.जिरें यूरोपखंडांतील लोकांस फार प्राचीन कालापासून माहित आहे.सतराव्या शतकांत इंग्लंडमध्यें याचा उपयोग मसाल्यास करीत असत व अजूनहि जर्मनीमध्यें याचा मसाल्यास उपयोग करतात. मध्ययुगांत यूरोपभर जिरें उपयोगांत आणीत असत. जिऱ्यांत शेंकडा ३ ते ४ तेल असतें. या तेलाचें विशिष्ट गुरुत्व ०.९१ तें ०.९३ पर्यंत असतें. यूरोपमध्यें या तेलाचा मुख्य उपयोग मद्यें करण्यांत केला जातो. हिंदुस्थानांतहि जिऱ्याचा उपयोग औषधाकडे करतात. हें रक्तशोधक व दाहशामक आहे.

व्या पा र.—संयुक्तप्रांत व पंजाब यांमध्यें मुख्यत्वेंकरून जिरें पिकतें, ह्याचा व्यापार मोठा आहे. मद्रासेंत बंगालमधून जिरें येतें. अलीकडे हिंदुस्थानमधील जिऱ्याची निर्गत वाढत चालली आहे. बहुतेक व्यापार मुंबई, बंगाल आणि सीलोन, स्ट्रेटसेटलमेंन्ट व ब्रिटिश आफ्रिका यांमध्यें चालतो. ग्रेटब्रिटन हें प्रतिवर्षी २० ते ५० हंड्रेडवेट जिरें खरेदी करतें. वायव्येकडील सरहद्द, तांबडसमुद्र व इराणाचें आखात यांमधून पुष्कळसें जिरें हिंदुस्थानांत येतें. याचीं मुख्य व्यापाराचीं ठिकाणें जबलपूर, गुजराथ, रतलाम व मस्कत हीं होत.

**जिलेटिन**—जिलेटिन हें प्राण्यांचें मांस, अस्थी, कातडीं, खुरें व शिंगें इत्यादिकांपासून तयार करतात. हा पदार्थ ग्ल्यू किंवा सरस या पदार्थापेक्षां जास्त शुद्ध असतो. कच्चें कातडें व चामडें हीं कापून काढल्यावर जो निरुपयोगी भाग शिल्लक रहातो त्यापासून सरस तयार करतात. हा पदार्थ ओलाव्यानें बिघडून जाऊं नये म्हणून त्यांत लाखेच्या कांड्या मिसळतात.जिलेटीन,ग्ल्यू व इसिंग्लास यांच्यांत रासायनिकदृष्ट्या कांहींच फरक नाहीं. माशाच्या हाडांपासून तयार केलेला सरस या देशांत फार उपयोगांत आणतात व तो सर्वत्र विकत मिळतो.

सरसांत खालीं लिहिलेले प्रकार आहेतः—( १ ) हाडापासून तयार झालेला; ( २ ) कातडीचा सरस; ( ३ ) माशापासून तयार केलेला. उंच प्रतीचा सरस तांबुस व पिवळया रंगाचा असून त्यांत कचरा किंवा बारीक इतर रंगाचे ठिपके नसतात. तो फोडला असतां आंतून कांचेसारखे तुकडे पडतात. जिलेटिन पाण्यांत भिजत ठेवल्यास फुगतें व त्यानंतर थोडीशी उष्णता दिल्याबरोबर विरघळून गोंदासारखें चिकट होतें. सरसहि प्रथम पाण्यांत भिजवून नंतर त्यास मंदाग्नीवर कढविल्यास फार चिकट होतो व निरनिराळ्या कामाकडे जिलेटिन व सरसाचा सिमेंटसारखा उपयोग होतो. सरस चांगला तयार झाला म्हणजे त्याची चिकटण्याची शक्ति फार वाढते.

अगदीं नवीन तयार झालेल्या सरसापेक्षां बरेच दिवसांचा जुना सरस जास्त उपयुक्त असतो.

**जिवबादादा बक्षी**—दौलतराव शिंद्यांचा सेनापति; जातीचा शेणवी; आडनांव केरीकर. सन १७९५ मध्यें हा दौलतराव शिंद्यांबरोबर खर्ड्याच्या लढाईत होता. त्या लढाईंत याच्याकडे दुय्यम सेनापतीचें काम होतें. शिंद्याच्या कारभारी मंडळींत हा प्रमुख असून दौलतराव ( वयानें लहान असल्यानें ) त्याच्याच अनुरोधानें चालत असे. सवाई माधवरावाच्या मृत्यूनंतर यशोदाबाईच्या मांडीवर दत्तक देण्याविषयीं नाना फडनविसानें जी सूचना पुढें मांडली होती, तिला तुकोजी होळकराप्रमाणें आपलीहि संमति देण्याविषयीं यानें आपल्या धन्यास अगोदर सल्ला दिला होता. परंतु बाळाजी विश्वनाथाचा औरस वंशज हयात असतांना दत्तक घेण्याविषयीं आपण सल्ला दिला तें बरोबर केलें नाहीं असें मागून त्याला वाटूं लागल्यामुळें यानें मरतेसमयीं दौलतरावास जवळ बोलावून त्यास तसें सांगितलें असें डफ म्हणतो. हा इ. स. १७९६ मध्यें मरण पावला. याच्या पश्चात् याच्या मुलाकडे कांहीं दिवस बक्षिगिरी दौलतरावानें चालविली होती. [ डफ–पु. ३; खरे–ऐ. ले. संग्रह, खंड ७–९. ]

**जीन मेरी रोलंड** ( १७३४–१७९३ )— हा फ्रेंच मुत्सद्दी १७३४ त जन्मला. त्याला विद्याव्यासंग असून तो अखेरपर्यंत टिकला. प्रथम कांहीं वर्षें कारकून व नंतर कारखान्यांतील इन्स्पेक्टर अशा नौकऱ्या त्यानें केल्या. त्यानें याचवेळीं स्वदेशाच्या व्यापाराविषयींहि चांगली माहिती मिळविली. ती त्याला पुढें सार्वजनिक आयुष्यांत मोठ्या योग्यतेस चढविण्यास कारणीभूत झाली. १७८१ सालीं त्यानें लग्न केलें; त्याची बायको मॅडम रोलंड ही इतिहासांत प्रसिद्ध झाली. ती पॅरिसमधील एका कारागिराची मुलगी होती. लहानपणापासून तिला विद्येची मोठी आवड असून तिची बुद्धिमत्ताहि चांगली होती. आपलें शिक्षण तिनें बहुतेक स्वकष्टानें केलें. प्लूटार्क, व्होल्टेअर, रूसो, मांटेक यांची ती भक्त होती. ती आपल्या नवऱ्याइतकी विद्वान असून बुद्धिमत्ता व कार्यकुशलता यांत तर ती त्याच्यापेक्षां श्रेष्ठ होती. पतीच्या सहकारितेनें तिनें फ्रेंच राज्यक्रांतीच्या आरंभापासून स्वतः त्याला वळी पडेपर्यंत फ्रान्सच्या भवितव्यतेवर विलक्षण परिणाम घडवून आणले. जीन रोलंड यास त्याच्या व्यापारविषयक लेखांत मॅडम रोलंडचें सतत सहाय्य मिळे. राज्यक्रांतीला सुरवात झाली त्यावेळीं त्याच्या नांवानें राजकारणावर जे लेख येत ते मॅडम रोलंड खुद्द लिही व नवऱ्याच्या नांवानें प्रसिद्ध करी. त्यांत राज्यक्रांतींतील अगदीं पुढारलेल्या पक्षाचीं मतें प्रतिपादिलेलीं असत. पुढें जीन हा लियॉन्स म्युनिसिपालिटीतर्फे एका प्रकरणांत पॅरिस येथील कॉन्स्टिटयुअंट असेंब्लीकडे डेप्युटी म्हणून ( १७९१ ) पत्नीसह आला. तेथील मुक्कामांत भावी जिरॉंडिस्ट पक्षाच्या बऱ्याच वजनदार पुढाऱ्यांशीं त्याच्या मुलाखती झाल्या, त्यांत मॅडम रोलंडहि भाग घेई. यापुढें रोलंड पॅरिसमध्यें राहूं लागला व जॅकोबिन पक्षाचा सभासद झाला. लवकरच मॅडम रोलंडच्या बैठकींत ब्रिसॉट, पॉटियन, रॉबिस्पेरी, न्यूझोट असले गृहस्थ जमूं लागले. स्वतः ती जरी सुंदर नव्हती तरी फार मोहक होती. मॅडमचीं राजकारणांतील मतें स्पष्ट व परिणामकारक असत; तिची वृत्ति शांत व निरीक्षण शक्ति तीक्ष्ण होती. बैठकींत वडेवडे विद्वान जमले असतांहि तिला अध्यक्ष निवडीत. जिरॉंडिस्ट पक्ष अधिकारारूढ झाला तेव्हां रोलंडला अन्तर्व्यवस्थामंत्री नेमण्यांत आलें ( १७९२ ). याच सुमारास देशत्यागी लोकांविरुद्ध व नॉन–ज्यूरिंग लोकांविरुद्ध काढावयाच्या हुकूमावर राजाची सही मिळेना. तेव्हां त्या संधीचा फायदा घेऊन मॅडमनें लुई राजाला एक पत्र पाठविलें त्याचें उत्तर आलें नाहीं; तेव्हां तेंच पत्र भर कौंसिलमध्यें राजापुढें मोठ्यानें वाचून दाखविलें. तेथें तें इतकें पसंत पडलें कीं, असंतुष्ट लोकांच्या जाहीरनाम्याचें स्वरूप त्याला मिळून त्याच्या प्रती देशभर वाटण्यांत आल्या. तेव्हां दूर केलेल्या लोकांनाच पुन्हां मंत्री नेमण्याबद्दल देशभर मागणी सुरू झाली; राजाला नालायक ठरविण्यांत आलें व रोलंड व डांटन यांच्या हातांत पुन्हां अधिकारसूत्रें देण्यांत आलीं.

पण या सुमारास राज्यक्रांतीचें पाऊल अति झपाट्यानें पुढें पडत होतें; आणि ज्वलत् जहाल ( मौंटन ) पक्षाच्या भीतीनें राजधानी ब्लॉयला नेण्याची रोलंडनें सूचना आणली व रॉबस्पेरी वगैरे पुढाऱ्यांवर टीकेचा मारा चालविला. या कारणांनीं तो अप्रिय झाला. शिवाय सरकारी महत्त्वाचे कागदपत्र नाहींसे झाल्याचा त्याच्यावर आरोप आला. तसेंच राजाची चौकशी कन्व्हेन्शनच्या मतानें न होता देशांतील सर्व लोकांच्या मतानें व्हावी, असा ( जिरांडिस्ट पक्षाप्रमाणें ) त्यानें आग्रह धरला. या सर्व कारणांमुळें ( राजाचा वध झाल्यावर दोन दिवसांनींच ) रोलंडला आपल्या जागेचा राजीनामा द्यावा लागला ( १७९३ ).

पुढें रोलंड पतिपत्नींवर निंदारोपांचा मारा लोकांकडून चालू झाला. तेव्हां त्यांच्या निरसनार्थ एकदां मॅडम स्वतःच असेंब्लीमध्यें गेली. तेथें तिच्या भाषणाचा परिणाम होऊन सभेनें तिला निरपराधी ठरविलें. तथापि तिच्या शत्रूंनीं तिला कैद केलें, तेव्हां मिस्टर रोलंड गुप्तपणानें रूआंडला पळून गेला ( १७९३ ). कैदेंत असतां तिनें आपल्या चरित्रावर लेख लिहून ठेविले. ८ नवंबर १७९३ रोजीं तिचा गिलोटीनवर वध करण्यांत आला. पत्नीच्या वधाच्या बातमीनें दोन दिवसांनीं मिस्टर रोलंडनें आत्महत्या केली.

**जीवकचिंतामणी**—हा एक तामिळ भाषेंतील ग्रंथ असून त्यामध्यें जीवकचरित्र वर्णन केलें आहे. हा तिरुत्तक्कदेवर यानें लिहिला. जे जैन ग्रंथ प्रथम संस्कृतमध्यें होऊन नंतर प्रचलित भाषांमध्यें आले त्यांपैकींच जीवकचिंतामणि हा

एक ग्रंथ आहे. हल्लीं हा तामिळ भाषेंतील महाग्रंथ समजला जातो. जीवकचरित्रावर दुसरे संस्कृत ग्रंथ म्हटले म्हणजे वादीभसिंह याचे ( १ )गद्यचिंतामणि व ( २ )क्षत्रचूडामणि आणि, हरिचंद्र याचे ( ३ जीवन्धरचंपू व ( ४ ) जीवन्धर नाटक हे होत. यांपैकीं जीवन्धर नाटकाच्या हस्तलिखित प्रतीचाहि अद्याप शोध लागला नाहीं.

महामहोपाध्याय पण्डित स्वामिनाथ ऐय्यर यानीं १८९९ सालीं जीवकचिंतामणीचा कांहीं भाग प्रकाशित केला. त्याच्या प्रस्तावनेंत ते म्हणतात कीं, महापुराणामध्यें जीं ६३ शलाका पुरुषांचीं चरित्रें दिलीं आहेत त्यांत जीवकाचें चरित्र दिलें आहे. त्याप्रमाणेंच श्रीपुराणामध्यें २४ तीर्थंकरांचीं चरित्रें आहेत. त्यांपैकीं श्रीवर्धमानचरित्रामध्यें जीवकाचा उल्लेख आहे. वरील गद्यचिंतामणि वगैरे ग्रंथांशीं ताडून पहातां असें दिसतें कीं जीवकचिंतामणि हा ग्रंथ नसून गद्यचिंतामणीच्या आधारें केला आहे. कारण यांतील वरेच श्लोक व कल्पना गद्यचिंतामणीवरून घेतलेल्या दिसतात. यांतील कथाभाग श्रीपुराणांतील कथाभागापेक्षां थोडा भिन्न दिसतो.

परंतु निरुत्तक्कदेवर हा गद्यचिंतामणि किंवा क्षत्रचूडामणि या ग्रंथांचा उल्लेख करीत नाहीं व याचा टीकाकार नच्छिनारक्किनिआर हा या ग्रंथाला केवळ संस्कृतपुराणाचें माध्यम म्हणतो; यावरून याच्या कालीं तरी हा ग्रंथ दुसऱ्या ग्रंथाचें रूपांतर असा समजला जात नसून तो महापुराणावरूनच घेतला आहे असा समज असावा. या ग्रंथाचा काल १० व्या व ११ व्या शतकाच्या दरम्यान धरितात ( कुप्पस्वामिशास्त्री यांचा इं. अॅ. (१९०७) मधील लेख पहा.).

**जीवधन किल्ला**—हा किल्ला नाणेघाटाच्या तोंडावर पुण्याच्या वायव्येस ६५ मैल व जुन्नरच्या पश्चिमेस १६मैलांवर असून तो समुद्रसपाटीपासून ३००० फूट उंच आहे. घाटघर खेड्याच्या सरहद्दींत ह्या खेड्याचा समावेश होतो. किल्ल्याच्या चारी बाजूंस कडे तुटलेले आहेत, कोंकणचे बाजूचा भाग तर फारच खोल आहे. याची लांबी १ हजार व रुंदी ५०० यार्ड आहे. हा किल्ला जवळ जवळ शिवनेरी सारखाच आहे. किल्ल्याचा चढाव एक मैलाचा पण फार अवघड आहे. वर कांहीं बौद्ध लोकांच्या वेळचीं कोरीव लेणीं आहेत. ह्या किल्ल्यावरून साष्टीच्या टेंकड्या, तुंगार, वसई, कामणगड हीं ठिकाणें व निरभ्र दिवशीं समुद्र देखील दृष्टीस पडतो.

अहमदनगर येथील निझामशाही घराणें स्थापन करणाऱ्या पहिल्या अहमदनें हा किल्ला १४८९ सालीं घेतला होता. पुढें १६३७सालीं शाहाजीनें मोंगलांना दिलेल्या पांच किल्ल्यांमध्यें हा एक किल्ला होता मराठी राज्यांत या किल्ल्यावर राजकीय कैदी ठेवीत असत. हा स.१८२०त इंग्रजांनीं पाडून टाकल्यामुळें माथ्यावर जातां येत नाहीं. वर पाण्याचीं पांच टांकीं आहेत. [ पुणें ग्याझे; इलियट. पु. ७; डफ पु. १.]

**जीवनकार्यविचार.** प्रा णि वि ष य क—या विषयास आरंभ करण्यापूर्वी जीवन म्हणजे काय, याविषयीं विचार केला पाहिजे. जीवनपेशीकडून जी सतत चळवळ अगर धडपड तिच्या अंतःस्थितीचा परिस्थितीशीं मेळ घालण्यासाठीं चालू असते, त्या चळवळीलाच जीवन अगर जीवित म्हणावें अशी व्याख्या हर्बर्ट स्पेन्सरनें केली आहे, व अर्थात ही चळवळ प्रोटोप्लाझम ( जीवनरस ) युक्त जिवंत व्यक्तीकडूनच होणें शक्य आहे. केवळ जीवन या क्रियेचा विचार कर्तव्य असतां ती व्यक्ति कीटकादि क्षुद्र प्राण्यांपैकीं आहे अगर व्याघ्रमानवादि उच्च प्राण्यांपैकीं अगर प्राणिकोटी किंवा उद्भिज्जकोटी यांपैकीं आहे हा विचार दृष्टिआड केला पाहिजे. कारण प्राण्याची आकाररचना यांचा विचार विकासवादांत केलेला बरा, म्हणून या जीवनक्रियेचा जेवढ्या सोप्या व साध्या तऱ्हेनें विचार करतां येईल तेवढाच विचार येथें वनस्पतिजीवनविचाराला उपोद्घात म्हणून केला पाहिजे. प्रथम जीवनाचीं मुख्य लक्षणें सांगून जीवनपेशी अगर सजीव व्यक्ति व निर्जीव वस्तू यांतील फरक निश्चित केला पाहिजे. प्राणिज अगर उद्भिज सजीव व्यक्तीचें शरीर अनेक जीवनपेशींच्या योगानें बनलेलें असतें. या पेशींचे मोठाले समूह असून त्यांचें जननपोषणवृद्धि हे व्यापार स्वतंत्रपणें व अव्याहतपणें त्या सजीव व्यक्तीच्या शरीरांत चालू असतात. तसेच त्यांना अपघात, धोका, विषबाधा, आत्मविपशोषणामुळें आलस्य व मरण वगैरे आपत्ती आल्यानें त्या व्यक्तीचें 'जीवन' हि थांबण्याचा प्रसंग येतो हें पहिलें लक्षण होय. कार्बन, हायड्रोजन, ऑक्सिजन, गंधक व नायट्रोजन या साधारण व परिचित मूलभूतद्रव्यानें नैट्रोजनविशिष्ट असा प्रोटीड नामक पदार्थ सजीव व्यक्तीच्या शरीरांत असतो. हा नैट्रोजनसंमिश्र पदार्थ सजीव व्यक्तीच्या शरीराखेरीज इतरत्र बनत नाहीं. याचप्रमाणें पिष्ट व वसायुक्त पदार्थांची उत्पत्ति ही या सजीव व्यक्तींत होते. परंतु त्यांची उत्पत्ति इतरत्र देखील होणें संभवनीय असते.जीवनपेशींत कांहीं प्रकारचे क्षार व पाणी हींहि बनतात. इतक्या साधनांनीं व द्रव्यांनीं परिप्लुत असलेली परंतु त्या द्रव्यांतील वैयक्तिक व स्वतंत्र गुणाहून भिन्न गुणधर्मांची ही सजीव व्यक्ति असते. आतां सजीव व्यक्ति व निर्जीव वस्तू यांमधील फरक कोणता हेंहि बारकाईनें निश्चित केलें पाहिजे. निर्जीव वस्तूंत स्फटिकमय रचना असते व सजीव व्यक्तींत ती नसते हें एकदां प्रचलित मत अग्राह्य, मिथ्या व आभासमय आहे. सजीवांमध्यें चैतन्य असणें व निर्जीवांत तें नसणें हें लक्षण अधिक ग्राह्य व सत्य आहे; तथापि त्यांतील अपवाद येथें कथन करीत नाहीं. शीत, उष्ण, क्षार, विद्युत् वगैरे बाह्य साधनानें सजीव व्यक्तींवर परिणाम होतो. तथापि भिन्न प्रकारचा तो निर्जीव वस्तूंवरहि होतो. प्रजोत्पादन हें लक्षण सजीव स्थितिदर्शक मानतां येतें.

परंतु खनिज ( निर्जीव )वर्गापैकीं पारा पडून त्याच्या बारीक गोळ्या बनतात. त्याचें पेशीवर्धनाच्या योगानें होणाऱ्या प्रजोत्पादनाशीं साम्य जुळवून देतात. जीवनपेशीचें वर्धन या तऱ्हेनें होतें व कोणतीहि जीवनपेशी अगोदरच्या पेशींपासून निर्मित झाली असली पाहिजे हें मत तर हल्लीं मान्य आहेच. म्हणून सजीव व निर्जीव यांतील मुख्य भेद रासायनिक स्वरूपाचा असून अतिसंमिश्र पदार्थ जो प्रोटीड तो सजीवांत सांपडतो, व निर्जीवांत सांपडत नाहीं एवढें लक्षांत ठेवलें पाहिजे. कांहीं तऱ्हेचे किडे,कीटक,जंत वगैरे प्राणी वाळवून अगर बर्फांत ठेवले असतां मृतवत् होतात. परंतु अनुकूल परिस्थितींत त्यांस ठेवतांच ते जिवंत होतात हा अनुभव आहे.तसेंच योगसाधन व प्राणायाम यांच्या अभ्यासानें जिव्हा तालुरंध्रांत घालून मन अंतर्मुख करून समाधि लावली तर मृतप्राय स्थितींत योगी कित्येक दिवस असतो व पुढें तो समाधि उतरून शुद्धीवर येतो अगर जिवंत होतो.ही स्थिति खरी मानण्यास बरीच जागा आहे व यावरून सजीव व निर्जीव यांतील भेदांतील अनिश्चितता वाढविण्यास एक साधन उपलब्ध आहे असें म्हटलें तरी चालेल. तसेंच उत्तर व दक्षिण ध्रुवाकडील कांहीं प्राणी तेथील अति कडक हिंवाळा येण्याच्या सुमारास त्यांच्या अंगावरील लोंकर अति वाढून ते बारसहा महिने महानिद्रावश होतात तोहि प्रकार असाच आहे.

व न स्प ति वि ष य क.

प्रथम सर्व जीवनास आधारभूत अशा जीवरसाचा अथवा चिद्रसाचा विचार करणें भाग आहे. त्याशिवाय तो विषय बरोबर समजणें शक्य नाहीं. सजीव व्यक्तींचीं जीवनकार्यें केवळ जीवरसावर अवलंबून असून वनस्पति–जीवरस व प्राणि–जीवरस ह्या दोहोंच्या मूलभूत गुणधर्मांत कोणताहि भेद नसतो. अन्नग्रहण, वर्धन व प्रजोत्पादन या गोष्टी सर्व साधारणपणें प्रत्येक सजीव व्यक्तींत आढळतात, व त्या गोष्टी म्हणजेच व्यक्तींचीं मुख्य जीवनकार्यें होत. हीं जीवनकार्यें केवळ जीवरसाच्या सचेतनत्वामुळेंच घडून येतात. म्हणून वनस्पती व प्राणी यांच्या प्रत्येक जीवनकार्याचा उत्पादक जीवरस आहे हें निश्चित होय. प्रत्येक सचेतन पेशींत जीवरस असतो. त्यामुळें त्या पेशीकडून कांहीं विशिष्ट जीवनकार्य घडूं शकतें. असल्या पेशीस अथवा पेशिसमुच्चयास इंद्रिय अशी संज्ञा देतात. अशा पेशीरूप अगर पेशिसमुच्चयरूप इंद्रियाकडून घडणाऱ्या जीवनकार्याच्या मीमांसेस ' जीवनकार्य—विचार ' असें म्हणतात.

जीवरस (प्रोटोप्लाझम ):— प्रत्येक सचेतन पेशीमध्यें तीन मुख्य भाग असतात. (१) पेशिभित्तिका,(२) पेशीद्रव्यें व (३) जीवरस. त्यांमध्यें महत्त्वाचा भाग म्हणजे जीवरस होय. तो फार पातळ नसून घट्टहि नसतो. तो पारदर्शक असून कणीदार अथवा रवाळ असतो. जीवरसांत ' केंद्र ' म्हणून एक पिंड असून दुसरे अनेक जीवनपिंड असतात. मध्यभागीं जलस्थान असून त्यासभोंवतीं जीवरसाचा भाग किंचित घन झालेला असतो. हीच स्थिति पेशीभित्तिकेजवळ असते. त्यामुळें पेशिभित्तिकेस तसेंच जलस्थानास एक प्रकारचा आधार मिळतो. पेशिभित्तिका व जलस्थान ह्या दोहोंमधील जीवरसाचा भाग इतर जागेपेक्षां पातळ असतो;व ह्याच पातळ रसांत जीवनपिंड असतात.केंद्र,जीवनपिंड,जीवरस हीं तीन्ही सजीव असून सर्व जीवनकार्यें ह्यांकडूनच होतात. जीवरसाचें खरें रासायनिक पृथक्करण सचेतन स्थितींत होणें शक्य नसून त्या स्थितींतील रासायनिक घटक कोणत्या स्वरूपाचे असतात हें सांगतां येणें कठिण आहे. सर्व साधारणपणें जीवरसांत कारबन,हायड्रोजन, ऑक्सिजन, नायट्रोजन, गंधक व फॉस्फरस असे मूलघटक पदार्थ आढळतात. ह्या मूल पदार्थांपासून वेगवेगळे रासायनिक संयुक्त पदार्थ बनलेले आढळतात. पण त्या सर्व पदार्थांतून कोणत्या विशिष्ट पदार्थांत सचेतन शक्ति असते हें सांगणें शक्य नाहीं. हे पदार्थ केव्हांहि स्थिर नसतात. त्यांमध्यें एकसारख्या घडामोडी होत असतात. ह्या घडामोडींचीं कारणें आंतर असोत अगर बाह्य असोत परंतु त्यांमुळें कधीं कधीं एखादि बाह्यशक्ति शरीरांत सांठते, तर कधीं शरीरांतील पूर्व शक्तीचा विकास होऊन तिचें रूपांतर होतें. ह्या घडामोडी फार व्यवस्थित रीतीनें चाललेल्या असतात. त्यांत बिघाड फार क्वचित् होतो. शारीरिक व रासायनिक घडामोडी सुसंगत चालणें हेंच सचेतनत्वाचें खरें लक्षण होय. जेव्हां असल्या घडामोडींत विसंगतता उत्पन्न होते तेव्हांच त्यांतील चैतन्य नाहींसें होऊन मृतस्थिति उत्पन्न होते.बाहेरून अन्नद्रव्यें शोषण करणें, त्यांची योग्य जागीं पाठवणी करून त्यांपासून सेंद्रिय पदार्थ तयार करणें, अनवश्यक वस्तूंचा त्याग करणें, श्वासोच्छ्वासद्वारां घडामोडीस लागणारी शक्ति पुरविणें अथवा नूतन उत्पत्तीस चलन देणें वगैरे सर्व जीवनकार्यें जीवरसाकडून अथवा केंद्रादिजीवनपिंडाकडून होतात. साध्या शर्करादि ओषट पदार्थांपासून नायट्रोजनयुक्त पदार्थ तयार करणें, त्या पदार्थांचें सात्मीकरण करणें व तद्द्वारा जीवरस वाढविणें व पुनः तो जीवरस शरीरवृद्धीसाठीं खर्चणें, हीं सर्व कार्यें जीवनरसाकडून होतात. मूळचा जीवरस, मुळ्या, फांद्या, कळ्या, पानें, फुलें वगैरे अवयव उत्पन्न करण्यांत खर्चिला जाऊन पुन्हां नवीन जीवरस त्याच मार्गानें बनविणें हेंच जीवरसाचें खरें लक्षण होय. शरीरवृद्धि तसेंच देशवृद्धि हे जीवरसाचे स्वाभाविक धर्म आहेत.वास्तविक वनस्पति अथवा प्राणि-शरीर हें जीवरसाचें परिणत रूप आहे. कारण शरीराचा प्रत्येक घटक भाग जीवरसाच्या घडामोडीचें फळ आहे. म्हणजे शरीरघटकपेशींत जीवरस प्रत्यक्ष आपल्या पूर्व अथवा रूपांतर स्थितींत असतो. शरीरवृद्धि करण्याच्या कामीं जीवरस सोयीसाठीं निरनिराळे खण तयार करून त्यांत तो थोड्याबहुत प्रमाणांत राहतो. असल्या खणास आपण पेशी म्हणतों. सचेतन स्थितींत पेशीपेशींचा परस्पर संबंध भित्तिकेंतून पसरणाऱ्या जीवरसाच्या सूक्ष्म धाग्यामुळें कायम

असतो. यामुळें सर्व शरीरांत जीवरसाची एकसूत्रता असते. या एकसूत्रतेमुळें एका ठिकाणीं घडणारी उत्तेजनरूपी संवेदना दुसऱ्या जागीं पेशीपेशींतून सहज रीतीनें पोहोंचते. अशा प्रकारचा सर्व शरीरांत सार्वत्रिक संबंध असणें अवश्य व हितावह आहे.

केंद्र ( न्यूक्लस ):—जीवरसाच्या विशिष्ट पिंडास आपण केंद्र म्हणतो. जीवरसाचे घटक नेहमीं बदलणाऱ्या स्थितींत असतात. परंतु केंद्राच्या क्रोमीडिया नांवाच्या घटकाच्या मूळ स्थितींत फारसा बदल होत नाहीं. अलिकडील शास्त्रीय शोधांतीं जीवनकार्याचें चालकत्व या केंद्रघटकाकडेच येत आहे. गुणपरंपरा चालू ठेवण्याचें काम केंद्रघटकांकडून होतें असा समज आहे.

ह्या केन्द्रघटकांचें प्राकृतिक अगर रासायनिक विशिष्ट प्रकारचें स्वरुप नेहमीं असतें असें मात्र म्हणतां येत नाहीं. केंद्ररसांत केंद्रबिंदू असतात. कारबन, हायड्रोजन, नायट्रोजन, आक्सिजन वगैरे मुख्य घटक केंद्रांत तसेंच जीवरसांत आढळतात.परंतु जीवरसांत फास्करस हा विशेष आढळतो. शरीर—वृद्धींत अथवा वंशवृद्धींत केंद्रच पुढाकार घेतें. नवी पेशी उत्पन्न करण्याचें काम केंद्राकडूनच होते. पूर्वकेंद्राचा विभाग होऊन नवीन केंद्र उत्पन्न होतें व त्यापासून नवी पेशी तयार होतें. नवीन होणाऱ्या पेशी एकाच शरीरांत राहिल्या तर पूर्व शरीर वाढूं लागतें. जर त्या पेशी स्वतंत्र होऊन आपलीं जीवनकार्यें करूं लागल्या तर वंशाची वाढ होते. शरीर—वृद्धि व वंश—वृद्धि ह्यांमध्येंच सर्व जीवनकार्यांचा अंतर्भाव होतो.

जीवनपिंड (प्लास्टिड्स):—जीवरसांतील केंद्रासारखे दुसरे महत्त्वाचे भाग म्हणजे जीवनपिंड होत. हे लहान मोठ्या आकाराचे असून त्यांचा रंगहि वेगवेगळा असतो. रंगाप्रमाणें जीवनकार्यांत त्यांचा वेगवेगळा उपयोग होतो. शर्करादि ओषट पदार्थांची उत्पत्ति ह्या जीवनपिंडाकडून होते. केंद्राप्रमाणेंच पाहिल्या जीवनपिंडाचें विभाग होऊन नवीन जीवनपिंड उत्पन्न होतात.

पेशि—भित्तिका ( सेल वॉल ):—जीवरसापासून पेशिभित्तिका उत्पन्न होते. तिचें रासायनिक घटक सत्वादि पदार्थांसारखेच असतात. पेशिभित्तिकेची वाढ आंतून बाह्यप्रदेशीं होते. पेशीभित्तिकेच्या पहिल्या सेंद्रिय घटकांत क्रमाक्रमानें निरिंद्रिय द्रव्यें जमून तीं पुढें संकीर्ण होते. तिच्या वेगवेगळया कार्याप्रमाणें सेंद्रिय घटकांत रासायनिक फरक होऊन ती पुष्कळ वेळां लांकडासारखी बुळबुळित तर कधीं बाटलीच्या बुचाप्रमाणें चिवट होते. तिची जाडी कमीअधिक असते. तिच्या प्राथमिक स्थितींत ती फार पातळ असते.परंतु जीवरसांतून पेशीघटकद्रव्याचे थर वरचेवर त्यावर जमून जाड होत जाते.परंतु थर कमीअधिक जाड झाल्यानें भित्तिकेस मळसुत्राकृति, वळीदार, खांचेदार, वगैरे आकार येतात. पेशीचीं जाडी व आकार ही केवळ पेशींकडून होणाऱ्या जीवनकार्यावर अवलंबून असतात.

इंद्रियोत्पत्तिः— पेशीच्या सर्व भागीं जीवरस सारखा पसरलेला असतो असें वाटण्याचा संभव आहे;पण वस्तुस्थिति तशी नसते. एकाच पेशींतील जीवरसाच्या घटनेंत थोडेंबहुत वैचित्र्य असतें. ह्या जीवरसाच्या वैचित्र्यापासून प्राथमिक इंद्रियरचनेस आरंभ होतो. एक पेशीमय वनस्पतींतील इंद्रिय-रचनेचा शोध १८६१ सालीं अर्नेस्ट ब्रूक नांवाच्या शास्त्रज्ञानें लाविला. पेशींतील जीवरसाचें कमी अधिक घनत्व तसेंच केंद्रादि जीवनपिंडांचें संकीर्णत्व म्हणजेच इंद्रियरचना असें त्यांचें म्हणणें आहे. सूक्ष्म पेशींत सुद्धां श्रमविभाग अथवा कामाची वांटणी झालेली आढळते. पेशीच्या कांहीं एका भागाकडून एक कार्य होतें व दुसरें कार्य दुसऱ्याकडून होतें. म्हणजे कार्यभिन्नतेप्रमाणें इंद्रियरचनेस सुरवात होते. जरी बाह्यतः एकपेशीमय वनस्पतींत सर्व जीवनकार्यें एकाच ठिकाणीं चालतात असें वाटतें तथापि तीं सर्व एकाच जागीं होत नसतात. त्यांतहि भिन्न भिन्न भाग भिन्न भिन्न कामें करीत असतात. ह्याच भिन्न भागांमध्यें इंद्रिय—रचनेचा उगम असतो.

एकपेशीमय वनस्पतींचीं सर्व कामें एका पेशींत होतात, पण बहुपेशीमय वनस्पतींत तीं कार्यें निरनिराळया पेशिसमुच्चयांत होतात. पेशि—विभाग होऊन नवीन पेशी उत्पन्न होतात व पेशींची संख्या वाढत जाते. सारख्या आकाराच्या पेशींचा संघ एकत्र होऊन तो विशिष्ट जीवनकार्यास उपयोगी पडूं लागतो. असल्या पेशिसंघास पेशिजाल म्हणतात. पुष्कळ पेशिजालें एकत्रित होऊन जो भाग तयार होतो त्यास अवयव अथवा इंद्रिय असें म्हणतात. निरनिराळया वनस्पतींमध्यें इंद्रियांची वाढ कमी अधिक होते. उच्च वनस्पतींत आढळणाऱ्या मूल, स्कंद, पर्ण इत्यादि इंद्रियांची उत्पत्ति पेशिजालांच्या संघटित भागापासून होते व प्रत्येकाचें जीवनकार्य वेगवेगळें असतें.

पेशींची आवश्यकताः—वेगवेगळया पेशींच्या ऐवजीं एकच पेशि विस्तृत होऊन शरीरवृद्धीचें काम भागणार नाहीं काय? वेगवेगळया पेशींमध्यें जीवरस रहाण्याऐवजीं एकाच पेशींत तो कां राहूं नये? वेगळ्या पेशी असण्याची जरूरी काय? अशा प्रकारचे प्रश्न उत्पन्न होण्याचा संभव आहे. जीवरसांतील केंद्रास मोठ्या विस्तृत प्रमाणावर बनलेल्या पेशीमध्यें सर्व जीवनघडामोडीवर उत्तम रीतीनें ताबा ठेवितां येणार नाहीं. केंद्राची शक्ति मर्यादित भागावर चालू शकते. त्यामुळें सोयीसाठीं वेगवेगळे खण अगर पेशी उत्पन्न करून प्रत्येकांत वेगळे केंद्रादि जीवनपिंड उत्पन्न होतात. जीवनकार्यें सुलभ रीतीनें व व्यवस्थितपणें चालण्यास एका पेशीपेक्षां अधिक पेशी असण्यांत फायदा असतो व श्रमविभागास पूर्ण अवकाश मिळून ह्या स्थितींत जीवनकार्यें उत्तमप्रकारें चालतात. नाहीं तर एकाच ठिकाणीं

निरनिराळ्या कार्यांची गर्दी होण्याचा संभव आहे व कदाचित् त्यामुळें परस्परांत विरोध उत्पन्न होण्यास वाव मिळेल. ह्यांचसाठीं पुष्कळ पेशी उत्पन्न होऊन पेशीजाल किंवा इंद्रिय यांची उत्पत्ति होण्यानें अधिक सोय होते. केंद्रादि जीवनपिंडांनां संकुचित जागेंत रहावें लागतें म्हणून जरी त्यांची शक्ति मर्यादित झाली, तथापि ती अधिक व्यवस्थित होते. पेशिभित्तिका जागजागीं उत्पन्न होऊन जीवरसांत ताजेतवानी कायम रहाते. निरनिराळ्या पेशी उत्पन्न होण्याऐवजीं एकच पेशी विस्तृत होत राहिली तर त्यांतील जीवनपिंडास नैसर्गिक ग्लानी अगर वृद्धावस्था कालांतरानें येणें साहजिक आहे. परंतु नवीन पेशी उत्पन्न होण्यांत नवीन जीवनपिंडांची उत्पत्ति होते व त्या योगें त्याचा तरतरितपणा कायम रहातो. जुन्या पेशींतील जीवनपिंडास थकवा येत जातो व त्याप्रमाणें त्यांची जीवनकार्यें शिथिल होतात पण नवीन जीवनपिंड असल्यानें जीवनकार्यांत खंड पडत नाहीं. हे जीवनपिंड तरुण व कार्यक्षम असतात. ह्या कारणांमुळेंच जुन्या खोडाचा गाभा पोकळ व मृत झाला तथापि बाह्यांगीं नवीन पेशींचा भरणा असल्यानें पानें, फुलें किंवा फळें येणें बंद होत नाहीं. म्हणूनच वरचेवर नवीन पेशी उत्पन्न होण्यांत फायदा असतो.

जीवरसाच्या गरजाः—जीवरसाची पहिली गरज म्हणजे पाणी होय. पाण्याशिवाय जीवरसाचें अथवा जीवनपिंडाचें सचेतनत्व कायम रहाणें शक्य नाहीं. जीवरसाचें पोषण पाण्यावर अवलंबून असतें. पाण्यामुळें पेशींत टणकपणा येतो. रबरी फुग्यांत हवा भरल्यावर तो जसा टणक होतो, त्याप्रमाणें जीवरसांत पाणी आल्यावर पेशिभित्तिकेवर त्या पाण्याचा ताण बसून ती टणक होते. प्रथम पाणी जेव्हां जीवरसांत शिरतें त्यावेळीं तें त्यांत पूर्ण मिसळून जातें. पण लवकरच जीवरस वेगळा होऊन जलस्थान उत्पन्न होतें व त्या जागीं पाण्याचा सांठा होतो. सर्व सचेतन पेशींत जलस्थानांची सोय असते. पाणवनस्पतींनां वाटेल तेव्हां पाणी मिळण्याचा संभव असूनहि त्यांमध्यें जलस्थानें असतात व हीं जलस्थानें पेशिरसानें भरलेलीं असतात. म्हणजे केव्हांहि पाण्यासारख्या अत्यंत उपयुक्त पदार्थाची अडचण पडूं नये म्हणून त्या स्थितींत सुद्धां पाण्याची तरतूद वनस्पती करितात. दुसरी अवश्यक वस्तु म्हणजे शुद्ध हवा होय. जीवरसास व जीवनपिंडास खेळती हवा अवश्य मिळाली पाहिजे. हवा पाण्यांत विरून ती सर्व शरीरांत पसरते. हवेप्रमाणें अन्नाची जरूरी असते. अन्न सेंद्रिय असो अथवा निरिंद्रिय असो, तथापि तें शरीरांत शोषिलें जाण्यास अथवा पेशींतून दुसऱ्या जागीं पसरण्यास पाण्याची अवश्यकता असते. म्हणजे सर्व वस्तूंत पाण्याचा उपयोग पहिल्या प्रतीचा असून त्याशिवाय कोणतेंहि जीवनकार्य होणें शक्य नाहीं.

जीवरसाच्या उत्पत्तीविषयीं निरनिराळीं मतेंः—जीवरस व जीवनपिंड कसे उत्पन्न होतात ह्याविषयीं विचार केला असतां सकृत् दर्शनीं असें दिसून येतें कीं त्यांची उत्पत्ति पूर्व जीवरसापासून अथवा पूर्व जीवनपिंडापासून होते. पण जेव्हां अगदीं त्यांच्या मूल उत्पत्तीचा विचार आपण करूं लागतों तेव्हां मात्र ती उत्पत्ति कशी झाली ह्याबद्दल आपली मति कुंठित होते. कांहीं तत्त्ववेत्त्यांच्या मतानें जीवनपिंडाचें अथवा जीवरसाचें अस्तित्व दुसऱ्या गोलावर असून तेथून तें आपल्या भूगोलावर उल्कापाताबरोबर तारे पडण्याच्या झटक्यांत इकडे आलें. जरी हें मत मान्य मानिलें तथापि त्या गोलावर सुद्धां प्रथम त्याची उत्पत्ति कशी झाली हा प्रश्न तसाच रहातो. कांहीं शास्त्रज्ञांच्या मतें एकदां असा एक अनुकूल काल होता कीं त्यामध्यें आपोआप निरिंद्रिय द्रव्यापासून रासायनिक कार्यें घडून जीवनपिंड तयार झालें व पुढें क्रमाक्रमानें त्यांचे विभाग होऊन त्यांची वृद्धि होत गेली. कार्यकारणांचा शुष्क विचार न करतां परमेश्वरानें प्रथम जीवनपिंड उत्पन्न केले व त्यांनां स्वतःची परंपरा वाढविण्याची शक्ति आहे, असें कांहींचें मत आहे. ह्या मतानें मनाचें कदाचित् समाधान होईल. परंतु जिज्ञासा खुंटून जाण्याचा संभव आहे व त्यामुळें शास्त्रीय शोधास आळा बसेल. कांहींचें मत असें आहे कीं हल्लीं ज्या प्रकारचे जीवनपिंड आपणास आढळतात तसे पिंड पूर्वी नव्हते. त्यांनां अति शीत अथवा अति उष्ण स्थिति मानवत असे. अगदीं साध्य निरिंद्रिय पदार्थापासून विकासक्रमांत हल्लींचे संकीर्ण जीवनपिंड क्रमाक्रमानें उत्पन्न झाले. निर्जीव पदार्थापासून स्थित्यंतरें होत होत प्रस्तुतचे जीवनपिंड तयार झाले. विकासवादाचा पुरस्कार करणारे डार्विन, हॅक्स्ले, वॅलेस वगैरे प्रसिद्ध तत्त्ववेत्ते ह्याच रीतीनें जीवनपिंडाच्या उत्पत्तीविषयीं लिहितात. डॉ. शफरसारखे रसायनशास्त्रज्ञ जीवनपिंड रासायनिक प्रयोगशाळेंत तयार करण्यासारखी स्थिति आली आहे असें जोरानें सांगत आहेत. नुकतेच ज्यांचे सिद्धांत सर्व शास्त्रज्ञांस संमत झाले आहेत असे सुप्रसिद्ध डॉ. जगदीशचंद्र बोस म्हणतात कीं पदार्थांत निर्जीव व सजीव असा भेदभावच रहात नाहीं. त्या सर्वांमध्यें एकच प्रकारचें चैतन्य आहे. मात्र भिन्न भिन्न बाह्य कारणांनीं तें वेगवेगळ्या रीतीनें व्यक्त होतें. अर्थात् जीवनपिंडाची उत्पत्ति अमक्यापासून झाली असा वेगळा प्रश्न राहूं शकत नाहीं.ज्या पदार्थास कांहीं कारणांमुळें विशिष्ट उत्तेजन मिळतें, ते पदार्थ त्या उत्तेजनानुसार विकास पावूं लागतात व या न्यायाप्रमाणें जीवनपिंडाची उत्पत्ति झाली असावी.

जलशोषण.—सचेतन शरीरांतील जीवनपिंडाच्या शारीरिक व रासायनिक घडामोडीस पाण्याची अवश्यकता अत्यंत असते व तें पाणी शोषून घेणें हें एक प्रमुख जीवनकार्य आहे. जलशोषण करणें हा पाण्याशीं निकट संबंध येणाऱ्या प्रत्येक सजीव पेशीचा स्वभावधर्म असून तो अगदीं सूक्ष्म अशा एक पेशीमय जलस्थ वनस्पतीपासून तों तहत मोठमोठ्या वृक्षांपर्यंत जवळ जवळ सारखाच असतो. अर्था-

प्राथमिक जलस्थ साध्या वनस्पती म्हणजे पाण्यांतील तवंग किंवा समुद्र शैवालासारखे जलरुह साधारणपणें आपल्या शरीराच्या सर्व पृष्ठभागाचा उपयोग पाण्याचें शोषण करण्याच्या कामीं करतात. परंतु भूस्थ वनस्पती ज्या मानानें वातावरणांत वाढूं लागल्या, त्यामानानें ह्या शोषक भागांचा संकोच होऊं लागला व शेवटीं पाण्याशीं अगदीं निकट सांनिध्य पावणारा जो भाग त्याची परिणति होऊन त्याचें एक स्वतंत्र इंद्रिय अगर अवयव बनलें. त्या अवयवासच सर्वसाधारणपणें 'मूळ' म्हणण्याचा प्रघात आहे. ह्या मुळांतूनच जलशोषण होतें. मुख्य मुळावर पोटमुळ्या असून त्या सर्वांच्या अग्राजवळ हजारों शोषक-केंस असतात. ह्या शोषक-केंसांकडून जलशोषणाचें कार्य सुरू होतें. पाण्याचा अंश जमीनींतील सूक्ष्म कणांभोंवतीं दिलगलेला असतो. तेथून तो अंश वेगळा केला जाऊन शोषून घेण्याचें काम केंसांकडून होऊं शकतें. शेंकडों शोषक केंस शोषण करण्याचें काम करीत असल्यामुळें मोठमोठ्या वृक्षांसारख्या वनस्पतीस पाण्याचा पुरवठा होतो.

अन्योन्य रसाकर्षण अथवा रस-संमिश्रणः—एक कमी न अधिक घन अशा दोन द्रवरूप रसांमध्यें फक्त एक सूक्ष्म चर्मपटल ठेविलें तर ते दोन्ही रस त्या चर्मपटलांतून एकमेकांकडे जाऊन परस्पर मिसळूं लागतात. ही क्रिया त्या रसद्वयांतील घनतेच्या भिन्नपणावर अवलंबून असते. रस-मिश्रणांत परस्पर विरुद्ध दिशेकडे जाणारे दोन प्रवाह सुरू होतात. पहिला प्रवाह पातळ रसांतून जास्त घन रसाकडे सुरू होतो, दुसरा प्रवाह उलट घनरसांतून पातळ रसाकडे असतो. प्रथमतः त्यामानानें पहिला प्रवाह सुरू होऊन दुसरा प्रवाह सुरू होण्यास कमी अधिक वेळ लागतो. ह्या रीतीनें मिश्रण सुरू झाल्यावर दोन्ही रसांची घनता सारखी होईपावेतों तें मिश्रण चालू असतें. दोन भिन्न घनतेचे रस परस्परांत ह्या प्रकारें मिसळणें हा त्यांचा शारीरिक स्वभावधर्म आहे. कित्येक वेळां एकच रस दुसऱ्या रसाकडे अधिक जोरानें आकर्षिला जाऊन तो दुसऱ्या रसांत पूर्णपणें मिसळतो व दुसरा पहिल्या रसाकडे आकर्षिला जातच नाहीं. असें झालें म्हणजे मिश्रण एकांगी होतें.

शोषक-केंसांकडून होणारें अन्योन्य रसाकर्षणः—शोषक-केंसांच्या चारी बाजूंस भित्तिका असून आंतील अंगास जीवरसाचा पातळ कणीदार थर असतो. व मध्यभागीं जलस्थानांत पेशिरस असतो. शोषक केंसांचा संबंध जमीनींतील पाण्याशीं येतो. म्हणून जलस्थानांतील पेशीरसांत व जमीनींतील पाण्यांत 'अन्योन्य रसाकर्षण' सुरू होतें. त्यायोगानें जमीनींतून पाणी जलस्थानांत आकर्षिलें जातें. त्यास अडथळा पेशिभित्तिकेकडून होत नाहीं. जमीनींतील पाणी पुष्कळसें शोषिलें जाऊन तें जलस्थानांत सांठविलें जातें. मात्र ह्या ठिकाणीं एक विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे जलस्थानांतून पेशिरस क्वचितच बाहेर जातो. साध्या अन्योन्य रसाकर्षण-क्रियेंत रसांचें परस्पर मिश्रण अथवा आकर्षण होतें. पण ह्या क्रियेंत अशा ठिकाणीं एकांगीपणा रहातो. पेशिभित्तिकेच्या आंतील अंगास असणाऱ्या जीवरसाच्या थरामुळें आंतून बाहेर पेशिरस जाण्यास अडथळा होतो. बाहेरून वाटेल तितकें पाणी जाऊं शकतें पण आंतील पेशिरसास बाहेर जाण्यास मार्ग मिळतोच असें नाहीं.

शोषणकार्यांतील जीवरसाची आवडः—पेशींतील जीवरसाचा थर जलशोषणास उत्तेजन देण्याच्या कामींच केवळ महत्त्वाचा आहे असें नाहीं, तर त्या पाण्यांत जीं द्रव्यें विरलेलीं असतात तीं कितीं व कोणचीं शोषण करावयाचीं, हें ठरविण्याच्या बाबतींतहि त्याकडून मोठी महत्त्वाची कामगिरी घडते. पाण्यांत विरणाऱ्या सर्वच क्षारांचा शिरकाव जीवरसांतून होतो असें कोणी समजूं नये. विरलेले क्षार पोषणकार्यास उपयोगी पडत असतील तरच ते जीवरसाच्या थरांतून जलस्थानांत येऊं शकतात. पुष्कळ वेळां विरलेल्या क्षारांच्या घनतेंत फरक होत गेला म्हणजे ते जीवरसांतून शोषिले जाऊं शकतात. प्रथम जरी त्यास अडथळा होत असे, तथापि पुढें त्यांच्या घनतेंतील फरकामुळें त्यांचा अपायकारक परिणाम नाहींसा होऊन तो पोषणकार्यास उपयोगी पडूं शकतो. म्हणूनच त्याला आंत शिरण्यास हरकत रहात नाहीं. ग्लिसरीन हा पदार्थ साध्या स्थितींत जीवरसांत केव्हांहि शिरूं शकत नाहीं. परंतु तोच (ग्लिसरीन) पदार्थ पुष्कळ वेळ पाण्यांत राहून त्याची घनता कमी झाली, तर जीवरसांत शिरण्यास योग्य होतो. प्रथम त्यामुळें जीवरसांत संकोच उत्पन्न होऊन जलस्थानांतून पाणी बाहेर जाऊन पेशींतील ताण कमी होतो. पण पुढें घनतेंत फरक झाल्यावर जीवरसाची संकोच-स्थिति नाहींशी होऊन ग्लिसरीन हा पदार्थ साध्या पाण्याप्रमाणें वाटेल तसा आंत जाऊं शकतो. ग्लिसरीनप्रमाणेंच आलकोहल किंवा मद्यार्क जीवरसांत शिरूं शकत नाहीं. पण त्याची ही घनता फार कमी झाल्यावर तोहि साध्या पाण्यासारखा शिरूं शकतो. जीवरसांतून एखादा पदार्थ विरलेल्या स्थितींत जलस्थानांत शिरणें झाल्यास त्याचें प्रमाण फारच सूक्ष्म असलें पाहिजे. जीवरसास अवश्य लागणाऱ्या क्षारांचेंच कांहीं एका विशिष्ट प्रमाणांत शोषण होऊं शकतें. पाण्याच्या परमाणूवर तसेंच त्यांत विरलेल्या क्षारांच्या परमाणूंवर जीवरसाचें आकर्षण भिन्न भिन्न प्रकारें होतें. म्हणून वनस्पतींमध्यें जमीनींतून पाणी शोषिलें जातें. त्यांतील क्षारांचें प्रमाण तसेंच त्या जमीनींतील पाण्याच्या क्षारांचें प्रमाण वेगळें असतें. एकाच जागीं वाढणाऱ्या निरनिराळ्या जातींच्या झाडांची राख करून तिचें पृथक्करण करून पाहिल्यास असें दिसून येईल कीं तेथील पाण्यांत असणाऱ्या क्षारांच्या प्रमाणाहून झाडांतील क्षारांचें प्रमाण निराळें असतें, एवढेंच नव्हे, तर निरनिराळ्या जातींतहि हें प्रमाण आढळतें. अशा प्रकारें जमीनींतील पाण्यांत क्षारांचें कोहींहि प्रमाण असलें तरी

# पानांचे प्रकार.









तें पाणी आणि क्षार आपल्या इच्छेनुरूप अगर गरजेनुरूप शोषण करण्याविषयीं जीवरसाची आवडरूपी शक्ति जीवनकार्यांत फार महत्त्वाची आहे. कारण त्यामुळें पाण्यांत एखादा क्षार अधिक प्रमाणांत असल्यास किंवा त्या क्षाराची जरूरी नसल्यास किंवा तो अपायकारक असल्यास जणूं काय तें पाणी गाळून घेऊन त्या क्षाराचा त्याग करितां येतो. उलटपक्षीं एखादा विशिष्ट क्षार फार कमी प्रमाणांत असल्यास तो योग्य प्रमाणांत शोपिला जाण्याची व्यवस्था मुळावरील शोपक केसांकडून केली जाते.

पेशींतील जीवरसाची घनता पेशिभित्तिकेजवळ असल्यानें जीवरसाचा थर त्या जागीं तयार होतो व ह्या थराचा आधार पेशिभित्तिकेस मिळतो. तसेंच जलस्थानासभोंवतीं सुद्धां जीवरसाची घनता अधिक होऊन जलस्थानांत पेशिरस संभाळून धरण्यासहि त्याचा आधार होतो. द्रव स्थितींत बाहेरून पदार्थ आंत शिरणें अथवा पेशिरसांतून तो बाहेर जाणें ही गोष्ट जीवरसाच्या ह्या विशिष्ट घनतेवर अथवा घन पडद्यावर अवलंबून असते. जेव्हां एखादा पदार्थ पाण्यावरोवर पेशिभित्तिकेजवळील जीवरसाच्या थरांतून आंत शिरूं लागतो; तेव्हां तो पदार्थ आंत शिरला असतां फायदेशीर होणार असेल, तर त्याला अटकाव होत नाहीं. पण जर त्याची उपयुक्तता नसेल तर जीवरसामध्यें संकोच उत्पन्न होऊन जीवरस जलस्थानाकडे सरकूं लागतो व जलस्थानांतून पाणी बाहेर जाऊं लागतें. त्या पदार्थास आंत शिरण्यास वाव मिळत नाहीं. जरी पेशिभित्तिकेंतून द्रव स्थितींत एखादा पदार्थ आला तथापि तो पुढें जलस्थानांत साठविण्यासाठीं पाठविला जाईलच असें नाहीं. जीवरसाच्या ह्या दोन्ही पडद्यांत अथवा थरांत एक विशिष्ट द्रवता उत्पन्न करण्याचा गुण असल्यानें पेशिभित्तिकेंतून आंत आलेला पदार्थ पुन्हां वेगळ्या प्रकारें विरला जाऊन मग तो जलस्थानांत शिरण्यास योग्य होतो. ही विशिष्ट द्रवता त्या पदार्थास न मिळाल्यास तो पदार्थ जीवरसांत शिरूं शकत नाहीं, म्हणजे हा विशिष्ट गुण जीवरसाच्या आवडीमुळें अथवा नावडीमुळें उत्पन्न होतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. ज्या पदार्थापासून पोपणकार्यास मदत होईल अशाच पदार्थास ती विशिष्ट द्रवता त्या जीवरसाच्या थरांतून मिळते व तेच पदार्थ आंत शिरूं शकतात. जीवरसाचे हे थर वरचेवर नवीन होत गेल्यामुळें त्यांचा विशिष्ट द्रवता उत्पन्न करणारा गुण कायम रहातो. म्हणून क्षारशोपणांत जीवरसाची आवड अथवा विशिष्ट शक्ति प्रधान कारण आहे.

केशाकर्षणः—दिव्याच्या वातींत तेल खालून वर चढतें त्याप्रमाणें जमीनींत घुसलेल्या मुळ्यांच्या शोपक केसांत पाणी शिरून वर चढतें, असा कांहीं लोकांचा समज होता, पण हा समज चुकीचा आहे. कारण केशाकर्पण सुरू होण्यास केसांचीं तोंडें उघडीं असावीं लागतात. उघड्या तोंडांतून येथेंहि कदाचित् केशाकर्पण सुरू झालें असतें. पण शोपक केसांनां उघडीं तोंडें बिलकूल असत नाहींत. मोठमोठ्या शक्तीच्या सूक्ष्मदर्शक यंत्रांतून सुद्धां त्यांवर तोंडें असलेलीं दिसत नाहींत. अर्थात् केशाकर्पणास अशा स्थितींत वाव मिळत नाहीं. म्हणून शोपककेसांत पाणी शिरण्यास केशाकर्पण कारणीभूत होत नाहीं असें आतां सर्वसंमत व सिद्ध झालें आहे.

शोपक केसांची उपयुक्तता.—मुळ्या जमीनींत घुसतांना त्यांनां सर्वच जमीनी मऊ व भुसभुसीत आढळतात असें नाहीं. कित्येक ठिकाणीं जमीन फारच टणक व कठिण असते. अशा स्थितींत मुळ्यांनां क्षारशोपण करणें तसेंच जमीनींत खोलवर घुसत जाणें मोठें कठीण जातें. परंतु हें काम शोपककेसांमुळें फार सुलभ होतें. जमीन कितीहि कठिण असली तरी शोपक केसांच्या शोपण शक्तीपुढें टीकाव धरूं शकत नाहीं. जेव्हां शोपककेसांतील पेशिरसांत व जमिनींतील क्षारयुक्त पाण्यांत अन्योन्य रसाकर्पण सुरू होतें, तेव्हां जलस्थानांतून सूक्ष्म प्रमाणांतून कर्बाम्ल बाहेर येतें. पाण्यांत न विरणाऱ्या पदार्थास ह्या आंतून बाहेर येणाऱ्या आम्लामुळें द्रवता उत्पन्न होऊन ते पदार्थ पाण्यांत विरतात व अन्योन्य रसाकर्पण-क्रियेंत ते पाण्यावरोवर जलस्थानांत शिरूं शकतात. खरोखर कठिण जमीनींतील क्षार विरविण्याकरितां हें अम्ल बाहेर येणें अवश्य असतें. ह्या रीतीनें हें आम्ल निरुपयोगी न होतां उलट जमिनींतील क्षार विरविण्याकरितां हें अम्ल बाहेर येणें अवश्य असतें. ह्या रीतीनें हें अम्ल निरुपयोगी न होतां उलट जमिनींतील कठिण पदार्थास विरवून सोडण्यास त्याचा उपयोग होतो. ह्याप्रमाणें त्या कठिण पदार्थावर शोपककेसाची विद्रावक क्रिया सुरू झाली म्हणजे हळू हळू त्यांचें काठिण्य नाहींसें होत जातें. जरी जमिनींत पोपणकार्यास उपयोगी पडण्यासारखें पुष्कळ अन्नक्षार असतात. तथापि ते विरल्याशिवाय वनस्पतिशरीरांत जाणें शक्य नाहीं. म्हणून असे पदार्थ शोपणापूर्वी विरविले जाणें अवश्य आहे. विरविण्यास अम्ल पाहिजे. अर्थात् जलस्थानांतून कित्येक वेळां अन्योन्यरसाकर्पणक्रियेंत जें अम्ल बाहेर येतें, त्याचा उपयोग अशा वेळीं फार होतो. ही नैसर्गिक व्यवस्था नसती तर जमिनींत उपयोगी पडण्यासारखे अन्नक्षार असूनहि त्यांचा उपयोग वनस्पतिपोपणास कांहींहि झाला नसता. ह्या दृष्टीनें विचार केल्यास शोपक-केसाची उपयुक्तता जीवनकार्यांत किती मोठी असते हें कळण्यासारखें आहे. सर्वच ठिकाणीं जलस्थानांतून अन्योन्य रसाकर्पण—क्रियेंत अशीं अम्लें बाहेर येतात असें नाहीं. बाह्य परिस्थितीप्रमाणें क्षार विरविण्यास अम्ल बाहेर जाण्याची योजना जीवरसाकडून होते. कांहीं लोकांचा समज असा आहे कीं, प्रत्यक्ष अम्ल शरीरांतून बाहेरीं येत नाहीं. पण सचेतन पेशींत श्वासोच्छ्वासक्रिया नेहमीं चालू असल्यानें जो कर्बाम्ल वायु बाहेर येतो, त्याचा पाण्याशीं

संबंध होऊन कर्बाम्ल रस तयार होतो व हा रस क्षार विरविण्यास उपयोगी पडतो. कसेंहि असलें तरी जमिनींतील कठिण क्षारावर ह्या अम्लाचा रासायनिक परिणाम होऊन ते विरतात व पुढें त्यांचा शिरकाव शरीरांत होऊन पोषणकार्यांत त्यांचा मोठा उपयोग होतो.

मूलजन्य शक्ति अथवा दाबः—अन्योन्य रसाकर्षण क्रियेनें जमिनींतून पाणी शोषिलें जाऊन जसें जसें तें जलस्थानांत साठूं लागतें तसतसा त्या पाण्याचा ताण पेशिभित्तिकेवर बसूं लागतो. एक पेशी पाण्यानें ताणली गेल्यावर त्याच प्रकारची स्थिति दुसऱ्या पेशींत उत्पन्न होते. कारण त्या पेशींत व पहिल्या पेशींत अन्योन्य रसाकर्षण–क्रिया सुरू होऊन पहिल्या पेशींतून दुसऱ्या पेशींत पाणी जमा होत गेल्यानें तेथील पेशिभित्तिकेवर पहिल्यासारखा ताण बसतो. एवढ्या वेळांत पुनः जमिनींतून नवीन पाणी पहिल्या पेशींत येतें. अशा रीतीनें पहिल्या पेशीपासून दुसरींत दुसरीपासून तिसरींत,तिसरीपासून चवथींत ती क्रिया, सुरू होऊन सर्व पेशींत पाणी भरलें जाऊन त्या ताणूं लागतात. याप्रमाणें ही तणावाची स्थिति मुळयांच्या सालींतील (कॉर्टेक्स) प्रत्येक पेशींत उत्पन्न होतें. ह्या तणावांच्या संकलित परिणामामुळें तेथें एक विशिष्ट शक्ति उत्पन्न होते. ही मुळयांतलि पेशींच्या तणावानें उत्पन्न होते म्हणून तिला 'मूलजन्यशक्ति' असें म्हणतात.

स्तंभासभोंवती सालीचें वेष्टन असल्याकारणानें त्या तणावजन्य शक्तीचा परिणाम स्तंभावरसुद्धां होतो. स्तंभांतील काष्टवाहिन्यांत ह्या तणावानें पेशिरसाचा उच्छ्वास होऊन सालींतलि तणाव कमी होतो. परंतु पुनः नवीन पाणी तेथें जमून पुनः पूर्वीसारखा ताण उत्पन्न होतो. याप्रमाणें नवीन पाणी वरचेवर शोषिलें जाऊन त्या उच्छ्वास काष्टवाहिन्यांत होऊन पाण्याची परंपरा एकसारखी कायम रहाते. ही मूलजन्यशक्ति म्हणजे शोषिल्या जाणाऱ्या जाणाऱ्या पाण्यामुळें उत्तेजित झालेल्या जीवरसाकडून मिळणारें एक प्रकारचें प्रत्युत्तर होय. ह्या शक्तीनें मूळांतून खोडांत व खोडांतून पानापर्यंत पेशिरस चढण्यास मदत होते.

मूलजन्यशक्तीचे चमत्कारः—कधीं कधीं कडू लिंब आपोआप फांटून त्यांतून पेशिरस वाहूं लागतो. पेशिरस अशा रीतीनें वाहण्यामुळें झाडाची खराबी होते. त्याचा परिणाम त्या झाडाच्या पोषणकार्यावर होऊन झाड वाळून जाण्याचा संभव असतो. झाड फांटून पेशीरस वाहूं लागणें हा मूलजन्यशक्तीचा एक चमत्कार आहे. पानांच्या अग्रांतून दवासारखे रस–बिंदू सकाळीं आलेले आढळतात. ह्यांचें कारण सुद्धां मूलजन्यशक्तीच होय. रात्रीं पानांतून वाष्पोच्छ्वास होत नसल्याकारणानें पानाच्या अग्रांत आलेल्या पाण्याचा ताण अधिक होऊन कित्येक वेळां अग्राकडील पेशिभित्तिका फांटून जाते व खालून वर जाणारा पाण्याचा प्रवाह बाहेर गळून वाहूं लागतो. परंतु वाष्पोच्छ्वास सुरू असतां अशा प्रकारें पाणी वहाण्याचा संभव फार कमी असतो. कारण त्या स्थितींत पेशिभित्तिकेवर तणाव उत्पन्न होत नाहीं म्हणून ती फांटण्याची भीतीहि कमी असते. विनाकारण पेशिरस वाया जाणें हें एकंदरींत नुकसानकारक असतें. पेशिरसांत सेंद्रिय व निरिंद्रिय द्रव्यें असतात. असा पेशिरस जमविण्यास झाडाची शक्ति किती तरी खर्च झाली असते. परंतु जर तो पेशिरस जीवन–कार्यांत उपयोगी न पडतां केवळ बाहेर गळून जाईल तर झाडांचें नुकसान फार होईल.

कांहीं वेळां अशा बाहेर गळणाऱ्या पेशिरसांतून निरूपयोगी पदार्थांचें विसर्जन होतें. पण त्याबरोबर पुष्कळ पोषणोपयोगी पदार्थ गळल्यानें तोटा होतो. केवळ त्याज्य पदार्थ नाहींसे झाले असते तर फायदा झाला असता पण अशी स्थिति क्वचितच असते.

वाष्पोत्सर्जन अथवा वाष्पोच्छ्वासः–जलस्थानांत अधिकाधिक पाणी जसजसें शोषिलें जाईल तसतसा त्या पाण्याचा उपसा होत जाणेंहि अवश्य आहे. पूर्व पाण्याचा उपसा होत गेल्याखेरीज नवीन पाणी शोषिलें जाणें शक्य नाहीं. नवीन पाणी वरचेवर आल्याखेरीज पोषणोपयोगी अवश्य क्षार शरीरांत कसे येत जाणार ? शोषिल्या जाणाऱ्या पाण्यांतील क्षारांचें प्रमाण फारच सूक्ष्म असतें. अशा स्थितींत जितकें पाणी वरचेवर शोषिलें जाईल तितक्या प्रमाणांत पौष्टिक क्षार शरीरांत येण्याचा संभव आहे. पाणी एकसारखें शरीरांत येत गेलें तर तें सगळें तेथें मावणें शक्य नाहीं. म्हणून पाण्याचा उपसा बाहेर होत जाणें अवश्य असतें. सूर्यप्रकाशांत शरीरांतील पाण्याची वाफ होऊन ती वाफ हवेंत मिसळते व त्यायोगें पाण्याचा उपसा होत गेल्यानें नवीन पाणी शिरण्यास मार्ग मोकळा होतो व त्याबरोबर अवश्य क्षारांचेंहि शोषण होतें. पेशिरसाच्या वाष्पीभवनास 'वाष्पोत्सर्जन' अथवा 'वाष्पोच्छ्वास' म्हणतात.

साध्या पाण्याचा वाष्पोच्छ्वास व पेशिरसाचा वाष्पोच्छ्वास ह्या दोहोंमध्यें फार फरक असतो. उष्णतेच्या कमी अधिक मानाप्रमाणें अथवा वाऱ्याच्या कमी अधिक जोराप्रमाणें साध्या वाष्पोच्छ्वासांत पाण्याची वाफ होऊन हवेंत मिळते. ही क्रिया केवळ प्राकृतिक आहे. परंतु पेशिरसाच्या वाष्पोच्छ्वासांत वेगळा प्रकार आढळतो. पेशिरसाची वाफ होणें अथवा ती अमुक एक विशिष्ट प्रमाणांत होणें ही गोष्ट केवळ उष्णतेवर अवलंबून नसते. पेशि–रसाची वाफ होऊन हवेंत मिसळणें व त्यामुळें नवीन पाणी शोषण्यास मदत होणें अथवा अन्न-क्षारादि पदार्थ शोषिले जाणें वगैरे गोष्टी केवळ जड स्वरूपाच्या नसून त्या शरीरांतील जीवनपिंडांच्या जीवनात्मक रासायनिक घडामोडींप्रमाणें होत असतात. परिस्थितीप्रमाणें पेशिरसाची वाफ कमी अधिक होऊं देणें अथवा ती अजिबात बंद करणें, तसेंच ती बाहेर जाण्याचा

मार्ग खुला ठेवणें अथवा न ठेवणें वगैरे कार्यें जीवनपिंडांच्या उत्तेजनकार्यावर अवलंबून असतात. म्हणूनच साधें बाष्पीभवन व वनस्पति-शरीरांत होणारा बाष्पोच्छ्वास ह्या दोन्ही कार्यांत मोठा भेद असतो. एक कार्य केवळ जड तर दुसरें जीवनात्मक आहे.

बाष्पोत्सर्जनाचे फायदेः—पेशिरसाचा बाष्परूपी उच्छ्वास झाल्यानें नवीन पाणी शरीरांत शिरण्यास एक प्रकारचें उत्तेजन मिळतें, व त्याबरोबर अन्न-क्षारांचें शोषण होतें. अशा ठिकाणीं पेशिरसास बाष्परूप देण्याची काय जरूरी आहे, तर बाष्परूपानें केवळ पाणी नाहींसें होऊन निरिंद्रिय अन्न-क्षार शरीरांत शिल्लक राहतात. ह्या रीतीनें अन्नक्षार शरीरांत राहून पाण्याची तेवढी बाष्परूपानें विल्हेवाट लागते.

बाष्पोच्छ्वासानें शरीरांतील उष्णता विशिष्ट अंशापेक्षां अधिक वाढत नाहीं. सूर्यप्रकाशांत पानें, फांद्या, खोड वगैरे भाग एकसारखे तळपत राहिल्यानें त्यांच्या शरीरांतील उष्णतेचें प्रमाण फारच वाढलें असतें. पण वस्तुस्थिति उलट आढळते. बाष्पोच्छ्वास-क्रियेंत पुष्कळशी उष्णता खर्च होऊन फाजील उष्णतेचा अपायकारक परिणाम टाळिला जातो. नाहीं तर त्या उष्णतेनें शरीरांतील नाजूक जीवन-पिंडादि पदार्थ मृत होऊन सर्व जीवनकार्यें बंद पडलीं असतीं. यद्यपि सूर्यप्रकाशरूपी कांहीं शक्ति सेंद्रियपदार्थोत्पत्तींत खर्च होते तथापि उरलेल्या उष्णतेचा परिणामहि जीवनपिंडावर अपायकारक झाल्याशिवाय राहिला नसता. पण बाष्पोच्छ्वासांत ती उरलेली उष्णता खर्च होऊन आपोआप तो अपायकारक परिणाम टाळिला जातो. ह्या दृष्टीनें विचार केल्यास बाष्पोच्छ्वासानें एक मोठीच कामगिरी साधते ह्यांत संशय नाहीं.

बाष्पोच्छ्वास व त्वग्रंध्रः—पेशिरसाची वाफ झाल्यावर ती 'त्वग्-रंध्र' नांवाच्या विशिष्ट छिद्रांतून शरीराबाहेर जाते. त्वग्-रंध्रांची योजना केवळ बाष्पोच्छ्वासाठीं असते असें म्हणतां येणार नाहीं. त्वग्-रंध्राचा उपयोग, शर्करादि सेंद्रियपदार्थोत्पत्तीस अवश्य असणारा कर्बाम्ल वायु शरीरांत शोषणें अथवा आंतून आक्सिजन वायु बाहेर सोडणें, त्याचप्रमाणें श्वासोच्छ्वास-क्रियेंतील वायूच्या फेरबदलास वाव देणें वगैरे गोष्टींकडे होतो. ह्या गोष्टींबरोबरच बाष्पोच्छ्वास-कार्यासहि त्यांतून वाट मिळते. पेशिरसाची वाफ झाल्यावर प्रथम ती पेशिमध्य पोकळ्यांत अथवा वात-स्थानांत जमते. सर्व वातस्थानांचा परस्पर संबंध असून त्यांचीं बाह्य अंगें म्हणजे त्वग्-रंध्रें होत. अर्थात् वातस्थानांत जमणारी वाफ ह्या त्वग्-रंध्रांतून पडते. त्वग्-रंध्र उघडणें अथवा बंद होणें हें त्वग्-रंध्राजवळील रक्षकपेशींच्या कमी अधिक तणावावर अवलंबून असतें. जेव्हां रक्षकपेशींतील पेशिरसामुळें पेशिभित्तिका तणाणूं लागते त्यावेळीं त्वग्-रंध्र अधिक उघडें अथवा विस्तृत होतें. रक्षकपेशींच्या भित्तिकेची रंध्राकडील बाजू अधिक जाड असल्यानें तणावाचा परिणाम त्या बाजूवर फारसा होत नाहीं. उलट दुसऱ्या बाजूची भित्तिका पातळ असल्याकारणानें त्यावर तणावाचा जोर पडून ती अधिकच ताणली जाते. ह्या स्थितींत दुसरी बाजू तणावाकडे कलल्यामुळें रक्षकपेशिद्वयांतील त्वग्-रंध्र अधिक खुलें होतें व त्यांतून आंतील अंगास असणाऱ्या वातस्थानांतील वाफेस बाहेर पडण्यास आपोआप मार्ग खुला होतो. जर रक्षकपेशिद्वयांत तणाव उत्पन्न होणार नाहीं तर तिच्या दोन्ही बाजू सारख्या ढिल्या राहून त्यांतील त्वग्-रंध्र जवळ जवळ बंद राहील.

त्वग्-रंध्रांत बाहेरून वायू आंत शिरतो म्हणून तें उघडतें असें नाहीं. केवळ बाह्यत्वचेच्या रक्षकपेशीच्या कमी अधिक तणावाप्रमाणें त्वग्-रंध्र विस्तृत अथवा संकुचित होतें. कमी अधिक संकोचाप्रमाणें अथवा विकासाप्रमाणें बाहेरुन वायु शोषिण्यास सुद्धां अडथळा होतो व त्यायोगें कारबनकर्बविपाक अथवा संस्थापन किंवा श्वासोश्वास ह्यासारख्या जीवनकार्यांत अडथळा उत्पन्न होत असतांना सुद्धां बाष्पोच्छ्वासास सोय व्हावी म्हणून त्वग्-रंध्रें बंद अगर उघडीं ठेवलीं जातात. ह्यावरूनच जीवनकार्यांतील बाष्पोच्छ्वासाचें महत्त्व लक्षांत येण्यासारखें आहे. प्रकाशामुळें त्वग्-रंध्र उघडें रहाण्यास अप्रत्यक्षरीतीनें एक प्रकारचें उत्तेजन मिळतें. कारण रात्रीं तसेंच दिवसां शोषण-कार्य मुळाकडून चालू असतें व त्याप्रमाणें रक्षकपेशींत तणाव उत्पन्न होऊन रात्रींसुद्धां त्वग्-रंध्र उघडें राहिलें पाहिजे. पण रात्रीं त्वग्-रंध्रें उघडीं असत नाहींत. दिवसां रक्षकपेशींतील जीवनपिंड प्रकाशानें उत्तेजित होऊन ते अधिक पाणी शोषून घेतात व त्यायोगें पेशींत अधिक ताण उत्पन्न होऊन त्वग्-रंध्रें खुलीं होण्यास मदत होते. रात्रीं प्रकाशाचा अभाव असल्यानें जीवनपिंडास प्रकाशाचें विशिष्ट उत्तेजन मिळत नाहीं व त्याचा परिणाम रात्रीं रक्षकपेशींत कमी शोषण होऊन ताणहि दिवसासारखा उत्पन्न होत नाहीं. अर्थात् अशा स्थितींत त्वग्- रंध्रें खुलीं राहणें शक्य नसतें. म्हणजे प्रकाशाचा अप्रत्यक्ष उपयोग तीं खुलीं राखण्यास होतो.

पानाच्या वरील बाजूपेक्षां खालील बाजूवर हजारों त्वग्-रंध्रें असतात म्हणून त्या बाजूंतून बाष्पोच्छ्वास अधिक होतो हें निराळें हें सांगण्याची जरूरी नाहीं.

बाष्पोत्सर्जन व परिस्थितिः—बाष्पोत्सर्जन परिस्थितीप्रमाणें कमी अधिक जोरानें चालतें. हवेंत उष्णतेचें प्रमाण-अधिक झालें असतां बाष्पोत्सर्जन अधिक होतें पण उलट तेंच प्रमाण कमी झालें किंवा हवा थंड झाली तर त्याचा परिणाम बाष्पोत्सर्जनावर होतो. दमट हवेपेक्षां कोरड्या हवेंत तें अधिक होतें. कोरड्या हवेप्रमाणेंच सोसाट्याचा वारा सुटला असतां बाष्पोत्सर्जन अधिक होऊन पानें गळल्यासारखीं होतात. कोरड्या हवेंत जरी बाष्पो-

अधिक होतें, तथापि कोरड्या जमीनींतील रोपट्यांतून तें कमी होतें. ह्याचप्रमाणें सर्द जमीन व सर्द हवा ह्या दोन्ही स्थितींत बाष्पोत्सर्जन अगदीं उलटरीतीनें चालतें. जेव्हां जमीनींत पाणी पुष्कळ असतें अशा वेळीं मुळांकडून अधिक पाणी शोषिलें जातें; व अर्थात् त्या प्रमाणांत बाष्पोत्सर्जन अधिक होतें. पण उलट जमीनींत पाणी असलें तर कमी पाणी शोषिलें जाऊन बाष्पोत्सर्जन कमी होतें. तसेंच जमीनींतील विशिष्ट क्षारावरसुद्धां बाष्पोत्सर्जन कांहीं अंशीं अवलंबून असतें. प्रखर प्रकाशांत बाष्पोत्सर्जन अधिक होऊं लागतें. अशा स्थितींत बाष्पोत्सर्जनांत खर्च होण्याऱ्या पाण्यापेक्षां कमी पाणी मुळ्याकडून शोषिलें जाईल तर त्याचा वाईट परिणाम वनस्पतीस भोगावा लागतो. हा वाईट परिणाम टाळावा म्हणून जीवनपिंडास बाष्पोत्सर्जन बंद करण्याची सोय करणें भाग पडतें. कोंवळ्या पानावर एक प्रकारचें संरक्षक आवरण उत्पन्न करून बाष्पोत्सर्जन कमी केलें जातें.

आवरणामुळें प्रकाशाची आंच आंत कमी पोहोंचते म्हणून पेशिरसाची वाफसुद्धां त्या प्रमाणांत कमी होते. कित्येक वेळां मेणासारख्या पदार्थाचा लेप पानावर तयार केला जातो. मेण हा पदार्थ उष्णतावाहक नसल्यामुळें प्रकाशाची उष्णता आंतील भागात शिरत नाहीं, व त्यामुळें पेशिरसाची वाफ कमी होते. कित्येक वेळां कडक प्रकाशानें जीवनपिंड उत्तेजित होऊन प्रकाशांत सुद्धां त्वग्—रंध्रें बंद करतात. कांहीं ठिकाणीं त्वग्-रंध्रांजवळ शेंकडो केंस उत्पन्न होऊन वाफ बाहेर जाण्याचे मार्ग बंद होतात. कांहीं ठिकाणीं पानावर दाट केंस वाढून पानास पोहोंचणारी उष्णता कमी केली जाते. ज्या ठिकाणीं पाणी फार कमी पडतें पण प्रकाश कडक पडतो अशा ठिकाणीं उत्पन्न होणाऱ्या वनस्पतींच्या पानाचा आकार फार लहान केला जातो. पानांचा आकार लहान झाल्यामुळें तितक्या प्रमाणांत बाष्पोत्सर्जन कमी होतें. कांहीं पानें कांट्यांसारखीं संकुचित व अणुकुचिदार होतात. त्यामुळें बाष्पोत्सर्जन फार कमी होतें. कडक उन्हाळा फार दिवस टिकला असतां वनस्पतींतून फाजील बाष्पोत्सर्जन होण्याची भीति असते. अशा स्थितींत बाष्पोत्सर्जनाचीं साधनें जीं पानें, तींच अजीबात गाळून तें कमी केलें जातें. पानें गळल्यानें शर्करादि पदार्थोत्पत्तीस अडथळा येतो तथापि फाजील बाष्पोत्सर्जनानें सुकून जाण्याच्या ऐवजीं किंचित्काळ जीवनपिंड संकुचित सुप्त स्थितींत ठेवणें बरें.

एक मृत व एक सजीव अशा दोन सारख्या आकाराच्या पानांतून बाष्पोत्सर्जन कसें होतें ह्याचें परीक्षण केल्यास असें आढळून येईल कीं मृत पानांतून बाष्पोत्सर्जन अधिक जोरानें होतें. ह्याचें कारण त्यांत बाष्पोत्सर्जन कमी अधिक करणारे जीवनपिंड असत नाहींत. पण सजीव पानांत जीवनपिंड असल्यानें पाण्याच्या पुरवठ्याप्रमाणें अथवा इतर परिस्थितीप्रमाणें बाष्पोत्सर्जन कमी अधिक होत असतें.

पेशिरसाचा उत्प्रवाहः—मोठमोठ्या दोन दोनशें फूट उंच वाढणाऱ्या वृक्षांच्या शेंड्याकडे असणाऱ्या फांद्यांत अथवा पानांत मुळाकडून शोषिलें जाणारें पाणी कसें पोहोंचतें हा मोठा प्रश्न आहे. ह्याविषयीं निरनिराळ्या शास्त्रज्ञांचीं मतें वेगवेगळीं आहेत. 'झाडांत पाणी कसें वर चढतें,' हा प्रश्न अजून जसा सुटावा तसा सुटलेला नाहीं. बाह्य हवेच्या विशिष्ट दाबामुळें अगर वजनामुळें मुळ्यांमध्यें पाणी वर चढतें असें कांहींचें मत आहे. परंतु पदार्थ—विज्ञान—शास्त्रांत ठरविलेली हवेच्या दाबाची किमान मर्यादा तीस फुटांपेक्षां अधिक नाहीं. अर्थात् दोन दोनशें फूट पाणी वर चढणें केवळ हवेच्या दाबामुळें वनस्पति—शरीरांत घडून येतें हें सर्वांना पटत नाहीं. कांहींच्या मतानें केशाकर्षण—क्रियेनें वाहिनींतून पाणी वर चढत असावें परंतु वाहिनींची परंपरा मुळापासून शेंड्यापर्यंत सारखी नसते. शिवाय कांहीं विशिष्ट मर्यादेपलीकडे केशाकर्षण क्रियेचा प्रभाव चालत नाहीं. म्हणून इतक्या लांबवर पाणी चढण्यास केशाकर्षण कारणीभूत होत असेल असें संभवत नाहीं. केवळ अन्योन्य—रसाकर्षण—क्रियेनें पाणी इतक्या दूरवर पसरत असेल अशी कल्पना केली, तर ती क्रिया फार सावकास होणारी असते व अशा स्थितींत त्या क्रियेनें इतकें पाणी मुळांतून शेंड्यापर्यंत अव्याहतपणें इतक्या लवकर होणें कठिण दिसतें. तसेंच अन्योन्य—रसाकर्षण—क्रियेस चालन देणारे भिन्न घनतेंत विरलेले पदार्थ अमूक एक ठाम प्रमाणांत चोहोंकडे पसरलेले आहेत असें कांहीं सांगवत नाहीं. मूलजन्यशक्तीनें पाणी नेहमींच चढत असेल असेंहि गृहीत धरतां येत नाहीं. कारण जेव्हां वातोत्सर्जन-क्रिया जोरांत चालू असते अशा वेळीं मूलजन्यशक्ति अगदीं सूक्ष्म स्थितींत असते. डिक्सन, जॉली, अस्कनसी वगैरे शास्त्रज्ञांच्या मतानें मुळांतून पाणी वर खेंचिलें जाण्यास पानांतील बाष्पोत्सर्जन पुरेसें आहे. पानांतील बाह्यांगाकडे असणाऱ्या पेशींतील पेशिरसाची प्रकाशाच्या उष्णतेनें वाफ होऊन ती पानांतील वात-स्थानांत जमूं लागतें. अशा वेळीं तेथील पेशिरस घन होऊं लागतो. पण ह्याच वेळीं इतर पेशींतील पेशिरस घन असत नाहीं अर्थात् त्या दोन्ही पेशिरसांत अन्योन्य—रसाकर्षण सुरू होतें व खालून पेशिरस वर चढूं लागतो. हीच परंरा खालीं जमीनींत असणाऱ्या मुळ्यापर्यंत पोहोंचते व त्या सर्वांतून पेशिरस ह्याच रीतीनें वर चढतो. ही विचारसरणी एकंदरींत बरी दिसते. पण जसें जसें बाष्पोत्सर्जनानें एकीकडून पाणी नाहींसें होईल त्याप्रमाणें खालून अन्योन्य-रसाकर्षण क्रिया चालू असली पाहिजे. नेहमीं ही क्रिया फारच सावकाशरीतीनें होते. अर्थात् इतक्या जलद पाण्याचा एकसारखा प्रवाह ह्याच एका क्रियेनें चालू राहील असें कधींहि म्हणवत नाहीं. कित्येक वेळां बाष्पोत्सर्जन—क्रिया चालू नसतांनासुद्धां पाणी खालून वर चढत असतें. अशा

स्थितींत बाष्पोत्सर्जनानेंच पाणी वर चढतें ही उपपत्ति कशी टिकणार? कित्येक जागीं अन्योन्यरसाकर्षण-क्रिया एका विशिष्ट दिशेनें होण्यासारखी स्थिति असून सुद्धां प्रवाह उलटा जातो. एकंदरींत अमुक एक विशिष्ट क्रियेनें पाणी वर चढतें हें निश्चित सांगतां येत नाहीं काहींनीं केवळ सचेतन पेशींकडून हें कार्य केलें जातें असें प्रतिपादिलें पण स्ट्रॉसबरनें ह्याविपर्यीं प्रयोग केला. त्यानें कांहीं कलमें मोरचुदाच्या पाण्यांत टेवून त्यांचा त्यावर कसा काय परिणाम होतो हें पाहिलें. मोरचुदाचा अंश पानापर्यंत येऊन पोहोंचलेला त्याला आढळून आला. तो वर येतांना मध्यंतरीं असणाऱ्या सर्व पेशी मृत झाल्या ह्यावरून त्यानें अनुमान बसविलें कीं सचेतन पेशींकडूनच पाणी वर चढविलें जातें असें नाहीं. ह्याचप्रमाणें मुळ्यांवर आधणाचें पाणी ओतून त्यांतील पेशी मारून टाकिल्या तथापि सुद्धां पानांतून बाष्पोत्सर्जन एकदां सुरू झालें म्हणजे मागाहून सचेतन पेशींची ह्या कार्यांत फारशी जरुरी नाहीं. डॉ. बोस यांनीं ह्यासंबंधीं एक निराळीच उपपत्ति दिली आहे. सचेतन पेशींच्या जीवनक्रियेनेंच पाणी मुळ्यांतून शेंड्यापर्यंत चढत जातें असें त्यांचें म्हणणें आहे. मात्र घडामोडी निरनिराळ्या उत्तेजनापासून उत्पन्न होतात. जमीनीशीं मुळ्यांचा संबंध येणें तसेंच त्या जमीनींत घुसतांना त्यांच्या वाढत्या भागाची घासून झीज होणें अथवा शोषक-केंसाकडून अन्योन्यरसाकर्षणक्रियेनें पाणी शोषून घेतल्यावर पेशींत ताण उत्पन्न होणें, किंवा जमीनींत वेगवेगळे रासायनिक क्षार असणें वगैरे कारणांनीं मुळ्यांच्या अग्रभागास उत्तेजन मिळून वर चढण्यास त्यायोगें चालन मिळतें. एकदां तें चालन मिळाल्यावर पुढें आपोआप तें पाणी सरकत जातें. प्रथम उत्तेजनामुळें शोषक-केंसांतील जलस्थानचा संकोच होतो व त्यायोगें त्यांतील पेशिरस पुढील जलस्थानांत जातो. पुढून तो रस पुन्हां नवीन जलस्थानाकडे जातो म्हणजे एकदां चालन मिळाल्यावर त्याचा परिणाम फार दूरवर पुष्कळ वेळ होत रहातो. मुळांतून पेशिरस वर चढण्यास एकच उत्तेजन पुरें होतें असें नाहीं. तर निरनिराळ्या उत्तेजनांच्या संकलित परिणामामुळें पेशिरस वर चढतो. वनस्पति-शरीरांत उत्तेजन ग्रहण करणारीं पेशिजालें सर्व जागीं असतात. त्यांनां एकदां आरंभीं उत्तेजन मिळालें म्हणजे तें पुढें एका पेशिजालापासून दुसऱ्यास व दुसऱ्यापासून तिसऱ्यास पोहोंचत जातें. उत्तेजनाप्रमाणें पेशिरसाचा प्रवाह एका पेशिजालापासून दुसऱ्यांत चालू होतो.

एका पेशीस उत्तेजन मिळाल्यावर त्यांतील जलस्थानाचा संकोच होऊन पेशिरस दुसऱ्यांत जातो. परंतु पुन्हां त्याच वेळीं पहिल्या पेशीस उत्तेजन मिळून पूर्वीसारखाच संकोच उत्पन्न होतो. अर्थात् त्याबरोबर पेशिरस पुनः दुसरीकडे जातो. याप्रमाणें सारख्या वेळेच्या अंतरानें एकसारखीं उत्तेजनें पहिल्या पेशीस मिळतात व त्याप्रमाणें प्रवाह सारखा पुढें जातो. जसे हृदयांत सारख्या वेळेच्या अंतरानें सारखे धक्के मिळत गेल्यामुळें रक्ताचा प्रवाह दूरदूर पसरतो. त्याच प्रमाणें मुळ्यांमध्यें अग्राकडील भागांतील उत्तेजनजन्य-संकोचधक्क्यानें पेशिरस खालून शेंड्याकडे चढत जातो. उत्तेजनजन्य-संकोच खालून वर अधिक लवकर होतो. म्हणजे उत्तेजनजन्य संकोचानें पेशिरसाचा प्रवाह खालून वर अधिक झपाट्यानें जाऊं शकतो. जर कांहीं कारणानें मुळ्यांच्या अग्रास उत्तेजन मिळण्याऐवजीं वर पानाकडे मिळूं लागलें तर संकोचाची दिशा वरून खालीं होईल. पण प्रयोगानें असें सिद्ध झालें आहे कीं वरून खालीं येणारा संकोच-जन्य-प्रवाह सावकाश चालतो. त्यांत खालून वर जाण्यांत दिसणारी त्वरा आढळत नाहीं. पेशिरसाचा प्रवाह व उत्तेजनाची दिशा ह्या दोहोंचा फार निकट संबंध आहे. वाहिन्यांतून पेशिरसाचे प्रवाह तसेंच उत्तेजनांचा प्रवाह हे सारख्याच झपाट्यानें चालतात. प्रवाहास आडव्यापेक्षां लंब दिशा अधिक सोयीची असते. जरी आरंभीं उत्तेजनजन्य-संकोचानें पेशिरसास चालन मिळतें, तथापि बाष्पोत्सर्जन, अन्योन्यरसाकर्षण, मूलजन्यशक्तीचा ताण वगैरे गोष्टींनीं तें चालन अधिक जोरानें चालू होतें. शरीरांतील सर्वच सचेतन पेशींत जीवनघडामोडी सारख्या जोरानें होत असतात असें नाहीं. म्हणून जेथें जेथें अधिक कार्यशील पेशी असतील तेथें अधिक जोरानें उत्तेजनजन्य संकोच उत्पन्न होऊन पेशिरस पुढें पुढें ढकलिला जातो. पेशिरसाच्या उत्प्रवाहासंबंधीं ही डाक्टर साहेबांची उपपत्ति अधिक सयुक्तिक दिसते.

अन्नक्षार.—वनस्पतींचीं अन्न-द्रव्यें सेंद्रिय व निरिंद्रिय अशीं दोन प्रकारचीं असतात. निरिंद्रिय क्षार जमीनींतून शोषिले जातात व सेंद्रिय अन्न शरीरांत तयार केलें जातें. जमीनींत नाना प्रकारचे क्षार पाण्यांत विरणारे असतात म्हणून ते त्या जमीनींत उगवणाऱ्या वनस्पतींमध्यें असतातच असें नाहीं. अल्युमिनीयम धातुचे क्षार बहुतेक जमीनींत असतात पण पुष्कळ वनस्पतींत त्यांचा अंशसुद्धां आढळत नाहीं. समुद्राच्या पाण्यांत आयोडिनचा अंश फारच थोडा असतो परंतु समुद्रशैवालांत त्या क्षाराचें प्रमाण पुष्कळ सांपडतें. ह्यावरून अवश्य क्षारांचें शोषण करून ते क्षार जलस्थानांत वनस्पती सांठवितात. व्यक्ती तितक्या प्रकृती अशी स्थिति असल्यामुळें वनस्पतींच्या क्षारशोषणांत भिन्नता आढळते. एकाच जमीनींत उगवणाऱ्या एकाच जातीच्या वनस्पतींमध्यें सर्व निरिंद्रिय क्षार सारख्याच प्रमाणांत शोषिले जातात असें नाहीं. क्षार-शोषण प्रत्येक वनस्पतीच्या जीवन-व्यापारावर अवलंबून असतें.

क्लोरीन (हर), गंधक, फास्फरस (स्फुर), सिलिका (सिकत), पोटॅशियम (पालाश), सोडियम् (सिंधु), कॅलशियम् (खट), मॅग्नेशियम् (मग्न), लोह, मँगनीज्-(मंगलिक), वगैरे धातूंचे क्षार थोड्याफार प्रमाणांत पुष्कळ वनस्पतींत आढळतात. ह्या सर्व क्षारांचा उपयोग

सारखा होतो असें नाहीं. ल्युकन्स नांवाच्या शास्त्रज्ञानें वनस्पतीस कोणत्या क्षारांची अवश्यकता आहे हें सप्रयोग कांहीं वनस्पतींविषयीं ठरविलें. इतरांनींहि प्रयोग करून कांहीं विशिष्ट क्षारांची अवश्यकता सिद्ध केली. सर्वसाधारण रीतीनें प्रत्येक वनस्पतीस नायट्रोजनक्षार, गंधकक्षार फॉस्फरिकक्षार तसेंच पोटयाशियम् मॅग्नेशियम्, क्यलशियम्, व लोह ह्या धातूंच्या क्षारांची अत्यंत अवश्यकता आहे असें सर्वमान्य सिद्ध झालें आहे.

पोटॅशियम् क्षारामुळें वनस्पतीस चांगली पुष्टता मिळून फुलें व फळें येतात असा अनुभव आहे. जर जमीनींत पोटॅशियम् धातूचा अभाव असला तर त्या ठिकाणच्या वनस्पती सुकूं लागतात व त्यांस फुलें येत नाहींत. पोटॅशियम क्षारानें सेंद्रिय पदार्थांच्या उत्पत्तीस चालन मिळतें व सेंद्रिय पदार्थ बनत गेल्यावर शरीरास पुष्टी मिळते.

मॅग्नेशियम् धातूच्या क्षाराचा उपयोग पोटॅशियम क्षाराप्रमाणेंच नायट्रोजनयुक्त सेंद्रिय पदार्थ बनविण्यास होतो. हरित् द्रव्याच्या घटकपदार्थांत मॅग्नेशियम् क्षार आढळतो. हरित्द्रव्याचा उपयोग कर्बनसंस्थापनक्रियेस फारच मोठा होतो. अर्थात् मॅग्नेशियम् क्षाराचेंहि महत्त्व तितकेंच अधिक आहे

कॅलशियम् क्षाराचा उपयोग संरक्षक असतो. नायट्रोजनयुक्त सेंद्रिय पदार्थ उत्पन्न करण्यास ह्याचा प्रत्यक्ष उपयोग होत नाहीं. वाढत्या कोंबांत कॅलशियम् क्षाराचें नांवहि आढळत नाहीं. परंतु त्याच जागीं पोटॅशियम् किंवा मॅग्नेशियम क्षार आढळतात. म्हणून जीवरसाच्या वाढीस ह्या क्षाराची अवश्यकता नसते. परंतु शरीरांत उत्पन्न होणाऱ्या आक्सॅलिक अम्लासारख्या विषारी अम्लांचा विघातक परिणाम नाहींसा करण्यास क्यालशियम् क्षाराचा उपयोग होतो. स्किंपर व पेफर ह्या शास्त्रज्ञ-द्वयांनीं क्यालशियम् क्षाराविषयीं पुष्कळ शोध केले आहेत. ह्या क्षाराच्या अभावानें पानावर पिंवळट रंगाचे चट्टे उत्पन्न होतात व तीं पानें सेंद्रिय पदार्थोत्पत्तीस निरुपयोगी होतात. अर्थात् ह्या क्षाराचा उपयोग संरक्षकच आहे असें म्हणणें भाग पडतें.

लोहक्षारानें जीवनपिंडांत हरित्-द्रव्य उत्पन्न होतें. हरित्-जीवनपिंडांत लोहक्षाराचें प्रत्यक्ष अस्तित्व असत नाहीं. तथापि त्या क्षाराचा अभाव जमीनींत झाला कीं तेथील पानें पिवळीं होऊं लागतात. जीवनपिंडास लोहक्षारानें एक प्रकारचें उत्तेजन मिळून त्याचा उपयोग हरित्-द्रव्य उत्पन्न करण्यांत होतो. मॉलिश व बेनेस्की ह्या शास्त्रज्ञांनीं असें सिद्ध केलें आहे कीं केवळ हिरव्या उच्च वनस्पतींनांच लोहक्षाराची अवश्यकता असते असें नाहीं तर हरित्-द्रव्य नसणाऱ्या आलिंब-वर्गाचें सुद्धां लोहक्षाराशिवाय चालत नाहीं.

ह्या चार क्षारांशिवाय नायट्रोजनक्षार, गंधकक्षार व फॉस्परस-क्षार यांची मोठी आवश्यकता असते. हे क्षार जीवरसाचे अथवा जीवरसांतील केंद्रांचे मुख्य घटक होत.

हवेमध्यें शेकडा ८० टक्के नायट्रोजन वायूचें प्रमाण असून त्याचा प्रत्यक्ष उपयोग वनस्पतींना होत नाहीं. म्हणून ते क्षार जमीनींतून शोषून घेणें भाग असतें. ज्या जमीनींत ह्या क्षाराची कमतरता असते तेथील वनस्पती पुष्ट होत नाहींत. प्रत्यक्ष जीवरसाच्या मुख्य घटकांत तोटा पडूं लागल्यानें नवीन वाढ होणें कठिण होतें. हीच स्थिती गंधक व फॉस्फरस क्षारांच्या अभावानें उत्पन्न होते. हेहि क्षार इतरांप्रमाणें जमीनींतूनच शोषून घ्यावे लागतात. गंधकक्षार केंद्रांत असत नाहींत पण जीवरसांत असतात. केंद्रांत फॉस्फरस क्षार आढळतात. त्यांचा त्या ठिकाणीं कोणता प्रत्यक्ष उपयोग असतो हें कळत नाहीं. प्राणिवर्गाच्या मज्जातंतूमध्यें सुद्धां फॉस्फरसक्षार आढळतात व मुद्दाम फॉस्फरस पदार्थ असणारीं बीजें अथवा फळें अधिक खाण्यांत यावीं असें डॉक्टर लोक सांगतात. त्यायोगें मज्जातंतूंना पुष्टी मिळते असें त्यांचें म्हणणें आहे. यावरून कदाचित् पेशींतील केंद्र फॉस्फरसाचें स्थान असल्यानें तें मज्जातंतूंचें काम देणारें स्थान असावें असा कित्येकांचा तर्क आहे.

हे क्षार-शोषणास पाण्याची अवश्यकता असते हें पूर्वी सांगितलेंच आहे. पाण्याचे घटक आक्सिजन व हायड्रोजन असतात हें निराळें सांगण्याची जरूरी नाहीं. ह्याशिवाय हवेंतून कारबन व आक्सिजन असे दोन पदार्थ वायू-स्वरूपांत शोषावे लागतात म्हणजे कारबन हायड्रोजन, आक्सिजन व नायट्रोजन तसेंच गंधक, फॉस्फरस, पोटेशियम, मॅग्नेशियम्, कॅलशियम् व लोह अशीं दहा द्रव्यें वेगवेगळ्या स्वरूपांत वनस्पतींत आढळतात. ह्या द्रव्यांखेरीज व्यक्तिमात्र वनस्पतींत कांहीं विशिष्ट द्रव्यें आढळतात. कूट्र नांवाच्या वनस्पतीस क्लोरीन--द्रव्याची अवश्यकता असते व त्याप्रमाणें तो पदार्थ त्यांत साठविलेला आढळतो. गवताप्रध्यें सिलिका-द्रव्य असतें. म्हणजे व्यक्तिमात्र वनस्पतींत आढळणाऱ्या विशिष्ट द्रव्यांचा विचार बाजूस ठेविला असतां वरील दहा द्रव्यें प्रत्येक वनस्पतींत अवश्य असतात. पैकीं कारबन व आक्सिजन हे दोन पदार्थ केवळ जमीनींतून क्षारस्थितींत पाण्याबरोबर शोषावे लागतात. ह्या दहा पदार्थांपासून निरनिराळे सेंद्रिय पदार्थ तयार होतात. व त्याच सेंद्रिय-पदार्थांचें सर्व वनस्पति-शरीर बनलेलें असतें. त्या पदार्थांत सेंद्रियत्व उत्पन्न करणाऱ्या शेंकडों रासायनिक घडामोडी वनस्पतींच्या शरीरांत अव्याहत चालू असतात व अशा घडामोडी म्हणजेच त्यांचीं जीवनकार्ये होत. ह्या घडामोडीस प्रथम जीवनपिंडाकडून चालन मिळतें व एकदां तें कार्य सुरू झालें म्हणजे तें एकसारखें चालू होतें.

हरित्-द्रव्ययंत्र.—हवा, पाणी व अन्न-क्षार ह्या त्र्यींपासून वनस्पती आपल्या शरीरांत सेंद्रिय अन्न तयार करितात. सेंद्रिय अन्न तयार करण्यास योग्य अशी विशिष्ट रचना

त्यांच्यां शरीरांत असते त्यास हरित्-द्रव्य-यंत्र म्हणतात. ह्या यंत्रांत पुष्कळ हरित्-जीवनपिंड असतात. प्रत्येक हरित्-जीवनपिंड जीवरसात्मक असून त्यांत हरितद्रव्य असतें. हरित्-द्रव्यामुळेंच पानास रंग येतो. हरित्-जीवनपिंडापासून हरित्-द्रव्य वेगळें करतां येतें. मद्यार्क ( आलकोहल ), ईथर, क्लोरोफॉर्म, बेनझोल, सारख्या रसांत हिरवीं पानें ठेवून हरित्-द्रव्यजीवनपिंडांपासून वेगळें केलें जातें. सोडा, पोटॅश वगैरे पदार्थांचा अंश असलेल्या पाण्यांत हिरवीं पानें ठेविलीं असतांहि हरित्-द्रव्य वेगळें होतें. हरित्-द्रव्य उत्पन्न होण्यास लोह-क्षार लागतात. लोहांश नसलेल्या जमीनींतील उगवणाऱ्या वनस्पतींचीं पानें फिकीं होतात. लोहक्षाराप्रमाणेंच हरित्-द्रव्योत्पत्तीस प्रकाशाची आवश्यकता असते. म्हणूनच अंधाऱ्या जागीं अथवा सावलींत वाढणाऱ्या वनस्पती फिकट होतात. प्रकाशानें पानांतील जीवनपिंड उत्तेजित होऊन हरित्-द्रव्य त्याजकडून उत्पन्न केलें जातें. हरित्-द्रव्यें असलेल्या रसावर प्रकाश पडला, तर त्यांतील कांहीं किरण शोषून घेण्याची शक्ति त्यास असते. तसेंच तो रस प्रकाशांत दोन वेगळ्या बाजूनें पाहिला तर तो दोन वेगळ्या रंगांचा दिसतो. प्रकाशाच्या पलीकडील बाजूस तो हिरवा जसाचा तसाच दिसतो; पण जिकडे त्याचें परावर्तन होतें त्या बाजूस तो रस लाल रक्तासारखा दिसतो. ह्या उलट तानें रक्त दिसतें. म्हणजे तें प्रकाशाकडील बाजूस लाल व परावर्तन होणाऱ्या बाजूस हिरवें दिसतें.

वनस्पति-भेदाप्रमाणें हरित्-जीवनपिंडास वेगवेगळा आकार येतो. कांहीं पाणकेशांच्या जीवरसांत हरित्-द्रव्य पूर्ण विरलें जाऊन त्यास कोणताहि विशिष्ट आकार येत नाहीं. परंतु स्पायरोगायरासारख्या पाणकेशांत हरित्-जीवनपिंड मळसूत्राकृती होतात. झिमियामध्यें त्यास नक्षत्रासारखा आकार येतो. उच्च वर्गांत साधारणपणें त्यास वाटोळा आकार असतो. उच्च वर्गांत अवयवरचना पूर्णत्वास पोहोंचल्यामुळें हरित्-जिवनपिंड साधारणपणें पानांत विशेष आढळतात. परंतु त्यांतहि मध्यांगीं ते पुष्कळ असतात. वरील भागापेक्षां खालील भाग अधिक फिका असतो. बाह्यत्वचेंत हे पिंड सहसा आढळत नाहींत. त्वग्-रंध्राच्या रक्षक-पेशींत मात्र हे असतात. मंद प्रकाशांत हरित्-जीवनपिंड पूर्ण रीतीनें चोहोंबाजूंकडे पसरतात व ही स्थिति कर्बविपाकास अथवा संस्थापनेस अधिक चांगली असते. प्रकाश कडक असेल तर त्यांची तीव्रता टाळण्याकरितां पानांतील बाह्यांगास असणारे हरित्-जीवनपिंड आंतील बाजूस वळून त्यांचें पुंज तयार होतात. पुंज बनल्यानें कडक प्रकाशापासून त्यांचें संरक्षण होतें. कडक प्रकाशांत पानांचा पृष्ठभाग एका बाजूला वळून त्यांच्या शक्य तितक्या थोड्या भागावर प्रकाश पडेल अशी व्यवस्था होते. म्हणजे ज्या प्रकारें कडक प्रकाशामुळें स्वतःचें नुकसान न होतां प्रकाश अधिक शोषिला जाऊन सेंद्रिय पदार्थ बनविण्याचें मुख्य कार्य उत्तम रीतीनें साधेल, त्याप्रमाणें ते जीवनपिंड योग्य ती तजवीज करतात.

किरणांचें पृथक्करणः—कांचेच्या त्रिपार्श्वावर प्रकाश पडला असतां त्या प्रकाशाचें विघटन अथवा पृथक्करण होऊन त्यापासून रंगी बेरंगी सात प्रकारच्या किरण-शलाका उत्पन्न होतात. प्रकाशाचे निरनिराळ्या रंगांतील किरण निरनिराळ्या लांबीच्या लहरींचे आहेत हें त्यांच्या पृथक्कृत स्थितींत स्पष्ट दिसतें. तांबडा, नारिंगी, पिवळा, हिरवा, अस्मानी, निळा, व जांभळा अशा निरनिराळ्या रंगांचे सात किरण मिळून पांढरा किरण बनतो व असे पांढरे किरण कांचेच्या त्रिपार्श्वावर पडले असतां त्यांचे सात घटककिरण वेगवेगळे होतात. पृथक्कृत प्रत्येक किरणाचा परावर्तन—शक्ति वेगवेगळी असते.

किरण व हरित्-जीवनपिंड ह्यांचा परस्पर संबंधः—ज्या प्रकारें कांचेच्या त्रिपार्श्वानें किरणाचें पृथक्करण होतें, त्याप्रमाणेंच हरित-जीवनपिंडानें सुद्धां किरणांचें पृथक्करण होतें. मात्र या दोहोंत फरक असतो. पहिल्या पृथक्करणांत सातीं किरण वेगवेगळे दिसतात. पण दुसऱ्या पृथक्करणांत कांहीं किरणांचें शोषण होऊन केवळ उरलेले किरणच वेगळे दिसतेतात. त्रिपार्श्वास किरण शोषण करण्याची शक्ति नाहीं परंतु पानांतील हरित्-जीवनपिंडास तशी शक्ति आहे कांच त्रिपार्श्वांत पोकळी करून त्यांत हरितद्रव्य रस भरला व त्यायोगानें किरणांचें पृथक्करण कसें होतें हें पाहिलें असतां असें आढळेल कीं नेहमीं वेगळ्या होणाऱ्या सात किरणांपैकीं फक्त नारिंगी, पिवळे व हिरवे या तीनच रंगांचे किरण वेगळे होतात व बाकीचे चार रंगांचे तांबडे, अस्मानी, निळे व जांभळे हे कमी अधिक प्रमाणांत हरित्-द्रव्य रसाकडून शोषिले जातात व उरलेले तीन न शोषिले गेल्यामुळें वेगळे झालेले दिसतात; म्हणजे त्रिपार्श्वाच्या पोकळींत ठेविलेल्या हरित्-द्रव्य रसांतील हरित्-जीवनपिंडाकडून प्रकाशाचे कांहीं किरण शोषिले जाऊन उरलेले किरण वेगळे होतात. ही विशिष्ट शक्ति जीवनकार्यांत फार उपयोगी पडते. ह्या रीतीनें प्रकाशांतील किरणें शोषून त्यांचा उपयोग सेंद्रिय पदार्थोत्पत्तीस लागणाऱ्या अवश्य शक्तीचा पुरवठा करण्याकडे होतो. प्रकाशांतील सात किरणांपैकीं केवळ चार किरण कर्बसंस्थापन-कार्यास अथवा कर्बविपाकास फार उपयोगी पडतात असा अनुभव आहे. मात्र हे किरण सारख्या रीतीनें शोषिले जातात अथवा ते सारखेच उपयोगी पडतात असें नाहीं. सर्व किरणांत तांबडे किरण सात्विक पदार्थोत्पत्तीस अधिक उपयोगी पडतात व ते त्या मानानें जीवनपिंडाकडून अधिक शोषिले जातात. त्या खालोखाल अस्मानी व पुढें निळे व जांभळे अशा क्रमाक्रमानें उपयोगी पडतात व ह्याच अनुभव किरण-शोषणांत दृष्टीस पडतो. प्रकाशांतील उपयुक्त किरण शोषण करून त्यांचा उपयोग सात्विक पदार्थ बनविण्यास करणें हें जीवनकार्यांतील एक महत्त्वाचें कार्य असल्यानें हरित्-

जीवनपिंडांचें अथवा त्यांतील हरित-द्रव्याचें इतकें महत्त्व असतें.

कारबन संस्थापन.—पानावर असणाऱ्या त्वग्-रंध्रांतून हरित्-जीवनपिंडांच्या साहाय्यानें हवेंतील कर्वाम्लवायु शोषिला जातो. तो वायु पानांत आल्यावर पानाच्या घटकपेशिजालांत असणाऱ्या पाण्याशीं अथवा पेशिरसाशीं संयोग होऊन त्याचें कर्वाम्ल तयार होतें. पेशिरसांत मुळ्याकडून शोषिलेले पोट्याशियम क्षारादि पदार्थ असतात. जरी या पदार्थांचा प्रत्यक्ष उपयोग संस्थापन-कार्यांत नसतो तथापि या विशिष्ट पदार्थांच्या अभावीं कर्वसंस्थापन-कार्य होऊं शकत नाहीं. म्हणजे असले उपयुक्त शोषित क्षार अप्रत्यक्ष रीतीनें कर्वसंस्थापन कार्यास अवश्य असतात. पेशिरसांतील या कार्यास प्रत्यक्ष उपयोगी पडणारा पदार्थ म्हणजे पाणी होय. या पाण्याचा कर्वाम्लवायूशीं संयोग होऊन झालेल्या कर्वाम्लाचें पृथक्करण हरित्--जीवनपिंडाकडून केलें जातें. एक भाग कर्व ( कार्बन ) व दोन भाग उज्ज (हायड्रोजन) व तीन भाग प्राण ( ऑक्सिजन ) असे घटक पदार्थ असतात. त्यांपासून एक भाग कारबन, दोन भाग हायड्रोजन व एक भाग ऑक्सिजन असे वायू असलेला एक फारमलडिहाइड नांवाचा संयुक्त पदार्थ तयार होतो; व सुटया ऑक्सिजनचे दोन भाग मोकळे होतात. हे ऑक्सिजनचे भाग हवेंत मिसळतात व ताबडतोब फारमलडिहाइड पदार्थाच्या दृढीकरणानें त्यापासून एक प्रकारची साखर तयार होते. साखरेचें पुढें सत्त्व बनतें. शरीरांत सत्त्व हाच पहिला दृश्य पदार्थ होतो. कांहीं शास्त्रज्ञांच्या मतानें कर्वाम्लवायू पानांत आल्यावर त्याचें कर्वाम्ल तयार होण्याची आवश्यकता नसते. त्या कर्वाम्लवायूचेंच पृथक्करण होतें. कर्वाम्लवायूमध्यें एक भाग कर्व व दोन भाग प्राण ( ऑक्सिजन ) असे घटक पदार्थ असतात. त्यांपासून कर्वएकप्राणिद ( कारबन मोनाक्साइड ) म्हणजे एक भाग कर्व व एक भाग प्राण ( ऑक्सिजन )असे वायू असणारा एक संयुक्त पदार्थ व एक भाग सुटा ऑक्सिजन अशा प्रकारचें त्याचें पृथक्करण होतें. कर्वाम्ल वायूप्रमाणेंच पानांत येणाऱ्या पाण्याचेंहि हायड्रोजन दोन भाग व ऑक्सिजन एक भाग असें पृथक्करण होतें. पहिला कर्वएकप्राणिद ( कारबन मोनाक्साइड ) व उज्जचे दोन भाग यांचा कांहीं विशिष्ट प्रमाणांत रासायनिक संयोग होऊन त्यापासून एक भाग कर्व, दोन भाग उज्ज व एक भाग प्राण असा एक सेंद्रिय पदार्थ तयार होतो व उरलेल्या प्राणाचे दोन्हीं भाग मोकळे राहून हवेंत मिसळतात. हा तयार होणारा सेंद्रिय पदार्थ एक प्रकारच्या साखरेसारखा असतो अथवा फारमलडिहाइडसारखा विषारी पदार्थ तयार होतो. मात्र पुढें फारमलडिहाइडपासून लगेच साखर होते व साखरेपासून सत्व बनतें.

फारमलडिहाइड हा विषारी पदार्थ असल्याकारणानें तिचें अस्तित्व सजीव शरीरांत अथवा जीवनपिंडांत मानणें योग्य नाहीं असें कांहीं शास्त्रज्ञांना वाटतें. पोलॅसी नांवाच्या शास्त्रज्ञानें हिरव्या सचेतन पानांत फारमलडिहाइड पदार्थाचें अस्तित्व फार सूक्ष्म प्रमाणांत वरचेवर आढळतें असें सिद्ध केलें आहे. तसेंच प्रकाशामध्येंच फारमलडिहाइड पदार्थ पानांत तयार होतो.एरव्हीं अंधारांत हा तयार होत नाहीं असें त्याच्या पाहण्यांत आलें आहे. यावरून हा पदार्थ हरित्जीवनपिंडाकडून पानामध्यें कर्व-संस्थापन क्रियेंत प्रथम तयार केला जातो व पुढें त्याचें दृढीकरण होऊन साखर होते व त्यास सत्वाचें दृश्य रूप येतें. यारीतीनें फारमलडिहाइड पदार्थाचा विषारीपणा जीवनपिंडास जाचक होत नाहीं.

साखर फारमलडिहाइड पदार्थापासून बनते पण साखरेपासून सत्त्व बनण्याची अवश्यकता कोणती अथवा त्यापासून फायदा कोणता असा प्रश्न उद्भवूं शकतो. तसेंच साखर ही विरणारी असल्यानें पानांत तयार झाल्यावर ती दुसऱ्या जागीं सुद्धां सहज जाऊं शकते. त्यास उत्तर एवढेंच देतां येईल कीं कर्व-संस्थापन होत असतांना साखर बनण्याचें प्रमाण बरेंच मोठें असतें. ह्याच वेळीं जरी साखर दुसरीकडे पाठविण्याची तजवीज केली तरी ती सर्व लवकर पानांतून दुसरीकडे जाणें शक्य नसतें व त्या अवधींत तिचें प्रमाण पानांत अधिकाधिक होत गेलें तर त्याचा परिणाम जीवनपिंडावर तसेंच जीवरसावर होऊं लागतो; त्यामुळें त्यांच्या कार्यांत अडथळा उत्पन्न होतो व तितक्या प्रमाणांत नवीन साखर उत्पन्न होण्याचें काम बंद होईल. म्हणून थोड्या वेळाकरितां त्या साखरेचे अविद्राव्य सत्वकण बसल्यानें जीवनपिंडाचें कार्य पूर्वीसारखेच झपाट्यानें चालू राहतें. व्हाइन्स नांवाच्या शास्त्रज्ञानें साखरेपासून सत्वकण बनण्यासंबंधी निराळी उपपत्ति दिली आहे. तो म्हणतो प्रथम विघटीकृत घटकापासून फारमलडिहाइड तयार होतें व त्याची साधी साखर बनते. ह्या साखरेच्या रसाशीं नायट्रोजन, गंधक व फॉस्फरस हे पदार्थ मिसळून नायट्रोजनयुक्त प्रतीद ( प्रोटीड) अगर ओजस पदार्थ तयार होतो. नायट्रोजन, गंधक व फॉस्फरस हे पदार्थ क्षारस्थितींत मुळांतून शोषिले जाऊन पानांत येतात अथवा पहिल्या प्रतीद पदार्थाचें पचन होऊन हे नायट्रोजनादि पदार्थ पानांत मोकळ्या स्थितींत आढळतात. त्यांचा साखरेच्या रसाशीं रासायनिक संयोग होऊन प्रतीद ओजस पदार्थ तयार होतो. हा प्रतीद पदार्थ जीवनपिंडाकडून पचविला जाऊन त्याचें जीवनपिंडाशीं पूर्ण सात्मीकरण होतें. पण लवकरच जीवनपिंडाकडून सत्त्वाची उत्पत्ति होऊन त्यास दृश्य सत्त्वकणाचें घनस्वरूप प्राप्त होतें. ह्याच रीतीनें तेल, सेल्युलोज वगैरे पदार्थ उत्पन्न होतात. बीजामध्यें तसेंच रताळीं, बटाटे वगैरे कंदादि भागांत जेव्हां जेव्हां पौष्टिक अन्नाची सांठवण होते, तेव्हां ह्याच रीतीनें जीवनपिंडाकडून तें पौष्टिक अन्न वेगळें होऊन त्या विशिष्ट भागांत सांठविलें जातें. म्हणजे प्रथम जीवनपिंडाकडून एखाद्या विशिष्ट

# वनस्पतीच्या पोषणासंबंधी प्रयोग.




प्र. १. यांत निरनिराळया द्रव्यांचा पोषणकार्याला उपयोग कितपत होतो हें ठरविण्याकरितां वॉटरकल्चर नांवाचा प्रयोग दाखविला आहे. अशा प्रयोगांत शुद्ध (डिस्टिल्ड) पाणी असलेल्या कांचपात्रांत वनस्पति लावून त्यांत पोषक क्षारांपैकीं कांहीं किंवा सर्व एकदम घालून वाढ कितपत तें ठरवितां येतें.




प्र. २. यांत वनस्पतीच्या मुळ्यांच्या द्वारें पाणी किती जोरानें ओढलें जातें तें दाखविलें आहे. कुंड्यांतील झाडाच्या दांड्याला रबराच्या ट्यूबनें एक कांच नळी जोडली आहे. व नळींत पारा आहे, मुळ्यांनीं आकर्षिलेलें पाणी दांड्याच्या द्वारें नळींत खेचल्यामुळें नळींतील पारा वर चढूं लागतो.

प्र. ३. यांत हेल्स नामक शास्त्रज्ञाच्या प्रयोगांत वनस्पतींतील जीवनरस (सॅप) काष्ठद्वारां (वुड) वाहतो असें सिद्ध केलें आहे. साल काढून घेतलेला दांड्याचा जो भाग आहे त्यावरील पानेंहि जगूं शकतात.







प्र. ४. या प्रयोगांत झाडाची तोडलेली फांदी पाणी असलेल्या नळीमध्यें खालचें टोंक ठेवल्यास पाणी आकर्षण करून जिवंत राहूं शकते, असें दाखविलें आहे. व आकर्षणाचा जोर किती असतो तें त्याच नळींत खालीं पारा असल्यास तोहि वर ओढला जातो, त्यावरून ठरवितां येतें.

प्र. ५

प्र. ६

प्र. ५. यांत वनस्पतींतून बाहेर पडणारा ऑक्सिजन वायु स्पष्ट निदर्शनास आणतां येतो. एका कांचपात्रांत जल-वनस्पति टाकून तिचीं टोकें टेस्ट-ट्यूबमध्यें घातल्यास टेस्ट-ट्यूबच्या वरच्या अंगास ऑक्सिजन वायु बुडबुड्यांच्या रूपांत जमा होऊं लागतो.

प्र. ६. यांत झाडांच्या श्वासोच्छ्वासाचा प्रयोग आहे. एका कांचेच्या चंबूंत फुलें ठेवून तो उलटा करून त्याचें तोंड एका पारा असलेल्या व त्यावर कॉस्टीक पोटॅशचें सोल्यूशन असलेल्या कांचनळींत घातलें आहे. तेथें उत्पन्न झालेलें कार्बानिक ॲसिड कॉस्टिक पोटॅशमध्यें आकर्षिलें जातें आणि त्या मानानें पारा वर चढूं लागतो

प्र. ७. वातावरणांतील हवा वनस्पतींच्या अंतर्भागांतून कशी ओढली जाते तें या प्रयोगावरून दिसून येतें. यांत एका बाटलींत एक कांचेची नळी व एक पान हवा न शिरेल अशा रीतीनें बसविलें आहे. नळीचे द्वारें हवा काढून घेतल्यावर बाहेरील पानाच्या अंतर्भागातून हवा ओढली जाऊन बुडबुड्यांच्या स्वरूपांत बाटलीमध्यें दिसूं लागते.

प्र. ८. या ऑक्झॅनोमीटर नामक यंत्रानें वनस्पतीची वाढ मोजतां येते. वनस्पतीच्या वरील टोंकाला दोऱ्याचें एक टोंक बांधून दुसऱ्या टोंकाला वजन बांधून तो दोरा एका पुलीवर ठेवला आहे. व त्या पुलीला एक कांटा जोडला असून त्या कांट्यानें प्रत्यक्ष वाढीच्या वीसपट वाढ दर्शविली जाते. तसेंच उजव्या हातच्या यंत्रांत ठराविक वेळांत वाढ किती झाली तें समजतें.






स्थितींत सात्मीकरण झाल्यापासून पुन्हां तो पदार्थ जीवनपिंडाच्या शरीरापासून वेगळा होतो. प्रत्यक्ष साखरेपासून सत्त्व तयार होतें असें आतां कोणी म्हणत नाहींत. जीवनपिंडाच्या प्रत्यक्ष साहाय्यानें त्यांच्या शरीरापासून असले पदार्थ उत्पन्न होतात असें सर्वसंमतसिद्ध झालें आहे.

प्रकाश व कर्वसंस्थापनः— हवेंतील कर्वाम्ल वायु शोषिला जाऊन त्यांतील पदार्थांचें संस्थापन वनस्पतिशरीरांत होतें. केवळ कर्व अशा स्वतंत्र स्थितींत त्याचें संस्थापन होत नाहीं. कोणत्याना कोणत्या तरी सात्त्विक सेंद्रिय पदार्थांत तें होत असतें. वनस्पति-शरीरांत पाण्याचा भाग तीनचतुर्थांशापेक्षां अधिक असतो. हा भाग सोडून उरलेल्या कोरड्या भागांत निम्म्याहून अधिक केवळ कर्व पदार्थांचा भाग असतो. इतका सगळा कर्व पदार्थ याच रीतीनें शरीरांत संस्थापित होतो. हें संस्थापनकार्य केवळ दिवसां प्रकाशांत चालतें. हें कार्य घडवून आणण्यास हरित्-जीवनपिंड व प्रकाश हींच कारणीभूत होतात. कर्वाम्ल वायूचें तसेंच पाण्याचें विघटीकरण हरित्जीवनपिंडाकडूनच प्रकाशांत होऊं शकतें. या विघटीकरणकार्यांत पुष्कळ शक्ति खर्च होते. कर्वाम्लवायूपासून कर्वएकप्राणिद ( कारबन मोनॉक्साइड ) बनण्यास अति उष्णतेची अवश्यकता असते. रसायन-प्रयोगशाळेंत असा पदार्थ बनविण्यास एक हजार सेंटिग्रेडहून अधिक उष्णतारूपी शक्तीची जरूरी लागते. इतकी उष्णतारूपी शक्ति वनस्पतीमध्यें कोठून उत्पन्न होते ? वनस्पतिशरीरांत इतकी उष्णता प्रकाशांतून मिळण्याची सोय असते. हरित्-जीवनपिंड प्रकाशांतील किरण शोषून यास उष्णतेच्या स्थितींत आणतात व अशा उष्णतेच्या शक्तीनेंच विघटीकरण-कार्य होत असतें म्हणजे सूर्यबिंबापासून निघणारा प्रकाश वनस्पतीस पोहोंचल्यावर त्याचें शोषण होतें व पुढें त्याचें रूपांतर उष्णतेंत होतें. हा शक्तीचा पुरवठा प्रकाशांतून झाला नसता तर सर्व जीवनकार्य बहुतेक बंद पडलीं असतीं. सूर्यनारायण प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष रीतीनें सर्व सचेतन सृष्टीस पोषण देतो. वनस्पतीची वाढ सुद्धां अप्रत्यक्षरीतीनें सूर्यप्रकाशावर अवलंबून असते. सर्व प्राणिवर्ग पोषणासाठीं वनस्पतीवरच अवलंबून असतो. कांहीं प्राणी मांसाहारी असतील पण त्या मांसाहारी प्राण्यांचें भक्ष्य अन्य प्राणी प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष वनस्पतीवर अवलंबून असतील. अर्थात् सर्व सचेतन सृष्टीचें जीवन सूर्यप्रकाशावर अवलंबून असते. तोच जगांतील सर्व सेंद्रिय पदार्थांचा उत्पादक आहे. त्याशिवाय नवा सेंद्रिय पदार्थ अस्तित्वांत येणें शक्य नाहीं.

कर्वाम्लवायूचा पुरवठाः—सर्व सेंद्रिय पदार्थांत कर्व हा एक अवश्य भाग असतो, किंबहुना सेंद्रियत्व येणें म्हणजे कर्वपदार्थाशीं एकरूप होणें होय असें कांहींनीं म्हटलें आहे. अर्थात् सर्व सेंद्रिय पदार्थ बनण्यास केवढ्या तरी कर्वाम्ल वायूची जरूरी पाहिजे. हवेंत त्या वायूचें प्रमाण फारच सूक्ष्म असतें. तेव्हां एवढा पुरवठा कोठून होतो ? पृथ्वीवरील ज्वालामुखी पर्वतांपासून पृथ्वीच्या पोटांतील कर्वाम्ल वायूचा लोट सारखा बाहेर पडतो. तसेंच ज्वालाप्रवाही झऱ्यांतून तो वायू वाहून हवेंत मिसळत असतो. सर्व सजीव सृष्टीच्या श्वासोच्छ्वासाबरोबर बाहेर पडणाऱ्या कर्वाम्लवायूचेंहि प्रमाण लक्ष्यांत घेण्यासारखें आहे. इतक्या सर्व ठिकाणाहून मिळणारा हा वायू एकत्र झाल्यावर हवेंतील त्या वायूचें प्रमाण वास्तविक किती तरी वाढलें पाहिजे. परंतु हवेंतील त्या वायूचें प्रमाण नेहमीं एकसारखेंच असतें. त्याचें कारण वनस्पतींकडून हा वायु शोषिला जाऊन त्यापासून सेंद्रिय पदार्थ बनतात हें होय. हवेंतील कर्वाम्लाचें प्रमाण जें आज हजारों वर्षें सारखें कायम आहे तें केवळ हीं दोन परस्परविरोधी कार्यें घडत असल्यामुळेंच आहे. सचेतन सृष्टीचा श्वासोच्छ्वास व वनस्पति-शरीरांत होणारें कर्व-संस्थापन हीं दोन कार्यें परस्परविरोधी आहेत. एकानें कर्वाम्लाचें प्रमाण वाढलें पाहिजे पण त्याच्या उलट दुसरी क्रिया वनस्पतिशरीरांत होत गेल्यानें पहिलीचा परिणाम नाहींसा होतो व या कारणामुळेंच वायूची समता आज लाखों वर्षें बिघडली नाहीं. एखाद्या विशिष्ट जागीं कांहीं कारणानें या वायूचें प्रमाण अधिक होण्याचा संभव आहे. पण हवा खेळती असल्यानें तो वायू दुसरीकडे पसरला जाऊन पूर्वीचेंच प्रमाण कायम राहतें. हल्लीं आढळणारें वायूचें प्रमाण पूर्वीपेक्षां फार कमी आहे. प्राचीन काळीं वनस्पतींची वाढ फार विस्तीर्ण होई. त्या काळीं वाढलेल्या वनस्पतींचीं अरण्यें जशींच्या तशींच कांहीं जागीं भूकंपासारख्या कारणांनीं जमीनीखालीं दडपलीं जाऊन त्यांच्या दगडी कोळशाच्या खाणी तयार झाल्या. तो काळ फार प्राचीन असावा. परंतु कालानुसार तें प्रमाण कमी होत जाऊन आज प्रस्तुतच्या स्थितीस पोहोंचलें व त्या प्रमाणांत वनस्पतींची वाढ कमी झाली.

कर्वसंस्थापनकार्यांत त्वग्-रंध्रांचा उपयोगः—कर्वाम्ल वायु शोषण करून घेण्यास त्वग्रंध्राचा मार्ग उपयोगी पडतो. पाणवनस्पतीमध्यें जें वाय्वांगीं आवरण असतें त्यांतून हा वायु आंत शिरण्यास अडचण पडत नाहीं. जमीनीवर उगवणाऱ्या वनस्पतींमध्यें त्वग्-रंध्राचा विशिष्ट योजना असते व त्यांतून तो वायु आंत शोषून घेण्यास सोय होते. प्रकाशांत त्वग्-रंध्रें उघडीं असतात. म्हणून प्रकाशांतच त्या रंध्रांतून त्या वायूचें शोषण होऊं शकतें. त्वग्-रंध्रें बंद असलेल्या स्थितींत तो वायु शोषिला जाणें शक्य नसतें. हा वायु शोषिला गेल्याशिवाय कर्वसंस्थापनकार्य घडणार नाहीं. अर्थात् प्रकाश, त्वग्-रंध्रें व हा वायु या तीन्हींचा या कार्याशीं अत्यंत निकट संबंध असतो.

नायट्रोजयुक्त प्रतीद (प्रोटीड) पदार्थ—ओजस् पदार्थः—वनस्पति-शरीरांत केवळ, सात्त्विक सेंद्रिय पदार्थ असतात

असें नाहीं, तर इतर सेंद्रिय पदार्थहि त्यावरोवरच आढळतात. सर्व सेंद्रिय पदार्थांमध्यें नायट्रोजनयुक्त पदार्थ अधिक महत्त्वाचे आहेत; कारण त्यापासूनच प्रतीद ( प्रोटीड ) किंवा ओजस् पदार्थ तयार होतात व हेच जीवरसाचे अथवा जीवनपिंडाचे खरे घटक होत. सात्त्विक पदार्थांचा उपयोग प्रतीद पदार्थ बनण्यास होतो किंवा जीवनकार्यास अवश्य लागणाऱ्या शक्तीचा पुरवठा करण्यांत होतो. सात्त्विक पदार्थांवर विशिष्ट रासायनिक कार्य घडून त्यांत नायट्रोजन, गंधक व फास्फरस हीं दुसरीं द्रव्यें मिसळून त्यापासून प्रतीद पदार्थ तयार होतो.

हवेमध्यें शेंकडा ८० टक्के नायट्रोजन-वायूचें प्रमाण असूनहि त्या वायूचा प्रत्यक्ष उपयोग वनस्पतींनां नायट्रोजनाकरितां जमीनींतून नायट्रोजनक्षार मुळयांकडून शोषून घ्यावे लागतात. हा शोध प्रथम वोसिंगॉल्ट नांवाच्या शास्त्रज्ञानें लाविला. जमीनींतून द्रवस्थितींत मुळयान्वयें नायट्रोजन क्षार इतर क्षारांवरोवर शोपिले जातात. ते शरीरांत आल्यावर त्यांवर रासायनिक क्रिया सुरू होऊन त्यांचें नत्राम्ल तयार होतें. ह्याचप्रमाणें गंधकाचे क्षार शोपिले जाऊन त्यांचें गंधकाम्ल तयार होतें. हीं दोन्हीं अम्लें व साधा फारमलडिहाइडसारखा पदार्थ अथवा साधी साखर ह्यांचा रासायनिक संयोग होऊन त्यापासून प्रतीद पदार्थ उत्पन्न होतो.

कित्येक शास्त्रज्ञांच्या मतानें जमीनींतील नायट्रोजनयुक्त सेंद्रिय पदार्थांवर सूक्ष्म जंतूंच्या विद्रावणक्रियेनें अमोनिया वायू मोकळा होतो व ह्या अमोनिया वायूवर हवेंतील आक्सिजन वायूचा परिणाम होऊन नायट्रेट—क्षार तयार होतात व ते मुळयान्वयें वनस्पतीच्या शरीरांत शोपिले जातात. शोपित नायट्रेट-क्षारापासून पुन्हां अमोनिया मोकळा होऊन ॲमिडो-ॲसिड तयार होतें, व ह्याचा सात्त्विक पदार्थांशीं संयोग होऊन त्यांत गंधकाम्लाचें मिश्रण झालें म्हणजे प्रोटीड पदार्थ बनतो. पहिल्या उपपत्तीपेक्षां ही उपपत्ति पुष्कळ शास्त्रज्ञांस मान्य आहे. कारण वनस्पतिशरीरांत ॲस्फरॅजिनसारखे ॲमिडो—ॲसिड पदार्थ पुष्कळ वेळां आढळतात. झाडाच्या वाढत्या भागांत हे पदार्थ आढळत नाहींत. कारण त्या जागीं वाढ होत असल्यानें पुष्कळ नवीन जीवनपिंड व जीवरस बनण्याची आवश्यकता असते; म्हणून त्या भागांतील सर्व ॲस्फरॅजिनसारख्या ॲमिडोॲसिडाचा सात्त्विक पदार्थांशीं संयोग होऊन प्रतीद पदार्थ बनतात व ह्या तयार झालेल्या प्रतीद पदार्थांचें सात्मीकरण होऊन जीवरसाचा व जीवनपिंडांची वाढ होते. ह्या कारणानें वाढत्या भागांत ॲस्फरॅजिनसारखे खुले नायट्रोजन पदार्थ आढळत नाहींत. तो वाढता भाग अंधारांत असला तर त्या भागांत ॲमिडो-ॲसिड पदार्थ आढळूं लागतात. ह्याचें कारण असें कीं तो वाढता भाग-सूर्यप्रकाशांत नसल्यानें सात्त्विक पदार्थांची उत्पत्ति होऊं शकत नाहीं. अर्थात् सात्त्विक पदार्थांच्या अभावीं त्या ॲस्फरॅजिन पदार्थांचा रासायनिक संयोग त्याशीं न होऊन ते पदार्थ मोकळ्या स्थितींत आढळणें साहजिक आहे. जेव्हां वाढता भाग प्रकाशांत असतो त्यावेळीं सात्त्विक पदार्थ उत्पन्न होऊन मोकळ्या ॲस्फरॅजिन किंवा ॲमिडो-ॲसिडसारख्या पदार्थांशीं रासायनिक संयोग होतो. संयोगानें उत्पन्न होणाऱ्या प्रोटीड पदार्थांचें पर्यवसान जीवरसांत होतें म्हणून त्यावेळीं असले ॲस्फरॅजिनसारखे पदार्थ मोकळे असूं शकत नाहींत.पण अंधारांत ह्याच्या उलट स्थिति होते.

वनस्पति-शरीरांत ॲस्फरॅजिन पदार्थ दोन रीतींनें उत्पन्न होण्याचा संभव आहे. पूर्व प्रोटीड पदार्थांचें पचन व विघटीकरण होऊन ॲस्फरॅजिन पदार्थ उत्पन्न होऊं शकतात; किंवा जमीनींतून नायट्रेड-क्षार शोषिल्यावर त्यापासून अमोनिया वायू मोकळा होऊन ॲस्फरॅजिन पदार्थ उत्पन्न होतात. अशा रीतीनें उत्पन्न होणाऱ्या ॲस्फरॅजिन पदार्थांपासून सात्त्विक पदार्थांच्या रासायनिक संयोगानें प्रतीद पदार्थ बनूं शकतात.

प्रतीद पदार्थांचें उत्पत्तिस्थानः—हे पदार्थ अमुक एका विशिष्ट जागींच तयार होतात असें नाहीं. वनस्पतीच्या सर्व सचेतन पेशिजालांत हे पदार्थ होऊं शकतात. एखाद्या विशिष्ट भागांत ते अधिक बनतात तर दुसऱ्या जागीं त्यांच्या उत्पत्तीचें प्रमाण फार कमी असतें. साधारणपणें पानांत अथवा पानासारख्या हिरव्या भागांत ह्यांची उत्पत्ति अधिक होते. स्फिपर नांवाच्या शास्त्रज्ञाचें असें म्हणणें आहे कीं ह्या पदार्थांची उत्पत्ति हरित्जीवनपिंड व सूर्यप्रकाश ह्यांवर अवलंबून आहे. खरोखर ह्या पदार्थांच्या उत्पत्तीस सूर्यप्रकाशाचा किंवा हरित्जीवनपिंडाचा अप्रत्यक्षच उपयोग असतो. केवळ प्रकाशांत हरित्-जीवनपिंडाकडून हे पदार्थ बनतात असें म्हणणें चुकीचें होईल. अंधारांत सुद्धां प्रतीद पदार्थ बनूं शकतात. आलिव वर्गांतील वनस्पती नायट्रेट-क्षारापासून आपल्या शरीरांत हे पदार्थ अंधारांत बनवूं शकतात. सात्त्विक पदार्थोत्पत्तीस अवश्य लागणारी शक्ति सूर्यकिरणांतून मिळते. तशी शक्ति प्रतीद पदार्थ बनविण्यास कोठून मिळते ? सात्त्विक पदार्थोत्पत्तींत सूर्यकिरणरूपी शक्ति गुप्तस्थितींत सांठविली जाते. त्या सांठविलेल्या शक्तीचाच उपयोग ह्या कामीं होतो. कारण ती गुप्त शक्ति दृश्य स्थितीस आणणारी एक स्वतंत्र जीवनक्रिया अहोरात्र वनस्पति-शरीरांत चालू असते. त्यामुळें सूर्यप्रकाश अप्रत्यक्षरीतीनें प्रतीद-पदार्थोत्पत्तीसहि कारणीभूत होतो. कांहींच्या मतानें ह्यास सूर्यप्रकाशाचा प्रत्यक्षहि उपयोग होऊं शकतो. प्रकाशांतील अस्मानी किरणाकडून हे पदार्थ बनण्यास साहाय्य होतें.

प्रतीद पदार्थांच्या रासायनिक पृथक्करणांत कारबन. हायड्रोजन, आक्सिजन व नायट्रोजन अशीं द्रव्यें आढळतात. तसेंच कांहीं ठिकाणीं फॉस्फरस व गंधक हींहि आढळतात,

प्रतीद् पदार्थांच्या राखेंत क्लोराइड, फास्फेट, सल्फेट, कारबोनेट वगैरे असून कॅलशियम, मॅग्नेशियम्, लोह व पोटॅशियम् क्षारांचाहि किंचित् अंश सांपडतो. वनस्पति—शरीरांत प्रतीद पदार्थास नेहमीं विशिष्ट वेगळा आकार येतो असें नाहीं. बहुतेक वेळां ते पदार्थ जीवरसाशीं सात्मीकृत झालेले असतात. कांहीं बीजांत नैसर्गिकपणेंच ते जीवरसापासून वेगळे होऊन त्यास विशिष्ट स्फटिकाकृति येते. एरंडीसारख्या सतैल बीजांत खाऊच्या पुड्यासारखा अथवा मयुरी चंबूसारखा आकार प्रतीद पदार्थास येतो. कांहीं ठिकाणीं साधारण लहानमोठा, वाटोळा आकार येतो.

अन्न-शोपणार्थ कांहीं खटपटी—स्वतः सेंद्रिय अन्न तयार करितां येत नाहीं अशा कांहीं वनस्पतींनां सेंद्रिय अन्नासाठीं दुसऱ्यावर अवलंबून राहावें लागतें. अशांनां परावलंबी वनस्पती अथवा वृक्षादनी म्हणतात. अमरवेल नांवाच्या वनस्पतीस नेहमीं दुसऱ्या वृक्षाची जरूरी असते. तिला कर्बाम्ल शोपून स्वतःच्या शरीरांत कर्ब-संस्थापन करितां येत नाहीं. कर्ब-संस्थापन-क्रियेस अत्यंत आवश्यक जें हरित्-द्रव्य तें त्या वनस्पतींमध्यें फारसें असत नाहीं. ती वनस्पति पिंवळट असते. मांसाहारी वनस्पतीसुद्धां ह्याच मालिकेंत येतात. त्या स्वतः सेंद्रिय अन्न तयार करण्याच्या भानगडींत न पडतां त्यांनां कीटकादि खाणेंच आवडतें. लहान किडे व कीटक भुलून त्यांच्या भक्ष्यस्थानीं पडण्यास मधुर रसोत्पादन करण्याची नैसर्गिक सोय त्यांच्या शरीरांत असते. मधुर रसास लुब्ध होऊन ते कीटक एकदां त्यांच्या तावडींत सांपडले म्हणजे पुन्हां त्यांनां बाहेर जाणें केव्हांहि शक्य नसतें. किडे पकडण्यासाठीं त्यांची शरीररचना विशिष्ट प्रकारची होते. कांहींच्या पानांचा देंठ पोकळ होऊन त्या पोकळींत पाचक-रस जमतो. देंठाचा वरील भाग झांकणासारखा बनलेला असतो. मात्र तें झांकण उघडें असतें. त्या उघड्या भागांतून रस पिण्याकरितां किडे त्या पोकळींत शिरतात. किडे आंत गेल्यावर वरील झांकण बंद होतें. आंतील रसांत ते किडे मरून जातात. हळूहळू त्यांच्या शरीरावर त्या अम्लरसांचा परिणाम होऊन त्या किड्यांच्या शरीरांतील सर्व सेंद्रिय पौष्टिक भाग विरून त्याचें वनस्पतिशरीरांत पूर्ण शोपण होतें.

कांहीं मांसाहारी वनस्पतींच्या पाल्यांभोंवर चारी बाजूंस पिंडमय केंस असून त्या आकर्षक होतात. केंसांच्या कोणत्याहि भागीं किडा बसला तर तो केंस मध्यभागाकडे वळून किडा मध्यबाजूकडे आणिला जातो. त्यावेळेस केंसांतून स्वादिष्ट, चिकट रस उत्पन्न होऊन त्यायोगें तो किडा पूर्णपणें पकडला जातो. पळून जाण्याकरितां जसजसा तो किडा धडपड करूं लागेल तसतसा अधिकाधिक रस चोहोंकडून येऊन त्याची धडपड व्यर्थ होते. ह्या रसांत तो किडा शेवटीं मरतो व त्याचें शरीर त्या रसांत विरघळून पहिल्याप्रमाणें त्याचें शोपण होतें. किडा केंसावर बसल्याचें ज्ञान त्या वनस्पतीस तात्काल होऊन प्रथम मध्यभागीं त्याला खेंचून चारी बाजूंकडून रस उत्पन्न करण्याची तजवीज होते. केंसांच्या बाजूवर जीवनपिंड असतात. केंसांवर किडा बसल्यानें ते उत्तेजित होऊन त्यांतून रस-स्राव होऊं लागतो. त्या किड्याच्या शरीरांतील सर्व उपयोगी पडण्यासारखा भाग शोपून झाल्यावर ती वनस्पति पुन्हां नवीन किड्याची वाट पाहूं लागते.

कित्येक वेळां दोन परस्पर भिन्न जातींच्या वनस्पतींचें साहचर्य होऊन त्यांपासून परस्पर फायदा होतो. त्यांपैकीं एक वनस्पति एक कार्य करिते. त्या दोन्हींचा परस्पर उपयोग असल्यामुळें त्या दोन्ही एकत्र राहूं इच्छितात. जें कार्य एकीला करितां येतें तें कार्य दुसरीकडून होणें शक्य नसतें. तसेंच दुसरीचें कार्य पहिलीस करितां येत नाहीं. पण त्या दोन्ही एकत्र राहिल्यानें दोन्हींच्या विशिष्ट गुणामुळें परस्पर फायदा होतो. अशा विशिष्ट संयोगास सहकारी साहचर्य असें म्हणतां येईल.

पाणकेशवर्ग व आलिववर्ग ह्यांमध्यें पुष्कळ वनस्पतींचा अशा प्रकारचा सहकारी संबंध येतो. पाणकेशांत हरित्-जीवनपिंड असल्याकारणानें, त्यांनां सात्विक सेंद्रिय पदार्थ बनवितां येतात. आलिववर्गांत त्यांचा अभाव असल्यामुळें ती गोष्ट त्यांनां साध्य नाहीं. परंतु हवेंतून पाणी अथवा ओलावा आलिव–वनस्पतींनां आपल्या धाग्यान्वयें शोपितां येतो. असल्या भिन्नधर्मीय दोन वनस्पतींचा संबंध एकत्र आला असतां, दोन्हींकडून दोन विशिष्ट कार्यें घडून दोहोंचाहि फायदा होतो. शिलावल्क अशाच पाणकेशीय व आलिव–वर्गांतील वनस्पतींच्या साहचर्यानें उत्पन्न होतें. शिलावल्क-वनस्पति म्हणजे दोन भिन्नवर्गीय वनस्पतींचा गुच्छच होय. त्या भिन्नवर्गीय वनस्पती एकत्र राहिल्यानें दोहोंचीं जीवनकार्यें सुरळीत चालतात.

कांहीं वनस्पतींच्या मुळयांवरील शोपक केंस कित्येक वेळां कांहीं कारणांनीं मरून जातात. अशा स्थितींत शोपक केंसांचें काम दुसऱ्या रीतीनें झालें नाहीं तर त्या वनस्पतींची उपासमार होऊन त्या मरून जातील. परंतु त्या मुळयांचा व जमिनींत असणाऱ्या कांहीं विशिष्ट आलिव वनस्पतीचा साहचर्य संबंध होऊन परस्पर फायदा होतो. जमिनींतील आलिव वनस्पती त्या मुळयांत घुसून आपण त्यांतून अन्नशोपण करतात पण त्याबरोबरच त्यांच्या धाग्याकडून जमिनींतून क्षारयुक्त पाणी शोपिलें जाऊन तें त्यांच्या मुळयांत येतें. जरी यामुळें यांतील थोडेंसें सेंद्रिय अन्न नाहींसें झालें तथापि क्षारयुक्त पाण्याचा पुरवठा त्याकडून झाल्यानें त्या मुख्य वनस्पतीचा तोटा होत नाहीं. कारण त्यावेळीं पाणी शोपण करणारे त्यांच्या मुळयावरील शोपक केंस नाहींसे झालेले असतात. परंतु हा विशिष्ट संबंध घडून दोघांचाहि फायदा होतो. ही स्थिति जंगलांत उगवणाऱ्या मोठमोठ्या उच्चवर्गीय वनस्पतींमध्यें सुद्धां आढळते. जर साहचर्यस्थितींत एक वनस्पति

कांहीं कार्य न करतां केवळ दुसऱ्यावर सेंद्रिय अन्नासाठीं अवलंबून राहील तर मात्र तो संबंध नुकसानकारक होतो. पण संबंध झाल्यावर दोन्हीं वनस्पती थोडीबहुत परस्परांस मदत करतील तर असा संबंध केव्हांहि नुकसानकारक होत नाहीं. अमरवेल दुसऱ्या वृक्षावर उगवून त्यामध्यें आपले शोषक धागे घुसविते व तद्द्वारां स्वतःचें केवळ पोषण करते. त्यामुळें अमरवेलीच्या आश्रयदात्या पोषक वृक्षाचा नाश लवकरच होतो. जेव्हां एखाद्या वनस्पतीवर आलिंबवर्गीय रोग पडतो तेव्हां सुद्धां अशाच प्रकारची स्थिति उत्पन्न होते. आश्रयदात्या वनस्पतीनें मेहनत करून स्वतःकरितां सेंद्रिय अन्न उत्पन्न करावें पण रोगोत्पादक दुसऱ्या वनस्पतीनें त्या अन्नावर ताव मारून त्याचा खुशाल उपयोग करावा ही स्थिति रोगपीडित वनस्पतीमध्यें आढळते.

बांडगुळें परावलंबी असतात, पण त्यांमध्यें हरित्‌जीवनपिंड असल्याकारणानें त्यांना स्वतंत्रपणें कर्ब-संस्थापनकार्य करतां येतें. त्यांचा जमीनीशीं प्रत्यक्ष संबंध नसल्यामुळें तीं ज्या झाडावर उगवतात. त्यांतून क्षार व पाणी एवढ्याच वस्तू शोषून घेतात. म्हणजे अमरवेलापेक्षां बांडगुळापासून कमी नुकसान होतें. जेव्हां आश्रयवृक्षाचीं पानें गळून सर्वत्र शिथिलता उत्पन्न होते, अशा वेळीं स्वतःच्या पानांत तीं सेंद्रिय पदार्थ बनवितात. व स्वतःची गरज भागवून उरलेलें सेंद्रिय अन्न आश्रयदात्या वृक्षासहि पोहोंचवितात. म्हणजे नेहमीं आश्रयदात्या वृक्षांतून जें कांहीं घेतलें जातें, त्याचा मोबदला किंवा स्वतःस आश्रयदात्या वृक्षांकडून सुरळीतपणें क्षारयुक्त पाणी मिळत जावें म्हणून त्यावेळीं त्याला थोडीबहुत मदत केली जाते.

शिंबीवर्गांतील वनस्पतींच्या मुळ्यांवर फोडासारख्या लहान लहान गुठळ्या येतात. या गुठळ्या म्हणजे सूक्ष्म जंतूंचे पुंज होत. ह्या सूक्ष्म जंतूंस हवेंतील खुला नायट्रोजन वायु शोषण करून स्व-शरीरांत नायट्रोजनयुक्त सेंद्रिय पदार्थ तयार करण्याची शक्ति असते. ते सूक्ष्मजंतु त्या मुळ्यांतून सेंद्रिय पदार्थ भक्षण करून शरीर-पोषणासाठीं त्या मुळ्यावर अवलंबून असतात पण स्वतः हवेंतून नायट्रोजन शोषून नायट्रोजनयुक्त सेंद्रिय पदार्थ त्या मुळ्यांत आयते तयार करून ठेवितात. अर्थात् मुळ्या व ते सूक्ष्म जंतु ह्यांचा परस्पर ' देवाण व घेवाण ' अथवा सहकारी संबंध येतो व त्यामुळें दोहोंचाहि परस्पर फायदा होतो.

जेव्हां वनस्पतींना स्वतः जमीनींतून क्षारादि पदार्थ शोषून स्वतंत्रपणें सेंद्रिय अन्नें बनवितां येतात, तेव्हां त्यांनां दुसऱ्या वनस्पतींची जरूरी नसते. पण जेव्हां स्वतःची एखादी बाजू लंगडी असते अशा वेळेस त्यांनां दुसऱ्याची मदत पाहिजे असते. सूर्यप्रकाशांत हरित्-जीवनपिंडांकडून-सात्त्विक सेंद्रिय पदार्थ तयार करणें हा सर्वसाधारण हरित्-वनस्पतींचा स्वभावधर्मच आहे. तसेंच सात्त्विक पदार्थांपासून नायट्रिक व सल्फ्युरिक अम्लांच्या संयोगानें प्रतोद--पदार्थ बनविणें हाहि त्यांचा जातिस्वभावच समजला पाहिजे. पण ह्या स्वभावाविरुद्ध कांहीं वनस्पती वागतात, अशा वेळीं त्यांमध्यें कांहीं व्यंग उत्पन्न झालें असतें. एक वनस्पति दुसऱ्या वनस्पतीवर आपला जीवन--कारभार चालविते, ह्याचा अर्थ असा कीं तिची स्वतंत्रपणें पोषण होण्यासारखी नैसर्गिक स्थिति नसते. त्यामुळें तिला परावलंबी होणें भाग पडतें. दुसऱ्या वनस्पतीवर सुलभतेनें जीवन चालेल अशी व्यवस्था त्या परावलंबी वनस्पतींत आपोआप उत्पन्न होते. प्राणरक्षणास लागणारें सेंद्रिय अन्न त्या वनस्पतीला कोठून तरी मिळविणें भाग असतें. तें प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें मिळविण्यासंबंधीं खटपट सर्व सचेतन सृष्टींत अहोरात्र चालू असते. कोणी दुसऱ्यास लुबाडून तें मिळवितात, तर कोणी तें स्वतः निराळ्या रीतीनें तयार करितात. इतकाच काय तो दोन्ही मार्गांत फरक असतो.

पा च क अ थ वा वि घ ट क र स.—कर्ब-संस्थापनक्रियेनें वेगवेगळ्या प्रकारच्या सात्त्विक पदार्थांची उत्पत्ति होते. सत्त्व, साखर, सेल्युलोज (पेशिकद्रव्य), इन्युलिन्, समेद ( मेदयुक्त, मेदस ) पदार्थ वगैरे निरनिराळ्या प्रकारचे पदार्थ वनस्पति- शरीरांत आढळतात. ह्यांची उत्पत्ति प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीनें कर्ब-संस्थापन-क्रियेवर अवलंबून असते. ह्या सर्व पदार्थांत कर्ब ( कार्बन ) हा प्रधान घटक असतो, एवढेंच नव्हे तर सर्व सेंद्रिय पदार्थांत कारबन पदार्थ प्रधान घटक असतो. वनस्पति--शरीरांत असा एकहि सेंद्रिय पदार्थ नाहीं कीं त्यांत कर्ब पदार्थाचा अंश नसतो. ह्या कर्बविशिष्ट सेंद्रिय पदार्थांचा उपयोग वनस्पति--जीवनांत अन्न ह्या दृष्टीनें फार मोठा असतो. नायट्रोजनयुक्त प्रतोद -पदार्थांत सुद्धां कर्ब पदार्थाचें अंग असतें. सात्त्विक पदार्थांपेक्षां नत्रयुक्त प्रोटीड--पदार्थ अधिक महत्त्वाचे असतात. कारण त्यापासून पुढें प्रत्यक्ष जीवरसाची उत्पत्ति होते.

ज्या ज्या भागांत वरील सेंद्रिय पदार्थांचा सांठा झालेला असतो, त्याच ठिकाणीं त्या पदार्थांचें पचन होण्यास अथवा पचन होण्यासारखी स्थिति उत्पन्न करण्यास पाचक द्रव्याची योजना झालेली असते. विशिष्ट सेंद्रिय पदार्थांस विशिष्ट रासायनिक बाधक द्रव्याची जरूरी असते. एकच पाचकद्रव्य सर्व ठिकाणीं सारखें उपयोगीं पडतें असें नाहीं. रताळीं, बटाटे, मका, गहूं वगैरे पाचक पदार्थांत सत्व सांठविलेलें असतें. केव्हां असलेल्या सत्वाचा उपयोग उगवत्या बीज--गर्भास व्हावयाचा असतो, अशा वेळीं त्या जागीं असणाऱ्या पाचक--द्रव्याचा परिणाम त्यावर होऊन त्याचा एक प्रकारचा सत्वरस अगर शर्करारस तयार होतो व ह्याच स्थितींत त्याचा उपयोग बीज--गर्भांत होऊं शकतो. सत्त्व हा पदार्थ पाण्यांत विरणारा नाहीं व कोणतीहि वस्तु पाण्यांत विरल्याशिवाय तिचा उपयोग होऊं शकत नाहीं. अर्थात् सत्वास शर्करा--रस स्थिति आणणें अवश्य असतें. ही स्थिति उत्पन्न करणारें

'डायस्टेज' नांवाचें पाचक द्रव्य असतें. जेथें जेथें सत्वाचा सांठा असतो, त्या त्या जागीं ह्या पाचक द्रव्याची योजना झालेली असते. जेव्हां पाण्याचा ओलावा बीजास मिळतो तेव्हां त्या ओलाव्यानें त्यांतील पाचक द्रव्य उत्तेजित होऊन आपली विघटक क्रिया सत्वावर करितें व त्याचा परिणाम असा होतो कीं, हळूहळू पूर्वीचे न विरणारे सत्वकण पाण्यांत विरून त्यापासून शोषणास योग्य असा शर्करा--रस तयार होतो. हें डायस्टेज पाचक द्रव्य बीजांतून पाण्यांत अथवा ग्लिसरीनांत वेगळें काढितां येतें व पुढें अलकोहलाचा उपयोग केला तर तळाशीं त्या द्रव्याचा साखाहि वेगळा होतो. डायस्टेजासारखीं इन्युलेज, ग्लयूकेज, सायटेज वगैरे पुष्कळ पाचक द्रव्यें शास्त्रवेत्त्यांनीं शोधून काढिलीं आहेत. खजूर, सुपारी वगैरे बीजांत सेल्युलोज नांवाचे पौष्टिक पदार्थ असतात. त्यांस विरविणारें पाचक द्रव्य सायटेज नांवाचें असतें. इन्युलिन नांवाचा सेंद्रिय पदार्थ डालिया वनस्पतीच्या मुळ्यांत पुष्कळ आढळतो. ह्या मुळ्या स्पिरिट अथवा अलकोहल ह्यांमध्यें ठेविल्या तर त्या इन्युलिन पदार्थाच्या स्फटिकाकृति बनतात. ह्याची फलशर्करा तयार करणारें पाचक द्रव्य इन्युलेज होय. इन्व्हरटेज नांवाच्या पाचक द्रव्यानें इक्षु--शर्करेचे लेव्ह्युलोज, डेक्सट्रोजसारखे पदार्थ तयार होतात. ऊंस, चुकंदर ( बीट ), वगैरेमध्यें असली इक्षु--शर्करा पुष्कळ असते. वनस्पति--शरीरांत तैलादि समेद (मेदयुक्त ) पदार्थ कसे उत्पन्न होतात ? ज्या पेशींत कर्बसंस्थापन होतें त्या पेशींत केव्हांहि तैलादि समेद पदार्थ सहसा नसतात. परंतु पुष्कळ बीजांत तैलादि पदार्थ सांठविलेले असतात. हे पदार्थ कर्ब पदार्थांपासून तयार होतात ह्यांत संशय नाहीं. कारण पानांतील हरित्--द्रव्यांकडून शोपिल्या जाणाऱ्या कर्बाम्ल वायूपासून जे कर्ब तयार होतात त्यांवर कांहीं विशिष्ट रासायनिक कार्य घडून कांहीं ठिकाणीं त्यांचें पर्यवसान हे तैलादि--पदार्थ उत्पन्न करण्यांत होतें. असले तैलादि समेद पदार्थ जेव्हां बीजांत अथवा बीजासारख्या दुसऱ्या भागांत सांठलेले असतात तेव्हां त्यांस 'लायपेज' नांवाच्या पाचक द्रव्यानें द्रवरूप येतें. ह्या पाचक द्रव्यानें त्यापासून मेदाम्ल व ग्लिसरीन बनून तीं दोन्ही पाण्यांत विरघळतात पण पुढें त्या मेदाम्लापासून साध्या द्रवरूप कार्बन पदार्थांत रूपांतर होऊन त्याचें पचन होतें.

तैलादि समेद पदार्थांप्रमाणेंच नायट्रोजनयुक्त प्रतीद पदार्थां--चेंहि ट्रिपसीन नांवाच्या पाचक रसानें पचन होऊन जीवरसाशीं त्यांचें सात्मीकरण होतें. सात्मीकरण झाल्यावर मागें ॲमिडो--ॲसिड नांवाचीं द्रव्यें शिल्लक राहतात. एरंडासारख्या बीजांत प्रतीद--पदार्थास विशिष्ट स्फटिकाकृति येते. इतर ठिकाणीं त्यास अमुक एक आकार येतो असें नाहीं. प्राणि--शरीरांत प्रतीद पदार्थांचें पचन होण्यास अशाच ट्रिपसीन--द्रव्याची जरूरी असते. वास्तविक वनस्पतींच्या व प्राण्यांच्या अन्नांत फरक नसल्यानें या अन्नाचें पचन होण्यास दोहोंतहि एकच प्रकारचीं पाचक द्रव्यें असतात. अन्नभेदाप्रमाणें भिन्न पाचक द्रव्याची जरूरी असते. प्राणिशरीराची रचना भिन्न असल्यानें त्यांत पाचक द्रव्यें उत्पन्न करणारे विशिष्ट पिंड असतात व त्यांतून जरूरीच्या वेळीं तसलीं द्रव्यें अगर रस उत्पन्न होण्याची नैसर्गिक तजवीज होत असते. पण वनस्पति--शरीरांत तशा प्रकारचे विशिष्ट पिंड असत नाहींत. पण जेथें पौष्टिक अन्नाचा सांठा असतो, त्याच ठिकाणीं त्या अन्नावरोबरच पाचक द्रव्याचा सुद्धां सांठा होतो. जेव्हां पाण्याचा ओलावा त्यास मिळतो, त्यावेळीं तीं पाचक द्रव्यें उत्तेजित होऊन तीं आपलीं विघटक अथवा पाचक कार्यें सुरू करतात. पाचक द्रव्यानें अविद्राव्य पदार्थास द्रवता येऊन तो पदार्थ द्रव-स्थितींत वनस्पति--शरीरांत पेशीपासून पेशींत पसरत जातो. कांहीं पदार्थांचा तात्काल उपयोग होतो व कांहीं पदार्थ अडचणीसाठीं अथवा पुढील उपयोगासाठीं झाडांच्या कांहीं भागांत सांठविले जातात. ह्या सेंद्रिय पदार्थांत प्रधान घटक कार्बन पदार्थ हा असतो. हा पदार्थ हवेंतून शोपिला जाऊन प्रकाशरूपी शक्तीमुळें शरीरांत संस्थापित होतो. ह्या कार्यांत प्रकाशांतील शक्ति त्या पदार्थांत गुप्त रीतीनें सांठविली जाते व तीच शक्ति श्वासोच्छ्वास कार्यांत मोकळी केली जाऊन ती सर्व जीवनकार्यास उपयोगी पडते.

**श्वा सो च्छ् वा स.**—सचेतन शरीराच्या अवश्य जीवन-कार्यांपैकीं श्वासोच्छ्वास ही एक फार महत्वाची क्रिया आहे. शरीर सचेतन आहे तोंपावेतों ही क्रिया अव्याहतपणें चालू राहते. ह्या क्रियेंत कांहीं प्रमाणांत बाह्य हवेंतून शरीरांत आक्सिजन--वायूचें शोषण होऊन उलट शरीरांतून कर्बाम्ल वायु व किंचित पाण्याचा अंश बाहेर येतो; बाह्य हवेंतून शोषून घेतलेल्या आक्सिजन वायूमुळें जीवरसाच्या घटकद्रव्यावर रासायनिक कार्य घडून शेवटीं त्यापासून कर्बाम्ल वायू व पाणी हीं उत्पन्न होतात. व ह्या दोहोंच्या बाहेर उच्छ्वास होतो. जीवरसाचीं घटक--द्रव्यें नेहमीं अस्थिर असतात. त्यांमध्यें एकसारखी घडामोड होत असते. शोपिलेल्या आक्सिजन वायूचा जीवरसाच्या घटक--द्रव्याशीं संयोग होऊन पूर्वापेक्षां त्यामध्यें अधिकच अस्थैर्य उत्पन्न होतें. त्यायोगें जीवरसाच्या घटक-द्रव्यांत विघटीकरण सुरू होऊन त्यापासून साधे व संकीर्ण संयुक्त पदार्थ उत्पन्न होऊं लागतात. त्यांपैकीं कांहीं संयुक्त पदार्थ पुन्हां जीव-रसांत सात्मीभूत होतात. ह्या रीतीनें तयार होणाऱ्या साध्या पदार्थांत कर्बाम्ल वायू व पाणी ह्यांची उत्पत्ति होते. जीव-रसास आक्सिजन वायु मिळाला नाहीं तर त्याचीं जीवन-कार्यें बंद होतात. जीवरसाचें चैतन्य कायम राखण्यास प्राण-वायूची आवश्यकता असते. प्राणवायूचा जीवरसाशीं संबंध-आल्यावर जीवनकार्य करण्यास त्यास उत्तेजनात्मक शक्ति मिळते. शरीरांत सांठविलेल्या सेंद्रिय पदार्थाचें विघटीकरण करून त्यांत उत्पन्न होणाऱ्या शक्तीनें जीवनकार्यास चालन

देणें हेंच श्वासोच्छ्वास-क्रियेचें मुख्य कार्य असतें. ह्या क्रियेंत एका वायूचें अंतःशोषण होऊन आंतून दुसऱ्या प्रकारचा वायु बाहेर पडतो म्हणून ह्यास 'श्वासोच्छ्वास' क्रिया म्हणतात. ही क्रिया सचेतनत्वाची खूण समजली जाते. दिवसां, रात्रीं, सुप्तावस्थेंत किंवा जागृतावस्थेंत ही क्रिया शरीर मृत होईपर्यंत चालू असते. ही क्रिया थांबणें म्हणजे मृत्यु येणें होय.

श्वासोच्छ्वास आणि कर्वसंस्थापन—तुलनाः—कर्वसंस्थापन-क्रियेंत तयार होणाऱ्या सेंद्रिय पदार्थांत प्रकाशाची किरणरूपी शक्ति गुप्त रीतीनें एकवटली जात असते. ती शक्ति श्वासोच्छ्वास-क्रियेंत मोकळी केली जाऊन जीवनकार्यें अव्याहतरीतीनें चालू राहतात. प्रकाशाच्या शक्तीचें रूपांतर सेंद्रिय पदार्थांत कर्व-संस्थापन-क्रियेंत होतें. पण ही शक्ति पुनः मोकळी होऊन जीवनकार्यास उपयोगी पडते. कर्वसंस्थापन व श्वासोच्छ्वास ह्या दोन कार्यांचा अति निकट संबंध आहे. एक कार्य नेहमीं चालूं असतें पण दुसरें कार्य कांहीं विशिष्ट परिस्थितींतच चालूं शकतें; एकास प्रकाशाची अत्यंत जरूरी तर दुसऱ्यास प्रकाश असो वा नसो तरी तें कार्य चालू राहतें. एकीनें कर्वाचे नवीन नवीन संयुक्त पदार्थ बनविले जातात अर्थात् त्यायोगें शरीराचें वजनहि पूर्वीपेक्षां अधिक होतें पण दुसऱ्या क्रियेनें त्या बनविलेल्या पदार्थांत विघटीकरण सुरू होऊन कर्वाम्लवायु व पाणी हीं द्रव्यें उत्पन्न केलीं जातात. एकानें नव्या पदार्थांची घटना होते, व दुसऱ्याकडून त्यांचा विघात होतो. असल्या विघातक क्रियेनें जरी जीवरस कमी कमी होत जातो, तथापि ह्या विघातक क्रियेंत बाहेर मोकळया होणाऱ्या शक्तीनें नवीन संघटनात्मक कार्यास चालन मिळून अधिकाधिक जीवरस उत्पन्न होत जातो. सर्व सचेतन पेशींत अशा प्रकारची घडामोड चालू असते. सर्व सचेतन पेशींत श्वासोच्छ्वास-क्रिया चालू असते. पण कर्व-संस्थापन-क्रिया मात्र पेशींत चालते असें नाहीं. ह्यास विशिष्ट जागा व विशिष्ट परिस्थिति ह्यांची आवश्यकता असते. जीवरसाकडून संस्थापित शक्तीचा विकास करणें हेंच श्वासोच्छ्वासाचें खरें स्वरूप आहे. श्वासोच्छ्वासांत शोषिल्या जाणाऱ्या प्राणवायूचा प्रत्यक्ष परिणाम जीवरसाच्या घटक पदार्थावर होतो, व त्यामुळें मोकळया होणाऱ्या शक्तीनेंच इतर सर्व जीवनकार्यें चालतात.

यावरून श्वासोच्छ्वासक्रियेचें महत्व कळून येणार आहे. कांहीं वेळ इतर जीवनक्रिया बंद राहिल्या तरी चालण्यासारखें असतें पण ही क्रिया चालू असणें अवश्य असतें, कारण ह्या क्रियेवर इतर सर्व क्रियांचा आधार असतो.

श्वासोच्छ्वासास मोकळी हवा पुरविण्याची सोयः—शरीराच्या सर्व सचेतन पेशींतून श्वासोच्छ्वासाची क्रिया चालू असते पण त्यांतील कित्येक पेशी अंतस्थ असतात. अशा पेशींनां ऑक्सिजनवायु मिळण्याची सोय कशी होते? खुली हवा सर्व शरीरांत खेळती राहण्यास योग्य अशी शरीरांतव्यवस्था होत असते. पानांतील त्वग्-रंध्रांतून बाह्य हवा आंत शिरल्यावर ती वातस्थानांत जमते. वातस्थानें शरीरांत चोहोंकडे असून त्यांचा परस्परांशीं संबंध जुडलेला असतो. त्यामुळें त्वग्- रंध्रांतून शिरणारी हवा वातस्थानांतून चोहोंकडे पसरत जाते व तद्द्वारा अंतःस्थ व खोल भागीं असणाऱ्या सचेतन पेशीस खुली हवा मिळण्याची सोय होते. हीं वातस्थानें उत्पन्न करण्याची व्यवस्था नैसर्गिक असते. ह्या वातस्थानांतून बाह्य हवा व शरीरांत उत्पन्न होणारे कर्वाम्लादि वायू ह्यांचा परस्पर संबंध येऊन ते आंत बाहेर खेळते राहतात. ह्या वातस्थानांतील खेळती हवा व बाह्य हवा अगदीं एकच प्रकारची असते असें नाहीं. भिन्न अवयवांत तसेंच भिन्न परिस्थितींत वातस्थानांतील खेळत्या हवेंत बदल होत जाणें साहजिक आहे. कर्वसंस्थापनेस उपयोगी पडणारा कर्वाम्लवायु अथवा श्वासोच्छ्वासक्रियेसाठीं शोषिला जाणारा प्राणवायू किंवा ह्यांत उलट उत्पन्न होणारा कर्वाम्लवायू वगैरे वायू त्वग्-रंध्रांतून व वातस्थानांतूनच खेळते राहतात. पाण्यांत उगवणाऱ्या वनस्पतींमध्यें त्वग्-रंध्रें असत नाहींत. अशा ठिकाणीं बाह्य हवा शरीरांत शिरण्यास अडचण पडते. म्हणून अशा वनस्पतीवर नेहमीं येणारें 'त्वक्कवच' येत नाहीं व पेशिभित्तिकेंतून पाण्यांत विरलेली हवा आंत शिरते.

कांहीं ठिकाणीं अडचण पडूं नये म्हणून प्रसंगाकरितां वातस्थानें मोठीं होऊन तीं हवेनें पूर्ण भरून जातात. ह्या हवेचा उपयोग त्यांनां वाटेल तेव्हां करितां येतो. कमळ, कांदे वगैरेमध्यें पानांच्या देठांत हवा भरलेली असते.

मोकळया हवेशिवाय श्वासोच्छ्वास चालणें, मोकळ्या हवेशिवाय, निदान उच्चवर्गीय अशा वनस्पतींत श्वासोच्छ्वास चालणें शक्य नसतें. कांहीं क्षुद्र आलिववर्गीय वनस्पतींमध्यें श्वासोच्छ्वासास मोकळ्या प्राणवायूची जरूरी नसते. ज्या सेंद्रिय पदार्थावर त्या आलिव-वनस्पतींचें पोषण चालतें, त्यांतूनच त्यांनां श्वासोच्छ्वासासाठीं प्राणवायू मिळवितां येतो. उंसाचा रस उघडा असला म्हणजे तो एक दोन दिवसांनीं फसफसून आंबट होऊं लागतो. ह्याचें खरें कारण, म्हणजे त्या रसांत उत्पन्न होणाऱ्या विशिष्ट किण्व वनस्पतींची श्वासोच्छ्वास-क्रिया होय. रसांत शर्करा ही खाद्य वस्तु असते. ह्या खाद्य वस्तूवर हवेंतील किण्वादि वनस्पतींच्या सूक्ष्म जननपेशी अथवा बीजकल्पें उगवून त्यांची तेथें श्वासोच्छ्वास-क्रिया सुरू होते. अशा वेळीं त्यांच्या पुष्कळशा पेशी त्या रसांत पूर्ण बुडालेल्या असतात. त्यांनां हवेंतून आक्सिजन वायु शोषून घेण्याची जरूरी भासत नाहीं. आक्सिजनासाठीं रसांतील सेंद्रिय-पदार्थाचें विघटीकरण त्या सुरू करितात. विघटीकरण चालूं झाल्यावर त्या संकीर्ण पदार्थांतील आक्सिजनाचा उपयोग श्वासोच्छ्वास-कार्यास होतो. निराळा मोकळा आक्सिजनवायु हवेंतून न शोषण करितां त्या संकीर्ण पदार्थांतीलच तो वायु ह्या

कार्यास उपयोगी पडतो. विघटीकरणांत कर्बाम्ल, अलकोहलादि पदार्थ उत्पन्न होतात.या रीतीनें श्वासोच्छ्वास करतो येण्याच्या शक्तीमुळें त्यांचा उपयोग पिण्याची दारू तयार करण्याकडे होतो. किण्व वनस्पतीसारख्या अशा दुसऱ्या पुष्कळ आलिंबवर्गीय वनस्पती आहेत कीं ज्यांना मोकळ्या ऑक्सिजनची जरूरी नसून त्या स्वतंत्रपणें सेंद्रिय पदार्थांत विघटीकरण सुरू करून आपली श्वासोछ्वासक्रिया चालवूं शकतात. वस्तु सडूं लागली असतां याच प्रकारें सूक्ष्मजंतूंची श्वासोछ्वासक्रिया चालू असते.सेंद्रिय वस्तु सडूं लागली म्हणजे तिच्यावर पोसल्या जाणाऱ्या सूक्ष्मजंतूंच्या विघटीकरणशक्तीनें वेगवेगळ्या रासायनिक क्रिया सुरू होऊन शेवटीं कर्बाम्ल, पाणी किंवा नायट्रोजनासारखीं साधीं द्रव्यें उत्पन्न होतात. विघटीकरणांत त्यास मिळणाऱ्या ऑक्सिजन वायूवर त्यांची श्वासोछ्वासक्रिया चालते. म्हणून फसफसणें, आंबणें किंवा सडणें या सर्वांस मूलभूत कारण म्हणजे 'श्वासोछ्वास 'क्रिया होय. या सर्व क्रियांत अंतिम उत्पन्न होणारे पदार्थ एकच प्रकारचे असतात.साध्या श्वासोछ्वासक्रियेस मोकळ्या ऑक्सिजनची अवश्यकता असते पण जेव्हां तो प्रत्यक्ष त्या स्थितींत मिळत नाहीं तेव्हां सेंद्रिय पदार्थांत विघटीकरण सुरू करून त्यांतील ऑक्सिजनचा उपयोग श्वासोछ्वासक्रियेकडे करतात.

उच्च वर्गांत सुद्धां कित्येक वेळां बीजें उगवतांना अशा प्रकारें श्वासोछ्वासक्रिया सुरू होते. पावट्यासारखीं बीजें उगवतांना अलकोहलादि पदार्थ उत्पन्न होतात. मात्र त्यांना मोकळा वायु त्या स्थितींत मिळूं देतां उपयोगी नाहीं.कांहीं विवक्षित वेळेपलीकडे त्यांना मोकळा वायु मिळालाच पाहिजे नाहींतर बीजें मरून जातात. अशा स्थितींत चालणाऱ्या श्वासोछ्वासक्रियेस 'अंतःश्वासोच्छ्वास' असें म्हणतात.खरोखर दोन्ही श्वासोच्छ्वास-कार्यांत तत्त्वतःफरक नसून ते केवळ ऑक्सिजनवायु मिळविण्याचे दोन मार्ग आहेत.

शरीराच्या घडामोडी.—श्वासोच्छ्वासक्रियेनें शरीरांतील सेंद्रिय पदार्थ मोडिले जातात. म्हणजे श्वासोच्छ्वासक्रिया विघातक आहे, पण त्याबरोबर हेंहि सुचविणें अवश्य आहे कीं त्यामुळें मोकळ्या होणाऱ्या शक्तीनें जीवनकार्य व्यवस्थित चालून शरीरावयव घटनात्मक कार्यास उत्तेजन मिळतें. असल्या विघातक परंतु उत्तेजक क्रियेनें जीवरसाच्या घटक द्रव्यांचें विघटीकरण होऊन तीं कमी होत जातात पण त्याबरोबर दुसरीकडून नवीन जीवरस तयार होण्याची तजवीज होत असते. नवीन सेंद्रिय पदार्थ बनणें व त्यांपासून रुपांतर होत जाऊन शेवटीं त्याचें जीवरसोत्पादनांत पर्यवसान होणें हीं सर्व कार्यें घटनात्मक आहेत व ह्यांस श्वासोच्छ्वास-क्रियेकडून उत्पन्न होणाऱ्या शक्तीमुळें चालन मिळतें. जीवरस तयार झाल्यावर त्यापैकीं कांहीं श्वासोच्छ्वासाच्या विघटीकरणांत नाहींसा होतो. परंतु नवीन जीवरसहि त्याबरोबरच उत्पन्न होत असतो. असल्या घडामोडीनें नुकसान होत नाहीं. शरीरस्वास्थ्यास असल्या घडामोडी नेहमीं चालू राहणें अवश्य आहे. नुसती विघातक क्रिया चालून नवीन सेंद्रियपदार्थोत्पादनाची परंपरा कायम न राहिली तर मात्र त्यायोगें नुकसान झालें असतें. केवळ विघातक क्रिया चालून कांहीं फायदा नाहीं. त्याबरोबरच घटनात्मक कार्यें चालून अधिक सेंद्रिय पदार्थ उत्पन्न झाले पाहिजेत. ह्या सर्वांचें अंतिम ध्येय म्हणजे जीवरसोत्पादन होय. जीवरस शरीरांत अधिक उत्पन्न होत गेला म्हणजे खरी शरीर--वृद्धि झाली. जीवरस अधिक उत्पन्न झाल्यावर नवीन वाढ होऊं लागते. शरीर-घटक भाग उत्पन्न करण्यांत जीवरस खर्चिला जातो पण तो जीवरस घटनात्मक क्रियांनीं पुन्हां नवीन बनतो. वनस्पतींचे-मुळ्या, खोड, पानें, फुलें, फळें वगैरे सर्व अवयव जीवरसाकडूनच उत्पन्न होतात. हे अवयव तयार होतांना जीवरसाचीं रुपांतरें होत होत शेवटीं त्यास विशिष्ट प्रकारचा कायम आकार येतो. ह्या रीतीनें जीवरस खर्चिला जाणें हें जीवन-दृष्ट्या फायदेशीर होतें. कारण त्यायोगें शरीर-घटक भाग निरनिराळे बांधिले जाऊन शरीर वृद्धिंगत होतें. एका पेशीपासून दुसरी पेशी उत्पन्न होणें किंवा पुष्कळ पेशींचा संघ एकत्र होऊन पेशिजालें व अवयव तयार होणें, ह्या सर्व गोष्टी शरीर-वृद्धीसंबंधीं असून शरीरांत चालणाऱ्या घडामोडींचीं द्योतक चिन्हें होत. अशी घडामोड झाल्याखेरीज शरीर-वृद्धि होणें शक्य नाहीं. अधिक घटनात्मक क्रिया चालून अधिक जीवरस उत्पन्न होईल. तो जीवरस स्थिर रहाणें शक्य नाहीं. त्याचें विघटीकरण होऊन त्यास स्थिर आकार येत जातो व ह्या स्थिर आकारासच आपण 'वाढ' म्हणतों.

वाढः—बीं रुजून रोपा तयार झाला व त्यावर खोड, फांद्या, पानें वगैरे भाग दिसूं लागले म्हणजे त्या स्थितीस आपण त्या बीजाची वाढ झाली असें समजतों. तसेंच पेशीपासून पेशी उत्पन्न होऊन त्या सर्व पेशींचा संघ एकत्र राहून मुख्य शरीराचा भाग मोठा होऊं लागला म्हणजे त्याची वाढ झाली अथवा वनस्पति एक पेशिमय असली पण तिचा पूर्वीचा सूक्ष्म आकार नाहींसा होऊन तिला मोठा आकार आला, तरी सुद्धां त्या पेशीची वाढ झाली असें समजतात. आतां ह्या सर्व स्थितींत असें आढळेल कीं अन्न द्रव्यें शोषिल्यावर त्यास सेंद्रियत्व येऊन त्यांचें जीवरसाशीं सात्मीकरण होतें व त्यामुळें अधिक जीवरस उत्पन्न होतो व जीवनपिंडांची संख्याहि अधिक होते. म्हणजे निरनिराळ्या पेशींची वाढ अथवा एखाद्या मोठ्या शरीराची वाढ हीं केवळ त्यांतील जीवरसाच्या व जीवनपिंडाच्या वाढीवर अवलंबून असते. वाढ म्हणजे केवळ मोठा आकार असें म्हणतां येणार नाहीं. पेशींत पाणी शोषिलें जाऊन त्यास मोठा आकार येतो व त्या पाण्याचा उपसा दुसऱ्या पेशींत झाल्यावर पुन्हां तो आकार संकुचित होतो. म्हणून नुसता आकार मोठा होणें हेंच केवळ खऱ्या वाढीचें चिन्ह नव्हे. रताळ्याच्या किंवा बटाट्याच्या

गांठींत सेंद्रियान्नें जमून त्यांस मोठा आकार येतो व त्यांचें वजनहि अधिक होतें; पण जोंपर्यंत त्यांत नवीन जीवरसाची अगर जीवन—पिंडांची उत्पत्ति होत नाहीं तोंपर्यंत त्यांत खरी वाढ झाली असें म्हणतां येणार नाहीं. कारण केवळ सेंद्रियान्नें एकेजागीं असणें म्हणजे जीवरस नव्हे. त्या सेंद्रिस अन्नांत जीवरसाची स्थिति येण्यास किती तरी जीवनात्मक रासायनिक क्रिया झाल्या पाहिजेत. बीजामध्यें सुद्धां सेंद्रिय अन्नाचा सांठा असून तीं फुगलेलीं असतात. पण जेव्हां तीं बीजें अथवा वर सांगितलेल्या बटाट्यांच्या गांठी उगवूं लागतात त्यावेळीं त्यांचें वजन जरी कमी झालें तथापि त्यांतील जीवरस अधिक होऊं लागतो. तेव्हां त्यांची खरी वाढ सुरू होते. त्या सेंद्रिय अन्नाचें पचन जीवरसाकडून होऊन अधिक जीवरसोत्पादन होतें व पुढें त्या जीवरसाचा खर्च नवीन पेशी किंवा पेशिजालें उत्पन्न करण्यांत होतो व हळू हळू पूर्व शरीर वाढत जातें. जीवरसाची उत्पत्ति होईपावेतों त्यामध्यें घटनात्मक कार्यें चालतात व पुढें जीवरसाचा खर्च होऊं लागून नवीन पेशी किंवा पेशिजालें तयार होऊं लागतात, त्यावेळीं विघटना सुरू होते. वाढींत घटनात्मक व विघटनात्मक कार्यांचा अंतर्भाव होतो. त्या दोन्ही कार्यांचें मूर्त स्वरूप म्हणजे शरीर—वृद्धि होय. म्हणून वाढ ही साधी एकच क्रिया नसून ती दुसऱ्या अनेक क्रियांची द्योतक आहे. घटना अगर विघटना होण्यास एकसारखें चालन मिळालें पाहिजे. हें चालन अगर उत्तेजन बाह्यपरिस्थितीनें जीवरसावर व जीवनपिंडावर होऊन त्यांच्याकडून प्रत्युत्तररूपी वाढीचें कार्य होतें. मात्र तें प्रत्युत्तर तात्काल उत्तेजनास असो अथवा पूर्वींच्या निरनिराळ्या उत्तेजनांच्या समुच्चयास असो. घटना व विघटना हीं दोन्ही उत्तेजनप्रत्युत्तररूपींच कार्यें होत व वाढसुद्धां त्यावरच अवलंबून असते.

वाढीस लागणाऱ्या आवश्यक गोष्टी, अन्नः—अवश्य पदार्थांत अन्नास पहिला मान असतो. अन्नाशिवाय जीवरस व जीवनपिंड वाढणें अथवा पुष्ट होणें शक्य नाहीं. भरपूर अन्न मिळाल्यावर त्याचें पूर्ण पचन अथवा सात्मीकरण होऊन जीवरसाची परंपरा कायम राहते व त्यामुळें नवीन घटनात्मक कार्यास जोर मिळतो. अन्नाच्या अभावीं जीवनकार्यें शिथिल होतात. म्हणून ज्या ठिकाणीं नवीन वाढ होत असते त्या जागीं अन्नरस–प्रवाह सारखा येत राहणें अवश्य असतें.

पाणीः—अन्नाइतकीच वाढीस पाण्याची अवश्यकता असते. कारण पाण्याविना शोषणादि जीवनकार्यें चालू शकणार नाहींत. पेशींत पाणी भरल्याशिवाय पेशिभित्तिकेवर तणाव उत्पन्न होणार नाहीं व तणावाशिवाय पेशींच्या वाढीस उत्तेजन मिळणार नाहीं. म्हणजे प्रत्येक सचेतन पेशीच्या वाढीस पहिलें उत्तेजन केवळ पाण्यानें उत्पन्न होणाऱ्या तणावामुळें मिळतें. तणावानें बाह्यांगीं फुगलेली पेशिभित्तिका फाटण्याचा संभव असतो. परंतु ही स्थिति येऊं न देण्याकरतां पेशींतील जीवनपिंडाकडून सेल्युलोज द्रव्याचा थर भित्तिकेच्या आंतील अंगास जमविला जातो व त्यामुळें पेशिभित्तिका अधिक जाड व टणक होते. अर्थात् अधिक पाणी शोषिलें जाऊन अधिक तणाव सहन करण्यासारखी ताकद त्यांत उत्पन्न होते. म्हणजे तणावामुळें पेशिभित्तिकेच्या वाढीस सुरवात होते व तीस वेगवेगळा आकार येत जातो. पाण्यानें जी स्थिति एका सचेतन पेशींत उत्पन्न होते तीच स्थिति हळूहळू इतर पेशींत उत्पन्न होऊन त्यांचीहि वाढ होत जाते. वाढत्या कोंबांत अन्न पाण्यांतून येतें. सेंद्रिय अन्न तयार झाल्यावर तें वाढत्या कोंबांत पेशींतून पसरणें किंवा त्याची पुढील जीवरसांत विल्हेवाट होणें ह्या सर्व वाढीच्या गोष्टी पाण्यावर अवलंबून असतात.

उष्णताः—जीवरसाच्या व जीवनपिंडाच्या घटनात्मक कार्यास कांहीं विशिष्ट उष्णतेची जरूरी असते. मात्र भिन्न वनस्पतींमध्यें वाढीसंबंधीं उष्णतेचें प्रमाण भिन्न असतें. अति कडक उष्णतेच्या अगर थंडीच्या स्थितींत वाढ अजावात थांबते. आर्टिक महासागरांतील उष्णतेच्या अंशाचें प्रमाण कांहीं जागीं जवळ जवळ शून्य असतें. तथापि त्या ठिकाणीं कांहीं पाणकेशांच्या जाती वाढूं शकतात. बॅक्टिरियासारख्या सूक्ष्म वनस्पती उकळणाऱ्या पाण्यांत सुद्धां दम धरून वाढूं शकतात. त्या विशिष्ट पाणकेशांची थंडी अथवा बॅक्टिरियांची उष्णता ह्या दोन्ही स्थिती साध्या वनस्पतींना केव्हांहि मानवणार नाहींत. उष्णतेमुळें जीवनपिंडास कमी अधिक जोराचें उत्तेजन मिळून त्यांच्या घटनात्मक कार्यांत फरक होत जातो.

मोकळी हवाः—वाढीस आक्सिजन वायु अवश्य लागतो हें निराळें सांगण्याची जरूरी नाहीं. कारण त्याशिवाय श्वासोच्छ्वास-क्रिया चालणें शक्य नाहीं. व श्वासोच्छ्वास क्रियेनेंच सर्व घटनात्मक कार्यास शक्ति पुरविली जाते. आक्सिजन वायु हा वनस्पतींना प्रत्यक्ष खाद्य पदार्थ म्हणून उपयोगी पडतो असें नाहीं तर त्यायोगानें पूर्वी सांठविलेल्या सेंद्रिय पदार्थांचें विघटीकरण सुरू होऊन घटनात्मक कार्यास शक्ति पुरविली जाते.

सर्व आवश्यक गोष्टींची पूर्तता असूनहि सचेतन पेशींची वाढ सर्वकाळीं सारखी होईल असें नाहीं. वाढीचा प्रारंभ सूक्ष्म प्रमाणांत होऊन ती पूर्णावस्थेस पोहोंचते व पुन्हां कमी कमी होत शेवटीं अगदीं नाहींशी होते. उत्पत्ति, परिणति व लय ह्या तीन्ही स्थिती प्रत्येक ठिकाणीं सारख्याच आढळतात. वाढत्या भागांतील पेशींत जीवरस व जीवनपिंड अधिक अस्थिर असतात. त्यामुळें तेथें पेशि-विभाग एकसारखा होत जाऊन पुष्कळ नवीन पेशींची उत्पत्ति होते. पण ही पेशि-विभाग-शक्ति एकाच ठिकाणीं फार वेळ टिकणें शक्य नसतें. जुन्या पेशींतील ती शक्ति नाहींशी होऊन ती केवळ नवीन उत्पन्न होणाऱ्या पेशींमध्यें आढळते व हळूहळू

जुन्या पेशींना कायमचें स्वरूप प्राप्त होतें. वरचेवर नवीन पेशींची उत्पत्ति होत गेल्यानें शरीरवृद्धि होते व ह्याच रीतीनें सर्व अवयवांची वाढ होते.

प्रथम पेशीची विभाग-शक्ति जोराची असल्यामुळें शेंकडों नवीन पेशी उत्पन्न होतात. त्यांतील जीवरस व जीवनपिंड एकसारखे वृद्धिंगत होत असतात. पण कांहीं कालानें ती शक्ति कांहीं विशिष्ट पेशींतच संकलित होते व पुढें पुढें तेथून तीहि नाहींशी होते. ह्या स्थितींत त्या अवयवास पूर्ण व कायम स्वरूप प्राप्त झालेलें असतें. तसेंच अवयवाच्या प्रत्येक बाजूच्या पेशींची वाढ एकसारखी होते असें नाहीं. त्यामुळें बाजूबाजूच्या वाढींत सुद्धां फरक होतो. हंसराजाच्या पानांत अग्राकडून बुडाकडे एक खोपेवजा गुंडाळी झालेली असते. ह्याचें कारण असें कीं पोटाकडील बाजूपेक्षां पाठीकडील बाजूच्या पेशी अधिक तणागल्या जाऊन त्यांची त्या बाजूची वाढ अधिक होते. ह्यामुळें त्या पानाची अग्राकडून बुडाकडे गुंडाळी बनते. पुढें पोटाकडील अथवा वरील बाजूच्या पेशी अधिक तणाणूं लागतात व वाढीचें क्षेत्र बदलतें तेव्हां आपोआप ती गुंडाळी सुटून पान सरळ, उभें व ताठ होत जातें. अर्थात् बाजूच्या वेगवेगळ्या वाढीनें असा फरक होतो.

प्रकाश, जमीनींतील क्षार, हवा, गुरुत्वाकर्षण, पाणी वगैरे निरनिराळ्या गोष्टींचा परिणाम अप्रत्यक्ष रीतीनें शरीरवृद्धीवर होतो व त्यायोगें शरीरास वेगवेगळे आकार प्राप्त होऊन ते वेगवेगळ्या दिशेकडे पसरतात. मुळ्यांची वाढ जमीनींत होणें किंवा फांद्या व पानें जमीनीबाहेर हवेंत पसरणें वगैरे वाढीचे चमत्कार वरील कारणामुळें घडून येतात.

संवेदना अथवा ज्ञान.—वनस्पतीच्या सभोंवतालची परिस्थिति केव्हांहि एकसारखी फार वेळ टिकणें शक्य नाहीं. त्यांत बदल सारखा होत असतो. बदलाप्रमाणें वनस्पतीस वेगवेगळें उत्तेजन मिळून परिस्थिति व त्या वनस्पतीचा जीवनक्रम ह्यांमध्यें एकवाक्यता उत्पन्न होते. वेगवेगळ्या उत्तेजनाप्रमाणें वनस्पति आपला जीवनक्रम बदलीत असते. अन्नद्रव्यांत कांहीं विघातक पदार्थ असला कीं तावडतोब त्याचा परिणाम जीवरसावर व जीवनपिंडावर होतो. उपासमार झाली अथवा श्वासोच्छ्वास—कार्यांत ऑक्सिजन वायूच्या कमतरतेमुळें अडचण पडूं लागली, किंवा हवेमध्यें उष्णतेचें प्रमाण कमी अधिक वाढूं लागलें तर त्या त्या विशिष्ट गोष्टीप्रमाणें वनस्पतीवर चांगला अथवा वाईट परिणाम होऊं लागतो. म्हणजे वनस्पतींची जीवनात्मक कार्यें जीवरसाकडून अथवा जीवनपिंडाकडून वेगवेगळ्या परिस्थितीप्रमाणें बदलली जातात. ह्या बदलण्याचा अर्थ एवढाच घ्यावयाचा कीं परिस्थितीची जाणीव जीवरसास अगर जीवनपिंडास होते. बाह्य उत्तेजन स्वीकारून त्यास प्रत्युत्तर देणें म्हणजे जाणीव असणें होय. उत्तेजन ग्रहण करणें, त्यास प्रत्युत्तर देणें अथवा तें उत्तेजन मिळालें आहे त्याची अन्य रीतीनें खात्री पटविणें वगैरे क्रियांमध्येंच जाणीवेचा अंतर्भाव होतो. जमीनींत बीजें वेडीं वांकडीं उगवत असलीं तरी नेहमीं मुळ्यांचा मोड जमीनींत घुसणें व खोडाचा अंकूर जमीनीबाहेर वाढणें, तसेंच फांद्या लांब आंखूड होणें, किंवा पानें एकमेकाखालीं न येतां तीं साधारणपणें प्रकाशाकडे कलतीं राहणें वगैरे चमत्कार उत्तेजन—प्रत्युत्तर कार्यांचीं द्योतक रूपें आहेत. उत्तेजनादि कार्यांचा संकलित परिणाम वनस्पतीच्या वाढीवर होतो. कित्येक वेळां उत्तेजन मिळण्याचें ठिकाण वेगळें व त्यास प्रत्युत्तर मिळण्याची जागा वेगळी असें होतें. म्हणजे त्या दोन्ही कार्यांची जागा एकच असते असें नाहीं. ह्यावरून असें म्हणतां येईल कीं परिस्थितीचें ज्ञान वनस्पतीस मिळून त्या ज्ञानाप्रमाणें कमी अधिक फरक त्यांच्या शरीररचनेंत होतो. पाण्याच्या शोधार्थ मुळ्या लांबवर पसरत जाणें, प्रकाशाकडे फांद्या कलत्या राहणें, कीटकभक्षक 'ड्रासेरा' वनस्पतीच्या केंसांतून मधुर रसस्पर्श झाला असतां वाढूं लागणें, लाजाळूचें लाजणें, सूर्यकमळाचें प्रकाशाप्रमाणें माना फिरविणें वगैरे गोष्टी वनस्पतींनां ज्ञान ग्रहण करण्याची शक्ति असल्याबद्दलचीं प्रत्यक्ष उदाहरणें आहेत.

ज्ञानतंतुः—विशिष्ट प्रकारचें ज्ञान एकदां झाल्यावर तें दुसऱ्या जागीं पोंहोंचविण्याची योजनाहि शरीरांत असते. मात्र वनस्पतिशरीरांत प्राणिवर्गापेक्षां ही योजना वेगळ्या तऱ्हेची असते. प्राणिवर्गांत ज्या ज्ञानतंतूकडून जागचें ज्ञान दुसऱ्या जागीं पोंहोंचाविलें जातें त्या ज्ञानतंतूंचें जाळें सर्व शरीरांत पसरलेलें असून जागजागीं त्यांचे विशिष्ट पुंजके असतात व सर्वांचा संबंध डोक्यांत असतो. अशा प्रकारची ज्ञान वाहण्याची रचना वनस्पति-शरीरांत असणें शक्य नाहीं; पण सचेतन अशा पेशींचा सर्व शरीरांत संबंध आल्याकारणानें त्यांतील जीवरसांतून अगर जीवनपिंडाकडून एका ठिकाणचें ज्ञान दुसऱ्या जागीं पोंहोंचविलें जातें. शरीरांतील सर्व सचेतन पेशींतील जीवरसाचा परस्पर संबंध असतो व हा संबंध जोंपावेतों कायम असतो, तोंपर्यंत त्यांतून ज्ञानवाहनास फार उत्तम सोय असते. जीवरसाच्या घटकपदार्थांत संकोच अगर विकास होऊन तज्जन्य फरकाचें ज्ञान चोहोंकडे पोहोंचविलें जातें. थंडीमुळें अथवा उष्णतेनें ज्ञान पोंहोंचण्याच्या गतींत फरक होतो. फार कडक उत्तेजन मिळालें असतां त्यापासून उत्पन्न होणारा संकोच अगर विकास तितक्याच जोराचा असतो. थकव्यामुळें ज्ञानशक्तिहि मंदावते. जर ज्ञानतंतूचें काम केवळ एका जागचें उत्तेजन दुसऱ्या जागीं पोंहोंचाविणें एवढेंच असेल तर वनस्पति-शरीरांत सुद्धां ज्ञानतंतू असतात. सचेतन पेशी, पेशिमालिका अगर परंपरा, कीं ज्यांतून ग्रहण केलेलें उत्तेजन दुसऱ्या जागीं पोंहोंचविलें जातें व उलट त्या उत्तेजनास मिळणारें प्रत्युत्तर तशाच मार्गें पोंहोंचतें, त्यांसच ज्ञानतंतु

म्हणणें भाग आहे. ही ज्ञानतंतु-रचना संकीर्ण नसून वनस्पतींच्या साध्या जीवनास योग्य तशीच ती असते.

वं श वृ द्धि.—पेशींच्या कमी अधिक वाढीप्रमाणें वनस्पति कमी अधिक प्रमाणांत मोठी होते. जोंपर्यंत नवीन वाढणाऱ्या पेशी एकाच शरीरांत राहतात, तोंपर्यंत एकाच व्यक्तीची वाढ होत असते. परंतु जेव्हां पेशिविभागानें उत्पन्न होणाऱ्या नवीन पेशी परस्पर वेगळ्या होऊन आपला जीवनव्यवहार स्वतंत्ररीतीनें चालवूं लागतात, त्यावेळीं पुष्कळ व्यक्तींची वाढ होते. जेव्हां पेशी एकत्र राहतात, तेव्हां त्यांकडून होणाऱ्या जीवनकार्यांचा उद्देश एकाच व्यक्तीच्या स्वास्थ्यासंबंधीं असतो. पण वेगळें शरीर उत्पन्न झालें की प्रत्येकाचा जीवनक्रम वेगळा होतो. वेगवेगळीं स्वतंत्र कार्यक्षम शरीरें उत्पन्न होणें म्हणजे वंशवृद्धि होणें होय. जीवनकार्यांपैकीं वंशवृद्धि होणें हें एक फार महत्त्वाचें आवश्यक कार्य आहे. प्रत्येक शरीरास मरण अगर लय ही स्थिति केव्हां ना केव्हां तरी प्राप्त होते. जर मरण ही स्थिति नैसर्गिक आहे तर प्रजोत्पादन अगर पुनरुत्पत्ति करून मरणामुळें होणाऱ्या वंशऱ्हासाचें नुकसान भरून काढणें ही स्थिति सुद्धां साहजिकच आहे. एकच शरीर अव्याहतपणें सचेतन राहिलें तर वंशवृद्धीची जरूरी नाहीं. पण ती गोष्ट शक्य नसते. म्हणून शरीर नाहींसें होण्यापूर्वी त्यापासून तत्सदृश नवें शरीर उत्पन्न होणें अवश्य असतें. क्वचित् प्रसंगीं एखादी वनस्पति रोगरहित राहून भरपूर अन्न मिळून पुष्कळ काळ वांचू शकेल. ह्या स्थितींत तिला वंशवृद्धि करण्याची आवश्यकताहि वाटणार नाहीं. परंतु कारणपरत्वें अन्नग्रहणादि व्यवहारांत फरक पडून शरीर-वृद्धि थांबेल व ही स्थिति पुढें राहिली तर तें पूर्व शरीर ढासळून समूळ नष्ट होण्याची भीति असते. अर्थात् ही प्रतिकूल स्थिति प्राप्त होण्यापूर्वी अथवा त्या स्थितीचा प्रारंभ होतांच तावडतोब वंशवृद्धीची तजवीज करणें अवश्य असतें. ही तजवीज करीत असतांना केवळ एकच नवीन शरीर उत्पन्न न करतां शेंकडों नवीन शरीरें उत्पन्न करणें अवश्य असतें. कारण ह्या उत्पन्न केल्या जाणाऱ्या शरीरांपैकीं शेंकडों शरीरें जीवनस्पर्धेत नाहींशीं होण्याचा संभव असतो. नाहींशीं होऊन उरलेल्यांपैकीं निदान एखादें दुसरें तरी वंशवृद्धीस उपयोगीं पडावें म्हणून ही योजना असते. एखादेंच शरीर उत्पन्न झालें व पुढें कांहीं कारणानें तें नाहींसें झालें तर वंश खुंटून ती पूर्व वनस्पति अस्तित्वांत होती किंवा नव्हती अशी स्थिति उत्पन्न होण्याचा संभव आहे. पूर्व वंशाची परंपरा सतत पुढें चालविणें हें सर्व जीवनकार्यांचें अंतिम ध्येय आहे असें वाटतें. ह्या कार्यांत आत्मरक्षणाचा अंतर्भाव होतो. पोषण व पुनरुत्पादन हींच कार्यें सचेतनत्वाचीं खरीं लक्षणें होत व ह्याहि कार्यांत आत्मरक्षणाचा हेतु असतो. आत्मरक्षणास शरीरवृद्धि तसेंच वंशवृद्धि घडवून आणणें अवश्य असतें. केवळ एकाच गोष्टीवर तें कार्य होऊं शकणार नाहीं. म्हणून शरीरवृद्धीनंतर वंशवृद्धि व पुनः वंशवृद्धींत शरीरवृद्धि होऊं देणें अवश्य असतें.

वंशवृद्धीचे प्रकारः—वंशवृद्धि वेगवेगळ्या रीतीनें होत असते. कांहीं ठिकाणीं वनस्पतीच्या सुप्त कलिका वंशवृद्धीस उपयोगी पडतात. यांनां 'डोळे' असें म्हणतात. अळू, गुलछबू, केळ वगैरेंमध्यें असल्या डोळ्यांकडून वंशविस्तार होतो. जमिनीवर पसरत जाणारी गवताची प्रत्येक धांवती फांदी सुद्धां अशाच रीतीनें वंशवाढीस उपयोगी पडते. जाई, जुई, मोगरा वगैरे फुलझाडांच्या फांद्या जमिनीवर पसरून जागजागीं त्यापासून मुळ्या फुटतात व अशा मुळ्या फुटलेल्या फांद्यांचीं स्वतंत्र रोपटीं तयार होतात. कलमापासून अगर फांद्यांपासून जीं झाडें तयार होतात त्याचें मुख्य कारण म्हणजे त्यावरील डोळेच होत. रताळीं, गोराडू, बटाटे, ऊंस वगैरे पिकांत नेहमीं वंशवृद्धीस डोळ्यांचाच उपयोग असतो.

जेव्हां खोडावर अगर फांद्यावर असल्या कळ्यांची उत्पत्ति होऊं लागते त्यावेळीं ती उत्पत्ति केवळ शरीरवृद्धीसाठींच असते. कळ्या वाढून त्यांच्या फांद्या होणें हें लक्षण केवळ शरीरवृद्धीचेंच आहे. पण कारणपरत्वें शरीरवृद्धि करणाऱ्या कळ्यापासून वंशवृद्धि साधते.अशा ठिकाणीं शरीरवृद्धि व वंशवृद्धि या दोहोंत फरक नसतो.याचें कारण म्हणजे वनस्पतीचें शरीर हें एकत्र राहणाऱ्या पुष्कळ पेशींचा संघ होय.संघांतील कांहीं पेशी स्वतंत्र होतात व आपला जीवनक्रम स्वतंत्र चालवितात. त्यांपैकीं पुष्कळ एकत्रच राहून तो संघ पुष्ट करतात. सूक्ष्म वनस्पतींत पोषण व पुनरुत्पादन हीं दोन्हीं कार्यें प्रत्येक पेशींत होऊं शकतात. पण ही प्रत्येक पेशीची नैसर्गिक स्वायत्तता पुढें रहात नाहीं. उच्च वर्गांत पेशींच्या कामाची वांटणी होऊन अशी स्वायत्तता प्रत्येक पेशींत टिकणें शक्य नसतें. त्यांपैकीं कांहीं विशिष्ट पेशींनांच ती गोष्ट साध्य असते. जेथें सूक्ष्म वनस्पतींत पेशिविभागानें उत्पन्न होणाऱ्या प्रत्येक पेशीस स्वतंत्र जीवन चालवितां येतें त्या ठिकाणीं केवळ पेशिविभाग वंशवृद्धीस पुरेसा होतो. कांहीं ठिकाणीं श्रमविभागाच्या तत्त्वाप्रमाणें कांहीं पेशी पोषणकार्य करतात व कांहीं केवळ पुनरुत्पत्तीचें कार्य करतात. म्हणजे सर्व पेशींची पूर्वीची उपजत पुनरुत्पादनशक्ति कांहीं विशिष्ट पेशींमध्येंच संकलित होते. यांपैकीं कांहींनां स्वतंत्रपणें नवीन व्यक्ति बनतां येते. योग्य स्थितींत मूळ शरीरापासून त्या स्वतंत्र होऊन प्रत्येकीं नवें शरीर उत्पन्न होतें. असल्या पुनरुत्पादन साधणाऱ्या पेशीस जननपेशी म्हणतात. जातिभिन्नत्वाप्रमाणें त्याहि पुष्कळ प्रकारच्या असतात.

कांहीं जननपेशींचा उद्भव ओलसर जागेंतच चांगला होतो. पाण्यांत योग्य जागा मिळविण्यासाठीं कांहीं जननपेशीस वल्हींवजा शेंपट्या असतात. कोरड्या जागेंत इकडून तिकडे वाऱ्याबरोबर उडून जाण्यासारखें कांहींचें शरीर हलकें झालेलें असतें. तसेंच हवेचा वरा वाईट परिणाम होऊं नये म्हणून एखादें दुसरें आवरणाहि त्यांवर येतें.

ह्याहून निराळाच एक पुनरुत्पत्तीचा प्रकार आढळतो. त्यामध्यें दोन पेशींचा संयोग होऊन एक वेगळी पेशी उत्पन्न होते व तिला वंशवृद्धि करण्याची शक्ति असते. ती संयुक्त पेशी योग्य परिस्थितींत वाढून तिजपासून पहिल्या शरीरासारखा एक विस्तृत रोपा तयार होतो. संयोग पावणाऱ्या त्या दोन्हीं पेशी कित्येक वेळां सारख्या कार्यक्षम असतात. त्यावेळीं साधारणपणें दोन्हींच्या आकारांत फरक नसतो. पण कांहीं ठिकाणीं संयोग पावणाऱ्या पेशींच्या आकारांत व कार्यक्षमतेंत पुष्कळ भेद असतो. उच्चवर्गीय वनस्पतींत हा भेद स्पष्ट व तीव्र असतो. त्यास पुरुष व स्त्री लिंगदर्शक नांवेंहि देतां येतात. स्त्रीपुरुष-तत्वांचा एकजीव होऊन त्यापासून गर्भ होतो व पुढें त्यास बीजस्थिति प्राप्त होते. ह्या लिंगदर्शक विशिष्ट पेशी फुलांत असतात म्हणून फुलें हीं वनस्पतींचीं जननेंद्रियें होत. फुलें झाडावर येऊन वंश—वृद्धीची तजवीज होते. साधारणपणें शरीराची वाढ चांगली पक्व झाल्यावरच मोहोर व फुलें येऊं लागतात. अर्थात् प्रथम शरीरवाढ पूर्ण होणें हें वंश-वृद्धीचें पहिलें साधनच होय. शरीर-संकीर्णतेप्रमाणें पुनरुज्जीवन साधणाऱ्या अवयवांतहि संकीर्णता येऊं लागते. स्पायरोगायरासारख्या दोन साध्या पाणकेश-वनस्पतींत पुनरुत्पत्तीच्या अवयवांत संकीर्णता मुळींच नसते. त्यापैकीं कोणत्याहि दोन समोरासमोर असणाऱ्या पुनरुत्पादन करणाऱ्या पेशी तें कार्य सहज करूं शकतात. पुनरुत्पत्तीच्या वेळीं त्या पेशींतील जीवरसादि सर्व पदार्थ एकत्र संकुचित होतात. दोन्ही पेशी परस्परांकडे वाढून त्यांतील पदार्थांचा संयोग होतो. एका पेशींतील जीवरसादि पदार्थ दुसऱ्या पेशींत जातात व येथें असणाऱ्या पदार्थांशीं पूर्ण एकजीव होतात. व त्यापासून एक नवीन संयुक्तपेशी तयार होते. ती नवीन पेशी कांहीं काल विश्रांती घेऊन पुढें योग्य कालानें आपोआप वाढून तिजपासून नवीन वनस्पति उत्पन्न होते. ह्या उदाहरणांतील मूळच्या दोन्ही पेशी सारख्याच आकाराच्या व सारख्याच कार्यक्षमतेच्या असतात.

फुलांतील विशेष महत्त्वाचे भाग म्हणजे पुंकेसर व स्त्रीकेसर होत. पुष्पकोश आंतील भागाच्या संरक्षणास उपयोगी पडतो. पुष्पमुकुटाचा उपयोग अप्रत्यक्ष रीतीनें गर्भधारणेस होतो. पण प्रत्यक्ष कार्यकारी पुंकेसर व स्त्रीकेसरच होत. पुंकेसराचे पराग स्त्रीकेसराग्रावर पडून त्याची वाढ होते व त्यापासून परागनलिका तयार होते. ही परागनलिका बीजाण्डांतील गर्भकोशापर्यंत पोहोंचून त्यांतील पुंतत्त्व—केंद्र आंत शिरतें. ही स्थिति येईपर्यंत गर्भकोशांतील स्त्रीतत्त्व—गर्भाण्ड संयोगास तयार होतें. पुंतत्त्व-केंद्र व स्त्रीतत्त्व-गर्भाण्ड ह्यांचा संयोग होतो व ह्या कार्यास गर्भधारणा असें म्हणतात. साधा संयोग व गर्भधारणा ह्या दोन कार्यांत तत्त्वतः फरक नसतो. एकजीव होणाऱ्या केंद्रांचा आकार भिन्न असून प्रत्येकाचें कार्य वेगळें असतें. गर्भसंस्कार झालेल्या स्त्रीतत्त्व-गर्भाण्डापासून बीज उत्पन्न होतें व पुंतत्त्व-केंद्राचें काम केवळ त्या गर्भाण्डाशीं एकजीव होऊन बीजोत्पादनास उत्तेजन देण्यासंबंधीं असतें. अशा प्रकारचें उत्तेजन मिळाल्याखेरीज केव्हांहि गर्भाण्डापासून बीजोत्पादन होत नाहीं. साध्या संयोग-कार्यांत संयोग पावणाऱ्या दोन केंद्रांच्या आकारांत भेद नसतो. तसेंच अमुकच केंद्रापासून बीज उत्पन्न होतें असेंहि नाहीं. जें केंद्र स्वतःची जागा सोडून दुसऱ्याकडे जातें व त्याच्याशीं एकजीव होतें, अशा वेळीं जागा न सोडणाऱ्या केंद्रापासून बीज उत्पन्न होतें व त्यासच वाटल्यास स्त्रीतत्त्व-गर्भाण्ड म्हणतां येईल. खरोखर संयोगकार्यांत अशा प्रकारचा कोणता भेदाभेद नसतो.

स्त्री—पुरुष असा लिंगभेद कां असावा ? —ह्या प्रश्नाचें उत्तर देणें कठिण आहे. स्त्रीपुरुषलिंगभेद केवळ श्रमविभागतत्त्वानें उत्पन्न झाला असावा. विशिष्ट पेशीस विशिष्ट प्रकारचें कार्य दुसऱ्यापेक्षां सहज करतां येतें व त्याप्रमाणें कार्याची वांटणी होते. ह्या तत्त्वावर स्त्रीपुरुष-लिंगदर्शक अशा कामांची वांटणी झाली असावी. असा भेदभाव उत्पन्न होण्यापूर्वी शरीरांतून कांहीं विशिष्ट पेशी बाहेर पडून एकमेकांशीं संयोग पावतात व त्या संयुक्तपेशींकडून वंशवृद्धीचें कार्य होतें. संयोग घडवून आणण्यास त्या पेशी परस्पराजवळ येणें अवश्य असतें. अर्थात् त्यांना गति उत्पन्न करण्याजोगी शरीररचना मिळते अथवा वल्हीवजा शेपट्यांची सोय करणें भाग असते. ह्याहून उच्च दर्जाच्या वनस्पतींत संयोगास अशा पेशी उत्पन्न केल्या जातात. परंतु त्यांच्या आकार व चलनकार्यांत भेद उत्पन्न होतो. पुढील उत्पन्न होणाऱ्या असल्या पेशींत हा भेद अधिक स्पष्ट व दृढ होतो. एकीचा आकार मोठा होऊन तींत पौष्टिक द्रव्यें सांठविण्याची सोय होते. ह्या पौष्टिक द्रव्यांचा उपयोग संयुक्त पेशीच्या जननस्थितींत होतो. दुसरीचा आकार बारीक रहातो व ती पेशी चलन—कार्य अधिक चांगलें करूं शकते. अर्थात् ह्या वेळीं त्या दोन पेशींत श्रम—विभाग अगर कामांची वांटणी होऊं लागते व त्याच कारणानें पुढें स्त्री—पुरुषभेद उत्पन्न होतो. मोठा आकार, अन्नसामुग्री व चलनाभाव ह्या गोष्टी स्त्री—पेशींत दृढ होतात व सूक्ष्म आकार, अन्नाभाव व गतिक्षमता हीं लक्षणें पुरुष—पेशींत वृद्धिंगत होतात. एकदां ह्या गोष्टी पूर्णपणें प्रस्थापित झाल्यावर पुढील वरच्या दर्जाच्या वनस्पतींमध्यें स्त्रीपुरुष—लिंगदर्शक जननेंद्रियें ह्या श्रम-विभागतत्त्वावरच बनत जातात व त्यांत अधिकाधिक भेद उत्पन्न होत जातो मात्र गर्भधारणा सहज रीतीनें घडून येईल अशी रचना प्रत्येकीस येत जाते. विशिष्ट रचना असणें ही गोष्ट दुय्यम महत्त्वाची आहे. जेणेंकरून पुंतत्वपेशीस सहजरीतीनें स्त्रीतत्त्वपेशीशीं अगर गर्भाण्डाशीं संभोग पावतां येईल ती रचना प्रत्येकास मिळते. केवळ श्रमविभाग तत्त्वावरच तो लिंग-भेद उत्पन्न होतो. स्त्री पुरुषलिंगभेदामुळें

अर्भकाची सोय होते, ज्या पेशीमुळें अथवा पेशिरचनेमुळें उत्पन्न होणाऱ्या अर्भकास पोषण व संरक्षण या दृष्टीनें प्राथमिक सोय होते, त्या पेशीस अगर पेशिरचेनेस स्त्रीलिंगदर्शक इंद्रिय समजणें योग्य आहे. उलट संयोगास अथवा गर्भधारणेस ज्या पेशीकडून अथवा पेशिमालिकेकडून प्रत्यक्ष चालन मिळतें त्यास पुरुषलिंगदर्शक इंद्रिय मानावें लागेल. स्त्री गर्भधारण करि ते व पुरुष गर्भसंस्कार करतो. एकाचें काम गर्भ धारण करण्याचें असून दुसऱ्याचें गर्भसंस्कार करण्याचें असतें. ह्या दोन भिन्न कार्यांप्रमाणें प्रत्येकाची रचना व ठेवण हीं वेगवेगळीं होतात.

वंश-वृद्धींत संयोगाचें महत्त्वः—वंश-वृद्धीच्या वेगवेगळ्या प्रकारांत संयोग व गर्भधारणा अधिक संकीर्णतेचीं असतात. तथापि सुद्धां वनस्पती त्या मार्गाचा अवलंब करून वंश-विस्तार करीत असतात. संयोगानें उत्पन्न होणाऱ्या नवीन अंकुरांत अधिक जोम व प्रगमनशीलता आढळते व जीवनस्पर्धेंत ह्याच गुणांची अवश्यकता असल्यामुळें वनस्पती प्रसंगवशात् त्या संकीर्णमार्गाचें अवलंबन करून बीजोत्पादन करितात. आलिंब अगर पाणकेश ह्यासारख्या साध्या वनस्पतींतील पुनरुत्पादन-कार्य साधणाऱ्या जननपेशी व संयोगजन्यपेशी ह्या दोहोंची तुलना केल्यास संकटसमयीं कार्यशील कोण हें सहज कळून येतें. संयोगजन्य पेशींत अधिक दमदारपणा असून प्रतिकूल स्थितींत न उगवतां स्वस्थपणें विश्रांति घेऊन अनुकूल स्थिति येईपावेतों त्या वाट पाहूं शकतात. पण ती शक्ति सर्व जननपेशींत नसते. म्हणून संयोग साधून प्रतिकूल कालांत संकटास तोंड देणाऱ्या पेशीकडून प्रसंगवशात् वंश-वृद्धि करणें अधिक साहजिक आहे. प्रतिकूल काल नसेल तर बहुतेक संयोगाचा अवलंब वनस्पती करीत नाहींत. जेव्हां संयोगाशिवाय अन्यमार्गानें वंश—वृद्धि होते तेव्हां पूर्व शरीराच्या शाखा अगर पेशी वेगळ्या होऊन त्या स्वतंत्रपणें वाढतात. ह्या रीतीनें उत्पन्न होणाऱ्या रोपट्यांत पूर्व रोप्याचेच गुण तंतोतंत उतरतात. जर सभोंवतालची परिस्थिति एकसारखी कायम राहिली व त्यांत बदल झाला नाहीं, तर ह्या रीतीनें वंश-वृद्धि होण्यांत तोटा नाहीं पण नेहमीं परिस्थिति एकसारखी कायम टिकणें शक्य नसतें.त्यांत बदल होणें साहजिक आहे. अर्थात् त्या बदलणाऱ्या स्थितीस योग्य अशी योजना म्हणजे संयोगानें वंशवृद्धि करणें होय.ह्यायोगें उत्पन्न होणाऱ्या अंकुरांत स्त्रीपुरुषाचे गुण एकवटले जाऊन त्यांचा उपयोग बदलणाऱ्या परिस्थितींत कायदेशीर होतो. जिवनकलहांत टिकणाऱ्या गुणांचा परिपाक ह्या योगानें होतो. तसेंच पूर्वशाखेपासून नवीन शाखा वाढून जर वंश-वृद्धि एकसारखी होत गेली तर कांहीं कालानें त्या वनस्पतींत एक प्रकारचा शिथिलपणा येतो. हें शैथिल्य नाहींसें करण्यास प्रसंगविशेषीं संयोग होऊन वंशवृद्धि होणें अवश्य असतें. संयोगजन्य पेशींत स्त्रीपुरुषांचे कांहीं विशिष्ट गुण एकत्र होऊन त्या वनस्पतींची सुस्थिति कायम राहण्यास एक प्रकारचें उत्तेजन मिळतें. निरनिराळ्या गुणांचें एकीकरण होणें हाहि उद्देश संयोगानें साधितो. बाह्यतः बीजांत आईबापांपेक्षां फारसा फरक असेल असें वाटत नाहीं. परंतु वस्तुस्थिति वेगळी असते.

संकर साधण्यास निसर्गाची मदतः—एकाच फुलांत पुंकोश व स्त्रीकोश ह्या दोहोंची योजना असल्याकारणानें त्याच फुलांतील परागकणामुळें स्त्रीतत्वकेंद्राचें गर्भीकरण होऊन बीजोत्पादन नेहमीं होत असेल अशी कल्पना होते. पण निसर्गांत पुष्कळ वेळां ह्याहून भिन्न प्रकार आढळतो. भिन्न फुलांतील स्त्रीपुरुष तत्व—केंद्रांचा संयोग होऊन बीजोत्पादन व्हावें अशी नैसर्गिक योजना असते. कांहीं फुलांत पुंकेसरांतील परागकण व स्त्रीकोशांतील बीजाण्डें ह्या दोहोंची पक्क होण्याची वेळ भिन्न असते. परागकण स्त्रीकेसराग्रावर पडून सुद्धां कांहीं वेळां स्त्रीकोशांतील बीजाण्डें पक्क नसल्यामुळें त्यांची परागनलिका बनून पराग—वाहिनींत शिरण्यास प्रोत्साहन मिळत नाहीं. ह्या स्थितींत ते परागकण वाया जातात. परंतु असले परागकण वाऱ्यानें उडून साहजिक दुसऱ्या फुलावर पडले व त्यावेळीं तेथील बीजांण्डें पक्क व परागोत्सुक असलीं तर त्या परागकणांचा उपयोग होऊन तीं बीजाण्डें गर्भीकृत होतात. म्हणजे त्या दोहोंची पक्क होण्याची वेळ भिन्न असल्यानें संकर साधण्यास निसर्गाकडूनच मदत होते. कांहीं फुलांची ठेवण अशी असते कीं पुंकेसरावरील परागपिटिका बाह्यांगास झुकलेल्या असून त्यांतील परागकण बाहेर पडतात, त्यामुळें त्यांचा उपयोग त्या फुलांतील बीजाण्डास कांहींच होत नाहीं. अशा ठिकाणीं फुलांतील पुंकेसराची विशिष्ट ठेवण म्हणजे एक तऱ्हेनें संकर साधण्यास मदतच होय. कित्येक फुलांत स्वतःच्या परागकणांचा उपयोग गर्भधारणेस होत नाहीं व कित्येकवेळां उलट ते सहजगत्या आंतील स्त्रीकेसाग्रावर पडले तर :तो स्त्रीकोश खुरटून जातो म्हणजे स्वतःचे परागकण स्वतःस विषारी होतात. पण त्यास दुसऱ्या फुलांतील परागकण मिळाले तर त्यांचा उपयोग होऊन बीजोत्पादन होतें. म्हणजे त्या स्त्रीकोशास बीजें उत्पन्न करण्याची शक्ति नसते असें नाहीं. अर्थात् स्वतःच्या स्त्रीपुरुषतत्वपेशींचा परस्परास उपयोग न होतां दुसऱ्या फुलास होतो, तेव्हां अशा ठिकाणीं संकर साधणें हाच एक उद्देश दिसतो. पाकळ्यांचे भपकेदार रंग व सुवास त्यांची रचना, मधोत्पादक पिंड, तसेंच फुलांच्या उमलण्याच्या वेगवेगळ्या वेळा वगैरे गोष्टी अप्रत्यक्षपणें संकर घडवून आणण्यास मदत करतात. फूलपांखरासारख्या कीटकांकडून परागकण एका फुलापासून दुसऱ्या फुलास पोहोचविणें व तद्द्वारां संकर घडवणें ह्या कार्यांत निसर्गाचीच मदत असते. पराग पोहोंचविण्यास वारा, पाण्याचा प्रवाह अथवा किडे उपयोगी पडतात. मात्र हें कार्य त्याकडून सुरळीत व

व्यवस्थित होण्यास त्यांची ठेवण, आकार, रंग, सुवास वगैरे गोष्टी वेगवेगळ्या प्रकारच्या आढळतात.

संकर होऊन उत्पन्न होणाऱ्या बीजांत अधिक जोम व तरतरीतपणा असतो. ह्याचें कारण असें दिसतें कीं दोन भिन्न सजातीय वनस्पतींच्या स्त्रीपुरुषतत्त्व-पेशींचा संयोग झाल्यानें उत्पन्न होणाऱ्या बीजांवर अधिक उत्तेजक परिणाम होत असावा व त्यामुळें बीजांकुरांत अधिक जोम येत असावा. सारांश शरीर-वृद्धि व वंशवृद्धि हीं दोन कार्यें म्हणजेच जीवन होय व ह्यांतच इतर सर्व साधनीभूत कार्यांचा अंतर्भाव होतो. स्थूलमानानें विशिष्ट कार्य विशिष्ट-इंद्रियाकडून होतें व ह्याच गोष्टींचें ठोकळ वर्णन या निबंधांत करण्याचा प्रयत्न केला आहे.

**जीवन्मुक्त**—एक महाराष्ट्रीय संतकवि. निझामराज्यांत येकेहळ्ळीजवळील अन्वार गांवीं यांचा मठ आहे. यांस तिकडे मुक्तेश्वर म्हणतात; हे ज्ञानेश्वरसंप्रदायी होते. श्रीज्ञानेश्वरानंतर यांचेंच नांव तिकडे घेतात. जीवन्मुक्ति, गीताप्रभाकर व जीवन्मुक्तिवाक्य वगैरे ग्रंथ यांनीं केले आहेत. [ संतकविकाव्यसूचि. ]

**जुई**—जाईप्रमाणें जुईचाहि वेल असतो. या झाडास संस्कृतमध्यें यूथिका, मागधी वासंती, लाटिनमध्यें जॅसमिनम ऑरिक्युलॅटम व मराठींत जुई असें म्हणतात. जुईच्या वेलास त्रिदळें म्हणजे तीन पानें एका जागीं अशीं असतात. जाईच्या फुलांपेक्षां जुईचें फूल किंचित् लहान असतें. परंतु दोन्ही फुलांचा सुवास बहुतेक सारखाच असतो. जुईचे औषधी गुण बहुतेक जाईप्रमाणेंच आहेत असें म्हणतात.

**जुगार**—मनुष्यप्राण्यानें करमणुकीकरितां जे अनेक प्रकारचे खेळ शोधून काढले आहेत त्यांत यदृच्छाधीन असलेले किंवा नशीबाचे खेळ ( गेम्स ऑफ चान्स ) हा एक प्रकार आहे असल्या खेळांत यशापयश खेळणारांच्या कौशल्यावर अवलंबून नसतें, तर काकतालीयन्यायवत् असतें. सोंगट्या, फांसे, पत्ते, हे बहुशः या जातीचे खेळ होत. असले खेळ फार पुरातन म्हणजे मानवोत्पत्तीइतके जुने आहेत. भविष्य कालांतील अज्ञात गोष्टी जाणण्याच्या प्रबळ इच्छेमुळें हे मनुष्याला सुचले असावेत. चिठ्ठ्या टाकून भविष्य जाणण्याचा प्रयत्न करणें याच्यासारखाच हा प्रयत्न आहे. याप्रमाणें हे खेळ अस्तित्वांत आल्यावर या खेळांना उत्तेजन यावें म्हणून कांहीं मालमत्ता, पैसा, पणास लावावा ही प्रवृत्ति होते. ही पण लावून हरजितीचा खेळ खेळण्याची प्रवृत्ति वैदिक आर्यांत व परंपरेनें सर्व भारतीयांत दिसून येते. असें द्यूत किंवा जुगार खेळून सर्वहानि झालेल्या एका माणसाचें दुःख ऋग्वेदांतील एका सुप्रसिद्ध सूक्तांत ( १०. ३४ ) वर्णिलें आहे. द्यूताची आवड भारतीयांत किती वाढली होती व त्याला शिष्टसंमतत्त्व किती प्राप्त झालें होतें, ही गोष्ट महाभारतांतील नलदमयंती व कौरवपांडव यांच्या कथांवरून स्पष्ट दिसते. मृच्छकटिक नाटकांतील दुसऱ्या अंकांत द्यूत खेळणारांचें भांडण चांगलें वर्णिलें आहे. प्राचीन ग्रीक व जर्मन लोकांतहि फांशांचें द्यूत फार प्रिय असे. सामान्यतः असें दिसतें कीं, मृगया, युद्ध व वाणिज्य यांवर जीवन चालविणारे लोक द्यूतप्रिय असतात, कारण त्यांची सांपत्तिक स्थिति फार अनिश्चित असते व म्हणूनच ते आकस्मिक द्रव्यप्राप्ति करून घेण्याला लोलुप असतात. उलटपक्षीं कृषिजीवी म्हणजे स्वकष्टानें उपजीविका करणारे लोक अत्यंत परिश्रमानें मिळविलेलें द्रव्य जुगारीनें म्हणजे यदृच्छाधीन खेळानें गमावण्यास तयार नसतात.

ग्रीक लोकांत होमरकाळीं चार बाजू असलेल्या फांशांनीं व नंतरच्या काळांत सहा बाजूंच्या फांशांनीं खेळत. रोमन लोक नाण्यांनीं ( हेड ऑर टेल ), व फांशांनीं द्यूत खेळत. ईजिप्त, बाबीलोनिया, चीन वगैरे देशांत प्राचीन काळांत जुगार होती. इस्रायल लोक मात्र पूर्वी बराच काळ कृषिजीवी असल्यामुळें त्यांच्यामध्यें हें व्यसन नव्हतें.

जु गा री चे प्र का र.—जुगार खेळण्याची दुष्ट इच्छा तीन कारणांनीं होतेः (१) द्रव्यप्राप्तीची इच्छा, (२) करमणूक व ( ३ ) युयुत्सा किंवा लढण्याची नैसर्गिक प्रवृत्ति. धिम्मेपणानें कष्ट करून द्रव्यार्जन करण्याचा माणसाला जात्याच कंटाळा येतो व अनायासें धनप्राप्ति व्हावी अशी इच्छा असते. रोजच्या ठराविक जीवनक्रमाचा कंटाळा आल्यामुळें कांहीं करमणूक असावी असें वाटतें. पण यशापयश यदृच्छाधीन असलेल्या खेळांत यशस्वी इसमावर ईशकृपा आहे असा समज होतो; आणि उलटपक्षीं अपयशी माणसाकडे कांहीं कमीपणा किंवा दोष येत नसल्यामुळें त्यांत मानहानि वाटत नाहीं. इतकेंच नव्हे वऱ्याच वेळां अपयश आलेल्या इसमाला एकदम यश मिळून सर्व पारडें फिरण्याची अखेरपर्यंत आशा असते.

जुगारीचे अनेक प्रकार आहेत, पण कोणत्याहि प्रकारांत गमावणारे जितकें द्रव्य घालवितात त्यांपेक्षां जिंकणाऱ्यांना नेहमीं कमीच मिळतें. जुगारीचा मुख्य प्रकार घोड्यांच्या शर्यती. याला सुधारलेल्या देशांतहि कायद्यानें परवानगी दिलेली असल्यामुळें ही जुगार फार मोठ्या प्रमाणांत चालते. इंग्लंडमध्यें घोड्यांच्या शर्यती नाहींत असे वर्षांतून फार तर १० दिवस जातात. फ्रान्स देशांत १९१० सालीं १३० लक्ष पौंड पैसा या जुगारींत लावला गेला;आणि इंग्लंडमध्यें निदान फ्रान्समधील रकमेच्या तिप्पट तरी रक्कम लावली जाते. शिवाय प्रत्यक्ष शर्यतींच्या मैदानावर हजर न राहतां त्या शर्यतींत ' स्टार्टिंग-प्राइसच्या ' पद्धतीनें पैसे लावणारे इसम हजर इसमांच्या दुप्पट तरी असतात. ही सर्व रक्कम लक्षांत घेतां इंग्लंडमध्यें नुसत्या घोड्यांच्या शर्यतींच्या जुगारींत ५६० लक्ष पौंड पणास लागतात. या शर्यतींशिवाय जुगारीचे अनेक प्रकार आहेत ते ( १ ) फुट-बॉलवरचे कूपन-बेटिंग,

( २ ) क्रिकेटमधील बोलिंग, (३) सायकलच्या शर्यती, ( ४ ) इतर मर्दानी खेळ, ( ५ ) पत्त्यांचे ब्रिज वगैरे डाव, ( ६ ) नाण्यांच्या हेड-टेलची जिताजित, वगैरे. खाणींच्या प्रदेशांत जुगारीचे अड्डे पुष्कळ असतात व तेथें हा शेवटचा जुगारीचा प्रकार फार चालतो. घोड्यांच्या शर्यतीशिवाय इतर जुगारीच्या प्रकारांनां कायद्याची मनाई असल्यामुळें अर्थात हे प्रकार चोरून केवळ गुप्त ठिकाणीं चालतात. या सर्व ठिकाणची रक्कम जमेस जर धरली तर एका इंग्लंड देशांत दरसाल अदमासे १० कोटी पौंड जुगारींत उडत असले पाहिजेत. शिवाय सट्टेबाजारांतील दलाली. सट्टेबाजी व जुगार यांत एक महत्त्वाचा फरक असल्यामुळें तिचा धंदा हा जुगारीचाच प्रकार आहे, पण जुगारीच्या कायदेशीर व्याख्येंत येत नाहीं. जुगारीच्या व्यवसायानें दळणवळणाच्या रेल्वे, पोस्ट तार, वगैरे आधुनिक सुधारलेल्या साधनांचा तसेंच छापखान्यांचा उपयोग करून घेतला आहे. इतकेंच नव्हे तर, सार्वत्रिक शिक्षणसंस्थांचा जुगारीला मदतच होते; कारण निरक्षर समाजांत जुगारीचे प्रकार कमी चालतात.

का य द्या चें नि यं त्र ण.—जुगारीचा नाद अनर्थावह आहे याबद्दल मतभेद नाहीं. इंग्लंडचा मुख्य प्रधान लार्ड बीकन्सफील्ड यानें असें म्हटलें आहे कीं, "जुगार म्हणजे राष्ट्राचा नैतिक अधःपात करणारें एक अजस्र एंजिन आहे." या व्यसनाच्या पायीं इंग्लंडमध्यें एका दहा वर्षांत (१८९५ ते १९०५ ) १५६ आत्महत्या, व ७१९ चोऱ्या झाल्या आणि ४४२ दिवाळीं निघालीं. सुधारलेल्या देशांत कायद्यानें जुगारीला प्रतिबंध केलेला असतो. इंग्लंडमध्यें जुगारीविरुद्ध कायदा प्रथम स. १६६५मध्यें झाला. स १६९८मध्यें लॉटरींनां बेकायदा ठरविण्यांत आलें. १८४५ व १८५३ च्या कायद्यानें सार्वजनिक जुगारीचीं गृहें नष्ट केलीं. तरी जुगारीचें प्रमाण वाढतच होतें. म्हणून स. १९०१ मध्यें एक कमिटी नेमली गेली. तिनें घोड्यांच्या शर्यतींच्या जुगारींनां परवानगी देण्याची शिफारस केली व इतर सर्व प्रकार बंद करण्याकरितां अधिक कडक कायदे सुचविले. घरांतून चालणारी खाजगी जुगार बंद करणें शक्य नसलें तरी जुगारीच्या योगानें झालेल्या कर्जाबद्दल कोर्टांत फिर्याद चालणार नाहीं असा कायदा आहे. इंग्लंडमधील १९०६ सालच्या 'स्ट्रीट बेटिंग ॲक्ट' नें या व्यसनावर व्यापक नियंत्रण आहे. या गुन्ह्यास पहिल्या वेळीं १० पौंडपर्यंत, दुसऱ्या वेळीं २० पौंड, व तिसऱ्या वेळीं ३० पौंड किंवा ३ महिनेपर्यंत साधी किंवा सक्तमजुरी कैद अशा प्रकारच्या शिक्षा ठेवल्या आहेत.

हिंदुस्थानांत प्राचीन राजेच द्यूत खेळत असत. तथापि स्मृतिकारांच्या काळीं जुगारीला कायद्यानें प्रतिबंध करण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. दिवाणी कायद्यांत द्यूतमद्यादि व्यसनामुळें बापानें केलेलें कर्ज फेडण्याची जबाबदारी पुत्रावर नसे. शिवाय द्यूत खेळणें हा गुन्हा ठरवून त्याला हात तोडणें ही शिक्षा सांगितली आहे. मध्ययुगीन राज्यांत व मोंगलमराठे अमदानींत मनुस्मृतीचाच कायदा रूढ होता व त्यामुळें कौरवपांडवादिकांच्या द्यूतासारखे मोठाले राजेरजवाड्यांचे किंवा सामान्य जनसमाजांतले द्यूतप्रसंग ग्रंथांत नमूद नाहींत. ब्रिटिश अमदानींत येथें इंग्लंडच्या कायद्यासारखेच कायदे आहेत.

सुमात्रामध्यें जुगारीला कायमची मनाई आहे, पण कांहीं विशिष्ट प्रसंगीं कोंबड्यांच्या झुंजीच्या जुगारीला परवानगी ठेवलेली आहे. चीनमध्यें जुगारीच्या गुन्ह्याला मरणाची शिक्षा असे. इस्लामी कायद्याचा जुगारीला प्रतिबंध आहे.

नै ति क आ क्षे प.—बेसुमार जुगार खेळणें दुष्परिणामी असतें याबद्दल मतभेद नाहीं. पण मर्यादित प्रमाणांत जुगार खेळणें हें सुद्धां आक्षेपार्ह आहे. जुगारीच्या व्यवसायांत पैशाची मोठी उलाढाल होत असली तरी त्यानें अर्थशास्त्रदृष्ट्या समाजाच्या संपत्तींत यत्किंचित्‌हि भर पडत नाहीं. करमणुकीखातर जुगार खेळणें हेंहि नैतिकदृष्ट्या समर्थनीय नाहीं; कारण पैसे कमावणारांनां सुख होतें पण पैसे गमावणारांनां दुःख होतें. सबब हा असुरी जातीचा आनंद होय; त्यानें मनुष्य कठोर व स्वार्थी बनून त्याचा नैतिक अधःपात होत जातो. आयतें धन मिळविण्याची मनःप्रवृत्ति जुगारीमुळें बळावते, आणि विद्याकलानैपुण्य, न्यायप्रियता, जबाबदारी वगैरे उच्च प्रकारच्या गुणांचा अभाव होतो. मालमत्तेची तफदील होण्याचे न्याय्य मार्ग ( १ ) दान, ( २ ) श्रम आणि ( ३ ) अदलाबदल ( एक्स्चेंज ) हे तीन होत. जुगारीमध्यें कोणतीहि मोबदला किंवा किंमत न देतां द्रव्यहरण होतें, सबब ती एकप्रकारची उभयतांच्या संमतीनें चाललेली दरोडेखोरीच होय.

व्यापारांतील सट्टेपद्धति ही जुगार नव्हे. यदृच्छा ( चान्स ) सट्टयाच्या व्यापारांत असते असें म्हणतात, पण तें खरें नाहीं. मालाच्या किंमतींची चढउतार ही व्यापारी जगांतील घडामोडींवर अवलंबून असते, त्यामुळें किंमतीमध्यें काय फेरफार होतील त्यांचा अदमास उर्फ भविष्य कळण्यास जगांतील व्यापाराची माहिती व अर्थशास्त्राचें ज्ञान लागतें. पुढें भाव वाढतील म्हणून आगाऊ खरेदी क[illegible] हें समाजदृष्ट्याहि आवश्यक व न्याय्य आहे. उलटपक्षीं जुगारीनें कोणतेंहि समाजहित साधलें जात नाहीं. सट्टेबाजींत सुद्धां मालाची देवघेव करण्याचा खरोखर उद्देश नसेल तर ही कायदेकोर्टांत जुगारच समजली जाते. विमाकंपन्यांचा धंदा ही जुगारच आहे असा आक्षेप घेतात, पण ती चूक आहे. कारण धोका टाळणें हाच विम्याचा उद्देश असल्यामुळें त्यामुळें जीवित अधिक सुरक्षित होतें. जुगारीनें मात्र धनहानि हा एकच दुष्परिणाम सदासर्वदा ठरलेला आहे.

**जुगोस्लाव्हिया**—सर्व्ह, क्रोट व स्लोव्हेन या तिन्ही लोकांचें मिळून जुगोस्लाव्हिया हें राष्ट्र बनलें आहे. १९१८ सालीं डिसेंबर महिन्याच्या पहिल्या तारखेस या स्वतंत्र राज्याची मुहूर्तमेढ रोविली गेली. चेकोस्लोव्हेकियाच्या

राज्याची प्राणप्रतिष्ठा अवघे दोन महिनेच अगोदर झाली होती. जुगोस्लाव्हियाच्या स्वतंत्र राज्याला पुढें कांहीं दिवसांनंतर यूरोपमधील प्रमुख राष्ट्रांनीं आपली मान्यता दर्शविली जुगोस्लाव्हियाच्या राष्ट्रांत सर्व्हिया, मॉंटिनीग्रो, क्रोएशिया, स्लोव्हानिया, डालमेटिया, वनट, बक्क, वरंज, बोस्निया-हर्झेगोव्हिना इत्यादि देशांचा अंतर्भाव होतो. १९२१ सालीं या राज्याची लोकसंख्या १२१६२९०० होती.

जुगोस्लाव लोकांनीं आपल्या स्वतंत्र राज्याची स्थापना करण्याची चळवळ अगदीं अलीकडे चालू केली असें एक विधान करण्यांत येतें पण तें खरें नाहीं. १५ व्या शतकापासूनच या चळवळीला सूक्ष्म आरंभ झाला होता. १६ व्या शतकामध्यें डालमेटियाच्या प्रदेशांत उस्कॉक जातीच्या चांचे लोकांनीं आपली स्वतंत्र वसाहत स्थापन केली होती, व त्याचप्रमाणें दक्षिण हंगेरी व स्लोव्हानिया येथें सर्व्हियन लोकांनीं वसाहती स्थापन केल्या होत्या. १७ व्या शतकांच्या पूर्वार्धांत रगूसाच्या इव्हॅन गुंडुलिकनें व त्याच्या भोंवतालच्या कवींनीं सर्व्हिया व बोस्नियामधील लोकांशीं आपला रक्ताचा संबंध आहे अशी भावना जागृत करण्यास सुरवात केली होती. क्रिझॅनिक नांवाच्या क्रोटमधील, कॅथॉलिक उपाध्यायानें, रशियांत असतांना अखिल स्लाव्ह लोकांच्या एकीकरणाची कल्पना प्रसृत केली होती.

पण या कल्पनांना मूर्त स्वरूप देण्याचें कार्य नेपोलियननें घडवून आणलें. त्यानें स्लोव्हेनचा प्रांत क्रोएशिया व डालमेटिया यांमधील बराच भाग निराळा काढून, त्याला इलिरियन राष्ट्र असें स्वतंत्र नांव दिलें व तें आपल्या फ्रेंच साम्राज्याशीं जोडून घेतलें. अर्थात त्याच्यानंतर त्याचा प्रयोग फारच थोडा वेळ टिकला पण त्याची ही कल्पना मात्र व्होडनिक कवीनें हातीं धरून, ती फैलावण्यास आरंभ केला. जूडेव्हिटगाज नांवाच्या अद्वितीय पंडितानें या कल्पनेंत चैतन्य ओतलें. यानें वाङ्मयाच्या द्वारां सर्व्ह व क्रोट हे लोक एकत्रच आहेत व यांचें स्वतंत्र राज्य शक्य तितक्या लवकर निर्माण झालें पाहिजे अशी भावना जागृत केली. मग्यार लोकांकडून या कल्पनेला मूर्त स्वरूप देण्याच्या कार्यांत अडथळा येईल हें तो पक्कें जाणून होता. पण त्यानें आपली चळवळ तेवढ्यामुळें थांबवली नाहीं. या त्याच्या चळवळीला हळू हळू लोक मिळूं लागले व मॉंटेनिग्रोचा युवराज पीटर यानेंहि या चळवळीला आपली पूर्णपणें संमति दर्शविली.

हंगेरीमध्यें या चळवळीच्या पुरस्कर्त्यांनीं जें बंड केलें त्यांत त्यांचा पूर्णपणें पराभव झाल्यामुळें हंगेरीनें यांच्यावर सुलतानशाही राजविन्यास सुरवात केली. या चळवळीचा जनक गज व जेलासिक यांनीं निराशेनें प्राण सोडले व ईलिरियन राष्ट्र स्थापण्याची कल्पना रसातळाला गेली. पण अशा रीतीनें ईलिरियन राष्ट्रस्थापनेची कल्पना नष्ट झाली तरी त्याच्या बदली जुगोस्लाव्ह लोकांनीं जुगोस्लाव्ह राष्ट्र स्थापण्याची चळवळ सुरु केली. बिशप स्ट्रासमेयर या प्रसिद्ध पंडितानें या चळवळीला पाठिंबा दिला व दक्षिण स्लाव्ह लोकांसाठीं, दक्षिणस्लाव्ह विद्यापीठ स्थापन केलें. या पीठांत जुगोस्लाव्हाच्या एकीकरणाच्या चळवळीच्या दिशेनें बौद्धिक प्रयत्न सुरू झाले. स्वतः स्ट्रासमेयरनें इतर राष्ट्रांत या चळवळीला पाठिंबा मिळवण्याचा प्रयत्न केला. सर्व्हियाचा राजा प्रिन्समायकेल व मॉंटीनीग्रोचा राजा प्रिन्सडॅनिलो यांनींहि या चळवळीला मदत करण्याचें आश्वासन दिलें.

पण स. १८६० च्या सुमारास या पॅन-स्लाव्ह चळवळीला भयंकर धक्का बसला. प्रशियानें अपूर्व जय संपादन केल्यामुळें ऑस्ट्रियाचा पराभव होऊन ऑस्ट्रियाला हंगेरीशीं समेट करणें भाग पडलें. त्यामुळें हंगेरीला आपली सुलतानशाही या छोट्या राष्ट्रावर राजविन्यास आयतीच संधि मिळाली. आपल्या राज्यांतील जुगोस्लाव्ह चळवळीशीं परराष्ट्रीय स्लाव्ह लोकांचा संबंध येऊं नये यासाठीं हंगेरीनें प्रयत्न केला. व्हिएन्नामध्यें पॅनस्लाव्ह चळवळीला विरोधक अशी पॅनक्रोट (विश्वक्रोट संघटनाची) चळवळ सुरु करण्यांत आली. १८८३-१९०३ सालापर्यंतच्या अवधींत दक्षिण स्लाव्ह लोकांना फारच वाईट दिवस प्राप्त झाले. सर्व्हियाचा राजा मिलन यानें ऑस्ट्रिया-हंगेरीशीं गुप्त तह करून ऑस्ट्रिया-हंगेरीविरुद्ध जी चळवळ होईल ती दडपून टाकण्याविषयीं आश्वासन दिलें. जूगोस्लाव्ह लोकामध्येंहि अंतःस्थ दुफळी माजली व त्यामुळें त्यांच्या चळवळींत जोम राहिला नाहीं.

पण १९०३ च्या सुमारास पुन्हां या चळवळीला बरे दिवस लाभण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. प्राग येथें असतांना स्लाव्ह तरुणांवर प्रो. मसरिकच्या शिकवणीची विलक्षण छाप पडून त्यांच्या मनांत पुन्हां जूगोस्लाव्ह चळवळ सुरू करण्याची प्रेरणा उत्पन्न झाली. क्रोट व सर्व्ह लोकांनीं एकत्र झाल्याशिवाय गत्यंतर नाहीं अशी भावना विचारी माणसांत जागृत होऊं लागली; व त्याप्रमाणें त्यांनीं संघटना करण्यास सुरुवात केली. सर्व्हियन दरबारनेंहि या संघटनेला अनुकूल मत दर्शविलें. याच सुमारास हंगेरींत राजा व प्रजा यांमध्यें वितुष्ट माजल्यामुळें या संघटनेच्या पुढाऱ्यांना नामी संधि मिळाली. क्रोएशियामधील ४० प्रतिनिधींनीं ट्रंबिक व सुपीलो यांच्या नेतृत्वाखालीं क्रोट व सर्व्ह यांच्यामधील एकीच्या अवश्यकतेचें महत्त्व प्रतिपादन केलें. सर्व्हियाच्या प्रतिनिधींनींहि यास आनंदानें संमति दिली. क्रोट व सर्व्ह हे लोक एकराष्ट्रीय आहेत असा जाहीरनामा लवकरच काढण्यांत आला. हंगेरीनें साम-दाम-दंड-भेद या चारी शस्त्रांचा उपयोग करून पाहिला पण या एकीचा भंग झाला नाहीं.

बाल्कनयुद्धांत बाल्कन राष्ट्रांनीं तुर्कस्तानवर विजय मिळविल्यामुळें तर या एकीला चांगलाच जोर चढला. ऑस्ट्रिया हंगेरीनें ही एकी भंग पावण्यासाठीं जुलमाचा कळस करण्यास सुरवात केली होती. पण सर्व्हियानें त्याला भीक

घातली नाहीं. जुगोस्लाव्ह चळवळींत विद्यार्थ्यांचा खूप भरणा होता व त्यांची जहाल मतें त्यांच्या पुढाऱ्यांनांच पटत नव्हतीं. पण विद्यार्थ्यांनां आवरणें या पुढाऱ्यांनां शक्य नव्हतें. या विद्यार्थ्यांनीं आपल्यावर जुलूम करण्याऱ्या शत्रूंच्या पुढाऱ्यांनां यमसदनाला पाठवण्याचे प्रयत्न करण्यासहि कमी केलें नाहीं. त्यांपैकीं कांहींनां यशहि आलें. या विद्यार्थ्यांपैकीं कांहींनीं सारजेव्हो येथें आर्चड्यूक फ्रान्सिस फर्डिनंडचा खून केल्यामुळें या हत्येचा भयंकर परिणाम होऊन महायुद्धाला सुरवात झाली.

महायुद्धाच्या प्रथम भागांत या जुगोस्लाव्ह लोकांचे भयंकर हाल झाले. यांच्यापैकीं हजारों लोकांनां मृत्यूचा मार्ग स्वीकारावा लागला. कित्येकांनां तुरुंगांत कोंवण्यांत आलें. मुद्रणस्वातंत्र्य व भाषणस्वातंत्र्य बंद करण्यांत आलें. बोस्नियामध्यें तर जुलमाची परमावधी झाली पण एवढ्यानेंहि धीर खचूं न देतां जुगोस्लाव्ह चळवळ जिवंत राहिली होती. महायुद्धास सुरवात होण्यापूर्वी, डॉ ट्रंबिक, सुमिलोप्रभृति पुढारी ऑस्ट्रिया–हंगेरींतून पळून गेले होते. त्यांनीं परराष्ट्रांत या चळवळीला आरंभ केला. ठिकठिकाणीं या चळवळीसाठीं शाखा काढण्यांत आल्या. प्रथमतः या चळवळीचें मुख्य केंद्र रोमशहरीं होतें. पण तेथील सरकार जुगोस्लाव्ह चळवळीला विरुद्ध असल्यामुळें हें केंद्र बदलून लंडन येथें आणण्यांत आलें.

१९१५ सालीं लंडन येथें दोस्तसरकार व इटली यांच्यामध्यें गुप्त तह होऊन त्यांत इटलीनें दोस्तराष्ट्रांच्या बाजूनें महायुद्धांत भाग घेतल्यास त्याला जुगोस्लाव्हियन मुलखांतील बराच भाग देण्याचें दोस्तराष्ट्रांनीं कबूल केलें; त्यामुळें तर या चळवळीच्या पुरस्कर्त्यांच्या तोंडचें पाणी पळालें. पण एवढ्यानें धीर खचूं न देतां त्यांनीं रशियाशीं संधान बांधलें. रशियन सैन्यामध्यें २३००० सर्व्हियन लोकांचें एक पथक तयार झालें व या पथकानें डोब्रूजाच्या स्वारींत चांगला पराक्रम गाजविला. पुढें रशियाचा पराभव झाल्यावर इंग्लंड व फ्रान्सच्या सैन्यांत यांनीं नांवें नोंदविलीं व सॅलोनिकाच्या रणक्षेत्रांत यांनीं आपलें नांव गाजविलें. इकडे खुद्द ऑस्ट्रिया–हंगेरींतहि चार्लस राजा बादशहा झाल्यापासून वातावरण निवळूं लागलें होतें. त्यामुळें पार्लमेंटांतील, स्लोव्हेन, क्रोट व सर्व्ह लोकांच्या पुढाऱ्यांनीं आपला जुगोस्लाव्ह पार्लमेंटरी क्लब स्थापन केला होता. यांनीं जुगोस्लाव्हच्या स्वातंत्र्यासाठीं खटपट करण्यास सुरवात केली. अमेरिका युद्धांत पडल्यानंतर स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाला महत्त्व प्राप्त झालें होतें व त्या तत्त्वाची कास धरून जुगोस्लॉव्ह लोकांनींहि आपल्याला स्वातंत्र्य मिळण्याचा आग्रह धरला.

१९१७ सालच्या जुलै महिन्याच्या २० व्या तारखेस पसिक हा सर्व्हियाचा प्रधान व डॉ. ट्रंबिक यांच्यामध्यें गुप्त वाटाघाट होऊन त्यांत जुगोस्लाव्ह हें स्वतंत्र राष्ट्र होणें जरूर आहे, जुगोस्लाव्हियाचें अंतिम ध्येय स्वतःचें पूर्ण स्वातंत्र्य प्रस्थापित करणें असून, या राष्ट्राची शासनपद्धति लोकसत्तात्मक व पार्लमेंटरी पद्धतीची असावी, सार्वत्रिक मतदानपद्धतीचा स्वीकार करण्यांत यावा, आड्रियाटिक समुद्र सर्वांनां खुला राखण्यांत यावा अशा प्रकारच्या अटी ठरवण्यांत आल्या. ट्रंबिक वगैरे पुढारी परत सर्व्हियांत आले व त्यांचें मोठें स्वागत करण्यांत आलें. ही वाटाघाट 'डेक्लेरेशन ऑफ कॉर्फू' या नांवानें प्रसिद्ध आहे. या डेक्लेरेशनला लॉईड जॉर्जनेंहि पाठिंबा दिला पण हंगेरीचें पार्लमेंट अद्यापिहि शुद्धीवर आलें नव्हतें. त्यांनीं आपल्या पार्लमेंटमध्यें जुगोस्लाव्हच्या प्रतिनिधींनां मज्जाव केला. त्यामुळें जुगोस्लाव चिडून गेले व त्यांनीं पुन्हां जोरानें आपली चळवळ सुरू केली. बोल्शेव्हिक रशियाशीं ऑस्ट्रिया–हंगेरीनें जी तहाची वाटाघाट सुरू केली होती, त्या वाटाघाटींला आपल्या तर्फे स्वतंत्र प्रतिनिधी घेण्यांत यावे असें त्यांनीं प्रतिपादन करण्यास सुरवात केली.

प्रथम इटली हा जुगोस्लाव्हियन एकीच्या विरुद्ध होता. पण प्रेसिडेंट विल्सन व लॉईड जॉर्ज यांच्या स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाला देण्यांत आलेल्या पाठिंब्यामुळें, इटलीतहि ऑस्ट्रिया-हंगेरीमधील छोट्या राष्ट्रांनां स्वयंनिर्णय मिळावे अशी इच्छा उत्पन्न झाली. लवकरच डॉ. ट्रंबिक व सिग्नॉर टोरे यांच्यामध्यें खासगी खलबत होऊन, इटली व जुगोस्लॉव्ह यांच्यामध्यें एकीच्या आवश्यकतेबद्दल चर्चा झाली. वाटाघाटींत इटलीनें जुगोस्लाव्हच्या स्वातंत्र्य–चळवळीला मान्यता दिली. आड्रियाटिक समुद्र सर्वांनां खुला ठेवण्यासाठीं पुन्हां चळवळ करण्याचें दोघांनीं ठरविलें. ही वाटाघाट 'पॅक्ट ऑफ रोम' या नांवानें प्रसिद्ध आहे.

याच सुमारास प्राग येथें एक मोठी कॉंग्रेस भरली. या कॉंग्रेसला चेक, पॉलिश, इटालियन, रुमानियन, स्लोव्हाक व जुगोस्लाव प्रतिनिधी हजर होते. या सर्व प्रतिनिधींनीं स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं परस्परांनां साहाय्य करण्याचें अभिवचन दिलें. अमेरिकेनें रोमच्या ॲक्टला संमति दिल्यानें तर जुगोस्लाव लोकांनां अधिकच उत्साह आला. जुगोस्लाव लोकांचा पुढारी कोरोसेक हा होता. यानें स्लाव लूब्लियाना येथें ऐक्यपरिषद भरविली व तींत स्लाव लोकांचें दृढ ऐक्य कसें होईल यासंबंधींची चर्चा केली. इकडे ऑस्ट्रियाची सत्ता हळूहळू शिथिल होत होती.धान्याच्या टंचाईमुळें जिकडेतिकडे बेबंदशाही माजली होती. जुगोस्लाव्ह लोकांपैकीं एका बंडखोर टोळीनें डोंगराचा आश्रय करून ऑस्ट्रियन सैन्याला सतावून टाकण्यास सुरुवात केली होती. अशी बिकट परिस्थिति उत्पन्न झाल्यामुळें दक्षिण स्लाव्ह लोकांचा प्रश्न सोडविण्यासाठीं ऑस्ट्रिया-हंगेरीनें आपले प्रयत्न सुरु केले. पण या प्रश्नाचा विचार वास्तविक जुगोस्लाव्ह लोकांच्या हितसंबंधाकडे दृष्टि ठेवून न करतां आपल्या साम्राज्याच्या हिताकडे लक्ष ठेऊन केल्यामुळें या प्रयत्नाला यश आलें

नाहीं. याच सुमारास शांततापरिषदेचें अधिवेशन भरण्याचें निश्चित झालें होतें. त्याला आपले स्वतंत्र प्रतिनिधी पाठविण्याचा जुगोस्लाव्ह लोकांनीं निश्चय केला.

प्रेसिडेंट विल्सननें ऑस्ट्रियाहंगेरीकडे स्वयंनिर्णयाच्या तत्वासंबंधीं एक खलिता पाठविला व त्या धर्तीवर सर्व राष्ट्रांनीं आपलें राज्यकारभाराचें ध्येय आंखावें असें कळविलें. ऑस्ट्रियाहंगेरीला या स्वयंनिर्णयाच्या तत्वाला मान्यता देण्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. त्याप्रमाणें दुसरेकर्ने बादशाही जाहीरनामा काढून ऑस्ट्रियाचे जर्मन, चेक, जुगोस्लाव्ह, युक्रेनियन असे चार भाग पाडून या चारी भागांतील प्रतिनिधींनीं एकमेकांच्या सल्ल्यानें ऑस्ट्रियाचा राज्यकारभार चालवावा असें प्रसिद्ध केलें, पण ऑस्ट्रिया व हंगेरी या दोघांनींहि या तत्वावरहुकूम वागविण्याचें ठरविल्याशिवाय या जाहीरनाम्याला संमति देण्याचें कोरोसेकर्ने नाकारलें. प्रेसिडेंट विल्सननें याच सुमारास ऑस्ट्रियाहंगेरीला खलिता पाठवून चेकोस्लाव्ह व जुगोस्लाव्ह लोकांनां स्वातंत्र्य देण्याविषयीं कळविलें. याचा फार परिणाम झाला. यामुळे जुगोस्लाव्ह लोकांनां फार आनंद झाला व त्या आनंदाच्या भरांत जुगोस्लाव्ह शिपायांनीं आपल्या अंगावरील ऑस्ट्रियाहंगेरीचीं पदकें भिरकावून दिलीं. बोस्निया व डालमेटिया प्रांतांतील लोकांनीं स्वातंत्र्य पुकारून आपलें राष्ट्रीयमंडळ बनविलें क्रोटियन लोकांनीं फ्यूममधील हंगेरियन शिपायांनां निःशस्त्र करून फ्यूम आपल्या ताब्यांत घेतलें. लगेच आठवड्याच्या आंत क्रोटियानें आपलें स्वातंत्र्य पुकारलें. ऑस्ट्रियानें यावेळीं मुत्सद्दीपणा लढवून आपलें सर्व आरमार जुगोस्लाव्हांच्या ताब्यांत देऊन त्यांना आपल्याकडे वळविण्याचा व अशा रीतीनें इटलीमध्यें व जुगोस्लाव्ह राष्ट्रांमध्यें बिघाड आणण्याचा प्रयत्न केला व त्याला तात्पुरतें यशहि आलें. इटलीला जुगोस्लाव्हांच्या बद्दल मनांत संशय उत्पन्न झाला व तिनें जुगोस्लाव्हांच्या स्वातंत्र्याच्या चळवळीविरुद्ध खटपट करण्यास प्रारंभ केला. सर्व्हियाचा प्रधान पासिक यानें पॅनस्लाव्हचें धोरण स्वीकारलें. पण डॉ. ट्रंबिक याला केवळ स्लाव्ह लोकांचेंच एकीकरण व्हावें असें वाटत नव्हतें. त्याची दृष्टि अखिल जुगोस्लाव्हांचें स्वतंत्र राष्ट्र स्थापित व्हावें अशी होती, त्यामुळें पासिक व ट्रंबिक यांच्यामध्यें वेबनाव उत्पन्न झाला. पासिकर्ने, सर्व्हियाला बोस्निया प्रांत मिळावा अशी खटपट चालू केली; पण सर्व्हियाचा अमेरिकेंतील परराष्ट्रमंत्री मिहल्लोव्हिक यानें पासिक व अमेरिका यांमधील पत्रव्यवहार दाबून ठेवल्यानें त्याला त्याच्या जागेवरून हांकून लावण्यात आलें. इंग्लंडमधील जोव्हानोव्हिक या परराष्ट्र मंत्र्यानें जुगोस्लाव्हैक्यासंबंधींची एक योजना तयार केली व त्या योजनेला बाल्फोरनें संमति दिली. पण पासिकला तें मान्य न झाल्यामुळें जोव्हानोव्हिक याला राजीनामा द्यावा लागला. अशा प्रकारची चमत्कारिक स्थिति शांततापरिषदेच्या सुरुवातीपूर्वीची होती.

पण याच सुमारास नवीनच गोष्ट घडून आली. झेग्रेब प्रांतानें आपलें स्वातंत्र्य पुकारलें व ट्रंबिक व त्याचे साथीदार यांनां आपले परदेशीय प्रतिनिधी या नात्यानें मान्यता दिली व स्वित्झर्लंड येथें जुगोस्लाव्हैक्यासंबंधीं चर्चा करण्यास त्यांनां अधिकार दिला. त्याप्रमाणें जिनीव्हा येथें जुगोस्लाव्हांचे प्रतिनिधी जमले व त्यांनीं वाटाघाट करून एक मसुदा तयार केला. या तयार केलेल्या मसुद्यावर पासिक, कोरोसेक ट्रंबिक वगैरेंच्या सह्या होत्या. या मसुद्यान्वयें जुगोस्लाव्ह हें स्वतंत्र राष्ट्र असून इतर राष्ट्रांशीं जुगोस्लाव्हचा समान दर्जा आहे असें जाहीर करण्यांत आलें. तरी पण जुगोस्लाव्ह लोकांतच अद्यापि दुफळी माजलेली होती. याच सुमारास इटलीला जुगोस्लाव्हांच्या टापूंमधील प्रदेश आपल्या ताब्यांत आणण्याची इच्छा झाल्यामुळें तीनें आपलें सैन्य लुब्लिजनच्या रोखानें रवाना केलें. हें संकट निवारण्यासाठीं झेग्रेबनें सर्व्हिया, मॉटीनिग्रो इत्यादि राष्ट्रांची मदत मागितली. एवढेंच नव्हे तर जुगोस्लाव्ह संस्थानांत ऐक्य घडवून आणून जुगोस्लाव्हच्या राज्यकारभाराची धुरा सर्व्हियाचा राजा अलेक्झांडर याच्या हातांत दिली. त्यामुळें ऐक्याला इष्ट असा परिणाम घडून जुगोस्लाव्हचा राज्यकारभार चालविण्यासाठीं एक राष्ट्रीय मंडळ निवडण्यांत आलें. या मंडळाचे पोट्रिक व कोरोसेक हे अनुक्रमें प्रधान व उपप्रधान झाले, डॉ. ट्रंबिक यास परराष्ट्रमंत्री निवडण्यांत आलें व पासिक, ट्रंबिक, झोलगर यांनां शांततापरिषदेस प्रतिनिधि म्हणून धाडण्यांत आलें.

पण इटलीला जुगोस्लाव्ह राष्ट्राचें अस्तित्वच कबूल नव्हतें. जुगोस्लाव्हांनीं जें आपलें राष्ट्र स्थापलें त्यामुळें इटलीच्या अंगाचा तिळपापड उडून गेला. त्यानें जुगोस्लाव्ह व दोस्तराष्ट्रें यांच्याविरुद्ध टीकांचा भडिमार करण्यास सुरुवात केली. इकडे प्रेसिडेंट विल्सननें तर या परिषदेच्या पूर्वी जे परस्पर राष्ट्रांतील गुप्त तह झाले असतील ते रद्द झाले आहेत असें जाहीर केलें. तर इटलीनें लंडनमध्यें इंग्लंड व दोस्तराष्ट्रें यांच्याशीं जो तह झाला होता तो तह अंमलांत आणण्यासाठीं दोस्तराष्ट्रांनां आव्हान केलें. अशा दुहेरी कात्रींत सांपडल्यानें लाईड जॉर्ज व क्लेमेंको यांची फार त्रेधा उडाली. इटली व प्रेसिडेंट विल्सन यांच्यामध्यें खडाजंगी उडण्याचा प्रसंग आला. इटली व जुगोस्लाव्हियामध्यें समेट व्हावा या इच्छेनें पुष्कळ उपसूचना शांततापरिषदेंत आल्या पण त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं फ्यूम बंदर व ॲड्रियाटिक समुद्रासंबंधींचा प्रश्न यांवर तर भयंकर रणें माजलीं. डी. अनंझियो यानें फ्यूम बंदर आपल्या ताब्यांत घेतलें व याला दोस्तराष्ट्रांच्या सैन्यांनींहि विरोध केला नाहीं. यामुळें विल्सन व दोस्तराष्ट्रें यांच्यामध्येंहि बेबनाव होण्याचा प्रसंग प्राप्त झाला शेवटीं डॉ. ट्रंबिक यानें स्वतःच इटालियन प्रधानाशीं या प्रश्नासंबंधानें खल करण्याचें ठरविलें. या वाटाघाटींत कांहीं तरी निष्पन्न होईल अशीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं. पण डी. अनंझियो यानें डालमेटियावर स्वारी केल्यामुळें या वाटाघाटीला वाटाण्याच्या अक्षता मिळण्याचा रंग

दिसूं लागला. पण अमेरिकन सैन्य व आरमार डालमेटियाच्या भागांत असल्यामुळें डॉ. अनंझियाचें कांहीं चाललें नाहीं. इकडे खुद्द इटलींतहि नवीन प्रधानमंडळ अधिकारारूढ झाल्यामुळें, वातावरण निवळत चाललें होतें. विल्सनच्या सत्तेला ग्रहण लागत चाललें होतें. त्यामुळें इटालीला पुन्हां आशा उत्पन्न होऊन त्यानें जुगोस्लाव्हच्या प्रतिनिधींशीं पुन्हां बोलणें सुरू केलें व शेवटीं या भांडणाचा कसाबसा निकाल रॅपॅलोच्या तहानें लागला. या तहान्वयें इटलीला जुगोस्लाव्ह राष्ट्रांतील बराच भाग मिळाला. डालमेटियावरील आपला हक्क इटलीनें सोडून दिला. पण या तहान्वयें जुगोस्लाव्हच्या व इटलीच्या राज्याच्या हद्दी ठरविण्याच्यावेळीं पुन्हां विघ्नें येऊं लागलीं पण शेवटीं तींहि कशीबशीं मिटविण्यांत आलीं.

अशा रीतीनें जुगोस्लाव्ह राज्याची स्थापना झाली. पण अंतस्थ घटनेचें मोठें कार्य जुगोस्लाव्हियापुढें होतें. खुद्द या राष्ट्रांतच, रॅडिकल व डेमोक्रॅटिक असे दोन पक्ष होते; व त्यांची एकमेकांविषयी द्वेषबुद्धि होती, त्यामुळें जुगोस्लाव्हियाची नवीन घटना करण्याचें काम दुष्कर होऊन बसलें. या वादाचा निकाल लागे तों जी तात्पुरती राज्यघटना आंखण्यांत आली होती तींत वरील दोन्ही पक्षांचे सारखेच प्रतिनिधी होते, त्यामुळें प्रत्येक प्रश्नावर दुफळी माजे. शेवटीं पासिक यानें तटस्थ पक्षाशीं एकी करून, नवीन राज्यघटनेचें बिल मंजूर करून घेतलें. सर्व्हियाच्या राजानें या घटनेप्रमाणें चालण्याची शपथ घेतली; व विरोधी बंडखोर पक्षाला चिरडून टाकण्याचा बेत केला. पण अशा तऱ्हेनें पक्षभेद व कलहांचा सुकाळ, जुगोस्लाव्हियाच्या राजकारणांत माजला असतांना, इतर दृष्टींनीं मात्र जुगोस्लाव्हियांची आस्ते सुधारणा होत चालली होती. सुदैवानें परराष्ट्रीय धोरणावर मात्र सर्व पक्षांचें पूर्ण ऐक्य होतें. १९२१ सालीं जुगोस्लाव्हियाचे प्रयत्न राष्ट्रांतील निरक्षरता नाहींशी करण्याकडे, व खाणी व शेतकी या प्रश्नांकडे लागले होतें.

[ संदर्भग्रंथ.—आर. डब्ल्यू सेटनवॅटसन—दि सदर्न स्लाव्ह क्वेश्चन ( १९११ ); टेलर—दि फ्यूचर ऑफ दि स्लाव्हज ( १९१६ ); बरक-क्रोट्स अँड स्लोव्हेनीज फ्रेंड्स ऑफ दि एंटिटी ( १९१९ ); दि सदर्न स्लाव्ह लायब्ररी; लुजो व्हाज्नोव्हिक—डालमेटिया ( १९२० ); सिसिल—हिस्टरी ऑफ फ्यूम ( १९१९ )]

**जुजुत्सु**—जपानमधील एका प्रसिद्ध खेळाला जुजुत्सु हें नांव आहे. हा खेळ जपानमध्यें फारच लोकप्रिय आहे. या खेळाच्या उत्पत्तीविषयीं निरनिराळीं मतें प्रसिद्ध आहेत. हा खेळ देवादिकांमध्यें प्रचलित असून तेव्हांपासून जपानमध्यें आजतागायत तो चालत आला आहे असें कांहींचें म्हणणें आहे. सुमारें तीन शतकांपूर्वीपासून हा खेळ फार लोकप्रिय झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. हिरटो येथें राहणारा अकीयामा शिरोबी हा विद्वान वैद्य चीनमध्यें गेला असतां त्याला चीनमधील 'बॉक्सिंग' चा खेळ पहावयास मिळाला. या खेळाचें ज्ञान त्यानें संपादन केलें व जपानमध्यें त्यानें तो खेळ प्रचारांत आणला पण हा खेळ विशेष लोकप्रिय न झाल्यामुळें त्यांत बऱ्याच सुधारणा केल्या व त्याला जुजुत्सु हें नांव दिलें.

जुजुत्सु खेळाचें मुख्य तत्व म्हणजे आपल्यापेक्षां अधिक भारी अशा गड्याशीं नमते घेतल्यासारखें दाखवून नंतर संधि साधून त्याला चीत करणें हें होय. या खेळांत शक्तीचा विशेषसा उपयोग करावयाचा नसतो व एवढ्यामुळें हा खेळ कुस्तीपेक्षां निराळा आहे. या खेळांत हत्यारांचा कांहींहि उपयोग करावयाचा नसतो. तात्पर्य हा खेळ केवळ युक्तीच्या जोरावर खेळावयाचा असतो. आपल्या प्रतिस्पर्ध्याला हुलकावण्या देऊन, त्याच्याशीं नमतें घेतल्यासारखें दाखवून तो गाफील झाला असें पहातांच त्याच्या मर्मस्थानीं अचूक घाव घालून त्याला चीत करावयाचा हा या खेळांत मुख्य उद्देश असतो. प्रतिस्पर्ध्याचीं कोणकोणतीं मर्मस्थानें आहेत याचें पूर्ण ज्ञान जुजुत्सु खेळणाऱ्या माणसाला असावें लागतें. प्रतिस्पर्ध्याचें हाड मोडणें, त्याच्या शरीरांतील शीर दाबून त्याला निश्चेष्ट करणें, व तो चीत झाल्यावर नंतर त्याला पुन्हां शुद्धीवर आणणें इत्यादि प्रकार या खेळांत हमेशा घडून येतात. अलीकडे तर या खेळाचें शास्त्रीय पद्धतीनें अध्ययन करण्यांत येऊं लागलें आहे व मनुष्याचीं मर्मस्थानें किती व कोणतीं आहेत याचें ज्ञान जुजुत्सु शिकणाऱ्या विद्यार्थ्यांस देण्यांत येऊं लागलें आहे. या खेळाचें शिक्षण देणाऱ्या शाळा जपानमध्यें पुष्कळ आहेत. पण त्यांमध्यें सर्वांत प्रमुख संस्था म्हणजे प्रो. कनो याची होय. ही संस्था टोकिओमध्यें सकाशितमाची या भागांत आहे. याच शहरीं, झिमोटोमीझक येथें या खेळाची भली मोठी व्यायाम शाळा आहे. या दोन्हीं ठिकाणीं या खेळाचें शिक्षण दिलें जातें. या खेळांत प्रवीण झाल्यास त्यास पदवी दिली जाते.

या खेळाचें तात्पुरतें जरी ज्ञान झालें तरी त्याच्या योगानें आपल्यापेक्षां बलवान गड्याला सहज चकवितां येतें. या खेळापासून अनेक फायदे होतात. आत्मसंरक्षण कसें करावें, शरीराचा तोल संभाळून, पद्धतशीर रीतीनें शत्रूला कसें चीत करावें, या गोष्टी या खेळापासून शिकतां येतात. पूर्वीं हा खेळ सरदार घराण्यांतील लोकांतच प्रचलित असे व खालच्या वर्गांतील लोकांनां या खेळाचें ज्ञान होऊं नये यासाठीं हे सरदार लोक फार खबरदारी घेत असत. पण सरदारशाहीचें युग संपल्यानंतर हा खेळ सर्व प्रकारचे लोक खेळूं लागले. जपानांतील स्त्रियांमध्येंहि हा खेळ प्रचलित आहे. परकी लोकांनीं विशेषतः इंग्लिश व अमेरिकन लोकांनीं या खेळाचें अध्ययन चालविलें आहे पण त्यांत त्यांनां यश यावें तितकें आलें नाहीं.

[ संदर्भ ग्रंथ—टेरी—गाइड टु दि जॅपनीज एम्पायर; चेंबर्लेन-थिंग्स जॅपनीज; प्रो. हॅरिसन—मॉडर्न जपान; ओहाशीं-

जॅपनीज फिजिकल कल्चर (१९०४); के. सैटो-जुजुत्स ट्रिक्स (१९०५); आयर्विंग ह्यॅनॉक-दि कंप्लीट केनो जुजुत्सु (१९०५).]

**जुझोतिया ब्राह्मण**—संयुक्तप्रांतांतील एक लहान जात. बुंदेलखंड व त्या नजीकचा भाग याला युधवती असें नांव असल्याचें समजतें. विष्णुधर्मपुराणांत (१) विंध्याद्रि व यमुना आणि (२) नर्मदा यांमधील प्रांतास "युधदेश" हें नांव दिलेलें आहे. त्या प्रांतांत "जुझोतिया" ही जात आढळते. जुझारसिंग नांवाच्या एका जुन्या बुंदेलखंडच्या राजानें यमुनेच्या उत्तर प्रांतांतून (कनोजिआ) हे लोक बोलावून त्यांनां हें नांव दिलें असें श्रीनगर येथें जातीसंबंधी भरलेल्या सभेचें मत आहे. तथापि कनोजिया ब्राह्मण यांच्या हातची पक्की रसई खात नाहींत [क्रुक; से. रि..]

**जुडा**—जुडा हा प्राचीन पॅलेस्टाइनचा जिल्हा, इस्त्रायल राज्याच्या दक्षिणेस मृतसमुद्र व फिलिस्टाइन मैदान यांमध्यें आहे. याचे तीन स्वाभाविक भाग होतात. डोंगराळ प्रदेश, निम्न प्रदेश व निर्जन प्रदेश. हेब्रानच्या भोंवतालचा भाग अत्यंत सुपीक आहे. जुडा देशाचा प्राचीन इतिहास उपलब्ध नाहीं. प्राचीन हिब्रु राजसत्तेच्या वेळीं जुडा व इस्त्रायल यांमध्यें वैर होतें. इ. स. पूर्वी ५ व्या शतकापासून यहुदी व सॅमारिटन लोकांमध्येंहि विरोध होता. सुमेरियाचा ऱ्हास (इ. स. पू. ७२२) व जेरुसलेमचा नाश (इ. स. पूर्वी ५८६) यांमधील काळ शांततेचा व निकट स्नेहाचा गेला असावा असा तर्क चालतो. पश्चिमेकडचे फिलिस्टाइन, पूर्वेचे मोआब, एडम व उत्तर अरबस्तानापासून नाईल नदीच्या मुखापर्यंत राहणाऱ्या लोकांमुळें जुडाच्या इतिहासावर पुष्कळसा परिणाम झाला. ख्रिस्तीधर्मस्थापनेच्या वेळेला येथें वरीच धामधूम सुरू होती. इ. स. ७० त जेरुसलेमबरोबरच जुडाचा ऱ्हास झाला.

**जुडीआ**—दक्षिण पॅलेस्टाईनच्या भागाला हें नांव होतें. हद्दपारीनंतर यहुदी लोक येथें इराणी, ग्रीक व रोमन सत्तेखालीं रहात असत. कधीं कधीं सबंध पश्चिम पॅलेस्टाईनला हा शब्द लावीत असत. हेराडच्या मृत्यूनंतर आर्केलास हा सुमेरिया, इडुमिया व जुडिया यांचा सुभेदार बनला. हा पदच्युत झाल्यानंतर जुडिया हा प्रांत सिरियाला जोडला गेला. यावर एका प्रतिनिधीची सत्ता असून तो सिझेरियांत रहात असे.

**जुतोघ**—पंजाब इलाखा. सिमला जिल्ह्यांतील ही एक डोंगरी छावणी सिमल्याच्या पश्चिमटोंकापासून सुमारें १ मैलावर आहे. उत्तर अक्षांश ३१°७′ व पूर्व रेखांश ७७°७′. १८४३ सालीं ही जमीन पतिआळ्याच्या राजापासून घेतली. उन्हाळ्यांत कांहीं सैन्य येथें ठेवण्यांत येतें. लोकसंख्या (१९०१) ३७५.

**जुनागड**, संस्थान—हें मुंबई इलाख्यांमधील काठेवाड पोलिटिकल एजन्सींतील एक संस्थान उत्तर अक्षांश २०°४४′ ते २१°९३′ व पूर्व रेखांश ७०°०′ ते ७२°०′ यांच्या दरम्यान असून याचें क्षेत्रफळ ३३३६$\frac{1}{2}$ चौरस मैल व उत्पन्न ५० लाख आहे. याच्या उत्तरेस हलार संस्थान व पश्चिम आणि दक्षिणेस अरबी समुद्र आहे. या संस्थानांत गिरनार, दातार, लासोपावडी वगैरे पर्वत असून त्यांतील गोरखनाथ नांवाचें शिखर सुमारें ३६६६ फूट (समुद्रसपाटीपासून) उंच आहे. भादर, हिरान, मच्छुंद्री, वेरावळ आणि सरस्वती या नद्या यांतून वहात आहेत. या संस्थानांत ५०० चौ. मै. क्षेत्रफळाचें गीर नांवाचें दाट जंगल असून या जंगलांतील कांहीं भाग डोंगराळ आहे. तथापि कांहीं भाग फारच सखल आहे. साऱ्या हिंदुस्थानांत याच जंगलांत सिंह अद्यापीहि आढळतात. हवा साधारण बरी आहे; तथापि, गिरनार पर्वताखेरीज इतरत्र एप्रिलपासून जूनपर्यंत कडक उन्हाळा असतो. पावसाची दरवर्षीची सरासरी ४० इंचापासून ४५ इंचांपर्यंत आहे. संस्थानची लो. सं. (१९२१) ४६५४९३ आहे. लोकसंख्येंत शेंकडा ८२ हिंदू व बाकीचे मुसुलमान आहेत. येथें तलाव बरेच असून सरदारखानानें जुनागड येथें बांधलेला मोठा तलाव सर्वांत मोठा आहे. गीर जंगलांतील गवतामुळें गुरांच्या चाऱ्याची सोय बरीच होते. चित्ते, हरीण, सांबर, लांडगे, नीलगाय, वानर व सिंह या जंगलांत आहेत; वाघ व अस्वल आढळत नाहींत. सिंहास तिकडे सावज असें म्हणतात. इ. स. १४७२ पर्यंत जुनागड संस्थानावर चुडासम नांवाचे रजपुत राजे राज्य करीत होते. त्यापूर्वी अहमदाबादचा सुलतान महमुद बेगडा यानें तें राज्य जिंकलें. अकबराच्या कारकीर्दींत तें राज्य दिल्लीपातशाहीच्या अंमलाखालीं आलें. त्यावेळीं गुजराथच्या सुभेदाराचा प्रत्यक्ष अंमल त्यावर चालत असे. इ. स. १७३५ च्या सुमारास मोंगलांची गुजराथवरील सत्ता नाहींशी झाली व त्यावेळीं शेरखान बाबी नांवाच्या साहसी पुरुषानें मोंगल सुभेदारास हांकून लावून, गुजराथेंत आपला अंमल सुरू केला. या बाबी घराण्याचा मूळपुरुष बहादुरखान होता. शहाजहानच्या कारकीर्दींत तो पुढें आला. पुढें १७०५ मध्यें दक्षिणकाठेवाडांत मराठ्यांनीं धुमाकूळ घातला तेव्हां सफदरबाबी यास दिल्लीहून बंदोबस्तास पाठविलें. पण धनाजी जाधवानें त्याचा धुव्वा उडविला. सफदरनें पुढें पाटणची सुभेदारी मिळविली (१७०६). त्यानें निझामुल्मुल्कास साहाय्य केल्यानें त्याची सत्ता जास्त वाढली. यानंतर (१७२३) निजाम व हमीदखान यांच्या झगड्यांत बाबीनें आपली सत्ता बळकट केली. स. १७२८-२९ त जुनागडचा असदअल्ली हा मेला. त्यानें विरमगांवचा सलाबतमहंमदबाबी यास आपली इस्टेट दिली. सलाबतचा मुलगा शेरखान बाबी होय. हा मराठ्यांविरुद्ध असे. गायकवाडानें त्याची गोघा जहागीर यावेळीं काबीज केली व त्याचा पराभव केला. त्याची राजधानी बालसिनोर होती. शेरखानाचा पुत्र सलाबतखान यानें आपल्या वडील पुत्रास जुनागडचा राजा बनविलें व धाकट्या मुलांस इतर

जमीनी दिल्या. इ. स. १८०७ मध्यें प्रथमतः जुनागडच्या राजाचा व ब्रिटिशांचा संबंध झाला. येथील संस्थानिकास नवाब हा किताब असून ११ तोफांच्या सलामीचा मान आहे. यास मुसुलमानी कायद्याप्रमाणें दत्तक वगैरे घेण्याची सनद मिळालेली आहे. हल्लींचा नवाब हा येथील राजघराण्यांतील (मूळपुरुषापासून) नववा पुरुष असून त्याचें नांव हिज हायनेस महबतखान असें आहे. याचा जन्म १९०० मध्यें होऊन १९११ मध्यें हा गादीवर आला. गिरनार पर्वतावर जैन देवळें आहेत. याशिवाय वेरावळ बंदर व सोमनाथाचें पडकें देवालय याच संस्थानांत आहे.

संस्थानांत जिराईत जमीनीच्या $\frac{1}{2}$ जमीन बागाइती आहे. एकंदरींत जमीन डोंगराळ आहे.समुद्रापासून अगदीं नजीकच्या सखल भागांत घेर नांवाची एक प्रकाराची जमीन असूनह्रि तींत हलकें पीक काढतात. माधवपूर ते ऊनापर्यंत पसरलेली वरील प्रकारची जमीन सर्वांत पिकाऊ आहे; तिला नाघरे म्हणतात; तींत ऊंस चांगला पिकतो. चोरवड, जुनागड व मालिया येथील आंबे उत्तम आहेत

कापूस, ज्वारी, गहूं. तांदूळ, गळिताचीं धान्यें, ऊंस, तंबाखु, कडधान्य वगैरे पिकें येथें होतात. बराचसा कापूस वेरावळहून मुंबईस रवाना होतो. सागवान, शिसव, जंबु, बाभुळ वगैरे झाडें येथें होतात. इमारतीच्या लाकडांचा पुरवठा फार नसल्यामुळें तें मलबारांतून बरेंच इकडे येतें.

किनाऱ्यावर लहान मोठीं गलबतें लागण्याजोगीं पुष्कळ बंदरें आहेत. भेरायखाडी व सील या ठिकाणीं मोतीं व पोंवळीं सांपडतात. वेरावळ, मांगरोळ, भेराय, नवें बंदर, धाराय, सील वगैरे बंदरें आहेत. त्यांत वेरावळ मुख्य असून येथूनच सोरठ व काठेवाडच्या दक्षिणेकडील भागांत धान्य, इमारती लांकूड वगैरे माल जातो. पोष्टखात्याची सोय संस्थानेंच आपली स्वतःची केलेली आहे भावनगर–गोंडल—जुनागड—पोरबंदर ही रेल्वे या संस्थानांतून गेली आहे.

जुनागड संस्थान काठेवाडांतील संस्थानांत पहिल्या प्रतीचें मानलें आहे;गायकवाड व ब्रिटिश सरकारास मिळून सालीना (अनुक्रमें ३७२१०+२८३९४=रु.) ६५६०४ रुपये खंडणी या संस्थानास द्यावी लागते. तथापि काठेवाडांतील निरनिराळ्या छोट्या संस्थानिकांकडून जोरतलबी (खंडणी) या नांवाखाली जुनागडच्या नवाबास ९२४२१ रुपये सालीना मिळतात. ही रक्कम काठेवाड पोलिटिकल एजन्सींतील ब्रिटिश
...र वसूल करून नवाबास पावती करतात. पूर्वींच्या
...नी अधिराज्याची ही एक खूण शिल्लक राहिली
...संस्थानची स्वतःची टांकसाळ असून तींत पाडलेलें
हा ...स्थानांत चालतें. कोरी व अर्धकोरी हीं नाणीं चालू
मध्यें ...त्यां दिवाणशाई म्हणतात. एक कोरींचें वजन १२
म्हणणें ...ल चांदी व बाकी तांबें) असतें. तांब्याच्या
लोकप्रिय ह... ...का म्हणतात; चाळीस दोडक्याची एक
राहणारा अक. ...रावर म्युनिसिपालिट्या आहेत;

पैकीं जुनागडची म्युनिसीपालिटी सर्वांत मोठी असून तिचें उत्पन्न सुमारें १८००० रुपये आहे. संस्थानांत शंभराची इंपीरियल सर्व्हिस भालाइताची एक तुकडी आहे.

शहर.—हीं जुनागड संस्थानची राजधानी असून उ. अ. २१° ३१' व पूर्व रे. ७०° ३६' याच्या दरम्यान व राजकोटच्या नैर्ऋत्येस ६० मैलांवर आहे. याची लोकसंख्या ३५ हजारांपर्यंत आहे. शहरांत उपरकोट नांवाचा एक भाग आहे. त्यामध्यें, त्याच्या खंदकांत व त्याच्या आसपास सर्वत्र जुनीं बुद्धाच्या वेळचीं लेणीं आहेत. सुलतान महंमद बेगडा यानें बांधलेली एक मशीद येथें असून जवळच एक १७ फूट लांब व ७ $\frac{1}{2}$ फूट परिघाची मोठी तोफ पडलेली आहे. उपरकोट (जुना किल्ला) हें प्राचीन जुनागड होय. पूर्वी यास पुष्कळ वेळां वेढा पडलेला आहे. अशा वेळीं जुनागडचे राजे गिरनारच्या किल्ल्यांत आश्रय घेत असत. हल्लींच्या नवीन जुनागडास मुस्तफाबाद हें नांव आहे. हें गांव गिरनार व दातार टेंकड्यांच्या पायथ्याशीं आहे. हें शहर पहाण्यासारखें असून ऐतिहासिक व प्राचीनावशेषांच्या दृष्टीनें त्यास बरेंच महत्त्व आहे. हल्लीं येथें पुष्कळ सुंदर इमारती बांधिल्या आहेत. अशोकाचा (धर्माज्ञांचा) प्रख्यात शिलालेख येथेंच गिरनार टेंकडीच्या पायथ्याशीं सुरक्षित जागीं आहे. गिरनार टेंकडी ही जैन, वैष्णव, शैव, वगैरे सर्व पंथांच्या हिंदूंस पूज्य आहे. [इंपे. गॅझे. पु. १४; बर्जेस—अँटिक्विटीज् ऑफ कच्छ अँड काठेवाड; टाईम्स—इंडियन इयरबुक, १९२२.]

**जुनापाणी**—मध्यप्रांत.नागपूर जिल्हा व तहशील. नागपूरच्या पश्चिमेस ७ मैलांवर हें लहानसें खेडेंगांव असून या गांवाच्या आसपास दगडी वर्तुळें पुष्कळ आहेत. दगड फार मोठमोठे नसतात. पूर्वी गुरें राखणाऱ्या जाती निरनिराळ्या ठिकाणीं भटकत असत. त्यावेळच्या त्या लोकांच्या या रहाण्याच्या जागा असाव्या असा कित्येकांचा समज आहे. कधीं कधीं या दगडाखालीं लोखंडी खिळे व कांहीं हत्यारें सांपडतात.

**जुनापादर**—मुंबई इलाखा. काठियावाडांतील एक छोटें संस्थान. हा तालुका चोक ठाण्यांत, चोकच्या दक्षिणेस तीन मैलांवर आहे. यांत जुनापादर हें एकच गांव आहे. तालुकदार खासियाकोळी आहेत.

**जुनो**—एक प्रमुख रोमन व लॅटिन देवता. ही देवी स्त्रियांचें प्रधान उपास्य दैवत समजली जाते. ही सॅटर्नाची मुलगी, जोव्हाची भगिनी व भार्या होय. प्लुटो, नेपच्यून इ. तिचीं भावंडें होत. जोव्ह हा तिच्या रुपानें मोहित होऊन एके दिवशीं त्यानें मोठें वादळ उत्पन्न केलें. थंडी पडल्यामुळें जिकडे तिकडे गारठा पडला. अशा प्रसंगीं कोकिलेचें रुप घेऊन जूनोजवळ जोव्ह कुडकुडत गेला. तिला त्याची दया आली व तिनें त्यास उचलून उराशीं धरिलें. त्यासरसें त्यानें मूळ रुप धारण करून तिच्याशीं लग्न लावण्याचें

वचन देऊन आपली समागमेच्छा पूर्ण केली. लग्नसमारंभास सुर, नर, पशु, पक्षी इत्यादि सर्व हजर होते. याप्रमाणें जुनो ही देवांची राणी झाली. परंतु जोव्हाचे चाळे तिला आवडत नसत. त्याला दुसऱ्या स्त्रियांच्या ठिकाणीं संतति होई, याचा तिला राग येत असे व तो ती त्या संततीवर काढीत असे. हर्क्यूलीस ट्रॉयमधून परत येतांना जोव्हाला निद्रित करून जुनोनें मोठें वादळ उत्पन्न करून त्याच्या मार्गांत विघ्न उत्पन्न केलें होतें. हें जोव्हाला कळतांच त्यानें तिचे पाय ऐरणीशीं बांधून टेविले. व्हल्कनानें तिला साहाय्य केलें म्हणून त्यानें त्यालाहि स्वर्गांतून खालीं डोकें वर पाय करून फेंकून दिलें. यामुळें जुनो जास्त चिडली व जोव्हास पदच्युत करण्याचा तिनें कट केला. तिला मार्स, हिबी, वगैरे अपत्यें झालीं. मिनर्व्हा हीस जोव्हानें आपल्या मस्तकांतील मगजांतून जेव्हां उत्पन्न केलें तेव्हां या चमत्काराच्या जोडीला तिनें व्हल्कन यास एक वनस्पति हुंगून निर्माण केलें. जुनो निद्रित असतां हर्क्यूलिसला जोव्हानें तिच्या स्तनाशीं लाविलें. त्यावेळेस तिच्या स्तनांतून स्वर्गांत दुग्धाचा स्राव झाला.दुग्धाच्या रंगाचा जो तारकापथ आकाशीं दिसतो व ज्यास आपण आकाशगंगा म्हणतों व इतर दुग्धमय पथ म्हणतात तो या स्तन्यापासून उत्पन्न झाला अशी समजूत आहे. जुनोचें वर्णन रोमन लोकांनीं केलेलें आहे तें फार भव्य आहे. ती सुवर्णसिंहासनावर बसलेली आहे, हातीं सुवर्ण राजदंड धरलेला आहे, त्यावर कोकिल बसलेला आहे, मागें इरिस आपल्या इंद्रधनुष्याचे रंग पाडीत आहे, पार्श्वी मयूर बसला आहे, इत्यादि. सौंदर्याबद्दल लावलेलें बक्षीस पारिसानें व्हीनसला दिलें व जुनोला दिलें नाहीं. याच गोष्टींत ट्रोजनयुद्धाचें मूळ आहे. [ लँप्रेरे—क्लासिकल डिक्शनरी; हवालदार—इलियड. ]

**जुनोना**—मध्यप्रांत. चांदा जिल्हा. चांदाच्या पूर्वेस ७ मैलांवर हें एक रयतवारी खेडें असून या ठिकाणीं एक सुंदर तळें आहे. त्या तळाच्या कांठावर एका प्राचीन राजवाड्याचे अवशेष असून हा राजवाडा धुंडिया रामशहानें ( इ. स. १५९७–१६२२ ) बांधला असें म्हणतात. राजवाड्याच्या पिछाडीस एक चार मैल लांबीच्या भिंतीच्या कांहीं खुणा दिसतात. अलीकडे वरील तळ्याचा उपयोग पाटबंधाऱ्याकडे करतात.

**जुन्नर, तालुका.**—जुन्नर तालुक्याचें क्षेत्रफळ ५९१ चौ. मै. असून लो. सं. १ लक्ष २० हजारांपर्यंत आहे. त्यांत २ गांवें व १५८ खेडीं असून एकंदर वसूल २ लाख १५ हजारांपर्यंत आहे. हा तालुका मिना व कुकडी खोऱ्यांत वसलेला असून तो पश्चिमेकडे डोंगराळ होत गेला आहे. पूर्वेकडील जमीन सुपीक असून मुख्य पीक बाजरीचें आहे. हवा कोरडी निरोगी आहे. दरसाल पावसाचें मान ३० इंच आहे.

**शहर.**—जुन्नर तालुक्याचें ठाणें. हें गांव कुकडी नदीच्या दक्षिण थडीवर वसलेलें असून पूर्ण जिल्ह्यांत पुण्याचें उत्तरेस ५६ मैलावर एका सपाट खोऱ्यांत वसलेलें आहे. गांवाच्या आसपास बागबगीचे वरेच आहेत. गांवांतील कांहीं जुनाट थडगीं व मशीदी पुराणवस्तुखात्याच्या देखरेखीखालीं आहेत. हें गाव लोलिंबराज कवीच्या जन्माचें ठिकाण आहे.

गांवाच्या दक्षिणेस व नैर्ऋत्येस मानमोड डोंगर, पश्चिमेस शिवनेरीचा डोंगर आणि उत्तरेस हाटकेश्वर व गणेश हे डोंगर आहेत. मानमोड डोंगरांत अम्बिका, भीमाशंकर व भूतलिंग अशीं तीन बौद्ध लेणीं आहेत. शिवनेरीच्या वायव्येस तुळजा टेंकड्या व तुळजा नांवाचीं लेणीं आहेत. त्यांच्या उत्तरेस कुकडीचें खोरें असून त्याच्याहि पलीकडे वायव्येस महारखोरें आहे.

महारखोऱ्याच्या पूर्वेस हाटकेश्वराचा उंच डोंगर व त्याच्या पूर्वेस अगदीं लगतच नवरा–नवरीची टेंकडी आहे. आग्नेयीकडील डोंगरास सुलेमान किंवा गणेश डोंगर म्हणतात. येथें एक गणपतीचें देऊळ आहे. दक्षिणेस सुळक्यासारखा उंच पर्वत असून तेथें पीरशाहदावल याची कबर आहे.

जुन्नर येथें प्रवाश्यांस उतरण्याची सोय व जुनी जागा म्हणजे बारावावडी होय. येथील लो. सं. दहा हजारांवर असून त्यांपैकीं आठ हजार लोक हिंदू आहेत.हिंदूंच्या खालोखाल मुसलमानांची लोकसंख्या आहे. गांवाभोंवतीं कोट आहे. जुन्नर हा गांव नाणेंघाटाजवळ वसलेला असल्याकारणानें व्यापारीदृष्टीनें हा गांव पूर्वी मोठ्या भरभराटीचा होता. निदान ख्रि. पू. पहिल्या शतकापासून ह्या गांवास हें व्यापारी महत्त्व आलें असावें असें वाटतें.

नाणेंघाटाच्या मार्गानें कोंकणांतून तांदूळ, बाजरी, नारळ, मीठ वगैरे माल येथें येतो. तसेंच पितळी भांडीं, धान्य, तेल, वगैरे माल येथें आयात होतो.

येथें कागद, पागोटीं, लुगडीं, कांबळीं तयार करितात. पूर्वीपासून जुन्नरीकागद प्रख्यात आहे. येथील कागद पुण्यास, सोलापुरास व संस्थानांतून ( सावकारी दुकानांतून ) वापरला जातो. गांवास म्युनिसिपालिटी आहे. गांवांत पाण्याचा पुरवठा कांहींसा कुकडी नदीपासून व कांहींसा बारावावडीपासून व शिवनेरीच्या पायथ्याशीं असलेल्या दोन विहिरींपासून होतो.

थो. सवाईमाधवरावांच्या कारकीर्दींत रावबाजीस येथें अटकेंत ठेवलें होतें. पुढें येथूनच त्यांना गादीवर बसविण्यासाठीं नेण्यांत आलें. मामलतदार कचेरीजवळ एक मराठी शिलालेख आहे.

येथें तीन हेमाडपंती देवालयें असून दुसरीं पंचलिंग, गणपती, पाताळेश्वर, उत्तरेश्वर व ठाकूरद्वार वगैरे इतर देवालयें आहेत. जैन लोकांचींहि दोन देवालयें आहेत. मुसलमानी अमदानींतील अवशेष म्हणजे कांहीं थडगीं, मशीदी अफीझबागेंतील सुंदरवाडा वगैरे वरेच आहेत. ‘ सौदाग

रची छत्री' हें जुन्नरमधील मुसुलमानांचें अत्युत्तम प्रेक्षणीय काम आहे. याच्या पूर्वेस एक मैलावर अफीझबाग आहे. हें स्थळ अनेक दृष्टींमुळें अत्यंत प्रेक्षणीय आहे. हा बाग निर्माण करणाऱ्या हबशाचें थडगें तेथून जवळच आहे. जुन्नरच्या पश्चिमेस सरासरी अर्ध्या मैलावर शिवनेरचा उंच डोंगर आहे. ह्या डोंगरांत कांहीं बौद्धांचीं लेणीं आहेत. इसवी सनाच्या पहिल्या व दुसऱ्या शतकांत येथें बौद्ध लोक रहात असत. पहिल्या शतकांत क्षत्रप लोकांचें राज्य या प्रांतीं असतां जुन्नर ही त्यांची राजधानी होती. त्यांचा राजा नहपान हा प्रख्यात होऊन गेला. देवगिरीच्या यादवांकडे शिवनेर होती असें अनुमान काढतां येतें. नाणें-घांटाजवळच्या एका मोठ्या खडकास 'नानाचा आंगठा' म्हणतात. एकंदर तिन्ही टेंकड्यांत मिळून १२५ लेणींवजा गुहा आहेत.बौद्धांचे वेळीं ह्या गांवाच्या भडोच, गुजराथ, ठाणें वगैरेशीं व्यापार चालत असे. ११७० ते १३१८ मधील कालांत देवगिरीच्या यादवांच्या ताब्यांत हें गांव होतें. १४४३ मध्यें मलिक तुजार यानें शिवनेर किल्ला घेतला. त्यावेळीं जुन्नर हें एका प्रांताचें मुख्य ठाणें होतें. सन १४७० मध्यें येथें रशियन प्रवासी निकितिन हा आला होता. सन १४८५ मध्यें निझामशाही घराण्याचा संस्थापक मलिक अहमद हा पूर्वी सुभेदार असतांना जुन्नर येथेंच रहात असे. इ. स. १४८६ मध्यें त्यानें निझामउल्मुल्क बहिरी हा किताब धारण करून स्वतंत्र राज्य स्थापिलें. तेव्हां दुसऱ्या महमदशाह ब्राह्मणीनें युसुफ अदिलखानास त्यावर पाठविलें. पण त्यानें त्याचा पराभव केला. सन १४९४ त ह्यानें अहमदनगर शहराची स्थापना केली. तत्पूर्वी जुन्नर हीच त्याची राजधानी होती. सन १५६२ मध्यें हुसेन निझामशहा ह्याचा विजयनगरचा रामराजा व विजापूरचा अलीआदिलशहा ह्यांनीं पिच्छा पुरविल्यामुळें तो जुन्नरच्या पहाडांत पळून गेला. दुसऱ्या बहादूर निझामानें मालोजी भोंसले ह्याला पुणें व सुपें इकडे ज्या जहागिरी दिल्या त्यांत शिवनेरीसह जुन्नर प्रांताचा कांहीं भाग येत असे

दुसऱ्या मुर्तझानिझामशहाचा कांहीं दिवस येथें तळ होता. जिजाबाई ही सुद्धां कांहीं दिवस जुन्नरास ( शिवनेरीवर)राहत होती. त्यावेळीं जुन्नर हें शहाजींच्या ताब्यांत होतें. सन १६३६ मध्यें शहाजीनें विजापूर सरकारच्या नोकरींत जाण्याचें नाकारलें व जुन्नर व इतर किल्लेहि परत करण्याचें नाकारलें होतें. एवढेंच नव्हे तर १६४९ मध्यें शिवाजीनें [illegible]न्नरच्या देशमुखीची मागणी दख्खनचा सुभा मुराद याच्याकडे केली होती.

सन १६५० मध्यें ( मुसुलमानी अंमलांत ) पुण्याच्या वायव्य प्रदेशांतील कोळी लोकांनीं बंड केलें होतें, परंतु तें मोडण्यांत आलें. कैद्यांस जेथें शिक्षा करण्यांत आली त्या [illegible]स 'काळा चौथरा' असें नांव आहे. शिवाजीनें जुन्नर हें जा[illegible] [illegible]ांत दोरीच्या शिड्यांवरून तट चढून मराठ्यांनीं ११ हजार होन, २०० घोडे वगैरे लूट नेली. त्यानंतर पुन्हां दुसऱ्यानें १६५७ च्या मेमध्यें शिवाजीनें रातोरात जुन्नर गांव लूटन अंदाजें तीन लाख होन मिळविले. सन १६७० मध्यें शिवाजीनें शिवनेरीचा किल्ला घेण्याचा पहिला प्रयत्न केला पण तो निष्फळ झाला. मात्र जुन्नर परगणा सर्व लुटून फस्त केला. पुन्हां पांच वर्षांनीं त्यानें दुसरा प्रयत्न केला होता. फ्रायर ह्यानें जुन्नर येथील मोंगल सुभेदाराच्या वेळचें मोठें मजेदार वर्णन लिहून ठेविलेलें आहे ( सन १६७३ ). पुढें ( सन १६८४ ) औरंगझेबानें जुन्नर व सिंहगड येथील ठाणीं मजबूत करण्याचा प्रयत्न केला होता. सन १७१६ मध्यें शाहूनें शिवनेर किल्ल्याकरितां मोंगलांजवळ मागणी केली. नानासाहेब पेशव्यांच्या वेळीं शिवनेर मराठ्यांनां मिळालें.

१७९० सालीं जुन्नर हें एका जिल्ह्याचें मुख्य ठाणें असून ह्यांत २३ परगण्यांचा समावेश होत असे; त्यावेळीं याचें एकंदर उत्पन्न १४६४३३८ रु. होतें असा उल्लेख आढळतो. सन १८४५ मध्यें राघोजी भांगरे यानें केलेल्या बंडाळ्यामुळें जुन्नर येथें एक फौजेची तुकडी ठेवण्यांत आली होती. इतिहासांत जुन्नरच्या किल्ल्याचें( शिवनेर )नांव नेहमीं येतें [ पुणें-ग्याझे. पु. ३; ऐति. लेख संग्रह, पु. १०; डफ, पु. १, २; विल्क—साऊथ इंडिया, पु. १; ब्रिग्ज—फेरिस्ता, पु. ३.]

**जुपिटर** ( जोव्ह )—रोमन राष्ट्राची प्रमुख देवता. द्यौस्पितर या इंडोयूरोपियन देवतानामाचा हा अपभ्रंश असून ग्रीक झ्यूसचा हा रोमन अवतार आहे असें बहुतेक पाश्चात्य पंडित मानितात. हा सॅटर्नचा पुत्र होता. सॅटर्नाला एक टिटन म्हणून बंधू होता. तुला मुलगे होतां कामा नये या अटीवर टिटनापासून सॅटर्नानें राज्य मागून घेतलें होतें. म्हणून त्याला जे मुलगे होत ते तो खाऊन टाकी हें त्याच्या भार्येला आवडत नसे. तिला जेव्हां जोव्ह झाला तेव्हां तिनें जोव्हाला दूर नेऊन ठेविलें व पतीपुढें एक दगडाचा गोळा आणून ठेविला. तो त्यानें लागलाच भक्षण केला. यास मुलगा झाल्याचें टिटनास कळलें तेव्हां त्यानें यास कैदेंत टाकिलें. जोव्ह वर्षाचा होतांक्षणींच टिटनाचें पारिपत्य करण्यास समर्थ झाला व टिटनाचा पराभव करून त्यानें पित्यास बंधमुक्त केलें. परंतु मुलगा इतका प्रबळ झाला हें सॅटर्नला आवडलें नाहीं. तोहि कपटोपाय योजूं लागला.हें जोव्हाला समजतांच पित्याला त्यानें हांकून दिलें. जोव्हाला, प्लूटो व नेप्चून असे दोघे बंधू होते, त्यांनीं सर्व पृथ्वीचें राज्य वांटून घेतलें. स्वर्ग जोव्हनें घेतला. नेप्चूनाला सागरप्रदेश दिला; प्लूटोला नरकप्रांत दिला व पृथ्वी समाइकच राहिली. पृथ्वीवरील कांहीं राक्षसी प्रजेस टिटनाचा पराभव झालेला आवडला नाहीं. कारण त्यांचें व टिटनाचें नातें होतें. त्यांनीं पर्वतावर पर्वत रचून स्वर्गास चढत जाऊन जोव्हशीं युद्ध करण्याचा निश्चय केला.तेव्हां सर्व देव ईजिप्तदेशांत पळून गेले

व पशुरूप धारण करून वनांत लपून बसले. जोव्हनें हर्क्यूलीसाच्या साहाय्यानें या राक्षसांचा नाश केला.

अशा रीतीनें निष्कंटक राज्य झालें असतां जोव्हनें विषयसुखाचा उपभोग घेण्यास प्रारंभ केला. त्यानें जुनोसकट सात बायका केल्या. त्यांतच लाटोना होती. त्यानें डायनाला सुवर्णच्या वर्षावांत गांठिलें, आन्टिओपीला वनचर देवाचें रूप घेऊन गांठिलें; लीडेला, हंसाचें; युरोपेला, वृषभाचें; इजिनेला अग्निज्वालांचें इत्यादि वेगळीं रूपें घेऊन या बायकांशीं समागम केला. त्याला अपत्येंहि पुष्कळ झालीं. गरुड हा याचा आवडता पक्षी होय. जुपिटर सर्व सुरनरांचा शास्ता होय. क्रीटन लोक याचें ध्यान काढीत तेव्हां त्याला कान दाखवीत नसत. कारण यानें कोणाचें कमीअधिक ऐकून पक्षपात धरूं नये अशी त्यांची भावना असे.

**जुबल**—पंजाब, सिमला, डोंगरी संस्थानांपैकीं एक संस्थान. उत्तर अक्षांश ३०° ४६' ते ३१° ८' व पूर्व रेखांश ७७° २७' ते ७७° ५०'. क्षेत्रफळ २८८ चौरस मैल. लोकसंख्या (इ. स. १९२१) २४८५६. पूर्वी हें संस्थान सिरमुर संस्थानचें मांडलिक होतें; परंतु पहिल्या गुरखा लढाईनंतर तें स्वतंत्र झालें. येथील राण्यानें संस्थानचा कारभार योग्य रीतीनें न पहिल्यामुळें ब्रिटिश सरकारास संस्थानचे सर्व अधिकार इ. स. १८३२ मध्यें देण्यांत आले. परंतु १८४० सालीं राण्यास कृतकर्माचा पश्चात्ताप झाला तेव्हां त्याचे अधिकार त्यास परत देण्यांत आले. हल्लीं राणा भगतसिंग हे गादीवर आहेत. संस्थानांत एकंदर ८४ खेडीं असून सालीना उत्पन्न सुमारें ६८८६४० रुपये आहे. खंडणी २५२० रुपये द्यावी लागते.

**जुवो**—मुंबई इलाखा, सिंध प्रांत. खैरपुर संस्थानांतील एक गांव. उत्तर अ. २६° २२' व पूर्व रे. ६९° ३४'. लोकसंख्या (१९०१) ६९२४. येथील लोक मेंढरें पाळतात व लोंकरं या घोंगड्या करतात. येथें एक पटका किल्ला आहे.

**जुभखा**—मुंबई इलाखा. रेवाकांठाच्या पांडु मेहवा समूहांतील छोटें संस्थान. क्षेत्रफळ एक चौ. मैल असून यांत दोन खेडीं आहेत संस्थानिक गायकवाडाचा मांडलिक आहे.

**जुव्हेनल** (इ. स. ६०–१४०)—हा रोमन कवि व औपरोधिक लेखक ॲक्विनम येथें जन्मला; यानें स्वतः लिहून ठेविलेल्या माहितीवरून याच्या चरित्राचा कांहीं थांग लागतो. जुव्हेनल हा एका श्रीमंत गृहस्थाचा मुलगा अगर आश्रित होता. जुव्हेनल पूर्वी गुलाम असून त्याची गुलामगिरींतून सुटका झाली होती. मध्यमवयाचा होईपर्यंत त्यानें धंदा म्हणून नव्हे तर हौसेनें वक्तृत्वाचा अथवा वक्तृत्वाची भाषणें करण्याचा अभ्यास केला. डोमिटिअनचा आवडता नट पारिस याजवर त्यानें पहिलें उपहासात्मक काव्य लिहिलें. या काव्यांत त्याला यश मिळाल्यामुळें त्यानें हाच व्यवसाय पुढें सतत चालू ठेवला. ज्यावेळीं त्यानें उघडपणें आपला प्रयत्न लोकांपुढें मांडला त्यावेळीं तो सर्वांस आवडून त्याची प्रसिद्धि झाली. पण त्यानें पारिसवर लिहिलेल्या लेखामुळें त्याजवर राजाची अवकृपा झाली. लवकरच जुव्हेनल यास लष्करी कामाकरितां ईजिप्तमध्यें धाडिलें. यावेळीं त्याचें ८० वर्षांचें वय होतें. तेथें त्यास अतिशय दुःख व त्रास होऊन तो मरण पावला. त्याच्या सर्व उपहासात्मक काव्यांचे सोळा भाग पडतात व ते पांच पुस्तकांत प्रसिद्ध केले आहेत. पहिलीं ९ काव्यें बाकींच्या काव्यांहून भिन्न स्वरूपाचीं आहेत. पहिल्या नवामध्यें रोममधील गुन्हे, दुर्गुण व मूर्खपणा यांवर अत्यन्त कडक व भेदक शब्दांत टीका केली असून दुसरीं ७ हीं निरनिराळ्या विषयावर निबंधरूप आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. हे उपहासात्मक लेख त्यानें राजकीय हेतूनें लिहिलेले नाहींत. एवढें मात्र खरें कीं लोकांतील दुर्गुण दाखविण्याकरितां राजा व राणी यांचीं उदाहरणें त्यानें दिलीं. लोकसत्ताक राज्यपद्धतीची त्याला कांहींच कल्पना नव्हती. स्वातंत्र्यनाश किंवा सीनेटपद्धतीचें राज्य याबद्दल त्याला वाईट वाटत नव्हतें, तर राष्ट्रीय पौरुषत्व व स्वाभिमान याचा नाश झाल्याबद्दल मात्र त्याला अत्यन्त खेद होत होता. परकीय चालीरीती व देवभोळेपणा त्याला खपत नसे. अशक्तपणा किंवा परिस्थिति यामुळें दुसऱ्यावर अवलंबून राहणाऱ्या लोकांची त्याला कींव येत असे. पात्रांचे स्वभाव, देखावे, कथाप्रसंग व कृती यांचें वर्णन करण्यांत तो अत्यंत वाकबगार होता.

जुव्हेनल हा साहित्यशास्त्रज्ञ होता कीं स्वतंत्र कवि होता हें सांगणें जरांस कठिण आहे. पण एकंदरींत त्यास प्रसिद्ध कवि मानण्यापेक्षां प्रसिद्ध साहित्यशास्त्रज्ञ मानणें अधिक बरें.लेखक व व्यक्ति या दोन्ही नात्यांनीं जुव्हेनलच्या लेखांपासून स्पष्ट कांहींच बोध होत नाहीं. ग्रीक कला व विचार यांचा रोममध्यें शिरकाव होण्याच्या पूर्वीची विचारसरणी याच्या पुस्तकांत आढळते. त्याची कविता जोरदार आहे पण वैचित्र्याभावामुळें ती कंटाळवाणी वाटते.

**जूव**—मध्यप्रांत. सुरगुजा संस्थानांतील एक ओसाड किल्ला.उत्तर अक्षांश २३° ४३' व पूर्व रेखांश ८३° २६'. येथें झाडींत कांहीं कोरीव लेणीं आहेत.

**जूल, जेम्स प्रेस्कॉट** (१८१८–१८८९)—या इंग्रज पदार्थविज्ञानशास्त्रज्ञाचा जन्म मँचेस्टरजवळील सालफोर्ड गांवीं झाला. जॉन डाल्टन या शास्त्रज्ञाकडून त्याला रसायनशास्त्राचें थोडेंसें शिक्षण मिळालें. बाकीचें शिक्षण त्यानें आपलें आपणच संपादन केलें. शास्त्रीय प्रयोगांत अगदीं बरोबर व शक्य तितक्या सूक्ष्म प्रमाणांत मोजमापें घेतलीं पाहिजेत, हें त्यानें प्रथमपासूनच ओळखिलें. व हें तत्त्व त्यानें आपल्या सर्व आयुष्यभर पाळिलें. त्यानें आपल्या वयाच्या १९ व्या वर्षी एक चुंबकजन्य विद्युद्यंत्र तयार केलें व या यंत्रापासून किती विद्युद् उत्पन्न होते याविषयीं मोजमापें घेण्यास पूर्वीच्या पद्धतीनें सुरवात केली;

रची छत्री' हें जुन्नरमधील मुसुलमानांचें अत्युत्तम प्रेक्षणीय काम आहे. याच्या पूर्वेस एक मैलावर अफीझबाग आहे. हें स्थळ अनेक दृष्टींमुळें अत्यंत प्रेक्षणीय आहे. हा बाग निर्माण करणाऱ्या हवशाचें थडगें तेथून जवळच आहे. जुन्नरच्या पश्चिमेस सरासरी अर्ध्या मैलावर शिवनेरचा उंच डोंगर आहे. ह्या डोंगरांत कांहीं बौद्धांचीं लेणीं आहेत. इसवी सनाच्या पहिल्या व दुसऱ्या शतकांत येथें बौद्ध लोक रहात असत. पहिल्या शतकांत क्षत्रप लोकांचें राज्य या प्रांतीं असतां जुन्नर ही त्यांची राजधानी होती. त्यांचा राजा नहपान हा प्रख्यात होऊन गेला. देवगिरीच्या यादवांकडे शिवनेर होती असें अनुमान काढतां येतें. नाणेघांटाजवळच्या एका मोठ्या खडकास 'नानाचा आंगठा' म्हणतात. एकंदर तिन्ही टेंकड्यांत मिळून १२५ लेणींवजा गुहा आहेत.बौद्धांचे वेळीं ह्या गांवाच्या भडोच,गुजराथ,ठाणें वगैरेशीं व्यापार चालत असे. ११७० ते १३१८ मधील कालांत देवगिरीच्या यादवांच्या ताब्यांत हें गांव होतें. १४४३ मध्यें मलिक तुजार यानें शिवनेर किल्ला घेतला. त्यावेळीं जुन्नर हें एका प्रांताचें मुख्य ठाणें होतें. सन १४७० मध्यें येथें रशियन प्रवासी निकितिन हा आला होता. सन १४८५ मध्यें निझामशाही घराण्याचा संस्थापक मलिक अहमद हा पूर्वी सुभेदार असतांना जुन्नर येथेंच रहात असे. इ. स. १४८६ मध्यें त्यानें निझामउल्मुल्क बहिरी हा किताब धारण करून स्वतंत्र राज्य स्थापिलें. तेव्हां दुसऱ्या महमदशाह ब्राह्मणीनें युसुफ अदिलखानास त्यावर पाठविलें. पण त्यानें त्याचा पराभव केला. सन १४९४ त ह्यानें अहमदनगर शहराची स्थापना केली. तत्पूर्वी जुन्नर हीच त्याची राजधानी होती. सन १५६२ मध्यें हुसेन निझामशहा ह्याचा विजयनगरचा रामराजा व विजापूरचा अलीअदिलशहा ह्यांनीं पिच्छा पुरविल्यामुळें तो जुन्नरच्या पहाडांत पळून गेला. दुसऱ्या बहादूर निझामानें मालोजी भोंसले ह्याला पुणें व सुपें इकडे ज्या जहागिरी दिल्या त्यांत शिवनेरीसह जुन्नर प्रांताचा कांहीं भाग येत असे

दुसऱ्या मुर्तझानिझामशहाचा कांहीं दिवस येथें तळ होता. जिजाबाई ही सुद्धां कांहीं दिवस जुन्नरास ( शिवनेरीवर)राहत होती. त्यावेळीं जुन्नर हें शहाजींच्या ताब्यांत होतें. सन १६३६ मध्यें शहाजीनें विजापूर सरकारच्या नोकरींत जाण्याचें नाकारलें व जुन्नर व इतर किल्लेहि परत करण्याचें नाकारलें होतें. एवढेंच नव्हे तर १६४९ मध्यें शिवाजीनें जुन्नरच्या देशमुखीची मागणी दख्खनचा सुभा मुराद याच्याकडे केली होती.

सन १६५० मध्यें ( मुसुलमानी अंमलांत ) पुण्याच्या वायव्य प्रदेशांतील कोळी लोकांनीं बंड केलें होतें, परंतु तें मोडण्यांत आलें. कैद्यांस जेथें शिक्षा करण्यांत आली त्या स्थळास 'काळा चौथरा' असें नांव आहे. शिवाजीनें जुन्नर हें प्रथम १६५६चे जानेवारींत लुटलें.त्यांत दोरीच्या शिड्यांवरून तट चढून मराठ्यांनीं ११ हजार होन, २०० घोडे वगैरे लूट नेली. त्यानंतर पुन्हां दुसऱ्यानें १६५७च्या मेमध्यें शिवाजीनें रातोरात जुन्नर गांव लुटून अंदाजें तीन लाख होन मिळविले. सन १६७० मध्यें शिवाजीनें शिवनेरीचा किल्ला घेण्याचा पहिला प्रयत्न केला पण तो निष्फळ झाला. मात्र जुन्नर परगणा सर्व लुटून फस्त केला. पुन्हां पांच वर्षांनीं त्यानें दुसरा प्रयत्न केला होता. फ्रायर त्यानें जुन्नर येथील मोंगल सुभेदाराच्या वेळचें मोठें मजेदार वर्णन लिहून ठेविलेलें आहे ( सन १६७३ ). पुढें ( सन १६८४ ) औरंगझेबानें जुन्नर व सिंहगड येथील ठाणीं मजबूत करण्याचा प्रयत्न केला होता. सन १७१६ मध्यें शाहूनें शिवनेर किल्ल्याकरितां मोंगलांजवळ मागणी केली. नानासाहेब पेशव्यांच्या वेळीं शिवनेर मराठ्यांनां मिळालें.

१७९० सालीं जुन्नर हें एका जिल्ह्याचें मुख्य ठाणें असून ह्यांत २३ परगण्यांचा समावेश होत असे; त्यावेळीं याचें एकंदर उत्पन्न १४६४३३८ रु. होतें असा उल्लेख आढळतो. सन १८४५ मध्यें राघोजी भांगरे यानें केलेल्या बंडाळ्यामुळें जुन्नर येथें एक फौजेची तुकडी ठेवण्यांत आली होती. इतिहासांत जुन्नरच्या किल्ल्याचें( शिवनेर )नांव नेहमीं येतें [ पुणें-ग्याझे. पु. ३; ऐति. लेख संग्रह, पु. १०; डफ, पु. १, २; विल्क—साऊथ इंडिया, पु. १; ब्रिग्ज-फेरिस्ता, पु. ३.]

**जुपिटर** ( जोव्ह )—रोमन राष्ट्राची प्रमुख देवता. द्यौस्पितर या इंडोयूरोपियन देवतानामाचा हा अपभ्रंश असून ग्रीक झ्यूसचा हा रोमन अवतार आहे असें बहुतेक पाश्चात्य पंडित मानितात. हा सॅटर्नचा पुत्र होता. सॅटर्नाला एक टिटन म्हणून बंधू होता. तुला मुलगे होतां कामा नये या अटीवर टिटनापासून सॅटर्नानें राज्य मरेतों घेतलें होतें. म्हणून त्याला जे मुलगे होत ते तो खाऊन टाकी हें त्याच्या भार्येला आवडत नसे. तिला जेव्हां जोव्ह झाला तेव्हां तिनें जोव्हास दूर नेऊन ठेविलें व पतीपुढें एक दगडाचा गोळा आणून ठेविला. तो त्यानें लागलाच भक्षण केला. यास मुलगा झाल्याचें टिटनास कळलें तेव्हां त्यानें यास कैदेंत टाकिलें. जोव्ह वर्षाचा होतांक्षणींच टिटनाचें पारिपत्य करण्यास समर्थ झाला व टिटनाचा पराभव करून त्यानें पित्यास बंधमुक्त केलें. परंतु मुलगा इतका प्रबळ झाला हें सॅटर्नला आवडलें नाहीं. तोहि कपटोपाय योजूं लागला. हें जोव्हाला समजतांच पित्याला त्यानें हांकून दिलें. जोव्हाला, प्लूटो व नेप्च्यून असे दोघे बंधू होते, त्यांनीं सर्व पृथ्वीचें राज्य वांटून घेतलें. स्वर्ग जोव्हनें घेतला. नेप्च्यूनाला सागरप्रदेश दिला; प्लूटोला नरकप्रांत दिला व पृथ्वी समाइकच राहिली. पृथ्वीवरील कांहीं राक्षसी प्रजेस टिटनाचा पराभव झालेला आवडला नाहीं. कारण त्यांचें व टिटनाचें नातें होतें. त्यांनीं पर्वतावर पर्वत रचून स्वर्गास चढत जाऊन जोव्हशीं युद्ध करण्याचा निश्चय केला.तेव्हां सर्व देव ईजिप्तदेशांत पळून गेले

व पशुरूप धारण करुन वनांत लपून बसले. जोव्हनें इर्क्यूलीसाच्या साहाय्यानें या राक्षसांचा नाश केला.

अशा रीतीनें निष्कंटक राज्य झालें असतां जोव्हनें विषयसुखाचा उपभोग घेण्यास प्रारंभ केला. त्यानें जुनोसकट सात बायका केल्या. त्यांतच लाटोना होती. त्यानें डायनाला सुवर्णाच्या वर्षावांत गांठिलें, आन्टिओपीला वनचर देवाचें रूप घेऊन गांठिलें; लीडेला, हंसाचें; युरोपेला, वृषभाचें; इजिनेला अग्निज्वालांचें इत्यादि वेगळीं रूपें घेऊन या बायकांशीं समागम केला. त्याला अपत्येंहि पुष्कळ झालीं. गरुड हा याचा आवडता पक्षी होय. जुपिटर सर्व सुरनरांचा शास्ता होय. क्रीटन लोक याचें ध्यान काढीत तेव्हां त्याला कान दाखवीत नसत. कारण यानें कोणाचें कर्मीअधिक ऐकून पक्षपात करूं नये अशी त्यांची भावना असे.

**जुवल**—पंजाब, सिमला, डोंगरी संस्थानांपैकीं एक संस्थान. उत्तर अक्षांश ३०° ४६′ ते ३१° ८′ व पूर्व रेखांश ७७° २७′ ते ७७° ५०′. क्षेत्रफळ २८८ चौरस मैल. लोकसंख्या ( इ. स. १९२१ ) २४८५६. पूर्वी हें संस्थान सिरमुर संस्थानचें मांडलिक होतें; परंतु पहिल्या गुरखा लढाईनंतर तें स्वतंत्र झालें. येथील राण्यानें संस्थानचा कारभार योग्य रीतीनें न पहिल्यामुळें ब्रिटिश सरकारास संस्थानचे सर्व अधिकार इ. स. १८३२ मध्यें देण्यांत आले. परंतु १८४० सालीं राण्यास कृतकर्माचा पश्चात्ताप झाला तेव्हां त्याचे अधिकार त्यास परत देण्यांत आले. हल्लीं राणा भगतसिंग हे गादीवर आहेत. संस्थानांत एकंदर ८४ खेडीं असून सालीना उत्पन्न सुमारें ६८८६४० रुपये आहे. खंडणी २५२० रुपये द्यावी लागते.

**जुयो**—मुंबई इलाखा, सिंध प्रांत. खैरपुर संस्थानांतील एक गांव. उत्तर अ. २६° २२′ व पूर्व रे. ६९° ३४′. लोकसंख्या ( १९०१ ) ६९२४. येथील लोक मेंढरें पाळतात व लोकर. या घोंगड्या करतात. येथें एक पटका किल्ला आहे.

**जुमखा**—मुंबई इलाखा. रेवाकांठाच्या पांडु मेहवा समूहांतील छोटें संस्थान. क्षेत्रफळ एक चौ. मैल असून यांत दोन खेडीं आहेत संस्थानिक गायकवाडाचा मांडलिक आहे.

**जुव्हेनल**( इ. स. ६०–१४० )—हा रोमन कवि व औपरोधिक लेखक ॲक्विनम येथें जन्मला; यानें स्वतः लिहून ठेविलेल्या माहितीवरून याच्या चरित्राचा कांहीं थांग लागतो. जुव्हेनल हा एका श्रीमंत गृहस्थाचा मुलगा अगर आश्रित होता. जुव्हेनल पूर्वी गुलाम असून त्याची गुलामगिरींतून सुटका झाली होती. मध्यमवयाचा होईपर्यंत त्यानें धंदा म्हणून नव्हे तर हौसेनें वक्तृत्वाचा अथवा वक्तृत्वाचीं भाषणें करण्याचा अभ्यास केला. डोमिटिअनचा आवडता नट पारिस याजवर त्यानें पहिलें उपहासात्मक काव्य लिहिलें. या काव्यांत त्याला यश मिळाल्यामुळें त्यानें हाच व्यवसाय पुढें सतत चालू ठेवला. ज्यावेळीं त्यानें उघडपणें आपला प्रयत्न लोकांपुढें मांडला त्यावेळीं तो सर्वांस आवडून त्याची प्रसिद्धि झाली. पण त्यानें पारिसवर लिहिलेल्या लेखामुळें त्याजवर राजाची अवकृपा झाली. लवकरच जुव्हेनल यास लष्करी कामाकरितां ईजिप्तमध्यें धाडिलें. यावेळीं त्याचें ८० वर्षांचें वय होतें. तेथें त्यास अतिशय दुःख व त्रास होऊन तो मरण पावला. त्याच्या सर्व उपहासात्मक काव्यांचे सोळा भाग पडतात व ते पांच पुस्तकांत प्रसिद्ध केले आहेत. पहिलीं ९ काव्यें बाकींच्या काव्यांहून भिन्न स्वरूपाचीं आहेत. पहिल्या नवामध्यें रोममधील गुन्हे, दुर्गुण व मूर्खपणा यांवर अत्यन्त कडक व भेदक शब्दांत टीका केली असून दुसरीं ७ हीं निरनिराळ्या विषयावर निबंधरूप आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. हे उपहासात्मक लेख त्यानें राजकीय हेतूनें लिहिलेले नाहींत. एवढें मात्र खरें कीं लोकांतील दुर्गुण दाखविण्याकरितां राजा व राणी यांचीं उदाहरणें त्यानें दिलीं. लोकसत्ताक राज्यपद्धतीची त्याला कांहींच कल्पना नव्हती. स्वातंत्र्यनाश किंवा सीनेटपद्धतीचें राज्य याबद्दल त्याला वाईट वाटत नव्हतें, तर राष्ट्रीय पौरुषत्व व स्वाभिमान यांचा नाश झाल्याबद्दल मात्र त्याला अत्यन्त खेद होत होता. परकीय चालीरीती व देवभोळेपणा त्याला खपत नसे. अशक्तपणा किंवा परिस्थिति यामुळें दुसऱ्यावर अवलंबून राहणाऱ्या लोकांची त्याला कींव येत असे. पात्रांचे स्वभाव, देखावे, कथाप्रसंग व कृती यांचें वर्णन करण्यांत तो अत्यंत वाकबगार होता.

जुव्हेनल हा साहित्यशास्त्रज्ञ होता कीं स्वतंत्र कवि होता हें सांगणें जरासें कठिण आहे. पण एकंदरींत त्यास प्रसिद्ध कवि मानण्यापेक्षां प्रसिद्ध साहित्यशास्त्रज्ञ मानणें अधिक बरें.लेखक व व्यक्ति या दोन्ही नात्यांनीं जुव्हेनलच्या लेखांपासून स्पष्ट कांहींच बोध होत नाहीं. ग्रीक कला व विचार यांचा रोममध्यें शिरकाव होण्याच्या पूर्वीची विचारसरणी याच्या पुस्तकांत आढळते. त्याची कविता जोरदार आहे पण वैचित्र्याभावामुळें ती कंटाळवाणी वाटते.

**जूव**—मध्यप्रांत. सुरगुजा संस्थानांतील एक ओसाड किल्ला.उत्तर अक्षांश २३° ४३′ व पूर्व रेखांश ८३° २६′. येथें झाडींत कांहीं कोरीव लेणीं आहेत.

**जूल, जेम्स प्रेस्कॉट** ( १८१८–१८८९ )—या इंग्रज पदार्थविज्ञानशास्त्रज्ञाचा जन्म मँचेस्टरजवळील सालफोर्ड गांवीं झाला. जॉन डाल्टन या शास्त्रज्ञाकडून त्याला रसायनशास्त्राचें थोडेसें शिक्षण मिळालें. बाकीचें शिक्षण त्यानें आपलें आपणच संपादन केलें. शास्त्रीय प्रयोगांत अगदीं बरोबर व शक्य तितक्या सूक्ष्म प्रमाणांत मोजमापें घेतलीं पाहिजेत, हें त्यानें प्रथमपासूनच ओळखिलें. व हें तत्त्व त्यानें आपल्या सर्व आयुष्यभर पाळिलें. त्यानें आपल्या वयाच्या १९ व्या वर्षी एक चुंबकजन्य विद्युद्यंत्र तयार केलें व या यंत्रापासून किती विद्युद् उत्पन्न होते याविषयीं मोजमापें घेण्यास पूर्वीच्या पद्धतीनें सुरवात केली;

परंतु या पूर्वीच्या पद्धतींत बराच विसंगतपणा आहे असें दिसून आल्यावरून त्यानें विद्युल्लतेच्या एकत्व परिमाणाचें एक निराळेंच माप योजिलें. ज्या विद्युल्लतेनें एका तासांत नऊ ग्रेन पाण्याचें पृथक्करण होतें त्या विजेस एकत्व परिमाणाची वीज समजावी असें त्यानें ठरविलें; यामुळें त्याला सन १८४० च्या सुमारास विद्युत्प्रवाह आणि उष्णता यांच्यांतील परस्परतुलनात्मक संबंध सिद्ध करतां आला. पुढें त्यानें गति आणि उष्णता यांच्यांतील नित्य-संबंध प्रयोगानें सिद्ध करून दाखविला. शक्तिनित्यत्त्वाचा सिद्धांत बसविण्यास त्याच्या या शोधाचा अत्यंत उपयोग झाला. शक्तिनित्यत्वाच्या सिद्धांताच्या शोधांत जूलचा कितपत हात होता हें 'विज्ञानेतिहासां' त सविस्तर सांगितलेंच आहे ( पृ. ५३९-५४३ ). निरनिराळ्या द्रव्यावर दाब आणला असतां किती उष्णता उत्पन्न होते याविषयीं प्रयोग करून नवीन माहिती त्यानें उपलब्ध केली. वाफेच्या यंत्रांतील वाफ थंड करण्याची एक उपयुक्त योजना त्यानें तयार केली व या योजनेचा वाफेच्या यंत्रांत फार उपयोग झाला आहे. विशेषतः समुद्रावरील वाफेच्या यंत्रांत या युक्तीचा अत्यंत उपयोग झाला आहे.

**जेऊर**—मुंबई. अहमदनगर जिल्ह्यांतील व तालुक्यांतील एक व्यापारी गांव. उ. अ. १९° १८' व पू. रे. ७४° ४८'. अहमदनगरच्या ईशान्येस १२ मैलांवर पांच हजार लोकवस्तीचा हा गांव आहे. जवळच एका टेंकडीवर तीन देवळें असून एकावर इ. स. १७८१ मध्यें खोदलेला एक शिलालेख आहे. जेऊरच्या उत्तरेस दोन मैलांवर इमामपुर नांवाचा रहदारी बंगला आहे.

**जेकब**—बायबलमध्यें 'उत्पत्ति' या प्रकरणांत याची हकीकत आली आहे. अब्राहामचा मुलगा इझाक व त्याची पत्नी रेबेका यांचा हा मुलगा. रेबेकाला जेकब व एसाव अशीं दोन जुळीं मुलें झालीं. त्यांत एसाव हा वास्तविक मोठा पण त्यानें जेकबला आपला मोठेपणाचा हक्क देऊन टाकला अशी कथा आहे. रेबेकाचें जेकबवर एसावपेक्षां अधिक प्रेम होतें. इझाक हा म्हातारा झाला होता. एक दिवस त्यानें एसावला उत्तम प्रकारची शिकार मिळवून मला सुग्रास अन्न जेवायला घाल असें सांगितलें. ही गोष्ट रेबेकानें जेकबला सांगून त्याच्याकडून इझाकला सुग्रास अन्न घातलें त्यामुळें इझाकनें त्याला उत्तम अशीर्वाद दिला. यामुळें एसावास फार राग आला व त्यानें जेकबला ठार मारण्याचा निश्चय केला. त्यामुळें आईच्या सांगण्यावरून जेकब हरन येथें आपल्या आजोळीं गेला. हरन येथें असतांना राहेल इच्यावर त्याचें प्रेम जडलें, व त्यानें तिची सात वर्षें सेवा केली पण त्याचें फसवणुकीनें राहेलची थोरली बहीण लीआ हिच्याशीं लग्न करण्यांत आलें. पण त्यानें पुन्हां राहेलची सेवा करून तिचें प्रेम संपादन केलें. जेकबवर परमेश्वरी कृपा असल्यानें त्याची संपत्ति दररोज वाढत चालली होती. त्यामुळें त्याच्या सासऱ्याला त्याच्याविषयीं अतोनात द्वेष उत्पन्न झाला. म्हणून जेकब हा आपल्या बायकांसह पळून गेला. लाबाननें—त्याच्या सासऱ्यानें त्याचा पाठलाग करून त्याला गिलाड येथें गांठलें. पण जेकबनें त्यास खरी हकीकत सांगितल्यामुळें लाबाननें त्याला क्षमा केली. येथें असतांना एसाव हा सैन्यानिशीं येत आहे असें त्याला कळल्यामुळें त्यानें एसावचें सख्यत्व संपादन करण्याकरितां आपले दूत पाठविले व त्यामुळें या दोघा भावाभावांचें पुन्हां सख्य जमलें. जबॉक येथें असतांना त्याची एका देवदूताशीं झोंबाझोंबी झाली व त्यांत त्या देवदूताचा जेकबनें पराभव केला. या स्थानाला त्यानें पेनुएल हें नांव ठेवलें. नंतर जेकब सुक्कोथ येथें गेला व तेथें त्यानें आपणासाठीं घर व कळपासाठीं वाडे बांधले. तेथून तो शखेम येथें गेला. तेथें त्यानें हमोर जातीपासून कांहीं जमिनीचा भाग विकत घेऊन एक वेदी बांधली व तिचें नांव एल अलोहे इस्रायल असें ठेवलें. नंतर जेकब हा बेथेल येथें आला व तेथें त्याला साक्षात्कार झाला. यामुळें जेकब यास इस्रायल हें नांव पडलें. बेथेल येथें त्याची बायको, त्याची दासी इत्यादि माणसें मरण पावलीं. त्यामुळें वैतागून तो हेब्रन येथें आला. येथें त्याच्या भावाचा व त्याचा पुन्हां खटका उडाला व जेकब हा ईजिप्तकडे जाण्यास निघाला. वाटेंत त्याला देवदर्शन होऊन तुझ्यापासून मोठें राष्ट्र निर्माण होईल असा अशीर्वाद मिळाला. ईजिप्तमध्यें आल्यावर त्यानें गोशेन येथें वस्ती केली. या ठिकाणीं तो आपल्या वयाच्या १४७ व्या वर्षीं मरण पावला.

**जेजाकभुक्ति उर्फ जिझोटी**— जिझोटी उर्फ बुंदेलखंड येथें चंदेल्ल घराणें राज्य करीत होतें ( चंदेल्ल पहा ). या प्रांताचें दुसरें नांव जेजाकभुक्ति होतें. खजुराहो ( छत्रपुर संस्थान ), महोबा ( हमीदपूर जिल्हा ) व कालंजर ( बांदा जिल्हा ) हे भाग या राज्यांत प्रमुख होते. आग्रा, अयोध्या या प्रांतांतीलहि कांहीं भाग या मर्यादेत मोडत असे. तसेंच मध्यप्रांतांतीऌ थोडा भाग मोडला जाई. शिलालेखांतून जेजाक अथवा जेजा हें नांव येतें. ह्युएनत्संगानें या राज्याचा व तेथील ब्राम्हणराजाचा उल्लेख केला आहे. हें राज्य मूळ गुप्तसाम्राज्यांत मोडत होतें. त्यांचा नाश झाल्यावर कोणी ब्राम्हण घराणें राज्य करीत असेल. हर्षाच्या निधनानंतर हें घराणें स्वतंत्र झालें असावें व पुन्हां कनोजच्या यशोवर्म्यानें तें जिंकलें असावें. पुढें ९ व्या शतकापासून चंदेल्लांचा उदय झाला. येथील ब्राम्हणांनां अद्यापि जझोटिया असें म्हणतात. [ एपिग्राफिआ इंडिका, पु. १ पृ. १२१. स्मिथ—अर्लि हिस्टरी इंडिया; वैद्य—मध्ययुगीन भारत, पु. १ व २.]

**जेजुरी**—पुणें जिल्ह्यांत सासवडच्या आग्नेयीस १० मैलांवर पुणें-साताऱ्याच्या जुन्या रस्त्यावर हें गांव आहे. हें एक मोठें यात्रेचें ठिकाण आहे. येथील लो. संख्या तीन हजारांवर आहे. येथें म्युनिसिपालिटीहि असून तिची सन

१८६८ त यात्रेकरूंच्या सोयींकरितां स्थापना करण्यांत आली. तिचें उत्पन्न सह्य हजारांपर्यंत आहे. येथें खंडोबा हें मुख्य दैवत आहे. त्याची मुख्य जत्रा चंपाषष्ठीस भरते ह्या देवास बहिरोबा, मल्हारी, मार्तंड हींहि नांवें आहेत. येथील खंडोबाचीं दोन देवालयें उंच टेंकड्यावर आहेत. त्यास कडेपठार म्हणतात. गांवाच्या दक्षिणेस रावबाजी पेशवे यांनीं बांधलेला एक मोठा तलाव आहे. त्यालाच जोडून लहान लहान हौद आहेत. जवळच्या एका विहिरीस मल्हारतीर्थ म्हणतात. तुकोजी होळकरानेंहि येथें एक तलाव बांधला आहे.

ह्या तलावाच्या व गांवाच्या मध्यें एक महादेवाचें (मल्हारराव होळकराच्या स्मरणार्थ बांधलेलें ) देवालय असून तेथें देवामागें मल्हारराव व त्याच्या तीन बायका बनाबाई, द्वारकाबाई व गौतमाबाई यांच्या मूर्ती आहेत. खंडोबाच्या देवळास जाण्यास पुष्कळ पायऱ्या चढून जावें लागतें. चढून जातां जातां मध्यें हेगडी या धननर ( देवाच्या) प्रधानाची समाधी लागते. जवळच खंडोबाची भार्या बनाई हिची समाधि आहे.खंडोबाच्या पहिल्या बायकोचें नांव म्हाळसा;ह्या दोघी परस्परांचा मत्सर करीत असल्यामुळें खंडोबानें एकीस शिखरावर नेऊन बसविलें व एकीस पायथ्याशीं ठेविलें. देवळाच्या मुख्य दरवाज्याजवळ भिंतीस एक मोठें भगदाड आहे. औरंगझेबानें जेव्हां भुलेश्वराच्या देवळाचा नाश केला, तेव्हां खंडोबानें पुढीलप्रमाणें ह्या देवळाचा बचाव केला म्हणून सांगतात. ज्या वेळीं औरंगझेब विध्वंस करण्यास आला त्यावेळीं त्या भगदाडांतून एकदम गांधिल माशांचा (हे भुंगे होते असें कोणी म्हणतात ) घोळका बाहेर आला व त्यानें मुसुलमानांवर हल्ला केला. त्यामुळें औरंगझेबाला देवळाचा उच्छेद करतां आला नाहीं व या प्रसंगानें औरंगझेबाच्या मनांत ह्या देवाविषयीं भक्ति उत्पन्न झाली. देवळाच्या समोरील आवारांत एक मोठी कांसवाची आकृति व एका खांबाशीं भव्य ( ९ फूट उंचीची ) मल्लाची एक मूर्ति आहे. देवळांतील एका मोठ्या घंटेवर पोर्तुगीज भाषेंत व दुसऱ्या घंटेवर मराठींत कोरलेले लेख आहेत. चार फूट लांबीचें पातें असलेली एक तरवार येथें असून ती मल्ल राक्षसाची आहे असें सांगतात. देवळांत एक शके १५९७सालचा शिलालेख आहे. गाभाऱ्यांत शिवलिंगाच्या मागच्या बाजूस मार्तण्ड, खंडेराव व म्हाळसा ह्यांच्या सोन्याचांदीच्या ( तीन ) मूर्ती आहेत; त्याशिवाय आणखी दोन दगडी मूर्ती आहेत. शके १२०३ व १५९७ सालचे लेख येथील उंबरठ्यावर कोरलेले आहेत. या देवळामागें विठ्ठलराव देव चिंचवडकरांनीं बांधलेलें पंचलिंगानें देवालय आहे व त्याच्या मागें 'भंडारा' वांटण्याची खोली आहे. कडेपठारावर खंडोबाचें जुनें देवालय आहे. ह्या दोन देवळांच्या मध्यें खंडोबाच्या घोड्याचे खूर उमटल्याची एक जागा दाखवितात. ती आख्यायिका अशी आहे कीं मल्लासुर राक्षस ब्राह्मणास फार छळीत असे.तेव्हां शिवानें खंडोबाच्या रूपानें अवतार घेऊन त्याचा नाश केला. मृत्युकाल समीप आला असतां मल्लानें शैव धर्माची दीक्षा घेऊन तो व खंडोबा दोघेहि शिवरूपीं विलीन झाले. येथें मार्गशीर्ष शुद्ध चतुर्थी ते शुद्ध सप्तमी, पौष शुद्ध द्वादशी ते वद्य प्रतिपदा, माघ शुद्ध द्वादशी ते वद्य प्रतिपदा, व चैत्र शुद्ध द्वादशी ते वद्य प्रतिपदा असे चार सण पाळण्यांत येतात; त्यावेळीं येथें मोठ्या जत्रा भरतात. त्याचप्रमाणें सोमवती अमावस्या व आश्विन शुद्ध दशमी हेहि सण थोड्या लहान प्रमाणावर सणाप्रमाणें पाळतात. सोमवती आमावास्येच्या दिवशीं खंडोबास समारंभानें मौजे वालेवाडीस स्नानास नेतात. विजयादशमीच्या दिवशीं दोन्ही देवालयांतून सीमोल्लंघनाकरितां मोठ्या थाटानें पालख्या निघतात, तेव्हां मार्गामध्यें दोन पालख्यांची भेट होते. तदनंतर दोन्हीहि देव आपआपल्या स्थानीं परत जातात.खंडोबास अर्पण केलेल्या मुलांमुलींस अनुक्रमें वाघ्या व मुरळी म्हणतात. मराठे लोक खंडोबाचे मोठे भक्त आहेत. मुख्यत्वेंकरून खानदेशांतील व वऱ्हाडांतील मराठे लोक ह्या देवास भजतात. कोळी लोकांत जे 'भगत' म्हणून असतात त्यांच्या जवळ खंडोबाची पालखी असते. हे भगत लोक शुभाशुभ वर्तवितात. प्रत्येक यात्रेकरूंस अर्धा आणा म्युनिसिपालिटीस करादाखल द्यावा लागतो. देवास नैवेद्य दाखवून प्रसाद घेण्याच्या वेळीं पंक्तीस वाघ्यास व मुरळीस घेण्याची चाल आहे. येथें गुरव हेच देवाचे उपाध्ये आहेत. यात्रेकरू दिवटी पाजळून व ती बरोबर घेऊन देवळाच्या पायऱ्या चढतो व देवाचें दर्शन घेतो. देवळांत कांसवाच्या पाठीवर उभे राहून चिंचा व खोबरें उधळण्याची चाल आहे. रात्रीं वाघ्यांचें व मुरळ्यांचें गाणें करावें लागतें. ह्या गोष्टी खालच्या ( गांवाजवळच्या ) खंडोबाच्या देवळांत होतात. याशिवाय कडेपठारावरील खंडोबाची पूजाअर्चा निराळी असते. ती प्रथम मल्हारतीर्थांत स्नान करून मग करावी लागते. पठारावर चढण्याचे मार्ग भिन्नभिन्न आहेत. एकंदर यात्रेस तीन दिवस लागतात. जत्रांच्या दिवसांत येथील बाजारांत बरीच कांबळीं विक्रावयास येतात.

स. १६६२ मध्यें शहाजी व शिवाजी यांची भेट जेजुरी येथें(भेटीस बारा वर्षे होऊन गेल्यामुळें)देवळांत झाली होती. शाहू हा औरंगझेबाकडून सुटून साताऱ्यास जात असतां वाटेंत येथें राहिला होता.येथें त्यावेळीं त्यानें बराच दानधर्महि केला ( १७०७ ). १७९५ सालीं तुकोजी होळकर हा येथें छावणी करून राहिला होता. रघोजी आंग्र्यानें १८४५ सालीं येथील देवीची मूर्ति पळविली होती, ती पुन्हां परत आणून ठेवण्यांत आली. मद्रास व सदर्न मराठा रेल्वेचें हें गांव एक स्टेशन आहे. [ पुणें ग्याझे. पु. ३; डफ-पु.१. ]

जेझ्रील—हें अहाबच्या अमलाखालीं इस्रायल राज्याची राजधानी होतें. हेंच नांव जवळच्या मोठ्या मैदानाला ( एस्ड्रीलानला )लावतात. सध्यांच्या खेड्याचें नांव झरसीन आहे.

हें एका रुक्ष टेंकडीवर आहे. उत्तरेस ऐन एलमैयींता नांवाचा झरा आहे. दुसरें जेझ्रील नांवाचें शहर हेब्रानच्या जवळपास जुडा देशांत होतें. डेव्हीडची पत्नी अहिनोआम हिचें हें गांव होतें.

**जेतपुर** ( देवळी)—मुंबई इलाख्यानध्यें काठेवाड पोलिटिकल एजन्सींतील हें एक संस्थान असून, तें उ. अ. २२° ३६' ते २२° ४९' व पू. रे. ७०° ३५' ते ७०° ५१' यांच्या दरम्यान आहे. याचें क्षेत्रफळ ९४ चौरस मेल असून लो. सं. अकरा हजारांवर आहे.यांत एकंदर २१ खेडीं असून संस्थानचें उत्पन्न सवालाख आहे. काठेवाडांतील चवथ्या दर्जाचें हें संस्थान आहे. जेतपुर या नांवाचा एक तालुकाच असून त्यांत एकंदर २० तालुकदाऱ्या आहेत.

जेतपुर संस्थानासंबंधीं दोन प्रकारच्या हकीकती आढळतात. एक अशी आहे कीं,जुनागडचा पहिला नवाब बहादुरखान यानें वाला वीर यास जेतपुर गांव इनाम दिलें. दुसरी अशी आहे कीं, वीरो नाज यानें वागेसराच्या सामंत वालांनां, त्यांच्या वैजो खासियाशीं चाललेल्या भांडणांत मदत केली. त्यांत सामंत वाला हा लढाईत मारला गेला. वीरोनें दिलेल्या मदतींदाखल वागेसराच्या वालांनीं त्यास जेतपुर इनाम दिलें. पुढें शम्सखान नांवाच्या मुसुलमान सरदारानें, नाजचा नातू चंपाराज यापासून जेतपुर जिंकून घेतलें. परंतु पुढें चंपाराजाच्या वंशजानें पुन्हां तें आपणाकडे घेतलें.

वर ज्या वीस तालुकदाऱ्या सांगितल्या, त्यांपैकीं चार मुख्य आहेतः त्यांचीं नांवें जेतपुर देवळी; जेतपुर वाडिया; जेतपुर मुळुसुरग व जेतपुर नाज काल ही होत. या निरनिराळ्या तालुकदाऱ्या मिळून जेतपुर या नांवाचा जो तालुका आहे त्यांत १४३ खेडीं आहेत. जेतपुर देवळी हें भादर नदीच्या कांठीं असून व्यापाराचें व भरभराटीचें शहर आहे. हें भावनगर–गोंडळ–जुनागड–पोरबंदर या रेल्वेचें एक स्टेशन आहे. गांव तटबंदी आहे

वा डि या.—ही तालुकदारी ७२ चौ. मै. क्षेत्रफळाची असून तींत एकंदर १७ खेडींआहेत. एकंदर लो. सं. दहा हजार असून, जहागिरीचें उत्पन्न १ लक्ष ३० हजार आहे. हें संस्थान काठेवाडांतील तिसऱ्या दर्जाचें आहे.

मु ळु सु र ग.—या जहागिरीचें क्षेत्रफळ २५ चौरस मैल व लो. सं. सात हजार असून तींत एकंदर सोळा गांवें व एकंदर उत्पन्न साठ हजारांचें आहे. हें संस्थान काठेवाडांतील चवथ्या दर्जाचें आहे.

ना ज का ल अ थ वा वि ख्वा .—या तालुकदारीचें क्षेत्रफळ ७२ चौ. मै. व लो. सं. साडेदहा हजार आहे. हींत चोवीस गांवें असून उत्पन्न पावणेदोन लाखांचें आहे. [ इंपे. ग्याझे. पु. १४ ]

**जेधे**—भोर संस्थानांत मौजे कारी म्हणून एक इनाम गांव आहे. तेथील जहागीरदार जेधे या आडनांवाचे मराठे आहेत. हें घराणें त्या ठिकाणीं शिवाजीच्या पूर्वीपासून रोहिडखोऱ्याची व मोरखोऱ्याची देशमुखी करीत होतें. या घराण्यांतील कान्होजी व बाजी या दोन पुरुषांनीं शहाजी व शिवाजी यांनां स्वराज्यस्थापनेच्या कामीं थोडीशी मदत केली. त्याकाळीं प्रत्येक देशमुखापाशीं थोडा बहुत शिपाईस्वारांचा जमाव असे. या जमावाच्या बळावर हे देशमुख आसपासच्या मुलुखांत पुंडाई करीत. शहाजीनें कान्होजी जेध्यास आपल्याकडे वळवून घेतलें होतें. जावळी प्रकरण, अफजलवध वगैरे प्रसंगीं या जेध्यांनीं आपल्या जमावानिशीं शिवाजीस मदत केली. त्याबद्दल शिवाजीनें कान्होजीला तरवार बक्षीस दिली होती. संभाजीच्यावेळीं हे जेधे औरंगझेबास मिळाले, तेव्हां ह्यानें सर्जाराऊ यास जरबेचें पत्र लिहिलें होतें. " स्वामींचे अन्न बहुत...भक्षिलें, त्याचे सार्थक केलेत...मोंगल त्यांकडे जाउनु राहिलेत....तुमचा हिसाब काय....एक्षणीं स्वामी.... गनिमा देखील तुम्हास कापून काढवितील." सारांश हे देशमुख जिकडे आपला फायदा असेल तिकडे जात. म्हणूनच शिवाजीनें यांचें प्रस्थ मोडलें होतें. या जेध्याकडे एक शकावली सांपडली आहे. शिवाजी, संभाजी व राजाराम यांच्या कारकीर्दीतील बहुतेक सर्व प्रमुख गोष्टी हिच्यांत नमूद केलेल्या आहेत; ही बहुतेक विश्वसनीय आहे. ती कै. लो. टिळकांनीं प्रसिद्ध केली आहे. [ राजवाडे खंड. १५; भा. इ. सं. चतुर्थ संमेलन. ]

**जेना**—जर्मनी, सॅक्स–वर संस्थानांतील विश्वविद्यालय असलेलें शहर. हें ग्रॉसवेरिजेनसालफेल्ड रेल्वेनें लायपझिगपासून नैर्ऋत्येस ५६ मैलांवर व वीमर–जेरा रेल्वेनें वीमरपासून आग्नेयेस १२ मैलांवर आहे. लोकसंख्या ( १९१० ) ३८४८७. हें शहर चुनखडीच्या टेंकड्यांनीं वेढलेल्या एका रुंद खिंडींत वसलेलें असल्यामुळें त्याचा देखावा कांहींसा भयानक दिसतो. उत्तरेस जेथें जेनाची लढाई झाली तें पठार आहे. विश्वविद्यालयाशिवाय ह्या ठिकाणचीं पाहण्यासारखीं जीं कांहीं स्थळें आहेत त्यांतील मुख्य म्हटलीं म्हणजे सेंट मायकेलच्या देवळांतील लूथरचा ब्रॉन्झ धातूचा पुतळा, विश्वविद्यालयांतील ग्रंथसंग्रहालयांत ठेवलेली एक सपक्ष सर्पाची विचित्र आकृति आणि विजेल नांवाच्या ज्योतिपशास्त्रज्ञाचें भरवस्तींत असलेलें घर हीं होत. ह्या घराला एक उंच धुराडें आहे, त्यांतून दिवसांदेखील तारे दिसूं शकतात. हल्लीं जेथें विश्वविद्यालयाचें देऊळ आहे, त्या ठिकाणीं पूर्वी एक महाल होता त्यांत गोएटे कवीनें हर्मन आणि डोरोथी ग्रंथ लिहिले. येथल्या विश्वविद्यालयाची स. १५५८ त स्थापना झाली. ज्याच्या दरबारीं गोएटे कवि होता त्या चार्लस ऑगस्टस् ड्यूकच्या कारकीर्दींत ह्या विश्वविद्यालयास फार विद्वान् अध्यापक लाभले होते. कोणतीहि नवीन कल्पना निघाली कीं तिचा स्वीकार करण्यांत ह्या विश्वविद्यालयाचें पाऊल पुढें असतें. १८ व्या शतकाच्या शेवटीं व

१९ व्या शतकाच्या आरंभीं जेव्हां नवीन विश्वविद्यालयें जर्मनींत उघडण्यांत आलीं तेव्हां हें मागें पडलें. तरी देखील १९१४--१५ सालीं येथें १६६६ विद्यार्थी व १२१ अध्यापक होते. विश्वविद्यालयाला जोडून ग्रंथसंग्रहालय, वेधशाळा, धर्मशास्त्राच्या व भाषाशास्त्राच्या संस्था, बागा वगैरे आहेत. अलीकडे येथील पुस्तकांचा व्यापार बराच वाढला आहे व कित्येक छापखाने निघाले आहेत.

१३ व्या शतकांत जेनाला म्युनिसिपल हक्क होते असें दिसतें. हें स. १४३३ त सॅक्सनीच्या इलेक्टरकडे आलें. स. १६६२त वीमरच्या विल्यम ड्यूकच्या बर्न हार्ड नांवाच्या धाकट्या मुलाकडे आलें तेव्हां हें एका अलग लहान संस्थानाची राजधानी झालें. बर्नहार्डचा वंश १६९० सालीं नामशेष झाल्यावर हें इसेनॅक संस्थानास जोडलें गेलें; परंतु स. १७४१ त त्या संस्थानासह तें पुन्हां वीमरकडे आलें. ता. १४ आक्टोबर स १८०६ रोजीं या शहराजवळ नेपोलियननें प्रशियन सैन्याचा पराभव केला.

**जेपाळ**—या वनस्पतीस लॅटिनमध्यें इपोमोका पुर्गा, इंग्रजींत जालप, संस्कृतांत जेपाल, ग्रहद्दंती, मराठींत जेपाळ, हिंदींत जमालगोटा वगैरे नांवें आहेत. मेक्सिकन, ॲंडीज, दोड्ड बेट्टा ( निलगिरी टेकड्यांवरील प्रदेश ), मसूरी ( वायव्यहिमालयाकडील प्रदेश ) या ठिकाणीं व कोंकणांतहि हीं झाडें होतात. ह्याचीं पानें मोगली एरंडाच्या पानासारखीं असतात व बीं एरंड्याप्रमाणें असतें. पूर्वी ही वेल सिंकोना झाडांच्यामध्यें लावीत, परंतु यामुळें, सिंकोना झाडांना नुकसान पोहोंचतें असें आढळून आल्यापासून, ही रीत बंद करण्यांत आलेली आहे. ओलसर, रेताड व ज्या ठिकाणीं सावली असेल अशा जमिनींत कलमें लावून ही वेल वाढवितात. परंतु मोठ्या प्रमाणांत जर लागवड करावयाची असेल तर लहान लहान गांठाळ मुळ्यांचा उपयोग करणेंच चांगलें. या मुळ्या खड्डे खणून, त्यांत एकफुटाच्या अंतरानें आणि सुमारें ६ इंच खोल लावतात. वेलीला वर चढतां यावें म्हणून तिच्याभोंवतीं काठ्या उभारतात.

उ प यो गः—ह्या वेलीच्या बिया उर्फ जमालगोटा हें फार तीव्र जुलाबाचें औषध म्हणून याची ख्याती आहे. विंचवाच्या विषावर जेपाळ पाण्यांत उगाळून लावितात. [ वाट; पदे. ]

**जेफर्सन, थॉमस** ( १७८३- १८२६ )—हा युनैटेड स्टेट्सचा ३ रा अध्यक्ष १७४३ सालीं जन्मला. त्याचा बाप हा जुन्या सरदार घराण्यांपैकीं असूनहि तो डेमोक्रॅट होता त्यामुळें त्याचा मुलगाहि त्याच वळणावर गेला. जेफर्सन यास लॅटिन, ग्रीक, फ्रेंच स्पॅनिश, इटालियन व ॲंग्लोसॅक्सन इतक्या भाषा येत असत. शिवाय त्याचें विद्यार्जन आजन्म चालू होतें व त्यामुळें अखेरपर्यंत अनेक विद्वानांशीं त्याचा स्नेह व पत्रव्यवहार कायम होता. तो मर्दानी खेळांत प्रवीण असून घोड्यांच्या शर्यतींचाहि त्याला शोक होता.

कॉलेज सोडल्यावर यानें वकीलीची सनद मिळविली. तथापि त्या कामांत तो विशेष चमकला नाहीं. यावेळीं त्यानें व्हर्जिनियांतील जुन्या उपयुक्त कायद्यांचा निवडक संग्रह केला. न्यायपद्धतींतील दोष दूर करण्यासाठीं त्यानें राजकारणाकडे लक्ष वळविलें. याच सुमारास त्याचा बाप वारला व त्यामुळें सुमारें सालीना ४०० पौंडांचें उत्पन्न त्याला मिळालें.पुढें त्यानें शेतींत लक्ष घालून उत्पन्न वाढविलें. त्याच संधींत ( १७७२ ) त्याचा विवाह होऊन बरेंचसें उत्पन्न त्याला मिळालें. त्याची बायको पुनर्विवाहित असून चांगली होती. लग्नानंतर तेहतीस वर्षांनीं ती वारली. त्यावर त्यानें पुन्हां लग्न केलें नाहीं. तिच्यापासून त्याला एकंदर सहा अपत्यें झालीं.

त्यानें जस्टिस ऑफ दि पीसच्या जागेपासून सार्वजनिक कामास सुरवात केली. . १७६९ त तो व्हर्जिनियाच्या लोकसभेचा सभासद म्हणून निवडून आला; व नंतर वाढत वाढत १७७४ सालीं कॉंटिनेंटल कॉंग्रेसचा सभासद झाला. तो जोरदार व सफाईदार लेखक असल्यामुळें त्याचें प्रथमपासूनच लोकांवर चांगलें वजन बसत चाललें. वादविवाद माजविणें त्याला पसंत नसे; आणि तो स्वतःहि मोठासा वक्ता नव्हता. या सुमारास इंग्लंड व वसाहती यांचें राजकीय भांडण सुरू झालें; व्हर्जिनियाच्या लोकसभेनें आयातबंदी वगैरे ठराव केले म्हणून तेथील गव्हर्नरनें दोनतीनदां लोकसभा मोडून टाकली. प्रत्येक सभेंत जेफर्सन प्रमुख असे. ‘ वसाहतसंघ ’ स्थापण्याकरितां कॉंटिनेंटल कांग्रेस भरविण्याच्या पूर्वी इंग्लंड व वसाहती यांच्या राजकीय संबंधाविषयीं एक पत्रक त्यानें प्रसिद्ध केलें; त्यांत ‘ पूर्वी सॅक्सन व डेन्स लोक इंग्लंडांत येऊन राहिले, तसेंच अमेरिकेंत इंग्लिश वसाहतवाले आले; तेव्हां हल्लीं डेन्मार्कचा जितपत इंग्लंडवर हक्क आहे तितपतच इंग्लंडचा वसाहतीवर असावा; ’ अशा तऱ्हेनें निर्भिडपणें प्रतिपादन केलें होतें. या पत्राच्याच आधारावर इंग्लिश पार्लमेंटमध्यें बर्कनें आपलें वक्तृत्व लढविलें. पुढें ‘ स्वातंत्र्याचा जाहीरनामा ’ तयार करण्याचा मानहि जेफर्सनलाच मिळाला. लार्ड नॉर्थच्या समेटाच्या सूचनांना उत्तरें त्यानेंच दिलीं. त्यामुळें बेंजामिन फ्रॅंकलिनबरोबर शिष्टाईला जाण्याचें काम त्याच्यावर आलें, पण तें नाकारून व्हर्जिनियाच्या लोकसभेंतच सभासद होऊन अनेक उपयुक्त कायदे करण्याचें काम त्यानें केलें त्याचवेळीं सार्वत्रिक शिक्षणपद्धति त्यानें सुरू करविली. शिक्षणदान हें सरकारचें कर्तव्य आहे, असें प्रतिपादन करणारा पहिला अमेरिकन लोकनायक जेफर्सनच होय.

अमेरिकेंतील संस्थानांत स्वतंत्र राज्यकारभार सुरु झाला तेव्हां व्हर्जिनियाच्या गव्हर्नरच्या जागीं जेफर्सनची नेमणूक झाली. तो गव्हर्नर असतां १७८०-८१ सालीं ब्रिटिश

सैन्यानें त्याच्या करून व्हर्जिनियाची धुळधाण उडवून दिली; पुढें कॉंग्रेसनें इंग्लंडबरोबर तहाचें बोलणें करणाऱ्या वकील-मंडळांत त्याची दोनदां नेमणूक केली; पण तें सर्व नाकारून शेवटीं कॉंग्रेसमध्यें तो काम करूं लागला. तेथें राज्यकारभार प्रकरणांत व गुलामपद्धतीच्या बंदीस मतानुकूल्य तयार करण्यांत त्यानें बहुमोल मदत केली. १७८४ ते १७८९ या सालांत तो फ्रेंच दरबारीं अमेरिकन वकील म्हणून राहिला. फ्रान्समध्यें असतांना त्याचें नैतिक आचरण ढिलें होतें असें म्हणतात. फ्रेंचांनीं नॅशनल असेंब्लीच्या कमेटीमार्फत राज्यघटना तयार करण्याच्या कामांत त्याला मदतीस बोलाविलें. तथापि राजकीय कारणासाठीं त्यानें त्या बहुमानाचा इनकार केला.

फ्रान्समधून परत येतांच त्याची स्टेटसेक्रेटरीच्या जागीं नेमणूक झाली. त्यावेळीं हॅमिल्टन हा खजिनदार होता. या दोघांचीं राजकीय मतें परस्पर विरुद्ध होतीं. त्यांच्या नेतृत्वाखालींच अमेरिकन कॉंग्रेसमध्यें प्रथम 'डेमोक्रॅट्स' व 'फेडरॅलिस्ट्स' असे दोन पक्ष निर्माण झाले; त्यावेळीं फ्रान्सबरोबर तटस्थवृत्तीचें धोरण अमेरिकेनें ठेविलें. जेफर्सन त्याच मताचा होता व पुढें याच धोरणास परिणत स्वरूप येऊन, यूरोपीय राजकारणापासून सर्वस्वी अलिप्त राहण्याचें व 'अमेरिकनांकरतां अमेरिका', यूरोपीयनांनीं तिकडील कारभारांत पडतां कामा नये, असें 'मनरो डॉक्ट्रिन' म्हणून प्रसिद्ध असलेलें तत्त्व निघालें. जेफर्सननें तटस्थवृत्तीच्या तत्त्वानुसार इतकें उत्कृष्ट काम केलें कीं, खुद्द हॅमिल्टनच्या फेडरॅलिस्टपक्षानेंहि त्याची पाठ थोपटली. तथापि दोन पक्षांतील मतभेद वाढतच गेला, हॅमिल्टनचा कल इंग्लड व ब्रिटिशराज्यपद्धति इकडेच अधिकाधिक वाहूं लागला. उलट जेफर्सनची लोकमतानुवर्ती राज्यपद्धतीवरील श्रद्धा रेसभरहि ढळली नाहीं, त्यामुळें अखेर जेफर्सनलाच अमेरिकन लोकशाहीचा मूर्तिमंत पुतळा असें लोक मानूं लागले.

प्रे. वॉशिंग्टनला हे दोन विरोधी मुत्सद्दी असह्य वाटूं लागले. तें जाणून व खासगी परिस्थितीमुळें त्रासून जेफर्सननें राजीनामा दिला. इ. स. १७९६ च्या निवडणूकींत जेफर्सनला दुसऱ्या नंबरचीं मतें मिळून तत्कालीन नियमानुसार तो व्हाइस प्रेसिडेंट झाला. व पुढें १८०० मधील निवडणूकींत ( हॅमिल्टननें जेफर्सनला मदत केल्यामुळें ) प्रेसिडेंट झाला. त्यावेळीं फेडरलपक्षाशीं त्यानें समेटाचें धोरण ठेवलें; त्यामुळें सन १८०४ मध्यें झालेल्या निवडणुकींतहि तो प्रेसिडेंट निवडून आला.

खाजगी वर्तनाप्रमाणें सरकारी कामांतहि त्यानें साधेपणा राखला. त्यानें थाटमाटाचे समारंभ बंद केले, स्वतः प्रेसिडेंटचा चार्ज घेण्यास तो अगदीं साध्या पोशाखांत व ठराविक सहा घोड्यांच्या गाडींत न बसतां पायींच गेला. प्रेसिडेंटचा वाढदिवस सरकारी खर्चानें साजरा करण्याचें त्यानें बंद केलें. सरकारी खात्यांचा खर्च बराच कमी करून कित्येक जागा कमी केल्या; सरकारदरबाराव्यतिरिक्त इतर ठिकाणीं समाजांत तो उच्चनीच भाव विसरून सर्वांबरोबर बरोबरीच्या नात्यानें वागत असे.

मिलिशिया सैन्याची पुनर्घटना, बंदराची तटबंदी,सरकारी कर्जाची फेड, कर कमी करणें व युद्धांत न पडणाऱ्या तटस्थ राष्ट्रांच्या समुद्रावरील हक्कांचें जतन करणें, हीं कामें त्यानें केलीं. त्यानें देशांत शांतता राखली; व्यापार वाढण्यासाठीं आरमाराची वाढ करणें, कारखाने व शहरांची वाढ करणें या कामीं त्याची सहानुभूति नव्हती; उलट शेतकरीवर्गावर मात्र त्याचा पूर्ण भरंवसा होता. त्यानें सुमारें ४० वर्षे सार्वजनिक व्यवसायांत घालविलीं व १८०९ सालीं प्रेसिडेंटची जागा सोडून तो घरीं बसला; तिसऱ्या वेळीं लोकांनीं विनंति केली असतांहि प्रेसिडेंट होण्याचें त्यानें साफ नाकारिलें व वाशिंगटननें घालून दिलेलें हें अधिकाऱ्यासाचें उदाहरण गिरविलें.

जेफर्सन घरीं बसला तरी मॅडिसन, व मनरोसारखे त्याचे मोठे अनुयायीहि हरएक प्रसंगीं त्याची सल्ला घेण्यास येत. तो प्रेमळ,इंग्लंडमधील व्हिगमताचा, चाणाक्ष, माणसांचा पारखी, धूर्त, धोरणी, मिटतें घेणारा, मनमिळाऊ असे. त्याचीं तत्त्वें पराकोटींतील असत व त्याचें प्रतिपादनहि तो कित्येकदां निस्सीम आत्मविश्वासानें व बाणेदारपणानें करी. त्याचीं राजकीय मतें तत्त्वज्ञान व भूतदयाप्रेरित असत. मतदारांच्या बुद्धीस पटेल अशा तऱ्हेनें गोष्टी त्यांच्यापुढें मांडाव्यात व त्यांचें अज्ञान दूर करावें, अशा सुबुद्ध मतदारसंघाच्या मताधिक्यानें चालविलेला राज्यकारभार हेंच खरें न्यायाचें राज्य होय, असें त्याचें ठाम मत होतें. या त्यानें प्रतिपादिलेल्या तत्त्वांवरच हल्लींची अमेरिकन लोकशाही उभारलेली आहे. त्यानें आपल्या एकट्याच्या प्रयत्नानें अमेरिकेंतील स्वराज्याचा प्रयोग यशस्वी करून दाखविला.

जेफर्सननें शेवटचें आयुष्य व्हर्जिनियाची युनिव्हर्सिटी स्थापण्यांत खर्च केलें. त्यानें दाखविलेल्या धोरणानेंच पुढें १९ व्या शतकाच्या अखेरीस अमेरिकेंतील युनिव्हर्सिटयांचे उद्देश, व्यवस्था व अभ्यासक्रम ठरविण्यांत आले आहेत. अखेर अखेर जेफर्सनची पैशाच्या बाबतींत बरीचशी ओढाताण होऊं लागली. त्याची जमीन पुष्कळ असूनहि उत्पन्न थोडें येई. त्यामुळें त्याला आपली १०००० निवडक ग्रंथांची लायब्ररी कमी किंमतीस विकावी लागली; तेव्हां अखेर राष्ट्रीय वर्गणी गोळा करून त्याला १६५०० पौंड देण्यांत आले. अखेर तो ४ जुलै १८२६ रोजीं मरण पावला. [ ब्रिटा. पु. १५ रॅन्डोल्फ–थॉमस जेफर्सन; दि जेफर्सन सायक्लो.].

**जेबील** ( प्राचीन जेबल--बिब्लस )—हें सिरियांतील शहर बैरुतच्या उत्तरेस २० मैलांवर आहे. याच्याभोंवतीं १॥ मैल परिघाची कोट असून आग्नेय टोंकास एक किल्ला आहे. जेबलचा राजा जोहावमलेक याचा एक कीर्तिस्तंभ

येथें सांपडला आहे. येथील लोकसंख्या सुमारें ३००० आहे. फोनिशियन जेबल व ग्रीक बिब्लस येथील रहिवाशी चांगले पाथरवट व जहाजें बांधण्यांत निपुण गणले जात. मुसलमानी अमलाखालीं या शहराचा ऱ्हास झाला.

**जेम्सटाऊन**—हें अमेरिकेंतील संयुक्त प्रांतांतील शिटाका कौंटीचें मुख्य स्थान. हें शिटाका सरोवराच्या दक्षिणेस आहे. लो. सं. ( १९०० ) २२८९२. येथें रेल्वेचे दोन फांटे असून शिवाय आगबोटींची सरोवरांतून रहदारी चालते. हें उन्हाळ्यांत हवा खाण्याचें ठिकाण आहे. गॅस व जलशक्ति यामुळें उद्योगधंद्यांना विशेष तेजी आली आहे. ह्या शहरास १८८६ मध्यें शहराचे हक्क प्रथमतः मिळाले. जेम्स प्रेन्डरगास्ट या जुन्या वसाहतवाल्याचें नांव या शहरास देण्यांत आलें आहे.

**जेम्स-मेरी सॅन्ड्स**—ज्या ठिकाणीं हुगळी नदीशीं दामोदर व रूपनारायण या नद्यांचा संगम होतो तेथील वाळूच्या पुळणीस हें नांव आहे. ही पुळण ३ मैल लांब व ½ मैल रुंद आहे. इ. स. १६९४ मध्यें जेम्स आणि मेरी या नांवाचें गलबत या ठिकाणीं फुटलें होतें म्हणून हीस हें नांव मिळालें आहे. ही पुळण नदीच्या मध्यभागीं असून दोन्ही बाजूस नदीचें पात्र आहे. ही जागा अतिशय धोक्याची असल्यानें ती सुधारण्याचे प्रयत्न काय करावयाचे या विषयींच्या योजनांचा विचार होत आहे.

**जेम्स राजे**—या नांवाचे राजे इंग्लंड व स्कॉटलंड हे दोन देश, अरेगॉन प्रांत ( फ्रान्स ) आणि मार्जोर्का बेट इतक्या ठिकाणीं होऊन गेले. त्यापैकीं इंग्लंड व स्कॉटलंड येथील राजेच विशेष महत्त्वाचे आहेत. शिवाय जेम्स नांवाचा एक तोतया ( ओल्ड प्रिटेंडर ) इंग्लंडांत होऊन गेला.

इं ग्लं ड चे जे म्स रा जे.—या नांवाचे एकंदर दोनच राजे झाले. ते इंग्लंडच्या स्टुअर्ट घराण्यांतील असून तोतया जेम्सहि त्याच घराण्यांत झाला. त्यांचा राजकीय इतिहास 'इंग्लंड' या लेखांत दिला आहे.

पहिला जेम्स (१५६६-१६२५):—हाच मूळ स्कॉट्लंड-मधील सहावा जेम्स राजा असून इंग्लंडच्या एलिझाबेथ राणीनंतर औरस वारस नसल्यामुळें नजीकचा वारस जेम्स हा इंग्लंड व स्कॉटलंड या दोन देशांचा संयुक्त राजा झाला. हा स्कॉटलंडची राणी मेरी(क्वीन ऑफ स्कॉट्स ) व तिचा दुसरा नवरा डार्नले यांचा मुलगा होय. मेरीच्या संशयित दुर्वर्तना-मुळें ती पदभ्रष्ट होऊन जेम्स हा एक वर्षाचा असतांना स्कॉटलंडचा राजा झाला. तो लहानपणापासून अगदीं अशक्त होता. तथापि घोड्यावरून रपेट करण्याचा त्याला फार नाद होता. त्याला लॅटिन व फ्रेंच भाषांचें चांगलें ज्ञान व प्रॉटेस्टंट धर्मपंथाचें उत्तम शिक्षण देण्यांत आलें होतें. त्यामुळें तो विद्येचा चाहता पण धर्मेडखोर बनला. वयांत आल्या-वर त्यानें स्कॉटलंडांतील सरदारांची अरेरावी बंद करून सुव्यवस्थित राज्यकारभार सुरू केला. त्यानें उद्योगधंद्यास उत्तेजन दिलें व धर्मसत्तेला राजसत्तेच्या वर्चस्वाखालीं आणलें. येवढ्यावरूनच तो दुबळा राजा नव्हता किंवा पढतमूर्खहि नव्हता असें सिद्ध होतें. त्याचीं राजकारणांत ध्येय गांठण्याचीं साधनें अयोग्य असल्यामुळें त्याचे खरे गुण पुढील पिढ्यांस विद्रूप भासतात. वक्रराज-नीती( किंग—क्रॅफ्ट )चें शिक्षण त्याला मूळपासून मिळालें होतें. वचन देणें व तें मोडणें हा त्याचा नेहमींचा क्रम होता. शिवाय कुरूप शरीर, वडवड्या स्वभाव, स्कॉच स्नेह्यांवरील देणग्यांचा वर्षाव वगैरे गोष्टींमुळें तो इंग्लंडांत अप्रिय बनून अनियंत्रित राज्यकारभाराच्या प्रय-त्नामुळें राजपक्ष व पार्लमेंटपक्ष यांच्यांमधील यादवी युद्धाचा त्यानें पाया घातला. स्पेन या कॅथोलिक देशाबरोबर सख्य जोडण्याचा प्रयत्न फसल्यामुळें त्याचीं कारस्थानें फारच हास्यास्पद ठरलीं. जेम्सला ग्रंथकर्ता म्हणून प्रसिद्ध होण्याची मोठी इच्छा होती म्हणून त्यानें बरेंच लिखाण लिहिलें. तें वाङ्मय या दृष्टीनें अगदीं सामान्य दर्जाचें असलें तरी इंग्लंडच्या राजावलींत विद्वत्तेच्या बाबतींत त्याचा नंबर बराच वर लागतो.

दुसरा जेम्स (१६३३-१७०१):-हा पहिल्या चार्लस राजाचा मुलगा दुसऱ्या चार्लस राजानंतर१६८५सालीं गादीवर आला. तो युद्धकलाकुशल होता. डच युद्धांत जय मिळवून त्यानें आरमारी लढाईंतलें कौशल्य व्यक्त केलें.पण त्याचें खासगी वर्तन चांगलें नव्हतें. शिवाय तो उघडपणें रोमन कॅथॉलिकपंथी बनला. राज्यावर आल्यावर त्यानें कॅथॉलिकांवरील नियंत्रणें दूर करण्याचा व त्यांना अधिकाराच्या जागा देण्याचा क्रम सुरू केल्यामुळें राजकीय जुलूम व धार्मिक दुराग्रह यांनीं सर्व देशांत फार असंतोष माजला. त्याचें पर्यवसान स.१६८८ च्या राज्यक्रांतींत झालें. नंतर पळून जाऊन तो फ्रान्समध्यें राजाश्रयाखालीं राहिला. आयर्लंडमध्यें बंड उभारून गेलेलें राजपद पुन्हां मिळविण्याचा त्यानें प्रयत्न केला पण तो फसला. नंतर मरेपर्यंत तो मोठा साधुपुरुष बनून रोग बरे करण्याचे अद्भुत चमत्कार करीत फ्रान्समध्यें राहिला. त्याला ॲन हाइड नांवाच्या बायकोपासून आठ मुलें, मोडनाची मेरी या बायकोपासून सात मुलें आणि दुसऱ्या दोन उपस्त्रियां-पासून कांहीं मुलगे व मुली मिळून बरींच अपत्यें होतीं.

जेम्स, थोरला तोतया (१६८८—१७६६):—हा दुसऱ्या जेम्सचा मुलग बापानें राज्य गमावल्यावर फ्रान्सच्या राजाच्या आश्रयास राहिला होता, व फ्रान्सचा राजा चवदावा लुई याच्या मदतीनें त्यानें १७१५ सालीं राज्य परत मिळविण्याकरितां स्कॉटलंडमध्यें बंड केलें पण तें फसलें. १७१८ सालीं जेम्सनें पोलंडच्या राजघराण्यांतील मेरिआ क्लेमेंटिनाशीं लग्न करण्याचें ठरविलें. पण फ्रेंच राजा लुई यानें त्यास विरोध केल्यावर दोघांनीं इटलींत पळून विवाह लावला. पोपनें त्यांना इंग्लंडचे राजा राणी म्हणून मान

देऊन राहण्यास राजवाडा व खर्चाकरितां १२००० क्राऊन इतकी वार्षिक नेमणूक दिली. जेम्सचें यायकोशीं पटलें नाहीं, व तीहि लवकरच वारली. जेम्सला दोन मुलगे होते.

स्कॉटलंडचे जेम्स राजे.—या नांवाचे सहा राजे झाले. पहिला जेम्सः–(१३९४–१४३७)हा तिसऱ्या रॉबर्टचा मुलगा असून त्याला शिक्षणाकरितां फ्रान्सला धाडला असतां वाटेंत इंग्लंडच्या चवथ्या हेनरीनें कैदेंत ठेविलें. तेथें त्याला चांगलें शिक्षण देण्यांत आलें. त्यानें मर्दानी–खेळांत तसेंच तत्त्वज्ञान व कायदेशास्त्र यांत प्राविण्य मिळविलें होतें.१४२३ सालीं ६०००० मार्क खंडणी घेऊन त्याला कैदेंतून मुक्त केलें व तो स्कॉटलंडचा राजा झाला. त्यानें पार्लमेंटच्या सभा भरवून कायदे पास करून घेऊन सनदशीर राज्यकारभाराचा पाया घातला. सरदारांची बंडें मोडलीं. पण कांहीं सरदारांच्या कारस्थानामुळें १४३७सालीं त्याचा खून झाला. एका इंग्रज सरदाराच्या जेन नांवाच्या मुलीशीं त्याचा विवाह झाला. त्याला दोन मुलगे, सहा मुली होत्या.त्याच्या विधवेनें पुनर्विवाह केला. जेम्सला संगीत व काव्यकलेचा नाद होता. त्यानें स्वतः कांहीं कविता केल्या.

जेम्स दुसरा ( १४३०–१४६० ):—पहिल्या जेम्सच्या वधानंतर त्याचा मुलगा दुसरा जेम्स हा गादीवर आला. तो सज्ञान होईतों आर्चिबाल्ड डग्लस हा त्याच्या नांवानें राज्यकारभार पहात असे. या अवधींत लिव्हिंग्स्टन व क्रिक्टन यांचें प्रस्थ माजलें होतें. डग्लस व क्रिक्टन यांच्यामध्यें वैर उत्पन्न झालें होतें. १४४३ सालीं विल्यम डग्लसनें राजाच्या नांवानें क्रिक्टनशीं लढाई पुकारून क्रिक्टनचा पाडाव केला. १४४९ मध्यें जेम्सनें स्वतः आपल्या हातीं कारभार घेतला. त्यानें पहिल्या प्रथम लिव्हिंग्स्टनला कैद केलें व थोड्याच दिवसांत विश्वासघाताच्या आरोपावरून डग्लसचा शिरच्छेद केला. त्यामुळें डग्लसच्या पक्षपात्यांनीं बंड केलें. पण त्यांत त्यांचा मोड झाला. इंग्लंडमध्यें या सुमारास आपापसांत कलह सुरू होऊन बंडाळी माजली होती. लौकरच ' गुलाबांचें युद्ध ' सुरू झालें. या युद्धांत लँकॅस्टरच्या वतीनें जेम्सनें भाग घेतला होता.या लढाईंत राक्सबर्गच्या वेढ्यांत हा मारला गेला. याला तीन मुलगे व दोन मुली होत्या. हा लोकप्रिय राजा होता. याच्या कारकीर्दींत जमीनींसंबंधीं कायदे, चलनी नाण्यांचा सुधारणाविषयक कायदा, न्यायखात्यांत सुधारणा इत्यादि गोष्टी घडून आल्या.

जेम्स तिसरा ( १४५१–१४८८ ):—याचा राज्याभिषेक १४६० सालीं झाला. पण हा लहान असल्यामुळें त्याची आई त्याच्या वतीनें राज्यकारभार पहात असे. पुढें ती वारल्यानंतर अलेक्झांडर बॉईड व त्याचा भाऊ लॉर्ड बॉईड यांनीं राजास आपल्या ताब्यांत आणून त्याच्या इच्छेविरुद्ध स्कॉटलंडचा राज्यकारभार चालविला. वयांत आल्यावर त्यानें स्वतःच्या हातांत राज्यसूत्रें घेतलीं व आपल्या राज्यांतील बलाढ्य सरदारांचा पराभव करून आपली सत्ता चिरस्थाई केली. हा जात्या शांतवृत्तीचा होता. आपल्या पदरीं हलक्या दर्जाचे खुशामती त्यानें ठेवले होते. त्यामुळें तो लोकांनां अप्रिय झाला. या खुशामत्यांच्या चिथावणीनें त्यानें आपल्या दोन्हीं भावांनां पकडून अटकेंत ठेवलें. आल्बनी हा कैदेंतून निसटून इंग्लंडला पळून गेला. इंग्लंडचा राजा चौथा एडवर्ड यानें त्याला स्कॉटलंडचा राजा म्हणून मानण्याचें कबूल केलें. त्यामुळें जेम्सनें इंग्लंडविरुद्ध युद्ध पुकारलें. पण इतक्यांत जेम्सच्या सरदारांनीं त्याला बंदिवान केल्यामुळें आल्बनीशीं तह करणें जेम्सला भाग पडलें. पण पुनः आल्बनीनें एडवर्डशीं आपल्यास राज्यपद मिळविण्यासाठीं संधान बांधलें पण याच सुमारास एडवर्ड वारल्यामुळें त्याचा बेत फसला व तो फ्रान्समध्यें पळून गेला. तेथें तो१४८५ सालीं वारला जेम्स राजाला इंग्लंडशीं सख्यत्वाचें नातें जोडावयाची मनापासून इच्छा होती. पण त्याच्या सरदारांनां हें पसंत नव्हतें. शिवाय तो ख्यालीखुशालींत आपला वेळ दवडीत असल्यामुळें तो सरदारांनां फार अप्रिय झाला होता. त्यामुळें स्कॉटलंडमध्यें अंतस्थ बंड माजलें जेम्सनें या सरदारांवर चाल केली; पण सॉक्षीबर्न येथें त्याचा पराभव झाला. पुढें तो विश्वासघातानें मारला गेला. त्याला तीन मुलगे होते. जेम्सला गाण्यावजावण्याची व शिल्पशास्त्राची फार गोडी होती. एकांतवासाची त्याला फार आवड असे. राजाच्या अंगीं आवश्यक लागणारी धडाडी त्याच्यामध्यें नव्हती.

जेम्स चौथा ( १४७३–१५१३ ):—आपल्या बापाच्या मरणानंतर जेम्स हा गादीवर आला. बापापेक्षां याच्या अंगीं धडाडी, मुत्सद्दीपणा हे गुण विशेष होते. आपल्या प्रजेला संतुष्ट ठेवण्यासाठीं तो फार जपत असे व त्यामुळें लोकांची त्याच्यावर फार भक्ति असे. तो राज्यावर आल्यावर कांहीं उपद्व्यापी सरदारांनीं त्याला सातव्या हेनरीच्या ताब्यांत देण्याचा कट केला. पण सुदैवानें तो फसला. हेनरीनें त्याला आपली मुलगी देऊं केली, ती त्यानें प्रथम नाकारली, पण पुढें त्याचा व तिचा विवाह घडून आला. आपली सत्ता बळकट करून त्यानें यूरोपमध्यें आपली मान्यता वाढविण्याचा प्रयत्न केला पण आठवा हेनरी इंग्लंडच्या गादीवर आल्यामुळें याला एक नवीनच प्रतिस्पर्धी उत्पन्न झाला. हेनरीचा नक्षा उतरविण्यासाठीं जेम्सनें त्याच्याशीं लढाई पुकारली पण १५१३ सालीं फ्लॉडन येथें जी इतिहासप्रसिद्ध लढाई झाली तींत जेम्स हा मारला गेला. त्याला एक मुलगा होता व धर्मबाह्यसंबंधापासूनहि दोनतीन मुलें झालीं होतीं.

जेम्स हा उदार, शहाणा व धडाडीचा राजा होता. त्याच्या कारकीर्दींत स्कॉटलंडमध्यें बऱ्याच इष्ट सुधारणा घडून आल्या. शिक्षणाला व वाङ्मयाला त्यानें उदाराश्रय दिला. सांपत्तिक परिस्थिति याच्या कारकीर्दींत पुष्कळ सुधारली. तो मुत्सद्दी व शूर असल्यामुळें आपल्या राज्यांतलीं किरकोळ बंडें त्यानें मोडून टाकून स्कॉटलंडला

प्रबळ केलें व यूरोपियन राजकारणांत आपला वचक बसविला. हा धार्मिक व देवभोळा होता. दानधर्माच्या बाबतींत तो मागेंपुढें पहात नसे. एकंदरींत हा लोकप्रिय राजा होऊन गेला यांत शंका नाहीं.

जेम्स पांचवा (१५१२-१५४२):—चौथ्या जेम्सच्या निधनानंतर हा जेम्स राज्यावर बसला. हा अज्ञान असल्यामुळें याच्या वतीनें याची आई राज्यकारभार पहात असे. पण पुढें तिनें अँगसच्या अर्लेशीं विवाह केल्यामुळें आल्बनीचा ड्यूक जॉनस्टुअर्ट याच्याकडे राज्यकारभाराचीं सूत्रें आलीं. हा इंग्लंडचा वैरी होता. अँगस, व जेम्सची आई इंग्लंडची पक्षपाती होती. त्यामुळें या उभयतांमध्यें भयंकर कलह माजले. १५२४ मध्यें पार्लमेंटनें जेम्सच्या हातांत कारभार दिला. १५२६ मध्यें अँगसनें जेम्सला आपल्या कैदेंत ठेवलें. पण १५२८ मध्यें जेम्स निसटून गेला. व मोठें सैन्य जमवून त्यानें अँगसला स्कॉटलंडमधून हांकून लावलें. नंतर आपल्या पदरच्या बंडखोर सरदारांनां हात दाखून त्यांनां जेम्सनें वठणीवर आणलें. इंग्लंडवरहि त्यानें किरकोळ हल्ले केले. शेवटीं १५३४ मध्यें इंग्लंड व स्कॉटलंड यांच्यामध्यें तह झाला. हेनरीनें आपली मुलगी त्याला देऊं केली पण त्याला फ्रेंच राज्यकन्या अधिक पसंत पडल्यानें त्यानें मॅडेलाईनशीं विवाह केला. पण ती थोडक्याच दिवसांत वारल्यामुळें त्यानें ड्यूक ऑफ ऑर्लीनच्या मुलीशीं लग्न केलें. फ्रेंचांच्या पक्षपातामुळें त्यानें इंग्लंडशीं विरोध आरंभला. १५४२ मध्यें हेनरीनें स्कॉटलंडवर आपली सेना पाठविली. जेम्सला त्याच्या सरदारांचा पाठिंबा नसल्यानें त्याचा पराभव झाला, त्यामुळें मनाला धक्का बसून जेम्सनें प्राण सोडला. जेम्सला दोन मुलगे व एक मुलगी झाली. पण दोन्ही मुलगे अल्पवयांतच वारले. जेम्स हा धडाडीचा होता. तो सरदारांनां अप्रिय होता. तरी लोकांची त्याच्यावर भक्ति होती. तो धर्मशील व विद्वानांचा आश्रयदाता होता.

**जेयोर**—मुंबई, रेवाकांठा. राजपिप्पलच्या नांदोद पोटभागांतील ठिकाण. येथें कुंभेश्वर महादेवाचें देऊळ असून याबद्दल नर्मदापुराणांत माहिती आहे. श्रावणी शनिवारीं येथें एक लहानशी यात्रा भरते.

**जेरिको**—जेरिको हें महत्त्वाचें शहर जार्डन नदीच्या खोऱ्यांत असून मृतसमुद्राच्या उत्तरेस ५ मैलांवर आहे. विजयी इस्रायल लोकांनीं हल्ला करून घेतलेलें असें हें पहिलें कॅननाईट शहर होय. येथेंच बाबिलोनियन व खेडेफिया यांच्यामधील शेवटची लढाई झाली. या लढाईमुळें जुडाचें राज्य लयास गेलें. सिरियनांचा सेनापति बॅचिडिस यानें जेरिको घेऊन त्याची तटबंदी केली होती. येथील जमीन सुपीक असून तालवृक्षांबद्दल फार प्राचीन काळापासून याची प्रसिद्धि आहे. ख्र्यां येथें फळांची लागवड चांगली होते. सांप्रतचें एरीहा हें एक घाणेरडें खेडेगांव असून त्याची लो. सं. सुमारें ३०० असावी. ख्र्यांचें गांव जुन्या ठिकाणीं नाहीं. कालवे, साखरेच्या गिरण्या इत्यादि अवशेष अद्यापि दृष्टीस पडतात. हा सर्व जिल्हा तुर्कस्तानच्या खासगी मालकीचा असे.

**जेरिझिम**—जेरिझिम हा सुमेरियांतील एक पर्वत असून समुद्रसपाटीपासून १८४९ फूट उंच आहे. जेरिझिम व एबल ह्या दोन पर्वतांमध्यें नेब्लस (शेकेम) शहर आहे. जेरिझिम हें सॅमेरिटन लोकांचें पवित्र ठिकाण असून आयझाकनें त्या ठिकाणीं यज्ञ केला अशी त्यांची समजूत होती. जेरिझिम पर्वतावर आशीर्वाद व एबलवर शाप दिले जात. मॅनोसेहानें जेरिझिमवर सॅमेरिटन लोकांसाठीं इ. स. पूर्वी ४३२ त एक मंदिर बांधलें होतें.

**जेरुसलेम**—पॅलेस्टाइन प्रांतांतील मुख्य शहर. इस्रलाईट लोकांनीं कॅननमध्यें प्रवेश करण्यापूर्वीच या शहराची प्रसिद्धि असून त्याला उरुसलीम (सलीमचें शहर, अगर शांततेचें शहर) हें नांव होतें. हेड्रियन बादशहानें हें शहर पुन्हां बांधवलें व त्याला एलिया कॅपिटोलिना हें नांव ठेवलें. अरबांचें हें पवित्रस्थान असून ते या शहराला, बीट एल मुकडीज, एल मुकडीज अगर एल कड्स या पावित्र्यदर्शक नांवानें संबोधितात.

हें शहर दक्षिण पॅलेस्टाइनमध्यें असून भूमध्यसमुद्रापासून २५०० फूट व मृत समुद्रापासून ३८०० फूट उंचीवर वसलेलें आहे. हें पठारावर वसलेलें असून याच्या चहूंबाजूंनें डोंगरांच्या रांगा पसरल्या आहेत. या टापूंत सायलेशियन खडूचे थर असून त्यांच्या खालीं शाडूचे जाड थर आहेत. हे दोन्ही प्रकारचे दगड इमारतीला फार उपयुक्त आहेत. पूर्वी या शहराच्या नजीक असलेल्या किड्रान दरींतून एक सुंदर झरा वहात असे पण या शहराच्या आसपासच्या टापूंत 'फाउंटन आफ दि व्हर्जिन' हा एकच झरा काय तो हल्लीं आढळतो.

जेरुसलेमचा प्राचीन इतिहास संपूर्ण व सुसंगत असा उपलब्ध नाहीं. जोशुआनें या शहरावर स्वारी करण्यापूर्वी हें शहर ईजिप्शियन लोकांच्या ताब्यांत होतें असें टेल एल अमर्नाच्या विटांवरून समजतें. इस्रलाइट लोकांच्या स्वारीच्या वेळीं हें शहर जेब्साइट लोकांच्या हातांत होतें. या लोकांनीं हें शहर जिंकून घेतल्यानंतर या इस्रलाईट लोकांचा नायक डेव्हिड यानें या शहराच्या पूर्वेकडील भागांत आपलें रहाण्याचें ठिकाण बांधलें व पश्चिम भागांत आपला सेनापति जोआब याची स्थापना केली. या दोघांनींहि आपापल्या भागाची तटबंदी केली. पुढें डेव्हिडनें या शहराजवळच जेहोव्हचें भव्य देवालय बांधविलें. हें देवालय सालोमनच्या देखरेखीखालीं बांधलें गेलें. पुढें सालोमनच्या कारकीर्दीत या शहराची फारच भरभराट झाली. पण त्याच्या मरणानंतर जरोबोमनें बंड करून इस्राएल लोकांचें स्वतंत्र राज्य स्थापून शेकम ही त्याची राजधानी केली. पण थोडक्याच दिवसांत ईजिप्तचा राजा शिशाक यानें जेरुसलेमच्या

राजाचा पराभव करून येथील अपार संपत्ति लुटून नेली. त्यामुळें जेरुसलेमचें अर्धें अधिक महत्व नाहींसें झालें. या नंतरचा जेरुसलेमचा तीन शतकांचा इतिहास म्हणजे हें शहर आपल्या ताब्यांत न आणण्याविषयीं निरनिराळ्या लोकांनीं जे प्रयत्न केले त्या प्रयत्नांचा इतिहास होय.

इस्रलाइटांचा राजा जो अश यानें जूडहाचा राजा अमझिअह याच्यापासून जेरुसलेम जिंकून घेतलें व त्या शहराच्या तटांचा नाश केला. पण पुढें अमझिअहचा मुलगा उझिअह यानें या तटांची आपल्या कारकीर्दींत पुन्हां दुरुस्ती केली. पुढें असीरियाचा सेनापति सेनाचेरिब यानें या शहरावर हल्ला केला असतां त्यांत त्याचा पराभव झाला.नंतर झेडेकिअहच्या कारकीर्दीत बाबिलोनचा राजा नेबुकाडझ्झर यानें जेरुसलेमवर स्वारी करून तें शहर लुटलें व पुष्कळशा लोकांनां बंदिवान करून नेण्यांत आलें. जेहोव्हच्या देवालयाचाहि यानें विध्वंस केला; पण नेबुकाडझ्झर आपल्या राजधानीकडे परत गेल्यानंतर झेडेकिअहनें तें देवालय पुन्हां बांधवलें व पुढें पुष्कळ वर्षांनीं नेहमियानें या शहराच्या भोंवतालच्या तटांची पुन्हां दुरुस्ती केली. त्यामुळें पुन्हां पुष्कळशा यहुदी लोकांनीं येथें वस्ती करण्यास सुरुवात केली.

यानंतर अलेक्झांडरच्या स्वारीपर्यंतचा जेरुसलेमचा इतिहास उपलब्ध नाहीं. अलेक्झांडरनें ख्रि. पू. ३२२ सालीं या शहरावर स्वारी केली.त्यावेळीं यहुदी लोक त्याला शरण आल्यामुळें त्यानें तें शहर यहुद्यांच्याच ताब्यांत दिलें. पण पुढें दहा बारा वर्षांनीं ईजिप्तचा राजा पहिला टॉलेमी यानें या शहरावर स्वारी करून तें जिंकलें व त्या शहराचा विध्वंस केला. पुढें सायमननें बऱ्याच वर्षांनीं पुन्हां या शहराची डागडुजी केली व जेहोव्हचें देवालय बांधविलें, पण ख्रि. पू. १६८ च्या सुमारास, अँटिओकस एफिफेनीस यानें पुन्हां जेरुसलेम जिंकून देवालय व तट हे उध्वस्त करून टाकले व शहरापासून थोड्या अंतरावर एक किल्ला बांधून तेथें ग्रीक लष्कर ठेवलें. पुढें अँटिओकसच्या जुलमी कारकीर्दींत यहुदी लोकांनीं बंड करून भयंकर चिकाटीनें तें शहर पुन्हां जिंकून घेतलें व किल्ल्याचा विध्वंस केला. या कृत्याचें सर्व श्रेय सायमन मॅकेबीज याला दिलें पाहिजे. याचेंच घराणें एक शतकपर्यंत जेरुसलेमवर राज्य करीत होतें. पुढें रोमन लोकांचें लक्ष या टापूकडे लागलें व पांपानें ख्रि. पू. ६५ मध्यें हें शहर पुन्हां जिंकलें. पुढें थोड्या वर्षांनंतर हेरॉड दि ग्रेट यानें या ठिकाणीं आपला अंमल बसवून इदूमेपन घराण्याची स्थापना केली. याच्या कारकीर्दींत जेरुसलेमला पुन्हां चांगले दिवस लाभले. यानें तटांची उत्तम दुरुस्ती करून जुहोव्हचें देवालय बांधून त्याशिवाय अँटोनियाचा किल्ला बांधला. आपल्याला रहाण्यासाठीं शहराच्या पश्चिम भागांत एक भव्य राजवाडा बांधला. याशिवाय शहरांत नाटकगृह, व मोठमोठीं क्रीडांगणें बांधून शहराला त्यानें शोभा आणली. पुढें हेरॉडच्या पुढील राजांनीं या शहराभोंवतीं तीन तट बांधले.

पण टिटसच्या कारकीर्दींत पुन्हां जेरुसलेमवर घाड आली. त्यानें जेरुसलेमवर हल्ला करून, या तिन्ही तटांचा जवळ जवळ विध्वंस केला, व हें शहर जिंकून त्या ठिकाणीं आपलें लष्कर ठेवलें. यानंतर सुमारें साठ वर्षें हें शहर रोमन लोकांच्या ताब्यांत होतें. पण पुढें इ. स. १३२ मध्यें शरकोबाच्या आधिपत्याखालीं यहुदी लोकांनीं बंड करून जेरुसलेम जिंकून घेतलें. पण थोडक्याच दिवसांत ज्यूलियस स्टेव्हस या रोमन सेनापतीनें तें शहर पुन्हां जिंकून बेचिराख करून टाकलें. पुढें हॅड्रियननें तें शहर पुन्हां बांधवून त्याचें एलिया कॅपिटोलिना हें नांव ठेवलें. त्यानें या शहरांत मोठमोठीं देवालयें व भव्य इमारती बांधविल्या. यहुद्यांनां या शहरांत रहाण्याची पूर्ण मनाई केली. पुढें १५० वर्षांनंतर कॉन्स्टंटाईन बादशहानें येशूख्रिस्ताच्या फांशीची जागा व त्याचें थडगें यांचें नक्की ठिकाण ठरवून त्या ठिकाणीं दोन भव्य देवालयें बांधलीं. पुढें इ. स. ४६० मध्यें रोमन साम्राज्ञी यूडेसिया ही जेरुसलेम पहावयाला आली असतां तिनें या शहराची पुन्हां डागडुजी करून त्याठिकाणीं सुंदर इमारती बांधविल्या. ६ व्या शतकांत, जस्टीनीयन बादशहानें, व्हर्जिनमेरीच्या नांवानें एक भव्य चर्च बांधलें व त्याला जोडून दोन रुग्णालयें काढलीं. ६१४ मध्यें इराणचा राजा खुश्रू यानें जेरुसलेमवर चाल करून तें शहर जिंकलें व त्याचा विध्वंस केला; पण मेडेस्टस नांवाच्या साधूनें उध्वस्त देवालयें पुन्हां बांधली. या खुश्रूचा पराभव ६२९ सालीं हेरॅक्यूलस बादशहानें केला व जेरुसलेम पुन्हां आपल्या ताब्यांत आणलें. यानंतर ६३७ सालीं खलीफा उमर यानें हें शहर जिंकलें पण त्यानें या शहराचा विध्वंस केला नाहीं व सर्वधर्मीयांनां त्यानें शांततेनें राहूं दिलें. पुढें १०९९ सालापर्यंत हें शहर मुसुलमानांच्या ताब्यांत होतें. पण पुढें बौलिनच्या गाडफ्रेनें हें शहर जिंकून घेतलें. पण ५०।६० वर्षांनंतर म्हणजे ११८७ सालीं सलादिननें पुन्हां मुसुलमानांच्या ताब्यांत हें शहर आणलें. नंतर बराच काल हें शहर मुसुलमानांच्या ताब्यांत राहिलें. १५१७ सालपर्यंत हें ईजिप्तच्या सुलतानांच्या ताब्यांत होतें, पण तुर्कस्थानचा राजा पहिला सेलीम यानें हें शहर जिंकलें. तुर्की अमदानींत जेरुसलेमची वाढ बरीच झाली. या शहराची अंतर्व्यवस्था मुतेसरुफीच्या हातांत असे व त्याच्या हाताखालीं निरनिराळ्या धर्मांच्या लोकांनीं आपल्या जातींतून प्रतिनिधी निवडून दिलेले असत. महायुद्ध सुरु झाल्यावर ग्रेटब्रिटननें हें शहर काबीज केलें ( १९१७ ). हल्लीं तें ग्रेटब्रिटनच्या हुकमतीखालीं आहे. जेरुसलेम शहरीं हल्लीं पुष्कळ इमारती झाल्या आहेत. रेल्वेचे निरनिराळ्या शहराकडे जाणारे फांटे बांधण्यांत आले आहेत. तसेंच निरनिराळ्या धार्मिक संस्था स्थापन झाल्या आहेत. फ्रेंच,

जर्मन, इंग्लिश मिशनरी संस्थांनीहि आपल्या शाखा स्थापन केल्या आहेत, व त्या शाखांतर्फे शाळा व दवाखाने वगैरे इतर लोकोपयोगी कार्ये करण्यांत येत आहेत.

जेरुसलेमची मूळ हवा चांगली आहे. तथापि, नगरारोग्याची नीटशी काळजी घेण्यांत येत नसल्यामुळें हवा फार बिघडली आहे. पाण्याची येथें हल्लीं टंचाई आहे. पावसाचें सरासरी प्रमाण २६ इंच आहे. ऑलिव्ह लांकडाचा व शिंपल्यापासून तयार होणाऱ्या जिन्नसांचा माल येथून परदेशीं जातो. कापड, धान्य, वगैरे माल बाहेरून येतो. दरवर्षी यात्रेकरू लोक येथें बरेच येतात. १९०५ सालीं या शहराची लोकसंख्या ६०००० होती. हल्लीं ती ८५ हजारांवर आहे.

[ संदर्भग्रंथ.—सर वारन—जेरुसलेम मेमॉयर (१८८४); ब्लिस—एक्सकॅव्हेशन्स ॲट जेरुसलेम ( १८९८ ); कॉन्डर-लॅटिन किंगडम ऑफ जेरुसलेम ( १८९७ ); सिटी ऑफ जेरुसलेम (१९०९); लास्ट्रेंज-पॅलेस्टाइन अंडर दि मॉस्लेम्स ( १८९० ). ]

**जेरेसा**—जेरेसा ( आधुनिक जेराश ) हें डेकॅपोलिस-संघापैकीं पॅलेस्टाईनमधील एक शहर होतें. हें गीलिअड पर्वतांत समुद्रापासून १७५७ फूट उंचीवर वसलें आहे. कित्येकांच्या मतें बायबलांतील रॅमाथ गिलियड शहर तें हेंच असावें. अलेक्झांडर जेनिअसनें हें शहर इ. स. पूर्वी ८३ त काबीज केलें. परंतु रोमन लोकांनीं पुन्हां बांधलें ( इ. स. ६५ ). यहुदी लोकांनीं हें शहर जाळलें होतें. दुसऱ्या व तिसऱ्या शतकांत जेरेसा हें पॅलेस्टाईनमधील अतिशय श्रीमंत व भरभराटीचें शहर होतें. ग्रीक संस्कृतीचें हें केंद्रस्थान असून या ठिकाणीं आर्टेमिसची पूजा चालू होती. या शहराचे अवशेष केरवान नदीच्या दोन्ही तीरांवर आहेत. या शहराचा नाश बहुतेक भूकंपानें झाला असावा असा तर्क आहे. सध्यांच्या नवीन शहरांत सिर्केसियन लोकांची वस्ती आहे.

**जेर्हा**—हें अरबस्तानांतील प्राचीन शहर इराणी आखाताच्या पश्चिमेस आहे. येथें बॅबिलोनियांतून हद्दपार झालेले खाल्डियन लोक रहात असत. [ स्ट्रेबो; प्लीनी. ]

**जेलेप ला**—हिमालय पर्वताच्या चोला डोंगरांतील एक खिंड. बंगालमधील सिक्कीम संस्थानांतून तिबेटच्या चुंबी खोऱ्यांत या खिंडींतून मार्ग जातो. समुद्रसपाटीपासून उंची १४३९० फूट आहे. याच खिंडीतून तिबेटाचा व्यापार मुख्यत्वेंकरून ब्रिटिश हिंदुस्थानाशीं चालतो.

**जेलडर्लंड**—हो पूर्वी रोमन साम्राज्यांतील ड्यूकच्या मालकीची जहागीर होती. ही खालील ऱ्हाइन आणि इस्सेल या नद्यांवर वसलेली असून तिच्या सरहद्दीवर फ्रिएसलँड-वेस्टफालिआ, ब्रॅबंट, हॉलंड झुइडर झी हे मुलूख आहेत. इ. सनाच्या आरंभीं येथें ट्यूटानिक राष्ट्रजातींची वस्ती होती आणि त्यानंतर म्हणजे रोमन साम्राज्याच्या पडत्या काळांत येथें चमव्हि आणि इतर फ्रँक लोक होते. ही जहागीर ऑस्ट्रेलियाच्या कॅरोलिंग राज्याचा भाग होता व याचे ' पगि ' किंवा ' गौएन ' नांवाचे विभाग केलेले असून प्रत्येक विभागाचा अधिकार कौंटकडे सोंपविला होता. ८४३ त व्हर्डूनच्या तहाप्रमाणें हिचा लोथेरिंजिआ किंवा लोरेन प्रांतांत समावेश झाला आणि मीरस्सेन येथील ८७९ च्या तहानें ही पुढें ईस्ट फ्रॅन्सिआला (जर्मनी )जोडण्यांत आली. त्यानंतरचा या जहागिरीचा विस्तार म्हणजे म्यूज आणि नायर नद्यांमधला जेल्डर किंवा जेल्रे शहरांभोंवतालचा प्रांत होय. हा प्रांत १७१५ पासून ऱ्हीनिश प्राशियांत मोडतो.

**जेवर**—संयुक्त प्रांत. बुलंदशहर जिल्ह्याच्या खुर्जा तहशिलींतील खुर्जाच्या पश्चिमेस २० मैलांवर असलेला एक गांव. उ. अ. २८° ७' व पू. रे. ७७° ३४'. लोकसंख्या ( १९११ ) ६८८४. येथें पासोड्या व सतरंज्या तयार होतात.

**जेव्हॉन्स, विल्यम स्टॅनले** ( १८३५–१८८२ )—हा इंग्रज अर्थशास्त्रज्ञ व तर्कशास्त्रज्ञ लिव्हरपूल येथें जन्मला. त्याचा बाप थॉमस जेव्हान्स याला शास्त्रीय विषयाची आवड असून कायदे व अर्थशास्त्र या विषयांवर तो लेख लिहीत असे. त्याचा धंदा लोखंडी व्यापाराचा होता. विल्यम जेव्हान्सची आई ही विल्यम रास्कोची मुलगी होय. विल्यमला १५ व्या वर्षी लंडन येथील युनिव्हर्सिटीकॉलेज स्कूलमध्यें घालण्यांत आलें. त्याला या वयापासूनच, आपण थोर, विचारी, विद्वान होणार असा आत्मविश्वास होता असें दिसतें. त्याचें कॉलेजचें शिक्षण दोन वर्षे झालें नव्हतें तोंच अनपेक्षितरीत्या त्याला ऑस्ट्रेलियांत नवीन स्थापन झालेल्या एका बँकेंत नाणकपरीक्षकाची जागा देण्यांत आली. त्याच सुमारास त्याच्या बापाला व्यापारांत ठोकर लागल्यामुळें सांपत्तिक अडचणीस्तव त्यानें ती नोकरी पत्करली. तेथें पांच वर्षे नोकरी केल्यावर १८५९ सालीं परत येऊन त्यानें लंडनच्या युनिव्हर्सिटीकॉलेजांत पुन्हां अभ्यास सुरु केला. व बी. ए. आणि एम.ए. या दोन्ही परीक्षा यथाक्रम दिल्या.पुढें भौतिकशास्त्रांचा व नैतिकशास्त्रांचा अभ्यास त्यानें चालू ठेवला. लवकरच त्याला मँचेस्टर येथील ओवेन्स कॉलेजमध्यें प्रथम शिक्षका (टयूटर)ची व नंतर १८७६ मध्यें अर्थशास्त्राच्या प्रोफेसरची जागा मिळाली. त्याच्या पुढल्या वर्षी त्यानें हॅरियट ॲन टेलर हिजबरोबर विवाह केला. तिचा बाप ' मँचेस्टर गार्डियन ' चा संस्थापक व मालक होता. लवकरच निद्रानाशरोग व इतर आजारानें त्याची प्रकृति खालावल्यामुळें कॉलेजांतील बहुविध विषयांवरील व्याख्यानें देण्याचें काम फार जड जाऊं लागलें. पुढें त्याची लंडनमधील युनिव्हर्सिटी कॉलेजांत नेमणूक झाल्यामुळें त्याला आनंद झाला. प्रवास व संगीत हीं दोन त्याचीं करमणुकीचीं साधनें असत. तथापि

लंडनमध्येंहि त्याची प्रकृति अधिकाधिक खालावत गेल्यामुळें अखेर १८८० सालीं त्यानें राजीनामा दिला. १२ आगष्ट १८८२ रोजीं हेस्टिंग्ज येथें स्नान करीत असतां तो बुडून मरण पावला. त्याच्या अकालीं मरणानें अर्थशास्त्र व तर्कशास्त्र यांचें मोठें नुकसान झालें.

अर्थशास्त्र व तर्कशास्त्र या दोहोंत त्यानें महत्त्वाच्या स्वतंत्र सिद्धान्तांची भर घातलेली असून हे सिद्धांत त्याच्या पूर्ववयांतच त्यानें ठाम ठरविलेले होते. उपयुक्ततासिद्धांतावर त्याची अर्थशास्त्रीय मतें उभारलेलीं असून तो सिद्धांत त्यानें १८६० सालींच ठाम केलेला होता अर्थशास्त्राला त्यानें गणिती पद्धति लागू केलेली असून तत्संबंधीचा मूळ लेख १८६२ सालीं ब्रिटिश असोसिएशनकडे त्यानें पाठविला होता. १८७२ सालीं " थिअरी ऑफ एकॉनॉमी " ( अर्थशास्त्राची उपपत्ति ) हें पुस्तक त्यानें प्रसिद्ध केलें. पदार्थांची बाजारी किंमत व अंतिम उपयुक्तता यांमधील संबंधाची उपपत्ति त्यानें प्रथम इंग्लंडमध्यें लोकांच्या पुढें मांडली. गणिती पद्धति व अंतिम उपयुक्ततेचें तत्त्व हीं दोन्हीं ए. ए. कूर्नोट व एच्. एच्. गोसेन यांनीं अगोदरच यूरोपांत प्रसिद्ध केलीं होतीं, पण त्यांचा इंग्लंडांतील पहिला पुरस्कर्ता जेव्हान्स होय. शिवाय तात्त्विक सिद्धान्तांपेक्षां अर्थशास्त्राच्या व्यावहारिक प्रश्नांवर उत्तम लेख लिहिणारा म्हणून जेव्हान्सची प्रसिद्धि मोठी आहे. सोन्याच्या भावाची भयंकर मंदी ( १८६३ ), ' कोळशाचा प्रश्न ' ( १८६५ ), 'पैसा आणि विनिमयव्यवस्था ( १८७५ ), ' सरकार व मजूर यांमधील संबंध ' ( १८८२ ), ' चलनपद्धति व जमाखर्च यांविषयीं उद्घाटन ' आणि 'सामाजिक सुधारणेच्या पद्धती' वगैरे विषयांवरील त्याचे निबंध व पुस्तकें हीं त्यांतील स्वतंत्र विचार व चटकदार लेखनपद्धति यामुळें फार लोकप्रिय झालीं.

अर्थशास्त्राबरोबरच तर्कशास्त्रासंबंधानेंहि त्याचे विचार व लेख चालू होते. १८७० त त्यानें एक तर्कशास्त्रविषयक यंत्र तयार करून रॉयल सोसायटीला दाखविलें; त्यांत मूळ गृहीत प्रमेयें टाकतांच शास्त्रीयरीत्या बरोबर असलेलें अनुमान आपोआप निघत असे. १८६९सालीं त्यानें आपला नवा तर्कशास्त्रांतील मूलभूत सिद्धांत प्रसिद्ध केला तो असाः " कोणत्याहि एका गोष्टींतले गुणधर्म तत्सम सर्व गोष्टींत सांपडतात. " १८७० सालीं ' तर्कशास्त्रांतील प्राथमिक पाठ, ' १८७४ सालीं ' तर्कशास्त्राचीं तत्त्वें ', १८८०सालीं 'आनुमानिक तर्कशास्त्रांतील विवेचन ' या अर्थाचीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं. जेव्हान्सची टीकाकार यापेक्षां स्वतंत्र लेखक म्हणून योग्यता अधिक आहे.

**जेष्ठमध**—या वनस्पतीस संस्कृतमध्यें मधुक, यष्टिमधु, इंग्रजींत लिक्वोराईस, मराठींत जेष्ठ-मध, गुजराथींत जेष्ठीमध, हिंदींत मलहठी, इत्यादि नांवें आहेत. हिंदुस्थानांत बहुतेक ठिकाणीं व दक्षिण यूरोपांत ही वनस्पति विपुल होते. या वनस्पतीला जमीन डोंगराळ,ओलसर व हवा उष्ण असावी लागते. जेष्ठमधाची दुसरी जात आहे, ती झुडपाप्रमाणें लहान असून तिची उंची सुमारें २ हात असते; व तिचीं पानें कारोटीच्या पानांसारखीं लांबट असतात. हीस पांच अंगुळांवर कांडीं असतात. सातारा जिल्ह्यांतील माहुलीजवळच्या डोंगरावर हीं झाडें बरींच होतात. हीं उन्हाळ्यांत अगदीं सुकून जातात. पाण्यांत होणारी एक जेष्ठमधाची जात आहे तीस मधुलिका असें संस्कृत भाषेत नांव आहे. या वनस्पतीच्या मुळांस जेष्ठमध असें म्हणतात. जेष्ठमध गोड असते,

**जेष्ठमधाचा शिरा करण्याची कृति**–जेष्ठमधाच्या मुळ्या चार पांच वर्षांच्या झाल्याशिवाय अर्क काढण्यास योग्य होत नाहींत. सुमारें १०० पौंड वजन मुळ्यांपासून १६ पौंड अर्क निघतो. जेष्ठमधाच्या मुळ्या आणून त्यांचे दोन चार बोटें लांबीचे तुकडे पाडावेत व ते पाण्यांत घालून चांगले धुवून नंतर ते खलबत्त्यांत ओबडधोबड कुटावे लागतात. हीं ठेंचलेलीं मुळें एका मोठया भांड्यांत घालून २४ तासपर्यंत मंदाग्नीवर शिजवावीं. मग तीं एका स्क्रूच्या दाबाखालीं दाबून त्यांतील सर्व रस काढून घ्यावा. हीं शिजविण्याची व रस काढण्याची क्रिया त्या मुळ्यांवर दोन चार वेळ करावी लागते व जो रस निघेल तो गाळून पुन्हां चुलीवर ठेवावा. बराच वेळ शिजल्यावर हा काढा उथळ परातींत घालून पुन्हां चुलीवर ठेवावा; व वरचेवर रस घट्ट होईपर्यंत ढवळावें. नंतर परात चुलीवरून खालीं उतरून त्या रसाच्या कांड्या एका सांच्यांत घालून पाडाव्या. ह्या कांड्यासच जेष्ठमधाचा शिरा असें नांव आहे. हा शिरा खोकल्यावर देतात.

**जेसर**—( १ ) मुंबई, काठेवाड. गोहिलवाड जिल्ह्यांतील ठिकाण. सोरटमधील जेसोनें मुसलमानांशीं तह केल्यावर जेसर वसविलें. येथील जमीन चांगली असून कापूस व आंबे उत्तम होतात. येथें वैजनाथ महादेवाचें एक देऊळ आहे. भावनगरचा अमल येथें चालतो.

( २ )—मुंबई. रेवाकांठामधील एक छोटें संस्थान. क्षेत्रफळ १½ चौ. मै. आहे. गायकवाडाला वार्षिक खंडणी द्यावी लागते. मेसरी नदी यांतून वाहात असल्यानें जमीन चांगली सुपीक आहे.

**जेसरी**—कर्नाटकांत जेसरी येथें शिवाजीचा सेनापति प्रतापराव गुजर याची व विजापुरकर सेनापति बहलोल यांची लढाई झाली. प्रतापरावानें याच बहलोलास थोडयाच आठवड्यापूर्वी उदार मनानें उंबराणी येथें हातांत सांपडला असतां सोडून दिलें होतें. परंतु त्यानें विश्वासघातानें पुन्हां प्रतापरावावर हल्ला केला. याच वेळीं शिवाजीनेंहि प्रतापरावास ठपका दिल्यामुळें, चिडून जाऊन व उतावळीपणा करून त्यानें बहलोलास तोंड दिलें. सैन्य व्यवस्थित नव्हतें त्यामुळें हल्ला कारागर न होतां पुष्कळ मराठे पडले व शेवटीं खासा प्रतापरावहि कामास आला. शिवाजीचा दुसरा सरदार हंसाजी मोहिते हा जेसरीच्या जवळच मुक्कामास

होता, त्यानें ही बातमी समजतांच त्वरेनें येऊन, विस्कळित झालेलें प्रतापरावाचें सैन्य एकत्र करून निकराचा हल्ला चालवून बहलोलचा पराभव केला; तेव्हां बहलोल पळून गेला. याच लढाईंत पुढें प्रख्यातीस आलेले संताजी घोरपडे व धनाजी जाधव या शिलेदारांनीं चांगला पराक्रम गाजविला. हंसाजीला या कृत्याबद्दल हंबीरराव ही पदवी शिवाजीनें दिली ( १६७४ फेब्रुवारी ) [ भा. इ. सं.मं. चतुर्थ संमेलनवृत्त; मराठी रिसायत; शिवदिग्विजय ]

**जेसलमीर**, संस्थान— राजपुताना संस्थानांतील अगदीं पश्चिमेकडील हें सर्वांत मोठें संस्थान असून तें उत्तर अक्षांश २६ ° ४' ते २८ ° २३' आणि पूर्व रेखांश ६९ ° ३०' ते ७२ ° ४२' यांच्या दरम्यान वसलेलें आहे. या संस्थानाचें क्षेत्रफळ १६०६२ चौरस मैल असून एकंदर गांवें ४७२ आहेत. चतुःसीमा—उत्तरेस भावलपुर; पश्चिमेस सिंध; दक्षिणेस व पूर्वेस जोधपूर आणि बिकानेर. संस्थानची लोकसंख्या (१९२१) ६७६५२ असून उत्पन्न चार लाखांवर आहे. संस्थानी प्रजेंत शेंकडा ७० हिंदू आहेत. संस्थानांत मारवाडी व सिंधी भाषा चालतात. हें संस्थान हिंदुस्तानांतील विशाल वालुकासागरापैकीं एक भाग असल्यामुळें बहुतेक सर्व प्रदेश वालुकामय असून ओसाड आहे. जेसलमीर शहराच्या आसपास सुमारें ४० मैलांतील जमीन दगडाळ असून चढउतार देखील आहेत. पश्चिमेकडील वाळूच्या टेंकड्या बाभळीच्या खुरट्या झुडुपांनीं आच्छादिलेल्या असून, पूर्वेकडील टेंकड्यांवर उंच वाढलेलें गवत आढळतें. सर्व प्रदेश ओसाड असून सर्वत्र रेतीचे डोंगर आहेत. खेडीं दूर दूर अंतरावर वसलेलीं असून वस्ती फार विरळ आहे. साधारणपणें एखाद्या खाऱ्या विहिरीभोंवतीं झोंपड्या बांधून लोक राहतात. काकनी नांवाचा ओढा जेसलमीरच्या उत्तरेस १७ मैलांवर वहात असून त्याच्याच पुढें भुजझील नांवाचा तलाव झाला आहे. पाणी २००।३०० हात खोलीवर लागतें व तेंहि मचूळ असतें. यांत नद्या मुळींच नाहींत. पावसाळ्यांत मका पिकतो व तेंच काय तें मुख्य धान्य आहे. बहुतेक प्रदेश वाऱ्यानें वाहून आलेल्या वाळूनें आच्छादिलेला आहे. सर्वत्र वाळूचे खडक, शिपा, चुनखडीचे खडक वाळूंतून वर डोकें काढीत असलेले दृष्टीस पडतात.

जंगली प्राण्यांच्या जाती इकडे फार दृष्टीस पडत नाहींत. संस्थानांतील विरसिलपुरचा किल्ला दुसऱ्या शतकांतील असून लोदर्वा येथील जैन देवळें एक हजार वर्षांपूर्वीचीं आहेत. संस्थानचीं पहिली राजधानी तनोट ही आठव्या शतकांतील आहे.

हवा कोरडी असून निरोगी आहे; परंतु उन्हाळा अतिशय कडक असतो. उष्णतामान मे आणि जून महिन्यांत अधिक असून जानेवारींत उष्णमापक यंत्राचा पारा वर्फेरेषेच्याहि खालीं गेलेला आढळतो. पाऊस फारच थोडा पडतो. जेसलमीर शहरांतील पावसाचें सरासरी प्रमाण ६ इंच आहे. फक्त सन १८८३ मध्यें १५ इंच पाऊस पडला होता.

इतिहासः—जेसलमीरचे संस्थानिक जादन ( यादव ) वंशापैकीं रजपुत असून श्रीकृष्ण आपला मूळपुरुष आहे असें ते मानतात. दंतकथेप्रमाणें यांची प्राचीन माहिती पुढीलप्रमाणें आहे—श्रीकृष्णाचा काल झाल्यावर त्याच्या पुत्रांपैकीं दोघांनीं सिंधू नदापलीकडे जाऊन सर्व्ह देशांत वसाहत केली. गज नांवाचा त्यांचा एक वंशज होऊन गेला. त्यानें गझनी शहर वसविलें ( हेंच अफगाणिस्थानचें गझनी असावें असें टॉड म्हणतो. परंतु हें रावळपिंडीच्या जवळपास कोठें तरी असावें असें कॅनिंगह्यामचें म्हणणें आहे. ). पुढें खोरासानच्या राजानें गजाच्या वंशजाचा लढाईंत पराभव करून त्यास त्याच्या अनुयायांसह पंजाबांत हाकलून दिलें. तेथें त्यानें नवें नगर वसवून त्यास आपलें ( सलभान ) नांव दिलें. तें नगर हल्लीं सियालकोट या नांवानें प्रसिद्ध आहे. सलभानचा नातु भाति या नांवाचा प्रख्यात योद्धा होऊन गेला. यानें आसपासच्या संस्थानिकांना पादाक्रांत करून पुष्कळ मुलुख आपल्या राज्यास जोडला. या राजापासूनच हल्लींचे भाति ( भाटी ) जादन असें नांव प्राप्त झालें आहे. या ठिकाणीं त्यांचा अमरकोट, झालोर वगैरे पुष्कळ रजपूत घराण्यांशीं संबंध आला. त्यांची पहिली राजधानी मरुस्थानांत तनोत नांवाची असून ती आठव्या शतकांत वसविली असावी. परंतु या ठिकाणाहून त्यांचा राजा देवराज याची हकालपट्टी झाल्यामुळें त्यानें इ. स. ८५३ मध्यें देवगड वसविलें. देवगड हल्लीं भावलपुर संस्थानांत देरावर नांवानें प्रसिद्ध आहे. देवराजानें प्रथम आपणांस रावळ म्हणवून घेतलें व थोडक्याच काळांत लोद्रा रजपुतांची, लोदोरवा नांवाची राजधानी जिंकली परंतु ती लष्करी दृष्टीनें मजबूत नसल्यामुळें त्याचा सहावा वंशज जयसाल यानें इ. स. ११५६ मध्यें लोदर्वाजवळच ( ५ कोसांवर ) जेसलमीर नांवाचें शहर वसविलें. तो सुमारें स. ११६८ त मेला. त्याच्या नंतर गादीवर त्याचा पुत्र सलभान बसला. तो मुसुलमानांबरोबर युद्ध करीत असतांना मेला. त्याचा पुत्र बीजल; हा लवकर वारल्यावर त्याचा चुलता कैलान हा राजा झाला. यानें मुसुलमानांवर स्वाऱ्या करून त्यांचा पराभव केला व भावाचा सूड घेतला. यानें १९ वर्षे राज्य केलें. याच्या चाचिकदेव नांवाच्या मुलानें ३२ वर्षे राज्य केल्यावर, त्याचा पुत्र कर्ण यानें २८ वर्षे राज्याचा उपभोग घेतला. नंतर लाखुरसेन गादीवर आला; तो मूर्ख होता, त्यानें ४ वर्षे राज्य केलें; पुढें त्याचा मुलगा पंपाल राजा झाला. पण तो अतिशय क्रूर असल्यानें, त्याला पदच्युत करून त्याचा चुलता जयतसी हा राजा झाला. यानें १८ वर्षे राज्य केलें. त्याच्यावर अल्लाउद्दीन खिलजी चालून आला. मुसुलमानांनीं जेसलमीरास ८ वर्षे वेढा घातला होता. प्रथम रजपुतांना जय झाला, परंतु अखेर मुसुलमानांपुढें न चालून रजपुतांनीं आपल्या स्त्रियांचा जोहार करून व मुसुलमानांवर चढाई करून आपले प्राण अर्पण केले. या वेढ्याच्या काळांत

मध्यंतरींच जयतसी मेला होता व त्याचा मुलगा मूलराज राजा झाला होता. पण तोहि या शेवटच्या लढाईंत मरण पावला. फक्त त्याचा पुत्र देवराज व दोन पुतणे तेवढे वाचले. पण देवराज लवकरच मेला ( १२९५ ). ओसाड जेसलमीरांत मुसुलमान दोन वर्षें होते. मग तेथून ते निघून गेले. नंतर मेहू येथील राठोड तेथें येऊन राहिले. परंतु पुढें दुदू या भाटीराजानें आपले लोक जमवून राठोडावर स्वारी करून, त्यांनां हांकून जेसलमीर पुन्हां काबीज केलें. पुढें त्याच्यावर दिल्लीच्या शहानें स्वारी करून त्याचा पराभव करून मूलराजाच्या एका गरसी नांवाच्या पुतण्यास जेसलमीर दिलें ( १३०६ ); परंतु दुदूच्या मंडळीनें त्याचा खून केला. तेव्हां त्याचा भाऊ केहूर व त्याच्या नंतर हमीर हे गादीवर बसले, त्याच्यानंतर कैलम, चाचीकदेव, बरसी, जैत, नूनकर्ण, भीम हे राजे झाले. भीमाच्या मागें त्याच्या मुलाचा खून करून भीमाचा भाऊ मनोहरदास हा राजा झाला. तो मेल्यावर सावळसिंग गादीवर आला ( १६५१ ). दिल्लीच्या पातशाहीचा मांडलिक प्रथम हाच झाला. सावळसिंगानें पेशावर व कंदाहार या भागांत कामगिरी केल्यामुळें पातशहाच्या संमतीनें त्यानें जेसलमीरच्या राज्यास आसपासचा बराच मुलुख जोडला. त्यावेळीं हें राज्य वैभवाच्या शिखरास चढलें होतें. परंतु १७६२ च्या सुमारास एक एक प्रांत या राज्यांतून जाऊं लागला. तथापि हें राज्य अगदीं एकीकडे वसलें असल्यामुळें, मराठयांच्या तावडींतून सुटलें होते. त्याचप्रमाणें ब्रिटिशांच्या संरक्षणाखालीं राजपुतान्यांत जीं जीं राज्यें आलीं, त्यांतहि या राज्याचा क्रम शेवटचा होता.

सावळनंतर त्याचा पुत्र अमरसी हा राजा झाला. त्यानें राज्यांतील दरवडेखोरांचा बंदोबस्त केला. तो १७०२ सालीं मेला. तेव्हां जसवंत गादीवर आला. हा दुर्दैवी राजा होता. याचा पूगल, बारमैल, फिलोदी वगैरे प्रांत राठोड व मुसुलमान यांनीं बळकावला. त्याच्या पश्चात् गादीबद्दल तंटे होऊन वडील मुलगा अरसींसिंग राजा झाला. त्याच्याहि हातून देवरावळ वगैरे प्रांत शिकारपुरच्या खानानें घेतला. यानें ४०वर्षें राज्य केलें. त्याच्यामागून (१७६२) मूलराज हा गादीवर बसला. त्याचा दिवाण सरूपसिंग नांवाचा अति दुष्ट, क्रूर व विषयी होता. त्यानें प्रजेवर फार जुलूम केले. तेव्हां राजपुत्र रामसिंगानें त्याचा वध केला. पण मूलराजानें त्याचा पुत्र सालीमसिंग यास दिवाण केलें. हा सालीमसिंग तर बापापेक्षां जास्त वाईट होता. सर्व दुर्गुणांचा तो पुतळा होता. बाहेरून सौम्यपणा दाखवून आंतून नाश करीत असे. एकदां राजपुत्र राजसिंगाच्या लोकांनीं त्याला एकाएकीं गांठलें. त्यावेळीं त्याचा प्राण जावयाचा, परंतु त्यानें काकुळती केल्यानें तो वांचला.पण पुढें सालीमसिंगानें या लोकांचा कपटानें वध केला. ती गोष्ट स्वतःच्या भावास व बायकोस कळल्यावरून त्यानें तिला व त्यालाहि ठार केलें. संधि साधून त्यानें राजपुत्र राजसिंगास त्याच्या कुटुंबासह त्याच्या घरास आग लावून जाळून टाकलें व त्याच्या मुलांनां विषप्रयोग केला.त्याचप्रमाणें आपल्या विरुद्ध असलेल्या अनेक लोकांनां त्यानें ठार केलें. त्यामुळें जेसलमीर ओसाड होऊं लागलें. मूळराजाशीं इंग्रजांचा संबंध स.१८०८ मध्यें प्रथम आला. नंतर १८१८ त या दोघांचा तह झाला. त्यांत संस्थानास दत्तकाचा अधिकार मिळाला व खंडणीची माफी मिळाली. नंतर १८२० त मूळराज मेला. त्याच्या मागें त्याचा पुत्र गजसिंग गादीवर आला. परंतु तो सालीमसिंगाच्या धाकानें त्याच्या मुठींत नेहमीं असे. सालीम हा यानंतर चार वर्षें जिवंत होता. त्या मुदतींत त्यानें लोकांवर अत्यंत जुलूम केला. विकानेर वगैरे शेजारच्या संस्थानिकाशीं त्यानें सरहद्दीबद्दल भांडणें उपस्थित केलीं. परंतु इंग्रजांनीं व उदेपूरच्या महाराण्यानें मध्यें पडून हे तंटे मिटविले. एकदां या सालीमचा खून करण्याचा प्रयत्न झाला, पण तो उघडकीस आला ( १८२४ ). शेवटीं त्यानें आपल्या मुलास दिवाणगिरी मिळविण्याची खटपट करून आपला देह ठेवला. त्याच्या मुलास दिवाण नेमण्यांत आलें. परंतु त्यानें आपल्या भावाचा खून केल्यामुळें गजसिंगानें त्याला कैदेंत टाकलें. त्यामुळें थोडासा दंगा झाला, पण तो शमविण्यांत आला. यानंतर गजसिंगानें राज्यकारभार आपल्या हातीं घेतला व प्रजेस सुख दिलें. १८४० सालीं इंग्रजांनां सिंध प्रांत काबीज करण्यास पुष्कळ मदत केली व आसपासच्या संस्थानिकांशींहि स्नेहाचें वर्तन ठेवलें. सिंध घेतल्यावर इंग्रजांनीं त्यांतील शहागड, गरसिया व गतुरा हे तीन किल्ले गजसिंगास दिले. मूळचे ते जेसलमीरच्याच राज्यांतील होते. ते मागें सिंधच्या अमिरानें बळकावले होते. गजसिंग १८४६ सालीं मेला. तो निपुत्रिक असल्यानें त्याच्या राणीनें रणजितसिंगा(पुतण्या)स दत्तक घेतलें. तोहि स. १८६४ त निपुत्रिकच मेला. तेव्हां त्याच्या धाकटया भावास दत्तक देऊन गादीवर बसविलें. त्याचें नांव बहिरीसाल. तो वयानें लहान असल्यानें तो गादीवर बसण्यास कबूलच होईना. ही गादी अपशकुनी आहे असें त्याचें मत बनलें होतें. म्हणून राज्याभिषेक लांबणीवर पडून बहिरीसालचा बाप केसरसिंग हा राज्यकारभार पाहूं लागला. पुढें १८६५ सालीं बहिरीला राज्याभिषेक केला. तो स. १८९१ त मेला. त्यानंतर त्याच्या राणीनें लाठीच्या खुशालसिंगाचा पुत्र श्यामसिंग यास दत्तक घेऊन गादीवर बसविलें. हे राजे इ. स. १८८७ त जन्मले असून यांचा अभ्यास मेयो कॉलेजांत (अजमेर) झाला. येथील संस्थानिकास १५ तोफांच्या सलामीचा मान आहे. हल्लींचे अधिपति महाराजाधिराज महारावळ श्री सर जवाहरसिंगजी बहादूर के. सी. एस्. आय. हे आहेत.

गां व.—हें गांव जेसलमीर संस्थानची राजधानी असून जोधपूर-बिकानेर रेल्वेच्या बारमेर स्टेशनच्या उत्तरेस सुमारें ९० मैलांवर उ. अ. २६° ५५' व पू. रे. ७०° ५५ यांच्या

दरम्यान वसलें आहे. मुंबईच्या उत्तरेस ६०० मैलांवर हा गांव आहे. याची लोकसंख्या सात हजारांवर आहे. इ. स. ११५६ त रावळ जयसाल यानें हा गांव वसविला व त्याचेंच नांव अद्यापि गांवास चालत आहे. गांवासभोंवतीं सुमारें ३ मैल परिघाचा व १० पासून १५ फूट उंचीचा व ५ फूट जाडीचा दगडी तट आहे. गांवांत जाण्यास पूर्वेकडे एक व पश्चिमेकडील एक अशा दोन वेशी आहेत. गांवांतील रस्ते फारच अरुंद आहेत. तटाच्या आंतील जागेंत हल्लीं फारशी वस्ती नाहीं. एके काळीं मात्र तेथें फार वस्ती असावी असें दिसतें. दक्षिणेस एका टेंकडीवर किल्ला आहे. ही टेंकडी आसपासच्या प्रदेशाहून २५० फूट उंच असून ५०० फूट लांब व २५० फूट रुंद आहे. किल्ल्याची तटबंदी चांगली असून गांवच्या बाजूनेंच किल्ल्यांत जाण्यास मार्ग आहे. किल्ल्यांत महारावळाचा राजवाडा आहे. किल्ल्यांतील जैनांचीं देवळें चांगलीं असून कांहींचें खोदकाम प्रेक्षणीय आहे. कांहीं देवळें १४०० वर्षांचीं जुनीं आहेत असें म्हणतात. [ इंपे. गॅझे. पु. १४; गोडबोले—एतद्देशीय संस्थानांचा इतिहास; टाईम्स—इयरबुक १९२२. ]

**जेसुइट लोक**—हें नांव 'सोसायटी ऑफ जीझस' या नांवाच्या संस्थेंतील सभासदांस लावितात. ख्रिस्ती संप्रदायांपैकीं रोमन कॅथोलिक पंथाची अनुयायी असलेली ही संस्था सेंट इग्नेशियस लॉयोला नांवाच्या इसमानें १५३९ सालीं स्थापिली. या संस्थेचा उद्देश ख्रिस्तीधर्मशास्त्रवेत्त्या इसमांनीं निर्धनता, ब्रह्मचर्य व आज्ञाधारकपणा हीं तीन व्रतें पाळण्याची शपथ घेऊन स्वतःचें व शेजाऱ्यांचें आध्यात्मिक कल्याण करण्याकरितां झटणें हा आहे. या संस्थेचे सभासद व मूळ संस्थापक इग्नेशियस यानें तयार केलेल्या नियमांप्रमाणें राहात व वागत असत, व या नियमांनां पोपची संमति मिळालेली होती. मार्टिन लूथर यानें जर्मनीमध्यें १५२० सालीं रोम येथील ख्रिस्ती धर्मगुरु पोप याचें आज्ञापत्र जाळून 'प्रॉटेस्टंट पंथ' म्हणून जें बंड उभारलें त्याचा प्रतिकार करण्याकरितां लूथरचा समकालीन इग्नेशियस यानें स्पेनमध्यें सदरहू संस्था स्थापिली. या संस्थेसंबंधीं नियम करतांना इग्नेशियसनें मोठें कडक लष्करी धोरण स्वीकारलें होतें कारण, लूथरचें बंड मोडण्याकरितां जुन्या ख्रिस्ती धर्मपंथाला धार्मिक व नैतिक स्वरूपाची लढाई चालविली पाहिजे असें त्याचें म्हणणें होतें; व त्याप्रमाणें जेसुइट संस्थेचा चालक एक मुख्य अधिकारी आमरण नेमून त्याच्या हातीं अनियंत्रित सत्ता देण्याचा त्यानें नियम केला होता. तो लिहितो " या मुख्य अधिकाऱ्याच्या सैन्यांतल्या कमांडर-इन-चीफच्या आज्ञांप्रमाणें हाताखालच्या सर्व लोकांनीं मुख्याला केवळ ईश्वराच्या जागीं समजून त्याची वैयक्तिक बुद्धिमत्ता, नीतिमत्ता व सारासार विचारशक्ति यांविषयीं विचार मनांत न आणतां विनतकार मानल्या पाहिजेत. कनिष्ठांनीं वरिष्ठापुढें आपलें सर्व म्हणणें अवश्य मांडलें पाहिजे व तें ऐकल्यावर वरिष्ठाची जी आज्ञा होईल ती शिरसावंद्य केली पाहिजे. धडधडीत पापकृत्य असेल तें खेरीजकरून इतर प्रत्येक बाबतींत कनिष्ठानें वरिष्ठाची इच्छा तीच आपली इच्छा इतकें तादात्म्य पावून वागलें पाहिजे. पापकृत्यच असेल तर प्रथम वरिष्ठापुढें स्वतःचें मत मांडावें, व त्याचाहि उपयोग न झाल्यास दुसऱ्या दोन तीन समंजस इसमांनां आपली शंका निवेदन करून ते सांगतील त्याप्रमाणें वागावें." इग्नेशियसचा दुसराहि एक नियम विशेष महत्वाचा आहे. रोमयेथील पोपच्या धर्मसत्तेविरुद्ध लूथरची मोहीम समाजांत बद्धमूल होऊं नये म्हणून जेसुइटांनीं सर्व लोकांत मिसळून उपदेश करीत रहावें; केवळ एकांतामध्यें ईश्वर चिंतनांत वेळ घालविल्यानें खरी आध्यात्मिक उन्नति होणार नाहीं, असें त्यानें स्पष्ट बजावलें आहे.

संस्थेची रचना व कारभार.—या संस्थेमध्यें सहा दर्जाचे इसम असत ते असेः—( १ ) नोव्हिस ( नवशिक्या ), ( २ ) स्कोलॅस्टिक ( विद्यार्थी ), ( ३ ) टेंपोरल कोॲड्ज्यूटर ( ऐहिक सहकारी ), ( ४ ) स्पिरिच्युअल कोॲड्ज्यूटर ( आध्यात्मिक सहकारी ), ( ५ ) प्रोफेस्ड ऑफ दि थ्री व्हाऊज ( त्रिव्रतस्थ ) व ( ६ ) प्रोफेस्ड ऑफ दि फोर व्हाऊज ( चतुर्व्रतस्थ ). नोव्हिस या सदरांत चौदा वर्षांवरील इसमांनां घेऊन त्यांनां एका अधिकाऱ्याच्या देखरेखीखालीं दोन वर्षें ठेवीत व त्या काळांत त्यांच्या स्वभावांतील गुणदोषांची नीट परीक्षा करून लायक ठरल्यास त्यांनां दुसऱ्या वर्गांत घालीत, व त्यांनां धर्मोपदेशक ( प्रीस्ट ) किंवा गृहस्थाश्रमी ( लेमन ) या दोन भिन्न आयुष्यक्रमांपैकीं एक निश्चित ठरवून तदनुरूप पुढील शिक्षण देत असत. धर्मोपदेशक होणारांनां स्कोलॅस्टिक ( विद्यार्थी ) या सदराखालीं शपथ घेऊन बरींच वर्षें अध्ययन व अध्यापन करीत राहावें लागे. शपथ घेणें ती 'हे सर्व शक्तिमान् परमेश्वरा मी निर्धनता, ब्रह्मचर्य व संस्थेची सर्व काळ आज्ञा पाळण्याची शपथ घेतों, आणि या संस्थेंत आमरण राहण्याचें व सर्व बाबतींत संस्थेच्या नियमानुसार वागण्याचें वचन देतों व तें पुरें करण्याकरितां तूं मजवर पूर्ण कृपा कर." या दुसऱ्या वर्गांत स्कोलॅस्टिकला प्रथम पांच वर्षें वाङ्मयात्मक विषयांचें शिक्षण, नंतर पांचसहा वर्षें उच्च शिक्षणाबरोबर अध्यापन आणि वयाच्या अठ्ठावीस तीस वर्षांपासून ईश्वरज्ञाना ( थिआलजी )चा अभ्यास, येणेंप्रमाणें विद्यार्जन चौतीस छत्तीस वर्षें वयापर्यंत झाल्यावर प्रीस्ट बनून स्पिरिच्युअल कोॲडज्यूटर हा दर्जा प्राप्त होत असे. गृहस्थाश्रमी होऊं इच्छिणारांनां 'टेंपोरल कोॲडज्यूटर' या सदरांत प्रवेश होण्याकरितां दहा वर्षांचा अभ्यासक्रम असे. प्रीस्ट झाल्यानंतर योग्य वर्षांनीं 'थ्री व्हाऊज' ( तीन व्रतें ) पत्करणाराचा वरच्या दर्जांत समावेश होई आणि अखेर पंचेचाळीस वर्षें वय झाल्यावर शेवटचा 'फोर व्हाऊज' ( चार

व्रतें ) घेणारांचा दर्जा संस्थेच्या सभासदाला मिळूं शकत असे. या शेवटच्या सर्वोच्च वर्गात फार थोड्या इसमांचा प्रवेश होई. या सर्व निरनिराळ्या दर्जाच्या सभासदांनां संस्थेच्या इमारतींतच राहावें लागे. या जेसुइट संस्थेच्या मुख्याला 'जनरल' म्हणत व तो नेहमीं रोम येथें रहात असे. संस्थेच्या प्रांत, जिल्हा व गांव येथील सर्व शाखांचे अधिकारी नेमण्याचा अधिकार जनरलला असे. जनरलची नेमणूक मात्र मतदाराकडून निवडणुकीनें होत असे. प्रत्येक ठिकाणच्या जेसुइटला संस्थेच्या कार्यासंबंधीं माहिती जनरला नियमितपणें द्यावी लागत असे. जनरल हा जरी सर्वाधिकारी असे तरी पण त्याच्या मदतीला एक 'कन्सल्टेटिव्ह कौन्सिल' ( सल्लागार मंडळ ) असे, आणि सल्लागारांची निवड किंवा बडतर्फी करणें जनरलच्या हातीं नसल्यामुळें हें मंडळ जनरलचे दोष दाखवून योग्य सल्लामसलत व सूचना निर्भिडपणें देत असे. शिवाय संस्थेच्या सर्वसाधारण सभेला जनरलला तात्पुरता किंवा कायम बडतर्फ करण्याचा अधिकार आहे.

याप्रमाणें या संस्थेची घटना व नियम मोठ्या कौशल्यानें केले असल्यामुळें अंतस्थ कलह न माजतां जुन्या ख्रिस्ती धर्मांत म्हणजे रोमन कॅथोलिक पंथांत नवीन सामर्थ्य उत्पन्न करण्याच्या कामीं या संस्थेनें फार वाखाणण्यासारखी कामगिरी केली. प्रॉटेस्टंट पंथाची लाट यूरोपभर पसणार अशीं चिन्हें दिसत होतीं त्यावेळीं ती लाट उत्तर यूरोपकडेच थोपवून धरण्याचें काम या संस्थेनें केलें. हें कार्य जेसुइटांच्या हातून झालें तें केवळ अंधश्रद्धेमुळें नव्हे तर शहाणपणा व दूरदर्शीपणामुळें झालें. ख्रिस्तीधर्मसुधारणेच्या म्हणजे प्रॉटेस्टंट पंथाच्या चळवळीला जोर चढण्याचें कारण ख्रिस्तीधर्मोपदेशकांतील अज्ञान, आळस व दुर्वर्तन आहे ही गोष्ट जाणून या संस्थेनें उच्च विद्यार्जन व सद्वर्तन या दोन्ही गुणांनीं संपन्न असे विद्यार्थी तयार करण्याकरितां स्वतःच्या शाळा, कालेजें स्थापलीं, इतकेंच नव्हे तर स्वतःचीं नवीं क्रमिक पुस्तकें तयार केलीं. सुमारें तीन शतकें जेसुइट लोक हे सर्वोत्कृष्ट शिक्षक म्हणून यूरोपभर नांवाजलेले होते. त्यांचें खासगी वर्तन निर्दोष असे; उच्च शिक्षणामुळें धर्मोपदेशक होण्याची लायकी त्यांच्या अंगीं सर्वांहून अधिक असे; आणि वाङ्मयाच्या धार्मिक व इतर सर्व शाखांत ग्रंथलेखक म्हणूनहि त्यांची संख्या सर्वांत अधिक आहे. पण त्यांची सर्वांत अधिक स्पृहणीय कामगिरी यूरोपेतर खंडांतील दूरदूरच्या देशांत ख्रिस्तीधर्मप्रसारासंबंधाची होय. उत्तर अमेरिका, ब्राझिल, पाराग्वे, चीन, हिंदुस्थान वगैरे देशांत पाश्चात्य विद्या व ख्रिस्तीधर्म यांच्या प्रसाराची जी कामगिरी त्यांनीं एकनिष्ठेनें, निरलसपणें व आनंदानें केली आहे तिशीं तुलना करण्यासारखी बौद्ध भिक्षूंखेरीज इतर कोणाहि धर्मीयांची कामगिरी नाहीं.

संस्थेवरील आक्षेप.—संस्थेच्या या उज्वल बाजूबरोबर दुसरी दूषणार्ह बाजूहि आहे. यांत विशेष महत्त्वाची गोष्ट ही कीं, ज्या रोमन कॅथॉलिक पंथाचें पुनरुज्जीवन करण्याचें श्रेय संस्थेस आहे त्या पंथांतील लोकांनांहि जेसुइट लोक अप्रिय झाले. त्याचें कारण एकतर कॅथोलिक पंथी रूढिभक्त पण नीतिभ्रष्ट धर्माधिकाऱ्यांनां आत्मसुधारणेचा जेसुइटांनीं केलेला उपदेश व स्ववर्तनानें घालून दिलेला धडा साहजिकच कटु व दुःसाध्य वाटूं लागला; आणि जेसुईटांच्या वाढत्या वळाबद्दल मत्सर आणि चढाईच्या वर्तनाबद्दल राग उत्पन्न झाला. तात्पर्य स्वतःचें महत्त्व व चैन कमी होणारसें पाहून कॅथोलिक चर्चमधील अधिकारी जेसुइटांचे विरोधी बनले. जेसुइटांचे दुसरे आक्षेपक नीतिक्षेत्रांतले होत. 'साधनांचें समर्थन साध्य करतें' (एण्ड जस्टिफाईज दि मीन्स)म्हणजे साध्य चांगलें असलें कीं साधनें वरी वाईट असलीं तरी तें क्षम्य आहे हें तत्त्व जेसुइट संस्था उपदेशिते. कांहीं जेसुइटांनीं या म्हणीप्रमाणें वर्तन केलें असलें तरी सर्व संस्थेचें हें ब्रीदवाक्य होतें हा आरोप खरा नाहीं. कारण या तत्त्वानें चालल्यास कोणतीहि संस्था फार काळ टिकणें शक्य नाहीं. जेसुइटांविरुद्ध सर्वांत मोठा आरोप म्हणजे त्यांच्या राजकारणांतील ढवळाढवळ. पुष्कळ जेसुइटांनां धर्मकारण व राजकारण पृथक् ठेवतां आलें नाहीं ही गोष्ट खरी आहे. राजकीय प्रश्नांचें तात्विक विवेचन जेसुइटांच्या शाळेंत चाले व त्यांत जुलमी राजकर्त्यांच्या खुनांचें समर्थन केलें जात असे हेंहि खरें आहे. तथापि कोणत्याहि राजकीय खुनाच्या कटांत कोणाहि जेसुइटाचें प्रत्यक्षाप्रत्यक्ष अंग असल्याचा कसलाहि पुरावा नाहीं. फ्रान्समधून प्रॉटेस्टंट लोकांची हद्दपारी, 'तीस वर्षांचें युद्ध,'इंग्लंडच्या इलिझावेथ राणीविरुद्ध झालेले कट, वगैरे गोष्टींतील प्रत्यक्ष कार्यकर्त्यांशीं जेसुइटांचे पत्रव्यवहार असत हें सिद्ध झालें आहे. तथापि सभासदांनीं असल्या कार्याशीं बिलकुल संबंध ठेवूं नये असा सोसायटीचा सक्त नियम होता. सबब त्या नियमविरुद्ध वागणाऱ्या व्यक्तींच्या कृत्यांबद्दल संस्थेला जबाबदार धरणें योग्य नाहीं.

अपकर्षाचीं कारणें.—या संस्थेचा पुढें सर्वत्र अपकर्ष होत जाण्याचीं मुख्य कारणें दोनःपहिलें कारण संस्थेच्या सभासदांमध्यें खरोखर मोठ्या बुद्धिमत्तेच्या इसमांचा पुढील काळांत अभाव हें होय. या संस्थेंत हजारों सभासद होऊन गेले आणि सामान्य माणसापेक्षां त्यांचा शैक्षणिक दर्जा अधिक असे.तथापि मोटाल्या योजना तयार करून त्या कुशलतेनें पार पाडण्यास लागणारी असामान्य बुद्धिमत्ता कोणाच्याहि अंगीं नव्हती.स्वतःसंस्थेचा संस्थापक लायोला व सेंट फ्रॅन्सिस झेवियर हे दोनच पहिल्या प्रतीचे इसम होते. नंतरच्या इसमांत अनसेल्म, बेकन, रिचेल्यू यांच्या योग्यतेचा एकहि नव्हता. पास्काल, डेकार्टस्, व्होल्टेयर वगैरेंचें शिक्षण या संस्थेंत झालें पण ते महान् तत्त्ववेत्ते संस्थेंतून फुटून बाहेर पडले आणि सामान्यतः सर्व संस्थांची हीच

दुःस्थिति असते. संस्थेला सतत थोर बुद्धिमान चालक कोठेंहि लाभत नाहींत. त्याचें कारण असें कीं, संस्थेचे उत्पादक जे नियम करून ठेवतात त्यांच्या कक्षेत सर्व सभासद जखडून जाऊन स्वतंत्र कर्तबगारीला वाव रहात नाहीं आणि नियमांचें कुपण कोणी उल्लंघन करूं लागल्यास तो अप्रिय ठरून संस्थेंतून बहिष्कृत होतो. हीच स्थिति जेसुइटांच्या संस्थेत असे. स्वतंत्रपणें भिन्न मतांची चर्चा करण्याचीहि संस्थेंत पूर्ण मनाई असे.

अपकर्षाचें दुसरें कारण म्हणजे जेसुइटांचा इतर धर्मपंथांशीं सहकारितेचा अभाव व स्वसंस्थेचें सर्वत्र वर्चस्व स्थापण्याची इच्छा. हें धोरण संस्थेचा दुसरा जनरल लेनेझ ( १५५८–१६६५ ) यानें संस्थेच्या कार्यांत पक्कें करून टाकलें. स्वतःचा हेतु साधण्याकरितां जेसुइट लोक युक्तायुक्त कोणतीहि गोष्ट करण्यास तयार होत. हिंदुस्थान व चीन देशांत त्यांनीं योजलेल्या युक्त्या व केलेलीं कृत्यें ख्रिस्ती धर्माला निःसंशय कमीपणा आणणारीं आहेत. हिंदुस्थानांतील ब्राह्मणवर्गाची सहानुभूति मिळावी म्हणून जेसुइटांनीं ब्राह्मणी पोषाख व राहणीहि स्वीकारली, व महारोगग्रस्तांचीं धर्मकृत्यें करण्याचें नाकारून एकप्रकारें ख्रिस्ती धर्मांत जातिभेदाला स्थान दिलें. असल्या कृत्यामुळें जेसुइटांची सर्वत्र बदनामी झाली; ती इतकी कीं, १७७३ सालीं या जेसुइटांच्या संस्था अनेक देशच्या सरकारांनीं बंद पाडल्या. तथापि पुन्हां १८११ सालीं त्यांच्या पुनरुज्जीवनास परवानगी मिळाली. यावेळीं यूरोपांत प्रातिनिधिक राज्यपद्धति बऱ्याच देशांत झाल्यामुळें जेसुइटांनीं शैक्षणिक व धार्मिक क्षेत्रांखेरीज बाहेर राजकीय क्षेत्रांत शिरणें अशक्यप्राय झालें. तरीहि राजकीय उलाढाली व रोमन कॅथोलिक पंथाशीं विरोध यांनीं संस्थेस अपाय पोहोंचतो, ही गोष्ट सर्व जेसुइटांना पटलेली नव्हती. त्यामुळें १९ व्या शतकांतहि या संस्थेच्या शाखांवर अनेक संकटें आलीं.

इतिहास.—इग्नेशियसच्या हयातींतच जेसुइट संस्था पोर्तुगाल, रोम, गोवा ( हिंदुस्थान ), स्पेन, जर्मनी, फ्रान्स इतक्या ठिकाणीं स्थापन झाल्या. १५४२ सालीं त्यांचें पहिलें कॉलेज कोईंम्ब्रा येथें निघालें. याप्रमाणें पहिल्या चार जनरलांच्या कारकीर्दीत संस्थेची एकसारखी प्रगति होत गेली. पांचवा जनरल आक्वेव्हिवा ( १५८१–१६१५ ) याच्यावेळीं संस्थेची बदनामी होण्यास सुरुवात झाली. तरीहि १६३९ सालीं संस्थेचा शतवार्षिकोत्सव साजरा करण्यांत आला, त्या वेळीं संस्थेच्या एकंदर आठशें शाखा व पंधरा हजार सभासद होते. पुढें फ्रान्समधील ह्युगुनॉट ( फ्रेंच प्रॉटेस्टंट ) पंथाशीं वैर केल्यामुळें जेसुइटांची अप्रियता वरीच वाढली. तथापि जेसुइटांवर सर्वांत मोठें संकट १७६७ सालीं आलें. स्पेनचा राजा तिसरा चार्लस यानें, त्याच्याविरुद्ध राजकीय कटांत जेसुइट सामील असल्याचा पुरावा मिळाल्यावरून स्वतःच्या राज्यांतील सर्व जेसुइट संस्था बंद पाडण्याचा हुकूम केला आणि स. १७७३ च्या सुमारास तर फ्रान्स, पोर्तुगाल, ऑस्ट्रिया याहि देशांनीं जेसुइटांच्या संस्था बंद करण्याचा हुकूम केला. यावेळीं जेसुइटांचे एकंदर ४१ प्रांत व २२५८९ सभासद होते जेसुइट संस्थेच्या कार्याला रोमच्या पोपांची प्रथमपासून अनुकूलता होती पण यावेळीं यूरोपांतले फ्रान्स, स्पेन, ऑस्ट्रिया वगैरे देशांचे बादशहा विरुद्ध गेल्यामुळें पोपांनांहि जेसुइटांविरुद्ध आज्ञापत्र ( ब्रीव्ह किंवा बुल ) काढावें लागलें. तथापि रशिया व प्रशिया या दोन देशांत परवानगी असल्यामुळें तेथील जेसुइटांच्या संस्था टिकून राहिल्या.

१८०१ सालापासून पोपांनीं जेसुइट संस्थांना पुन्हां परवानगी देण्यास सुरवात केली, आणि लवकरच वरील सर्व देशांत जेसुइटांवरील बंदी दूर झाली. तथापि १९ व्या शतकांतहि मधून मधून एखाद्दुसऱ्या देशांत जेसुइटांविरुद्ध मनाईहुकूम सुटत असत. पण एकंदरीनें आतांपर्यंत पोपांची व लोकमताची जेसुइटांच्या कार्याला अनुकूलता मिळत आलेली आहे. १९१० सालीं फ्रान्स, इंग्लंड, स्पेन, इटली, हॉलंड, बेल्जम, जर्मनी, पोलंड, स्वित्झर्लंड वगैरे यूरोपीय देशांत आणि इतर खंडांतील तिबेट, हिंदुस्थान, चीन, जपान, अबीसिनिया, ईजिप्त, कांगो, दक्षिण आफ्रिका, ब्राझिल, पेरु, मेक्सिको, ब्रिटिश साम्राज्य, वगैरे देशांत त्यांच्या संस्था असून एकंदर सभासदांची संख्या अजमासे २०००० होती. तसेंच आजपर्यंत या संस्थेचे पंचवीस जनरल ( मुख्य अधिकारी ) झाले आहेत. [ संदर्भ ग्रंथ —नीव्ह—दि जेसुइट्स ( क्रेटिन्यू-जॉलीच्या पुस्तकाचें भाषांतर), २ भाग, लंडन १८७९; निकोलिनी–हिस्टरी ऑफ जेसुइटस; रूल–सेलेब्रेटेड जेसुइट्स; ए. रि. ए. मधील लेख. ]

**जेसोर**, जिल्हा.—बंगाल इलाख्यांतील एक जिल्हा. उ. अ. २२°४७' ते २३°४७' व पू. रे. ८८°४०' ते ८९°५०'. क्षेत्रफळ २९२५ चौरस मैल. उत्तरेस आणि पश्चिमेस नडिया जिल्हा, दक्षिणेस खुलना, पूर्वेस मधुमती आणि बारासिया नद्या. हा जिल्हा हुगळी आणि मेघना या नद्यांमध्यें असून त्यांत पुष्कळ नद्या आहेत व दक्षिणेस बराच भाग दलदलीचा आहे. उत्तरेस वस्ती दाट आहे परंतु दक्षिणेस तो भाग दलदलीचा असल्यामुळें वस्ती विरळ आहे. सर्व जमीन मळीची आहे. दलदलीच्या भागांत नाना प्रकारच्या वनस्पती व प्राणी आहेत. या जिल्ह्यांत जंगल नाहीं.

इतिहास:—सुमारें साडे चारशें वर्षांपूर्वी खांजा अली नांवाचा मनुष्य येथें येऊन त्यानें गौरच्या राजाजवळून एक जहागीर मिळविली. यानें १४५९ सालापर्यंत या भागांत राजाप्रमाणें सत्ता गाजविली. यानें बांधलेल्या मशिदी वगैरे अद्यापि खुलना जिल्ह्यांत सांपडतात. दुसरी अशी एक दंतकथा आहे कीं, विक्रमादित्य नांवाचा राजा येथें राज्य करीत होता. यानें आपली राजधानी म्हणून यशोहर नांवाचें शहर वसविलें. त्याचा अपभ्रंश हल्लीं जेसोर झाला

आहे. याच्यामागून त्याचा मुलगा प्रतापादित्य गादीवर बसला. यानें भुइयाच्या बारा नाइकांचा पराभव केला. या भुइयांनीं त्यावेळीं बंगालचा दक्षिण व पूर्व भाग व्यापिला होता. पुढें या प्रतापादित्याचा पराभव राजा मानसिंगानें केला (इसवी सन १५८९ ते १६०६). ज्या ठिकाणीं प्रतापादित्याचें राज्य होतें त्या भागास जेसोर असें नांव पडलें. इ. स. १७८६ पर्यंत या भागाचे तुकडे पाडण्यांत आले नव्हते. परंतु त्या वेळेपासून आजपर्यंत त्याचे पुष्कळ वेळां तुकडे पाडण्यांत येऊन हल्लींचा जेसोर जिल्हा पूर्वीपेक्षां अर्धा झाला आहे.

प्रतापादित्याचा पराजय झाल्यावर त्याच्या परगण्याचे एकंदर तीन भाग झाले. दक्षिणेकडचा भाग चांञ्च राजा याकडे गेला. उत्तरेकडचा भाग नळडांगाच्या राजाकडे गेला व तिसरा राजा सीतारामराय याजकडे आला. या सीतारामरायाची अशी गोष्ट सांगतात कीं, हा मधुमती नदीच्या कांठीं असलेल्या हरिहरनगरचा तालुकदार असून त्यास डाक्क्याच्या नबाबानें या भागाचा वसूल करण्याकरितां पाठविलें होतें. यानें वसूल केला परंतु नबाबास एक पै देखील न पोहोंचल्यामुळें त्यानें सैन्य पाठवून इ. स. १७१२ मध्यें त्याचा पराजय करून त्यास कैद केलें. या सीतारामरायानें महमदपूर येथें बांधलेलीं तळीं अद्यापि तेथें दिसतात.

राजा मानसिंग याच्या पदरीं भावेश्वरराय नांवाचा शिपाई होता. हा चांञ्च राजांचा मूळपुरुष. हा १५८८ सालीं वारल्यावर त्याचा मुलगा महतब रामराय यानेंहि प्रतापादित्याविरुद्ध मानसिंग यास मदत केली. पुढें प्रतापादित्याचा पाडाव झाल्यावर ते परगणे याच्याच हवालीं करण्यांत आले. याच्या मागून कंदर्पराय व नंतर मनोहरराय (१६४९–१७०५) हा गादीवर बसला. या वंशाचा हाच मूळपुरुष समजला जातो. कारण यानें आपली जमिनदारी पुष्कळच वाढविली. याच्या नंतर कृष्णराय व नंतर शुखदेवराय (१७२९–१७४५) हा गादीवर बसला. यानें आपल्या जमीनदारीचा ½ भाग आपला भाऊ श्यामसुंदर यास दिला. पुढें श्यामसुंदर निपुत्रिक मरण पावल्यावर ईस्ट इंडिया कंपनीनें हा भाग एका जमीनदारास देऊन त्याच्या बदली त्याची कलकत्त्याजवळ असलेली जमीन घेतली. स. १८१४ पर्यंत ही जमीनदारी हाजी महमद मोहसिन याजकडे होती. त्यासाठीं त्यानें हुगळी इमामवारास इनाम देऊन टाकली, ती अद्यापि तिकडेच आहे. राहिलेली ३/१६ जमिनदारी (इसाफपुर जमिनदारी) १७६४ सालीं श्रीकांतराय याजकडे आली. ज्यावेळीं कायमधारपद्धति अमलांत आली त्यावेळीं या जमीनदाराचें नुकसान झालें व सरकारनें दिलेल्या पेंशावर आपला निर्वाह करणें भाग पडलें. १८१७ सालीं याचा नातु वरदाकांत हा अज्ञान असतांच गादीवर बसला. तेव्हां ब्रिटिश सरकारनें सर्व व्यवस्था आपल्या हातांत घेऊन जमीनदारी उर्जितावस्थेस आणली. १८२३ सालीं सरकारनें यांत आणखी परगण्यांची भर घातली व सन १८५७ च्या बंडांत या जमिनदारानें चांगली मदत केल्यामुळें त्यास राजा बहादूर ही पदवी दिली. हा १८८० सालीं मरण पावला व त्याच्या मागून त्याचा वडिल पुत्र हल्लीं गादीवर आहे.

जरी बंगालची दिवाणगिरी ईस्ट इंडिया कंपनीकडे १७६५ सालीं आली होती तरी इ. स. १७८१ पर्यंत जेसोरजवळ मुरली येथें कोर्टे उघडलें नव्हतें. जिल्ह्याची लोकसंख्या (१९२१) १७२२२१९ आहे. लोकसंख्या कमी होत असण्याचें कारण येथील हवा फार वाईट आहे. दलदलीचे प्रदेश, जंगलांत असलेलीं खेडीं, व चांगलें पाणी मिळण्याची अडचण वगैरे गोष्टींमुळें येथें रोग फार होतात. कॉलरा, 'वरद्वानचा ताप' वगैरे रोग येथें उत्पन्न होतात. येथील लोकांची भाषा बंगाली आहे. लोकवस्ती शेंकडा ६१ मुसुलमान व ३९ हिंदु यांची आहे. उत्तरेकडचा भाग सुपीक असून त्यांत भात, तंबाखु, ऊंस वगैरे पिकें येतात. ताड खजूर या झाडांपासून साखर तयार करतात. पूर्वी येथें नीळीची लागवड फार होत असे; परंतु हल्लीं येथें ती होत नाहीं. चटया, टोपल्या, गाड्यांचीं चाकें, साखर वगैरे तयार होतात. ईस्टर्न स्टेट रेल्वेचें जेसोर हें मुख्य स्टेशन आहे. नद्यांच्या समुद्राजवळच्या भागांत भरती ओहोटीचें पाणी येत असल्यामुळें होड्या बारा महिने चालू असतात व त्यांतून पुष्कळ व्यापार होतो. यांत अलिकडे दुष्काळ पडलेला नाहीं. या जिल्ह्याचे पांच विभाग केले आहेत. १९०३–०४ सालीं या जिल्ह्याचें उत्पन्न १६८९००० रुपये होतें.

विभाग.—बंगाल, जेसोर जिल्ह्याचा एक विभाग. उ. अ. २२° ४७' ते २३° २८' व पू. रे. ८८° ५९' ते ८९° २६'. क्षेत्रफळ ७४८ चौरस मैल. बराच भाग सखी जमीनीचा असून पुष्कळ दलदलीचा प्रदेश आहे. लोकसंख्या (१९११) ४६२३०५. यांत एक गांव व ११०१ खेडीं आहेत.

गांव.—बंगाल. जेसोर जिल्हा. भैरवनदीकांठीं हा गांव असून ईस्टर्न बंगाल स्टेट रेल्वेचें हें एक स्टेशन आहे. १९११ सालीं ८९११ लोकसंख्या होती. उ. अ. २३°१०' व पू. रे. ८९° १३' आहे. १८६४ सालापासून म्युनिसिपालिटी येथें आहे. गांवांत जिल्ह्याच्या सर्व कचेऱ्या, दवाखाना, तुरुंग वगैरे आहेत.

**जेहोव्ह**—हा इस्राएल लोकांचा देव आहे. या शब्दाच्या उपपत्तीसंबंधीं अनेकांनीं अनेक तर्क चालविलेले आहेत. पण अद्यापि त्याची नीटशी उपपत्ति लागली नाहीं. कांहींच्या मतें जेहोव्ह हा शब्द 'हवह' (असणें) या धातूपासून निघाला आहे. पण ही उत्पत्ति निराधार आहे असें इतर विद्वानांचें मत आहे. पण उपपत्तीपेक्षांहि खरा महत्त्वाचा प्रश्न म्हणजे जेहोव्ह देव हा मूळचा इस्राएल लोकांचाच कीं, त्यांनीं तो दुसऱ्या लोकांपासून घेतला ? प्राचीन इस्राएल जातीच्या इतिहासकारानें जी इस्राएल लोकांची हकीकत

दिली आहे तीवरून मोझेसच्या पूर्वीच्या इस्राएल लोकांनां हा देव माहीत नव्हता असें दिसतें. पॅलेस्टाइनच्या दक्षिणेस एका पर्वतावर मोझेसला याचें प्रथम दर्शन झालें. मोझेसनें, ईजिप्तमधून इस्राएल लोकांची सुटका केल्यावर त्यांनां जेहोव्हच्या पर्वताकडे नेलें. मोझेसचा सासरा या जेहोव्हाचा भक्त होता व त्याची पूजाअर्चा तो करीत असे असें कांहींचें मत आहे. आपल्या लोकांसह मोझेस तेथें गेल्यानंतर मोझेसच्या सासऱ्यानें त्या सर्वांचें स्वागत करून जेहोव्हाचें महत्व वर्णन केलें व त्याच्या प्रीत्यर्थ यज्ञ केला; व नंतर मोझेसनें या देवाचें माहात्म्य इस्राएल लोकांनां समजावून दिलें. तात्पर्य इस्राएल लोकांनीं हा देव निर्माण केला नसून त्यांच्या पूर्वी पॅलेस्टाईनच्या दापूंतील मीडियन, केनाइट इत्यादि जाती या देवाच्या उपासक होत्या असें दिसतें.

कांहींच्या मतें पश्चिम सेमाइट लोकांमध्यें या देवतेची पूजा चालू होती. पण त्याला विश्वसनीय आधार मिळत नाहीं. डेलीट्स नांवाच्या एका विद्वानानें, तर हा बाबिलोनियन लोकांचा देव होता असें प्रतिपादन केलेलें आढळतें. पण हे सर्व तर्क अद्यापि अनिश्चितावस्थेंतच आहेत. जेहोव्ह ही निसर्गदेवता आहे असें गृहीत धरून, १९ व्या शतकांतील कांहीं विद्वानांनीं ही देवता अग्निदेवता आहे असें प्रतिपादन केलें. जुन्या करारांत वादळ व अग्नि यांच्याशीं या देवतेचा नित्य संबंध येतो मेघगर्जना हा जेहोव्हाचा शब्द, विद्युत् हे त्याचे बाण व इंद्रधनुष्य हें याचें धनुष्य होय असें बायबलमध्यें वर्णन केलें आहे. पण एवढ्यावरून हा कोणी विशिष्ट गुणाचा देव होता असें मानणें बरोबर नाहीं. इस्राएल लोकांचा हा सर्वांत प्रमुख देव होता व त्यामुळें युद्धामध्यें त्याचें साहाय्य व्हावें एवढ्यासाठीं त्याच्या शौर्याची वरीलप्रमाणें ते स्तुति करीत होते असें दिसतें.

**जैंटिया**—हा मुलुख आसाम प्रांतांत आहे. ह्या मुलुखाचें क्षेत्रफळ ४८४ चौरस मैल आहे व लोकसंख्या लाखावर आहे. ह्या परगण्यांतली बहुतेक जमीन खोलगट आहे व सुर्मानदीला मिळणाऱ्या प्रवाहांचें पाणी या जमीनींत मुरतें. डोंगरांच्या पायथ्याजवळची जमीन व ह्या मुलुखाचा पश्चिमेकडील मुलुख शेतीच्या कामास नालायक असल्यामुळें येथें जंगल फार आहे. हे परगणे पूर्वी एका देशी राजाच्या ताब्यांत होते व त्याचें राज्य जैंटिया डोंगरांपासून आसामांतल्या कलंग नदीपर्यंत होतें. हे जैंटिया राजे जरी खासी वंशातले होते तरी त्यांच्यावर हिंदुधर्माची छाप पडली होती. १८ व्या शतकाच्या सुमारास अहोम लोकांनीं त्या वेळच्या जैंटिया राजाचा पराजय केला पण त्यांचा अंमल लोकांनीं कबूल न केल्यामुळें हें संस्थान स्वतंत्रच राहिलें. पुढें काचरवर जेव्हां १८२४ सालीं ब्रह्मी लोकांनीं स्वारी केली त्यावेळीं जैंटिया राजानें इंग्रज सरकारशीं मित्रत्वाचा तह केला, पण अनेक प्रसंगीं इंग्रज सरकारास त्याचें अस्तित्व सोईस्कर वाटलें नाहीं तेव्हां १८३५ सालीं सिल्हटे प्रांतांतला मुलुख सरकारनें आपल्या राज्यास जोडला व बाकीच्या राहिलेल्या मुलुखावर राज्य करण्यास जेव्हां तो राजा कबूल होईना तेव्हां जैंटिया टेंकड्यासुद्धां इंग्रजीराज्याला जोडल्या गेल्या. ह्या मुलुखांत बऱ्याचशा जमीनींत तांदूळ होतो. हिंवाळ्यांत जी जमीन तांदुळाला निरुपयोगी असते त्या जमीनींत मोहरी व लिंबोळी घेतात. ह्या भागांत पाऊस विपुल आहे. इतकेंच नव्हे तर कधीं कधीं पाऊस जास्त होतो व अवेळीं पडतो. एकंदरींत येथील जमीन उत्तम असून फळझाडें लावल्यानें शेतकऱ्यास उत्पन्न चांगलें येतें. येथील लोक पुराणप्रिय आहेत व त्यामुळें आळशी व बिन घाडशी आहेत. डोंगराच्या पायथ्याजवळचीं हवा दलदलीमुळें खराब असून मलेरिया नांवाच्या रोगास फार अनुकूल आहे.

**जैंटियापूर**—हें शहर आसाम प्रांतांमध्यें सिल्हेट जिल्ह्यांत आहे. हें शहर पूर्वी जैंटिया राजाची राजधानी होती. हिंदूधर्माचा इतिहास दर्शविणाऱ्या ह्या शहराचें महत्त्व पूर्वी होतें पण १८९७ सालीं येथें जो धरणीकंप झाला त्यामुळें येथल्या सर्व इमारती नाहींशा झाल्या आहेत म्हणून याचें महत्त्व हल्लीं फारसें नाहीं.

**जैतो**—पंजाब. नाभा संस्थानच्या फूल निझामतींतील हा गांव नॉर्थ वेस्टर्न रेलवेच्या फेरोझपूरभाटिंडा—रेल्वे लाईनवर फेरोझपूरच्या पूर्वेस ८० मैलांवर आहे. उ. अ. ३०° २६' व पू. रे. ७४° ५६'. लोकसंख्या (१९११) ७६९४. येथें धान्याचा व्यापार मोठा असून फेब्रुवारी महिन्यांत गुरांव बाजार भरत असतो. पोलिस ठाणें, दवाखाना व प्राथमिक शाळा येथें आहेत. या ठिकाणीं शीखांचें देवस्थान असून तेथें बिन हरकत पूजा करण्याचा हक्क प्रस्थापित करण्यासाठीं शीखांनीं सत्याग्रह सुरु केला व जैतोला जथेच्या जथे जाऊं लागले. या बाबतींत बरेच शीख मृत्युमुखीं पडून हजारों शीखांनां तुरुंगवास भोगावा लागला. अद्याप हा सत्याग्रह थांबला नाहीं.

**जैन संप्रदाय**, प्रा स्ता वि क.—आपल्या या भरतखंडामध्यें जे पांच सहा अति प्रसिद्ध धर्म उदयास आले व ज्यांनीं हिंदुस्थानचें 'धर्मभूमि' हें नांव सार्थ करून दाखविलें त्या प्राचीन धर्मांपैकीं जैनधर्म हा होय. अशा प्रकारें जैनधर्म हा प्रमुख धर्मांपैकीं एक असतां, त्याचें अध्ययन मात्र अद्यापि हिंदी विद्वानांकडून व्हावें तसें झालें नाहीं ही खेदाची गोष्ट होय. इतर प्रसिद्ध धर्मांप्रमाणेंच याचेंहि अध्ययन होणें व इष्ट अवश्यक आहे व त्याला महत्त्वाचीं कारणेंहि आहेत. जैनधर्म एके काळीं हिमालयापासून तो कन्याकुमारीपर्यंतच काय पण हिंदुस्थानाबाहेरहि फैलावला होता असें खात्रीलायक पुराव्यावरून सिद्ध झालें आहे, व एवढें एकच कारण त्याच्या अभ्यासाच्या अवश्यकतेला पुरेसें आहे. पण याशिवायहि त्याच्या अभ्यासाच्या जरूरीसाठीं दुसरीं कारणें देतां येतील. ख्रिस्तो शकाच्याहि पूर्वी

पांचसहार्श वर्षें या धर्माचा उदय झाला. वैदिक धर्मांत आचारार्चें उर्फ कर्मकांडाचें भलतें स्तोम माजल्यामुळें, तद्विरुद्ध विचारांची जी लाट उसळली त्या लाटेनेंच या धर्माची प्राणप्रतिष्ठा केली. यामुळें प्राचीन विचारांच्या व तत्त्वज्ञानाच्या इतिहासाचें पूर्ण ज्ञान होण्यास या धर्माचें अध्ययन करणें अत्यंत जरूरीचें आहे. जैनधर्माची चलती फार दिवस चालली नाहीं. बौद्धधर्मानें आपल्या तेजानें जगाला दिपविल्यामुळें त्यापुढें जैनधर्म मागें पडल्यासारखा झाला हें खरें असलें तरी थोड्या काळपर्यंत कां होईना जैनधर्मानें हिंदुस्थानभर आपल्या धर्माचा प्रसार करून आपल्या धर्माला हजारों अनुयायी मिळविले होते व अद्यापिहि जैनधर्मानें आपलें अस्तित्व कायम ठेवलें आहे.

जैनधर्माचा अत्यंत प्राचीन इतिहास गूढ आहे. महावीरापूर्वीचें जैनधर्माचें स्वरूप काय होतें हें आज निश्चयपूर्वक सांगतां येत नाहीं तथापि कांहीं गोष्टींवरून कल्पना बसवितां येते. इंद्रियसंयमनाचें महत्व सांगणाऱ्या वर्गाचें अस्तित्व उपनिषदांत व त्यापूर्वींहि दिसून येत आहे तसेंच "मुनि" "यति" हे शब्दहि बरेच जुने आहेत. पण मुनींच्या वर्गाचें महत्व वैदिककालांत नसावें. सूक्तकालांत ऋषि व सूक्तकार यांचें महत्त्व होतें तर ब्राह्मणकालांत आचार्य व श्रौती यांचें महत्त्व वाढूं लागलें. तर ह्या कालांत जो विचार करणारा व संयमनाचें महत्त्व सांगणारा वर्ग होता तो पुढें आरण्यकीय कालांत पुढें सरसावला आणि त्यांतूनच, आरण्यकीय ब्रह्मवेत्ते व महावीराचे पूर्वगामी निघाले असावेत.

जैनांनीं आपलें विचारवैशिष्ट वैदिक संस्कृतीच्या उपबृंहणानें तयार केलें नसून सूत संस्कृतीच्या उपबृंहणानें तयार केलें. हें त्यांच्या पुराणग्रंथांत आलेल्या विद्याधरांच्या उलेखांवरून प्रामुख्यानें दिसून येतें. जैन धर्म म्हणजे जिनानें स्थापन केलेला धर्म होय. जिन म्हणजे जेता. जैनांचा शेवटचा तीर्थंकर जो महावीर त्याला मोक्षाची किल्ली सांपडल्यामुळें त्याला जिन असें संबोधण्यांत येऊं लागलें व त्यानें उपदेशिलेल्या धर्माला जैनधर्म असें नांव पडलें. वास्तविक महावीर हा जैनधर्मसंस्थापक नव्हे. कारण हा धर्म महावीराच्या जन्मापूर्वीपासून प्रचलित होता. महावीरापूर्वीचा तेवीसावा तीर्थंकर जो पार्श्व त्यानें हा धर्म प्रस्थापित केला असेंहि एक मत आहे. कांहीं विद्वानांनीं जैनधर्म हा पार्श्वाच्या पूर्वीपासूनच प्रचलित होता असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. जैनांचा एक तीर्थंकर जो ऋषभ तो व वेदांत व भागवतांत वर्णिलेला ऋषभ हे एकच असें प्रतिपादून वेदकालापासूनच जैनधर्म अस्तित्वांत होता असें रावजी नेमचंद शहा, बॅरिस्टर जैनी इत्यादि विद्वानांनीं मत प्रदर्शित केलें आहे. यांचें मत अद्यापि मान्य झालें नाहीं. कसेंहि असलें तरी जैनधर्म हा बराच प्राचीन व बुद्धधर्माअगोदरचा होता असें निःसंशय रीतीनें मानण्यास हरकत नाहीं; व महावीर हा जैनांचा शेवटचा तीर्थंकर यानें जैनधर्माला हल्लींचें स्वरूप प्राप्त करून दिलें हीहि तितकीच निर्विवाद गोष्ट आहे.

महावीरांचें चरित्र स्वतंत्र येईलच. या महावीरानें उपदेशिलेल्या या जैनधर्माचें त्याचा प्रसिद्ध शिष्य सुधर्मा यानें संरक्षण केलें व त्याच्यामुळेंच जैनधर्म आज अस्तित्वांत राहिला आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. सूत्रकृतांग या ग्रंथामध्यें त्यानें महावीराचे आपल्याशीं जे संवाद झाले ते ग्रथित केले आहेत.

महावीराच्या मरणोत्तर जैनधर्माच्या इतिहासांत एक दोन क्रांतिकारक गोष्टींशिवाय महत्त्वाची गोष्ट घडून आली नाहीं. एक क्रांतिकारक गोष्ट म्हणजे जैनांमध्यें फूट होऊन वेगळे पंथ निर्माण झाले ती होय. श्वेतांबर ( श्वेत वस्त्र परिधान करणारे ) व दिगंबर ( नग्न हिंडणारे ) हे ते दोन पंथ होत. ख्रि. पू. ३१० च्या सालीं मगध देशांत भयंकर दुष्काळ पडल्यामुळें बऱ्याचशा जैन लोकांनीं देशांतर केलें. या देशांतरित लोकांचा मुख्य भद्रबाहु असून मगधामध्यें राहिलेल्या लोकांचा नायक स्थूलभद्र हा होता. या स्थूलभद्रानें पाटलिपुत्र येथें एक धर्मसभा बोलावून जैनधर्मग्रंथांचें एकीकरण केलें. दुष्काळानंतर ज्यावेळीं हे देशांतरित जैन लोक स्वदेशीं आले त्यावेळीं त्यांनां आपल्या गैरहजरींत स्थूलभद्रानें भरविलेल्या धर्मसभेची व तींत घडलेल्या ग्रंथैकीकरणाची हकीकत समजली. त्यांनीं या गोष्टीला मान्यता दिली नाहीं व यामुळें जैनांत दोन पक्ष निर्माण झाले व स्थूलभद्रादि लोकांचा श्वेतांबर पंथ व भद्रबाहु व इतर त्याच्या अनुयायांचा दिगंबर पंथ असे दोन तट पडले व ते अद्यापि अस्तित्वांत आहेत ( श्वेतांबर व दिगंबर यांवरील स्वतंत्र लेखांत या संबंधानें सविस्तर माहिती दिली आहे ). या दोन पंथांशिवाय तिसरा एक पंथ जैनांत आढळतो व तो म्हणजे ढुंढिया उर्फ स्थानकवासी पंथ होय. हा पंथ श्वेतांबरामधील एक पोटपंथ आहे. श्वेतांबर व दिगंबर पंथांत भिक्षू व भिक्षुणीशिवाय इतरांनीं धर्मग्रंथ वाचण्याची प्रवृत्ति नाहीं. आहे; पण ढुंढियापंथानें ही परवानगी सर्वांनां दिली आहे ( ढुंढिया पहा ).

जैनधर्माच्या वाङ्मयांत तत्कालीन परिस्थितीचे फारसे उल्लेख आढळून येत नाहींत. त्यामुळें जैनधर्माचा इतिहास सुसंगत मिळणें अशक्य झालें आहे. अशोकाचा नातु संप्रति हा सहिष्णु असल्यामुळें त्यानें आपल्या कारकीर्दींत जैनधर्माला आश्रय दिला. पण जैनधर्माच्या इतिहासांतील अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे राजाकुमारपालानें जैनधर्माचा केलेला स्वीकार होय. हेमचंद्रानें कुमारपालाला जैनधर्माची दिक्षा दिली व त्याच्या कारकीर्दींत जैनधर्माचा प्रसार झाला.

*आंकडे.*—हिंदुस्थानामधील प्रत्येक मोठ्या शहरांत यांची वस्ती आहे, सन १९११ च्या खानेसुमारीप्रमाणें यांची लोकसंख्या एकंदरीत १२४८१८ होती. १९२१ सालीं ती संख्या ११७८५९६ भरली. राजपुताना एजन्सी

व मुंबई इलाखा यांमध्यें जैनांची संख्या फार आहे. जैन समाजाच्या संख्याक्षयाकडे त्यांनीं लक्ष देणें अवश्य आहे.

संख्येनें जरी हे लोक थोडे असले तरी हे धनिक असल्या-कारणानें यांनां समाजांत एक प्रकारचें महत्त्व प्राप्त झालें आहे. हे बहुतेक व्यापारी आहेत.

प्रां त वा री को ष्ट क.

| | |
|---|---|
| राजपुताना एजन्सी | २७९७२२ |
| मुंबई इलाखा | ४८१६५० |
| संयुक्तप्रांत | ६८१११ |
| मध्यहिंदुस्थान | ८३३३७ |
| हैद्राबाद एजन्सी | १८५८४ |
| अजमीर–मेरवाडा | १८४२२ |
| मद्रास | २५४९३ |
| पंजाब आणि दिल्ली | ४६०१९ |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | ६९७९४ |
| बडोदें संस्थान | ४३२२३ |
| इतर | २०२० |
| बंगाल | १३३७६ |
| म्हैसूर एजन्सी | २०७३२ |
| आसाम | ३५०३ |
| बिहार आणि ओरिसा | ४६९० |
| एकूण | ११७८५९६ |

जैनांतील पोटजातींची कल्पना येण्याकरितां पंजाबांतील जैनपोटवर्गांची यादी पुढें दिली आहे. ( १ ) दिगंबरीः—( अ ) स्थानकवासी, ( आ ) तेरापंथी, ( इ )इतर (दिगं.). ( २ ) श्वेतांबरीः—( अ ) ढुंढिया, ( आ ) पुजेरे, ( इ ) साधुमार्गी, ( ई ) स्थानकवासी व ( उ ) इतर ( श्वेतां. ). ( ३ ) इतरः--( अ ) पितांबरी, ( आ ) मंदिरपंथी, ( इ ) साधुपंथी, (ई) सारावेगी, (उ) स्थानकवासी, व ( ऊ ), इतर (४) हिंदुसदृश वर्गः-( क ) रूपनामी, ( ख ) सनातनधर्मी.

जैनांमध्यें यति, उपासक व श्रावक असे तीन पोटभेद आहेत. यति म्हणजे संसाराचा त्याग करून विरक्त बनलेला मनुष्य. ब्रह्मचाऱ्याला देखील एकदम यति होतां येतें. गृह-स्थाला अगर ब्रह्मचाऱ्याला यति होण्यापूर्वी आपल्या आई-बापांची अगर पालकांची परवानगी घ्यावी लागते. विवाहित गृहस्थाला आपल्या बायकोची परवानगी घ्यावी लागते.

श्वेतांबरपंथी गृहस्थाला यति होण्याच्या पूर्वी पंचप्रावरण व एक घोंगडी याशिवाय सर्व वस्तूंचा त्याग करावा लागतो. हीं वस्त्रें पिवळ्या रंगाचीं असतात. स्थानकवासी यतींच्या बाबतींत पांढरें वस्त्र वापरण्यांत येतें. अहमदाबादमध्यें कांहीं श्वेतांबरी यती पांढऱ्या व पिवळ्या अशा मिश्र रंगाची वस्त्रें वापरतांना क्वचित आढळतात. दिगंबरपंथी अंगावर कांहींच घेत नाहींत. यावरील सामुग्रीखेरीज अन्नावर, पाण्यावर व आपलें मुख आच्छादण्याकरितां यतीला तीनचार वस्त्रें जवळ ठेवावीं लागतात. स्थानकवासी साधु रात्रंदिवस आपल्या तोंडावर वस्त्र ठेवितात. एवढेंच नव्हे तर त्यांच्याशीं एखाद्या माणसाला बोलावयाचें असल्यास त्या गृहस्थानें आपला चेहरा झांकून या साधूशीं बोललें पाहिजे असा निर्बंध आहे. श्वेतांबरी साधू फक्त हातांत मुखवस्त्र बाळगतात.

याशिवाय यतीजवळ एक लांब काठी व एक झाडणी असावी लागते. झाडणीचा उपयोग कृमिकीटकांनां हळूंच दुसरीकडे लोटून देणें हा होय. ही झाडणी बहुधां लोंकरीची केली असते. दिगंबर साधु अरण्यांतच रहात असल्यानें केर-सुणीच्या ऐवजीं ते मोराचे पंख वापरतात. पंचप्रावरणाप्रमाणें पांच भांडीं (लांकडाचींच) जैनसाधूला बाळगण्याची परवानगी आहे. बायकांनां देखील भिक्षुणी होतां येतें.

दीक्षा घेण्याच्या वेळीं त्याची मोठी मिरवणूक काढून त्याला एका वडाच्या झाडाखालीं नेण्यांत येतें. व त्याचें मुंडन कर-ण्यांत येतें. नंतर त्याच्या डोक्याला भस्म फासण्यांत येऊन त्याच्या कानांत खालील मंत्र उच्चारण्यांत येतो ' करोमि भंते सामायं सावज्जजोगं पचरवामि । जावनिवाए, पज्जु वासामि । ( दुविहं, तिविहेणं न करोमिन कारमेनि ) मणसा, वयसा कायसा तस्संभते, पडिकमामि, निंदामि, गरहामि अप्पाणं वोसिरामि. । ' दीक्षा घेतल्यानंतर दिगंबर पंथी अगर श्वेताम्बरी यति नवीन नांव धारण करतो. स्थानकवासी यति पूर्वाश्रमींचेंच नांव धारण करतो. अशा प्रकारच्या यतीला श्वेतांबर व स्थानवासी जैन अनुक्रमें संवेगी महापुरुष अगर पूज्य या नांवानें संबोधितात.

भिक्षुणींच्या बाबतींत याप्रमाणेंच सर्व कृत्यें करावीं लाग-तात. भिक्षुणी होण्याची परवानगी स्त्रीला आपल्या नवऱ्याकडून मिळवावी लागते. विधवेला अगर कुमारिकेला आपल्या पित्याकडून अगर पालकाकडून संमति घ्यावी लागते. भिक्षुणी होण्यापूर्वी तिला धर्माचें अध्ययन करावें लागतें. भिक्षुणी झाल्यानंतरहि तिला दररोज, अध्ययन करावें लागतच. भिक्षुभिक्षुणींपैकीं कोणी वारल्यास त्याची फार थाटाची मिरवणूक काढून त्यांचा और्ध्वदेहिक विधि साजरा करण्यांत येतो. भिक्षुणीच्या मृत शरीराभोंवतालच्या वस्त्राचा तुकडा जवळ ठेवल्यास आपल्याला संतति होते अशी वांझ बायांची समजूत असते.

भिक्षु-भिक्षुणींचीं पंचमहाव्रतेंः—अहिंसा, असत्यत्याग, अस्तेय, ब्रह्मचर्य, व अपरिग्रह अशीं पांच व्रतें पाळण्याची शपथ घ्यावी लागते. त्याप्रमाणें क्षमा, निर्लोभता, आर्जव, मार्दव, तप (तपाचे प्रकार—अवहान, ऊनोदरी, वृत्तिसंक्षेप, रसत्याग, कायक्लेश, संलीनता, प्रायश्चित्त, विनय, वैय्यावश, स्वाध्याय, ध्यान, उत्सर्ग) संयम, सत्य, शौच, आकिंचन्य, ब्रह्मचर्य इत्यादि दहा यतिधर्म पाळावे लागतात. भिक्षु–भिक्षु-णींनां एका आठवड्यापलीकडे कोणत्याहि एका गांवांत रहातां येत नाहीं. श्वेतांबरी यति, ज्या गांवीं उपासरो म्हणजे जैन-साधूंच्यासाठीं धर्मशाळा असतील अशाच ठिकाणीं जातात. भिक्षेवर यांचा उदरनिर्वाह चालतो.

जैनगृहस्थधर्मः—प्रत्येक जैन गृहस्थाला अहिंसा, सत्य, प्रामाणिकपणा, सच्छील, निर्लोभ, दिशिव्रतपरिमाण, उपभोग-परिभोग- परिमाण, अनर्थ, दंडव्रत, सामायिक, देशावकाशिकव्रत, पोषधव्रत, अतिथिसंविभागव्रत, हीं बारा व्रतें पाळण्याची शपथ घ्यावी लागते.

चालीरीतिः—जैनांमध्यें जातिनिर्बंध नाहीं अशी एक समजूत प्रचलित असे,पण खरा प्रकार त्याहून अगदीं उलट आहे. जैनांनीं ब्राह्मणांविरुद्ध बंड केलें खरें पण स्वतः मात्र जातिनिर्बंध अत्यंत कडक ठेविले. ते आपल्या मंदिरांत हीन जातीच्या लोकांनां येण्याला पूर्ण मनाई करितात. जातिनिर्बंध उठवण्याच्या खटपटीला जैन लोकांनीं वारंवार विरोध केला आहे.जैन लोक आपले धार्मिक विधी ब्राह्मणांकडूनच करवून घेतात. त्यांचे लग्नाचे सर्व विधी ब्राह्मणांमधील विधींप्रमाणेंच आहेत. अलीकडे मात्र अग्नीसमोर ब्राह्मणाच्या ऐवजीं अर्हताची पूजा करण्यांत येऊं लागली आहे.

लग्नाच्या बाबतींत यांच्यांत वयाचा निर्बंध नसतो. पण साधारणतः स्थानकवासी व श्वेतांबरी लोकांत मुलींचे विवाह १४–१६व्या वर्षाच्या वयाच्या दरम्यान व मुलांचे १९–२० या वयाच्या दरम्यान करतात. दिगंवरपंथी लोकांत मुलींचें १२ व्या वर्षाच्या आंत लग्न करतात; व वराकडून हुंडा घेतात.

सजातीय श्वेतांबर, दिगंबर व स्थानकवासी लोकांत रोटीबेटीव्यवहार होतात. श्वेतांबर व स्थानकवासी लोकांत, पत्नीपासून संतति होत नसेल अशा पुरुषाला दुसरें, तिसरें, चवथेंसुद्धां लग्न करून घेण्याला परवानगी आहे.दिगंबर हे एकपत्नीव्रताला पूर्ण अनुकूल आहेत. दिगंबरपंथाच्या एका पोटजातीशिवाय सर्व पंथानें जैन लोक पुनर्विवाहाला प्रतिकूल आहेत. जैनांमध्यें स्त्रियांनीं बुरखा वापरलाच पाहिजे अशी सक्ति नाहीं पण ज्या ठिकाणीं मुसलमानी अंमल विशेष रीतीनें कडक होता त्या ठिकाणीं जैन स्त्रियांनीं पडदा वापरण्याची चाल पडल्यानें अद्यापिहि तीच पद्धत त्या त्या भागांत रूढ आहे. स्त्रियांनां सभांतून हजर राहण्याची व त्यांत भाग घेण्याची पूर्ण मुभा आहे. स्त्रियांचा खास दिवस स्त्रियांकडून पाळण्यांत येतो.

मृतांचे संस्कार हिंदूमधील मृतसंस्काराप्रमाणेंच आहेत व ते ब्राह्मणांकडून करविण्यांत येतात. अस्थी व रक्षा नदींत टाकण्याची चाल मात्र जैनांत नाहीं. दीड वर्षाच्या आंतल्या मुलाला हिंदूप्रमाणेंच जैन लोकहि जाळण्याऐवजीं पुरतात. यतींनां पुरण्याऐवजीं जाळण्यांत येतें. सुतकाची खूण म्हणून पांढरी अगर काळी पगडी जैन वापरतात. श्मश्रू करण्याची चाल यांच्यामध्यें नाहीं. महिन्यांतील प्रत्येक अष्टमी व चतुर्थी हे पर्व दिवस होत. या दिवशीं उपवास अगर एक वेळां जेवण करण्याची पद्धत आहे. या दिवशीं जपस्तोत्रध्यान करण्याची चाल आहे चैत्र शु. १३ रोजीं महावीर--जयन्ति साजरी करण्यांत येते. वैशाख शु. ३च्या दिवशीं श्रेयांस राजानें आदिनाथ तीर्थंकरास इक्षुरसाचा आहार दिला तन्निमित्त या दिवशीं जैन लोक देवावर उसाच्या रसाचा अभिषेक करतात. आषाढ, कार्तिक व फाल्गुन या तीन महिन्यांत शु. ८ पासून पौर्णिमेपर्यंत आठ दिवस शिवमंदिरांतून नंदीश्वरमूर्तीची पूजाअर्चा सुरू असते. नंदीश्वरद्वीपांत चारी दिशेला अकृत्रिम अशीं ५२ चैत्यालयें आहेत. या चैत्यालयांत ५२ मूर्तींची कल्पना करून प्रत्येक दिशेस १६ मूर्ती बसवून ५२ तीर्थकरांच्या प्रतिमा तयार करण्यांत येतात. या आठ दिवसांत पंचमेरूची स्थापना करून त्यावर नंदीश्वराची प्रतिमा ठेवून त्याची पूजा करण्यांत येते. या पर्वास नंदीश्वरपर्व असेंहि म्हणतात. भाद्रपदमासीं शुद्ध पंचमीपासून १० दिवसपर्यंत असलेल्या पर्वदिवसांत उत्तरेकडचे लोक दशधर्माची आराधना करतात. या अवधींत जैनांच्या देवळांत मोठा उत्सव साजरा करण्यांत येतो. या उत्सवाला पज्जुसण असें नांव आहे. जैन पंचांगाप्रमाणें वर्षाचे हे शेवटचे दिवस असल्यानें या अवधींत वर्षांत केलेल्या पापांचें क्षालन करण्याचे प्रयत्न करण्यांत येतात. दर दिवसाआड उपवास करण्यांत येतो. उपवासाच्या दिवशीं कल्पसूत्राचें पुराण ऐकण्यासाठीं जैन लोक उपासरोकडे जातात. कांहीं धार्मिक जैन संबंध पंधरवडा देखील कडकडीत उपवास करतात. याअवधींत एक दिवसभर कडकडीत उपोषण, केल्यानें मनुष्य पुण्यवान होतो अशी समजूत असते. पुष्कळ जैन एक दिवस उपवास करतात. याला पोसो असें नांव आहे. या पज्जुसणाची महाराष्ट्रांत फारशी वहिवाट नाहीं, तथापि भाद्रपदांत अनंतचतुर्दशीव्रताचा तीन दिवसपर्यंत मोठा उत्सव चाललेला असतो. याच महिन्यांत षोडशकारण, पुष्पांजली, रत्नत्रय वगैरे इतर पर्वदिवसहि आहेत. संवत्सराचा शेवटचा दिवस जैन मोठ्या आस्थेनें व धार्मिक बुद्धीनें पाळतात. यावेळीं परस्परांची क्षमा मागण्याची वहिवाट आहे. वर्षांत केलेल्या पातकांची गुरूजवळ कबुली देऊन आपल्या पापाचें क्षालन करण्याची वहिवाट आहे. या पज्जुसणाच्या उत्सवांत हिंसेला पूर्ण बंदी आहे. संस्थानिकांनां या अवधींत शिकार न करण्याविषयीं जैनांनीं विनंति करून या अवधींत हिंसेला बंदी करण्याचें श्रेय घेतलें आहे. मार्च व एप्रिल महिन्यांत आली अगर अंबेल हा सण साजरा करण्यांत येतो. या दिवशीं पालिताना, समेदशिखर, गिरनार येथें मोठ्या यात्रा भरतात. आश्विन आमावास्येला महावीरनिर्वाणपर्व असलें तरं त्या दिवशीं जैन लोक महावीर तीर्थंकराची पूजाअर्चा करतात व निर्वाण लाडू चढवतात. याशिवाय प्रत्येक तीर्थंकराची पुण्यतिथि क्वचित साजरी करतात.

जैन लोक हे अहिंसावादी असल्यामुळें त्यांनीं शहरोशहरीं व खेडोपाडीं अनाथ गुरांचें रक्षण करण्यासाठीं पांजरपोळ उघडले आहेत व त्यामुळें त्यांनीं पुष्कळ गुरांचा कत्तलीपासून बचाव केला आहे. तथापि त्यांनीं अहिंसाव्रत अव्यवहार्य कोटीला नेऊन पोंचविलें आहे ( ‘ अहिंसा ’ पहा ).

जैन धर्म.—जैनांची शास्त्रोक्त दिनचर्या पुढीलप्रमाणें असावी. त्यांनीं प्रातःकाळीं उठावें; तोंड वगैरे न धुतां

मंत्रांचे पाठ करावे; आणि ते पाठ बोटांनीं मोजावे; इष्ट देवतेचें, गुरुदेवतेचें, धर्माचें आणि आपल्या कर्तव्याचें स्मरण करावें; नंतर तीर्थंकरांचें ध्यान करावें; नंतर मी आज अमकी गोष्ट करणार नाहीं म्हणून सोगण किंवा शपथ घ्यावी. उदाहरणार्थ, मी आज इतक्या भातापेक्षां अधिक भात खाणार नाहीं, किंवा अमक्या इतक्या ( शेरभर अथवा दोन शेर ) पाण्यापेक्षां अधिक पाणी पिणार नाहीं; किंवा अमकी भाजी खाणार नाहीं किंवा अमुक वाजेपर्यंत कोणाशीं बोलणार नाहीं, मौनव्रत धारण करीन. अशी शपथ घेण्याचा उद्देश हा दिसतो कीं, मनुष्याला आपलें मन ताब्यांत ठेवण्याची संवय व्हावी, आत्मसंयमनाचा हा धडाच म्हणतां येईल.

प्रत्येक जैनानें पुढील बारा गोष्टी लक्ष्यांत ठेवाव्या असें सांगितलें आहे.—यांना बारा भावना अथवा अनुप्रेक्षा म्हणतात.( १ ) या जगांत नित्य असें कांहीं नाहीं, सगळें क्षणभंगुर आहे. हिला अनित्यभावना असें म्हणतात. ( २ ) या जगांत आपणांस दुसरा कोणाचा आसरा नाहीं; आपण जसें कर्म करूं तसें फळ पावूं. याला अशरणभावना म्हणतात. ( ३ ) पूर्व जन्मांत आपण पुष्कळ दुःखें भोगिलीं आहेत, तेव्हां आतां तरी या दुःखांतून मुक्तता करून घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ही संसृतिभावना होय. ( ४ ) आपण या जगांत एकटे आहों, ही एकत्वभावना होय. ( ५ ) या जगांत दिसणाऱ्या सगळ्या वस्तू आपणाहून भिन्न आहेत. ही अन्यत्वभावना होय. ( ६ ) हें शरीर अपवित्र होय. याचा अभिमान काय धरावयाचा ? असें मानणें ही अशुचि भावना होय. ( ७ ) ज्यांच्या योगानें नवीन कर्में उत्पन्न होतील असे विचार, उच्चार व आचार यांचें अनुकरण करणें ही आश्रवभावना. ( ८ ) नव्या कर्मांनीं आत्मा बद्ध होऊं नये म्हणून उपाय योजणें, ही संवरभावना. ( ९ ) गतकर्मांपासून मुक्तता मिळण्याचे उपाय योजणें, ही निर्जरा भावना. ( १० ) हें जग कोणत्या द्रव्यांनीं बनलें आहे व याचीं तत्त्वें काय आहेत ? इत्यादि गोष्टींचा विचार करणें ही लोकभावना. ( ११ ) रत्नत्रयी म्हणजे सम्यक् दर्शन, सम्यक्ज्ञान, व सम्यक्चारित्र्य, या तीन गोष्टींखेरीज करून बाकीच्या गोष्टी या जगांत सहज प्राप्त होतात असें समजणें ही बोधदुर्लभ भावना व ( १२ ) रत्नत्रयी हीच या जगांत खरी सुख देणारी आहे असें मानणें ही धर्म भावना होय.

हिंदूंच्या धर्मांत जसे सोळा संस्कार आहेत तसा जैन लोकांत ५३ क्रिया आहेत. त्यांत मुलाचा केशवाप म्हणजे शेंडी ठेवणें,पांचव्या वर्षी त्याला उपाध्यायाकडे नेऊन विद्यारंभ करविणें, आठव्या वर्षी त्याच्या गळ्यांत यज्ञोपवीत घालणें व ब्रह्मचर्यानें विद्याभ्यास करीत राहण्याविषयीं उपदेश करणें—इ. गोष्टी जशा आपल्या धर्मशास्त्रांत आहेत, तशाच जैनशास्त्रांतहि आहेत. परंतु आपल्याकडे जसे लोक सगळे संस्कार करीत नाहींत, मुख्य मुख्य तेवढे मानतात, त्याप्रमाणेंच जैनांचें आहे. कित्येक तर यज्ञोपवीतांचा संस्कार सुद्धां करीत नाहींत.

ग च्छ.—दहाव्या शतकाच्या मध्यभागांत उद्योतन नांवाचा एक मोठा भट्टारक होऊन गेला व त्याच्या शिष्यापासून ८४ गच्छ उर्फ पंथांची उत्पत्ति झाली. ८४ निरनिराळ्या धर्मगुरूंच्या मतांमध्यें जसे फरक होत गेले तसे गच्छभेद अनेक वाढले. कांहीं कांहीं केवळ स्थानभेदावरूनच निरनिराळ्या नांवाचे गच्छ तयार झाले. साधारणतः गुरुपरंपरेवरून गच्छ ओळखले जातात. गच्छाच्या मुख्य आचार्याला सूरि व शिष्याला मणि असें नांव आहे. प्रमुख सूरींचीं चरित्रें व उपकेशगच्छ, अंचलगच्छ, तपागच्छ वगैरे मोठाल्या गच्छांच्या पट्टावल्या स्वतंत्र दिल्या आहेत. आम्हाला उपलब्ध असलेल्या गच्छांची यादी पुढें दिली आहे.

आगमगच्छ, आगमिया, आगमिया मोकल, आचार्यीय खरतर, उपकेशगच्छ, उकेशगच्छ, ओसवालगच्छ, अंचलगच्छ, आंचलिया, कतवपुरा-तपागच्छ, कुमारगिरिस्थित कूर्चपुरगच्छ, कृष्णगच्छ, कोटिकगण, कोटिकगच्छ ( खरतरगच्छाची शाखा), कोटिकगण (वज्रशाखा, चंद्रगच्छ), कोरंटवाल तपागच्छ, कौटिक, खरतरगच्छ, गोयरक्ष, चतुर्दशीयक, चंद्रगच्छ, चंद्रकुलगच्छ, चंद्रकुल वज्रशाखा, चित्रावाल जांगीवाडे, चित्रावाल तपागच्छ, चितामणिया, चिवालवगच्छ, छापरिया पुन्नामिया, जीरापल्ली ( बृहद्गच्छाची शाखा ), टाकवंश, तपागच्छ, त्रांगडिया पुनमियागच्छ, धंदेरिया पुन्नमियागच्छ, धर्मघोषगच्छ, धवलीपर्व—आंचलियागच्छ, नंदिसंघ, नरचंद्रसूरिवंश, नागेंद्रगच्छ, नागोरा—नागपुरीय तपागच्छ, नानकगच्छ, निर्गन्थ, पल्लीवालगच्छ, पार्श्वचंद्रगच्छ, पाल्हणपुरागच्छ, पिप्पलकखरतर, पिंपलियागच्छ, पूर्णिमापक्ष, पूर्णिमागच्छ, प्राग्वाटीय (अथवा पोरवाडगच्छ—विजयानंद सूरिगच्छ पट्टा), पौर्णिमा-(मी)यक पक्ष, बलात्कारगण, बृहत्खरतर, बृहद्गच्छ( जीरापल्लीपट्टा),बृहच्छालीय तपागच्छ, बोकडियागच्छ, भरयच्छागच्छ, भावहर्षीय खरतर, भुवनतुंगसूरि शाखा(अंचलगच्छाची), मधुखरतर, मलधारागच्छ, माथुरपंथ, मूळसंघ, मेळापट्टावली, रंगविजयखरतर, राजगच्छ, राजपिंगच्छ, रुद्रपल्लीयखरतर, लघ्वाचार्य खरतर, लघुखरतर, लघुशालिक, वचंवन्दणिकापिरालुया, वज्रशाखा (खरतर गच्छांतर्गत),वटगच्छ (बृहद्गच्छ), वनवासीगच्छ, वायदगच्छ, विजयदेवगच्छ, विजयशाखा (विजयानंदसूरिगच्छ व पोरवाडगच्छ एकत्र), विधिपक्षगच्छ ( अंचलगच्छ ), विमलगच्छ, विश्वालगच्छ, बृद्धशालिक, वेगडखरतर ( वेगडाखरतर ), श्रीकृष्णराजर्पिगच्छ, सरस्वतीगच्छ, सागरमत, साधुपम्नमियागच्छ ( साधुपुनमियागच्छ ), सारीयखरतर सार्पाओसवालागच्छ, सिद्धांतियागच्छ, सिद्धांतियावटगच्छ, सुविहितपक्षगच्छ, सुहस्तिवंश, स्थूलिभद्रवंश, हर्षपुरीयगच्छ, हेमचंद्र.

ती र्थं क र.-जैनधर्मांत एकंदर २४ तीर्थंकर आहेत. त्यांचीं नांवें:—ऋषभ, अजित, शंभव, अभिनंदन, सुमति, पद्मप्रभ, सुपार्श्व, चंद्रप्रभ, पुष्पदंत, शीतल, श्रेयान्, वासुपूज्य, विमल, अनंत, धर्म, शांति, कुंथु, अर, मल्लि, मुनिसुव्रत, नमि, नेमि, पार्श्व, वर्द्धमान ( महावीर ).

जै न द र्श न.—श्रीहरिभद्रसूरि सांगतात कीं, बौद्ध, नैयायिक, सांख्य, जैन, वैशेषिक, जैमिनीय, या षड्दर्शनांपैकीं जैनदर्शन हें जिन महात्म्यानें प्रकाशित केलें. या दर्शनांत नऊ तत्त्वें सांगितलीं आहेत तीं अशीं:—जीव, अजीव, पुण्य, पाप, आश्रव, संवर, निर्जरा, बंध व मोक्ष ('षड्दर्शनसमुच्चय')

ज्यांस ज्ञानचैतन्यगुण आहे तो जीव व शरीरादिक जड पदार्थ ज्यांत अंतर्भूत होतात तें तत्त्व अजीव; " शुभाशुभकर्मद्वाररूप " म्हणजे शुभ अथवा अशुभ कर्मबंध होण्याचीं जीं द्वारें त्यांनां आश्रव म्हणतात; " आत्मकर्मणोरन्योन्य प्रदेशानुप्रवेशात्मको बंधः " म्हणजे आत्म्याचा प्रदेश व कर्मांचा प्रदेश यांचें एकमेकांत प्रविष्ट होणें हा कर्मबंध; ' आश्रवनिरोधलक्षणः संवरः ' म्हणजे आत्म्याच्या ठिकाणीं नवीन कर्म न येऊं देणें, अथवा आश्रवाचा विरोध करणें याला संवर म्हणतात; आणि संपूर्ण कर्मांचा नाश होणें हा मोक्ष. जीवांच्या गुणांवर आवरण घालणारीं जीं कर्में तीं आठ प्रकारचीं आहेत व या आठहि प्रकारच्या कर्मांचा नाश करण्याचा जो मार्ग तो मोक्षमार्ग. सम्यक्दर्शन, सम्यक्ज्ञान व सम्यक्चारित्र्य हीं त्या मार्गाचीं तीन द्वारें होत. म्हणजे या तीन साधनांच्या योगानें सगळ्या कर्मबंधांचा नाश होऊन मनुष्य मोक्ष पावतो.

जै न त त्त्व ज्ञा न.—जैनांचें तत्त्वज्ञान बऱ्याच महत्त्वाच्या बाबतींत बौद्धांच्या तत्त्वज्ञानाशीं विरुद्ध आहे हे दोन्ही धर्म स्वतंत्र आहेत एवढेंच नव्हे तर परस्परविरोधी आहेत. जैन तत्त्वज्ञान अत्यंत सूक्ष्मदर्शी आहे. त्यांत प्रत्येक चराचर वस्तूस जीव आहे असें मानलें आहे. फक्त ' जल ' तापविलें असतांना तें जीवरहित असतें. परंतु बौद्धांच्या तत्त्वज्ञानाची उभारणी आत्म्याचें अस्तित्व मान्य न करतांच केली आहे. जैन तत्त्वज्ञानांत आत्म्याला 'जीव' असा शब्द योजिला आहे. सत्, असत् आणि दिक् यांचा संबंध प्रत्येक वस्तूंतील जीवाशीं येतो. स्याद्वाद हें जैनतत्त्वज्ञानांतील प्रधान अंग आहे.

अर्हताच्या सर्व सिद्धान्तांत मूलभूत सिद्धान्त (मूलमन्त्र) म्हणजे स्याद्वादाचा सिद्धान्त होय. सापेक्षतेनें एकाच पदार्थाच्या ठिकाणीं सत्त्व, असत्त्व (अस्तित्व, नास्तित्व ), नित्यत्व, अनित्यत्व इत्यादि अनेक धर्म वास करितात; या सिद्धान्ताला स्याद्वादसिद्धांत म्हणतात. कोणतीहि वस्तु घ्या, ती स्वतःच्या रूपानें सत् व पररूपानें असत्; सुवर्णमृत्तिकादि मूलद्रव्याच्या दृष्टीनें नित्य व कटक-कुंडल रूपानें अनित्य इ. प्रकारची असते हें आपण पाहतों. ही जी प्रतीति तीच स्याद्वादसिद्धान्तास आधारभूत आहे. कोणत्याहि पदार्थाच्या स्वरूपाची उपपत्ति स्याद्वादाशिवाय लागत नसल्यानें सर्व पदार्थ स्याद्वादमुद्रांकित आहेत हें स्याद्वाद तत्त्व श्री हरिभद्रसुरिपादांनीं आपल्या 'अनेकान्तजयपताका' ग्रन्थांत विस्तारानें प्रतिपादिलें आहे. जैनांचें तत्त्वज्ञान जितकें परम सहिष्णु आहे, तितकाच त्यांचा तपाचरणाबद्दल दुराग्रह आहे. जीवहत्या होईल या भीतीनें यतीनें आपलीं वस्त्रें सुद्धां धुतां कामा नयेत; फार काय दांतहि घासतां कामा नयेत. अशा तऱ्हेच्या तपाचरणानें मोक्षप्राप्ति होते असा त्यांचा समज आहे. स्वतः महावीरानें एक तप आचरण करून निर्वाणपद मिळविलें असें म्हणतात. आतां हिंदु व जैन यांच्या तत्त्वज्ञानपद्धतींतील भेद पाहूं. जैन ईश्वराचें अस्तित्व मानीत नाहींत. नैय्यायिकांचा आरंभवाद व परमाणुवाद त्यांस मान्य नाहीं. सामान्य हा पदार्थ ते धरीत नाहींत. त्यांच्या ज्ञानामध्यें लौकिकज्ञान व लोकोत्तरज्ञान असे दोन भेद आहेत. लौकिकज्ञानांमध्यें भौतिकशास्त्रें, कला, व्याकरण भाषाशास्त्र वगैरे विषय येतात. लोकोत्तरज्ञानामध्यें परमार्थसाधन, तत्त्वज्ञान इ. विषय येतात. हिंदु व जैन यांच्यामध्यें भेद असेल तर तो लोकोत्तरज्ञानमार्गांतच आहे, लौकिक ज्ञानांत नाहीं. जैन तत्त्वज्ञान स्याद्वादमंजिरी, गोमट्टसार इत्यादि ग्रंथांत आहे.

जैन आस्तिक कीं नास्तीकः—जैन लोक आस्तिक आहेत कीं नास्तिक आहेत यविषयीं बराच मतभेद आहे. शंकराचार्यांनीं त्यांनां नास्तिक म्हटलें आहे. पाश्चिमात्त्य ग्रंथकारहि त्यांनां नास्तिकच समजतात. जैन लोक आत्मा, कर्म आणि सृष्टि हीं नित्य आहेत असें मानतात. त्यांनां कोणी उत्पन्नकर्ताहि नाहीं व नाशकर्ताहि नाहीं अशी त्यांची समजूत आहे. आपण जें कांहीं कर्म करतों त्याचें फळ आपणांस मिळतें. ईश्वराचा त्याच्याशीं अर्थाअर्थी कांहीं एक संबंध नाहीं. आपण स्तुति करून परमेश्वराला प्रसन्न करून घेऊं व ईश्वर आपल्या स्तुतीला भुलून आपल्या कर्माप्रमाणें बरीं वाईट फळें दिल्यावाचून राहील ही कल्पनाच जैन लोकांत नाहीं. ईश्वर सर्वज्ञ, नित्य आणि मंगल स्वरूप आहे हें जैनांनां मान्य आहे. पण तो आपल्या पूजेनें किंवा स्तुतीनें प्रसन्न होऊन आपल्यावर विशेष कृपा करील व न्यायाचा कांटा अणुरेणूइतका तिकडे राहील असें नाहीं. कर्माप्रमाणें फळें मिळावयाचीच हा जो नियम तो नित्य आहे. त्या नियमानें हें सगळें सृष्टीचें सूत्र चालावयाचें आहे. त्यांत परमेश्वर मध्यें पडत नाहीं अशी जैनांची समजूत आहे. मनुष्याचा आत्मा रत्नत्रयीच्या साधनानें उन्नतीप्रत जात जात निर्वाणाप्रत पोंचला म्हणजे ईश्वररूप होतो. तेव्हां ईश्वर म्हणजे सृष्टीचा निर्माता, शास्ता, किंवा संहारकर्ता नसून अत्यंत पूर्णावस्थेला पोहोंचलेला आत्माच होय असें जैन मानतात. म्हणजे ते ईश्वराचें अस्तित्व मानीत नाहींत असें नाहीं, तर ईश्वराच्या कृतीविषयींची त्यांची समजूत व हिंदु लोकांची समजूत यांत काय तो भेद आहे. यामुळें जैन लोक नास्तिक होत असा अपवाद त्यांच्यावर आलेला आहे.

स्वर्ग, मृत्यु व नरक या तिन्ही लोकांना जैन मानतात. स्वर्ग बारा आहेत किंवा सोळा आहेत याबद्दल दिगंबर व श्वेतांबर या पंथांत मतभेद आहे. पण परलोक आहे याविषयीं कोणी शंका घेत नाहीं. कर्मानुबंधानें निरनिराळ्या लोकीं भ्रमण करून पुण्यकर्माचा पुरेसा संचय झाला म्हणजे प्राणी मोक्षपद पावतो असें ते समजतात. तेव्हां पाणिनीच्या मताप्रमाणेंहि जैनांवर नास्तिकत्व स्थापित करतां येत नाहीं. ज्यांनां श्रुती प्रमाण नाहींत ते नास्तिक असा अर्थ घेतला तर मात्र जैन हे नास्तिक आहेत असें म्हटलें पाहिजे. कारण ते वेदाला प्रमाण मानीत नाहींत. पण ख्रिस्ती, मुसुलमान, बौद्ध व अलीकडे उदयास आलेला ब्रह्मसमाज वगैरे धर्मपंथ सुद्धा वेदाला प्रमाण मानीत नसल्यामुळें तेहि नास्तिकाच्या कोटींत येतील. तेव्हां आस्तिक नास्तिक या शब्दांचा कसाहि अर्थ घेतला तरी जैन लोक हे नास्तिक आहेत हें सिद्ध करतां यावयाचें नाहीं.

पण एका दृष्टीनें मात्र जैन नास्तिक म्हटले जातील; आणि ब्राह्मणधर्मी लेखक किंवा पाश्चिमात्य ग्रंथकार जेव्हां जेव्हां बौद्धांनां व जैनांनां नास्तिक म्हणतात तेव्हां तेव्हां ते याच दृष्टीनें पहात असले पाहिजेत असें वाटतें. ती दृष्टि म्हणजे ईश्वराकडे सृष्टीचें कर्तृत्व आहे कीं नाहीं हें होय. बौद्धांप्रमाणें जैनहि ईश्वराकडे सृष्टीचें कर्तृत्व जातें असें न समणारे आहेत. पृथ्वीच्या पाठीवर सध्या जे ठळक ठळक धर्म आहेत त्यांत ईश्वराला सृष्टीचा कर्ता न मानणारे हेच दोन धर्म आहेत, म्हणून यांनां सगळे लोक नास्तिक म्हणत असले तर मात्र बरोबर होईल. पण सृष्टीचें कर्तृत्व ईश्वराकडे जातें किंवा नाहीं हाच प्रश्न अगोदर वादग्रस्त आहे. शास्त्रज्ञांत याबद्दल अद्याप एकमत झालेलें नाहीं. तें होईपर्यंत तरी निदान नास्तिक शब्दानें जैन धर्माचें वैगुण्य स्थापित होतें असें म्हणतां यावयाचें नाहीं.

जैन तत्त्वज्ञानाची संगतिपर मांडणी करण्याचा प्रयत्न विजयधर्मसूरींनीं केला आहे तो अर्वाचीन चळवळी या लेखभागाखालीं दिला आहे.

जै न वा ङ्म य.—जैनांची मूलग्रंथांची भाषा अर्धमागधी किंवा आर्ष या नांवांनीं लोकांस ठाऊक असलेली प्राकृत आहे. ही सध्यां उपलब्ध असलेल्या श्वेतांबर ग्रंथांची भाषा कालानुक्रमानें बदलली गेली असावी. आहेत त्यांतच दोन निरनिराळ्या उपभाषा दिसतात. आणि त्यांपैकीं एक भाषा पद्यमय रचनेलाच वापरली गेली आहे. दिगंबर ग्रंथांची भाषा ही तिसरीच एक भाषा आहे. जुनीं भाष्यें देखील प्राकृतमध्येंच आहेत. संस्कृत भाषेचा उपयोग ग्रंथ लिहिण्याकडे प्रथम दिगंबरपंथानें केला व ख्रिस्तोत्तर १००० वर्षांनंतर संस्कृत भाषेचाच उपयोग ग्रंथलेखनास अधिक झाला. तथापि प्राकृतमध्यें देखील थोडी बहुत ग्रंथरचना चालू होती. यानंतर १३ व्या शतकांत हिंदी भाषा पुढें आली व त्या भाषेंत ग्रंथ होऊं लागले. जैन ग्रंथकारांनींहि या हिंदी भाषेंतच आपले ग्रंथ लिहिण्यास सुरवात केली.

जैन वाङ्मयाचा आद्यभाग जो मूल धर्मग्रंथांचा, त्याचें अंगोपांगासहित सविस्तर परीक्षण 'बुद्धपूर्वजग' विभागाच्या परिशिष्टांत केलेंच आहे. आतां अवांतर जैनधार्मिकवाङ्मयाकडे वळूं.

जैनसंप्रदायाचे मूल धर्मग्रंथ सोडून देतां इतर वाङ्मयाचे ( १ ) टीका स्वरूपाचें अवाढव्य वाङ्मय ( २ ) व स्वतंत्र ग्रंथ असे दोन वर्ग पडतात. ह्यांपैकीं स्वतंत्र ग्रंथ बहुतेक संप्रदायाचे विधी, नीतिशास्त्र व मठवासाचे नियम ह्यांचें विवेचन करणारे असून कांहीं जिनस्तुतिपर काव्यरचनेचा भाग आहे, व ह्याशिवाय कांहीं ग्रंथ जैनांच्या कथास्वरूप वाङ्मयापैकीं आहेत. ह्या विद्वत्तापूर्ण ग्रंथांच्या व काव्यग्रंथांच्या नखल्या दर्जाचें असें कांहीं वाङ्मय आहे कीं, त्यामध्यें उपदेशपर कविता, संतचरित्रें व संप्रदायाच्या इतिहासाची माहिती आढळते ह्या वाङ्मयाची भाषा कांहीं प्राकृत ( जैन महाराष्ट्री ) व कांहीं संस्कृत अशी आहे.

देवर्धीनें मूल जैन धर्मशास्त्राचें शेवटचें संगठण करण्यापूर्वी बरेच अगोदर जैन मुनींनीं मूल ग्रंथावर अर्थबोधक टिपणें लिहिण्याचें कार्य सुरु केलें असावें. कारण निज्जुत्ति ( निर्युक्ति ) नांवाच्या अति प्राचीन टीका सूत्रग्रंथामध्येंच गुंफल्या गेल्या आहेत इतकेंच नव्हे तर कांहींनीं सूत्रग्रंथांची जागा पटकाविली आहे. ' पिण्ड ' व ' ओघनिज्जुत्ति ' ह्यांचा सूत्रांतच समावेश झालेला दिसतो आणि ओघनिज्जुत्ति ' तर एका प्राचीन ' पुव्व ' ग्रंथांतून घेतली आहे अशी एक दंतकथा आढळते. परंपरागत माहितीप्रमाणें महावीरनिर्वाणानंतर १७० वर्षांनीं वारलेला भद्रबाहु ह्यानें मूळ दशधर्मग्रंथांवर निर्युक्ती लिहिल्या असें समजतें. ह्यांच्या पैकीं थोड्या कांहीं निर्युक्ती आपणांस सांप्रत उपलब्ध आहेत. त्यांवरून जैनमहाराष्ट्री भाषेंत आर्यावृत्तांत त्रोटक विवेचनपूर्ण अशी ह्यांची रचना दिसते. शिष्यांस, मूळ धर्मग्रंथ कसें लावावेत हे शिकवितांनां जैन अध्यापकांनां कांहीं तरी मदत व्हावी ह्या दृष्टीनें ह्या प्राकृत आर्यांचा उपयोग होत असावा. पुढें ह्याच निर्युक्तींचीं मोठमोठीं अवाढव्य भाष्यें, चूर्णी इत्यादि प्राकृत ग्रंथांत रूपांतर झालें, व त्यावरहि पुन्हां अनेक संस्कृत वृत्ती, टीका इ. सनाच्या ९ ते १२ शतकाच्या दरम्यान रचल्या गेल्या. कधीं कधीं हे एकावर एक अशा टीकांचे थर इतका घोंटाळा उत्पन्न करणारे होतात कीं त्यांमधील एका थराची दुसऱ्यांतून नीट सोडवणूक करतांच येत नाहीं.

सर्वांत अत्यंत प्राचीन असा टीकाकार हरिभद्र नांवाचा असून शिवाय तो कवि व विद्वान ग्रंथकार या दृष्टीनें प्रसिद्ध आहे. हा ख्रिस्ती शकाच्या ९ व्या शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेला. हरिभद्र हा जातीनें ब्राह्मण असून व्याकरण वगैरे ब्राह्मणानें शिकावयाच्या सर्व शास्त्रांत पारंगत झाला होता. अशी आख्याइका सांगतात कीं तो नेहमीं म्हणे कीं " ज्या कोणाचें म्हणणें मला कळणार नाहीं त्याचा

होईन." एकदां त्यानें एका जैन जोगिणीस कांहीं श्लोक म्हणतांना ऐकिलें परंतु त्याचा अर्थ त्यास कळेना. शेवटीं एका जैन उपाध्यायानें त्या श्लोकांचा अर्थ त्यास सांगितल्यावर हरिभद्रानें त्याचें शिष्यत्व पत्करलें व जैन धर्माची दीक्षा स्वीकारली व जैनधर्मशास्त्रांत निष्णात होऊन "सूरि" ही पदवी मिळविली. माता ज्याप्रमाणें आपल्या मुलांचें संरक्षण करते त्याप्रमाणें हरिभद्रानें १४४४ ग्रंथ लिहून अर्हतांच्या उपदेशांचें संरक्षण केलें. "आवस्सय" व "दसवेयालिय" ह्या दोन मूळ सूत्रांवरील हरिभद्राच्या टीका सांप्रत उपलब्ध आहेत.

शीलांक नांवाचा एक हरिभद्राशीं समकालीन असा टीकाकार होऊन गेला. त्यानें इ. स. ८६२ किंवा ८७२ च्या सुमारास पहिल्या दोन अंगांवर टीका लिहिल्या. शीलांकाच्या टीका संस्कृतमध्यें असून हरिभद्रानें आपल्या ग्रंथांत प्राकृत भाषेमध्यें बरेंच कथास्वरूपी वाङ्मय रक्षण केलें आहे.

अकराव्या शतकांमध्यें, शांतिसूरि किंवा शांत्याचार्य व देवेंद्रगणि यांनीं "उत्तरज्झयन" सूत्रावर आपल्या विस्तृत टीका लिहिल्या, व सुप्रसिद्ध अभयदेव यानें ९ व्या अंगावर टीका लिहिल्या, त्यांपैकीं सहाव्या अंगावरील टीका इ. स. १०६४ च्या सुमारास लिहिली गेली.

ह्या टीकास्वरूप वाङ्मयाचें महत्त्व सांप्रत आपणास दोन तऱ्हेनें वाटण्यासारखें आहे.त्यांपैकीं एक गोष्ट ह्मणजे पुष्कळशी ऐतिहासिक किंवा अर्ध-ऐतिहासिक परंपराप्राप्त माहिती ह्या टीकावाङ्मयांत अनायासें सुरक्षित राखली गेली आहे व दुसरी गोष्ट म्हणजे त्या वाङ्मयांत तत्कालीन लौकिक कथासाहित्याचा अमूल्य सांठा झालेला आहे. बौद्ध भिक्षूप्रमाणें जैन मुनींनाहि आपलीं धर्मप्रवचनें निरनिराळ्या गोष्टी सांगून रसभरित करण्याची नेहमीं इच्छा असे व अशा रितीनें ते व्यवहारांतील गोष्टींचें जैनसाधूंच्या कथांत बेमालूमपणें रूपांतर करीत, व जैन धर्मतत्त्वें सोदाहरण समजावून देण्याचा प्रयत्न करीत असत, व अशा रीतीनें गोष्टिरूप वाङ्मयाबद्दल असलेल्या भारतीय आवडीचा, आपल्या धर्माकडे शक्य तितके अनुयायी वळवून घेण्यास उपयोग करीत. ह्या गोष्टींचा कांहीं भाग मूळ जैनधर्मग्रंथांत आख्यायिका व गीतें ह्या स्वरूपांत मिसळून गेला हें आपण वर पाहिलेंच आहे. परंतु ह्याचा पुष्कळसा भाग कित्येक शतकांच्या अवधींत तयार झालेल्या टीकास्वरूपी वाङ्मयांत पसरला आहे.

संस्कृत टीकाकारांनीं आपल्या संस्कृत टीकाग्रंथामध्यें ज्या ज्या विविध कथा सांगितल्या आहेत त्या सर्व त्यांनां परिचित असलेल्या संस्कृत भाषेंत न सांगतां जशा परंपरेंतून मिळाल्या तशाच आपल्या पूर्वजांच्या प्राकृत भाषेंत दिल्या आहेत (चूर्णी, कथानकें, व "आवश्यक" कथा यांची भाषा जैनमहाराष्ट्रीचें जुनाट स्वरूप असावें. त्याचप्रमाणें पद्याची भाषा गद्याच्या भाषेपेक्षां अत्यंत भिन्न आहे). ह्या टीकाग्रंथांतील गोष्टींशिवाय स्वतंत्रपणेंहि कित्येक मोठमोठ्या कथा व कथानकें लिहिलीं गेलीं व परंपराप्रवाहानें पुढल्या पिढीस प्राप्त झालीं. शेवटीं सांगावयाचें म्हणजे जैनांनीं असल्या गोष्टींचे कित्येक संग्रह तयार केले आहेत.

बौद्धजातकाप्रमाणें ह्या अफाट जैन कथात्मक वाङ्मयाचा एक सामान्य प्रकार असा आढळून येतो कीं, ह्यांतील बरेचसे विषय इतर भारतीय व भारतेतर वाङ्मयांतहि आढळून येतात व हे विषय सबंध जगाच्या वाङ्मयाशीं संबद्ध असेच आहेत. अशा नमुन्याच्या कित्येक गोष्टी "निर्युक्ती" कथामध्येंहि आढळून येतात. नमुन्यादाखल म्हणून लान्मनने 'दसवेयालिय' ग्रंथाच्या 'निर्युक्ती' मधून भाषांतर करून घेतलेला प्रश्नोत्तररूप उतारा पुढें देत आहे.

"महाराज, आपली उंच टोपी दुमडलेली कां?" "मला मासे धरण्यास तिचा उपयोग होतो." "कां, आपण मासे खातां कीं काय?" "तर! डोकें दुखत असलें म्हणजे मासे खाल्ल्यानें तावडतोब राहतें." "पण डोकें दुखायला काय आपण मदिरा घेतां कीं काय?" "तसें कांहीं नाहीं. फक्त प्रियतमेबरोबर एखादे वेळींच घेतों." "म्हणजे, आपणांस प्रियतमाहि आहे एकूण?" "शत्रूशीं युद्धें, कलागती करून दमल्यावर विसावा म्हणून लागते. "कांहो आपलें तर अहिंसाव्रत, मग आपणांस शत्रू कोठून?" "अहो! कधीं कधीं चोऱ्या करण्याचा प्रसंग येतो व लोक अंगावर तुटून पडतात." "म्हणजे, आपणांस चोऱ्या करण्याची जरूरी कां?" "अहो जुगार खेळायला पैसा नको कां?" "एकूण आपण जुगारहि खेळतां?" "अहो मी जुगारी नसतो तर मी कवरमाशाच नसतों."

"आवस्सय" ह्या ग्रंथावरील हरिभद्राची टीका व 'उत्तरज्झयन' ह्यावरील शांतिसूरीची टीका ह्यांमध्यें आलेले संप्रदायाच्या फाटाफुटींसंबंधीचे उल्लेख भारतीय पंथांच्या ज्ञानास फार उपयुक्त आहेत. ह्यांपैकी एका उताऱ्यांत एक भटकणारा मुनि आपल्या झग्याभोंवती तांब्याची तार बांधून व हातांत जंबुवृक्षाची एक फांदी घेऊन इकडे तिकडे पळतो व त्यायोगें असें दर्शवित असतो कीं आपल्या ज्ञानाच्या पूर्णत्वामुळें कदाचित आपला झगा फाटेल म्हणून ही तांब्याची तार बांधली आहे व तो हातांतील जंबुवृक्षाच्या फांदीवरून जंबुद्वीपांत आपल्या जोडीचा कोणी नाहीं असें दर्शवीत असतो असें वर्णन आहे. उपनिषदें व बौद्धग्रंथ ह्यांमधील कित्येक तार्किकांच्या देखील अशाच आख्याइका ऐकू येतात.

"उत्तरज्झयन" सूत्रावरील टीकाग्रंथ कथावाङ्मयाच्या संपत्तीचें सुप्रसिद्ध भांडार आहे. सर्वांत प्राचीन टीका म्हणजे ६०० श्लोकांचा "निज्जुत्ति" ग्रंथ असून तो भद्रबाहूनें केला असल्याबद्दलची दंतकथा आहे. कोणी तरी अप्रसिद्ध ग्रंथकर्त्यानें केलेली 'चुर्णी' नांवाची टीका ह्या

निज्जुती' नंतरची असून सर्वांत महत्त्वाच्या टीका म्हटल्या म्हणजे शांतिसूरि व देवेंद्रगणी ह्यांनीं रचलेल्या होत. ह्यांपैकीं शांतिसूरि अगोदरचा असून तो इ. स. १०४० च्या सुमारास मृत झाला. त्यानें आपल्या "शिष्य हिता" नामक टीकेंत कथा अगदीं थोडक्यांत दिल्या आहेत. ह्या टीकेवरच देवेंद्रगणि ह्यानें आपली "सुखबोधा, नांवाची टीका लिहिली असून ती त्यानें इ. स. १०७३ मध्यें पुरी केली. ह्या टिकेमध्यें देवेन्द्रगणी ह्यानें वरील गोष्टी सविस्तर वर्णिल्या आहेत. ह्याच कथांचें संस्कृत रूपांतर लक्ष्मीवल्लभ याच्या टीकाग्रंथांत आढळून येतें. जैन लोकांनीं आपल्या अनुयाय्यांस जैनसंप्रदायांतील कमीपणा भासूं नये म्हणून ब्राम्हणी व इतर सामान्य वाङ्मयांतून पुष्कळशा लोकप्रिय कथा आपल्या ग्रंथांत समाविष्ट केल्या. तसाच कांहीं जुन्या कथावाङ्मयाचा जैनधर्माशीं कांहींतरी लांबचा कसा तरी संबंध जोडून दिला परंतु जैनधर्मीय स्वरूप देतांना कांहीं भागाचा त्यांनीं अगदीं विघाड केला. तथापि प्राचीन भारतीय कथा वाङ्मयाचें कौशल्य दर्शविणारे पुष्कळ सर्वोत्कृष्ट नमुने जैनटीकांमध्यें किंवा कथावाङ्मयामध्यें उत्तम स्थितींत आढळतात, नाहीं तर ह्या भागास सांप्रत आपण आंचवलों असतों.

जैन लोकांनीं बराच काल अगोदर कृष्णोपासना आपल्या धर्मांत अंतर्भूत केली व आपल्या आख्यायिकात्मक वाङ्मयामध्यें कृष्णकथाहि गुंफून टाकली. द्वारावती नगराचा नाश व कृष्ण निर्याण याबद्दलच्या कथा जैनांच्या अंगांतच आढळून येतात. परंतु देवेंद्राच्या "उत्तरज्झयना" वरील टीकेंत ही कृष्णकथा पुष्कळ विस्तारानें आली आहे. त्याचप्रमाणें गंगावतरण व सगरांच्या ६०००० पुत्रांचें दहन ह्या भारतीय इतिहासांतील कथा ह्याच टीकेंत आल्या आहेत. जैनांनां ह्या कथेचें महत्त्व ह्या दृष्टीनें वाटलें असावें कीं, ऐहिक वस्तूंच्या विनाशित्वाबद्दल पवित्र विचारांनीं भरलेलीं सांत्वनपर संभाषणें घालण्याची संधि त्यांनां ह्या कथानकांत ६०००० सगरपुत्रांच्या विनाशाच्या संबंधांत मिळाली. शिवाय कर्मतत्त्वाप्रमाणें सगरपुत्रांचा मृत्यु जैनतत्त्वज्ञानास मान्यच आहे. ह्याच निमित्तानें एक सांत्वनपर गोष्ट आली आहे व ही गोष्ट "किसागोतमी व मोहरीचें बीं" ह्या सुप्रसिद्ध बौद्ध गोष्टीचें रूपांतरच आहे. देवेंद्रानें आपल्या टीकेंत सांगितलेल्या "पच्चेकबुद्ध" कथासंबंधीं जर सामग्र्यानें विचार केला तर जैनांनां बौद्धवाङ्मयाची माहिती असावी ही गोष्ट सिद्ध होते. ह्यापैकीं चौथ्या राजर्षीच्या म्हणजे "नूगई" नांवाच्या राजाच्या कथेमध्यें कणयमंजरीचें कथानक आलें आहे. देवेंद्रानें वर्णन केलेल्या कथानकामधील अत्यंत चित्तवेधक असें कथानक मूळदेव नामक ऐंद्रजालिक व देवदत्ता नामक वारांगना हिचें आहे. मूळदेव ह्या नांवाची खरी व्यक्ति होऊन गेली असावी व हा "कामशास्त्र" नामक एखाद्या ग्रंथाचा कर्ता असावा. ह्या मूळदेवाच्या संबंधानें "मंडीय" नांवाच्या एका भामटयाची मनोवेधक गोष्ट आहे. मंडीय हा दिवसा भिक्षेकऱ्याच्या वेषांत लोकांचीं दयार्द्र अंतःकरणें वेधतो व रात्रीं खुनी, दरोडेखोर व अट्टल घरफोड्या बनून सबंध नगर भीतिग्रस्त करतो असें ह्याचें वर्णन आहे. अगलदत्त याचें गद्यकथानक देखील चोरांच्या गोष्टीपैकींच आहे, व ह्याचा प्राचीन पद्यमय तर्जुमा देवेंद्रगणि याच्या टीकेंतच आढळून येतो. हरिभद्राच्या टीकामध्येंहि पुष्कळ मनोरंजक कथा आढळतात. उदाहरणार्थ, "आवश्यक" कथांमध्यें, प्रत्येक पदार्थांतील फक्त चांगुलपणाच पाहणाऱ्या वासुदेवाची चित्ताकर्षक दंतकथा आली आहे.

एका देवतेनें कुत्र्याच्या एका मृत शवाचें स्वरूप धारण केलें व सुंदर दांत असलेलें तें शव रस्त्यांत पडून राहिलें. त्या मृतशरीराकडे पाहतांच किळस येऊन वाटेनें जाणारे लोक मार्ग सरत. नंतर वासुदेव सहज जात असतांना शांतपणें उद्गार काढतोः– "अहाहा! या कुत्र्याचे शुभ्र दांत किती सुंदर व चकचकीत आहेत."

ह्यानंतर स्वतंत्र ग्रंथ म्हणून प्रसिद्ध असलेल्या कांहीं थोडया कथानकाकडे वळूं. ह्यापैकीं एक "कालकाचार्य कथानक" नांवाचें असून तें गद्य व पद्य अशा भिन्न रचनेचें आहे. हें एका जैन साधूचें चरित्र असून सर्व जैन मठवासी कल्पसूत्राशेवटीं ह्याचा पाठ करतात. कालक नांवाचा राजपुत्र राज्यैश्वर्य सोडून जैन धर्म स्वीकारतो व शेवटीं ह्या जैनांचा मुख्य पुढारी होतो. त्याची धाकटी बहीण सरस्वती नांवाची मठवासिनी हिला उज्जयिनीचा राजा गर्दभिल्ल हा जबरदस्तीनें आपल्या अंतःपुरांत प्रविष्ट करतो. पुढें कालक हा वेडयाचें सोंग घेऊन उज्जयिनीच्या प्रजाजनांचीं मनें राजाविरुद्ध चेतवितो, व शककुलाचा राजा शाहिस याला गर्दभिल्ल राजाशीं युद्ध करावयास लावून उज्जयिनी त्यांजकडून काबीज करवितो. ह्या कथानकास कांहीं तरी ऐतिहासिक आधार असणें संभवनीय आहे. तथापि ह्या छोटया ग्रंथाचा कर्ता कोण व काल कोणता ह्याविषयीं फारच थोडी माहिती सांपडते. ह्यापैकीं कथानकाची भाषा जरी अत्यंत साधी असली तरी वरीचशीं वर्णनें काव्यमय ठराविक भाषेंत आहेत.

'उत्तमचरित्रकथानक' ही एक आश्चर्यकारक धाडसांची रेलचेल असलेली कल्पित कथा होय. हें कथानक लिहिणाऱ्या लेखकाचा उद्देश लोकांची कल्पित कथाविषयक जिज्ञासा पूर्ण करण्याचा व अप्रत्यक्षपणें जैनसंप्रदायाचें शिक्षण देण्याचा होता ही गोष्ट ह्या कथानकांत जागजागीं दिसून येणाऱ्या जैनसंप्रदायासंबंधीं उल्लेखावरून स्पष्ट दिसून येते.

जिनकीर्तिसूरि ह्यानें १५ व्या शतकाच्या मध्याच्या सुमारास "चंपकश्रेष्ठिकथानक" नांवाची काल्पनिक कथा

लिहिली. ह्या कथेमध्यें एका विचित्र पत्राच्या अदलाबदलीनें मृत्यूच्या जबड्यांतून सुरक्षित राहिलेल्या भाग्यशाली मुलाची गोष्ट आली आहे. अर्थात् ह्या ठिकाणीं तीन निरनिराळीं कथानकें एकत्रित केलीं आहेत. ह्यापैकीं पहिलें पोटकथानक व्यर्थ दैवास तुच्छ मानणाऱ्या रावणाचें आहे. तिसऱ्या पोटकथेंतहि कमी विनोद नाहीं. एक व्यापारी भेटणाऱ्या प्रत्येक मनुष्यास फसवितो परंतु सरते शेवटीं त्या ठकासहि महाठक अशी एक वेश्या भेटते व त्या व्यापाऱ्यास चांगलाच लुबाडते असा या गोष्टीचा सारांश आहे. ह्याच जिनकीर्तिसूरीनें "पालगोपालकथानक" नांवाची एक जैन आख्यायिका लिहिली आहे. हिजमध्यें सर्व प्रकारच्या कादंबरीवजा व कल्पित कथावजा मनोरम गोष्टींचा संग्रह आहे. उदाहरणार्थ एका गोष्टींत दोन बंधू प्रवासास निघतात व पुष्कळशीं साहसाचीं कृत्यें करून बहुमान व कीर्ति संपादन करतात असें वर्णन आहे. दुसऱ्या कित्येक गोष्टी उपकारक व सहाय्यभूत प्राण्यांच्या आहेत. एका गोष्टींत एक स्त्री एका पवित्र तरुणास व्यभिचार करण्यास प्रवृत्त करते परंतु जेव्हां तिचा हेतु सफळ होत नाहीं तेव्हां ही त्याजवर बलात्काराचा आरोप करते असें वर्णन आहे.

यानंतर जैनांनीं बरेच कथासंग्रह तयार केले व त्यांमध्यें नेहमीच्या भारतीय पद्धतीप्रमाणें सर्व गोष्टी एके ठिकाणीं गुळविल्या आहेत, किंवा नुसत्या एका मागून एक सांगितल्या आहेत. त्यांपैकीं कोणातरी अप्रसिद्ध ग्रंथकाराचा "सम्यक्त्वकौमुदी" हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. हा कथासंग्रह जैन संप्रदायासंबंधीं असून त्यामध्यें अर्हद्देव नांवाच्या व्यापाऱ्यानें आपल्या आठ स्त्रियांस व त्या स्त्रियांनीं उलट अर्हद्देवास, आपापल्या रितीनें सम्यक्त्व कसें प्राप्त करून घेतलें ह्यासंबंधीं गोष्टी दिल्या आहेत. त्याचवेळीं रात्रीं प्रधानासह फिरणारा राजा व एक चोर ह्या कथा ऐकतो व ह्या ठिकाणीं आपणांस अरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टींची, त्याचप्रमाणें सिंदबाद व्यापाऱ्याच्या कथानकांची आठवण होते. विशेषतः आपल्या विश्वासू कामगारास गोत्यांत घालण्याकरितां रात्रीं गुप्तपणें खजिन्यांत शिरणाऱ्या परंतु सात दिवस सात गोष्टी सांगून व न ऐकल्यामुळें त्याचें स्वरूप उघडें करून चोर म्हणून ठरलेल्या व म्हणून लोकांनीं पदच्युत केलेल्या सुयोधन नांवाच्या राजाच्या कथेचें जातककथेंतील ४३२ व्या गोष्टीशीं बरेंच साम्य आढळतें.

'कथाकोश' नांवाच्या एका अज्ञात ग्रंथकाराचा कथासंग्रह हा एक विश्ववाङ्मयाचा भाग म्हणतां येईल. ह्या कथांची भाषा गचाळ संस्कृत असून त्यामध्यें प्राकृत श्लोक आहेत. सबंध ग्रंथांत जैनांची सांप्रदायिक दृष्टि स्पष्टपणें आढळते. उदाहरणार्थ आश्चर्यकारक साहसांनीं परिपूर्ण अशा एका समुद्रपर्यटणविषयक गोष्टीचें जैनांच्या धर्मकथेंत रूपांतर झालें आहे. त्याचप्रमाणें नलदमयंतीच्या आख्यानांतील शेवटचा भाग महाभारतांतील नलोपाख्यानास पुरवणीदाखल जैनांनीं जोडला परंतु हा प्रयत्न सफळ झाल्याचें दिसत नाहीं. ह्यापैकीं कांहीं कथा अत्यंत बेचव व मूर्खपणाच्या प्रदर्शक असून कांहीं मात्र "सुंदरवनिका" ह्या गोष्टीप्रमाणें उत्कृष्ट कल्पनासृष्टीचे नमुने आहेत.

"सुंदरवनिका ही एक कुमारिका असून तिची एक सावत्र आई होती. ती सुंदरवनिकेस वाटतील तीं जडजड कामें करण्यास सांगत असे. एकदां ती गाई कुरणांत चरण्यास सोडून स्वस्थ बसली असतां तिला झोंप लागली. इतक्यांत एका कृष्णसर्पाच्या चाहुलीमुळें ती जागी झाली व इकडे तिकडे पाहते तोंच तो कृष्णसर्प मांत्रिकाच्या तावडींतून आपलें संरक्षण करण्याबद्दल तिची याचना करूं लागला. अर्थात् ती कुमारिका त्या सर्पाचें संरक्षण करते, व तदनंतर तो सर्प कांहीं तरी इच्छित वस्तू मागण्याविषयीं तिची आर्जव करतो. त्यावर ती कुमारिका म्हणते कीं "गाई राखतांना उन्हाचा त्रास न व्हावा म्हणून माझ्या मस्तकावर थोडी छाया कर." हें ऐकून तो सर्प मंत्रसामर्थ्यानें एक सुंदर उपवन निर्माण करतो व ती कुमारिका जिकडे जाते तिकडे तिच्याबरोबर तें उपवन असतेंच. अशा ह्या सुंदर जादूच्या बागेंत ती बसली असतां तिला राजा पाहतो व प्रेमवश होऊन तिला आपली पट्टराणी करतो. परंतु ह्या सुंदरवनिकेच्या सावत्र आईची आपल्या सख्ख्या मुलीचें राजाबरोबर लग्न व्हावें म्हणून इच्छा असल्यामुळें ती त्या सावत्र मुलीचा नाश करण्याकरितां कित्येक युक्त्या योजते, परंतु पूर्वीचा कृष्णसर्प सुंदरवनिकेस वारंवार संकटांतून सोडवितो."

इतर भारतीय कथाग्रंथांप्रमाणें ह्या पुस्तकांतहि कित्येक सुभाषितें घातलीं आहेत. उदाहरणार्थ, लालयेत्पंचवर्षाणि दशवर्षाणि ताडयेत् । प्राप्ते तु षोडशे वर्षे पुत्रे मित्रवदाचरेत् ॥ अशा प्रकारचेहि कित्येक श्लोक आहेत.

याखेरीज शुभशीलगणि या ग्रंथकारानें केलेला एक कथाकोश आहे व याच ग्रंथकारानें १४६५ सालीं सुमारें ५००वर कथांचा 'पंचशतिप्रबोधसंबंध' नामक एक संग्रह केला आहे. याखेरीज राजशेखरकृत 'अंतरकथासंग्रह', सोमचंद्रकृत 'कथामहोदधि' ( १४४८ ), हेमविजयकृत 'कथारत्नाकर' ( १६००-१ ) वगैरे बारीक बारीक संग्रह आहेत.

याशिवाय 'चरित्रें' व 'प्रबंध' इत्यादि स्वरूपाचें अवांतर पुष्कळ कथास्वरूपाचें काव्यवाङ्मय आहे. यांपैकीं पहिल्या प्रकारांत तीर्थंकर किंवा जिन, चक्रवर्ती राजे व इतिहासपूर्व कालांतील ऋषी यांचे जीवनेतिहास दिले असून प्रबंधामध्यें इतिहासकाळांतील जैन मुनी व साधू यांचीं चरित्रें वर्णन केलीं आहेत. या दोन्ही प्रकारच्या वाङ्मयाचें ध्येय सन्मार्गनिष्ठेची वृद्धि करणें हें होय. एकंदर जैनसंप्रदायाचें महत्त्व स्थापन करणें, जैन उपदेशकांना प्रवचनाकरितां सामुग्री पुरविणें व अशा रीतीनें श्रोतृवर्गाचें मनोरंजन करणें हें या जैन वाङ्मयाचें उद्दिष्ट आहे. यामुळें प्रबंध ग्रंथामध्यें जरी ऐतिहासिक व्यक्तींची माहिती येत असली तरी तीमध्यें दंतकथा

वगैरे अवांतर काल्पनिक गोष्टींचा संग्रह केलेला दिसतो. चरित्रांमध्ये कांहीं ग्रंथ जैनसाधूंचीं वैयक्तिक चरित्रें वर्णन करणारीं आहेत व कांहींमध्ये अनेक जैन तीर्थंकरांचीं चरित्रें एकामागून एक वर्णन केलीं आहेत. हेमचंद्र या जैन साधूनें लिहिलेला 'त्रिषष्टिशलाकापुरुषचरित' हा ग्रंथ चरित्रांपैकीं एक आहे.

हेमचंद्र यानें अनेक विषयांवर महान् महान् ग्रंथ लिहिले. तो एक मोठा पंडित असून शिवाय कवि होता. गुर्जरदेश हा जैनांचें केंद्रस्थान झाल्याबद्दलचें सर्व श्रेय हेमचंद्रासच दिलें पाहिजे. तथापि त्यानें ग्रंथरचना करून केवळ ग्रंथवाङ्मयांतच भर घातली नाहीं तर आपल्या धर्मबंधूंनां व्याकरणशास्त्र, कोशरचना, काव्यशास्त्र व छंदःशास्त्र यांसारखीं शास्त्रें परिचित व्हावींत म्हणून या शास्त्रांवरहि ग्रंथरचना केली व त्यामुळें त्याला 'कलिकालसर्वज्ञ' हें नामाभिधान प्राप्त झालें.कुमारपालराजाच्या कारकीर्दींत हेमचंद्रानें 'त्रिषष्टिशलाकापुरुष चरित' या सुप्रसिद्ध ग्रंथाची रचना केली. हेमचंद्र ११७२ सालीं मृत झाला. वरील ग्रंथाचीं दहा पर्वें असून त्यांमध्ये चोवीस जैनांचे तीर्थंकर, बारा चक्रवर्ती, नऊ वासुदेव, नऊ बलदेव, नऊ विष्णुद्वेषी यांच्या कथा आहेत. ह्या ग्रंथास हेमचंद्र यानें स्वतःच "महाकाव्य" म्हटलें आहे व विस्ताराच्या दृष्टीनें पाहतां महाभारताप्रमाणें ह्या काव्यासहि हें नांव सार्थ आहे. परंतु ह्या ग्रंथाची भाषा अत्यंत साधी अकृत्रिम आहे व ह्यांतील विषय तर धार्मिकवृत्तीच्या जैनांखेरीज इतर फारच थोड्या लोकांनां आवडण्यासारखे आहेत. तथापि या महाकाव्याच्या दहाव्या पर्वास एक विशिष्ट प्रकारचें महत्त्व प्राप्त झालें आहे. कांहीं हस्तलिखित प्रतींमध्ये या पर्वास महावीरचरित्र हें स्वतंत्र नांव देण्यांत आलें आहे.परंतु या पर्वाचें मुख्य महत्त्व महावीराच्या चरित्रकथेमुळें नसून त्यामध्ये ग्रंथकारानें आपल्या स्वतःच्या चरित्राविषयीं सूचित केलेल्या माहितीकरितां आहे. वाङ्मयेतिहासाच्या दृष्टीनें या सबंध महाकाव्यास फारसें महत्त्व नसून त्याला शेवटीं जोडण्यांत आलेलें परिशिष्टपर्व किंवा स्थविरावलीचरित या भागास आहे. या भागामध्ये जैन संप्रदायांतील 'दहापूर्विशी' या मूळधर्मग्रंथांचें ज्ञान असलेल्या अतिप्राचीन दहा जैन धर्मोपदेशकांच्या चरित्रकथा आल्या आहेत. या ठिकाणीं एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं हेमचंद्रकृत 'त्रिषष्टिशलाकापुरुषचरित' या महाकाव्यामध्ये ज्या महाविभूतींचे जीवनेतिहास वर्णन केले आहेत त्यांपैकीं पार्श्वनाथ व महावीर या दोन ऐतिहासिक व्यक्तींस वगळलें असतां बाकीचे बहुतेक तीर्थंकर काल्पनिक किंवा दैवतकथास्वरूपाचे दिसतात. परंतु याच्या उलट स्थविरावलीचरितामध्ये या दहा स्थविरांचीं चरित्रवर्णनें आलीं आहेत. त्यांवरून ह्या व्यक्ती ऐतिहासिक असून महावीराचे साक्षात शिष्य होत; ह्या श्वेतांबर जैनांच्या परंपराप्राप्त सर्वमान्य माहितीस दुजोरा मिळतो. आतां ही गोष्ट मात्र खरी आहे कीं, ह्या ऐतिहासिक व्यक्तीं संबंधानें वर्णन केलेल्या आख्यायिकांनां फारच थोडा ऐतिहासिक आधार सांपडेल. हेमचंद्रानें जुन्या टीकाग्रंथांवरून विशेषतः हरिभद्राच्या टीकांवरून वरील आख्यायिका आपल्या ग्रंथांत घेतल्या असाव्यात. ह्या गोष्टींमध्ये आलेल्या विनोदी सुभाषितांवरून व लौकिक उपमारूपकादि अलंकारांवरून त्यांचा लौकिक वाङ्मयामध्ये उद्‌भव झाला असावा हें स्पष्ट दिसून येतें. हेमचंद्रानें फारसे फेरबदल न करतां ह्या आख्यायिका प्राकृतामधून भाषांतर करून घेतल्या.

परिशिष्टपर्वामध्ये अशा पुष्कळ कथा आहेत कीं, ज्यांच्या अनेक प्रतिकृती सर्वसामान्य भारतीय वाङ्मयांत इतकेंच नव्हे तर सर्व जगाच्या वाङ्मयांत आढळून येतात. त्यांपैकीं कुबेरसेनानामक वारांगनेच्या कुबेरदत्त व कुबेरदत्ता ह्या दोन जुळया मुलांची गोष्ट ग्रीक वाङ्मयांतील ओडिपस् नांवाच्या शोकपर्यवसायी कथानकाची प्रतिकृति वाटते. ह्या ग्रंथांत सेंट ग्रेगरी ह्या ख्रिस्ती साधूच्या आख्यायिकेपेक्षां नकळत घडलेल्या व्यभिचाराच्या जुन्या विषयास धरून एक धार्मिक जैन आख्यायिका बनविण्यांत आली आहे. फरक येवढाच कीं, आपल्या भारतीय कथानिवेदकानें त्या गोष्टींतील शोकरसोत्पादक अंशाकडे लक्ष न देतां त्यांतील गुंतागुंतीचा परस्परसंबंध वर्णन करण्याकडे जास्त लक्ष दिलें आहे. कारण ज्यावेळीं एखादा जैनधर्मोपदेशक धार्मिक आख्यायिका लिहूं लागतो त्यावेळीं स्त्रीजातीचा दुष्टपणा हा विषय घेऊन वैवाहिक नियमांचें उल्लंघन केलेल्या स्त्री-पुरुषांचीं अनेक सूक्ष्म कथानकें त्याला लिहितां येतात. अशा प्रकारच्या बऱ्याच आख्यायिका परिशिष्टपर्वामध्ये आहेत. स्थूलभद्र व कोपा नांवाची जैन भिक्षुणी यांचेंहि कथानक नमुनेदार आहे.

"तीन जैन धर्मोपदेशकांनीं आपल्या गुरूसमोर तीन निराळीं व्रतें स्वीकारलीं. त्यांपैकीं पहिल्या धर्मोपदेशकानें वर्षाऋतूच्या चार महिनेपर्यंत सिंहाच्या गुहेशेजारीं बसून दिवस काढण्याचें ठरविलें. दुसऱ्यानें चातुर्मासपर्यंत अत्यंत विषारी दृष्टीच्या सर्पाच्या बिळाच्या तोंडाशीं बसावयाचें ठरविलें व तिसऱ्यानें चातुर्मासपर्यंत विहिरीच्या रहाटगाडग्यावर बसण्याचें ठरविलें. इतक्यांत स्थूलभद्र येतो व तो वैराग्यवृत्ति धारण करण्याच्या अगोदर ज्या कोपानामक वारांगनेचा प्रियकर असतो तिच्याच घरीं आपलें पावित्र्य ढळूं न देतां चातुर्मास काढण्याचें व्रत जाहीर करितो. ह्या दुष्कर व्रतांतून स्थूलभद्र मात्र पार पडतो. इतकेंच नव्हे तर ती कोपानामक वेश्याहि जैनधर्म स्वीकारते. चतुर्मासाच्या शेवटीं तीन शिष्य आपल्या गुरूकडे जातात व गुरु त्यास म्हणतो कीं सर्वांत स्थूलभद्रानें अत्यंत खडतर व्रतांतून जय मिळविला. हें ऐकून इतर शिष्यांच्या मनांत मत्सर उत्पन्न होतो व त्यांपैकीं सिंहाच्या गुहेशेजारीं बसून व्रतपूर्तता करणारा शिष्य स्थूलभद्राप्रमाणेंच आपणहि व्रत पूर्ण करून दाखवितों अशी पैज मारतो. त्यानंतर तोहि स्थूलभद्राप्रमाणें

कोषा हिच्या घरीं जातो. परंतु कोषा जेव्हां त्यास मोह पाडण्याचा प्रयत्न करते तेव्हां तोहि मोहून जातो. पुढें कोषा स्वतःच त्याच्या डोळ्यांत अंजन घालते व शेवटीं ती स्वतः जैन मठवासिनी होते."

ह्या प्रकारच्या गोष्टींखेरीज ऐतिहासिक किंवा चरित्रवर्णनपर अशा दुसऱ्या पुष्कळ जैन दंतकथा आहेत. उदाहरणार्थ ५ व्या पुस्तकांत सयंभव यानें सहा महिन्यांच्या अवधीमध्यें आपला पुत्र मृत होणार हें भविष्य जाणून इतक्या थोड्या अवधींत इतर धर्मग्रंथ न वाचतां जैनतत्त्वज्ञान प्राप्त व्हावें ह्या उद्देशानें 'दशवैकालिकसूत्र' ह्या धर्मग्रंथाची रचना कशी केली याबद्दल वर्णन आहे. नवव्या आणि तेराव्या पुस्तकांतील दंतकथाहि धर्मशास्त्राच्या संहितीकरणालाच अनलक्षून आहेत. आठव्या पुस्तकांतील नंद ह्या राजघराण्यासंबंधींच्या कथा इतिहासदृष्ट्या थोड्या उपयोगाच्या आहेत तथापि दंतकथांमध्यें प्रत्यक्ष ऐतिहासिक माहिती फार थोडी दिसून येते. नंदवंशांतील शेवटच्या राजाचा मौर्यवंशस्थापक चंद्रगुप्त ह्यानें पराभव केला (इ. स. पूर्व ३२६) ही गोष्ट इतिहासदृष्ट्या खरी आहे, परंतु ह्या ग्रंथांतील दंतकथेप्रमाणें चंद्रगुप्त आपल्या आईच्या बाजूनें अत्यंत हीन कुलांत जन्मला असल्याकारणानें त्यानें चाणक्य नामक ब्राह्मणास आपला मंत्री करून त्याच्या साहाय्यानें राज्यपद प्राप्त करून घेतलें. चाणक्याविषयींहि बऱ्याच लौकिक आख्यायिका प्रचलित होत्या आणि हेमचंद्रानें देखील, ह्या गोष्टी जरी धार्मिक वृत्तीच्या जैनांस आदर्शभूत नव्हत्या तरीहि त्यांजकडे दुर्लक्ष्य केलें नाहीं. व लौकिक कथावाङ्मयांतील प्रत्येक नायकावर आपल्या जैन संप्रदायाचा छाप मारण्यास सोडलें नाहीं. तथापि चाणाक्यासारख्या धूर्त, राजनीतिकुशल, आणि निधड्या छातीच्या व्यक्तींच्या बाबतींत वरील प्रकार दिसून येत नाहीं. यावरून चंद्रगुप्त ह्याची वस्तुतः जैनधर्माबद्दल सहानुभूति होती, या आख्यायिकेवर विश्वास ठेवण्याचा मोह पडतो; आणि ह्या कारणामुळेंच जैनांनीं चंद्रगुप्त व चाणक्य ह्यांची स्तुति केली असावी. हेमचंद्रास मात्र राज्याच्या उलाढाली करणाऱ्या ह्या पुरुषाचें धार्मिक जैन साधूमध्यें रूपांतर कसें करावें ही गोष्ट अवगत होती. त्यानें असें वर्णन केलें आहे कीं, चाणक्यानें मृत्यूपूर्वी आपल्या शत्रूचा सूड घेतला व आपला अंतकाल नजीक प्राप्त झाला आहे असें जाणून खऱ्या जैनसाधूप्रमाणें व्रतें व उपोषणें करून मृत्यु प्राप्त व्हावा ह्या हेतूनें त्यानें मलयुक्त उकिरड्याचा आश्रय केला. परंतु त्याच्या एक प्रतिस्पर्ध्यानें उकिरड्यास अग्नि लावल्यानें चाणक्य नकळत जळून जातो व मृत्यूनंतर त्यास देवतास्वरूप प्राप्त होतें.

ह्या प्रकारच्या ऐतिहासिक राजांच्या व राजकीय व्यक्तींच्या, त्याचप्रमाणें संप्रदायेतिहासांतील महत्त्वाच्या व्यक्तींच्या कथा कितीहि काल्पनिक असल्या तरी त्यांमध्यें इतिहासदृष्ट्या थोडाबहुत मजा आहेच. प्रत्यक्ष कांहीं मूळ धर्मशास्त्रविषयक ग्रंथांमध्यें देखील महावीर व त्याचे पहिले शिष्य यासंबंधीं माहिती आढळते. त्याचप्रमाणें भद्रबाहूच्या कल्पसूत्रामध्यें स्थविर, त्यांचीं मतें व पोटभेद यासंबंधीं यादीवार माहिती आढळते. मागाहूनच्या शतकांतील अशा पुष्कळ 'पट्टावल्या' उपलब्ध आहेत. हरिभद्र व शांतिसूरि ह्यांच्या टीकाग्रंथांमध्यें जैनांतील पोटपंथांसंबंधीं कांहीं अंशानें ऐतिहासिक अशा दंतकथा सांपडतात. धर्मसागरकृत गुर्वावली सूत्र व मेरुतुंगकृत थेरावली ह्यासारख्या ग्रंथांमध्यें फक्त धर्मसंप्रदायाचा इतिहास सांपडतो.

प्रभाचंद्र व प्रद्युम्नसूरि ह्यांनीं इ.स. १२५० मध्यें लिहिलेलें "प्रभावकचरित" हें हेमचंद्राच्या परिशिष्टपर्वास पुरणी म्हणून शोभण्यासारखें आहे. ह्यामध्यें हेमचंद्रासकट २३ जैन उपदेशकांच्या चरित्रकथा आहेत.

इ. स. १३०६ मध्यें मेरुतुंगानें पूर्ण केलेल्या "प्रबंधचिंतामणी" व १३४९ मध्यें राजशेखरानें रचलेला 'प्रबंधकोष" हे कांहींसे ऐतिहासिक स्वरूपाचे चरित्रात्मक ग्रंथ होत. यांपैकीं मेरुतुंगकृत प्रबंधचिंतामणीमध्यें ऐतिहासिक व वाङ्मयप्रसिद्ध अशा अनेक अप्रसिद्ध व्यक्तींबद्दल वरवर दिसण्यांत ऐतिहासिक स्वरूपाच्या अशा अनेक दंतकथा व काल्पनिक गोष्टी यांचा संग्रह केला आहे. ह्या ग्रंथांत भोज, विक्रमादित्य व शिलादित्य ह्यांचें, नामांकित कवी व विद्वान पंडित यांचे आश्रयदाते ह्या दृष्टीनें ऐश्वर्य वर्णन केलें आहे आणि कालविपर्यासाच्या बाबतींत तर ह्या ग्रंथांमध्यें मोठी मौज सांपडते. उदाहरणार्थ इ. स. ६ व्या शतकांतील सुप्रसिद्ध ज्योतिषशास्त्रज्ञ वराहमिहिर हा ख्रिस्तपूर्व चवथ्या शतकांत होऊन नंदराजाशीं समकालीन असल्याबद्दलचें उत्तम वर्णन या ग्रंथांमध्यें आढळतें. बऱ्याच खुल्या अंतःकरणानें सांगितलेल्या छोट्या छोट्या गोष्टींमध्यें पुष्कळ विनोदपूर्ण कोटिक्रमयुक्त प्रसंग आढळून येतात. तत्कालीन हिंदी राजेरजवाड्यांच्या दरबारांतील चालीरीती, विशेषतः राजसभांतून होणारे खडाजंगी वाङ्मयात्मक वादविवाद यांसंबंधीं या ग्रंथांत हुबेहुब वर्णन केलेलें सांपडतें. त्याचप्रमाणें या ग्रंथकारापूर्वीच होऊन गेलेल्या हेमचंद्र व कुमारपाल या दोघा पुरुषांविषयीं या ग्रंथांत आलेली माहिती इतिहासदृष्ट्या अत्यंत महत्त्वाची आहे. राजशेखरकृत 'प्रबंधकोषा' मध्यें हेमचंद्रासहित दहा जैन धर्मोपदेशक, श्रीहर्ष, हरिहर, अमरचंद्र व दिगंबरमदनकीर्ति हे चार कवी, सात राजे व इतर तीन व्यक्ती मिळून एकंदर चोवीस व्यक्तींचे जीवनेतिहास वर्णन केले आहेत.

ह्या प्रकारच्या चरित्रग्रंथांना दिगंबर जैन "पुराणें" ही संज्ञा देतात. उदाहरणार्थ विमलसूरिकृत 'पद्मचरित' किंवा "पद्मपुराण" नांवाचा एक जैन ग्रंथ प्राकृत भाषेंत लिहिलेला प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें रविसेन नामक ग्रंथकारानें संस्कृत भाषेंतहि एक पद्मपुराण रचिलें आहे. जैनांचा दुसरा

एक महापुराण नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. या ग्रंथाचा प्रथम भाग जिनसेन यानें रचिलेलें आदिपुराण हा होय ( पहा ) व दुसरा भाग म्हणजे उत्तरपुराण हा जिनसेनाचा शिष्य गुणभद्र यानें रचिला. इ. स. ७८४ मध्यें लिहून झालेल्या हरिवंशपुराण या ग्रंथाचा कर्ता हा जिनसेनच होय. आदि-पुराणामध्यें पहिला तीर्थंकर जो ऋषभ याचें चरित्र वर्णन केलें आहे. परंतु याखेरीज ब्राह्मणी पुराणग्रंथांप्रमाणें इतर सर्व प्रकारच्या विधिनियमांचें या ग्रंथांत वर्णन आहे. उत्तर पुराणामध्यें राहिलेल्या तीर्थंकरांचे जीवनेतिहास वर्णिले आहेत. शत्रुंजयमाहात्म्य हा ग्रंथ पुराणांतील इतर माहात्म्य-ग्रंथांच्या पद्धतींत लिहिला आहे. त्यामध्यें शत्रुंजय ह्या जैनांच्या पवित्र गिरिस्थानाचें श्रेष्ठत्व वर्णिलें आहे. ह्या काव्य-स्वरूप ग्रंथाचे चौदा सर्ग असून त्यांमध्यें जैनांच्या व ब्राह्म-णांच्या पुष्कळ दंतकथा विपर्यस्त स्वरूपांत रचलेल्या आढ-ळून येतात.

जैन वाङ्मयामध्यें धर्मोपदेशात्मक ग्रंथ व काव्यग्रंथ यांमधील मर्यादादर्शक रेषा ठरविणें मोठें कठिण आहे. वर सांगितलेंच आहे कीं, हेमचंद्र आपल्या आख्यायिकात्मक ग्रंथांस महाकाव्य ही संज्ञा देतो. ह्या ग्रंथांमध्यें बऱ्याच महाकाव्यांचे उल्लेख आले आहेत व हीं काव्यें एकसमया-वच्छेदेंकरून काव्यचातुर्याचें व उपदेशात्मक वाङ्मयाचे आदर्श म्हणून गणले जातील.

हरिभद्राची ' समराइच्चकहा ' ही एक प्राकृत भाषेंतील लिहिलेली गद्यकथा असून मध्यंतरीं तिच्यामध्यें अनेक गाथावृत्तांतील श्लोक रचिले आहेत. ह्याच नमुन्यावर धण-वाल ह्यानें ' भविसाहकहा ' नांवाचें अपभ्रष्ट भाषेंत एक काल्पनिक काव्य रचिलें. ह्या काव्यांतील मूळचा भाग म्हणजे एक कल्पित कथा असून ह्या कथेंतील धाडसी नायक एका ओसाड नगरांत प्रवेश करितो आणि शेवटीं एका राजकन्येबरोबर विवाह करितो. दुसऱ्या भागांमध्यें महाभा-रत व रामायण ह्यांच्या पद्धतीवर युद्धांचीं वर्णनें दिलीं आहेत; व तिसऱ्या भागांत जैनकथांच्या नेहमींच्या पद्धती-प्रमाणें मुख्य मुख्य व्यक्तींच्या पूर्वजन्मांतील माहितीच्या अनेक आख्यायिका सांगितल्या आहेत. इ. स. ९०६ मध्यें होऊन गेलेल्या जैन कवींपैकीं अत्यंत सुप्रसिद्ध असा जो सिद्ध-राज नामक कवि ह्याजवर हरिभद्राच्या ग्रंथांचा बराच परि-णाम झालेला दिसून येतो. सिद्धराजाचा ' उपमितिभाव-प्रपंचकथा ' ह्या नांवाचा कथाग्रंथ प्रसिद्ध असून त्यामध्यें मानवी जीवितांचें रूपकपूर्ण वर्णन केलें आहे.

सदरहू ग्रंथ ही गद्यस्वरूपांत लिहिलेली कथा असून तींत मध्यंतरीं लहान मोठे श्लोक घातले आहेत. कांहीं अंश संवादरूपानें व कांहीं अंश कथानकस्वरूपांत अशा रीतीनें जैनसंप्रदायाप्रमाणें मानवी जीवित कसें स्वरूपाचें असतें ह्याचें रूपकपूर्णवर्णन कवीनें ह्या ग्रंथांत उत्तम केलें आहे व त्यावरून पापाचरणानें बिघडलेल्या मनुष्याकडून जैनधर्माचा स्वीकार करविणें कसें शक्य आहे हें दाखविलें आहे. एकंदर कथानक खूप लांबलचक व कंटाळवाणें आहे. प्रस्तावनेच्या शेवटीं सर्व रूपकाचा थोडक्यांत उलगडा करून दिला आहे.

हें कथानक ज्या ठिकाणीं घडून आलें तें ठिकाण म्हणजे अनादि संसाराचें रूपक असें प्रारंभ आणि शेवट असलेलें नगर होय. त्या नगरांतील ' सद्गुणशून ' भिकारी म्हणजे आपला आत्मा असून त्याजवर नानाप्रकारचीं संकटें येतात व त्याजवर विद्युताघात होत असतात. त्या भिकाऱ्याचें मृण्मय भिक्षापात्र म्हणजे आत्म्याचे गुणदोष ज्या ठिकाणीं एकत्र सांठविले जातात असें मानवशरीर होय. ह्या कथेंतील मूर्ख लोक म्हणजे परसांप्रदायिक होत, दुःख हें आत्म्याचें पापा-चरण हें होय, आणि व्याधी म्हणजे विषय होत. त्याचप्रमाणें राजा ' अचल ' म्हणजे सर्वज्ञ प्रभुजिन असून जैन तत्त्वज्ञान हा त्याचा राजवाडा होय. राज-पुत्र म्हणजे जैन उपदेशक असून अमात्य हे त्यांच्या हाता-खालचे जैन उपाध्याय होत. स्वयंपाकी म्हणजे मनुष्य प्राण्यांमध्यें धर्मतत्त्वरवीचा प्रकाश उत्पन्न करणारा पूज्य सूर्य होय, वगैरे वगैरे.

ह्या काव्याच्या उत्पत्तीनंतर शंभर वर्षांनीं त्याच्या संबंधीं अनेक उल्लेख, त्यांतील कित्येक उतारे व कांहीं कथाभाग दुसऱ्या ग्रंथकारांनीं उद्धृत केले आहेत. इ. स. ९५९ मध्यें सोमदेव नांवाच्या दिगंबर जैनपंथी विद्वानानें यशस्तिलक नांवाचें चंपुप्रकाराचें काव्य रचिलें आहे. ह्या काव्याचा विषय थोडक्यांत पुढील प्रमाणें आहे—

" मारिदत्त नांवाचा राजा तरुणपणींच राज्यावर बसला व विषयसुखांत रममाण होऊन गेला. परंतु कुलगुरूनीं सांगितल्यावरून त्यानें चंडमारिदेवता ह्या आपल्या कुल-देवतेप्रीत्यर्थ एक मोठा याग करण्याचें ठरविलें व त्यांत मनुष्यासुद्धां प्रत्येक प्राण्याचें एक एक युग्म कुलदेवतेस बळी देण्याचा संकल्प केला. मारिदत्तानें यज्ञकृत्यास स्वतः सुर-वात केली व योग्य प्रसंगीं क्रमाप्रमाणें, राजसेवकानें बळी देण्याकरितां सज्ज केलेला एक तरुण जैन मठवासी पुरुष व एक मुलगी असे ओढीत आणले. त्यांनां पाहतांच राजाच्या चित्तास एकदम धक्का बसला व तो तरुण मठवासी व मठ-वासीनि मुलगी ही पूर्वी जैनधर्म स्वीकारून प्रपंचाचा त्याग केलेल्या आपल्या वहिणीचीं जुळीं मुलें असावींत असा त्यास संशय आला, व त्यांस त्याची पूर्वकथा विचारतांच खरो-खरीच तीं मुलें आपल्या आप्तेष्टांपैकीं आहेत असें त्यास कळून आलें. व अशा रीतीनें राजास त्या दोघां-कडून पूर्वजन्मांची हकिगत समजली. " ह्या प्रसंगानें जैनसंप्र-दायांतील कित्येक तत्त्वें ह्या कथानकांत गुंफलीं गेलीं आहेत. ह्या प्रसंगीं भारवि, भवभूति, भर्तृहरि, गुणाढ्य, व्यास, भास, कालिदास, बाण इत्यादि मोठमोठ्या सुप्रसिद्ध कवींचीं वचनें, ह्या कवींचें जैनसंप्रदायास अनुकूलत्व दर्शविण्याकरितां

उध्दृत केलीं आहेत. ह्याच्या शेवटच्या तीन प्रकरणांस मिळून " उपासकाध्ययन " ही संज्ञा असून त्यांची योजना सामान्य जैन लोकांची मानसिक उन्नति व्हावी ह्मणून आहे. ह्या ग्रंथाच्या शेवटीं मारिदत्त व त्याची कुलदेवता ह्यांनीं जैनसंप्रदायाचा स्वीकार केल्याचें दाखविलें आहे.

सोमदेवानें वरील काव्य रचतांना बाणाची कादंबरी आदर्शभूत धरली होती. त्याचप्रमाणें हा आदर्श पुढें ठेवून धनपालानें (इ. स. ९७० ) तिलकमंजरी नामक गद्यकाव्य लिहिलें. कादंबरीच्या नमुन्याचें आणखी एक ओडयदेव किंवा वादीभसिंह यानें रचिलेलें " गद्यचिंतामणि " नांवाचें असेंच दुसरें एक गद्यकाव्य आहे. वादीभसिंह हा दिगंबर जैन असू पुष्पसेनाचा शिष्य होय व ह्यानें केलेल्या वरील गद्यप्रबंधाचा विषय जीवक किंवा जीवनधर ह्याची कथा होय. जैन लोकांस अत्यंत आवडता असा मलयसुंदरीकथा नांवाचा गद्यप्रबंध कोणी तरी जैन साधूनें लौकिक कथानकांपैकीं एकाचें जैन स्वरूपांतर करून उद्धृत केलेला दिसतो. या ग्रंथांतील अत्यंत विलक्षण धाडसें व दैवी चमत्कार वाचतांना वाचकाचें देहभानहि विसरतें. काल्पनिककथावाङमयांत आढळून येणारे सर्व विषय ह्या गद्यप्रबंधांत गुंफले आहेत. या प्रबंधाचें कथानक थोडक्यांत असें आहे. राजपुत्र महाबल व राजकन्या मलयसुंदरी ह्यांची प्रथम अकल्पित रीतीनें गांठ पडून तीं दोघें परस्परांवर अनुरक्त होतात व पुन्हां पुन्हां गांठी पडतात. फक्त शेवटीं एकंदर कथानकास तांत्रिक अद्भुत गोष्टीप्रमाणें जैन सांप्रदायिक कथेमध्यें रूपांतर करण्याचा प्रयत्न केलेला दिसतो.

माघकविकृत शिशुपालवध काव्याचें अनुकरण करून हरिचंद्र नामक जैन कवीनें पंधरावा तीर्थंकर धर्मनाथ याच्या चरित्रकथनपर एक एकवीस सर्गाचें महाकाव्य रचलें. गुणभद्राच्या उत्तर पुराणांतील जीवनधराच्या कथेचा आधार घेऊन ह्याच दिगंबर जैनपंथी कवीनें जीवनधरचंपु लिहिला असावा. त्याचप्रमाणें नेमिनाथ नांवाच्या दुसऱ्या एका जैन साधूची कथा आधारास घेऊन वाग्भट नांवाच्या पंडितानें एक पंचदश-सर्गात्मक नेमिनिर्वाण हें महाकाव्य रचिलें. सुप्रसिद्ध वाङ्मयालंकार या अलंकारग्रंथाचा कर्ता हाच कवि असावा. साङ्गणपुत्र विक्रम ह्यानें आपल्या नेमिदूत ह्या काव्यास वरील कथानकच आधारभूत घेतलें आहे. नेमिनाथानें मठवासवृत्ति पत्करल्यानें त्याच्या राजिमति नामक पत्नीनें केलेला शोक हा या काव्याचा विषय होय. हें काव्य समस्यापूर्तीचें एक सुंदर उदाहरण असून त्यांतील प्रत्येक श्लोकाचा चौथा चरण कालिदासाच्या मेघदूत काव्यांतून घेतला असून पहिले तीन चरण मात्र स्वतः कवीनें केले आहेत. ह्याच प्रकारचा जिनसेन कवीनें लिहिलेला पार्श्वाभ्युदय नामक पार्श्वनाथाची चरित्रकथा वर्णन करणारा ह्या पूर्वीचा एक काव्यग्रंथ आहे. ह्या ग्रंथामध्यें जिनसेन यानें आपल्या प्रत्येक श्लोकांत कालिदासाच्या मेघदूत काव्यांतून एक दोन चरण घेऊन बाकीची रचना आपण केली आहे व अशा रीतीनें सबंध मेघदूत काव्य आपल्या काव्यांत अंतर्भूत केलें आहे.

ह्याखेरीज बाह्यस्वरूपतः महाकाव्यें म्हणून गणले जाणारे पुढील काव्यग्रंथ प्रसिद्ध आहेत. कनकसेन वादिराज ( १० वें शतक ) यानें रचिलेल्या यशोधरचरित काव्यांत यशोधर नांवाच्या धार्मिक राजाची अनेक योनीमधील पूर्वजन्मांची हकीकत वर्णन केली आहे. मलधारी देवप्रभ ( १३ वें शतक ) यानें लिहिलेल्या मृगावतीचरित्र नामक काव्यांत राजा उदयन व त्याच्या वासवदत्ता व पद्मावती ह्या दोन स्त्रिया यांची अत्यंत महत्त्वाची कथा वर्णन केली आहे. चरित्रसुंदरनें (पंधराव्या शतकाचा मध्य) लिहिलेल्या महीपालचरित्र काव्यामध्यें चौदा सर्गांत बऱ्याच काल्पनिक कथा व जैन आख्यायिका संग्रहीत केल्या आहेत.

कथास्वरूप काव्याप्रमाणेंच स्तुतिपर धार्मिक काव्यामध्यें देखील जैन लोकांनीं इतर सांप्रदायिकांबरोबर अहमहमिका चालू ठेविली होती. जैनांनीं संस्कृत व प्राकृत ह्या दोन्ही भाषांत बरीच स्तोत्ररचना केली आहे; व ह्यांपैकीं कांहीं काव्यगुणामध्यें देखील अत्यंत सरस आहेत. सांप्रत उपलब्ध अशा स्तोत्रांमध्यें अत्यंत प्राचीन असें उवसग्गहर स्तोत्र नांवाचें पांच श्लोकांचें एक स्तोत्र आहे. यामध्यें पार्श्वाची स्तुति केलेली असून ह्याच्या कर्तृत्वाचा मान भद्रबाहूकडे देण्यांत येत असतो. तसेंच धर्मघोष किंवा धर्मकोप नामक पंडितानें आर्ष प्राकृत भाषेंत रचलेलें ऋषिमंडळ स्तोत्र हेंहि निःसंशय बरेंच प्राचीन आहे. इ. स. १४९७ मध्यें पद्ममंदिर ह्यानें लिहिलेल्या ह्या स्तोत्रावरील टीकेमध्यें जैन ऋषींविषयीं पुष्कळ आख्यायिका आल्या आहेत.

मानतुंग याचें भक्तामरस्तोत्र हें अत्यंत सुप्रसिद्ध स्तोत्रांपैकीं एक आहे. बाह्यदृष्ट्या हें काव्य असलें तरी त्यामध्यें अतिशयोक्तिपर वर्णनाचा दोष बिलकूल आढळत नाहीं. ह्यामध्यें ऋषभदेवाचें माहात्म्य वर्णन केलें असून त्याच्या नामसंकीर्तनापासून सकळ विघ्नांचा नाश होतो असें सांगितलें आहे.

कुष्टरोगापासून स्वतःची मुक्तता करून घेण्याकरितां मयूर कवीनें सूर्यशतक रचिलें. ह्यामुळें बाण कवीस वैषम्य वाटून त्यानें आपले हातपाय कापून घेतले व चंडिका देवीचें शंभर श्लोकांत स्तोत्र रचून त्या देवीच्या प्रसादानें आपले नष्ट अवयव परत मिळविले असल्यानें अनेक आख्यायिका सांगतात. जैनांच्या धर्मामध्येंहि अशा प्रकारचें सामर्थ्य आहे हें सिद्ध करण्याकरितां मानतुंगानें ४२ लोहशृंखलांनीं बंद केलेल्या एका खोलींत स्वतःस बांधून घेतलें व भक्तामरस्तोत्राच्या योगानें त्यांच्या शृंखला सुटून तो मोकळा झाला अशी आख्यायिका सांगतात.

सिद्धसेनदिवाकर यानें लिहिलेलें " कल्याणमंदिरस्तोत्र " ही भक्तामरस्तोत्राची पूर्ण अनुकृति आहे. ह्या स्तोत्राचे ४४

श्लोक आहेत. परंतु ह्याची भाषा मानतुंगाच्या भाषेपेक्षां जास्त बोजड आहे. ह्या पार्श्वनाथाच्या स्तोत्राच्या प्रभावानें सिद्धसेनानें उज्जयिनी येथील महाकालाच्या देवालयांतील शिवलिंगाचा भंग व त्याच्या जागीं पार्श्वनाथाची प्रतिमा उत्पन्न केली अशी आख्यायिका आहे.

धनपालाच्या ऋषभपंचाशिकेमध्यें प्राकृत ५० श्लोकांमध्यें ऋषभाची स्तुति आहे व त्यांपैकीं पहिल्या २० श्लोकांत ऋषभचरित्राचें थोडक्यांत वर्णन असून पुढें नुसती स्तुति आहे. स्तोत्राची भाषा साधी नाहीं, तरीदेखील एकंदर काव्यांत ओजस्विता असून मधून मधून खुमासदार उपमाहि दृग्गोचर होतात. उदाहरणार्थ, प्रपंच हा एक समुद्र असून त्यांत ऋषभ ही एक तारणारी नौका आहे, किंवा प्रपंच हें कामक्रोधादि हिंस्र श्वापदांनीं युक्त असें अरण्य असून ऋषभ हा रक्षणकर्ता होय असें वर्णन आहे. त्याचप्रमाणें जग ही रंगभूमि ही कल्पनाहि आढळून येते. धनपाल हा प्रथम ब्राह्मण असून पुढें त्यानें जैनधर्माचा स्वीकार केल्यावर हें स्तोत्र रचलें. ह्याचें धर्मांतर घडवून आणणारा शोभन हा त्याचा भाऊ असून त्यानेंहि "चतुर्विंशतिजिनस्तुति" हें स्तोत्र लिहिलें आहे. ह्या स्तोत्रांत त्यानें चित्रकाव्य, निरनिराळे अलंकार, विविध वृत्तें उपयोगांत आणलीं आहेत. याकोबी यानें या स्तोत्राविषयीं काढलेले उद्गार अगदीं अन्वर्थक आहेत. तो म्हणतो "शोभनस्तुती ह्या गारोड्याच्या खेळासारख्या मजेदार असून त्याजवरून जैन कवितेस पुढें कशा प्रकारची दिशा लागली व एकंदरीनें जैन लोकांत ह्या प्रकारची योग्यता होती किंवा नाहीं ह्या गोष्टी स्पष्ट दिसून येतात." हे बंधुद्वय इ. सनाच्या १० व्या शतकाच्या उत्तरार्धात होऊन गेले. इ. सनाच्या अकराव्या शतकांत अभयदेव यानें "जयतिहुयनस्तोत्र" लिहिलें. ह्याविषयीं अशी आख्यायिका सांगतात कीं कवि आजारी असतांना ह्या स्तोत्रामुळें बचावला व त्यानें वरीच शतकें झांकून राहिलेली पार्श्वनाथाची एक प्रतिमा उघडकीस आणली. सुप्रसिद्ध हेमचंद्रानेंहि "वीतरागस्तोत्र" व "महावीरस्वामिस्तोत्र" हीं स्तोत्रें रचिलीं आहेत.

जैनांची उपदेशपर कविता कांहींशी सुभाषितवजा व कांहीं वर्णनात्मक स्वरूपाची असून जैनांच्या केवळ तात्विक व सांप्रदायिक वाङ्मयाच्या संक्रमणाची दर्शक आहे. मूळ जैनधर्मशास्त्रव्यतिरिक्त उपदेशपर कवितेंत अत्यंत प्राचीन काव्य प्रश्नोत्तररत्नमाला हें असून याची भाषा अत्यंत साधी आहे. या काव्याचें कर्तृत्व कधीं कधीं श्वेतांबर जैनपंथी विमल नांवाच्या पंडिताकडे देण्यांत येतें व कधीं कधीं दिगंबर जिनसेनाचा मित्र राजा अमोघवर्ष (सुमारें इ. ८१४–८७८) याजकडे देण्यांत येतें. तथापि त्यांतील सामान्य जनतेस उपयोगी पडणाऱ्या नीतिनियमामुळें बौद्ध व ब्राह्मण या दोघांनींहि वरील ग्रंथ आपल्याच धर्मविषयक ग्रंथांतील एक आहे असें प्रतिपादन केलें आहे.

दुसरा एक अशाच प्रकारचा प्राचीन ग्रंथ धर्मदासकृत उवएसमाला ( उपदेशमाला ) हा असून याचें प्राकृत भाषेमधील ५४० श्लोक आहेत. या काव्यावर अनेक टीका लिहिल्या गेल्या असून त्यांपैकीं अत्यंत प्राचीन म्हणजे नवव्या शतकांत लिहिलेल्या दोन टीका आहेत. या एकाच काव्यावरील अनेक टीकावरून या काव्याची लोकप्रियता सिद्ध होते. दिगंबर जैनपंडित अमितगति याचीं दोन उपदेशपर काव्यें जैनांस अत्यंत प्रिय झालीं आहेत. सुभाषितरत्नसंदोह हें त्या दोहोंमध्यें पूर्वीचें असून इ. स. ९९४ मध्यें त्याची रचना पूर्ण झाली आहे. या काव्याचे बत्तीस सर्ग असून प्रत्येक सर्गामध्यें एका विशिष्ट विषयाचें विवेचन व विशिष्ट व्रताची योजना केलेली आहे. या काव्याची भाषापद्धति व छंदोयोजना अगदीं काव्यग्रंथासारखी असून त्यांमध्यें कवीनें दिगंबर जैनांस उपयुक्त अशा आचारानियमांचें विवरण केलें आहे. ह्याच काव्यामध्यें जैन मठवासी व सामान्य लोक यांच्या वागणुकीचे नियम घालून दिले असून ब्राह्मणधर्माच्या अनेक तत्त्वांवर खरमरीत टीका केली आहे. इंद्रियोपभोग व त्यांचे अनिष्ट परिणाम, सदसद्विवेक, पुण्यकर्म, मरण व अमृतत्व, स्त्रीजातीचीं कुटिल कृत्यें, मांसाशनाचें पाप, मद्यपान इत्यादि वैराग्यपर काव्यांत सामान्यपणें येणाऱ्या गोष्टींविषयीं स्वतंत्र अशा फारच थोड्या कल्पना आढळून येतात. ह्या काव्याच्या सव्विसाव्या सर्गामध्यें ज्यांनीं स्वतःची फसवणूक, मत्सर व अनेक चित्तविकार हे दूर झुगारून दिले आहेत अशा आप्तांचें म्हणजे खऱ्या रीतीनें मुक्त झालेल्या महापुरुषांचें वर्णन आलें असून ब्राह्मणधर्मांतील स्त्रियांचा अभिलाष करणाऱ्या, मद्य पिऊन धुंद होणाऱ्या व विषयसुखांत दंग होऊन राहणाऱ्या इंद्रवरुणादि देवांची वरीच निंदा करण्यांत आली आहे. तथापि ह्या सर्गाच्या शेवटीं अमितगति यानें स्पष्ट म्हटलें आहे कीं, त्यानें ब्राह्मणधर्मांतील देवादिकांवर जो हा निंदेचा वर्षाव केला तो मत्सर किंवा वडवडीची संवय ह्यामुळें केला नसून सर्वज्ञ, निष्पाप अशा आप्तांस कसें ओळखावें ह्या हेतूनें केला.

सुभाषितरत्नसंदोहानंतर वीस वर्षांनीं म्हणजे इ. स. १०१४ मध्यें अमितगति याचें "धर्मपरीक्षा" हें सुप्रसिद्ध काव्य निर्माण झालें. वस्तुतः हा ग्रंथ तात्त्विक पद्धतीचा आहे. तथापि त्यामध्यें इतकीं कथानकें आलीं आहेत कीं, ह्या काव्यास कथात्मक वाङ्मयांत देखील समाविष्ट करतां येईल. ह्या ग्रंथाकरवीं जैनसंप्रदायाचा उपदेश करणें हा तर ग्रंथकाराचा स्पष्ट हेतु दिसतोच. परंतु ह्याशिवाय इतर सांप्रदायिक लोकांची निंदा करून आपल्या प्रेक्षकांचें चित्तरंजन करणें हाहि एक हेतु उघड दिसतो. या ग्रंथाची रचना पुढें दिली आहे—

एक जैन धर्मोपदेशक अनेक प्रकारचे चमत्कार करून व असंभाव्य अशा विविध कथा सांगून आपल्या एका ब्राह्मण मित्रास जैनधर्म स्वीकारावयास लावितो, व अशा रीतीनें जैन संप्रदायामध्यें किती अद्भुत सामर्थ्य आहे हें त्यास दाखविण्याचा प्रयत्न करतो. अमितगति यानें अशा रीतीनें बऱ्याचशा तोंडोतोंडीं ऐकिलेल्या व प्राकृत भाषेंतील कथासंग्रहांतून घेतलेल्या दंतकथा मोठ्या चातुर्यानें एकत्र आणिल्या आहेत. दुसऱ्या कित्येक कथा पुराणग्रंथांतून घेऊन त्यांचें स्वरूप पार बदलून टाकण्यांत आलें आहे. लौकिक कथांमध्यें चार मूर्खांची गोष्ट मोठी मजेदार आहे. ती थोडक्यांत पुढील प्रमाणें आहे:—

चार मूर्ख लोक मार्गांतून जात असतां त्यांस एक जैन साधू भेटला व त्या साधूनें ह्या चौघाजणांस नमस्कार केला. हें पाहून चौघांपैकीं कोणास त्यानें नमस्कार केला असावा या मुद्दयावर चौघांचें रण माजलें; व सरतेशेवटीं त्यांनीं ही गोष्ट प्रत्यक्ष साधूसच जाऊन विचारण्याचें ठरविलें यावर साधूनें सर्वांत जो अत्यंत मूर्ख त्यास मीं नमस्कार केला असें उत्तर केलें. हें ऐकून ते चारी वेडे शहरांत जाऊन जास्त मूर्ख कोण, याबद्दल नगरवासियांचें मत विचारूं लागले व प्रत्येकानें आपलें एक एक मूर्खपणाचें कृत्य सांगितलें. पहिल्या वेड्यानें आपल्या हातून आपल्या दोन स्त्रियांस गाढ झोंपेंत त्रास होऊं नये म्हणून आपण स्वतःचे डोळे जाळून घेतले असल्याबद्दल सांगितलें. दुसऱ्यानें आपण आपल्या दोन दुष्ट बायकांस आपल्या स्वतःच्या तंगड्या मोडण्याची परवानगी दिली असें सांगितलें. चौथ्यानें आपली सासू गालगुच्चा घेईल, या भीतीनें स्वतःच आपल्या गालाचा लचका तोडून दिल्याचें सांगितलें. परंतु तिसऱ्यानें सर्वांवर ताण केली. एकदां आपल्या स्त्रीसह तो एकांतस्थलीं बिछान्यावर पडलेला असतां त्या पतिपत्नीपैकीं जो कोणी प्रथम बोलेल, त्यानें दुसऱ्यास दहा गोड पोळ्या द्यावयाच्या असा त्या दोघांनीं बेत केला. इतक्यांत घरामध्यें चोर शिरला व त्यानें सांपडेल ती वस्तु हरण केली. सरतेशेवटीं त्या चोरानें त्या स्त्रीच्या नेसत्या वस्त्रास हात घातला. त्यामुळें ती स्त्री आपल्या नवऱ्यास म्हणाली " काय! अद्यापि देखील तुम्ही स्वस्थपणें मजाच पाहतां?" हें ऐकून आपल्या पत्नीनें प्रथम मौनभंग केला म्हणून त्या मनुष्यानें तिजजवळ कबूल केलेल्या दहा पोळ्याची मागणी तावडतोब केली. अद्भुत काल्पनिक गोष्टींपैकीं नमुना म्हणून पुढील गोष्ट देतां येईल—

एका मनुष्यानें एक सुंदर, पुष्कळ फलांनीं भरलेला वृक्ष पाहिला व त्याच्या वरील फळांचा आस्वाद घेण्याची त्यास इच्छा झाली. परंतु वृक्ष अतिशय उंच होता म्हणून त्यानें आपलें मस्तक तोडलें आणि त्या वृक्षावरील फलांकडे उंच आकाशांत फेंकून दिलें. यानंतर त्या मस्तकानें कंटाळा येईतोंपर्यंत फळें खाल्यावर तें मस्तक त्यानें पुन्हां आपल्या मानेस पूर्वीप्रमाणें चिकटवून दिलें. रामायण व महाभारत या ग्रंथांतून अमितगति यानें घेतलेल्या आख्यायिका फारच मजेदार आहेत. परंतु त्यांपैकीं बहुतेक सर्व कथांमध्यें त्यानें पुष्कळ फरक केले आहेत. या सर्व कथांमध्यें कांहींच संगति नसल्यामुळें हा संग्रह अव्यवस्थित स्वरूपाचा दिसतो. या ब्राह्मणधर्मविषयक ग्रंथांतील आख्यायिकेमध्यें त्यानें स्वतः फरक केलेले नसून त्याच्या पूर्वीच्या जैन लोकांनीं केलेले असणें जास्त संभवनीय आहे. महाभारताच्या उत्पत्तीबद्दल अमितगति पुढील आख्यायिका सांगतो—

व्यास यास आपल्या ग्रंथांत पुष्कळ खोटयानाटया गोष्टी भरलेल्या आहेत, हें माहीत होतें, परंतु एक प्रयोग करून, लोक किती मूर्ख आहेत, हें अजमावल्यावर आपला असंबद्ध व वेडगळ गोष्टींनीं भरलेला ग्रंथ लोकांस म्हणून दाखविण्याचें त्यानें धाडस केलें. लोकांचा मूर्खपणा समजण्याकरितां त्यानें गंगेच्या तीरावर एक भांडें ठेविलें, व त्याजवर वाळूची रास घालण्याचा सपाटा चालविला. इतक्यांत बरेच लोक त्या ठिकाणीं आले व त्यांनींहि व्यासाचें अनुकरण करून वाळूच्या राशी घालविण्यास आरंभ केला व अशा रीतीनें थोडक्याच वेळांत व्यासानें ज्या जागीं आपलें भांडें ठेविलें होतें ती जागाच ओळखणें दुरापास्त झालें.

ब्राह्मणधर्मावर टीका करतांना अमितगति यानें पुढचा मागचा कांहींच विचार केलेला दिसत नाहीं. सुभाषित रत्नसंदोहांतल्याप्रमाणें वरील धर्मपरीक्षा ग्रंथामध्येंहि ब्राह्मणसंप्रदायाच्या देवतांवर सारखीच कडक टीका केली आहे; व त्यावरून हे दोन्ही ग्रंथ एकाच ग्रंथकर्त्याचे आहेत, हें निःसंशय सिद्ध होतें. अमितगति यानें थोडक्यांत बौद्ध संप्रदायावरहि थोडी टीका केली आहे, व सरतेशेवटीं इतर संप्रदायांचें ऐतिहासिक पर्यालोचन करतांना असें सांगितलें आहे कीं, इतर असत्य मतांतूनहि कांहीं चांगल्या गोष्टी आढळून येतात, परंतु या चांगल्या गोष्टी बहुतेक ठिकाणीं जैन धर्मांतून घेतलेल्या असतात.

जैनांचें विशेष महत्त्वाचें उपदेशपर असें काव्य म्हटलें म्हणजे हेमचंद्राचें 'योगशास्त्र' हें होय. या काव्याची रचना साध्या श्लोकांत केली असून त्यावर काव्यमयभाषापद्धतींत रचलेली व लहान लहान कथांनीं युक्त अशी एक टीका लिहिली आहे. या ग्रंथाच्या पहिल्या चार प्रकरणांमध्यें सबंध ग्रंथाचा तीनचतुर्थांश भाग आला असून त्यामध्यें सामान्य लोकांना उपयुक्त होईल अशा तऱ्हेची जैन धर्माची थोडक्यांत माहिती आली आहे, व त्यावरील टीकेमध्यें दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथांत न सांपडणारें जैन संप्रदायासंबंधीं सविस्तर तात्त्विक विवेचन आहे. हेमचंद्रानें हा ग्रंथ कुमारपाल राजाच्या इच्छेवरून तयार केला; आणि त्यायोगानें जैनधर्माकडे राजाचें मन वळविण्यास पुष्कळ मदत झाली. योगशास्त्रामध्यें योग

याचा अर्थ केवळ ध्यान किंवा विस्मृति असा नसून सामान्य धर्मोपासना हा आहे. परंतु प्रत्यक्ष योगशास्त्राचे प्रयोग शेवटच्या आठ प्रकरणांत दिले असून या सर्व विवेचनानें एकंदर टांकेचा एकदशांश भाग व्यापिला आहे. या पहिल्या चार प्रकरणांचा विषय अमितगतीच्या सुभाषितरत्नसंदोहांतील विषयासारखाच आहे. परंतु अमितगतीपेक्षां हेमचंद्राची रचनापद्धति जास्त कौशल्याची, स्वतंत्र आणि कल्पनाचातुर्याची दर्शक आहे. हेमचंद्राच्या ग्रंथांतील वारंवार नवीन नवीन कल्पना व सुंदर उपमा किती तरी आढळून येतात. हेमचंद्रानेंहि मनुस्मृति वगैरे हिंदुधर्म ग्रंथांतील आचारपद्धतीवर टीका केली असून कित्येक ठिकाणीं मनुसंहितेंतील श्लोक देऊन त्यांतील आचारपद्धती अहिंसातत्त्वास सोडून असल्यामुळें त्याज्य ठरविल्या आहेत. हेमचंद्राच्या दृष्टीनेंहि नरकद्वाराच्या मार्गावरील दीपशिखा या सर्व अनिष्टांचें मूळ व कलहांचें उत्पत्तिस्थान अशा आहेत. व अशा प्रकारच्या वर्णनामध्यें अमितगति यांज बरोबर त्याचें सादृश्य दिसून येतें. हेमचंद्राच्या ग्रंथामध्यें भारतीय सुभाषितवाङ्मयांत वारंवार आढळून येणाऱ्या वर्णनांसारखीं मजेदार वर्णनें आढळून येतात. मानवी जीविताच्या क्षणभंगुरत्वाविषयीच्या व निष्फलत्वाविषयीच्या हेमचंद्राच्या कांहीं कवितांवरून भर्तृहरीच्या अत्युत्तम सुभाषितांची आठवण झाल्याखेरीज रहात नाहीं.

उत्तम, सफाईदार काव्याच्या भाषेमध्यें लिहिलेलें दुसरें एक उपदेशपर काव्य म्हटलें म्हणजे श्रृंगारवैराग्यतरंगिणी हें असून याची रचना सन १२७६ मध्यें सोमप्रभ नांवाच्या जैन पंडितानें केली. या काव्याचे ४६ श्लोक असून त्यांमध्यें विषयोपभोगाच्या निष्फलतेविषयीं विवेचन केलें आहे. सोमप्रभ यानें दुसरें एक सूक्तिमुक्तावलि किंवा सिंदूरप्रकर नांवाचें उपदेशपर काव्य लिहिलें आहे.

जैनांनीं नीतिविषयक स्फुट श्लोकांचे पुष्कळ संग्रह केले आहेत. मुनिचंद्रसूरिन् याचा (स. ११२२) गाथाकोश वरील प्रकारांतच समाविष्ट होतो. यानंतरचा म्हणजे इ. स. १६३० च्या सुमारास गाथासहस्री नामक मोठा संग्रह समयसुंदर यानें तयार केला. यांतील श्लोक संस्कृत व प्राकृत असे दोन्ही तऱ्हेचे असून हरिभद्र, देवेंद्र इत्यादि प्राचीन पंडितांच्या ग्रंथांतून घेतले आहेत. इतर विषयांप्रमाणें संप्रदायेतिहास दाखविणारेहि कांहीं श्लोक या ग्रंथांत आढळतात. ह्या खेरीज, भाववैराग्यशतक नांवाचा शंभर श्लोकांचा दुसरा एक संग्रह असून त्यामध्यें संसाराची अनिष्टता, जीविताचें निष्फलत्व व एकंदर जगांतील पदार्थांचें अनित्यत्व याविषयीं विवेचन असून या सर्वांवर जैनधर्माचा स्वीकार हा रामबाण उपाय सांगितला आहे.

जैनसंप्रदायासंबंधीं विद्वत्तापूर्ण विवेचन असलेले ग्रंथ पुष्कळ आहेत. त्यांपैकीं कांहीं थोड्या प्रमुख ग्रंथांविषयीं येथें माहिती देणें इष्ट आहे. या प्रकारची वाङ्मयरचना करणारा अत्यंत प्राचीन ग्रंथकार कुंदकुंदाचार्य नांवाचा दिगंबर जैन हा असून तो इ. स. ७०० च्या पूर्वी होऊन गेला असावा. त्यानें प्राकृत भाषेंत गाथाछंदामध्यें लिहिलेला प्रवचनसार नामक ग्रंथ जैनांचे आचारविधी, नीतिकल्पना वगैरे गोष्टींसंबंधीं प्रमाणभूत मानिला जातो. याखेरीज कुंदकुंदाचे नियमसार व पट्प्राभृत या नांवाचे ग्रंथ असून या ग्रंथांवर श्रुतसागर यानें टीका लिहिली आहे. शिवाय श्वेतांबर जैनांच्या आयारंग (आचारांग) या सूत्र ग्रंथासारखाच एक सूत्रग्रंथ आहे; त्याचें कर्तृत्व कुंदकुंदाकडेच लावण्यांत येतें. या आचारांगसूत्रावर वसुनंदी यानें एक वृत्ति लिहिली आहे. दिगंबर जैन उमास्वाती (उमास्वामिन्) हा कुंदकुंदाचा शिष्य होय असें मानितात परंतु त्याचीं मतें दिगंबर जैनांच्या मतांपेक्षां भिन्न असल्यानें ही गोष्ट संभवनीय दिसत नाहीं. कदाचित् उमास्वाती हा जैनांमध्यें दुफळी होण्यापूर्वी होऊन गेला असावा. तथापि उमास्वातीचें तत्त्वार्थाधिगमसूत्र हें श्वेतांबर व दिगंबर जैन प्रमाणभूत मानितात. या ग्रंथामध्यें जैनसंप्रदायानुसार विश्वोत्पत्ति, अध्यात्मशास्त्र इत्यादींचें विवेचन केलें असून त्या ग्रंथांवर उमास्वाती यानें स्वतः टीका लिहिली आहे. एकंदर उमास्वातीनें सुमारें पांचशेंहूनहि जास्त ग्रंथ लिहिले असें म्हणतात. त्याचा श्रावकप्रज्ञप्ति हा ग्रंथ प्राकृत भाषेमध्यें सामान्य जैन लोकांना जैनसंप्रदायाची माहिती व्हावी या हेतूनें पद्धतशीर लिहिला आहे. हरिभद्रानें या ग्रंथावर टीका लिहिली या गोष्टीवरून या ग्रंथाची लोकप्रियता दिसून येते.

प्राचीन ग्रंथकार व धर्मोपदेशक यांजमध्यें समंतभद्र यानें आपल्या देवागमस्तोत्र अथवा आप्तमीमांसा या ग्रंथांत अर्हद्देवाच्या सर्वज्ञत्वाविषयीं उपदेश केला आहे. आप्तमीमांसेवर टीका लिहिणाऱ्या अकलंकानें उमास्वातीच्या सूत्रावर एक टीका व दुसरे पुष्कळ स्वतंत्र ग्रंथ लिहिले असल्याचे उल्लेख आढळतात. त्याचप्रमाणें अकलंकाचा शिष्य प्रभाचंद्र याजविषयीं स्तूपावरील शिलालेखांवरून अशी माहिती मिळते कीं त्यानें न्यायकुमुदचंद्रोदय व प्रमेयकमलमार्तंड या नांवाचे दोन ग्रंथ लिहिले व यानें उपवासादिकांच्या योगानें स्वतःच्या इच्छेनें मृत्यु स्वीकारला. हे सर्व ग्रंथकार आठव्या शतकांत अथवा त्यापूर्वी होऊन गेले असले पाहिजेत. पांडवपुराणाचा कर्ता शुभचंद्र यानें ज्ञानार्णव नांवाचा संस्कृत श्लोकबद्ध तत्त्वविवेचनात्मक ग्रंथ लिहिला आहे. नवव्या शतकाच्या उत्तरार्धांतील सुप्रसिद्ध टीकाकार जो हरिभद्र त्याची तत्वविवेचनात्मक ग्रंथकर्ता या नात्यानें पुष्कळ प्रसिद्धि आहे. त्यानें लिहिलेल्या चौदाशें चव्वेचाळीस ग्रंथांपैकीं कांहीं ग्रंथांमध्यें सामान्य तत्त्वज्ञानस्वरूपाचें विवेचन असून कांहीं थोडा भाग जैन तत्त्वज्ञानास दिला आहे. षड्दर्शनसमुच्चय हा अशाच पैकीं एक ग्रंथ असून त्यामध्यें बौद्ध, न्याय, सांख्य, वैशेषिक, जैमिनी इत्यादि दर्शनांचीं व एका लहानशा

परिशिष्टांत चार्वाकाच्या नास्तिक वादाची थोडक्यांत माहिती दिली आहे; व त्या मानानें जैन तत्त्वविवेचन चौथ्या लहानशा प्रकरणांत उरकलें आहे. लोकतत्त्वचिंतामणि हा संस्कृत ग्रंथ देखील केवळ जैनतत्त्वविवेचनास वाहिलेला नसून त्यामध्यें हरिभद्रानें स्पष्ट म्हटलें आहे कीं, जिनदेव हा आपला मित्र नाहीं किंवा कपिल, पतञ्जलि, जैमिनी इत्यादि तत्त्ववेत्ते हे आपले शत्रूहि नाहींत, आणि जें सत्यमय असेल तें कोणत्याहि संप्रदायाचें कां असेना तें स्वीकारणें शक्य आहे; अशी इच्छा त्यानें प्रकट केली आहे. उलटपक्षीं योगविंदु, योगदृष्टिसमुच्चय, धर्मविंदु इत्यादि प्रबंध केवळ जैनसंप्रदायाविषयीं होत. धर्मविंदु हें आचारविधीस उपयुक्त होणारें छोटें पुस्तक असून त्याचे तीन परिच्छेद आहेत. या प्रबंधाची भाषा ब्राह्मणांच्या धर्मसूत्रग्रंथांप्रमाणें सूत्रमय आहे. इसवी स० ९७८ मध्यें चामुंड महाराज यानें चरित्रसार नांवाचा एक छोटा आचारग्रंथ लिहिला आहे. शांतिसूरि यानें एक्कावन्न आर्यामध्यें प्राकृत भाषेंत जीवविचार नामक एक ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथामध्यें जीवांचे मुक्तावस्थेंतील व संसारभ्रमणावस्थेंतील असे दोन भाग पाडले असून संसारावस्थेंतील जीवांचे पुन्हां निर्जीव व सजीव असे विभाग पाडले आहेत. सजीव जीवांची नरकवासी जीव, प्राणी, मानवजीव व देव अशी वर्गवारी पाडण्यांत आली आहे. अशा दृष्टीनें हा ग्रंथ देवताशास्त्र, प्राणिशास्त्र, सजीवसृष्टिशास्त्र, देवताकथाशास्त्र, इत्यादिकांचें संमिश्रण आहे.

इ० स० १०६८ मध्यें देवसेन यानें दर्शनसार या नांवाचा दिगंबर जैनांस उपयुक्त असा एक छोटा प्रबंध लिहिला. इ. स. १२९२मध्यें मल्लिसेनानें लिहिलेली स्याद्वादमञ्जरी ही जरी हेमचंद्राच्या वीतरागस्तुतीवरील टीका आहे, तरी तिची स्वतंत्र तत्त्वज्ञानात्मक पुस्तकांत गणना करतां येईल. जैन धर्मावरील अत्यंत विस्तृत ग्रंथ म्हटला म्हणजे आशाधर यानें १३ व्या शतकांत लिहिलेला धर्मामृत नांवाचा ग्रंथ होय. आशाधर याचा बिल्हण कवीनें उल्लेख केला आहे त्यावरून, हे दोघे समकालीन होत हें सिद्ध होतें. या ठिकाणीं १५ व्या शतकांत सकलकीर्ति यानें लिहिलेल्या 'तत्त्वार्थसारदीपिका' व 'प्रश्नोत्तरोपासकसार' या दोन प्रबंधांचा उल्लेख केला पाहिजे. यांपैकीं पहिल्या ग्रंथांत दिगंबर जैनांच्या मूळ धर्मग्रंथाची पूर्ण माहिती दिली आहे व दुसऱ्यांत प्रश्नोत्तररूपानें सामान्य जैनांचे आचारनियम दिले आहेत. इ. स. १५७२ मध्यें धर्मसागर नामक श्वेतांबर जैन पंडितानें दिगंबर जैनांच्या नग्नवृत्ति, मोक्षधर्मामध्यें स्त्रियांचें अनधिकारित्व, इत्यादि मतांविरुद्ध वादविवादात्मक असा कुपक्षकौशिकसहस्रकिरण, या नांवाचा प्राकृत प्रबंध व स्वतःच त्याजवर संस्कृत टीका लिहिली.

जैन लोकांनीं धर्मशास्त्राखेरीज इतर अनेक प्रकारच्या वाङ्मयक्षेत्रांत चळवळी केल्या आहेत. याविषयीं बुल्हरनें आपल्या "इंडियन सेक्टस ऑफ दि जैन्स" या ग्रंथांत ह्मटलें आहे कीं "प्रथम दिगंबर जैन व नंतर श्वेतांबर जैन यांनीं संस्कृत भाषेचा उपयोग करण्यास सुरवात केली. अर्थात् हा उपयोग त्यांनीं केवळ आपलें तत्त्वज्ञान समजून देण्याकरितांच केला असें नाहीं तर ब्राह्मणांच्या इतर ऐहिक शास्त्रांकडेहि त्यांनीं बरेंच लक्ष दिलें. व्याकरण, ज्योतिष वगैरे शास्त्रांमध्यें जैनांनीं इतकी प्रगति केली कीं विरुद्ध ब्राह्मणपक्षीयांनां त्यांचे ग्रंथ प्रमाणभूत मानावे लागले. दक्षिणेमध्यें द्राविड जातीमध्यें त्यांनीं आपल्या कार्यास सुरवात केली व त्याचें फल ह्मणजे आजच्या कानडी, तामील, तेलगु ह्या भाषांचें सुसंपन्नत्व हें होय. ह्या चळवळीमुळें त्यांचें उद्दिष्ट ध्येय बाजूलाच राहिलें, परंतु इतिहासदृष्ट्या जैनांच्या कामगिरीस पुष्कळ महत्त्व आहे."

संस्कृत-प्राकृत जैनवाङ्मयाचें विहंगमावलोकन.

(१७ व्या शतकापर्यंत)

श्वे तां ब र वा ङ्म य, (अ) अकरा अंगेंः—आचार (आयार); सूत्रकृत (सूयगद); स्थान (थान); समवाय; भगवती; ज्ञातधर्मकथा (नायधम्मकहा); उपासकदशा (उवासकगदसाव); अंतकृतदशा (अंतगददसाव); अनुत्तरौपपातिकदशा (अनुत्तरोववाइयदसाव); प्रश्नव्याकरण (पम्हावागरण); ध विपाक (विवाग) [ दृष्टिवाद (नष्ट). ]

(आ) द्वादश उपांगेंः—औपपातिक (औवाइय); राजप्रश्नीय (रायपसेनैय्या); जीवाभिगम; प्रज्ञापना (पन्नवना); जम्बुद्वीपप्रज्ञप्ति (जम्बूद्दीवपन्नती); चंद्रप्रज्ञप्ति (चंदपन्नत्ति); सूर्यप्रज्ञप्ति (सूरियपन्नति); निरयावली (निरयावलीयाव) किंवा कल्पिक (कप्पीयाव); कल्पावतंसिका (कप्पावर्दिसिआव); पुष्पिका (पुप्पहियाव); पुष्पचूडा (पुप्फचुलाव); वृष्णिदशा (वन्हीदसाव).

(इ) दहा प्रकीर्ण (पैन्न किंवा पयन्न):—चतुसरण (चऊस्सरण); संस्तार (संथार); आतुरप्रत्याख्यान (आऊर पच्चाखान); भक्तपरिज्ञा; तन्डुलवैतालिक (तन्दुलवेयालिय); चन्दाविय्यय; देवेंद्रस्तव (देविंदत्तहअ); गणितविद्या (गणीविय्या); महाप्रत्याख्यान; वीरस्तव (वीरथ्थअ.)

(ई) सहा छेदसूत्रें किंवा छेदग्रंथः--निशीथ; महानिशीथ; व्यवहार; दशाश्रुतस्कंध, कल्पसूत्र (धरून); बृहद्कल्प; पंचकल्प.

(उ) भिन्न भिन्न नांवांचीं दोन सूत्रेंः—नन्दी; अनुयोगद्वार.

(ऊ) चार मूलसूत्रें अथवा मूलग्रंथः—उत्तरध्ययन; आवश्यक; दशवैकालिक; पिंडनिर्युक्ति.

यांचे लेखकः— 'प्रज्ञापना', हा अज्जसाम याचा ग्रंथ समजतात. कालकाचार्यासहि याचा कर्ता समजतात. चतुःसरण हा वीरभद्राचा ग्रंथ मानतात. व्यवहार, दशाश्रुतस्कंध (कल्पसूत्रासहित) आणि बृहत्कल्प हे ग्रंथ

भद्रबाहु याचे मानतात ( ख्रि. पू. ३०० ). नन्दीसूत्र आणि कल्पसूत्राचा कांहीं भाग देवर्द्धि नामक ग्रंथकारानें रचला असावा. दशवैकालिक. याचा कर्ता सिज्जंभव असें समजतात.

इतर वाङ्मय.(काळ, ग्रंथकार व ग्रंथ )

ख्रि पू. ३००:—भद्रबाहु-निर्युक्ति; उपसर्गहरस्तोत्र व ( प्राकृ. ) कल्पसूत्र.

कालकाचार्य—प्राचीन जैन ज्योतिर्विद्या. ( कालकाचार्य नांवाचे एकंदर पांच ग्रंथकार झाले असें कित्येक विद्वानांचें मत आहे ).

३ रें अगर ४ थें शतकः—विमलसूरि—पौमचरिय ( प्राकृत ); जैनरामायण.

४ थें किंवा ५ वें शतकः—उमास्वती–तत्त्वार्थाधिगमसूत्र

४ थें अगर ५ वें शतकः—सिद्धसेन दिवाकर–कल्याण मंदिरस्तोत्र; न्यायावतार ( तर्कशास्त्र ).

इ.स.५१४:—देवर्द्धि–नन्दीसूत्र आणि कल्पसूत्राचा कांहीं भाग;६ व्या शतकाचा पूर्वार्धः —सिद्धसेन गणि–तत्त्वार्थटीका; प्राकृत भाष्यें.

७ वें शतक, पूर्वार्धः–मानतुंग-भक्तामरस्तोत्र;भयहरस्तोत्र.

इ. स. ८००:—बप्पभट्टि—सरस्वतीस्तोत्र.

८ वें अगर ९ वें शतकः—जयवल्लभ–वज्जालग्ग(प्राकृत).

९ व्या शतकाचा प्रारंभ काळः—मल्लवादिन्.

९ वें शतक, उत्तरार्धः—हरिभद्र–षड्दर्शनसमुच्चय; मूलग्रंथ व प्रस्तावना; समराइच्चकहा ( प्राकृत ).

शीलांक–' आवश्यक ' वर टीका; ' आचार ' आणि ' सूत्रकृत ' या ग्रंथद्वयावरील टीका ( इ. स. ८६३ ).

इ. स. ९०६:–सिद्धर्षि–उपमितिभवप्रपंचाकथा ( प्राकृत); कालकाचार्यकथानक ( प्राकृत ).

१० वें शतकः—शोभन—चतुर्विंशतिजिनस्तुति.

१० वें शतकः—धनपाल–ऋषभपंचाशिका; तिलकमंजरी; पाईयलच्छी ( इ. स. ९७२, प्राकृत शब्दकोश. )

१० वें शतकः—जीवकचिंतामणि (तामीळ भाषेंतील रसभरित काव्य.)

इ. स. १०४०:—(निधनकाल) शान्तिसूरि—प्राकृतटीका ( उत्तराध्ययन ग्रंथावर );जीववियार ( प्राकृत ).

इ. स. १०६९:—(उदयकाल,) जिनचंद्र ( अभयदेवाचा गुरु )-संवेगरंगशाला ( ह्यांत सुमारें १८००० दोहरे अगर श्लोक असून ही ईश्वराच्या भक्तिविषयक आहे ).

इ.स.१०७८:—(निधनकाल) अभयदेव-स्थाच, समवाय, भगवती, ज्ञातकर्मकथा, उपाधशकदशा, अंतकृतदसा, अनुत्तरौपपातिकदसा, प्रश्नव्याकरण, विपाक, दृष्टिवाद यांवर टीका, जयतिहुयनस्तोत्र.

इ. स. १०८२:—(उदयकाळ) गुणचंद्र—महावीरचरित ( प्राकृत ).

इ. स. १०८६–११६९: —देवभद्र–पार्श्वनाथचरित्र; वीरचरित्र; संवेगरंगशाला.

इ. स. १०८९—११७३:—हेमचंद्र—योगशास्त्र किंवा आध्यात्मोपनिषद; वीतरागस्तुति, प्रमाणचिंतामणि; महावीरचरित, अनुयोगद्वार— टीका; वसुदेव—हिंड ( प्राकृत ); त्रिषष्टिशलाकापुरुषचरित्र; परिशिष्टप्रवणचरित.

इ. स. ११५०:—( उदयकाळ )मलयगरि—राजप्रश्नीय, जीवाभिगम; पन्नापना, जम्बुद्वीपप्रज्ञप्ति, चंद्रप्रज्ञप्ति, सूर्यप्रज्ञप्ति, व्यवहार, नन्दी, या ग्रंथावर टीका.

१२ वें शतकः—चंद्रसूरि—निरयावली व आवश्यक यांवर टीकात्मक ग्रंथ ( प्राकृत ).

इ. स. ११९१:—( उदयकाल ) असद—विवेकमंजरी; उपदेशकन्दली.

इ स. १२२०:—( उदयकाल ) जिनदत्तसूरि—विवेकविलास.

इ. स. १२३०:—( उदयकाल ) अमरचंद–बालभारत, पद्मनाभकाव्य.

इ. स. १२३२ :—(उदयकाळ)तिलकाचार्य–आवश्यकावर टीका.

इ. स. १२५० :–प्रभाचंद्र–'प्रभावकचरित.

इ. स. १२७१:—(उदयकाल)देवेन्द्रसूरि—पहिल्या पांच ग्रंथावरील टीका व ६ कर्मग्रंथ.

इ. स. १३०४:—( उदयकाळ ) मेरुतुंग–प्रबन्धचिंतामणि; महापुरुषचरित्र किंवा उपदेशशत षड्दर्शनविचार; मुंजप्रबन्ध ( प्राकृत ).

इ. स. १३४९:—( उदयकाल ) राजशेखरसूरि–प्रबन्धकोशः अन्तरकथासंग्रह.

१४ वें शतकः—ज्ञानसागर–' पिंडनिर्युक्ति ' व आवश्यक, या ग्रंथांवर टीका. पैकीं पहिली इ. स. १३८३ त रचिली.

इ. स. १३७२:—रत्नशेखर— श्रीपालचरित्र; लघुक्षेत्रसमास.

इ. स. १४००:—गुणरत्न—षड्दर्शनसमुच्चयटीका; 'नवतत्त्व.' (याचा ग्रंथकाल आणि कर्ता उपलब्ध नाहीं.)

इ. स. १३८४—१४४३:—सोमसुंदर—टीकात्मक ग्रंथ, ' उपदेशमाला ' ' नवतत्वा ' चतुःशरण; आवश्यक आणि व्यवहार या ग्रंथांवर यानें टीका लिहिल्या आहेत.

इ. स. १३८०—१४४ :—मुनिसुन्दर–उपदेशरत्नाकर; मित्रचतुष्ककथा; अध्यात्मकल्पद्रुम; सहस्रनामस्मृति.

इ. स. १४३६ :—( उदयकाल )जिनमण्डन–कुमारपाल प्रबन्ध.

इ. स. १४३८:—( उदयकाल ) जिनकीर्ति–चम्पकश्रेष्ठिकथानक; ( इ. स. १४०० ); धन्यशालिचरित्र; दानकल्पद्रुम; श्रीपालगोपालकथा.

इ. स. १४०१-१४६१:—रत्नशेखर; टीकाग्रंथ (संस्कृत).

इ. स. १४६४:—(उदयकाल) शुभशील—पंचशती-प्रबोधसंबंध; भरतादिकथा किंवा कथाकोश; कालकाचार्य कथानकावरील टीका.

इ. स. १५२६:—(उदयकाल) हरिषेण—जगत्सुन्दरी योगमाला.

इ. स १५७३:—(उदयकाल) धर्मसागर—कुपक्षकौशिकादित्य किंवा प्रवचनपरीक्षा.

समयसुंदर—कल्पलता; कल्पसूत्रावरील टीकाग्रंथ; गाथासहस्री (१०००श्लोकावतरणें); विसंवादशतक; सामाचारीशतक.

इ. स. १६५२:—विनयविजय—लोकप्रकाश.

दिगम्बर वाङ्मय.

हें मुख्यतः संस्कृत आहे. सूर्यप्रज्ञप्ति आणि चंद्रप्रज्ञप्ति, दोनीहि ग्रंथ प्राकृत आहेत.

वत्तकेर—मूलाचार (प्राकृत); त्रिवर्णाचार (प्राकृत).

कुन्दकुन्दाचार्य; शतप्राभृत; अष्टप्राभृत, समयसारप्राभृत; प्राभृतसार; प्रवचनसार; नियमसार; पंचास्तिकाय किंवा पंचत्थियसंघहसुत्त; रमणसार; द्वादशानुप्रेक्षा.

इ. स. ६००:—सामन्तभद्र—गन्धहस्तिमहाभाष्य; टीकात्मक विवेचनग्रंथ (तत्त्वार्थाधिगम-सूत्र, या ग्रंथावर टीका); आप्तमीमांसा अथवा देवागमस्तोत्र; रत्नकरण्डश्रावकाचार; युक्त्यानुशासन; स्वयंभूस्तोत्र; चतुर्विंशति-जिन-स्तुति.

इ. स. ६६०:—(उदयकाळ) रविषेण—पद्मपुराण:

पूज्यपाद; सर्वार्थसिद्धि ('तत्त्वार्थाधिगम-सूत्र' या ग्रंथावरील टीकाग्रंथ).

इ. स. ७००-७०:—अकलंक—अकलंकस्तोत्र; अष्टशती, 'आप्तमीमांसे' वर टीका; जैन वर्णाश्रम (आचारविचारविषयक ग्रंथ); तत्त्वार्थटीकाव्याख्यालंकार ('तत्त्वार्थाधिगम-सूत्र' या ग्रंथावरील टीकाग्रंथ).

इ. स. ७८३:—(उदयकाळ) जिनसेन—हरिवंश पुराण.

८ वें शतक.—राजवार्तिक—तत्त्वार्थाधिगमसूत्र टीका.

८ वें शतक.—विद्यानंद—श्लोकवार्तिक अथवा जैन श्लोकवार्तिक अष्टसहस्री अथवा आप्तमीमांसालंकार; आप्तपरीक्षा; प्रमाणपरीक्षा.

८ वें शतकः—माणिक्यनन्दिन्—परीक्षामुख.

इ. स. ८२५:—प्रभाचंद्र—प्रमेयकमलमार्तंड; टीकात्मक ग्रंथ (परीक्षा मुखावर).

इ. स. ८३७:—जयधवला.

९ वें शतकः—जिनसेन—आदिपुराण अथवा त्रिषष्टिलक्षण महापुराण; पार्श्वाभ्युदय; आदिपुराण किंवा त्रिषष्टिलक्षण महापुराण.

९ वें शतकः—गुणभद्र—जिनसेनकृत आदिपुराण यानें संपूर्ण केलें. उत्तरपुराण; आत्मानुशासन.

९ वें शतकः—अमोघवर्ष पहिला—प्रश्नोत्तरमाला.

इ. स. ९०५:—(उदयकाळ) अमृतचंद्र—समयसारप्राभृत टीका; 'प्रवचनसार' ग्रंथावरील टीका; तत्त्वार्थसार; पुरुषार्थसिद्ध्युपाय.

इ. स. ९६०:—(उदयकाळ) सोमदेव—यशस्तिलक; नीतिवाक्यामृत.

इ. स. ९८०. नेमिचंद्र—द्रव्यसंग्रह (प्राकृ.); त्रिलोकसार; गोम्मतसार (चामुण्डरायाकरितां रचिलेला ग्रंथ); लब्धिसार; क्षपणसार.

इ. स. १२००—१२५०.—आशाधर—धर्मामृत; त्रिषष्टिस्मृति; इतर कांहीं ग्रंथ.

इ. स. ११२०.—बालचन्द्र—तत्त्वरत्नदीपिका; टीकाग्रंथ (प्राभृतसार ग्रंथावर); श्री योगीन्द्र—परमात्मप्रकाश.

इ. स. १४६४.—(उदयकाळ) सकलकीर्ति—तत्त्वार्थसारदीपिका; प्रश्नोत्तरोपासकाचार; शान्तिनाथचरित; पार्श्वनाथचरित्र; वर्धमानपुराण.

१५ व्या शतकांतील अखेरीचा काळः—श्रुतसागर—जिनसंहिता; शतप्राभृतवरील टीका; तत्त्वार्थदीपिका; षट्प्राभृत या ग्रंथावरील टीका.

इ. स. १५२८.—(उदयकाळ) नेमिदत्त—श्रीपालचरित्र नेमिजिनपुराण; धन्यकुमारचरित्र; अराधनाकथाकोश; श्रावकाचार.

१६ वें शतकः—शुभचंद्र—पाण्डवपुराण आणि इतर ग्रंथ.

इ. स. १६२६:—रत्नचंद्र—सुभौमचरित्र; प्रद्युम्नचरित्र.

देशी भाषेंतील जैन वाङ्मय.

हिंदी.—संप्रदायानुसार श्वेतांबर व दिगंबर असे उपलब्ध जैन साहित्याचे२ विभाग पडतात. श्वेतांबरी वाङ्मयांत कथाग्रंथ अधिक आहेत. तात्त्विक किंवा सिद्धांतविषयक नाहींतच म्हटलें तरी चालेल. पण दिगंबरी वाङ्मयांत जसे कथाग्रंथ किंवा चरित्रग्रंथ आहेत तसे तात्त्विक अगर सैद्धान्तिक ग्रंथहि आहेत. गोमटसार, राजवार्तिक, सर्वार्थसिद्धि, आत्मख्याति, भगवती आराधाना, प्रवचनसार, समयसार, पंचास्तिकाय अशा ग्रंथांच्या वचनिका दिगंबरी वाङ्मयांत आढळतात. कांहीं ग्रंथांचीं दोन दोन चार चार गद्य अगर पद्य भाषांतरें आढळतात. देवागम परीक्षासुख, न्यायदीपिका, आप्तमीमांसा इत्यादि न्यायग्रंथांचे देखील हिंदीमध्यें अनुवाद झालेले आहेत. असें सांगतां येईल कीं, संस्कृत अगर प्राकृत भाषेंत दिगंबरी ग्रंथ ज्या ज्या विषयांवर झालेले आहेत त्या त्या विषयांवर हिंदीमध्यें कांहींना कांहीं तरी लिहिलें गेलेंच आहे. दिगंबरी मताचें ज्ञान ज्यास वाटेल त्यास हिंदीमधूनहि मिळूं शकेल; आणि या परिस्थितीचा जनतेवर परिणामहि झाला आहे. श्वेतांबर संप्रदायामध्यें जे लोक संस्कृत अगर प्राकृत भाषांशीं अपरिचित असतात अशा लोकांस फारसें धर्मज्ञान नसतें आणि ते लोक या बाबतींत आपल्या " महाराजा " वर अवलंबून

असतात. पण दिगंबर सांप्रदायाची गोष्ट अशी नाहीं. गोम्मटसारादि ग्रंथांची चर्चा करणारे असे शेंकडों जैन आहेत कीं त्यांस संस्कृत भाषेचें एक अक्षरहि समजत नाहीं. स्वधर्माची जाणीव असलेले लोक जागोजागीं आढळतात; आणि गांवोगांव शास्त्रार्थाचा वादविवाद करण्यासाठीं सभा होतात.

हिंदी जैन ग्रंथांचा प्रसार केवळ हिंदी बोलली जाणाऱ्या भागांतच नाहीं तर गुजराथेंत व दक्षिणेंतहि आहे व तेथें व तसेंच कर्नाटकांतहि हिंदी ग्रंथ वाचले जातात; एवढेंच नव्हे तर मोठमोठे ग्रंथ प्रसिद्धहि होतात. हिंदी ही दिगंबर संप्रदायाची भाषा झाली आहे असें म्हटल्यास चालेल. "जैनमित्र" सारख्या हिंदी पत्राचे एक चतुर्थांश वर्गणीदार गुजराथ व दक्षिण या भागांत आहेत.

श्वेतांबरी व दिगंबरी वाङ्मयाची तुलना करतां आणखी ज्या गोष्टी नजरेस येतात त्या येणेंप्रमाणें—ज्या ग्रंथांचे कर्ते गृहस्थ म्हणजे श्रावक आहेत असे ग्रंथ श्वेतांबरी वाङ्मयांत क्वचितच आढळतात, उलटपक्षीं दिगंबरी हिंदी ग्रंथांकडे अवलोकन केलें असतां असें दिसून येईल कीं, यांच्या कर्त्यांत श्रावक थोडे नाहींत. दिगंबर संप्रदायांत साधुसंघाचा अभाव आज ४००-५०० वर्षें आहे. या संप्रदायाचे अनुयायी जर साधूंच्या तोंडाकडेच पहात असते तर त्यांची दुर्गति झाली असती, परंतु धर्मज्ञान जिवंत राखण्याचा बोजा गृहस्थांनीं अंगावर घेतल्यामुळें संप्रदाय बचावला व वाङ्मयाची वृद्धि झाली.

या दोन संप्रदायांच्या वाङ्मयांत आणखी एक भेद दिसतो तो हा कीं श्वेतांबरांचे ग्रंथ स्वतंत्र आहेत. भाषांतररूप नाहींत आणि दिगंबरांमध्यें स्वतंत्र ग्रंथ फारच कमी असून भाषांतररूपच बहुतेक आहेत. याचें कारण असें दिसतें कीं परंपरागत समजुतीमुळें गृहस्थास वाटतें कीं धार्मिक गोष्टींवर बोलण्यास आपण अनधिकारी आहोंत, आपल्या हातून कांहीं भलतेंच तर लिहिलें जाणार नाहींना. कित्येक भाषांतरकार असे चांगले विद्वान आहेत कीं त्यास दोन चार स्वतंत्र ग्रंथ लिहिणें कठिण गेलें नसतें. ज्या संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें केलीं गेलीं त्यांतील अनेक ग्रंथ कवडीच्या मोलाचेहि नाहींत पण त्यांचीं भाषांतरें झालीं आहेत व अशांचीं भाषांतरें ज्यांनीं केलीं ती मंडळी अशी दिसतात कीं जी मुळापेक्षां अधिक चांगली कविता संस्कृतामध्येंच करूं शकतील. हा एक भक्तीचा खेळ आहे.

हिंदी जैन ग्रंथांचे रा. नाथुराम प्रेमी हे (१) तात्त्विक ग्रंथ, (२) पुराणें व चरित्रें (३) पूजापाठ, (४) पदें, भजनें व विनंत्या असे चार भाग करतात. पहिल्या दोन विषयांवर पुष्कळ वाङ्मय असणें स्वाभाविक आहे. पण पूजापाठादि विषयांवर झालेलें लिखाण थोडें थोडकें नाहीं. त्याचा एकीकृत गठ्ठा फारच मोठा होईल. एकच विषयावर पूजापाठ दहा दहा वीसवीस कवींनीं केले आहेत. जैनांनीं अलीकडच्या काळांत सांप्रदायिक इतर आचारापेक्षां पूजाप्रतिष्ठेस जें प्राधान्य दिलें त्याचा हा परिणाम आहे. पदभजनादींचें साहित्य पूजापाठाइतकें नाहीं पण बरेंच आहे. भूधर, द्यानत, भागचंद बनारसी या कवींचीं पदें चांगलीं म्हणून समजलीं जातात. पूजा भजनादींच्या रचनेमुळें भक्तिरस जैन वाङ्मयांत बराच वृद्धिंगत झाला. भक्तिरसांत पहातां पहातां पुष्कळ कवी हें विसरले कीं जैन मत ईश्वराच्या कर्तेपणाचा स्वीकार करीत नाहीं; आणि त्यामुळें भक्तीस क्षेत्र स्वभावतःच मर्यादित आहे. वैष्णवसंप्रदायांतर्गत भक्तिमार्गाचा जैन मार्गावर परिणाम झाला असावा. एक कवि म्हणतो "ईश्वरा मी जसा बनलों आहे तसा मला तार; माझ्या करणीकडे मुळींच पाहूं नको, (नाथ मोहि जैसे बने तैसे तारो; मोरी करनी कछून विचारो)." करणीलाच सर्व भवितव्याचें कारण किंवा ईश्वरच समजणाऱ्या जैनांच्या कवितेवर ईश्वरकर्तृत्वाचा किती पुटें चढलीं हें पहाण्याजोगें आहे.

हिंदी जैन वाङ्मय शांतरसस्वरूपी आहे, व शृंगारादि रसांचा अभाव दिसून येतो. अलंकारविषयक ग्रंथ किंवा नायिकाभेदांचीं रसाळ वर्णनें हिंदी जैन वाङ्मयांत फारशीं आढळत नाहींत. लालमणिकृत रसप्रकाश अलंकार, सेवाराम राजपुताचा रसग्रंथ यांचा उल्लेख ग्रंथशालांच्या सूचिग्रंथांतून आढळतो, पण ते ग्रंथ अजून प्रसिद्ध नाहींत. बनारसीदासानें शृंगाररसमय काव्यांची रचना थोडीबहुत केली पण त्यानें आपले ग्रंथ यमुनाप्रवाहांत सोडून दिले. संस्कृतमध्यें आणि प्राकृतमध्यें जैनांच्या शृंगारिक कृती अनेक सांपडतात. मोठमोठ्या मुनींच्याहि ग्रंथांत शृंगाररस थबथबलेला दिसतो. असें असतां हिंदी जैन कवींनींच शृंगाररसाचा त्याग कां करावा? असा प्रश्न उपस्थित करून नाथुरामप्रेमी उत्तर देतात कीं हिंदी ग्रंथ ज्या काळांत झाले त्या वेळेस रसपरिपाक करणें किंवा वाङ्मय प्रसविणें हें जैनांचें ध्येय नव्हतें, तर ज्ञानाचा प्रसार करणें व धर्मरक्षण करणें हें ध्येय होतें. नाथुरामाचें हें मत वरवर ग्राह्य आहे. कांकीं, जेव्हां लोकांच्या भाषेंतच बदल झाला तेव्हां लोक पूर्वजांच्या भाषेंतील ग्रंथांस पारखे झाले, आणि त्यामुळें संप्रदायाचें अवश्य ज्ञान देण्याची आवश्यकता असल्यामुळें लोकांची प्रवृत्ति झाली असावी. हेंच कारण सर्व संस्कृतोद्भव चालू भाषांतील वाङ्मय परमार्थविषयक झालें याचेंहि आहे, तथापि हें एकच कारण नाहीं. दुसरीं जीं अनेक कारणें होतीं त्यांचें विवरण अन्यत्र होईल, व हिंदीजैनग्रंथस्वरूपनिश्चयास तीं देखील असणें शक्य आहे.

हिंदी जैन ग्रंथकार शृंगारिक कवितेशीं अस्पृष्ट होते असें मात्र नाहीं. स्त्रियांचें नखशिखांत वर्णन करणारे आणि नानाविध शृंगारांनीं भरलेल्या आदिपुराणासारख्या ग्रंथांचे अनुवाद करण्यांत त्यांनीं संकोच बाळगला नाहीं.

जैन कवींमध्यें उच्च प्रकारची कविता लिहिणारे थोडे होते असें रा. प्रेमी कबूल करतात. जैनांतील श्रेष्ठ कवि

बनारसीदास होय. रूपचंद, भूधरदास, भगवतीदास, आनंदघन यांसहि हिंदी जैन कवींत उच्च पद मिळेल. दीपचंद द्यानतरायमाल, यशोविजय, वृंदावन बुलाकीदास, दौलतराम बुधजन हे जैनांत दुय्यम प्रकारचे कवी ठरतील. यांची संख्या देखील थोडीच आहे. " घरोघरीं झाले कवी " या न्यायानें तिसऱ्या. वर्गाच्या कवींचा भरणा विपुल आहे. जे उच्च वर्गातले कवी मोडतात त्यांनीं प्रायः अशा विषयावर कविता केली कीं त्यांचे ग्रंथ सामान्यांस समजणें कठिण आहे. या कवींनीं आपलें कवित्व कथाग्रंथ अगर चरित्रें लिहिण्यासाठीं उपयोगिलें असतें तर त्याचा बराच उपयोग होता. तथापि चरित्रें पाहिलीं तर मनोवेधक आहेत असें नाहीं. "पार्श्वपुराण" म्हणून एक चरित्रग्रंथ आहे व तो उच्च समजल्या जाणाऱ्या कवीनें रचला आहे, पण त्यांत स्वर्ग, त्रैलोक्य, कर्मप्रकृति, गुणस्थानें इत्यादिकांचें विशेष वर्णन केल्याशिवाय कवीस राहवलें नाहीं; आणि त्यास चरित्रग्रंथ म्हणण्यापेक्षां तात्विक ग्रंथ म्हटल्यास अधिक सयुक्तिक होईल. पंडित नाथुराम म्हणतात कीं तुलसीदासरामायणासारख्या मोहक ग्रंथास जैन समाज मुकला आहे, आणि शीलकथा, दर्शनकथा आणि खुशालचंदजींचें पद्मपुराण यासारख्या रद्दी आणि निःसत्व कविता पढतां पढतां जैन समाज चांगली कविता म्हणजे कशी असते हेंहि कदाचित् विसरून गेला असावा.

गद्यलेखकांत त्याचप्रमाणें टीकाकारांत तोडरमल्ल श्रेष्ठ आहे. जयचंद, आत्माराम नेणसीमूता असे कांहीं चांगले लेखक होऊन गेले. सदासुख भागचंद, दौलतराम, जगजीवन, देवीदास या लेखकांस मध्यम प्रतीचे लेखक म्हणतां येईल. बाकी सर्वसाधारणच आहेत. गद्यग्रंथांत श्वेतांबरीय ग्रंथ प्रायः नाहींतच म्हटलें तरी चालेल. मुनि आत्मारामजींचे जे कांहीं ग्रंथ आहेत ते अपवादादाखल समजावेत. श्वेतांबरी ग्रंथ जितके उपलब्ध आहेत त्यांत कथाग्रंथच विशेष आहेत व त्यांत तात्त्विक चर्चा फारच कमी आहे.हिंदी जैन वाङ्मयासंबधीं सर्व साधारण विवेचन केल्यानंतर आतां तेराव्या शतकापासूनचें वाङ्मय व वाङ्मय लेखक यांची माहिती पुढें दिलेली आहे.

तेरावें शतक.—धर्मसूरि याचा जम्बुस्वामी रासा नांवाचा ग्रंथ पाटणच्या सुप्रसिद्ध जैन पुस्तकालयांतील ग्रंथसंग्रहांत उपलब्ध झाला आहे. यासंबंधीं चिम्मनलाल दलाल एम. ए. यांनीं असें म्हटलें आहे कीं यांतील भाषा गुजराथी असून हा गुजराथी भाषेंतील पहिला ग्रंथ होय. पण सूक्ष्म विचार केल्यास या ग्रंथांतील भाषा चंदाच्या वेळच्या हिंदुस्थानी भाषेशीं अधिक निकटवर्ति आहे असें दिसतें. हा ग्रंथ सन १२६२ मध्यें लिहिला गेला असावा.

विजयसेनसूरिः—पाटणच्या संघवीपाडाच्या ग्रंथभांडारांत विजयसेनसूरींचा 'रेवंतगिरीरासा' नामक ग्रंथ सांपडला आहे. विजयसेनसूरींचा शिष्य वस्तुपाल मंत्री यानें संवत १२८८ मध्यें ज्या वेळीं गिरनारसंघ स्थापन केला त्या वेळीं हा ग्रंथ विजयसेनानें लिहिला असावा. या ग्रंथांत गिरनारचें व तेथील जैनमंदिराच्या जीर्णोद्धाराचें वर्णन आहे. या रासामधील भाषेलाहि दलालांनीं गुजराथी म्हणून संबोधलें आहे पण ती प्राचीन हिंदी भाषा आहे.

विनयचंद्रसूरिः—याचा 'नेमिनाथ चउपाई' नांवाचा पद्यमय ग्रंथ पाटणच्या ग्रंथभांडारांत सांपडला आहे. याचे इतर ग्रंथ म्हणजे मल्लिनाथ महाकाव्य, पार्श्वनाथचरित, कल्पनिरुक्त हे होत. याचा 'उवडासमाला कहाणय छप्पय' हा पदसंग्रहवजा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

चौदावें शतकः—या शतकांतील ग्रंथकारांची संख्या थोडी आहे. कित्येक ग्रंथांच्या कर्त्यांचीं नांवेंच उपलब्ध नाहींत. 'सप्तक्षेत्रिरास' नांवाचा ग्रंथ ( सन १३२७ चा ) उपलब्ध झाला आहे पण त्याचा कर्ता कोण हें निश्चित नाहीं. या ग्रंथांत, जिनमंदिर, जिनप्रतिमा,साधु, साध्वी, ज्ञान, श्रावक अगर श्राविकारूप इत्यादि सात पुण्यक्षेत्रांच्या उपासनांचें वर्णन आहे. यांत गुजराथी शब्द बरेच आले असले तरी ग्रंथांतील भाषा प्रधानतः प्राचीन हिंदी आहे.

अंबदेवः—सं. १३७१ मध्यें अनहिलपट्टणच्या समरासंघपतीनें शत्रुंजय तीर्थाचा अगणित पैसा खर्च करून उद्धार केला. त्याला अनुलक्षून अंबदेवानें संघपति समरारासा नांवाचा ग्रंथ लिहिला. या ग्रंथांत वास्तविक गुजराथी शब्दांचा भरणा अधिक असावयाचा पण राजस्थानी भाषेंतील शब्दप्रयोगच अधिक आले आहेत. त्यावरून या ग्रंथाच्या कर्त्याला राजस्तानची माहिती असावी असें वाटतें. याच्या ग्रंथाची भाषा साधी व सुरेख आहे.

याशिवाय जैनाचार्य मेरुतुंगाच्या प्रबंधचिंतामणि नामक एका ऐतिहासिक ग्रंथांत मधून मधून अपभ्रंश अगर हिंदी भाषेंतील दोहे दृष्टीस पडतात. या शतकांत 'कच्छुलिरासा' सारखे आणखी कांहीं छोटे मोठे ग्रंथ निर्माण झाले असतील पण ते उपलब्ध नाहींत.

पंधरावें शतकः—संवत १४१२ मध्यें विजयभद्र नामक श्वेतांबर साधूनें 'गौतमरासा' नांवाचा ग्रंथ लिहिला. हा हल्लीं छापण्यांत आला आहे. पण तो अशुद्ध आहे.

विद्धणु—यानें संवत १४२३ मध्यें 'ज्ञानपंचमी चउपाई' नांवाचा ग्रंथ लिहिला. या ग्रंथाची भाषाहि प्राचीन हिंदीच आहे.

दयासागरसूरिः—यानें संवत १४८६ मध्यें 'धर्मदत्तचारित्र' नांवाचा ग्रंथ लिहिला.

सोळावें शतक, ईश्वरसूरिः—शांतिसूरीचा शिष्य ईश्वरसूरि यानें मांडलगढच्या नासिरुद्दीन राजाच्या कारकीर्दीत ( १५५५–१५६९ ) १५६१ सालीं लिहिला. या ग्रंथाची रचना फार सुंदर आहे. भाषेंत प्राकृत व अपभ्रंश भाषेचें मिश्रण आहे.

संवेगसुंदरः—यानें संवत १५४८ मध्यें सारसिखामनरासा ' हा ग्रंथ लिहिला. हा इंदोरच्या यति माणिकचंदाच्या भांडारामध्यें उपलब्ध झाला आहे. या ग्रंथांत नीतिविषयक विचार ग्रथित केले गेले आहेत. पद्यसंख्या २५० आहे. या ग्रंथाची भाषा गुजराथीहिंदीचें मिश्रण असून, ग्रंथ साधारण आहे.

गौरवदासः—यानें सं. १५८१ मध्यें यशोधरचरित्र ग्रंथ लिहिला.

ठाकुरसीः—या कवीनें 'कृपणचरित्र' नांवाचें एक छोटें पण सुंदर व प्रासादिक काव्य लिहिलें. तें मुंबईच्या दिगंबर जैन मंदिरांतील सरस्वती भांडारांत उपलब्ध झालें आहे. या ग्रंथांत कृपण माणसाचें चरित्र देऊन कुटुंबी माणसानें आपल्या संपत्तीचा आनंदानें उपभोग घ्यावा असें तात्पर्य सांगितलें आहे.

बालचंदः—यानें सं. १५७८ मध्यें 'रामसीताचरित्र' नांवाचें काव्य लिहिलें.

सत्रावें शतकः—या शतकामधील पुष्कळ जैन ग्रंथ उपलब्ध आहेत. या शतकामध्यें हिंदी भाषेची फार उन्नति झाली. तुळशीदास कवि याच शतकामध्यें जन्मास आला.

बनारसीदासः—या शतकांतील सर्वश्रेष्ठ ग्रंथकार म्हणजे बनारसीदास होय. जैनांत याच्या इतका उत्तम कवि झाला नाहीं असें म्हटलें तरी चालेल. हा आग्रा येथें रहाणारा श्रीपाल वैश्य होता. याचा जन्म सं. १६४३ मध्यें माघ शुद्ध ११ स जैनापूर येथें झाला. याचा बाप खरगसेन हाहि श्रेष्ठ कवि होता. हा प्रथम श्वेताम्बरपंथाचा अनुयायी होता, पण पुढें त्यानें दिगंबरपंथाचा स्वीकार केला. आचारापेक्षां तत्वज्ञानाकडे त्याचा ओढा अधिक त्यामुळें आचाराचें स्तोम माजविणाऱ्यांचा याच्यावर घुस्सा झाला असावा यांत नवल नाहीं. मेघविजय नामक श्वेतांबरपंथी उपाध्यायानें युक्तिप्रबोध नांवाचें प्राकृत नाटक लिहून त्यांत बनारसीदासावर सडकून टीका केली आहे. त्यावरून त्याच्या काळीं बनारसीला बरेच शत्रू होते असें दिसतें.

बनारसीदासाचे बनारसीविलास, नाटकसमयसार, अर्द्धकथानक व नाममाला हे चार ग्रंथ महत्वाचे होत. यांपैकीं पहिले तीन छापून प्रसिद्ध आहेत. बनारसीविलासांत ६०१७० लहानमोठ्या पद्यांचा संग्रह आहे. यांतील पद्यें अत्यंत सुंदर व मनाला तन्मय करून टाकणारीं आहेत. उदाहरणार्थः—

' एकरूप हिंदु तुरुक दुजी दशा न कोइ ।
मनकी दुविधा मानकर भय एकसो दोइ ॥
दोउ, भुले भरनमे, करे ववनकी टेक ।
' रामराम ' हिंदू कहे, तुरक 'सलामालेक' ॥
इनके पुस्तक वांचिए, वे हू पढे कितेव ।
एक वस्तुके नामद्वय जैसे ' शोभा ' वेव ॥
तिन कौं दुविधा-जे लखै रंग विरंगी चाम ।
मेरे नैनन देखिए, घटघट अंतरराम ॥
यहै गुप्त यह है प्रगट यह बाहर यह माहि ।
जब लग यह कछु नहि रहा तब लग यह कछु माहि ॥

बनारसीदासाचा दुसरा ग्रंथ 'समयसार' नाटक हा आहे. भगवान कुंदकुंदाचार्यांचा 'समयसार' नांवाचा एक प्राकृत भाषेमधील ग्रंथ आहे, व त्याच्यावर अमृतचंद्राचार्यांची टीका आहे. या दोहोंच्या आधारें बनारसीदासानें नाटक रचलें आहे. हें नाटक फारच सुंदर साधलें आहे. दोन्हीं संप्रदायांमध्यें या ग्रंथाची मान्यता आहे. जैनधर्मसिद्धान्ताची ज्यांना यत्किंचित् माहिती आहे त्यांनीं हें नाटक अवश्यमेव वाचावें. नाटकांतील भाषा उच्च प्रकारची व सुंदर आहे. पद्येंहि सुरस व सार्थी आहेत. उदाहरणार्थ खालील पद्य पहा—

' भैया जगवासी, तू उदासी व्हैकै जगतसौं ।
एक छै महीना उपदेस मेरो मानु रे ।
और संकल्प विकल्प के विकार तजि ।
बैठिके एकंत मन एक दौर आनु रे ।
तेरौ घट सर्‌तामे तूही व्है कलम वाकौ ।
तूहि मधुकर व्है सुवास पहिचानु रे ।
प्रापति न व्है है कछु ऐसैं तूं विचारतु है ।
सही व्है है प्रापति सरूप यौंहि जानु रे ।.

बनारसीदासाचा तिसरा ग्रंथ ' अर्धकथानक ' होय. यांत त्यानें आत्मचरित्र दिलें आहे. प्राचीन काळीं लोकांनां इतिहासाची व आत्मचरित्राची गोडी नव्हती असा आक्षेप घेणाऱ्यांच्या तोंडावर हा ग्रंथ फेंकून देण्यासारखा आहे. या ग्रंथांत बनारसीनें आपल्या वयाच्या ५५ व्या वर्षापर्यंतचा इतिहास दिला आहे आपल्या अंगच्या गुणांचे व अवगुणांचें निःपक्षपातीपणानें वर्णन केलें आहे. आपल्या आयुष्यांतील अनेक बऱ्या वाईट प्रसंगाची हकीकत या ग्रंथांत स्पष्टपणें व सुंदर तऱ्हेनें दिली आहे. आग्र्यामध्यें १६७३ सालीं प्लेग झाला असतां लोकांची किती हलाखीची स्थिति झाली होती त्याचें हृदयद्रावक शब्दांत खालीलप्रमाणें वर्णन केलें आहे—

इसही समय ईति विस्तरी परी आगरे पहिली मरी ।
जहाँ तहाँ सब भागे लोग, परगट भया गांठका रोग ॥
निकसै गांठी मरैं छिनमाहि, काहुंकी बसाय कछु नाहीं ।
चुहे मरे वैद्य मर जाहिं भयसों लोग अन्न नहि खाहिं॥

त्याचा मुलगा धनमल वारल्यावेळचा प्रसंग त्यानें दोन ओळींत वर्णन केला आहे.

धनमल घनदल उडि गये कालपवन संजोग।
मातपिता तरुवर तए लहि अल्प सुत-सोग॥

या ग्रंथाची भाषा सुंदर व वर्णनें स्वाभाविक, हृदयस्पर्शी आहेत. बनारसीचा चौथा ग्रंथ ' नाममाला ' होय. हा हिंदी भाषेंत दोहराबद्ध कोश आहे. हा छापलेला नाहीं. याशिवाय

'शृंगाररससंग्रह' नांवाचा एक ग्रंथ तयार केला होता, पण त्याला संसाराचा वीट आल्यामुळें तो यमुनेंत बुडवून टाकला.

कल्याणदेवः—हा जिनचंद्रसूरीचा शिष्य होता. यानें 'देवराज वछरास चडपाई' नामक ग्रंथ संवत १६४३ मध्यें लिहिला. यांत दोन राजपुत्रांची हकीकत आहे. रचना साधारण आहे. भाषेंत गुजराथी व हिंदीचें मिश्रण आहे.

मालदेवः—हा वडगच्छाच्या भावदेवसूरीचा शिष्य. याचे 'भोजप्रबंध' व 'पुरंदर कुमर चउपई' हे दोन ग्रंथ उपलब्ध आहेत. या दोन्ही ग्रंथांची रचना चांगली आहे. भोजप्रबंधाची भाषा प्रौढ आहे. यांत गुजराथी व अपभ्रंश शब्दांचें मिश्रण आहे. हा प्रतिभाशाली कवि होता.

हेमविजयः—हा सुप्रसिद्ध आचार्य हरिविजयसूरीचा शिष्य व विद्वान कवि होता. यानें विजयप्रशस्ति, कथारत्नाकर इत्यादि संस्कृत ग्रंथ लिहिले. हिंदीमध्यें सुद्धां यानें थोडीफार काव्यरचना केली आहे.

रूपचंदः—या बनारसीदासाच्या समकालीन कवीचा उल्लेख, आत्मचरितांत व नाटकसमयसारांत, बनारसीनें 'जैनधर्माचा वडा विद्वान' या नांवानें केला आहे. यानें 'परमार्थी दोहाशतक' नांवाचा पद्यसंग्रह रचिला आहे. यांतील दोहे फार सुंदर आहेत. याचा दुसरा ग्रंथ 'गीत परमार्थी' असून तो उपलब्ध नाहीं. याचें 'मंगलगीतप्रबंध' नामक छोटें काव्य जैन समाजांत फार लोकप्रिय आहे.

पांडे रायमलः—हा अनंतकीर्तीचा शिष्य होता. यानें इसवी सन १६१६ मध्यें लिहिलेला 'हनुमच्चरित्र' नांवाचा एक पद्यमय ग्रंथ लिहिला आहे. बनारसीदासानें ज्याचा मार्मिक विद्वान या नांवानें उल्लेख केला तोच हा रायमल्ल किंवा नाहीं याबद्दल निश्चित सांगतां येत नाहीं. याच्याच नांवाचा दुसरा एक कवि होऊन गेला. त्यानें सं. १६६७ मध्यें भक्तामरकथा नांवाचा संस्कृत ग्रंथ लिहिला. तसेंच भविष्यदत्तचरित्र व सीताचरित्र हे दोन्ही ग्रंथ यानेंच लिहिले असून ते छंदोबद्ध आहेत.

कुंवरपालः—हा बनारसीदासाचा मित्र व विद्वान कवि होता. याचा स्वतंत्र असा कोणताच ग्रंथ उपलब्ध नाहीं. बनारसीदासाच्या सूक्तमुक्तावलींत याचीं कांहीं पद्यें आलीं आहेत; त्यावरून तो उच्च दर्जाचा कवि होता असें दिसतें.

पांडे जिनदासः—याचे जंबूचरित्र व ज्ञानसूर्योदय हे दोन पद्यग्रंथ व कांहीं फुटकळ पदें प्रसिद्ध आहेत.

पांडे हेमराजः—पंडित रूपचंदाचा हा शिष्य. याचे प्रवचनसारटीका, पंचास्तिकायटीका, भाषाभक्तामर हे तीन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. प्रवचनसारटीका यानें सं. १७०९ मध्यें लिहिली. पंचास्तिकायटीका व प्रवचनटीका या दोन ग्रंथांना जैन समाजांत फार मान मिळतो. याची गद्य भाषा सरळ व स्पष्ट आहे. उदाहर० 'जो जीव मुनि हुवा चाहे है सो प्रथम ही कुटुंब लोकको पूछि आपके छूटावै है बंधु लोगनिसो इसी प्रकार है अहो रसि जनके शरीरके तुम भाइबंध हौ इसि जनका आत्मा तुम्हारा नाहीं यौ तुम निश्चय करि जाओ.

'भाषाभक्तामर' हा मानतुंगसूरींच्या संस्कृत ग्रंथाचा हिंदी अनुवाद आहे व तो सुंदर असून फार लोकप्रिय आहे. यांतील पद्यें फार गोड आहेत. याशिवाय, गोम्मटसार, नयचक्रकी वचनिका, चौराशी बोल इत्यादि ग्रंथ त्यानें लिहिले आहेत.

उदयाराजजतीः—यानें राजनीतिसंबंधीं वरेच दोहे लिहिले आहेत.

विद्याकमलः—यानें १६६९ ( संवत ) पूर्वी 'भगवती गीता' ग्रंथ लिहिला.

मुनिलावण्यः—याचा 'रावणमंदोदरीसंवाद' नांवाचा ग्रंथ आहे.

गुणसूरिः—याचा दोलासागर नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

लूणसागरः—यानें 'अंजनासुंदरी'संवाद नामक ग्रंथ लिहिला आहे.

१८ वें शतकः—भया भगवतीदास हा बनारसीदासजीप्रमाणें आध्यात्मिक व प्रतिभाशाली कवि होता. याच्या जन्माची व मृत्यूची नक्की तारीख माहीत नाहीं. तरी पण १७५५ सालच्या सुमारास प्रसिद्धीस आला असावें असें दिसतें. काव्यशास्त्राचा व अलंकारशास्त्राचा यानें मार्मिक अभ्यास केला होता. याच्या कवितांमध्यें प्रास, यमक इत्यादींची रेलचेल आहे. अंतरालापिका, बहिरालापिका व चित्रबद्ध काव्येंहि यानें लिहिलें आहे. याच्या काव्यांत धार्मिक भाव ओतप्रोत भरलेला आढळतो. जैन धर्मांतील तत्त्वांचें यानें ठिकठिकाणीं विवरण केलेलें आहे.

भूधरदासः—हा आग्रा येथील राहणारा, खंडेलवाल जातीचा कवि. याच्याहि बाबतींत कालाची अनिश्चितताच आहे. यानें जैन शतक, पार्श्वपुराण, पदसंग्रह असे ग्रंथ लिहिले. जैनशतक या काव्यांत कविता, दोहे, छप्पय, सवैया मिळून १०७ पद्यें आहेत. प्रत्येक पद्याचा स्वतंत्र विषय आहे. या ग्रंथाला सुभाषितसंग्रह असें म्हणण्यास हरकत नाहीं. हा ग्रंथ फार लोकप्रिय आहे. दुसरा ग्रंथ पार्श्वपुराण होय. या ग्रंथाला जैन समाजांत फार मान्यता मिळाली आहे. यामधील स्वर्ग, नरक, लोक, गुण, स्थान इत्यादींचें जें वर्णन आलें आहे तें फाजील विस्तृत असून कंटाळवाणें होतें. तरी पण या काव्यांत सौंदर्य व प्रसाद हे गुण जागजागीं आढळतात. याच्या ग्रंथांतील पद्याचा एक मासला खालीं दिला आहे त्यावरून त्याची कविता किती प्रसन्न असते हें दिसून येईल.

'यथा हंसके वंसकौं चाल न सिखवे कोइ ।
त्यौं कुलीन नर नारिकौ सहज नमन गुण होई ॥
जिन–जननी रोमांच तन, जगीं मुदित मनजान ।
किधौं संकटक कमलिनी विकसी निसि अवसान ॥
पदरे सुभ आभरन तन सुंदरवसन सुरंग ।
कलप बेल जंगम किधौं चली सखीजनसंग ॥

याचा तिसरा ग्रंथ पदसंग्रह हा होय. या पदसंग्रहांत एकंदर ८० पदें आहेत. कालिंगडा रागांतील एक पद खालीलप्रमाणें आहे—

' चरखा चलता नाहीं चरखा हुआ पुराना ॥ टेक ॥
पग खूंटे द्वय हालन लागे, उर मदरा खखराना ।
छीदी हुई पाखंडी पसली फिरै नहीं मनमाना ॥ १ ॥
रसना तकलीने बल खाया सो अब कैसे खूंटे ।
सबद सूत सुधा नहिं निकसे घडी घडी पल टूटे ॥ २ ॥

द्यानतरायः—हा आग्रवाल जातीचा व आग्रा येथील राहणारा. याचा जन्म १६७७ सालीं झाला. विहारीदास नांवाच्या एका गृहस्थाला यानें गुरु करून घेतलें. १७१४ सालीं याचा द्यानतविलास हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. हा छापून प्रसिद्ध झाला आहे. याच्यांत ३३३ पदें आहेत. याशिवाय धर्मविलास नामक एक ग्रंथहि त्यानें लिहिला. तो उत्तम कवि होता असें त्याच्या पदावरून दिसतें. कठिण विषय सोप्या भाषेंत लोकांना समजेल अशा तऱ्हेनें लिहिण्यांत याचा हातखंडा होता. याच्या काव्यांत सृष्टिवर्णन सुंदर रीतीनें केलेलें आढळतें. उदाहरणार्थ आग्रा शहराचें वर्णन खालीलप्रमाणें आहे.

' इधैं कोट, उधैं बाग, जमना वहै है बीच।
पच्छिमसौं पूरव लौं असीम प्रवाहसौं ।
अरमनी कसमीरी गुजराथी मारवारी ।
नरां सेती जामैं बहु देस बसैं चाहसौं ॥
रूपचंद बानारसी चंदजी भगौतीदास
जहां भले भले कवि द्यानत उछाहसौं ॥

जगजीवनः—हा अभयराज नामक प्रसिद्ध धनिकाचा मुलगा. याचें वाङ्मयावर फार प्रेम असे. याच्या प्रेरणेनें पुष्कळ जैन विद्वानांनीं ग्रंथ लिहिले. हा स्वतः विद्वान व बऱ्यापैकीं कवि होता. यानें बनारसी कवीचा कवितासंग्रह प्रकाशित केला. त्याप्रमाणें बनारसीच्या समयसार या नाटकावर चांगली टीका लिहिली.

हिरानंदः—जगजीवनाच्याच काळचा एक कवि. जगजीवनाच्या सांगण्यावरून त्यानें पंचास्तिकायसमयसाराचें पद्यांत भाषांतर केलें.

आनंदघनः—हा श्वेतांबर संप्रदायांतील एक महात्मा व आध्यात्मिक कवि होऊन गेला याची गुजराथी भाषेंत 'स्तवनावली ' प्रसिद्ध असून तींत २४ स्तोत्रें आहेत. तसेंच 'आनंदघनबहत्तरी' हा त्याचा ग्रंथ हिंदी भाषेंत आहे. या ग्रंथांतील पदांची रचना मर्मस्पर्शी आहे. याच्या पद्याचा मासला खालीलप्रमाणें आहे.

' जग आशा जंजीरकी गति उलटी कछु और ।
जकर्यौ धावत जगतमैं रहै छुटो इक ठौर ॥
आतम अनुभव फूलकी कोउ नवेली रीत ।
नाक न पकरै वासना कान गहै न प्रतीत ॥



यशोविजयः—हा श्वेतांबरांमधील प्रसिद्ध विद्वान होता. याचा जन्म १६१४ सालीं झाला व तो १६८९सालीं वारला. याला संस्कृत, प्राकृत, हिंदी व गुजराथी या चारी भाषा अवगत होत्या व चारी भाषांत त्याचीं कवनें आहेत. याचा ' यशविलास ' नांवाचा पदसंग्रह, ' सज्झायपद अने स्तवन संग्रह ' नांवाच्या मोठ्या पदसंग्रहांत छापलेला आहे. या शिवाय ' दिग्पट चौरासी बोल, ' 'सितपट चौरासी बोल ' हे ग्रंथहि छापून प्रसिद्ध आहेत.

विनयविजयः—यशोविजयाच्या काळचाच व यशोविजय याचा गुरुबंधु. यशोविजयाहूनहि संस्कृतमध्यें हा पारंगत होता. याचा ' नयकर्णिका ' नामक न्यायग्रंथ इंग्लिश टीकेसह छापण्यांत आला आहे. यशोविजयाच्या यशोविलासाप्रमाणेंच विनयविलास नांवाचा पदसंग्रह विनयविजयाचा असून तोहि प्रसिद्ध झालेला आहे.

बुलाकीदासः—हा गोयलगोत्री अग्रवाल जैन होता. आपल्या आईच्या सांगण्यावरून यानें ' भारतभाषा ' हा ग्रंथ श्रावकांना पांडवकथा समजण्यासाठीं लिहिला. या ग्रंथांतील श्लोकांची संख्या ५५०० आहे. श्लोकांची भाषासरणी मध्यम प्रकारची असून कोठें कोठें फारच सुंदर आहे.

किसनसिंहः—खण्डेलवाल जैन कवि यानें संवत १७८४ ( सन १७२८ ) मध्यें ' क्रियाकोश ' नांवाचा पद्यमय ग्रंथ लिहिला. या ग्रंथांत २९०० श्लोक आहेत. याशिवाय भद्रबाहुचरित्र, रात्रिभोजनकथा हे दोन ग्रंथहि त्यानें लिहिले.

शिरोमणिदासः—यानें संवत १७३२ मध्यें ' धर्मसार ' नांवाचा दोहा चौपाईवृत्तामध्यें लिहिला. या ग्रंथांतील कविता साधारण आहे.

रायचंद.—यानें सीताचरित नामक छंदोबद्ध ग्रंथ संवत १७१३ मध्यें लिहिला. या ग्रंथाची श्लोकसंख्या ३६००असून भाषा साधारण आहे.

मनोहरलालः—यानें आचार्य अमितगतीच्या 'धर्मपरीक्षा' नांवाच्या ग्रंथाचा अनुवादात्मक ग्रंथ लिहिला.

बोधराजगोदीकाः—याचा ' सम्यक्त्वकौमुदी ' नांवाचा ग्रंथ आहे. याशिवाय प्रीतंकरचरित्र, धर्मसरोवर, कथाकोश, प्रवचनसार, भावदीपिकावचनिका और ज्ञानसमुद्र इत्यादि ग्रंथ लिहिले. मानवदीपिकावचनिका सोडून इतर सर्व ग्रंथ पद्यमय आहेत.

खुशालचंदकालाः—खंडेलवाल जैन कवि. यानें मोठमोठ्या पुराण व धर्मग्रंथांचें भाषांतर केलें आहे. हरिवंशपुराण, उत्तरपुराण, धन्यकुमारचरित्र, व्रतकथाकोश, जम्बूचरित्र, चोवीसी पूजापाठ, इत्यादि ग्रंथ याचे होत. कविता अगदींच साधारण आहे.

रूपचंदः—याची बनारसीकृत नाटकसमयसारावर टीका असून ती फार सुंदर आहे.

नेणसीमुताः—ओस्वाल जातीचा श्वेतांबर जैन. हा जोधपूरचे मोठे महाराज जसवंतसिंग यांचा दिवाण होता. यानें

मारवाडी भाषेंत राजस्तानचा एक अमोलिक इतिहास लिहिला आहे. या ग्रंथांत रजपुतांच्या ३१ जातींचा इतिहास आला असून, राजस्तानच्या इतिहासासंबंधींची इतकी अमूल्य माहिती टॉडच्या राजस्थानच्या इतिहासांत देखील आढळत नाहीं.

दौलतरामः—खण्डेलवाल जैन, जयपूरचा रहाणारा. यानें आदिपुराण, पद्मपुराण, हरिवंशपुराण इत्यादि पुराणें गद्यांत भाषांतर केलीं. याशिवाय, योगीन्द्रदेवाच्या परमात्मप्रकाश, व श्रीपालचरित्र या ग्रंथांचेंहि भाषांतर केलें. पं. तोडरमल्लजीची 'पुरुषार्थसिध्दुपायकी भाषाटीका' अपुरी राहिली होती, ती यानें पुरी केली.

याशिवाय खड्गसेन ( ग्रंथ–त्रिलोकदर्पण ); जगतराय ( आगमविलास, सम्यक्त्वकौमुदी, पद्मनंदिप्रशस्ति ); जिनहर्ष (श्रेणिकचरित्र); देवीसिंह ( उपदेश सिद्धान्तरत्नमाला, छंदोबद्ध ); जीवराज ( परमात्मप्रकाशवचनिका ); ताराचंद (ज्ञानार्णव-छंदोबद्ध); विश्वभूषणभट्टारक (जिनदत्तचरित्र-छंदोबद्ध ); धर्ममंदिरगणि ( प्रबोधचिंतामणि, चोपिमुनि चरित्र ) इत्यादि जैन ग्रंथकार या शतकांत झाले.

एकोणीसावें शतक, तोडरमल्लः—१९ व्या शतकामधील सर्वांत प्रसिद्ध लेखक पंडित तोडरमल्ल हा होय. दिगंबरसंप्रदायामध्यें तर याला ऋषितुल्य मानतात. अवघ्या बत्तीस वर्षांच्या आयुष्यांत त्यानें मोठमोठे ग्रंथ निर्माण करून, जैन तत्त्वज्ञानाचा थांबता गाडा पुन्हां सुरू केला. प्राकृत अगर संस्कृत भाषेमध्यें जें जैनांचें तत्त्वज्ञान होतें तें सामान्य लोकांनां समजेल अशा हिंदी भाषेमध्यें लिहून, त्यानें जैनतत्त्वज्ञानाचें लोण खालच्या समाजापर्यंत पोहोंचविलें. हा जैनधर्माचा असाधारण विद्वान होता. हा जयपूर येथें रहाणारा खण्डेलवाल जैन जातीचा पंडित होता. याचा सर्वांत प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे 'गोम्मटसारवचनिका' हा होय. यामध्यें क्षपणासार व लब्धिसार यांचाहि अंतर्भाव झाला आहे. या ग्रंथाची श्लोकसंख्या ४५ हजार आहे. हा ग्रंथ नेमिचंद्राच्या प्राकृत गोम्मटसारावरील टीका होय. यांत जैनधर्माच्या कार्यसिद्धांताचें विस्तृत विवेचन आलें आहे. दुसरा ग्रंथ 'त्रैलोक्यसारवचनिका' हा होय. हा ग्रंथहि प्राकृत ग्रंथाचा अनुवाद आहे. यांत जैनमताप्रमाणें पृथ्वीचें व खगोलाचें वर्णन आहे. याची श्लोकसंख्या १०–१२ हजार आहे. तिसरा ग्रंथ गुणभद्रस्वामीच्या संस्कृत 'आत्मानुशासनाचा' हिंदींत अनुवाद होय. यांत अत्यंत अमोलिक असा आध्यात्मिक उपदेश आला आहे. याशिवाय पुरुषार्थसिद्धुपायकी वचनिका व मोक्षमार्गप्रकाशक हे दोन अपुरे ग्रंथ आहेत. मोक्षमार्गप्रकाशक हा ग्रंथ अगदीं स्वतंत्र असून तो फार अमोलिक आहे.

जयचंद्रः— तोडरमल्लाच्या खालोखाल पंडित जयचंद्राचा दुसरा नंबर येतो. हा खंडेलवाल जैन. यानें सर्वार्थसिद्धि ( संवत १८६१ ); परीक्षामुख ( न्याय ) ( संवत १८६३); द्रव्यसंग्रह ( संवत१८६३ ); स्वामी कार्तिकेयानुप्रेक्षा ( १८६६ ); आत्मख्यातिसमयसार ( १८६४ ); देवागम ( न्याय ) (१८६६)अष्टपाहुड (१८६७); ज्ञानार्णव (१८६९); भक्तामरचरित्र ( १८७० ); सामायिक पाठः मतसमुच्चय; पत्रपरीक्षा; चंद्रप्रभकाव्यके द्वितीयसर्गका न्यायभाग; इत्यादि ग्रंथ लिहिले आहेत. हे सर्व ग्रंथ संस्कृत अगर प्राकृत ग्रंथांचा हिंदी अनुवाद आहे. याच्या ग्रंथांची भाषा चांगली व जोरदार आहे.

वृंदावनः—हा गोयलगोत्री अग्रवाल जैन. याचा जन्म संवत १८४८ मध्यें झाला. हा उत्तम कवि होता. याचा मुख्य ग्रंथ 'प्रवचनसार' हा होय. हा प्राकृत ग्रंथाचा अनुवाद आहे. 'चतुर्विंशतिजिनपूजापाठ' व 'तीस चौवीसी पूजापाठ' हे दोन आचारप्रधान ग्रंथ आहेत. या ग्रंथांत शब्दालंकाराकडेच विशेष लक्ष दिलेलें दिसतें. चौथा ग्रंथ 'छंदशतक' हा होय. हा फार उपयुक्त ग्रंथ आहे. यांच्या शिवाय त्याच्या स्फुटकवितांचा संग्रहहि प्रसिद्ध आहे.

यति ज्ञानचंद्रः—हा उदयपुर संस्थानांतील मॉंडलगट या गांवचा रहाणारा. राजस्तानच्या इतिहासाचें याला पूर्ण ज्ञान होतें, व कर्नल टॉडला त्याच्या ग्रंथलेखनांत याचा फार उपयोग झाला. टॉड तर याला आपला गुरु मानीत असे. हा कवि असून याचा फुटकळ पद्यसंग्रह प्रसिद्ध आहे.

भूधरमिश्रः—आग्र्याच्या जवळ शाहगंज येथें राहणारा ब्राह्मण. पुरुषार्थसिद्धुपाय ग्रंथ वाचून त्यांतील अहिंसातत्त्वाच्या विवेचनानें जैन धर्मावर त्याची फार मर्जी बसली. त्यानें या ग्रंथावर एक सुरेख टीका लिहिली आहे. यानें आपला गुरु पंडित रंगनाथजी यांच्यापाशीं जैन धर्माचें अध्ययन केलें. 'चर्चासमाधान' नांवाचा याचा एक ग्रंथ प्रसिद्ध आहे. हा चांगला कवि होता, हें खालील कवितेवरून दिसून येतें.

> नमो आदि करता पुरुष, आदिनाथ अरहंत।
> द्विविध धर्मदातार धुर महिमा अतुल अनंत ॥ १ ॥
> स्वर्गभूमि पातालपति जपत निरंतर नाम।
> जा प्रभुके जस हंसको जग पिंजर विश्राम ॥ २ ॥

बुधजनः—याचें नांव विरधी चंद्रजी असून हा जयपूरचा राहणारा खंडेलवाल जैन. याचे तत्त्वार्थ--बोध; बुधजनसतसई; पंचास्तिकाय व बुधजनविलास' हे चार ग्रंथ प्रसिद्ध आहेत. हे ग्रंथ अनुक्रमे संवत १८७१ १८८१, १८९१, १८९२ मध्यें लिहिले.

दीपचंदः—हा जयपूर येथील कशलीवाल गोत्रीय खंडेलवाल जैन. यानें बरेच ग्रंथ लिहिले पण त्यांपैकीं ज्ञानदर्पण, व अनुभवप्रकाश हे दोनच ग्रंथ प्रकाशित आहेत. पहिला पद्यांत व दुसरा गद्यांत आहे. ज्ञानदर्पणांतील पद्यरचना निर्दोष व सुंदर आहे. गद्यरचनाहि साधी, सरळ व हृदयस्पर्शी आहे. उदाहरणार्थ खालील उतारा पहा--

> 'इस शरीरमंदिरमे यह चेतनदीपक सासता रहै।
> मंदिर तौ छुटै पर सासता रतनदीप ज्यौंका त्यौं रहै॥

व्यवहारमें तुम अनेक स्वांग नटकी ज्यौं धरे । नट ज्यौंका त्यौं रहै । वह स्पष्ट भाव कर्मकी तौऊ कमलिनीपत्रकी नाई कर्मसौं न बंधैं न स्पर्शै ।

या दोन ग्रंथांशिवाय अनुभवप्रकाश, अनुभवविलास, आत्मावलोकन, चिद्विलास, परमात्मपुराण, स्वरूपानंद, उपदेशरत्न, इत्यादि ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

ज्ञानसार या ज्ञानानंदः—हा एक श्वेतांबरपंथाचा साधु होता. हा अहमदाबादेजवळ नेहमीं स्मशानांत पडून रहात असे असें म्हणतात. 'सज्झायपद अने स्तवनसंग्रह' या पदसंग्रहांत यानें केलेल्या 'ज्ञानविलास' व 'समय तरंग' या पद्यसंग्रहाचा समावेश करण्यांत आला आहे. या पद्याची रचना चांगली आहे. यानें आनंदघनाच्या चौवीसीवर एक गुजराथी टीका प्रसिद्ध केली असून ती छापलेलीआहे.

रंगविजयः—हा तपागच्छाच्या विजयानंदसूरींच्या समुदायापैकीं एकयति होता. यानें प्रार्थनापर व आध्यात्मिक पद्यें वरीच लिहिलीं आहेत. याचा पद्यसंग्रह अप्रकाशित आहे. या पदांची रचना सरळ व सुरस आहे. वैष्णव कवींनीं जशी राधाकृष्णावर शृंगारिक पद्यरचना केली त्या धर्तीवर यानेंहि राजीमति व नेमिनाथ यांच्या चरित्रांवर शृंगारिक पद्यरचना केली आहे. सवंत १८४९ मध्यें यानें एक ५५ कडव्यांचें गज्जल रचलें. त्यांत अहमदाबाद नगरचें वर्णन आहे.

कर्पूरविजय या चिदानंदः—हा संवेगी साधु. यानें पुष्कळ आध्यात्मिक पदें रचिलीं आहेत. हा स्वरशास्त्रांत पारंगत होता व यानें 'स्वरोदय' नामक एक ग्रंथ लिहिला आहे. याच्या पद्याची रचना अनुभवपूर्ण व मार्मिक आहे. हा गुजराथमध्यें रहात असल्यानें याच्या पद्यांत गुजराथी शब्दहि क्वचित् आढळतात.

टेकचंदः—याचे तत्वार्थकी श्रुतसागरी टीका की वचनता ( सं. १८३७ ); सुदृष्टितरंगिनी वचनिका ( १८३८ );षट्पाहुडवचनिका; कथाकोश ( छंदोबद्ध, ); बुधप्रकाश; वगैरे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

नथमल विमलालाः—याचे सिद्धांतसारदीपक (सं.१८२४); जिनगुणविलास; नागकुमारचरित्र ( १८३४ ); जीवंधरचरित्र ( १८३५ ); जंबुस्वामीचरित्र; इत्यादि पद्यमय ग्रंथ आहेत.

डालुरामः—हा माधवराजपुरनिवासी अग्रवाल.याचे गुरूपदेशश्रावकाचार; सम्यक्त्वप्रकाश इत्यादि ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

देवीदासः—खंडेलवाल बसवानिवासी जैन कवि. याचे सिद्धांतसारसंग्रहवचनिका ( १८४४ ),तत्त्वार्थसूत्रकी वचनिका इत्यादि ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

देवीदासः—झांशी जिल्ह्यांतील दुगोदहकेलगांवचा हा रहाणार. याचे ग्रंथ परमानंदविलास; प्रवचनसार; चिद्विलास वचनिका; इत्यादि आहेत.

सेवारामः—रजपूत कवि-ग्रंथ-हनुमच्चरित्र (छंदोबद्ध); शांतिनाथपुराण ( छंदोबद्ध ) व भविष्यदत्तचरित्र.

भारामलः—खरौआ जातीचा, फर्रुकाबाद येथें राहणारा कवि. याचे ग्रंथ-चारुदत्तचरित्र, सप्तव्यसनचरित्र, दानकथा, शीलकथा, रात्रिभोजन इत्यादि छंदोबद्ध ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

गुलाबरायः—याचा शिखरविलास ( सवंत १८४२ ) प्रसिद्ध आहे.

यांशिवाय भानसिंह—सुबुद्धप्रकाश; नंदलाल छावडा —मूलाचारकी वचनिका ( सं. १८८८ ); मन्नालालसांगाका चारित्रसारकी वचनिका ( १८७१ ); मनरंगलाल—चौविसी पूजापाठ ( १८५७ ), सप्तव्यसनचरित्र, सप्तर्षिपूजा; लालचंद-षट्कर्मोपदेश रत्नमाला ( १८१८ ), वरांगचरित्र, विमलानाथपुराण, शिखरविलास, सम्यक्त्वकौमुदी, आगमशतक; सेवागमशाह—चौविसी पूजापाठ, धर्मोपदेशक; यतिकुशलचंदगणि–जिनवाणीसार; हरजसराय–साधुगणमाला, देवाधिदेवरचना, देवरचना; क्षमाकल्याणपाठक—जीवविचारवृत्ति, साधुप्रतिक्रमणविधि, श्रावकप्रतिक्रमणविधि, सुमतिजिनस्तवन; विजयकीर्ति–श्रेणिकचरित्र; इत्यादि कवी होऊन गेले.

विसावें शतक,सदासुखः—या विसाव्या शतकांतील लेखकांमध्यें सदासुख याचा पहिला नंबर लागतो. याचा 'रत्नकरंडश्रावकाचार' हा ग्रंथ फार प्रसिद्ध असून त्या ग्रंथाची श्लोकसंख्या पंधरा सोळा हजार आहे. याचा दुसरा ग्रंथ 'अर्थप्रकाशिका' आहे. तत्वार्थसूत्राचें हें भाष्य आहे व हें गद्यांत आहे. 'भगवती आराधना' यावरील टीका, बनारसीकृत नाटकसमयसाराची टीका, नित्यपूजाटीका वगैरे ग्रंथ यानें लिहिले आहेत.

पन्नालाल चौधरीः—हा संस्कृत ग्रंथांचें भाषांतर करण्याबद्दल फार प्रसिद्ध आहे. यानें जवळ जवळ ३५ संस्कृत ग्रंथांचीं गद्य भाषांतरें केलीं आहेत व हे सर्व भाषांतरित ग्रंथ छापले आहेत. त्याचें भाषांतरित ग्रंथ—वसुनंदिश्रावकाचार सुभाषितार्णव, प्रश्नोत्तरश्रावकाचार,जिनदत्तचरित्र,तत्वार्थसार, सद्भाषितावली, भक्तामरकथा, आराधनासार, धर्मपरीक्षा, यशोधरचरित्र, योगसार, पांडवपुराण, समाधिशतक, सुभाषितरत्नसंदोह, आचारसार, नवतत्व, गोतमचरित्र, जंबुचरित्र, जीवंधरचरित्र, भविष्यदत्तचरित्र, तत्वार्थसारदीपका श्रावकप्रतिक्रमण, स्वाध्यायपाठ, इत्यादि.

भागचंदः—हा ग्वाल्हेरचा रहाणार ओसवाल,व दिगंबरपंथी जैन. हा अतिशय विद्वान् होता. यानें संस्कृत व प्राकृत अशा दोन्ही भाषेंत काव्यें लिहिलीं आहेत. ज्ञानसूर्योदय, उपदेशसिद्धांतरत्नमाला,अमितगति,श्रावकाचार,प्रमाणपरीक्षा, नेमिनाथपुराण यांच्यावर त्यानें गद्य टीका लिहिल्या आहेत. यानें केलेल्या पद्यांचा संग्रहहि प्रसिद्ध आहे.

दौलतरामः—हा सासनी येथील रहाणारा पल्लीवाल जैन. याचा शिंप्याचा धंदा असे असें म्हणतात. हा फार विद्वान् होता. गोम्मटसारांतील सिद्धांताचें हा फार मार्मिक तऱ्हेनें विवरण करीत असे. याचा छहढाला नांवाचा एक सुंदर

पद्यग्रंथ आहे. याच्यामध्यें जैन धर्माचें सर्व सार आलें आहे. याशिवाय त्याचा एक छोटा पद्यसंग्रहहि आहे.

मुनि आत्मारामः—हा श्वेतांबरपंथी विद्वान् होता. याचा जन्म विक्रमसंवत १८९३ मध्यें झाला. हा पंजाबमध्यें जन्मला. याची पाश्चात्य देशांतहि प्रसिद्धी आहे. याचे शिष्य बॅरिस्टर वीरचंद गांधी हे शिकागो येथील धर्ममहासभेंत प्रतिनिधि या नात्यानें गेले होते. यानें सर्व ग्रंथ हिंदींमध्यें लिहिले. पैकीं जैनतत्वादर्श, तत्वनिर्णयप्रसाद, अज्ञानतिमिरभास्कर हे प्रमुख ग्रंथ आहेत. याची भाषा पंजाबी मिश्रित हिंदी आहे. हा वादशूर असून इतर धर्मांचीं व संप्रदायांचीं तत्वें खंडन करण्याचा यानें प्रयत्न केला आहे. श्वेतांबरीयांनीं याचें स्मारक म्हणून एक सभा व एक दोन मासिकें चालविलीं आहेत.

यतिश्रीपालचंदः—हा बिकानेरचा रहाणार. यानें अतिशय परिश्रम करून जैनसंप्रदायशिक्षा नामक ग्रंथ लिहिला. पण तो संपूर्ण छापून होण्याच्या पूर्वीच दुर्दैवानें त्याचें देहावसान झालें.

चंपारामः—याचे गौतमपरीक्षा, वसुनन्दिश्रावकाचार, चर्चासागर, योगसार इत्यादि ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

छत्रपतिः—याचे द्वादशानुप्रेक्षा, मनमोहनपंचाशिका, उद्यमप्रकाश, शिक्षाप्रधान, हे पद्यग्रंथ प्रसिद्ध आहेत. हा उत्तम कवि होता.

जौहरीपालशाहः—पद्मनंदि पंचविंशतिकावचनिकेचा कर्ता.

नंदरामः—योगसारवचनिका, यशोधरचरित्र, त्रैलोक्यसारपूजा या ग्रंथांचा कर्ता.

नाथुलाल दोसीः—जयपूरचा रहाणारा. ग्रंथ-गद्य-सुकमालचरित्र, महीपालचरित्र, समाधितंत्रः पद्य-दर्शनसार, परमात्माप्रकाश, सिद्धप्रियस्तोत्र, रत्नकरंडश्रावकाचार.

पन्नालालः—विद्वज्जनबोधक नांवाचा मोठा ग्रंथ यानें लिहिला आहे. याशिवाय उत्तरपुराणवचनिका, व अनेक पूजापाठहि यानें लिहिले आहेत.

पारसदासः—जयपूरनिवासी. ग्रंथ-पारसविलास, ज्ञानसूर्योदय, सारचतुर्विंशतिवचनिका.

फतेहलालः—ग्रंथ-विवाहपद्धति, दशावतार नाटक, राजवार्तिकालंकार, रत्नकरंड, नामदीपिका, तत्वार्थसूत्रवचनिका.

बक्तावरमल रतनलालः—जयपूरनिवासी. ग्रंथ-जिनदत्तचरित्र, नेमिनाथपुराण, चंद्रप्रभपुराण, भविष्यसारचरित्र, प्रीतिकरचरित्र, प्रद्युम्नचरित्र, व्रतकथाकोश इत्यादि छंदोबद्ध ग्रंथ.

पन्नालाला बैनाडाः—प्रद्युम्नचरित्रवचनिका.

महाचंदः—महापुराण, फुटकळ संस्कृत व हिंदी पद्यें यांचा कर्ता.

मिहिरचंदः—हा सोनपतचा रहाणारा, संस्कृत व फारसी भाषापंडित. यानें सज्जनचित्तवल्लभ काव्यावर संस्कृतमध्यें टीका लिहिली आहे व या काव्याचें हिंदींत पद्यांत भाषांतर केलें आहे. सादीचे गुलिसान व बोस्तान याचा हिंदीमध्यें यानें अनुवाद केला आहे.

हिराचंद अमोलकः—हा सातारा जिल्ह्यांत फलटणचा रहाणारा. यानें हिंदीमध्यें पुष्कळ कविता रचिली. पंचपूजा हा त्याचा ग्रंथ चांगला आहे.

शिवचंद्रः—याचे नीतिवाक्यामृत, प्रश्नोत्तरश्रावकाचार, तत्वार्थसूत्रवचनिका हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

स्वरूपचंद्रः—मदनपराजयवचनिका, त्रैलोक्यसार, इत्यादि छंदोमय ग्रंथ यानें लिहिले आहेत.

शिवजीलालः—हा जयपूरचा रहाणारा. ग्रंथ-रत्नकरंड चर्चासंग्रह, बोधसार, दर्शनसार, अध्यात्मतरंगिणी.

शिवप्रसादसितारे हिंद:—हा श्वेतांबर पंथाचा अनुयायी असून याला सी आय. ई. हा किताबहि मिळाला होता. हा विद्वान् होता. याचें मुद्राराक्षस नाटकाचें भाषांतर फार प्रसिद्ध आहे. यानें पुष्कळ हिंदी पुस्तकें लिहिलीं. त्यांपैकीं इतिहासतिमिरनाशक हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. हा हिंदी भाषेचा पक्षपाती होता.

बाबू रतनचंद्र वकीलः—हा बी. ए. एल्एल्. बी. वकील, अलाहाबादचा रहाणारा खंडेलवाल जैन होता. याचे न्यायसभा नाटक, भ्रमजाल नाटक, चातुर्थार्णव, वीरनारायण, इंदिरा ( हिंदी-उर्दु नाटक ) इत्यादि ग्रंथ प्रसिद्ध आहेत. यापैकीं कांहीं स्वतंत्र व कांहीं भाषांतरवजा ग्रंथ आहेत. हा हिंदी भाषा फार सुरेख लिहित असे याचें चरित्र प्रयागच्या इंडियनप्रेसनें प्रसिद्ध केलें आहे.

बाबू जैनेंद्र किशोर—आराचा जमीनदार, व अग्रवाल जातीचा जैन आरा येथील नागरीप्रचारिणी सभेचा व प्रत्नसमालोचक सभेचा उत्साही कार्यकर्ता म्हणून याची प्रसिद्धि आहे. हा हिंदी भाषेंतील कवि व लेखकहि होता. यानें खगोल विज्ञान, कमलावती, मनोरमा, इत्यादि ग्रंथ व एक नाटक लिहिलें आहे. जैनजगत्चा हा कांहीं वर्षे संपादक होता. १०।१२ वर्षांपूर्वीच हा मरण पावला.

मि. जैन वैद्यः—हा खण्डलवाल जैन. याला बंगाली, उर्दू, मराठी, गुजराथी इत्यादि भाषा अवगत होत्या. हा हिंदीचा मोठा रसिक होता. यानें 'समालोचक' नांवाचें एक मासिक कांहीं वर्षे चालविलें. लहानपणींच यानें कमलमोहिनी भंवरसिंह नाटक, व्याख्यानप्रबोधक, ज्ञानावर्णमाला हीं पुस्तकें लिहिलीं होतीं. यानें जयपूर येथें 'नागरीभवन' नांवाचें पुस्तकालय काढलें होतें व तें अद्यापि चांगल्या अवस्थेंत आहे. हा १९१० सालीं मरण पावला.

बाबू सूरज भानजी—हा लेखक अद्यापि हयात आहे. यानें सर्व जैन लोक धर्मग्रंथ छापण्याच्या विरुद्ध असतां मोठ्या धैर्यानें ग्रंथ छापण्याचें ठरविलें. हिंदी जैनगजटाचा हा जन्मदाता आहे. यानें एक साप्ताहिक, व मासिक चालविलें. पण ते फार दिवस चाललें नाहींत. द्रव्यसंग्रह, पुरुषार्थसिद्ध्युपाय, परमात्मप्रकाश इत्यादि ग्रंथांचा हिंदी भाषेंत यानें

अनुवाद केला आहे. याशिवाय 'ब्याहि बहु', 'मनमोहिनी', ज्ञानसूर्योदय' हेहि ग्रंथ प्रसिद्ध आहे. आपला 'वकीलीचा धंदा सोडून, हल्लीं यानें जैन समाजाची सेवा करण्याचें व्रत पत्करिलें आहे.

पं. पन्नालालजी बाकलीवाल.—हा विकानेरचा रहाणारा, खंडेलवाल गृहस्थ. जैन ग्रंथाचें मुद्रण व प्रकाशन करण्याच्या कामीं यानें फार पुढाकार घेतला आहे. मुंबई येथें जैन ग्रंथरत्नाकर कार्यालय, काशींत स्याद्वाद पाठशाळा या संस्था याच्या प्रेरणेनें स्थापन झाल्या. जैनहितैषि पत्र यानें सुरू केलें. धर्मपरीक्षा–अनुवाद, रत्नकरंड, द्रव्यसंग्रह, तत्त्वार्थसूत्रावरील बालोपयोगी टीका, जैन बालबोधक, स्त्रीशिक्षा इत्यादि बरींच पुस्तकें यानें लिहिलीं आहेत. 'सनातन जैनग्रंथमाला' नामक संस्कृत ग्रंथाची माला यानें काढिली आहे.

पं. गोपाळदासजी बरैयाः—हा मोरेना (ग्वालेर) येथें रहातो. दिगंबर संप्रदायामध्यें याची पंडित या नात्यानें प्रसिद्धि आहे. याला न्यायवाचस्पति, वादिगज–केसरी, स्याद्वादवारिधि या पदव्या मिळाल्या आहेत. मोरेना येथील जैनसिद्धांतविद्यालय, यानें फारच परिश्रम व स्वार्थत्याग करून चालविलें आहे. मुंबई येथें जें जैनमित्र नांवाचें साप्ताहिक चालू आहे. त्याचा संपादक हा आहे. हा उत्तम हिंदी लेखक आहे. सुशीला–उपन्यास, जैनसिद्धांतदर्पण, जैनसिद्धांतप्रवेशिका, हे तीन सुंदर ग्रंथ त्यानें लिहिले आहेत.

बाबु जुगुलकिशोरजीः—हा सहारणपुर जिल्ह्यांतील देवबंदचा रहाणारा. आपला वकीलीचा धंदा सोडून हल्लीं हा साहित्याची सेवा करण्यांत आपला वेळ घालवितो. हा जैन वाङ्मयाचा अधिकारी पुरुष आहे. जैनधर्माचा इतिहास लिहिण्यास यानें सुरवात केली आहे. जैनगजटसाप्ताहिकाचा हा कांहीं वर्षे संपादक होता. आर्यमतलीला, पूजाधिकामीमांसा, विवाहका उद्देश्य वगैरे चांगलीं पुस्तकें यानें लिहिलीं आहेत.

पंडित अर्जुनलाल सेठीः—हा राजकीय पुढारी आणि वाङ्मयभक्त आहे. यानें जयपुरास जैनशिक्षाप्रचारकसमिति व वर्द्धमानविद्यालय या दोन संस्था स्थापन केल्या आहेत. महेंद्रकुमार वगैरे दोन तीन नाटकेंहि यानें लिहिलीं आहेत.

लाला मुन्शीलालजीः—हा लाहोरच्या कालेजांतील प्रोफेसर होता. हा हल्लीं पेन्शनर आहे. याचे 'दरिद्रतासेश्रेय, 'कहानियोंके पुस्तक', 'शील और भावना', 'शीलसूत्र', 'छात्रोंको उपदेश,' इत्यादि ग्रंथ हिंदींत प्रसिद्ध आहेत.

बाबू दयाचंदजी गोयलीयः—यानें मितव्ययता, युवाओंकीउपदेश, शांतिवैभव, अच्छी आदत डालनेकी शिक्षा, चरित्रगठन और मनोबल, पिताके उपदेश, अमाहामलिकन इत्यादि पुस्तकें व जैन धर्मावरील छोटीं छोटीं पुस्तकेंहि लिहिलीं आहेत.

मि. वाडीलाल मोतीलाल शाहः—हा गुजरायीमध्यें निघणाऱ्या जैनहितेच्छु मासिकाचा संपादक आहे. गुजराथी व हिंदी भाषेमध्यें यानें ग्रंथ लिहिले आहेत. राजपुताना हिंदीसाहित्यसमितीच्या संस्थापकांपैकीं हा एक असून याहि समीतीतर्फे हल्लीं चांगले ग्रंथ प्रसिद्ध करण्यांत आले आहेत.

बाबू सुपार्श्वदासजी गुप्तः—यानें 'पार्लमेंट' नांवाचा ४०० पानांचा ग्रंथ लिहिला आहे. हा हिंदी भाषेचा उत्तम लेखक आहे.

बाबू मोतीलालजीः—यानें स्माईल्सच्या सेल्फहेल्पचें हिंदींत भाषांतर केलें आहे. हा चांगला कवि आहे.

बाबू वेणीप्रसादजीः—हा सरस्वती मासिकांत उत्तम प्रकारचे लेख लिहितो.

ब्रह्मचारी शीतलप्रसादजीः—यानें गृहस्थधर्म, छहढालाकी-टीका, नियमसारकी टिका, अनुभवानंद इत्यादि ग्रंथ लिहिले आहेत.

मुनिजिनविजयजीः—हा हिंदी व गुजराथी, या दोन्ही भाषांत पंडित आहे. विज्ञासित्रिवेणी, कृपारसकोश, प्रशस्तिसंग्रह इत्यादि संस्कृत ग्रंथ यानें संपादित केले आहेत.

बाबू माणिकचंदजीः—यानें जीवदया, सुखानंदमनोरमा, इत्यादि पुष्कळ ग्रंथ लिहिले आहेत.

बाबू कन्हैयालालजीः—यानें अंजनासुंदरी वगैरे नाटकें लिहिलीं आहेत.

पं. उदयलालजी काशलीवालः—हा उत्तम हिंदी लेखक असून हिंदीगौरव ग्रंथमालेचा हा संपादक आहे.

पं. दरयावसिंहजी सोधियाः—यानें हिंदीमध्यें कृषिविद्या, हिंदीव्याकरण, कहावत कल्पद्रुम, श्रावकधर्मसंग्रह इत्यादि पुस्तकें लिहिलीं आहेत.

बाबू खूबचंदजी सोधियाः—यानें 'सफलगृहस्थ' इत्यादि एक दोन ग्रंथ लिहिले आहेत.

पं. वंशीधरजी शास्त्रीः—यानें अष्टसहस्री, प्रमेयकमलमार्तंड इत्यादि पुष्कळ ग्रंथांचें संशोधन केलें असून हिंदीमध्यें आत्मानुशासनाचा अनुवाद केला आहे.

पं. खूबचंदजीशास्त्रीः—यानें गोम्मटसार, जीवकांड, न्यायदीपिका इत्यादि पुस्तकांचें भाषांतर केलें आहे.

मुनिशांतिविजयजीः—या श्वेतांबरी साधूनें मानवधर्मसंहिता, जैनतीर्थगाइड, उपदेशदर्पण इत्यादि पुस्तकें लिहिलीं आहेत. याच्या ग्रंथांत उर्दू भाषा जागजागीं आढळते.

लाला न्यामतसिंहजीः—हा गायनशास्त्रज्ञ आहे. यानें गायनासंबंधीं दहा बारा पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत.

बालचंद्राचार्यजीः—या श्वेतांबर यतीनें जगकर्तृत्वमीमांसा, मानवकर्तव्य इत्यादि चांगले ग्रंथ लिहिले आहेत.

मुनिमाणिकजीः—समाधितंत्र, कल्पसूत्र इत्यादि पुस्तकांचा हिंदीमध्यें यानें अनुवाद केला आहे.

बाबू सुखसंपतरायजी भण्डारीः—हा 'मल्हारीमार्तंड विजया'चा संपादक असून, बुद्धदेव, स्वर्गीय जीवन, उन्नति इत्यादि पुस्तकें लिहिलीं आहेत.

बाबू सूरजमलजीः—हा जैनप्रभाताचा संपादक असून जैन इतिहास, पर्युषणपर्व, इत्यादि पुस्तकांचा कर्ता आहे.

बाबू कृष्णलालजी वर्माः—' जैनसंसार 'चा संपादक. चंपा, राजपथका पथिक, दळजीतसिंह नाटक इत्यादि पुस्तकांचा कर्ता.

पं. लालारामजीः—सागरधर्मामृत, आदिपुराण इत्यादि पुस्तकांचें यानें हिंदींत भाषांतर केलें आहे.

नाथूराम प्रेमीः—हा जैनवाङ्मयाचा पंडीत असून जैनहितैषीचा संपादक आहे. यानें पुष्कळ जैन ग्रंथ प्रकाशांत आणले असून, स्वतः पुष्कळ ग्रंथहि लिहिले आहेत.

कानडी जैन वाङ्मयः—हें जैनवाङ्मयांत महत्त्वाचें आहे. जैन संप्रदायाचें वैशिष्ट्य स्थापन करण्याविषयीं कानडी जैन लेखकांनीं बरेच परिश्रम केले आहेत. कानडी वाङ्मयांतील जैन युगाविषयीं विवेचन " कानडी वाङ्मय " या लेखांत सांपडेल.

मराठी जैन वाङ्मय— आतां मराठींत जैनवाङ्मय कितपत आहे याविषयीं थोडक्यांत आढावा घेऊं.

मराठी भाषेंतील जैन ग्रंथ

| ग्रंथाचें नांव | कर्ता | गद्य कीं पद्य | स्वतंत्र कीं भाषांतर |
|---|---|---|---|
| आदिनाथपुराण | ब्रह्मजिनदास | पद्य | भाषांतर |
| रामायण (पद्मपुराण) | ( अज्ञात ) | ,, | ,, |
| हरिवंश | जिनदास व पुण्यसागर | ,, | ,, |
| पांडवपुराण | ( अज्ञात ) | ,, | ,, |
| पुण्याश्रव | नागकवि | ,, | ,, |
| श्रेणिकचरित्र | जनार्दनकवि | ,, | ,, |
| उपदेशरत्नमाला | भट्टारक जिनसेन | ,, | ,, |
| जंबुकुमारचरित्र | भट्टारक जिन | ,, | ,, |
| श्रीपालचरित्र | आण्णा वाडकर | ,, | भाषांतर |
| भजनसद्बोधमालिका | सन्मतिदास ऊर्फ रावजी कोळेकर | ,, | स्वतंत्र |
| श्रावकप्रतिक्रमण व रविवारव्रतकथा | ज्ञानचंद गांधी | ,, | भाषांतर |
| रत्नत्रयमार्गप्रदीप | अनंतराज पांगळ | ,, | स्वतंत्र |
| पंचस्तोत्रावरील अभंग | ,, | ,, | भाषांतर |
| नेमिदूतकाव्य | कृ. ना. जोशी | ,, | ,, |
| देशभूषण कुलभूषण सुधा | द. भि. रणदिवे | ,, | स्वतंत्र |
| गजकुमार | ,, | ,, | ,, |
| साध्वी नीली | ,, | ,, | ,, |
| दोघा जैनांचा संवाद | ,, | ,, | ,, |

(मराठी जैन ग्रंथ पुढें चालू.)

| ग्रंथाचें नांव | कर्ता | गद्य कीं पद्य | स्वतंत्र कीं भाषांतर |
|---|---|---|---|
| जैन पट्टावली | पार्श्वनाथ गोपाल फडकुले | पद्य | स्वतंत्र |
| रत्नकरंडश्रावकाचार | कलाप्पा निटवे | ,, | भाषांतर |
| सम्यक्त्वकौमुदी | ,, | ,, | ,, |
| पंचकल्याणिक व सातिअनंतमति | तात्या नेमिनाथ पांगळ | ,, | स्वतंत्र |
| जीवंधरचरित्र | ,, | ,, | ,, |
| दशलक्षणीक धर्म | श्रीमती कुंकुबाई | गद्य | भाषांतर |
| रत्नकरंडश्रावकाचार | हिराचंद नेमचंद | ,, | ,, |
| शोडषकारणभावना | ,, | ,, | ,, |
| जैनव्रतकथा | ,, | ,, | ,, |
| पार्श्वनाथचरित्र | ,, | ,, | ,, |
| महावीरचरित्र | ,, | ,, | ,, |
| श्रावकप्रतिक्रमण | ,, | ,, | ,, |
| द्वादश अनुप्रेक्षा | ,, | ,, | ,, |
| जैनधर्माची माहिती | ,, | ,, | स्वतंत्र |
| व्यंतराच्या आराधनें नुकसान | ,, | ,, | ,, |
| भट्टारकचर्चा-निर्माल्य द्रव्यचर्चा वगैरे | ,, | ,, | ,, |
| धर्मपरीक्षा व पद्मनंदी पंचविंशति—सुभाषितावली | कृ. ना. जोशी | ,, | भाषांतर |
| ईश्वर कांहीं करतो काय? | वालचंद गांधी | ,, | ,, |
| महापुराण | कलाप्पा निटवे | ,, | ,, |
| देवागमस्तोत्र | ,, | ,, | ,, |
| पंचास्तिकायसमयसार | ,, | ,, | ,, |
| सम्यक्त्वकौमुदी | ,, | ,, | ,, |
| वसुनंदीकृत—श्रावकाचार | ,, | ,, | ,, |
| अमितगतिकृत—श्रावकाचार | ,, | ,, | ,, |
| सागरधर्मामृत | ,, | ,, | ,, |
| क्रियामंजरी—प्रश्नोत्तर माणिक्यमाला वगैरे | ,, | ,, | ,, |
| त्रिवर्णाचार वगैरे | ,, | ,, | ,, |
| तत्त्वार्थसूत्र | जिवराज गौ. दोशी | ,, | ,, |
| आत्मानुशासन | ,, | ,, | ,, |
| जैनसिद्धांतप्रवेशिका | ,, | ,, | ,, |
| हरिवंशपुराण | ,, | ,, | ,, |
| श्रीकुंदकुंदाचार्य चरि. | तात्या पांगळ | ,, | स्वतंत्र |
| महावीरचरित्र | ,, | ,, | ,, |
| तीर्थंकरचरित्रें | ,, | ,, | भाषांतर |

( पृष्ठ ३४८ वरून पुढें चालू )

| | | | |
|---|---|---|---|
| अष्टपाहुड | तात्या पांगळ | गद्य | भाषांतर |
| जैनधर्मनियम | ,, | ,, | ,, |
| जैनधर्मांचें सौंदर्य | ,, | ,, | ,, |
| श्रीमहापुराणामृत | रावजी ने. शहा | | ,, |
| समाधिशतक | ,, | ,, | ,, |
| जैनधर्मादर्श | ,, | ,, | ,, |
| श्रुतावतारकथा | ,, | ,, | ,, |
| जैनलग्नविधी | नाना रा. नाग | ,, | ,, |
| तत्वार्थसूत्र | दादगौंडा पाटील | ,, | ,, |
| महतीसागरचरित्र | रावजी स. दोशी | ,, | स्वतंत्र |
| अंजनासुंदरी | दत्तात्रय भि. रणदिवे | ,, | ,, |
| रूपिणी | ,, | ,, | ,, |
| जैनोन्नति | धोंडीराम गु. खिवसरा | ,, | ,, |
| जिनविजय मासिक | प्रो. लठ्ठे व रा. पाटील | " | ,, |
| जैनकथा सुमनावली | हिराचंद अमी. शहा | ,, | भाषांतर |
| यशोधरचरित्र | ,, | ,, | ,, |
| जैनभाग्योदय (ले.सं.) | जयकुमार दे. चवरे | ,, | स्वतंत्र |
| पंचस्तोत्राचा मराठी अर्थ | देवचंद माणिकचंद | ,, | भाषांतर |
| जैन लोकांचा इतिहास | कलाप्पा उपाध्याय | ,, | स्वतंत्र |
| भट्टारक-सार्वधर्म | बाळगौंडा पाटील | ,, | भाषांतर |
| जैन ऐतिहासिक स्त्रिया | ... | ,, | ,, |
| जैन धर्मावरील व्याख्यान | वासुदेव गो. आपटे | ,, | स्वतंत्र |

आधुनिक चळवळी.—जैन संप्रदायाच्या आधुनिक चळवळी अनेक प्रकारच्या आहेत. त्यांचें राजकीय, सामाजिक, धार्मिक, वाङ्मयविषयक असें अनेक प्रकारचें वर्गीकरण करतां येईल. त्यांनीं आपलें वाङ्मयविषयक कर्तव्य उत्तमतऱ्हेनें बजावण्याची खटपट चालविली आहे. जुन्या हस्तलिखितांचा संग्रह व त्यांचें प्रकाशनहि जोरांत चालू आहे. आरा व पाटणा येथें त्यांच्या प्रसिद्ध ग्रंथशाळा आहेत. पश्चिमहिंदुस्थानांत जैन ग्रंथांसंबंधीं अत्यंत महत्त्वाचा शोध सरकारमार्फतच झाला व त्यामध्यें पीटर्सन, डॉ. भांडारकर व प्रो. पाठक यांनीं पुढारीपणा केला आणि त्या प्रयत्नामुळेंच ग्रंथसंपादनप्रयत्नास यश येत गेलें असें म्हणतां येईल.

त्यांच्या राजकीय चळवळींमध्यें हिंदूंपासून आपण अलग आहों आणि यासाठीं आपणांस स्वतंत्र प्रतिनिधी पाठविण्याचे हक्क पाहिजेत अशा तऱ्हेची खटपट त्यांचे पुढारी कधीं कधीं करतांना दिसतात तर महाराष्ट्रांत व कर्नाटकांत ते कधीं ब्राह्मणेतर पक्षाशीं संलग्न होतात; आणि ब्राह्मणांविरुद्ध चळवळीस ऐतिहासिक स्वरूप देण्याची खटपट करतात. इंदूरचे न्यायाधीश जैनी यांनीं जैनांचा कायदाच निराळा आहे. अशा तऱ्हेची मांडणी करण्याची खटपट चालविली आहे. तर कांहीं मंडळींनीं, हिंदुस्थानांत जर कांहीं चांगला विचार झाला असेल तर तो जैनांमार्फतच झाला; इतर हिंदुसंस्कृतींत ग्राह्यांश फार थोडका आहे अशा तऱ्हेचे आग्रही लेख लिहिले आहेत. उत्तर हिंदुस्थानांत जैनमंडळी लग्नव्यवहार ब्राह्मणांकडून करवून घेतात ते बंद करण्याची खटपट चालविली आहे. जैन मिशनरीपणा देखील आतां पुन्हां सुरू होत आहे. महाराष्ट्रांतील कांसारांनां तुम्हीं "जातीनें" जैन आहांत अशा तऱ्हेचा उपदेश त्या जातींतील जैन मंडळी करीत आहेत ("कासार" पहा). म्हणजे हा समाज सामान्य जनतेपासून पृथक्त्व स्थापन करणें व ज्या लोकांशीं लग्नव्यवहार आहेच त्या लोकांस पुरे जैन बनाविणें या तऱ्हेच्या प्रयत्नांत गुंतला आहे.

जैनांचा आत्मसंवर्धनार्थ प्रयत्न एवढ्यावरच थांबला नाहीं. पूर्वींच्या कांहीं जैन ग्रंथकारांनीं कालिदासादि प्रत्येक प्राचीन महत्त्वाच्या व्यक्तीसंबंधानें त्या जैन होत्या म्हणून उल्लेख लिहून ठेवले; त्यांवरच अधिक विश्वास टाकून तेंच आग्रहानें म्हणत राहणारा जैन लेखकवर्ग दृष्टीस पडतो.

जैनांचें स्वजातिसंरक्षणासाठीं शास्त्रशुद्ध प्रयत्न चालले आहेत असें मात्र म्हणतां येत नाहीं. बोहोंकडे जैनांमध्यें संख्याक्षय दिसून येत आहे. त्या संख्याक्षयाकडे त्यांचें जसें तीव्रतेनें लक्ष जावें तसें गेलें नाहीं. सर्व जैनांच्या परिषदा भरतात तशाच त्यांच्या विशिष्ट पंथांच्याहि भरतात. परिषदांमध्यें शिक्षणविषयक प्रश्नांकडे विशेष लक्ष असतें. त्यांचीं विशिष्ट अशीं नासिकें आहेत. त्यांत "जैन ग्याझेट" हें अधिक महत्त्वाचें होय. समाजसेवा हें महत्त्वाचें कार्य समजून तें वाढविण्याकडे जैनांचें लक्ष लागलें आहे. राजकोटची स्थानकवासी जैन लीग, बडोद्यांतील यंगमेन्स जैनलीग या त्या प्रकारच्या प्रवृत्तींचीं उदाहरणें आहेत.

जैनांमध्यें जी बौद्धिक चळवळ चालली आहे तिची दिशा पूर्णपणें अजून निश्चित झाली नाहीं. त्यांच्या ग्रंथांत दिलेल्या कालमानावर किंवा तीर्थंकरांच्या लक्षानुलक्ष वर्षें आयुष्यावर आजच्या जैनांचा विश्वास असेल असें वाटत नाहीं. आज हा समाज म्हणजे विशिष्ट तीर्थें किंवा व्रतें यांस महत्त्व देणारा आहे. त्यांचे तत्वज्ञानावर जे अनेक पेटारे भरून होतील इतके ग्रंथ आहेत त्यामुळें त्यांच्या तत्वज्ञानाचें ज्ञान त्यांच्या लोकांत फारसें नाहीं. दक्षिणेंतील जैनांचे आवडते ग्रंथ म्हणजे पुराण वाङ्मयच आहे. जैनांतर्गत अनेक मतांची संगति करण्याकडेहि त्यांचे प्रयत्न चालू आहेत आणि जैनतत्वज्ञान म्हणून कांहीं विशिष्ट आहे त्याची मांडणीहि करण्यांत येते. अशा मांडणींपैकीं एक (श्री विजयधर्मसूरि यांची) मांडणी येथें देतों.

श्री हरिभद्रसूरि नामक एका ग्रंथकारानें आपल्या "षड्दर्शनसमुच्चय" या ग्रंथांत सहा दर्शनें आहेत असें

सांगितलें आहे. तीं दर्शनें येणें प्रमाणें:—बौद्ध, नैयायिक, सांख्य, जैन, वैशेषिक व जैमिनीय. यांपैकीं जैनदर्शन हें 'जिन' हें नांव धारण करणाऱ्या महात्म्यानें प्रकाशित केलें. या दर्शनाला "अर्हत्प्रवचन", "जैनशासन", "स्याद्वाददृष्टि", "अनेकान्तवाद" अशींहि नांवें आहेत. या दर्शनांत नऊ तत्त्वें सांगितलीं आहेत, तीं अशीं: जीव, अजीव, पुण्य, पाप, आश्रव, संवर, निर्जरा, बंध व मोक्ष. या तत्त्वांचा आतां क्रमशः विचार करूं.

जीवः—जीवाचें लक्षण–ज्याला चेतना आहे तो जीव (चैतन्य, ज्ञान, उपयोग हे चेतनेचे पर्याय—विकार आहेत). जीव चेतनारूप म्ह० ज्ञानरूप असून त्याला सकल वस्तूंचें ज्ञान नसतें याचें कारण तो अनादि कालापासून नानाविध कर्म करीत आलेला आहे. अनादिकालापासून त्याला सर्व बाजूंनीं लागलेल्या या कर्मजालांनीं तो बद्ध झालेला आहे. त्याच्यावर या निबिड कर्मजालाचें आच्छादन आहे. या आच्छादनामुळें जीवाला सकल वस्तूंचा 'साक्षात्कार' होऊं शकत नाहीं. यासंबंधीं श्रीविनयविजयोपाध्यायकृत "लोकप्रकाश" या ग्रंथांत खालील श्लोक आहे—

न सर्वमपिवेत्त्येव प्राणी कर्मावृतो यथा ।
नार्कस्याऽभ्राभिभूतस्य प्रसरन्त्याभितः प्रभाः ॥
(द्रव्यलोक, सर्ग २, श्लो. ७०.)

जीवांचे प्रकारः—जीवांचे प्रकार दोन–मुक्त आणि संसारी. मुक्त म्हणजे सकल कर्मांचा क्षय झाल्यानें सिद्ध आणि निरंजन अशा परब्रह्मस्वरूपाला मिळालेले व संसारी म्ह० कर्मांनीं बांधलेले. संसारी जीवांचे प्रकार दोन—स्थावर आणि त्रस. स्थावरांचे प्रकार पांच–पृथ्वी, आप, तेज, वायु, वनस्पति. त्रसांचे प्रकार चार–द्वींद्रिय, त्रींन्द्रिय, चतुरिन्द्रिय, पंचेंद्रिय. पृथ्वीआदि पांच स्थावर यांचें चैतन्य घर्षण, छेदन इत्यादि क्रियांनीं नाहींसें होत नाहीं. या पांचांना एक त्वगिंद्रियच फक्त आहे; ते एकेंद्रिय हे एकेंद्रिय प्रत्येकीं दोन प्रकारचे–सूक्ष्म आणि बादर. ज्यांचें कर्म सूक्ष्म तें सूक्ष्म. हें सूक्ष्म एकेंद्रिय जीव 'लोकाकाशांत' सर्वत्र भरलेले आहे. लोक म्ह० जीव आणि अजीव राहतात तें स्थान. लोकाकाश म्ह० या स्थानाशीं संबद्ध जें आकाश तें. बादर एकेंद्रिय म्ह० ज्या एकेंद्रियांचें कर्म बादर अर्थात् स्थूल असतें तें. हें एकेंद्रिय कांहीं नियमित स्थलीं नें. द्वींद्रिय म्ह० स्पर्शनेंद्रिय व रसनेंद्रिय हीं ज्यांना त ते. जसे जीव कृमि, पूतरक, चन्दनक, शंख, कवड्या, इत्यादि होत. स्पर्शन, रसन आणि घ्राण हीं तीन ज्यां आहेत ते त्रींद्रिय; कुंथु, ढेंकूण, ऊ, मत्कोटक, र्शन, रसन, घ्राण व नेत्र हीं चार इंद्रियें क्षिका, मशक, वृश्चिक वगैरे. इंद्रियें असणारे ते पंचेंद्रिय; चि म्ह० मीन, मकर, गज,

नो· देशभू राजकुमार साध्वी नीली दोघा जैनांचा संवाद

सारस, हंस वगैरे. (२) मनुष्य. (३) नारक म्ह० अधोलोकांत राहणारे. (४) देव म्ह० प्राधान्यानें ऊर्ध्व लोकांत राहणारे; भुवनपत्र वगैरे कांहीं देव अधोलोकांतहि आहेत. द्वींद्रिय, त्रींद्रिय आणि चतुरिंद्रिय या जीवांना विकलेंद्रिय अशी संज्ञा आहे. एकेंद्रिय व विकलेंद्रिय यांना विशिष्ट मनोज्ञान नसल्यानें असंज्ञि ( संज्ञाशून्य ) असें म्हणतात.

जीवांचा जन्म आणि लिंगविचारः–एकेंद्रिय व विकलेंद्रिय हे संमूर्च्छिम (संमूर्च्छिम म्हणजे ज्याचे शरीर मातापित्यांवांचून म्हणजे इकडले तिकडले परिमाणू एकत्र होऊन बनलेले असतात ते जीव). देव व नारक हे उपपातज. तिर्यंचांमध्यें कांहीं सम्मूर्च्छिम, कांहीं गर्भज. मनुष्य हे गर्भज होत. गर्भज मनुष्याच्या श्लेष्मामध्यें वगैरे जे बर्मचक्षूंना अदृश्य व अंतर्मुहूर्तभर ज्यांची इहलोकची स्थिति असते असे मनुष्यजातीय उत्पन्न होतात तेहि सम्मूर्च्छिमच होत. गर्भज नसून जे संज्ञाशून्य ते संमूर्च्छिम. उपपातज म्हणजे उपपतनानें अस्तित्वांत येणारे. देव हे देवशय्येच्या अंतर्भागीं उपपतन पावतात. नारक हे वज्रनिर्मित भिंतींत खिडक्यासारखीं भोंकें असतात तेथें उपपतन पावतात. देवस्थितींत देव व देवी असे दोनच प्रकार असतात, नपुंसक नसतात. नारक व संमूर्च्छिम हे नपुंसक; यांच्यांत स्त्री नाहीं, पुरुष नाहीं. संमूर्च्छिमाखेरीज जे तिर्यंच व मनुष्य त्यांच्यांत स्त्री, पुरुष व नपुंसक तिन्ही भेद असतात.

जीवांचें शरीरः—जीवांचें शरीर पांच प्रकारचें असतें. हे पांच प्रकार येणेंप्रमाणें—औदारिक, वैक्रिय, आहारक, तैजस, कार्मण. औदारिक शरीर, मनुष्य पशु आदिकरून सर्वांनां असतें; देव आणि नारक यांना मात्र नसतें. वैक्रिय शरीर हें देवांना व नारकांना जन्मतःच असतें. मनुष्यादिकांनीं त्या त्या प्रकारची शक्ति प्राप्त करून घेतल्यास हें वैक्रिय शरीर त्यांना प्राप्त होतें. वैक्रिय शरीराच्या योगानें लहान, मोठें, दृश्य, अदृश्य, भूचर, खेचर अशीं अनेक रूपें धारण करतां येतात. आहारक शरीर हें ज्या महापुरुषांनीं दृष्टिवाद शास्त्रांतील चतुर्दशपूर्वविभागांत सांगिलेल्या विद्येच्या बळानें सकल पदार्थांचें ज्ञान करून घेतलें आहे त्यांना प्राप्त होतें. या महापुरुषांनांच परमर्षि म्हणावें. हें आहारक शरीर जीवन्मुक्त देहधारी व सर्वज्ञ असे जे परमात्मे केवलज्ञानी त्यांच्या अग्रभागीं पाठवून आपल्याला सूक्ष्मार्थसंबंधीं जो सन्देह असेल तो दूर करून घेतां येतो व भगवंताच्या महद्धींचें ( जिनपरत्साम्याच्या–अथवा तीर्थंकरांच्या असामान्य केवलज्ञानी आत्म्यांच्या परमशक्तीचें व वैभवाचें ) दर्शन करतां येतें. तैजस व कार्मण हीं शरीरें सर्व संसारी जीवांना असतात. तैजस शरीर हें भुक्त आहाराचा परिपाक करणें वगैरे कार्य करतें. क्षीराला त्यांत घातलेलें पाणी सर्व विलगून असतें त्याप्रमाणें जीवप्रदेशाला विलगून असलेला जो कर्मप्रदेश तेंच कार्मणशरीर. कार्मणशरीराच्या योगानें

जीवाची एका भवांतून ( जन्मांतून ) दुसऱ्या भवांत गति होते.

पृथिव्यादि यांचें सचेतनत्वः—वर जे पृथिव्यादि स्थावर जीव सांगितले त्यांचें सचेतनत्व कमी अधिक दुर्ज्ञेय आहे. तरीपण तर्कबलानें तें सिद्ध करतां येतें. या स्थावरांपैकीं वनस्पतिवर्गाचें सचेतनत्व त्याच्या ठिकाणीं सचेतनत्वाच्या कांहीं स्पष्ट क्रिया दिसतात त्यावरून समर्थित होतें. उदाहरणार्थ तरूंच्या मूलांनां पाणी घातलें म्हणजे फलादिकांत रस स्पष्टतेनें दिसतो. हा रस खालून वर जो जातो त्या तरूंच्या ठिकाणीं उच्छ्वासधर्म असल्याशिवाय जात नाहीं खास; कारण रसप्रसर्पण ही क्रिया ज्यांनां उच्छ्वास आहे अशा मनुष्यादिकांत असते. ज्यांनां उच्छ्वास नाहीं अशा मृत्तिकादिकांत नसते. तेव्हां रसप्रसर्पण ही जी तरूंची क्रिया तिजवरुन त्यांच्यांत उच्छ्वासधर्म आहे असें अनुमान करतां येतें व या उच्छ्वासधर्मावरून तरू हे सात्मक ठरतात. तसेंच, मनुष्यांमध्यें स्त्रियांनां जशी दोहदोत्पत्ति आहे, तद्वत तरूंमध्येंहि दोहदोत्पत्ति आहे. मनुष्यांप्रमाणें संकोचविकास इत्यादि चेतनाधर्मंहि तरूंच्या ठिकाणीं दिसतात; यावरूनहि तरूंचें सचेतनत्व सुश्रद्धेय आहे. ही वनस्पतिवर्गाची गोष्ट झाली; आतां पृथिवी घेऊं. विद्रुमाशिला छेदिली असतां छेदाच्या ठिकाणीं विद्रुमाचा अर्शाला ( सुरणाला ) अंकुर उगवावा त्याप्रमाणें पुन्हां उगवतो. यावरून विद्रुमशिलादि पृथिवी सात्मक ठरते. खांदलेल्या जमीनींतून जल हें दर्दुराप्रमाणें स्वभावतः ( आपोआप ) उत्पन्न होतें. यावरून पृथ्वीगत जल हें सचेतन ठरतें. मीनांप्रमाणें अभ्रादि विकाररूपी जल स्वतः उत्पन्न होऊन पृथ्वीवर पडतें; यावरून नभःस्थ जल सात्मक ठरतें. नराप्रमाणें, आहार घेणें आहारवृद्धीमुळें नराप्रमाणें विकारविशेष पावणें हे धर्म तेजामध्यें दिसतात, यावरून तेज सात्मक आहे असें ठरतें. गाईला दुसऱ्या कोणी प्रेरणा केली असतां ती वांकडीतिकडी चालूं लागते त्याचप्रमाणें वायूचीहि स्थिति आहे; म्हणून वायूहि सचेतन ठरतो. आतां पृथ्वी आदिकांच्या सचेतनत्वाविषयीं जीं प्रमाणें सांगितलीं त्यांचा आधार व आगमांत या स्थावरांचें सचेतनत्व प्रतिपादलें आहे ही गोष्ट यांच्या बळावर पृथ्वी आदिक सचेतन आहेत हा सिद्धान्त सूज्ञ कबूल करतात.

जीव हा पदार्थ मानलाच पाहिजेः-जीव पदार्थ नाहींच असें मानल्यास बंध, मोक्ष वगैरे जी व्यवस्था सृष्टींत दिसत आहे तिची उपपत्ति लागत नाहीं. तसेंच, जीव पदार्थ नसेल तर जगतामध्यें जें वैचित्र्य दिसत आहे त्याची संगति कशी लावावयाची? एक राजा, एक रंक; एक धनी, एक दरिद्री; कोणी निरोगी, कोणी रोगी; कोणी प्रज्ञावान्, कोणी जडमति; हें व अशा प्रकारचें ज्याला अंत ना पार असें वैचित्र्य विश्वांत आहे. या वैचित्र्याची उपपत्ति जीव पदार्थ नाहीं म्हणणारांनां लावतां येत नाहीं. विश्वांतील या वैचित्र्याची संगति लावावयाची तर, मनुष्यमात्रांत आत्म्याचें अस्तित्व कल्पून, या आत्म्यांनीं केलेलें व म्हणून त्यांनां विलगून असणारें जें कर्म त्याच्या ठिकाणीं वैचित्र्य मानलें पाहिजे याशिवाय गत्यंतर नाहीं. श्रीमान् देवेन्द्रसूरि यांनीं प्रथमकर्मग्रंथांत प्रथमगाथावृत्तींत म्हटलेंच आहे कीं—

> क्ष्मा-भृद्रंककयोः मनीषिजडयोः सद्रूपनीरूपयोः ।
> श्रीमद्दुर्गतयोः बलाबलवतोः नीरोगरोगार्तयोः ॥
> सौभाग्यासुभगत्वसंगमजुषोः तुल्येऽपि नृत्वेऽन्तरं ।
> यत्तत्कर्मनिबंन्धनं तदपि नो जीवं विना युक्तिमत् ॥

[ अर्थः—राजा आणि रंक, बुद्धिमान् व जडमति, सुरूप आणि कुरूप, श्रीमान् आणि दरिद्री, बली व दुर्बल, निरोगी व रोगार्त, भाग्यवान् व अभागी या सर्वांत मनुष्यत्व हें सारखेंच असून धन, बुद्धि वगैरे संबंधानें जें अन्तर असतें तें अंतर कर्मनिबद्ध असतें; व कर्म हें जीव न मानल्यास तर्कसिद्ध होत नाहीं. ]

अचेतनांपासून चेतनोत्पत्तिः—गूळ, पीठ, उदक इत्यादिकांपासून मदशक्ति उत्पन्न होते, तद्वत् पृथिव्यादि ( अचेतन ) भूतांपासून चेतना उत्पन्न होते असें जें मत तें विचारास टिकत नाहीं कारण अचेतन भूतांपासून चेतनेची उत्पत्ति मानणें न्यायविसंगत आहे. अन्यथा, घटादिकांनांहि सचेतनत्व मानावें लागेल दुसरें एक मत असें आहे कीं, पृथिव्यादि जीं चार भूतें त्यांचा विशेष प्रकारचा संबंध झाला म्हणजे चेतनोत्पत्ति होते, हें मतहि बरोबर नाहीं. ज्या वस्तूंत जो धर्म मूळांत नाहीं, तो धर्म त्या वस्तूंच्या संयोगानें उत्पन्न होतो ही कल्पना युक्तीविरुद्ध आहे. अनुभवहि असाच आहे. तैल हें तिळाव्यतिरिक्त इतर वस्तूंपासून प्राप्त होत नाहीं. याप्रमाणें पृथिव्यादि प्रत्येक अचेतन; तेव्हां या अचेतनांच्या संबंधापासून चेतनोत्पत्ति होते असें मानणें युक्तीविरुद्ध आहे. मदशक्तीचा दाखला दिला तोहि अयुक्त आहे; कारण मदशक्ति ही अचेतन आहे. अर्थात् अचेतन पिष्टादिकांपासून अचेतन मदशक्ति उत्पन्न होते ही गोष्ट युक्तच आहे; तेव्हां जड अशा भूतांपासून चैतन्यशक्ति उत्पन्न होते ही गोष्ट पिष्टादिकांपासून मदशक्ति उत्पन्न होते या गोष्टीवरून अनुमित करणें हें तर्कदृष्ट्याहि दोषपूर्ण आहे.

"देह हाच आत्मा; इंद्रियें हाच आत्मा":—अचेतन भूतांपासून चेतनोत्पत्ति असिद्ध आहे, यासंबंधीच्या वरील विवेचनावरून देह व आत्मा एकच असें जें मत तेंहि युक्तीविरुद्ध ठरतें. मृत देहांत चेतना उपलब्ध होत नाहीं, जर देह व आत्मा एक हें खरें असतें, तर मृत देहांत चेतना उपलब्ध झाली असती. इंद्रियें हाच आत्मा हेंहि मत अयुक्त आहे. चक्षूंनीं पाहिलेली जी वस्तु तिचें, चक्षू त्या वस्तूवरून काढले असतांहि स्मरण होतें;या स्मरणाची उपपत्ति इंद्रिय हाच आत्मा असें मानलें असतां लागत नाहीं. चक्षूंनीं पाहिलेल्या वस्तूची चक्षूव्यतिरिक्त दुसरें इंद्रिय आठवण काढील

सांगितलें आहे. तीं दर्शनें येणें प्रमाणें:—बौद्ध, नैयायिक, सांख्य, जैन, वैशेषिक व जैमिनीय. यांपैकीं जैनदर्शन हें 'जिन' हें नांव धारण करणाऱ्या महात्म्यानें प्रकाशित केलें. या दर्शनाला "अर्हत्प्रवचन", "जैनशासन", "स्याद्वाददृष्टि", "अनेकान्तवाद" अशींहि नांवें आहेत. या दर्शनांत नऊ तत्त्वें सांगितलीं आहेत, तीं अशीं: जीव, अजीव, पुण्य, पाप, आश्रव, संवर, निर्जरा, बंध व मोक्ष. या तत्वांचा आतां क्रमशः विचार करूं.

जीवः—जीवाचें लक्षण-ज्याला चेतना आहे तो जीव (चैतन्य, ज्ञान, उपयोग हे चेतनेचे पर्याय—विकार आहेत). जीव चेतनारूप म्ह० ज्ञानरूप असून त्याला सकल वस्तूंचें ज्ञान नसतें याचें कारण तो अनादि कालापासून नानाविध कर्मे करीत आलेला आहे अनादिकालापासून त्याला सर्व बाजूंनीं लागलेल्या या कर्मजालांनीं तो बद्ध झालेला आहे. त्याच्यावर या निबिड कर्मजालाचें आच्छादन आहे. या आच्छादनामुळें जीवाला सकल वस्तूंचा 'साक्षात्कार' होऊं शकत नाहीं. यासंबंधीं श्रीविनयविजयोपाध्यायकृत "लोकप्रकाश" या ग्रंथांत खालील श्लोक आहे—

न सर्वमपिवेत्त्येव प्राणी कर्मावृतो यथा।
नार्कस्याऽभ्राभिभूतस्य प्रसरन्त्यभितः प्रभाः ॥
(द्रव्यलोक, सर्ग २, श्लो. ७०.)

जीवांचे प्रकारः—जीवांचे प्रकार दोन-मुक्त आणि संसारी. मुक्त म्हणजे सकल कर्मांचा क्षय झाल्यानें सिद्ध आणि निरंजन अशा परब्रह्मस्वरूपाला मिळालेले व संसारी म्ह० कर्मांनीं बांधलेले. संसारी जीवांचे प्रकार दोन—स्थावर आणि त्रस. स्थावरांचे प्रकार पांच-पृथ्वी, आप, तेज, वायु, वनस्पति. त्रसांचे प्रकार चार-द्वींद्रिय, त्रीन्द्रिय, चतुरिन्द्रिय, पंचेंद्रिय. पृथ्वीआदि पांच स्थावर यांचें, चैतन्य घर्षण, छेदन इत्यादि क्रियांनीं नाहींसें होत नाहीं. या पांचांना एक त्वगिंद्रियच फक्त आहे; ते एकेंद्रिय हे एकेंद्रिय प्रत्येकीं दोन प्रकारचे-सूक्ष्म आणि बादर. ज्यांचें कर्म सूक्ष्म तें सूक्ष्म. हे सूक्ष्म एकेंद्रिय जीव 'लोकाकाशांत' सर्वत्र भरलेले आहे. लोक म्ह० जीव आणि अजीव राहतात तें स्थान. लोकाकाश म्ह० या स्थानाशी संबद्ध जें आकाश तें. बादर एकेंद्रिय म्ह० ज्या एकेंद्रियांचें कर्म बादर अर्थात् स्थूल असतें तें. हे एकेंद्रिय कांहीं नियमित स्थलीं असते. द्वींद्रिय म्ह० स्पर्शनेंद्रिय व रसनेंद्रिय हीं ज्यांना आहेत ते. जसे जीव कृमि, पूतरक, चन्दनक, शंख, कवड्या, जळवा इत्यादि होत. स्पर्शन, रसन आणि घ्राण हीं तीन इंद्रियें ज्यांना आहेत ते त्रींद्रिय; कुंथु, ढेंकूण, ऊ, मत्कोटक, इंद्रगोपक वगैरे. स्पर्शन, रसन, घ्राण व नेत्र हीं चार इंद्रियें असलेले चतुरिंद्रिय, भ्रमर, मक्षिका, मशक, वृश्चिक वगैरे. वरील चार व श्रोत्र अशीं पांच इंद्रियें असणारे ते पंचेंद्रिय; पंचेंद्रियांचे प्रकार चार. (१) तिर्यंच म्ह० मीन, मकर, गज, सारस, हंस वगैरे. (२) मनुष्य. (३) नारक म्ह० अधोलोकांत राहणारे. (४) देव म्ह० प्राधान्यानें ऊर्ध्व लोकांत राहणारे; भुवनपत्य वगैरे कांहीं देव अधोलोकांतहि आहेत. द्वींद्रिय, त्रीन्द्रिय आणि चतुरिंद्रिय या जीवांना विकलेन्द्रिय अशी संज्ञा आहे. एकेंद्रिय व विकलेंद्रिय यांना विशिष्ट मनोज्ञान नसल्यानें असंज्ञि ( संज्ञाशून्य ) असें म्हणतात.

जीवांचा जन्म आणि लिंगविचारः—एकेंद्रिय व विकलेंद्रिय हे संमूर्च्छिम (सम्मूर्च्छिम म्हणजे ज्याचें शरीर मातापित्यावांचून म्हणजे इकडले तिकडले परिमाणू एकत्र होऊन बनले असतात ते जीव).देव व नारक हे उपपातज.तिर्यंचांमध्यें कांहीं सम्मूर्च्छिम, कांहीं गर्भज. मनुष्य हे गर्भज होत. गर्भज मनुष्याच्या श्लेष्मामध्यें वगैरे जे चर्मचक्षूंना अदृश्य व अंतर्मुहूर्तभर ज्यांची इहलोकची स्थिति असते असे मनुष्यजातीय उत्पन्न होतात तेहि सम्मूर्च्छिमच होत. गर्भज नसून जे संज्ञाशून्य ते संमूर्च्छिम. उपपातज म्हणजे उपपतनानें अस्तित्वांत येणारे. देव हे देवशय्येच्या अंतर्भागीं उपपतन पावतात. नारक हे वज्रनिर्मित भिंतींत खिडक्यासारखीं भोकें असतात तेथें उपपतन पावतात. देवस्थितींत देव व देवी असे दोनच प्रकार असतात, नपुंसक नसतात. नारक व संमूर्च्छिम हे नपुंसक; यांच्यांत स्त्री नाहीं, पुरुष नाहीं. संमूर्च्छिमाखेरीज जे तिर्यंच व मनुष्य त्यांच्यांत स्त्री, पुरुष व नपुंसक तिन्ही भेद असतात.

जीवांचें शरीरः—जीवांचें शरीर पांच प्रकारचें असतें. हे पांच प्रकार येणेंप्रमाणें—औदारिक, वैक्रिय, आहारक, तैजस, कार्मण. औदारिक शरीर, मनुष्यें पशु आदिकरून सर्वांनाच असतें; देव आणि नारक यांना मात्र नसतें. वैक्रिय शरीर हें देवांना व नारकांना जन्मतःच असतें. मनुष्यादिकांनीं त्या त्या प्रकारची शक्ति प्राप्त करून घेतल्यास हें वैक्रिय शरीर त्यांना प्राप्त होतें. वैक्रिय शरीराच्या योगानें लहान, मोठें, दृश्य, अदृश्य, भूचर, खेचर अशीं अनेक रूपें धारण करतां येतात. आहारक शरीर हें ज्या महापुरुषांनीं दृष्टिवाद शास्त्रांतील चतुर्दशपूर्वविभागांत सांगितलेल्या विधीच्या बलानें सकल पदार्थांचें ज्ञान करून घेतलें आहे त्यांना प्राप्त होतें. या महापुरुषांनाच परमर्षि म्हणावें. हें आहारक शरीर जीवन्मुक्त देहधारी व सर्वज्ञ असे जे परमात्मे केवलज्ञानी त्यांच्या अग्रभागीं पाठवून आपल्याला सूक्ष्मार्थासंबंधीं जो सन्देह असेल तो दूर करून घेतां येतो व भगवंताच्या महद्धीचें ( जिनपरमात्म्याच्या-अथवा तीर्थंकरांच्या असामान्य केवलज्ञानी आत्म्यांच्या परमशक्तीचें व वैभवाचें ) दर्शन करतां येतें. तैजस व कार्मण हीं शरीरें सर्व संसारी जीवांना असतात. तैजस शरीर हें भुक्त अहाराचा परिपाक करणें वगैरे कार्य करतें. क्षीराला त्यांत घातलेलें पाणी जसें विलगून असतें त्याप्रमाणें जीवप्रदेशाला विलगून असलेला जो कर्मप्रदेश तेंच कार्मणशरीर. कार्मणशरीराच्या योगानें

जीवाची एका भवांतून ( जन्मांतून ) दुसऱ्या भवांत गति होते.

पृथिव्यादि यांचें सचेतनत्वः—वर जे पृथिव्यादि स्थावर जीव सांगितले त्यांचें सचेतनत्व कमी अधिक दुर्ज्ञेय आहे. तरीपण तर्कबलानें तें सिद्ध करतां येतें. या स्थावरांपैकीं वनस्पतिवर्गाचें सचेतनत्व त्याच्या ठिकाणीं सचेतनत्वाच्या कांहीं स्पष्ट क्रिया दिसतात त्यावरून समर्थित होतें. उदाहरणार्थ तरूंच्या मूळांनां पाणी घातलें म्हणजे फलादिकांत रस स्पष्टतेनें दिसतो.हा रस खालून वर जो जातो त्या तरूंच्या ठिकाणीं उच्छ्वासधर्म असल्याशिवाय जात नाहीं खास; कारण रसप्रसर्पण ही क्रिया ज्यांनां उच्छ्वास आहे अशा मनुष्यादिकांत असते. ज्यांनां उच्छ्वास नाहीं अशा मृत्तिकादिकांत नसते. तेव्हां रसप्रसर्पण ही जी तरूंची क्रिया तिजवरुन त्यांच्यांत उच्छ्वासधर्म आहे असें अनुमान करतां येतें व या उच्छ्वासधर्मावरून तरू हे सात्मक ठरतात. तसेंच, मनुष्यांमध्यें स्त्रियांनां जशी दोहदोत्पत्ति आहे, तद्वत तरूंमध्येंहि दोहदोत्पत्ति आहे. मनुष्यांप्रमाणें संकोचविकास इत्यादि चेतनाधर्मंहि तरूंच्या ठिकाणीं दिसतात; यावरूनहि तरूंचें सचेतनत्व सुश्रद्धेय आहे. ही वनस्पतिवर्गाची गोष्ट झाली; आतां पृथिवी घेऊं. विद्रुमशिला छेदिली असतां छेदाच्या ठिकाणीं विद्रुमाचा अशोला ( सुरणाला ) अंकुर उगवावा त्याप्रमाणें पुन्हां उगवतो. यावरून विद्रुमशिलादि पृथिवी सात्मक ठरते. खांदलेल्या जमीनींतून जल हें दर्दुराप्रमाणें स्वभावतः ( आपोआप ) उत्पन्न होतें. यावरून पृथ्वीगत जल हें सचेतन ठरतें. मीनांप्रमाणें अभ्रादि विकाररूपी जल स्वतः उत्पन्न होऊन पृथ्वीवर पडतें; यावरून नभःस्थ जल सात्मक ठरतें. नराप्रमाणें, आहार घेणें आहारवृद्धीमुळें नराप्रमाणें विकारविशेष पावणें हे धर्म तेजामध्यें दिसतात, यावरून तेज सात्मक आहे असें ठरतें. गाईला दुसऱ्या कोणी प्रेरणा केली असतां ती वांकडीतिकडी चालूं लागते त्याचप्रमाणें वायूचीहि स्थिति आहे; म्हणून वायूहि सचेतन ठरतो. आतां पृथ्वी आदिकांच्या सचेतनत्वाविषयीं जीं प्रमाणें सांगितलीं त्यांचा आधार व आगमांत या स्थावरांचें सचेतनत्व प्रतिपादलें आहे ही गोष्ट यांच्या बळावर पृथ्वी आदिक सचेतन आहेत हा सिद्धान्त सूज्ञ कबूल करतात.

जीव हा पदार्थ मानलाच पाहिजेः-जीव पदार्थ नाहींच असें मानल्यास बंध, मोक्ष वगैरे जी व्यवस्था सृष्टींत दिसत आहे तिची उपपत्ति लागत नाहीं. तसेंच, जीव पदार्थ नसेल तर जगतामध्यें जें वैचित्र्य दिसत आहे त्याची संगति कशी लावावयाची? एक राजा, एक रंक; एक धनी, एक दरिद्री; कोणी निरोगी, कोणी रोगी; कोणी प्रज्ञावान्, कोणी जडमति; हें व अशा प्रकारचें ज्याला अंत ना पार असें वैचित्र्य विश्वांत आहे. या वैचित्र्याची उपपत्ति जीव पदार्थ नाहीं म्हणणारांनां लावतां येत नाहीं. विश्वांतील या वैचित्र्याची संगति लावावयाची तर, मनुष्यमात्रांत आत्म्याचें अस्तित्व कल्पून, या आत्म्यांनीं केलेलें व म्हणून त्यांनां विलगून असणारें जें कर्म त्याच्या ठिकाणीं वैचित्र्य मानलें पाहिजे याशिवाय गत्यंतर नाहीं. श्रीमान् देवेन्द्रसूरि यानीं प्रथमकर्मग्रंथांत प्रथमगाथावृत्तींत म्हटलेंच आहे कीं—

> क्ष्मा-भृद्रंककयोः मनीषिजडयोः सद्रूपनीरूपयोः ।
> श्रीमद्दुर्गतयोः बलाबलवतोः नीरोगरोगार्तयोः ॥
> सौभाग्यासुभगत्वसंगमजुषोः तुल्येऽपि नृत्वेऽन्तरं ।
> यत्तत्कर्मनिबंन्धनं तदपि नो जीवं विना युक्तिमत् ॥

[ अर्थः—राजा आणि रंक, बुद्धिमान् व जडमति, सुरूप आणि कुरूप, श्रीमान् आणि दरिद्री, बली व दुर्बल, निरोगी व रोगार्त, भाग्यवान् व अभागी या सर्वांत मनुष्यत्व हें सारखेंच असून धन, बुद्धि वगैरे संबंधानें जें अन्तर असतें तें अंतर कर्मनिबद्ध असतें; व कर्म हें जीव न मानल्यास तर्कसिद्ध होत नाहीं. ]

अचेतनांपासून चेतनोत्पत्तिः—गूळ, पीठ, उदक इत्यादिकांपासून मदशक्ति उत्पन्न होते, तद्वत् पृथिव्यादि ( अचेतन ) भूतांपासून चेतना उत्पन्न होते असें जें मत तें विचारास टिकत नाहीं कारण अचेतन भूतांपासून चेतनेची उत्पत्ति मानणें न्यायविसंगत आहे. अन्यथा,घटादिकांनांहि सचेतनत्व मानावें लागेल दुसरें एक मत असें आहे कीं, पृथिव्यादि जीं चार भूतें त्यांचा विशेष प्रकारचा संबंध झाला म्हणजे चेतनोत्पत्ति होते, हें मतहि बरोबर नाही. ज्या वस्तूंत जो धर्म मूळांत नाहीं, तो धर्म त्या वस्तूंच्या संयोगानें उत्पन्न होतो ही कल्पना युक्तीविरुद्ध आहे. अनुभवहि असाच आहे. तैल हें तिळाव्यतिरिक्त इतर वस्तूंपासून प्राप्त होत नाहीं. याप्रमाणें पृथिव्यादि प्रत्येक अचेतन; तेव्हां या अचेतनांच्या संबंधापासून चेतनोत्पत्ति होतें असें मानणें युक्तीविरुद्ध आहे. मदशक्तीचा दाखला दिला तोहि अयुक्त आहे; कारण मदशक्ति ही अचेतन आहे. अर्थात् अचेतन पिष्टादिकांपासून अचेतन मदशक्ति उत्पन्न होते ही गोष्ट युक्तच आहे; तेव्हां जड अशा भूतांपासून चैतन्यशक्ति उत्पन्न होते ही गोष्ट पिष्टादिकांपासून मदशक्ति उत्पन्न होते या गोष्टीवरुन अनुमित करणें हें तर्कदृष्ट्याहि दोषपूर्ण आहे.

"देह हाच आत्मा; इंद्रियें हाच आत्मा":-अचेतन भूतांपासून चेतनोत्पत्ति असिद्ध आहे, यासंबंधीच्या सदरील विवेचनावरून देह व आत्मा एकच असें जें मत तेंहि युक्तीविरुद्ध ठरतें. मृत देहांत चेतना उपलब्ध होत नाहीं, जर देह व आत्मा एक हें खरें असतें, तर मृत देहांत चेतना उपलब्ध झाली असती. इंद्रियें हाच आत्मा हेंहि मत अयुक्त आहे. चक्षूंनीं पाहिलेली जी वस्तु तिचें, चक्षू त्या वस्तूवरून काढले असतांहि स्मरण होतें;या स्मरणाची उपपत्ति इंद्रिय हाच आत्मा असें मानलें असतां लागत नाहीं. चक्षूंनीं पाहिलेल्या वस्तूची चक्षूव्यतिरिक्त दुसरें इंद्रिय आठवण काढील

असें होऊं शकत नाहीं. कारण एकानें वस्तु पहावी, व दुसऱ्यानें तिची आठवण ठेवावी (काढावी), असा अनुभव नाहीं. यावरून दृष्टार्थस्मरणाचें कार्य करणारा असा एक इंद्रियाव्यतिरिक्त पदार्थ आहे ही गोष्ट विचारी लोक कबूल करतील.

जीवाची विस्तृत व्याख्याः–सदरील विवेचनावरून जीव या पदार्थाची व्याख्या खालीलप्रमाणें करतां येते. जो पदार्थ ज्ञानस्वरूप आहे, इंद्रियें ज्याच्या प्रेरणेनें आपापल्या विषयांचें ज्ञान करून घेऊं शकतात, कोणत्याहि इंद्रियानें एखादा विषय ग्रहण केला असतां, तें इंद्रिय त्या विषयापासून दूर झाल्यावरहि त्या विषयाचें स्मरण जो पदार्थ ठेवतो व जो देहापासून अगदीं वेगळा आहे तो पदार्थ म्हणजे 'जीव' होय. गौतमाच्या न्यायदर्शनांत(तृतीयाध्याय,प्रथमाह्निक,प्रथमसूत्र, या ठिकाणीं) म्हटलेंच आहे कीं 'दर्शनस्पर्शनाभ्यामेकार्थग्रहणात्' । अर्थः– दर्शन व स्पर्शन या दोन इंद्रियांनीं ग्रहण केलेली वस्तु एकच आहे असें ज्ञान ज्या अर्थी होतें, त्या अर्थी इंद्रियाव्यतिरिक्त इंद्रियदृष्ट विषयांचें स्मरण ठेवणारा असा पदार्थ जीव नामक आहे.

तत्त्व२ रें, अजीवः—अजीवाचें लक्षणः ज्या पदार्थाच्या ठिकाणीं चेतनेचा अत्यंताभाव आहे तो अजीव. जड, अचेतन, अजीव हीं एकाच पदार्थाचीं नांवें होत. अजीवाचे प्रकार पांच—धर्मास्तिकाय, अधर्मास्तिकाय, आकाशास्तिकाय, पुद्गलास्तिकाय आणि काल. अस्तिकाय म्ह० प्रदेशसमूहात्मक पदार्थ. प्रदेशसमूहात्मक असे पदार्थ पांच– जीव, धर्म, अधर्म, आकाश आणि पुद्गल. संख्यादृष्टीनें जीवाचे प्रदेश असंख्येय; धर्माचे व अधर्माचे जीवाइतकेच असंख्येय; आकाशाचे प्रदेश अनन्त व पुद्गलाचे त्याच्या पुद्गलाप्रमाणें संख्येय, असंख्येय अथवा अनन्त समजावे. प्रदेशरहित असा पदार्थ काल हा आहे. अनागत काल हा उत्पन्न झालेला नसतो, उत्पन्न होऊन गेलेला काल हा विनष्ट असतो व वर्तमान समयांच्या ठिकाणीं प्रदेश नसतात; यावरून तीन्ही प्रकारचा काल प्रदेशरहित ठरला. वर सांगितल्याप्रमाणें अस्तिकाय पांच आहेत व हे पांच अस्तिकाय मिळून हा लोक झालेला आहे.

धर्म व अधर्म या अजीवांचें अस्तित्व मानण्यास आधार(आगमप्रमाण):—अजीव भेदरूप जो धर्म व अधर्म म्हणून वर सांगितला आहे, तो धर्म व अधर्म म्ह० पुण्य पाप हीं जोडी नव्हे, जीवाशीं संबद्ध अदृष्टरूप अशी जी शुभाशुभांची जोडी ती नव्हे; तर आकाशाप्रमाणें सर्वत्र व्यापून असलेले इहलोकांतील पदार्थ होत असें जिनप्रकाशित दर्शनांत सांगितलें आहे. हे अशा प्रकारचे धर्म व अधर्म हे पदार्थ आहेत असें मानण्यास आधार कोणता ? या प्रश्नास उत्तर आगम हाच या ठिकाणीं आधार आहे, हेंच होय. कोणत्याहि दर्शनाच्या अभिमानी लोकांनीं आपापल्या आगमाला प्रमाण मानणें, ही बुद्धि सर्वत्रच असते. स्वर्ग, नरक इत्यादि जे पदार्थ अतीन्द्रिय आहेत त्यांचें ज्ञान होण्यास आगमाखेरीज अन्य कांहींहि सोय नाहीं. जें अनुमानप्रमाणें देऊन स्वर्गनरकादिकांचें अस्तित्व ठरविलें जातें, तीं प्रमाणेंहि स्वतंत्र रीतीनें आपल्या मनांत या पदार्थांच्या अस्तित्वाविषयीं विश्वास उत्पन्न करूं शकत नाहींत; त्यांनां आगमप्रमाणाचा प्रसाद ( आधार ) असतो; म्हणूनच तीं कृतकार्य होतात. आतां जैनदर्शनाखेरीज अन्य कोणत्याहि दर्शनांत धर्म व अधर्म हे अजीव पदार्थ स्वीकारले नाहींत, यामुळें केवळ एका आगमाच्या आधारावर या पदार्थांचें अस्तित्व मनाला पटणें अवघड आहे; आगमाला थोडीशीं तर्काची जोड मिळाल्यास बरें असें कोणी म्हणेल तर त्यांजसाठीं खालील युक्तिवाद दिला आहे.

### धर्म व अधर्म यांची युक्तिसिद्धता

धर्मास्तिकायाचें लक्षण गति हें आहे. गतिपरिणत ( गतिमान् झालेले, ) जे जीव व पुद्गल ते अलोकांत गमन करूं शकत नाहींत या गोष्टीची उपपत्ति एकाच मार्गानें लावतां येते व तो मार्ग म्हणजे लोकांत गतिलक्षण धर्मास्तिकाय आहे ( व अलोकांत तो नाहीं ) असें मानणें हा होय. जीवांची व पुद्गलांची अलोकाभिमुख गति नसल्यानें अलोकांत गति होत नाहीं, असें कोणी म्हणतील तर त्यास असें उत्तर आहे कीं, सिद्धपरमाणु–आदिक अलोकाभिमुख असतात; व असें करूनहि त्यांची गति अलोकांत होत नाहीं. कोणी म्हणतील कीं, देशविशेष हाच क्रियाविशेषाचा हेतु असतो, अर्थात् अलोकदेश हा गतिरूप क्रियेचा हेतु नव्हे असें मानलें म्हणजे अलोकांत जीवाची व पुद्गलाची गति होत नाहीं, या गोष्टीची उपपत्ति लागते; त्यासाठीं धर्म, अधर्म, या पदार्थांची कल्पना करण्याचें कारण नाहीं. या पूर्वपक्षास असें उत्तर आहे कीं, क्रियाविशेषाचा हेतु होणारा असा जो देशविशेष तुम्ही मानतां त्या देशविशेषाला विशेषत्व येतें तेंच मुळीं त्याच्या व्यतिरिक्त त्याला साहाय्य करणारा असा जो कांहीं पदार्थ असतो त्यामुळें येतें. असा कोणीहि सहकारी नसतां केवल देश एखाद्या विशिष्ट क्रियेचा हेतु होऊं शकतो, अशी कल्पना करण्यास आधार नाहीं. अर्थात् सहकारी पदार्थ मानणें अपरिहार्य आहे व लोकांच्या ठिकाणीं असा जो गति–सहकारी पदार्थ ( जीवांनां व पुद्गलांनां तेथें गति असल्यामुळें ) मानावा लागतो त्यालाच धर्मास्तिकाय असें आम्हीं म्हणतों. याप्रमाणें धर्माचें अस्तित्व युक्तीनें सिद्ध होतें. अशाच प्रकारच्या युक्तीनें अधर्माचेंहि अस्तित्व सिद्ध होतें. अधर्म हा स्थितिलक्षण आहे. जीव व पुद्गल हे स्थिति–परिणत ( गतिरहित )अवस्थेतहि अलोकांत असत नाहींत. लोकांतच फक्त असतात. यावरून स्थितिसाहायक( अधर्म नामक ) पदार्थ लोकांत आहे व अलोकांत नाहीं, असा तर्क करावा लागतो. असो सदरील विवेचनांतील भावार्थ असा आहे कीं,

जीव व पुद्गल यांच्या ठिकाणीं गति अथवा स्थिति हे जे परिणाम ( विकार ) होतात ते त्यांच्या स्वभावानें होतात. मात्र जसें पाणी हें मीनांनां गतिकर्मांत साहाय्यक होतें, आणि जमीन ही त्यांनां स्थिति कर्मांत साहाय्यक होते ( स्थल व मीन यांच्याऐवजीं छाया व पान्थ हा दाखलाहि चालेल ). तसेंच धर्म व अधर्म हे जीवांनां व पुद्गलांनां अनुक्रमें गतिकर्मांत व स्थितिकर्मांत साहाय्यक होतात. हे साहाय्यक नसतील तर जीवादिक सदागतिमान् अथवा सदास्थितिमान् होतील,कारण त्यांच्यांत गतीच्या ठिकाणीं स्थिति व स्थितीच्या ठिकाणीं गति असा स्वभावतः विकार झाला तरी या विकाराला साहाय्यक कोणी नसल्यानें तो क्षणांत नाहींसा होईल. जीवादिक हे सदागति अथवा सदास्थिति नाहींत, यावरून धर्म व अधर्म हे लोकव्यापी असून जीवादिकांच्या ठिकाणीं गति अगर स्थिति हे परिणाम होतांच त्यांनां साहाय्यभूत होतात असें अनुमान करतां येतें;हें वरील विवेचनाचें तात्पर्य आहे.

लोक व अलोकः—जैनदर्शनांत लोक व अलोक असे जगताचे दोन विभाग सांगितले आहेत. लोक हा चतुर्दश रज्ज्वात्मक असून जीव आणि अजीव यांनीं भरलेला आहे. या लोकांचे, ऊर्ध्वलोक, अधोलोक व तिर्यग्लोक असे तीन विभाग आहेत ऊर्ध्वलोकांत देव व अधोलोकांत नारक राहतात हें सांगितलेंच आहे. तिर्यग्लोक म्हणजे आम्ही मनुष्यें वगैरे जेथें रहातों तो. यांतील जम्बुद्वीप म्ह. भारतवर्षादि क्षेत्रसमूह; हा वर्तुलाकार असून याच्या नाभीच्या ठिकाणीं मेरुपर्वत आहे, व याचा व्यास एक लक्ष योजनें आहे. या जम्बूद्वीपाच्या सभोंवार लवणसमुद्र, जंबूद्वीपाच्या दुप्पट व्यासाचा आहे. याच्या भोंवती वलयाकृति द्वीप, भोंवतीं समुद्र असें असंखेय द्वीप व समुद्र आहेत. हा सर्व तिर्यग्लोक. याप्रमाणें लोकांचें वर्णन झालें. आतां अलोकाचें वर्णन. अलोक हा केवलाशात्मक आहे. याठिकाणीं जीव नाहींत, पुद्गल नाहींत, धर्म नाहीं, अधर्म नाहीं. केवलाकाशरूप अलोक हा अनंत आहे.

आकाश, काल, पुद्गलः—अजीव भेदांपैकीं, धर्मास्तिकाय व अधर्मास्तिकाय यांचें विवेचन येथवर झालें. आतां आकाश काल व पुद्गल हे तीन अजीव राहिले. यांपैकीं आकाश हें सर्वव्यापि सर्वाधार, स्वप्रतिष्ठ व अनन्तप्रदेश आहे हें सर्वांनां ठाऊकच आहे. दिक् हें आकाशाचेंच दुसरें नांव आहे. आकाशाचे भाग दोन, लोकाकाश (=लोकसंबद्ध आकाश ), व अलोकाकाश (=अलोकरूप आकाश). कालाचें लक्षण वर्तना म्ह नवा,जुना इत्यादि विकार; अर्थात् ज्याच्या सहकारितेनें जीवादिक द्रव्यांत सदरील विकार होतात तें द्रव्य कालद्रव्य होय. हें नवपुराणादि विकारहेतु काल द्रव्य नरक्षेत्रांत भरलेलें आहे हें नरक्षेत्र म्हणजे जम्बुद्वीप त्याला वेढणारा लवणोदधि, त्याच्या भोंवतालचा धातकीखण्ड, या खण्डाभोंवतालचा कालोदधि आणि कालोदधीला वेढणाऱ्या पुष्करावर्तद्वीपाचा अर्धा भाग इतकें क्षेत्र होय. या क्षेत्राचा व्यास ४५ लक्ष योजनें आहे. पुद्गल म्हणजे ज्या पदार्थाला स्पर्श, रस, गंध आणि वर्ण आहे तो पदार्थ. पुद्गलाचे प्रकार दोन. अणु आणि स्कंध. स्कंधापासून वेगळे झालेले अबद्ध व अप्रदेशरूप ते परमाणु. स्कंध हे त्यांच्यांतील प्रदेशसंख्येप्रमाणें द्विप्रदेशिक,संख्येयप्रदेशिक, असंख्येयप्रदेशिक, अथवा अनन्तप्रदेशिक असतात. घट, पट इत्यादि स्कंधांच्या ठिकाणीं संबद्ध असा जो परम अणु त्याला प्रदेश म्हणतात. हाच अणु स्कंधापासून वेगळा झाला म्हणजे त्याला परमाणु हें नांव देतात. जीव, धर्म, अधर्म, व आकाश यांचे प्रदेश हीं स्वतंत्र द्रव्यें नाहींत. पुद्गलांचे प्रदेश हीं स्वतंत्र द्रव्यें असतात. हे प्रदेश स्वतंत्र द्रव्यरूप असल्यानें पुद्गलांपासून वेगळे होऊन राहूं शकतात; अशी गोष्ट जीवादिप्रदेशांची नाहीं. जीवादिकांचे प्रदेश ( स्वतंत्रद्रव्यरूप नसल्यानें ) त्यांच्यापासून वेगळे होऊं शकत नाहींत. ते परस्परसंबद्ध एकीभूत अशा स्थितींतच नेहमीं असतात. अर्थात् पुद्गलप्रदेश व जीवादिप्रदेश हे एका जातींचे नव्हत.

वस्तुतः मूल पदार्थ दोनच जीव, व अजीवः— वस्तुतः जीव व अजीव हे दोनच पदार्थ मूल पदार्थ होत. कोणताहि पदार्थ घ्या, तो या दोहोंपैकीं एकाच्या सदरांत अगर पोटांत येतो धर्म, अधर्म, आकाश, काल व पुद्गल हे आतां वर्णन केल्याप्रमाणें अजीवांत अंतर्भूत होतात. पुण्य, पाप, आश्रव, संवर, निर्जरा, बंध व मोक्ष हीं तत्त्वें जीव किंवा अजीव यांच्यांतच अंतर्भूत होतात, पृथक् राहूं शकत नाहींत ज्ञानादि गुणरूपादि गुण, उत्क्षेपणादि कर्में, हीं जीवद्रव्य अथवा अजीवद्रव्य यांशीं संबद्ध व अभिन्न असल्यानें त्यांचा पृथक् पदार्थ म्हणून विचार होणें अयोग्य आहे. सामान्य, विशेष हींहि वस्तूंचीं स्वरूपें होत. समवायसंबंध, ( नैयायिक व वैशेषिक यांनां स्वतंत्र पदार्थ म्हणून अभिमत आहे तो ) देखील द्रव्यापासून पृथक्स्थितींत राहूं शकत नाहीं. अर्थात त्याला स्वतंत्र पदार्थ मानणें योग्य नाहीं. अभावाला आर्हत भावात्मक अथवा तार्किक सार्वभौम श्रीयशोविजयगणि यांनीं आपल्या न्यायालोकांत म्हटल्याप्रमाणें अधिकरणरूप मानतात; अर्थातच त्याचा यथासंभव जीव अथवा अजीव यांत अंतर्भाव होतो. याप्रमाणें जीव व अजीव हे दोनच मूल पदार्थ आहेत हा सिद्धांत ठरतो. तरी गोबलीवर्द न्यायानें विशेष ज्ञान होण्यासाठीं व संसाराचे दोष दाखवून निःश्रेयसाच्या मार्गाकडे लोकांचें लक्ष लावण्यासाठीं पुण्यादि तत्त्वांचा वेगळा विचार करणें युक्त आहे.

पुण्य, पाप, आश्रव, संवर,निर्जराः—पुण्य म्हणजे जीवाशीं संबद्ध असलेला व त्याला स्वर्ग, ऐश्वर्य आदिक चांगलें फल मिळवून देणारा कर्मसमुदाय. पाप म्हणजे याच्या विपरीत असा कर्मसमुदाय. आश्रव म्हणजे जीवरूप तडागामध्यें कर्मरूप उदक आणून सोडणारा पदार्थ, अर्थात् कर्मांचें

उपादानकारण म्हणजे आश्रव. आश्रवाचे प्रकार चारः मिथ्यात्व, अविरति, कषाय व योग. मिथ्यात्व म्हणजे कोणत्याहि वस्तूचें जें खरें स्वरूप त्याच्याहून विपरीत अशा स्वरूपाचा तिच्या ठिकाणीं भास होणें. हिंसा, अनृत, स्तेय, ब्रह्मचर्याभाव व अपरिग्रह यांजपासून दूर न रहाणें याचें नांव अविरति. क्रोध,मान, माया व लोभ यांनां कषाय म्हणतात. मनाच्या वाणीच्या व शरीराच्या व्यापारांनां योग म्हणतात.शुभ योग हे पुण्यजनक व अशुभ योग हे पापजनक समजावे.संवर हा पदार्थ आश्रवाच्या विरुद्ध जातीचा.आतांच जे मिथ्यात्व वगैरे कर्मोपादान हेतू सांगितले त्यांचा विरोध करणाऱ्या गोष्टी संवरांत अंतर्भूत होतात.आश्रवाच्या चार प्रकारांप्रमाणें तद्विरोधी संवराचेहि चार प्रकार आहेत.सम्यग्दर्शन ( मिथ्यात्वविरोधी ),विरति ( अविरतिविरोधी ), क्षमादिक ( = क्षमा, मृदुत्व, आर्जव, संतोष हे अनुक्रमें क्रोध, मान, माया, लोभ यांचे विरोधी ), मनोगुप्त्यादिक ( मनोगुप्ति वाग्गुप्ति, कायगुप्ति हे मनोयोग वाग्योग, काययोग यांचे प्रतिरोधी ). तपानें कर्मांचा देशतः [ सामस्त्यानें नव्हे तो देशतः, क्षय. कर्म हें पुद्गल (प्रदेश, परमाणु ) समूहात्मक आहे. तपानें कर्मांचा प्रदेशवार ( देशतः ) क्षय होत जातो. ]क्षय ( = निर्जरण ) होणें यांचें नांव निर्जरा.

बन्धः—या लोकांत, एखाद्या डबींत अंजनचूर्ण दाबून भरावें त्याप्रमाणें पुद्गलद्रव्य दाबून भरलेलें आहे. या पुद्गलांपैकीं कर्मयोग्यपुद्गलांचा व आत्म्याचा क्षीरनीराप्रमाणें अथवा अग्नि आणि लोहपिंड यांच्याप्रमाणें जो दृढ परस्परसंश्लेषात्मक संबंध होतो, त्याचें नांव बंध. हा बंध चार प्रकारचा आहे—प्रकृतिबंध, स्थितिबंध, अनुभागबंध व प्रदेशबंध.

प्रकृतिबंधः—प्रकृतीचे प्रकार आठ–ज्ञानावरण, दर्शनावरण, वेदनीय, मोहनीय, आयुष्क, नाम, गोत्र व अन्तराय. ज्ञानावरण म्हणजे नजरबंद करणाऱ्या कपटकृतीप्रमाणें जें कर्म ज्ञानावर पडदा आणतें तें कर्म याच कर्मांच्या योगानें विद्वान लोकांतहि स्मृतिभ्रंशादि विकार होतात. हें कर्म परिपुष्ट होत जातें त्याप्रमाणें ज्ञानधनाचा ऱ्हास होत जातो. व तें शिथिल होतें तसतसा ज्ञानाचा प्रकाश अधिकाधिक पसरतो. या कर्माचा पूर्णपणें क्षय झाला म्हणजे सकल पदार्थांचें ज्ञान होतें. दर्शनावरण म्हणजे दृष्टीवर आवरण घालणारें कर्म. निद्रादिक या कर्मांच्या योगें प्राप्त होतात. अंधत्व, बधिरत्व इत्यादिकहि याच कर्मांचीं फळें होत. वेदनीय म्हणजे सुख वा असुख उत्पन्न करणारें कर्म; याचे सातवेदनीय ( सात = सुख ) व असातवेदनीय असे दोन प्रकार मानतात.

मोहनीय कर्मः—मोहनीय म्ह॰ मदिरेप्रमाणें मोह पाडणारें कर्म. या कर्माच्या योगानें ' हें चांगलें, हें वाईट ' या स्वरूपाचें जें आपलें ज्ञान तें नष्ट होतें. मोहनीयाचे प्रकार दोन. दर्शनमोहनीय व चारित्रमोहनीय. दर्शनमोहनीय हें मिथ्यात्व, सम्यक्त्व, मिश्र असें तीन प्रकारचें आहे. मिथ्यात्व व सम्यक्त्व यांचें विवरण वर आश्रवसंवर प्रकरणांत आलेंच आहे. मिश्र मोहनीयासंबंधानें श्री रत्नशेखरसूरि आपल्या गुणस्थानक्रमारोहांत म्हणतात–

जात्यन्तरसमुद्भूतिर्वडवाखरयोर्यथा ।
गुडदध्नोः समायोगे रसभेदान्तरं यथा ॥
तथा धर्मद्वयश्रद्धा जायते समबुद्धितः ।
मिश्रोऽसौ भण्यते तस्मात् भावो जात्यन्तरात्मकः ॥

[ अर्थः—घोडी व गाढव यांच्या संयोगानें नवी जाति उत्पन्न होते, गूळ व दही यांच्या संयोगानें तिसराच रस उत्पन्न होतो, तद्वत् सत्य व असत्य अशा दोन धर्मांच्या ( तत्वांचे ) ठिकाणीं सारखी बुद्धि ठेवल्यानें दोन्हीं धर्मांविषयीं श्रद्धा उत्पन्न होते. हा जो धर्मद्वयश्रद्धारूप भाव हा सत्यासत्यश्रद्धाविपरीत अशा तिसऱ्यासच नव्या जातीचा असतो, व याला मिश्र असें म्हणतात. ] नालिकेरद्वीपांतील लोकांनां गोड पदार्थांचा लोभ वा कंटाळा दोन्हीहि असत नाहींत, त्यासंबंधानें ते उदासीन असतात; तद्वत् सत्यमार्गासंबंधानें प्रेम व द्वेष दोहोंचाहि अभाव असण्याची जी स्थिति ती मिश्र मोहनीय कर्माची स्थिति होय. मिथ्यात्वाचा जो पुद्गलसमूह तो अत्यंत अशुद्ध स्थितींत असेल तेव्हां त्याला मिथ्यात्व हें नांव असतें. पुद्गलसमूह मदनकोद्रव न्यायानें ( कोद्रु खाल्यानें कामविकार हटतो त्याप्रमाणें ) सम्यग्दर्शनाच्या उपायानें परिशुद्ध होऊन विकार उत्पन्न करीनासा झाला म्हणजे याला अशुद्ध सम्यक्त्व असें म्हणतात. हाच पुद्गलसमूह किंचितसा विकार उत्पन्न करण्याच्या स्थितींत अर्थात् अर्धविशुद्ध स्थितींत असेल तर त्याला मिश्र मोहनीय म्हणतात. चारित्रमोहनीय कर्म १६ प्रकारचें आहे. क्रोध, मान, माया, लोभ हे कषाय चारित्रमोहनीयरूप आहेत; तसेंच हास्य, रति, अरति, भय, शोक, जुगुप्सा, पुरुषवेद, स्त्रीवेद, नपुंसकवेद हे नऊ नोकषायहि चारित्रमोहनीयाचेच प्रकार आहेत. " नो " हा साहचर्यार्थी शब्द आहे. नोकषाय म्हणजे कषायसहचारी कषायोद्दीपक असाहि नोकषाय याचा अर्थ होतो.

आयुष्कर्म,नाम, गोत्र, अंतरायः—आयुष्कर्म चार प्रकारचें–सुरजन्म देणारें, नरजन्म देणारें, तिर्यग्जन्म देणारें व नरकजन्म देणारें. नामकर्माचे, संक्षेपतः सांगावयाचें तर दोन प्रकार आहेत. शुभ व अशुभ. विस्तरशः बोलावयाचें तर या कर्माचे नानाप्रकार आहेत. जसा चित्रकार विविध जातींचीं चित्रें निर्माण करतो, तद्वत् नामकर्म जीवांच्या ठिकाणीं हा मनुष्य, हा बलवान,हा पशु,हा निर्बल, हा रूपवान,हा कुरूप, हा सुस्वर, हा दुःस्वर असे नानाप्रकारचे विकार उत्पन्न करतें. गोत्रकर्म दोन प्रकारचें— उच्चगोत्र व नीचगोत्र सर्व ठिकाणीं गोत्रकर्म दोन प्रकारचें असल्यानें उच्च गोत्र, नीच गोत्र हा व्यवहार सर्वत्र संभवतो. अंतरायकर्म पांच प्रकारचें. दानान्तराय—देण्यासारखी वस्तु व सत्पात्र जवळ असून आणि दानाचें फल अवगत असून, ज्या कर्माच्या

उदयाच्या योगानें मनुष्य दान करण्यास प्रवृत्त होत नाहीं तें दानान्तराय कर्म. दाता चांगला, देयवस्तु आहे, याचक याचनाकुशल आहे, असें असून याचकाला लाभ होत नाहीं, तेव्हां हें ज्या कर्माच्या उदयानें होतें तें लाभान्तराय कर्म. आणि वैभव आहे, आहारमाल्यादि उत्तम प्रकारचे तयार आहेत, विरति देखील उत्पन्न झालेली नाहीं असें असतां आहारमाल्यादिकांचा भोग घडत नाहीं; ही गोष्ट जें कर्म घडवून आणतें तें भोगान्तराय कर्म. वस्त्रें, आभरणें असतां त्यांचा ज्या कर्मबलानें उपभोग घडत नाहीं तें उपभोगान्तराय कर्म. ज्याच्या योगानें बलवान् व निरोगी अशा स्थितींतहि मनुष्य गवताची काडी देखील वांकवूं शकत नाहीं तें वीर्यान्तराय कर्म.

कर्मः-'क्रियते इति कर्म' ही कर्माची व्युत्पत्ति आहे. क्रियते म्ह. "कषायादि दोषैः कर्मद्रव्यमात्मना वध्यते" (कषायादि दोषांमुळें आत्म्याशीं निगडित होतें) जैन दर्शनाप्रमाणें कर्म हें पुद्गलरूप आहे. यामुळेंच जीव हा कर्मानें, शृंखलेनें बांधावा तसा बांधला जातो. नैयायिकमतें कर्म हा जीवाचा गुण आहे; बौद्ध(सौगत)मतें कर्म वासनारूप आहे; कापिलमतें कर्म प्रकृतिविकाररूप आहे; ब्रह्मवादी लोकांच्या मतें अविद्यास्वभावालाच कर्म हें नांव आहे. शृंखलेनें बांधल्याप्रमाणें जीव कर्मानें बांधला जातो हा अनुभव असल्यानें अर्हतांनीं कर्मासंबंधींचीं लक्षणें न स्वीकारतां कर्म हें पुद्गलरूप मानलें आहे.

कर्मबन्ध कसा उत्पन्न होतोः-वर सांगितलेलें आठ प्रकारचें (ज्ञानावरणादि) कर्म आत्म्याशीं निगडित होतें तें खालील प्रकारानें होतें-ज्ञानवानाच्या ज्ञानाचा मत्सर करणें, त्याच्या मार्गांत विघ्नें आणणें, त्याच्या ज्ञानसाधनांचा नाश करणें या प्रकारच्या कर्मांमुळें ज्ञानावरणाचा बन्ध होतो. दर्शनवानाच्या दर्शनाचा मत्सर करणें, त्याच्या मार्गांत विघ्नें आणणें, दर्शन साधनांचा नाश करणें इत्यादींमुळें दर्शनावरणबंध उत्पन्न होतो. दुःख, शोक, ताप, आक्रन्दन, वध, परिदेवन (आत्मस्थ अथवा परस्थ) हीं असातवेदनीय बंध उत्पन्न करतात. सातवेदनीय बंध हा भूतानुकंपा, दान, सभा इत्यादिकांनीं उत्पन्न होतो. परमर्षि, धर्मशास्त्र व देवतादिक यांनां वर्ण नाहीं असा आग्रह धरणें हें दर्शनमोहनीयबंधाचें कारण. क्रोधादि कषायांच्या उदयानें तीव्र क्लेशकर परिणाम घडतात त्यांचें फळ चरित्रमोहिनीयबंध. वहुत कार्य अंगावर घेऊन त्यांत गुरफटलेलें असणें (बह्वारंभपरिग्रहत्व) यायोगें नारकायुर्बंध होतो. कपट हें तिर्यग्योनिबंधाला कारण होतें. अल्पकार्यव्यग्रता, मृदुस्वभाव, ऋजुता, यांच्या योगें मनुष्ययोनिबंध होतो. देवायुर्बंध सरागसंयम, देशसंयम, बालतप आदिकांनीं होतो. मनोवाक्काययोगाच्या बाबतींत वक्रत्व, परप्रतारणा करणें, यायोगें अशुभयोगाचा आणि याच्या उलट रीतीनें मनाचे वगैरे व्यापार केले असतां शुभयोगाचा बंध होतो. परनिन्दा, आत्मश्लाघा, दुसऱ्याचे सद्गुण लपवून असद्गुण उघडे करणें यायोगें नीच गोत्राचा व याच्या उलट वागण्यानें उच्च गोत्राचा बंध होतो. दुसऱ्यांनां विघ्न करण्यानें अंतरायबंध होतो.

स्थितिबन्ध, अनुभागबन्ध, प्रदेशबन्धः--आत्मगृहीत जे कर्मपुद्गल त्यांचा स्थितिकाल (स्थितिकालदृष्टीनें कर्मपुरुपांचा जो बंध होतो तो स्थितिबंध) तो स्थितिबंध. या कर्मपुद्गलांचा शुभ वा अशुभ घाती वा अघाति असा जो रस (फल देण्याची शक्ति) तो रसबन्ध अथवा अनुभागबन्ध (रसदृष्टीनें कर्मपुद्गलांचा बंध तो अनुभाग बंध). कर्मपुद्गलांचा जो प्रदेशसंख्यादृष्टीनें समूह तो प्रदेशबंध (कर्मपुद्गलांचा त्यांच्या संख्येच्या दृष्टीनें जो बंध तो प्रदेशबंध)

कर्मप्रकृतींचा स्थितिकालः—ज्ञानावरणादि जीं आठ कर्में सांगितलीं त्यांच्या पुद्गलांचा उत्कृष्ट व निकृष्ट (अधिकांत अधिक व कमींत कमी) स्थितिकाल येणेंप्रमाणें आहे. उत्कृष्ट स्थितिज्ञानावरण, दर्शनावरण, वेदनीय व अंतराम यांचा काल कोटिगुणित तीस कोटी सागरोपम (हें कालाचें एक फार मोठें माप आहे. याचें स्वरूप देवेंद्रसूरि याच्या पंचमकर्मग्रंथांत वर्णिलेलें आहे). मोहनीयाचा काल कोटिगुणित ७० कोटि सागरोपम. नाम व गोत्र यांचा काल कोटिगुणित २० कोटि सागरोपम. आयुष्काचा काल ३३ सागरोपम. निकृष्टस्थिति--वेदनीय, १२ मुहुर्त; नाम व गोत्र, ८ मुहुर्त; शेषकर्में, अंतर्मुहूर्त.

कर्मपुद्गल व मोदकः—मोदकाच्या दाखल्यानें कर्माची प्रकृति, स्थिति, रस व प्रदेश नांसंबंधाची कल्पना स्पष्ट करतां येते, ती अशी. मोदक हा वात, पित्त, कफ, यांपैकींच एखाद्या द्रव्याचा असतो, व यांपैकींच दुसऱ्या एखाद्या द्रव्याला तो उपशामक होतो. याप्रमाणें ज्ञानावरणादि कर्मद्रव्य ज्ञानमत्सरादिकांपासून बनतें व ज्ञानाला आच्छादक होण्याचा धर्म (प्रकृति) त्यांजमध्यें असतो. मोदक महिना, पंधरा दिवस, अथवा एक दिवस टिकतो. तसें ज्ञानावरणादि कर्म कोटिगुणित तीस सागरोपम कोटि आदि काल पावेतों टिकतें. मोदकांतील रस स्निग्ध, मधुर इत्यादि प्रकारचा तसाच एकगुण, द्विगुण, त्रिगुण, असाहि असतो; तद्वत् कर्मांचा रस (फलदायिनी शक्ति) एकस्थानिक, द्विस्थानिक, त्रिस्थानिक इ० अशा प्रकारचा असतो. मोदक एकप्रसृति (पसा) द्वीप्रसृति इत्यादि प्रमाणांचे असतात, त्याप्रमाणें कर्मेंहि अल्प, बहु, बहुतम इत्यादि प्रमाणांचीं असतात.

मोक्षः—मोक्ष म्हणजे सकलकर्माचा क्षय. केवळ ज्ञान झाल्यावरच असा क्षय होतो. मोहनीय कर्माचा क्षय झाल्यानंतर ज्ञानावरण, दर्शनावरण, अंतराय या कर्मांचा क्षय होतो; व हें झाल्यानंतर केवळ ज्ञान होतें. यानंतर वेदनीय, आयुष्क, नाम, गोत्र या कर्मांचा क्षय होऊं शकतो. या कर्मांनां अघाति कर्में असें नांव दिलें आहे. यांनां भवोपग्राहि कर्में असेंहि म्हणतात; कारण भवरूप प्रासादाला या अघातिकर्मांचाच

शब्दोच्चार अनादि आहेत, या तत्वावर त्यानें फार जोर दिला आहे. शब्द व त्याचा अर्थ ह्यांमधील संबंध संकेतजन्य नसून शब्दाच्या ठायींच अर्थस्वयंभू असतो असें जैमिनीनें प्रतिपादन केलें आहे ( 'मीमांसा' पहा ).

पद्मपुराणांत जैमिनी व त्याचा संप्रदाय हा निरीश्वरवादी होता असें म्हटलें आहे. वास्तविक प्रकार त्याच्या उलट आहे. पूर्वमीमांसा हें दर्शन पूर्णपणें सेश्वरवादी आहे. पण वैदिक कर्मांचें व यज्ञांचें महत्व काय हेंच या मीमांसा-सूत्रांमध्यें आलें असल्याकारणानें व तात्विक व गहन विचारांचें यांत विवेचन नसल्यामुळें टीकाकारांची दिशाभूल झालेली आहे. जैमिनीच्या या दर्शनांत तत्वविचार विशेष नसल्यानें त्यांचा व्हावा तितका अभ्यास, अर्वाचीन, पौर्वात्य व पाश्चात्य पंडितांकडून झाला नाहीं पण अलीकडे या मीमांसेचें महत्व विद्वानांनां कळूं लागलें असून मुंबई विद्यापीठानें या विषयाला एम. ए. च्या अभ्यासक्रमांत स्थान दिलें आहे व याचें श्रेय मुख्यतः सरस्वतीभूषण वामनशास्त्री किंजवडेकर यांच्याकडे आहे.

**जैस**—संयुक्तप्रांतांत रायबरेली जिल्ह्यांत हें शहर आहे. येथील लोकसंख्या सन १९११ सालीं १२८५४ होती. येथें पूर्वी उदयनगर नांवाचा किल्ला होता. ह्या किल्ल्यावर सय्यद सालारच्या कामगारानें हल्ला केला; तेव्हां या जागेचें नांव फारशी जैश ( तळ ) ह्या नांवावरून पडलें. या ठिकाणीं जाम मशीद नांवाची मुख्य इमारत आहे.त्याच ठिकाणीं पद्मावती काव्याचा कर्ता महमद जैसी जन्मास आला.

**जैसवाय**—पंजाबांतील एक जात. लो. सं. ( १९११ ) ११२३७. हे मुख्यतः हिंदु असून, सैन्याबरोबर नोकर म्हणून पंजाबांत आले आहेत. ते पुरभय्या जातीचे असून छावणीमध्यें लहानसहान कामें करतांना आढळून येतात. ते बहुधा घोड्याचे मोतद्दार असतात. [ से. रि. ( पंजाब ) १९११. ]

**जोक्जाकर्ते**—हें डच ईस्ट इंडीजपैकीं जावा बेटाची रेसीडेन्सी आहे. त्याच्या उत्तरेकडे केदू व सुराकर्ता, पूर्वेकडे सुराकर्ता, दक्षिणेकडे हिन्दी महासागर व पश्चिमेस बागेलेन आहे. येथील लोकसंख्या ( १८९७ ) ८५८३९२ होती. प्रोगो व उपाक नद्यांच्या मधील पाचरीच्या आकाराचा भाग सोडून बाकी सर्व प्रदेश डोंगराळ आहे. वायव्येकडे मेरापीच्या ज्वालामुखीच्या दक्षिणेकडील ढाळ असून पूर्वेकडे किडूल टेंकडी व सेवू पठार आहे. बाकीचा भाग पाण्यानें डवडवलेला व सुपीक आहे. येथें ऊंस, तांदूळ व नीळ यांची लागवड करतात. समुद्रकिनाऱ्यावर मीठ काढितात. कोळसा, संगमरवरी दगड व सोनें सांपडतें. येथील राजसत्ता सुलतान ( डच सरकारचा मांडलिक ) व पेकू आलम नांवाचा स्वतंत्र राजा यांजमध्यें विभागली आहे. गावेन व इमोगिरी हे सुराकर्तातील विभाग आहेत. येथील मुख्य शहरापासून वटेन्हिक्षा, समरांग, सुराकर्ता या ठिकाणीं उत्तम रस्ते व रेल्वे नेल्या आहेत. जोक्जाकर्ता या शहरांत रेसीडेन्ट सुलतान व पेकू आलम राजा हे राहतात. सुराकर्ता व प्रम्बानन यांच्या सीमेजवळील कालासानच्या जवळ व इतर ठिकाणीं हिंदुदेवालयांच्या मोडक्या इमारती अद्यापि दिसतात.

**जोग, कृष्णाजी महादेव उर्फ (बाळाभाऊ)**.—एक महाराष्ट्रीय नट. हे कोंकणांतील साखरवाडीचे राहणार. इंग्रजी तीन इयत्तापर्यंत शिक्षण झाल्यानंतर शाहूनगरवासी नाटक मंडळींत यांनीं प्रवेश केला. नाट्याचार्य गणपतराव जोशी यांचे हे सहकारी. यांच्याकडे स्त्रीभूमिका करण्याचें काम असून त्या बाबतींत त्यांनीं त्यावेळीं विलक्षण लौकिक संपादन केला होता. स्वराविर्भाव, अभिनय, व कुलिनता हीं त्यांच्या कौशल्याचीं तीन अंगें होतीं. शरीराच्या सहजसौंदर्याची देणगीहि यानां होती. शाहूनगरवासी नाटक मंडळीच्या उत्कर्षाचें श्रेय यानांहि अंशतः देणें जरुर आहे. हे १९१० सालीं निवर्तले.

**जोगापरमानंद**—हा ज्ञानेश्वराच्या समकालीन संतकवि होता. याच्या ग्रंथाचें लेखन विसोबा खेचर करीत असे. हा बार्शी ( सोलापूर जिल्हा ) चा रहिवासी असून तो सूर्योपासक होता. नवलक्ष साळ्या असें याचें टोपण नांव होतें. याचें काव्य फुटकळ आढळलें आहे. मोठा ग्रंथ आढळत नाहीं. [ संतकविकाव्य सूचि ]

**जोगी**—या जातीची एकंदर लोकसंख्या २ लक्ष ६३ हजारांच्या वरती आहे व ती हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व प्रदेशांत आढळते. कांहीं लोक मठ करून राहतात व कांहीं फिरतीवर असतात. आसामांतील या जातीची लोकसंख्या १६९०९७ आहे यांच्या उत्पत्तीबद्दल विश्वसनीय माहिती नाहीं. आसामांत हे कोष्टयाचा धंदा करतात. अस्सल शूद्र जातीचे लोक यांनां हलके समजतात. सुरमा खिंडींतील लोक स्वतःला 'नाथ'म्हणवून शिवाचा अवतार जो गोरखनाथ त्याचे आपण वंशज आहों असें म्हणतात. नाथपंथी असल्यानें ते प्रेतांचें दहन न करितां तीं तशींच पुरतात त्यांच्यापैकीं कांहीं लोक संन्याशी असल्याची बतावणी करतात. काचार प्रांतामधील हे लोक समाजांतील आपला दर्जा वाढण्याकरितां हल्लीं प्रयत्न करीत आहेत व त्यांनीं विधवा-विवाहाची चाल टाकून दिली आहे. ब्रह्मपुत्रा खोऱ्यांतील या लोकांत पांच पोटभेद आहेत. गोलपाऱ्यांत हे लोक बालविवाह करूं लागले आहेत. पंजाबांतील यांची लो. सं. ५४९०० असून ते आपल्यास यति म्हणवितात. तथापि कांहीं जोगी विवाह करतात. यति–जोगी ही एक निराळी जात असून तिचा या जोग्यांशीं कांहीं संबंध नाहीं.

**जोगी रावळ**—पंजाबांत जोगी रावळ व जोगी या दोन शब्दांसंबंधानें बराच घोटाळा होतो. जोगी–रावळ ही जात दोन विशिष्ट जातींची भेसळ आहे असें म्हणतात. रावळांची उत्पत्ति रजपूत लोकांपासून आहे. पुढें रावळ लोकांमधील बाटलेल्या लोकांनीं व जोगी लोकांनीं आपला

पिढीजात धंदा सोडून वैद्यकी, व्यापार, भविष्य सांगणें हीं कामें उचललीं असावीं. दोघाचें धंदे एकसारखे असल्यामुळें या दोन जातींचें दळणवळण वाढून त्या एक झाल्या असाव्या व त्यांच्यांत बेटीव्यवहार सुरू झाला असावा. पुढें हे लोक आपणास ( जोगी रावळ न म्हणवितां ) फक्त रावळ म्हणवूं लागले. शिक्षणामुळें या लोकांत आतां फरक झाला आहे. हल्लीं ते धाडशी व्यापारी बनून त्यांनीं दुसऱ्या देशांत जाऊन पुष्कळ संपत्ति मिळविली आहे. मलाया, सिंगापूर, सुमात्रा वगैरे देशांत त्यांच्यापैकीं कांहीं गूढविद्या जाणणारे आहेत. कांहींनीं आस्ट्रेलिया वगैरे परकी देशांत वैद्यकींत चांगली कीर्ति मिळविली आहे असें म्हणतात. कांहीं ज्योतिषी आहेत. भाती, खोकर वगैरे उपनांवांवरून त्यांची उत्पत्ति रजपूत किंवा जाट लोकांपासून असावी असें वाटतें. जोगी म्हणविणारा दुसरा एक मुसुलमानांचा वर्ग पंजाबांत आहे. चौकशी अंतीं असें समजतें कीं, हे (मुसुलमान जोगी) मूळचे काश्मिरी असून, एका मुसुलमान साधूचे शिष्य झाले, म्हणून त्या सर्वांना जोगी असें नांव पडलें. हिंदु रावळ हे मुख्यतः लाहोर प्रांत, रावळपिंडी जिल्हा व चेनाबदरी, पतियाळा व भावलपूर संस्थानें यांत आढळतात.

काश्मीरमधील ह्यांची लोकसंख्या ५५५० असून ते हिंदु आणि मुसुलमानी धर्माचे आहेत ( साधु या सदराखालीं येणाऱ्या कानफाटे जोग्यांत व या लोकांमध्यें फार फरक आहे ) दुकडील कानफाटे साधुजोगी व हे जोगी भिन्न आहेत. ह्या जातीचे लोक शेतकरीवर्गापैकीं आहेत.

मध्यप्रांतांत यांची संख्या १५००० पर्यंत आहे. येथें यांचे १२ पंथ असून त्यांचीं नांवें त्यांस माहित नाहींत. यांचे कानफाटे व औघड असे दोन वर्ग आहेत. कानफाटे गुरूकडून कान टोंचून त्यास १। रुपया दक्षणा देतात व कानांत लांकडाच्या, दगडाच्या किंवा कांचेच्या बाळ्या घालतात. बाळी घालून कान दुभंगला तर तो मनुष्य निरुपयोगी झाला असें समजतात व त्यास जातीबाहेर टाकून त्याची समाधि देखील बांधीत नाहींत. प्रथम १२ वर्षे औघड दीक्षा घेऊन मग त्यास कानफाटी दीक्षा देतात. कानफाट्यांतील मुख्यास दर्शनी म्हणतात. औघड लोक गळ्यांत काळ्या लोंकरीच्या दोऱ्यांत एक शिटी लटकावितात व सकाळीं, संध्याकाळीं व दुपारीं जेवण्यापूर्वीं ती वाजवितात. तिला हे नाद किंवा पुंगी म्हणतात. प्रथम सर्वक्षौर करून नंतर दीक्षा घेतात. हे द्वारका व बद्रीनारायणास जाऊन तेथें तप्त मुद्रा घेतात. बद्रीनारायणाहून तांब्याचें कडें व केदारनाथाहून लोखंडाचें कडें आणून दंडांत घालतात व पांढऱ्या दगडी मण्यांची माळ बलुचिस्तानांतल्या लासबेला संस्थानांतलि हिंग्लज गांवाहून आणतात. हे आपलीं प्रेतें आसनमांडी घालून पुरतात व त्यावर समाधि बांधतात.

शिवरात्र हा यांचा मोठा सण आहे. नागपंचमीस हे नागाची पुजा करतात. अलीकडे यांपैकीं पुष्कळ लोकांनीं गृहस्थाश्रम पत्करला आहे, व आपली एक निराळी जातच बनविली आहे. तसेच त्यांनीं निरनिराळे धंदेहि उचलले आहेत. कोणी ' मणिहारी ' म्हणजे फुटकळ विक्री करणारे आहेत, कोणी पाटविना म्हणजे तागाचे दोरे वळणारे आहेत, तर कोणी लडैयामार म्हणजे कोल्हे मारून त्यांचें मांस विकणारे आहेत. यांची खालच्या वर्गांत गणना आहे, त्यांच्या हातचें कोणी पाणी सुद्धां घेत नाहीं. हे लोक लग्नांत ब्राह्मणांस बोलावितात.

हे ज्या ठिकाणीं रहातात तेथील शेतकऱ्यांच्या चालीरीती प्रमाणें यांच्या चालीरीती असतात. कानफाटे लोक मात्र स्वतः आपल्या जातीचें उपाध्याय बोलावतात. ते ब्राह्मणांस बोलावीत नाहींत. कांहीं लोक मंत्र, तंत्र, जादू वगैरेंवर पैसा मिळवितात. मणिहारी लोक कागद, टांक, पेन्सली, टिकल्या, सुया वगैरे विकतात व कोणी कोणी मोत्यें व पोंवळीं, विकतात. कोणी निरनिराळ्या प्रकारानें जुगारहि खेळतात. पूर्वीं हे लोक यात्रेंत मेलेल्या किंवा हरवलेल्या लोकांबद्दल सर्व माहिती मिळवून तोतयेपणा करीत.

मुंबई इलाख्यांत यांची लो. सं. ५२९६ असून हे लोक सर्व इलाख्याभर थोडेथोडे पसरलेले आहेत. हे गोरखनाथी पंथाचे आहेत. यांना कानफाटे असें दुसरें उपहासात्मक नांव देतात. यांच्या कानांचीं भोंकें मोठालीं असून, त्यांमध्यें ते लांकडी किंवा हस्तिदंती गोल वलयें घालतात. यांना नाथ असेंहि नांव आहे. रहाण्याच्या ठिकाणावरून यांचे (१) गुजराथी जोगी ( २ ) मराठे जोगी, असे दोन भाग झालेले आहेत. यांचे १२ पोटभाग असून, एका पोटभागांतील लोक दुसऱ्या पोटभागांतील लोकांशीं विवाहसंबंध करीत नाहींत. गोरखनाथाच्या १० शिष्यांनीं स्थापिलेलीं यांचीं १० गोत्रें आहेत. यांच्यांमध्यें सगोत्र विवाह होत नाहींत. हे मांसाहारी आहेत. ते १२ व्या वर्षी मुलांना दीक्षा देतात.

दक्षिण कानडामध्यें राहणारा व मराठी आणि तुलु भाषा बोलणारा जोगी पुरुषांचा एक वर्ग आहे. हे दुसऱ्या कोणाहि परजातीयास आपल्या जातींत घेत नाहींत व आपली स्वतंत्र जात मानतात. कदिरी येथें यांचा मुख्य मठ असून, हलोरी आणि भुवरासु या कानडांतील दोन ठिकाणीं त्यांच्या शाखा आहेत. भैरव ही यांची प्रमुख देवता असते. तथापि कित्येक जोगी, गोरक्षनाथासहि मुख्य मानतात. ब्रह्मचारी जोग्याच्या कानाला भोंक असून, त्यांत गेंड्याच्या शिंगाची अथवा चिनीमातीची चक्राकार मुद्रा असते. गृहस्थाश्रमी जोग्यांच्या कानांत मुद्रा नसतात. सर्व जोगी पुरुषांच्या गळ्यांत, पितळेची, तांब्याची अथवा चांदीची पुंगी असते तिला शिंगनाद अथवा शिंगी म्हणतात. भोजनापूर्वी भैरवनाथाचें स्मरण करून ही वाजवितात. लग्नविधीकरितां हे कऱ्हाडा ब्राह्मण बोलावितात. कित्येक जोगी, हमालांचीं, मजूरांचीं आणि नोकरांचीं कामें करतात.

म्हैसुरप्रांतांतील ह्या लोकांची एकंदर संख्या १२८८१ असून ते बंगलोर, कोलार व शिमोगा जिल्ह्यांत आढळतात. त्यांचा धंदा शेतीचा व भीक मागण्याचा आहे. हे तेलगु भिकाऱ्यांतील एका जातीचे लोक आहेत. याशिवाय ते सर्पास मंत्रानें भुलविण्याचा धंदा करतात. ही जात सर्व जातींतील वैराग्यांची मिळून झाली आहे. सिलेक्याट, हेलावा, जंगालिंग व पकानती हे या जातींतील प्रमुख भेद असून, शेवटचे दोन वैद्यकीचा धंदा करतात.

तेलंगणांत हे लोक भटकत फिरणाऱ्या दासरी भिकाऱ्यांच्या वर्गांत मोडतात. तिकडे हे लोक पोत अगर मणी विकतात; आणि डुकरें बाळगतात, तसेंच साप व नाग यांनां युक्तीनें पकडून गारुड्याचा धंदा करतात. त्यांच्या संवयी व आचार खालच्या दर्जाचे आहेत. रोटीव्यवहारांत कोणचाहि प्रतिबंध ते पाळीत नाहींत. वाटेल त्या शूद्राच्या घरीं ते अन्न खातात. त्यांच्या विधवा कोणाच्याहि रखेल्या म्हणून राहतात. यांच्यापैकीं पुष्कळ लोक शेतावरील मजुरी करतात. कांहीं लोक किरकोळ चोऱ्याहि करतात. हे लोक भटके आहेत. यांच्या बायका गोंदण्याचा धंदा करतात.

तामीळ प्रदेशांत जोग्यांनां धोंदीयन किंवा तोत्तियन असें नांव आहे. त्याचप्रमाणें झाडूवाल्यांचें काम करणारे जोगी, कोरवस अथवा ओडून या नांवानें ओळखले जातात. पार्वतीच्या शापामुळें आपणांस भिक्षावृत्तीनेंच राहणें भाग आहे असें हे जोगी म्हणतात; आणि रानउंदीर व मांजरें यांचें मांस हे खातात असें म्हणतात. हे दारूबाज आहेत. त्यांचा पोषाख घाणेरडा असून एका कांखेंत झोळी आणि दुसऱ्या कांखेंत सापाची टोपली घेऊन हे फिरतात. भिक्षा मिळाल्याशिवाय हे जागचे हालत नाहींत. त्यांच्या जवळ एक पोकळ भोपळा असून त्यांत हे चोरलेल्या वस्तू ठेवतात. या जातींतील बायका व्यभिचार करतात आणि कन्याच स्त्रिया उघडपणें वेश्येचा धंदाहि करितात. आपलें पावित्र्य पटविण्यासाठीं बायका गोमूत्र व गोमय खातात. एखादा अपराधी मनुष्य दंड देण्यास असमर्थ असल्यास त्याच्या डोक्यावर १० शेर वजनाचा दगड ठेवून त्यास एक फर्लांग चालवितात.

लग्नाच्या वेळीं वराकडून वधूला एक डुक्कर देणगीदाखल दिला जातो. वर वधूच्या घरीं जाऊन तिच्या गळ्यांत बोट्टु ( मंगळसूत्र ) बांधतो; ओड्डेस आणि आप्परवस लोकांत अशी म्हण आहे कीं, जोग्याची विधवा एकदां सोडून सातदां पुनर्विवाह करूं शकते.

जली-वल्लु लोकांत, मृत मनुष्याच्या छातीवरील खळग्यांत ( त्याला पुरतांना ) एक कोंबडीचें पिलूं व थोडेसें मीठ ठेवण्याचा प्रघात आहे.

पेद्दवाडु, मलालम्मा, गंगम्मा, अय्यावारु, रुद्रम्मा, आणि मदुरा विरडु देवांची हे लोक पूजा करितात. कांहीं प्रसंगीं हे लोक वाटमाऱ्यांचाहि धंदा करितात. जातीबाह्य झालेल्यास जातींत परत घेण्याचा विधि जंगमाच्या ( जातीचा मुख्य ) हस्तें होतो. [ सेन्सस ऑफ इंडिया, १९११, पु. ३, ७, १४, २०, २१; रोज-ग्लॉसरी ; सी. पी. सेन्ससरिपोर्ट १९२१; थर्स्टन—कास्ट्स् अँड ट्राइब्ज ऑफ स. इंडिया. ]

**जोगेश्वरी**—मुंबई इलाखा, ठाणें जिल्हा. बी. बी. सी. आय. रेल्वेच्या गोरेगांव स्टेशनच्या आग्नेयीस २॥ मैलांवर साष्टी तालुक्यांत असलेलें लेणें. उ.अ. १९° १३'व पू. रे. ७२° ५९'. हें लेणें सातव्या शतकांतील आहे.

**जोडिया**—मुंबई, काठेवाड, नवानगर जहागिरीचें मुख्य बंदर. पूर्वी हें अगदीं लहान मच्छिमार खेडें होतें. मेरामन खवासनें या ठिकाणाचें महत्त्व ओळखून येथील व्यापार वाढविण्यास आरंभ केला. उ. अ. २२° ४२' व पू. रे. ७०°२१'. शहराला तटबंदी असून आंत एक लहान किल्ला आहे. हल्लीं येथें सरकारी कचेऱ्या, मुलांमुलींच्या शाळा, पोष्टऑफीस व दवाखाना हीं आहेत.

**जोतिबाचा डोंगर**— मुंबई इलाखा, कोल्हापुर संस्थान. यास 'वाडी रत्नागिरी' असें एक नांव आहे. उ. अ. १६° ४८' व पू. रे. ७४° १३'. कोल्हापूर शहराच्या वायव्येस ९ मैलांवर पायथ्यापासून १००० फूट उंचीचा हा एक डोंगर आहे. डोंगरावर हजार दीड हजार लोकवस्तीचें एक खेडें आहे.खेड्याच्या मध्यभागीं केदारलिंग, केदारेश्वर आणि रामलिंग अशीं तीन जोतिबाचीं देवळें आहेत. स्थानिक दंतकथा अशी आहे कीं कोल्हापुरच्या अंबाबाईस राक्षसांनीं अत्यंत त्रास दिला,त्यामुळें ती त्रस्त झाली व तिनें हिमालयांत जाऊन केदारनाथाची तीव्र तपश्चर्या केली व राक्षसांचा नाश व्हावा अशी प्रार्थना केली. तिच्या प्रार्थनेवरून केदारेश्वर जोतिबाच्या डोंगरावर येऊन राहिले. पूर्वीचें देऊळ कोणी नावजी सय यानें बांधलें असें म्हणतात. त्याच्या जागीं हल्लींचें असलेलें देऊळ राणोजी शिंदे यानें १७३० मध्यें बांधलें. केदारेश्वराचें दुसरें देऊळ १८०८ सालीं दवलतराव शिंदे यानें बांधलें, रामलिंगचें देऊळ इ. स. १७८०सालीं मालजी पन्हाळकर यानीं बांधलें. या देवळाजवळ चोपडाईचें देऊळ असून गांवाबाहेर असलेलें यमाईचें देऊळ राणोजी शिंदे यानीं बांधलेलें आहे. यमाईच्या देवळासमोर दोन तीर्थें असून त्यांपैकीं एक इ. स. १७४३ च्या सुमारास कोल्हापुरच्या जिजाबाई साहेब यानीं बांधलें व दुसरें (जामदग्न्य तीर्थ)राणोजी शिंदे यानें बांधलें. जोतिबानें रत्नासुर नामक राक्षसाचा नाश केला म्हणून वाडीस रत्नागिरी असें नांव पडलें, अशी दंतकथा आहे. चैत्री पौर्णिमेस या विजयाप्रीत्यर्थ दरवर्षी मोठी जत्रा भरते. त्यावेळीं चाळीस पन्नास हजार लोक जत्रेस असतात.

**जोत्याजी केसरकर**—हा संभाजीचा एक स्वामिभक्त सेवक कोल्हापूर प्रांतांतील पुंजाळ गांवचा पाटील असून नेहमीं संभाजीच्या ( स्वारी शिकारींत ) निकट रहात असे.

त्यांपैकीं आज चार चालू आहेत. त्याचा वडील पुत्र दूहर, त्याचा रायपाळ, त्याचा कन्हूळ, त्याचा जल्हण, त्याचा थोदो, त्याचा सिल्को व त्याचा विरण होय. या सर्वांनीं आपलें राज्य वाढविलें. विरणचा पुत्र राजा राव चोंडा यानें परिहारच्या राजापासून १३८१ सालीं मंदोर घेतलें व त्याच्या मुलीशीं विवाहसंबंध करून, आपल्या राज्यास व नवीन घेतलेल्या मुलुखास बळकटी आणली. मंदोर ही राठोडांची राजधानी सुमारें ७८ वर्षें होती. निरनिराळ्या ठिकाणीं स्वाऱ्या करण्याकरितां हें फार सोयीचें ठिकाण होतें. चोंडा इ. स. १४०९ मध्यें मरण पावला. परंतु, मरण्यापूर्वीं त्यानें नागर व इतर कांहीं ठिकाणें आपल्या राज्यास जोडलीं होतीं. याला चौदा पुत्र होते, त्यांतील रणमल्ल हा, त्याच्या मागून गादीवर आला. उदेपुरकर राणा लाखाचा मेव्हणा असून, याचा बराच काळ चितोड येथें गेला.

लाखा मेल्यावर यानें उदेपूरच्या राजकारणांत ढवळाढवळ करण्याचा प्रयत्न केला, परंतु त्यांत तो मारला गेला. रणमल्लानें उदेपूर मोकलजी राण्याचा वध करण्याचा विचार केला होता, त्यामुळें त्याचा असा नाश झाला व त्याचें बरेंचसें राज्य उदेपूरवाल्यांनीं काबीज केलें. त्याच्या मागून राव जोध हा गादीवर बसला. यानें इ. स. १४५५ मध्यें सोजत ठिकाण खालसा केलें व इ स. १४५९ मध्यें जोधपुर शहर वसवून तेथें राजधानी केली व उदेपुरकराकडून आपला गेलेला पुष्कळ प्रांत परत मिळविला. यानें प्रजेस फार सुख दिलें. याला १४ पुत्र ( कोणी १७ होते असें म्हणतात ) होते; पैकीं वडील पुत्र सातल हा त्याच्या आधींच वारल्यामुळें दुसरा पुत्र सूरजमल्ल हा त्याच्या मागें इ. स १४८९ च्या सुमारास गादीवर बसला. यानें २७ वर्षें राज्य केलें. त्याला पांच पुत्र होते. एकदां पिपारच्या जत्रेंत, १२० राठोड कुमारिकांना पठाण लोक पळवून नेत होते, त्या वेळीं ( १५१६ ) झालेल्या चकमकींत हा सूरजमल्ल प्राणास मुकला. त्यानंतरच्या रावगंगानें (१५१६–१५३२) मेवाडच्या निशाणाखालीं, बाबराशीं लढाई करण्याकरितां, आपलें राठोड सैन्य पाठविलें होतें. त्यावेळीं खानुआ येथील रणांगणांत (१५२७) रावगंगाचा नातु रायमल्ल व बरेच राठोड सरदार मारले गेले. गंग हा १५३२सालीं मेला. त्याच्या मागचा राव मालदेव ( १५३२–१५६९ ) याच्या कारकीर्दीत या राज्याची सत्ता शिखरास पोंहोंचली. हा योद्धा व मुत्सद्दीहि होता. ज्यावेळीं हुमायून बादशहा पदच्युत झाला, त्यावेळीं त्यानें मालदेवाचा आश्रय घेण्याचा प्रयत्न केला. परंतु मालदेवानें त्यास आश्रय दिला नाहीं. मारवाड जिंकण्याच्या उद्देशानें शीरशहानें ( १५४४ ) ८०००० सैन्य मालदेवाविरुद्ध पाठविलें. यावेळीं ज्या लढाया झाल्या, त्यांत मालदेवानें शीरशहाचें अत्यंत नुकसान केलें. त्यानें मुसुलमानांपासून अजमेर व नागोर परत घेतलें. जोधपुर शहराभोंवतीं तट बांधला व राज्यांत सर्वत्र गड कोट बांधले. पुढें हुमायूनाच्या वेळचा सूड घेण्यासाठीं म्हणून अकबरानें या प्रांतावर स्वारी करून व शिकस्तीचा प्रयत्न करून मेरट, मालकोट आणि नागर किल्ले काबीज केले (१५६१). पुढें १८ वर्षें मालदेव लढतच होता. शेवटीं नाइलाजानें अकबराशीं तह करण्यासाठीं मानी मालदेवानें आपण स्वतः न जातां आपल्या चंद्रसेन पुत्रातर्फे खटपट चालविली. पण स्वतः मालदेव आला नाहीं, यामुळें अकबर चिडला व त्यानें जोधपुरास वेढा दिला. तेव्हां मालदेवानें मोठ्या कष्टानें वडील पुत्र उदेसिंगास आपल्या वतीनें अकबराच्या दरबारांत मुजरा करण्यास पाठविलें. पण तिकडे चंद्रसेनानें अकबराशीं लढाई सुरू ठेऊन त्यांत आपला प्राण दिला. यानंतर वरील अपमानानें व पुत्रशोकानें मालदेव लवकरच मरण पावला (१५७३). तेव्हां त्याच्या पुत्रांत गादीबद्दल तंटा सुरू झाला. त्याला एकंदर १२ पुत्र होते. त्यांपैकीं उदेसिंगास गादी मिळाली. याच्या कारकीर्दींत मारवाडचें स्वातंत्र्य नष्ट झालें. तो मुसुलमानांचा नुसता ताबेदार होऊन न राहतां त्यानें आपली बहीण जोधबाई हिचें अकबराशीं व आपली मुलगी मानबाई हिचें राजपुत्र सेलीमशीं लग्न लावलें. मात्र याबद्दल त्यानें अकबराकडून आपले पूर्वीचे प्रांत ( अजमीर खेरीजकरून ) परत मिळविले; शिवाय माळव्यांतील कांहीं सुपीक जिल्हे त्यास मिळून 'राजा' हा किताब मिळाला. तो अकबराला नेहमीं सैन्याची मदत करी. यानें ३३ वर्षें राज्य केलें. त्याला ३४ मुलें होतीं. त्याच्या मागून त्यांतील सूरसिंग हा राजा झाला ( १५९५-१६२० ). त्यानें शिरोहीच्या रावाचा पराभव करून गुजराथ काबीज केला. त्याचा वडील पुत्र गजसिंग यानें लहानपणीं झालूरच्या वेढ्यांत यश मिळविल्यानें जहांगिरानें त्याला तलवार बक्षीस दिली. सूरसिंहानें जोधपुरास विशेष शोभा आणली. शेवटीं त्यानें आपल्या वंशजांनीं नर्मदेपलीकडे जाऊं नये अशी शपथ एका स्तंभावर कोरून ठेविली. तो १६२० सालीं मेला. त्याला ६ पुत्र होते. त्याला सवाई राजा असा किताब जहांगिरानें दिला होता. नंतर त्याचा पुत्र गजसिंग हा ( यावेळीं बऱ्हाणपुरास होता ) जोधपुरास जाऊन गादीवर बसला. गजसिंगास दख्खनची सुभेदारी मिळाली, शिवाय, 'दलभंजन' आणि 'दलथंभन' हे किताब मिळाले. गजसिंग हा शहाजहानानें बापाविरुद्ध बंड केलें असतां, त्याला न मिळतां जहांगिरास मिळाला व बुंदीकोटा, जयपूर वगैरे राजांच्या मदतीनें गजसिंगानें हें बंड मोडलें. त्यामुळें जहांगिराची त्याच्यावर फार मर्जी बसली. पुढें तो गुजराथेंतील बंडाळी मोडीत असतां १६३८ सालीं एका लढाईत मारला गेला. त्याच्या मागें त्याचा दुसरा पुत्र जसवंतसिंग हा गादीवर आला ( इ स. १६३८–१६७८ ). हा प्रथम माळव्याचा सुभेदार होता. त्यावेळीं ( १६५८ ) अवरंगझेब व मुराद यांनीं आपल्या बापाविरुद्ध बंड उभारलें होतें व तें मोडण्याच्या कामावर याची नेमणूक झाली होती. तेथें

बेफिकीरीमुळें त्याचा पराभव झाला. पुढें त्यानें अवरंगझेबाला सुजाविरुद्ध बरवर मदत केली परंतु प्रत्यक्ष लढाईंत तो अचानक उलटला; व औरंगझेबाची छावणी लुटून, जोधपुरास निघून गेला. पुढें हा दख्खन आणि गुजराथचा सुभेदार होता. आपल्या मार्गांतील हा काटा नाहींसा व्हावा म्हणून ( १६७८ ) अवरंगझेबानें त्याची अफगाणच्या मोहिमेवर योजना केली. तिकडेच तो जमरूड येथें मरण पावला. ( जास्त माहिती जसवंतसिंग या नांवाखालीं पहा ). नंतर त्याचा पुत्र अजितसिंग हा गादीवर बसला.

जसवंत वारला तेव्हां अजितची आई त्याच्या वेळीं ७महिन्यांची गरोदर होती.ती प्रसूत झाल्यावर तिनें मारवाडची वाट धरली. परंतु वाटेंत दिल्लीस अवरंगझेबानें तिला जबरीनें ताब्यांत घेण्याचा प्रयत्न चालविला. तेव्हां तिचा विश्वासू सरदार दुर्गादास यानें अवरंगझेबाकडून बायकामुलांची परवानगी मिळवून त्या घोळक्यांत या मायलेकरांस जोधपुरकडे पाठविलें व एक तोतया अजित व त्याची आई दिल्लीस ठेविली. अखेर हें कपट उघडकीस आलें, तेव्हां अवरंगझेबानें जोधपुरावर सैन्य पाठविलें. परंतु अजित हातीं लागेना, तेव्हां त्या खोट्या मायलेकरांसच त्यानें मुद्दाम खरें मानून त्या तोतया मुलालाच जोधपुरचा मालक म्हणून पुष्कळ वर्षे वागविलें, व पुन्हां मारवाडवर स्वारी करून जोधपूर व इतर मोठीं गांवें लुटलीं, पुष्कळ देवळांचा नाश केला व सर्व राठोड वंशानें इस्लाम धर्म स्वीकारावा असें एक फर्मान काढलें. यामुळें सर्व रजपूत दुर्गादासाच्या सल्ल्यानें एकत्र झाले व त्यांनीं बहुतेक सर्व लढायांत अवरंगझेबाचा मोड करून त्यास परतविलें. दुर्गादासनें तर अवरंगझेबाच्या विरुद्ध अकबरास उठविलें व शेवटपर्यंत अवरंगझेबास चैन पडूं दिलें नाहीं. अखेर तो मरण पावल्यावर अजितसिंगानें जोधपुरावर चाल केली व तेथील मुसुलमानी सैन्याचा मोड करून राजधानी आपल्या ताब्यांत घेतली (१७०७). दुसऱ्याच वर्षी उदेपुर, जोधपुर व जयपुर हीं राज्यें एकत्र होऊन त्यांनीं मुसुलमानी अंमल झुगारून द्यावयाचें ठरविलें. जोधपुर आणि जयपुर येथील राजघराण्यांनीं मोंगलांशीं लग्नसंबंध केल्यामुळें, उदेपुरच्या राजघराण्यांशीं त्यांचे लग्नसंबंध होत नसत, ते पूर्ववत सुरू व्हावे, अशी एक अट, ही जूट होत असतांना घातलेली होती. या जुटीनें सांभर येथें बहादुरशहाचा सपाटून पराभव केल्यानें त्यानें लवकरच या दोस्तांशीं तह केला ( १७०९ ). अजित हा बापाप्रमाणें शूर, धाडशी व उत्साही होता. मुसुलमानांच्या विषयीं त्याच्या अंगांत फार द्वेष होता. त्यानें त्याप्रमाणें दिल्लीपतीस सतत त्रास दिला.त्याच्या अनेक फौजा त्याच्यावर आल्या, परंतु त्यानें त्यांचा पराभव केला. प्रजेस सुख दिलें व बहुतेक सारें मारवाड मुसुलमानांच्या हातून सोडविलें. सुरसिंग, गजसिंग, यशवंतसिंग, अजितसिंग असे चार राजे एकामागें एक पराक्रमी होऊन गेले.

सय्यद बंधूंच्या वेळीं अजितसिंगास रीतीप्रमाणें मुजरा करण्यास दिल्लीस बोलाविलें परंतु तो गेला नाहीं. त्यामुळें जोधपुर त्याच्यापासून जबरदस्तीनें घेण्यांत आलें. त्याचा वडील पुत्र अभयसिंग यास ओलीस म्हणून दिल्लीस नेण्यांत आलें. त्याशिवाय त्याला आपली मुलगी, फर्रुकशियर यास द्यावी लागून स्वतः दिल्लीदरबारांत हजर रहावें लागलें. पुढें कांहीं काळ दरबारांतील घालमेलींत अजितसिंगानें थोडेंबहूत अंग होतें. फर्रुकशियरच्या खुनानंतरच्या सय्यदांच्या बेतांनां अनुकूल न होता, अभयसिंगास मागें ठेवून तो जोधपुरास परत आला( १७१९ ). लगेच ( १७२१ ) त्यानें अजमीर काबीज केलें व तेथें आपल्या नांवाचें नाणें पाडलें. परंतु दोन वर्षांनीं महमदशहानें अजमीर घेतलें. मध्यंतरीं, जोधपूर राज्याचा नाश न व्हावा व आपली बढती होण्यास विलंब होऊ नये म्हणून अभयसिंगानें आपल्या पित्याचा खून करावा, अशाविषयीं दिल्लीपतीकडून त्याचें मन वळविण्यांत आलें; व त्याप्रमाणें त्यानें आपला भाऊ बखतसिंग याजकरवीं तें अमानुष कृत्य पार पाडलें ( १७३१ ). त्यानंतर अभयसिंगानें सुमारें २६ वर्षे राज्य केलें. अहमदाबाद सर करण्यांत (१७३१) व सरबुलंदखानाचें बंड मोडण्यांत, यानें अहमदशहास बरीच मदत केली होती.याची कारकीर्द बखतसिंगाशीं लढण्यात गेली. हा स्वतः आळशी, क्रूर व व्यसनी होता. गुजराथेंतील कांहीं सुपीक प्रांत त्यानें आपल्या राज्यास जोडले. टॉड म्हणतो कीं, "पितृहत्येबद्दल हें जें बक्षीस मिळालें तेंच मारवाडच्या सर्व गृहकलहास कारण झालें."

इ. स. १७५० मध्यें अभयसिंग मरण पावल्यावर अभयसिंग याचा पुत्र रामसिंग हा गादीवर बसला. परंतु तो अल्पवयी ( १९ वर्षांचा ) असल्यानें अविचारानें त्यानें बखतसिंगाची जहागीर जप्त करून त्यावर स्वारी केली, परंतु त्यांत त्याचाच पराभव झाला व तो उज्जनीस पळून गेला, त्यावेळीं जयप्पा शिंदे तेथें होता; त्याची मदत घेऊन तो या प्रांतावर स्वारी करणार, इतक्यांत बखतसिंग मेला (कोणी म्हणतात कीं त्यास मावशीकडून विषप्रयोग झाला). बखतसिंग हा उदार व शूर होता. पितृहत्येच्या पातकाखेरीज त्याच्या हातून दुसरें वाईट काम घडलें नाहीं. त्यानें ३ वर्षे राज्य करून बऱ्याच सुधारणा केल्या. जोधपूरची तटबंदी पुरी करून राज्याचें उत्पन्न अनेक प्रकारांनीं वाढविलें. यानंतर बखतसिंगाचा पुत्र विजयसिंग गादीवर बसला. मराठ्यांनीं रामसिंगास मदत केली व त्यानें (१७६१) मेरट येथें विजयसिंगाचा पराभव केला. पुढें जयाप्पाचा खून झाल्यामुळें मराठ्यांनीं रामसिंगाला हांकलून देऊन विजयसिंगापासून अजमीरचा किल्ला व प्रांत घेऊन त्यावर खंडणी बसविली. यावेळीं मराठेच संस्थानचे मालक बनले. रामसिंग जयपूर येथें आश्रयास राहिला; तेथेंच तो १७७३ सालीं मेला. यानंतर कांहीं वर्षे मारवाडांत स्वस्थता होती. परंतु

लवकरच विजयसिंहानें मारवाडांत धुमाकूळ घातला. त्यानें आपले सरदार डोईजड झाले म्हणून त्यांनां एका निमित्तानें एकत्र करून सरसकट सर्वांचे खून करविले तेव्हां प्रजा खवळून जाऊं नये म्हणून त्यानें अटकेकडे स्वारी करून अमरकोट घेतलें, तसेंच जसलमीर व मेरवाडया संस्थानिकांनीं मारवाडचा कांहीं प्रांत बळकाविला होता तोहि सोडविला; आणि मराठयांच्या विरुद्ध कारस्थानें करूं लागला. तेव्हां मराठयांच्याहि स्वाऱ्या त्यांच्या प्रांतावर होऊं लागल्या. त्यामुळें पुन्हां एकदां मेवाड, जोधपूर आणि जयपूर हीं राज्यें मराठयांविरूद्ध एकत्र झालीं. इ. स. १७८७ मध्यें तुंग येथील लढाईंत शिंद्यांची पिच्छेहाट होऊन त्यांस अजमीर प्रांत थोडे दिवस सोडावा लागला. परंतु लवकरच (१७९१) शिंद्यानें रजपुतांचा पाटण (जून) व मेरट (सप्टेंबर) येथें पराजय केला व खुद्द जोधपुरावर ६० लाख खंडणी लादली व अजमीर परत मिळविलें. यापुढें विजयसिंग एका राखेच्या नादानें वागूं लागला. त्यामुळें फार अव्यवस्था माजली. तेव्हां सरदारांनीं तिचा खून केला. त्यानंतर विजयसिंग लवकरच मरण पावला व त्याच्यामागून त्याचा पुत्र भीमसिंग गादीवर आला (१७९३). त्यानें १० वर्षे राज्य केलें. भीमसिंगाला ६ भाऊ होते. भीमसिंग हा चवथा होता. त्यानें आपल्या सर्व भावांनां त्यांच्या मुलांसह ठार केलें. फक्त एक पुतण्या मानसिंग हा पळून झालूर येथें गेला. भीमसिंगानें झालूरास वेढा दिला. वेढा पुष्कळ दिवस चालू होता. पण झालूर पडलें नाहीं. इतक्यांत भीमसिंग एकाएकीं मेला (१८०३) व मानसिंग राजा झाला.

इंग्रजांनीं मानसिंगापाशीं मराठयांच्या विरुद्ध तहाची वाटाघाट सुरू केली; पण त्यानें ती धुडकावून यशवंतराव होळकरास मदत केली. याच सुमारास अमीरखान पठाणानें त्याच्या राज्यांत लुटालूट चालविली. उदेपूरच्या कृष्णाकुमारीच्या प्रकरणांत, जयपूरशीं मानसिंगानें लढाई सुरू केली. तेव्हां पेंढारी अमीरखानानें प्रथम जयपूरचा पक्ष व नंतर जोधपूरचा पक्ष स्वीकारला; व शेवटीं जोधपूरच्या राज्याचा कारभार दोन वर्षें स्वतःच बळकावून तेथील सर्व खजिना लुटून, आपण निघून गेला. भीमसिंगाला एक धोकलसिंग म्हणून पुत्र होता; त्याला शेखावतीच्या अनेक सरदारांनीं मदत दिली. त्यांच्यासह धोकल हा याच वेळीं मानसिंगावर चालून आला. तेव्हां मानसिंगानें वेडाचें ढोंग केलें व आपला पुत्र छत्रसिंग याच्या हातीं राज्य सोंपविलें. तेव्हां इंग्रजांनीं छत्रसिंगाशीं बोलणें सुरू केलें. इ. स. १८१८ मध्यें इंग्लिशांचा व या संस्थानचा तह झाला. त्याअन्वयें जोधपूरनें सालीना १०८००० रुपये खंडणी इंग्रजास द्यावी व जरूर लागेल तेव्हां १५०० घोडेस्वारांची मदत त्यांनां करावी व त्याबद्दल इंग्रजांनीं संस्थानचें रक्षण करावें असें ठरलें. यानंतर छत्रसिंग लवकरच वारला; तेव्हां मानसिंगानें वेडेपणाचें ढोंग झुगारून, स्वतः कारभार हातीं घेतला; व लगेच जे लोक त्याच्या विरुद्ध होते त्या सर्वांस त्यानें ठार केलें, प्रजेवर जुलूम करून एक कोट रुपये प्रजेपासून उकळले; राज्यांत बेबंदशाही माजली, पुष्कळ सरदार या जुलमामुळें परराज्यांत पळून गेले व त्यांनीं इंग्रजांची मदत मागितली. इंग्रजांनीं मानसिंगाला दपटशा देऊन त्यानें जप्त केलेल्या सरदारांच्या पुष्कळ जमिनी परत देवविल्या. इ. स. १८२७ मध्यें धोकलसिंगास पुढें करून पुन्हां सरदारांनीं बंड केलें, परंतु तें मोडण्यांत आलें. अखेर (१८३९) राज्यांत अत्यंत असंतोष पसरल्यामुळें इंग्रजांनीं मध्यें पडून जोधपुरावर सैन्य पाठवून पांच महिने जोधपूरचा लष्करी ताबा घेतला. तेव्हां मानसिंगानें योग्य रीतीनें राज्यकारभार करूं असा करार केला. या तहानें त्याच्या दरबारीं पोलिटिकल एजंट (इंग्रजांचा) येऊन बसला व जोधपूरचें स्वातंत्र्य नष्ट झालें. पुढें ४ वर्षांनीं तो निपुत्रिक मेला. तेव्हां धोकलसिंगानें आपला हक्क पुढें आणला, परंतु तो मान्य झाला नाहीं. मारवाडांतील अहमदनगर या जहागिरीचा मालक तखतसिंग यांस दत्तक घेऊन गादीवर बसविण्यांत आलें (१८४३).

तखतसिंग हा अजितसिंहाचा पणतु होता. तखतसिंगानें १८५७ सालीं इंग्लिशांस चांगली मदत केली. परंतु पुढें राज्यांत अव्यवस्था झाल्यामुळें (१८६८) हिंदुस्थान सरकारास कारभारांत पुन्हां हात घालावा लागला. तखतसिंग धनलोभी व आळशी निघाल्यानें त्याच्या अधिकाऱ्यांनीं प्रजेस फार त्रास दिला. अखेर तो १८७३ सालीं मरण पावला. त्याच्या मागून (वडील पुत्र) जसवंतसिंग गादीवर आला. जोधपूरच्या महाराजास पूर्वी १७ तोफांची सलामी होती, ती याच्या कारकीर्दींत प्रथम १९ व नंतर २१ पर्यंत वाढविण्यांत आली. हा इ. स. १८९५ मध्यें मरण पावला. याच्या मागून त्याचा एकुलता एक अज्ञान पुत्र सरदारसिंग गादीवर बसला. त्याला इ. स. १८९८ मध्यें सर्व अधिकार मिळाले. तो अज्ञान असतां सर्व कारभार त्याचा चुलता महाराज सर प्रतापसिंग (ईदरचा महाराज) पहात असे. त्याच्या कारकीर्दींत पुष्कळ सुधारणा झाल्या. तो १९११ सालीं वारल्यावर त्याचा वडील पुत्र सुमेरसिंग बहादुर गादीवर आला. यावेळीं त्याचें वय १४ होतें व राज्यकारभार कौंसिल ऑफ रीजन्सीमार्फत चालत असे. कौंसिलचा अध्यक्ष सर प्रतापसिंग होता. या कामासाठीं त्यानें आपल्या ईदरच्या राजसिंहासनाचा राजीनामा दिला होता. गेल्या महायुद्धांत सुमेरसिंग व प्रतापसिंग यांनीं इंग्रजसरकारास फार मदत केली. ते दोघे स्वतः यूरोपांत रणांगणावर गेले होते. महाराज वयांत येऊन त्याला के. बी. ई. ची पदवीहि मिळाली होती. त्याला स. १९१६ त संस्थानची सर्व अखत्यारी मिळाली. परंतु तो थोडयाच दिवसांनीं मरण पावला (आक्टोबर १९१८). त्यानंतर त्याचा धाकटा भाऊ

महाराजा उमेदसिंग गादीवर बसला. हा सध्यां अज्ञान असल्यानें राज्यकारभार वरीलप्रमाणेंच रीजन्सी कौन्सिलमार्फत चालतो.

संस्थानांत प्राचीन अवशेष पुष्कळ ठिकाणीं ( वाली, भीनमाळ, दिडवाण, जालोर, मंदोर, नाडोल, नागर, पाली, राणपुर आणि सादी वगैरे) सांपडतात. यांत १९११ सालीं२५ शहरें व ४०८८ गावें होतीं. ब्रिटीश मुलखांतील मेरवाडा जिल्ह्यांतील २१ खेडयांवर जरी हिंदुस्थान सरकारचा ताबा चालतो तरी जोधपुर दरबारच्या १८८५ सालच्या तहान्वयें संस्थानचे कांहीं अधिकार त्या खेडयांवर चालतात. त्याप्रमाणें सांभर गांवावर जोधपुर व जयपुर या दोन्ही संस्थानांचा अधिकार चालतो. संस्थानांत तेवीस हुकूमत-जिल्हे आहेत.

या संस्थानांत शेंकडा ८३ लोकवस्ती हिंदूंची आहे. येथें मुख्यत्वेंकरून मारवाडी भाषा बोलतात. बहुतेक सर्व प्रदेश रेताड आहे. या संस्थानांत कांहीं ठिकाणीं उंट नांगरास जोडतात. बाजरी, ज्वारी, मठ, मका, तीळ, आणि कापूस हीं मुख्य पिकें होत. रब्बीचीं पिकें ( गहूं, हरभरा, मोहरी वगैरे ) सुपीक जमीनींत होतात. या संस्थानांत सुमारें ३५५ चौ. मैल जंगल आहे. या प्रदेशांत मीठ बरेंच सांपडतें. तें खाणींतून काढण्याचे बहुतेक सर्व हक्क ब्रिटिश सरकाराकडे आहेत. सांभर तलावाजवळ माक्राण येथें संगमरवरी दगड सांपडतो.

या संस्थानांत विशेष महत्त्वाचे असे उद्योगधंदे नाहींत. संस्थानांतून मीठ, जनावरें, कातडीं, हाडें, लोंकर, कापूस, गळिताचीं धान्यें, संगमरवरी दगड, कुरुंदाचा दगड वगैरे बाहेर जातात. मारवाडी घोडे राजपुतान्यांत प्रख्यात आहेत. राजपुताना-माळवा-रेल्वे ही संस्थानच्या आग्नेयीकडील भागांतून जाते. तसेंच जोधपूर-बिकानेर रेल्वेचा एक फांटा संस्थानच्या मालकीचा आहे. या फांटयाची एकंदर लांबी ४५५ मैल असून हा फांटा संस्थानांत मुख्य ठिकाणीं खेळवला आहे. यास एक कोटी बावीस लक्ष रुपये भांडवल खर्च झालें आहे.

या संस्थानांत पाऊस नेहमीं कमी पडतो, त्यामुळें दुष्काळ वारंवार पडतात. साधारण आठ वर्षांनीं एकदां दुष्काळ पडावयाचा अशा अर्थाची एक म्हण इकडे प्रचारांत आहे. संस्थानांत जसवंतसागर नांवाचा एक तलाव आहे. संस्थानचा कारभार कौंसिलच्या मार्फत येथील महाराज पहात असतात. या संस्थानांत पूर्वी चांदीचें नाणें पाडीत. त्यास 'विजयशाही' व 'इक्तीसंद' अशीं नांवें होतीं. परंतु ब्रिटिश नाण्यापेक्षां त्यास बाजारांत किंमत कमी येऊं लागल्यामुळें संस्थाननें ब्रिटिश नाणें सरसहा सुरू केलें. यांत फक्त ६९० खालसा गांवें असून, त्यांवर दरबारचा प्रत्यक्ष अधिकार चालतो. बाकीचीं गांवें जहागिरदार, भुमिया, इनामदार, चारण, ब्राह्मण, धार्मिक संस्था वगैरेंच्या मालकीचीं आहेत. यांच्यापासून दरबारास उत्पन्न मिळण्याचे मार्ग निराळे आहेत. पूर्वी सरकारसारा ऐनजिनसीं देण्याची वहिवाट होती. परंतु इ. स. १८९४ पासून खालसा गांवांत सारा नाण्यांत धेण्याची वहिवाट सुरु झाली. इतर ठिकाणीं कोठें कोठें साऱ्याबद्दल अद्यापि धान्य घेण्याची वहिवाट आहे.

श ह र.—हें जोधपूर संस्थानची राजधानी. उ. अ. २६° १८' व पू. रे. ७३° १'. हें जोधपूर-बिकानेर रेल्वेवरचें स्टेशन आहे. हें दिल्लीहून ३८० मैल व मुंबईहून ५९० मैल असून येथील लोकसंख्या ( १९२१ ) ७३४८० आहे. १४५९ सालीं राव जोधानें हें शहर वसविलें. जुन्या शहराभोंवतीं तट असून त्यास चार वेशी आहेत. हें जुनें शहर अर्वाचीन शहराच्या आग्नेयीस आहे. अर्वाचीन शहर एका डोंगराच्या पायथ्याशीं घोड्याच्या नालाच्या आकाराप्रमाणें वसलें असून त्यावर किल्ला आहे. अठराव्या शतकाच्या पूर्वार्धांत किल्ल्यास भक्कम तट बांधला असून सहा वेशी आहेत. राजपुतान्यांतील किल्ल्यांत हा किल्ला प्रेक्षणीय आहे. किल्ल्यांतील मोतीमहाल, फत्तेमहाल वगैरे इमारती पहाण्यासारख्या आहेत. शहरांत देखील मोठमोठे राजवाडे असून अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत बांधलेलें कुंजविहारीच्या मंदिराचें खोदकाम फारच सुंदर आहे.

जोधपूर येथें व्यापार बराच चालतो पण स्थानिक उद्योगधंदे महत्त्वाचे नाहींत. १८८४ सालापासून येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली आहे. शहरांतील मैला वगैरे काढण्याकरितां शहराभोंवतीं ट्रॅम्वेची योजना करुन पाणीची व्यवस्था विशेष स्वच्छरीतीनें केली आहे. जसवंतकॉलेज, दरबारहायस्कूल, रजपूतस्कूल व हयूसनगर्लस्स्कूल या मुख्य शिक्षणसंस्था आहेत. [ इंपे. ग्याझे. पु. १४; गोडबोले- संस्थानांचा एतद्देशीय इतिहास; टॉड-राजस्थान; टाईम्स इयरबुक ( १९२२ ); सेन्सस रिपोर्ट ( १९२१ ); डफ—हिस्टरी ऑफ दि मराठाज. ]

**जोधबाई**—अकबराची एक रजपूत राणी. ही जोधपूर (मारवाड) चा राजा मालदेव याची मुलगी. हिचा भाऊ उदयसिंह यानें ही अकबरास दिली. हिचें माहेरचें नांव जगतघोषिणी ऊर्फ बालमती असें होतें. ही जोधपुरच्या राजघराण्यांतील असल्यानें हिला जोधबाई असें टोपण नांव मिळालें. अकबराचें तिच्यावर फार प्रेम होतें. त्यानें आग्र्यास तिच्यासाठीं एक स्वतंत्र महाल बांधला होता. अकबराच्या मरणानंतर, जहांगिराच्या कारकीर्दींत हिनें आग्रा येथें वीष खाऊन आत्महत्या केली (१६११) तिनें सोहागपुर नांवाचें एक गांव वसवून तेथें वाडा बांधविला होता. याच गांवीं तिचें दफन झालें. हल्लीं हिची कबर व वाडा पडक्या अवस्थेंत आहेत. बील व ऐनेइअकबरी ह्मणते कीं, ही अकबराची बेगम नसून मिर्झा सलीम (जहांगीर बादशहा) याची बेगम होती व मालदेवाची मुलगी नसून उदयसिंहाची होती. हिचें लग्न स. १५८५ त झालें. शहाजहान बादशहा हा हिचाच मुलगा

असून तो हिला लाहोर येथें १५९२ सालीं झाला. बहुधां नूरजहानच्या सवतीमत्सरामुळें हिनें आत्महत्या केली असावी. यावरून दोन जोधपूरच्या राजकन्या जोधबाई नांवानें होऊन गेल्या; एक अकबराची व दुसरी सेलीमची राणी होती असें दिसतें [ टॉड–राजस्थान पु. २; मॅलेसन-अकबर; बील—ओरि. बायॉ. डिक्श.]

**जोन ऑफ आर्क** (१४११–१४३१)—जोन ऑफ आर्क ऊर्फ "मेड ऑफ ऑर्लीन्स " ही १४१०–१२ च्या दरम्यान फ्रान्समध्यें जन्मली. तिचा बाप हा त्या गांवांतील जमीनदार होता. तिच्या आईनें रोमची यात्रा केल्यामुळें तिला रोमी असेंहि म्हणत. जोनची घरची सांपत्तिक स्थिति बऱ्यापैकीं होती. तिला लिहितां वाचतां येत नव्हतें. आईकडून तिला धार्मिक शिक्षण काय तें मिळालें होतें; बापाच्या मेंढ्या राखण्याचें काम ती कधीं कधीं करीत असे; विणकामांत ती तरबेज होती. लहानपणीं तिच्या अंगांत ताकदहि अचाट होती; मात्र तिचें अन्तःकरण कोमल होतें. आपल्या गांवांत सर्वांशीं अत्यंत दयाळुपणानें वागत असल्यामुळें ती सर्वांना फार प्रिय झालेली होती. तरुणपणांत एकांतांत बसून देवाची प्रार्थना करण्यांतच तिचा बहुतेक वेळ जाऊं लागला. त्यावेळीं पुष्कळ तरुणांनीं तिच्या प्राप्तीचा यत्न केला, पण तिनें सर्वांना झिटकारून लावलें.

या सुमारास फ्रान्सवर राजकीय आपत्ति ओढवलेली होती. बर्गंडीच्या ड्यूकच्या मदतीनें इंग्लिशांनीं बहुतेक फ्रान्सदेश पादाक्रांत केला होता; १४२२ सालीं ६ व्या हेनरीस फ्रान्सचा राजा ठरवून फ्रान्सचे तुकडे करून घशाखालीं घालण्याचें काम चालूं होतें. शिवाय फ्रेंच युवराजाची माता इसाबेला हिचा ओढा आपला जांवई इंग्लंडचा ५ वा हेनरी याच्याकडे असल्यामुळें फ्रेंच राजघराण्यांतच एक प्रकारची दुही उद्‌भवली होती. त्या काळीं यूरोपांत अर्थात् (फ्रान्समध्येंहि) मंत्रतंत्र, जादुटोणा, चेटूक, दृष्टान्त वगैरे गोष्टींवर लोकांची बरीच श्रद्धा असे. फ्रान्समध्यें अशापैकींच एकानें आपणास असा साक्षात्कार झाल्याचें जाहीर केलें होतें कीं, "फ्रान्सच्या तत्कालीन विपत्तीस एक स्त्री कारणीभूत असून त्याची सुटका लवकरच एका कुमारिकेच्या हातून होणार आहे." या गोष्टीचा जोनच्या मनावर कांहींतरी परिणाम झाला. कारण पुढें चवकशीच्या वेळीं तिनें सांगितलें कीं, "फ्रान्सला इंग्लंडच्या हातून सोडविण्याचें पवित्र काम आपल्याकडे आहे असें स्वतःला पक्कें वाटे व आपल्याला सेंट मायकेल, सेंट काथराईन व सेंट मार्गारेट यांचे वरील मजकुराचे शब्द ऐकूं येत." १४२८ सालीं तिनें फ्रेंच राजपुत्राला असा निरोप पाठविला कीं, "तुम्ही स्वातंत्र्यप्राप्तीच्या कार्यास लागा, तुम्हाला परमेश्वर खास मदत करणार आहे;" पण त्यानें तिला धुडकावून लावलें. पुढें ऑर्लीन्सला इंग्लिशांनीं वेढा दिला, तेव्हां तिनें फ्रेंच गव्हर्नरला निरोप कळविला कीं, "ऑर्लीन्सशहर इंग्लिशांच्या हातून सोडवून र्‍हीम्स येथें राजपुत्राला अभिषेक करण्याबद्दल परमेश्वराची मला आज्ञा आहे." त्यावेळीं त्या गव्हर्नरानें तिच्या म्हणण्यास रुकार देऊन तिला सहा सहस्र सैनिकांसह युवराजाकडे रवाना केलें, युवराजानें प्रथम तिची भेट घेण्याचें नाकारिलें; पण शेवटीं तिच्या बाजूचें लोकमत इतकें प्रबल झालें कीं, मंत्रिमंडळानें युवराजाला तिची मुलाखत घेण्याची सल्ला दिली. तिनें त्या मुलाखतीच्या वेळीं युवराजाच्या औरसपणाबद्दलच्या ज्या कांहीं गुप्त संशयास्पद गोष्टी होत्या त्याबद्दल त्याची खात्री करून दिली; या गोष्टीचा युवराजाच्या मनावर अर्थात् विलक्षण परिणाम झाला. नंतर धर्मगुरूंकडून तिची परीक्षा करवून तिच्या वर्तनांत कॅथोलिक धर्मविरुद्ध कांहीं नाहीं अशी खात्री करून घेऊन व अनेक वृद्ध स्त्रियांकडून ती शुद्ध कुमारिका असल्याबद्दची हमी मिळाल्यानंतर युवराजानें तिला हजार सैन्य बरोबर घेऊन ऑर्लीन्स शहर शत्रूच्या हातून सोडवावयास परवानगी दिली. तेव्हां अंगावर चिलखत चढवून व हातांत एक पुरातन समशेर घेऊन ती त्या सैन्याच्या आघाडीस घोड्यावर बसून निघाली. शिवाय कमलचित्रांकित असें स्वतः बनविलेलें एक शुभ्र निशाण तिनें बरोबर घेतलें होतें; त्यावरच ढगांवर बसलेल्या व एका हातांत भूगोल धारण केलेल्या परमेश्वराचें चित्र काढलें होतें. याप्रमाणें थाटानें व आवेशानें चाल करून जाऊन ( १४२९ एप्रिल ) व शत्रूची फळी फोडून तिनें ऑर्लीन्स शहरांत प्रवेश करून इंग्लिशांवर जोरानें हल्ले सुरू केले कीं त्यामुळें इंग्रजांचा पराभव होऊन लवकरच त्यांनीं ऑर्लिन्सचा वेढा उठवला. हें सर्व यश केवळ तिच्याच अलौकिक धैर्यामुळें व तिच्या अंगांतील पुढारीपणाच्या चातुर्यामुळें मिळालें. पुढें एका आठवड्याच्या आंत जार्ग्यू वगैरे स्थळें काबीज करून तिनें इंग्लिशांना लॉयरच्या पलीकडे पिटाळून लावलें. नंतर र्‍हीम्सला जाऊन तेथें तिनें युवराजाला राज्याभिषेक करविला. तेव्हां तिच्या हाताखालीं १२००० सैन्य होतें. पुढें राजाच्या आग्रहावरून ती पॅरिसवर चालून गेली; पण त्यांत अपयश येऊन ती तेथें जखमी झाली. तरीहि तिनें पुन्हां नॉर्मंडीकडील युद्धांत राजास मदत केली. तेव्हां तिच्या घराण्याचें नांव सरदारांच्या यादींत घालून तिचा गौरव केला. ती कॉंपीनेकडील वेढा उठविण्यास गेली असतां शत्रूच्या हातीं लागून कैदेंत पडली. पण राजा चार्लसनें खंडणी भरून तिला सोडविण्याचा प्रयत्न केला नाहीं, अगर तिची यत्किंचितहि काळजी दाखविली नाहीं. पुढें पॅरिसयुनिव्हर्सिटी व इंक्विझिशन यांच्या चिथावणीवरून लक्झेंबर्ग( व बर्गंडी )च्या ड्यूकनें तिला इंग्लिशांना विकत दिलें; व त्यांनीं तिची इंक्विझिशन मार्फत चौकशी होण्याकरतां तिला त्यांच्या ताब्यांत दिलें. तेव्हां ६ दिवस तिची जाहीर चौकशी करून तिच्यावर चेटकीपणाचा व पाखांडीपणाचा आरोप ठेवून तिला मरणाची शिक्षा सांगण्यांत आली. परंतु वधस्तंभासमोर तिनें

क्षमेची याचना केल्यावरून तिला माफी देण्यांत आली. याप्रमाणें ती मृत्युमुखांतून जरी सुटली तरी तिला इंग्रजांच्या कैदेंतच राहावें लागलें. तेथें पहारेकऱ्यांच्या आग्रहावरून एकदां सहज तिनें आपला पूर्वीचा मर्दानी पोशाख चढविला; तेव्हां तेवढ्या निमित्तावरूनच तिला पुन्हां अपराधी ठरवून मरणाची शिक्षा सांगितली व त्याप्रमाणें रूएन शहरच्या भर रस्त्यामध्यें मे ३० सन १४३१ रोजीं तिला जिवंत जाळून टाकण्यांत आलें! पुढें १४३६ त दुसरी एक तोतया जोन बाई उत्पन्न झाली होती. इ. स. १४५६ मध्यें खुद्द पोपनेंच जोनवरील आरोप खोटा ठरवून रद्द केला; इतकेंच नव्हे तर कॅथोलिक धर्मलेखक हे तिला ईश्वरीप्रेरणा असल्याचें पुढें मान्य करूं लागले. १९ व्या शतकांत तर फ्रान्समध्यें हिच्या भक्तांचा एक विशिष्ट संप्रदाय सुरू होऊन त्यांनीं तिची संतमालिकेंत गणना होण्याबद्दल पोपकडून आज्ञापत्रहि मिळविलें. १९०४ सालीं पोपनें तिला "व्हेनेरेबल" (पूज्य) अशी पदवी दिली व १९०८ मध्यें व्हॅटिकननें ती मुक्त असल्याचें आज्ञापत्र काढलें ! जोन ही असामान्य व्यक्ति होती, फ्रेंच राष्ट्रावरील एका भयंकर संकटाच्या वेळीं तिनें पुढें येऊन फ्रेंच लोकांमध्यें उत्साह उत्पन्न केला व भित्र्या, लुटारू आणि बाजारबुणग्या अशा फ्रेंच सैन्यामध्येंहि राष्ट्रभक्तीचें असें विलक्षण वारें उत्पन्न केलें कीं, त्या तिच्या सैनिकांनां क्रॉमवेलच्या प्युरिटन सैन्याची उपमा मिळाली. तिचें उदात्त ध्येय, श्रद्धा, पवित्र आचरण व निष्कपट देशभक्ति हे गुण वाखाणण्याजोगे होते.

**जोनगन**—किंवा जोनकन. मल्याळी भाषा बोलणारे (मुसलमान), कांहीं लोक सोनगन (=अरबस्तान) या तामीळ शब्दापासून या नांवाची उत्पत्ति आहे असें मानतात, कोणी 'यवनक' (ग्रीक) या शब्दा-पासून उपपत्ति लावितात.यांची एकंदर लो. सं. (१९११) १३७२८० आहे. कोचीन त्रावणकोर संस्थानांत यांची बहुतेक वस्ती आहे. ज्यांनां नसरनी मापिला असें म्हणतात अशा एतद्देशीय ख्रिश्चन लोकांपासून भिन्नत्व दाखविण्याकरितां यांनां मप्पिला किंवा जोनकमप्पिला असेंहि म्हणतात. हिंदूंतील हलक्या जातीच्या किंवा मिश्र विवाहापासून झालेल्या प्रजेचे हे वंशज आहेत. हे सर्व सुनी पंथाचे असून, त्यांच्यांत बहुपत्नीत्वाची चाल रूढ आहे. ते बहुतकरून गरीब असून शिक्षणाच्या बाबतींत फार मागासलेले आहेत. [ से. रि.; थर्स्टन. ]

**जोनपुर**, जिल्हा.—हा संयुक्त प्रांतांतील बनारस विभागाचा वायव्येकडील जिल्हा असून तो उत्तर अक्षांश २५° २४' ते २६° १२' व पूर्व रेखांश ८२° ७' ते ८३° ५' यांच्या दरम्यान आहे व त्याचें क्षेत्रफळ १५५१ चौरस मैल असून लोकसंख्या (स. १९२१) ११५५१०५ आहे. हा जिल्हा त्रिकोणी असून याच्या दक्षिणेस अलाहाबाद, मिर्झापुर आणि बनारस, पूर्वेस गाझीपुर आणि आझमगड, उत्तरेस सुलतानपुर व पश्चिमेस सुलतानपुर आणि प्रतापगड आहेत. गंगानदीच्या सखल प्रदेशांत हा जिल्हा जरी वसलेला आहे तरी तो अगदीं सपाट नाहीं. पुष्कळ ठिकाणीं चढउतार आढळतात. सर्व जमीन लागवडीखालीं असून यांतील खेडीं जवळ जवळ आहेत. या जिल्ह्यांतून गोमती नदी वहात असून हीस पूर येण्याची पुष्कळ भीति असते.

आंबा, महुआ, शिसवी, उंबर, बाभुळ वगैरे झाडें येथें उगवतात. या जिल्ह्यांत जंगल नाहीं; त्यामुळें जंगली प्राणी क्वचितच दिसतात. हवा दमट आहे. उष्णतामान हिंवाळ्यांत ५० अंशापर्यंत खालीं उतरतें व उन्हाळ्यांत ११० पर्यंत वर जातें. पाऊस सरासरी ४२ इंच पडतो.

इतिहासः—प्राचीन काळीं भार वगैरे वन्य जातींची वस्ती येथें होती असें दिसतें. पुढें हिंदु राजांच्या वेळीं झाफराबाद वगैरे गांवें प्रसिद्ध होतीं. १०१९ सालीं गिझनीच्या महंमदानें जो मुंज नांवाचा किल्ला काबीज केला तें हेंच झाफराबाद होय असें म्हणतात. अकराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत येथें राठोडांचें राज्य होतें. ज्यावेळीं महंमद घोरीनें कनोजचा राजा जयचंद यावर स्वारी केली त्यावेळीं जयचंदानें आपला खजिना अस्नीच्या किल्ल्यांत ठेविला होता. हा किल्ला झाफराबादजवळच असावा. ११९४ सालीं जयचंद मरण पावल्यावर मुसुलमान या भागांत बनारसकडून शिरले व राठोड राजांनीं बांधलेल्या देवळांचा त्यांनीं नाश केला. १३२१ सालीं गियासुद्दीन तुघलकानें आपला मुलगा झाफखान यास या भागाचा सुभेदार नमलें.

जोनपुर हें शहर फिरोझशहा तुघलकानें १३५१ सालीं स्थापिलें; तें बनारसपासून २५ कोसांवर आहे. येथें शर्की नांवाचें एक मुसलमान घराणें राज्य करीत होतें. शर्क म्हणजे पूर्वदिशा; शर्की म्हणजे पौर्वात्य. या घराण्याचा मूळपुरुष मलिक सर्वर नांवाचा होता. जोनपुर व अंतर्वेदी या प्रांतावर हें राज्य पसरलें होतें. फिरोझचा मुलगा महम्मद तुघलक याचा मलिक सर्वर हा गुलाम (व खोजा) असून त्यानें त्याला आपला वजीर केलें व ख्वाजा जहान हा किताब दिला. महम्मद मेल्यानंतर व त्याचा पुत्र महमूद तुघलक गादीवर बसल्यावर (हा यावेळीं १० वर्षांचा होता.) ख्वाजा यास साम्राज्याच्या पौर्वात्य प्रांतांचा (कनोज, अयोध्या, कडा व जोनपुर या) सुभेदार नेमिलें (१३९४); तेव्हां त्यानें आपलें ठाणें जोनपूरास केलें. महमूदशहाच्या कारकीर्दींत अनेक बंडें उत्पन्न झालीं. त्या अंदाधुंदीचा व शहाच्या अल्पवयाचा फायदा घेऊन, ख्वाजानें मलिक–उस्शर्क (पूर्वेचा राजा) हा किताब धारण करून जोनपुर येथें स्वतंत्र राज्य स्थापिलें (१३९९). त्यानंतर तो पांचसहा वर्षें राज्य करून मेला (१४००). त्याच्या मागून त्याचा दत्तक मुलगा मलिक वासील उर्फ कर्णफल यानें मुबारिकशहा हें नांव घेऊन तख्तारोहण केलें. यानें विशेष उत्तेजन देऊन व इतर लोकोपयोगी कृत्यें करून नांव कमाविलें. हा मेल्यानंतर (१४०२) त्याचा भाऊ (पण

लेनपूलच्या मतें मुलगा ) इब्राहीमशहा हा सुलतान झाला. त्यानें शांतपणें राज्यकारभार केला. जोनपुरच्या घराण्यांत हा विशेष प्रसिद्ध आहे. चाळीस वर्षे राज्य करून तो वारल्यावर ( १४४१ ) त्याचा पुत्र महमूदशहा गादीवर बसला. त्यानें लालदरवाजा नांवाची एक सुंदर मशीद बांधिली. तो १४५२ सालीं मेला व त्याचा मुलगा महम्मद हा राजा झाला. हा फार क्रूर असल्यानें रयतेनें त्याच्या विरुद्ध बंड उभारलें; त्यांत तो मारला गेला ( १४५८ ). त्याच्या मागून त्याचा भाऊ हुसेनशहा गादीवर आला. याच्या व दिल्लीचा राजा बहलोल लोदी याच्या अनेकदां लढाया झाल्या; अ-र एका लढाईंत बहलोलचा जय होऊन, हुसेन हा पळून बंगालचा राजा सुलतान अल्लाउद्दीन पुर्बी याच्या आश्रयास राहिला (१४७६).अल्लाउद्दीन याच्या साहाय्यानें हुसेननें आपलें राज्य परत मिळविण्याचा प्रयत्न केला होता, पण तो फसला. अखेर तो अल्लाउद्दीनच्या जवळच मरण पावला (१४९९) व जोनपूरचें राज्य त्याच्या बरोबर लयास गेलें. हल्लीं जोनपुरास पठाणधर्तीच्या कलाकुसरीच्या अनेक इमारतींचे ( विशेषतः मशिदींचे ) अवशेष पहावयास सांपडतात; या इमारती याच घराण्यानें बांधल्या होत्या. या घराण्यानें जोनपुरास शंभर वर्षें राज्य केलें.

हुसेननंतर बहलोलचा पुत्र बारबकशहा हा जोनपुरचा सुभेदार झाला. ज्यावेळीं बाबरानें लोदी घराण्याचा शेवटचा इब्राहिम लोदी याचा पानिपतच्या लढाईंत ( १५२६ ) पराभव केला, त्यावेळीं जोनपुर आणि बिहार यांच्या सुभेदारानें आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें. पुढें मोंगल राज्य सुरू झाल्यावर अकबराच्या कारकीर्दींत ( १५९९, जोनपुर मोंगल राज्यांत सामील झालें. पुढें १७२२ सालीं हा भाग अयोध्येच्या नबाबाकडे गेला. कांहीं वर्षांनंतर तो मन्साराम याकडे गेला आणि १७७५ सालीं ब्रिटिशांकडे आला. इ. स. १८५७ च्या बंडाच्या वेळीं येथें बरीच गडबड उडाली होती. जोनपुरचे शिपाई त्यांत सामिल होते.

या जिल्ह्यांत ७ गांवें व ३१६९ खेडीं आहेत. हिंदूंची वस्ती शेंकडा ९१ असून मुसुलमान शेंकडा ९ आहेत; शेंकडा ८१ लोक पुरबिया हिंदी भाषा बोलतात; आणि शेंकडा १५ लोक बिहारी भाषा बोलतात. सातु, भात, मसूर, मका, गहूं, ज्वारी वगैरे धान्यें येथें पिकतात. गुरांची अवलाद हलक्या प्रतीची आहे. येथें साखरहि तयार होते. एकंदर जिल्ह्याचें उत्पन्न वीस लाखांपर्यंत आहे. जोनपुर तहसील याच जिल्ह्यांत असून, तिचें क्षेत्रफळ २८० चौ. मैल आहे. लोकसंख्या २७हजार आहे व उत्पन्न तीन लाख आहे.

श ह र.—हें संयुक्तप्रांतांत जोनपुर जिल्ह्याचें आणि तहसिलीचें मुख्य ठिकाण असून, तें उत्तर अक्षांश २४° ४५' व पूर्व रेखांश ८२° ४१' यांच्या दरम्यान औंध आणि रोहिलखंड रेल्वेवर गोमती नदीकांठीं आहे याची लो. सं. ( १९२१ ) ४२ हजार पर्यंत आहे

जोनपूरच्या मूळ नांवांविषयीं अजून पूर्ण माहिती मिळत नाहीं. यास जवानपुर, जमानपुर असेंहि कोणी म्हणतात. जामदग्न्य ऋषीच्या नांवापासून या गांवास हें नांव मिळालें असें हिंदूंचें म्हणणें असून, मुसुलमान लोक उलुघखान जुना ( नंतर महमदशहा तुघलक ) यापासून हें नांव निघालें असें म्हणतात. चवदाव्या शतकापर्यंत याच्या जवळील गांव झाफराबाद यास फार महत्त्व होतें. श्रीरामानें करार वीर नांवाच्या राक्षसास मारिलें; त्याचें देऊळ येथील किल्ल्याजवळच आहे. अकबरानें अलाहाबाद हें त्या प्रांताचें मुख्य ठिकाण केल्यापासून या गांवास उतरती कळा येत चालली.

मुख्य शहर गोमतीच्या तीरावर असून नदीवर अकबर बादशहाच्या वेळीं बांधलेला एक दगडी पूल आहे. शहरांत पूर्वी होऊन गेलेल्या, जोनपूर येथील राजांनीं बांधिलेल्या मोठमोठ्या इमारती पुष्कळ आहेत. फिरोजशहा तघलखानें बांधलेल्या किल्ल्याचे फारच थोडे अवशेष शिल्लक आहेत. इ. स. १८५९ त बऱ्याच जुन्या इमारतींचा नाश करण्यांत आला. सोळाव्या शतकांत बांधलेला शहरदरवाजा, १३७६ सालीं बांधलेली एक मशीद व इब्राहिमशहानें बांधलेलीं तुर्की पद्धतीचीं स्नानगृहें साधारण चांगल्या स्थितींत आहेत. भारतीय शिल्पाचे नमुने येथें चांगले पहावयास सांपडतात. येथें १८६७ सालीं म्युनिसिपालिटी स्थापन झाली. येथें गुलाबी अत्तर तयार होतें. पूर्वी येथें कागद तयार करण्याचा व्यापार पुष्कळ चालत होता परंतु हल्लीं तो धंदा नामशेष झाला असून फारसा व्यापारहि नाहीं [ माबेल डफ; बील; मुसुलमानी रियासत; इंपे. ग्याझे. पु. १४. ]

**जोनराज**--एक संस्कृत ग्रंथकार. काश्मीरच्या जोनराजानें काश्मीरच्या झैनुल् अबिदीनच्या कारकिर्दींत " किरातार्जुनीयावर" एक टीका लिहिली. (१३७०."पृथ्वीराजविजय"आणि " श्रीकंठचरित " या ग्रंथांवरहि त्याच्या टीका आहेत. तसेंच " राजतरंगिणी " नांवाचा ग्रंथ ( कल्हणाच्या "राजतरंगिणी " चा पुढील भाग ) लिहिला; त्यांत इ. स. १४१२ पर्यंतची हकीकत आली आहे. याच्या बापाचें नांव नोनराज असून आजाचें लौलराज होतें.[ माबेल डफ; आफ्रेट. ]

**जोन्स, सर विल्यम** (१७४६–१७९४)—एक ब्रिटिश पौर्वात्य भाषापंडित व ज्यूरिस्ट. सर विल्यम् जोन्स याचा जन्म इ. स. १७४६ मध्यें झाला. त्याचें लहानपणचें शिक्षण हॅरोस्कूलमध्यें झालें. नऊ वर्षांचा असतांना एकदां त्याच्या मांडीचें हाड मोडल्यामुळें एक वर्षपर्यंत तो अंथरुणावर पडून होता. याच काळांत त्यानें उत्तमोत्तम इंग्लिश कवींचा अभ्यास केला. त्याची स्मरणशक्ति विलक्षण होती.१७६४ सालीं ऑक्सफोर्ड येथील युनिव्हर्सिटीकॉलेजमध्यें त्यानें प्रवेश केला. यावेळीं चॅलमर्स नांवाच्या त्याच्या चरित्रलेखकानें म्हटल्याप्रमाणें " पुढील आयुष्यांतील वर्तनमार्गाची दिशा व कीर्तिसंपादनाचा मार्ग

इत्यादि गोष्टींचें दिग्दर्शन करण्याकरितांच की काय पौर्वात्य वाङ्मयाचा चित्ताकर्षकपणा त्याच्या मनास पटला."

१७६५ सालीं तो लॉर्ड ऑल्थॉर्प याजकडील खाजगत शिक्षक झाला. वयाच्या एकविसाव्या वर्षी आशिया खंडांतील काव्यवाङ्मयावरील विवेचक ग्रंथ त्यानें रचण्यास सुरवात केली. याच सुमारास डेन्मार्कचा राजा प्रवास करीत असतां इंग्लंडमध्यें आला होता त्यावेळीं त्यानें आपल्याबरोबर आणलेल्या नादिरशहाच्या चरित्राचें जोन्सनें भाषांतर केलें. नंतर त्यानें कायद्याचा अभ्यास करण्याचा विचार केला व १७७० सालच्या सप्टेंबर महिन्यांत त्याचा टेंपलमध्यें प्रवेश झाला. वाङ्मयाभ्यासी मनुष्यास कायदेशास्त्राचा अभ्यास करणें म्हणजे रुक्ष व नीरस काम वाटावयाचें, परंतु एखाद्या धंद्यांत श्रेष्ठ दर्जा प्राप्त करून घेण्याच्या महत्त्वाकांक्षेपुढें त्याला कायद्याच्या अभ्यासांतहि रम्यता वाटूं लागली. व १७७२ सालीं एक कवितांचा संग्रह व पौर्वात्य काव्यावर सामान्यतः अनुकरणप्रधान अशा ललितकलांवर असे दोन निबंध त्यानें प्रसिद्ध केले.

१७७४ सालीं त्याला वकिलीची सनद मिळाली व तेव्हां पासून केवळ धंदेवाईक या दृष्टीनेंच नव्हे तर तत्वज्ञ या-दृष्टीनेंहि वकील होण्याचा त्यानें प्रयत्न चालविला. कांहीं वेळपर्यंत त्याचा धंदा नीट चालेना, परंतु हलकेहलके त्याला बरेंच यश मिळूं लागलें व कीर्तिहि वाढूं लागली. १७७६ सालीं त्याला दिवाळखोरांचा कमिशनर नेमण्यांत आलें. यावेळीं प्राचीन ग्रीक वक्त्यांचा त्यानें अभ्यास सुरू केला व इसीउस या सुप्रसिद्ध विद्वानाच्या उपयुक्त संभाषणांचें भाषांतर त्यानें प्रसिद्ध केलें. १७७२ सालीं त्याला रॉयल सोसायटीचा फेलो निवडण्यांत आलें व त्यानें यावेळीं स्वातंत्र्यतेस उद्देशून एक लाटिन काव्य प्रसिद्ध केलें. स. १७८० त लंडन शहरांत बरीच तीव्र स्वरूपाची वंडाळी कांहींवेळ माजली होती; यावरून त्याला एक कल्पना सुचून त्याप्रमाणें त्यानें "दंगे मोडण्याचा कायदेशीर पद्धतींतील नौकशी व पुढें होणाऱ्या दंग्यापासून रक्षण करण्याचा सनदशीर उपाय" या आशयाचें पत्रक प्रसिद्ध केलें यापत्रकामध्यें जोन्सनें असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला कीं "प्रत्येक राष्ट्राच्या शासनसत्तेतील सार्वजनिक व सनदी कायदे यांच्या बळावर त्या देशांतील शासनखात्यास कोणत्याहि प्रकारची लष्करी खात्याची मदत न घेतां किंवा अलीकडील दंगे मोडण्याचा कायदा यांचीहि मदत घेतां, कसलेहि दंगे किंवा बंडें मोडण्याचा अधिकार असतो व या अधिकाराची योग्य अम्मलबजावणी सुरू असेल तर ही गोष्ट केव्हांहि अशक्य नसते." इ. स. १७८०–८१ मध्यें त्यानें अरबस्तानांतील अत्यंत सुप्रसिद्ध अशीं प्राचीन दहा काव्यें यांचीं भाषांतरें केलीं यानंतर त्यानें जामीनकीच्या कायद्यावर एक निबंध लिहिला. चॅलमर्स या चरित्रलेखकानें म्हटल्याप्रमाणें "जोन्स यानें केलेल्या कायदेशास्त्राच्या विवेचनाचा मूळ उद्देश शास्त्रज्ञानानें महत्त्व-स्थापन करण्याकरितां होता." इ. स. १७८२ मध्यें कॉमन्स सभेमध्यें योग्य प्रमाणांत प्रतिनिधित्वाची वांटणी व्हावी या उद्देशानें ज्या कांहीं संस्था त्यावेळीं अस्तित्वांत आल्या होत्या त्यांच्या कार्यांत जोन्स यानें बरीच मदत केली. यानंतर त्यानें एक शेतकरी व गांवांतील सभ्य गृहस्थ यांजमधील शासनतत्त्वविषयक संभाषण लिहिलें.

१७८३ मार्च मध्यें फोर्ट विल्यम किल्ल्यांतील श्रेष्ठ न्याय-कचेरींतील न्यायाधिशाची जागा व त्याबरोबरच नाईट कितावाचा बहुमान त्यास देण्यांत आला. एप्रिलमध्यें त्याचा ॲनामेरिया शिपले या स्त्रीशीं विवाह झाला. सप्टेंबरमध्यें जोन्स कलकत्ता येथें येऊन दाखल झाला. तो येथें हिंदुस्थानांत येऊन थोडा काळ झाला नाहीं तोंच त्यानें आपल्या नोकरीच्या वेळांतून राहिलेल्या वेळांत वाङ्मय व शास्त्रें यांचा अभ्यास करण्याचा बेत केला. लौकरच शास्त्रीय कार्याकरितां कलकत्ता येथें त्यानें एक संस्था स्थापन केली व या संस्थेचा जोन्स यासच अध्यक्ष करण्यांत आलें. लौकरच त्यानें संस्कृत वाङ्मयाचा अभ्यास सुरू केला. संस्कृत भाषेबद्दल त्यानें एका ठिकाणीं असे उद्गार काढले आहेत कीं, "संस्कृत भाषा ही कितीही पुरातन असो तिची रचना अत्यंत आश्चर्यकारक असून ग्रीक भाषेपेक्षां ती जास्त पूर्णत्वास पोहोंचलेली, लॅटिन भाषेपेक्षां जास्त विकसित व दोही भाषांपेक्षां जास्त सुधारलेली आहे." यानंतर आपल्या न्यायाच्या कामावरितां मदत व्हावी म्हणून त्यानें "डायजेस्ट ऑफ हिंदू ॲंड महॉमेडन लॉज्" हा ग्रंथ रचला. १७८९ सालीं त्यानें आपला "एशियाटिक रिसर्चेस" (आशिया खंडांतील संशोधन) या ग्रंथाचा प्रथम विभाग व सुप्रसिद्ध कवि कालिदास याचें सर्वोत्कृष्ट नाटक शाकुंतल याचें इंग्लिश भाषांतर हीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं. इ. स. १७९४ मध्यें त्यानें मनुस्मृतीचें भाषांतर प्रसिद्ध केलें. त्याच वर्षी यकृतदाहाच्या योगानें तो आजारी पडला व या दुखण्यानें त्याच सालीं एप्रिलच्या ७ तारखेस तो मृत्यू पावला.

जोन्स याच्या ग्रंथलेखनाचें विषयक्षेत्र अफाट आहे. त्यामध्यें हिंदूंची कालगणना, हिंदूंचें राशिचक्र, हिंदूंची चांद्र-वर्षगणना, हिंदू बुद्धिबळांचा खेळ, पर्शियन भाषेचें व्याकरण, पर्शियन भाषेचा इतिहास, मुसुलमानी वारसाचा कायदा, पौर्वात्य हस्तलिखित ग्रंथांची सूची, इराणचा संक्षिप्त इतिहास, आशियाखंडाचें वर्णन इत्यादि विषयांचे अनेक ग्रंथ प्रमुख आहेत.

"आशियाटिक मिसेलेनी" या जोन्सच्या पुस्तकामध्यें संस्कृत, आरबी व फारशी काव्यांतील उत्तमोत्तम भागांचीं भाषांतरें, अनुकरणें व कांहीं नवीन कविता आल्या आहेत. त्यापैकीं कुमारसंभवाच्या तिसऱ्या सर्गातील कथाभागास अनुलक्षून केलेलें कामदेवस्तोत्र, नारायणस्तुति इत्यादि कविता चांगल्या आहेत. अनुकरणप्रधान कलांवरील जोन्स याचा निबंध या दृष्टीनें फार महत्त्वाचा आहे. या निबंधांत

जोन्स यानें सर्व काव्याचा उगम अनुकरणामध्येंच होतो हें आपलें मत सांगोपांग विवेचिलें आहे. मानवी मनोविकार जोरदार व आवेशपूर्ण शब्दांत आविर्भूत होत असतां कवितेचा कसा उद्भव होतो, तीव्र भावनांना साहजिकपणेंच तालबद्धता व कालनियमन हे कसे संयुक्त होतात, त्याचप्रमाणें प्रेम व युद्ध यांनींच प्रमुखपणें काव्यप्रतिभा उत्तेजित करण्याचें कार्य कसें केलें, इत्यादि मुद्द्यांचें या निबंधांत उत्कृष्ट विवेचन आहे. तसेंच संगीतशास्त्र हें मानवजातीइतकें प्राचीन कसें आहे इत्यादि गोष्टींचा या निबंधांत उहापोह करण्यांत आला आहे.

प्राचीन भारतीय संस्कृतीची जगाला पद्धतशीर माहिती करून देणाऱ्या अगदीं पहिल्या विद्वानांमध्यें सर विल्यम जोन्स याचें नांव प्रमुख आहे. जोन्स याचा स्वभाव अत्यंत शांत व विवेकपूर्ण असून त्याची मानवीजीविताचा विचार करण्याची दृष्टि स्वभावतःच हिंदू लोकांप्रमाणें असल्यामुळें भारतीय संस्कृतीसंबंधीं त्यास नेहमीं सहानुभूति वाटे. प्राचीन संस्कृत वाङ्मयाच्या अफाट विस्ताराची कल्पना पूर्णपणें त्याच्या मनावर ठसली होती. विशेषतः संस्कृत पद्यवाङ्मयास आधारभूत असलेल्या छंदःशास्त्राबद्दल त्यास अत्यंत प्रेम वाटत असे. त्यानें भगवद्गीता, गरुडपुराण, ऋतुसंहार, हितोपदेश यांचीं भाषांतरें केलीं होतीं. अशा रीतीनें जोन्स याच्या आयुष्यांतील कामगिरी अत्यंत महत्त्वाची व अफाट होती. [ लॉर्ड टेनमाऊथ–मेमॉइर, १८०४; इंडियन रिव्ह्यू, पु. २२; ब्रिटानिका. ]

**जोबत,** सं स्था न.—मध्यहिंदुस्थान. भोपावर एजन्सीतील एक सनदी संस्थान. हें उ. अ. २२° २१' ते २२° ३०' व पू. रे. ७४° २८' आणि ७४° ५०' यांमध्यें वसलें आहे. क्षेत्रफळ १४० चौ. मैं. उत्तरेस झाबुआ संस्थान; दक्षिणेस व पश्चिमेस अलीराजपुर; आणि पूर्वेस ग्वाल्हेर. हें संस्थान विंध्याद्रि पर्वतांत वसलें असून बहुतेक भागांत दाट जंगल आहे. सरासरी ३० इंच पाऊस या भागांत पडतो.

या संस्थानचा मूळ पुरुष कोण असावा यासंबंधानें मतभेद आहे. परंतु पंधराव्या शतकांत अली–राजपूर राज्याचा संस्थापक अनंददेव याचा पणतु केसरदेव याच्याकडे हा प्रदेश प्रथम आला या गोष्टीस आधार सांपडतात. ब्रिटिशांची सत्ता प्रस्थापित झाल्यावर हा भाग राणा सबळसिंगाच्या ताब्यांत होता. त्याच्यामागून गादीवर बसलेला राणा रणजितसिंग १८७४ सालीं मरण पावला. याच्यामागून राणा स्वरूपसिंग गादीवर बसला, तो १८९१ सालीं मरण पावला. त्याच्यामागून राणा इंद्रजितसिंग गादीवर बसला. त्यावेळीं तो अज्ञान असल्यामुळें संस्थानचा कारभार पोलिटिकल एजंटनें नेमलेला अधिकारी पहात असे. जोबतच्या संस्थानिकांना ' राणा ' ही पदवी आहे. संस्थानची लोकसंख्या ( १९११ ) १५२६० असून येथें भिल्ल आणि भिलाल या वन्य जातींची वस्ती शेंकडा ८६ आहे. जमीन सुपीक असून वन्य जाती लागवडीची काळजी घेत नाहींत. संस्थानचीं पांच ठाणीं केलीं असून त्यांवर दोन ठाणेदारांचा अधिकार चालतो. संस्थानचें एकंदर सालिना उत्पन्न २१००० रुपये आहे.

गां व.—संस्थानांतील मुख्य शहर. उ. अ. २२° २७' व पू. रे. ७४°३७'. बी. बी. सी. आय. रेल्वेच्या रतलाम-गोध्रा शाखेच्या दोहद स्टेशनापासून हा गांव सुमारें ४० मैलांवर आहे. लोकसंख्या ( १९०१ ) २०८. जोबत गांवीं संस्थानिक राहतो. याच्या दक्षिणेस दोन मैलांवर घोर नांवाचें ११५४ लोकवस्तीचें गांव असून येथें संस्थानचा सर्व कारभार चालतो. घोर व जोबत हीं दोन मुख्य ठिकाणें असल्यावरून येथील लोक या संस्थानास घोर–जोबत असेंहि म्हणतात.

**जोरा**—मध्यहिंदुस्थान, ग्वाल्हेर संस्थान. तोंवारघर जिल्ह्याचें हें मुख्य ठिकाण असून ग्वाल्हेर—लाईट–रेल्वेचें स्टेशन आहे. उ. अ. २६° २०' व पू. रे. ७७° ४९'. लोकसंख्या ( इ. स. १९०१ ) २५५१. यास जोराअलापुर असें ह्मणतात. करोलीच्या राजांनीं बांधलेल्या जुनाट किल्ल्याचे अवशेष येथें आहेत. येथें सराई, पोलिस ठाणें, तपासणी बंगला वगैरे आहेत.

**जोरिय**—दक्षिण हिंदुस्थानांतील एक प्राचीन देश. ह्युएनत्संग हा सातव्या शतकांत येथें गेला होता. हा देश नक्की कोणता त्याबद्दल वाद आहे. धनकटकच्या नैर्ऋत्येस ८८ कोसांवर चुलीय अथवा चोरिय किंवा जोरिय हा देश होता असें ह्युएनत्संग लिहितो. तो प्रांत ४०० मैल घेराचा असून तेथून पुढें १३० कोसांवर कांचीपुर( कांजीवरम् ) येतें असेंहि त्यानें सांगितलें आहे. या सुमारास हल्लींचें कर्नूल शहर येतें. जोरिय ( चोरिय ) हें चोलमंडल असावें असें लासन–मार्टिन ह्मणतात; परंतु हल्लींचें चोलमंडल हें द्रविड देशाच्या पलीकडे असून ह्युएनत्संगचें जोरिय तर अलीकडे येतें. कर्नूलजवळ झोरा ( जोरा ) हें एक जुनें गांव आहे तेंच जोरिय असावें. टॉलेमीचें सोरा हेंच असावें. [ कनिंगहाम; दीक्षित–भारतवर्षीयभूवर्णन ]

**जोऱ्हाट,** वि भा ग.—आसाम; सिबसागर जिल्ह्यांतील मध्यविभाग याचें क्षेत्रफळ १०३२ चौरस मैल असून उत्तर अक्षांश २६° २२' ते २७° ११' व पूर्व रेखांश ९३°५७' ते ९४° ३६ यांवर वसला आहे. या विभागांतील सुमारें ⅚ भाग ब्रह्मपुत्रा नदीच्या मुख्यपात्राच्या उत्तरेस आहे. लोकसंख्या( १९११ )२५४६४५, या विभागांत१ गांव व ६५१ खेडीं आहेत. १९०४ सालीं या विभागांत ५६ चहाचे मळे होते. आसाम–बंगाल रेल्वे या विभागांतून जाते. १९०३–४ सालीं या विभागाचें एकंदर उत्पन्न ५७९००० रुपये होतें.

गांव.—आसाम.सिबसागर जिल्हा.जोर्व्हाट विभागाचें मुख्य ठिकाण उ. अ. २६° ४५' व पू. रे. ९४° १३'. लोकसंख्या ( १९११ ) ५२३१.अहोम राजाचें हें राजधानीचें गांव होतें. येथें व्यापार बराच चालतो. सिबसागर जिल्ह्याचें हें लवकरच मुख्य ठिकाण होणार आहे.

**जोवई,** वि भा ग.—आसाम. हा खासी आणि जैंटिया डोंगर जिल्ह्याचा एक विभाग आहे. क्षेत्रफळ २०८६ चौरस मैल.उत्तर अक्षांश २४°५८'ते २६°३'व पूर्व रेखांश ९१° ५९' ते ९२° ५१' यामध्यें वसला आहे. जैंटिया राजाचा हा प्रदेश होता परंतु १८३५ सालीं ब्रिटिशांनीं त्या राजाकडून मिळविला. लोकसंख्या ( १९११ ) ७७८६७. या विभागांत ८२९खेडीं असून जोवई गांव मुख्य ठिकाण आहे. जोवई येथें दरवर्षी पाऊस सरासरी २३७ इंच पडतो. परंतु डोंगराच्या दक्षिण उतारावर यापेक्षां जास्त पडत असावा.

गां व.—जोवई विभागाचें हें मुख्य ठिकाण असून समुद्र-सपाटीपासून ४४२२ फूट उंचीवर आहे. लोकसंख्या(१९०१) ३५११. उ. अ. २५° २५ व पू. रे. ९२° १२'. येथून कापूस व रबर बाहेर जातें. पावसाची दर वर्षाची सरासरी २३७ इंच आहे.

**जोशी**—गांवगाड्यांत अनेक हक्कदारांपैकीं ग्रामजोशी हा एक हक्कदार फार पूर्वीपासून आहे. याचें काम पंचांग पाहून गांवांतील लोकांस तिथि सांगणें, लग्नाचे व मुंजीचे ( व दुसऱ्या धार्मिक कृत्यांसाठीं ) मुहूर्त काढून देणें, जन्मलेल्या मुलांचीं नांवें ठेवणें वगैरे असे. या कामासाठीं गांवांतून त्याला जी हक्काची मिळकत मिळे, तिचें स्वरूप थोडक्यांत पुढीलप्रमाणें असे. प्रत्येक शेतकऱ्याकडून धान्य-कापणीच्यावेळीं नियमित धान्य; गुडीपाडवा, दिवाळी, होळी वगैरे सणांच्या प्रसंगीं दर घरांतून साधारण एक एक पैसा; सरकारांतून जोसकीच्या वृत्तीबद्दल इनाम जमीन चालत असे; शिवाय सणावारीं नक्त रक्कम थोडी फार मिळे. लग्न-मुंजीच्या प्रसंगीं याला प्राप्ति होई. शूद्रवर्गांत लग्न लावण्याचें काम याचेंच असे. जोसकीवृत्ति जर बेवारशी झाली तर ( मराठी राज्यांत ) ती पुढें दुसऱ्याकडे चालविण्याचा अधिकार सरकाराकडे नसून, परगण्याच्या देशमुख देशपांडे वगैरे जमीनदारांच्या व ग्रामाधिकाऱ्यांच्या हातीं असे. हा वर्ग बहुधा यजुर्वेदी ब्राह्मणांचा असे. [ वाड–भा. २ ]

**जोशी**—मुंबई इलाख्यांतील एक जात. लो. सं.(१९११) ३१५७. दक्षिण हिंदुस्थान, कोंकण व कानडा यांमध्यें हे मुख्यत्वेंकरून आढळतात. मराठे, धनगर, माळी, इत्यादि जातींचा यांमध्यें बराच भरणा असून हे फिरते भिकारी व सामुद्रिक असतात. त्यांच्या डमरूच्या आवाजावरून यांचीं बुडबुडकी, गिडबिडकी व कुडबुडे हीं नांवें पडलीं आहेत. यांनां पिंगळे हेंहि नांव आहे. जोश्याचे ( १ ) खास जोशी व ( २ ) अकरमाशे, असे दोन भाग असून त्यांमध्यें फक्त रोटीव्यवहार आहे पण बेटीव्यवहार नाहीं. यांमध्यें कुळें आहेत. पंचपालवी हें त्यांचें देवक असून त्यांचा धर्म व चालीरीती मराठ्यांप्रमाणेंच आहेत. ते मांस खातात व दारू पितात. आपला दर्जा मराठ्यांबरोबर आहे असें ते म्हणतात परंतु जोशी लोक महार-मांगांची भिक्षा घेत असल्यामुळें मराठे लोक त्यांनां कमी दर्जाचे समजतात. वऱ्हाड–मध्यप्रांत व मध्यहिंदुस्थान यांमध्येंहि एक जोशी जात आहे.

**जोशी, अण्णा मार्तंड**—(१८४८–१८९८) एक महाराष्ट्रीय नाटककार. हे अण्णासाहेब किर्लोस्करांचे समकालीन होते. त्यांच्या देखरेखीखालीं बेळगांवास स्थापन झालेल्या “ भरतशास्त्रोत्तेजक ” मंडळींत जोशी होतेच. इसवी सन १८७९ मध्यें नोकरीकरितां ते मुंबईस गेले. तेथें ते पूर्वीच्याच कंपनीच्या नांवें कधीं कधीं हौशी मंडळी जमवून नाटकें करीत. संगीत सौभाग्यरमा, सं. सावित्री व सं. शिवछत्रपतिविजय अशीं यांचीं स्वतंत्र तीन नाटकें उपलब्ध आहेत. त्यांचे प्रयोग “ आर्यनाट्यकलोत्तेजक ” मंडळी मुंबईस करी. सौभाग्यरमेंत स्त्रियांच्या दुःस्थितीचें चित्र रेखाटलें आहे. अण्णा सुधारकमताचे असल्यानें तें चित्र त्यानां भडक रंगांत वठवितां आलें. याखेरीज सं.मृच्छकटिक व उत्तररामचरित्र हीं नाटकें त्यांनीं रचिलीं असावींत असें दिसतें. संगीत नाटकाच्या पहिल्या अमदानीचे जनक म्हणून डोंगरे, किर्लोस्कराबरोबर यांचेंहि नांव निघणें जरूर आहे. [ रंगभूमि, वर्ष ५ अं. ३ ]

**जोशी, गणेश कृष्ण**—( १८६७–१९२२ )—एक महाराष्ट्रीय नट.यांचें घराणें मूळचें आडिवरें,जिल्हा रत्नागिरी येथील रहाणारें असून लहानपणींच वडील निवर्तल्यामुळें व गरिबीमुळें यांच्या शिक्षणाची हेळसांड झाली. वयाच्या १० व्या वर्षीच ते मधुकरी मागण्याच्या त्रासाला कंटाळून कार्लेकरांच्या नाटकमंडळींत पळून गेले. तेथें आपल्या काम करण्याच्या कुशलतेनें त्यांनीं बरीच वाहवा मिळविली. पुढें १८८१ मध्यें कार्लेकरांची नाटकमंडळी बंद पडून ते घरीं परत आले. परंतु त्याच सुमारास रा. कृ. ब. जोशी या गृहस्थानीं ठाणें येथें शाहुनगरवासी नाटक मंडळी स्थापन केल्यामुळें त्यांनीं गणपतरावास मंडळीस येऊन मिळण्याविषयीं विनंति केल्यावरून ते सदर मंडळींत येऊन दाखल झाले. ही मंडळी प्रथम ७|८ वर्षेपर्यंत पौराणिक नाटकेंच करीत असे. त्यापुढें समाजाच्या बदलत्या अभिरुचीस अनुसरून नवीन गद्य नाटकें करण्यास मंडळीनें सुरवात केली. याच सुमारास महाराष्ट्ररंगभूमीचीं पडदे, सीनसिनरी वगैरे बाबतींत सुधारणा होऊं लागली होती. अशा नवीन सजावटीनें मंडळीनें बरेचसे खेळ बसविले. परंतु उत्पन्नाच्या दृष्टीनें मंडळीची स्थिति सुधारेना.अशा स्थितींत १८९१ मध्यें शाहूनगरवासी नाटकमंडळी पुण्यास आली.पुण्यास प्रो.केळकर यानीं ही मंडळी हाताशीं धरली व गणपतरावांच्या अंगच्या सहजाभिनयनादि गुणांचा उत्कर्षच या वेळेपासून मंडळीच्या

उत्कर्षास कारणीभूत झाला. या वेळेपर्यंत मंडळीनें शेक्सपीयरचीं झुंझारराव, हॅम्लेट, तारा, वगैरे व मंजुघोषा, मोचनगड, वीरकांत-वीरसेन वगैरे इतर नाटकें रंगभूमीवर आणलीं होतीं. १८९२पासून मंडळीनें ऐतिहासिक नाटकें बसविण्यास सुरवात केली व या प्रयत्नांत चांगलेंच यश आलें. 'राणा भीमदेव' या नाटकांत गणपतराव भीमदेवाची भूमिका घेत असत. त्यांच्या वीररसान्वित पहाडी आवाजानें, सहजाभिनयानें व तद्रूपतेनें प्रेक्षकांच्या चित्तवृत्ती अगदीं थरारून जात. याच सुमारास 'तुकाराम' या धार्मिक नाटकाचा प्रयोग करण्यांत आला. या नाटकांतील भूमिका गणपतराव इतक्या यथायोग्य तऱ्हेनें करीत असत कीं या २० व्या शतकांतील तुकारामाचें दर्शन घेण्याकरतां अखेरपर्यंत भाविक प्रेक्षकांच्या उड्या पडत असत. इतर नाटकाप्रमाणेंच त्राटिका, फाल्गुनराव व मानाजीराव ( मॅक्बेथ ) या नाटकांतहि त्यांनीं चांगली कीर्ति मिळविली. गणपतरावांच्या अंगीं कमावलेलें शरीरसौष्ठव व स्वाभाविक परंतु 'परार्थी' अभिनय यांचें प्रकृष्ट मिश्रण होतें. बहिऱ्या प्रेक्षकालाहि नाट्याचा सर्व भाव व भाषा केवळ अभिनयानें समजूं शकेल इतक्या सूक्ष्मतऱ्हेनें व भिन्नभिन्न मनोवृत्तींनीं उचित असा अभिनय मुद्राभिनय व अंगविक्षेप–भावार्थ समजून करण्यांत त्यांच्या गुणांचें सार होतें. गणपतराव हे मंडळीच्या मालकांपैकीं एक असल्यामुळें इतरांना वागवून घेण्याचा त्यांना गुण चांगलाच दिसून येत असे. इंग्लंडमधील सुप्रसिद्ध नट गॅरिक किंबहुना त्याहूनहि सरस अशी हॅम्लेटची भूमिका करतांना त्यांची यौगिक तन्मयता यामुळेंच महाराष्ट्र रंगभूमीवर त्यांना नाट्याचार्य ही पदवी मिळवितां आली. हॅम्लेटमधील भूमिकेच्या अप्रातिमपणाबद्दल यूरोपियन लोकांनीं पाश्चात्य नटांच्याहि वर त्यांना बसविलेलें आहे व याचें कारण त्यांचें अभिनयपाटव, भाषणशैली व स्वरलाघव हे गुण होत. शोकभावाप्रमाणेंच सुखभावहि यथायोग्य तऱ्हेनें वळविण्याची त्यांची हातोटी वाखाणण्याजोगी होती. दानधर्माकडेहि त्यांचें बरेंच लक्ष असे. त्यांना नाट्यनैपुण्याची ईश्वरी देणगी होती यांत संशय नाहीं.

**जोशी, गणेश वासुदेव** (१८२८–१८८०)–एक महाराष्ट्रीय पुढारी. सार्वजनिक काका या नांवानें हे प्रसिद्ध आहेत. वयाच्या चौदाव्या वर्षी यांनीं सदरअमीनची नोकरी पत्करली; पुढें हायकोर्ट वकिलीची परीक्षा देऊन पुण्यास वकिली केली व उत्तम लौकिक संपादन केला, १८६४ सालीं यांनीं पुण्याची सार्वजनिक सभा स्थापन केली. या संस्थेच्या वतीनें यांनीं पुष्कळ लोककार्य केलें. शेतकऱ्यांची स्थिति सुधारण्यासाठीं यांचे अव्याहत प्रयत्न चालू होते. लवादकोर्टांचीहि यांनीं स्थापना केली. मल्हारराव गायकवाड यांच्यावरील खटल्याच्या वेळीं फारच वर्णनीय कामगिरी यांनीं केली. यांच्या सार्वजनिक कामगिरीवरून यांस 'सार्वजनिक काका' असें लोक म्हणूं लागले. बंडवाले वासुदेव बळवंत फडके यांचें वकीलपत्र यांनीं घेतलें होतें. १८६९ सालीं यांनीं स्वदेशी वस्तु वापरण्याचा निश्चय केला व जाडेभरडे आंगरखे, दामणकांठी धोतर व कंदी रंगाचें पागोटें घालूं लागले. यांनीं स्वदेशीचें व्रत आमरण पाळलें; यांचा स्वभाव फार कोमळ होता. उद्योग दांडगा असे. सार्वजनिक सभेसाठीं त्यांनीं एक मोठा वाडा खरेदी करून संस्थेस मोफत दिला.

**जोशी, गणेश व्यंकटेश** ( १८५१—१९११ )—एक महाराष्ट्रीय अर्थशास्त्रज्ञ व राजकारणी पुरुष. यांचा जन्म ८ जून १८५१ त मिरजेस झाला. यांचे वडील मिरजसंस्थानचे पोतनीस होते. यांचे आजोबा स. १८१८ त मिरजकरांच्या तर्फे पेशव्यांकडे वकील असून त्या वेळच्या इंग्रजांबरोबर झालेल्या अखेरच्या चकमकींत सामील होते. चरित्रनायक हे बी. ए. च्या परीक्षेंत तर्कशास्त्राच्या विषयांत पहिले आले होते. विद्याभ्यास संपल्यावर त्यांनीं शालाखात्यांत नोकरी धरली ( १८७३ ). या वेळेपासूनच त्यांनीं लोकोपयोगी कामास प्रारंभ केला. ते उत्तम शिक्षक म्हणूनहि प्रख्यात होते. नाशिक, रत्नागिरी, मुंबई, सोलापुर, सातारा, पुणें वगैरे ठिकाणीं त्यांनीं नौकरी करून १९०७ सालीं पेन्शन घेतलें. त्यांची रहाणी अगदीं साधी होती; ते अत्यंत विनयशील पण धर्मनिष्ठ ( गाणपत्य ) व नियमित वागणारे होते. त्यांचा आवडता विषय आकडेशास्त्राचा होता. सरकारी अहवालांतील आंकडे घेऊन त्यांची तुलना परराष्ट्रांतील जमाखर्चाशीं करून हिंदुस्थानची दरिद्रावस्था त्यांनीं सिद्ध केली. त्यांचें कोणतेंहि विधान निराधार नसे, त्यामुळें सरकारास तें मान्य करावें लागे. टाईम्स ऑफ इंडियांत यांचे लेख 'जे' या इंग्रजी अक्षरनामाखालीं येत. त्यांचें अध्ययन व विद्वत्ता इतकी मोठी असे कीं, न्या. रानडे हेहि त्यांची सल्ला घेत. ना. गोखल्यांनीं वेल्बी कमीशन पुढें जी साक्ष दिली तिची सर्व तयारी यांनींच करून दिली होती. तसेंच सुरेंद्र बानर्जी, ना. सयानी, रोमेशचंद्र दत्त यांनांहि वेळोवेळीं यांची मदत होती. राजकारण, इतिहास, अर्थशास्त्र हे यांचे आवडते विषय होते. सार्वजनिकसभा, त्रैमासिक, इंडियन रिव्ह्यू, मराठा वगैरे नियतकालिकांत यांचे लेख आलेले आहेत. स्वराज्याच्या चळवळीस त्यांचा पाठिंबा असे. मुंबईच्या कायदेकौन्सिलचे ते सभासद होते. ते १९०८ सालीं धुळें येथें भरलेल्या मुंबई प्रांतिकपरिषदेचे अध्यक्ष होते. त्यांचीं भाषणें माहितीनें भरलेलीं असत. महाराष्ट्रांतील सर्व राजकीय पक्षांतील पुढारी, त्यांना मान देत. शिक्षण सार्वत्रिक व मोफत करावें अशी त्यांची इच्छा होती. त्यांचा अंत ( ता. २० मे १९११ रोजीं )अंतर्गळाच्या विकारानें झाला. शेवटपर्यंत त्यांचें अध्ययन सुरू होतें. त्यांच्या बहुतेक लेखांचें व भाषणांचें एक पुस्तक त्यांच्या चिरंजीवांनीं १९१२ सालीं प्रसिद्ध केलें आहे.

**जोशी, चासकर**—'कृष्णाजी नाईक जोशी' ( विभाग ११ पृ. ६६५ ) पहा.

**जोशी, बारामतीकर**—हें घराणें मूळचें कोंकणांतील केळशी गांवचें; त्या घराण्यांतील केशव नाईक नांवाचा पुरुष काशीस जाऊन सावकारी करूं लागला त्याला सदाशिव, कृष्ण व अंतोबा असे तीन पुत्र होते. कृष्णाजी हा शाहूबरोबर दक्षिणेंत आला. सातान्यास येऊन राज्य मिळेपर्यंत कृष्णाजीनें शाहूस पैसा पुरविला, म्हणून त्याच्यावर शाहूची मर्जी फार होती. सदाशिवाच्या पेढ्या सर्व देशभर होत्या. तोहि सावकारींत हुशार होता. कृष्णाजीस सातान्यास शनिवार पेठेची चौधरी मिळाली होती. त्याचा एक मुलगा विश्वनाथ सातान्यास सावकारी करी, दुसरा मुलगा नारायण हा नागपुरकर भोंसल्यांचा दिवाण असतां लढाईत मेला. त्याचा पुत्र कृष्णराव, हा उत्तरपेशवाईंत प्रख्यातीस आला. हा पेशव्यांच्या तर्फे टिपूकडे वकील असे. यानें १७८५ सालीं सातान्यास स्वतःकरितां एक मोठा वाडा बांधिला. पेशवाई गेल्यानंतर हा सातारकर महाराजांचा खाजगी कारभारी होऊन स. १८२५ त मरण पावला. याचे वंशज हल्लीं सातान्यास आहेत

केशव नायकाचा वडील मुलगा सदाशिव हा बारामतीकरांचा मूळ पुरुष होय. तो व त्याचे मुलगे सावकारीचा धंदा करीत असत. त्याला गोविंद, महादबा उर्फ बाबूजी व आबूजी असे तीन पुत्र होते. बाळाजी विश्वनाथ पेशवे यानें आपली मुलगी भिऊबाई ही आबूजी ( आबाजी )यास दिली. ही मंडळी राजकारणांतहि पडत असत. माळव्याच्या कामगिरीवर यांची इ. स १७३२ च्या वेळीं नेमणूक झाली होती. नाईक-पेशव्यांचें कांहीं दिवस वितुष्ट पडलें होतें. नानासाहेब पेशव्यांनां पेशवाई मिळूं नये अशा खटपटींत बाबूजी नाईक होता. स. १७४३ त बारामतीस जहागीरी मिळवून तेथें नाईक राहू लागले. स. १७५३ त पेशवे व नाईक यांचा समेट झाला. थोरल्या माधवरावानां यांचें साहाय्य चांगलें असे. त्यांनींच रामचंद्र जाधवास निजामाकडून फोडून पेशव्यांकडे आणिलें. राघोबादादा यांची मुलगी दुर्गाबाई ही बाबूजीच्या पांडुरंग नावाच्या मुलास दिली होती परशुरामभाऊ पटवर्धनांची मुलगी बाबूजीच्या चवथ्या मुलास दिली असून तो मुलगा लग्नाच्या १५व्या दिवशीं वारला, तेव्हां तिच्या पुनर्विवाहासंबंधीं त्यावेळीं प्रश्न उपस्थित झाला होता. नारायणरावांच्या वधानंतर बाबूजीनें राघोबादादाचा पक्ष सोडला. यानें बहुतेक पेशवाई समक्ष पाहिली होती. तो रसिक व गुणज्ञ होता. त्याच्याच पदरीं मोरोपंत पराडकर हे होते. हा स. १७८०च्या सुमारास व त्याचा पुत्र पांडुरंगराव स.१७९४ त वारला. त्यानंतर या घराण्याची वाताहत झाली. या घराण्याच्या वावडेकर, मेंडतकर, सातारकर व बारामतीकर अशा शाखा झाल्या. [ पेशव्यांची बखर; भारतवर्ष पत्रें, यादी; मराठी रियासत, पु ३ ]

**जोशीमठ**—संयुक्त प्रांत. गढवाल जिल्ह्यांतील एक खेडें. उत्तर अ. ३०° ३३′ व पू. रे. ७९°३५′ समुद्रसपाटीपासून ६१०७ फूट उंचीवर हें पांचशें लोकवस्तीचें खेडें आहे. येथें बद्रीनाथाचा मुख्य पुजारी—यास रावळ म्हणतात-हिंवाळ्यांत येऊन राहतो. कारण वरील बद्रीनाथ देवळाच्या वाटेवर बर्फ पडल्यामुळें तो रस्ता बंद होतो. येथें पुष्कळ प्राचीन देवळें आहेत. त्यांपैकीं कांहींचें धरणीकंपामुळें नुकसान झालें आहे. या मठास ज्योतिर्मठ असेंहि म्हणतात. हा मठ शंकराचार्यांनीं स्थापिला व यांत त्यांचे पूजेचे शालिग्राम आहेत असें मानण्यांत येतें.

**जोहानिस्वर्ग**—प्रशियाच्या हेसेनासउ प्रांतांतील ऱ्हाइन नदीच्या उजव्या किनाऱ्यावरील, आगगाडीच्या रस्त्यानें रुडेशीमच्या दक्षिणेस ६ मैलांवर असलेलें खेडें. येथें ऱ्हाइन नदीच्या काठीं टेंकडीवर एक सुंदर महाल आहे; तो १८०७ त नेपोलियननें आपल्या केलेरमन सेनापतीस दिला होता; ह्याच्या आसपास द्राक्षाचे मळे असून त्यापासून निघणारें जोहानिस्वर्ग मद्य प्रसिद्ध आहे

**जोहानीझबर्ग**—दक्षिण आफ्रिका. हें ट्रान्सव्हालचें मुख्य शहर असून रँडखाणींतून काढलेल्या सोन्याच्या व्यापाराचें केंद्रस्थान आहे. हें दक्षिण आफ्रिकेचें व्यापाराचें ठिकाण आहे. विटवॉटररँडच्या दक्षिण उतारावर हें वसलेलें असून दक्षिण अक्षांश २६° ११′ व पूर्वरेखांश२८° २′ यांवर आहे. समुद्रसपाटीपासून हें ५७६४ फूट उंच आहे. पश्चिमेकडील भागांत बाजारचौक आहे व दक्षिणेकडे सरकारी चौक आहे. कमिशनरस्ट्रीट, मार्केटस्ट्रीट, प्रेसिडेन्टस्ट्रीट व प्रिटचर्डस्ट्रीट या मुख्य व्यापारी सडका आहेत. यांवर पेढ्या, खनिज कंपन्यांचीं दुकानें व इतर दुकानें आहेत. व्हॅान ब्रँडीस चौकांत टेलिफोन कचेरी आहे. ग्रीन चौकांत ट्रान्सवाल युनिव्हर्सिटीकॉलेज आहे. सेन्टमेरी प्रार्थनामंदिर व यहुदी लोकांचें देऊळ हीं जवळ जवळ आहेत. कर्कस्ट्रीटवर कॅथोलिक पंथाचें मंदिर आहे. जोवर्टपार्कच्या उत्तरेस सार्वजनिक इस्पितळ असून पलीकडे बोअरसरकारनें बांधलेला किल्ला आहे शहरच्या ईशान्येस ३ मैलांवर वेधशाळा आहे.

जॉपेसटाऊन, बलग्रेव्हिआ, डुर्नफॉन्टेन, बेरी, हिलब्रो, पार्कटाऊन, येओव्हिली आणि विलेव्ह्यु हीं शहरच्या आसपासचीं मुख्य खेडीं आहेत. फोर्डवर्ग येथें विजेचे व गॅसचे कारखाने आहेत. जर्मिस्टन, बॉक्सबर्ग व क्रुगर्संड्रॉप हीं शहरें रँडवर असून तेथें म्युनिसिपालिटया आहेत. शहरच्या दक्षिणेस, पूर्वेस व पश्चिमेस सोन्याच्या खाणी असून मजूर लोक राहतात. रँडपासून किंबर्लेपर्यंत रेल्वे आहे. जोहानीझबर्गच्या पूर्वेस २५ मैलांवर स्प्रिंग्ज येथें कोळशाच्या खाणी आहेत. येथील हवा आरोग्यकारक आहे. हिंवाळ्यांत उष्णतामान ५३° अंश असतें व उन्हाळ्यांत ७५° अंश असतें. येथें २८ इंच पाऊस पडतो फुप्फुसाच्या रोगानें फार लोक

मरतात. प्राथमिक व दुय्यम शाळा संस्थानच्या ताब्यांत आहेत. येथें सक्तीचें शिक्षण नाहीं. प्राथमिक शाळांतून फक्त मोफत शिक्षण मिळतें. १९०६ सालीं अल्फ्रेड बेटनें विद्यापीठाच्या इमारतीकरितां २,००,००० पौंडांची देणगी दिली. येथील गोरे लोक निरनिराळ्या देशांतून येथें आले आहेत. १९०६ पर्यंत घोड्याच्या ट्रामगाड्या होत्या. पुढें विजेच्या ट्रामगाड्या सुरू झाल्या. येथील लोक हातगाड्यांचाहि उपयोग करतात. खास शहरचें क्षेत्रफळ ६ चौरस मैल आहे. स्थानिक राज्यकारभार लोकनियुक्त म्युनिसिपलमंडळाकडे असतो. गोऱ्या ब्रिटिशप्रजाजनांनांच फक्त मत देण्याचा अधिकार आहे. १९०४ सालीं खास शहरची लोकसंख्या ९१०२२ होती व म्युनिसिपल सरहद्दींतील लोकसंख्या १५५६४२ होती; सन १९११ मध्यें लो. सं. २६०००० होती. पैकीं १४९७५० गोरे व बाकीचे काळे लोक होते.

इतिहास.—विटवॉटरसँड खडकांतून सोनें सांपडलें म्हणून हें शहर अस्तित्वांत आलें. १८८६ सालीं हें शहर वसलें व यास जोहानीझरिसिक अधिकाऱ्याचें नांव देण्यांत आलें. १८९५ सालीं येथील खनिखोदक कंपनीची भरभराट झाली. बंदरापासून शहरापर्यंत रेल्वे झाल्यामुळें सोन्याच्या खाणीचा धंदा चांगलाच उर्जितदशेस आला. राजकारण व शिक्षणखात्यांत सुधारणा करण्याकरितां येथील लोकांनीं बोअर सरकारविरुद्ध बंड केलें पण त्यांत त्यांनां यश मिळालें नाहीं.

पण यामुळें स्थानिक राज्यकारभारांत पुष्कळ सवलती मिळाल्या. शहराची व्यवस्था सरकारनियुक्त आरोग्य नियामकमंडळाकडे असे. १८९७–९८–९९ या तीन वर्षांत खाणीचा धंदा पुष्कळ भरभराटीस आला. १८९८ सालीं १,५०,००,०००हून अधिक पौंडांचें सोनें खाणींतून निघालें. १८९९ सालीं ट्रान्सव्हाल व ग्रेटब्रिटनमध्यें युद्ध सुरू झाल्यामुळें बहुतेक युटिलँडर्स देश सोडून गेले. १९००सालीं ब्रिटिश लोकांनीं हें शहर घेतलें. लढाईनंतर सोन्याचा धंदा मंदावला. खाणींत काम करण्याकरितां पुरेसे मजूर नसल्यामुळें चीनमधून मजूर लोक येथें येत असत. १९०४पासून१९०६पर्यंत खाणींत काम करण्याकरितां ५०००० लोक येथें आले. १९०५ सालीं २,००,००,००० हून अधिक पौंडांचें सोनें खाणींतून निघालें.

१९१० नंतर जोहानीझबर्गमध्यें उद्योगधंद्यांची वरीच वाढ झाली तरी याचें जीविन मुख्यतः विटवाटर्सरँडमधील सोन्याच्या खाणींशीं निगडीत झालें होतें म्हटलें तरी चालेल. १९१०–१५ च्या दरम्यान जोहानीझबर्गमध्यें नवीन कोर्टें, नगरमंदीर, म्युनिसिपल आर्ट गॅलरी, इत्यादि इमारती बांधण्यांत आल्या. १९१६ सालीं मिलनर पार्कमधील ८० एकर जागा, नगरमंडळानें युनिव्हर्सिटीची इमारत बांधण्याकरितां देऊं केली. पण महायुद्ध सुरू झाल्यामुळें ही इमारत बांधण्याचें काम १९२० सालीं सुरू झालें; व युनिव्हर्सिटी स्थापन करण्याची पूर्वीची कल्पना जाऊन, तेथें कॉलेज स्थापन करण्याचें ठरलें व तें दक्षिण ऑफ्रिका युनिव्हर्सिटीला जोडण्यांत आलें. या कॉलेजमध्यें, खनिखोदनशास्त्र व शास्त्रीय शिक्षण हे विषयहि शिकविण्याची सोय केलेली आहे. नगरमंडळानें, रस्ते बांधणें, चोहों बाजूला बागा तयार करणें अशा तऱ्हेनें नगरसौंदर्याची वाढ चालविली आहे. पण आश्चर्याची गोष्ट मात्र ही कीं शहरापासून अर्ध्या मैलाच्या अंतरावर व्रेडेडॉर्प येथें जी येथील मूळ रहिवाशांची रहाण्याची जागा आहे ती अत्यंत गलिच्छ व रोगीष्ट असून ती सुधारण्याचा प्रयत्न या नगरमंडळानें अजिबात केला नाहीं. जोहानीझबर्ग हें उत्कृष्ट घोड्यांचें ठिकाण आहे. १९१९ सालीं येथें विमानगृह बांधण्यांत आल्यापासून, वैमानिक दळणवळणाचें हें केंद्र बनलें आहे.

जोहानीझबर्ग येथील म्युनीसिपॅलिटीचें उत्पन्न १९१९–२० सालीं ३४३५८००० पौंड होतें. १९१३–१४ या सालांत येथील गोऱ्या मजुरांनीं पुष्कळ संप केले व त्याप्रसंगीं दंगेधोपेहि झाले. १९१५ सालीं लुसिटॅनिया बोट बुडाल्यामुळें, जवळ जवळ ५ लक्ष पौंडांच्या मालाची नासधूस झाली. त्यामुळेंहि येथील वातावरण बरेंचसें प्रक्षुब्ध झालें होतें. १९१७ सालीं याच ठिकाणीं साउथ आफ्रिकन ट्रेड काँग्रेसचें पहिलें अधिवेशन झालें; १९१९ सालीं खाणींतील काळ्या लोकांमध्यें असंतोष माजल्यामुळें बरेच संप घडून आले.

**जोहार** ( जौहार )—रजपूत लोकांत ही जोहाराची चाल असे. शत्रूपुढें आपलें चालेनासें झालें व आतां शत्रूस खात्रीनें यश मिळणार अशी वेळ आली म्हणजे हे रजपूत लोक आपल्या सर्व बायकांनां ( एखाद्या गुहेंत अगर खाईंत ) एक मोठी चिता रचवून तींत जीवंत जाळीत. अशा प्रसंगीं मुख्य पुढाकार राजपत्नी घेत असे. तिच्या मागें सर्व स्त्रिया प्रथम देवीच्या दर्शनास जाऊन पूजा करीत व मग जमलेल्या ( आपल्याहून लहान ) पुरुषांनां आशिर्वाद देऊन शांतपणें चितारोहण करीत. सर्वांची रक्षा झाल्यावर तेथील चिताभस्म कपाळास लावून व अंगांत एकजात केशरी रंगाचा पोषाख चढवून व केशरीगंध लावून सर्व पुरुषमंडळी शत्रूवर जोरानें तुटून पडत असत व स्वतःचा प्राण धारातीर्थीं अर्पण करीत. या एकंदर विधीस जोहार म्हणत. फक्त वृद्ध व बालकें तेवढेंच या प्रसंगांतून वांचत. रजपूत इतिहासांत असे प्रसंग अनेकदां आढळतात. चितोड किल्ल्यावर असे तीन प्रसंग घडून आले होते व त्यांत लाखो जीवांनीं अग्निकाष्टें भक्षण केलीं. ज्या गुहेंत हा जोहार होत असे, ती गुहा अद्यापिहि दाखवितात. तेथें हल्लीं सर्प फार आहेत असें म्हणतात. शंभर पाऊणशें वर्षांपूर्वी तेथील सर्व अस्थी काढून उदेपूरच्या राण्यानें भागीरथींत टाकिल्या.

**जोही**—मुंबई इलाखा, सिंध प्रांत. लारखाना जिल्ह्यांतील एक तालुका. हा उत्तर अ. २६° ७' ते २७° व पूर्व रे. ६७° ११' ते ६७° ४७' यांमध्यें आहे. याचें क्षेत्रफळ

७५५ चौरस मैल असून लोकसंख्या (१९११) ५०१८७. या तालुक्यांत ९४ खेडीं आहेत. एकंदर उत्पन्न (१९०३-४.) १·४ लाख रुपये. वेस्टर्न नार सिस्टिम व मंछर तलाव याखालीं सुमारें $\frac{1}{2}$ ताल्लुका भिजतो व बाकीचा पावसावर अवलंबून रहातो. जमीन सुपीक असून हंगामांत ज्वारीची एका पेरणीवर तीन पिकें घेतां येतात. तालुक्याच्या पश्चिमेस कीर्थर डोंगर आहेत.

**जोहोर**—मलाया द्वीपकल्पाच्या दक्षिण टोकाशीं हें स्वतंत्र संस्थान आहे. याच्या उत्तरेस पाहँगचें संस्थान आहे. वायव्येस नेग्री सेंबीलन व मलायाचा प्रदेश; दक्षिणेस सिंगापूरला वेगळें करणारी सामुद्रधुनी; पूर्वेस चीनचा समुद्र व पश्चिमेस मलायाची सामुद्रधुनी. इ. स. १८७७ मध्यें ब्रिटिश सरकारानें मूअरप्रांताचा कारभार तात्पुरता जोहोर संस्थानच्या ताब्यांत दिला; व १९१० सालीं सुद्धां हा प्रांत सुलतानच्या ताब्यांत होता. याचा समुद्रकिनारा २५० मैल आहे. वायव्येकडून आग्नेयीकडे याची लांबी १६५ मैल आहे व पूर्वपश्चिम रुंदी १०० मैल आहे. याचें क्षेत्रफळ सुमारें ७५०० चौरस मैल आहे. येथील मुख्य नद्या म्हणजे मूअर, जोहोर, एंडो व बाटुपाहट ह्या आहेत. मलाया द्वीपकल्पांतील कोणत्याहि संस्थानापेक्षां येथें डोंगराळ प्रदेश कमी आहे. सर्वांत उंच ठिकाण गौंत ओफिर (४००० फूट) आहे. येथें जंगल फार आहे. अबुबकर यानें बांधलेला राजवाडा येथें मुख्य पहाण्यासारखा आहे. बंदर महाराणी ही मूअरप्रांताची मुख्य जागा आहे. येथील हवा आरोग्यकारक आहे व वार्षिक पर्जन्य सुमारें ९७·२८ इंच आहे. जोहोरची लोकसंख्या(१९११)त १८०४१७ होती;पैकीं १०२२१९ मलायी, ६३४०५ चिनी व ५६५९ हिंदी लोक होते. येथील उत्पन्न (१९१७) १०१६८६२४ डॉलर होतें. खर्च या मानानें कमी (निम्मा) आहे. १९१७ सालीं ५ इंग्रजी व ६६ देशी शाळा होत्या. रबर, गँबिहार, मिरची, खोबरें, जस्त वगैरे माल परदेशीं रवाना होतो.

१५११ सालीं पोर्तुगीज लोकांनीं मलाक्काच्या सुलतानाला हाकलून लावल्यानंतर त्यानें जोहोरचें मुसुलमानी राज्य स्थापिलें असें म्हणतात. डच व पोर्तुगीज लोकांच्या भांडणांत जोहोरनें भाग घेतला. नंतर रिओच्या सुलतानाचा अधिकारी जोहोरवर राज्य करीत होता. या अधिकाऱ्यानें इ. स. १८१२ मध्यें रिओच्या सुलतानाच्या अधिकार झुगारून दिला असावा असें दिसतें कारण १८१९ सालीं सुलतान हुसेन नांवाच्या त्याच्या वंशजानें सिंगापूर ईस्ट इंडिया कंपनीला दिलें. स. १८५५ त कंपनीनें त्यावेळचा सुलतान अली याला गादीवरून काढून जोहोरचा मूळ मालक टुमेंगांग याला पूर्ण अधिकार दिला. याचा मुलगा टुमेंगाग अबुबकर असाधारण बुद्धिमत्तेचा मनुष्य होता. तो पुष्कळ वेळां यूरोपांत गेला व आपल्या राज्याच्या कारभारांत व भरभराटींत त्यानें पुष्कळ लक्ष घातलें. व्हिक्टोरिया राणीनें त्याला स. १८७९ त महाराजा किताब दिला. १८८५ सालीं त्यानें ब्रिटिशांशीं नवा करार केला त्यामुळें जोहोर संस्थानचा सुलतान असा किताब घेण्यास परवानगी दिली. इ. स. १८९५ मध्यें त्याचा मुलगा सुलतान इब्राहीम गादीवर आला. जोहोर येथील राज्य इतक्या सुरळीत रीतीनें चाललें कीं ब्रिटिशांनां तेथें आपला रेसिडेंट ठेवण्याची अवश्यकता वाटली नाहीं. १९१४ सालीं एक ब्रिटिश सल्लागार नेमण्यांत आला. सुलतानला राज्यकारभारांत मदत करण्याकरितां एक स्टेट कौन्सिल असतें. त्यांत दोन यूरोपियन असतात. मूअर संस्थानचा कारभार जोहोरच्या राजघराण्यांतील पुरुषांकडून पाहिला जातो व तो रेसिडेंट असा किताब धारण करतो.

**जौगड**—मद्रास इलाखा, गंजम जिल्हा. गंजम गांवाच्या पश्चिमेस सुमारें ८ मैलांवर हा एक मोडकळीस आलेला किल्ला आहे. उ. अ. १९° ३३′ व पू रे. ८४° ५०′. हा बेऱ्हामपुर तालुक्यांत ऋषिकुल्या नदीच्या उत्तरेकडील तीरावर आहे. किल्ल्याच्या मध्यभागीं एक ग्रनाइट खडक असून त्यावर अशोक राजाचीं १३ शासनें (एडिक्ट्स्) आहेत (इ. स. २५०). मद्रास इलाख्यांत फक्त याच ठिकाणीं शासनें सांपडतात. जुनी मातीचीं भांडीं व कौलें येथें पुष्कळ सांपडतात. येथें पुष्कळ तांब्याचीं नाणीं सांपडलीं असून तीं पहिल्या शतकांतील असावींत असें म्हणतात. जमिनींत गाडलेलें गेलेलें एक देऊळहि येथें सांपडलें आहे.

**जौहरीफरवी**—अबुनस्र इस्माईल बिन हम्माद याचें आडनांव जौहरी फरवी असें होतें,व तो त्याच नांवानें प्रख्यात होता. हा जातीनें तुर्क असतांहि त्यानें आरबी भाषेंत (ईजिप्त व मेसापोटेमिया येथें शिकून) इतकें प्रावीण्य मिळविलें कीं, त्याला इमाम-उल्-लुघात म्हणजे भाषाशास्त्रज्ञ अशी पदवी मिळाली. यानें एक मोठा आरबीकोश, शहाह्-उल्-लुघात नांवाचा तयार केला आहे. त्यामुळें यानंतर त्याला साहेब-उस्-शहाह् असें (शहाह्चा कर्ता) टोपण नांव पडलें. तसेंच तो तुर्कस्थानांतील फाराब गांवचा रहिवासी असल्यानें त्याला फाराबी अथवा फाराबी-अल्-तुर्की असेंहि म्हणत. तो इ. स. १००२ (कांहींच्या मतें ९९२) मध्यें मेला. [वील.]

**ज्यूटीगल्पा**—"पूर्व हांडुरास" मधील ज्यूटीगल्पा विभागाचें हें एक मुख्य ठिकाण असून "फान्सेका" उपसागरापासून अटलांटिक किनाऱ्यापर्यंत जाणाऱ्या हमरस्त्यावर पाटूका नदीला मिळणाऱ्या एका ओढ्याच्या कांठीं वसलेलें आहे. शहराची लोकसंख्या १८०० असून हांडुरास संस्थानांतील हें दुसरें मोठें व महत्त्वाचें शहर आहे. भोंवतालचा भाग डोंगराळ असून येथें खनिजद्रव्यें विपुल आढळतात. दळणवळणाचीं साधनें नसल्यामुळें "खाणीकाम" फार कठिण जातें. इंडियनस् व हाफकास्ट लोकांची संख्या बरीच असून हे कॉफी, सोनकेळीं, तंबाखू,वगैरे पिकवितात.

**ज्योतिपंत महाभागवत**—हा अथर्ववेदी देशस्थ ब्राह्मण. सातारा जिल्ह्यांतील बुधकर्यातीचा देशपांडे. याच्या

बापाचें नांव गोपाळभट. ज्योतिपंत हा पेशवाईंत सरकारी नौकर असून झांशी प्रांतींचा एक अंमलदार होता. पानीपतावर हा गेला होता. एका कामांत वरिष्ठ अधिकाऱ्यांशीं न जमल्यानें यानें नौकरी सोडली व काशीस पुरश्वरण व भागवताचें पारायण केलें. तेथें व्यासानें याला भागवत देऊन त्यावर टीका करण्यास सांगितलें अशी आख्यायिका आहे. ही मूळ पोथी त्याच्या गांवीं आहे. याचा व तुकाविप्राचा स्नेह होता. यानें काशी–रामेश्वर या टापूंत ठिकठिकाणीं ( कोणी म्हणतात एक हजार ) विठ्ठलाचीं देवळें ( हा विठ्ठलभक्त असल्यानें ) बांधिलीं. त्यापैकींच मुंबईच्या विठ्ठलवाडींतील देऊळ व पुण्यास लकडीपुलाजवळील देऊळ आहे; प्रल्हाद वडवे हा याचाच शिष्य. याच्या भागवतावर एक ओंवीबद्ध व एक अंभगात्मक अशा दोन टीका आहेत. रामायणावरहि याचें काव्य असून, प्रवृत्ति निवृत्ति, ऐक्यरत्नावली वगैरे स्फुट काव्यहि आहे. याच्या भागवतरचनेवरून दास महाभागवत हें टोपण नांव मिळालें; तें हल्लीं त्याच्या वंशजासहि लावितात. हा शके १७१० (स. १७८८)त समाधिस्थ झाला. याचा मठ सातारा जिल्ह्यांत चिंचणेर येथें आहे. काशीजवळ रामनगरांत यानें शुक व व्यास यांचीं देवळें बांधलीं. यानें बांधलेल्या प्रत्येक विठोबाच्या देवळापुढें एक पिंपळाचें झाड व पार असतो. [ संतकविकाव्यसूचि; इतिहाससंग्रह. जुन्या ऐ. गोष्टी. पृ.३२,३३.]

**ज्योतिःशास्त्र**—सूर्य, चंद्र, ग्रह, तारे इत्यादि आकाशांत संचार करणारे पदार्थ म्हणजेच दिव्यपदार्थ अथवा ज्योतींच्या वास्तविक व भासमान स्थिती व गती, आणि त्यांचीं स्वरूपें, आकार, वजनें व घटना, अवस्था इत्यादि गोष्टी यांविषयीं अवलोकन व अनुमान यांवरून होणारें ज्ञान ज्याच्या विवेचनाचा विषय असतो तें शास्त्र ज्योतिःशास्त्र होय.

**आकाशगोल व त्याचें परिभ्रमण.**—रात्रीं आपण उघड्या जागीं उभें राहून सभोंवार पाहूं लागलों तर आपल्यावर सर्वत्र आकाशाचा घुमटाकार अर्धगोल पसरलेला दिसतो. त्याच्या अंतःपृष्ठास असंख्य चांदण्या लकटलेल्या दिसतात. तो अर्धगोल वर्तुलाकार रेषेंत भूपृष्ठास लागलेला दिसतो तिला क्षितिजवृत्त( आ. १, उपूदय)म्हणतात. कोठेंहि व कधींहि भूपृष्ठाचा प्रेक्षकास दिसणारा भाग वर्तुलमर्यादित दिसतो. यावरून भूगोलाकार आहे असें निष्पन्न होतें. आकाशगोलाचा अत्युच्च बिंदु( आ० १, ख) खस्वस्तिक होय. त्यास खमध्य किंवा खशिखर असेंहि म्हणतात. खस्वस्तिकापासून प्रेक्षकापर्यंत काढिलेली रेषा ही पतनदिशा होय.



आकृति १

अर्थात् ती भूपृष्ठास लंब असते व म्हणून ती वाढविली तर भूमध्यांतून जाते.

अनेकवार लक्षपूर्वक आकाशाकडे पाहत गेलें तर असें दिसून येतें कीं आकाशाचा अर्धगोल हा त्यावर लकटलेल्या चांदण्यासहित एखाद्या अदृष्ट आंसाभोंवतीं फिरत असावा. प्रत्येक चांदणी आकाशांतील एका विशिष्ट बिंदूसभोंवतीं सुमारें २४ तासांत एक प्रदक्षिणा करिते व तिचीं त्या बिंदूपासून व इतर चांदण्यांपासून जीं अंतरें एकदां दिसतात तीं कमी जास्त होत नाहींत. आतां इतक्या असंख्य चांदण्यासहित आकाशगोल पृथ्वीभोंवतीं फिरतो अशा कल्पनेपेक्षां पृथ्वीच आपल्या आंसाभोंवतीं फिरत असावी ही कल्पना अधिक साधी व आधुनिक शोधांप्रमाणें खरी ठरलेली अशी आहे. समजा कीं, पृथ्वी एका अक्षाभोंवतीं फिरत आहे ( आ. २, अ–अ = अक्ष ).प्रेक्षक(प्र) यास पृथ्वीच्या अक्षाच्या दिशेंत केव्हांहि भिन्नता आढळणार नाहीं अर्थात ज्या अतिदूरस्थ चांदणींतून ही अक्षादिशा जात असेल ती चांदणी प्रेक्षकास आकाशगोलावर स्थिर दिसेल. ही चांदणी म्हणजे ध्रुवाची तारा होय( अक्षादिशा जरी नेमकी या तारेंतून जात नाहीं तरी वरीच जवळून जाते ).



आकृति २

आकाशगोलाच्या पृष्ठावर चांदण्या लकटलेल्या दिसतात त्या खरोखरी अतिदूर व भिन्न भिन्न अंतरावर असून आकाशगोल हा केवळ दृष्टीचा आभास आहे. परंतु तो एक खरोखरीचा गोल असें मानणें चांदण्यांच्या दिशा ( वास्तविक स्थानें नव्हे ) दर्शविण्यास सोयीचें होतें. अक्षदिशेंत असलेली ध्रुवाची तारा ( ध ) ही मानीव आकाश गोलार्धावर जेथें दिसेल त्या स्थलास ( ध्रु ) आकाशगोलावरील ध्रुव तारास्थान म्हणतां येईल व तें स्थान पृथ्वी आपल्या अक्षाभोंवतीं फिरत असतांहि प्रेक्षकास दिसेल. आतां दुसरी एखादी ( त ) तारका घेतली तर तिच्याहि अतिदूरपणामुळें, प्रेक्षक पृथ्वीबरोबर फिरत असतां तिच्या वास्तविक दिशेंत फरक दिसणार नाहीं. म्हणजे आकाशगोलावरील ध्रुवाचें स्थान व तारकेचें स्थान (थ) यांच्या दिशांतील कोन( ध्रुप्रथ) ( म्हणजेच त्या स्थानांमधील गोलीय अंतर ) नेहमीं कायम राहील. अर्थात् तारका ध्रुवस्थानाभोंवती वर्तुलमार्गानें फिरत असलेला दिसेल.

खस्वस्तिक व खध्रुव संबंधीं वृत्तें व सहनिर्देशक.—एखाद्या गोलावरील कोणताहि बिंदु मध्यस्थानीं कल्पून काटकोनात्मक गोलीय त्रिज्येनें गोलावर वर्तुळ काढिलें तर त्यास गोलावरील वृहद्वृत्त म्हणतात. व दिलेल्या बिंदूस ( आ. ३ ) व त्यांतून जाणाऱ्या गोलव्यासाच्या दुसऱ्या टोंकाच्या बिंदूस त्या वृहद्वृत्ताचीं ध्रुवें म्हणतात. काटकोनाखेरीज इतर कोनाएवढ्या गोलीय त्रिज्येनें काढलेल्या गोलावरील वृत्तांस लघु वृत्तें म्हणतात. या सर्व वृत्तांचे मध्यबिंदू ध्रुवगामी गोलव्यासावर असतात वृहद्वृत्ताचा मध्य गोलमध्यच असतो व



आकृति ३

त्याचा व्यास गोलव्यासाएवढाच असतो. लघुवृत्तांचे व्यास गोलव्यासापेक्षां लहान असतात व लघुवृत्तें वृहद्वृत्तांस समान्तर असतात. एका वृहद्वृत्ताच्या ध्रुवांतून जाणारें कोणतेंहि वृहद्वृत्त दिलेल्या वृहद्वृत्तास व तत्समांतर लघुवृत्तांस लंब असतें अशा वृत्तांस त्या वृहद्वृत्तांचीं लंबवृत्तें म्हणतात. दोन लंबवृत्तांत सांपडलेल्या वृहद्वृत्तचापाची कोनात्मक लांबी व त्या लंबवृत्तामधील ध्रुवबिंदूपाशीं झालेला कोन हे समान असतात. आकाशगोलावरील खस्वस्तिक व ध्रुव यांतून जाणारें वृहद्वृत्त ( आ. १, उ ध्रु ख द ) हें याम्योत्तरवृत्त होय. तें क्षितिजास जेथें मिळतें त्यांतील ध्रुवापासून अधिक जवळचा बिंदु हा उत्तरगोलार्धावरील प्रेक्षकाच्या क्षितिजाचा उत्तरबिंदू ( आ. १,उ ) व दूरचा दक्षिणबिंदू ( आ.१ द. ) होय. दक्षिणगोलार्धावरील प्रेक्षकासंबंधीं याच्या उलट नांवें असतात. दक्षिणोत्तर ( द प्र उ ) रेषेस प्रेक्षकापासून काटकोनांत काढिलेली रेषा ( पू प्र प ) पूर्वापर रेषा होय. ही क्षितिजास जेथें मिळते त्यांतील जिकडून तारे उगवतात तिकडील बिंदु पूर्वबिंदु ( आ. १,पू ) होय व दुसरा पश्चिमबिंदु ( आ. १,प ) होय. पूर्व, पश्चिम व खस्वस्तिक यांतून जाणारें वृहद्वृत्त पुर्वापरवृत्त किंवा समवृत्त होय.

क्षितिजवृत्ताचा ध्रुव खस्वस्तिक होय. तत्संबंधीं लघुवृत्तें, क्षितिजसमांतरवृत्तें किंवा समोन्नतवृत्तें होत.तसेंच तत्संबंधीं लंबवृत्तें, दिगंशवृत्तें किंवा ऊर्ध्वाधरवृत्तें होत. एखाद्या ( आ. १,त ) तारकेंतून काढिलेलें दिगंशवृत्त क्षितिजवृत्तास जेथें मिळतें ( आ. १,थ) त्या बिंदूच्या तारकेपासून जें कोनात्मक अंतर ( त थ ) तें त्या तारकेचें उन्नतांश होत व तारकेचें खस्वस्तिकापासून कोनात्मक अंतर ( ख त ) तिचे नतांश होत. तारकेचें दिगंशवृत्त व क्षितिजवृत्त यांच्या छेदबिंदूचें उत्तरबिंदू ( उ ) पासून अंतर ( उ थ ) तारकेचे दिगंश होत, व ते छेदबिंदू पूर्वेस किंवा पश्चिमेस असल्यास पूर्व किंवा उत्तर दिगंश होतात. तारकेचे दिगंश व उन्नतांश (किंवा नतांश) कळले म्हणजे तिचें आकाशगोलावरील स्थान आपणास कळतें. स्थान निश्चित करणाऱ्या मानास निर्देशक म्हणतात. दिगंश व उन्नतांश हे तारकेचे सह-निर्देशक होत. आकाशगोल फिरत असतां तारकांचे हे सहनिर्देशक क्षणोक्षणीं बदलतात. खध्रुवाचें वृहद्वृत्त हें विषुववृत्त होय. हें



आकृति ४

( आ. ४ ) दोन्ही ध्रुवांपासून अर्थातच समान अंतरावर असतें. पृथ्वीचा अक्ष व आकाश गोलाचा अक्ष समान दिशेंत असतात म्हणून भूमध्यवृत्त व विषुववृत्त हीं वृत्तें समान्तर पातळ्यांत असतात. तेव्हां भूमध्यवृत्त वाटवीत वाढवीत गेलें तर अतिदीर्घ त्रिज्येच्या आकाशगोलावरील विषुववृत्ताशीं एकरूप होईल. भूमध्यवृत्त व क्षितिजवृत्त यांच्या पातळ्यांमधील कोन पृथ्वीचा अक्ष व उर्ध्वाधर रेषा यांच्यामधील कोना-( आ. २—अ ख म )बरोबर असतो म्हणजे ९०°—प्रेक्षक स्थलाचे अक्षांश इतका असतो. तोच कोन अर्थात् खस्वस्तिक खध्रुव यांच्यामधील कोनात्मक अंतरा ( खध्रु ) बरोबर असतो, म्हणजे ९०° —ध्रुवाचे उन्नतांश इतका असतो. म्हणून, ध्रुवाचे उन्नतांश = प्रेक्षक स्थलाचे अक्षांश.

खध्रुवसंबंधीं लघुवृत्तें हीं विषुवसमांतरवृत्तें किंवा समक्रांतवृत्तें होत. तत्संबंधीं लंबवृत्तें हीं ध्रुवगामीवृत्तें किंवा कालांशवृत्तें होत. पूर्वेकडून डोक्यावरून पश्चिमेकडे अशी आकाशगोलाच्या दैनिक परिभ्रमणाची दिशा होय. आकाशांतील एखादी तारका ( त ) घेऊन तिचें कालांशवृत्त काढिलें तर जेव्हां ती तारका याम्योत्तरवृत्तावर असेल तेव्हां तें कालांशवृत्त याम्योत्तरवृत्ताशीं एकरूप असेल. पुढें आकाशगोलाच्या भ्रमणामुळें कालांशवृत्त याम्योत्तरवृत्तास सोडून पश्चिमेकडे सरकत जाईल व एकपूर्ण परिभ्रमण झाल्यावर पुन्हां याम्योत्तरवृत्ताशीं एकरूप होईल. कोणत्याहि वेळीं तारकेचें कालांशवृत्त व याम्योत्तरवृत्त यांमधील याम्योत्तरवृत्तापासून पश्चिम दिशेनें मोजलेला कोन ( खध्रुत ) त्या तारकेचे त्यावेळचे कालांश होत, व तिचें ध्रुवापासून कोनात्मक अंतर (ध्रुत )हो तिची ध्रुवच्युति होय. तारकेचें स्थान सांगण्याचा ध्रुवच्युति व कालांश सांगणें हा दुसरा प्रकार होय.

तारकेचे कालांश आकाशगोलाच्या परिभ्रमणामुळें ०° पासून ३६०° पर्यंत एका पूर्ण परिभ्रमणांत वाढतात. या परिभ्रमणकालास एक नक्षत्रदिन म्हणतात. त्याचे २४ तास, एका तासाचीं ६० मिनिटें, एक मिनिटाचे ६० सेकंद; अथवा ६० घटिका, १ घटिकेचीं ६० पळें, १ पळाचीं ६० विपळें असे विभाग पडतात. आकाशगोलाचा परिवेग सदा सम असल्यामुळें कालांशांची वाढ दर तासी १५° याप्रमाणें होते. ह्मणून कालांश कोनपरिमाणांत न सांगतां कालपरिमाणांत सांगण्याची चाल आहे. उदाहरणार्थ ७५° कालांश असें न ह्मणतां ५ तास ह्मणतात. विषुववृत्तावर वसंतसंपात ह्मणून एक बिंदू आहे. तो काय हें पुढें कळेल. सध्यां आपण तो बिंदू ह्मणजे विषुववृत्तावरची एक तारका असें समजूं व तिला आदितारका(स) म्हणूं. या आदितारकेच्या कालांशवृत्तापासून पूर्व दिशेनें मोजलेलें दुसऱ्या कोणत्याहि ( त ) तारकेचें जें अंतर ( खध्रुव ) ते तारकेचे विषुवांश होत, व तारकेंतून काढिलेल्या कालांशवृत्तावर विषुववृत्तापासून तारकेपर्यंत मोजलेलें जें अंतर (तय) तें तारका विषुववृत्ताच्या दक्षिणेस किंवा उत्तरेस असेल त्याप्रमाणें तारकेची दक्षिण किंवा उत्तरक्रांति होय. विषुवांश व क्रांति सांगणें हा सहनिर्देशक सांगण्याचा तिसरा प्रकार होय.

ना क्ष त्र का ल द र्श क व वि षु वां शा न य न.— कोणतीहि तारका याम्योत्तरवृत्तावर आली म्हणजे तिचा मध्यारोह झाला असें म्हणावें. आदितारकेच्या मध्यारोहकालास ० ता. ० मि. ० से. दाखविणारें व एका नाक्षत्रदिनांत २४ तास दाखविणारें जें घड्याळ त्यास नाक्षत्रकालदर्शक म्हणतात. कोणत्याहि ( त ) तारकेच्या मध्यारोहकालीं आदितारकेचे कालांश हे त्या ( त ) तारकेचे विषुवांश होत. अर्थात त्या ( त ) तारकेचा नाक्षत्रकालदर्शकानें दर्शविलेला मध्यारोह हा त्या तारकेच्या विषुवांशाचें कालपरिमाणात्मक मान झालें. यावरून, ( त ) तारकेचे विषुवांश = (त) तारकेच्या मध्यारोहाचा नाक्षत्रकाल. ( त ) तारकेचे कालांश = आदितारकेचे कालांश—( त )तारकेचे विषुवांश.

आदितारकेच्या कालांशास याम्योत्तरवृत्ताचे विषुवांश ह्मणतात. म्हणून

( त ) तारकेचे विषुवांश = याम्योत्तर वृत्ताचे विषुवांश—(त)तारकेचे कालांश. याप्रमाणें मध्यारोहकालीं कालदर्शकावरून तारकेचे विषुवांश आणितां येतात.

आकाशगोलावरील असंख्य तारकांचीं परस्परसापेक्ष अंतरें व ध्रुवस्थान दीर्घकालपर्यंत निश्चल किंवा बहुतेक निश्चल रहात असल्यामुळें तारकादिकांची यादी करतांना विषुवांश व क्रांति बहुतांशीं स्थिर असे स्थाननिर्देशक देण्याचाच प्रघात आहे.

म ध्या रो ह द र्श क व क्रां त्या न य न.—नाक्षत्रकालदर्शकाच्या साहाय्यानें कोणत्याहि तारकेचे विषुवांश ठरवितां येतात असें वर सिद्ध झालें आहे विषुवांशसंबंधीं दुसरा सहनिर्देशक ठरविण्यास तारकेच्या मध्यारोहकालीं तिचे उन्नतांश मापितात. मध्यारोहकालचे हे उन्नतांश काढण्याचें साधन मध्यारोहदर्शक यंत्र हें होय. यांतील दुर्बीण एका पूर्वपश्चिम अक्षाभोवतीं याम्योत्तरवृत्ताच्या पातळींत फिरते. त्याच पातळींत एक कोनमापकवृत्त असून दुर्बिणीची दिशा ऊर्ध्वाधररेषेशीं किंवा दक्षिणोत्तररेषेशीं मध्यारोहदर्शनकालीं कोणता कोन करते हें त्या कोनमापकवृत्तावरून कळतें. म्हणजे मध्यारोहकालचे तारकेचे नतांश किंवा उन्नतांश कळतात. आतां, मध्यारोह खस्वस्तिकाच्या दक्षिणेस असेल तर

तारकेची क्रांति=तारकेचें विषुववृत्तापासून लंबांतर.

= विषुववृत्ताचें खस्वस्तिकापासून लंबांतर—तारकेची मध्यारोहकालचे नतांश.

= प्रेक्षकस्थलाचे अक्षांश—तारकेचे म. का. नतांश.

शेवटच्या वजावाकीचें फळ धन किंवा ऋण असेल त्याप्रमाणें क्रांति उत्तर किंवा दक्षिण समजावी.

मध्यारोह खस्वस्तिकाच्या उत्तरेस असेल तर

तारकेची क्रांति = प्रे. स्थ. अक्षांश + तारकेचे म.का.नतांश. याप्रमाणें तारकेची क्रांति आणण्याची पद्धति आहे.

क्रां ति वृ त्त, व त त्सं बं धीं स ह नि र्दे श क.— आकाशगोलाची लांकडी किंवा धातूची लहानशी प्रतिमा करावी तिच्यावर खध्रुवसंबंधीं सर्व वृत्तें काढावीं व निरनिराळ्या अनेक लहानमोठ्या तारकांचीं, वेधानें आणलेल्या विषुवांश व क्रांति या निर्देशकांवरून येणारीं स्थानें दर्शवावीं. अशा खगोलावर प्रत्येक दिवशीं सूर्याच्या मध्यारोहकालीं वेध



करून त्याचे विषुवांश व क्रांति आणून त्याचें त्या दिवशींचें स्थान खगोलावर दर्शवावें. असें प्रतिदिनीं करीत गेल्यास असें दिसून येईल कीं, हीं सूर्याचीं सर्व स्थानें खगोलावरील एका बृहद्वृत्तावर असतात व सूर्य प्रतिदिवशीं बृहद्वृत्तावर

पूर्व दिशेनें सुमारें १ अंश चळतो. म्हणजे तारकासंबंधीं सूर्याची स्थिति निश्चल रहात नाहीं तर तारकासमूहांतून सूर्य पश्चिमेकडून पूर्वेकडे प्रवास करितो. सूर्याचा प्रवास आकाशगोलावरील ज्या वृत्तावरून होतो त्यास क्रांतिवृत्त म्हणतात [ आ. ५ पहा ]. क्रांतिवृत्त व विषुववृत्त एकमेकांस ज्या दोन विंदूंत छेदितात त्यांस संपातविंदु म्हणतात. त्यांतील ज्या विंदूंतून जातांनां सूर्य दक्षिणेकडून विषुववृत्ताच्या उत्तरेस जातो तो वसंतसंपात व दुसरा शरत्संपात होय. याच वसंतसंपाताच्या स्थानीं तारका मानून तिला आपण वर आदितारका म्हटलें आहे. वस्तुतः संपातस्थानीं अशी नेमकी तारका नाहीं. संपातविंदूपासून ९० अंश अंतरावर असलेल्या क्रांतिवृत्तावरील विंदूंपैकीं वसंतसंपाताच्या पूर्वेकडील तो दक्षिणायनारंभ विंदु व दुसरा उत्तरायणारंभविंदु होय.

आकाशगोलावरील क्रांतिवृत्ताच्या ध्रुवास कदंब म्हणतात (हा बहुधा विषुववृत्ताच्या उत्तरेकडील क्रांतिवृत्ताचा ध्रुव घेतात). कदंबासंबंधीं लंबवृत्तांस कदंबगामीवृत्तें म्हणावें. याच वृत्तांवर तारकांचीं क्रांतिवृत्तापासून लंबांतरें मोजतात. एखाद्या तारकेचें कदंबगामीवृत्त क्रांतिवृत्तास जेथें छेदितें त्या विंदूचें वसंतसंपातापासून जें कोनात्मक अंतर( पूर्व दिशेनें मोजिलेलें) त्यास त्या तारकेचा सांपातिक भोग ( सध ) म्हणतात. तारकेचें क्रांतिवृत्तापासून जें लंबांतर तें त्या तारकेचा शर (तळ) होय. भोग व शर सांगणें हा तारकेचे सहनिर्देशक सांगण्याचा चवथा प्रकार होय. सूर्य व ग्रह हे बहुतेक क्रांतिवृत्ताच्या मार्गानेंच प्रवास करीत असतात. म्हणून त्यांचे सहनिर्देशक या चवथ्या प्रकारानें सांगण्याचा प्रघात आहे. भोग व शर हे प्रत्यक्ष वेधानें कळणें कठिण असल्यामुळें विषुवांश व क्रांतीवरून गणितानें ते काढतात.क्रांतिवृत्ताशीं विषुववृत्ताचा जो कोन होतो त्यास क्रांतिवृत्ताचें तिर्यक्त्व म्हणावें. ते २३°२७". ८२६–०."४६८; (इ. स.१९००) इतकें आहे.

संपातविंदूचें क्रांतिवृत्तावरील स्थान स्थिर नाहीं. त्यास पूर्वेकडून पश्चिमेकडे अत्यंत मंदगति आहे. ही गति दरवर्षास ५०" .२४८ +०.०००२२२ ( इ. स. वर्ष–१९०० ) इतकी आहे. यामुळें सुमारें २६००० वर्षांत संपाताचें क्रांतिवृत्तांतून एक परिभ्रमण होतें. या संपाताच्या गतीस संपातचलन किंवा अयनगति असें म्हणतात. क्रांतिवृत्ताचे ३०° चे १२ विभाग करितात. त्यांस राशि अशी संज्ञा आहे. त्याचप्रमाणें क्रांतिवृत्ताचे १३°२०'चे २७ विभाग करतात त्यांस नक्षत्र अशी संज्ञा आहे.

राशिविभाग किंवा नक्षत्रविभाग वसंतसंपातामध्यें आरंभ मानून केल्यास त्यांस सायनराशि किंवा नक्षत्र म्हणतात; क्रांतिवृत्तावरील एखाद्या निश्चल विंदूपासून त्यांचा आरंभ मानिल्यास त्यांस निरयनराशि किंवा नक्षत्र म्हणतात. व निश्चलविंदु आणि वसंतसंपात यांमधील अंतरास अयनांश म्हणतात. भारतीय ज्योतिषांत रेवती नक्षत्रांतील योगतारा(म्हणजे तिच्या लंबवृत्ताचें व क्रांतिवृत्ताचें छेदस्थल) आरंभीं मानिली असून अयनांश स. १९२५ च्या आरंभीं १८° ४९'३६" इतके होते. तथापि आरंभस्थान व अयनांश यांच्याबद्दल बराच मतभेद असून कांहीं विद्वानांच्या मतें चित्रानक्षत्राच्या योगतारेसमोरील विंदु आरंभस्थानीं मानावा असें आहे.

सूर्याची दैनिक गति.—आकाशगोलाचें परिभ्रमण चालू असतां सूर्यविंबाचा मध्य क्षितिजावर पूर्वेकडे आला म्हणजे सूर्योदय, त्याचा मध्यारोहकाल हा मध्यान्ह, पश्चिमेकडील क्षितिजावर येणें हें सूर्यास्त व क्षितिजाखालील मध्यारोह काल हा मध्यरात्र होय. दिवस व रात्र या दोहोंस अहोरात्र म्हणतात.एका सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंतचा काल सर्वदा सारखा असत नाहीं. या कालाचें जें सरासरीचें मान त्यास सावनदिवस म्हणतात किंवा दोन मध्यान्हामधील कालाच्या सरासरी मानास मध्यमसावनदिवस म्हणतात. सूर्य सुमारें १° इतका प्रतिदिवशीं क्रांतिवृत्तांत पूर्वेकडे ढळतो, म्हणून एका मध्यान्हकालापासून आकाशगोलाची १ फेरी पूर्ण झाली तरी मध्यान्हकाल येत नाहीं. तो आकाशगोल आणखी १° पश्चिमेकडे फिरल्यावर येतो. या कारणामुळें सावनदिवस व नाक्षत्रदिवस हे कालविभाग सारखे नाहींत. मध्यम सावन दिवसाचे तास, मिनिटें, सेकंद हे विभाग करितात ते प्रसिद्ध आहेत. (१)नाक्षत्र दिवस म्हणजे मध्यम सावनमानाचे २३ ता. ५६ मि. ४. ०९० से. (२) म. सावन दिवस म्हणजे नाक्षत्रमानाचे २४ ता ३ मि. ५६. ५५६सेकंद.

सूर्याची वार्षिक गति.—क्रांतिवृत्ताची वसंतसंपातासंबंधानें एक पूर्ण फेरी करण्यास सूर्याला जो काल लागतो तें सांपातिक वर्षमान होय व निश्चल आरंभ विंदूसंबंधानें एक पूर्ण फेरी करण्यास लागणारा काल हें निरयन किंवा नाक्षत्र वर्षमान होय. संपात प्रतिवर्षी सूर्यगतीच्या उलट दिशेस सरकत असल्यामुळें सांपातिक वर्षमान नाक्षत्रवर्षमानापेक्षां किंचित् लहान आहे. त्याचीं मध्यमसावनमानें खालीं दिलीं आहेत. सांपातिकवर्ष = ३६५.२४२२००८ दि. – ०.००००००६२४ ( इ.सन–१८५० ) दि. नाक्षत्रवर्ष = ३६५. २५६३५८२ दि.



आकृति ६

क्रांतिवृत्त विषुववृत्ताशीं २३° २७' इतका कोन करितें यामुळें सूर्य क्रांतिवृत्ताच्या मार्गानें फिरत असतां क्रांति

सारखी बदलत असते व ती कधीं उत्तर तर कधीं दक्षिण असते. तिचें दक्षिण किंवा उत्तर परममान क्रांतिवृत्ताच्या तिर्यक्त्वाबरोबर ( म्हणजे २३° २७′ सुमारें ) असतें.

सूर्याचे विषुवांश व क्रांति यांचे पुढें दिल्याप्रमाणें वर्षांत फेरबदल होतात [ आ. ६ पहा ].

| तारीख | विषुवांश | क्रांति |
|---|---|---|
| मार्च२१(वासंतिक विषुवान्.) | ०° | ०° |
| मार्च२१ ते जून २२ | ०°ते९०° | ०°ते२३°२७′(उत्त.) |
| जून२२(दक्षि. आरंभ) | ९०° | २३° २७′ ( उत्तर ) |
| जून २२ ते सप्टं. २३ | ९०°ते१८०° | २३°२७′ते०° (उत्त.) |
| सप्टं. २१ (शरद् विषुवान) | १८०° | ०° |
| सप्टं. २३ते डिसें.२२ | १८०°ते२७०° | ०°ते २३°२७′ (द.) |
| डिसें.२२(उत्त.आरंभ) | २७०° | २३°२७′ ( द. ) |
| डिसें.२२ ते मार्च२१ | २७०°ते३६०° | २३°२७′ ते०°( द. ) |

मार्च २१ व सप्टें. २३ या सुमारच्या ज्या क्षणीं क्रांति०° होते त्या क्षणास वासंतिक व शारद विषुवान् म्हणतात. व जून २२ व डिसेंबर २२ या सुमारच्या ज्या दोन क्षणीं क्रांति परम मानाची असते त्यांस दक्षिणायनारंभ व उत्तरायणारंभ म्हणतात. कारण डिसेंबर २२ पासून जून २२ पर्यंत सूर्य उत्तरेकडे ढळत असतो व जून २२ पासून डिसेंबर २२पर्यंत तो दक्षिणेकडे ढळत असतो.

सूर्याची ध्रुवच्युति = ९०°–सूर्यक्रांति (उ) किंवा ९०°+ सूर्यक्रांति ( द ). तेव्हां सूर्याची कमीत कमी ध्रुवच्युति ९०° —२३°२७′ = ६६° ३३′( दक्षि. का.) व सूर्याची जास्तीत जास्ती ध्रुवच्युति ९०° + २३°२७′ = ११३°२७′(उत्त. का.)

पृथ्वीचे पांच कटिबंध.—आतां प्रेक्षक स्थलाचे अक्षांश जर ६६°३३′ पेक्षां अधिक असतील(आ. ७ पहा) तर सूर्याचा दैनिक मार्ग दक्षिणायनारंभकालीं व त्याच्या आधीं व मागून कांहीं दिवस सतत क्षितिजावरच असेल. म्हणजे तितके दिवस सूर्य मुळींच मावळणार नाहीं. तसेंच उत्तरायणारंभकालीं व त्याच्या आधीं व मागून कांहीं दिवस तो मार्ग सतत क्षितिजाखालीं असेल; म्हणजे तितके




दिवस सूर्य उगवलेलाच दिसणार नाहीं. या दोन प्रकारच्या कालास संततदिन आणि संततरात्रि असें म्हणतात. संतत दिन व संततरात्रि यांमधील कालांत सूर्योदय–सूर्यास्त--विभिन्न दिनरात्री होत असतात. दोन्ही विषुवदिवशीं सूर्य मार्गाचा निमा भाग क्षितिजाखालीं व निमा वर असतो; म्हणून दिनमान व रात्रिमान समान असतात. संतत दिनानंतर प्रथमतः दिनमान रात्रिमानापेक्षां मोठें व नंतर हळू हळू कमी होत जाऊन रात्रिमानाएवढें व नंतर आणखी कमी होऊन रात्रिमानापेक्षां लहान होतें व मग संतत रात्रीस सुरुवात होते. ही स्थिति अक्षांश ६६°३३′ ते ९०° या भूभागांत होते. यांत सूर्यकिरण क्षितिजाशीं नेहमींच लहान कोन करितात म्हणून त्या भागास सूर्याची उष्णता फार कमी प्राप्त होते व संततरात्रींत मुळींच प्राप्त होत नाहीं. यामुळें पृथ्वीच्या या भागास शीतकटिबंध असें म्हणतात. असे भाग उत्तर व दक्षिण या दोन्ही गोलार्धांत आहेत. प्रेक्षक स्थल २३°२७′ ते ६६° ३३′ या अक्षांशवृत्तांच्यामध्यें कोठें असेल ( आ. ८ पहा ) तर दैनिक सूर्य मार्ग वर्षांत कोणत्याहि दिवशीं कांहीं भाग क्षितिजावर व कांहीं खालीं असा असेल.




आकृति ८

मात्र सूर्याचा मध्यारोह केव्हांहि खस्वस्तिकाच्या उत्तरेस असणार नाहीं; तो दाक्षिणेस कललेला असेल. अर्थात सूर्य अगदीं डोक्यावर असा कधींच येणार नाहीं. उत्तरायणांत दिनमान वाढतें व दक्षिणायनांत उत्तरतें असें असेल. एकंदरींत या भागांत सूर्याचे किरण लंबरूप असे कधींच नसतात. म्हणून या भूभागास समशीतोष्णकटिबंध म्हणतात. असे भाग उत्तर व दक्षिण या दोन्ही गोलार्धांत आहेत. प्रेक्षकस्थल जर०° ते २३°२७′ या अक्षांशवृत्तांमध्यें असेल [ आ. ९ पहा ]. तर दैनिक सूर्यमार्ग वरच्याप्रमाणेंच प्रतिदिनीं दुभागला जाईल. सूर्याचा मध्यारोह अगदीं खस्वस्तिकासन्निध केव्हां तरी होतो व वरेच दिवस सूर्य त्यापासून मध्यारोहकालीं फार दूर नसतो. यामुळें या भागांत सूर्याचे किरण वरेंच दिवस




आकृति ९

जवळ जवळ लंबरूप असतात. म्हणून हा भाग सर्वांत अधिक तापतो. या भागास उष्णकटिबंध म्हणतात. दक्षिण व उत्तर गोलार्धांतील हे विभाग एकास एक लागून आहेत. प्रत्यक्ष ध्रुवस्थानीं अर्धें वर्ष दिवस व अर्धें वर्ष रात्र अशी स्थिति असते. तसेंच प्रत्यक्ष भूमध्यवृत्तावर नेहमींच दिनमान व रात्रिमान समसमान असतात.

ऋ तु मा न.—वासंतिक विषुवदिनाच्या सुमारास पृथ्वीवर सर्वत्र दिनमान व रात्रिमान समसमान असतें. नुकताच हिंवाळा झालेला असतो. त्यामुळें, सूर्याच्या उन्हाची प्रखरता बेताची व सुखद असते. म्हणून या कालास वसंतऋतु म्हणतात. नंतर पुढें उन्हाची प्रखरता वाढत्या दिनमानामुळें व अधिकाधिक लंबरूप सूर्यकिरणामुळें वाढत जाऊन दक्षिणायनारंभकाळीं व त्यापुढें कांहीं दिवस ती फारच होते. हा काळ उन्हाळ्याचा होय. नंतर दिनमान उतरतें, व उन्हाळ्यांत हवेंत सांचलेली पाण्याची वाफ वातावरण निवत चाललें म्हणजे पुन्हां जलरूप होऊन शारदसंपाताच्या सुमारास व त्याआधीं पावसास सुरवात होते. हा पावसाळा होय. या पुढें दिनमान रात्रिमानापेक्षां कमी होतें व सूर्यकिरण अधिकाधिक कलते होत जातात, म्हणून वातावरणांत उष्णता फारच थोडी राहून उत्तरायणारंभीं व त्याच्या आधीं व पुढें कांहीं दिवस हिंवाळ्याचा काळ असतो. ऋतूंचें हें सामान्य विवेचन झालें. देशाच्या विशिष्ट परिस्थितीमुळें ऋतुचक्रात फार मोठे फरक पडतात. भारतीय ज्योतिषांत ऋतु ६ असून वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरत्, हेमंत, शिशिर अशीं त्यांचीं नावें आहेत.

पृ थ्वी चें सू र्या भों व ती प रि भ्र म ण.—पृथ्वी आपल्या आंसाभोंवतीं गिरक्या घेत एका ठिकाणीं स्थिर असून सूर्य पृथ्वीभोंवतीं एक वर्षांत पूर्ण प्रदक्षिणा करितो ही सूर्याच्या दृश्य गतीवरून प्रथमतः सुचणारी कल्पना होय. कोपर्निकसाच्या कालापर्यंत हीच शास्त्रांत रूढ होती. नंतर सूर्य स्थिर असून पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते ही कल्पना कोपर्निकसानें काढली. दोन्ही कल्पनांप्रमाणें सूर्याच्या दृश्य गतींत कांहीं फरक पडत नाहीं. तेव्हां या दोहोंपैकीं कोणती खरी हा बरेच दिवस वादाचा प्रश्न होता. परंतु आतां एका मागून एक अशीं अनेक प्रमाणें मिळून सूर्याच्या स्थिरत्वाची कल्पना निर्विवाद खरी ठरली आहे. केप्लरनें अनेक वर्षांच्या वेधावरून या कल्पनेस पुष्टि दिली. पृथ्वीच्या गतीसंबंधानें त्यानें दोन नियम सिद्ध केले; ते असे.

पहिला नियमः—पृथ्वीचा मार्ग म्हणजे तिची कक्षा क्रांतिवृत्ताच्या पातळींत दीर्घवर्तुलाकार अशी असून त्या दीर्घवर्तुलाच्या एका केंद्रांत सूर्य आहे.

दुसरा नियमः—पृथ्वीचें सूर्यापासून अंतर म्हणजे तिचा मंदकर्ण पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरत असतां समानकालांत समान क्षेत्रें निर्मितो.

हे दोन नियम स्थापण्यास केप्लरनें सूर्याचा भोग व बिंबव्यास यांचे प्रतिमध्यान्हीं वेध घेऊन त्यांवरून प्रतिमध्यान्हीचे मंदकर्ण(क) व भोग (भ) हे काढिले ते असेः पृथ्वीपासून सूर्य ज्या मानानें दूर किंवा जवळ असेल त्यामानानें बिंबव्यास ( ब ) लहान किंवा मोठा असेल. म्हणजे $क \propto \frac{1}{ब}$. बिंबव्यासावरून याप्रमाणें क ची सापेक्ष किंमत समजते. आतां दीर्घवर्तुळाचा केंद्र व बृहदक्ष यांच्यासंबंधानें दीर्घवर्तुळाचें समीकरण

$$\frac{प}{क} = 1 + च \times कोभु ( भ )$$

[ प = पार्श्वकर्ण, क = मंदकर्ण, भ = भोग ( बृहदक्षापासून ), च = च्युति ] असें होय. अनेक वेधांनीं प्राप्त झालेल्या क व भ च्या कोणत्याहि दोन मध्यान्हींच्या किमती या समीकरणांत क व भ ला दिल्या तर त्यावरून प व च यांच्या ज्या किंमती निघतात त्या कोणत्याहि दोन मध्यान्हींच्या किंमतींवरून त्याच त्या येतात. अर्थात् क व भ च्या वेधप्राप्त किंमतींनीं दीर्घवर्तुळाच्या समीकरणाची पर्याप्ति होते. म्हणून पृथ्वीची कक्षा दीर्घवर्तुळ असून सूर्य तिच्या केंद्रीं आहे हें सिद्ध झालें. आतां लागोपाठ दोन मध्यान्हींचे क व भ हे $क_1$, $भ_1$, $क_2$, $भ_2$, असे आहेत. तर एक दिवसांत मंदकर्णानें व्यापिलेल्या क्षेत्राची अतिसंनिध किंमत

$$\frac{1}{2} क_1 क_2 \times भुज ( भ_2 - भ_1 )$$

ही होय. क्षेत्राची किंमत प्रतिदिवशीं तीच तीच येते. यावरून दुसरा नियम सिद्ध होतो. या समीकरणांतून मिळणारी च्युतीची किंमत ०·०१६७८३६ म्हणजे सुमारें ६० येते. म्हणजे भूकक्षेचें दीर्घवर्तुळ जवळजवळ वर्तुळाकार आहे.

सूर्याचे लघुतम व महत्तम बिंबव्यास अनुक्रमें ३१′ ३२″ व ३२′ ३६″ होत. लघुतम बिंब असतें तेव्हां महत्तम मंदकर्ण असतो. त्यावेळीं पृथ्वी स्वकक्षेच्या उच्चीं आहे असें म्हणतात. तसेंच महत्तम बिंब असतां लघुतम मंदकर्ण असतो व त्यावेळीं पृथ्वी नीचीं आहे असें म्हणतात. उच्च व नीच स्थानें ही बृहदक्षाचीं अग्रें होत. म्हणून बृहदक्षास नीचोच्च रेषाहि म्हणतात. नीचोच्च रेषा स्थिर नाहीं. तिला मंद गति आहे. पृथ्वीच्या गतीची जी दिशा त्या दिशेंतील गतीला मार्गगति व उलट दिशेंतील गतीस वक्रगति अशीं नावें आहेत. नीचोच्चरेषेला वार्षिक सुमारें ११″ मार्गगति आहे व संपातरेषेस वार्षिक ५०″ वक्रगति आहे. म्हणून संपातरेषा व नीचोच्च रेषा यांमधील कोन प्रतिवर्षी १′ १″ (सुमारें )असा वाढतो. नीचोच्चासंबंधीं पृथ्वीच्या पूर्ण प्रदक्षिणेस लागणाऱ्या कालास केंद्राश्रित वर्ष म्हणतात. याचें मान नक्षत्रवर्षापेक्षां ४ मि. ३९.१२ सेकंद अधिक आहे.

पृथ्वीच्या मध्यापासून सूर्याची ( किंवा कोणत्याहि खस्थ पदार्थाची ) दिशा व प्रेक्षकस्थलापासून दिसणारी दिशा

यांतील अंतरास सूर्याचें ( किंवा त्या रवस्थ पदार्थाचें ) लंबन म्हणतात. आतां भूमध्य ( भू ), रवि ( र ) व प्रेक्षक ( प्र ) या त्रिकोणावरून

$$\text{भुज ( भूरि प्र )} = \text{भुज (रवप्रेर)} \times \frac{\text{प्रभू}}{\text{रभू}}$$

असें होतें. भूरिप्र = ल हा लंबनकोन लहान असल्यानें,

$$\text{भुज}(\widehat{\text{भूरप्र}}) = \text{ल,(चापीय मान)} \therefore \text{ल} = \text{भुज( रविनतांश)} \times \frac{\text{प्रभू}}{\text{रभू}}$$

जेव्हां रवि क्षितिजावर असेल तेव्हां नतांश ९०° व लंबन = ल० म्हणून, $\text{ल०} = \frac{\text{प्रभू}}{\text{रभू}}$ म्हणून ल० = ल०×भुज(रविनतांश) अर्थात्, ल''=ल०''×भुज (रविन०) यात, ल'' = विकलात्मक लंबन ल०'' = विकलात्मक क्षैतिजलंबन.

अनेक प्रकारचे वेध करून त्यावरून सिद्ध झालेलें सूर्याचें क्षैतिजलंबन = ८''. ८ विकला होय. यावरून,

$$\text{ल०} = \frac{८''.८}{२०६२६५''} \left\{ \begin{array}{c} \text{कारण चापीय एकेक} \\ = २०६२६५'' \end{array} \right\}$$

$$\text{म्हणून रभू ( सूर्याचें दूरत्व )} = \frac{२०६२६५}{८\cdot८} \cdot \text{प्रभू}$$

$$= \frac{२०६२६५ \times ३९६३\cdot३}{८\cdot८} \text{ मैल} = ९,२८,००,००० \text{ मैल}$$

सूर्यबिंबव्यास मध्यममानानें कोनात्मक ३२'२'' असतो. तेव्हां सूर्याचा व्यास ( मैलात्मक )

$$= \frac{३२'\ २''}{२०६२६५''} \times ९,२८,००,००० = ८,\ ६६,४०० \text{ मैल.}$$

**चं द्र ग ति.**—चंद्राचा आकाशांतील दृश्य मार्ग आकाशावरील एक बृहद्वृत्त होय. हें क्रांतिवृत्ताशीं ५° ८'इतका(सुमारें) कोन करितें. या दोन वृत्तांच्या छेदबिंदूस राहु व केतु अशीं नांवें आहेत. चंद्राचा भोग ०° पासून ३६०°वाढण्यास जो काल लागतो त्यास(म्हणजे नक्षत्रासंबंधीं पूर्ण परिभ्रमणास)नाक्षत्रमास म्हणतात. चंद्राचा भोग−सूर्याचा भोग यास तिथ्यंश म्हणतात. तिथ्यंश ० पासून ३६० पर्यंत वाढण्यास जो काल लागतो त्यास सामान्यतः चांद्रमास म्हणतात. तसेंच राहूसंबंधीं भोग ३६०° नीं वाढण्यास लागणारा काल हा पाताश्रित मास होय. या मासांचीं मध्यम सावन मानें अशीं:—

सांपातिक नाक्षत्रमास ( मध्यम मान ) २७ दि. ७ ता. ४३ मि. ४·६८सेकंद
निरयन ना.मास.(म.मान)२७दि. ७ ता.४३ मि. ११·५४५से.
चांद्रमास (मध्यम मान)२९दि. १२ ता. ४४मि. २.८६४ से.
पाताश्रित मास(म. मान)२७ दि.५ ता.५ मि. ३५·८१ से.

चांद्रमासाचे शुक्ल व कृष्ण असे २ पक्ष असतात. प्रत्येकांत १५ तिथी, असतात. एक तिथि म्हणजे तिथ्यंश १२° नीं वाढण्यास लागणारा काल. शु. प्रतिपदेंत ०° पासून १२° पर्यंत, व शु. द्वितीयेंत १२° ते २४° पर्यंत, असें तिथ्यंश वाढतात.

पौर्णिमेस तिथ्यंश १८०° असतात म्हणजे सूर्य व चंद्र आकाशगोलावर जवळ जवळ समोरासमोर म्हणजे १८०° अंतरावरील शरसूत्रावर असतात. अमावास्येस तिथ्यंश ३६०° किंवा ०° असतात. म्हणजे सूर्य व चंद्र एकाच शरसूत्रावर असतात. चंद्रमार्ग क्रांतिवृत्ताशीं तिरकस असल्यामुळें पौर्णिमा अथवा अमावास्येच्या वेळीं चंद्रसूर्य अगदीं समोरासमोर किंवा अगदीं एकत्र नसतात. ज्या वेळीं चंद्र राहु किंवा केतुजवळ असेल त्या वेळीं त्याचा शर अल्प असतो.अशा वेळीं पौर्णिमा असली तर सूर्यानें पाडिलेली पृथ्वीची छाया चंद्रावर पडून चंद्रग्रहण होतें व अमावास्या असली तर चंद्र सूर्याच्या आड येऊन, सूर्यग्रहण होतें. ग्रहणासंबंधीं विशेष माहिती 'ग्रहण' या शब्दाखालीं दिली आहे. चंद्र पृथ्वीभोंवतीं फिरत असतां त्याचें सूर्याभिमुख अंग प्रकाशित असतें. या प्रकाशित अंगाचा पूर्ण भाग पौर्णिमेस पृथ्वीसन्मुख असतो. म्हणून त्या दिवशीं चंद्रबिंब पूर्ण असतें. अमावास्येस प्रकाशित अंग पृथ्वीपराङ्मुख असतें. त्या दिवशीं चंद्र दिसत नाहीं अमावास्येनंतर प्रकाशित अंगाचा थोडथोडा भाग दृग्गोचर होत जातो. पौर्णिमेस सर्व प्रकाशित भाग दिसतो. नंतर तो कमी कमी होत जाऊन अमावास्येस पार नाहींसा होतो. चंद्रबिंबाच्या प्रकाशित भागास चंद्राची कला म्हणतात. चंद्राची अंतरालांतील वास्तविक गति पृथ्वीच्या सूर्यसंबंधीं गतीप्रमाणेंच दीर्घवर्तुलाकार कक्षेंत असते व त्या दीर्घवर्तुलाच्या केंद्रीं पृथ्वी असते. चंद्राचा मंदकर्ण ( भू. चंद्ररेषा ) समान कालांत समान क्षेत्रें आक्रमितो. चंद्राच्या कक्षेची नीचोच्चरेषा मार्गगतीनें चंद्रकक्षापातळींत फिरते. तिच्या एका नाक्षत्रभ्रमणास ३२३२·५७५ दिवस लागतात. चंद्रकक्षा व भूकक्षा यांच्या पातळ्यांची छेदरेषा ही पातरेषा होय. ही वक्रगतीनें भूकक्षापातळींत फिरते. तिच्या एका नाक्षत्रभ्रमणास ६७९३·३९१ दिवस लागतात. चंद्रकक्षेची च्युति ०·०५४९१ ( सुमारें $\frac{१}{१८}$) इतकी आहे. अर्थात चंद्रकक्षा जवळ जवळ वर्तुळाकार असते. चंद्राचें क्षैतिजलंबन ५७' २''.७०७ आहे. यावरून सूर्य व पृथ्वी यांचें अंतर ज्या पद्धतीनें काढलें त्या पद्धतीनें चंद्र व पृथ्वी यांचें अंतर २,३८,८४० मैल येतें. हें पृथ्वीच्या व्यासार्धाच्या सुमारें ६० पट व सूर्य व पृथ्वी यांच्या अंतराच्या सुमारें ४०० व्या भागाइतकें आहे. चंद्राचा व्यास २,१६२मैल आहे.

**ग्र हां च्या ग ती.**—सूर्य व चंद्र यांखेरिज तारकासमूहांतून भ्रमण करणारे दुसरे दिव्य गोल म्हणजे ग्रह होत. हे बुध, शुक्र, मंगळ, लघुग्रह, गुरु, शनि, प्रजापति ( युरेनस किंवा हर्शेल ) व वरुण ( नेप्च्युन ) हे मुख्यतः असून त्यांचे बहुतेकांचे एक किंवा अनेक उपग्रह आहेत. शिवाय कांहीं धूमकेतुहि नियमितपणें संचार करणारे आहेत. चंद्रसूर्य व बुधादि ग्रह यांच्या भासमान गतींतील मुख्य फरक हा कीं चंद्रसूर्यांचा भासमान भोग नेहमीं वृद्धिंगत होतो. म्हणजे त्यांची भासमान गति मार्गी असते. परंतु ग्रहांची भासमान गति कधीं मार्गी तर कधीं वक्री असते. ग्रहभोग−रविभोग या अंतरास इनान्तर म्हणतात. इनांतर शून्य असतां रवि व ग्रह यांची युति झाली असें म्हणतात. इनांतर १८०°

असतां रवि व ग्रह यांची वियुति झाली असें म्हणतात. दोन लागोपाठ होणाऱ्या युती किंवा वियुती यांमधील कालास युत्यंतर्गत भ्रमणकाल म्हणतात. ग्रहांच्या अंतरालांतील वास्तविक गतींसंबंधीं केप्लरनें अनेक वर्षांच्या परिश्रमानें शोधून काढलेले सिद्धांत असेः—

पहिला सिद्धांतः—ग्रहकक्षा दीर्घवर्तुलाकार असते व तिच्या केंद्रीं सूर्य असतो.

दुसरा सिद्धांतः—ग्रहाचा मंदकर्ण ( रवि व ग्रह यांस जोडणारी रेषा ) समान कालांत समान क्षेत्रें आक्रमितो.

तिसरा सिद्धांतः—ग्रहांच्या नाक्षत्र (सूर्य मध्यस्थ प्रेक्षकाचे संबंधीं) भ्रमणकालांचे वर्ग त्यांच्या मध्यमांतरांच्या ( सूर्यापासून सरासरी पद्धतीनें निघणाऱ्या ग्रहांच्या अंतरांच्या ) घनांच्या प्रमाणांत असतात.

भ्र हा जर ग्रहाच्या नाक्षत्रभ्रमणकाल आणि व हें वर्षमान घेतलें तर मध्यममानानें एक दिवसांत ग्रहाच्या मंदकर्णाची गति $\frac{३६०^\circ}{\text{भ्र}}$ व पृथ्वीच्या मंदकर्णाची $\frac{३६०^\circ}{\text{व}}$ इतकी होईल. म्हणजे ग्रह व पृथ्वी यांच्या मंदकर्णांमधील कोन $\frac{३६०^\circ}{\text{भ्र}}-\frac{३६०^\circ}{\text{व}}$ इतक्या अंशांनीं वाढेल. हें अंतर ३६०° वाढण्यास लागणारा काल युत्यंतर्गतभ्रमणकाल य होय. अर्थात् $\frac{१}{\text{भ्र}}-\frac{१}{\text{व}}=\frac{१}{\text{य}}$ यावरून य माहीत झाल्यावर भ्र कळतो.

अंतराळांत ग्रहकक्षा निश्चित करण्यास ६ मूलमानें माहीत असावीं लागतात. तीः—( १ ) कक्षेचा बृहदक्षार्ध; म्हणजेच ग्रहाचें सूर्यापासून सरासरीपद्धतीचें मध्यमांतर. (२) च्युति; ही $\frac{\text{उच्चमंदकर्ण}-\text{नीचमंदकर्ण}}{२\times\text{मध्यमांतर}}$ इतकी असते. ( ३ ) उत्पातभोग. ग्रहकक्षा व भूकक्षा यांच्या पातळ्यांची छेदरेषा ही पातरेषा होय. पातरेषा ही ग्रहकक्षेस उत्पात व अवपात अशा दोन बिंदूंत छेदिते. जेथें ग्रह भूकक्षेच्या दक्षिणेकडून उत्तरेकडे जातो तो उत्पातबिंदु. उत्पातबिंदूचा भोग तो उत्पातभोग. ( ४ ) नीचभोग, हा उत्पातभोग + उत्पातदिशा व नीचदिशा यांतील कोन असा मिश्र कोन असतो. (५) कक्षातिर्यक्त्व—ग्रहकक्षा व भूकक्षा यांच्या पातळ्यांमधील कोन. ( ६ ) नीचस्थितिकाल, ग्रह नीचीं असण्याची एक वेळ.

पुढील विवरणांत सर्वत्र कोन हे चापीय मानांत घेतले आहेत. वृत्तपरिधि व व्यास यांचें गुणोत्तर ३.१४१५९ असतें. याबद्दल π ही संज्ञा योजूं. चापीयमानाचा (आ. १० पहा.) एकक म्हणजे त्रिज्यातुल्य चापासमोरील वृत्तमध्यस्थकोन यांत ५७° १७′ ४५″ = ३४३७′ ४५″ = २०६२६५″ असतात. ३६०° अंशांचें चापीयमान २ π होय. दिनात्मक भ्रमणकालानें २ π ला भागिलें म्हणजे ग्रहाची मध्यमदिनगति येते. म्हणजे ग्रह समपरिवेगानें स्वकक्षेंत फिरतो असें मानल्यास त्याची ज्या परिवेगानें त्याच भ्रमणकालांत एक पूर्ण फेरी होईल तो परिवेग मध्यमदिनगति होय. या गतीनें येणारें ग्रहाचें स्वकक्षेंतील स्थान मध्यमग्रहस्थान होय. व कक्षेंतील त्याचें वास्तविक स्थान मंदस्पष्टग्रह होय. मंदस्पष्टग्रहापासून कक्षेच्या बृहदक्षावर काढिलेली लंब रेषा बृहदक्षास व्यास कल्पून काढिलेल्या वृत्तास ग्रहाच्या बाजूलाच ज्या बिंदूंत छेदिते त्याची कक्षामध्यगदिशा व बृहदक्ष दिशा यांतील कोनास च्युतमंदकेंद्र म्हणतात. मंदकर्ण (स्पष्टग्रहाचें सूर्यगत अंतर) व बृहदक्ष यांतील कोनास स्पष्टमंदकेंद्र म्हणतात. मध्यमग्रहाची सूर्यगत दिशा व बृहदक्ष यांतील

आकृति १०

उ = उच्च, न = नीच, म = कक्षामध्य, र = कक्षाकेंद्र ग = ग्रह, घमन = इ, गरन = फ, सरन = म.

कोनास मध्यममंदकेंद्र म्हणतात. पुढील विवरणांत खालील अक्षरसंज्ञा योजिल्या आहेत. अ = बृहदक्षार्ध, ल = लघ्वक्षार्ध, च = च्युति, उ = उत्पातभोग न = नीचभोग. त = कक्षातिर्यक्त्व, नी = नीचस्थितिकाल, ग = मध्यमदिनगति. भ्र = भ्रमणकाल, इ = च्युतमंदकेंद्र, फ = स्पष्टमंदकेंद्र, म = मध्यममंदकेंद्र, भ = स्पष्टग्रहभोग, क = मंदकर्ण, द = नीच स्थितिकालापासून दिवस. भुज = भुजज्या, कोभु = कोभुजज्या, मील = मीलन किंवा स्पर्शरेषा.

प्रथमतः $\text{ग} = \frac{२\pi}{\text{भ्र}}$ ( १ )

तसेंच, $\text{म} = \text{गद}.$ ( २ )

आतां मंदकर्णानें नीचापासून निघून द दिवसांत आक्रमिलेलें क्षेत्र $\frac{१}{२}\text{अल}\,[\,\text{इ} - \text{चभुजइ}\,]$.

इतकें असतें हें शंकुछिन्न भूमितीवरून सिद्ध होतें. [ आ० १० पहा ] कारण, वक्रतल $\triangle\text{गरन} = \frac{\text{ल}}{\text{अ}}\times\text{वक्रतल}\triangle\text{घरन}$

$$=\frac{\text{ल}}{\text{अ}}\left\{\text{वक्रतल}\triangle\text{घमन}\ \triangle\ \text{घमर}\right\}$$

$$=\frac{\text{ल}}{\text{अ}}\left\{\tfrac{१}{२}\text{अ}^२\text{इ}-\tfrac{१}{२}\,\text{अ}^२\text{च}\ \text{भुजइ}\right\}$$

$$=\tfrac{१}{२}\,\text{अल}\,(\,\text{इ}-\text{च भुज इ}\,)$$

केप्लरच्या दुसऱ्या नियमानें.

$$\frac{\text{द दिवसांत आक्र. क्षेत्र}}{\text{भ्र दिवसांत आक्र. क्षेत्र}}=\frac{\text{द}}{\text{भ्र}}=\frac{\frac{\text{म}}{\text{ग}}}{\frac{२\pi}{\text{ग}}}=\frac{\text{म}}{२\pi}$$

$$\text{म्हणून } \frac{\overset{१}{२}\text{ अल [ इ – उ भुज इ ]}}{\text{जअल}} = \frac{\text{म}}{\text{२ न}}$$

तेव्हां, $\text{इ – च भुज इ = म}$ ( ३ ) या समीकरणास केप्लरचें समीकरण म्हणतात.

तसेंच शंकुच्छिन्न भूमितीवरून

$$\text{फ = ख ( १–च कोभुइ )} \qquad (४)$$

$$\text{फ कोभु फ = ख ( कोभु इ–च )} \qquad (५)$$

$$\text{म्हणून कोभु फ} = \frac{\text{कोभु इ–च}}{\text{१ – च कोभु ई}}$$

$$\text{म्हणून } \frac{\text{१ – कोभु फ}}{\text{१ + कोभु फ}} = \frac{(\text{१ + च})}{(\text{१ – च})} \; \frac{\text{१ – कोभु इ}}{\text{१ + कोभु इ}}$$

$$\text{म्हणून मील } \frac{\text{फ}}{\text{२}} = \sqrt{\left\{ \frac{\text{१ + च}}{\text{१ – च}} \right\}} \text{ मील } \frac{\text{ई}}{\text{२}} \quad (६)$$

( ३ ), ( ४ ), आणि (६) या समीकरणांवरून मध्यम-मंदकेंद्र म दिलें असतां च्युतमंदकेंद्र इ व इ वरून स्पष्टमंद-केंद्र फ आणि मंदकर्ण क हे काढितां येतात.

च्युति च ही सर्व ग्रहकक्षांची बहुधा लहान अपूर्णांकच असते म्हणून वरील सूत्रांवरून फ आणि क च्या किंमती वर्धमान च घातयुक्त अनंतपदमालेच्या रूपानें देतां येतात. च च्या तृतीयघातापर्यंत त्या पदमाला खालीं दिल्या आहेत.

$$\text{फ = गद + २ च भुज गद} + \frac{\text{५ च}^{२}}{\text{४}} \text{ भुज२गद}$$

$$+ \frac{\text{च}^{३}}{\text{१२}} \text{ ( १३ भुज ३ गद – ३भुज गद)+...} \quad (७)$$

$$\text{क = १ – च कोभु गद} + \frac{\text{च}^{२}}{\text{२}} \text{ ( १ – कोभु २ गद )}$$

$$+ \frac{\text{च}^{३}}{\text{८}} \text{ ( ३ कोभु गद – ३कोभु३ गद)+...} \quad (८)$$

फ आणि क कळले म्हणजे ग्रहाचे रविमध्यस्थ भोग ( भ० ) आणि शर ( श० ) कळतात. ते असेः—

आकृति ११

शेजारील आकृतींत ( आ० ११ ) ग = ग्रहाच्या कक्षेंतील स्थान, नी = नीच, उ = उत्पात, स = संपात, गग० = गमधून क्रांतिवृत्तावर काढिलेलें लंबवृत्त होय, यांत

नीग = फ, स उ = उ, स उ + उ नी = न

गउग० = त, स ग० = भ०, गग० = श०

म्हणून उग = फ+न–उ, उ ग० = भ०–उ.

तेव्हां ग उ ग० या गोलीय त्रिकोणापासून

$$\text{मील ( भ०–उ ) = मील ( फ + न – उ ) कोभु त} \quad (९)$$

$$\text{मील श० = मील त भुज ( भ०–उ )} \quad (१०)$$

याप्रमाणें भ० आणि श० कळतात. भू आणि चंद्र यांचे भोगशर काढण्यास वरील समीकरणें पुरीं होतात.

आकृति १२

रविमध्यस्थ ग्रहावरून भूमध्यस्थ ग्रह काढतात तो असाः–

आकृतींत [ आ. १२ ] र = रवि, भू = पृथ्वी, ग = ग्रह, गघ = क्रां.वृ. पातळीवर लंब; रस, भूस = संपातदिशा. म्हणून

सरघ = भ०, गरघ = श०

सभूघ = भ = भमध्यस्थ भोग; गभूग = श = भूमध्यस्थशर आतां जर रवीचा भोग भ असेल तर. भूरघ = भ – भ+१८० ; रभूघ = (ज–भ ). तसेंच रग = क, भूग = ख = भूमध्यस्थ कर्ण ( चलकर्ण ); र,भू = क. तेव्हां रगघ व भूगघ या त्रिकोणांवरून ख भुज श = क भुज श० ( ११ )

व रघभू या त्रिकोणावरून ख कोभु श कोभु( भ–भ )

$$\text{= क कोभु श० कोभु( भ०–भ ) + क} \qquad (१२)$$

$$\text{ख कोभु श भुज(भ–भ) = क कोभु श०×भुज(भ०–भ)} \quad (१३)$$

( ११ ), ( १२ ), ( १३ ) यांवरून भ, श, ख हे कळतात.

भूमध्यस्थ भ नेहमीं वाढत नाहीं. कधीं वाढतो तेव्हां ग्रह मार्गी आहे व कधीं कमी होतो तेव्हां ग्रह वक्री आहे असें म्हणतात.

का ल सा ध न.—समीकरण (७) वरून ग्रहाचा परिवेग (उच्चवर्ग व आधिक मोठे घात उपेक्षून ).

$$\left.\begin{aligned} \text{परिवेग = व} &= \text{ग + २ गउ कोभु गद} \\ &= \text{ग ( १ + २ च कोभु गद )} \end{aligned}\right\} (१४)$$

इतका येतो. अर्थात ग्रहगति क्रांतिवृत्तांत सम परिवेगानें होत नाहीं.

कालसाधनासाठीं क्रांतिवृत्तांत सम परिवेगानें फिरणारा मध्यम रवि व चल परिवेगानें फिरणारा स्पष्ट रवि [ हे आ. नं. १३ मध्यें र व म० या अक्षरांनीं दाखविले आहेत ] यांतून विषुववृत्तावर लंबरूप क्रांतिसूत्रें काढावीं. यांपैकीं र हा याम्योत्तर वृत्तावर आला म्हणजे स्पष्ट मध्यान्ह होतो. संपात स पासून सम = सम० घेऊन जो

म बिंदू होतो त्यास विषुववृत्तस्थ मध्यम रवि म्हणतात. हा म जेव्हां याम्योत्तर वृत्तावर येतो तेव्हां मध्यम माध्यान्ह होतो. र, म०, आणि ख यांची क्रांतिसूत्रें विषुववृत्तास ल, व आणि म या बिंदूंत छेदितात. लम हा स्पष्ट रवि आणि मध्यम रवि यांच्या कालांशांतील फरक होय या फरकाची जी कालात्मक किंमत तिला वेलासंस्कार म्हणतात. हा संस्कार वम आणि वल या कालांशांच्या कालात्मक किंमतींतील फरकावर अवलंबून असतो.



आकृति १३

जर भ हा सूर्याचा भोग (मध्यम) असला तर एका सेकंदांत वेलासंस्कार = ९० भुज ( भ ) +४५२ कोभु ( भ )-५९२ भुज ( २ भ ) ( १५ ). घड्याळ लावण्यास स्पष्ट सूर्य याम्योत्तर वृत्तावर आल्यावरोबर घड्याळांत वेलासंस्कारा-इतकी वेळ दाखवावी. म्हणजे व्यवहारोपयोगी मध्यमकाल-दर्शक घड्याळ झालें.

ल घु ग्र ह, उ प ग्र ह आ णि धू म के तू.—लघुग्रह हे मंगळ व गुरु यांच्या कक्षांमधील अंतरालांत सूर्याभोंवतीं भ्रमण करणारे अनेक लहान ग्रह होत. यांच्या शोधाचा इतिहास थोडा चमत्कारिक आहे. तीन या संख्येपासून दुपटीनें वाढत जाणाऱ्या संख्यांची पंक्ति पहिल्या ठिकाणीं ० घालून मांडावी जसें:—

०, ३, ६, १२, २४, ४८, ९६, १९२

या प्रत्येक संख्येंत ४ मिळविले म्हणजे

४, ७, १०, १६, २८, ५२, १००, १९६,

अशी पंक्ति तयार होते. हे आंकडे, बुध, शुक्र, भू, मंगळ, —, गुरु, शनि,—या ग्रहांच्या कोटिमैलात्मक अंतराचेच स्थूलमानाचे आंकडे येतात ही गोष्ट बोड नामक ज्योतिष्यानें निदर्शनास आणिली. त्यावरून मंगळ व गुरु यांच्या मध्यें सूर्यापासून २८ कोटी मैल अंतरावर एखादा ग्रह असावा व शनीच्या पुढें सूर्यापासून १९६ कोटि मैल अंतरावरहि एखादा ग्रह असावा, व त्याच्याहि पुढें आणखी ग्रह असावे अशी कल्पना उदय पावली. स. १७८१ मध्यें हर्शेलला प्रजापति ग्रह सांपडला व तो जवळ जवळ १९६ कोटि मैलांवर आहेहि. यामुळें वरील कल्पना बळावली. सन १८०१ मध्यें पिआझीला एक ग्रह सांपडला तो २६ कोटि मैल अंतरावर आहे असें सिद्ध झालें. त्याचें नांव सीरीझ ठेविलें व तोच पूर्वी न सांपडलेला ग्रह होय असें प्रथमतः सर्वांस वाटलें. परंतु पुढें तितक्याच अंतरावर दुसरे अनेक ग्रह बहुधा प्रतिवर्षी सांपडूं लागले. त्यांची संख्या आतां ७०० वर गेली आहे. हे सर्व लहान गोल आहेत. एका मोठ्या ग्रहाचे कांहीं कारणानें तुकडे होऊन त्याचा तो भुगा त्या ग्रहाच्या कक्षेंत पसरून सूर्याभोंवतीं फिरत असावा अशी आतां या लघुग्रहासंबंधीं कल्पना बनली आहे.

बुध व शुक्र यांखेरीज सर्व ग्रहांभोंवतीं फिरणारे जे ग्रह आहेत त्यांस उपग्रह म्हणतात. चंद्र हा पृथ्वीचा उपग्रह होय. त्याच्या गतीचें वर्णन मागें आलेंच आहे. मंगळास २, गुरूस ८, शनीस १०, प्रजापतीस ४ व वरुणास १ असे उपग्रह आजपर्यंत माहीत झाले आहेत. हे बहुतेक लहान पण कांहीं चंद्राएवढे व एक थोडा पृथ्वीहून लहान असे आहेत.

धू म के तू.—हे अतिदीर्घवर्तुळकक्षेंत व क्रांतिवृत्ताशीं बऱ्याच तिरप्या असलेल्या पातळींत फिरणारे बहुतेक वायुमय असे दिव्य पदार्थ होत. हे जसजसे सूर्याजवळ येतात तसतसे त्यांस सूर्याच्या उलट दिशेला तेजोमय फवारे अनेक प्रकारच्या आकारांचे फुटूं लागतात.यांस शेंडेनक्षत्र असेंहि म्हणतात; यांपैकीं कांहीं सूर्यमालेंत कायमचे नियमित रीतीनें भ्रमण करणारे आहेत व कांहीं अतिदूर प्रदेशांतून येऊन सूर्यास वळसा घालून पुन्हां अति दूर प्रदेशांत गडप होतात. सूर्यमालेंत कायम झालेले प्रमुख धूमकेतू, हॅले व एन्के यांचे धूमकेतू होत. सूर्याभोंवतीं लघुग्रह व कायमचे धूमकेतू व ग्रहांभोंवतीं उपग्रह केप्लरच्या नियमानुसार भ्रमण करतात.

गु रु त्वा क र्ष ण.—प्रख्यात जगद्वंद्य गणिती न्यूटन यानें असें सिद्ध करून दाखविलें कीं,केप्लरचे नियम हे एका सार्वत्रिक नियमाचे परिणाम होत. तो नियम सार्वत्रिक गुरुत्वाकर्षणाचा नियम होय. तो असा: कोणतेहि दोन द्रव्यकण एकमेकांस एकमेकांकडे आकर्षितात. एकाचें दुसऱ्यावर आकर्षण व दुसऱ्याचें पहिल्यावर आकर्षण हीं दोन्हीं समान असतात व त्या कणांस सांधणाऱ्या रेषेच्या दिशेंत असतात हें अन्योन्याकर्षण दोन्ही कणांच्या द्रव्यांच्या गुणाकाराशीं सम प्रमाणांत असतें व त्यांमधील अंतराच्या वर्गाशीं व्यस्त प्रमाणांत असतें. न्यूटननें असेंहि दाखविलें कीं, दोन गोलांमधील वरील नियमानें होणारें आकर्षण तितक्याच द्रव्याच्या व मध्य बिंदुस्थानीं ठेविलेल्या दोन कणांमधील आकर्षणाइतकें असतें. सर्व ग्रह आकारानें गोल आहेत. तेव्हां ते कण आहेत असें मानण्यास हरकत नाहीं. न्यूटननें गणितानें असें सिद्ध केलें कीं केप्लरचा दुसरा नियम हा प्रत्येक ग्रहावर सूर्याचें आकर्षण आहे व दुसरें कोणतेंहि नाहीं या गोष्टीचा परिणाम होय व पहिला नियम हा तें आकर्षण ग्रहाच्या सूर्यगत अंतराच्या वर्गाशीं

व्यस्तप्रमाणांत असतें या गोष्टीचा परिणाम होय. व तिसरा नियम हा या दोन्ही परिणामांवरून आपोआप प्राप्त होतो. ग्रहांचीं एकमेकांवर जीं आकर्षणें होतात त्यामुळें त्यांच्या कक्षा स्थिरदीर्घवर्तुळाकार रहात नसून त्यांत सूक्ष्म बदल होत जातो. त्यांच्या उच्चनीच रेषा व पातरेषा यांस गति उत्पन्न होते. हे जे सूक्ष्म फरक होतात त्यांस विचलनें म्हणतात. हीं विचलनें गणितानें ठरविणें व तीं प्रत्यक्ष वेधानें निश्चित झालेल्या विचलनाशीं तंतोतंत जुळणें यांतच न्यूटनच्या महान् शोधाची खात्रीलायक प्रतीति मिळते.

ता र का.—आकाशांत असंख्य तारका दिसतात असें आपण म्हणतों. परंतु नुसत्या डोळ्यांनीं आपणास फक्त ६ ते ७ हजारच तारका दिसतात. ऑपेराग्लासमधून सुमारें १ लाख दिसतात. जगांतील मोठ्या दुर्बिणींतून १० कोटी तारका दिसूं शकतात.सर्व तारकांचे अनेक पुंज कल्पिले आहेत व त्यांस नांवें दिलीं आहेत. त्यांची माहिती ' नक्षत्रपद्धति व तारकापुंज ' यावरील लेखांत पहावी. तारकांच्या तेजाप्रमाणें प्रती लावितात. १ ल्या प्रतीची म्हणून जिला प्रमाण मानितां येईल अशी तारका रोहिणीची मुख्य तारका होय. दुसऱ्या प्रतीच्या तारकेच्या २.५१२ पट तेज १ ल्या प्रतीच्या तारकेचें असतें.याच प्रमाणांत तिसऱ्या,चवथ्या वगैरे प्रती लावण्यांत येतात. सहाव्या प्रतीपर्यंत तारका डोळ्यानें दिसूं शकतात. तारकासंबंधानें त्यांची गति, अंतरें, घटना, अवस्था इत्यादिक माहिती ' नक्षत्रें ' व ' विश्वसंस्था ' या लेखांत पहावी. 'वेधशास्त्र' याखालीं वेधासंबंधीं माहिती पहा.

## ग्रहांचीं मूलमानें.

| नांव | १ जाने. १८५० ( मध्यान्ह ) मध्यम सायन भोग. अंश, कला, विकला | बृहदक्षार्ध | च्युति | उत्पातसायनभोग अं. क. वि. | नीचसायनभोग अं. क. वि. | कक्षातिर्यक्त्व अं. क. वि. |
|---|---|---|---|---|---|---|
| बुध | ३२७°१५'२०" | ०.३८७१०० | .२०५६० | ४६°३३' ९" | ७५° ७' १४" | ७° ०' ८" |
| शुक्र | २४५°३३'१५" | ०.७२३३३२ | .००६८४ | ७५ १९ ५२ | १२९ २७ १५ | ३ २३ ३५ |
| भू | १००°४६'४४" | १.०००००० | .०१६७७ | १७२ ३७ ४० | १०० २१ २२ | ० ० ० |
| मंगळ | ८३°४०'३१" | १.५२३६९१ | .०९३२६ | ४८ २३ ५३ | ३३३ १७ ५४ | १ ५१ २ |
| सीरीझ् | १०३°२५' ३" | २.७६७२६५ | .०७६३१ | ८० ४६ ३९ | १४९ ३७ ४९ | १० ३७ १० |
| गुरु | १६०° १'१०" | ५.२०२८०० | .०४८२५ | ९८ ५६ १७ | ११ ५४ ५८ | १ १८ ४१ |
| शनि | १४°५२'२८" | ९.५३८८६१ | .०५६०७ | ११२ २० ५३ | ९० ६ ३८ | २ २९ ४० |
| प्रजापति | २९°१७'५१" | १९.१८३२९० | .०४६३४ | ७३ १३ ५४ | १७० ५० ७ | ० ४६ २० |
| वरुण | ३३४°३३'२९" | ३०.०५५०८० | .००८९६ | १३० ६ २५ | ४५ ५९ ४३ | १ ४७ २ |

## चंद्राचीं मूलमानें

जानेवारी १९००.० ( मध्यान्ह. )

चंद्रमध्यमसायनभोग = २७०° २६' १२"
बृहदक्षार्ध ( भूत्रिज्या = १ ) = ६०.२७०३५
च्युति = .५४९
नाक्षत्रभ्रमणकाल = २७.३२१६६
कक्षातिर्यक्त्व = ५°८'४०"
चंद्रनीचसायनभोग = ३३४° १९' ४६"
चंद्रनीचभ्रमणकाल = ३२३२.५७५ दिवस
चंद्रराहुसायनभोग = २५९° ११' ०"
चंद्रराहुभ्रमणकाल = ६७९३.३९१ दि. ( वक्र )

[ ले.—प्रो. वि. ब. नाईक ].

ज्यो ति ष प दा र्थ वि ज्ञा न ( आस्ट्रोफिजिक्स )—आकाशांतील ग्रहतारे कशाचे बनले आहेत यासंबंधाचें नवें शास्त्र बनलें आहे. नुसत्या डोळ्यांनीं किंवा दुर्बिणीनें ग्रहांची पहाणी करून ही माहिती मिळणें शक्य नसल्यामुळें १९ व्या शतकापर्यंत यासंबंधीं कांहीं कळणें शक्य नव्हतें. पण स्पेक्ट्रोस्कोपी, फोटोग्राफी व फोटोमेट्री या तीन अलीकडील कलांच्या योगानें आस्ट्रोफिजिक्स हें शास्त्र निर्माण झालें आहे. या शास्त्रांत जे मुख्य सिद्धान्त आहेत ते येणेंप्रमाणेः—

( १ ) आकाशस्थ ग्रहतारे हे आपली पृथ्वी ज्या द्रव्यांची बनली आहे त्यांचेच बनलेले आहेत. रसायनशास्त्रांत ज्ञात असलेल्या मूलद्रव्यांचेच ते बनले असून त्यांत लोखंड,कॅल्शियम व हायड्रोजन हीं मूलद्रव्यें ( एलेमेंटस ) मुख्य आहेत. पृथ्वीवरील सर्व मूलद्रव्यें ह्या सूर्यादि ग्रहताऱ्यांत आहेत किंवा नाहींत, याबद्दल अद्याप निश्चित सांगतां येत नाहीं.

( २ ) हे आकाशस्थ गोल घनरूप किंवा द्रवरूप आहेत अशी जी समजूत होती ती खोटी असून ते सर्व वायुरूप स्थितींत आहेत हें सिद्ध झालें आहे. खुद्द सूर्य सुद्धां इतर ग्रहताऱ्यांपेक्षां अधिक अविरल स्थितींत असला तरी तोहि वायुरूपच आहे, घनरूप नाहीं. मंगळ मात्र पृथ्वीप्रमाणें घनरूप असून लहानलहान गोलहि घनरूप असावे असा संभव आहे.

( ३ ) तिसरी सिद्ध झालेली गोष्ट ही कीं, विश्वांतील या मोठाल्या गोलांच्या अंतर्भागांतील उष्णमान फारच मोठें आहे. तें इतकें कीं सांप्रत उपलब्ध असलेल्या पृथ्वीवरील साधनांनीं आपणांस तितकें उष्णमान येथें उत्पन्न करणेंहि शक्य नाहीं.

**ज्योतिष्टोम**—सप्त सोमसंस्थांपैकीं पहिला जो अग्निष्टोम क्रतु त्याचेंच हें नामांतर आहे. अग्निष्टोम क्रतूंत 'भूरग्नि र्ज्योतिः' या ज्योतिरूप मंत्राचें प्रथम शंसन होतें म्हणून यास ज्योतिष्टोम असें नांव पडलें आहे. ज्योतिष्टोम शब्दाचा उल्लेख तैत्तिरीय संहिता व ब्राह्मणग्रंथ यांतून आढळतो. अग्निष्टोमासंबंधीं सविस्तर माहितीसाठीं 'वेदविद्या' पहा.

**ज्योती**—भूगोलावरील स्थळाचा निश्चय अक्षांश व रेखांश यांच्या साहाय्यानें करतां येतो. खस्थ ज्योतींच्या स्थलाचा निश्चय करण्याचीं साधनें अनेक आहेत. त्यांपैकीं कांहीं येथें देतों.

( १ ) खस्थ ज्योतीचे नतांश आणि दिगंश समजले असतां त्याचा स्थळनिश्चय होतो. स्वस्थ ज्योति, खमध्य आणि अधःस्वस्तिक या तीन बिंदूंतून जाणारें जें महावृत्त त्यास दृङ्मंडल असें म्हणतात. ह्या दृङ्मंडलावर खमध्यापासून खस्थज्योतीपर्यंत जें अंशात्मक अंतर असतें त्यास नतांश असें म्हणतात. खस्थज्योतींतून जाणारें दृङ्मंडल आणि पूर्वापार वृत्त यांच्यामध्यें जो कोन असतो त्यास दिगंश असें म्हणतात. हे दिगंश पूर्वबिंदूपासून क्षितिजावर उत्तरेकडे १८० अंशांपर्यंत आणि दक्षिणेकडे १८० अंशांपर्यंत मोजतात. उत्तरेकडील माप घेतलें असल्यास त्या दिगंशास उत्तरदिगंश म्हणतात आणि दक्षिणेकडील माप घेतलें असल्यास दक्षिण दिगंश असें म्हणतात. इंग्रजीमध्यें दिगंशास अझिमथ असें म्हणतात परंतु तो उत्तरबिंदूपासून मापलेला असतो एवढाच काय तो फरक आहे. उदाहरणार्थ एका खस्थ पदार्थाचा उत्तरदिगंश ६० असून नतांश ३० असल्यास तो खस्थ पदार्थ पूर्वेकडून उत्तरेच्या बाजूस ६० अंशावरील दृङ्मंडलावर खमध्यापासून खालीं उत्तरेकडे ३० अंशावर असेल.

( २ ) याच्या उलट खेटाचे म्हणजे स्वस्थज्योतीचे उन्नतांश व दिगंश या दोहोंवरून खस्थज्योतीचा स्थलनिश्चय करतां येतो.

( ३ ) खेटाचा नतकाल आणि ध्रुवांतरें यांवरूनहि स्थळाचा निश्चय करितां येतो. कारण नतकाल समजल्यानें $\frac{३६०\times नतांश}{६० \; घटिका}$ यावरून नतकालांश समजतील आणि नतकालांश समल्यामुळें कालकोन ( अवर अँगल ) समजतो. आणि ध्रुवांतरानें ध्रुवापासून खेटापर्यंत अंशात्मक अंतर खेटांतून जाणाऱ्या याम्योत्तर वृत्तावर मापलेलें समजतें. उदाहरणार्थ ज्या खस्थ पदार्थाचें ध्रुवांतर ६० अंश आहे व नतकाल ५ घटिका आहे. त्याचें स्थान निश्चित करावयाचें असल्यास $\frac{३६०\times५}{६०}=३०$ हे नतकालांश येतात. यावरून खस्थलीय याम्योत्तरवृत्ताशीं ३० अंशांचा कोन करणाऱ्या याम्योत्तर वृत्तावर ध्रुवापासून ६० अंशांवर ती खस्थ ज्योति आहे असें ठरतें.

( ४ ) खेटाची क्रांति आणि खेटाचा नतकाल दिला असतांहि क्रांति व ध्रुवांतर यांची बेरीज ९०° असते. यावरून वरीलप्रमाणें खेटाच्या स्थलाचा निश्चय करतां येतो.

( ५ ) खेटाचें विषुवांश व क्रांति ह्या दोन गोष्टी कळल्या असतां खेटाच्या स्थळाचा निश्चय करितां येईल. मात्र आपणांस संपात कोठें आहे व स्थलाचे अक्षांश रेखांश काय आहेत हें माहीत पाहिजे. कारण विषुवांश संपातापासून मोजतात. उदाहरणार्थ खस्थाचे विषुवांश ५० असून क्रांति ३० अंश उत्तर असल्यास खस्थ पदार्थ संपातापासून ५० अंशावर असणाऱ्या त्रिज्यावृत्तावर उत्तरेकडे ३० अंशावर असेल.

( ६ ) खेटाचे भोग व शर दिले असतांहि खेटाच्या स्थळाचा निश्चय करितां येतो. यावेळीं सुद्धां संपात व स्थळाचे अक्षांशरेखांश माहीत असावे लागतात. वरील उदाहरणांत विषुववृत्ताच्या जागीं क्रांतिवृत्त मानिलें तर खेटाचा भोग ५० अंश व शर ३० अंश असल्यास वरीलप्रमाणेंच खस्थाचें स्थान काढतां येईल.

( ७ ) ग्रहाच्या द्वादशांगुल शंकूसंबंधी भुज, कोटि आणि छाया यावरून खेटाचा निश्चय करतां येतो. अशा वेळीं द्वादशांगुल शंकू एका ठिकाणीं ठेऊन त्याची इष्टकालीं जी छाया पडेल तिचें अग्र आणि द्वादशांगुलशंकूचें अग्र यांस सांधणारी रेषा आकाशांत ज्या ठिकाणीं वाढविली असतां मिळेल त्या ठिकाणीं खेट आहे असें निश्चयानें सांगता येतें.

सारांश, भुजाक्ष, कोटयक्ष, आणि उन्नताक्ष यांसंबंधीं तीन्हीं अंतरें दिलीं असतां कोणत्याहि स्थलाचा निश्चय करितां येतो.

**ज्वर**—शरीराचें नेहमींचें उष्णतामान ९७.५°–९८.४° यांच्या दरम्यान असतें. त्याच्यावर उष्णतामान गेल्यास ज्वर आला असें म्हणतात. तो आला असतांना शरीरांतील बहुतेक क्रिया बिघडतात व शरीरांत एक अगर अनेक विषें फिरत असतात व तींच रोगोत्पत्तीस कारण असतात.

ज्व रा चे श रीरा व र प रि णा म.—शरीरांत ज्वरामुळें खालील प्रकार होतात.

त्वचाः—ही हातास अंमळ किंवा अति कढत लागते. कधीं अगदीं रुक्ष तर कधीं फारच घामानें थबथबलेली असते. अतिघामानें घामोळ्यांचा पुरळ उठतो. देवी, गोंवर कांजिण्या अशा सांथीच्या तापांतील पुरळ अगर फोडांशिवाय इतर फरक त्वचेंत एरवीच्या तापांत होत नाहींत. वरील तापांत त्या त्या विषामुळें त्वचेखालीं लाल डागहि दिसतात.

अन्नमार्गः— जिभेस पांढरी बुरशी येते. ती प्रथम ओली असते पण मागून तिला कोरड पडते. बुरशी कांहीं काळानें सोलली जाते व खालील भाग तांबडा लाल दिसतो. नंतर

जीभ फारच कोरडी होऊन कठिण व पिंगट दुर्गंधियुक्त बुरशीनें भरलेली दिसते. तिला भेगा पडून त्यांत अन्न, लाळ, तसेंच गालफडांतील अन्नाचे व गालांतील श्लेष्मल त्वचेचें कीट बसलेलें असतें. हिरड्यावर दुर्गंधिमय कीट जमतें. भूक नाहींशी होते. बद्धकोष्ट होतो. प्लीहा कधीं कमी तर कधीं फार वाढते.

रुधिराभिसरणक्रियाः—हृदय प्रथम जोरानें चालतें व शेवटीं थकूं लागतें. तसेंच नाडीचा वेग दर मिनिटास ८०–१२० होतो. नाडी पूर्ण भरलेली, जोराची व टणक अशी चालते. पुढें ती हातास मऊ व कंपित अशी लागते. अति मोठ्या ज्वरांत ती अति कंपित अशी हातास लागते. तापाच्या शेवटीं नाडीचा वेग आणखी वाढून ती अशक्त होते, व हातास बारीक सुतासारखी लागते. हृदयाचा प्रथमध्वनि नीटसा अगर मुळींच ऐकूं येत नाहीं. हृदयनाडी स्तनाच्या बाहेर दिसू लागते. हें भीतिप्रद लक्षण हृदयाची दुर्बलता दर्शवितें.

श्वसनक्रियाः—ज्यामानानें ज्वर असेल त्यामानानें श्वासाचें प्रमाण वाढतें, व दर मिनिटास केवळ ज्वरामुळें तें ३०–४० पर्यंत वाढतें. ताप दीर्घकालीन असल्यास फुप्फुसाच्या अधोभागीं रक्ताधिक्य होऊन छातीच्या वरील भागांत श्वसनक्रिया जलद चालते.

मूत्रपिंडः—त्वचा आणि फुप्फुस या मार्गानें बरेंच बाष्पीभवन झाल्यामुळें व धमन्यांतील रक्ताभिसरण कमी झाल्यामुळें लघवी कमी होते, व ती लाल रंगाची व थंड झाल्यावर यूरेटक्षाराचे विटकरीरंगाचें कीट असलेली अशी असते लघवींतील क्लोराईड क्षार कमी होतात. तींत अल्ब्यूमिन असतें.

मज्जातंतू व मेंदुः-बहुधां मस्तकशूळ असतो कांहींहि मानसिक श्रम करणें अथवा कसलाहि विचार करणें रोग्याच्यानें होत नाहीं. डोक्यांत जडपणा व सुस्ती येते. पुढें गुंगी येते व विचार करणें केवळ अशक्य होतें. झोंप लागली कीं वरळण्यास प्रारंभ होतो. नंतर जागा असतांनाहि वातामुळें रोगी बडबडतो. वातामुळें रोगी आपल्याशींच पुटपुटतो. पण एखादा रोगी फार मस्ती करून वेड्याप्रमाणें धावून खिडकीवाटें उडीहि मारतो. शेवटच्या स्थितींत झांपड अतिशय येते. त्यावेळीं रोगी आरंभीं चिरगुटें चिवडतो किंवा हवेंत कोणा काल्पनिक व्यक्तीस हातांनीं धरतो. शरीरांतील सर्व स्नायूंत परमावधीची ग्लानि असल्यामुळें जीभ व हातपायांस कंप सुटतो. गुदद्वार शिथिल होऊन त्यावाटें नकळत मलविसर्जन होतें. इंद्रियांतील स्पर्शज्ञान नष्ट झाल्यामुळें लघवी कोंडते व मूत्राशय फुगतो.

रोजचा चढ उतारः—बहुधां पहाटे २ वाजतां ताप कमी असतो. व संध्याकाळीं ४–६ पर्यंत जास्ती असतो. पण याच्या उलट किंवा दरम्यानचा प्रकारहि असूं शकतो.

ज्वराचे प्रकारः—ज्वराचे मुख्य भेद तीन आहेत (१) सततज्वरः-यांत नेहमींच्या स्वाभाविक उष्णतेपेक्षां ताप अधिक असतो; ज्वर नियत नाहीं पण सकाळच्या व संध्याकाळच्या उष्णतामानांतला फरक १° किंवा १.५° पेक्षां अधिक नसतो. (२) या प्रकारांतहि ताप स्वाभाविक उष्णतामानापर्यंत उतरत नाहींच. परंतु सकाळच्या आणि संध्याकाळच्या तापामध्यें १° अगर १.५° डिग्रीपेक्षां अधिक फरक असतो. (३) या प्रकारच्या तापांत सकाळीं ताप स्वाभाविक उष्णतामानापर्यंत अगर त्याच्या खालींहि उतरतो, पण संध्याकाळीं चढतो. विषमज्वर, कफक्षय इत्यादि कांहीं दुखण्यांत वरील सर्व प्रकारचे ताप रोगाच्या निरनिराळ्या स्थितींत पाहण्यांत येतात.

ज्वराचा क्रम.—ज्वर आला असतां तो निघेपर्यंत त्यास आरंभ, मध्यावस्था व शेवट ह्या तीन स्थिती असतात. आरंभीं कमी अगर जास्ती थंडी वाजते. दुसऱ्या स्थितीमध्यें रोग्याचें सर्वांग फार तापतें व तिसऱ्या अवस्थेंत ताप जलदीनें (१२–३६ तासांत ) अगर सावकाश उतरत जातो तो ९६°–९७° पर्यंतहि उतरतो.

ज्वरांत मृत्यु.—(१) मृत्यु तापानंतर थोड्या दिवसांनीं तापाच्या कडक विषामुळें ( प्लेग, इन्फ्लुएंझा इ. )येतो. हें विष शरीरांतील मज्जास्थानें दूषित करतें व त्यामुळें सर्व शरीराचे व्यापार थांबतात; (२) अगर ताप बरेच दिवस टिकून नंतर मृत्यु येतो. (३) मृत्यु येण्याचें ज्वरातिशय हेंहि कारण तापामध्यें असतें. (४)दुसरीं कारणें-हृदयक्रिया मंद होऊन तें थांबणें अथवा फुप्फुसें बिघडून त्यांची क्रिया चालेनाशी होणें.

सांथीच्या तापाचीं कारणें.—त्या त्या रोगांचे जंतू शरीरांत प्रवेश करून त्यापासून उत्पन्न होणारीं विषें रक्तांत व शरीरांत भिनून ज्वर उत्पन्न करितात. यांपैकीं कांहीं ताप अगदीं थोड्या मुदतीचे तर कांहीं लांब मुदतीचे असतात.

चिकित्सा.—तापाचें कारण असेल त्याप्रमाणें उपचार करावयाचे असतात. पण साधारणतः पुढें लिहिल्याप्रमाणें व्यवस्था ठेवावी. रोग्यास अंथरुणांत निजवून त्यास पूर्णपणें विश्रांति मिळेल असें करावें त्या ठिकाणीं हवा कोंदट नसावी. खोलींतील आरसे, चित्रें व इतर अडगळ काढून टाकावी. रोग्यास वात झाला असतां या जिनसा एखादे वेळीं घोंटाळा उत्पन्न करतात. त्यावर अनुभवशीर परिचारिकांकडून दिवसा रात्रीं सक्त नजर असावी.रोग्यास अति निर्मळ ठेविलें पाहिजे. ताप फार असेल तर अंगांत फार कपडे घालू नयेत. त्यास आरामशीर, थंड वाटेल अशी योजना राखावी. अशानें त्याचा ताप थोडा कमी होतो. रोग्याचे हातपाय झांकलेले असावे व जरूर तर शेकून त्यांस ऊब आणावी.

खाण्यास हलके, पचणारे व पौष्टिक पदार्थ—त्यांत दूध अति उत्तम-द्यावें. मोठ्या माणसांस २ पासून ३ शेर अगर अधिक दूध लागल्यास तें दिवसां-रात्रीं देत असावें. मांसकषाय हेंहि पदार्थ मधून मधून दिल्यास चालतात. दूध पचत नसलें तर त्यांत सोडावाटर किंवा बारलीचा कषाय घालून द्यावें. खाणें थोडें व थोडथोड्या अवकाशांनीं द्यावें; म्हणजे

चहाचा अर्धा पेला दूध दर दोन तासांनीं व तें दिवसा रात्रीं द्यावें. तहानेसाठीं सोडावाटर, बारलीकपाय, लेमोनेड, किंवा अगदीं थोडी चहाची पूड टाकून केलेला चहा द्यावा व तो थंड द्यावा. हे पदार्थ लागतील तर वरचेवर पिण्यास कांहीं हरकत नाहीं. डोकें दुखत असेल तर डोक्यावर बर्फाची पिशवी ठेवणें चांगलें.

तोंडामध्यें बुरशी, कीट वगैरे सांचल्यानें मागाहून कर्णग्रंथिदाह (गालगुंड) होण्याचा संभव असतो. म्हणून प्रत्येक खाण्यानंतर तोंड चुळा भरून टाकून स्वच्छ करावें. ताप अति वाढला असतां पोटांतील इंद्रियांचें स्पर्शज्ञान कमी होतें. तेव्हां लघवी कोंडली आहे कीं काय याजकडे चांगलें लक्ष असावें. चाकर मंडळी नुसती लघवी होत आहे असें सांगतात येवढ्यावरून लघवी तुंबली नसेल असें म्हणतां येत नाहीं. ती कोंडल्याचें लक्षण ओटीपोटावर फुगवटी व बोटाच्या अग्रांनीं ठोकलें असतां बद्द आवाज हीं लक्षणें दिसतांच मूत्रशलाका चालवून मूत्र काढलें पाहिजे. रोग्यास स्वतः लघवी करण्याची शक्ति येईपर्यंत रोज दोनदां लघवी काढीत जावी.

औषधयोजनाः—ताप कमी करणारीं विलायती अगर देशी औषधें देत असतांना ताप आपोआप निघण्याकडे त्याची आपोआप स्वाभाविक प्रवृत्ति असते हें सतत ध्यानांत ठेवून औषध द्यावें. औषधानें कित्येक डिग्री ताप कमी केला तरी त्याची विषबाधा जोंवर संपली नाहीं तोंपर्यंत तो पुन्हां वाढणारच. जर ताप फार चढला तर वस्तुतः जिवास धोका फार थोड्या रोग्यास असतो. म्हणून कृत्रिमतेनें कडक औषध देऊन ताप काढल्यानें वास्तविक त्याची तीव्रता व चढउताराचा क्रम अजमावण्याचें साधन उरत नाहीं. आतां हीं औषधें अगदीं देऊं नये असें नाहीं. तीं दिल्यानें रोग्याचे हाल कमी होऊन त्यास ताप सह्य होतो व पोट, छाती, मस्तक यांतील महत्त्वाच्या इंद्रियांत दोष व दुष्परिणाम होण्याचा संभव कमी असतो, हे त्यापासून फायदे असतात. यांपैकीं कांहीं औषधें सौम्य असतात व तींच बहुतकरून योजावीं; व तीं डाक्टर यांनींच होतां होईल तोंपर्यंत योजावींत. पुढील औषधें त्वरित ज्वरघ्न असून तीं पूर्ण माहितगारांवांचून कोणी देऊं नयेत. क्किनाईन २०–३० ग्रे. स्यालिसीन, स्यालिसिलिक ॲसिड (३० ग्रेन व २० ग्रेन), फेनाझोन १५ ग्रेन, ॲंटिफेब्रिन २–५ ग्रेन, फेनासिटीन ५–१० ग्रेन यांपैकीं कांहीं औषधें तारतम्याशिवाय दिली तर हृदय अशक्त होऊन हातपाय गार पडून रोग्यास घाम सुटून रोगी निश्चेष्ट पडतो. थंड पाण्याच्या योगानें ज्वर कमी करण्याचा उपाय चांगला आहे व त्यापासून धोकाहि नसतो. पण तो अमलांत आणतांना रोग्यास बराच त्रास होतो, हा उपयोग पुढील तऱ्हेनें करण्यांत येतो.

( १ ) जलस्नानः— याचा विषमज्वरांत उपयोग करतात. ताप दर तीन तासांनीं पहात असून तो १०२ च्या वर गेला म्हणजे रोग्यास ७० डिग्री उष्णतामान असलेल्या पाण्यांत ( म्हणजे थंड पाण्यांत ) ठेवावयाचें. पाण्याची उष्णता थर्मामिटरनें पहावी. रोग्यास पाण्यांत १०–१५ मिनिटें ठेवून कोरडें अंग करून बिछान्यावर निजवावयाचें, म्हणजे ताप ९९° अगर ९८° पर्यंत उतरतो. यांत कांहीं फेरफार करणें फायदेशीर आहेत ते असेः—१०३–५° ताप असेल तरच त्यास पाण्यांत ठेवावें व पाण्याची उष्णता ६०°–९०° ठेवण्यास हरकत नाहीं. म्हणजे रोग्यास हलण्याचा त्रास फार पडत नाहीं.

( २ ) ओलें फडकें गुंडाळणेंः–वरीलप्रमाणें ताप चढला असतां एक पलंगपोस पाण्यांत भिजवून ( त्या पाण्यांत बर्फ टाकलेलें असावें ) तें पिळल्यावर रोग्याभोंवतीं १०–१५ मिनिटेंपर्यंत गुंडाळून ठेवावें.

( ३ ) ओला बोळा अंगास चोळणेंः—कपडे फाडून थंडा बर्फ घालून थंड केलेल्या पाण्यांत फडकें भिजवून त्या बोळ्यानें सर्वांग १०–१५ मिनिटपर्यंत चोळावें. हा उपाय वरील दोहोंपेक्षां अंमल कमी गुणावह आहे व १°–१.५° ताप त्यापासून उतरतो.

( ४ ) रबरी पिशवींत बर्फ घालून ती पिशवी मस्तक अगर पोट किंवा छातीच्या ठिकाणीं ठेवतात व कांहीं वेळानें ताप कमी होतो. उत्तेजक औषधेंः—तापामध्यें अशी केव्हां तरी वेळ येते कीं तेव्हां मज्जास्थानें व हृदयक्रिया क्षीण होऊन थकतात व कृत्रिम उत्तेजन देणें जरूर पडतें. ताप दोषी असल्यामुळें त्या विषापासून हीं इंद्रियें क्षीण होतात. निव्वळ साध्या तापापासून असा धोका उत्पन्न होत नाहीं. धोका उत्पन्न झाल्याचीं चिन्हेंः—जलद अशक्त चालणारी नाडी, हृदयाचा पहिला ध्वनी बरोबर ऐकूं न येणें, हृदयाची अनियमित क्रिया व फुप्फुसाच्या मागें रक्ताधिक्य होणें, जिभेस व अंगास कंप सुटणें, झोंप न लागणें व वात होणें. साधा उत्तेजक उपाय म्हणजे ६ ते ८ औंस ब्रांडी अहोरात्र मिळून देणें. ब्रांडीचें प्रमाण फार देऊं नये. ती देऊं लागल्यापासून नाडींत सुधारणा होते किंवा नाहीं हें नीट पहावें. कारण विनाकारण ती अधिक दिल्यास पुन्हां नाडी अशक्त व जलद चालते व पुन्हां आपल्याशीं रोगी वातामुळें बडबडूं लागतो व मूळ या लक्षणासाठीं ब्रांडी देण्यास सुरवात केलेली असते तेंच पुन्हां उलटतें. अलीकडे ब्रांडीचा उत्तेजनासाठीं उपयोग कमी करीत जावा असें मत प्रचारांत येऊन स्ट्रिक्निया ( २ ते ५ मिनिम लायकर स्ट्रिक्नियाचे ) टोंचणें हा उपाय अधिक पसंत ठरला आहे. किंवा क्याफीन सोडीयो सालीसिलेट अगर क्याफीन व सोडियमबेन्झोवेट (टोंचून घालणें) अगर तिळाच्या तेलांत कापूर विरघळून शेंकडा १०–२० ग्रेन प्रमाणात तें टोंचणें; एड्रीनालीन किंवा डिजिटालिस ( पोटांत देणें अगर टोंचणें ) हीं औषधें अधिकाधिक प्रचारांत येऊं लागलीं आहेत; व ब्रांडी देण्याचा प्रघात कमी होत चालला आहे. दिलीच तर अहोरात्र मिळून प्रथम मोठ्या माणसास ४ औंसच द्यावी व जरूर तर वर

दिलेल्या मोठ्या प्रमाणापर्यंत वाढवीत जावी. अतिवृद्ध माणसें, अशक्त रोगी व अति लहान मुलें यांना मात्र ब्रांडीचें उत्तेजन ज्वरांत व इतर अवघड दुखण्यांत लागतेंच व त्यांना तीं देण्यास कचरूं नये. वरील अन्य उत्तेजक औषधाचें प्रमाण पुन्हां टोंचण्याच्या वेळीं अगर पोटांत देण्याच्या वेळीं त्याचा नाडी व हृदय यावर झालेला परिणाम पाहून नवीन प्रमाण कमी अगर जास्ती करावें. ज्या रोग्यांना वेड लागल्यासारखा वात झाला असेल त्यांना ब्रांडीचें उत्तेजन देण्याच्या ऐवजीं वरीलपैकीं एखादें औषध टोंचून उत्तेजन देणें श्रेयस्कर असतें.

आ यु र्वे दी य वि वे च न.

हा रोग वेदकालापासूनचा आहे. ज्याला अथर्ववेदांत तक्मन् म्हटलें आहे व ज्याकरितां पांच सूक्तें खर्चिलीं आहेत तीं ज्वररोगच असावा. त्याचें लक्षण तिसऱ्या विभागांत दिलें आहे ( बुद्धपूर्वजग पृ. २८४–८५ पहा ). ताप हा रोग फार सामान्य आहे. हा सर्व प्राण्यांस होणारा रोग आहे. हस्त्यायुर्वेदांत हत्तींना व शालिहोत्रांत घोड्यांनाहि हा रोग कसा होतो याचीं लक्षणें व उपचार हीं वर्णन केलीं आहेत. मनुष्यांस हा रोग नेहमीं होणारा आहे. सुदैवानें जन्मल्यानंतर एखाद्या मनुष्यास कोणत्याहि कारणानें येणारा ताप जरी आला नाहीं तरी त्यास उपजण्याच्या श्रमानें येणारा ताप अनुभवावाच लागतो. म्हणूनच सर्व रोगांत " ताप " हाच प्रधान रोग मानला आहे. कोणत्याहि कुपथ्यसेवनानें थंड अगर उष्ण हवेंत फिरल्यानें, संथ उत्पन्न झाल्यानें, ऋतु बदलल्यानें, तसेंच क्षय, पंडु, इत्यादि रोगांमुळें ताप येतो.

याचें शरीरांतील कारण ( संप्राप्ति ) असें आहे कीं, सर्व प्रकारच्या बाह्य कारणांनीं वात, पित्त किंवा कफ यांपैकीं एक, दोन किंवा तीनहि दोष दुष्ट होऊन आमाशयांत येतात आणि तेथील आमाशीं मिसळून अग्नि मंद करितात, नंतर अग्नीची अग्निस्थानांतील उष्णता व ते दोष सर्व शरीरांत आमाला घेऊन पसरतात; त्यावेळीं शरीराचें उष्णतामान वाढतें व अंग दुखतें. शरीरांत पसरलेल्या आमयुक्त दोषांनीं घाम येण्याचीं छिद्रें बंद होतात. यामुळें घामहि येत नाहीं म्हणून तापाचीं मुख्य तीन लक्षणें आहेत. शरीराचें उष्णतामान वाढणें, अंग दुखणें आणि घाम न येणें. तापाचीं वरील तीन लक्षणें हीं जरी मुख्य आहेत तथापि कांहीं प्रकारच्या तापांत घर्माभाव हें मुख्य लक्षण मानीत नाहींत. कारण त्यांत पहिल्यापासूनच घाम असतो. तापाचीं पूर्व चिन्हें खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत. थकल्यासारखें वाटणें, अस्वस्थचित्तता, वर्ण बदलणें, तोंड बेचव असणें, डोळे पाण्यानें भरून येणें, जांभया येणें, अंग दुखणें, जडपणा वाटणें, रोमांच उभे रहाणें, अरुचि, अंधेऱ्या येणें, हर्ष नसणें, थंडी वाजणें, थंड, वारा, ऊन, पाणी, छाया, शब्द या ठिकाणीं कारणाशिवाय प्रीति किंवा द्वेष होणें, पुष्कळ झोंप येणें, गोड खाण्याचा वीट व आंबट, खारट, तिखट यांची आवड होणें, लहान मुलांची आवड नसणें, तहान जास्त वाटणें. या पूर्वचिन्हांपैकीं कोणतीं तरी चिन्हें ताप येण्याच्या अगोदर होतात.

आर्यवैद्यकांत ताप आठ प्रकारचा सांगितला आहे. वात, पित्त, कफ, वातपित्तात्मक, कफपित्तात्मक, कफवातात्मक, संनिपातजन्य आणि आगंतुक. वर लिहिल्याप्रमाणें आठ प्रकारच्या तापांचीं पूर्वरूपेंहि दोषभेदानें कमीजास्त असतात. वातिक तापाच्या पूर्वरूपांत जांभया फार असतात. पित्तज्वराच्या पूर्वरूपांत डोळ्यांची आग जास्त होते व कफानें येणाऱ्या तापाच्या पूर्वरूपांत अन्नद्वेष जास्त असतो. दोन दोषांनीं अथवा त्रिदोषांनीं येणाऱ्या तापांत वर लिहिलेलीं मिश्रपूर्व लक्षणें असतात. याप्रमाणें पूर्व चिन्हांवरून पुढें होणारा रोग कोणता आहे व त्याचा जोर कितपत आहे हें समजतें. पूर्वचिन्हांच्या कमीजास्तप्रमाणावरून व सौम्य, उग्र स्वरूपावरून रोगाचा जोर समजतो. वर सांगितल्या प्रमाणें आठ प्रकारच्या तापांपैकीं वातानें येणाऱ्या तापाचीं लक्षणें खालीं लिहिल्याप्रमाणें—कंप असणें, घसा, व ओठ सुकणें, झोंप नसणें, शिंका न येणें, अंग रूक्ष होणें, अंग दुखणें, विशेषेंकरून डोकें व हृदय हीं दुखणें, तोंड बेचव असणें, मळ घट्ट होणें, पोट फुगणें व पोट दुखणें, इ. तापाचा जोर, ताप येण्याची व जाण्याची वेळ आणि तापांत असणाऱ्या वेदना या सर्वांचा वातिक ज्वरांत अनियमितपणा असतो. तसेंच शरीराचें उष्णतामानहि अनियमितपणानें कमीजास्त होतें. पाय बधिर होतात. पोटऱ्या वळतात, सांधे निखळल्यासारखे वाटतात, मांड्या गळल्यासारखें वाटतें, पाठ ठेंचल्यासारखी, पोट पिळवटल्यासारखें वाटतें, सर्व हाडें–विशेषेंकरून बरगड्या–तोडल्यासारख्या वाटतात, खांदे घुसळल्यासारखे वाटतात, खातांना हनवटी अशक्त होणें, कानांत आवाज होणें, शंख ठणकणें, तोंड तुरट होणें, शौचाला न होणें, त्वचा, तोंड, डोळे, नखें, लघवी, व मळ, हीं अरुणवर्ण असणें, तोंडाला पाणी सुटणें, अरोचक, अपचन, घाम न येणें, कोरड्या ओकाऱ्या व कोरडा खोकला, खिन्नपणा, दांत शिवशिवणें, भोंवळ, वडवडणें, उष्णपदार्थांची इच्छा होणें, अंगाला आळोखे, पिळोखे यावेसें वाटणें, हीं सर्व किंवा यांपैकीं कांहीं चिन्हें वातजन्य तापांत होतात.

ताप जोरानें भरणें, सर्व अंगांत एकदम ताप येणें, शौचास पातळ होणें, झोंप कमी असणें, पित्ताच्या ओकाऱ्या, घसा, ओंठ, तोंड व नाक पिकणें, घाम येणें, वडवडणें, तोंड कडू असणें, बेशुद्धि, दाह, उन्मत्तता, अतिशय तहान, भोंवळ, चित्ताची अस्वस्थता. थुंकींतून रक्त येणें, घशाशीं आंबट येणें, अंगावर लाल गांधी येणें, श्वासोच्छ्वास दुर्गंधी असणें, हीं पित्तानें आलेल्या तापाचीं लक्षणें आहेत. कफानें आलेल्या तापाचीं पुढीलप्रमाणें लक्षणें असतात.

ताप सावकाश भरतो, व उष्णतेचें मानहि कमी असतें, अंग जड वाटतें, अरुचि येते, तोंडाला पाणी सुटतें, तोंड गोड होतें, हृदयावर लेप बसल्यासारखें वाटतें, दमा, पडसें, उम्हासे सुटतात, ओकारी, खोकला, अंगास जडपणा, डोळे, त्वचा, नखें, लघवी व मळ यांस पांढरेपणा, डोळ्यांवर झांपड, अंगावर पुरळ उठतो, आळस, कांहीं खाऊं नयेसें वाटणें, झोंप जास्त असणें. या लक्षणांवरून कफज्वर समजावा.

वात आणि पित्त या दोन दोषांनीं आलेल्या ज्वरांत वरील निरनिराळ्या दोषांचींच लक्षणें मिसळून होतात व कांहीं दोन दोन दोषांच्या मिश्र लक्षणांहून निराळीं लक्षणें होतात. म्हणून त्या द्विदोषजन्य तापाचींहि लक्षणें सांगितलीं आहेत तीं खालीं लिहिल्याप्रमाणें– वातपित्तात्मक तापांत डोकें दुखणें, अरुचि, बेशुद्धि, ओकारी, दाह, विचाराशक्ति, घसा व तोंड सुकणें, अस्वस्थचित्तता, सांधे दुखणें, झोंप नसणें, तहान, भोंवळ, रोमांच उभे रहाणें, जांभया, वडवडणें हीं लक्षणें होतात. कफवातात्मक तापांत उष्णतामान फार वाढत नाहीं, अरुचि, सांधे व डोकें दुखणें, पडसें, दमा, खोकला, मळ साफ न होणें, थंडी वाजणें, जडपणा, अंधेऱ्या येणें (डोळ्यांपुढें), भोंवळ, डोळ्यांवर झांपड, संताप हीं लक्षणें होतात. कफपित्तानें आलेल्या तापांत थंडी वाजणें व उकडणें (दाह) हीं वरचेवर होतात, घाम वरचेवर येतो व बंद होतो, तहान लागते, खोकला, कफ व पित्त यांची ओकारी, विचाराची अशक्ति, डोळ्यांवर झांपड, तोंड कडू व लपेटलेलें, याप्रमाणें लक्षणें होतात. वर लिहिलेल्या द्विदोषजन्य ज्वरांपैकीं वातपित्तात्मक ज्वरांत अरुचि व रोमांच उभे रहाणें, वातकफजन्य ज्वरांत संताप, कफपित्तजन्य तापांत थंडी वाजणें व दाह यांचा अव्यवस्थितपणा, हीं लक्षणें द्विदोषजन्यच आहेत (निरनिराळ्या दोषांच्या मिश्रलक्षणांहून हीं भिन्न आहेत). त्रिदोषजन्य म्हणजे सान्निपातिक ज्वरांत वर लिहिलेल्या प्रत्येक दोषजन्य तापाचीं लक्षणें होतात. विशेषकरून खालीं लिहिलेलीं लक्षणें दृष्टीस पडतात.

रोग्यास वरच्यावर थंडी व दाह वाटतात, दिवसा पुष्कळ झोंप व रात्रीं जागरण होतें किंवा सर्वकाळ झोंप अथवा सर्व काळ जागरण होतें व घाम अतिशय येतो किंवा मुळींच येत नाहीं. रोगी गाणें, नाचणें, हसणें इत्यादि निरनिराळे चाळे करतो; डोळे लाल असून त्यांतून पुष्कळ पाणी गळतें, किंवा पाण्यानें भरून येतात. डोळ्यांच्या पापण्या मिटलेल्या रहातात, बुबुळें वांकडीं होतात. पोटऱ्या, बरगड्या, व सांधे आणि हाडें हीं दुखतात. भोंवळ येते, कान ठणकतात व त्यांत आवाज होतात. घशाला कुसें टोंचल्यासारखें वाटतें, जीभ भोंवतालीं जळल्यासारखी व खरखरीत आणि जड असते, अंग व सांधे गळल्यासारखे वाटतात; रक्त, पित्त, किंवा कफ यांच्या गुळण्या येतात. रोगी डोकें हालवतो, डोकें अतिशय दुखतें; काळ्या किंवा लाल गांधी अंगावर उठतात; हृदयांत पीडा होते; मळाचा अवरोध होतो, किंवा अगदीं थोडा मळ होतो; शक्ति कमी होते, तोंड बुळबुळीत होतें, आवाज बसतो, वडवड असते, झांपड, घशांत खरखर आवाज, दोषांचा पाक मंदगतीनें होणें, हीं लक्षणें संन्निपातानें येणाऱ्या तापाचीं होत. यासच "अभिन्यासज्वर" म्हणतात. एक किंवा दोन दोषांच्या आधिक्यानें संन्निपातज्वराचे तेरा प्रकार चरकांत वर्णिले आहेत त्यांचीं लक्षणें वर लिहिलेल्या लक्षणांपैकींच असल्यामुळें येथें देत नाहीं.

आगंतुक ज्वर चार प्रकारचा आहे. (१) शस्त्र, दगड, लांकूड इत्यादि पदार्थांच्या आघातानें किंवा जखमेमुळें, भाजणें इत्यादि कारणांनीं येणारा त्यास "अभिघातज" म्हणतात. (२) दुष्टग्रहांचा आपल्या शरीराशीं संबंध आल्यामुळें, तीक्ष्ण औषधांच्या वासानें, विषानें, क्रोध, भय, काम, व शोक इत्यादि मानसिक कारणांनीं जो ताप येतो त्यास "अभिषंग" ज्वर म्हणतात. यांपैकीं दुष्टग्रहानें आलेल्या तापांत रोगी एकदम हंसतो, अथवा रडतो. तीक्ष्ण औषधांच्या वासानें आलेल्या तापांत बेशुद्धि, डोकें दुखणें, कंप व शिंका येणें हीं लक्षणें असतात. विषानें आलेल्या तापांत बेशुद्धि, अतिसार तोंड काळसर होणें, दाह, व हृदयांत पीडा हीं लक्षणें असतात. क्रोधजन्य ज्वरांत कंप, डोकें दुखणें हीं लक्षणें, भय व शोकजन्य ज्वरांत वडवडणें हीं लक्षणें होतात. कामज्वरांत भोंवळ, अरुचि, दाह होतो व लज्जा, धैर्य, बुद्धि व झोंप हीं नाहींशीं होतात.

यांपैकीं ग्रह, औषधीगंध, व विष यांनीं येणाऱ्या तापांत सन्निपाताचा कोप असतो. भय, शोक व काम, यांनीं येणाऱ्या तापांत वायूचा कोप आणि क्रोधजन्य तापांत पित्ताचा कोप असतो. (३ व ४) शापानें व अभिचारानें आलेले ताप फारच असह्य व घोर असतात; त्यांपैकीं अभिचारानें आलेल्या तापांत पूर्वी चित्त व नंतर देह संतप्त होतात. नंतर अंगावर मोठे फोड येतात. तहान, भोंवळ, दाह, बेशुद्धि, हीं लक्षणें होऊन दररोज ताप वाढतो. आगंतुक ज्वरांत कोणत्या तरी बाह्य कारणांनीं ताप येऊन नंतर दोष दुष्ट होतात व ते दोष दुष्ट झाले म्हणजे वर सांगितलेलीं दोषलक्षणेंहि दृष्टीस पडतात.

यापूर्वी लिहिलेल्या आठ प्रकारच्या ज्वरांचेच खालीं लिहिल्याप्रमाणें प्रत्येकाचे दोन दोन प्रकार आहेत ते असे. शारीर व मानस, सौम्य व तीक्ष्ण, अंतर्गत व बहिर्गत, प्राकृत व वैकृत, साध्य व असाध्य आणि साम व निराम. याप्रमाणें प्रत्येक ज्वर १२ प्रकारचा आहे. पैकीं शरीराला प्रथम ताप होऊन नंतर मनाला पीडा होते त्यास शारीर ज्वर म्हणतात. याच्या उलट प्रथम मन व नंतर शरीर तप्त होतें त्यास मानसिक ज्वर म्हणावें. सौम्य किंवा तीक्ष्ण ज्वर हे वायूच्या योगवाहित्व (जवळच्या बरोबर जाणें) धर्मानें होतात. वायु कफयुक्त असेल तर सौम्य व पित्तयुक्त असेल तर तीक्ष्ण ज्वर असतो. अंतर्गत ज्वरांत पूर्वी सांगितलेलीं तापाचीं पुष्कळ लक्षणें असून अंतःक्षोभ आणि

मलावरोध हीं लक्षणें असतात. बहिर्वेग ( बहिर्गत ) तापांत लक्षणें कमी असून अंतःक्षोभ नसतो व तो ताप सुसाध्य असतो.

ज्या ऋतूंत जो दोष कालस्वभावानें वाढतो त्या ऋतूंत त्या दोषानें येणाऱ्या तापास प्राकृत व ज्या ऋतूंत जो दोष वाढत नाहीं त्या दोषानें आलेल्या तापास वैकृत असें म्हणतात. वर्षाऋतूमध्यें वातानें, शरदृतूमध्यें पित्तानें, आणि वसंतऋतूमध्यें कफानें येणाऱ्या तापास प्राकृत असें म्हणतात. वातानें आलेल्या प्राकृत ज्वराखेरीज प्राकृत ज्वर सुसाध्य आहेत; वैकृत ज्वर दुःसाध्य आहेत. रोगी बलवान् असून ज्वराचीं लक्षणें थोडीं असतील आणि ज्वराचे उपद्रव ( पुढें सांगणार आहों ) नसतील तर तो साध्य ( बरा ) होतो; याच्या उलट असाध्य समजावा. ज्वराच्या लक्षणांची वाढ, ग्लानी नसणें, लघवी पुष्कळ होणें, शौचाला न होणें, झालेंच तर अपक्क होणें, भूक न लागणें हीं सामज्वराचीं लक्षणें होत. साम आणि निराम यांच्यामध्यें " पच्यमान " म्हणून एक अवस्था मानिली आहे. तींत ज्वराचा वेग (उष्णतामान) जास्त असतो. तहान जास्त असते, वडवड, दमा, भोंवळ, तोंडाला पाणी सुटणें, आणि शौचाला जास्त होणें हीं लक्षणें होतात. ताप येऊन सात दिवस झाल्यानंतर किंवा सामज्वराचीं लक्षणें नाहींशीं झाल्यावर निराम अवस्था येते. सन्निपाताचे ( दोष आणि काल यांच्या कमीज्यास्तीपणानें ) संतत, सतत, अन्येद्यु, तृतीयक, आणि चतुर्थक ( चवथरा ) असे पांच प्रकारचे ताप मानिले आहेत.

सप्त धातू, मूत्र मल इत्यादि यांस वहाणाऱ्या स्रोतसां (शिरा)चा आश्रय करून ज्यावेळीं तीन्ही दोष कुपित होतात व विशेषेंकरून रसधातूचा आश्रय करून रहातात त्यावेळीं संतत या नांवाचा ज्वर येतो. हा ताप सारखा अंगांत असतो व तो फारच दुःसह असतो. या ज्वरांतील उष्णतेनें धातूंचा किंवा दोषांचा पाक होतो. दोष पक्व झाले तर रोगी जगतो व धातु पक्व झाले तर रोगी दगावतो.

या दोषपाकाची किंवा धातुपाकाची मुदत वात, पित्त, कफ यांच्या आधिक्यानें अनुक्रमानें सात, दहा, आणि बारा दिवसांची आहे. हारीत नांवाच्या ग्रंथकाराच्या मतें ही मुदत १४।१८ आणि २२ दिवस अशी आहे. दोषाची शुद्धि न झाल्यास हा ताप पुष्कळ दिवस सुद्धां येतो. सारांश लोकांत ज्यास " विषम " असें म्हणतात तो हा ताप आहे. यांत अंतर्बाह्य सर्व शरीर तप्त होतें व वर लिहिलेल्या मुदतीप्रमाणेंच हा कमी होतो. इतर ताप ठराविक वेळीं कमीजास्त होतात.

वैद्यकांत वर लिहिलेल्या संततज्वराखेरीज सतत, अन्येद्यु, तृतीयक, आणि चवथरा ( चतुर्थक ) यांस विषम म्हणतात, कारण हे ताप ठराविक मुदतींत निघतात व पुन्हां भरतात. विषम या शब्दाचा अर्थ निघून भरणें असा आहे, या अर्थावरून हें नांव पडलें आहे. हे विषम ज्वर जरी निघाले तरी कृशता, शरीराचा रंग बदलणें,व जडपणा इत्यादि लक्षणें कायम असतातच. यांपैकीं सतत या नांवाचा ताप दिवसां व रात्रीं असा दोनदां येतो व निघतो. अन्येद्यु ज्वर दिवसां व रात्रीं मिळून एकच वेळच येतो. यांत दोष मांस धातूचा आश्रय करून असतात. तृतीयकज्वर ( एकांतरा ) हा एक दिवसाआड येतो; यांत दोष मेद धातूचा आश्रय करतात. तृतीयकज्वरांत वायु व पित्त अधिक असतील तर प्रथम डोकें दुखतें व नंतर ताप येतो. कफ व पित्त यांचें आधिक्य असेल तर खांदे व मानेचा खालचा भाग दुखून ताप येतो. वायु आणि कफ अधिक असतील तर पाठ दुखून नंतर ताप येतो. चतुर्थक, चैवथ्या दिवशीं येणाऱ्या ( चवथरा ) तापांत मेद, मज्जा, किंवा अस्थी यांचा दोष आश्रय करतात. कांहीं ग्रंथकारांच्या मतें मज्जाधातूचाच दोष आश्रय करितात तेव्हां चवथरा ताप येतो. तो दोन प्रकारचा आहे. कफप्रधान, व वातप्रधान, पैकीं कफप्रधान चवथऱ्या तापांत अगोदर पोटऱ्या वळतात; आणि वातप्रधान तापांत डोकें दुखत नंतर ताप येतो. या तापाचाच दुसरा प्रकार असा आहे कीं, दोन दिवस सारखा ताप येऊन, एक दिवस ताप नसतो. हा ताप फारच कष्टसाध्य आहे. हे सर्व ताप ( संततखेरीजकरून) ज्या दोषांच्या आधिक्यानें आलेले असतील ते ते दोष वाढण्याच्या वेळीं ते वाढतात आणि दोष कमी होण्याच्या वेळीं कमी होतात. या सर्व तापांचे कारणभूत जे दोष ते कोणत्या धातूंना आश्रय करून आहेत हें समजण्याकरितां धातुगत ज्वरांचींहि लक्षणें सांगितलीं आहेत, तीं येणेंप्रमाणें-- जडपणा, मळमळणें, ओकारी, अरोचक, दीनपणा, हीं लक्षणें रसधातुगत तापाचीं होत. रक्ताची गुळणी, दाह, विचार न सुचणें, ओकारी, भोंवळ, वडवड, अंगावर पुळ्या, व तहान हीं लक्षणें रक्तगत ज्वराचीं आहेत. पोटऱ्या वळणें, तहान, लघवी व शौचाला साफ होणें, उष्णता, अंतर्दाह, हातापायांस चाळा, ग्लानि, हीं लक्षणें मांसगत ज्वराचीं आहेत. वरचेवर अतिशय घाम, तहान, बेशुद्धि, वडवड, ओकारी, दुर्गंधी, अरोचक, ग्लानि व वेदना सहन न होणें हीं लक्षणें मेदोगत ज्वराचीं आहेत. हाडें फुटल्याप्रमाणें वाटणें, कण्हणें, दमा, जुलाब होणें, ओकारी, व सर्वांगास चाळा हीं लक्षणें अस्थि( हाडें )गत ज्वराचीं होत. अंधाऱ्या येणें, उचकी, खोकला, थंडी, ओकारी, अंतर्दाह, महाश्वास, व मर्में फार दुखणें, हीं लक्षणें मज्जागत ज्वराचीं आहेत. शुक्र बाहेर येणें, लिंग ताठणें, हीं लक्षणें शुक्रगत ज्वरांत असून यानें रोगी वांचत नाहीं. रस, व रक्ताश्रित, तसेंच मांस, व मेदोगत ज्वर साध्य आहे. अस्थी व मज्जागतज्वर, कष्टानें बरे होणारे व शुक्रगत ज्वर बरे न होणारे असतात.

वर लिहिलेल्या तापांखेरीज"मधुरा" नांवाचा ताप लोकांत प्रसिद्ध आहे, त्याचीं लक्षणें-- अंगाची आग होणें, भोंवळ, विचार न सुचणें, शौचास पातळ होणें, ओकारी, तहान, झोंप नसणें, तोंड येणें, टाळा व जीभ सुकणें आणि गळ्यावर मोहरी एवढाल्या बारीक पुळ्या उठणें, वर लिहिलेल्या

कफपित्तज्वरांत याचा अंतर्भाव होतो. चरक, वाग्भट, सुश्रुत वगैरे ग्रंथांत हा ताप निराळा मानिला नाहीं. याशिवाय नवज्वर म्हणून लोकांत एक ताप प्रसिद्ध आहे. तो निराळा नसून मुदतीच्या तापांतील नऊ दिवसांच्या तापासच तें नांव आहे.

मोठा ताप येऊन गेल्यानंतर पुढें अशक्तपणानें जो अल्पप्रमाणाचा ताप शिल्लक रहातो व ज्यांत पानथरी वाढते त्यास जीर्णज्वर म्हणतात. यांत हातापायांची व डोक्याची आग होते आणि पानथरी वाढलेली असते.

ताप उतरतांना,धातूचा क्षोभ होतो त्यावेळीं रोग्यास दम लागतो. कण्हणें, घाम, ओकारी,कफ, वडवड, बेशुद्धि, रागीट मुद्रा, मळ जोरानें आणि सशब्द व पातळ होणें, हीं लक्षणें होतात. थकवा, विचारशक्ति व संताप हीं गेलीं, शरीर हलकें वाटावयास लागलें, तोंड आलें ( मुखपाक ), इंद्रियें आपापलीं कामें व्यवस्थित करूं लागलीं, पीडा शमली, घाम येऊं लागला, शिंका आल्या, आवडीच्या पदार्थावर इच्छा जाऊं लागली आणि डोकें खाजूं लागलें म्हणजे ताप गेला असें समजावें.

अशक्त मनुष्यास अतिशय जोराचा ताप आला असतां वरा होणें कठिण जातें. तसेंच ज्या तापाचीं कारणें फार आहेत, लक्षणें फार आहेत, तोहि ताप वरा होत नाहीं. पहाणें, ऐकणें, वगैरे इंद्रियांच्या शक्ती ज्या तापांत नाहींशा झाल्या आणि ज्या तापानें केंस दुभंगले तो ताप वरा होत नाहीं. रोग्यास तापांत अतिशय तहान, अंगाची आग, पोट अतिशय फुगणें,जोराचा दमा व खोकला, अतिशय क्षीणता, बेशुद्धि, विव्हलता, उठण्याची शक्ति नसणें, हृदयांत नाना प्रकारचें दुःख होणें, तोंडानें श्वासोच्छ्वास चालणें, डोळे लाल असणें, हीं लक्षणें असतील तर रोगी जगणें कठिण असतें.

रोगी फार क्षीण असून श्वासोच्छ्वास पुष्कळ वेळां जोरानें ( प्रमाणापेक्षां जास्त ) चालत असेल तर असाध्य समजावा. तापांत उचकी, दमा व तहान आणि डोळे फिरलेले (विभ्रांत) हीं लक्षणें असतां रोगी दगावतो. तापांत रोग्याचें अंग थंड लागत असून त्यास आंतून अतिशय दाह वाटत असेल तर तेंहि असाध्य लक्षण समजावें. या वर लिहिलेल्या तापाच्या असाध्य लक्षणांचा विचार करतांना तापाचा जोर, आणि रोग्याची शक्ति, यांचा प्रथम विचार करून नंतर दुसऱ्या लक्षणांचा विचार करावा. या दोन लक्षणांचा सौम्य किंवा उग्रपणा तारण्यास किंवा मारण्यास कारण होतो.

ज्याअर्थीं अमाशयांतील दोष अग्नीस मंद करून आमाशीं मिसळून व स्रोतसांचा अवरोध उत्पन्न करून ताप उत्पन्न करितात त्याअर्थी तापाचीं पूर्वचिन्हें दिसूं लागतांच किंवा ताप आल्यावरोवर एकदम शक्तिपात न होऊं देण्याविषयीं खबरदारी राखून उपास करावे, कारण आरोग्याचा आधार शक्तीवरच आहे आणि आरोग्याकरितांच चिकित्सा केली जाते.

उपासांनीं दोष क्षीण झाले, अग्नि प्रदीप्त झाला, व अंग हलकें झालें म्हणजे स्वस्थता, भूक तहान, पचनशक्ति, शक्ति व ओज हीं उत्पन्न होतात.

जेवल्यावरोवर ताप आला असेल व तो विशेषतः आमयुक्त असेल, आणि त्यांत दोष अतिशय वाढले असून ते आपापल्या स्थानांपासून चाळवले जाऊन संचार करीत असतील, व त्यांत कफाचा जोर असेल आणि मळमळ, तोंडास पाणी सुटणें, अन्नाचा तिटकारा, खोकला व विषूचिका हीं लक्षणें त्यांत असतील, तर रोगी वमन देण्यास योग्य असल्यास त्यास वमन देणें प्रशस्त आहे. याहून निराळ्या स्थितींत वमन दिल्यास दमा, अतिसार, मूर्छा, व हृद्रोग, हे विकार उत्पन्न होऊन ताप विषम होतो. वमन ( ओकारीचें औषध ) देणें असल्यास पिंपळीबरोवर, इंद्रजवाबरोवर, जेष्टमधावरोवर, मधुयुक्त किंवा लवणयुक्त ऊन पाण्यावरोवर, कडू पडवळ किंवा कडू लिंब याच्या काढ्यावरोवर अथवा सातूंचें कढण, उंसाचा रस, आणि मद्य यांवरोवर गेळफळ द्यावें. किंवा रोगाची व रोग्याची शक्ति, काळ वगैरे गोष्टी लक्षांत आणून ओकारीचीं औषधें द्यावीं. वमनास योग्य असल्यास वमन घेऊन व नसल्यास वमनावांचूनच तापकऱ्यानें वाढलेल्या सामदोषांचें पचन व निरामदोषांचें शमन करण्याकरितां उपास करावे.

वातकफज्वरांत रोग्यास तहान लागत असल्यास त्यानें थोडथोडें ऊन पाणी प्यावें. तें कफास पातळ करून लवकर तहान कमी करतें, अग्नीस प्रदीप्त करितें, स्रोतांस मऊ करून मोकळें करतें, दाटलेलें पित्त, वायु, घाम, मलमूत्र यांस प्रवृत्त करतें, झोंप, जडत्व व अरुचि यांस नाहींसें करतें, व प्राणांचें रक्षण करतें. थंड पाण्यांत याच्या उलट गुण असून तें दोषसमुदायास वाढवितें.

ऊन पाण्यांत जरी वर सांगितल्याप्रमाणें गुण आहेत तरी तें निव्वळ पित्ताच्या तापांत, पित्ताधिकतापांत, डोळे वगैरेंतून वाफा निघणें, सर्वांगाचा दाह, मूर्छा, अतिसार हे विकार असलेल्या तापांत विषापासून किंवा मद्यापासून उत्पन्न झालेल्या तापांत, ग्रीष्म ऋतूंत आणि उरःक्षत, धातुक्षय, व रक्तपित्त हे रोग असतील त्यांस देऊं नये. त्यांस नागरमोथा, चंदन, सुंठ, पित्तपापडा व वाळा हीं औषधें घालून तापविलेलें पाणी निववून देणें हितकर आहे. १ तोळा औषध एक शेर पाण्यांत घालून अर्धे पाणी आटवून तें थंड करून प्यावयास द्यावयाचें असें याचें प्रमाण आहे. तें पाचक व तहान आणि ताप दूर करणारें आहे. पित्तावांचून उष्णता नाहीं व उष्णतेवांचून ताप नाहीं. म्हणून सर्व प्रकारच्या तापांत व विशेषतः पित्तज्वरांत पित्तास विरुद्ध असे पदार्थ वर्ज्य करावे. तसेंच स्नान, अंगास तेल लावणें, चंदनादिकांची उटी व उपासावांचून बाकीचीं अकरा प्रकारचीं लंघनें वर्ज्य करावीं. उपास हा नवज्वरांत (तापाच्या आरंभींच्या पहिल्या दिवसांत)करावाच.आमाधिक

अजीर्णांत पोटांत तीव्र वेदना होत असल्या तरी जसें शूलघ्न औषध देऊं नये तसेंच आमाधिक तापांत ज्वरघ्न औषध देऊं नये. कारण तापास दूध पाजलें असतां जसें त्याचें विषच बनतें तसेंच आमानें भरलेल्या कोठ्यांत तें आमास अधिकच वाढवितें.

वातकफात्मक तापांत अंगावर गांधी, पडसें, दमा, पोटऱ्या, हाडांचीं पेरें व सांध्यांत शूल हीं लक्षणें असल्यास घाम काढावा. त्यायोगानें घाम, मलमूत्र व वायु हे प्रवृत्त होऊन अग्नी प्रदीप्त होतो.

उपास, घाम काढणें, दिवस लोटणें, कण्हेरी व कडू औषधें, हीं निरनिराळ्या अवस्थेंत किंवा क्रमाक्रमानें दोषांचें पचन करितात. निवळ वातज्वर, क्षयाचा ताप, आगंतुकज्वर, व जीर्णज्वर यांत उपास करूं नये. या ज्वरांत शक्ती कमी न होईल असें शमन-औषध द्यावें. लंघन ( उपवास )देणें तें आमज्वराचीं लक्षणें कमी होईपर्यंत द्यावें. आमज्वराचीं लक्षणें कायम असतील तर लंघन बंद करूं नये. इंद्रियें प्रसन्न होणें, मळ, मूत्र व वायु यांचे वेग चांगले येणें, तोंडाला रुचि येणें, तहान व भुक बरोबर लागणें, व्याधीचा जोर कमी होणें, उत्साह वाटणें, आळस न वाटणें हीं लंघनास योग्य झाल्याचीं लक्षणें आहेत. हीं लक्षणें झालीं म्हणजे ज्वरांत उपास बंद करावे. लंघनाचीं लक्षणें दिसूं लागल्यानंतर सहा दिवसपर्यंत किंवा ताप कमी होई-पर्यंत त्या त्या दोषांच्या तापांत त्या त्या दोषनाशक औषधांनीं सिद्ध केलेल्या कण्हेऱ्या द्याव्या. त्यांत प्रथम पेजे-पासून सुरवात करावी. आरंभीं सहज पचणारी अशीं लाह्यांची कण्हेरी, सुंठ, धने, व पिंपळी, यांनीं सिद्ध करून किंचित् सैंधव घालून द्यावी. रोग्याची आंबटावर इच्छा असल्यास त्यांत डाळिंबाचा रस घालावा. ज्या तापकऱ्यास रेच होत असतील किंवा पित्ताचा जोर असेल त्यानें धने व पिंपळी न घालतां नुस्ती सुंठ व मध घालून थंड कण्हेरी द्यावी. बस्ती, कुशी, व डोकें यांत दुखत असल्यास रिंगणीमूळ व गोखरूं यांनीं सिद्ध केलेली कण्हेरी द्यावी. उचकी, शूळ, दमा व खोकला, हे उपद्रव असल्यास लघुपंचमुळांनीं सिद्ध केलेली कण्हेरी द्यावी. कफविकार असल्यास बिल्वादि बृहत्पंचमूळांच्या कषायांत सातू घालून सिद्ध केलेली कण्हेरी द्यावी. मलावरोध असल्यास जव, पिंपळी व आंव-ळकाठी घालून केलेली व तुपाची फोडणी दिलेली कण्हेरी द्यावी. ही मळ व दोष यांचें अनुलोमन करणारी आहे. घाम व झोंप येत नसून अतिशय तहान लागत असल्यास खडी-साखर, आंवळकाठी व सुंठ यांनीं सिद्ध केलेली कण्हेरी द्यावी तहान, वांती, दाह व ताप हीं नाहींशीं करण्याक-रितां खडीसाखर, बोरें, द्राक्षें, उपळसरी, नागरमोथा, व चंदन यांनीं सिद्ध केलेली कण्हेरी मध घालून द्यावी. कण्हेऱ्या तयार करण्याकरितां औषधें सांगितलीं आहेत त्यांनींच मांसरस, धान्याचीं कढणें, वगैरे तयार करून द्यावीं. दारूनें येणाऱ्या तापांत, नेहमीं मद्य पिणाऱ्या ताप-कऱ्यास, कफ पित्तस्थानांत गेला असतां, ग्रीष्मऋतूंत, पित्त-कफाचा जोर असतां व तापांत तहान, उलटी, व दाह हे उपद्रव होत असतां व ऊर्ध्वगामी रक्तपित्त झालें असतां कण्हेरी देणें इष्ट नाहीं. त्यांत ज्वरनाशक आंवळे, डाळिंब, द्राक्षें वगैरे फळांच्या अंगरसांतून किंवा काढ्यांतून साळी-च्या लाह्यांचें पीठ, साखर व मध घालून द्यावें. नंतर हें लाह्यांचें पीठ किंवा यवागू दिली असल्यास ती जिरल्यावर भूक लागली असतां भाजलेल्या तांदुळांचा भात, किंचित् लवणयुक्त धान्याचीं कढणें किंवा मूग व लाव्यांच्या मांसाचे सुव्यांबरोबर जेवावा.

याप्रमाणें तापाचे पहिले सहा दिवस शक्ति क्षीण न होऊं देतां व दोष भडकूं न देतां घालवावे. लंघन (उपास) कण्हेऱ्या व योग्यकाल, इत्यादिकांनीं दोष पक्व झाल्यावर शिल्लक राहिलेल्या अपक्व दोषांचें पाचन व शमन करण्या-करितां काढा द्यावा.

पित्तज्वरांत विशेषतः कडु औषधांचा व कफज्वरांत तिखट औषधांचा काढा द्यावा. तुरट औषधें जरी पित्तकफ-नाशक आहेत तरी नवज्वरांत म्हणजे अपक्व तापांत तुरट औषधांचा काढा देऊं नये. कारण तो मळाचा अवष्टंभ करून तापास विषमावर घालवितो. आणि अरुचि, तळमळ, उचकी, पोटफुगी, वगैरे उपद्रवहि करतो.

कांहीं ग्रंथकार सात दिवसानंतर, कोणी दहा दिवसानंतर, आणि कोणी पेज, कण्हेरी वगैरे हलकें अन्न खाल्यावर ज्वरघ्न औषध द्यावें असें म्हणतात.परंतु वाग्भटाच्या मतें आमाचें आधिक्य तापांत असतां अर्थात् तापाचा जोर असतां किती दिवस झाले तरी औषध देऊं नये. कारण अंगांत तीव्रज्वर असलेल्या रोग्यास दोषांच्या उद्रेककाळीं किंवा दोष अति-शय सांचून त्यामुळें झांपड, व अंग जड आणि ओलसर वाटणें हीं लक्षणें होत असतां दिलेल्या औषधांचें पचन न होतां उलट तें तापास फार वाढवितें. ताप सौम्य झाला, अंग हलकें झालें आणि मलमूत्रादि दोष प्रवृत्त झाले असतां, नुकताच ताप येऊं लागला असला तरी त्यास औषध द्यावें. वातज्वरावर गुळवेल, पिंपळमूळ, सुंठ यांचा किंवा मिरीं, पादेलोण, सुंठ, काडेचिराईत, लेंडीपिंपळी, कटुकी या औष-धांचा काढा द्यावा.

काढ्याचीं औषधें दोन ते तीन तोळे, चाळीस तोळे पाण्यांत कालवून पांच तोळे पाणी राहिलें म्हणजे गाळून द्यावें. हें प्रमाण सामान्य आहे. रोग, रोगी, वय, काल, इत्यादिक पाहून वैद्यानें यांत फरक करावा. यापुढें जेथें काढ्याच्या औषधांचें विशेष प्रमाण सांगितलें नसेल तेथें हेंच प्रमाण उपयोगांत आणावें.

हिरडेदळ, बेहेडदळ, आंवळकाठी, सुंठ,मिरीं, लेंडीपिंपळी, तेल, गूळ व साखर यांची गोळी करून खावी व वर ऊन

पाणी प्यावें. तेडाचें चूर्ण ३॥ तोळे व साखर तीन तोळे, बाकी सात औषधें एक एक तोळा याप्रमाणें घ्यावीं.

पित्तज्वरावर पित्तपापडा, वाळा, रक्तचंदन यांचा किंवा गुळवेल, आंवळकठी, पित्तपापडा, यांचा अगर धमासा, गुळवेल, नागरमोथे व सुंठ यांचा काढा द्यावा. रोग्यास दाह फार होत असेल तर कडुलिंबाचा पाला पाण्यांत वाटून त्याचा फेंस अंगास लावावा. तहान, जीभ व टाळू सुकणें हीं लक्षणें असल्यास महाळुंगाचा गर, मध व सैंधव वाटून डोक्यास लेप द्यावा.

कफज्वरावर काडेचिराईत, कडुलिंब, लेंडीपिंपळी कचोरा, सुंठ, शतावरी, गुळवेल, कांटेरिंगणी, यांचा किंवा गुळवेल, कडुलिंब, रक्तचंदन, पद्मकाष्ठ, धने, अगर अडुळशाचीं पानें, नागरमोथे, सुंठ, व धमासा यांचा काढा द्यावा. कांकडशिंगी, लेंडीपिंपळी, कायफळ व पुष्करमूळ यांचें चूर्ण मधांत कालवून चाटावें, त्यानें दमा, खोकला या लक्षणांनीं युक्त असलेला कफज्वर जातो.

वातपित्तज्वरावर गुळवेल, पित्तपापडा, वाळा, काडेचिराईत, सुंठ यांचा काढा अगर काळीं द्राक्षें, मोहाचीं फुलें, जेष्ठमध, लोध्र, शिवणीचीं फळें, उपळसरी, नागरमोथा, आंवळकाठी, वाळा, कमळकेसर पद्मकाष्ठ, कमळाचे देठ, चंदन, काळावाळा, व फालसा, यांचा फांट किंवा हिम (शीतकषाय) जाईच्या फुलांनीं सुगंधित करून आणि त्यांत मध, खडीसाखर, व साळीच्या लाह्या घालून तो दिला असतां वातपित्तज्वर, मदात्यय, वांती, मूर्छा, दाह, श्रम, भ्रम, नाकातोंडांतून येणारें रक्त, तहान व कावीळ या रोगांस बरा करितो. कुटकी पाण्यांत वाटून कोऱ्या व स्वच्छ मडक्यांत शिजवून तिचा रस पिळून घेऊन तूप घालून द्यावा. हा ताप व दाह यांस दूर करतो.

वातकफज्वरांत वाहव्याचा मगज, पिंपळमूळ, नागरमोथे, कुटकी, व हिरडेदळ, यांचा काढा दिला असतां तो दीपन, पाचन करितो. रिंगणीमुळ, सुंठ, व गुळवेल यांचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून दिला असतां वात कफज्वर, दमा खोकला, पडसें, व शुळ यांस दूर करितो.

कफपित्तज्वरावर गुळवेल, कडुलिंबाची साल, कटुकी, नागरमोथे, इंद्रजव, सुंठ, कडू पडवळ, रक्तचंदन, यांच्या काढ्यांत पिंपळीचें चूर्ण घालून द्यावें. त्यानें कफपित्तज्वर ओकारी, अरोचक, मळमळणें, अंगाची आग, तहान हे विकार नाहींसे होतात.

संनिपातज्वराची चिकित्सा फार काळजीपूर्वक करावी, कारण संनिपातज्वराची चिकित्सा म्हणजे मृत्यूबरोबर लढाईच असें वैद्यशास्त्रज्ञ म्हणतात. संनिपातज्वरांत प्रथम आम व कफ कमी करण्याचे उपाय करावे. ते असे आम कमी होण्याकरितां उपास व कफ कमी होण्याकरितां तापलेल्या वाळूचा शेक, नस्य ( नाकांत ओढावयाचीं औषधें, ) लाळ सुटणारीं औषधें, अंजन, आणि चाटणें, यांचा उपयोग करावा. खापरांत वाळू तापवून ती मडक्यांत घेऊन तीवर कांजी शिंपडावी नंतर त्या वाळूनें शेकावें. महाळुंग व आलें यांचा कोमट रस सैंधव, पादेलोण व मीठ घालून नाकांत घालून ओढावा. त्यानें कफ पातळ होऊन नाकावाटें येतो व डोकें, छाती, गळा, तोंड आणि बरगड्या यांतील दुखणें कमी होतें आल्याच्या रसांत सैंधव व सुंठ, मिरीं आणि पिंपळी हीं घालून त्यांची चूळ तोंड भरून द्यावी व थुंकावी. त्यानें छातींतील व मान, गळा, व डोकें यांत दाटलेला कफ पातळ होऊन पडतो व तोंडाला रुचि येते आणि डोकें, बरगड्या व गळा यांस हलकेपणा वाटतो.

तीक्ष्ण ( झोंबणारीं ) औषधें डोळ्यांत घातलीं असतांहि कफ कमी होऊन झांपड, बडबडणें व डोकें दुखणें, हीं लक्षणें कमी होतात. नागरमोथे, कटुकी, हिरडा, बेहेडा, आवळकाठी, कांटेरिंगणी, कडु पडवळ, दारुहळद, कडुलिंबाची साल, ह्यांचा काढा द्यावा. त्रिभुवनकीर्तिरस आल्याचा रस व खडीसाखर यांतून द्यावा. मोहऱ्या, वेखंड, हिंग, करंजाच्या बिया, तेल्यादेवदार, सुंठ, मिरीं, पिंपळी, हीं गोमूत्रांत वाटून सर्वांगास लेप करावा. संनिपातज्वरांत जीभ फुटली व फार कोरडी झाली असतां काळ्या मनुका मधांत वाटून तूप घालून लेप करावा. तेरा प्रकारच्या संनिपातांवर जी सामान्य चिकित्सा आहे ती येथें लिहिली आहे. संनिपातज्वरांत शेवटीं शेवटीं कानाच्या मुळाशीं सूज येते त्यास कर्णमूळ म्हणतात. त्यावर रक्त काढणें, तूप पिण्यास देणें व कफ पित्तघ्न लेप लावणें, हे उपचार करावे. या सर्व तापांत प्रथम उपास, नंतर पेज, भात वगैरे पथ्यकारक अन्न व काढे वगैरे देऊन दहा दिवस झाल्यावर रोग्यास कफाचीं लक्षणें नसतील तर तूप जास्त प्रमाणांत द्यावें. त्यानें उष्णता कमी होऊन ताप नाहींसा होतो. तूप दिल्यानें कफ वाढेल तर तूप बंद करून पुन्हां लंघन करावें. याप्रमाणें चिकित्सा केली असतां वातिकज्वर सात दिवसांनीं, पित्तज्वर नऊ दिवसांनीं व कफज्वर अकरा दिवसांनीं किंवा याच्या दुप्पट मुदतीनें बरा होतो. जास्तींत जास्त बावीस दिवसांची मुदत शास्त्रानें लिहिली आहे. यापुढें राहणारे ताप आमदोषजन्य असतात. वर ज्वरांत जें तूप द्यावयास सांगितलें तें औषधांनीं तयार केलेलें असलें पाहिजे. कारण तुपावर ज्या गुणांचा संस्कार करावा ते गूण त्यांत येतात; यामुळें तें स्वतः वातपित्तघ्न औषधांत श्रेष्ठ असलें तरी कफघ्नहि करतां येतें. देहांतील धातूंच्या दुर्बळपणामुळें जो जीर्णज्वर असतो त्यावर तुपासारखें दुसरें औषधच नाहीं. पूर्वी सांगितलेले काढे तूप घालून द्यावे त्यानें जीर्णज्वर जातो. तिल्वकघृत, विषघृत, तिक्तकघृत हीं शास्त्रांत प्रसिद्ध असलेलीं घृतें ज्वरांवर प्रशस्त आहेत.

तूप देऊनहि ज्वर गेला नाहीं तर बली रोग्यास ओकारीचें किंवा रेचक औषध दोषाचें आधिक्य पाहून द्यावें. विष व दारू यांपासून ताप असेल तर शोधनच हितकारक आहे. वाहव्याचा मगज, त्रिफला नळीचें तेल इत्यादि रेचक

औषधें मनुकांच्या पाण्याबरोबर द्यावीं किंवा दुधाबरोबर द्यावीं. शोधन औषधांनीं दोष बाहेर पडूं लागले म्हणजे ते बंद करूं नयेत. कारण ते दोष शरीरांत राहिल्यानें दुसरे विकार उत्पन्न करतात. फारच ओकाऱ्या किंवा जुलाब होतील तर दोषांचें पचन करून ते विकार थांबवावे परंतु स्तंभन औषधांनीं बाहेर जाणारे दोष आंत सांठवून ठेवूं नयेत. ज्या रोग्यास दोषहरणाकरितां शोधन औषधें अशक्तपणामुळें देत नाहींत त्यास पुष्कळ दूध प्यावयास देऊन किंवा निरूहवस्तीनें त्याचे दोष काढून टाकावे. दूध हें जात्याच वातपित्तघ्न असल्यामुळें तापाला लौकर घालवितें व तापांतील तहान व दाह हीं लक्षणें दुधानें त्वरित शमतात. रोग व रोगी यांची शक्ति व काल यांचा विचार करून धारोष्ण, थंड किंवा औषधांनीं तयार केलेलें दूध उपयोगांत आणावें. नाहींतर तें अपायकारक होतें. सुंठ, खजूर, मनुका, साखर व तूप यांत तयार केलेलें दूध मध घालून द्यावें. तसेंच चौपट पाणी घालून पिंपळ्यांनीं तयार केलेलें दूधहि हितकारक आहे. सुंठ, विष्णुमूळ, कांटेरिंगणी, सराटे, व गूळ यांनीं तयार केलेलें दुध सूज, लघवी व मळ यांचा अवरोध यांस घालविणारें असून खोकला आणि ताप यांस घालवितें.

निरूहवस्ती (रुक्ष औषधांचा वस्ती) पक्वाशयांतील दोष घालवितो. पक्वाशयांतील तीन्ही दोषांवर हें उत्तम औषध आहे. वरगड्या, कंवर व पाठ हीं आंखडलीं असतां व शौचास साफ होत नसेल तर अनुवासन(स्निग्ध)वस्तीहि द्यावा. दोषहरणाकरितां नस्य, धूम, गंडूप (चुळा भरणें) हे विधीहि जीर्णज्वरांत करावे. आंवळकाठी, मनूका व खडीसाखर यांची चटणी तोंडांत धरावी. यानें अरुचि जाते. दोषांप्रमाणें औषधें घालून तयार केलेल्या तेलांनीं अभ्यंग करावा. त्यानें त्वचेचा आश्रय करून असलेला ताप जातो. तापांत दाह फार होत असेल तर थंड वीर्याच्या औषधांनीं तयार केलेल्या थंड काढ्यांत रोग्यास बसवावा अगर त्या काढ्यांचा अभिषेक करावा.

विषमज्वर (हिंवताप) हा ताप बहुतकरून थंडी वाजूनच येतो. म्हणून प्रथम खालीं लिहिलेले उपचार करावे. उष्णवीर्य औषधांचे काढे करून ते ऊन असतां अंगावर घ्यावे अगर त्यांत बसावें. विस्तवाच्या साहाय्यानें जे शेकण्याचे प्रकार आहेत त्यांनीं अंग शेकावें. घाम आणणारीं औषधें व अन्नें, घराच्या तळघरांतील मध्यभागीं निजणें, गोधडी, कांबळें, रजई इत्यादि उबदार वस्त्रें पांघरणें, विनधुराचे रखरखीत निखारे, भरलेल्या शेगड्या,दारु, सुंठ, मिरीं, पिंपळी घातलेलें ताक पिणें यानें थंडी वाजणें कमी होतें. कडू पडवळ, नागरमोथे, हिरडे व जेष्ठमध या औषधांचा काढा सर्व प्रकारचे हिंवताप घालवितो. रसायनविधानें विब्वा खावा. सकाळीं तेलाबरोबर लसूण खावी. ताप येण्याच्या दिवशीं दोषादि पाहून लंघन किंवा बृंहण करावें. त्रिफळा, गुळवेल, हिरडे, व लेंडीपिंपळी यांपैकीं कोणतेंहि एक औषध प्रकृतिमानाप्रमाणें घ्यावें. त्रिफळा, बोरें, व शिवणीचीं फळें यांच्या काढ्यांत समभाग दहीं घालून तूप सिद्ध करावें आणि तें तयार होत आलें म्हणजे त्यांत लोध्राच्या सालीची पूड टाकावी. हें हिंवतापावरील उत्तम औषध आहे. दारू, तीव्र मद्य, मोर, तित्तिर, कोंबडा यांचें मेदस्वी व उष्णवीर्य मांस अन्नाबरोबर खूप खाऊन तापाच्या पाळीच्या दिवशीं निजावें किंवा लागलीच तें अन्न ओकून टाकावें. धूप, अंजन, नस्य,भय दाखविणें हेहि उपाय करावे. प्रायश्चित्त, जप, दान वगैरे दैवी उपायांनीं सर्वच प्रकारचे ताप जातात. तथापि विषमज्वरावर ते फारच उपयोगी पडतात. कारण या तापांत आगंतुक कारणांचा संबंध असतो.वर लिहिलेल्या उपचारांनीं जो ताप जात नाहीं तो ताप रक्ताश्रित आहे असें समजून विधीप्रमाणें शीर तोडून रक्त काढावें. आगंतुज्वराची कारणाप्रमाणें चिकित्सा करावी.अभिघातानें आलेल्या तापावर तूप पिण्यास द्यावें. थंड लेप व परिषेक, मांसरसाबरोबर जेवण व त्या त्या रोगावर सांगितलेले रक्तस्रावादि उपाय योजावे. भूतबाधेनें आलेल्या तापांत बलि, मंत्र इत्यादि उपाय करावे. उग्र औषधींच्या वासापासून आलेल्या तापांत पित्तशामक व विषजन्य तापांत विषनाशक उपाय करावे.

काम, क्रोध, इत्यादिकांपासून आलेले ताप रोग्यास आवडणाऱ्या व त्यांचें मनोरंजन करणाऱ्या गोष्टींनीं व त्या त्या दोषांचें शमन करणाऱ्या उपायांनीं व हिताहित विवेकाच्या गोष्टींनीं बरे करावे.क्रोधापासून येणारा ताप कामानें व कामज्वर क्रोधानें शांत होतो. तसेंच भीति व शोक यांपासून आलेले ताप क्रोधानें आणि कामक्रोधापासून आलेले भय-शोकानें बरे होतात. शापानें व अथर्ववेदोक्त मंत्रांनीं केलेल्या अभिचारानें आलेल्या तापांत दैवी चिकित्सा करावी.

औषधांचा उग्र वास,विषबाधा, इत्यादिकांपासून आलेल्या तापांत आरंभीं केवळ तप्तता असून मागून त्यांत दोषांचा कोप होतो. म्हणून त्यांत दोषानुसार औषधादिकांची योजना करावी. रोग्याचें लक्ष्य मनोरंजक गोष्टींत गुंतवून त्यास ताप येण्याच्या वेळेची आठवणच होऊं देऊं नये. दयाळु व निर्मळ मन हें सर्व ज्वरांचें नाशक आहे.

ताप गेल्यानंतरहि अंगांत शक्ति येईपर्यंत मेहेनत, स्नान, स्त्रीसंग, जड असात्म्य, व विदाही अन्न, तसेंच इतर तापाचीं जीं कारणें असतील तीं वर्ज्य करावीं. ताप गेला तरी एकदम सर्व प्रकारचें अन्न खाऊं लागूं नये. कारण ताप निघाला तरी तो अशक्त मनुष्यास फार लौकरच मारतो. [ वाग्भट; चरक; योगरत्नाकर. ]

**ज्वांग, पट्टुआ**—( पट्टुआ म्हणजे हिंदी 'पट्टा' व संस्कृत पत्र या शब्दाचा अपभ्रंश होय)ही अनार्य जात धेनकानाल आणि केओंजहार या कटक संस्थानांतून आढळते. १९११ च्या खानेसुमारींत यांची संख्या १२,८४५ भरली. पैकीं पुष्कळजण वन्यधर्मीय (ॲनिमिस्ट) म्हणून नोंदले

गेले. ज्यांनीं अद्यापि वस्त्रप्रावरणार्थ पानांचा उपयोग करण्याचें टाकून दिलें नाहीं अशी उत्तरहिंदुस्थानांतील ही एकच जात दिसून येते. या जातीविषयींच्या एका दंतकथेंत असें सांगितलें आहे कीं, हे लोक पूर्वी कपड्याचें फार शोकी असून घाणेरडें काम करण्याच्यावेळीं मात्र ते काढून ठेवून पानांनीं शरीर आच्छादीत. म्हणून त्यांची देवी जी ठाकुराणी ( कोणी सीता म्हणतात ) तिनें त्यांच्या या पोषाखाच्या आवडीबद्दल त्यांनां रागें भरून यापुढें तुम्ही पानें गुंडाळून राहिलें पाहिजे; नाहींतर तुम्हाला वाघ खाऊन टाकील असा शाप दिला. दक्षिणहिंदुस्थानांतील पानें नेसून रहाणाऱ्या जातींनांहि अशाच तऱ्हेचा शाप आहे असें सांगतात ( थर्स्टन–कास्ट्स अँड ट्राईब्ज, पुस्तक ७; पृ. २० ). डाल्टन ( एथ्नॉलॉजी ऑफ बेंगाल, कलकत्ता, १८७२) यानें ज्वांग लोकांविषयीं पुढील माहिती दिली आहे.

जादूटोण्यावर कोलांप्रमाणें ज्वांगांचा विश्वास नाहीं. “ देव, ” “ स्वर्ग ” किंवा “ नरक ” यांनां त्यांच्या भाषेंत प्रतिशब्द नाहींत. मृत्यूनंतर काय होतें याची त्यांनां कल्पना नाहीं. संकटाच्या वेळीं ते सूर्यप्रीत्यर्थ पाखरें मारतात व ठराविक ऋतूमध्यें तीं तीं फळें मिळावींत म्हणून पृथ्वीलाहि पक्षी अर्पण करितात. अशा वेळीं एखादा म्हातारा मनुष्य उपाध्याय बनतो; त्याला नागम असें म्हणतात. कोणताहि धार्मिक विधि त्यांनां अवश्य म्हणून पाळावा लागत नाहीं.

जर डाल्टनची माहिती खरी असेल तर हे लोक शेजारच्या द्राविडी जातीपेक्षांहि खालच्या पायरीवर आहेत असें म्हणावें लागेल. रिस्लेच्या मतें केओंजहारमधील जात बराम नांवाच्या एका वनदेवतेची उपासना करते. हा देव सर्वश्रेष्ठ असून त्याच्या खालोखाल थानपती, मासिमुली, कालापात, हासुली आणि बसुमती ( पृथ्वीमाता ) या देवता होत. रेडे, बकरीं पक्षी, दूध आणि साखर हीं या देवतांनां प्रथम अर्पण करून नंतर उपासक त्यांचें सेवन करितात. बळी देण्याकरितां म्हणून कांहीं विशिष्ट दिवस ठरवून ठेविलेले नाहींत तर पेरणीच्या व हंगामाच्या वेळीं असे बळी दिले जातात. जेव्हां एखादी जमीन, जंगल वगैरे तोडून पेरणीकरितां तयार केली जाते त्यावेळीं जंगलांतील देवतांची मोठ्या भक्तियुक्त अंतःकरणानें पूजा होते. रानटी व सर्व सजीवत्वपंथी देवतांखेरीज कांहीं हिंदू देवतांहि यांच्यांत थोड्याफार शिरल्या आहेत. यांच्यांत संस्कार करण्याला अद्याप ब्राह्मण बोलावीत नसून त्याकरितां ‘ देहरी ’ किंवा ग्रामोपाध्याय याची योजना केलेली असते. ज्वांग लोक मृतांनां जाळतात. व त्यांची राख वाहत्या पाण्यांत सोडून देतात किंवा तशीच जाळलेल्या ठिकाणीं टाकून जातात. मृत्यूच्या दिवसानंतर लवकरच थोडासा श्राद्धविधि होतो त्यावेळीं मृताचा मामा संस्कार चालवितो. भाद्रपदांत तांदुळाच्या हंगामाच्या वेळीं पितरांनां पाणी पाजण्यांत येतें.

**ज्वारी**—एक धान्य.यास मराठींत ज्वारी,जोंधळा,रब्बीशाळू;कानडींत,ज्वाळा व गुजराथींत,ज्वार म्हणतात.हिंदुस्थानांत जोंधळ्याची लागवड फार प्राचीन आहे. मिसर देशांत याला दुरा व दक्षिण आफ्रिकेंत काफिर कार्न असें म्हणतात.

जोंधळ्याचें पृथक्करण केलें असतां त्यांत शेंकडा जीं द्रव्यें सांपडतात तीं पुढें दिलीं आहेत.

| द्रव्य | शेंकडा प्रमाण |
|---|---|
| पाणी | १२.५ |
| मांसजनक घटक | ९.३ |
| शर्करासत्वादि पदार्थ | ७२.०३ |
| स्निग्धांश | २.२ |
| फायबर | २.२ |
| निरिंद्रिय क्षार | १.७ |

जोंधळ्याचें ताट साधारणपणें ७ ते ९ फूटपावेतों वाढतें. सुरत, खानदेश, सातारा, अकोला, बुलढाणा, उमरावती, नागपूर, वगैरे जिल्ह्यांत खरीफ जोंधळ्याचें ताट बरेंच जाडें असून तें १०–१५ फूट उंच वाढतें. रब्बी हंगामांतील शाळूचें ताट उंचीला बहुतकरून कमी असतें. पानें लांब व रुंदट असतात. खाण्याच्या सर्व धान्यांत ( मक्याखेरीज ) जोंधळ्याचें कणीस मोठें असतें. कणसाचा लहान मोठा आकार हंगामावर, जमिनीवर व तिच्या मशागतीवर अवलंबून आहे. कांहीं कणसें घट्ट असतात व कांहीं अगदीं मोकळीं फिसकारलेलीं असतात. कित्येक जातींत तीं ताटांस वांकवून खालीं लोंबत असतात. कांहीं कणसांचा रंग पांढरा सफेत असतो. कांहींचा पिवळा, कांहींचा काळसर, व कांहींचा तांबूस असतो. कांहीं कणसांतील दाण्यांवर काळ्या किंवा तांबूस रंगाचे ठोंब असतें. (उ. कोंवळी सोरघम). कणसाप्रमाणें दाण्यांतहि पुष्कळ रंग आढळतात; अगदीं पांढरे (उ. निर्मळी चपटी ),तांबूस (उ. राती, अडघर) व पिवळे( उ. फुलगार).

हिंदुस्थानांत भाताच्या खालोखाल जोंधळ्याचें पीक आहे. प्रसिद्ध झालेल्या सरकारी आंकड्यावरून पहातां सर्व हिंदुस्थानांत या पिकाखालीं १९१९–२० सालीं सुमारें २ कोटी २४लक्ष एकर होते.त्यांपैकीं ५८ लक्ष मद्रास इलाख्यांत, ७८ लक्ष मुंबई इलाख्यांत, १९ लक्ष संयुक्तप्रांतांत, १९ लक्ष मध्यप्रांतांत व २४ लक्ष एकर वऱ्हाडांत होते. निझामच्या राज्यांत मराठवाड्यांत जोंधळ्याचा पेरा बराच होतो.

मुंबई इलाखा–मुख्य जिल्ह्यांतील जोंधळ्याचें क्षेत्र.

| जिल्हा | एकर | जिल्हा | एकर |
|---|---|---|---|
| सोलापूर | १२७८००० | अहमदनगर | ८८०५५१ |
| विजापूर | १४६४२८५ | पुणें | ७५१२७९ |
| धारवाड | ६१४६०८ | नाशिक | ११८६२९ |
| बेळगांव | ६४३७१५ | सातारा | ५१४६५३ |
| अमदाबाद | ३२८४२८ | पश्चिम खानदेश | १३५२८९ |
| पूर्व खानदेश | ३८५२०२ | | |

(मुंबई सीझन आणि क्रॉप रिपोर्ट सन. १९१५–१६.)

मध्यप्रांत व वऱ्हाडांत जोंधळा बहुतेक खरीफ हंगामांत पेरितात, व रब्बीचा पेरा थोड्याबहुत प्रमाणांत नागपूर भागांत आढळतो.

मध्यप्रांत व वऱ्हाड प्रांतांतील मुख्य जिल्ह्यांतील क्षेत्र.

| जिल्हा | एकर. | जिल्हा | एकर |
|---|---|---|---|
| नेमाड | २३२२२५ | अकोला | ७३०९२८ |
| वर्धा | २३१४२८ | उमरावती | ५६७५४८ |
| नागपूर | २२८४९५ | बुलढाणा | ५६९४१७ |
| | | व यवतमाळ | ६७५९५० |

वऱ्हाड व मध्यप्रांतांतील एकंदर क्षेत्र (एकर)

| | |
|---|---|
| मध्यप्रांत | १५०८०८९ |
| वऱ्हाड | २५४५३३९ |

(सीझन अाणि क्रॉप रिपोर्ट-मध्यप्रांत व वऱ्हाड, १९१५-१६).

जोंधळा पिकणाऱ्या प्रांतांचें नंबर पुढें दिल्याप्रमाणें लागतात-मुंबई, मद्रास, संयुक्तप्रांत, वऱ्हाड, मध्यप्रांत व पंजाब.

जाती.—जोंधळ्याच्या सुमारें १५० जाती आहेत. त्यांपैकीं खरिफांत रब्बी हंगमापेक्षां जास्त आहेत. रब्बी जातीच्या धान्याची भाकरी जास्त चवदार असते. गुजराथेंत चपटी, पिरीयो व सोलापुरी या मुख्य जाती आहेत. खानदेशांत मोठी, अळसपूरी, निरमळी, गुडघी; साताऱ्यांत डुकरी व गिडग्याप; धारवाड जिल्ह्यांत फुलगार (पिंवळी व पांढरी), शडगार, नडीयाल ह्या खरीफांतील मुख्य जाती होत.

मध्यप्रांतांत व वऱ्हाडांत धामणी, आमनेर, सावनेर, डुकरी व गानेर ह्या मुख्य खरीफ जाती होत. ह्या तयार होण्याला जास्त वेळ लागतो. याशिवाय रामकेळ, जगदन, नाटोरा वगैरे जातींचा पेरा हलक्या जमिनींत होत असून त्या लवकर तयार होतात. मोतीचुरा अगर मोतीतुरा ह्या जातींत कणीस फिसकारलेलें असल्यामुळें पांखरांना वर बसून दाणे खातां येत नाहींत. कणखारी अगर कावळी जातींत दाण्याला वरून काळें व घट्ट बोंड असतें.वाणी म्हणून एक जोंधळ्याची जात आहे. ती हुरड्याकरितां मुद्दाम पेरतात. दगडी, मालदांडी, गुळभेंडी, कावळी,रिंगणी वगैरे रब्बी हंगामांतील मुख्य जाती होत. रब्बी जोंधळ्याचें पीक महाराष्ट्रांत व निझामच्या राज्यांत बऱ्याच प्रमाणावर आढळतें. कोंकणांत जोंधळा फारच विरळा आढळतो.

ज्वारी कोणत्याहि जमिनींत होते. तरी या पिकास जितकी उत्तम जमीन असेल तितकी चांगली. रब्बी हंगमांतील ज्वारीस काळी चिकण जमीन चांगली. ज्वारीचें उत्तम पीक येण्यास २० ते ३० इंच पावेतों हंगमशीर पाऊस पडला पाहिजे. ज्वारी, कापूस, गहूं, हरभरा, जवस, वगैरेंशीं आळीपाळीनें पेरितात. खानदेशांत, मध्यप्रांतांत व वऱ्हाडांत उडीद, मूग, मटकी, व अंबाडी यांचा उतवडा असतो. गुजराथेंत व महाराष्ट्रांत तूर, उडीद, तीळ, मठ व मूग यांची मिसळ करतात. शाळू जोंधळ्यांत करडई व हरभऱ्याची मिसळ करितात. किंवा त्याचे शेतांत पाटे घालितात.

कापसानंतर ज्वारीचें पीक घेणें असल्यास कपाशीची जमीन खतवावी म्हणजे तेंच खत ज्वारीच्या पिकास उपयोगीं पडतें. पलाट्या वगैरे काढून झाल्यावर कित्येक लोक जमीन नांगरतात. परंतु सर्वसाधारण चाल उन्हाळ्या दिवसांत वरचेवर कुळवाच्या पाळ्या देणें ही होय. खत दिल्यास तें मात्र नांगरानें जमिनींत मिसळावें लागतें गुजराथेंत जमीन हलक्या नांगरानें नांगरतात व नंतर पाळ्या घालून ती चांगली तयार करतात. शाळूकरितां जमीन पावसांत नांगरून कुळवून तयार करितात. जमीन तयार झाली म्हणजे पाऊस पडून वाफसा झाल्यावरोबर ज्वारी पेरतात. खरीप ज्वारी पेरण्याचा हंगाम जूनअखेर पावेतो असतो. कांहीं जातींची ज्वारी जुलईत पेरली असतां चांगली येते. रब्बी जातींचा पेरा सप्टेंबर, आक्टोबरांत करितात.

जोंधळ्यांत काणी अगर काजळ्या रोग होऊं नये म्हणून पेरणीपूर्वी बीं मोरचुदाच्या पाण्यांत भिजवून मग पेरावें. मिश्रण करतांना पाण्यांत शेंकडा २ याप्रमाणें मोरचुदाची पूड मिसळावी. मिश्रणांत १० मिनिटें बीं ठेवावें व नंतर बाहेर काढून तें सावलींत वाळवावें व नंतर पेरण्यास घ्यावें.

दर एकरीं ६ ते ८ पौंड जोंधळा व सुमारें २ पौंड उतवडा लागतो. शहराशेजारील गांवांत जेथें कडबीची फार मागणी असते तेथें बियाचें प्रमाण दर एकरीं सुमारें ४० पौंडपावेतों असतें. दाट पेरा केला म्हणजे ताट बारीक येतें व तें गुरें मोठ्या आवडीनें खातात.

गुजराथेंत व खानदेशांत पेरणी दुसऱ्यानें करितात. दोन ओळींत १½ फूट अंतर असतें. वऱ्हाडांत आणि मध्यप्रांतांत बीं तिफणीनें पेरितात. व देशावर पाभरीनें पेरितात. पाभरीच्या नळ्यांत अंतर ९ इंच ते १ फूटपावेतों असतें बीं पातळ पेरलें म्हणजे कणसें मोठीं येतात. शाळूची पेरणी मोघडानें म्हणजे जड पाभरीनें करितात. कारण, दाणा खोल पडावा लागतो. ओळींत अंतर १६-२० इंच पर्यंत असतें. ज्वारीच्या पिकास दोन तीन कोळपण्या व एक भांगलणी देतात.

पांखरांपासून ( भोरड्या,चिमण्या, साळुंक्या वगैरे) ज्वारीची राखण सुमारें दोन अडीच महिने करावी लागते. कावळी म्हणून एक ज्वारीची जात आहे. तिचा दाणा भोंडांत असल्यामुळें तो पांखरांस खातां येत नाहीं. ही ज्वारी कधीं शेताच्या कडेनें पेरितात. खरीप ज्वारीचें पीक नोव्हेंबर व जानेवारींत होतें व शाळूचें फेब्रुवारी ते मार्चअखेर होते.

ज्वारीचें पीक तयार झाल्यावर ताटें उपटतात, किंवा कापतात. ताटें जाड व रांठ असल्यास तीं विळ्यानें कापतात. परंतु बारीक असल्यास कांहीं उपटतात व कांहीं कापतात. गुजराथ, खानदेश, मध्यप्रांत व वऱ्हाडप्रांतांतील कांहीं ठिकाणीं उंच जोंधळ्याची सुमारें २ ते ३ फूट उंचीचीं ताटें जमिनींत राखून वरील भाग कापून घेतात. शाळू जोंधळा बहुतेक उपटतात. नंतर त्याच्या पेंढ्या बांधून

४-५ दिवसांत वाळल्या म्हणजे कणसें खुडून घेवून तीं खळयांत नेऊन बैलांच्या पायांखालीं मळतात. तूर खेरीनकरून बाकी मिसळीचीं पिकें जोंधळयापूर्वीच निघतात. कित्येक वेळीं शाळूचीं कणसें पीक उभें असतानांच कापून घेतात पण सर्व साधारणपणें कणसें बैलांच्या पायांखालीं मळतात. हें मळण्याचें काम दगडी रुळानें फार कमी खर्चांत होतें इ. स. १९१३-१४ मध्यें जळगांव ( खानदेश जिल्हा ) येथील सरकारी शेतावर दगडी रुळानें मळणी केल्याचा तपशील खालीं दिला आहे.

| | बैलानें मळणी | दगडी रुळानें मळणी |
|---|---|---|
| कणसाचें वजन पौंड | ५६३९ | ५३६३ |
| दाणे वजन पौंड | ४५६० | ४३२० |
| मजुरी ८ तासास } माणसें | ३ | २ |
| मजुरी ८ तासास } बैल | ८ | २ |
| मळणीस वेळ,तास. | १४ | १७-२० |
| खर्च रुपये | ६-१४-३ | २-१३-१० |
| दर हजार पौं खर्च रु. | १-८-५ | ०-६-७ |

उपयोग—जोंधळयाच्या लाह्या, भाकरी, कण्या, वगैरे करून खातात. जोंधळयाचा दाणा कोंवळेपणीं भाजून खातात, त्यास हुरडा म्हणतात. वाणीचा हुरडा फार नरम व हिरवागार असतो. हिरवीं ताटें व वाळलेला कडवा हीं जोंधळा पिकणाऱ्या मुलखांतील मुख्य वैरण होय. दर एकरीं पेंढ्या सुमारें २५० त ४५० होतात. पेंढीचें वजन ३ ते ७ पौंड असतें. चांगल्या जोंधळयाचे दाणे तोळयांत २२० ते २३० भरतात. दर एकरीं उत्पन्नाचे सरासरीचे आंकडे पुढीलप्रमाणें:— ('आंकडे पौंडांचे आहेत )

| | |
|---|---|
| खरिफ जोंधळा | ६००—१००० |
| कडवीं | १५००—३००० |
| भुसकट | ३००—५०० |
| उडीद | १००—३०० |
| तूर | ७५—१०० |
| कडदणाचें भूस | ३००—५०० |
| रब्बी-शाळू, जोंधळा | ६००—७०० |
| कडवीं | १०००—१५०० |

क ड वा.—ज्वारीच्या पिकाचा दाण्याखेरीज कडव्याकरितांहि उपयोग होतो. ताटें चांगलीं पोसलेलीं व पक्क झालेलीं असावीं लागतात. मुंबई इलख्यांत हिरव्या ताटांचाहि कडवा काढतात. हिरवा कडवा असणाऱ्या ज्वारीच्या सहा जाती आहेत. (१) सुंठिया—ह्या ज्वारीचा कडवा उत्तम समजला जातो. (२) दुधिया ही ज्वारी खैरा व बडोदा प्रांतांत होते. (३) निळवा—ह्या ज्वारीचा कडवा दख्खनमध्यें उत्तम गणला जातो. (४) उतावळी—ह्या ज्वारीचीं कणसें चांगलीं भरत नाहींत. (५) व ( ६ ) काळबोंडी. या सर्व जातींची माहिती 'चारा' या लेखांत सांपडेल. या ज्वारीच्या सर्व जातींचा कडवा वजनदार असून त्यांत भरपूर रस असतो. हुंडी व काळबोंडी या ज्वारीचा कडवा उन्हाळयांत गुरांना टाकतात व त्यानें गुरें चांगलीं पुष्ट होतात. कडव्याकरितां पेरणी मे महिन्यांत सुरू करून ती जून व जुलै महिन्यांतहि चालू ठेविली असतां कडव्याची कापणी जुलैपासून मार्च व एप्रिलपर्यंत तीनदां होते; व कापणी करून वाळलेला कडवा चांगला सांठवितां येतो. कडवीची गंजी लावून ठेवितात. कित्येक ठिकाणीं लहान वरळीच्या आकाराची गंजी लावून ती मातीच्या ढेंकळांनीं दडपून ठेवितात. कित्येक ठिकाणीं सर्व गंजी चिखलानें लिंपून ठेवतात. त्यांस ठेवण पद्धत म्हणतात.

कि र ळ-वि ष.—शेतांत उभीं असलेलीं सरासरी एक दीड महिन्याच्या आंतील कोंवळया ज्वारीचीं ताटें जनावरांनीं खाल्लीं असतां त्यापासून त्यास होणारा जो रोग त्यास आपल्याकडील शेतकरी " किरळ " असें म्हणतात. कांहीं एका विवक्षित स्थितींत असतांना त्या कोंवळया ज्वारीच्या ताटांत एकप्रकारचें विष उत्पन्न होऊन त्या विषाची बाधा जनावरांस होते. आतां हें विष ज्वारीच्या ताटांत कसें पैदा होतें तें पाहूं. प्रत्येक ताटाच्या शरीरांत जीं अनेक द्रव्यें आहेत, त्यांत " ग्ल्युकोसाइड " या नावाचें एक द्रव्य असून त्याचे पुष्कळ प्रकार आहेत. त्यांपैकीं ज्यास 'ढुरिन' म्हणतात असें जें ग्ल्युकोसाइड आहे तें ज्वारीच्या ताटांत सर्व ठिकाणीं असून अवयवविशेषीं त्याचें प्रमाण मात्र वदलतेसें दिसतें. ज्या भागांत ग्ल्युकोसाइड असेल त्याच भागांत अवश्य पण वेगवेगळया परमाणूंत " एंझायम् "—ज्यास निरावयव अतिसूक्ष्मजंतु म्हणतां येईल असा पदार्थ-असतो; आणि ताटाच्या ज्या भागांत हे दोन पदार्थ असतील त्यास पाण्यांत घालून ठेंचून अथवा वाटून तें तयार झालेलें मिश्रण थोडावेळ ठेविलें असतां ग्ल्युकोसाइड व एंझायम् यांच्या परमाणूंचा संयोग होऊन त्यांचें " प्रुसीक ॲसिड " बनतें. त्याच्या फक्त एका बिंदूनें प्राण जातो; पण हेंच मिश्रण थोडें ऊन केलें असतां त्यांतील विष अगदीं नाहींसें होतें.

ज्वारीच्या इतर अवयवांपेक्षां तिच्या पानांत याचें प्राबल्य जास्त असतें. पण तें ताट जसजसें जून होत जाईल तसतसें त्या प्रुसिक ॲसिडचें प्रमाण कमी होत जाऊन तें शेवटीं अगदीं नाहींसें होतें. याकरितां कोंवळी ज्वारी जनावरास न खाऊं देण्याविषयीं शेतकरी नेहमीं काळजी घेत असतात. जर एखादें जनावर डोळा चुकवून कोंवळया ज्वारीच्या शेतांत गेलें आणि त्यानें तीं पानें नीट चावून गिळलीं तर त्या जनावराच्या पोटांतील पाण्याशीं तीं पानें मिसळून त्या ताटाचीं पानें फार विषारी असल्यास हें विष तयार होऊन त्यायोगें चार सहा दिवसांत तें जनावर ठार मरतें आणि विशेष विषारी नसल्यास जनावर एकदोन दिवस रेंगाळून पुन्हां सुधारतें. आतां कोणती जात कमी व कोणती जास्त विषारी आहे याबद्दल अद्याप पक्कें अनुमान लागलें

नाहीं, करतां कोंवळीं आहे तोंपावेतों कोणत्याच जातीची ज्वारी जनावरास खाऊं न देणें सुरक्षितपणाचें व शहाणपणाचें काम होय. ( केसरी ३०।१०।१९०६ )

कोंकणांत वरकस जमिनींत खरीप ज्वारीची लागवड करण्याचे प्रयोग यशस्वी झालेले आहेत. ' मानट ' किंवा ' मानवट ' जमिनींतूनहि शाळूची पिकें काढतां येतील कीं नाहीं याकडे शेतकीखात्याचें लक्ष लागलें आहे, हें त्यांच्या हस्तपत्रकांवरून दिसेल. [ वाट; शेतकी रिपोर्टें वगैरे. ]

**ज्वालामुखी**—हें प्रसिद्ध प्राचीन क्षेत्र असून त्या ठिकाणीं देवी वज्रेश्वरीचें देवस्थान आहे. पंजाबमधील कांग्रा जिल्ह्यांत, कांग्रा शहरच्या भवन नांवाच्या परिकरांत उ. अ. ३१° ५२' व पू. रे. ७६° २०' यांवर हें वसलें आहे. १९०५ सालच्या धरणीकंपानें याचा बराच नाश केला. हिंदूंच्या अग्न्युपासनेचें हें केंद्रस्थान आहे. गिझनिचा महंमद आणि फिरूज तघलख हे अनुक्रमें इ. स. १००९ आणि १३६० मध्यें नगरकोटवरील स्वारीच्या वेळीं येथें आले होते. फिरूझ तघलखाच्या स्वारीचा इतिहास देतांना शम्स-इ सिराज या इतिहासकारानें फिरूझ तघलखनें वज्रेश्वरी देवीला मान दिल्याबद्दलच्या गोष्टीचा पुढील शब्दांत निषेध केला आहेः—

" कांहीं काफर असें सांगतात कीं, सुलतान फिरूझ मुद्दाम येथील देवीची मूर्ति पाहण्यास गेला आणि त्यानें आपल्या हातानें देवीच्या डोक्यावर सोन्याची छत्री धरली. ...या काफरांनीं धार्मिक व पापभीरु सुलतानाची यायोगें निंदा केली आहे. दुसरे कांहीं काफर असें म्हणतात कीं, सुलतान महंमदशहा बिन तघलखशहा यानें याच देवीवर स्वतः छत्री धरली; पण हें खोटें आहे व चांगल्या मुसुलमानांनीं अशा विधानांनां कांहीं एक किंमत देऊं नये. " ( ईलियट—हिस्टरी ऑफ इंडिया, पु. २ व ३, लंडन, १८६७-१८७७ ).

या उल्लेखावरून असें दिसतें कीं मुसुलमान लोक सुद्धां हा भक्तिसंप्रदाय मान्य करीत अकबर बादशहाचा बखरकार अबुलफजल ' महामाया ' असा देवीचा नामनिर्देश करून या देवस्थानचें पुढीलप्रमाणें वर्णन करतो:—" पुष्कळ दूरदूरच्या भागांतून यात्रेकरू येथें येतात व आपली मनीषा पुरी करून घेतात. आपली प्रार्थना देवीनें ऐकून घ्यावी म्हणून ते स्वतःची जीभ कापून घेतात. कांहींच्या जिभा त्याच जागीं पुन्हां येतात तर कांहींच्या पुढें एक दोन दिवसांनीं येतात. औषधोपचारानें जीभ वाढण्याचें काम सुलभ होत असलें तरी इतक्या थोडया वेळांत ती येत असलेली पाहून मोठें आश्चर्य वाटतें. [ ऐने-इ-अकबरी याचें जारेटनें केलेलें भाषांतर, पु. २ ( कलकत्ता, १८९१ ) ३१२.]

गोपथ ब्राह्मणांतील कथा अबुलफजलनेंहि निर्दिष्ट केली आहे. ती कथा म्हणजे शिव आणि त्याचा श्वशुर दक्ष यांच्यामध्यें वैमनस्य असल्यानें दक्षानें त्याला आपल्या यज्ञास बोलाविलें नाहीं. तेव्हां शिवपत्नी उमा किंवा सती हिला अपमान वाटून तिनें आत्महत्या केली. तेव्हां विष्णूनें तिच्या शरीराचे तुकडे केले त्यांपैकीं जीभ या ठिकाणीं पडली असल्याचें सांगतात. वायुपुराणांत सुवक्ष आणि शिखिशैल या पर्वतांच्या शेजारीं एक शंभर योजनांचा सपाट प्रदेश असून त्या जमिनींतून ज्वाला बाहेर निघतात असें जें वर्णन आहे, तें निःसंशय ज्वालामुखीसंबंधींच होय. शीख गुरु अंगदशहा हा येथें आला असतां त्यानें येथील मूर्तिपूजेसंबंधीचा विधि नापसंत केल्याचें सांगतात.

सी. हुगेलनें येथील प्रवासाचें उत्तम वर्णन लिहून ठेविलें आहे ( ट्रव्हेल्स इन काश्मीर अँड पंजाब ). येथें देवीची मूर्ति वगैरे कांहीं एक नसून मुख्य देवळाच्या मध्यभागीं एक खड्डा आहे. त्याच्या दोन्ही बाजूला फकीर बसतात. खड्ड्याच्या आंतून एकसारखी ज्वाला वर येत असते. आणखी दोन ठिकाणींहि खडकांतून अशाच तऱ्हेच्या ज्वाला बाहेर पडतांना दिसतात. भाविक लोक देवळामध्यें शिरतांच पूजेचें साहित्य म्हणजे बहुधा फुलें या फकीरांच्या हातीं देतात व ते फकीर तीं प्रथम ज्वालेवर धरून नंतर देवळांत टाकून देतात. येथून जवळच साधु गोरखनाथाचें देऊळ आहे. हें ठिकाण पूर्वी बौद्धधर्मीय असल्यानें येथील ब्राह्मण भिक्षुकांनां कमी प्रतीचे लेखण्यांत येतेसें दिसतें. कारण मुख्य पुजाऱ्याला ' भोजकी पुजारी ' असें नांव आहे. ज्या ब्राह्मणांनां श्राद्धाच्या वेळीं यात्रेकरू जेऊं घालतात त्या ब्राह्मणांनां ' भोजकी ' हें गौणत्वदर्शक उपपद लावतात. ते मूळचे ब्राह्मण नसून शेतकरी जातीचे होते, पण पुढें देवस्थानाशीं त्यांचा संबंध आल्याकारणानें ते आपणाला ब्राह्मण म्हणवून घेऊं लागले असें सांगतात ज्वालामुखी देवीचा संप्रदाय बंगाल आणि दक्षिण येथेंहि पसरला असून खाखार नांवाचे रानटी याच नांवाच्या अग्निदेवतेचें भजनपूजन करतात.

**ज्वालामुखी**—ज्वालामुखी व याच वर्गांतील इतर चमत्कारांसंबंधीं एक मुख्य गोष्ट म्हणजे पृथ्वीच्या अंतर्भागांतून उष्ण पदार्थ वर येऊन पडणें ही होय. ह्या चमत्कारांपैकीं कांहींचे परिणाम थोड्या कालपर्यंत टिकणारे असतात, तर कांहींचे शाश्वत असून त्याचा पुरावा कायमचा राहतो व या दुसऱ्या तऱ्हेच्या चमत्कारांवरूनच भूस्तरशास्त्रवेत्त्यांनां ज्वालामुखींच्या संबंधीं खरी माहिती मिळते; कारण हजारों वर्षांपूर्वी जरी एखाद्या ठिकाणीं ज्वालामुखीचा स्फोट झालेला असला तरी तेथें असलेल्या अवशिष्ट चिन्हांवरून त्याचें अस्तित्व समजूं शकतें.

जागृतावस्थेंत असलेल्या ज्वालामुखीसंबंधीं माहिती दुरूनच गोळा करावी लागते म्हणून ती फारच अपुरी असते. परंतु निद्रित असलेल्या ज्वालामुखीजवळ जाऊन स्वस्थपणें सर्व बारीक गोष्टी पाहून व पूर्ण अभ्यास करून माहिती जमवितां येते. कांहीं ठिकाणीं पृथ्वीच्या पृष्ठभागांत पूर्ण क्रांति होऊन एखाद्या ज्वालामुखीचा तळ वर

पृष्ठभागावर आलेला दिसेल व ज्या भागाची माहिती जागृतावस्थेत कधींहि मिळणें शक्य नाहीं ती सहजच मिळूं शकेल. म्हणून शास्त्रज्ञांनीं फक्त जागृतावस्थेत असलेल्या ज्वालामुखींचाच अभ्यास करून भागत नाहीं तर ज्या ठिकाणीं निद्रितावस्थेत असलेल्या ज्वालामुखींचीं अवशिष्ट चिन्हें अगर खाणाखुणा सांपडतील त्या सर्व ठिकाणचीं माहिती त्यांनां मिळवावी लागते. म्हणजे ज्वालामुखीसंबंधीं खरें व सोपपत्तिक ज्ञान प्राप्त होतें. "ज्वालामुखी" म्हणजे निमुळता आकार असलेली टेंकडी अगर डोंगर असून त्याच्या शिखरामधून वायुरूप पदार्थ, राख किंवा वितळलेलें द्रवरूप पदार्थ मधून मधून बाहेर पडत असतात, व अशा बाहेर येणाऱ्या पदार्थांच्या संचयामुळेंच हा निमुळता आकार आलेला असतो; किंबहुना ही टेंकडी अगर डोंगर या पदार्थांचाच बनलेला असतो. त्याशिवाय पृथ्वीच्या अंतर्भागांतील पदार्थ ज्या इतर निरनिराळ्या तऱ्हेनें पृष्ठभागावर येण्याचा प्रयत्न करतात ते सर्व चमत्कार ज्वालामुखींच्या चमत्काराशीं बऱ्याच अंशीं संलग्न झालेले आहेत, व त्यांचा विचार ह्याच विषयाबरोबर केला पाहिजे.

हल्लीं जागृत असलेल्या ज्वालामुखींवरून सर्व तऱ्हेच्या ज्वालामुखींच्या संबंधानें यथार्थ कल्पना येणार नाहीं. एखादा ज्वालामुखी नवीन तयार होण्यापूर्वी पृथ्वीच्या अंतर्भागांत अतिशय दाबाखालीं असलेले वायुरूप पदार्थ घनपृष्ठभागांतून वर येण्याचा प्रयत्न करतात.

( १ ) कधीं कधीं हे पदार्थ घनपृष्ठांत विवर कोरून वर येतात व तसें होतांना हे घनपदार्थ अतिशय जोरानें वर फेंकले जातात, ( २ ) व केव्हांकेव्हां पृष्ठभागांत एखादी भेग अगर पोकळी तयार करून त्यांतून वायुरूप, घनरूप वगैरे पदार्थ बाहेर येतात. पूर्वेकडील अगर पश्चिमेकडील बहुतेक खंडांत निमुळत्या डोंगरांच्या ज्वालामुखींच्या ऐवजीं अगणित अशा भेगांतून हजारों चौरस मैलपर्यंत खडकांचा रस वर येऊन त्याचे सपाट थरच्या थर पसरलेले सांपडतात. अशा तऱ्हेचे स्फोट मनुष्याच्या आठवणींत फारसे कोठें झालेल्याचा दाखला नाहीं. फक्त १७८३ सालीं आइस्लंड बेटांत अशा तऱ्हेच्या भागांतून स्फोट झालेला नमूद केलेला आढळतो. पहिल्या तऱ्हेच्या ज्वालामुखींसंबंधीं पुष्कळच माहिती उपलब्ध आहे. कारण व्हेसुव्हिअस, एटना, लिपरी बेटें ह्या ठिकाणीं वरचेवर अशा तऱ्हेचे ज्वालामुखींचे स्फोट होत असतात म्हणून त्यांच्यासंबंधीं सांगोपांग माहिती जमा करितां आलेली आहे. परंतु दुसऱ्या तऱ्हेचे ज्वालामुखींचे चमत्कार (फिइयुअर एरप्शन) कोठेंच अलीकडे होत नसल्यामुळें त्यांचीं कारणें व कार्यें चांगलीशीं समजत नाहींत. प्रथमतःआपण व्हेसुव्हिअस वगैरे ठिकाणीं असलेल्या प्रकारच्या ज्वालामुखींसंबंधीं विस्तृतपणें विचार करूं व नंतर दुसऱ्या प्रकारासंबंधीं शक्य तेवढी माहिती देऊं.

ज्वालामुखींचा निमुळता आकार हा आंतून स्फोटाबरोबर निरनिराळे पदार्थ बाहेर पडून विवराच्या सभोंवार पडल्यामुळें स्वाभाविकपणें आलेला असतो. व्हेसुव्हिअस व त्याच्यासारख्या इतर ज्वालामुखींचा आकार म्हणजे शिखराप्रमाणें निमुळता होत गेलेला भाग, पण त्याचा वरील भाग मात्र नाहींसा झालेला असून वर द्रोणाकार खळगा असतो व त्यासच ज्वालामुखीचें मुख असें म्हणतात. ह्या मुखापासून खोल-लांबवर एक विवर असतें व त्याचा पृथ्वीच्या आंतील उष्णपदार्थापर्यंत संबंध असतो, तेव्हां त्यास एकच शिखर असून एकच मुख असतें. जेव्हां ज्वालामुखी फार मोठा असतो तेव्हां हें निमुळतें शिखर म्हणजे एक फार मोठा डोंगर असून त्याला पुष्कळ दुय्यम शिखरें व विवरें असतात, व ह्या सर्वांमधून स्फोट होत असतांना निरनिराळे पदार्थ बाहेर येतात. एटना पर्वत हें अत्यंत मोठ्या अशा ज्वालामुखीचें उत्तम उदाहरण आहे. हा पर्वत समुद्रसपाटीपासून १०८४० फूट उंच असून त्याला २०० दुय्यम शिखरें आहेत. कांहीं मोठमोठ्या ज्वालामुखींनां एक मोठें मुख असण्याऐवजीं त्यांचे स्फोट डोंगराच्या आजूबाजूनेंच होतात. ज्वालामुखीचे स्फोट होऊन जीं द्रव्यें बाहेर पडतात त्यांचे ४ वर्ग करितां येतील— ( १ ) वायुरूप पदार्थ, ( २ ) प्राणी, ( ३ ) वितळलेले खडक ( लाव्हा ) आणि ( ४ ) इतर घनरूप पदार्थ.

( १ ) वायुरूप पदार्थः—निरनिराळे वायू अगर निरनिराळे वायुरूप पदार्थ ( व्हेपर्स ) पृथ्वीच्या अंतर्भागांतील वितळलेल्या खनिज ( मोल्टन मॅग्मा ) द्रव्यांत विद्राव्यस्थितींत असतात, व ज्वालामुखीचे स्फोट होण्यास पुष्कळसे कारणीभूत होतात. यांतील कांहीं वायू स्फोटाच्या आरंभीं बाहेर पडतात तर कांहीं स्फोटाचा जोर व उष्णमान कमी होत आलें असतां बाहेर येतात. ह्या सर्व वायुरूप पदार्थांत अत्यंत महत्त्वाचा पदार्थ म्हणजे जलवायु ( वाटरगॅस ) हा असून शेंकडा ९९ ह्या प्रमाणांत असतो. याचें रूपांतर होऊन ( पाण्याची वाफ होऊन ) त्याचे ढग जागृत ज्वालामुखींच्यावर तरंगतांना दिसतात. अतिशय मोठमोठ्या ज्वालामुखींच्या स्फोटांच्या वेळीं फारच मोठ्या प्रमाणांत वाफ बाहेर पडून ती थंड होऊन मोठा पाऊस पडतो. एम. फोके नांवाच्या शास्त्रज्ञाचें असें म्हणणें आहे कीं, एटना पर्वताच्या एका दुय्यम ज्वालामुखीच्या स्फोटाच्या वेळीं १०० दिवसांत सुमारें ४६, २०,००,००० ग्यालन पाणी बाहेर पडलें. इ. स. १९०२ च्या मे महिन्यांत सेंट व्हिन्सेंट, व मार्टिनिक येथें जे प्राणघातक स्फोट झाले त्यांचें मुख्य कारण अशा तऱ्हेची अत्यंत उष्ण अशी पाण्याची वाफ हेंच होय. इतकेंच नव्हे तर शेंकडों वर्षे निद्रित असलेल्या नेपल्समधील सोल्फाटारा ज्वालामुखींतून कधीं कधीं नुसती पाण्याची वाफ एकसारखी पुष्कळ प्रमाणांत बाहेर पडते.

वाफेचे फवारे ज्वालामुखीच्या बाजूच्या अगर तळाच्या भेगांतून बाहेर येतात त्याच्याबरोबर एंजिनच्या शिटीप्रमाणें आवाज होतो. ही पाण्याची वाफ इतक्या मोठ्या प्रमाणांत बाहेर येत असते कीं ज्वालामुखीचे सर्व भाग झांकून गेलेले असतात व क्वचित प्रसंगीं जेव्हां वाऱ्यानें वाफ बाजूस जाते तेव्हां थोडासा भाग दृग्गोचर होतो. ही वाफ बाहेर पडत असतांना जो एकंदर गडगडाट चालू असतो त्यावरून कांहीं अंतरावर असणाऱ्या एखाद्या कारखान्याचा भास होतो. ही पाण्याची वाफ पुष्कळ काळपर्यंत ज्वालामुखी पर्वताच्या शिखरापासून लांब असणाऱ्या इतर थरांमधून येत रहाते. खडकांचा रस जो ज्वालामुखींतून बाहेर येतो, त्यांत पुष्कळच पाण्याची वाफ असते व त्याठिकाणीं वाफेचें उष्णमान फारच भयंकर असूं शकतें.

ही पाण्याची वाफ शुद्ध नसते, तर हींत दुसरे पुष्कळ वायू विरघळलेले असतात; व हे वायू निरनिराळ्या ज्वालामुखींतून निरनिराळे असूं शकतात. अतिशय उष्ण व अत्यंत जागृत अशा ज्वालामुखींतून सर्व तऱ्हेचे वायू बाहेर येत असतात; परंतु उष्णता जसजशी कमी होत जाते तसतसे हे वायुरूप पदार्थहि कमी होतात. व्हेसुव्हिअस पर्वताचा जो १८५५–५६ सालीं स्फोट झाला त्यावेळीं प्रथम येणाऱ्या वायूमध्यें, हायड्रोक्लोरिक, क्लोराइड्स, आणि सल्फ्युरस ॲसिड हे वायू होते, त्यानंतर पाण्याची वाफ व नंतर कारबन डाय ऑक्साइड व इतर ज्वालाग्राही वायू होते. अगदीं नवीन शोधांवरून असें दिसतें कीं, क्लोरीन ( व फ्लुरीन ) वायू बाहेर येतो तेव्हां स्फोटाची जागृत अवस्था असते. गंधकमय वायु येतांना त्याचा जोर कमी झालेला असतो, व कॅर्बानिक ॲसिड वगैरे येतांना तो स्फोट शेवटच्या अवस्थेंत असतो असें समजण्यास हरकत नाहीं. वूल्फ नांवाच्या शास्त्रज्ञानें असें पाहिलें आहे कीं, कोटोपॅक्सी येथील ज्वालामुखी पर्वताच्या शिखरामधून हायड्रोक्लोरिक ॲसिड, क्लोरिन हे वायू येतात व सल्फरेटेड हायड्रोजन, सल्फ्यूरस ॲसिड वगैरे वायू त्या डोंगराच्या मध्यावरून अगर उतारावरील भेगांतून बाहेर येतात.

समुद्राच्या तळाशीं जे ज्वालामुखी असतात त्याठिकाणीं सुद्धां अशाच पद्धतीनें निरनिराळे वायू बाहेर पडतात असें आढळून आलें आहे.वर नमूद केलेल्या वायुरूप पदार्थांशिवाय इतरहि पुष्कळ प्रकारचे वायू ज्वालामुखींतून बाहेर येत असतात, त्यांतील मुख्य म्हटले म्हणजे, नायट्रोजन, आयोडीन, ब्रोमीन, बोरिक ॲसिड वगैरे होत. पृथक्करणावरून असें आढळून आलें आहे कीं, या वर येणाऱ्या वायुरूप पदार्थांत वीस मूलभूत द्रव्यें अगर त्यांचेच एकमेकांशीं संयोग होऊन झालेले निरनिराळे पदार्थ असतात. हे वायुरूप पदार्थ वर येत असतांना त्यांची निरनिराळ्या खडकांवर रासायनिक क्रिया घडत असते, इतकेंच नव्हे तर त्यांच्या जवळपास असणाऱ्या वनस्पतींवर व प्राणिमात्रावरहि हानिकारक परिणाम होतो. यांतील कांहीं वायुरूप पदार्थ वर आल्यावर थंड होतात व घनीभूत होऊन त्यांचे निरनिराळे खनिज पदार्थ होतात.

( २ ) पाणीः—पुष्कळ ज्वालामुखींच्या स्फोटांबरोबर पाण्याचे लोटच्यालोट बाहेर पडतात. हें पाणी तीन निरनिराळ्या ठिकाणांहून येऊं शकतें. (अ) ज्या डोंगराच्या शिखरावर बर्फाचा संचय असतो त्या ठिकाणचा बर्फ ज्वालामुखीच्या उष्णतेनें एकदम वितळून त्याचें पाणी होऊन तें प्रवाहरूपानें वाहूं लागतें. आइस्लंडमधील एटना पर्वतावर व अँडीज डोंगरावरहि अशा तऱ्हेनें असलेले बर्फाचे थर ज्वालामुखीच्या स्फोटाच्या वेळीं एका रात्रींत वितळून त्यांचें पाणी होऊन वाहूं लागलेलें आढळलें आहे. (आ) स्फोट होत असतांना पाण्याची जी वाफ अतिशय मोठ्या प्रमाणांत वर येत असते ती थंड होऊन जलरूप होऊन प्रवाहांतून वाहूं लागते. ह्या तऱ्हेनेंच बहुतेक पाणी ज्वालामुखींच्या स्फोटांच्या वेळीं उत्पन्न होतें. (इ) पृथ्वीच्या अंतर्भागांत जे पाण्याचे संचय असतात त्यांतून अगर ज्वालामुखीच्या शिखरावर सरोवरांप्रमाणें जे पाण्याचे संचय असतात त्यांतून पाणी वाहूं लागतें. दक्षिण अमेरिकेंतील कांहीं ज्वालामुखींच्या शिखरांवर जीं सरोवरें आहेत त्यांतील माशांसह तें पाणी स्फोटांबरोबर वाहूं लागलेलें पुष्कळ वेळां आढळलें आहे.कधीं कधीं अशा तऱ्हेनें सरोवरांत असलेलें पाणी वाहून गेल्यानंतर पुन्हां कांहीं वेळानें तें भरून येतें, परंतु त्याचें उष्णमान मात्र कमी असतें. पुष्कळ वेळां ह्या पाण्यांत राख मिसळून त्याचा चिखल होऊन, चिखलाचेच प्रवाह वाहूं लागतात. कधीं कधीं पाणी व राख एकदम चिखलाप्रमाणें होऊनच बाहेर पडतात; व यांना मड्-लाव्हा,असें म्हणतात.ह्यांत पुढें वाळूच्या कणापासून तो दगडांच्या मोठाल्या तुकड्यांपर्यंत लहान मोठे दगड मिसळून ते वाळल्यानंतर त्यांचे ठिसूळ दगड तयार होतात.

(३) लाव्हा अथवा भूगर्भांतील द्रव्यांचा रसः—ह्याचें उष्णमान फार असून तो निरनिराळ्या घटक द्रव्यांचा असतो व तो द्रवरूप असल्यामुळें स्फोट होऊन बाहेर आल्यानंतर लांबवर वहात जाऊं शकतो. जसजसा हा रस थंड होत जातो तसतसा तो घट्ट होत होत त्याचे पुन्हां खडक होतात. लाव्हा द्रवरूप असतांना त्यांत निरनिराळे वायू कमजास्त प्रमाणांत मिसळलेले असतात; व त्याचप्रमाणें त्यांत निरनिराळीं रूपांतरें सांपडूं शकतात. कांहीं अत्यंत पातळ अगर पूर्ण द्रवरूप असतात, तर कित्येक मधाप्रमाणें मध्यम स्थितींत असतात व कांहीं तर जवळ जवळ घनरूप पदार्थांसारखे असूं शकतात.

ज्याप्रमाणें त्यांच्या घनस्थितींत फरक असतो त्याप्रमाणें त्यांचे आणखीहि पुष्कळ निरनिराळे गुणधर्म कमजास्त प्रमाणांत असूं शकतात. (अ) त्यांच्या विशिष्टगुरुत्वांत पुष्कळ फरक असूं शकतात व साधारणपणें तें २.३७ पासून ३.२२

पर्यंत असतें ( आ ) जड तऱ्हेच्या लाव्हांत लोहांश जास्त प्रमाणांत असतो व अम्ल पदार्थ कमी प्रमाणांत असतात. म्हणून त्यांनां 'बेसिक लाव्हा' असें म्हणतात. त्यांत वालुका द्रव्याचें ( सिलिका ) प्रमाण शेंकडा ४५ ते ५५ पर्यंत असतें. हलक्या जातीच्या लाव्हांत धातूंचे अंश कमी असून आम्ल पदार्थ जास्त असतात व त्यांनां 'ॲसिड लाव्हा' असें म्हणतात. ह्यांत सिलिकाचें प्रमाण शेंकडा ७० ते ७५ असावें. ह्या दोन जातींच्या लाव्हांशिवाय ह्यांच्या मध्यंतरींहि लाव्हा असतात. (इ) लाव्हांच्या रूपांतहि फरक असतात. कांहीं स्फटिकमय असतात, तर कांहीं कांचेप्रमाणेंच असतात व इतरांत लहान मोठीं छिद्रें असतात. ( ई ) त्यांचे रंगहि निरनिराळे असूं शकतात. काळा, पिंवळा, करडा, तांबूस वगैरे अनेक रंगांचे लाव्हा सांपडतात.

(४) खंडमय पदार्थः—या सदराखालीं ज्वालामुखीच्या स्फोटांच्या योगानें जे जे घनरूप पदार्थ बाहेर पडतात, त्या सर्वांचा समावेश होतो. उदाहरणार्थ, धूळ, रक्षा, वाळू अगर रेती, फोफाटा व लहान मोठे दगड. ह्या पदार्थांचे रंग, रूप, घनीभूत-द्रव्यें वगैरे अत्यंत निरनिराळीं असूं शकतात. एकाच ज्वालामुखीच्या स्फोटामुळें आलेले पदार्थहि अशा तऱ्हेनें भिन्न असूं शकतात. खालीं वर्णन केलेले ४–५ तऱ्हेचे पदार्थ जास्त महत्त्वाचे होत.

( अ ) रक्षा व धूळः—ह्यांचा रंग लांकूड अगर कोळसा जाळल्यानंतर मागें जो अवशेष राहतो त्यासारखा असतो, म्हणून त्यास रक्षा अशी संज्ञा दिली आहे. वास्तविक ही रक्षा नसून लाव्हा या पदार्थांचेच अत्यंत हलके असे परमाणू होत. हे इतके हलके व सूक्ष्म असतात कीं अगदीं बंद केलेल्या खोलींतहि आपला शिरकाव करूं शकतात व बंद केलेल्या पेटींतहि जाऊं शकतात. ही रक्षा किंवा धूळ वर येते तेव्हां तिचें उष्णमान बरेंच असतें व ही कधीं कधीं वाफेबरोबर मिसळून खालीं पडली म्हणजे जवळील पदार्थ करपून जातात.

( आ )लॅपिलीः—लहान वाटाण्याच्या आकारापासून तों आक्रोडाच्या फळाच्या आकारापर्यंत जे लहानमोठे तुकडे बाहेर येतात त्यांनां लॅपिली असें म्हणतात. हे तुकडे वर्तुलाकार अगर अणकुचीदार असूं शकतात. बहुतकरून हे जड असतात पण कधीं कधीं पाण्यावर सहज तरंगतील असे हलकेहि असूं शकतात; व अशा तऱ्हेचा स्फोट समुद्राजवळ झाल्यास समुद्राचे पृष्ठभाग तरंगत रहातात.

( इ ) सेओराईः—लाव्हा वर येऊन थंड होत असतांना खडबडीत असे जे दगड तयार होतात त्यांनां सेओराई असें म्हणतात. हा खडबडीतपणा येण्याचें कारण आंतील वायूंचें प्रसरण होय. अशा तऱ्हेचे दगड पुष्कळ वेळां स्फोटांबरोबर मोठ्या प्रमाणांत बाहेर पडतात.

( ई )ज्वालामुखी बाँबः—ज्वालामुखीच्या विवरांत लाव्हा प्रथम थंड होऊन त्याचे थर तयार झालेले असतात परंतु पुढील स्फोटांच्या वेळीं आंतून येणाऱ्या वाफेच्या योगानें हे दगडाचे थर फुटून त्यांचे तुकडे तुकडे वर फेंकले जातात. यांनां ज्वालामुखींतील बाँब असें म्हणतात. यांचा आकार लंबवर्तुळाप्रमाणें अगर गाईच्या कानाप्रमाणें असतो व यांची लांबी कांहीं इंचांपासून तो कांहीं फुटांपर्यंत असूं शकते. हे बहुतकरून भरींव असतात परंतु कधीं कधीं पोकळहि असूं शकतात. यांचा आकार कधीं कधीं फारच मोठा असतो. त्यापैकीं एकाची मापें ६×५×१ मिटर म्हणजे सुमारें २५ घनमिटर असून त्याचें वजन सुमारें ६८ टन भरतें.

( उ )ज्वालामुखींतील दगडः—हे दगड मोठ्या आकाराचे असून अणकुचीदार असतात. ज्वालामुखीच्या विवरांत घनीभूत झालेल्या खडकांचे हे तुकडे असतात. हे ज्वालामुखीचे स्फोट आरंभीच्या काळांत बाहेर पडतात व ज्वालामुखींत जवळपास कितीएक चौरसमैलपर्यंत प्रदेश आच्छादून टाकतात. अशा तऱ्हेनें हे जे दगडाचे तुकडे लांबवर पसरून पडलेले असतात व ते मोकळे न राहतां त्यांच्यावरील थराच्या खालच्या थरावर वजन पडून अगर चुन्यासारखे पदार्थ विरघळलेल्या पाण्याच्या क्रियेनें ह्या तुकड्यांचे पुन्हां खडक तयार होतात. यांनां ॲग्लोमेरेट (पिंडाकृति) अगर कॉन्ग्लोमेरेट असें म्हणतात. रक्षा, धूळ वगैरे इतर बारीक पदार्थांपासून जे खडक होतात त्यांनां टफ असें म्हणतात.

ज्वा ला मु खी ची क्रि या.—ज्वालामुखीची क्रिया दोन तऱ्हेची असूं शकते सतत चालू असणारी अगर नियमित कालानें उद्भवणारी. दोन्ही तऱ्हेच्या क्रियांचीं पुष्कळ उदाहरणें आहेत. भूमध्यसमुद्रांतील स्ट्रांबोली येथील ज्वालामुखी पहिल्या जातीचा आहे. म्हणजे हा नेहमीच जागृतावस्थेंत आहे. अर्थात ही जागृतावस्था कमी अधिक जोराची मात्र असते. सामोआ, टोफुआ, काटोपॅक्सी, येथील ज्वालामुखी सतत जागृतावस्थेंत असतात. परंतु अशीं उदाहरणें अपवादात्मकच होत. साधारण नियम म्हटला म्हणजे ज्वालामुखी कांहीं कालपर्यंत निद्रित असून मधून मधून कांहींकालपर्यंत जागृत होत रहतात.

साधारणपणें ज्वालामुखींच्या तीन अवस्था असतात व त्या त्या अवस्थेप्रमाणें त्यांचें वर्गीकरण करण्याची चाल आहे. ह्या तीन अवस्था म्हणजे (१) जागृत (२) धुमसत असलेला व (३) निद्रित अगर निवालेला. वरील तीन अवस्थांपैकीं पहिल्या अवस्थेंत असलेले ज्वालामुखी ओळखणें कठिण नाहीं. परंतु दुसऱ्या व तिसऱ्या अवस्थेंतील ज्वालामुखींचें वर्गीकरण करणें फार कठिण आहे. कारण कांहीं बाहेरून 'निद्रित' वाटणारे ज्वालामुखी कदाचित् आंत धुमसत असण्याचा संभव आहे व कांहीं दुसऱ्या अवस्थेंत असणारे ज्वालामुखी तिसऱ्या अवस्थेंत जाण्याच्या मार्गांत असतील.

शिवाय एखादा ज्वालामुखी ह्या तीन अवस्थांपैकीं प्रत्येक अवस्थेंत किती कालपर्यंत असतो हेंहि ठरलेलें नसतें. हें खालील एका ज्वालामुखीच्या इतिहासावरून लक्षांत येईल. इ. स. च्या पहिल्या शतकांत सोमा नांवाचा ज्वालामुखी पर्वत तिसऱ्या अवस्थेंत होता. तेथें कोणत्याहि तऱ्हेची उष्णता, ज्वाला वगैरे कांहीं अस्तित्वांत नव्हतें. त्याच मुखावर सर्व तऱ्हेची दाट झाडी असून तेथें लांडगे, डुकरें वगैरे श्वापदें वास करीत होतीं. परंतु इसवी सन ७९ च्या शरदृतूंत एकाएकीं मोठा स्फोट होऊन ज्वालामुखीच्या मुखाजवळील खडक उडून गेले व सध्याचा व्हेसुव्हिअस ज्वालामुखी तयार झाला व तेव्हांपासून आतांपर्यंत त्याचे स्फोट मधून मधून होतच असतात. परंतु इ. स. १५०० पासून इ. स. १६३१ च्या मधल्या १३१ वर्षांच्या अवधींत मुळींच स्फोट झाला नाहीं व वरील विवर जवळ जवळ पूर्णपणें भरून गेलें व वर कांहीं खाऱ्या व कढत पाण्याचे झरे हींच मात्र पूर्वीच्या जागृतावस्थेचीं अवशिष्ट चिन्हें शिल्लक राहिलीं. परंतु इ. स. १६३१ मध्यें मात्र फारच मोठा स्फोट होऊन हा निद्रितावस्थेचा काल संपला. सतराव्या शतकाच्या मध्यापासून आतांपर्यंत हा ज्वालामुखी मधून मधून सारखा जागृत होत असतो. हे स्फोट नेहमीं सारख्याच प्रमाणांत होत नाहींत, व त्यांच्या कमी अधिक शक्तीप्रमाणें त्यांनां तीन निरनिराळीं नांवें देण्यांत येतात, तीं अशीं—(१) सोलफाटारिक—अत्यंत कमी जोराचा स्फोट; आंतून वाफ व वायु येणें. (२) स्ट्राँबोलिअन—मध्यम जोरदार स्फोट—धूळ, दगड वगैरेंचा स्फोट होणें. (३) प्लिनिअन-अत्यंत जोरदार स्फोट—सर्व तऱ्हेचे पदार्थ बाहेर येणें.

ज्वालामुखीचे उद्भव होण्याचीं ठिकाणें.—भूस्तरशास्त्रज्ञांचें साधारपणें असें मत आहे कीं, ज्वालामुखीचा उद्भव होण्यास पृथ्वीच्या घनपृष्ठ भागांत कोठेंतरी एखादी भेग अगर फट असली पाहिजे; व ज्वालामुखीचा स्फोट होण्याची जागा ह्या भेगेवर अगर फटीवर सर्वांत कमजोर असणाऱ्या स्थलीं असते. कारण या ठिकाणीं आंतील विस्तृत होणाऱ्या वायुरूप पदार्थांनां सर्वांत कमी विरोध होतो. सध्यां अस्तित्वांत असणाऱ्या निरनिराळ्या ज्वालामुखींचें समुदायाकडे पाहिलें तर ते अशा मोठमोठ्या भूपृष्ठाच्या फटींच्या अगर भेगांच्या जवळपास असावे असें वाटतें. आल्यूशिअन व क्युराइल बेटें, जपान व ईस्टइंडीज व वेस्टइंडीजचीं बेटें, वगैरे ठिकाणच्या ज्वालामुखींच्या समुदायावरून असें दिसतें कीं, याच्या खालीं लांबवर गेलेल्या फटी असून यांतून ज्वालामुखींचे स्फोट होण्यास जागा असल्या पाहिजेत व हींच उदाहरणें ज्वालामुखींचा व भूपृष्ठांतील फटींचा संबंध दाखविणारा पुरावा म्हणून देण्यांत येतात. असें जरी असले तरी पूर्वी कोणत्याहि तऱ्हेची फट अगर भेग भूपृष्ठांत नसतांना सुद्धा नवीनच ज्वालामुखी उत्पन्न झाल्याचीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत.—

(१) नेपल्सच्या उपसागराच्या किनाऱ्यावर दोन दिवसांच्या अवधींत ५०० फूट उंचीचा मॉंटेनोव्हो नांवाचा ज्वालामुखी तयार झाला.

(२) इ. स. १७७० त सान साल्व्हाडोर शहराच्या पश्चिमेस ३० मैलांवर एका शेतीवाडीच्या मध्यभागीं एक नवा ज्वालामुखी उत्पन्न झाला. त्यावेळेपासून त्याचे मधून मधून सारखे स्फोट असतात व सध्यां त्याची उंची सुमारें ३००० फूट झालेली आहे.

(३) इ. स. १८८० च्या आरंभीं होपँगो सरोवरांत एक ज्वालामुखी उद्भवून त्यानें पांच एकर क्षेत्रफळाचें बेट तयार झालें व त्याची उंची १६० फूट होती.

ह्या उदाहरणांवरून असें दिसून येईल कीं, ज्वालामुखीचा स्फोट होण्यास भूपृष्ठांत पूर्वीच्या फटींची जरूरी नसते. आतां साधारण असें मत होऊं लागलें आहे कीं, ज्वालामुखीक्रियेच्या अंगीं भूपृष्ठांत नवीन विवर कोरून त्यांतून वर स्फोटकारक द्रव्यें फेंकण्याची पूर्ण शक्ति असते. व जुन्या ज्वालामुखीच्या निरीक्षणावरून आतां असें दिसून आलें आहे कीं, त्या ठिकाणीं पूर्वी भूपृष्ठांत भेग अगर फट नसावी. सर आर्चिबाल्ड गिकी, डॉ० लो, प्रो० ब्रांक वगैरे शास्त्रज्ञांनीं वरील मतास पुष्टिकारक असा बराच पुरावा गोळा केला आहे. अर्थात भूपृष्ठावर जर पूर्वीच्या फटी असतील तर अशा कमजोर पृष्ठांतून प्रथम ज्वालामुखीचा स्फोट होईल परंतु अशा फटींची ज्वालामुखीचा उद्भव होण्यास जरूरीच असते असें मात्र नाहीं; कारण आतां थंड झालेल्या पुष्कळ जुन्या ज्वालामुखीवरील भाग हवा, पाणी वगैरेंच्या क्रियांमुळें धुवून जाऊन त्यांच्या खालील पृष्ठभाग वर आलेले आहेत व त्यांच्या सूक्ष्म निरीक्षणावरून वरील मतास भरपूर पुरावा मिळाला आहे.

वरील विवेचनावरून एक महत्त्वाचें अनुमान निघतें तें हें कीं, पूर्वीची फट असल्याशिवाय जर विवर पाडून आंतील स्फोटकारक द्रव्यें बाहेर येत असतील तर या विवराची उंची फार नसावी. कारण जितका भूपृष्ठाचा थर जाड असेल तितकी तो भेदून बाहेर येण्यास शक्ति जास्त पाहिजे. म्हणजे ज्वालामुखीचा स्फोट होण्याची भूपृष्ठावरील जागा फार खोल नसावी. जमीनीच्या पृष्ठभागापासून कांहींशें फुटांपेक्षां हें स्थल जास्त खोल नसावें. शिवाय पाऊस पडणें व स्फोट होणें ह्यांचा जो संबंध लक्षांत आला आहे त्यावरूनहि वरील अनुमान खरें ठरतें. भूस्तरशास्त्राप्रमाणें निरनिराळे खडक निरनिराळ्या काळीं तयार झालेले आहेत. या वाटेल त्या काळीं तयार झालेल्या खडकांतून ज्वालामुखींचे स्फोट झालेले आढळतात. कांहीं ठिकाणीं ते ग्रॅनाईट व निसोज खडकांतून आलेले आहेत तर कांहीं ठिकाणीं तांबड्या कुरुंदाच्या खडकांतून आलेले आहेत; व कांहीं ठिकाणीं तर अगदीं अलीकडे तयार झालेल्या खडकांतहि ज्वालामुखींचे स्फोट झालेले आढळतात.

जा गृ त ज्वा ला मु खी ची ने ह मी ची स्थि ति.— जागृततावस्थेतील ज्वालामुखीच्या एकामागून एक होणाऱ्या दोन स्फोटांत जो कालावधी असतो त्यांत ज्वालामुखीचा जोर सारखा वाढत असलेला दिसतो. ज्वालामुखींचें जे द्रोणाकार मुख स्फोट झाल्यानंतर रिकामें झालेलें असतें, त्याचा पृष्ठभाग आंतील विस्तृत होत असणाऱ्या अंतर्द्रव्यांच्या उष्ण रसामुळें हळू हळू वर येतो. वायुरूप उष्ण पदार्थांचा सतत प्रवाह चालू असतो व कधीं कधीं त्याच्या बरोबर धूळ व दगड यांचाहि वर्षाव होतो. ह्या मुखाच्या पृष्ठभागावर ज्या भेगा असतात त्यांतून आंतील द्रव्यांचा लाल उष्ण रस दिसूं शकतो. ज्याठिकाणीं ह्या रसाचें उष्णतामान फार असतें त्याठिकाणीं हा रस फार द्रवास्थितींत असून सारखा जणू काय उकळत असतो व त्याच ठिकाणीं "उकळत असलेलीं सरोवरें" असतात. अशा तऱ्हेचें सरोवर किलौ येथें आहे. ह्या ठिकाणीं कित्येक एकरपर्यंत पसरलेल्या या शिजत असलेल्या रसांतून कारंज्याप्रमाणें हे द्रवस्थितींत असणारे खडक दूरवर फेंकले जातात व त्या उष्ण सरोवरांत पडलेले दिसतात. ह्या सर्व कालांत ज्वालामुखीच्या विवरांत भूपृष्ठाचा रस हळू हळू सारखा वर चढत असतो व एखाद्या कमजोर ठिकाणाहून संधि मिळतांच स्फोट होऊन वर येतो, किंवा आंतील दाब वाढून कठिण झालेल्या मुखाच्या पृष्ठभागांत विवर पाडूनहि स्फोट होतो.

ह वा मा ना चा प रि णा म.—स्फोट होण्यास काय काय गोष्टी कारणीभूत होतात अगर कोणत्या गोष्टींचा स्फोट होण्याशीं संबंध आहे ह्यासंबंधीं चांगलीशी माहिती उपलब्ध नाहीं. परंतु त्या त्या ठिकाणच्या हवेच्या दाबाशीं स्फोटांचा संबंध आढळून आला आहे. ज्याप्रमाणें हवेचा दाब कमी झाला असतां खाणींतील फायर डँप वायू जास्त प्रमाणांत बाहेर येतो त्याचप्रमाणें भूपृष्ठाच्या उष्ण रसांत जे वायुरूप पदार्थ असतात त्यावर हवेच्या कमी दाबाचा बराच परिणाम होत असला पाहिजे. कारण ह्या वायुरूप पदार्थांवर ज्वालामुखीची क्रिया बरीच अवलंबून असते. स्ट्रांबोली येथील ज्वालामुखीसंबंधीं असें आढळून आलें आहे कीं, ज्वालामुखीच्या आंतील वायुरूप पदार्थांचा दाब व हवेचा दाब हे दोन्हीं साधारण सारखे असतात. म्हणून हवेंतील दाबांत जेव्हां फरक होतो तेव्हां ज्वालामुखीचे स्फोट होतात. लिपारी बेटांतील कोळी लोकांच्या म्हणण्याप्रमाणें वादळी हवा असली म्हणजे ज्वालामुखींतून वाफ व दगड यांचा वर्षाव कोरडया हवेपेक्षां जास्त होतो. हवेच्या दाबाशिवाय आणखीहि कांहीं गोष्टींचा ज्वालामुखीच्या स्फोटावर परिणाम होत असला पाहिजे; व पावसाचा परिणाम बराच होत असावा असें दाखविणारा बराच पुरावा आहे. हावाई येथील ज्वालामुखीसंबंधीं जी माहिती गोळा केली होती तीवरून असें दिसून आलें कीं, १९ स्फोटांपैकीं १५ स्फोट पावसाळी हवा असतांना झाले. एटना व व्हेसुव्हिअस ह्या ठिकाणीं हिंवाळ्यांत अधिक स्फोट होतात असें आढळून आलें आहे. लारेंझो नामक शास्त्रज्ञाच्या मतें पावसाळी हवेचा स्फोटांशीं बराच संबंध आहे. १९०० सालीं स्ट्रांबोली येथील ज्वालामुखीचे मे व नोव्हेंबर महिन्यांत जे भयंकर स्फोट झाले ते अतिशय जोराच्या वृष्टीनंतर झाले हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे

जपानमधील स्फोट हिंवाळ्यांत जास्त होतात. क्लूग ह्या शास्त्रज्ञानें सूर्यावरील डाग व ज्वालामुखीचे स्फोट ह्यांचा संबंध दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. त्याच्या मतें ज्या वर्षी सूर्यावरील डाग कमी असतात त्या वर्षी पृथ्वीवर जास्त ज्वालामुखीचे स्फोट होतात. शिवाय त्याचें असेंहि म्हणणें आहे कीं, आगस्ट महिन्यांत जेव्हां जास्त तारे तुटून पडतात त्यावेळीं स्फोट जास्त होतात. परंतु या दोन्ही कल्पनांना फारसा दुजोरा मिळालेला नाहीं.

स्फो टां ची मु द त किं वा स्फो ट का ल.— पुष्कळ ज्वालामुखींचे स्फोट बरेचसे नियमित तऱ्हेनें होतात. नेहमीं जागृत असणाऱ्या स्ट्रांबोली येथील ज्वालामुखीचे स्फोट अगदीं नियमितपणें एक मिनिटाच्या अंतरापासून अर्ध्या अर्ध्या तासाच्या अंतरानें होतांना दृष्टीस पडत असतात. नेहमीं जागृत नसणाऱ्या ज्वालामुखींचे स्फोट सुद्धां असे नियतकालिक असलेले दिसून येतात. ज्वालामुखी जेव्हां इ. स. १८७३ च्या सप्टेंबर महिन्यांत जागृत झाला तेव्हां त्याचे स्फोट २० मिनिटांपासून अर्ध्या तासाच्या अंतरानें नियमितपणें होत होते. अशाच तऱ्हेचे नियमित स्फोट इ. स. १८८८ आगस्ट, ते मार्च १८९० पर्यंतच्या जागृतावस्थेच्या वेळींहि झालेले आढळले. ता. ११ फेब्रुवारीपासून ता. २४ मार्च (१८८९) पर्यंत तेथील स्फोटांचें रोजचें टिपण ठेवलें होतें. त्या मुदतींत तीन निरनिराळे कमजास्त जोराचे स्फोट आढळून आले. पहिला काल म्हणजे ता. ११ ते २३ फेब्रुवारी हा असून ह्या कालांत स्फोट वारंवार होत असत व त्यांचा जोरहि मध्यम होता व प्रत्येक तासांत सरासरी १२ स्फोट होत होते. दुसरा काल म्हणजे २४ फेब्रुवारी ते मार्च होय. ह्या मुदतींत होणारे स्फोट जरी जास्त जोरदार होते तरी दोन स्फोटांमधील काल जास्त होता. त्याचे तासी ७ स्फोट होत होते. तिसरा काल म्हणजे २२ मार्च ते २४ मार्चपर्यंतचा होय; व साधारणपणें दोन स्फोटांमधील काल ३ तासांपेक्षां जास्त होता.

एटना व व्हेसुविअस येथील ज्वालामुखींच्या स्फोटांसंबंधीं अशाच तऱ्हेचा नियमितपणा आढळून आला आहे. मि. व्हिंपर यानें सांगाई पर्वताच्या शिखरामधून अर्ध्या अर्ध्या तासाच्या अंतरानें वाफ वर येत असतांना पाहिली आहे व तसेंच कॅटोपाक्सी येथील मोठ्या ज्वालामुखीच्या मुखांतूनहि

अर्ध्या तासाच्या अंतरानें वाफेचे स्फोट होतांना आढळून आले.

हावाईमधील किलौआ ज्वालामुखीच्या स्फोटांमध्यें नियमितपणा दिसून येतो. परंतु येथील दोन स्फोटांमधील काल फारच मोठा आहे. साधारणपणें हा काल ३॥ वर्षांपासून १२॥ वर्षांपर्यंतचा असतो, व असें अनुमान आहे कीं, ह्या मुदतींत ह्या ज्वालामुखीचें विवर व मुख ४०० ते ५०० फूट खोलीपासून भरून येतें.

ज्वा ला मु खी चा स्फो ट घ डू न ये णा ऱ्या गो ष्टीं चा सा धा र ण अ नु क्र म — ज्वालामुखीचा स्फोट होणार हें दाखविणारीं पूर्वचिन्हें नेहमींच त्यांची अगाऊ सूचना देतात असें नाहीं. कोणत्याहि तऱ्हेचीं पूर्वचिन्हें अगर सूचना देण्यापूर्वी निरनिराळ्या भागांत कित्येक भयंकर स्फोट झाल्याचीं उदाहरणें आहेत.

हीं पूर्वचिन्हें अगर सूचना दोन गोष्टींवर अवलंबून असतात. ( १ ) भूपृष्ठाच्या पदार्थांच्या रसाची द्रवस्थिति (पातळ अगर घन स्थिति) व( २ ) ह्या भूपृष्ठस्थ पदार्थांच्या रसास वर येतांना होणारा अडथळा. हावाई येथें चालू शतकांत जे ज्वालामुखीचे स्फोट झाले ते भूकंप अगर इतर पूर्वचिन्हांशिवाय शांतपणें आंतील द्रव्याचा रस बाहेर येऊन झाले. कारण हा रस त्या ठिकाणीं अत्यंत द्रव स्थितींत म्हणजे पातळ असा आहे. परंतु त्याहि ठिकाणीं इ स. १८६८ मध्यें जो मोठा स्फोट झाला त्यावेळीं भूकंपाचे जोराचे धक्के बसले. व्हेसुव्हिअस ज्वालामुखी जागृत होण्यापूर्वी पुष्कळ वेळां तेथील विहिरींचें व झऱ्यांचें पाणी अगदीं आटतें अगर कमी होतें. परंतु ज्वालामुखीच्या जागृतावस्थेचीं नेहमींचीं पूर्वचिन्हें म्हणजे जमीनीची हालचाल होय. जमिनीच्या आंतून प्रथम हळूहळू गुरगुरण्यासारखा आवाज येऊं लागतो व नंतर तो आवाज वाढत जाऊन मेघगर्जनेप्रमाणें मोठा गडगडाट होऊं लागतो. पाठोपाठ लहान लहान धक्के बसूं लागतात व यांचा जोर व संख्या वाढत जाऊन चांगल्या भूकंपाचे धक्के बसूं लागतात.

ज्वालामुखीच्या द्रोणाकार मुखांतून वर येणारे वायुरूप पदार्थ जास्त प्रमाणांत येऊं लागतात. त्यामुळें भूपृष्ठाच्या पदार्थांचा उष्ण रस सारखा उकळत असल्याप्रमाणें अस्थिर असतो. आरंभीं हा भूपृष्ठ पदार्थांचा उष्ण रस थंड होऊन परत घनीभूत होऊन ज्वालामुखीचें द्रोणाकार तोंड बंद करतो व आंतील रस ज्वालामुखी पर्वताच्या बाजूस विवर पाडून त्यांतून बाहेर येऊन पर्वताच्या उतरणीवरून वाहूं लागतो. अगर ह्या रसांतील वायुरूप व द्रवरूप पदार्थांचा दाब इतका वाढतो कीं, ज्वालामुखीच्या तोंडावरील थंड व घनीभूत झालेला खडकांचा थर फोडून भयंकर स्फोट होऊन त्यांतून वाफेचे लोटच्या लोट वर येतात व नंतरःधुळीचे लोट येतात व लहानमोठ्या दगडांचीं वृष्टि होते. द्रोणाकार मुखाचा तळ व कडा अगर बाजू यांचा स्फोट होऊन तीं दूरवर फेकलीं जातात. ज्वालामुखीचा निमुळता शिखराकार भागहि नाहींसा होतो. हा अंतर्द्रव्याचा उष्ण रस बऱ्याच खोल ठिकाणाहून वर येतो व त्याबरोबर लाल, रसरशीत, वाटोळे अगर अणकुचीदार दगडाचे लहानमोठे तुकडे वर हवेंत फेंकले जातात.

हा खडकांचा उष्ण रस प्रथम लोखंडी रसाच्या नदीप्रमाणें जोरानें खालीं वाहूं लागतो. परंतु हळूहळू तो जसा थंड होतो तशी त्याची गति मंद होते. ह्या रसाचे पृष्ठभागांतून व ज्वालामुखीच्या द्रोणाकार तोंडातूनहि वाफेचे लोट वर येतात. व एकच जागृतावस्थेंत जे निराळे स्फोट होत रहातात त्यावेळीं धूळ, वाफेचे व दगडाचे तुकडे यांसह वर येणारे ढगच्याढग पर्वतशिखरावर दोन दोन मैल जागा व्यापून राहिलेले दिसतात. हळू हळू या स्फोटांची संख्या व जोर कमी होत जातो, खडकाचा उष्ण रस वर येण्याचें बंद होतें, दगड व धूळ यांची वृष्टि कमी कमी होत जाते व कांहीं कालानंतर तो ज्वालामुखी निद्रितावस्थेंत जातो. हा जागृतावस्थेचा काल कांहीं तास, दिवस अगर महिनेहि असूं शकतो.

परंतु ज्वालामुखीच्या स्फोटांचीं अशीं कांहीं उदाहरणें आहेत कीं, त्याठिकाणीं भूपृष्ठांतील पदार्थांचा रस मुळींच बाहेर आला नाहीं, तरी पण हे स्फोट अत्यंत नाशकारक होते. इ. स. १९०२ च्या मे महिन्यांत वेस्टइंडियन बेटांत जे अत्यंत हानिकारक स्फोट झाले त्यावेळीं खडक व उष्ण रसाची मुळीच वृष्टि झाली नाहीं. तरी या स्फोटांनीं मार्टिनीक मधील ३०००० लोकवस्तीचें सेंटपायरी गांव, (सेंट व्हिन्सेंटमधील बराचसा प्रदेश)२००० वस्तीसह थोड्याच मिनिटांच्या अवधींत नाश पावले. ह्यावेळीं अत्यंत उष्ण व लालभडक धूळ, वाळू व दगडांचे तुकडे यांचाच भयंकर वर्षाव झाला व यांतच उष्ण वायुरूप पदार्थांची भर पडली. ह्या सर्व पदार्थांचा इतक्या पुष्कळ प्रमाणांत वर्षाव झाला कीं, त्यांचे लोटच्या लोट प्रवाहाप्रमाणें वाहूं लागून वाटेंत येणाऱ्या सर्व पदार्थांचा नाश करीत होते. या वर्षावाबरोबर इतर काळेकुट्ट ढगहि वर येत असत. हे वायुरूप पदार्थ बहुतकरून वाफ व गंधकमिश्रित वायु ह्यांचें मिश्रण असावें व त्यांचा परिणाम द्रवरूप पदार्थप्रमाणें होत असावा.

भू पृ ष्ठा व री ल फ टी, भे गा (फिझ्युअर्स):—ज्या भूगर्भांतील शक्तीमुळें ज्वालामुखीचे डोंगर तयार होतात त्याच शक्तीच्या योगानें कधीं कधीं भूपृष्ठांत लांबवर मोठमोठ्या फटी ( खंदकाप्रमाणें ) तयार होतात. ज्वालामुखी उत्पन्न होण्याची क्रिया चालू असतां अशा फटी वारंवार ज्वालामुखीच्या आसमंतात उत्पन्न होतात. इ. स. १६६९ मध्यें ( एटना ) ज्वालामुखीचा जो स्फोट झाला त्यावेळीं त्या पर्वताच्या बाजूवर सहा समांतर फटी उत्पन्न झाल्या. ह्यांपैकीं एक फट ६ फूट रुंद असून १२ मैल लांब वळणें घेत घेत गेलेली होती. अशा तऱ्हेनें व्हेसुव्हिअस व इतर ज्वालामुखींच्या

जवळपासहि फटी तयार झालेल्या आहेत. सर्वांत मोठा व भयंकर असा ज्वालामुखीचा स्फोट म्हणजे इ. स. १८८३ च्या आगस्टच्या २६।२७ तारखेस झालेला सुंडा सामुद्रधुनींतील क्राकाटोआ ज्वालामुखीचा होय. कांहीं धरणीकंपाच्या धक्क्यानंतर त्या बेटाचा बराचसा भाग भयंकर कडकडाट होऊन ज्वालामुखीच्या जोरानें उडून गेला. हा कडकडाट इतका मोठा झाला होता कीं, तो १५० मैलांवरे ऐकू गेला व त्याच्या वेगानें शंभर मैल अंतरावर असणाऱ्या बटेव्हियांतील भिंती, खिडक्या यांना भेगा पडल्या. ह्या स्फोटाच्या वेळीं धूळ, राख, लहानमोठे दगड वगैरे जे पदार्थ बाहेर पडले, ते सुमारें १½ घनमैल असावेत. ह्या स्फोटामुळे समुद्रांत व हवेंतहि लाटा उत्पन्न झाल्या. हवेंतील लाटा सुमारें ¾ पृथ्वीच्या पृष्ठभागावर जाऊन आदळल्या. समुद्रांत उत्पन्न झालेल्या लाटांपैकीं, एक लाट नेहमींच्या भरतीच्या सपाटीच्यावर १०० फूट उंच जाऊन पुष्कळ लहानमोठया गांवांचा नाश झाला व सुमारें ३६,३८० लोक प्राणास मुकले. समुद्रांत उत्पन्न झालेल्या ह्या वादळाचे परिणाम ३८०० मैलांवर असणाऱ्या एडन बंदरांत व ४६९० मैलांवर असणाऱ्या दक्षिण आफ्रिकेंतील पोर्ट एलिझाबेथ येथेंहि पहाण्यांत आले. ज्वालामुखीच्या द्रोणाकार मुखाचा पृष्ठभाग उडणें अगर त्याच्या जवळील प्रदेश दुभंग होऊन तेथें खंदकाप्रमाणें फटी उत्पन्न होणें यास मुख्यतः दोन कारणें आहेत. (१) (अत्यंत दाबाखालीं असल्यामुळें) वायुरूप पदार्थांच्या भयंकर जोरानें भूपृष्ठ अगर बाजू दुभंगून त्यांतून स्फोट होतात; (२) भूपृष्ठांतील पदार्थांचा जो उष्ण रस वर येत असतो त्याची शक्ति अगर जोर हें दुसरें कारण होय. हा दाब सुमारें प्रत्येक चौरसफुटावर ८ टन वजनाइतका मोठा असतो. ह्या दोन कारणांपैकीं कधीं एकामुळें तर कधीं दोन्ही कारणांनीं आंतील द्रव्यें भूपृष्ठावर येऊन मोठमोठे डोंगर निर्माण होतात अगर अत्यंत लांबवर मोठमोठया भेगा भूपृष्ठावर उत्पन्न होतात. ह्या फटींतून अगर खंदकांतून भूपृष्ठांतील पदार्थांचा उष्ण रस वर येऊं लागतो व तो रस साच्यांत ज्याप्रमाणें थंड व घट्ट होतो त्याप्रमाणें त्या फटींत थंड होऊन घट्ट बनून त्याचे खडक होतात. व जेव्हां ह्या फटी ओळींत असतात तेव्हां हे खडक तट अगर भिंती घातल्याप्रमाणें दिसतात. ज्या ठिकाणीं या फटी भूपृष्ठाला समांतर अशा असतात त्या ठिकाणीं या खडकांचे सपाट असे थर होतात. सोमा व एटना पर्वतावर हे तट जुन्या ठिसूळ खडकांत मुद्दाम बांधिलेल्या भिंतीप्रमाणें निराळे प्रामुख्यानें दिसतात.

धू ळ व द ग ड ह्यां चा व र्षा वः—स्फोटामुळें अगर भूपृष्ठांत असणाऱ्या फटीमुळें पृष्ठभागाशीं आंतील उष्ण पदार्थांचें दळणवळण सुरू झालें म्हणजे प्रथम तो पृष्ठभाग ज्या खडकाचा असेल त्या खडकाचे लहान मोठे तुकडे मुखावाटे बाहेर येतात. मोठमोठ्या स्फोटांच्या वेळीं अत्यंत कठत व लाल असे तुकडे वर हवेंत फेंकले जातात व कांहीं परत द्रोणाकार मुखांत पडतात व कांहीं पर्वताच्या उतरणीवर पडतात.

सर डब्ल्यू. हॅमिल्टन याच्या लिहिण्यावरून असें दिसतें कीं, व्हेसुव्हिअस पर्वताच्या ( १७७९सालच्या ) जागृतावस्थेच्या वेळीं असे उष्ण दगड १०००० फूट उंच उडाले होते. मोठमोठे दगड तिरपे वर येऊन पुष्कळ अंतरावर जाऊन पडल्याचीं उदाहरणें आहेत. पाँपे शहर ज्या राखेच्या ढिगाखालीं पुरलें गेलें त्या राखेंत ८ पौंड वजनाचे दगड आढळतात. चिली बेटांतील एँटको पर्वतांतून निघालेले दगड ३६ मैलांवर जाऊन पडले असें म्हणतात, व काटोपाक्सी पर्वतांतून २०० टन वजनाचा दगड ९ मैल लांब जाऊन पडला; व जपानमधील आसामा डोंगरांतून ४० पासून १०० फूट व्यासाचे दगड वर आलेले आहेत. परंतु पुष्कळ ज्वालामुखींच्या जागृतावस्थेच्या वेळीं लहानमोठ्या दगडांशिवाय ज्वालामुखीच्या द्रोणाकार मुखांतून अतिशय बारीक अशा धुळीचे मोठमोठे लोटच्या लोट वर येऊन ते कित्येक मैल उंच हवेंत जाऊन नंतर ढगाप्रमाणें दूरवर पसरतात. ही धूळ किंवा राख इतकी बारीक असते कीं, अगदीं बंदोबस्तानें बंद केलेल्या पेटींत अगर घडयाळाच्या आंत ती सहज जाते. हे धुळीचे ढग इतके दाट असतात, कीं सूर्यप्रकाश नाहींसा होतो व ज्वालामुखी पर्वताच्या आसमंतात कित्येक दिवसपर्यंत रात्रीप्रमाणें काळोखच असतो. इ. स. १८२२मध्यें व्हेसुव्हिअस पर्वतांतून जी राख बाहेर आली तिचा जवळपासच्या प्रदेशांत तर जाड थर झालाच परंतु ती आस्कोली व कॅसानो ह्या दोन बाजूंस असणाऱ्या दोन गांवांपर्यंत लांबवर उडून गेली. हीं गांवें अनुक्रमें ५६ व १०५ इटालियन मैल दूर आहेत.

सर्वांत मोठा राखेचा वर्षाव म्हणजे १८३५ सालीं झालेल्या निकाराग्वा येथील कोसेग्विना येथील ज्वालामुखीच्या स्फोटाच्या वेळीं झालेला होय. त्यावेळीं ३५ मैल त्रिज्येच्या वर्तुलावरील प्रदेशावर पूर्ण अंधकार पडला आणि त्या डोंगरापासून ८ लीग किंवा २४ मैल अंतरामधील प्रदेशांत १० फूट उंचीचा थर सांचला व सुमारें २७० मैल व्यासाच्या प्रदेशांत हा वर्षाव झाला असावा असें अनुमान आहे. ह्या राखेपैकीं अत्यंत बारीक कण असलेली कांहीं राख इतकी उंच गेली कीं, ती हवेंतील वरील हवेच्या प्रवाहांत सांपडून पूर्वेकडे वहात जाऊन चार दिवसांनीं जमेका बेटांतील किंगस्टन या ठिकाणीं म्हणजे सुमारें ७०० मैलांवर जाऊन पडली.

इ. स. १८१५ मध्यें झालेल्या सुंबवा येथील स्फोटाच्या वेळीं सुमारें दहा लाख चौरस मैल प्रदेशावर धूळ व दगड यांची वृष्टि झाली, व ५० घनमैलांइतका धूळ व दगड यांचा वर्षाव झाला; व एका शास्त्रज्ञाच्या मतें ८५ व्हेसुव्हिअस पर्वताच्या आकाराएवढी वृष्टि झाली.

वरील विवेचनावरून कांहीं गोष्टी जास्त प्रामुख्यानें दृष्टोत्पत्तीस येतात. दगडांचे लहान मोठे प्रकार ज्वालामुखीचा जोर कमी असतांनाहि बाहेर फेंकले जातात. परंतु धूळ किंवा राख यांची वृष्टि फक्त ज्वालामुखी चांगल्या जागृतावस्थेंत असतांनाच होते. व बऱ्याच वेळां नवीन स्फोट होण्याचें कारण बऱ्याच दाबाखालीं असलेली वाफ, हेंच असतें.

धूळ, राख, लहानमोठे दगड यांचे थर सांचूनच ज्वालामुखीला शिखराप्रमाणें आकार आलेला असतो. जडजड पदार्थ अगदीं मुखाजवळ पडतात व हलके पदार्थ जरा अंतरावर पडतात व वरचेवर अशा पदार्थांचा वर्षाव होऊन ज्वालामुखीचा आकार व उंची ही वाढतात.परंतु या पदार्थांचे थर ज्वालामुखीपासून दूर अंतरावरहि सांचतात.

एक्वेडोरमधील सँगे येथील ज्वालामुखीच्या योगानें जवळपासचा प्रदेश ४००० फूट खोलीच्या राखेच्या ढिगाखालीं गडप झाला आहे. या ढिगांत अनेक प्रकारचीं झाडें व वनस्पती, प्राण्यांचीं अवशिष्टें अगर मनुष्यकृतीचे पदार्थ हे गडप झालेले सांपडतात. व अशा तऱ्हेचे थर म्हणजे ज्वालामुखीच्या स्फोटांचा पुरावाच होय. पण कधीं कधीं हे पदार्थ ज्वालामुखीपासून अतिशय दूर अंतरावर जाऊन पडतात. म्हणून असे थर सांपडले म्हणजे नेहमींच जवळपास ज्वालामुखी असलाच पाहिजे असें अनुमान काढणें चुकीचें होईल.

भू ग र्भ स्थ अ थ वा भू स्त र द्र व्य र सो द्भ व —ह्या उद्भवाचें मुख्य कारण म्हणजे ह्या दगडांच्या रसांत मिसळलेल्या वायुरूप पदार्थांचा विस्तार हें होय. व जरी कांहीं ठिकाणीं नुसतेच वायुरूप पदार्थ ज्वालामुखींतून वर येतात, तरी बहुतकरून त्यांच्या बरोबर भूस्तरद्रव्यांच्या रसाचाउद्भव होतोच. ह्या भूस्तर द्रव्यांच्या रसाचा तो वर येत असतांना ज्या विवरांतून तो वर येतो त्याच्या,बाजूवर अत्यंत दाब असतो. मागें सांगितल्याप्रमाणें १००० फूट उंचीच्या थराचा सुमारें ७० ते ८० टन वजनाइतका प्रत्येक चौरस फुटावर दाब असतो. इतक्या दाबाखालीं असलेल्या वायुरूप पदार्थांत अत्यंत शक्ति असते व त्यामुळें ह्या रस वर येऊन आगाऊ दुभंगलेल्या शिखराच्या बाहेरील बाजूच्या भेगांतून वाहूं लागतो. उंच ज्वालामुखी असला म्हणजे कधीं कधीं हा रस अगदीं ज्वालामुखीच्या तोंडापर्यंत येऊन तें पूर्ण भरून तो रस वरून वाहूं लागतो. परंतु बरेच वेळां कमजोर पृष्ठभागास विवर पडून अगर पूर्वीच्या भेगांतूनच हा रस बाहेर येतो. लहान ज्वालामुखी असली म्हणजे त्या ठिकाणीं हा रस वर तोंडापर्यंत येऊन वरील बाजूच्या भिंती अगर कडा कमजोर असल्यामुळें एखाद्या ठिकाणीं खिंड पाडून त्यांतून वाहूं लागतो. ह्या वितळलेल्या खडकांचा रस वर आल्याबरोबर त्यांतून पाण्याची वाफ व इतर वायुरूप पदार्थ बाहेर पडून त्यांचे ढग बनतात व त्या वहात असलेल्या प्रवाहाबरोबर त्यांच्यावर तरंगताना दिसतात. हे ढग या प्रवाहाबरोबर पुष्कळ लांब अंतरापर्यंत वर येत असतांना आढळतात.

भूस्तर द्रव्यांचा रस वर येण्याचें ठिकाण जर ज्वालामुखीच्या शिखरापासून बरेंच खालीं असेल तर हा रस अत्यंत जोरानें बाहेर पडत असल्यामुळें पुष्कळ उंचीपर्यंत वर उडून नंतर खालीं पडतो व अशा तऱ्हेनें वितळलेल्या दगडाच्या रसाचें कारंजेंच बनतें. अशीं कारंजीं इ. स. १७९४ मध्यें व्हेसूव्हिअस पर्वतावर व १८३२ सालीं एटना पर्वतावर उडत होतीं. मॉनलोआ येथें १८६८ सालीं ५०० पासून १००० फूट उंच उडणारीं अग्निरसाचीं कारंजीं कित्येक आठवडेपर्यंत उडत होतीं, तरी पण ह्या भूस्तर रसांचा उद्भव हे ज्वालामुखीचें कारण नसून एक कार्य आहे, व खरें कारण म्हणजे ह्या रसांत सांचलेले वायुपदार्थ हें होय.

हा अग्निरस बाहेर आला म्हणजे अत्यंत उष्ण असल्यामुळें पांढऱ्या रंगाचा दिसतो व मधाप्रमाणें अगर लोखंडाच्या रसाप्रमाणें वाहूं लागतो. लवकरच तो थंड होऊं लागून प्रथम त्यास लालभडक रंग येऊन नंतर काळसर रंग होतो; व जसजसा हा रस थंड होऊं लागतो तसतसा त्याचा वरील थर अधिक घनस्थितींत जाऊन त्यावर दगडहि तरंगू शकतो. वरील पृष्ठभाग जरी घनरूप होतो तरी खालील थर उष्ण व पातळ असतात, व त्यामुळें हा प्रवाह लांबवर वहात जातो. या अग्निरसाच्या प्रवाहाचा जोर व गति वाटेंतील अडथळ्यांच्यावर व उतारावर अवलंबून असते. प्रवाह चालू असतांना कर्कश आवाज उत्पन्न होतो. कांहीं प्रवाहांच्या पृष्ठभागावर फेंस आल्याप्रमाणें दिसतो तर कांहींवर सायीसारखा थर आलेला आढळतो. कांहीं ठिकाणीं हा रस थंड होतांना कांचेप्रमाणें बनतो तर कांहीं ठिकाणीं याला निरनिराळे आकार येतात.

अग्निरसाचा प्रवाह ज्या ज्या प्रदेशांत वहात जातो तो प्रदेश अत्यंत नाश पावलेला व भयाण असा दिसतो. या भूस्तर अग्निरसाचा प्रवाह सुरू झाल्यानंतर जास्त प्रदेशावर पसरतो व उतरणीवरून तो वेग कमी होत होत वाहूं लागतो. या प्रवाहाच्या बाजू व पुढील भाग तेथील रस थंड झाल्यामुळें एखाद्या किल्ल्याच्या तटाप्रमाणें दिसतात.

भू स्त र ( अग्नि ) र सा च्या प्र वा हा चा वे ग.— हा वेग भूस्तररसाच्या द्रव स्थितीवर,प्रवाहाच्या आकारावर व जमीनीचा उंचसखलपणा व उतार यांवर अवलंबून रहातो. म्हणून प्रवाहाच्या आरंभीं हा त्याचा वेग पुष्कळ असतो व व तो पुढें पुढें कमी कमी होत जातो, कारण आरंभीं हा रस अधिक पातळ असतो. कारण त्याला थंड होण्यास अवधि नसतो व आरंभीं जमिनीचा उतारहि जास्त असतो. सर्वांत पातळ व अतिशय वेगानें वहाणारा प्रवाह व्हेसुव्हिअस पर्वतावर इ. स. १८०५च्या आगस्ट महिन्यांत १२ तारखेचा होय. त्यावेळीं तो प्रवाह ४ मिनिटांत ३$\frac{1}{3}$ मैल लांब वहात

गेला; नंतर तो पसरट होऊन त्याचा वेग कमी झाला, तरी २ तासांत तो टॉरेडिल ग्रेको येथें जाऊन पोहोंचला

मॉनलोआ येथील प्रवाहाचा वेग ( १८५२ सालीं ) तासीं ७½ पासून १५ मैलप्रमाणें होता. ह्या प्रवाहाचे पृष्ठभाग थंड झाले तरी ते अत्यंत मंद गतीनें पुष्कळ दिवसपर्यंत वहात राहतात. इ. स. १८९५ च्या जुलैच्या ३ न्या तारखेस जो भूस्तर उष्ण रसाचा प्रवाह सुरू झाला तो पुढें चार वर्षेपर्यंत वहात होता; व त्याच्या योगानें एक ४०० फूट उंचीची काळसर दगडाची टेंकडी तयार झाली. कधीं कधीं वरून थंड व घट्टसर झालेल्या थरांतून आंतील पातळ रस वर येऊन पूर्वीपेक्षां अधिक वेगानें वाहूं लागतो. त्याचप्रमाणें प्रवाहाच्या मार्गांत एखादा तुटलेला कडा आल्यास प्रथम त्या ठिकाणीं प्रवाह आडलासा होऊन नंतर एकदम हा रस त्या उंच कड्यावरून खालीं पडूं लागतो व एक अग्निरसाचा धवधवाच सुरू होतो व त्यामुळें वाफेचे लोट, दगडांचा वर्षाव व या सर्व कारणांनीं अतिशय मोठा आवाज उत्पन्न होतो.

भू स्त र रसा च्या प्र वा हां चा आ का र.— कांहीं ठिकाणीं ज्वालामुखीच्या तोंडांतून हा रस आल्यानंतर डोंगराच्या पायथ्यापर्यंत न जातां जवळच थंड होऊन त्याचा कांचेसारखा पदार्थ होतो. परंतु इतर ठिकाणीं हे प्रवाह नुसतेच डोंगरांच्या पायथ्यांपर्यंत जातात असें नाहीं तर लांववर सपाटीवर कित्येक मैल वहात जातात. इ. स. १८६२ त एटना पर्वतांतून जो प्रवाह सुरू झाला त्यामुळें सुमारें ९ कोटी २० लक्ष घनमिटर इतका रस बाहेर आला. १८५२ सालीं ४२ कोटी घनमिटर व इ. स. १६६९ त ९८ कोटी घनमिटर आला. परंतु सर्वांत अत्यंत मोठा प्रवाह म्हणजे आइस्लंडमधील जोकुल पर्वताच्या १७८३ सालच्या स्फोटाच्या वेळचा होय. लाकी येथील भेगेतून १२ मैल लांबीचा प्रवाह वरचेवर वाहून नद्यांचीं पात्रें भरून कांहीं ठिकाणीं २०० फूट रुंद व ६०० फूट उंचीचे प्रवाह जाऊन सपाटीच्या प्रदेशांत पसरून १२ ते १५ मैल रुंदीचीं विसळलेल्या खडकांचीं सरोवरें बनलीं.

भू स्त र र सा चो नि र नि रा ळी द्र व स्थि ति.—सर्व ठिकाणीं भूस्तर रस जेव्हां वर येतो तेव्हां तो द्रवस्थितींत असतो. हा द्रवरूप पदार्थ कांचेसारखा मुख्यतः असून त्यांत निरनिराळीं खनिज द्रव्यें अत्यंत उष्णतेमुळें विरघळलेलीं असतात. परंतु हा रस पातळ अगर घट्टसर असा निरनिराळ्या परिस्थितीप्रमाणें असूं शकतो व ह्या द्रव स्थितींतील फरकाप्रमाणें या रसाच्या प्रवाहाची गति व विस्तार यांतहि बदल होतो. ट्राकाईट जातीचे खडक ज्या भूस्तर रसापासून झाले तो घट्टसर असला पाहिजे व त्यांत वालुकामय पदार्थ जास्त प्रमाणांत असून त्यांचें विशिष्टगुरुत्व, कमी असतें. काळ्या दगडाच्या जातीचे जे खडक तयार होतात ते पातळ रसापासून होतात, त्यांत लोहांश जास्त असून त्यांचें विशिष्टगुरुत्व जास्त असतें व या रसाचे थर फार जाड नसतात. ह्या द्रवस्थितींतील फरकाचीं कारणें. उष्णमान कमीअधिक असणें व त्यांतील रासायनिक द्रव्यांत फरक असणें हीं होत. ह्यांशिवाय कांहीं शास्त्रज्ञांच्या मतें आणखी एक कारण म्हणजे त्यांत असणाऱ्या वाफेच्या व इतर वायुरूप पदार्थांच्या प्रमाणांतील फरक हे होय.

या भूस्तररसाच्या द्रवस्थितीप्रमाणें त्यापासून होणारे परिणामहि निरनिराळे होतात. उदाहरणार्थ, अत्यंत (पातळ) द्रवस्थितींत ह्या अग्निरसाचीं कारंजीं असूं शकतात. कांहीं ठिकाणीं त्यापासून दुय्यम ज्वालामुखीचीं शिखरें तयार होतात व त्यांपासून निघणाऱ्या प्रवाहांची गति व विस्तार यांत त्याच्या द्रवरूप स्थितीप्रमाणें बदल होतो.

भू स्त र र सा पा सू न स्फ टि क.—लोंहरसासारखा हा भूस्तर रस बाहेर पडल्याबरोबर घट्ट होऊं लागून त्याचा वेग कमी होतो. ऑबसिडीअन व इतर कांचेप्रमाणें दिसणारे खडक त्यापासून तयार होतात तरी पण त्या खडकांचें सूक्ष्मदर्शक यंत्रांतून निरीक्षण केल्यास त्यांत अत्यंत सूक्ष्म असे स्फटिक तयार झालेले दिसतात. इतकेंच नव्हें तर हा भूस्तर रस पूर्णपणें थंड होण्यापूर्वीच त्यांत बारीक बारीक स्फटिक तयार झालेले आढळतात. कदाचित् हा रस ज्वालामुखींतून बाहेर येण्यापूर्वीच त्यांत स्फटिक तयार होऊं लागत असावेत व स्फटिकमय रस व स्फटिकाशिवाय असलेला रस असे त्याचे विभाग होऊन स्फोट होतांना दोन निरनिराळ्या वाजूस हे निरनिराळे रस बाहेर येतात. विन स्फटिकाच्या रसापासून कांचेप्रमाणें व अम्लपदार्थ जास्त असलेले खडक तयार होतात व त्याच्या उलट जातीचे खडक स्फटिकमय रसापासून होतात.

ज्या भूस्तर रसांतून वायुरूप पदार्थ जास्त प्रमाणांत बाहेर येतात त्यांत स्फटिक फारसे तयार होत नाहींत. मुख्यत्वेंकरून हा रस थंड होण्यास जो कमीजास्त वेळ मिळतो त्यावरच स्फटिक तयार होणें अगर न होणें हें अवलंबून असतें. जाड थर असल्यामुळें ज्या ठिकाणीं हा रस थंड होण्यास पुष्कळ काळ लागतो. त्या ठिकाणचे खडक पूर्णपणें स्फटिकमय होतात व अगदीं पातळ थर असल्यामुळें जेथें भूस्तर रस तावडतोव थंड होतो त्या ठिकाणीं त्यापासून कांचेप्रमाणें स्फटिकविरहित खडक तयार होतात. व ही गोष्ट पृष्ठभागानजीक असलेल्या व खोल असलेल्या, जुन्या ज्वालामुखीपासून तयार झालेल्या खडकांच्या थरांचें निरीक्षण करून सिद्ध झालेली आहे.

भू ग र्भां ती ल र सा चें उ ष्ण मा न.—इ.स. १८५५ मध्यें स्काकी व सेंट क्लेअरडेव्हिल ह्या शास्त्रज्ञांनीं व्हेसुव्हिअस येथें कांहीं प्रयोग करून पाहिले. बाहेर येणाऱ्या भूगर्भांतील रसांत चांदी, लोखंड व तांबें ह्या धातूंच्या बारीक तारा धरल्या होत्या. त्यावेळीं सुमारें १२२८° अंश इतकें उष्णमान आढळून आलें.

परंतु १८१९ साली केलेल्या प्रयोगाच्या वेळीं $\frac{1}{30}$ इंच जाडीची चांदीची तार ह्या रसांत धरल्याबरोबर तावडतोब वितळली, म्हणजे त्याचें उष्णमान निदान १८००° अंश असावें, इतकेंच नव्हे तर तांब्याची तार सुद्धां वितळली तेव्हां त्याचें उष्णमान २२०४° अंश असावें. हें उष्णमान बरेंच आधिक असावें याला दुसराहि पुरावा आहे. टॉरेडेल ग्रेको येथें या भूगर्भांतील रसांत कांहीं घरेंच गडप झालीं. त्याठिकाणीं पुढें असें आढळून आलें कीं, या रसाच्या योगानें पितळेचें पृथक्करण होऊन त्यांतील तांब्याचे स्फटिक तयार झाले व तसेंच चांदीहि वितळून तिचे स्फटिक तयार झाले, व गारगोटीसारख्या दगडाचे कांठहि थोडेसे वितळले. सांटोरिन येथील भूगर्भांतील रसांत जे चुन्याचे दगड सांपडले त्यांचें रूपांतर होऊन निरनिराळीं स्फटिकमय खनिज द्रव्यें तयार झालीं. व्हेसुव्हिअस पर्वतांतून जो रस वाहेर येतो त्याचें उष्णमान आरंभीं सुमारें २०००°अंशापेक्षां जास्त असावें.

भू ग र्भां ती ल र सा च्या प्र वा हा ची जा डी व (स पा टी) उ त र ण अ ग र क ल.—एके काळीं असा समज होता कीं, ज्वालामुखी पर्वताच्या उतरणीवर भूगर्भांतील रस थंड होऊन त्याचे थर तेथें राहूं शकणार नाहींत व म्हणून ज्वालामुखीच्या उत्पत्तिसंबंधीं जी उपपत्ति लावीत असत तींत असें समजत कीं, ज्वालामुखीच्या स्फोटानंतर हा ज्वालामुखी पर्वत भूगर्भांतूनच सगळा खालून वर येतो. परंतु सर्व ठिकाणच्या निरीक्षणावरून असें आढळून आलें आहे कीं, ही उपपत्ति बरोबर नसून भूगर्भांतील रस या सर्व डोंगराच्या उतरणीवर थंड झाल्यामुळें घनभूत होऊन त्याचे थर होऊं शकतात. ३५° अंशापासून ४०° अंशांपर्यंत जरी ही उतरण असली तरी त्याठिकाणीं थर राहूं शकतात.

हावाई बेटांतील डोंगराची उतरण २५°अंश आहे. तीवर ह्या भूगर्भांतील रसाचे थर होऊन राहिलेले आहेत. व्हेसुव्हिअस येथें ३०° अंश उतरणीवर थर बनलेले आढळतात. एटना पर्वताची पूर्वेकडील उतरण १७°पासून ४८° अंशांइतकी मोठी आहे तरी तेथें देखील या रसाचे थरच्या थर थंड होऊन राहिले आहेत व त्या थरांची साधारण जाडी १६ फूट आहे. परंतु मॉनालोआ येथें तर ४९° अंशांपासून ९०° अंशांइतक्या उतरणीवर म्हणजे तुटलेल्या कड्यावर हा रस थंड होऊन त्याचे थर होऊन राहिले आहेत. अगदीं सपाट दिसणार्‍या भूपृष्ठावरहि ह्या भूगर्भांतील रसाचा प्रवाह लांब अंतरावर गेलेला आढळतो. फार तर त्याची उतरण १° अंशांइतकीच असेल. त्या थरांच्या जाडींत पुष्कळ बदल असूं शकतो. अत्यंत द्रवस्थितींत असलेल्या रसापासून १० ते १२ फूट जाडीचे थर झालेले आहेत तर घट्टसर रसापासून शेंकडोंशें फूट जाडीचे थर झालेले दर्‍यांतून आढळतात.

भू ग र्भां ती ल र सा च्या प्र वा हा ची र च ना.—हे प्रवाह कधीं कधीं सजातीय असतात, परंतु बहुतकरून त्यांत निरनिराळे तीन थर तयार झालेले असतात. अगदीं तळाशीं असलेला थर ओबडधोबड असा असतो; आणि मधला व मुख्य थर चांगला पूर्ण घनरूप झालेला असून त्यांत बारीक बारीक छिद्रें असतात व वरील थर दगडाच्या लहानमोठ्या तुकड्यांचा झालेला असतो. ह्या निरनिराळ्या थरांत छिद्रें असण्याचें कारण त्यांत अडकून राहिलेली पाण्याची वाफ हें होय.

भू ग र्भ स्थ र सां ती ल वा यु रू प प दा र्थां चें घ नी भ व न.—पाण्याच्या वाफेशिवाय पूर्वीं भूगर्भांतील रसांत मिसळलेले असे पुष्कळ पदार्थ प्रथम वायुरूपानें खडकांत असणार्‍या भेगांतून अगर दुय्यम मुखांतून बाहेर येतात व वरील हवेच्या योगानें थंड होऊन त्यांचें घनपदार्थांत रूपांतर होतें. ह्या पदार्थांपैकीं, मुख्य पदार्थ म्हणजे मीठ अगर सैंधव हा होय. त्याची बारीक भुकटी अगर लहान मोठे स्फटिक झालेले ह्या भेगांच्या जवळपास अगर भूगर्भांतील रसाच्या पृष्ठभागावर सांपडतात. त्याचप्रमाणें क्लोराईड ऑफ आयर्न आणि क्लोराईड ऑफ कॉपर हेहि पदार्थ निरनिराळ्या रंगाचे सांपडतात. नवसागर, गंधक, तुरटी व हिराकस आणि इतर खनिज पदार्थ ज्वालामुखीच्या आसमंतात आढळतात.

भूगर्भांतील रस निवण्यास फारच वेळ लागतो. ह्या रसाच्या प्रवाहाचा पृष्ठभाग प्रथम घनभूत होतो. ह्या घनभागांतून उष्णता फारच थोड्या प्रमाणांत बाहेर जाऊं शकते. म्हणून वरील पृष्ठभाग चालतां येईल इतका जरी थंड झाला तरी त्याच्या खालीं थोड्याच इंचांवर अत्यंत उष्ण असा अग्निरस असूं शकतो. व ह्या प्रवाहाचें एकंदर उष्णमान जवळपासच्या जमीनीइतकें होण्यास पुष्कळ वर्षें लागतात. एटना पर्वताच्या एका स्फोटानंतर ११ महिन्यांनीं ह्या प्रवाहाच्या तळाशीं उष्ण रस दिसत होता व त्यांत काठी धरली असतां तिनें पेट घेतला. व्हेसुव्हिअस येथील १७८५ च्या स्फोटानंतर सात वर्षांनीं तेथील भूगर्भांतील रस उष्ण असलेला व त्यांतून वाफ बाहेर पडत असलेली आढळली. परंतु सर्वांत आश्चर्यकारक उदाहरण म्हणजे मेक्सिकोमधील जोरुलो पर्वताचें होय. त्या ठिकाणीं १७५९ सालीं स्फोट झाला. त्यानंतर २१ वर्षांनीं तेथील भेगांतून असलेल्या उष्णरसामुळें चिरूट पेटवितां येत असे. ४४ वर्षांनंतरहि वाफ बाहेर पडतांना दिसत होती व ८७ वर्षांनंतर सुद्धां दोन वाफेचे लोट बाहेर पडलेले आढळले.

वरील उदाहरणांवरून हा भूगर्भांतील रस किती हळू हळू थंड होत असतो ह्याची सहज कल्पना येते व अशा तर्‍हेच्या पुराव्यावरून शास्त्रज्ञ लोक भूगर्भांतील द्रव्यें अत्यंत उष्णस्थितींत द्रवरूप असलीं पाहिजेत असें म्हणतात.

भू ग र्भ स्थ र स प्र वा हा चा स भों वा र च्या भू पृ ष्ठा व र व पा ण्या चे प्र वा ह व सं च य यां व र हो णा रे प रि णा मः—भूगर्भांतील रसाचा प्रवाह वाहूं लागला म्हणजे तो पाण्याच्या प्रवाहांत आडवा पसरून त्याचा जणूकाय तालतयार

होऊन त्या प्रवाहाचें तळें अगर सरोवरच बनतें. कधीं कधीं सबंध प्रवाहाचें पात्रच त्या रसानें भरून त्यावर कित्येक फूट उंच खडकाचे थर तयार होतात व जें पात्र तयार होण्यास हजारों वर्षें लागलीं असतील तें थोड्या कलाकांच्या अवधींत भरून नाहींसें होतें. अशा तऱ्हेनें, पाण्याचे लहानमोठे प्रवाह, तळीं अगर सरोवरें, दऱ्या वगैरे बुजून जाऊन त्या प्रदेशांतील भूपृष्ठांत क्रांति घडून येते, प्रवाहांच्या दिशा बदलतात व कांहीं नवीनच प्रवाह सुरू होतात. दुसऱ्या तऱ्हेनें कार्य म्हणजे या भूगर्भांतील रसाचा भूपृष्ठावर होणारा परिणाम हें होय. निरनिराळ्या खडकांचें रूपांतर होतें. पूर्वीच्या घटकद्रव्यांत फरक होऊन त्यांची निराळी रचना होते. असें जरी आहे तरी कांहीं भाग जसेच्या तसेच राहूं शकतात, व त्याठिकाणीं असलेलीं झाडें व वनस्पतीहि जिवंत राहूं शकतात. कांहीं ठिकाणीं वर्फाच्या जाड थरावर या उष्ण रसाचा परिणाम न होतां व हे थर न वितळतां कित्येक दिवस तसेच रहातात.

भू पृ ष्ठ व र ये णें खा लीं जा णें अ ग र उं च स ख ल हो णें.—जमीनीच्या सपाटींत होणारा फरक समुद्रकांठीं सहज लक्षांत येतो. कारण समुद्राच्या पाण्याच्या सपाटीपासूनच नेहमीं सर्व ठिकाणांची उंची मोजतात. ज्या ठिकाणीं समुद्रांत असणाऱ्या वनस्पतींचीं अगर प्राण्यांचीं अवशिष्टें सांपडतात त्या ठिकाणीं जमीन समुद्रांतून वर आली असली पाहिजे. याचा चांगला पुरावाच आहे व अशा तऱ्हेचा पुरवठा एटना, व्हेसुव्हिअस व भूमध्यसमुद्रांतील इतर ज्वालामुखींच्या जागीं सांपडतो. म्हणजे हे ज्वालामुखी प्रथम समुद्रांत उत्पन्न होऊन जमीन वर येत येत तयार झाले असले पाहिजेत. ज्याप्रमाणें कांहीं ज्वालामुखीजवळचा प्रदेश वर आलेला आढळतो त्याचप्रमाणें कांहीं दिवस स्फोट झाल्यानंतर पुष्कळ ज्वालामुखींचे प्रदेश खालीं गेलेले आढळतात. हें जमीनीच्या खालीं जाणें समुद्राजवळच्या प्रदेशांत लवकर ध्यानांत येतें, कारण तेथें पाणी चढलेलें दिसतें. १८६६–६७ सालीं सांटोरिन येथें अशा तऱ्हेनें जमीन खालीं गेली. ज्वालामुखींचा प्रदेश अशा तऱ्हेनें सखल होण्यास दोन कारणें आहेत. एक (१) ज्वालामुखींतून जे पदार्थ अतिशय मोठ्या प्रमाणांत वर येऊन पडतात त्यांच्या वजनामुळें परिणाम होऊन जमीन खालीं दबली जात असावी व (२) दुसरें कारण असें कीं, ज्वालामुखींतून पुष्कळ पदार्थ बाहेर आल्यामुळें खालीं पोकळी होत असावी व त्यामुळें वरील वजन सहन न झाल्यामुळें पृष्ठभाग खालीं जात असावा.

पा ण्या चे व चि ख ला चे लों ढे:—पुष्कळ ज्वालामुखींच्या स्फोटाबरोबर पाण्याचे लोट बाहेर पडतात. शांत झालेल्या ज्वालामुखींच्या द्रोणाकार मुखांचीं मोठमोठीं सरोवरें झालेलीं असतात व कांहीं ज्वालामुखींच्या शिखरावर वर्फाचें आच्छादनहि तयार होतें. नवीन स्फोट होतांना या सरोवराचें पाणी अगर वर्फ वितळून त्याचें पाणी प्रवाहरूपानें एकदम वाहूं लागतें, अगर आंतून येणाऱ्या राखेंत मिसळून चिखल होऊन त्याचा लोंढा वाहूं लागतो. या चिखलाच्या लोंढ्यापासून कधीं कधीं फारच हानि होते, कारण ते बरेच द्रवरूप असल्यामुळें एकदम जलद वाहूं लागून वाटेंत येणाऱ्या पदार्थांचा नाश करतात. मोठमोठ्या दऱ्या भरून जातात व उतरणीवरून खालीं येतांना त्यांच्या बरोबर लहानमोठे दगड, झाडें अगर इतर पदार्थ वाहून खालील सपाट मैदानावर येऊन पडतात. १८७९त झालेल्या स्फोटाच्या वेळीं असाच चिखलाचा मोठा लोंढा आल्यामुळें हरक्युलेनियम येथील घरेंच्या घरें त्याच्याखालीं बुडून गेलीं. व त्यामुळें त्यांतील पुष्कळ वस्तू चांगल्या स्थितींत आज उपलब्ध आहेत. अशा तऱ्हेचे लोंढे मध्य व दक्षिण अमेरिकेंतील ज्वालामुखींच्या मधून पुष्कळ वेळां आल्याचीं उदाहरणें आहेत. वरील दोन्ही तऱ्हेच्या लोंढ्यापैकीं, चिखलाच्या लोंढ्यांपासून जमीनीच्या पृष्ठभागावर एकदम कायमचे परिणाम होतात. पूर्वीच्या दऱ्या, प्रवाह वगैरे बंद होऊन नवीन प्रवाह सुरू होतात.

ज्वा ला मु खी चें वि व र बं द हो ण्या चा प रि णा म.—ज्वालामुखीचा जोर कमी झाला म्हणजे आंतून येणारे पदार्थ विवरामध्येंच घनस्थितींत जातात व अशा तऱ्हेनें ज्वालामुखीचें तोंड बंद करतात. तरी आंतील शक्ति पूर्णपणें नाहींशी झालेली नसते व ती आंतील द्रव्यें वर ढकलण्याचा प्रयत्न करीत असते. अशा वेळीं जर जवळपासच्या खडकांत भेगा असल्या तर त्यांत हा रस जाऊन तेथें त्याचे खडक बनतात अगर दोन थरांच्यामध्यें शिरून तेथें तिसरा थर बंद होतो.

ज्वा ला मु खीं ती ल वा यु रू प प दा र्थ.—ज्वालामुखीचा जोर कमी होत चालला म्हणजे वायुरूप पदार्थ बाहेर येतात. नेपल्सजवळील सोल्फटोरा पर्वतावर ११९८ सालच्या स्फोटानंतर नेहमीं अशा तऱ्हेचे वायुरूप पदार्थ बाहेर येत असतात. व्हल्कयानो बेटावरहि आतां असेच वायुरूप पदार्थ बाहेर येतात. तरी अद्याप तेथें मधून लहान लहान स्फोटहि होतात. हे वायुरूप पदार्थ वर आल्यावर थंड झाल्यामुळें घनरूप अगर द्रवरूप होतात, अगर एकमेकावर त्यांच्या क्रिया होऊन रासायनिक पदार्थ तयार होतात. गंधकाच्या धुरापासून तेजाब तयार होतें. व त्याची खडकावर व इतर जवळपासच्या पदार्थांवर क्रिया घडते व त्यामुळें हे खडक पांढरे अगर पिवळे होतात. शिवाय गंधकाच्या धुरापासून गंधकाचे थर तयार होतात. तसेच सिलीकाचे थरहि पुष्कळ बनतात. याशिवाय जिप्सम, ॲलम (तुरटी), सल्फाईड्स ऑफ आयर्न ॲंड कॉपर व बोरॅसिक ॲसिड वगैरे पदार्थ या वायुरूप पदार्थांच्यापासूनच थंड झाल्यावर तयार होऊन पुष्कळ ज्वालामुखींच्या आसपास सांपडतात व कांहीं ठिकाणीं यांचा मोठा व्यापार चालतो. याशिवाय कार्बन डायाक्साईड म्हणून जो विषारी वायु

बाहेर येतो तो कांहीं ठिकाणीं फार प्रमाणांत येत असल्यामुळें तेथें कोणतेंहि प्राणी राहूं शकत नाहींत. यांपैकीं प्रख्यात जागा म्हणजे जाव्हा बेटांतील मृत्यूची दरी ही होय. या ठिकाणीं हा विषारी वायु पुष्कळ प्रमाणांत येत असल्यामुळें त्याच्या जवळपास जाणारे वाघ, अस्वलें, हरणें, डुकरें वगैरे प्राणी मरून त्यांचे सांगाडे पडलेले दिसतात.

उ ष्णो द का चें का रं जें.—अशा तऱ्हेचीं कारंजीं आइस्लंड बेटांत पुष्कळ आहेत. उष्णोदकाच्या झऱ्यांत व यांत फरक असा आहे कीं, याठिकाणीं कांहीं ठराविक कालानंतर उष्णोदक व वाफ यांचे फवारे कित्येक फूट उंच हवेंत उडतात. तसेंच यांचा आकार बाहेरून निमुळता असा असतो व झऱ्यांचा भूगर्भाच्या आंतील भागांशीं खोल विवरांच्या योगानें निकट संबंध असतो. ह्या पाण्याबरोबर येणाऱ्या घनपदार्थांचे थर ह्या कारंज्यांच्या सभोंवार सांचल्यामुळें त्यांना वर सांगितलेला निमुळता आकार आलेला असतो. प्रथम अंतर्भागांतून गुरगुर असा आवाज कांहीं कालपर्यंत ऐकून, त्या विवरांत जरा मोठासा गडगडाट होतो; व पृष्ठभागावरील झऱ्याचें पाणी खवळूं लागतें. नंतर उष्णोदक व वाफ यांचे फवारे मोठ्या आवाजासरसें उंच हवेंत उडूं लागतात. अमेरिकेंतील यलोस्टोन पार्क येथील ओल्ड फेथफुल नांवाचें कारंजें फार प्रख्यात आहे. ह्याठिकाणीं सुमारें एक कलाकाच्या अंतरानें वर वर्णन केल्याप्रमाणें उष्णोदक व वाफ यांचे फवारे मोठा आवाज होऊन सुमारें शंभर फूट उंच हवेंत पांच मिनिटांपर्यंत उडत असतात.

आइस्लंड बेटांतील ग्रेट गेशर येथें कांहीं शास्त्रज्ञांनीं ह्या कारंज्यांच्या उष्णमानासंबंधीं प्रयोग करून पाहिले त्यावरून असें दिसतें कीं, वर पृष्ठभागावर आल्यानंतर पाण्याचें उष्णमान ( २१२° अंश ) असतें, परंतु उष्णमापक यंत्र जेव्हां खोल विवरांत सोडून पाहिलें तेव्हां असें आढळून आलें कीं, तेथील उष्णतामान थोड्याशा खोलीवर बरेंच अधिक (२२६° फा. अंश) होतें. आतां या उष्णतामानास पाणी द्रवस्थितींत असूं शकतें नाहीं, परंतु हा जो विवरांत उंच पाण्याचा थर असतो त्याच्या दाबाखालीं असल्यामुळें तें द्रवरूप असूं शकतें व वर आल्यावर दाब कमी झाल्यामुळें त्याची वाफ होऊं लागते व खालील पाण्यावरीलहि दाब एकदम कमी झाल्यामुळें पाण्याची वाफ होऊन ती जोरानें वर येऊन दाबाखालीं असल्यामुळें हवेंत उंच उडते. तेव्हां असें दिसतें कीं, कारंजीं उडण्याकरितां लागणारी शक्ति या दाबाखालीं असलेल्या वाफेपासून प्राप्त होते; व ही शक्ति इतकी मोठी असते कीं हिच्या योगानें नुसतें पाणी व वाफच वर हवेंत फेंकलीं जातात असें नाहीं तर मोठाले दगडहि शंभर फूट उंच फेंकले जातात. या पाण्याबरोबर त्यांत विरघळलेले कित्येक क्षार व खनिजद्रव्यें वर येतात. दर दहा हजार पाण्याच्या भागाबरोबर सुमारें १२ भाग घनपदार्थ वर येतात. यांपैकीं मुख्य म्हणजे वालुकामय पदार्थ सोडिअम कार्बोनेट,मीठ हीं होत.हे घनपदार्थ वर आल्यावर झऱ्यांच्या काठांवर यांचे थर तयार होतात व त्यांवर सूक्ष्म वनस्पती उगवून त्यांत भर पडते. कांहीं कालानंतर अंतर्भागांतील रचनेंत फरक झाल्यामुळें ह्या कारंज्यांचा जोर कमी होत होत तीं उडेनाशीं होतात व आंतील विवर वालुकामय पदार्थांचा थर सांचून कायमचें बंद होतें, व पृष्ठभागावर फक्त ह्या घनपदार्थांचे जे निमुळते थर तयार झालेले असतात तेवढीच यांचीं अवशिष्ट चिन्हें म्हणून राहतात.

चि ख ला चे अ ग र मा ती चे ज्वा ला मु खी.—या प्रकारच्या ज्यालामुखींतून वायुरूप पदार्थ बाहेर येतात. ह्यांचा आकार निमुळत्या शिखराप्रमाणें असून हे ३ फुटांपासून १०० फुटांपर्यंत उंच असतात. ह्यांतून निरनिराळे वायुरूप पदार्थ कांहीं ठराविक कालानंतर येतात, व कांहीं कालपर्यंत हे निद्रित असतात. ह्यांतून येणाऱ्या वायूमध्यें मार्शगॅस, कार्बन डायाक्साईड, हायड्रोकारबन्स, नैट्रोजन, पेट्रोलियम वायू हे मुख्यत्वें असतात. चिखलाबरोबर क्षारयुक्त पाणीहि येतें. चिखल बहुतकरून थंड असतो. मोठ्या पावसानें हे लहान सहान ज्वालामुखी धुवून जाऊन सपाट प्रदेश होतो; व पुन्हां स्फोट होऊन पूर्वीच्या आकाराचे ज्वालामुखी होतात. अशा तऱ्हेचे ज्वालामुखी, सिसिली, कॉकेशस, सिंधूचें मुख वगैरे ठिकाणीं आहेत.

ज्वा ला मु खी प र्व तां ची र च ना.—अर्वाचीन कालांतील ज्वालामुखींच्या फक्त पृष्ठभागावरील भागांची रचना आपल्याला चांगली कळूं शकेल. परंतु प्राचीन कालांतील ज्वालामुखीच्या आंतील भागांतहि वरील भाग नैसर्गिक शक्तींच्या योगानें नाहींसे झाल्यामुळें दृष्टोत्पत्तीस येतात. म्हणून त्यांची अंतर्रचनाहि कळूं शकते. परंतु आपण फक्त अर्वाचीन ज्वालामुखींचाच विचार करूं. अशा ज्वालामुखींतून बाहेर पडणाऱ्या पदार्थांची दोन निरनिराळ्या पद्धतींनीं रचना होते. हे पदार्थ जर एका मध्यवर्ती मुखांतून वर येत असतील तर त्याच्यापासून निमुळता शिखराकार ज्वालामुखी होतो, परंतु हे पदार्थ जर भूपृष्ठांतील भेगांतून वर येत असतील तर त्यापासून सपाट असें मैदानच तयार होतें.

ज्वा ला मु खीं चीं शि ख रें.—शिखराकार ज्वालामुखीबद्दल पूर्वी बरेंच विवेचन केलेलें आहे. एखाद्या पूर्वी अस्तित्वांत असलेल्या विवरामधून अगर नवीन विवर पाडून ज्वालाग्राही पदार्थ वर येतात. त्यांतील घनपदार्थ वर आल्यावर ते ह्या विवराच्या सभोंवार पडून त्यांची कड तयार होते व जसजसे जास्त जास्त पदार्थ वर येतील तसतसे ते सभोंवार पडून निमुळत्या शिखराप्रमाणें त्यांची रचना होते, व हळू हळू त्या आकाराची टेंकडी अगर पर्वत तयार होतो. अर्थातच एकामागून एक असे जे स्फोट होतात व त्याच्या बरोबर जे पदार्थ बाहेर येतात त्यांच्या थरामुळेंच या टेंकड्या अगर डोंगर झालेले असतात. असें होत असतांना वरील पदार्थांचे थर अगदीं

मोठ्या उतरणीवरहि राहतात. ह्या पर्वताच्या थरांचें सूक्ष्म निरीक्षण केलें असतां असें आढळून येतें कीं, हे उंचवटे अगर पर्वत घन द्रव्यांचे निरनिराळे थर पूर्वीच्या पृष्ठभागावर सांचून तयार झाले आहेत. हे थर उतरणीवर राहूं शकतात ही गोष्ट अंतर्द्रव्यांचा रस ज्वालामुखींतून बाहेर पडल्यावर उतरणीवर कसा थंड होतो हें प्रत्यक्ष स्फोट होत असलेल्या ज्वालामुखींच्या उदाहरणांवरून सिद्ध झालें आहे.

नेहमीच्या ज्वालामुखींच्या शिखरावरील टोंक नाहींसें झालेलें असतें व त्या ठिकाणीं द्रोणाकार खळगा असतो. यासच आपण मुख असें म्हणतों. हा वर्तुलाकार सर्व ठिकाणीं वायूरूप पदार्थांचा सारखाच दाब असल्यामुळें आलेला असतो. हें मुख अतिशय लहान आकारापासून फार विस्तीर्ण असें असूं शकतें व त्याचप्रमाणें याची खोलीहि पुष्कळ असते. ज्याला चिखलाचे ज्वालामुखी म्हटलें आहे त्या ठिकाणच्या मुखाचा व्यास व खोली कांहीं इंच असते. परंतु हा व्यास कांहीं ठिकाणच्या ज्वालामुखींवर कित्येक मैल लांबीचा असून त्याची खोली हजारों फूट आहे. मुखाच्या सभोंवार तटबंदीप्रमाणें भिंती तयार झालेल्या असतात. शांत झालेल्या ज्वालामुखीच्या मुखाचा तळ बहुतकरून सपाट असा असतो, व त्यांतून बरेच वेळां वायू वर येतात. मुख असलेल्या ज्वालामुखींवर या एका मुख्य मुखाशिवाय दुसरीं दुय्यम मुखें असतात. कधीं कधीं हीं दुय्यम मुखें मुख्य मुखाएवढींहि असतात. सर्वच ज्वालामुखींनां मुखें असतात असें नाहीं.

ज्वालामुखींच्या मुखांचीं झालेलीं सरोवरें.—ज्वालामुखींचा स्फोट होऊन वरील भाग उडून गेल्यामुळें द्रोणाकार खोल असें मुख तयार होतें. त्यांत पाऊस पडून पाणी सांचतें व त्याचें सरोवरच बनतें. अर्थातच अशीं सरोवरें शांत झालेल्या ज्वालामुखींवरच होतात. ईफेल ह्या ठिकाणीं इटलींत पुष्कळ ठिकाणीं अशीं सरोवरें आहेत. हिंदुस्थानांत अशा तऱ्हेचें सरोवर मुंबई व नागपूर ह्यांच्यापासून सारख्या अंतरावर लोणार सरोवर म्हणून प्रसिद्ध आहे. येथील खडक दक्षिणेंतील काळ्या दगडाचा आहे. हें सरोवर वर्तुलाकार असून त्याचा व्यास १ मैलापेक्षां जास्त आहे आणि तें ३००–४०० फूट खोल आहे. ह्याच्या तळाशीं क्षारयुक्त पाण्याचा संचय आहे. उत्तरेकडील बाजूशिवाय इतर सर्व बाजूंनीं काळ्या दगडाची कड अगर भिंत आहे. ही भिंत ४०–५० फुटांपासून कांहीं ठिकाणीं १०० फुटांपर्यंत उंच आहे.

नेहमीच्या ज्वालामुखींच्या शिखरांशिवाय इतरहि निरनिराळीं शिखरें असतात. ( १ ) कांहीं शिखरें ज्वालामुखींतून आलेल्या पदार्थांचीं नसतात तर पूर्वी अस्तित्वांत असलेल्या खडकांतून वायुरूप पदार्थ येत असतांना झालेलीं असतात. ( २ ) दुसऱ्या जातीचीं शिखरें ज्वालामुखींतून येणाऱ्या राखेचीं व लहान सहान दगडांचीं झालेलीं असतात. ह्यांनां टफ कोन्स व सिंडर कोन्स असें म्हणतात. ( ३ ) चिखलापासून झालेलीं लहान मोठीं शिखरें हीं निराळ्या प्रकारचीं होत. व ह्याशिवाय ( ४ ) लाव्हा कोन भूगर्भांतील द्रव्यांच्या रसापासून झालेलीं शिखरें सर्वांत मुख्य होत. शिखरें निरनिराळीं एकावर एक पडून बनलेलीं असतात. हे थर निरनिराळ्या मजल्याप्रमाणें अगर पायऱ्याप्रमाणें रचले जातात.

समुद्रांतील ज्वालामुखी.—ज्वालामुखींचा उद्भव समुद्राच्या तळाशींहि होऊं शकतो इतकेंच नव्हे तर ह्या समुद्रांतील ज्वालामुखींचा जोर अधिक असतो. अगदीं अर्वाचीन काळांतहि अशा तऱ्हेचे ज्वालामुखी समुद्रांत उत्पन्न झाल्याचीं उदाहरणें आहेत. १७८३ सालीं आइस्लंड बेटाच्या पश्चिमेस ३० मैलांवर एक ज्वालामुखीचा स्फोट झाला. त्याबरोबर एक नवीन बेट तयार झालें आणि तेथून धूर व ज्वाला वर येऊं लागल्या परंतु सुमारें एक वर्षांत लाटांच्या योगानें वरील भाग फुटून वाहून गेला व तेथें फक्त उंचवटा राहिला. एक शतकानंतर (१८८४ सालीं) त्याच्या जवळच दुसरें एक बेट ज्वालामुखीचा स्फोट होऊन तयार झालें व तेंहि लवकरच समुद्राच्या लाटांच्या तावडींत सांपडून धुवून गेलें. अशा तऱ्हेचीं बेटें ज्वालामुखींच्या शक्तीच्या योगानें निरनिराळ्या समुद्रांत अगर महासागरांत उत्पन्न झालेलीं आहेत.

समुद्रांतील ज्वालामुखींचा आकार निमुळता, शिखराप्रमाणेंच असतो. हे ज्वालामुखी बहुतकरून एका रेषेंत उत्पन्न झालेले आढळतात व कांहीं ठिकाणीं ह्यांचे समूह सांपडतात. एका रेषेंत असलेल्या ज्वालामुखींचीं उदाहरणें म्हणजे आल्यूशिअन बेटें, जपान, जाव्हा व ॲंटिल्स येथील ज्वालामुखी हीं होत. ह्या ठिकाणीं समुद्राच्या तळाशीं पूर्वीची भेग असावी. समुद्रांतील ज्वालामुखींचे स्फोट होत असतांना जे पदार्थ बाहेर येतात ते जमीनीवरील ज्वालामुखींतून येणाऱ्या पदार्थांपासून निराळे नसतात असें गोळा केलेल्या नमुन्यांवरून आढळतें. निरनिराळ्या स्फोटांच्या मध्यें बराच काल लोटत असावा व ह्या कालांत समुद्रांतील प्राण्यांचीं अवशिष्टें, चुना वगैरे ह्यांचा बराच थर जमतो व पुन्हां त्यावर ज्वालामुखींतून येणाऱ्या पदार्थांचा दुसरा थर तयार होतो. ह्यांतील कांहीं समुद्रांतील ज्वालामुखी फार प्राचीन कालीं तयार झालेले असावेत.

पृष्ठभागावरील भेगांतून झालेले स्फोट.—पुष्कळ काल पर्यंत एटना, व्हेसुव्हिअस वगैरे ठिकाणीं असलेल्या द्रोणाकार मुख असलेल्या ज्वालामुखींशिवाय इतर निराळ्या ज्वालामुखींची कल्पना नव्हती. परंतु दक्षिण अमेरिका, आइस्लंड व हिंदुस्थान ह्याठिकाणीं हजारों चौरस मैल विस्तार असलेले खडक आहेत. हे पृथ्वीच्या आंतील उष्ण रस वर येऊन त्यांपासून थंड झालेले आहेत परंतु ह्याठिकाणीं त्यांचीं उगमस्थानें हीं द्रोणाकार मुख असलेले ज्वालामुखी दिसत नाहींत. शिवाय ह्यांचा विस्तार इतका मोठा आहे कीं, हे

ज्वालामुखींतून निघून तयार झालेले नसावेत. ह्यांचा स्फोट लांववर मोठमोठ्या भेगा पडून पृष्ठभाग दुभंगून त्यांतून रस-बाहेर येऊन शेंकडों किंवा हजारों मैल दूरवर पसरून त्यांचे खडक बनले आहेत. असे स्फोट वारंवार होऊन थरावर थर रचून हजारों फूट उंचीचे खडक तयार झालेले आहेत.

ह्या तऱ्हेच्या नवीन ज्वालामुखीचें उत्तम उदाहरण म्हणजे हिंदुस्थानांतील दक्षिणेकडील काळा खडक ( डेक्कन ट्रॅप ) हें होय. ह्याचें क्षेत्र सुमारें २०००० चौरस मैल विस्ताराचें असून ह्याची उंची सुमारें ६००० फूट आहे. हे सर्व खडक अर्थातच एकदम एक स्फोट होऊन तयार झालेले नाहींत. इतक्या जाडीच्या उंचीचे थर जमण्यास वरेच स्फोट झाले असले पाहिजेत व प्रत्येक स्फोट पुष्कळ काळपर्यंत टिकणारा असला पाहिजे. हे स्फोट अत्यंत प्राचीन काळीं म्हणजे क्रेटॅशिअस (सितोपल)कालांत झाले असावेत व पूर्वीच्या पृष्ठभागावर पसरून त्या काळीं अस्तित्वांत असलेल्या नद्या, नाले, सरोवरें वगैरें बुजवून भरून टाकिलीं असावींत.

ज्वा ला मु खी उ त्प न्न हो ण्या चीं का र णें.—ज्वालामुखी उत्पन्न होण्यास काय कारणें असावींत याबद्दल फार दिवसांपासून शास्त्रज्ञांमध्यें मतभेद आहेत.—( १ ) अगदीं प्राचीन काळीं वर्नर नामक शास्त्रज्ञ व त्याचे अनुयायी यांच्या मतें ज्वालामुखीचें कारण म्हणजे पृथ्वीच्या आंतील भागांत असलेल्या दगडी कोळशास आग लागून त्या उष्णतेमुळें हे उत्पन्न होत असावेत; ( २ ) कांहीं कालानंतर सर हंफ्रे डेव्ही व इतर शास्त्रज्ञ यांनीं असें प्रतिपादन केलें कीं, पृथ्वीच्या आंत मोठमोठ्या रासायनिक क्रिया घडत असाव्यात व भूपृष्ठावरील पाणी आंत झिरपून सोडिअम व पोटॅशिअम धातूंच्यावर त्याची क्रिया होऊन हे स्फोट होतात व (३) त्यानंतरच्या कालांत भूस्तरशास्त्रज्ञांच्या मतें पृथ्वीचा अंतर्भाग द्रवस्थितींत असावा असें ठरलें. तेव्हांपासून ज्वालामुखीचा स्फोट होण्याचें तेंच कारण असावें असें मत होऊं लागलें. त्याचप्रमाणें पृथ्वी हळूहळू थंड होत आहे व त्या अकुंचनामुळें ज्वालामुखी व धरणीकंप ह्यांसारखें परिणाम सहजच होतात. कॉर्डिअर ह्याचें असें म्हणणें कीं, $\frac{1}{२५}$ इंचाइतकें जरी अकुंचन झालें तरी त्यामुळें ५०० स्फोट होऊं शकतात. परंतु वरील कोणत्याहि कारणानें पूर्ण उलगडा होत नाहीं. कारण वरील कारणें अस्तित्वांत असतात तरी ज्वालामुखीचें स्फोट मात्र कधीं कधीं होतात, ते नेहमीं झालेले आढळून येत नाहींत. (४) हल्लींच्या सर्व भूस्तरशास्त्रज्ञांच्या मतें ज्वालामुखीचें मुख्य कारण पृथ्वीच्या आंतील भयंकर उष्णता हें आहे. तसेंच निरनिराळे होणारे स्फोट व त्यांतून बाहेर पडणारे पदार्थ ह्यांच्यावरून असेंहि अनुमान निघतें कीं, हे स्फोट होण्याचें अगदीं शेवटचें कारण म्हणजे पृथ्वीच्या आंतील उष्ण रसांत असलेले निरनिराळे वायुपदार्थ व त्यांचे गुणधर्म हें होय. कांहींच्या मतें हे वायुरूप पदार्थ मूलभूत द्रव्यापैकींच आहेत, व ह्यांस पुरावा म्हणजे आकाशांतील जे उल्कापात होऊन दगड खालीं पडतात त्यांतहि हायड्रोजन सारखे वायू शोषून राहिलेले सांपडतात. त्याचप्रमाणें पुष्कळ धातू वितळलेल्या स्थितींत वायु शोषून घेतात. परंतु कांहींच्या मतें हे वायुरूप पदार्थ मूलभूत द्रव्यांपैकीं नसून मागून उष्णरसांत मिसळत असावेत व यास पुरावा म्हणजे निरनिराळे स्फोट होत असतांना मुख्यतः पाण्याची वाफ हा पदार्थ अतिशय जास्त प्रमाणांत बाहेर येतो व हें पाणी पृथ्वीच्या पृष्ठभागावरूनच आंत जात असावें. नद्या, सरोवरें व समुद्र ह्यांच्या तळांतून पाणी झिरपून झिरपून खोलवर जात असावें व आंतील उष्णतेमुळें त्याची वाफ होऊन रसांत मिसळत असावी. त्याचप्रमाणें धरणीकंप, ज्वालामुखीचे स्फोट वगैरेंच्यावेळीं ज्या लहानमोठ्या भेगा पडतात त्यांतूनहि पावसाचें पाणी झिरपत असावें. ज्वालामुखीच्या स्फोटामुळें वर येणाऱ्या पदार्थांत क्लोराइड्स् जास्त असतात. ह्यावरून समुद्राचें पाणी आंत जात असावें असें अनुमान निघतें.

एकंदरींत असें दिसतें कीं, भूपृष्ठावरून आंत जाणारें पाणी हळूहळू झिरपत जाऊन आंतील उष्ण रसांत वायुरूपानें मिसळतें व जेव्हां त्याचा दाब अतिशय वाढतो तेव्हां तें ज्वालामुखीच्या विवरांतून बाहेर पडण्याचा प्रयत्न करतें, व अशा रीतीनें ज्वालामुखीचा स्फोट होतो. पुन्हां नवीन पाणी सांचूं लागतें व त्याची वाफ होऊन पूर्वीप्रमाणें दुसरा स्फोट होतो. प्रो. अरिनिअस ह्यांनीं जे शोध लावले आहेत त्यांवरून वरील विवेचनाला पाठिंबा मिळतो. उष्णमानाप्रमाणें पाण्याच्या गुणधर्मांत अतिशय फरक होऊन त्याच्या अंगीं फारच शक्ति येते. उष्णोदककारंज्याचे स्फोट ज्याप्रमाणें मुख्यत्वेंकरून वाफेमुळेंच होतात त्याचप्रमाणें ज्वालामुखींचे स्फोटहि मुख्यत्वेंकरून अत्यंत दाबाखालीं असलेल्या व अतिशय उष्णता असलेल्या वाफेच्या योगानेंच होत असावेत.

हें जरी मुख्य कारण असलें तरी त्याशिवाय कांहीं ठिकाणीं इतर दुय्यम कारणेंहि असावींत. कांहीं कार्बाइड्स नामक पदार्थांवर पाण्याची क्रिया होऊन त्यांतून वायुरूप पदार्थ तयार होतात व त्यामुळें लहान सहान स्फोट होणें शक्य आहे.

**झ, अक्षरविकास.**—'झ' अक्षराचीं दोन वळणें आहेत: एक जैन व दुसरें दक्षिणी. प्रस्तुत वळण दक्षिणी आहे. याची पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार शिलालेखांत, दुसरी, इ. स. २ऱ्या शतकांतील वासिष्ठी पुत्र पुलुमायी याच्या एका लेखांत, व तिसरी राजा शिवगणाच्या कोटा लेखांत (काल इ. स. ७३८) आढळून येते. इ. स. ११ व्या शतकांतल्या एका हस्तलिखित पुस्तकांत चवथी अवस्था दृष्टीस पडते. पांचव्या अवस्थेंतील 'झ' चवथीपासून तयार झालेला दिसतो. [भारतीय प्राचीन लिपिमाला.]

**झऊरी मुल्ला**—हा इराणचा रहिवासी असून त्याचें खरें नांव नुरुद्दीन होतें; हा हिंदुस्थानांत येऊन विजापुरच्या इब्राहिम आदिलशहा (दुसरा)च्या पदरीं राहिला. यानें आपला ४००० कवितांचा साकीनामा नांवाचा काव्यग्रंथ, नगरचा बुऱ्हाण निजामशहा (दुसरा) यास अर्पण केला; त्याबद्दल निजामशहानें त्यास सात हत्ती भरून पैका बक्षीस दिला. मीना बझार, रुकअत झहुरी, रीसाल नौरस, ख्वान खलील, गुलझार इब्राहिम वगैरे ग्रंथ त्यानें केले; त्यांपैकीं कांहीं त्यानें इब्राहिम आदिलशहास अर्पण केले. हा नव्वद वर्षांचा होऊन स. १६१७ त मेला. [फेरिस्ता; बील; बुसातिने सला तीन.]

**झगरपूर**—मध्यप्रांत. रायगड संस्थानांतील १३ गांवची एक जमीनदारी, हिचें क्षेत्रफळ २३१ एकर व लोकसंख्या ८०० पर्यंत आहे. येथील जमीनदार जातीचा गोंड असून इंग्रज सरकारास ११३ रु. खंडणी देत असतो. [छत्तिसगड ग्याझेटियर]

**झज्जर, तहसील.**—पंजाब, रोहटक जिल्ह्याची एक तहसील. उत्तर अक्षांश २८° २१' ते २८° ४१' व पूर्व रेखांश ७६° २०, ते ७६° ५६' यांच्या दरम्यान आहे. यांत एकंदर गांवें २५७ आहेत. हिचें उत्पन्न ३ लाखांपर्यंत आहे. एकंदर क्षेत्रफळ ७२८ चौ. मै. असून लोकसंख्या (१९२१) २१३८६६ आहे. ही तहसील अंबाला विभागांत आहे.

गांव.—हें तहशीलीचें मुख्य ठिकाण असून दिल्लीच्या पश्चिमेस ३५ मैल आहे. लोकसंख्या (१९११) १०६१७. महंमद घोरीनें पूर्वी या गांवाचा नाश केला होता; पुढें जाट लोकांच्या एका टोळीनें पुन्हां हें शहर वसविलें. १८०३ सालीं नबाब निजाबतखान यास हें इनाम मिळालें होतें. परंतु इ. स. १८५७ च्या युद्धांत त्यावेळच्या संस्थानिकानें ब्रिटिश सरकाराविरुद्ध भाग घेतल्यावरुन तें पुन्हां जप्त करण्यांत आलें व त्या नबाबाला फांशी देण्यांत आलें. इ. स. १८६७ त येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. हा गांव रंगाच्या व्यापाराकरितां प्रसिद्ध आहे. येथें मलमल, लोंकरी कापड व विणकाम चांगलें होतें.

**झंझरपुर**—बंगाल. दरभंगा जिल्ह्यामधील मधुबनी विभागांतील एक गांव. हें बंगाल-नॉर्थ-वेस्टर्न रेल्वेचें स्टेशन आहे. येथील लोकसंख्या सहा हजारांपर्यंत असून येथील पितळेचीं भांडीं, मुख्यत्वेंकरून पानाचे डबे व गडवे (गंगाजळी) ह्या भागांत प्रसिद्ध आहेत.

**झमानशहा**—हा अहमदशहा अबदालीचा नातु व तैमुरशहाचा मुलगा असून, काबूल-कंदाहारचा राजा होता. बापाच्या पश्चात हा गादीवर आला (स. १७९३). हा स. १७९६ त लाहोरपर्यंत चालून आला होता व दिल्लीवर येण्याचा त्याचा बेत होता; परंतु काबूलकडे त्याच्या भावांनीं बंडाळी केल्यामुळें, तो तेथूनच परत फिरला. पुढें (१८००) त्याच्या धाकट्या भावानें (हिरातच्या महमूदशाह) त्याचे डोळे काढून, त्याला बाला हिसार किल्ल्यांत कैदेंत ठेविलें. इंग्रजांनीं जेव्हां (१८३९) शहाशुजा याला काबूलच्या गादीवर बसविलें, तेव्हां अफगाण लोकांनीं झमानशाह याच्या नांवाची द्वाही फिरविली होती (१८४२). [पेशव्यांची बखर; बील; मुसुलमानी रियासत.]

**झमानिया, तहसील.**—संयुक्त प्रांत. बनारस विभागांमधील गाझीपूर जिल्ह्यातील एक तहसील. हींत गंगानदीच्या दक्षिण व कर्मनाशा नदीच्या उत्तर भागाचा समावेश होतो. तहसीलीचें क्षेत्रफळ ३८५ चौ. मै. आहे. १९११ सालीं लो. सं. २१६७५६ होती. तहसीलींत ३६९ गांवें असून बारा व झमानिया हीं दोन शहरें आहेत. काळीचें उत्पन्न चोवीस लाखांवर असून, कर्मनाशानदीचा उत्तर भाग फार सुपीक आहे. अफूचें उत्पन्न पुष्कळ येतें.

गांव.—हें तहसीलीचें मुख्य ठिकाण; ईस्टर्न-इंडियन रेल्वेवरील एक स्टेशन असून, येथील लो. सं. पांच हजारांवर आहे. सदर गांव अलीकुलीखान खानझमान यानें स्थापन केल्यामुळें त्यास त्याचें नांव पडलें. दोनशें वर्षांनंतर फझल-अली नांवाच्या एका मुसुलमान अधिकाऱ्यानें तें जाळलें. हिंदु आख्यायिका अशी आहे कीं, हें जमदग्नी ऋषीचें स्थान होतें. गांवाजवळ एक मोठा स्तंभ आहे. त्यावर शिलालेख वगैरे कांहीं नाहीं. येथें तांदूळ व साखरेचा थोडाफार व्यापार चालतो.

झमीनदवार ( जमीनद्वार )—अफगाणिस्तानांतील एक जिल्हा. दुराणी लोकांपैकीं मोठे कडवे व माथेफिरू अचकझाई नांवाचे लोक येथें रहातात. झमिनद्वार म्हणजे हिरातपासून कंदाहारपर्यंतच्या रस्त्याची किल्लीच होय. हा हेलमंड नदीच्या उजव्या तीरावर कंदाहारच्या वायव्येस आहेत. प्रांत डोंगराळ असला तरी हेलमंडच्या ( पाटांच्या ) पाण्यानें भिजत असल्यानें बराच सुपीक आहे. जिल्ह्याचें मुख्य ठाणें मूसाकाला. अचकझाई लोकांनीं सर डोनाल्ड स्टुअर्ट या इंग्रज सेनापतीचा अहमदखेल येथें पराभव केला होता.

झरथुष्ट्र—(जरत्‌उष्ट्र) पारशी धर्मसंस्थापक. झरथुष्ट्र कोण होता, केव्हां होता व तो कोठें रहात असे यासंबंधीं पुष्कळ मतभेद आढळतील. तथापि झरथुष्ट्र हा ऐतिहासिक पुरुष होता याबद्दल फारसा संशय राहिला नाहीं. झरथुष्ट्र कोणच्या प्रकारचा मनुष्य होता हें त्यानें रचलेल्या सूक्तांवरूनच स्पष्ट आहे. जागतिक वाङ्मयांत अशा सूक्तांसारखीं दुसरीं सूक्तें फारशीं नाहींत म्हटलें तरी चालेल आजमितीस त्यांतले कांहीं विचार तत्त्वज्ञांच्या सरावांतले असतील पण त्या काळीं अशा तऱ्हेचे गंभीर विचार अश्रुतपूर्व होते यांत संशय नाहीं.

धर्मसंस्थापकांच्या लांबच लांब सांखळींतला झरथुष्ट्र हा शेवटला दुवा होय. त्याच्या पूर्वकालीन किंवा उत्तरकालीन धर्मसंस्थापकांप्रमाणें याचीहि विचारपरंपरा हळू हळू वाढ होत होत परिणत स्थितीस पोंचली. याच्या संप्रदायांतील मुख्य कल्पना ह्याच्या पूर्वींच्या काळींच लोकांच्या लक्षांत आल्या होत्या पण त्यांचा कोणी उच्चार केला नव्हता. परिस्थिति इतकी अनुकूल होती कीं झरथुष्ट्र आला व त्यानें आपल्या धर्मकल्पना लोकांस सांगून लागलीच त्याची वाढ सुरू केली. तरी झरथुष्ट्राला सुधारक म्हणतां येणार नाहीं. कारण त्यानें आपल्या पूर्वींच्या लोकांचीं तत्त्वें खोडून काढिलीं नाहींत. सात्त्विक अहुरापुढें जुन्या आर्य देवांचें तेज पडत नाहीं खरें पण त्यांनां मुद्दाम कमी लेखावें असा झरथुष्ट्राचा हेतु असेल असें दिसत नाहीं. एका खालच्या प्रतीच्या देवाचा जातां जातां कोठें उल्लेख आला आहे, बाकी सगळ्या ग्रंथभर परमेश्वराचें कल्याणकारित्व, त्यानें लावलेली जगांतील व्यवस्था, व त्याचें शक्तिमत्त्व, या शक्तित्रयांच्या मनुष्यांच्या स्थितीवर झालेला परिणाम, मनुष्यामध्यें असलेला अहुराचा मूर्तिमंत अवतार, जी धर्मश्रद्धा, व या धर्मश्रद्धेचा परिणाम म्हणजे मनुष्याचें सुख व अमरत्व यांसारखे विषय त्याच्या सूक्तांत खेंचून भरले आहेत. म्हणून इतर गोष्टींस वाव राहिला नाहीं. त्याच्या विचारांत मनाचा खोलपणा व ईश्वरीप्रेरणा ह्या गोष्टी प्रमुखत्त्वानें दृग्गोचर होतात. त्याचा दुसरा विशेष गुण म्हणजे त्याची विचाराची व बोलण्याची एक विशेष पद्धत होय. त्याच्या सूक्तांतील प्रत्येक अक्षर विचारानें ओथंबलेलें आहे. केव्हां केव्हां हे विचार पुन्हां पुन्हां आलेले दिसतात. आज ते आम्हांला जरी अगदीं क्षुल्लक वाटतात तरी पण ज्यावेळेस झरथुष्ट्रानें हे विचार लिहिले त्या वेळेस ' तो कांहीं गूढ गोष्टी सांगतो आहे ' अशी त्याच्याबद्दल कोणीहि सहज कल्पना केली असती. लेखनांत संक्षिप्तपणाची किंवा सूत्रमय लेखनाची कमाल केली आहे. परमेश्वराचे गुण हे त्याचे दूत असून ते मनुष्याच्या अंतःकरणांत, त्याला पवित्र व मुक्त करण्याकरितां पाठविलेले असतात, ही आश्चर्यकारक कल्पना पाहिली म्हणजे इतकी अगदीं अलीकडच्या विद्वानांनांसुद्धां अंश व बोहु मनहु हे ईश्वराचे हे दूतच आहेत किंवा मनुष्यांत पुनः उत्पन्न केलेले ईश्वराचे विचार व त्याच्याच कल्याणकारक वृत्ती आहेत हें सांगतां येणार नाहीं. ईश्वरी गुणांना देव मानणें हें काव्य म्हणतां येईल. गाथांचा काळ व स्थळ लक्षांत आणतां, त्यामध्यें अशा तऱ्हेचें काव्य लक्षांत असणें ही विशेष गोष्ट आहे, किंवा असें वाटतें कीं, एकदां परमेश्वराच्या गुणांनां मनुष्यवत्‌ मानल्यावर मग झरथुष्ट्र त्यांनां मान द्यावयास विसरत नाहीं. हा मान मनुष्यांनां देण्यांत येणाऱ्या मानापेक्षां श्रेष्ठ आहे; कारण हा मान तत्त्वांनां आहे.

झरथुष्ट्राच्या स्वतःच्या वृत्तीबद्दल तो भक्त होता इतकेंच आपणांस म्हणतां येईल. ' झरझदैति ' ह्या त्याच्या शब्दांत त्याच्या हेतूची गुरुकिल्ली आहे. तो धैर्यशील होता हें निःसंशय होय. पण तो रक्तपात करण्यास भीत असे असें नाहीं. पण तो धीरोदात्त होता व संकटांतून पार पडण्याइतकी त्याच्यांत चिकाटि होती, तथापि सामान्य जनाप्रमाणें संकट आलें असतांना तो दुःखोद्गार काढी. त्याचे कार्यक्षेत्र संकुचित नव्हतें. प्रांत, खेडीं, सेनासमुदाय किंवा व्यक्ती कोठेंहि चोहोंकडे तो जात असे. त्याच्या व्याख्यानास राजे, पुढारी, पंडीतहि चालत, लहानसें मंडळहि चाले, मोठा जनसमुदायहि चाले.

लो क स्थि ति.—त्याचा काळ शांततेचा नव्हता. गादीवर बसण्याबद्दल व ती राखण्याबद्दल झटापटी चालत. त्यावेळीं विष्तास्प राजाची सत्ता डळमळीत होती. कारण आपणांला काढून दुसरा कोणी गादीवर बसेल अशी त्याला नेहमीं भीति वाटत असे.

झ र थु ष्ट्र कु ल.—झरथुष्ट्राच्या कुलासंबंधीं इतकेंच म्हणतां येईल कीं तो सन्मान्य कुळांतला होता. यापेक्षां विलकूल जास्त माहिती नाहीं.

विष्तस्पाच्या दरबारांतील मानकऱ्यांत, फ्रशओष्ट्र आणि जामास्प या दोघां बंधूंचा उल्लेख आला आहे. अलिकडच्या दंतकथेवरून असें दिसतें कीं हे दोघे विष्तस्पाचे वजीर होते. झरथुष्ट्राचें या दोघांशींहि नातें होतें. त्याची बायको व्होवी ही फ्रशओष्ट्राची कन्या व जामास्प हा त्याच्या पोरुकिस्ता नामक कन्येचा पति. त्याचा प्रथम शिष्य जो मैध्योइमाओंघ, हा त्याचा चुलतबंधु; मागाहूनच्या अवेस्ता ग्रंथान्वयें, त्याचा पोरुषस्प हा बाप असून दुघ्दोवा ही त्याची मात आणि हएकतस्प हा पणजा होता. याच परंपरेवरून झरथुष्ट्रास आपलें उपनांव प्राप्त झालें असावें. अवेस्तामध्यें

त्याच्या निधनकाळाचा कोठेंहि उल्लेख आलेला नाहीं. दलखच्या वेळ्यांत, तुरेनियन लोकांनीं यज्ञवेदीजवळ त्याचा खून केला, अशी कथा ' शाह–नामा ' ग्रंथांत आढळते. झरथुष्ट्राच्या मंत्रिमंडळाच्या चळवळींचें मुख्य ठिकाण बॅक्ट्रियाचें राज्य होतें असें जॅक्सनचें मत आहे ( अ. ओ. सो. ज. पु. १८ ). मीडियाच्या पश्चिमेस असलेल्या अट्रोपेटेन या गांवीं झरथुष्ट्र जन्मला व स्वतःच्या देशांत त्यास योग्य तो मान न मिळतां पूर्व इराणांत त्याच्या उपदेशाचा झपाट्यानें प्रसार झाला. एकंदर धर्मसुधारणेविषयींच्या कळकळीचा व उच्च धर्मतत्त्वांचा विष्तस्प राजावर परिणाम होऊन त्यानें या धर्मास आश्रय देऊन, सर्व इराणभर हा धर्म पसरविण्यास मदत केली. झरथुष्ट्रधर्मवाङ्मयांत या धर्मप्रसाराविषयीं पुष्कळदां उल्लेख आलेला आहे. या धर्माचा प्रसार झपाट्यानें झाला असला पाहिजे.

झरथुष्ट्राचा कालनिर्णय करण्याच्या बाबतींत लागणारी प्रत्यक्ष अशी माहिती अवेस्तामध्यें मुळींच सांपडत नाहीं. त्या काळचें व त्या काळांतील सामाजिक स्थितीचें चित्र त्यांत रेखाटलें आहे; विष्तस्प राजाची कारकीर्द त्यांत वर्णिली आहे पण हा काल ठरविण्यास उपयोगीं पडणाऱ्या ज्या इतर समकालीन गोष्टी त्यांविषयीं स्पष्ट उल्लेख या धर्मपुस्तकांत कोठेंच नाहीं. या व इतर अनेक गोष्टींमुळें झरथुष्ट्राच्या काळाविषयीं फारच मतभेद आहे.

या प्रश्नासंबंधीं जे प्राचीन उल्लेख केलेले आढळून येतात त्यांचे तीन वर्ग पाडतां येतीलः—( १ ) झरथुष्ट्र इ. स. पूर्वी ६००० वर्षें या कालीं होऊन गेला अशासंबंधीं उल्लेख, ( २ )काल्पनिक निनस व सेमिरामिस यांच्यांशीं झरथुष्ट्राच्या नांवाचा संबंध जोडणारे उल्लेख, व ( ३ ) इ. स. पूर्वी ६ व्या शतकांत झरथुष्ट्र होऊन गेला अशा विषयींचे उल्लेख. या तिन्ही वर्गांतील पुराव्यांची छाननी करतां असें अनुमान निघतें कीं, इ. स. पूर्वी सातव्या शतकाचा उत्तरार्ध व सहाव्याचा मध्य यांच्या दरम्यानच्या काळांत म्हणजे अकिमिडियनांच्या सत्तेचा उदय व्हावयाच्या पूर्वी झरथुष्ट्र होऊन गेला असावा. हॉग, जुस्ती, गेल्डनर, कसर्टेली व इतर संशोधकांनीं लाविलेल्या शोधाचाहि हाच निष्कर्ष निघतो. त्यानें तिसाव्या वर्षी मंत्रिमंडळाचा दरबार भरविला; ४२ व्या वर्षी विष्तस्पाचें धर्मांतर झालें; व ७७ व्या वर्षी मृत्यु,या ज्या झरथुष्ट्राच्या आयुष्यांतील मुख्य गोष्टी त्यांवरून अधिक सूक्ष्म रीतीनें काल ठरवितां येईल असें वाटतें.

मीडियन सत्तेचा ऱ्हास होऊन इराणी सत्तेचा उत्कर्ष ज्या शतकांत झाला म्हणजे इ. स. पूर्वी सातव्या शतकाचा उत्तरार्ध व सहाव्याचा मध्य यांच्या दरम्यानचा काळ हाचझरथुष्ट्राचा काळ होय. बाबिलोनमध्यें ज्यू लोकांस जेव्हां गुलाम करून नेलें त्यावेळीं ( इ. स. पूर्वी ५८६–५३६ ) इराणांत झरथुष्ट्राच्या धर्माची पाळेमुळें खोल गेलीं असलीं पाहिजेत. याच काळाच्या सुमारास कनफ्यूशिअसनें चिनी लोकांस धर्मतत्त्वें समजावून सांगितलीं व बुद्धानें गंगातटाकीं तृषित जीवांस जीवन्मुक्तीचा उपदेश केला.

झरथुष्ट्र संप्रदायाची सामान्य कल्पना ज्ञानकोशाच्या ४ थ्या विभागांत ( प्र. ३ रें, पृ. २५–२९ ) दिली आहे. इतर माहिती ' पारशी ' लेखांत सांपडेल. अवेस्ताधर्मग्रंथासंबंधीं विवेचन ' बुद्धपूर्वजग ' या तिसऱ्या विभागांत, ' पर्शुभारतीय संस्कृति' प्रकरणांत केलेंच आहे; अवशिष्ट माहिती झेंदावेस्तांत दिली जाईल.[ ए. व्ही. विल्यम जॅक्सन—झोरोआस्टर; रस्तुमजी एदुलजी दस्तूर पेशोतन संजाना—झरथुष्ट्र आणि झरथुष्ट्रिआनिझम् इन् अवेस्ता; लेहमन—झरथुष्ट्र; सेक्रेडबुक्स ऑफ दि ईस्ट, पृ. ३१.]

**झलिदा**—बिहार–ओरिसा. छोटानागपूर विभागांतील मानभूम जिल्ह्यांतील एका तालुक्याचें ठिकाण. येथील लो. सं. ( १९११ ) १२००८२ असून गांवें ४८४ व क्षे. फ. ३९६ चौ. मै. आहे. इ. स. १८८८ मध्यें येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. लाख, चाकू व कात्र्या यांचा व्यापार येथें बराच होतो.

**झलून**—दक्षिण ब्रह्मदेशांत झद जिल्ह्यांतील एक तालुका. याचें क्षेत्रफळ २७६ चौ. मै. असून लो. सं.(१९११) ७२४५७७ व गांवांची संख्या ३६२ आहे. तालुक्याचें मुख्य ठाणें झलून असून त्याची लो. सं. साडेसहा हजार आहे; व येथील जमीनीचें उत्पन्न ( १९०३ ) २३८००० आहे. हें इरावतीच्या काठीं आहे. सध्यंतरीं येथें लष्कराची एक तुकडी रहात असे.

**झाकाटेकस**, सं स्था न—अमेरिका. मेक्सिकोमधील संस्थान. लो. सं. (१९१०) ४७७५५६ व क्षे. फ. २४४७१ चौ. मै. असून हें ७७०० फूट उंचावर वसलेलें आहे. मेक्सिकन सेंट्रल व मेक्सिकन नॅशनल या दोन रेल्वे या संस्थानांतून जातात. प्रदेश डोंगराळ असून मोठी नदी एकहि नाहीं; पाऊसहि कमी. त्यामुळें धान्य थोडें उत्पन्न होतें. हें संस्थान तेथील चांदीच्या खाणीसाठीं प्रसिद्ध आहे. रबर काढणें, अशुद्ध धातु खाणींतून काढणें, इत्यादि धंदे येथें चालतात. कापसाचा व लोंकरीचा कपडाहि तयार होतो.

श ह र.—हें राजधानीचें शहर १५४६ सालीं चांदीच्या खाणीची एक शीर जमीनींत सांपडली त्यामुळें तेथें वसलें गेलें. याची लो. सं. ( १९११ ) २५९०० आहे. हें ८ हजार फूट उंचीवर आहे व टेंकडीवर वसलें आहे. येथें गाड्या तयार करणें, कापड विणणें व मातीचीं भांडीं तयार करणें, हें धंदे चालतात. ही व्यापाराची मोठी उतारपेठ आहे.

येथील हवा कोरडी व आरोग्यकारक आहे.साधारण नेहमींचीं खाण्याचीं धान्यें, साखर व ऊंस येथें उत्पन्न होतात; मात्र धान्याचें पीक पावसावर अवलंबून असतें. पीच, द्राक्षें, वगैरे फळें बरींच होतात. चांदीप्रमाणें सोनें, पारा, तांबें, लोखंड, जस्त, शिसें, मीठ, बिसमथ वगैरे खाणींतून काढतात हा धंदा येथें मुख्य आहे. येथील कांहीं खाणी सर्व मेक्सीको

संस्थानांत प्रख्यात आहेत. हा प्रदेश खनिज धातूंबद्दल प्रख्यात आहे. येथील अल्वराडोची चांदीची खाण फार प्रसिद्ध आहे. तिच्यांतून सन १५४८ ते १८६७पर्यंत८०कोटी डॉलर किंमतीची चांदी बाहेर पडली. सॉंब्रेरेट या शहरीं प्रख्यात चांदीच्या खाणी आहेत व फ्रेसनिल्लो गांवीं चांदीच्या व तांब्याच्या खाणी आहेत.

**झांग,** जि ल्हा.—पंजाब. मुलतान भागांतील एक जिल्हा. हा उ. अ. ३०° ३५' ते ३२° ४' व पू. रे. ७१° ३७' ते ७३° ३१' यांच्या दरम्यान असून याचें क्षेत्रफळ ३३९८ चौ. मै. व लो. सं. (स. १९२१) ५७०५५९ आहे. हा जिल्हा १८६१ सालीं नवीन वनविण्यांत आला. या जिल्ह्यांत झांग, चिनिओत व शोरकोट या तहशिली असून, त्यांचें क्षे. फ. अनुक्रमें १३७२, १०१६, १००५ चौ. मैल व लो. सं. (१९२१) २३२५७०, २११९८८ व १२६८०१ आहे. एकंदर गांवें ९८४ आहेत.

या जिल्ह्यांतून झेलमचा कालवा व चिनाबचा कालवा असे दोन कालवे जात असल्यामुळें पूर्वी ओसाड असलेला प्रदेश भराभर लागवडीखालीं येत असून लोकसंख्याहि जलदीनें वाढत आहे. शेतीच्या वाढीमुळें जंगल कमी होत असून वन्य प्राणी देखील कमी होत आहेत.या भागांत जून ते आगष्टपर्यंत उन्हाळा फार असून पाऊस सुमारें सरासरी ८ इंच पडतो. हवा कोरडी असल्यामुळें निरोगी आहे,परंतु कालव्याजवळील भागांत हिंवतापाची सांथ असते.

इतिहासः—ख्रि. पू. ३२६ सालीं अलेक्झांडरच्या हालचाली या जिल्ह्यांत झाल्या होत्या. त्याच्या तळांचें ठिकाण हल्लींचें शोरकोट होय. जेथें त्याची व शिबीराज आणि मालवराज यांची लढाई झाली तें ठिकाण मुलतानच्या ईशान्येस ( शोरकोट जवळच ) ४०-४५ कोसांवर आहे. तो निघून गेल्यावर या भागावर निरनिराळ्या राजांनीं राज्य केलें-मयूर(ख्रि. पू. ३२१-२३१), ग्रीको-बॅक्ट्रिअन्स ( ख्रि. पू. १९० ), इंडो पार्थिअन्स ( ख्रि. पू. १३८ ), कुशन अथवा इंडो-सिथिअन्स ( सुमारें १००-२५० ).

इ. स. ५०० च्या सुमारास हा प्रदेश गोऱ्या हूण लोकांनीं जिंकिला होता. तथापि त्यांची सत्ता फार दिवस टिकली नाहीं असें दिसतें.इ. स. ६३० सालीं हुएनत्संग इकडे आला असतांना या भागावर त्सेकियांचें राज्य असून त्यांची राजधानी साकळजवळच होती. साकळ शहर म्हणजे गुजराणवाला जिल्ह्यांतील शाहकोट ( शोरकोट ) अथवा चिनिओत नांवाचें खेडें किंवा सियालकोट असावें.दहाव्या शतकांत ओहिंद आणि पंजाब येथील ब्राह्मण राजाचें राज्य या भागावर होतें व मोंगलांच्या वेळीं हा भाग लाहोरच्या सुभ्यांत मोडत असे.

अर्वाचीन काळीं या जिल्ह्याचा इतिहास म्हणजे सियाळ जातीचा इतिहास होय. या जातीनें शाहपुर आणि मुलतान यांच्या दरम्यान असलेल्या प्रदेशावर एकोणिसाव्या शतकाच्या आरंभापर्यंत राज्य केलें. त्यांवर दिल्लीच्या पातशाहीचा नामधारी अधिकार चालत होता. सियाळ लोक रजपूत वंशाचें असून त्यांच्या धारनगरचा शंकरराय उर्फ सियाळ नांवाच्या एका पूर्वजानें मुसुलमानी धर्माची दीक्षा घेतली. ही गोष्ट तेराव्या शतकांत घडली. त्यावेळेपासून या जातीचें या भागावर प्रभुत्व होतें. बहुतेक सियाळ हे बाटगे मुसुलमान आहेत. १८०३ मध्यें रणजितसिंगानें झांगवर चाल केली होती; पण त्यावेळच्या झांगच्या संस्थानिकानें सालिना ७०००० रुपये खंडणी कबूल करून त्यास परत लावलें. पुन्हां तीन वर्षांनीं रणजितसिंगानें स्वारी करून येथील किल्ला सर केला. संस्थानिकानें मुलतानच्या नबाबाची मदत घेऊन आपल्या राज्यापैकीं कांहीं भाग पुन्हां काबीज केला. रणजितसिंग दुसरीकडे गुंतला असल्यानें त्यानें इकडे लक्ष दिलें नाहीं. परंतु इ. स. १८१ मध्यें हा मुलतानच्या नबाबास मदत करतो असा रणजितसिंगास संशय येऊन त्यास कैद केलें. पुढें रणजितसिंगानें थोडी जहागीर त्यास दिली. ती त्याच्या मुलाकडेहि चालली. परंतु मुलगा मरण पावल्यावर ती पुन्हां खालसा झाली. इ. स. १८४७ मध्यें ब्रिटिश अंमल सुरू झाला त्यावेळीं व इ. स. १८५७ च्या बंडांत या जहागीरदारानें ब्रिटिश सरकारास बरीच मदत केली. त्याबद्दल त्यास सरकारांतून कांहीं पेन्शन मिळालें. या जिल्ह्यांत प्राचीन अवशेष विपुल आहेत. मुसुलमानी कालापूर्वीचीं कांहीं नाणीं सांपडलीं आहेत, तीं इंडोसिथिअन यांच्या वेळचीं आहेत.

या जिल्ह्यांत शेंकडा ६८ मुसलमान, २४ हिंदु व ७ शिख याप्रमाणें वसती आहे. हल्लीं हा जिल्हा पंजाबांत महत्त्वाचा झाला असून, येथें गहूं, ज्वारी, मका, कापूस वगैरें पिकें होतात. कानडीं, धातूचीं भांडीं व साबू यांची पैदास्त येथें होते. कापूस पिंजण्याचे व गठ्ठे बांधण्याचे कारखानेहि येथें पुष्कळ झाले आहेत.

कालवे सुरू होण्यापूर्वी गुराखी लोक गुरें पाळीत असत. झांग आणि लियालपुर येथें गुरांचे बाजार भरतात. या बाजूचे घोडे प्रसिद्ध आहेत. उंटाची देखील पैदास इकडे होते. नॉर्थ-वेस्टर्न-रेल्वेची वझीराबाद-खानेवाल शाखा या जिल्ह्यांतून जाते.

त ह सी ल.—झांग जिल्ह्यांतील एक तहसील. क्षे. फ. १३७२ व लो. सं. (१९११) २१६६२८. झेलम नदी या तहसीलींत वायव्य दिशेकडून शिरते व चिनाब ईशान्येकडून शिरते व दोन्ही नद्यांचा संगम दक्षिणेकडे झालेला आहे. या तहसीलींत झांग हें मुख्य गांव व ४२९ खेडीं आहेत. १९०५-६ सालीं हिचें उत्पन्न २,५६,००० रुपये होतें.

श ह र.—हें झांग जिल्ह्याचें व तहशिलीचें मुख्य ठिकाण असून, नॉर्थ-वेस्टर्न रेल्वेच्या जेच-दोआब फांटयावरील एक

स्टेशन आहे. लो.सं. २५ हजारांवर आहे. झांग व मघिआना हीं गांवें एकमेकांपासून दोन मैलांवर आहेत; पण दोहोंस मिळून एक म्युनिसिपालिटी आहे. सुमारें तीन मैलांवर पश्चिमेकडे चिनाब नदीचा प्रवाह आहे. गांवाच्या आसपास झाडी पुष्कळ असून बागाइत बरेंच आहे. पंधराव्या शतकांत झांग हें गांव वसलें असावें असा तर्क आहे. परंतु नदीच्या पुरांत त्याचा एकदां नाश होऊन, पुन्हां औरंगझेबाच्या कारकीर्दींत नवा गांव वसला असें म्हणतात. १८०५ सालीं रणजितसिंगानें हा गांव सर केला होता. इ. स. १८६७ त येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. येथें धान्य व देशी कापड यांचा व्यापार असून कमावलेलीं कातडीं, मेणवत्या, पितळी कुलुपें वगैरे तयार होतात.

**झांजी**—आसाम प्रांतांतील नाग पर्वतांत या नदीचा उगम असून सिबसागर जिल्ह्यामधून ही वहात जाते व ब्रह्मपुत्रा नदीस जाऊन मिळते. उन्हाळ्यांत या नदीस पाणी फार कमी असतें परंतु पावसाळ्यांत डोंगरपायथ्यापर्यंत ४ टन वजनाच्या होड्या जाऊं शकतात.

**झांझमेर**—मुंबई, काठेवाड. तळाजाच्या दक्षिणेस १२ मैलांवरील एक ठिकाण. झांझशांवाला यानें हें वसविलें असें सांगतात. त्यानें तें खिलोजी वालाला दिलें व त्याच्यापासून पोर्तुगीज लोकांनीं जिंकिलें. येथें भावनगरचा अंमल चालतो.

**झांझीबार**, बेट.—झांझीबार हें बेट पूर्व आफ्रिकेंत ब्रिटिश संरक्षणाखालीं असून एका मुसुलमान सुलतानाच्या अंमलाखालीं आहे. १९०५ सालीं येथील सुलतानानें बेनाडीर किनाऱ्यावरील ५ बेटांचा सार्वभौमत्वाचा हक्क इटलीस विकला. पेंबा आणि झांझीबार बेटांचें क्षेत्रफळ १०२० चौरस मैल आहे. १९२१ सालीं येथील लोकसंख्या १९८००० होती. झांझीबार हें बेट उ. अ. ५०° ४०′ आणि पू. रे. ६° ३०′ यांमध्यें प्रवाळ खडकावर आहे. याचें क्षेत्रफळ ६४० चौरस मैल असून हें नारळीच्या झाडांकरितां फार प्रसिद्ध आहे. नारिंग, डाळिंब, दालचिनी आणि लवंगांचीं झाडें येथें पुष्कळ आहेत. माकडें, जंगली डुकरें, पाणघोडे, उंट आणि बैल वगैरे जनावरें आढळतात. उष्णता आणि दलदलीमुळें येथील हवा यूरोपियन लोकांस मानवत नाहीं. दरसाल ६५ इंच पाऊस येथें पडतो. पूर्वेकडील चन्टु भाषा बोलणारे लोक मासे पकडण्यांत फार पटाईत आहेत. पश्चिमेच्या भागांत वाटे अरब, ग्रोओनी, पारशी, हिंदु आणि कोमोरो हे लोक राहतात. रबर, खोबरें, मिरची, तंबाखू आणि व्हॅनिला नांवाचीं फळें येथें होतात. येथील स्वालीजातीचे मजूर पाहिल्यानें गुलाम होते. मोंबासा आणि दारसलेमच्या चुरशीमुळें येथील पिकाची भरभराट झाली व रेल्वे आणि सडका तयार करण्यांत आल्या. मुंबई आणि रंगूनहून येथें तांदूळ येतो. येथील लोकांचें मुख्य अन्न मासे आणि कॅसवा नांवाच्या झाडांच्या मुळ्यांचें पीठ हें होय.

येथें जकात ही वसुलीची मुख्य बाब आहे. १९१९ सालीं येथील वसूल ४०७००० पौंड होता व खर्च ३२३००० पौंड होता. पूर्वी सोन्याचें नाणें येथें प्रचारांत होतें. हल्लीं हिंदुस्थानांतील रुपया व नोटा हें चलन सुरू आहे.

येथील लोक मुसुलमानी धर्माचे आहेत. ख्रिस्ती पाद्र्यांनीं येथें शाळा स्थापिल्या आहेत. प्राथमिक शाळांत आरबी व वरिष्ठ शाळांतून इंग्लिश भाषा शिकवितात. येथील सुलतानानें न्यायनिवाड्याचा हक्क ब्रिटिश सरकारला विकला (१८९२).

इतिहासः—पूर्वी इराणी लोक व अरब लोक यांनीं जिंकलेल्या या बेटाच्या समुद्रकिनाऱ्यावरील प्रदेशास झेंज साम्राज्य असें नांव देण्यांत आलें. त्यावेळीं किल्वा हें राजधानीचें शहर होतें. यालाच पुढें झांझीबार नांव पडलें. येथील लोक मुसुलमानी धर्माचे निग्रो आहेत. १५ व्या शतकाच्या शेवटीं, पोर्तुगीज लोकांनीं किल्वा आणि मोंबासा काबीज केल्यामुळें, झेंज साम्राज्यास उतरती कळा लागली. १६ व्या शतकाच्या शेवटीं, तुर्क आणि झिंबास लोकांनीं येथील शहरें उध्वस्त केल्यामुळें, पोर्तुगीज सत्तेचा ऱ्हास झाल्यावर, मस्कतच्या इमामाची सत्ता येथें प्रस्थापित झाली. इ.स. १५०८ सालीं पोर्तुगीज लोकांनीं जिंकलेलें झांझीबार बेट १७३० सालीं अरबांच्या ताब्यांत आलें. १८३२ सालीं मस्कतच्या सय्यद सैद या नबाबानें झांझीबार हें राजधानीचें शहर केलें आणि १८३७ सालीं विश्वासघातानें मोंबासा घेतलें. पुढें ( १८७० ) याच घराण्यांतील राजांच्या कारकीर्दींत इंग्लंड, जर्मनी, आणि इटलीनें त्याच्या राज्याचा बराच भाग घेतला. पुढें येथील सुलतान हा इंग्लंडच्या वकीलाच्या तंत्रानें वागू लागला ( १८६६–१८८७ ). पुढें झांझीबार हें इंग्लंडचें संरक्षित संस्थान म्हणून जाहीर करण्यांत आलें ( १८९० ). परंतु थोड्याच दिवसांत सय्यद खलीद या नबाबानें आपणास स्वतंत्र सुलतान म्हणून जाहीर केल्यामुळें ब्रिटिश सरकारनें त्याच्या राजवाड्यावर तोफांचा मारा करून त्याचा पाडाव केला व राज्यकारभार आपल्या हातांत घेऊन सुलतानास खासगी खर्चाकरितां सालीना १२०००० रुपयांचें पेन्शन देण्यांत आलें. १८९७ सालीं गुलामगिरीचा व्यापार बंद करण्यांत आला. पुढें पोलिटिकल एजन्ट आणि कान्सल हे दोन अधिकारी असल्यामुळें राज्यकारभार सुरळीत चालत नसे म्हणून फक्त एजन्टच नेमण्यांत आला. तेव्हांपासून तेथें सुधारणा होऊं लागल्या. स. १९११ त सुलतान अली यानें गादीचा राजीनामा दिला व त्याचा मेव्हणा सय्यद खलीफ बिन हरुन हा गादीवर आला. हाच सांप्रत सुलतान आहे. यानें गेल्या महायुद्धांत आपल्या हाताखालील मुसुलमानांना शांत ठेविलें होतें. महायुद्धांत झांझिबारचें आसपास दर्यावर चकमकी झाल्या होत्या. त्यांत इंग्रजांच्या क्युपीड, खलीफा वगैरे बोटी जर्मन क्रूझर कोनिग्झबर्गनें बुडविल्या व झांझीबार येथील इंग्रज आरमाराची राळ उडविली. सुलतानानें ७०००० पौंड युद्धास मदत केली.

१९१३ सालपर्यंत झांझीबारच्या संरक्षित संस्थानचा राज्यकरभार इंग्लंडच्या परराष्ट्रखात्यामार्फत चालविला जात असे पण त्यानंतर ( १९१३ नंतर ) हें काम वसाहतखात्याकडे सोंपविण्यांत आलें. त्याप्रमाणें ब्रिटिश पूर्व आफ्रिकेचा गव्हर्नर, हा झांझीबारचा हायकमिशनरहि झाला व झांझीबारचा स्थानिक कारभार पहाण्यासाठीं मेजर पीयर्स यास रेसिडेंट नेमण्यांत आलें. याशिवाय राज्यकारभाराच्या बाबतींत सल्ला देण्याकरिता एक सल्लागारमंडळ नेमण्यांत येऊन त्या मंडळाचें अध्यक्षपद सुलतानास देण्यांत आलें. सुलतानानें दिलेले निकाल, रेसिडेंटची मान्यता मिळाल्यास बंधनकारक मानले जातात.

श ह र.—बेटाची राजधानी झांझीबार शहर हीच असून तें बंदरहि आहे. हें शहर एका त्रिकोणी द्वीपकल्पावर वसलेलें आहे. येथील मनोरे मशीदी, सुलतानाचा वाडा आणि सरकारी कचेऱ्या फार प्रेक्षणीय आहेत. वाड्याच्या डाव्या बाजूस सांप्रत उपयोगांत नसलेले जहाजासारख्या आकाराचें तलाव आहेत. शहराच्या घाणेरड्या भागांत वाणी सोंगाली, शिद्दी, हमाल, कोळी आणि वाटे वगैरे लोक राहतात. शहराच्या शंगानी नांवाच्या भागांत यूरोपिअन व्यापारी आणि पाद्री राहतात. समुद्रांतून नेलेल्या तारांचें मुख्य ठाणें आहे. व त्यामुळें जगांतील सर्व बंदरांशी याचा संबंध जोडला गेला आहे. थेट लंडनशीं आगबोटींची रहदारी स. १९१० त सुरू झाली. लवंगा आणि खोबरें येथून परदेशांत फार रवाना होतें लवंगांच्या लागवडीखालीं १९१९ सालीं साठ हजार एकर जमीन असून, त्या सालीं एकंदर सत्तर लाख शेर लवंगांचें पीक आलें होतें. लवंगांच्या खालोखाल नारळाची पैदास आहे. १९१९ सालीं येथें २५ लक्ष नारळींचीं झाडें होतीं. १९१८ त येथून १,५१,००० पौंड किंमतीचें खोबरें निर्गत झालें. तांदूळ कापड, इमारती लांकूड, कातडीं, कोळसा आणि पेट्रोल यांची येथें आयात होते.

सय्यदसैद या सुलतानानें हें राजधानीचें शहर केल्यापासून ( १८३२ ) येथील व्यापार पुष्कळ भरभराटीस आला. ब्रिटिश साम्राज्यांत समावेश होण्याच्या पूर्वीपासून येथें पाद्र्यांचें धर्मप्रसाराचें काम चालूच होतें. येथील व्यापार वाढल्यामुळें पूर्वआफ्रिकेंत येथूनच माल रवाना होतो.

**झाडीतेलंग**—मध्यप्रांतांत गोंड व हलक्या जातीच्या तेलंग लोकांच्या मिश्रणापासून या झाडीतेलंग लोकांची उत्पत्ति आहे असें म्हणतात. यांची संख्या ५००० आहे यांच्या तीन उपजाती झाल्या आहेत. ( १ ) पुराइत, ( २ ) सुराइत व ( ३ ) पोहनी. पुराइतास अन्य जातीच्या स्त्रीपासून झालेल्या मुलास सुराइत म्हणतात व सुराइतास अन्य जातीच्या स्त्रीपासून झालेल्या मुलास पोहनी म्हणतात. अशा प्रकारचा संकर वर्ग आतां फार कमी आहे व असा संबंधहि हल्लीं होत नाहीं. बहुतेक लोक पुराइत वर्गांचेच सांपडतात. पोहनी हे वरील दोन वर्गांच्या हातचें खातात व सुराइत पुराइतांच्या हातचें जेवतात. यांच्यांतील कुलांचे दोन वर्ग झाले आहेत. हे लोक स्वतःचे पूर्वज बस्तरच्या राजाबरोबर वरंगळाहून आले असें सांगतात.

हे आपल्या जातींत ब्राह्मण, रजपूत व हलवा या लोकांस घेतात व यांपैकीं कोणासहि तेलंगी स्त्रीपासून मुलगा झाला तर त्याचा प्रवेश त्याच्या आईच्या वर्गांत होतो. पण रावत, धाकर, जंगम, कुंभार व कलार यांच्यापासून मुलगा झाला तर तो आईच्या वर्गाहून एक वर्ग खालीं जातो. गोंड, सोनार, लोहार व मेहरा जातीच्या माणसापासून तेलंग स्त्रीस मूल झालें तर तिला बहिष्कृत करतात, मामेबहीण अथवा मावसबहीण हिच्याशीं लग्न लावण्याचा प्रघात आहे. लग्न सोमवारीं व गुरुवारीं लावतात. वराची वरात वधूच्या गांवीं रविवार, मंगळवार, बुधवार अथवा शुक्रवारीं पोंचली पाहिजे. लग्नांत मोहाच्या लांकडाचा मांडव करतात. विधवेनें नवऱ्याकरितां महिनाभर शोक करावा लागतो व त्यानंतर तिला पुन्हां लग्न करतां येतें.

यांच्या प्रत्येक कुलाच्या निरनिराळ्या देवता आहेत. एक लांकडाची खुंटी अथवा खांब किंवा दगड हीच त्यांच्या देवतेची प्रतिमा असते. तीस तांदूळ व कोंबडा यांचा बळी देतात. पेरणीच्या वेळीं ते प्रथम शिकारीस जाऊन येतात व शिकार न मिळाल्यास अशुभ समजतात. प्रत्येक गांवांत पुढीलप्रमाणें एक ग्रामदेव असतो. एका मोहाच्या लाकडांत खुंटी ठोकून एका लहान बांबूच्या काठीची पहिल्यानें पूजा करून मग ती खुंटी एका भांड्यांत दोरानें बांधून सोडतात. यांचा पुरोहित जंगम असतो. हे मृतास जाळतात किंवा पुरतात. यांचा जादूटोण्यावर फार विश्वास आहे. हे लोक शेतकींतील मजूरीचीं कामें करितात [ रसेल व हिरालाल ].

**झानेस्व्हील**—अमेरिकेंतील ओहीयो संस्थानांतील एक शहर. हें मातीचीं भांडीं, शोभेचीं फौलें व विटा यांकरितां प्रसिद्ध आहे. हें शहर १८०० मध्यें स्थापिलें गेलें. येथें आगगाड्यांचे अनेक फांटे एके ठिकाणीं मिळतात. येथें १८३६ सालीं पहिली शाळा स्थापन झाली, ती अद्यापि सुरू आहे. स. १९०५ मध्यें सुमारें ३८ लक्षांच्या किंमतीचे मातीचे जिन्नस येथें तयार झाले. येथील लोकसंख्या २८ हजारांवर आहे.

**झान्टे**—ग्रीसच्या ताब्यांतील आयोनियन विभागांतील आयोनियन समुद्रांतील एक बेट. याचें क्षे. फ. २७७ चौ. मै. व लोकसंख्या ( १९०७ सालीं ) ४२५०२ आहे. हें बेट उ. अ. ३७ ° ४०' व पू. रे २१ ° यांच्या दरम्यान असून तें २५ मैल लांब व १२ मैल रुंद आहे. बेटांत चुनखडीच्या टेंकड्या असून, सर्वांत जास्त उंच टेंकडी १६०० फूट आहे. बेटाचा मध्यभाग सुपीक आहे. टेंकड्यावरहि द्राक्षें, अंजीर, ऑलिव्ह, नारिंगें वगैरे फळझाडें अतिशय आहेत. मैदानांत सर्वत्र द्राक्षांचे मळे व इतर बागबगीचे आहेत. द्राक्षांची दारू करितात. करंट जातीच्या मनुकांचा

वेल तीन फूट उंचीचा असून त्याला सातव्या वर्षी फळ धरतें व तो शंभर वर्षांच्याहि वर टिकतो. येथें द्राक्षांच्या ४० वर व आलेव्हच्या १० वर निरनिराळया जाती आहेत. बेटांत सर्वत्र लहान लहान पाण्याचे झरे आहेत. भूकंप मात्र नेहमीं होतात. बिटुमिनस ( शिलाजतु ) व इतर तेलाचे कांहीं झरे किनाऱ्यावर आहेत. याची सांप्रदायिक माहिती अशी कीं, हें बेट इथकाचा राजा उलिसिस याच्या राज्याचा एक भाग होता. रोमन साम्राज्यांत हें बेट एपिरस प्रांताचा भाग होतें ( खि. पू २११ ). हें कालांतरानें व्हेनेशिअन लोकांच्या हातीं गेलें. पुढें याचे मालक अनुक्रमानें फ्रान्स, रशिया, इंग्लंड आणि ग्रीस हे झाले. येथील लोक जरी ग्रीक आहेत आणि त्यांची भाषा जरी ग्रीक आहे तरी त्यांचा पारमार्थिक संप्रदाय रोमनकॅथोलिक आहे.

बेटाची राजधानी झान्टे नांवाचीच असून, तें बंदर आहे. त्याची वस्ती साडेतेरा हजार आहे; हें प्राचीन झासिंथस नांवाचें शहर होय असें म्हणतात. हें खि. पू. ३७४ त अथेनियन लोकांच्या ताब्यांत होतें. हल्लीं हें बेट ग्रीक राज्यांत मोडतें. [ इमीट-डाय इनसेल झाकिन्थॉस; हेड-हिस्टोरिया न्युमोरम. ]

**झान्थस**—(आधुनिक गुनुक)लिसिआंतील प्राचीन शहर झान्थस नांवाच्याच नदीवर होतें. इराणी सेनापति हर्पागसनें ( खि. पू. ५४६ ) याला वेढा दिला व बालेकिल्ल्यास आग लाविली; तींत सर्व लोक मरण पावले. नंतर हें शहर पुन्हां वसविण्यांत आलें. खि. पू. ४२ त रोमन सेनापति जुनियस ब्रूटसनें हें शहर हल्ला करून घेतलें व शहरास आग लावून दिली. तींतहि पूर्वीप्रमाणें सर्व लोक जळून मेले. शहराचे प्राचीन अवशेष नदीच्या डाव्या तीरावर एका उंच पठारावर आढळतात, पैकीं नाटकगृह अद्यापि चांगल्या स्थितींत असून त्याच्या समोरच चारी बाजूंवर लिसिअन व ग्रीक लेख असलेला झान्थसचा प्रख्यात कीर्तिस्तम्भ आहे. याशिवाय दुसरे अनेक अवशेष आहेत.

**झाफरखान**-एक फारशी ग्रंथकार. याचें खरें नांव ख्वाजा इशान-उल्ला असून, तो शहाजहान बादशहाच्या कारकीर्दींत होता. झाफरखान ही पदवी आहे. याचा मुलगा इनायेतखान यानें शाहजहाननामा नांवाची ( शहाजहानच्या चरित्रपर ) एक बखर रचिली. झाफर हा तीन हजारी मनसबदार असून, कवि होता. तो १६६२ सालीं लाहोर येथें मरण पावला.

**झाफरवाल**, तहसील.-पंजाब. सियालकोट जिल्ह्यांतील ईशान्येकडील एक तहशील. क्षेत्रफळ २०७ चौ. मै. असून, एकंदर गांवें ४८३ व लो. सं. ( स. १९२१ ) १५८९३६. तहसीलीचें मुख्य ठिकाण हेंच असून, तहसिलीच्या एकंदर काळीचें उत्पन्न ( १९०३-४ ) २८३००० पर्यंत आहे.

गां व —हे डगे नदीच्या पूर्व किनाऱ्यावर वसलेलें असून येथील लो. सं. साडेचार हजारांवर आहे. सुमारें ४०० वर्षांपूर्वीं हें झाफरखान नांवाच्या ( बाटया ) जाट सरदारानें स्थापन केल्यामुळें शहराला त्याचें नांव पडलें आहे. येथें फारसा व्यापार नाहीं.

**झाबीताखान**—हा प्रख्यात नजीबउद्दौला अमीरुल-उमरा याचा पुत्र व रोहिल्यांचा सरदार होता. नजीबखान मेल्यावर ( १७७० ) हानें दिल्ली येथें व.दशहाचें कुटुंब ( शहाअलम बादशहा हा अलाहाबादेहून परत दिल्लीस येईपर्यंत ) आपल्या देखरेखीखालीं ठेविलें होतें (१७७१ डिसेंबर ). शहा आल्यावर त्यानें, झाबीतानें आपला उपमर्द केला व विशेषतः शहाअलमची वहीण खैरुन्निसा हिला व बादशाही जनान्यांतील बेगमांना भ्रष्ट केलें, असा त्याच्यावर आरोप करून पकडण्याचें ठरविलें. तेव्हां तो गुपचूपपणें सुजाउद्दौल्या( अयोध्येच्या नबाबा )कडे पळून गेला. तेव्हां त्याची जहागीर बादशहानें जप्त केली. परंतु थोड्याच दिवसांत हा मराठयांना शरण गेल्यानें, मराठयांनी बादशहाकडून त्याची जहागीर मोकळी करवून, त्याला अमीरुलउमरा ही पदवीहि देवविली. या वेळीं इंग्रजाचें वजन अयोध्या प्रांतांत वसत चाललें होतें, त्यामुळें त्यांनां शह म्हणून मराठयांनीं झाबीत यास हाताशीं धरिलें. हा स. १७८५ त मेला. याचाच मुलगा गुलाम कादर; त्यानें शहाअलम याचे डोळे काढले. झाबीतचा दुसरा मुलगा मोईनुद्दीनखान उर्फ भंबुखान, याला इंग्रज कंपनी पांच हजार रुपयांची मासिक नेमणूक देत असे त्याच्या पश्चात त्याच्या मुलांनां दरमहा एक हजार रु. मिळत. पैकीं वडील मुलगा महमूदखान हा स. १८५७ च्या गदींत सामील होता. त्यामुळें त्याला पकडून मीरत येथें मरेपर्यंत कैदेंत ठेविलें होतें. [ आयर्व्हिन-मोंगल एंपायर; बील; राजवाडेखंड ७, १२. ]

**झाबुआ**—हें मध्यहिंदुस्थानांतील, भोपावर एजन्सींतील एक संस्थान. हें उत्तर अक्षांश २२° २८′ ते २३° १४′ व पूर्व रेखांश ७४° २०′ ते ७५° १९ यांच्या दरम्यान असून, त्याचें क्षेत्रफळ १४३६ चौरस मैल व लो. सं. (१९२१) १२३९३२ आहे. याच्या उत्तरेस राजपुन्यांतील कुशाल्गड संस्थान; दक्षिणेस जोबत संस्थान; पूर्वेस अलीराजपूर आणि धार संस्थान; आणि पश्चिमेस मुंबई इलाख्यातील पंचमहाल जिल्हा आहे. सर्व प्रदेश माळव्यांतील डोंगराळ प्रदेशांत आहे.

सोळाव्या शतकांतील लभाना संस्थानचा प्रसिद्ध लुटारू जो झब्बु नाईक, त्याच्या नांवावरून या संस्थानास व राजधानीस हें नांव पडलें इ स. १५८४ त दिल्लीच्या बादशहानें या नायकाच्या वंशजास माळव्यांतील बदनावरची जहागिरी दिली. अकबराच्या वेळीं येथील जहागीरदार केशवदास यानें माळव्याच्या नैर्ऋत्येकडील बंडाळी मोडली. त्यामुळें केशवदास याला हा भाग जहागीर मिळाला व इ. स. १६०७ मध्यें बादशहाकडून उमराव हा किताब मिळाला; परंतु त्याचवर्षी त्याच्या वडील मुलानें त्याला

विषप्रयोग केला; यानंतर या भागांत नेहमीं दंगेधोपे होत. इ. स. १७२३ त जहागिदार अज्ञान असल्यामुळें, सर्व अधिकार होळकरांनीं आपल्याकडे घेतला. होळकरांची चौथाई व सरदेशमुखी झाबुआ संस्थानांतील कामगारच वसूल करीत असत. येथील राजा गोपाळसिंगानें इ. स. १८५७ च्या बंडांत इंग्रजांना चांगली मदत केली होती. स. १८७०पर्यंत थांडला आणि पेटलावड जिल्ह्यांवर इंदूर व झाबुआ या दोन्ही संस्थानचा अधिकार चालत असे. परंतु यामुळें तंटे होत. तेव्हां इ. स. १८७१ मध्यें पेटलावड इंदूरसरकाराकडे जाऊन थांडला झाबुआकडे जावें व झाबुआनें ( उत्पन्नाची बरोबरी होण्याकरितां )दरवर्षी ४३५० रुपये इंदूरसरकारास द्यावे असें ठरलें. हल्लींचे संस्थानिक हिज-हायनेस राजा उदेसिंग नांवाचे असून इ. स. १८९८ पासून हे कारभार पहात आहेत. यांना ११ तोफांच्या सलामीचा मान आहे.

संस्थानांत भिल्लांची वस्ति शेंकडा ७२ आहे. संस्थानांत ६८६ खेडीं आणि १५८ भिल्लांचीं पालीं आहेत. मही नदीच्या आसपासचा प्रदेश लागवडीस योग्य आहे. इतर डोंगराळ प्रदेश फारसा सुपीक नाहीं. एकंदर क्षेत्रफळापैकीं एकतृतीयांश प्रदेश लागवडीखालीं आहे.

येथें खनिज पदार्थ पुष्कळ असावेत असा अंदाज आहे, परंतु त्यांचा शोध कोणीं पूर्णपणें लावला नाहीं. रंभापुर येथें मँगेनीजच्या छोट्याशा खाणी आहेत. बहुतेक सर्व प्रदेश ओसाड असल्यामुळें व्यापारास गैरसोयीचा आहे. येथें पूर्वी अफू फार होत असे. या संस्थानांत चार परगणे व अठरा लहान लहान जहागिरी आहेत. जहागिरदारांकडून ५००० रुपये दरबारास व ७५१० रुपये होळकरास खंडणीदाखल मिळतात. संस्थानचें उत्पन्न १.१ लाख रुपये आहे. इ. स. १८८१ पर्यंत तांब्याचें नाणें येथें पाडीत असत.परंतु ही वहिवाट पुढें बंद पडली. हल्लीं ब्रिटिश नाणें सुरू आहे. राजधानी झाबुआ नांवाचीच असून ती भादुरसागर या तलावाच्या कांठीं आहे. येथील लो. सं. चार हजारांपर्यंत आहे. गोध्रा–रतलाम रेल्वेच्या मेघनगर स्टेशनपासून दहा कोसांवर हा गांव आहे. येथें एक भुईकोट किल्ला आहे व त्यांतच राजवाडा आहे. [ इंपे. ग्याझे. पु. १४.]

**झाबुलीस्तान**—हल्लींच्या गिझनीप्रांताचें प्राचीन नांव. इ. स. ७१३ त चीनचा बादशहा ह्युएनत्संग यानें आपल्या साम्राज्याच्या सरहद्दीवरील ज्या संस्थानिकांनां अरबांच्या विरुद्ध मदत केली, त्यांत हें झाबुलीस्तान संस्थान एक होतें. या संस्थानिकांनीं मुसुलमानी धर्माला व प्रचारकांनां त्यावेळीं जोराचा विरोध केला. याचवेळीं काश्मीरचा राजा चंद्रापीड हयात होता, त्यानेंहि मुसुलमानी धाडीस थोपविलें. [ स्मिथ–अर्लि हिस्टरी ऑफ इंडिया. ]

**झाबेल**—ही पंजाबांतील एक जात असून तिची लो. सं. ( १९११ )१४०४५ आहे. हे लोक सर्व मुसुलमान असून ते फेरोजपूर, मुलतान, मुझफरगड या जिल्ह्यांत व भावलपूर संस्थानांत आढळतात. यांचा धंदा कोळ्यांचा असून ते नदीच्या किनाऱ्यावर राहतात व त्यांची रहाणी मोर, खेल व झुल्का लोकांसारखी आहे. आपण उच्चवर्णांतून भ्रष्ट झालेले आहों असें ते म्हणतात. [ सेन्सस ऑफ इंडिया. १९११. ]

**झांबेसी नदी**—आफ्रिकेंतील चवथ्या नंबरची नदी. ही पूर्वाभिमुख असून हिंदी महासागरास मिळते; हिची लांबी २२००मैल.हिच्या भोंवतालचा सखल प्रदेश पांच लक्ष चौरस मैल आहे. हिच्यांतून बरींच आंत जहाजें जाऊं शकतात, त्यामुळें व्यापाराच्या कामीं हिचा उपयोग होऊं शकतो. हिला अनेक नद्या मिळतात. हिच्याच प्रवाहापासून 'व्हिक्टोरिया फाल्स' नांवाचा प्रचंड धबधबा तयार झाला आहे. नदीच्या थडीचा प्रदेश म्हणजे प्राचीन मोनोमोतपाचें राज्य होय. लिव्हिंगस्टोन, कर्क, गिबन्स, पिंटो वगैरे यूरोपियन शोधकांनीं हिच्या कांठचा प्रदेश व्यापारीदृष्टीनें शोधून पाहिला आहे. [ लिव्हिंगस्टोन—नॅरेटिव्ह ऑफ ॲन एक्स्पेडिशन टु दि झांबेसी ॲंड इट्स ट्रिब्युटरीज ].

**झांबोअंग**—फिलिपाईन बेटांतील मोरो प्रांत व झांबोअंग जिल्हा यांचें मुख्य ठाणें. येथून इमारतीचें लाकूड, ताग, ऊंस, तंबाखू, बटाटे, खोबरें, तांदूळ, इत्यादि माल निर्गत होतो. हें शहर बंदरहि आहे. या बेटांतील हवा खाण्याचें हें एक उत्तम ठिकाण आहे. ही स्पॅनिश लोकांची जुनी वसाहत आहे. येथें पूर्वींच्या गुलामांच्या वंशजांची वस्ती बरीच आहे.

**झामपोदर**—मुंबई, काठेवाडप्रांत. झालावाड जिल्ह्यांतील स्वतंत्र खंडणी देणारें एक लहान संस्थान. येथील तालुकदार झाला रजपूत जातीचा आहे.

**झामसिंग**—गाविलगडचा पहिला रजपूत किल्लेदार. हा रजपूत पुरुष मूळचा बंगाल्यांतील रहिवासी. याला रघूजी भोंसल्यानें तिकडून आणून तो शूर व इमानी दिसल्यानें वाढवीत, त्याच्या ताब्यांत मेळघाटांतील सर्व ( ७८ ) किल्ले दिले; म्हणजे तिकडील सर्व किल्लेदारांवर त्यास अधिकारी नेमिलें. साबाजी व मुधोजी ( नागपुरकर भोंसले ) यांच्या भांडणांत निजामाचा सरदार धौशा हा मुधोजीच्या तर्फें एलिचपुरावर चालून आला असतां, झामसिंगाची त्याच्याशीं लढाई होऊन त्याचा पराभव झाला होता. त्याच्या पश्चात त्याचा पुतण्या प्रमोदसिंग हा गाविलगडचा किल्लेदार झाला. त्याच्या मागून झामसिंगाच्याच वंशांत हा अधिकार पुष्कळ दिवस होता; दर्यासिंग, बेणीसिंग हे प्रख्यात पुरुष होऊन गेले. वेलस्लीनें गाविलगड ज्या वेळेस घेतला ( डिसेंबर १८०३ ) त्यावेळीं बेणीसिंग हा तेथें किल्लेदार होता. हा अखेरपर्यंत लढत होता; शेवटीं एका गोंडाच्या फितुरीनें

इंग्रज किल्ल्यावर चढले तेव्हां वेणीसिंगानें त्यांनां जोराचा प्रतिकार केला; अखेरीस त्यानें वायकांचा जोहार करून आपला देह धारातीर्थी अर्पण केला. किल्ल्याच्या दिल्ली-दरवाजांतच त्याचें प्रेत पडलें होतें ( तारीख १५ ). हल्लीं याचा वंश वैतुल येथें नांदत आहे. [ वेलस्ली-डिस्पॅचेस; काळे-वऱ्हाडचा इतिहास. ]

**झामोरा**—स्पेन. झामोरा प्रांताचें राजधानीचें ठिकाण. हें शहर उंचवट्यावर असून डयुरो व व्हलडेराड्यु या नद्यांच्या संगमाच्या खालच्या भागाला आहे. येथील व्यापार मुख्यतः धान्याचा आहे; परंतु लहान प्रमाणावर येथें कातड्याचा, तागाचा व लोंकरीचा माल, मातीचीं भांडीं, टोप्या व दारू हीं तयार होतात. मेरिनो नांवाच्या मेंढ्यांची व बकऱ्यांची येथें ( व या प्रांतांत ) चांगली निपज करितात. प्राचीन काळीं तटबंदीच्या दृष्टीनें झामोरा महत्त्वाचें ठिकाण होतें. इ. स. ७४८ मध्यें लिआनच्या पहिल्या अल्फोन्सोनें हें शहर मूर लोकांपासून घेतलें. पुढें तें कांहीं कालपर्यंत मूर लोकांच्या पुन्हां ताब्यांत गेलें. नंतर कॅसाईल व लिआनच्या पहिल्या फर्डिनांडनें तें घेतलें. येथील किल्ला आठव्या शतकापासूनचा आहे व बाराव्या शतकांतील एक चर्चहि येथें आहे. त्यांत पंधराव्या शतकांतील कांहीं तसबिरी आहेत. सन १०७३ मध्यें झामोरा सहाव्या आल्फोन्सोच्या ताब्यांत गेलें.

**झामोरीन**—मलबारच्या हिंदु राजांनां ही पदवी होती. त्यांची राजधानी कालिकत ( कालीकोट ) येथें असे. झामोरीन यांनां सामुरी असेंहि म्हणत. अरब लोक जे प्रथम मलबार किनाऱ्यावर उतरत, ते या राजांच्या दरबारीं येऊन मग पुढें देशांत व्यापार अथवा प्रवास वगैरे करण्यास जात. वास्को द गामा व पोर्तुगीज लोक यांचे पाय हिंदुस्थानांत कायमचे रुजण्यास यांपैकींच एक भोळसर झामोरीन कारण झाला होता ( १४९८ ). याच पोर्तुगीज लोकांपैकीं प्रमुख अशा अलबुकर्क यानें तर तत्कालीन झामोरीन राजास विषप्रयोग करून त्याचा जीव घेतला.

चेरमाण पेरुमाळ हा राजा मुसुलमान झाला होता. त्याच्या राज्याचे दोन भाग होते; ते उत्तरकोलत्तीरी ( मलबार ) व दक्षिणकोलत्तीरी ( त्रावणकोर ) होत. त्यांत एरनाड नांवाचा एक परगणा होता; तेथील अधिपति सामुरी ( सामुद्री ) नांवाचा होता ( आठवें शतक ). त्याचें आडनांव इदार्दी.यानें राष्ट्रकूटांच्या हल्ल्याच्या वेळीं पेरुमाळ यास मदत केल्यानें हा महत्त्वास चढला. पेरुमाळ याच्यानंतर हाच त्या प्रांताचा राजा झाला. यानें आपलें राज्य वाढवून दर्यावरहि सत्ता स्थापन केली. त्यानें आपल्याला कुन्नलक्कोन ( गिरिसागरपति ) ही पदवी लाविली व कालिकोट राजधानी केली व परकीय व्यापारास आश्रय व उत्तेजन देऊन व्यापार वाढविला. अरबांच्या साहाय्यानें त्यानें राज्याचा विस्तार केला. त्याला महामखसमारंभाचा मान होता. मार्को पोलोच्या वेळीं कालीकोटचें राज्य भरभराटींत होतें ( १२९२-९३ ). सामुरींचें प्राबल्य चौदाव्या शतकांत जास्त होतें. अब्दुल रझाक या प्रवाशानें म्हटलें आहे कीं "कालिकोटास न्याय चांगला मिळतो, सुरक्षितता उत्तम आहे, मोठमोठे व्यापारी आपला अतिशय मौल्यवान माल भर उघड्या रस्त्यावर टाकतात, त्यास कोणीहि रक्षक नसतो, परंतु त्याची चोरी होत नाहीं. मालावर ( तो विकला तरच ) शेंकडा अडीच टक्के जकात आहे." पोर्तुगीज मलबारांत आल्यावर त्यांचा बेत देश बळकावण्याचा आहे ही कल्पना या राजांस झाली नाहीं, म्हणून त्यांनीं त्यांनां आश्रय दिला. गामानें, हरवलेल्या गलबतांचा शोध करण्यास आलों अशी थाप देऊन कालिकोटास पहिला मुक्काम केला होता. गामानें भरपूर नजराणे देऊन झामोरीनचें मन वळविलें. अरबांनीं त्याचा उद्देश ( देशाकाबिजातीचा ) झामोरिनास उघड करून दाखविला; परंतु त्याला तो खरा वाटला नाहीं. दवणे व परीक्ष हे दोन कालिकोटचे रहिवाशी गामास फितूर झाले होते, त्यांनीं झामोरीनची व गामाची गांठ घालून दिली व कालिकोटच्या व्यापाराची मख्खी गामास दाखवून दिली. पुढें ( ३० आगष्ट इ. स. १५०० ) काब्राल या फिरंग्यानें कालीकोट येथें येऊन व पोर्तुगालच्या राजानें दिलेले अनेक नजराणे झामोरिनास देऊन तेथें एक वखार स्थापन केली; परंतु तेथें त्याला अरब लोकांशीं फार कटकट करावी लागली. तेव्हां तो परत ( पोर्तुगालास ) गेला. तेव्हां पोर्तुगालहून कालीकोटवर एक आरमार पाठविण्यांत आलें. त्याचें व झामोरीनच्या आरमाराचें युद्ध होऊन ( १५०२ ) झामोरीनच्या पराभव झाला.या लढाईत पूर्वी कोचीनच्या राजाचा प्रांत झामोरीननें घेतल्यामुळें त्या राजानें फिरंग्यास ( झामोरीनच्या विरुद्ध) मदत केली. पुढें हिंदुस्थानच्या व्यापारासाठीं झामोरीनशीं युद्ध करणें जरूर आहे असें ठरवून पोर्तुगालच्या राजानें पुन्हां एक मोठें आरमार देऊन गामास इकडे पाठविलें. कोचीनच्या राजानें यावेळींहि गामास मदत दिली. आणि झामोरीनचा पराभव झाला.त्यानें पाठविलेल्या ब्राह्मण वकिलाचे हात तोडून आठशें लोकांनां गामानें जिवंत जाळलें ( १५०२ ).झामोरीनचा या लढाईत पराभव होण्यास कारण त्याच्या राज्यांतील कांहीं लोक गामास फितूर झाले होते. मात्र गामा परत गेल्यावर झामोरीननें कोचीनवर स्वारी करून, तेथील राजाचा पराभव करून कोचीन घेतलें ( १५०३ ). तेव्हां पोर्तुगालहून अलबुकर्क हा आल्मीडासह आरमार घेऊन आला व त्यानें झामोरीनवर स्वारी करून त्याचा पराभव केला ( १५०४ ) व झामोरीनच्या गादीवर कोचीनच्या राजास बसविलें. पुढें फ्रान्सिस्को आल्मीडा यानें आपल्यास कोचीन वगैरे प्रांताचा पोर्तुगीज व्हॉइसराय म्हणविलें ( १५०५ ) व वर सांगितल्याप्रमाणें अलबुकर्क यानें झामोरीनला विष देऊन खून केला. यानंतर झामोरीन हे जहागीरदाराप्रमाणें बनले. इंग्रजांची सत्ता मलबारांत

वाढल्यावर त्यांनीं या राजांनां नेमणुका करून दिल्या. सन १८९६ त मनविक्रमसूरी नांवाचा झामोरीन वारला. त्याला महाराजा बहादूर ही पदवी असून, सालांना एक लक्ष चौतीस हजारांची नेणूमक होती [ सरदेसाई–ब्रिटिश रियासत; स्टॅन्ले–थ्री व्हॉयेजिस ऑफ वास्को द गामा; लोगन–मलबार; स्मिथ–ऑक्सफोर्ड हिस्टरी ऑफ इंडिया ]

**झार**—रशियाच्या बादशहाला झारा हें उपपद लावलें जातें. झार हा शब्द सीझरपासुन आला असून त्याचा अर्थ सुलतान असा होतो. प्रथमत बल्कन टापूंतील स्लाव लोकांनीं हा शब्द वापरण्यास सुरवात केली. मध्ययुगीन बल्गेरियन लोक आपल्या राजाला झार या शब्दानें संबोधीत असत. पुढें मस्कोव्ही व कॉन्स्टांटिनोपल यांमध्यें जसजसें दळणवळण वाढत गेलें, व विशेषतः मॉसिडोनियांतील बेसिलच्या राजघराण्यामध्यें बेटीव्यवहार होऊं लागल्यामुळें, त्यांनींहि झार शब्द वापरण्यास सुरवात केली. मोंगल लोकांचें वर्चस्व झुगारून दिल्यानंतर मस्कोव्हीच्या राजांनीं आपल्याला झार म्हणून घेण्यास सुरवात केली. रशियन बादशहा चौथा इव्हान (१५३३–१५८४), यानें प्रथमतः आपल्याला झार हा शब्द लावून घेतला. व तेव्हांपासून रशियन बादशहाच्या मागें झार हा शब्द लावण्यांत येऊं लागला. झारच्या बायकोला झारित्सा हा किताब आहे.

**झारगर जात**—या जातीचे लोक बहुतेक काश्मीरमध्यें असून तिची लोकसंख्या साडेसहा हजार आहे. या जातींत हिंदु, मुसुलमान व शीख असे लोक आहेत; हे सोनाराचा धंदा करतात. [ सेन्सस ऑफ इंडिया १९११. ]

**झारा**—पूर्वीच्या ऑस्ट्रिया–हंगेरीमधील डालमेशिया म्हणून जो प्रांत होता त्याची ही राजधानी होती. तेथील लोकसंख्या तीस हजारांवर आहे. हें शहर आड्रिआटिक समुद्राच्या किनाऱ्यावर आहे. येथें ग्रीक व रोमी ख्रिस्ती संप्रदायाचे विशप राहतात.

**झारापाप्रा**—ही जमीनदारी मध्यप्रांतांत चांदा जिल्ह्यांत असून तिचें क्षेत्रफळ १०९ चौरस मैल व एकंदर गांवें ३४ (पैकीं ओसाड ११) आहेत. झारापाप्रा येथें डोंगरांत पूर्वी जमीनदारीचें मुख्य ठिकाण पाप्रा होतें, परंतु शेजारचा अहिरींचा जमीनदार भीमराव यानें पाप्रा ताब्यांत घेतलें. तेव्हां पाप्राच्या जमीनदारानें थोडें उत्तरेकडे सरकून झारा गांव आपलें ठाणें केलें व त्या वेळेपासून जमीनदारीस झारापाप्रा म्हणतात. ठाण्याची लोकसंख्या दीड हजार असून जमीनदारींत एकंदर तळीं १७ आहेत. जमीनदार हलबा जातीचा आहे. जमीनदारींत जंगल पुष्कळ आहे. जमीनदारीचें उत्पन्न १०००रु. असून इंग्रजांनां ६० रु. खंडणी द्यावी लागते. [ चांदा ग्याझेटियर. ]

**झार्‍होन**—हा मोरोक्कोंतील एक पर्वत असून याच्या एका पठारावर मुलाई इद्रिस झार्‍होन नांवाचें एक शहर वसलें आहे. मुलाई इद्रिस (पहिला) हा मूरिश साम्राज्याचा संस्थापक होता. त्यास ७९१ या सालीं येथें पुरलें. या गांवच्या लोकांनां कर द्यावा लागत नाहीं व फौजेंत माणसें पाठवावीं लागत नाहींत. कांहीं हें सर्व शहर पवित्र क्षेत्र मानतात आणि मुसुलमानांशिवाय येथें कोणासहि जावयाची परवानगी नाहीं. जवळच फरोहाचा किल्ला व रोमन राजधानी आणि इद्रिसची राजधानी यांचे प्राचीन अवशेष आहेत.

**झालकाटि**—बंगाल.डाका विभागांतील बकरगंज जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. कलकत्ता आणि बारीसाल यांच्यामध्यें हा गांव असून, पूर्वबंगालमधील व्यापाराचें एक ठिकाण आहे. येथील लो. सं. साडेपांच हजार आहे. १८७५ सालीं म्युनसिपालिटी स्थापन झाली.

**झालरपाटण, राजधानी.**—ही झालावाड संस्थानची राजधानी. चंद्रभागा नदीकांठीं एका लहानशा डोंगराच्या पायथ्याशीं ही वसलेली आहे. येथील लोकसंख्या आठ हजार आहे. पूर्वी या गांवांत १०८ देवळें असून त्यांत घंटा ठेवल्या होत्या म्हणून यास हें नांव पडलें असें कोणी म्हणतात. कोणा झालर म्हणजे पाण्याचे झरे जवळ असल्यामुळें हें नांव पडलें असें म्हणतात. येथील राजघराणें झाला नांवाचें असून त्याच घराण्यांतील एकानें हें गांव वसविलें म्हणून झालरपटण नांव पडलें असें कांहींचें म्हणणें आहे व तें सयुक्तिकहि दिसतें.

हल्लींच्या गांवाच्या थोडें दक्षिणेस माळव्याचा राजा चंद्रसेन यानें वसविलेली चंद्रावती नांवाची नगरी पूर्वी होती. हा राजा विक्रमादित्याच्या मागून गादीवर बसला असें अबुल फझलचें म्हणणें आहे. कनिंगहॅम यास येथें कांहीं प्राचीन तांब्याचीं व रुप्याचीं नाणीं सांपडलीं; त्यावरून हा गांव ख्रि. पू. ५०० ते १००० वर्षांचा असावा असें त्यानें अनुमान काढलें. तथापि हल्लीं येथें आढळणाऱ्या वस्तू सहाव्या सातव्या शतकांतील असल्यामुळें, चंद्रसेनानें हें गांव पुन्हां वसवून त्यास आपलें नांव दिलें असावें.

अवरंगझेबाच्या कारकीर्दींत या गांवाचा नाश होऊन तेथील देवळांची पडझड झाली असें म्हणतात. येथील शीतळेश्वर महादेवाचें देऊळ त्यांतल्यात्यांत प्राचीन असून त्याची बांधणी सहाव्या शतकांतील आहे. या प्राचीन अवशेषांच्या उत्तरेस झालीमसिंगानें इ. स. १७९६ मध्यें हा नवीन गांव वसविला. ‘जो कोणी या गांवांत स्थाईक होईल त्यास कोणताहि कर द्यावा लागणार नाहीं व कोणत्याहि गुन्ह्याबद्दल रु. १–४–० पेक्षां अधिक दंड होणार नाहीं’ अशा अर्थाचीं वाक्यें खोदलेली एक शिला त्यानें भर बाजारांत गाडून त्यानें गांवांतील वस्ती वाढविली. १८५० सालीं महाराज राणा पृथ्वीसिंग याच्या कामगारानें हे सर्व हक्क रद्द करून ती शिळा तळ्यांत फेंकून दिली. परंतु इ. स. १८७६ मध्यें ती शिला पुन्हां बाहेर काढण्यांत आली. इ. स. १८७६ मध्यें येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली.

छा व णी.—ही छावणी १७९१ सालीं झालवाडच्या झालिम सिंगानें वसविली. येथील लोकवस्ती १५ हजारांपर्यंत आहे. संस्थानिकाचा राजवाडा येथेंच आहे. येथील म्युनिसिपालिटी १८७६ सालीं स्थापिली आहे.

**झालवान**—बलुचिस्तानांतील कलात संस्थानांतील एक डोंगराळ विभाग. उत्तर अक्षांश २५° २८' ते २९° २१' व पूर्व रेखांश ६५° ११' ते ६७° २७' यांच्या दरम्यान असून, त्याचें क्षेत्रफळ २११२८ चौरस मैल आहे. १८५३-५४ सालीं झालवान आणि सिंध प्रांत यामधील सरहद्द ठरविण्यांत आली. दक्षिणेकडे हा प्रदेश उतरता होत गेला आहे. सर्व प्रदेश डोंगराळ आहे तरी हरबोई डोंगराखेरीज जंगल फारसें नाहीं. या प्रदेशाचे दोन भाग केले तर उत्तर भागाची हवा क्वेटाप्रमाणें आहे; दक्षिण भागाची हवा हिंवाळ्यांत बरी असते. परंतु उन्हाळ्यांत फार भयंकर उष्ण असते; हरबोई डोंगराच्या दक्षिणेस तापाचा आजार सर्वत्र आढळतो. वड आणि मष्कईच्या आसपास धरणीकंपाचे धक्के वारंवार बसतात. पावसाचें प्रमाण फारच कमी आहे.

इ ति हा स.—हा प्रदेश सातव्या शतकांत सिंधमधील राय घराण्याकडून अरबांकडे गेला. त्यावेळीं त्याची राजधानी खुझदार ही होती. यानंतर या प्रांतावर गझनी व घोरी घराण्यांनीं राज्य केलें. त्यानंतर मोंगलांचाहि अंमल होता. येथें निरनिराळीं राज्यें पुष्कळ झालीं. तरी बरींच वर्षे हा भाग कलातच्या खानाकडे होता. येथील लोकांनीं पुष्कळ वेळां बंडें केलीं. अगदीं अलीकडील बंड १८९३ सालीं झालें होतें. येथें पुराणवस्तूंचे अवशेष पुष्कळ सांपडतात. सूर्यपूजकांचीं स्थंडिलें व कुफिक शिलालेख येथें पुष्कळ सांपडले आहेत.

या प्रदेशांत एकंदर कायम वस्तीचीं अशीं २९९ खेडीं असून खुझदार हें मुख्य ठिकाण आहे. बहुतेक वस्ती ब्राहुई लोकांची असून, बलुच, जाट वगैरे लोक थोडे फार आढळतात. १९०१ सालीं एकंदर लोकसंख्या २२४०७३ होती. बहुतेक लोक ब्राहुई भाषा बोलतात. सिंधी भाषाहि कांहीं लोक बोलतात. येथें बागाइती व शेती मुळींच नाहीं असें म्हटलें तरी चालेल; गायरानें मात्र पुष्कळ आहेत. येथील बैलांची अवलाद ठेंगणी परंतु कणखर आहे; मेंढ्या, बकरीं पुष्कळ असून उंटांचा उपयोग मालाची नेआण करण्याकरितां करतात.

या प्रांतांत पूर्वी शिसें जमीनींतून काढीत असत. परंतु हल्लीं तो धंदा बंद पडला आहे. या भागांतील दुसऱ्या खनिज पदार्थांविषयीं कांहीं माहिती नाहीं. लोंकरी बुरणुसें, दोर वगैरे येथें तयार होतात. आगगाड्या व सडका या भागांत नाहींत. येथें दुष्काळ वारंवार पडतो. परंतु सिंधप्रांत जवळ असल्यामुळें लोकांस तो फारसा जाणवत नाहीं. इ. स. १८९७–१९०१ च्या दुष्काळांत येथील लोकांनीं आपल्या तरुण उपवर मुली सिंधमध्यें नेऊन विकल्या होत्या.

कलातच्या खानानें नेमलेला एक अधिकारी येथील कारभार पाहतो. त्यावर पोलिटिकल एजंटची देखरेख असते. इ. स. १९०३–१९०४ मध्यें या भागाचें उत्पन्न ३१००० रुपये होतें.

या प्रदेशांतील कांहीं वडे लोक आपल्या मुलांस शिक्षण देण्याकरितां अफगाण मुल्लांची नेमणूक करतात. याखेरीज येथें निराळी शिक्षणाची सोय नाहीं.

इ. स. १८९४ मध्यें उपस्थित झालेल्या बखेड्यांमुळें कलातच्या खानानें दरवर्षी ४०००० रुपये निरनिराळ्या जातींच्या मुख्य नायकांस वांटण्याकरितां मंजूर केले आहेत. याबद्दल त्या नायकांनीं त्यांच्या त्यांच्या भागांत शांतता राखण्याविषयीं जबाबदार धरण्यांत येतें.

येथील लोक धर्मभोळे असून भूताखेतांवर विश्वास ठेवणारे आहेत. कलात येथील कांहीं लोकांस औषधी वनस्पतींचें चांगलें ज्ञान आहे.

**झालावाड**—मुंबई, काठेवाडातील चार प्रांतांपैकीं एक प्रांत. झाला रजपूत यांच्या नांवावरून हें नांव पडलें आहे. यांत ध्रांगध्रा, गोंडळ वगैरे संस्थानें आहेत. या प्रांताचें क्षेत्रफळ ३९७८ चौरस मैल असून, तेथील लोकसंख्या तीन लाखांच्यावर आहे व जमीनमहसूल २५ लक्ष ६० हजारांपर्यंत आहे.

**झालावाड संस्थान**—हें संस्थान राजपुतान्यांतील कोटाझालावाड एजन्सींत आग्नेयीस आहे. संस्थानचें क्षेत्रफळ ८१० चौ. मै. असून त्याची लो. सं. (१९२१) ९६१८२ आहे. संस्थानचे दोन भाग केले आहेत, पैकीं किरपापूर हा लहान भाग असून तो फारसा महत्त्वाचा नाहीं. उत्तरेस व दक्षिणेस याची उंची समुद्रसपाटीपासून अनुक्रमें १००० व १५०० फूट आहे. संस्थानचा बराचसा भाग सपाट असून प्रमुख अशी काली नदी आहे; ती चंबळा मिळते. हें संस्थान उ. अ. २४° ३२' व पू. रे. ७६°–१०' यांच्या दरम्यान आहे. काळवीट, वाघ, चित्ता व रानडुकरें बहुतेक सर्वत्र आढळतात. याशिवाय सांबर, नीलगाय व चितळ यांचीहि कोठें कोठें वसति आहे. येथील हवा माळव्याप्रमाणेंच निरोगी आहे. पाऊस दरवर्षी सरासरी ३७ इंच पडतो.

इ ति हा स.—येथील राजघराणें रजपुतांच्या झाला वंशांतील असून राजास राणा व महाराज म्हणतात. इ. स. १४८८ च्या सुमारास राजधर नांवाच्या एका पुरुषानें काठेवाडामध्यें झालावाड प्रांतांत हलवड येथें लहानशी जहागीर स्थापिली. याच्या वंशांतील भाऊसिंग या पुरुषानें, औरंगझेबाचीं मुलें आपल्यास राज्य मिळावें म्हणून परस्पर भांडत असतां व फौज जमा करीत असतां एका मुलाच्या फौजेंत नौकरी धरिली. त्याचा पुत्र माधवसिंग यानें कोटाच्या महाराव भीमसिंगाची मर्जी संपादन केली व तेथील फौजदारी मिळविली. माधवसिंगानें आपली बहीण भीमसिंगाच्या मुलास दिली होती. त्याबद्दल त्यास नंदतागांवची

जहागीर व फौजदारी ( सेनापतित्व ) मिळाली. ही फौजदारी पुढें याच वंशांतील पुरुषाकडे चालू होती. माधवसिंगाचा मुलगा मदनसिंग व त्याचा हिम्मतसिंग यांनीं मराठे-रजपूत युद्धांत शौर्य व मुत्सद्देगिरी दाखविली. कोटयाच्या राजाचा व मराठयांचा तह यानेंच घडवून आणिला. इ. स. १७७१ त कोटयाच्या महारावानें मरतांना आपला मुलगा उमेदसिंग व राज्य अशीं दोन्हीं झालिमसिंग फौजदाराच्या स्वाधीन केलीं. झालीम हा हिम्मतचा पुतण्या. तो फार प्रसिद्ध झाला. झालीमसिंगाचे वंशज पुढें कर्तबगार न निघाल्यामुळें महाराव व त्यांच्यामध्यें नेहमीं वेबनाव होऊं लागला व त्याचे अनिष्ट परिणाम टाळण्यासाठीं स.१८३४त झालवार संस्थान हें स्वतंत्रपणें त्यांच्या स्वाधीन केलें. झालीमचा नातु मदनसिंग हा झालावारचा पहिला महाराव होय. १८३८सालीं या संस्थानचा व ब्रिटिश सरकारचा तह होऊन संस्थानानें शक्य तितकी सैन्याची मदत व ८०००० रु. खंडणी देण्याचें कबूल केलें. अलीकडे फक्त ३०००० रु. च खंडणी घेतात. मदनसिंग स. १८४५ त मेला. त्याचा मुलगा पृथ्वीसिंग ह्यानें १८५७ सालीं इंग्रजांना सहाय्य केलें. त्याच्या आश्रयास आलेल्या सर्व यूरोपियनांचें त्यानें रक्षण केलें.

सन१८९६त येथील राजाला,त्यानें राज्याची गैरव्यवस्था केल्यानें गादीवरून पदच्युत केलें व संस्थानांतील १५ तालुके कमी करून ते कोटयाच्या राज्यांत सामील केले. नंतर फत्तेपुरचा छत्रसाल ठाकुर याचा मुलगा भवानीसिंग यांस झालवाडच्या गादीवर बसविलें. हल्लीं हेच राजे असून त्यांचा जन्म स. १८७४ त झाला आहे. यांना १९०८ सालीं के. सी.एस. आय. पदवी मिळाली.यानीं राज्यकारभारासाठीं एक कौंसिल नेमिलें; राज्यांत पुष्कळ( विशेषतः शिक्षणविषयक ) सुधारणा केल्या; या संस्थानांत शहरें व खेडीं सर्व मिळून एकंदर ४१० गांवें आहेत. संस्थानचें उत्पन्न सहा लाख आहे. संस्थानांत एकंदर ५ तहसीली असून झालरा पाटण ( राजधानी ) व छावणी हीं दोन शहरें आहेत. सोंथे लोकांची वसति जास्त असून एकंदर लोकसंख्येंत त्यांचें प्रमाण शेंकडा २४ पडतें; निव्वळ शेतकीवर उपजीविका करणाऱ्यांचें प्रमाण शेंकडा ५४ आहे.

येथील जमीनीचे ( १ ) काळी जमीन, ( २ ) माल जमीन व ( ३ ) बरड जमीन असे तीन वर्ग आहेत. तिसऱ्या वर्गाची जमीन तांबुस असून त्यांत गोटे व रेती वरीच असते. उत्पन्नाचे मुख्य पदार्थ म्हटले म्हणजे ज्वारी, मका, कापूस, हरभरा आणि गहूं हे होत. गुरेंढोरें विपुल असून तीं चांगलीं मजबूत असतात. घोड्यांकरितां या संस्थानाची एकदां ख्याति होती. बागायतीस पाटबंधाऱ्याच पाणी पुरविलेलें असून त्याचा पुरवठा विहिरींतून होतो. येथें सुमारें ६००० विहिरी याच कामाकरितां बांधलेल्या आहेत. टेंकड्यांतून सुंदर वाळूचे दगड सांपडतात. लोखंड व तांबेंहि कोठें कोठें आढळतें परंतु हे खनिज पदार्थ आतां कोणी काढीत नाहींत. कापसाचें जाडेंभरडें कापड, पितळेचीं भांडीं, चाकू अथवा सुऱ्या आणि तरवारींचीं पातीं येथें बनवितात. अफू, कापूस व गळिताचीं धान्यें हे निर्गतीचे मुख्य पदार्थ असून मीठ, साखर, कपडा, धातु व इतर धान्यें यांची आयात होते. या संस्थानांत रेल्वे नाहीं. संस्थानांत फारसे दुष्काळ पडत नाहींत. गेल्या १०० वर्षांत १८९९-१९०० साल काय तें दुष्काळाचें होतें. स. १९०१ पर्यंत संस्थानचें निराळें नाणें येथें चालत असे परंतु अलीकडे इंग्लिश नाणें सुरू केलें आहे. येथें थोडेंसें सैन्य असून त्यांतील पायदळांपैकीं बऱ्याच जणांना पोलिसचें काम करावें लागतें. शिक्षणाच्या बाबतींत राजपुतान्यांतील एकंदर लहान मोठ्या संस्थान व जहागिरींत झालावाडचा सातवा नंबर लागतो. येथें लिहितां वाचतां येणारांचें प्रमाण शेंकडा ३-४ आहे. शिक्षण मोफत मिळतें.

**झालेयूकस**—एका ग्रीक धर्मशासनग्रंथकाराचें नांव. हा खि. पू. ६६० च्या सुमारास झाला असें म्हणतात. हा ग्रीकांचा पहिला धर्मशासनग्रंथकार होय.कित्येकांच्या मतें हा मुळींच झालाच नाहीं. हा जातीनें धनगर होता असें म्हणतात. याचे कायदे यास अथेन्सच्या अथीना या ग्रामदेवतेनें स्वप्नांत सांगितले असें म्हणतात. ड्राकोच्या कायद्याप्रमाणें हेहि कडक असल्यामुळें यांचा बभ्रा फार झाला. ते अनेक शतकांपर्यंत टिकले. यांत शिक्षा स्पष्ट सांगितल्या होत्या. म्हणून न्यायाधिशांस आपली लहर चालवितां येत नसे. व्यभिचारास डोळे काढण्याची शिक्षा होती. त्याच्या कायद्याचे नियम मोडणारास फांशीची शिक्षा असे. त्यानें शेवटीं आत्महत्या केली. [ गर्लयाक-झालेयूकस. ]

**झालोड**—मुंबई इलाख्यांत पंचमहाल जिल्ह्यांतील झालोड नांवाच्या तालुक्याचें मुख्य ठिकाण. येथील लोक बहुतेक शेतकरी असून त्यांच्यापैकीं बरेच भिल्ल व कोळी आहेत. येथून गहूं व हरभरा यांची निर्गत होते व याशिवाय कांहीं मातीचीं भांडीं, हातमागावरील कापड व लाखेच्या बांगड्याहि तयार होतात. येथें एक सुंदर व मोठा तलाव आहे.

**झांशी, जिल्हा**—हा जिल्हा संयुक्तप्रांतात, झांशी विभागांतील नैर्ऋत्य बाजूस उत्तर अक्षांश २४° ११' ते २५° ५० व पूर्व रेखांश ७८° १०' ते ७९° २५' या दरम्यान असून याचें क्षेत्रफळ ३६२८ चौरस मैल व लोकसंख्या ( स.१९२१ ) ६०६४९९ आहे. या जिल्ह्याचा उत्तरेकडील भाग पूर्वपश्चिम असून, त्याच्या उत्तरेस ग्वाल्हेरचें संस्थान व जालन जिल्हा; पुर्वेस धसान नदी; दक्षिणेस ओरछा संस्थान आणि पश्चिमेस दतिया, ग्वाल्हेर हीं संस्थानें आहेत. डुक्करें, नीलगाई, काळवीट, चितळ, सांबर, लांडगे वगैरे प्राणी आढळतात. या जिल्ह्यांतील हवा कोरडी व आणि उष्ण आहे. पावसाची सरासरी ३१

इंच आहे. हिंवाळ्यांत या जिल्ह्यांत वारंवार गारांचा वर्षाव होतो.

प्राचीन इतिहासः—हल्लीं झांशी जिल्हा ब्रिटिश बुंदेलखंडांत मोडतो. प्राचीनकाळीं याच्या उत्तरेकडील प्रदेशांत परिहार व कांठी रजपूत आणि दक्षिणेकडील भागांत गोंड लोकांची वस्ती होती. नवव्या शतकांत महोबाचे चंदेल उदयास येऊन, अकराव्या शतकांत त्यांनीं आपला राज्यविस्तार बराच केला. त्यावेळीं त्यांनीं बांधलेलीं तळीं व देवळें अद्यापि दृष्टीस पडतात. सन ११८२ सालीं पृथ्वीराजानें चंदेल राजाचा पराभव केला; पुढें (स. १२०२-३) कुतुबुद्दीनानें व अल्तमशनें (स. १२३४) या प्रांतावर पुष्कळ स्वाऱ्या केल्या. यानंतर या प्रदेशांत बरेच दिवस गोंधळ माजून राहिली होती. खंगार (खेंगर) नांवाच्या एका वन्य जातीचा या भागावर कांहीं दिवस ताबा होता. त्या काळांतच ओरछा संस्थानांतील करारचा किल्ला त्यांनीं बांधला. तेराव्या व चवदाव्या शतकांत बुंदेल्यांची सत्ता वाढली व त्यांनीं खेंगारांस हांकून दिलें. या बुंदेल्यांपैकीं एका रुद्रप्रतापाची स्वतंत्र सत्ता बाबरानें मान्य केली होती. पुढें (१५३१) या रुद्रप्रतापाचा पुत्र भारतीचंद यानें ओरछा शहर वसविलें. उत्तरोत्तर बुंदेल्यांच्या सत्तेचा उत्कर्ष होऊं लागला व मोंगलांचे व त्यांचे तंटे वारंवार झाले. सतराव्या शतकाच्या प्रारंभीं ओरछा संस्थानचा राजा वीरसिंग देव यानेंच झांशीचा किल्ला बांधला.

या जिल्ह्याचा दक्षिणेकडील प्रदेश रुद्रप्रतापाच्या दुसऱ्या वंशजाकडे होता, त्यानें चंदेरीचें राज्य स्थापिलें. सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात चंपतरायानें बुंदेल्यांची तिसरी शाखा स्थापली. त्याचा पुत्र छत्रसाल यानें झांशी जिल्ह्याच्या बऱ्याच भागावर आपली सत्ता प्रस्थापित केली. सन १७३४ त छत्रसाल हा मरण पावल्यावर मराठ्यांस या राज्याचा तिसरा भाग मिळाला व त्यांनीं बाकीचा बहुतेक भाग ओरछाच्या राजापासून जिंकून घेतला (१७४२). झांशीवर पेशव्यांची सत्ता सुमारें ३० वर्षे राहिली होती. १८१७ सालीं पेशव्यांनीं बुंदेलखंडावरील आपलें स्वामित्व सोडून तो प्रांत ईस्ट इंडिया कंपनीस दिला व त्याच वर्षी कंपनीनें तेथील मराठे सरदारांचे हक्क वंशपरंपरेचे आहेत ही गोष्ट मान्य केली.

इ. स. १८६१ मध्यें चंदेरी जिल्ह्याचें नांव बदलून ललितपुर असें ठेवण्यांत आलें. त्याच वर्षी बटवा नदीच्या पश्चिमेकडील भाग, झांशी गांव व किल्ला शिंद्यांनां देण्यांत आला. परंतु पुढें (१८८६) झांशी गांव, किल्ला व आणखी ५८ खेडीं शिंद्यांनीं इंग्लिशांस परत दिलीं व त्याबद्दल ग्वाल्हेरचा किल्ला, मुरार छावणी व कांहीं खेडीं शिंद्यांस मिळालीं. झांशी आणि ललितपुर हे जिल्हे १८९१ सालीं एकत्र करण्यांत आले.

या जिल्ह्यांत पुराणवस्तू पुष्कळ सांपडतात. या जिल्ह्यांत ९ मोठीं गांवें व १३३१ खेडीं आणि सहा तहशिली आहेत. त्यांचीं नांवें:—झांशी, महु, गरोथा, मोथ, ललितपुर आणि महरोणी. येथें शेंकडा ९३ हिंदु लोकांची वस्ती असून शेंकडा ९९ लोक बुंदेली भाषा बोलतात. जिल्ह्याचें एकंदर उत्पन्न साडे नऊ लाखांपर्यंत आहे. या जिल्ह्यांत गहूं चांगला पिकतो, ज्वारी, हरभरा वगैरे पिकेंहि येथें होतात. झांशी हें रेल्वेचें मोठें स्टेशन असल्यानें येथें मोठा व्यापार चालतो.

त ह शी ल.—झांशी जिल्ह्यांतील एक तहसील. उत्तर अक्षांश २५° ८′ ते २५° ३७′ व पूर्व रेखांश ७८° १८′ ते ७८° ५३′. क्षेत्रफळ ८९९ चौरस मैल. लोकसंख्या दीड लक्ष. हींत ३ गांवें व २१० खेडीं आहेत. जमीनमहसूल सव्वा लक्ष रुपये व एकंदर उत्पन्न दीड लक्ष आहे.

श ह र.—हें झांशी जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण जी. आय. पी रेल्वेवर मुंबईहून ७०२ मैल अंतरावर आहे. लोकसंख्या ५६ हजार. ओरछाचा राजा वीरसिंगदेव यानें हें शहर वसवून येथील किल्ला बांधला (१६१३). इ. स. १७४२ पर्यंत हा गांव बुंदेल्यांकडे होता, परंतु त्या सालीं छत्रसाल याच्या मृत्युपत्रानें हा गांव मराठ्यांकडे आला. मराठ्यांनीं किल्ल्यांतील कांहीं भाग वाढविला. पुढें कांहीं महिने हा किल्ला अयोध्येचा नवाब सुजा उद्दौला याजकडे होता. परंतु इ. स. १७६६ त तो पुन्हां मराठ्यांकडे आला. १८८६ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. येथें इंग्रज सरकारची लष्करी छावणी आहे. पितळेचीं भांडीं करण्याचे कारखाने येथें आहेत.

इतिहास, झांशीची स्थापना (स. १७४२):—माळवा व बुंदेलखंड हे दोन प्रांत दिल्लीच्या हमरस्त्यावर आहेत. त्यामुळें मराठी साम्राज्य वाढविण्यासाठीं ह्या दोन प्रांतांचें स्वामित्व काबीज करण्याकडे मराठ्यांनीं व (विशेषतः बाजीराव पेशव्यानें) लक्ष दिलें. शिंदेहोळकरांनीं माळव्यांत उद्योग चालू केल्यावर, लवकरच बाजीरावानें (१७३४) छत्रसालापासून कांहीं प्रांत मिळवून येथें मराठ्यांची सत्ता कायमपणें स्थापिली. बाजीरावाच्या वेळेस छत्रसालाशीं बुंदेलखंडच्या राज्यापैकीं एका विभागाचा ठराव झाला होता; परंतु प्रत्यक्ष वांटा झाला नाहीं. महाराष्ट्रांतून कोणी सरदार येऊन सालीना सहा लक्षांप्रमाणें पांच सात वर्षांची खंडणी वसूल करीत असे. पुढें (स. १७४२) मल्हार कृष्ण व राणोजी शिंदे असे उभयतां सरदार आले असतां व त्यांचा झांशीस मुक्काम झाला असतां रात्रीं बुंदेले ओर्च्छेकर यांनीं छापा घालून मल्हार कृष्णाचा खून केला व मराठ्यांचा पराभव केला. तेव्हां पुण्याहून नारोशंकर राजेबहादर याची रवानगी झाली. त्यानें प्रथम ओर्च्छास (वोडसा) येऊन लढाई करून व तेथील राजास कैद करून राजधानीवर गाढवाचा नांगर फिरविला. याच वेळीं झांशी मराठ्यांनीं घेतली. मल्हार कृष्णाच्या वंशजास वरूवासागराची जहागीर मिळाली. मल्हार कृष्णाचा भाऊ अंताजी कृष्ण, दोन मुलगे व जांवई वगैरे सारें कुटुंबच ओरछेकरानें कपटानें ठार मारिलें होतें; म्हणून पेशव्यांनीं त्याच्या वंशजास

जहागीर दिली. नारोशंकरानें स. १७४२–५६ पर्यंत झांशी प्रांताचा बंदोबस्त ठेविला. पुढें तो देशीं आल्यावर महादजी-पंत हा सुभेदार झाला. त्यानें खंडेरावापाशीं तलाव बांधिला आहे.तो१७६०पावेतों होता. त्याच्यानंतरचा बाबुराव कोन्हेर सुभेदार हा १७६५ पावेतों राहिला; यावेळीं राजेबहादराच्या वेळेपेक्षां वसूल कमी झाला.पुढें विश्वासराव लक्ष्मण आला. तो १७६५ पर्यंत होता. त्याच्या वेळेस मुलूख वेचिराख झाला. नंतर रघुनाथराव हरि नेवाळकर, जुन्नर सुभ्याचे सुभेदार, हे मोठे शूर व दक्ष असल्यानें त्यांची नेमणूक झाली (१७७०). त्यानीं पुन्हां ओर्च्छाच्या राजाचें पारिपत्य केलें. रघुनाथरावानें आपला भाऊ शिवरामपंत याच्या नांवें सुभ्याचीं वस्त्रें पुण्याहून आणवून आपण जलसमाधि घेतली ( १७९५ ). रघुनाथरावानें २५ वर्षें कारभार केला.

ज्या जागेवर हल्लीं झांशीचा किल्ला आहे, त्या ठिकाणीं पूर्वी बळवंतनगर नांवाचें लहान गांव होतें. नारोशंकरानें झांशीचा किल्ला ताब्यांत घेऊन तेथें आपलें वास्तव्य केलें, आणि किल्ल्यास लागूनच झांशी हें नवीन शहर वसविलें. त्यानें ओर्च्छाच्या लोकांकडून जबरीनें झांशी शहरांत वस्ती करविली आणि दक्षिणेंतूनहि पुष्कळ नवीन कुटुंबें आणून झांशीची वसाहत केली. गंगायमुनांच्या मधील सुपीक दुआबांत जाण्याचा हमरस्ता झांशीवरून असल्यामुळें थोड्याच अवधींत झांशीचा व्यापार वाढून तें शहर फार सधन झालें.

झांशी १८५७ सालच्या वेळचीः—विष्णुभट गोडसे वरसईकर यांनीं १८५७ च्या गर्दींत स्वतः पाहिलेली झांशीची हकीकत,माझा प्रवास या पुस्तकांत नमूद केली आहे. तीवरून त्यावेळचें पुढील वर्णन दिलें आहे– हें शहर उत्तर हिंदुस्थानांत फार सुरेख व टुमदार आहे.तेथील किल्ला मोठा बळकट असून तो शहराच्या पश्चिम बाजूला एका लहानशा डोंगरावर आहे. पायथ्याशीं सभोंवार रुंद व खोल खंदक पाण्यानें भरलेला असल्यामुळें एकाच बाजूनें आंत जाण्यास रस्ता असे. डोंगराच्या माथ्यावर चुनेगची तट ( २० फूट रुंदीचा ) सभोंवार बांधून आंत ४००० मनुष्य राहील इतकी जागा आहे. किल्ल्याचा गरगंज नांवाचा बुरूज ८० हात औरस चौरस असून तो १२५ हात उंचीचा होता; त्यावर सतत चार तोफा आणि संस्थानचें निशाण असे. किल्ल्यांत एकंदर ५१ तोफा होत्या. त्यांत कडक बिजली, भवानीशंकर वगैरे प्रख्यात होत्या. पाण्याचीं टांकीं पुष्कळ होतीं. मुख्य सरकारी वाडा पांच मजली व आठ चौकी असून सभोंवतीं निरनिराळ्या कामाचे बंगले होते. वाड्याच्या पश्चिमेस शिपाई लोकांचें कवाईत वगैरे करण्यासारखें विस्तीर्ण मैदान असून त्यांत चिंचेचीं झाडें पुष्कळ होतीं. तटाच्या बुरुजाखालीं मोठीं तळघरें असून त्यांत धान्य व दारूगोळा ठेवीत; मुख्य वाड्याचें काम जुनें, मजबूत व सुरेख होतें व तो इतका विस्तीर्ण होता कीं सर्व दालनांची व इतर ठिकाणांचीं माहिती होण्यास सुमारें एक महिना लागे. वाड्याच्या दक्षिण बाजूचा बंगला फार उंच व सात मजली होता, व उत्तरेकडे एक पाण्याचा चोपडा ( हौद ) होता, व त्यास पाणी महामूर होतें. त्याच जागेंत एक मोठी विस्तीर्ण व रमणीय बाग असून तींत एक लहानसा बंगला होता. त्यास शंकरकिल्ला म्हणत.

किल्ल्याच्या नैर्ऋत्य कोनापासून दक्षिण बाजूनें पूर्वेकडे व वायव्य कोनापासून उत्तरबाजूनें पश्चिमेकडे असा शहराचा ४॥ मैल घेराचा कोट गेला होता. तोहि उंच, रुंद व मजबूत असून मधूनमधून त्यास बुरूज होते. त्यास अंबारीसह हत्ती जाण्यासारख्या पांच वेशी मुख्य होत्या, बाकी लहान दरवाजे बरेच होते. किल्ल्याच्या पूर्वेस कोटाच्या आंत बरेंच मैदान टाकून शहरास आरंभ झाला असून शहराची वस्ती दाट आणि रस्तेहि अरुंद होते. मात्र कोष्टीपुरा, हलवाईपुरा वगैरे कांहीं मुख्य मुख्य भाग उंच उंच हवेल्यांनीं भरलेले असून सुरेख होते. शहराच्या मध्यभागीं भिल्याचा मोठा बाग असून त्यांत पांच सहा मोठया विहिरी होत्या. याच बागेंत पुढें बीजन झालें त्यावेळीं हजार लोक तीन दिवस अडकून राहिले होते. शहरांतील मुख्य सरकारी वाडा चार चौकी असून त्याचें काम पहाण्यासारखें होतें. शहराच्या दक्षिण दरवाज्याबाहेर एक मोठा तलाव असून त्यांत महालक्ष्मीचें एक टोलेजंग देऊळ होतें. ही देवी झांशीवाल्यांची कुलस्वामिनी असल्यामुळें देवस्थानाचा नंदादीप, पूजा, चौघडा वगैरेंचा बंदोबस्त फार मोठ्या खर्चाचा ठेविला होता. आषाढापासून तों चैत्रापर्यंत देवीस जाणें तें होडींतून जावें लागत असे.

लोक श्रीमान, उद्योगी व कसबी होते. त्यावेळीं गालीचे, रेशमी वस्त्रें व पितळी सामान या शहरासारखें दुसरें कोठें होत नसे. तसेच कागदावर चित्रें काढण्याचेंहि काम येथें अप्रतिम होत असे. शहरांत ब्राह्मणांचीं घरें सुमारें ३०० असून ब्राह्मण्याला शहर फार चांगलें असे. दक्षिणेंत पुणें व उत्तरेस झांशी अशीं तेव्हां म्हणच पडून गेली होती. झांशी बुंदेलखंडांतला भाग असल्यामुळें येथील स्त्रिया सुरेख व विशेषकरून विशाल व काळ्याभोर डोळ्यांच्या असतात व पुरुष नेभळे दिसतात.

**झांशीची राणी, लक्ष्मीबाई**—नेवाळकरांचे मूळ पुरुष रघुनाथराव हे कोंकणांत कोट ( राजापुर तालुका ) या गांवचे राहणारे, अष्टाधिकारी वृत्तिवंत होते. पेशवाईच्या आरंभास ते खानदेशांत बहादुरपूर ( साक्री तालुका ) येथें येऊन राहिले. त्यांस खंडेराव व दामोदर अशीं दोन मुलें होतीं. दामोदरास रघुनाथ, सदाशिव आणि हरि अशीं तीन मुलें झालीं. ह्यांनीं पेशवे व मल्हारराव होळकर यांच्या पदरीं राहून, खानदेशांतील चोरवड ( चोपडे तालुका ) परगणा व गुजराथेंतील अहमदाबाद प्रांतांतील कांहीं परगण्यांच्या मामलती करून लौकिक मिळविला; व होळकरांच्या फौजेंत सरदारीहि केली. यावेळीं त्यांस पारोळें ( पूर्व खानदेशांतील ) गांवची जहागीर मिळाली. रघुनाथपंत लढाई

मारला गेला. हरिपंताचा वडील मुलगा लक्ष्मण हा पारोळ्यास असे व खुद्द हरिपंत पेशव्यांच्या फौजेंत आपला दुसरा मुलगा रघुनाथ यासह सरदारी करीत. रघुनाथावर पेशव्यांची मर्जी असून, त्यांनीं त्याला झांशीकडील बंडाळी मोडण्यासाठीं वर सांगितल्याप्रमाणें तिकडील सुभेदारी दिली ( १७७० ). रघुनाथरावानें गोसाव्यांची फौज पदरीं बाळगून बुंदेलखंडांतील सर्व ( ३०–३२ ) संस्थानिकांस कह्यांत आणलें. बुंदेलखंडांतून सहा लक्ष रुपये खंडणी दरसाल रघुनाथराव वसूल करी. या सर्व कामांत त्याचे भाऊ लक्ष्मण राव व शिवराव यांचेहि मधून मधून साहाय्य मिळे. रघुनाथरावानें जलसमाधि घेतल्यावर शिवराव हा झांशीचा सुभेदार झाला ( १७९५ ). याच्या वेळेस पुण्यास रावबाजीची कारकीर्द सुरू होती. इंग्रजांनीं या सुमारास बुंदेलखंडावर चाल केली असतां, सर्व बुंदेल्या राजांनीं शिवरावाच्या पाठिंब्यामुळें त्यांचा पराभव केला (शिवरावहि यावेळीं पेशव्यांचा नोकर न राहतां साधारणपणें स्वतंत्र बनला होता ). त्यामुळें इंग्रजांनीं ( १८ नोव्हेंबर १८०३त ) त्याच्याशीं बजीवडल् अर्ज नांवाचा दोस्तीचा तह केला. व शिवरावाच्या साहाय्यानें इंग्रजांनीं बुंदेलखंडांत आपलें वर्चस्व स्थापिलें. पुढें ( ६ फेब्रुवारी १८०४ ) इंग्रजांनीं शिवरावभाऊशीं ९ कलमांचा पुन्हां मित्रत्वाचा तह केला. भाऊनें इंग्रजांस अनेकवार मदत केल्याबद्दलचे अनेक उल्लेख गव्हर्नर जनरल वेलस्ली याच्या डिस्पॅचेसमध्यें आहेत. याप्रमाणें १८ वर्षे कारभार करून, आपले नातु रामचंद्रराव यांजकडे कारभार सोंपवून भाऊनें रघुनाथरावाप्रमाणें ब्रह्मावर्त येथें जलसमाधि घेतली(१८१४). भाऊनां कृष्णाजी, रघुनाथ व गंगाधर असे तीन पुत्र होते. कृष्णाजी हा भाऊंच्या हयातींतच वारला ( १८११ ). त्यामुळें त्याचा मुलगा रामचंद्रराव हा भाऊंच्या पश्चात गादीवर बसला. याच सुमारास ( ता. १३ जून सन १८१७ ) पेशवे व इंग्रज यांच्यांतील तहान्वयें बुंदेलखंडावरचें स्वामित्व इंग्रजांनां मिळालें. त्यामुळें ( १७ नोव्हेंबर १८१७ ) रामचंद्रराव व इंग्रज यांच्यांत पिप्री येथें तह झाला; त्यांत दुसऱ्या कलमांत इंग्रजांनीं झांशी संस्थान रामचंद्ररावाकडे पुढें वंशपरंपरा चालविण्याचें कबूल केलें. पुढें (१८२५)रामचंद्ररावानें पेंढाऱ्यांच्या बंडांत व काल्पी येथें नानापंडिताच्या दंग्यांत, इंग्रजांच्या विनंतीवरून त्यांनां साहाय्य केलें; त्यामुळें (डिसेंबर १८३२) लार्ड बेंटिंकनें झांशीस दरबार भरवून कृतज्ञतेनें रामचंद्ररावानां महाराजाधिराज व फिदवी बादशहा जानुजा इंग्लिस्तान हीं पदवी व छत्रचामरें आणि नगारा इत्यादि चिन्हें अर्पण केलीं. रामचंद्ररावानीं २५ वर्षे कारभार केला. तो निपुत्रिक वारल्यामुळें ( १८३५ ) इंग्रजांनीं रामचंद्ररावाचा चुलता रघुनाथराव यास गादीवर बसविलें. हा फार दुर्व्यसनी निघाला. त्यामुळें संस्थानास कर्ज झालें व उत्पन्न — वर येऊन सर्वत्र अंदाधुंदी माजली. त्यामुळें इंग्रजांनीं सन १८३७ मध्यें संस्थानचा कारभार आपल्या हातीं घेतला. रघुनाथराव सन १८३८ त वारल्यावर त्याचा भाऊ गंगाधरराव गादीवर बसला. मात्र ( १८४२ पर्यंत ) संस्थानास झालेलें कर्ज फिटेतोंपर्यंत संस्थानचा कारभार इंग्रजांकडेच होता. पुढें २७ डिसेंबर स. १८४२ रोजीं ( इंग्रजांनीं ) गंगाधररावाशीं तैनाती फौजेच्या खर्चाकरितां २२७४५८ रुपयांचा मुलुख स्वतःकडे घेऊन तह केला व झांशी संस्थानची मुखत्यारी त्यास दिली. हेच गंगाधरराव झांशीच्या राणीचे पति होत.

वांई येथें कृष्णराव तांबे नांवाचा एक कऱ्हाडा ब्राह्मण रहात असे, त्याचा मुलगा बळवंतराव. त्यास पेशव्यांच्या हुजुरातींत सरदारी होती. त्याला मोरोपंत व सदाशिव अशीं दोन मुलें होतीं; मोरोपंतावर धाकटे चिमाजीअप्पा यांची मर्जी असे. पेशवाई नष्ट झाल्यावर चिमाजीअप्पा हे काशीस गेले असतां त्यांच्याबरोबरच मोरोपंत तांबे हेहि गेले. तेथें ते त्यांचे दिवाण होते. त्यांच्या स्त्रीचें नांव भागीरथी. त्यानां कार्तिक वद्य १४ संवत १८९१ (१९ नोव्हेंबर १८३५) रोजीं काशी येथें एक मुलगी झाली; तिचें नांव मनुबाई असें ठेविलें. ती फार चपल व तेजस्वी असल्यामुळें तिला छबेली असें कौतुकानें म्हणत. तीन चार वर्षांनीं तिची आई वारली, व त्याच सुमारास चिमाजीअप्पाहि वारल्यामुळें मोरोपंत हे ब्रह्मावर्तास श्री. बाजीरावांच्या पदरीं जाऊन राहिले. तेथें नानासाहेब, रावसाहेब व बाळासाहेब पेशवे व मनुबाई यांचा बंधुभगिनीचा स्नेह जमला. या मुलांबरोबर मनुबाईनेंहि लेखनवाचन व भालाबोथाटी, दांडपट्टा वगैरे मर्दुमकीचें शिक्षण मिळविलें; घोड्यावर बसण्यांतहि ती पटाईत होती. मुलींच्या खेळामध्यें ती राणी होई. भाऊबीजेच्या दिवशीं नानासाहेबादि त्रिवर्ग पेशवे मनुबाईस ओवाळणी घालीत.

या सुमारास गंगाधरराव यांचें पहिलें कुटुंब रमाबाई ह्या वारल्या. तेव्हां मुलीचा शोध करून मनुबाईची माहिती मिळाल्यावर, गंगाधररावानीं तिला मागणी घातली, व शके १७६४ च्या वैशाखांत झांशी येथें या उभयतांचें लग्न झालें. लग्नांत श्री. बाजीरावानीं वधूपक्ष स्वीकारून बरीच मदत केली. मनुबाईच्या सासरचें नांव लक्ष्मीबाई असें ठेवण्यांत आलें व मोरोपंतास झांशी दरबारांत सालीना तीनशें रुपयांची सरदारी देण्यांत आली.

गंगाधररावानीं सर्व लहानमोठ्या कामांवर योग्य माणसें नेमून राज्यव्यवस्था उत्तम ठेविली आणि ( ठाकूर व बुंदेले ) बंडखोरांचा चांगला बंदोबस्त करून रयतेस सुख दिलें. यांच्या कारकीर्दींत संस्थानांत शिल्लकहि पुष्कळ पडली. त्यांच्या जवळ ५ हजार घोडदळ व २ हजार गोल पोलीस ( पायदळ ) असून चार तोफखाने होते. गंगाधरराव दयाळु पण अतिशय कडक स्वभावाचे व शिस्तीचे होते. बुंदेले राजांवर त्यांचें फार वजन असे व ते यांनां काका म्हणत. एकदां दसरा रविवारीं पडला, तेव्हां शिलंगणास झांशीचा इंग्रज रेसिडेंट

येईना; त्यावर गंगाधररावांनीं त्यास सणसणीत निरोप पाठविला कीं, "माझे मुलाजमकी तनखेबद्दल मुलूख दिला, तेव्हां ठरावाप्रमाणें फौजेसह यावें, नाहीं पेक्षां आजचे मुहुर्तावर मुलुखावर जप्ती पाठवितों," तेव्हां रेसिडेंट गुपचुप येऊन स्वरीत सामील झाला. गंगाधरराव हे काशीयात्रेस गेले होते ( १८५० ). त्यावेळीं येथील इंग्रज अधिकारी त्यांस सामोरा आला नाहीं, त्यावरून त्यांनीं कलकत्त्यास लिहून त्याला माफी मागावयास व नौकरीचा राजीनामा द्यावयास लाविलें. या यात्रेंत बरोबर लक्ष्मीबाई होत्या. थोड्या दिवसांनीं ( १८५१ ) राणीला पुत्र झाला; परंतु तो तीन महिन्यांनीं मृत्यु पावला. त्यामुळें गंगाधररावास धक्का बसून त्यांची प्रकृति खालावली. अनेक औषधोपचार केले, राणीनें उपोषणेंहि केलीं; परंतु उपयोग होईना. अखेर प्रकृति फार ढांसळल्यानें गंगाधररावांनीं व राणीनें नेवाळकरांच्या घराण्यांतील एक मुलगा ( आनंदराव ) दत्तक घेण्याचें ठरविलें व बुंदेलखंडाचा नायब पोलिटिकल एजंट एलीस व लष्करी अधिकारी मार्टिन यांच्या देखत यथाशास्त्र दत्तविधान करून मुलाचें नांव दामोदरराव ठेविलें ( १८५३ नोव्हेंबर ). या प्रसंगीं गंगाधररावांनीं इंग्रजास एक खलिता लिहिला, व त्यांत इंग्रजांशीं झालेल्या ( १८१७ सालच्या ) तहांतील दुसऱ्या कलमाप्रमाणें आपण घेतलेल्या दत्तकास कबुली देण्यास कळविलें. या प्रसंगीं एलीस व मार्टिन हे हजर होते व त्यांनीं आपण या कामीं खटपट करूं असें कबूल केलें. वरीलप्रमाणेंच दुसरा एक खलिता बुंदेलखंडाचा पो. एजंट मालकम याच्याकडे पाठविला; एलीस यानेंहि मालकम यांस एकंदर हकीकतीचें पत्र लिहिलें. त्यानंतर गंगाधरराव हे २१ नोव्हेंबर रोजीं वारले.

हें समजल्यावर मालकमनें गव्हर्नर जनरलास दत्तक बाबतींत एक पत्र लिहिलें ( २५ नोव्हेंबर ); त्यांत त्यानें 'इंग्रज सरकारनें दत्तक कबूल करूं नये' असा स्पष्ट मजकूर लिहिला. मात्र राणीच्या शानशौकतीकरितां दरमहा पांच हजारांची नेमणूक करून सर्व संस्थान लवकर खालसा करावें असा सल्ला दिला. याप्रमाणें पत्र लिहून मालकमनें झांशीस ८।१० पलटणी बंदोबस्तासाठीं आणून ठेवल्याहि. यावेळीं सातारा, नागपूर व तंजावर हीं संस्थानें बिनवारशी म्हणून खालसा करणारा डलहौसी हा गव्हर्नरजनरल होता. त्यानें ही संधि वाया जाऊं दिली नाहीं व वंशपरंपरागत राज्य चालवूं हें तहांतील कलम फेटाळून लाविलें. हें कलम पुढीलप्रमाणें होतें. "इंग्रजसरकारचा अंमल बुंदेलखंडांत सुरू झाला त्यावेळीं कै. शिवरावभाऊ यांच्या ताब्यांत असलेल्या व सध्यां झांशीसरकारच्या ताब्यांत असलेल्या.... सर्व प्रांतांचे राव रामचंद्र यांस, त्यांच्या वारसदारांस व त्या वारसदारांच्या जागीं संस्थापित होणारांस इंग्रजसरकार वंशपरंपरागत मालक नेमून, ते त्या प्रांतांचे संस्थानिक आहेत असें कबूल करीत आहे" यावेळीं राणीनेंहि शिवरावभाऊनीं इंग्रजांवर केलेल्या उपकाराची आठवण देऊन त्यांनीं दत्तक मंजूर करावा म्हणून ( व त्याच वेळीं दतियाचा राजा, ओरछाचा राजा व जालवणचा जहागीरदार या तिघांनीं घेतलेले दत्तक इंग्रजांनीं मान्य केल्याची आठवण देऊन ) एक खलिता डलहौसी यास पाठविला. परंतु त्याचाहि कांहीं उपयोग झाला नाहीं. एलिस यानें सुद्धां दत्तक कबूल करावा म्हणून डलहौसीस पत्र लिहिलें होतें; परंतु मालकमनें तें आपल्यापाशींच दडपून ठेविलें. शेवटीं डलहौसीनें पुढील ठराव केला– "इंग्रजसरकारच्या संमतीशिवाय ज्यांना दत्तक घेतां येत नाहीं, अशा मांडलिक संस्थानिकांना दत्तकाची परवानगी देण्यास अथवा दत्तकास मान्यता देण्यास साक्षात् आम्ही कोणत्याहि वचनानें बांधलेलों नाहीं आणि त्यांच्या जहागिरी औरस संततीच्या अभावीं परत घेण्याचा आम्हांस हक्क आहे. झांशी संस्थान स्वतंत्र नसून आमचें मांडलिक आहे व त्या संस्थानास आमच्या परवानगीशिवाय दत्तक घेतां येत नसल्यामुळें आणि हल्लीं तेथें औरस संतति नसल्यानें सार्वभौम या नात्यानें आम्ही तें परत घेतों." याप्रमाणें झांशी संस्थान डलहौसीनें पूर्वीच्या वचनास हरताळ फांसून कुटिल नीतीनें गिळंकृत केलें ( २७ फेब्रुवारी १८५४ ).

वरील डलहौसीचा जाहीरनामा ज्यावेळीं एलिसनें राणीला सांगितला, त्यावेळीं त्यांना अत्यंत दुःख होऊन त्या म्हणाल्या कीं 'मेरा झांशी देऊंगा नहीं'. त्यांच्या ताब्यांत राजवाडा व त्यांना ५ हजारांचें पेनशन दिलें. परंतु त्यांनीं शेवटपर्यंत पेनशन घेतलें नाहीं. खाजगी शिल्लक आणि जडजवाहीर यांच्यावर त्यांचा हक्क मुळींच नसून तें सर्व दामोदररावांचें आहे असें डलहौसीनें ठरविलें! डलहौसी म्हणे कीं कायद्याप्रमाणें दामोदररावाचें दत्तविधान जरी संस्थान चालविण्यास योग्य होत नाहीं तरी खाजगी मिळकतीवर त्यांचा हक्क चालण्यास तें मान्य आहे. एका बाबतींत दत्तक मान्य व दुसरींत मात्र अमान्य असा हा आपमतलबी न्याय होता अखेर एलिसनें खजिन्यांतील शिल्लक व किल्ला ताब्यांत घेऊन राणीला शहरांतील राजवाड्यांत राहण्यास सांगितलें. इंग्रजानें किल्ल्यांत आपल्या पलटणी आणून ठेविल्या व झांशीकरांच्या सैन्याला कामावरून कमी केलें. राणीनें विलायतेंत कोर्ट ऑफ डायरेक्टर्सकडे अपील केलें व त्यांत डलहौसीचें सर्व म्हणणें सप्रमाण खोडून काढलें, परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. उलट कोर्ट ऑफ डायरेक्टर्सनें डलहौसीच्या निकालास पाठिंबा दिला व झांशीस इंग्रजी अंमल सुरू झाला. इंग्रजांच्या अंमलांत झांशी संस्थानची स्थिति स्पंजानें पाणी शोषून घेतल्यानंतर राहिलेल्या कोरड्या भांड्याप्रमाणें झाली होती, असें जॉन सलिव्हन म्हणतो. यानंतर राणीनें आपलें लक्ष्य धार्मिक कृत्यांत घातलें. ती दररोज पार्थिवपूजा करीत असे. राणीचें वर्तन अत्यंत पूज्य व सच्छील असल्यानें खुद्द मालकम यानेंहि म्हटलें

आहे. सन. १८५५ त तिनें दामोदररावाची मुंज करण्याचें ठरविलें व त्याबद्दल खर्चासाठीं म्हणून इंग्रजांनीं आपल्या ताब्यांत घेतलेल्या खाजगी सहा लक्षांतून एक लाखाची मागणी केली तेव्हां त्या रकमेवर दामोदररावाचा हक्क आहे व तो वयांत आल्यावर त्यानें ती रक्कम मागितली तर तुम्हीं ती परत द्याल अशाबद्दल जामीन द्या असें डलहौसीनें बाईला कळविलें ! याप्रमाणें स्वतःच्या पैशाला जामीन लागूं लागला. अखेरीस जामीन देऊन रावाची मुंज केली.

डलहौसीच्या अनेक कृत्यांमुळें १८५७ साल उजाडलें. प्रथम बऱ्हाणपूरच्या १९ व्या काळ्या पलटणीनें युद्धाचा झेंडा उभारला. नंतर शिपायांनीं मिरत, बरेली, कानपूर, लखनौ, दिल्ली वगैरे ठिकाणीं युद्धास सुरवात करून तीं तीं ठिकाणें ताब्यांत घेतलीं.या लोकांस अयोध्येचा नबाब,दिल्लीचा बादशहा व दुसरे नानासाहेब पेशवे ही मंडळी ( इंग्रजांनी त्यांच्यावर केलेल्या अन्यायांमुळें ) मिळाली व त्यांनीं त्यांचा पुढारीपणा घेतला.

झांशी येथील सैन्यानें ता. १ जून रोजीं दंगलीस प्रारंभ केला. स्टारफोर्ट व तेथील दारूगोळा वगैरे सर्व सामुग्री शिपायांनीं ताब्यांत घेतली व तेथील पलटणीचा मुख्य अधिकारी डनलॉप याला ठार केलें. तेव्हां शिल्लक राहिलेली यूरोपियन मंडळी किल्ल्यांत पळून जाऊन लपून बसली, परंतु शिपायांनीं किल्ल्यावर हल्ले चढवून तो काबीज केला (७ जून) व आंतील लोकांची कत्तल केली.

या गोष्टींत राणीचा कांहींहि हात नव्हता. उलट तिनें इंग्रजांनां मदतच केली होती. सैन्यांत गडबड झाली, तेव्हां गार्डन वगैरे इंग्रज अधिकारी राणीकडे गेले आणि आपलें रक्षण करण्याबद्दल त्यांनीं तिची प्रार्थना केली, व पुन्हां इंग्रजी अंमल होईपर्यंत सर्व झांशी संस्थान आपल्या ताब्यांत घ्यावें असें सांगितलें. तेव्हां राणीनें सांगितलें कीं, तुम्हांस आश्रय दिल्यास पलटणवाले आम्हांस लुटतील व ठारहि करतील. तसेंच पूर्वी स्वस्थता असतां व मी राज्य मागत असतां दिलें नाहीं व आतां बंडांत मला देतां काय? तरी पण मी तुमचें रक्षण करतें असें म्हणून गोऱ्या बायकामुलांनां राणीनें खास आपल्या राजवाड्यांत आणून ठेवलें होतें. परंतु पुढें गोऱ्या पुरुषांनींच त्यांनां किल्ल्यांत नेऊन ठेविलें. राणीनें किल्ल्यांतील या गोऱ्यांनां तीनचार दिवस चोरून गव्हाच्या रोट्या पाठवून त्यांची सर्व प्रकारची काळजी सुद्धां घेतली व इंग्रजांवर उपकार केले. एवढेंच नव्हे तर पुढें कत्तल झालेल्या गोऱ्यांनां मूठमाती देववून, वांचलेल्यांचा योग्य परामर्श घेतला. या वांचलेल्यांपैकीं मार्टिन नांवाच्या एका गोऱ्यानें स्पष्ट म्हटलें आहे कीं, राणीचा वरील कत्तलींत मुळींच संबंध नसून, उलट तिनें आमच्या रक्षणास १०० बरकंदाज पाठविले व दोन दिवस रसद पुरविली; तिनें आम्हांस दतियाकडे पळून जाण्याची सूचना करून मदत करण्याचेंहि ठरविलें, परंतु आम्हीच हट्टानें किल्ल्यांत राहिलों व शेवटीं आमच्याच सैन्यानें ( राणीच्या नव्हे ) आमची कत्तल केली. कायें हा इतिहासकारहि असेंच म्हणतो.

कत्तलीनंतर पलटणवाले राणीकडे आले व व त्यांनीं तीन लाख रुपये खर्चाकरितां मागितले. निरुपायानें राणीनें एक लक्ष रक्कम दिली ( नाहींतर राजवाडा तोफेनें उडवून देण्याचें पलटणवाल्यांनीं ठरविलें होतें ) व मग ते लोक राणीची द्वाही शहरांत फिरवून दिल्लीकडे गेले. तरीहि राणीनें इंग्रजांनां मदतच केली; तिनें सागरच्या छावणीवाल्यांस निरोप कळवून सावध केलें. त्यामुळें तेथील पलटणीस बिथरण्यास सवड मिळाली नाहीं. याप्रमाणेंच ठिकठिकाणच्या इंग्रजांनां राणीनें पत्रांनीं सावध केल्याचें कायें हाच कबूल करतो. यावेळीं मात्र वर सांगितल्याप्रमाणें इंग्रजांनीं झांशीचा राज्यकारभार राणीकडे पुन्हां सोंपविला. परंतु राणीच्या दरबारीं या सुमारास जुने व अनुभविक मुत्सद्दी कोणी नव्हते; बहुतेक अधिकारी कमी दर्जाचे होते. तरी पण सर्व कारभाराची माहिती राणी नियमितपणें इंग्रज अधिकाऱ्यांकडे पाठवीत होती, असें पिंकने व मार्टिन सांगतात.

या संधीचा फायदा घेऊन राणीचा एक दूरचा नातलग सदाशिव नारायण यानें करेराचा किल्ला बळकावून आपल्यास झांशीचा महाराज म्हणून जाहीर केलें.परंतु राणीनें त्याच्यावर सैन्य पाठवून त्याला पिटाळून लाविलें. पुन्हां त्यानें उचल केल्यावरून त्याचा पराभव करून त्याला झांशीच्या किल्ल्यांत कैदेंत ठेविलें. इतक्यांत ओरछ्याचा दिवाण नथेखां हा झांशीवर वीस हजार सैन्यासह चालून आला. त्यानें राणीला ओरछ्याचें मांडलिक होण्यास सांगितलें. परंतु तें तिनें नाकारून युद्धाची तयारी केली. सर्व जुन्या सरदारांनां जमवून किल्ल्यांत दारूगोळ्याचे कारखाने काढून किल्ला सर्व तऱ्हेनें जय्यत तयार केला. नथेखानें किल्ल्यावर हल्ले केले. प्रथम त्याच्या जयाचा रंग दिसत होता; परंतु राणीनें जातीनें युद्धव्यवस्था हातीं घेऊन आपल्या थोड्या लोकांनिशींच अखेर त्याचा पराभव केला व नथेखांकडून युद्धखर्च घेऊन त्याला सोडून दिलें. याप्रमाणें इंग्रजांसाठीं म्हणून बाईनें या दोन बंडाळ्या मोडल्या असतां उलट त्या लोकांनींच आमची बाजू घेऊन राणीशीं लढाई दिली असें इंग्रज लोक म्हणतात !

राणीसाहेब तेजस्वी, सुशील, गुणिजनांच्या पारखी, दयाशील, परोपकारी, उदार व शूर होत्या. सुमारें नऊ दहा महिने झांशी त्यांच्या ताब्यांत असतां त्यांनीं जो राज्यकारभार केला त्यांत त्यांचें प्रजावात्सल्य, दातृत्व,न्यायचातुर्य व कार्यदक्षता दिसून आली. त्यांची स्मरणशक्ति इतकी होती कीं,दोडशें मुजरेकऱ्यांपैकीं एखादा एखाद्या दिवशीं गैरहजर असल्यास त्याला त्याचें कारण दुसरे दिवशीं विचारण्यांत येई. ग्रंथसंग्रहाचाहि त्यांनां नाद होता. त्यांचा रोजचा कार्यक्रम त्यांनां प्रत्यक्ष पाहिलेल्या एका ( वरसईकर गोडशे

नांवाच्या) माणसानें दिला आहे. त्यावरून त्यांची योग्यता दिसून येते. त्या न्यायनिष्ठुर असल्यानें कधीं कधीं अपराध्यास छडीनें स्वतः शिक्षा करीत. कचेरींत जाण्याच्या वेळीं त्यांचा पोषाख, पायांत पायजमा, अंगांत जांभळ्या रंगाचा आंगरखा, डोकीस टोपी व तिच्यावरून बांधलेली वत्ती, कमरेस जरी-दुपेटा व त्यास लटकवलेली रत्नखचित तरवार व दोन उत्तम दमास्कसचीं पिस्तुलें असा मर्दानी असे. कधीं जनानीहि पोषाख असे. पतिनिधनानंतर अंगठी वगैरे किरकोळ वस्तूं-शिवाय त्यांनीं अंगावर अलंकार घातले नाहींत. त्यांचा पोषाख बहुतेक पांढरा असे. दरबारांत त्यांची बसावयाची खोली दिवाणखान्यालगत असून दारावर चिकाचा पडदा असे. त्यांनां स्वतः लिहितां येत असल्यानें त्या आपले हुकूम एखाद्या वेळीं स्वतःच लिहीत. त्या वर्णानें फार गौर असून उंच, सुंदर, रुबाबदार, करारी, नाजूक पण निग्रही, तोंड-वळा किंचित् लांबट, सरळ नाक, उंच कपाळ पाणीदार डोळे व सडपातळ अशा होत्या, असें टेलर वगैरे लेखकांनीं लिहून ठेविलें आहे. रयतेबद्दल त्यांनां फार काळजी वाटे. एकदां राज्यांत चोरांचा फार उपद्रव झाल्यानें त्यांनीं स्वतः त्यांच्या-वर जाऊन त्यांचें पारिपत्य करून रयत निर्भय केली. थंडीमध्यें गरीब लोकांस त्या उबदार कपडे देत असत. प्रत्येक मंगळवारीं व शुक्रवारीं त्या झांशीच्या महालक्ष्मीच्या दर्शनास मोठ्या इतमामानें जात. त्या अश्वपरीक्षेंत अग्रेसर होत्या. हिंदुस्थानांत त्याकाळीं श्री. नानासाहेब पेशवे, त्यांचे मेव्हणे बाबासाहेब आपटे (ग्वाल्हेरकर) व लक्ष्मीबाई हे तिघे अश्व-परीक्षक म्हणून प्रख्यात होते. लढाईंत जखमी झालेल्या लोकांची हरएक प्रकारचीं काळजी त्या स्वतःच्या देखरेखीखालीं घेत; त्यामुळें शिपायांची त्यांच्यावर भक्ति होती. व्याया-माचा शोक असल्यानें त्या रोज पहाटे कसरत व घोड्यावरील फेरफटका करीत.

झांशी ताब्यांत आल्यावर तेथील व्यवस्था आपण इंग्रज सरकारातर्फे पाहत आहों व ओर्च्छा आणि दतिया येथील राजांनीं इंग्रजांविरुद्ध आपल्या प्रांतावर स्वाऱ्या केल्या असतां आपण त्यांचा पराभव केला वगैरे माहितीचीं पत्रें त्यांनीं इंग्रज अधिकाऱ्यांस अनेक पाठविलीं, परंतु त्यांचा परिणाम उलट झाला. राणीनें बंड उभारलें असें इंग्रज म्हणूं लागले. या आक्षेपाच्या निरसनार्थ राणीनें आपला एक वकील त्यांच्याकडे पाठविला; परंतु त्यानें इंग्रजांकडे न जातां मध्येंच दडी मारिली व राणीला खोटीं पत्रें लिहिलीं. त्यामुळें इंग्रजांनीं आपलेंच म्हणणें खरें धरून व प्रत्यक्ष चौकशी न करितां सर ह्यू रोज यास झांशी काबीज करण्यास पाठविलें. यामुळें शेवटीं बाईचेंहि मन इंग्रजांविरुद्ध उलटलें. इंग्रजांनीं आपल्याशीं कृतघ्नता केली असें त्यांनीं जाणलें. पति वारल्यावर काशीस जाऊन केशवपनविधि करण्यास त्यांनां इंग्रजांनीं परवानगी दिली नाहीं; त्यांच्या खाजगी उत्पन्नांतून वरीच रक्कम गंगाधररावांनीं केलेल्या अर्जाकरितां इंग्रज जप्त करूं लागले. झांशीस गोवध होऊं लागला व महालक्ष्मीच्या पूजेकडील उत्पन्नहि इंग्रजांनीं जप्त केलें. या कारणांनीं राणीचें मन त्यांच्याविरुद्ध गेलें व त्यांचा आणि श्री. नाना-साहेब पेशव्यांचा पत्रव्यवहार सुरू झाला असें म्हणतात. यानंतर किल्ल्यांत त्यांनीं युद्धोपयोगी सामान तयार करण्याचें काम जारीनें सुरू केलें.

प्रथम रोजनें बुंदेलखंडांतील पलटणवाल्यांनीं काबीज केलेलीं सर्व ठिकाणें सोडवून साठ हजार सैन्यासह २० मार्च (१८५८) रोजीं झांशीस वेढा दिला. आपल्या सर्व कृत्यांचा परिणाम उलटा झाला व आपण नीतीनें वागलों असतांहि इंग्रज आपल्यावर उलटून आपल्यास धरण्यास तयार होऊन आला, असें पाहिल्यावर राणीचा मानी स्वभाव प्रगट झाला. रोजनें त्यांनां शरण येण्यास सांगितलें असतां त्यांनीं तिकडे दुर्लक्ष करून लढाईची तयारी त्वरेनें व जोरानें केली. त्यावेळीं गांवांतील पुरुषांप्रमाणें बायकांनींहि त्या तयारीस मदत केली, एवढेंच नव्हे तर तोफखान्यांत त्या स्वतः खपत, असें रोज म्हणतो. युद्धकलेंतील नियमाप्रमाणें राणीनें किल्ला सर्वतोपरी जय्यत तयार केला. त्यांच्या चातुर्याबद्दल रोज, लो वगैरे तज्ज्ञांनींहि राणीची तारीफ केली आहे. झांशी लढवावयाची हा सर्वांचा निश्चय कायम होता. त्यांनीं लालु बक्षी यास सेनापति करून काल्पीस रावसाहेब पेशवे व तात्या टोपी यांस मदतीस येण्याबद्दल पत्रें लिहिलीं तेव्हां पेशव्यांनींहि मदतीस येण्याचें कबूल केलें.

राणीच्या जवळ ह्यू रोजच्या सैन्यापेक्षां सैन्य फार थोडें होतें. शिवाय रोजला चंदेरीहून आणखी इंग्रजी सैन्याची बरीचशी कुमक आली होती. तारीख २३ रोजीं खरी लढाई सुरू होऊन राणीकडील घनगर्ज नांवाच्या तोफेनें इंग्रजांच्या सैन्याची दाणादाण उडविली. या तोफेचा धूर प्रथम दिसतच नसे; त्यामुळें शत्रु बेसावध राही, तोंच गोळे येऊन आदळत. शहरावर नेम लागू होण्यासाठीं मोर्चे बांधण्याची खटपट ३।४ दिवस इंग्रजांनीं केली. परंतु त्यांचें कांहीं चालेना. अखेर फितुरानें जागा समजल्यावरून त्यांनीं पश्चिम बाजूस मोर्चे बांधून शह-रावर तोफा चालू केल्या. त्यामुळें राणीची प्रथम निराशा झाली. पण त्यांनीं लागलीच जास्त जोरानें तयारी करून गांवाच्या तटास झालेली इजा भरून काढली, शहरांत पाण्याचे बंब ठेविले व लोकांसाठीं अन्नछत्र खुलें केलें. तारीख २६ ला राणीकडील गुलाम गोषखान या प्रख्यात गोलंदाजानें इंग्र-जांचा बराच नाश करून त्यांच्या सर्व तोफा बंद पाडल्या. त्याबद्दल त्यास राणीनें बक्षीस दिलें. तारीख ३१ पर्यंत राणीनें इंग्रजांचें कांहीं चालू दिलें नाहीं. तारीख १ एप्रिल रोजीं दुर्बिणीच्या सहाय्यानें इंग्रजांनीं किल्ल्यांतील पाण्याची जागा शोधून काढून तेथें तोफांचा मार चाल-विला. दुर्बिणी, तारायंत्र, शिस्तीचें व कवायती सैन्य, उत्तम व लांब पल्ल्याच्या तोफा वगैरे सामान इंग्रजांकडे होतें. इंग्रजांकडील किल्लेफोडीचे तोफगोळे ६० । ६५ शेरी

होते. किल्ल्यांतील सरकारी वाड्यावर ते पडत व नुकसान होई, परंतु जुनें काम असल्यानें गोळा पडेल तेवढीच जागा जायबंदी होऊन बाकीची सुरक्षित राही. उलट या सर्व सामानाचा अभाव राणीकडे होता. असें असतांहि त्यांनीं दाखविलेलें शौर्य व रणकुशलता पाहून आश्चर्य वाटतें व तसें शत्रुपक्षांतलि अनेक लोकांनां ( खुद्द रोजलाहि ) वाटून त्यांनीं त्यांची स्तुति केली आहे. वरील दिवशींच राणीच्या दुर्दैवानें किल्ल्यांतील दारूखाना इंग्रजांकडील गोळ्यानें पेटून जळून खाक झाला व४०।५० माणसें मेलीं. वेढा पडल्यानंतर दहाव्या दिवशीं १५ हजार फौजेनिशीं तात्या टोपी काल्पीहून येऊन त्यानीं इंग्रजांस बाहेरून वेढा देऊन लढाई सुरू केली. प्रथम तात्यांची सरशी होती, परंतु अखेरीस त्यांची फौज फुटली व तात्या काल्पीकडे निघून गेले. ज्यावेळीं तात्यांच्या फौजेनें इंग्रजांवर हल्ले चढविले त्याचवेळीं किल्ल्यांतून जर इंग्रजांवर तोफा सुरू झाल्या असत्या व लढाई चालू झाली असती तर खात्रीनें रोजचा पराभव झाला असता. परंतु किल्ल्याचा हवालदार हाच आंतून इंग्रजांस फितूर होऊन त्यानें यावेळीं किल्ल्यांतून एकहि गोळी वाजविली नाहीं व त्यामुळें अखेर तात्यांचा मोड झाला. या फितुरीमुळेंच पुढें शहर व किल्ला इंग्रजांच्या हातीं गेला असें म्हणतात अकराव्या दिवशीं स्वतः राणीनें सक्त मेहनत करून इंग्रजांवर हल्ले चढविले; सर्व दिवसभर त्यांनीं खपून शत्रूचें कांहीं चालूं दिलें नाहीं. बाराव्या दिवशीं पहाटें किल्ल्यांतील लोक गैरसावध असतां इंग्रजानें गवताचे भारे तटाजवळ रचून दक्षिण बाजूनें तट ओलांडून शहर घेतलें. एका फितुऱ्यानें इंग्रज लोक वेढा उठवून काल्पीकडे जात आहेत अशी खोटीच गोष्ट राणीला सांगितल्यानें त्या यावेळीं विश्रांति घेत होत्या. तेवढ्या वेळांत वरील गोष्ट घडली. तेव्हां किल्ल्यांतून उतरून दीड हजार लोकांनिशीं राणीनें गोऱ्यांवर चढाई करून त्यांनां घरादारांचा आश्रय घेण्यास लाविलें. राणी स्वतः यावेळी लढत होती; तिच्या समोर गोरे येईनात. तरवारीची लढाई संपवून त्यांनीं बंदुकी सुरु केल्या. तेव्हां नाइलाजानें राणी किल्ल्यांत परतली. इंग्रजांनीं शहर घेऊन लोकांची कत्तल करून शहरास आग लाविली व शहर लुटलें. ज्यानें गोऱ्यास पैका दिला नाहीं त्यास वेलाशक गोळी घालीत.अशा वेळीं बायको नवऱ्याचें रक्षण करण्यास आली तर त्या दोघांनां एकदम गोळी घालीत. अब्रूच्या भयानें अनेक स्त्रियांनीं विहिरींत जीव दिले. शहरांतील हें वर्तमान ऐकून राणीस फार दुःख झालें. त्या भरांत तिनें जोहार करण्याचा बेत केला,पण मन शांत झाल्यावर तिनें पेशव्यांकडे जाण्याचें ठरविलें. रात्रीं ( ४ एप्रिल ) अत्यंत निवडक असे तीनशें लोक घेऊन राणी किल्ल्यांतून बाहेर पडली; अडीच हजार किंमतीच्या करड्या रंगाच्या खंद्या घोड्यावर त्या स्वार झाल्या होत्या; त्यावेळीं त्यांचा पोषाख मर्दानी होता; अंगांत चिलखत असून, पाठीशीं बारा वर्षांच्या दामोदररावानां बांधून घेतलें होतें. जयशंकर शब्द करून किल्ल्यांतून निघून शहरांतून उत्तरदरवाज्यानें मंडळी बाहेर आली. यावेळीं शहरांतील प्रजेनें राणीला शेवटचें अभिवादन केलें. ही बातमी इंग्रजांस समजतांच त्यांनीं या लोकांवर तोफा सुरू करून पाठलाग चालविला. राणीजवळ बंदूक होती; तिचा उपयोग करून त्यांनीं घोडा भरधांव सोडला. अंधारामुळें सर्वत्र गडबड झाली. राणीनें इंग्रजांची फळी फोडून ( खुद्द रोजच्या छावणींतून ) काल्पीचा रस्ता गांठला. तें पाहून रोज याला फार आश्चर्य वाटलें राणीबरोबर एक दासी व एक बारगीर येवढेच टिकले. त्यांचा कांहीं गोऱ्यांनीं पाठलाग केला, भांडेर गांवीं ले. बौकर यानें आपल्या एका पलटणीनिशीं राणीला वेढा दिला. वेळ अत्यंत आणीबाणीची होती. परंतु न डगमगतां राणीनें बौकरवर हल्ला करून त्याला जखमी करून, सर्व पलटणीच्या देखत घोडा बाणाप्रमाणें सोडला व काल्पीकडे प्रयाण केलें यावेळच्या त्यांच्या शौर्याचें वर्णन इंग्रजांनींहि मोठ्या आदरानें केलें आहे. दुसरे दिवशीं रात्रीं राणी काल्पीस पोहोंचली, अन्नपाण्याशिवाय सारखे चोवीस तास ( १०२ मैल ) ही दौड होती. काल्पीस रावसाहेब पेशव्यानीं त्यांची उत्तम व्यवस्था लावून दिली.

दुसरे दिवशीं ( ५ एप्रील रोजीं ) झांशी शहरांत बीजन ( कत्तल ) सुरू झालें. लोक वाड्यांतील वंड्यांत ( भिंतींतील मोठमोठे चोरकोनाडे) व इतरत्र छपून राहिले गांवांत लढाऊ लोक कोणीच राहिले नसल्यामुळें निरपराधी दीन प्रजेस इंग्रजांनीं ठार मारण्याचें काम चालविलें. जीवाच्या भीतीनें लोक गवताच्या गंजींत लपत, तों गोऱ्यांनीं ती गंजीच पेटवून द्यावी. विहीरींत दुबून असलेल्या लोकांचीं डोकीं वर दिसलीं कीं, गोळ्या घालाव्यात, या प्रमाणें तीन दिवस बीजन ( पांच हजार लोकांचें ) झालें व कोट्यावधी किंमतीची लूट गोऱ्यांनीं लुटली. राजवाड्यांत तर अपार लूट मिळाली. सर्व राजवाडा धुवून गेला. सोनें, रुपें, पितळ, तांबें, जवाहीर, वगैरे लुटलें. कांहीं एक वस्त्रपात्र, राहिलें नाहीं; पोथ्यांचीं वेष्टणें सुद्धां नेलीं. झांशीचा सरकारी हस्तलिखित ग्रंथांचा अमूल्य व प्रचंड संग्रह गोऱ्यांनीं नाहींसा केला. महालक्ष्मीचें देऊळ व तिचे अलंकारहि लुटले. यानंतर काळ्या पलटणींनीं लुटीस प्रारंभ केला. त्यांनीं लोकांच्या घरांत जें सांपडलें तें सर्व धातू, धान्य, कापड देवांच्या मूर्ती, आडाचे दोर, रहाट, झाडावरचीं फळें, मडकीं यांसह एकूण एक चीज लुटली. ही लूट चार दिवस झाली. शहरांमध्यें माणसांचीं आणि जनावरांचीं सर्वत्र प्रेतें पडलीं होतीं. पांचव्या दिवशीं इंग्रजांनीं तेथें आपली द्वाही फिरविली. नंतर मिळविलेल्या लुटीचा इंग्रजांनीं सरकारीरीतीनें जाहीर लिलांव केला व त्यांत पुष्कळ नफा मिळविला. शिंदे वगैरे राजेरजवाडयांनीं सुद्धां हा माल विकत घतला. नंतर या प्रकरणांतील जे जे मुख्य लोक सांपडले त्यांनां वाड्यापुढें फांशीं दिलें. मोरोपंत तांबे( राणीचे वडील )

हे त्या रात्रीं इंग्रजांची फळी फोडून दतियाकडे निसटून गेले होते. परंतु ते अतिशय जखमी झाल्यानें, तेथील राजाकडे गेले असतां, त्यानें त्यांना पकडून इंग्रजांच्या स्वाधीन केलें व त्यांनीं त्यांना वाड्यापुढें फाशीं दिलें; त्यांच्याच बरोबर सेनापति लालाभाऊ यासहि फांशी दिलें ( ५ एप्रिल ).

काल्पीस आल्यावर विषादानें राणीनें आपली तरवार जेव्हां श्री. रावसाहेबानां परत देऊं केली, तेव्हां त्यांनीं त्यांची समजूत करून त्यानां एका सेनाविभागाचे सेनापति केलें. येथें बरेच पलटणवाले लोक जमा झालेले होते. रोजनें झांशीचा बंदोबस्त करून काल्पीकडे प्रयाण केलें ( २५ एप्रिल ).परंतु झांशी पुन्हां परत घेण्यासाठीं राणी व तात्या टोपी हे काल्पीहून निघाले असतां, वाटेंतच कुंच येथें दोघांची गांठ पडली. रोजनें अघाडी मारून माऱ्याच्या सर्व जागा काबीज करून पेशव्यांशीं लढाई दिली. ग्वाल्हेरच्या मदतीची वाट पेशवे पहात होते; परंतु ती वेळेवर आली नाहीं. पुष्कळ वेळपर्यंत त्यांच्या खास हुजरातीनें इंग्रजांस दाद दिली नाहीं. पण अखेरीस सैन्यांत शिस्त नसल्यानें गोंधळ होऊन पेशव्यानां मागें हटणें भाग पडलें. व ते परत काल्पीस गेले ( ६ मे ). या प्रसंगीं राणीचें म्हणणें पेशव्यानीं न ऐकतां ते बांदेवाल्या नवाबाच्या तंत्रानें चालत होते, त्यामुळें त्यांचा पराभव झाला. यावद्दल राणीनें पेशव्यांची चरीच कानउघाडणी केली.

काल्पीस पुन्हां युद्धाची तयारी झाली. राणीच्या हाताखालीं त्यांचे स्वतःचे लालवर्दीचे २०० घोडेस्वार असून यमुनेकडील उत्तरबाजू रक्षण करण्याचें काम त्यांच्याकडे होतें. रोज काल्पीस (१६ मे )दाखल झाला व लढाईस प्रारंभ झाला. येथेंहि त्यानें पेशव्यांच्या हलगर्जीपणाचा फायदा घेऊन प्रथम माऱ्याच्या जागा हस्तगत करून घेतल्या. पेशव्यांच्या लोकांनीं खोट्या उत्साहाच्या भरांत आपली सुरक्षित जागा सोडून, ते इंग्रजांच्या माऱ्याच्या टप्प्यांत गेले; त्यामुळें त्यांचा फार नाश झाला व ते मागें हटले. इतक्यांत राणीनें आपले २०० स्वार घेऊन अतिशय जोरानें इंग्रजांच्या उजव्या बगलेवर हल्ला चढविला. तो इतका असह्य होता कीं, तेथील इंग्रजी फौज पळून गेली. राणीनें तर इंग्रजांच्या तोफखान्यापर्यंत लढाई करून त्यांचा तोफखाना बंद पाडला. स्टुअर्ट हा एक सेनापति आपल्या लोकांनिशीं चालून आला असतां त्याचाहि पराभव राणीनें केला. अखेर स्वतः रोज हा शिलकी सैन्यासह आला. त्यावेळीं पेशव्यांचेंहि सैन्य राणीच्या मदतीस आलें, परंतु ते लोक भांग पिऊन बेशिस्त लढत असल्यानें रोजनें त्यांना मागें हटविलें; तेव्हां राणीलाहि नाइलाजानें परतावें लागलें. परंतु यावेळीं तिनें दाखविलेल्या शौर्याचें इंग्रजांनींहि कौतुक केलें. याप्रमाणें काल्पी पडली ( २४ मे ) व पेशव्यांनीं वर्षभर सांठवून ठेविलेलें युद्धसाहित्य व पैका इंग्रजांनां मिळाला ( तीस हजार शेर तर नुसती बंदुकीची दारूच होती ). या सर्व जयाचें कारण, रोज म्हणे कीं, आमची शिस्त व पलटणवाल्यांची बेशिस्त हें होय.

काल्पीहून पेशवे ग्वाल्हेरीकडे वळले. ग्वाल्हेरचा बळकट किल्ला प्रथम ताब्यांत घेऊन नंतर इंग्रजास तोंड द्यावें हा राणीचा सल्ला सर्वांस पसंत पडला, म्यालेसननेंहि या युक्तीबद्दल राणीची प्रसंशा केली आहे. त्यानें रावसाहेब पेशवे, बांदेवाला नवाब, तात्या टोपी व राणी या चौघांची तुलना करून बुद्धिचातुर्यांत राणीलाच पहिलें स्थान दिलें आहे. पेशवे हे मुरारच्या छावणीस ता. ३० मे रोजीं आले; ग्वालेरीस त्यावेळीं जयाजीराव शिंदे हा गादीवर होता. या सुमारास त्याचें वय २३ वर्षांचें होतें. महाराजपूर, पन्यारच्या लढायांत जय झाल्यानें ( १८४४ ) इंग्रजांची ग्वालेरीस चांगलीच पकड बसली होती. ग्वालेरीचा किल्ला इंग्रजांच्या हातीं होता. जयाजीस मुखत्यारी मिळाली ( १८५३ ) तरी सर्व कारभार रेसिडेंटच्या हुकमतीखालीं चालत होता. दिवाण दिनकर रघुनाथ राजवाडे हा होता. हा प्रथम एक कारकून होता, रेसिडेंट बुश्बी यानें त्याचे ( इंग्रजास उपयोगी पडणारे ) गुण पाहून त्यास उच्च पदास चढविलें. जयाजीला युद्धकलेचा शोक असून तो तेजस्वीहि होता. परंतु त्याच्यावर दिनकररावाचें वजन फार होतें. स. १८५७ च्या प्रारंभीं जयाजी हा ग. जनरल क्यानिंग यास भेटला असतां त्यानें त्याचा फार मान करून, त्यास पुत्र न झाल्यास दत्तक घेण्याची परवानगी देऊन संस्थान पश्चात चालू ठेवण्यांत येईल असें आश्वासन दिलें. ह्याचा परिणाम जयाजीवर बराच झाला व तो बंडवाल्यास मिळाला नाहीं. पलटणवाल्यांनीं जयाजीस पुढारीपण घेऊन आग्र्यावर चालून जाण्यास सांगितलें. परंतु त्यानें तें ऐकिलें नाहीं. यावेळीं जर जयाजी आग्र्यास गेला असतां व पलटणवाल्यानां मिळाला असतां तर इंग्रजांचें फार नुकसान झालें असतें. शिंदा विरुद्ध जाता तर इंग्रजास आपलें चंबूगबाळें उचलण्याचा प्रसंग आला असता. होळकर, भोपाळकर, बुंदेलखंडांतील संस्थानिक हे सारे जयाजीवर अवलंबून होते. क्यानिंगनें, जर शिंदे बंडांत सामील होईल तर मला उद्यां आपला गाशा गुंडाळावा लागेल अशी तार केली होती असें म्हणतात.

जयाजीनें ग्वालेरीच्या पलटणवाल्यांनां आपण मिळाल्याचें बाह्यात्कारीं आमिष लावून १५ आक्टोबर ( १८५१ ) पर्यंत प्रसंग निभावला. परंतु त्यानंतर इंदूरचीं पलटणें बिघडलीं व तात्या टोपी यांनीं येऊन ग्वालेरीचीं पलटणेंहि अनुकूल करून घेतलीं. पुढें या पलटणांनीं एके दिवशीं जयाजीची, त्यानें पुढाकार घ्यावा म्हणून स्पष्टच विनंति केली असतां त्यानें ती नाकारली व त्यांच्या विरुद्ध आपलीं खासगी मराठी पलटणें तयार करून जास्त फौजहि जमविली. तेव्हां चिडलेल्या पलटणवाल्यांनीं राजवाड्यावर हल्ला करण्याचें ठरविलें, परंतु तात्या टोपी यांनीं त्यांची समजूत

करून त्यांना कानपुरास नेलें ( १ डिसेंबर १८५७ ). ग्वालेरीचे जुने सर्व सरदार इंग्रजांच्या विरुद्ध झाले होते; शिलकी सैन्यहि फितलें होतें, आसपास युद्धें सुरु होतीं, अशा स्थितींत केवळ दिनकरराव ( व जयाजी ) यानें इंग्रजांशीं राजनिष्ठ राहून त्यांचा बचाव केला. पुढें ( एप्रिल १८५८ ) तात्या टोपी हे पुन्हां ग्वालेरीस आले असतां दिनकररावानेंच प्रसंग सांवरला होता. अशा स्थितींत रावसाहेब पेशवे काल्पीहून निघून ग्वालेरीकडे वळले व ३० मे रोजीं ग्वालेरीजवळ दाखल झाले,

तेथें आल्यावर रावसाहेबांनीं जयाजीस दोन तीन निरोप आपल्यास मिळण्याविषयीं पाठविले; परंतु त्यानें तिकडे दुर्लक्ष करून त्यांच्यावरच उलट चाल केली ( १ जून ) एकाएकीं हल्ला झाल्यानें पेशव्यांचें सैन्य गोंधळून पळूं लागलें. तेव्हां राणीनें आपल्या दोनशें स्वारांनिशीं शिंद्यांच्या तोफखान्यावर जोरानें चालून जाऊन व गोलंदाज कापून काढून तोफा बंद पाडल्या. या वेळीं जयाजी स्वतः पांच हजार फौजेनिशीं राणीवर तुटून पडला. तरीहि राणीनें न डगमगतां त्याचे हल्ले परतविले. इतक्यांत तात्या टोपीनींहि आपल्या पथकानिशीं जयाजीवर चाल केली. फडाक्याचें युद्ध होऊन जयाजीचा पराभव झाला व तो दिनकररावासह आग्र्यास इंग्रजांकडे पळून गेला. याप्रमाणें या प्रसंगाचें श्रेय मुख्यतः राणीकडे होतें. शहरांत प्रवेश केल्यावर तात्यानीं ग्वालेरीच्या किल्ल्याचा ताबा घेतला. तेथील किल्लेदार त्यास अनुकूल होता. गांवांत लूट न करण्याबद्दल रावसाहेबांनीं सक्त ताकिदी दिल्या होत्या. नंतर ता. ३ जून १८५८ रोजीं ग्वालेरीस फुलबागेंत रावसाहेबांनीं राज्यारोहणसमारंभ करून पेशवाईची स्थापना केली व श्रीमंत नानासाहेबांच्या नांवाची द्वाही फिरविली आणि ब्राह्मणभोजनें सुरू करून सर्वजण ऐषआरामांत दिवस घालवूं लागले. या वर्तनाचा राणीनें अनेकवार निषेध केला. लढाईची तयारी ठेवून इंग्रजांचा मोड करावा, त्यांना सर्वत्र पायबंद लावावा व ते नामशेष झाल्यावर मग हे समारंभ करावे वगैरे सल्ला राणीनें श्रीमंतांस दिला. परंतु अदूरदर्शी पेशव्यानें तो मानला नाहीं.

रोजनें पेशव्यांच्या या चुकीचा फायदा घेऊन पावसाळा जवळ आला तरी तावडतोब प्रतिकार करण्याची तयारी केली. त्यानें तसें केलें नसतें तर म्यालेसन म्हणतो कीं, तात्या टोपी यांनीं आपल्या पाताळयंत्री राजकारणानें व अतर्क्य आणि अलौकिक युद्धकलेनें त्या तीन चार महिन्यांच्या आंतच, ग्वालेरीस स्थापलेल्या पेशवाईचा प्रचंड वृक्ष बनवून साऱ्या दख्खनमध्यें जागृति उत्पन्न करून मराठ्यांचें निशाण सर्व हिंदुस्थानांत नाचविलें असतें. रोज हा काल्पीहून निघून ( ६ जून ) अनेक अडचणींच्या मार्गानें ग्वालेरीजवळ येऊन पोहोंचला ( १६ जून ). मार्गांत अनेक घाट व डोंगर होते; त्यांतून येतांना त्याच्या सैन्याचे फार हाल झाले. सिल्व्हेस्टर म्हणतो कीं, प्रत्येक १०० यार्डांवर आम्हांला विश्रांति घ्यावी लागे. वाटेंत पाण्याचा दुष्काळ होता. अशा वेळीं जर अडचणींच्या जागीं पेशव्यांच्या सैन्यानें त्यांच्यावर चढाई केली असती तर त्यांचा धुव्वा उडाला असता. पण पेशवे ब्राह्मणभोजनांत दंग होते, मुरारच्या छावणीचीहि त्यांनीं योग्य काळजी घेतली नव्हती. माऱ्याच्या जागा सोडून दिल्या होत्या. ही संधि ओळखून रोजनें तावडतोब मुरारवर हल्ला चढविला. उशीरा बातमी मिळाल्यावर तात्या धांवून आले. परंतु ते येण्यापूर्वीच सर्व माऱ्याच्या जागा रोजनें काबीज करून मराठ्यांवर शिस्तीनें चढाई केली, पेशव्यांच्या सैन्यात अवसानघातकी व बेशिस्त लोक बरेच होते व त्यांच्यावर एकाची सत्ता नसून ते आपापल्या मनाप्रमाणें वागत. त्यामुळें अखेर रोजनें त्यांचा पराभव करून मुरार हें ठिकाण काबीज केलें. या सर्व गोष्टींत पेशव्यांनी राणीचें म्हणणें ऐकलें नाहीं. इतक्यांत रोजनें एक युक्ति योजली. त्यानें जयाजीस आग्र्याहून मुरारास आणिलें. व त्याच्या नांवानें माफीचा जाहीरनामा काढून आपण त्याच्यासाठीं लढत आहों असें प्रसिद्ध केलें. अर्थात पेशव्यांच्या बाजूस जे शिंद्याचे सरदार मिळाले होते ते खुद्द जयाजीशीं युद्ध करण्यास तयार होईनात; त्यांनीं पेशव्यांची बाजू सोडून दिली, त्यामुळें पेशव्यांचें पुष्कळच बळ कमी झालें.

यावेळीं तात्यांनीं व पेशव्यांनीं राणीची सल्ला घेऊन तिला ग्वालेरीच्या पूर्व बाजूचें संरक्षण करण्यास सांगितलें आणि तिनें सांगितल्याप्रमाणें तजविजी अंमलांत आणल्या. ही शेवटचीच लढाई असून पेशव्यानें संधि गमावल्यामुळें आतां त्यांना जय मिळणें अशक्य आहे हें राणीनें ओळखलें होतें. पण तिनें धीर सोडला नाहीं.

कोटाकीसराई या खेड्याच्या बाजूनें स्मिथ या इंग्रजी सरदारानें किल्ल्याकडे चाल करण्यास ता. १४ रोजीं प्रारंभ केला. किल्ल्याच्या या दिशेस राणीचें पथक व मोर्चे होते, त्यांची व्यवस्था उत्कृष्ट असल्यानें स्मिथचा लाग चालला नाहीं. ता. १७ रोजीं स्मिथनें पुन्हां हल्ला केला. प्रथम राणीच्या लोकांनीं त्याला मागें हटविलें; परंतु तितक्यांत त्याला ताज्या दमाच्या तीन चार पलटणींची मदत मिळाल्यानें, व राणीचे लोक दमल्यानें ते मागें सरले. तेव्हां राणी स्वतः पुढें सरसावली. तिचा आवेश पाहून तिची तुकडी इंग्रजांवर तुटून पडली. स्मिथनें फार खटपट केली, अनेक हल्ले केले, सर्व दिवसभर मारा चालविला, परंतु राणीचें पथक तिच्या शौर्यामुळें विस्कळित झालें नाहीं आणि इंग्रजांचा जो बेत कीं, त्या पथकाची फळी फोडून, कोटकीसराईपासून ग्वालेर शहराजवळील फुलबागेपर्यंतचा रस्ता काबीज करावयाचा, तो सिद्धीस गेला नाहीं व इंग्रज निराशेनें परत फिरला.

तारीख १८ जून ( १८५८ ) उजाडली. राणीवर हल्ले चटविण्यास या दिवशीं आठव्या हुजर्स घोडदळाची योजना

झाली होती व त्यांच्या मदतीस सर्व इंग्रजी सैन्य तयार झालें होतें. स्मिथनें प्रथम चाल केली त्याच वेळीं रोजनें दुसऱ्या बाजूनें राणीवर हल्ला केला. राणी आपल्या लष्करी पोषाखांत ( डोकीस भरजरी चंदेरी बत्ती, अंगांत तमामी अंगरखा, पायांत पायजमा, व गळ्यांत मोत्यांचा कंठा ) घोड्यावर बसून, हातांत तरवार घेऊन आपल्या सैन्याच्या अग्रभागीं आली व लढाई जुंपली. इंग्रजांनीं पुन्हांपुन्हां हल्ले चढविले, परंतु राणीनें मोठ्या शौर्यानें ते सर्व परतविले. राणीबरोबर सुंदर व काशी नांवाच्या दोन सुंदर व शूर दासी ( मर्दानी पोशाख केलेल्या ) होत्या. त्याहि लढाईंत सामील झाल्या होत्या. इतक्यांत रोजनें राणीच्या पिछाडीस असलेल्या पेशव्यांच्या तोफखान्यावर चाल केली, व जोराची लढाई करून दोन मोर्चे काबीज केले. त्यावेळीं जयाजीचे सरदार त्या ठिकाणीं होते; ते फितूर होऊन मागें परतले. रोज हा राणीच्या जवळ जवळ येऊं लागला. इकडे स्मिथच्या तोफखान्यानें राणीच्या पथकांतील लोक कमी कमी होऊं लागले. राणीचे सबंध मोर्चे इंग्रजांच्या हातीं लागले यावेळीं राणीच्या भोंवतीं इंग्रजांचा गराडा पडला व पेशव्यांचें सैन्यहि वेढलें गेलें. परंतु त्या शूर स्त्रीचा धीर खचला नाहीं. त्यांनीं धाडसानें उरलेल्या बरोबरच्या दहा वीस स्वारांनिशीं इंग्रजांची फळी फोडण्याचा शेवटचा प्रयत्न केला. शिवरावभाऊंची सून म्हणवून घेण्यांत त्यांना मोठा अभिमान वाटे.

इंग्रजांची फळी फोडून, पेशव्यांनां जाऊन मिळण्याचें राणीनें ठरविलें. हुजर्सांचा सारखा गोळीबार होत होता व प्रत्येक खेपेस राणीचे लोक पडत होते; असें असतांहि मोठ्या शौर्यानें राणीनें भरधांव घोडा फेंकून वाटेंत येणाऱ्या प्रत्येक इंग्रज स्वारास कापून, हुजर्सची फळी फोडली व द्रुतगतीनें त्या दौडत निघाल्या. तें पाहून स्मिथनें एक घोडदळाची तुकडी त्यांच्या पाठलागास पाठविली. एकसारखे तीन दिवस युद्ध करून त्या थकल्या होत्या. त्यांच्या मागें सुंदरदासी व रामचंद्रराव देशमुख आणि रघुनाथसिंग हे विश्वासु सरदार दोन तीन स्वारांसह होते. दामोदरराव ( राणीचे चिरंजीव) हे रामचंद्ररावाच्या घोड्यावर होते. इतक्यांत सुंदरला इंग्रज स्वारांनीं ठार मारल्यानें, राणीनें परत फिरून त्या स्वारांनां कापून काढलें व पुन्हां जोरानें घोडा सोडला. त्यांचा नेहमीचा घोडा जखमी झाल्यानें, या दिवशीं त्यांनीं हा नवीनच घोडा घेतला होता. त्याला लढाईची संवय नव्हती.सपाट्यानें पुढें जात असतां व हुजर्स मागें पाठलाग करीत असतां वाटेंत बागेंतील पाण्याचा पाट लागला, त्याला पाहून दुर्दैवानें राणीचा घोडा अडला. त्यांनीं त्याला पुढें नेण्याची फार खटपट केली, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. तो तेथें निश्चल उभा राहिला. हुजर्स स्वारांनीं राणीला न ओळखतां ( कोणी तरी मोठा सरदार असेल अशा समजुतीनें ) व त्यांच्या गळ्यांतील कंठ्याच्या लोभानें, त्यांनां चोहोंबाजूनें घेरून जोराचा हल्ला केला. परंतु राणीनें मोठ्या शौर्यानें तो निष्फल केला. त्यांनीं बऱ्याच वेळां त्यांनां दाद दिली नाहीं. त्या अतिशय थकल्या होत्या व हे लोक ताज्या दमाचे होते तरीहि त्यांनीं त्या सर्वांस पिटाळून लाविलें. शेवटीं दुर्दैवानें त्यांची शक्ति नाहींशी होत चालली व त्याच वेळीं उरलेल्या एका ड्रागून स्वारानें पाठीमागून हल्ला करून त्यांच्या डोकीवर वार केला; तो कारागीर होऊन मस्तकाचा उजवा भाग विछिन्न होऊन एक डोळा बाहेर आला. इतक्यांत त्याच स्वारानें किरिचीची हूल राणीच्या छातींत मारिली. परंतु असल्याहि आसन्नमरण स्थितींत राणीनें त्या स्वाराला ठार मारिलें. मात्र आपला अंतकाल जवळ आला असें पाहून त्यांनीं रामचंद्रराव देशमुखास खूण केली. त्यानें व इतर बरोबरच्या एक दोन स्वारांनीं मोठ्या चपलतेनें त्यांनां उचलून जवळच एका बागेंतील झोंपडींत नेलें व तेथें त्यांच्या तोंडांत गंगा घातली. त्यांनीं दामोदररावास संभाळण्याची व आपला मृतदेह म्लेच्छांच्या हातीं लागू न देण्याची सरदारांनां आज्ञा दिली आणि अखेर प्राण सोडला. लागलीच शेजारच्या एका गंजीमध्यें गवताची चिता करून रामचंद्ररावानें राणीच्या शरीराला अग्नि दिला. याप्रमाणें ज्येष्ठ शुद्ध सप्तमी संवत १९१४ रोजीं झांशीच्या महाराणी लक्ष्मीबाईसाहेब यांचा रणांगणांत शेवट झाला.

हें वृत्त समजतांच रावसाहेब व तात्या टोपी यांनां फार दुःख होऊन त्यांचा धीर खचला. बेशिस्त व अदूरदर्शीपणानें पेशव्यांचा पराभव होऊन रोजनें त्याच दिवशीं ग्वाल्हेर घेतलें व जयाजीस राज्यावर बसविलें. पेशवे ग्वाल्हेरीहून निघून पंजाबकडे गेले. खुद्द ह्यू रोज, लो, मार्टिन, अर्नोल्ड, टॉरेन्स, म्याकर्थी वगैरे अनेक इंग्रज लोकांनीं व लेखकांनीं राणी लक्ष्मीबाई यांची सर्वतोपरी स्तुति गायिली आहे.

राणीच्या मृत्यूनंतर दामोदररावास सुरक्षित ठेवण्याचें काम रामचंद्रराव, रघुनाथसिंग, बाळु गोडबोले, काशी कुणबीण वगैरे अत्यंत विश्वासु लोकांनीं केलें. ठिकठिकाणीं अरण्यांत लपून छपून त्यांनीं अत्यंत अडचणींत दिवस काढले.अनेकदां त्यांच्यावर विकट प्रसंग आले. पण अखेर त्यांतून ते पार पडले. तालबेट कोठ्याच्या ठाकूरानें त्यांनां त्यांची अन्नपाण्याची व्यवस्था लावून ठाकूरांतील एका पहाडांत ठेविलें होतें. त्याबद्दल त्यास दरमहा ५०० रु. व उंट घोडे, वगैरे द्यावे लागले. त्या जंगलांत हिंस्र पशू फार, त्यामुळें बऱ्याच रात्री झाडांवरील माळ्यांवर दामोदररावांस त्या लहान वयांत काढाव्या लागल्या. याप्रमाणें रावांनीं त्या ठिकाणीं दोन वर्षे काढिलीं. एकदां तर राव अजारी पडले असतां मोठ्या खटपटीनें बरे झाले. राव ग्वालेरीहून बाहेर निघाले त्यावेळीं त्यांच्यापाशीं रोख व दागदागिने मिळून ७० हजारांचा विषय होता. रोख पैसा ठाकुरास देण्यांत संपला, तेव्हां दागिने तराजूनें तोलून मागेल त्या भावानें त्याला

देण्यांत आले. याप्रमाणें दोन वर्षांत सर्व पुंजी संपली तेव्हां ठाकुरानें रावानां आपला आश्रय सोडण्यास सांगितलें. त्यावेळीं फक्त २०० रु. रावांजवळ होतें. कोठरा जंगल सोडून लपत छपत सिप्री येथें मंडळी आली. तेथील (शिंद्याच्या) ठाणेदारानें मंडळीस पकडण्याचें ठरविलें; तेव्हां रघुनाथसिंगानें त्याची मूठ दाबून तो प्रसंग टाळला व तेथून वडोद येथें राव आले. परंतु तेथील ठाणेदारानें या सर्व मंडळीस कैद करून पाटण येथील इंग्रज एजंटाकडे पाठवून दिलें. त्या प्रवासांत (ठाणेदारानें घोडें हिसकून घेतल्यानें) लहानग्या रावास पायीं प्रवास करावा लागला.

कोठरा सोडल्यावर रावाचे दोन नौकर न्हनेखां व गणपत हे पाटणच्या ठाकुराच्या पदरीं नौकरीस राहिले. पाटणच्या जवळच आगर येथें इंग्रजांची छावणी असून तेथें फ्लीक नांवाचा पो. एजंट होता. त्याची युक्तीनें गांठ घेऊन न्हनेखांनें रावांचें रक्षण करण्याबद्दल त्याचें मन वळवून आश्वासन मिळविलें. फ्लीकला राणीबद्दल फार आदर वाटत होता. त्यामुळें त्यानें इंदूर येथील पो. ए. शेक्सपिअर यास रावानां माफी देण्याबद्दल पत्र लिहिलें व त्यानेंहि तें कबूल करून, न्हनेखांबरोबर आपले स्वार देऊन रावास सुरक्षित आणण्याचें काम सांगितलें. न्हनेखां रावाचा तपास करीत असतां वाटेंतच कैदेंत असलेल्या रावाची गांठ पडली व त्या इंग्रज स्वारांनीं वडोदच्या ठाकराच्या कैदेंतून रावाला सोडवून मंडळी पाटणास आली.

पाटणच्या ठाकुरानें रावाची व्यवस्था बरी ठेविली मात्र त्याच्या मनांत रावानीं येथेंच रहावें असें असल्यानें त्यानें त्यानां नजरकैदेंत ठेविलें होतें. ही हकीकत फ्लीक याला समजतांच त्यानें खटपट करून रावाची सुटका करवून, त्यानां आपल्यापाशीं आणिलें. त्यावेळीं रावाजवळ हातांतील कड्यांशिवाय एक कपर्दिकहि नव्हती, फ्लीकच्या धूळभेटीच्या वेळीं तींहि नजर करावीं लागून राव निष्कांचन झाला. फ्लीकनें रावांस इंदुरास पाठविलें. ही मंडळी इंदुरास आल्यावर (५ मे १८६०) शेक्सपीयरनें त्यांची व्यवस्था पुढीलप्रमाणें लावून दिली. फक्त शागीर्द माणसें (तीन चार) ठेवून बाकीच्यांस रजा देऊन नेटिव्ह असिस्टंट मुनशी धर्मनारायण याच्या देखरेखीखालीं रावास ठेविलें व गव्हर्नर जनरलकडून मोठ्या औदार्यानें त्यास दरमहा दीडशें रुपयांची नेमणूक करून दिली! पंचवीस लक्षांच्या उत्पन्नाच्या मालकास दीडशें रुपयांवर राहावें लागलें. रावानीं इंग्रजी, फारशी, उर्दू व मराठी भाषांचा अभ्यास केला. डलहौसीनें संस्थान खालसा करतांना रावाचें दत्तविधान खाजगी हक्कापुरतें मान्य करून गंगाधररावाची सर्व खाजगी मालमत्ता, जडजवाहीर व इतर मिळकती यांच्यावर रावाची पूर्ण मालकी आहे असें ठरविलें होतें. शिवाय संस्थानची खाजगी शिलक सहा लक्ष रु. राव अज्ञान आहेत तोंपावेतों इंग्रजी खजिन्यांत व्याजीं लावून ठेविली होती व सज्ञान झाल्यावर ती रक्कम रावास देण्याचा करार केला होता. याच्या खेरीज झांशीचे व काशी आणि पुणें येथील वाडे, बागा, पारोळें वगैरे ठिकाणचीं पूर्वापार वतनें व जहागिरी हीं सर्व रावाच्या मालकीची होती. यावेळीं त्या सर्वांस राव आंचवले. इंग्रजांनीं आपलें वचन मोडून या सर्व खाजगी मिळकती जप्त केल्या. जप्ती मोकळी करण्याबद्दल रावानीं पो. एजंट, गव्हर्नर जनरल वगैरेंकडे अनेक अर्ज केले, खटपटी केल्या, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं.

या सुमारास रावाचें लग्न त्याच्या चुलतीनें केलें; त्यासाठीं तिनें खर्चासाठीं पैक्याची मागणी रेसिडेंटाकडे केली; पण त्यानें ती धुडकावून लाविली; तेव्हां बाईनें आपले दागिने मोडून लग्न पार पाडिलें. रावांची ही पहिली पत्नी भाटवडेकर घराण्यांतील असून, ती स. १८७२ त वारली, तेव्हां रावांनीं द्वितीयसंबंध (शेवडे घराण्यांतील कन्येशीं) केला. या बाईपासून रावानां लक्ष्मणराव नांवाचे चिरंजीव झाले (१८७९). हेच हल्लीं विद्यमान आहेत. यांचा विद्याभ्यास इंदूर येथें झाला.

निदान आपली नेमणूक तरी वाढावी म्हणून दामोदररावनीं अनेकवार खटपट केली, तेव्हां गव्हर्नर जनरल नार्थब्रुक यानें मोठ्या उदारपणानें (इंदूरच्या रेसिडेंटाच्या अभिप्रायावरून) पन्नास रु. ची वाढ केली व रावाचें दहा हजारांचें कर्ज फेडलें. हे दोनशें रु. पुरेनात म्हणून पुन्हां रावानीं आपल्या मिळकतींबद्दल खटपट केली, शेवटीं विलायतेस इंडिया ऑफीसकडे दाद मागितली; तिचें उत्तर आलें कीं, रावास हल्लींच योग्य औदार्य बुद्धीनें वागविण्यांत येत असल्यानें या प्रकरणांत आम्हांस हात घालण्याचें कारण दिसत नाहीं (१८८२). अखेरीचा उपाय म्हणून रावानीं इंग्रज सरकारावर दिवाणी दावा लावण्याचेंच ठरविलें, परंतु सरकारनें पुराव्यास लागणारे कागदपत्र देण्याचें नाकारलें व रावाजवळ खटल्यापुरता पैकाहि नव्हता. त्यांनीं १२१ संस्थानिकांस द्रव्याबद्दल विनंति केली असतां फक्त एकट्या रामपूरच्या नबाबानें एक हजार रु. पाठविले. बाकीच्यांनीं तर विनंतीकडे दुर्लक्षच केलें. इंदूरच्या कै. तुकोजीरावानीं मात्र दामोदररावाचा थोडा फार परामर्श घेतला. याप्रमाणें जन्मापासून अखेरपर्यंत दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडून अखेर दामोदरराव हे मुक्तेच वारले. हल्लीं त्यांचे चिरंजीव श्री. लक्ष्मणराव हे इंदुरास रेसिडेन्सीमध्यें राहत आहेत.

[संदर्भग्रंथ:—फॉरेस्ट—गव्हर्नमेंट सिलेक्शन्स; वेलस्लीज डिस्पॅचेस; एंपायर इन एशिया; स्लीमन्स रिपोर्टस्; माझा प्रवास (वरसईकर गोडसे भटजीकृत); ग्वालेरची बखर; पेपर्स ऑन दि अनेक्सेशन ऑफ झांशी; मालकम्स लेटर्स; वेल-इंडियन एंपायर; डलहौसीज ॲडमि. ऑफ ब्रिटिश इंडिया; कायें—हिस्टरी ऑफ दि शिपाई वॉर; म्यालेसन—हिस्टरी ऑफ दि इंडियन म्युटिनी; दि राणी (गिलीयनकृत);

पार्लमेंटरी पेपर्स ( १८५७–५८ ); लो–सेंट्रल इंडिया; लाईफ ऑफ सर ह्यू रोज; काये–लाईव्हज ऑफ इंडियन ऑफिसर्स; सिल्हेस्टर—कॅम्पेन इन माळवा; मार्टिन—इंडियन एंपायर; पारसनीस—झांशीच्या राणीचें चरित्र; मार्टिन—ब्रिटिश इंडिया; म्याकफर्सन—मेमोरियल्स; मॅकार्थी—हिस्टरी ऑफ अवर ओन टाइम्स; इ. इ. ]

**झिगकलिंग हकमती**—उत्तर ब्रह्मदेशांतील चिंदविन जिल्ह्याच्या थेट उत्तरेकडील एक शान संस्थान. हें चिंदविन जिल्ह्याच्या डेप्युटी कमिशनरच्या देखरेखीखालीं आहे. याचें क्षेत्रफळ ९८३ चौ. मै. असून, बहुतेक संस्थानांतील खेडीं नदीतीरीं वसलेलीं आहेत. संस्थानचे लोक बहुधा शान आहेत. इंग्रजांनीं संस्थान आपल्याकडे घेण्यापूर्वी, संस्थानावर काचीन लोकांचे हल्ले वारंवार होत असत. येथील लोकसंख्या दोन हजारांवर असून, तींत ½ ब्रह्मी व बाकीचे शान जातीचे लोक आहेत.

**झिगन**—दक्षिण ब्रह्मदेशांतील थरावती जिल्ह्यांतील उत्तर पोटविभाग. यांत ३ तालुके असून झिगन नांवाचें गांव या पोटविभागाचें मुख्य शहर आहे. तें रंगून–प्रोम रेल्वेचें स्टेशन ( रंगूनपासून ६० कोस) असून, तेथील लो. सं. दोन हजार आहे. गांवांत म्युनिसिपालिटी आहे.

**झिंझुवाडा**–मुंबई. हें काठेवाडांतील एक प्राचीन सुंदर शहर असून याच नांवाच्या एका जहागिरीचें हें मुख्य ठिकाण आहे. झिंझुवाड नांवाचा तालुकाहि आहे. येथें एक जुना किल्ला व तलाव आहे. अनहिलवाडपट्टणच्या प्रसिद्ध सिद्धराज जयसिंगानें हा किल्ला व तलाव बांधला असें म्हणतात. अहमदाबादच्या सुलतानांच्या हातांत हें शहर असतांना तें त्यांचें एक लष्करी ठाणें होतें. अकबर बादशहानें गुजराथ जिंकल्यावर मोंगल सुभेदार येथें राही. मोंगलांच्या नंतर तें अनुक्रमें कोळी व कुंभोज लोकांच्या ताब्यांत गेलें व हल्लीं कुंभोजांच्या वंशजांकडेच आहे. येथें पूर्वी मीठ तयार करण्याचे कारखाने असत. हल्लीं येथें सोरा सापडतो. झिंझुवाडा तालुक्यांत,झिंझुवाडानंतर आद्रीआण हें मोठें खेडें आहे. तेथेंहि एक मोठा तलाव आहे. एका झुंझो नांवाच्या मनुष्यानें झिंझुवाडा वसविलें असें म्हणतात. झांझवा म्हणजे मृगजळ. झिंझुवाडा हें कच्छच्या रणाच्या माथ्यावर वसलें असल्यामुळें येथें मृगजळ नेहमीं दिसतें व त्यामुळें त्याला झिंझुवाड नांव पडलें अशी एक दंतकथा आहे.

**झितोमीर**—रशिया. उक्रैनिआ राज्यांतील प्रांताचें एक मोठें शहर. लो. सं.( १९१३)९६८००.या शहरांत एकतृतीयांशापेक्षां अधिक लोक यहुदी आहेत, आणि रशियामध्यें जीं हिब्रु पुस्तकें प्रसिद्ध होतात त्यांतील निम्म्यापेक्षां अधिक या शहरांतील दोन छापखान्यांतून बाहेर पडतात. हें फार जुनें शहर आहे.९ व्या शतकाच्या अगोदर हें स्थापन झालें. हें रशियाच्या ताब्यांत रशियानें जेव्हां युक्रेन प्रांत सर केला तेव्हां त्याबरोबर आलें.

**झिनत–उन–निसा बेगम**—ही अवरंगझेब बादशहाची दुसरी मुलगी. हिला दिल्लींतील झिनत–उल्–मसजीद नांवाच्या मशीदीच्या आवारांत पुरण्यांत आलें. ही मशीद तांबड्या दगडांची असून ती झिनतनेंच बांधलेली आहे. ती शहाजहानाबादमधील दरियागंज पेठेंत यमुनेच्या तीरावर आहे. ही जन्मभर कुंवारच राहिली. हिनें आपल्या खर्चानें दिल्लीस एक कुमारीमशीद बांधली आहे. कदाचित् वरील मशीद व ही एकच असतील. ही बापाबरोबर दक्षिणेंत पंचवीस वर्षे होती. त्यावेळीं जनानखान्यांत वडीलपणा घेऊन हीच देखरेख करीत असे. संभाजी छत्रपतींवर जिचें मन बसलें ( व जिला त्यानें मागणी घातली ) व जी त्याच्या पश्चात् लग्न न करतां अविवाहित राहिली आणि जिनें शाहूचा व येसुबाईचा परामर्श अत्यंत काळजीनें घेतला, तीच ही बेगम होय. मराठी बखरकारांनीं हिच्या ऐवजीं झेबुन्निसा बेगम ( हिची वडील बहिण ) हिचेंच नांव सर्वत्र दिलें आहे, तें चूक आहे. लेनपूलनें हिचा मृत्यु १७०८ दिला दिला, तो चूक आहे. मासिरी आलमगिरी १७१० देतें; जहांदर शहा हा हिच्याशीं भांडल्याचा उल्लेख आढळतो ( १७१३ ), फर्रुखशियर हा याच वेळीं ( १७१३ ) हिला भेटला होता असें कामदारखान म्हणतो. मिर्झा महंमद म्हणतो कीं, ही आपल्या वयाच्या ८० व्या वर्षी म्हणजे १७२१ त वारली. सारांश हिच्या मृत्यूबद्दल नक्की साल आढळत नाहीं. हिला पातशहा बेगम म्हणत.

[ संदर्भ ग्रंथः—बील; मासीरी आलमगिरी; जोनाथन स्कॉट–हिस्टरी ऑफ डेक्कन; ताझकिरी सलातीनी चघताई; तारीखी महंमदी; इंडियन अँटिक्वरी. पु. ३० पृ. ८०. ]

**झिपी तौडू**—नेपाळांत ललित पाटण ( ललितपूर ) या जुन्या राजधानींत अशोकानें झिपी तौडू नांवाचा एक बुद्धाचा स्तूप ख्रि. पू. २५० च्या सुमारास बांधला. हें देवपाटण ( ललितपाटण ) अशोकाची मुलगी चारुमती हिनें आपला नवरा देवपाल याच्या स्मरणार्थ वसविलें होतें. हें नेपाळचें जुनें राजधानीचें शहर असून तें काटमंडूच्या आग्नेयीस सव्वा कोसावर आहे. अशोकानें येथें पांच स्तूप निरनिराळ्या दिशेस बांधलेले अद्याप कायम आहेत. त्यांपैकीं उत्तरेकडच्या स्तूपाला झिपी तौडू म्हणतात. इपि, इंपी अशींहि याचीं दुसरीं नांवें आहेत.

[ संदर्भ ग्रंथः—इंडियन अँटिक्करी पु. १३, पृ. ४१२; वेंडल—ए जर्नी इन् नेपाळ; ओल्डफील्ड—स्केचेस फ्रॉम नेपाळ, भाग २. ]

**झियाउद्दीन बरनी**—याला झियाइ बरनी असेंहि म्हणतात. दिल्लीचे सुलतान, मुहंमद शहा तुघलक आणि फिरोझ शहा तुघलक यांच्या कारकीर्दींत हा पुढें आला. “ तारीख फिरोजशाहि ” या अखबारीचा हा कर्ता होय. या बखरींत आठ राजांची म्हणजे सुलतान घयासउद्दीन बल्बन ( स. १२६६ ) पासून सुलतान फिरोजशाह तुघलक (स. १३५६)

पर्यंतची माहिती दिलेली आहे. यावेळीं हा ७४ वर्षांचा होता. त्याचा चुलता मलीक अलाउलमुल्क हा अल्लाउद्दीन खिलजीच्या कारकीर्दीत दिल्लीचा कोतवाल असून, त्याचा बाप मुवय्यद हा ( १२९६ ) बरन शहर( सांप्रतचें बुलंद-शहर )चा मुलकी अधिकारी होता. या ठिकाणीं झियाचा जन्म झाल्यानें त्याला बरनी म्हणत. [ वील; जदुनाथ–अवरंगझेब. ]

**झिरा, तहसील.**—पंजाब. फिरोजपूर जिल्ह्यांतील एक तहसील. हिचें क्षेत्रफळ ४९५ चौ. मैल व लो. सं. (१९११) १५५६९५. तहसिलीच्या उत्तरेस सतलज नदी वाहते तहसिलीचें मुख्य स्थळ झिरा आहे. तहसिलींत ३४३ खेडीं असून कालींचें उत्पन्न १९०३—०४ सालीं २ लक्षांवर होतें.

**गांव.**—झिरा तालुक्याचें मुख्य शहर. हें फिरोजपूर शहरापासून २४ मैल आहे. १९०१ सालीं याची लो. संख्या ४३७८ होती. १८६७ सालीं येथें म्युनिसिपल कमिटीची स्थापना झाली. शहरांत व्यापार वगैरे फारसा नाहीं. येथें एक शाळा व एक दवाखाना आहे.

**झिरी ( जिरी )**—आसाम. कांचार जिल्हा व मणिपुर संस्थान यांच्या दरम्यान असलेली नदी. ही नदी त्रेलच्या दक्षिण उतारावर उगम पावून सुमारें ७५ मैल दक्षिणेकडे वहात जाते व बराक अथवा सुरमा नदीस मिळते या नदींतून जंगलांतील माल व चहा जलमार्गानें येतो.

**झिवारत**—बलुचिस्तान एजन्सीचें उन्हाळ्यांतील थंड हवेचें ठिकाण. हें समुद्रसपाटीपासून ८०५० फूट उंच आहे. हें सिबि जिल्ह्यांत शाहरिग तहसिलींत आहे. मे महिन्यापासून आक्टोबर महिन्यापर्यंत पो. एजंटाचें रहाणें येथेंच असतें. वायव्यसरहद्द रेल्वेवर काच स्टेशनपासून ३२½ मैल चैलगाडीनें प्रवास करून शियारतला सुखानें मनुष्य पोहचूं शकतो. १८८३ सालापासून हें थंड हवेचें स्थळ म्हणून निवडण्यांत आलें. १८९०—१ सालीं पो. एजंटकरतां बंगला बांधण्यांत आला. व १८९९ सालीं ३८००० रुपये खर्च करून पिण्याचें पाणी नळानें आणून सोय केली. येथील देखावा फारच मनोहर आहे. पो. एजंटाचा बंगला सोडून सार्वजनिक दुसऱ्या इमारती व अधिकारी लोकांचीं घरें पुष्कळ आहेत.

**झीटुन**—तुर्कस्तानांत या नांवाचीं शहरें अगर गांवें पुष्कळ आहेत. त्यांत एक महत्त्वाचें अलेप्पो सुभ्यांत ( विलायतेंत ) आहे. बहुतेक लोक आर्मेनियन ख्रिस्ती आहेत. लोकसंख्या १०००० आहे.

आर्मेनियन राज्य गेल्यानंतर हें ठिकाण लुटालूट करणाऱ्या आर्मेनियनांचें घरटें झालें होतें. यांनीं आपलें स्वातंत्र्य जवळ जवळ १८७८ पर्यंत कायम राखिलें आणि या सालीं तुर्कस्तानच्या सुलतानाला तेथील गडावर फौज ठेवूं दिली. १८९० सालीं यांनीं पुन्हां बंड केलें; तथापि इंग्रज व अमेरिकन लोकांच्या तडजोडीमुळें याचा संपूर्ण नाश झाला नाहीं. १८९५ सालीं आर्मेनियन लोकांची पुन्हां कत्तल झाली. त्या वेळेस या लोकांनीं बंड केलें व किल्ला ताब्यांत घेतला. यांचा पूर्ण नाश झाला असता पण ख्रिस्ती राष्ट्रांचे जे प्रतिनिधी अलेप्पोला होते त्यांच्या मध्यस्थीनें यांस जरा मानाचा व सुखाचा तह मिळाला. त्यामध्यें त्यांचा गव्हर्नर कोणी ख्रिस्ती असला पाहिजे इत्यादि अटी मान्य झाल्या.

**झीत्झ**—जर्मनींतील एक शहर. लो. सं. २७३९१. हें शहर फार जुनें व स्लाव्ह लोकांनीं स्थापिलेलें आहे. ९६८ पासून १०२८ पर्यंत येथें एक बिशप रहात असे. शेवटचा रोमन कॅथॉलिक बिशप १५६४ सालीं मेला. तेव्हां तें साक्सन लोकांच्या हातीं आलें. १८१५ सालीं हें प्रशियन लोकांच्या हातीं गेलें. येथें एक फ्रान्सिस्कन नांवाच्या भिक्षु पंथाचा मठ असून त्यांत २०००० ग्रंथ आहेत.

**झीनवर**–झींवर, धीमर, धीनवर ( सं. धीवर = कोळी ). हें नांव पंजाबांत ओझेवाले, पाणके, कोळी आणि बुरूड या जातींना लावतात. १९११ सालीं यांची संख्या ३७५६९४ होती. पैकीं शेंकडा ६१ हिंदू व बाकीचे मुसुलमान व फार थोडे शीख होते. झीनवरला कहार आणि मेहर असेंहि म्हणतात ( ' कहार ' पहा ). मुसुलमान झीनवरला माची असें नांव आहे. मेहर आपणास रजपूत बीजाचे म्हणतात. हिंदु जातींत यांचा दर्जा खालचा आहे. तथापि यांच्या चालीरीती व भावना वन्यधर्मीयांहून कांहींशा वरच्या दर्जाच्या आहेत. हे लोक आपल्या उद्योगधंद्यांत ज्यांचा संबंध येतो अशा देवता व गंगा, यमुना आणि सिंधू या सारख्या नदीदेवता यांची मुख्यत्वेंकरून उपासना करितात; आणि बोटी, जाळीं आणि आपल्या धंद्याचीं इतर हत्यारें यांचीहि पूजा करितात.

यांच्यातील एक विधि विशेष चमत्कारिक आहे. पंजाबमध्यें दिवाळीनंतरच्या अष्टमीस होई किंवा हुई सण होतो. त्यावेळीं घरांतील झीनवरणी किंवा पाणकीणबाई हिचा सत्कार करून घरांतील इतर बायका तिच्या सेवेस राहतात. घर शेणानें सारवून भिंतीवर चार पांच रंगांत मेणा व भोई यांचीं चित्रें काढतात व त्यांवर गंधफुलें वाहून धूपदीप लावतात. याची अशी कथा सांगतात कीं, कलियुगाच्या प्रारंभीं दुष्काळ, रोगराई, मृत्यु यांनीं जग ग्रस्त झालें होतें. तेव्हां ब्राह्मणांनीं पुष्कळ जपजाप्य, तपाचरण करून पाहिलें पण कांहीं एक उपयोग झाला नाहीं. अशा वेळीं एक झीनवर जातीची बाई पुढें आली व तिनें आणखी प्रयत्न करण्यास ब्राह्मणांस उत्तेजन दिलें. ब्राह्मणांनीं तिच्या सांगण्याप्रमाणें केल्यावर कालिका देवी आपलें शिर आपल्या हातांत घेऊन प्रगट झाली; आणि तिनें 'हा सर्व अनर्थ, अधर्म व अनीति यांपासून झाला असून जर जगाचें रक्षण करावयाचें असेल तर आपणाला लोकांनीं भजलें पाहिजे' असें सांगितलें. तेव्हांपासून दरवर्षी देवीचा सण पाळण्यांत येत आहे. त्यावेळीं झीनवार बाईला अग्रस्थान दिलें जातें दुसरी एक गोष्ट अशी कीं, होई नांवाची एक ब्राह्मण कुमारिका मुसुलमानांच्या तावडींतून

सुटण्याकरितां एका झीनवरच्या झोपडींत लपून राहिली. जेव्हां तिला भ्रष्ट करणारे मुसुलमान त्या ठिकाणीं आले तेव्हां ती पृथ्वीच्या पोटांत गडप झाली, तेव्हांपासून तिच्या जातींचे लोक व इतर हिंदू तिला भजतात. ही चाल कशी पडली हें सांगतां येणें कठिण आहे. कदाचित् पृथ्वी-पूजेचा प्राचीन संप्रदाय यांच्यांत सुरू असून, यांच्यांतली एखादी बाई देवी म्हणून पूजिली जात असली पाहिजे. पंजाबांतील इतर देवीसंप्रदायांतून हेंच दृष्टीस पडतें. [ रोजची ग्लॉसरी; से. रि. ( पंजाब ). ]

**झीनॉफानेझ**—हा ग्रीक तत्त्ववेत्ता आशियामायनरमध्यें कोलोफोन येथें खि पू. ५८० च्या सुमारास जन्मला. थिओफ्रेस्टस्च्या मताप्रमाणें हा अनेक्झिमेंडरचा शिष्य होता. हा प्रथम ग्रीस देशांत गाणीं गात हिंडत असे. हिंडतां हिंडतां हा इटली देशाच्या दक्षिणेस ईलिया येथें येऊन राहिला. त्यानें स्थापन केलेल्या पंथाचें नांव या गांवाच्या नांवावरूनच पडलें ( 'इलियाटिक पंथ' पहा ). या पंथांतील तत्त्ववेत्त्यांपैकीं पार्मेनिडेझ, झेनो व मिलीसस् हे प्रमुख होत. झीनॉफानेझचा मरणकाल अनिश्चित आहे. याच्या मतांची कल्पना येण्यास 'विज्ञानेतिहास' ( पृ. २३७–३८ ) पहावा.

**झीलंड**—डेन्मार्कमधील सर्वांत मोठें बेट. याच्या उत्तरेस कॅटेगाट, पूर्वेस साउंड, दक्षिणेस फाल्स्टर, मुएन वगैरे बेटांपासून अलग करणाऱ्या लहान सामुद्रधुन्या, व पश्चिमेस फ्यूनेनपासून अलग करणारी ग्रेटबेल्ट सामुद्रधुनी ह्या आहेत. स्वीडन जवळचें टोंक तीन मैलांवर, व फ्यूनेनपासून ११ मैलांवर आहे. दक्षिणोत्तर ८२ मैल वपूर्वपश्चिम ६८ मैल असा याचा विस्तार आहे. याचें क्षेत्रफळ २६३६ चौरस मैल आहे. पृष्ठभाग उंच सखल असून समुद्रसपाटीच्या कांहींसा वर आहे. येथें ३५०. फुटांहून उंच अशा क्रेटेशस टेंकड्या आहेत समुद्रकिनारा असंख्य लहानमोठीं आखातें यांनीं भंगलेला आहे. इसिफोर्ड व तिच्या शाखा या सुमारें २५ मैल जमिनीच्या आंत गेल्या आहेत. महत्त्वाच्या म्हणण्यासारख्या नद्या येथें नाहींत. परंतु ईशान्येस आरी, एस्कम वगैरे कित्येक मोठालीं सरोवरें आहेत. जमीन सुपीक असून धान्य, बटाटे,इतर भाज्या व फळें उत्पन्न होतात. फोर्डच्या सभोंवारचा देखावा फार आल्हादजनक असतो पण इतर भाग रुक्ष दिसतात.

झीलंडचे पांच अम्टर ( भाग ) आहेत. ( १ ) फ्रेडरिक्सबोर्ग-मुख्य शहर एल्सिनोर. ( २ ) क्जोबेनहॅव्ह-राजधानी कोपनहेगन; ( ३ ) होल्बायक—मुख्य शहर होल्बायक, याच्या पश्चिमेस कालुंडबोर्गचें बंदर आहे. येथें बाराव्या शतकांतील रोमन धर्तीवर बांधलेलें ( चमत्कारिक ) चर्च आहे; ( ४ ) सोरो-मुख्य शहर सोरो. येथें पूर्वी विश्वविद्यालय होतें, अजून हें एक विशेष महत्त्वाचें माहेरघर आहे. पश्चिमेस स्लागेलस हें शेतकीचें ठिकाण आहे. ( ५ ) प्रीस्टो, मुख्य शहर प्रीस्टो. पश्चिमेस नीस्ट व्हेड हें पुरातन शहर आहे. दक्षिणेस व्होर्डिंगबोर्ग हें लहानसें बंदर आहे.

**झुंगेरिया**—हें मध्य आशियांत एक मोंगोलियन राज्य होतें. १७ व्या शतकाच्या उत्तरार्धांत हें राज्य काल्दन अथवा बुरतुखान ह्याच्या कारकीर्दींत उन्नतीच्या शिखरास पोहोंचलें होतें. परंतु १७५७–१७५९ च्या चिनी स्वारीमुळें या राज्याचा नाश झाला. मोंगोलियाच्या इतिहासांत झुंगेरियाचें फार महत्त्व आहे. याचा कांहीं भाग चिनी साम्राज्यांत ( पूर्व तुर्कस्थान व वायव्य मोंगोलिया) व कांहीं भाग रशियन तुर्कस्तानांत आहे. झुंगेरिया हें नांव इसांगर अथवा सांगर लोकांवरून पडलें. या प्रांतांत काश्गर, यार्कंद, खोतान व थ्यानशान पर्वताचा भाग, इतके प्रांत आहेत. सध्यांच्या टिएशान् पैलू या चिनी प्रांताला हें नांव देतां येईल. राजकीय व भौगोलिक बाबतींत झुंगेरिया नांव प्रचारांत नाहीं. सप्तनालयाच्या प्रदेशापासून बाल्खश सरोवरापर्यंतच्या पर्वताला झुंगेरियन ओळ म्हणतात. क्षेत्रफळ १४८००० चौ. मैल व लोकसंख्या ६००००० आहे.

**झुंझुनु**—राजपुताना, जयपूर संस्थान. शेखावती निजामत. हें झुंझुनु तहशिलीचें मुख्य ठिकाण असून जयपूरच्या उत्तर-वायव्येस आहे. लोकसंख्या ( १९११ ) १३२६६. येथें एक १३०० वर्षांचें प्राचीन जैन देवालय आहे.

**झुबेदा खातुन**—ही प्रख्यात खलिफा हरून-अल्-रशीद याची बायको. ही खलीफ-अल्-मन्सूरच्या मुलाची मुलगी. हिचा मुलगा खलिफ-अल्-अमीन नांवाचा होता. ही बगदाद येथें ८३१ त मरण पावली. हिनें ताब्रिझ शहर (स. ८०६) वसविलें असें म्हणतात. [ बील. ]

**झुब्दतुन्निसा**—ही औरंगझेबाची चौथी मुलगी. हिच्या आईचें नांव नवाबबाई असें होतें. हिचा जन्म इ. स. १६६० त झाला. दारा शिकोह याच्या एका मुलाशीं हिचें लग्न झालें. औरंगझेब मेला त्याच वर्षी व महिन्यांत, मात्र थोडे दिवस आधीं ही मेली (१७१७ ). [ मासिरी आलमगीर; लेनपूल-अवरंगझेब .]

**झुरळ**—एक प्राणी. 'कीटक अथवा षट्पद' ( विभाग ११ वा ) या लेखांत झुरळाची सविस्तर माहिती दिली आहे.

**झुलफिकारखान**—यास अमीर उल उमरा नसरतजंग असा किताब होता;याचें मूळचें नांव यातकादखान असें होतें. औरंगझेबाचा वजीर असदखान याचा हा मुलगा, याचा जन्म इ. स. १६५७त झाला.औरंगझेबाच्या करकीर्दींत यानें अनेक कामगिऱ्या केल्या. कोंकणच्या स्वारींत हा स. १६८९ त आला. रायगड फितुरीनें घेऊन बाल शाहु व येसुबाई यांना धरून औरंगझेबाच्या स्वाधीन केलें ( १६९० ) व त्याबद्दल शहानें याला झुलफिकार ही पदवी दिली. नंतर राजारामास धरण्यासाठीं जिंजीला सहा सात वर्षें वेढा घालून बसला ( १६९१–९७ ). परंतु मराठे सेनापती संताजी व

धनाजी यांनीं त्याचा लाग चालूं दिला नाहीं.अखेरीस त्याच्या हातून राजाराम निसटला. तंजावर व त्रिचनापल्ली यांवर यानें स्वाऱ्या केल्या होत्या. या सुमारास याचें व औरंगझेबाचें नीट नव्हतें. यानें एकदां तर कामवक्ष शहाजाद्यास ( जिंजीच्या वेळयांत)कैद केलें होतें.औरंगझेबानें याच्यावर देखरेखीस काम वक्षास घाडलें होतें. यालाच पुन्हां मोहिमेचा सर्व अधिकार दिला. पुढें त्याला महाराष्ट्रांत बोलावून (राजाराम गेल्यानंतर यानें जिंजी घेतली होती व तिकडे काम नसल्यामुळें ) राजाराम जालना लुटून परत येत असतां शहाजादा बेदर बख्तबरोबर यास राजारामावर पाठविलें; परंतु राजारामानें त्याचा पराभव करून सिंहगड गांठला ( १६९९ ). पुढें मराठ्यांच्या बंदोबस्तासाठीं याला माळव्यांत पाठविण्यांत आलें(१७०५). तेथें त्याची व नेमाजी शिंद्याची झटपट उडाली. तिकडून याला वागिनगिऱ्यावर पाठविलें असतां त्यानें तें सर केलें ( १७०६ ). त्यावर औरंगझेबानें शाहूस त्याच्या स्वाधीन करून सिंहगडावर धाडलें; धान्याच्या टंचाईनें अखेर किल्ला पडला ( १७०६ ). पुढल्या वर्षी त्यानें धनाजी जाधवाविरुद्ध घोरपड्यांस मदत केली, इतक्यांत औरंगझेब मेल्याचें ऐकून तो अझीमशहास येऊन मिळाला ( १७०७ ) व नेमाजी शिंद्याच्या मदतीनें कामवक्षावर हल्ला करून त्याला लढाईत ठार केलें ( १७०८). आग्र्याच्या लढाईत अझीमचा पराभव झाला व शहाआलम ( बहादूर शहा ) जय पावला, तेव्हां खान दक्षिणेंतून पळून आला. पण बहादूरशहानें त्याला क्षमा केली. एवढेंच नव्हे तर बहादुरशहानें याला अमीरुल उमरा पदवी देऊन याला दक्षिणचा सुभेदार नेमिलें ( १७०७ ). बहादुरच्या मागें, जहांदर हा आपल्या भावांनां एकीकडे सारून केवळ झुल्फिकारच्याच साहाय्यानें व धरवाईनें गादीवर आला; त्यामुळें त्यानें याला वजीर केलें. पुढें फर्रुखसियरनें जहांदरशीं लढाई करून त्याला पकडून कैदेंत ठेविलें व गादी बळकावली. नंतर त्यानें जहांदरचा खून केला व झुल्फिकार यालाहि फांशीं दिलें आणि त्या दोघांचीं डोकीं भाल्यांनां खोंचून व त्यांचीं धडें हत्तीला उलटीं टांगून, त्यासह मोठ्या थाटानें फर्रुखनें दिल्लींत वाजत गाजत प्रवेश केला ( जानेवारी १७१३ ). एवढेंच नव्हें तर शहानें झुल्च्या वृद्ध पित्यास ( वझीर आसदखान ) व त्याच्या जनानखान्यांतील बायकांस याप्रसंगीं बळजबरीनें आपल्या स्वारीबरोबर चालविलें होतें; व त्यांनां प्रत्यक्ष आपल्या मुलाची व घराण्याची बेअब्रू पहावयास भाग पाडलें होतें. या वेळीं आसदनें दुःखानें उद्गार काढला कीं, " झमूल अबराहीम इसमाईल रा करतन " ( अब्राहमनें इस्माईलचा शेवट केला ). झुल्फिकारची आई मेहरुन्निसा बेगम म्हणून होती व शाहिस्ताखान हा त्याचा सासरा होता. [ सरकार—औरंगझेब; बील; मुसुलमानी नखर .]

झुलुलंड—दक्षिण आफ्रिका. नाताळ विभागांतील एक प्रांत. हा प्रांत दक्षिण अक्षांश २६°५०' ते २९°१५' आणि पूर्व रेखांश ३०°४०' ते ३२° यांच्या दरम्यान आहे. याचें क्षेत्रफळ १०४२४ चौ. मै. आहे याच्या आग्नेयीस हिंदी महासागर आहे; उत्तरेस व वायव्येस युट्रेच, व्हिहीड व स्वाझिलंड हीं आहेत. ईशान्य किनाऱ्यावर असलेल्या रेतीच्या टेंकड्यांच्या पलीकडे सेन्टलुशीआ व कोशी नांवाचे तलाव आहेत. पॉंगोला, मॅपुटा, उम्लाबुमा, अमकुझी, अमफोलोसी, अम्ल्हाटुझी, ब्लड, बफेलो व टुगेला ह्या नद्या या प्रांतांतून वहातात. येथील हवा समशीतोष्ण असून येथें एकंदर पाऊस ४७ इंच पडतो. १९०४ सालीं येथील लोकसंख्या २३०००० होती, पैकीं १६९३ गोरेलोक व एतद्देशीय झुलु लोकांशिवाय २००० बासुटॉस लोक होते. मॅसिडु, मरॅन्व्ही, वेगॉनी, मेटेबल, मॅन्व्हिटी आणि अवेझांशी लोकांनीं या प्रांतावर स्वाऱ्या करून पूर्व व मध्य आफ्रिकेचा बराच भाग काबीज केला. चाकाचे मुख्य अधिकारी मॉसिलीकेट्झ व सुंगनड्या यांच्या बंटांत सामील होऊन मेटेबल व अंगोनी लोकांनीं देशांतर केलें. गुरें हीं येथील मुख्य दौलत समजली जाते.

झु लु लो क.—या लोकांची स्वतंत्र जात म्हणून मोडत चालली असली तरी अद्यापि लिंपोपो आणि मध्य झांबेझी यांमधील प्रदेशांत यांचें वर्चस्व आहे. काफिर झुलूंच्या माहितीकरितां ' काफीर ' पहा.

बहुपत्नीत्वाची चाल झुलु लोकांत रूढ असल्यामुळें,वारसासंबंधीं भानगडी उद्भवतात. तरी यांचा वारसाचा फायदा फार उत्तम रीतीनें तयार केला आहे. यांच्या खासगी मालमत्तेंत बहुशः गुरेंढोरें यांचाच समावेश होतो. लग्नाच्या वेळीं वधूबद्दल तिच्या बापाला मोबदल्यादाखल गुरेंढोरें देण्याची चाल झुलु लोक पाळतात. झोंपड्यांचा समूह त्यांच्या प्रमुख नायकाच्या आधिपत्याखालीं असतो. हा नायक, मूळसंस्थापक अगर ' पेट्रिआर्क ' असून स्वजातिबांधवांच्या चांगल्या वर्तणुकीबद्दल तो जबाबदार असतो. एकाहून अधिक झोंपड्यांच्या समूहावरहि या नायकाची सत्ता चालू शकते. याच्यावरचा अधिकारी म्हणजे जातीचा मुख्य पुरुष होय. त्याच्याहि वरचा अधिकार झुलुलंडच्या राजाला होता; परंतु सांप्रत तो कमिशनरच्या हातांत आहे. ल्होनिप पद्धतीनुसार, झुलु स्त्री आपली व आपल्या नवऱ्याच्या आईबापांची भेट होऊं न देण्याची काळजी घेते. त्याचप्रमाणें, आपल्या नवऱ्याच्या कुटुंबांतील प्रमुख व्यक्तींच्या नांवांत आढळणारे शब्द झुलु स्त्री कधींहि उच्चारीत नाहीं. उदाहरणार्थ तिच्या दिराचें नांव, यून्कोमो असलें तर गाय या शब्दाला झुलु भाषेंत असलेला इन्कोमो शब्द ती कधींच उच्चारावयाची नाहीं. गाईचा उल्लेख करण्याची जर तिजवर पाळी आली तर ती दुसरा एखादा शब्द हुडकून

काढून तो ती योजील. वर सुद्धा आपल्या सासूसासऱ्यासंबंधी ह्याच नियम पाळतो.

नजीकच्या देशांत अद्याप प्रचारांत असलेली चेटकाची बाधा घालविणारे लोक पदरीं ठेवण्याची पद्धत, झुलुलंडमध्येंहि एके काळीं प्रचारांत होती. एखाद्या माणसास जर कोणी चेटुक केलें तर हे लोक जादूटोणा करून तें घालवीत. परंतु किटिवायो नामक गृहस्थानें ही पद्धत मोडून चेटकी म्हणून गणल्या जाणाऱ्या कैद्यांकरितां निराळ्या झोंपड्या बांधल्या आणि त्यांची राहण्याची व्यवस्था या झोंपड्यांतून केली. २० व्या शतकांतील प्रारंभींच्या वर्षांत ही पद्धत बहुतेक नामशेष होण्याच्या मार्गास लागली. ही जात बंटु जातीचा एक पोटवर्ग असल्यानें यांची भाषा, धर्म वगैरेंची माहिती बंटु जातीवरील लेखांत आढळेल.

श ह रें.—एशोवी शहरची लो. सं. १९०४ त १८५५ होती. कर्नल पीअर्सनला झुलु लोकांनीं १८७९त येथेंच वेढलें. एशोवीच्या ईशान्येस २५ मैलांवर बोअर लोकांच्या मुलुखांत मेलमॉथशहर आहे. सोमकेली हें सेंट लुशीआ कोळशाच्या खाणींचें मुख्य ठिकाण आहे. या देशाला बंदर मुळींच नाहीं. नीटनेटक्या सडकांनीं मोठमोठीं शहरें जोडलीं आहेत. टुगेला नदीमार्गावर नाताळ व झुलुलंडचे रस्ते येऊन मिळतात. १९०४ सालीं येथें रेल्वे सुरू झाली.

मका, ज्वार, तंबाखु, साखर, चहा व कॉफी ह्या जिनसा येथें होतात. सोनें, तांबें, लोखंड, कोळसा हे खनिज पदार्थ येथें सांपडतात. येथील मुख्य सत्ता प्रांतिक मंडळाकडे आहे. किरकोळ बाबतींत हें संघटित पार्लमेंटला जबाबदार आहे. १८९५ सालीं इंग्वावुमा देश ब्रिटिश राज्यास जोडला गेला. येथील प्रत्येक झुलु नवऱ्याला प्रत्येक पत्नीमागें १४ शिलिंग प्रमाणें कर द्यावा लागतो. १९०६ सालापासून १६ वर्षांवरील प्रत्येक मनुष्यावर १ पौंड कर लादण्यांत आला.

इ ति हा स.—१७ व्या शतकाच्या प्रारंभीं झुलु लोक व्हाइट अंफोलोसी नदीच्या खोऱ्यांत येऊन राहिले. १७५६ सालीं यूरोपियन व झुलु लोकांत चकमक होऊन 'डॉडिंग्टन' बुडालें. बचावलेले लोक सेन्टलुशीनाच्या किनाऱ्यावर आले. त्यांच्या सांगण्यावरून येथील लोक फार गर्विष्ठ व हट्टी असावे असें वाटतें. १८ व्या शतकाच्या शेवटीं झुलु लोकांचें महत्त्व फारच कमी झालें. यावेळेस अवाटेप्वा लोक बलिष्ठ होते, त्यांचा मुख्य डिंगि केपकॉलनींत रहात असे. त्यानें डेलागोआबे येथील पोर्तुगीज लोकांशीं व्यापार सुरू केला. १८१० सालीं सेंझांगाक्षोनाच्या मरणानंतर त्याचा मुलगा चाक याला मिळाला व त्याच्याच मदतीनें अमे झुलूंचा राजा झाला. १८१२ सालीं अमटेप्वा आणि झुलु लोकांनीं अमांगवाना लोकांना वफेलो नदीच्यापार हांकलून दिलें. अनव्डांव्डी लोकांचा पुढारी सिन्झीडे यानें याच वेळेस डिंगिसवेयोला पकडून ठार केलें. उमटेप्वाचें सैन्य चाकच्या ताब्यांत आल्यावर त्यानें अनव्डांव्डी लोकांनां जिंकून लष्करांत पुष्कळ सुधारणा केल्या.

स्वागेंडवा व मणीकुसा यांचा पराभव केल्यावर १८२० सालीं सर्व नाताळ चाकच्या ताब्यांत आलें. पुढें झुलु सेनापति मॉझिलीकेटझनें व्हाल आणि लिंपोपो नद्यांमधील मुलुख उध्वस्त केला. पोंगोलो व उमकेमांझी नद्यांमधील मुलुख चाकच्या ताब्यांत होता. जमिनीवर ड्रेकनवर्गपर्यंत त्याचाच मुलूख होता.

चाकनें १८२४ सालीं देणगी म्हणून फे एफ. जी. फेअरवेलला पोर्ट नाताळ दिलें. यावेळेस चाकला झालेली जखम एका यूरोपीयनानें बरी केली. केपटाउन व ब्रिटिश सरकार यांच्यामध्यें राजकारणासंबंधीं दळणवळण सुरू करण्याकरितां सोटोबीला इंग्लंडच्या राजाकडे पाठविलें, परंतु लगेच पोर्ट एलिझाबेथपासून त्याला परत यावें लागलें. पुढें चाकनें पोंडो देश उध्वस्त केला आणि १८२८ सालीं तो डिंगान व आम्थ्लांगान या सावत्र बंधूंकडून मारला गेला. पुढें डिंगान गादीवर आला, हा फार चैनी व दुष्ट होता. झुलुलँडमधील पळपुट्यांनां आश्रय देणार नाहीं एवढ्या अटीवर १८३५ सालीं यानें ब्रिटिश वसाहतवाल्यांनां पोर्ट नाताळ येथें धर्मप्रसारक संस्था स्थापण्यास परवानगी दिली.१८३७ सालीं हीच परवानगी अमेरिकन धर्मप्रसारक मंडळीला देण्यांत आली. याच सालीं बोअर लोकांनां येथें राहण्याची परवानगी मिळाली. १८३८ सालीं डिंगाननें बोअर लोकांची कत्तल केली. पण अँड्रिअस प्रिटोरिअसनें त्याच्या सैन्याचा पाडाव केला. स्विझर्लंडमध्यें डिंगान मारला गेल्यावर बोअर लोकांनीं पांडाला गादीवर बसविलें.

१८४३ सालीं यानें ब्रिटिशांनां अप्परटुगेलो व बफेलो नद्यांमधील मुलुख व सेन्टलुआबे दिला. बोअर लोकांशीं यानें पुष्कळ लढाया केल्या. स्वाझी लोकांशीं यानें युद्ध केलें. पांडाचे मुलगे सिटीवेयो व अंबुलाझी यांच्यामध्यें यादवी सुरू झाली तींत अंबुलाझी पडला. सिटीवेयोच्या कारकीर्दींत इंग्लिश, जर्मन व नॉर्वेजिअन धर्मप्रसारक संस्था येथें स्थापण्यांत आल्या.

युट्रेच प्रजासत्ताक मुलुखांतील बोअर मंडळानें सिटीवायोला कांहीं मुलुख मागितला. युट्रेच येथें पळून गेलेल्या सिटीवायोच्या भावाला(अमटाँगोला)परत दिल्यास सरहद्दीवरचा मुलूख देऊं असें जाहीर केल्यावर त्यांनीं भावास परत दिलें व ठरलेला मुलूख ताब्यांत घेतला. अमटाँगो पुन्हां पळून गेल्यावर सिटीवायोनें दिलेला मुलूख परत मागितला. याच वेळेस स्वाझी लोकांनीं बोअर लोकांनां दिलेला मुलूख झुलु लोक मागूं लागले. अशा रीतीनें उत्पन्न झालेलें वैमनस्य मिटविण्याकरितां नाताळला लेफ्टनंट गव्हर्नरची नेमणूक करण्यांत आली पण त्यांत त्याला यश आलें नाहीं.

सिटीवायो जरी लायक होता तरी आपलपोट्या व घमेंडी होता. यानें ठरवलेल्या लोकांशीं लग्न केलें नाहीं

म्हणून यानें बऱ्याच मुलींची कत्तल केली म्हणून नाताळ सरकारची त्याच्यावर इतराजी झाली. त्याच वेळेस सिटीवायो आणि ट्रान्सव्हाल यांच्यामधील सरहद्दीविषयीं कांहीं तंटा चालला होता. १८७७सालीं ट्रान्सव्हाल ब्रिटिशांच्या ताब्यांत गेल्यावर पूर्वी चालू असलेल्या सरहद्दींविषयींचा तंटा सुरू झाला. सरहद्दीवरील बोअर लोक जागा सोडून गेल्यास त्यांना मोबदला मिळावा व तेथें राहिल्यास त्यांचे रक्षण व्हावें या मुख्य कमिशनर सर बार्टल फ्रेअरच्या अटी सिटीवायोस पसंत नसल्यामुळें युद्ध सुरू झालें. लॉर्ड चेल्म्सफर्डनें झुलुलंडवर स्वारी केली. इसानध्लवना येथें ब्रिटिशांचा पराभव झाला परंतु रॉर्कड्रिफ्ट येथें झुलु लोकांचा त्यांनीं पाडाव केला. जिंगीन ल्होव्हो व कँबुला येथें झालेल्या लढायांत ब्रिटिशांचीच फत्ते झाली. ब्रिटिश सैन्याबरोबर आलेला फ्रान्सचा राजपुत्र लुइ नेपोलिअन या युद्धांत पडला. नंतर उलंडी येथील लढाईमध्यें ब्रिटिशांचीच फत्ते झाली.

वूल्स्लेनें सिटीवायोला गादीवरून काढलें व ११ सरदारांस हा देश वांटून दिला आणि त्यांच्यावर देखरेख करण्याकरितां ब्रिटिश रेसिडेंट नेमला. केवळ यामुळेंच युसिबेपु, हामु आणि उसुतु ( राजपक्ष ) यांमध्यें झालेल्या युद्धानंतर सिटिवायो पुन्हां राजा झाला. युसिबेपु याच्या लोकांनीं उलंडीवर स्वारी केली, त्यावेळीं सिटीवायो येथून पळून गेला. १८८४ सालीं तो मरण पावला. बोअर लोकांच्या मदतीनें सिटीवायोचा मुलगा डिनी झुलूनें युसिबेपु लोकांचा पराभव केला. परंतु मदत केल्याबद्दल मध्यझुलुलंडमधील बराच मुलूख बोअर लोकांना द्यावा लागला. यानंतर प्रजासत्ताक पद्धति येथें सुरू झाली. नाताळमधील व्होईहीड पूर्वी उसुटस लोकांच्या ताब्यांत होतें.

नवीन प्रजासत्ताक मुलुख वगळून सर्व झुलुलंड १८८७ सालीं ब्रिटिश राज्यास जोडलें गेलें. याबद्दल डिनी झुलूनें बंड केलें पण त्यांत त्याचा पराभव होऊन त्यास सेंट हेलिना येथें हद्दपार करण्यांत आलें. १८०० सालीं झुलुलंड व टोंगालंडमधील अर्धवट स्वतंत्र मुलुख झुलुलंडला जोडला. १८९५ सालीं झंबान व उमटेगिझा सरदाराच्या मुलखांचा या देशांत समावेश झाला. या वेळेस टोंगोलंड ब्रिटिशांचें रक्षित संस्थान झालें.

१८९७ सालीं झुलुलंड नाताळ सरकारच्या ताब्यांत गेलें. १८९८ सालीं डिनीझुलु परत आला. १८९९ पासून १९०२ पर्यंत बोअर व झुलु लोकांमध्यें युद्ध झालें त्यांत झुलु लोकांची फत्ते झाली. १९०१ सालीं लुइबोथानें नाताळवर स्वारी करण्याचा प्रयत्न केला पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. १९०५ सालीं प्रत्येक तरुण पुरुषावर १ पौंड कर बसविला. म्हणून येथील लोकांनीं बंड केलें. बंडखोरांचा पुढारी बंबाट हा कांधला येथें पळून गेला. याच वेळेस सिगनंदा बंडांत सामील झाला. सर डंकन मॅकेन्झीनें बंडखोरांचा पराभव केला. यांत बंबाटचा अंत झाला व सिगनंदा शत्रूला वश झाला. बंबाटच्या बंडांत सामील असल्याबद्दल डिनीझुलूला ४ वर्षांची शिक्षा झाली. १९१० सालीं बोथाप्रधानमंडळानें बंधमुक्त केल्यावर यास ५०० पौंडांचें पेन्शन मिळालें. [ गिब्सन—दि स्टोरी ऑफ दि झुलूज; फरेर—झुलुलंड अँड दि झुलूज; मिट्फोर्ड—थ्रू दि झुलु कन्ट्री. ]

झूबा—मध्यप्रांत. सुरगुजा संस्थानांतील एक ओसाड किल्ला. हा मानपुऱ्याच्या आग्नेयीस २ मैलांवर आहे. टेंकडीच्या एका सडकाळ कड्यावर हा बांधला आहे. जवळच खांडांनीं झांकलेलीं अशीं कांहीं खोदीव देवळें आहेत.

झूरिच—स्वित्झर्लंड. झूरिच विभागाचें मुख्य ठिकाण. हें शहर लिम्मॅट नदीच्या दोन्ही तीरावर वसलें असून स्वित्झर्लंडमध्यें हें सर्वांत मोठें शहर आहे. येथील देखावा फार रमणीय आहे. याची लोकसंख्या १९०० सालीं १५०७०३ होती. पैकीं ३११२५ जर्मन, ५३५० इटालियन, ४२१० ऑस्ट्रियन, ६८३ रशियन, ६५२ फ्रेंच, १५७ इंग्रज व २३२ युनायटेड स्टेट्समधील अमेरिकन होते. निरनिराळ्या धर्मांचे लोक पुढीलप्रमाणें होते—१०२७९४ प्रॉटेस्टंट, ४३६५१ रोमनकॅथोलिक व २०१३ यहुदी. १९१० सालीं झूरिचची लोकसंख्या १८९०८८ होती.

येथें ऑस्टीन फ्रायरचें देवालय आहे. त्या ठिकाणीं कॅथोलिक लोक प्रार्थना करावयास जमतात. याच देवालयांत १६३१ सालीं स्थापिलेलें ग्रंथसंग्रहालय आहे. या ग्रंथसंग्रहालयांत १७०००० ग्रंथ असून ४५०० बखरी आहेत. या बखरींत झ्वींग्ली, बुलींगर, जेन ग्रे वगैरे प्रसिद्ध विभूतींचे हस्तलिखित ग्रंथ आहेत. या इमारतीजवळच१८८५सालीं उभारलेला एक झ्वींग्लीचा पुतळा आहे. येथील दुसरी महत्त्वाची इमारत म्हटली म्हणजे राष्ट्रीय पदार्थसंग्रहालय होय. यांत पुष्कळ जुन्या वस्तूंचा संग्रह केला आहे. येथें एक रोमन लोकांनीं बांधलेला पूल आहे. याशिवाय येथें पुष्कळ देवालयें आहेत.

हें शहर स्वित्झर्लंड देशांतील जर्मन भाषा बोलणाऱ्या लोकांचें बौद्धिक केंद्रस्थान आहे. येथील मुख्य धंदे म्हटले म्हणजे, कापूस पिंजणें व यंत्रें तयार करणें होत. येथें रेशमी कापडहि तयार होतें. येथें प्राथमिक व दुय्यम शिक्षणाच्या शाळा असून १८३३ त स्थापन झालेलें एक विद्यापीठहि आहे. या शहराजवळ एक वेधशाळा आहे. याशिवाय येथें जनावरांची शस्त्रक्रिया, गायन, औद्योगिक कला, रेशीम विणणें वगैरे शिकण्याकरितां निरनिराळ्या संस्था आहेत. येथें पूर्वी केल्टहेल्व्हेशियन लोक राहत असत. पुढें हें शहर रोमन लोकांच्या ताब्यांत गेलें व त्यांनीं येथें इटली देशांत जाणाऱ्या व इटली देशांतून येणाऱ्या मालावर जकात घेण्याकरितां एक ठाणें ठेविलें. इ. स. १३९३ मध्यें येथील सत्ता एका मोठ्या सभेच्या हातीं गेली.

**झूसी**—संयुक्तप्रांत. अलाहाबाद जिल्हा. फूलपुर तहांसलींतील एक गांव. उ. अ. २५° २६' व पू. रे. ८१° ५४'. गंगा व यमुना नद्यांच्या संगमासमोरच हा गांव वसलेला आहे. लोकसंख्या (१९०१) ३३४२. पुराणांतरीं वर्णिलेलें पुरूरवस राजाचें प्रतिष्ठान अथवा केसी हेंच होय असा शोध लागला आहे. एका काळीं यास हारवंगपुर असें म्हणत. अकबर बादशहाच्या वेळीं यास हाडियावास असें नांव होतें. हुएनत्संगनें उल्लेखलेलें किया-शि-पु-लो हेंच असावें असा कांहींचा तर्क आहे. दोन मातींचे ढीग प्राचीन काळीं त्या ठिकाणीं किल्ले असावे असें दाखवितात. याशिवाय गुप्तांच्या वेळचीं सोन्याचीं नाणीं व इ. स. १०२७ मधील एक ताम्रपट या ठिकाणीं उपलब्ध झाला आहे.

**झेंद-अवेस्ता**—हा पारशांचा धर्मग्रंथ होय. अवेस्ता हा शब्द 'अविस्ताक-ज्ञान, ज्ञानदेणारें पुस्तक' या पहलवी भाषेंतल्या शब्दावरून बनलेला आहे. झेंद-अवेस्ता हें नांव चुकीचें आहे. पहलवी भाषेंत झेंद याचा टीका असा अर्थ आहे. 'अविस्ताक व झेंद' अगर 'अवेस्ता वा झेंद' असा शब्द प्रयोग पाहिजे.

अवेस्ता ग्रंथ, हा नष्टप्राय झालेल्या धर्माचा मुख्य ग्रंथ आहे. जगांतील इतर कोणत्याहि धर्माचा या धर्माच्या इतका कमी प्रसार नसेल हें खरें, तरी पण या अवेस्ता ग्रंथाचें व त्यामध्यें सांगितलेल्या धर्माचें ऐतिहासिकदृष्ट्या फार महत्त्व आहे. या धर्मग्रंथांत खिस्ती शकापूर्वी ५०० वर्षांपूर्वीच्या व ख्रिस्तोशकानंतर ७०० वर्षांच्या अवधींतील इराणी लोकांच्या धर्मकल्पना, समजुती, आचारविचार यांची माहिती सांपडते; इतकेंच नव्हे तर या धर्मग्रंथाच्या व त्यांत सांगितलेल्या धर्माच्या साहाय्यानें, पर्शुभारतीय काळावर म्हणजे वैदिक आर्यांच्या भारतप्रवेशापूर्वींच्या काळावर प्रकाश पडण्याचा पुष्कळ संभव आहे. हल्लीं उपलब्ध असलेला अवेस्ता ग्रंथ हा एका काळच्या मोठ्या वाङ्मयाचा केवळ अवशेष होय. मूळ अवेस्ताग्रंथाचीं १२०० प्रकरणें होतीं असें पहलवी दंतकथांवरून समजतें. अवेस्ताग्रंथ १२०० गाईंच्या कातड्यावर कोरला होता असें टबरी व मसूदी या इतिहासकारांनीं म्हटलें आहे. या ग्रंथाच्या विस्ताराबद्दल प्राचीन सीरियन लेखकहि साक्ष देतात व प्लिनी नांवाच्या रोमन पंडितानें, झोरोआस्टरनें २० लक्ष कविता रचल्या असें म्हटलें आहे. खुद्द उपलब्ध अवेस्ताग्रंथाचें अंतरंगपरीक्षण केलें तरी हेंच दृष्टोत्पत्तास येतें. पण सर्वांत बलवत्तर प्रमाण म्हणजे पहलवी भाषेंतील डिनकर्त या ग्रंथाचें व पर्शियन रिवायतग्रंथांचें होय. या ग्रंथांत प्राचीन अवेस्ताग्रंथाच्या विस्ताराबद्दल व त्यांतील मजकुराबद्दलची संपूर्ण माहिती आलेली आहे.

पूर्वकाळीं व विशेषतः अकिमेनियन राजांच्या अंमलाखालीं या धर्मग्रंथाचें रक्षण मोठ्या आस्थेनें होत होतें. झोरोआस्टरचा साहाय्यक जो विष्टास्प राजा त्यानें अवेस्ता ग्रंथ सोनेरी अक्षरांत लिहून काढवून तो ग्रंथ पर्सेपोलीस येथील आपल्या दप्तरकचेरींत ठेवला होता असें टबरीनें म्हटलें आहे, व डिनकर्त ग्रंथांवरूनहि हीच गोष्ट दिसून येते. या ग्रंथाची दुसरी एक सोन्याच्या विटांवर कोरलेली १२०० प्रकरणात्मक प्रत समरकंदमधील अग्यारी (अग्निगृह) मधील खास खजिन्यांत ठेवली होती असें शात्रोइहा-इ ऐरान या पहलवी ग्रंथावरून समजते. पण या दोन प्रतींचा अलेक्झांडरच्या स्वारीमध्यें ज्यावेळीं पर्सेपोलीस व समरकंद हे ग्रीकांच्या हातीं आले त्यावेळीं नाश झाला.

अलेक्झांडरच्या मागून सेल्युकसच्या अंमलाखालीं व पार्थियन अमदानींतहि, अवेस्ता ग्रंथाचा पुष्कळ भाग नामशेष झाला. तथापि अशा हालाखीच्या स्थितींतहि अवेस्ताचा बराच भाग शिल्लक होता व कांहीं भाग पारशी उपाध्यायांच्या तोंडांत होता. अर्साकिडच्या कारकीर्दीत म्हणजे तिसऱ्या शतकाच्या प्रारंभीं शिल्लक राहिलेल्या अवेस्ता ग्रंथाचें एकीकरण करण्याचा प्रयत्न झाला. वक्श राजानें उपलब्ध अवेस्ता ग्रंथ लिहून काढण्यांत यावे, अशी आज्ञा जाहीर केली. ससानियन घराण्याच्या संस्थापकानें हीच परंपरा सुरू ठेवली. त्यामुळें या एकत्रीकरणाच्या प्रश्नाला चालना मिळाली व दुसऱ्या शापूरच्या कारकीर्दींत (३०९-३८०) आदरबाद मारसपंद या मुख्य प्रधानाच्या देखरेखीखालीं या उपलब्ध ग्रंथानें एकत्रीकरण झालें; व हा तयार झालेला ग्रंथ प्रमाण ग्रंथ म्हणून मानण्यांत येऊं लागला. पण अलेक्झांडरच्या स्वारीनें जें पारशांचें व त्यांच्या धर्मग्रंथांचें नुकसान झालें नाहीं तें मुसुलमानांच्या प्रशियावरील स्वारीनें झालें. मुसुलमानांनीं इराण पादाक्रांत केल्यावर त्यांनीं आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें धर्मच्छल करण्यास सुरवात केली. ज्या ज्या ठिकाणीं धर्मग्रंथ सांपडतील ते सर्व गोळा करून त्यांचा नाश करावा असें फर्मान काढण्यांत आलें व पारशांचा फार छळ करण्यांत आला. त्यामुळें पारशी लोकांना देशत्याग करणें भाग पडलें. त्यांच्याबरोबर जेवढा अवेस्ता ग्रंथाचा भाग नाशांतून वांचला तेवढा रक्षिला गेला. पारशी लोकांपैकीं बऱ्याच लोकांनीं बाटण्याच्या भीतीनें हिंदुस्थानचा मार्ग धरला. हिंदुस्थानांत असतां राखण्यांत आलेला अवेस्ता ग्रंथाचा भाग पुन्हां लिहून काढण्यांत आला. त्या प्रतींपैकीं कांहीं प्रती १३।१४ व्या शतकामधील असून त्या उपलब्ध आहेत. पण कोणत्याहि एका प्रतींत समग्र अवेस्ता ग्रंथ एकत्र असलेला आढळत नाहीं.

अवेस्ता ग्रंथाचें स्वरूप.—ज्याला आपण हल्लीं झेंदावेस्ता म्हणून नांव देतों त्याचे दोन मुख्य भाग आहेत. पहिला, ज्यालाच खरोखर अवेस्ता हें नांव देणें सयुक्तिक होईल त्यामध्यें वेंदीदाद, विस्पेरद व यश्न यांचा समावेश होतो. वेंदीदादमध्यें पौराणिक कथा व धर्माच्या आज्ञा यांचा संग्रह

झालेला आहे. विस्पेरदमध्यें, यज्ञाकरितां जरूर अशा अरिष्टशांतिप्रार्थनांचा संग्रह आहे. यश्नमध्यें अशाच प्रकारच्या अरिष्टशांतिप्रार्थनांचा अंतर्भाव असून शिवाय, प्राचीन गाथापंचकाचाहि यांत समावेश करण्यांत आला आहे. कांहीं हस्तलिखित प्रतींत हे तिन्ही ग्रंथ परस्परांहून स्वतंत्र असून त्यांच्या शेवटीं पह्लवी भाषेंतील भाषांतर जोडलेलें आढळतें. इतर हस्तलिखित प्रतींत हे तीन्ही ग्रंथ यज्ञांमधील प्रार्थनांच्या दृष्टीनें सोईप्रमाणें, एकत्र करण्यांत आले आहेत व त्यांच्या शेवटीं भाषांतर अगर टीका वगैरे कांहीं आढळत नाहींत. म्हणून त्याला ' शुद्ध वेंदीदाद ' असें नांव देण्यांत येतें. दुसऱ्या भागाचें खोर्द अवेस्ता असें नांव असून त्याच्यामध्यें छोटीं छोटीं प्रार्थनासूक्तें ग्रथित झालेलीं आहेत. हीं सूक्तें केवळ उपाध्यायांनींच नव्हे तर सर्व गृहस्थांनीं विशिष्ट प्रसंगीं विशिष्ट तऱ्हेनें म्हणावयाचीं असतात. यांखेरीज या भागांत यश्त व इतर संकीर्ण कथांचा अंतर्भाव होतो. यश्त म्हणजे देवतांच्या स्तुतींचा केलेला संग्रह.

आज जें अवेस्तावाङ्मय उपलब्ध आहे तें संपूर्ण नसून बरेंचसें वाङ्मय लुप्त झालेलें असावें असें या वाङ्मयाच्याकडे विचारपूर्वक पाहिल्यास सहज दिसून येईल. शिवाय या मताला ऐतिहासिक पुरावाहि पण सांपडतो. अरबांच्या विजयामुळें ससानियन राजघराण्याला ओहोटी लागली. झेंद वाङ्मयाचा बराच भाग उध्वस्त करण्यांत आला. वेंदीदादच्या पह्लवी भाषांतरांत असे पुष्कळ झेंद भाषेंतील उतारे सांपडतात कीं त्यांची माहितीच आपल्याला अद्यापि लागलेली नाहीं. निरंगिस्तान एओजेमेद, या ग्रंथांतहि असे पुष्कळ अज्ञात पुस्तकांतील उतारे घेतलेले आहेत. यश्तांची संख्या ३० आहे अशी पारशी लोकांची समजूत आहे. पण त्यांपैकीं १८ उपलब्ध आहेत. इतकें तरी अवेस्ता वाङ्मय शिल्लक राहिलें याचें कारण त्यांत श्रौतस्मार्तविधींचा संग्रह असून त्यांचा नेहमीं व्यवहारांत उपयोग होत असल्यामुळें त्याचें रक्षण होणें स्वाभाविकच होतें हें होय.

प्राचीन अवेस्ताचें स्वरूप.—ससानियन घराण्याच्या सत्तेखालीं अवेस्ता वाङ्मयाचा संग्रह करण्यांत येऊन त्याचे २१ नस्क ( भाग ) पाडण्यांत आले आहेत. यांपैकीं पहिल्या सात भागांना गाथा व दुसऱ्या सात भागांना दात अगर आचारभाग व उरलेल्या सात भागांना हधमाथ्र असें नांव पडलें.

गाथा नस्कामध्यें स्तोतयश्त, सूत्कर, वर्श्त मानसर, वक, वश्तग, हाधोक्त, स्पंद या गाथांचा अंतर्भाव होतो. स्तोत यश्तांत यज्ञाचें सार आलेलें असून हें यश्त फार पवित्र मानण्यांत येतें. या स्तोत यश्तांचीं ३३ प्रकरणें असून, त्यांपैकीं २२ प्रकरणें पद्यमय असून त्यांतील भाषा ही फार प्राचीन दिसते. बाकीचीं ११ प्रकरणें हीं गद्यमय असून त्यांची भाषा तत्कालीन प्रचलित असलेली भाषाच आहे. सूत्कर, वर्श्त मानसर, व वक यांमध्यें प्रत्येकीं २२ प्रकरणें असून या २२ गाथांवर यांत टीका आलेली आहे व गाथांचें भाषांतरहि केलेलें आहे. पण हीं सर्व प्रकरणें उपलब्ध नाहींत, हाधोक्ताचीं तीन प्रकरणें आहेत, त्यांपैकीं एक प्रकरण यश्नामध्यें घालण्यांत आलें आहे.

धर्मकायदाविषयक नस्कामध्यें निकातम, गनबा सरनिगत, हूस्पारम, सकातुम, वेंदीदाद, चित्रदात, बकानयश्त इत्यादिकांचा अंतर्भाव होतो. या सात नस्कांपैकीं पहिल्या पांच नस्कांत धर्मविषयक कायद्यांची माहिती आलेली आहे. शेवटच्या दोन नस्कांत, विश्वोत्पत्तिविषयक व पौराणिक कथांचा संग्रह आहे. धर्मकायदाविषयक पांच नस्कांत वेंदीदाद हें नस्क पूर्णपणें उपलब्ध आहे. निकातम् गनबा सरनिगत, व सकातुम यांचा थोडा भाग उपलब्ध आहे. हूस्पारमचा महत्त्वाचा भाग, इरपतिस्थान व नीरंगिस्तानमध्यें राखून ठेवण्यांत आला आहे. चित्रदात नस्कांत मनुष्यजातांच्या व इराण देशाच्या उत्पत्तीची माहिती आली असून झोरोआस्टरच्या जन्मापर्यंतचा इतिहास त्यांत आढळतो. बकान यश्तांत निरनिराळ्या यज्ञताच्या प्रार्थना असून हल्लीं १८ यश्तच उपलब्ध आहेत.

हधमाथ्र नस्कांत दामदात, नातर, पागग, रतदात इतग, बरीज, कश्किश्रव, विष्तास्प सास्त यांचा अंतर्भाव असून या नस्कांची नासाडी फार झालेली आहे. दामदातांत झोरोआस्टरच्या मतें जगाच्या उत्पत्तीची माहिती आलेली आहे पण हें नस्क संपूर्ण उपलब्ध नाहीं. नातरसंबंधीं कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. पागगमध्यें. गाहानबार, श्रौतविधी, कालाचे भाग, इत्यादींची माहिती आलेली आहे. रतदात इतग याचे दोनच भाग उपलब्ध असून त्यांत यज्ञाचें विधिवर्णन केलेलें आहे. बरीजमध्यें नीतितत्त्वांचें विवेचन आहे. कश्किश्रवामध्यें यज्ञ बिनचुक कसा करावा याविषयींची माहिती आली आहे. विष्तास्प सास्त यामध्यें झोरोआस्टरनें विष्तास्पाला आपल्या धर्मांत ओढून घेतल्याची कथा व झोरोआस्टरनें अर्जास्पाविरुद्ध केलेल्या लढायांची हकीकत आली आहे.

प्राचीन अवेस्ता ग्रंथाच्या स्वरूपाचें थोडक्यांत वर्णन केल्यानंतर त्यांपैकीं हल्लीं किती भाग उरला आहे याकडे वळूं. पूर्वीं शिल्लक असलेल्या ग्रंथांचें स्वरूप सांगितलें आहे त्यावरून प्राचीन अवेस्ता ग्रंथांतील मुख्य व महत्त्वाचा भाग अद्यापिहि शिल्लक आहे असें दिसतें. कारण २१ नस्कांपैकीं वेंदीदाद व स्तोतयश्त व बकान यश्ताचा महत्त्वाचा भाग हें तीन नस्क संपूर्ण उपलब्ध आहेत. वक, हाधोक्त, विष्तास्प सास्त व हूस्पारम या चार नस्कांचा महत्त्वाचा भाग अद्यापि उपलब्ध असून त्याशिवाय इतर नस्कांमधील थोडा थोडा भाग उपलब्ध आहे. याशिवाय बाकीचे नष्ट नस्क अवेस्तन भाषेंत उपलब्ध नसले तरी पह्लवी भाषेंत भाषांतराच्या रूपानें तें अस्तित्वांत आहेत व या भाषांतराच्या साहाय्यानें त्यांतील मजकूर कळतोच.

अवेस्तांतील विषय.मांडणी व काळ.—हल्लींच्या उपलब्ध अवेस्ता ग्रंथांच्या अंतरंगाची माहिती ज्ञानकोश प्रस्तावना खंड, भाग ३, उत्तरभाग प्रकरण ८ पृष्ठें ९८-९९ यामध्यें दिलेली आहे. कालसंबंधीं वर दिलेल्या प्रकरणांतील १००-१०१ पानें पहा.

अवेस्तांतील वृत्तें.—अवेस्तांतील वृत्तांचें निरीक्षण केल्यास अवेस्तांतील भाग कोणकोणत्या वेळीं लिहिले गेले याचें अनुमान करतां येतें. अवेस्तांतील अगदीं जुना जो भाग आहे तो छंदोबद्ध आहे व त्यानंतर मागाहून लिहिण्यांत आलेला भाग हा गद्य आहे असें दिसतें. गाथा वाङ्मय हा छंदोबद्ध भाग असून त्याचें याहि बाबतींत वैदिक ग्रंथांशीं साम्य आहे. अवेस्तामधील छंदोबद्ध भाग म्हणजे गाथावाङ्मय. त्याशिवाय दुसरा कोणता छंदोबद्ध भाग नाहीं अशी प्राचीनांची समजूत होती पण यूरोपीयन पंडितांनीं गाथावाङ्मयानंतरच्या वाङ्मयांतहि मधून मधून छंदोबद्ध भाग दृष्टीस पडतात असें सिद्ध केलें आहे. अवेस्तांतील पद्यवाङ्मय हें अष्टाक्षरी वृत्तांत लिहिलेलें आढळतें. याशिवाय इतर वृत्त वापरलेलें क्वचितच आढळून येतें.

अवेस्ताची भाषा.—अवेस्ता ज्या भाषेंत लिहिला गेला त्या भाषेचें अवेस्तन नांव आहे. इंडोजर्मानिक भाषासमूहाच्या इराणी शाखेची ही भाषा असून तिचें संस्कृतशीं विलक्षण साम्य आहे; व हें अवेस्ता ग्रंथाच्या प्रामाण्यनिश्चयाचें एक बलवत्तर साधन झालें आहे. ध्वनिशास्त्रदृष्ट्या अवेस्तन भाषेंतील व संस्कृत भाषेंतील स्वरांमध्यें पुष्कळ साम्य आहे. ई व ओ या स्वरांचे अवेस्तन भाषेंत पुष्कळ प्रकार होतात तसें संस्कृतमध्यें होत नाहींत. शब्दाच्या शेवटचे स्वर ओ खेरीजकरून सर्व ऱ्हस्व आहेत. संस्कृतमध्यें तसा प्रकार नाहीं. अवेस्तन भाषेंतील कांहीं व्यंजनें संस्कृत व्यंजनांशीं साम्य दाखवितात. पण बऱ्याच व्यंजनांचें संस्कृत व्यंजनांशीं ध्वनिसाम्य आहे. संस्कृत 'स' चें अवेस्तांत 'ह' हें रूप होतें. अशा रीतीनें संस्कृत व अवेस्तन भाषांमध्यें पुष्कळच साम्य असल्यामुळें अवेस्तन शब्दप्रयोगांचें संस्कृतांत सहज रूपांतर करतां येतें. वैदिक संस्कृत भाषेप्रमाणेंच अवेस्तन भाषेंतहि प्रत्ययांची समृद्धि आहे. वाक्यरचनेच्या बाबतींत, संस्कृतमध्यें व अवेस्तन भाषेमध्यें थोडा फार महत्त्वाचा फरक आढळून येतो.

अवेस्ता ग्रंथांत दोन पोटभाषांचें अस्तित्व दृग्गोचर होतें. एक गाथांची जुनी भाषा व दुसरी नंतरच्या वाङ्मयांत आढळून येणारी भाषा. पहिलीला गाथाअवेस्तन भाषा असें नांव आहे व दुसरीचें कनिष्ठ अवेस्तन नांव आहे. गाथाअवेस्तन भाषा आणि कनिष्ठअवेस्तन भाषा या दोन भाषांमधील फरक वैदिकसंस्कृत व अभिजातसंस्कृत यांमधील फरकाप्रमाणें आहे. गाथांची भाषा फार शुद्ध असून वाक्यरचनाहि पण तितकीच शुद्ध असते. शब्दाच्या शेवटचा स्वर दीर्घ करण्यांत येतो. कनिष्ठअवेस्तनभाषा मिश्र आहे. अपभ्रष्ट शब्द तींत बरेच येतात.

लिपि.—अवेस्तन भाषेच्या मानानें अवेस्तन लिपि ही बरीच मागाहूनची असावी असें दिसून येतें. या भाषेंतील अक्षरें सस्सानियन काळांतील पहलवी लिपीपासून घेतलीं असावींत असें दिसून येतें. या लिपींत उर्दूप्रमाणेंच उजवीकडून डावीकडे ओळ वाचावयाची असते. मूळच्या अवेस्तन लिपीसंबंधाची माहिती अद्यापि उपलब्ध नाहीं.अवेस्ता ग्रंथाचें पहलवींमध्यें रूपांतर सस्सानियन काळांत झालें. त्यावेळीं अवेस्ता समजण्याची देखील अडचण पडूं लागली होती. अवेस्तावर कांहीं टीकाग्रंथ झाले होते असें दिसतें; व अशा प्रकारचे टीकाग्रंथ मुसुलमानी अमदानींत म्हणजे ख्रिस्ती शकाच्या आठव्या नवव्या शतकांत देखील झाले होते याबद्दल पुरावा सांपडतो. पहलवींमध्यें रूपांतर झालेल्या भागांपैकीं, संपूर्ण यश्न, विस्परेद, वेंदीदाद व इतर थोडा भाग उपलब्ध आहे. अवेस्ताचें शब्दशः भाषांतर व क्वचित् ठिकाणीं विवरणार्थ टीपा असें या रूपांतराचें स्वरूप आहे. मूळ अवेस्तांतील वाक्यरचना देखील जशाच्या तशा भाषांतरांत ठेवण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे, व ज्या ठिकाणीं अशक्य होईल त्या ठिकाणीं तेवढे नवीन प्रत्यय निर्माण करण्यांत आले आहे. या पहलवी भाषांतरावरून प्राचीन काळीं या झरथुष्ट्रांच्या धर्मासंबंधीच्या आपल्या कोणत्या कल्पना होत्या, अवेस्तामधील धर्मविषयक कार्यांचा तत्कालीन लोक कशाप्रकारें अर्थ लावीत असत, तत्कालीन आचारविचार काय होते यासंबंधीची माहिती मिळते व या दृष्टीनें या भाषांतराचें फार महत्त्व आहे. याशिवाय अवेस्तांतील एखाद्या क्लिष्ट शब्दाचा अर्थ या पहलवी रूपांतरावरून समजतो, या दृष्टीनेंहि या भाषांतराचें महत्त्व आहे. या भाषांतरांत पुष्कळ अशुद्धें व चुका आहेत व त्यांत कांहीं कांहीं ठिकाणीं विचित्र अर्थ करण्यांत आला आहे हें खरें तथापि त्यामुळें त्याचें महत्त्व कमी होत नाहीं. अवेस्तन वाक्यरचनेबरहुकूम पहलवी भाषांतरांतहि तशीच वाक्यरचना करण्याचा प्रयत्न करण्यांत आल्यामुळें भाषांतर फार बोजड झालें आहे. इ. स. १२०० च्या सुमारास, धवल नांवाच्या एका पारशी पाद्याच्या नेर्योसंघ नांवाच्या मुलानें या पहलवी भाषांतराचें संस्कृतमध्यें रूपांतर केलें. हें भाषांतर करतांना यानेंहि पहलवी वाक्यरचना संस्कृतमध्यें तशीच ठेवण्याचा प्रयत्न केल्यानें संस्कृत भाषांतर फार क्लिष्ट झालें आहे. संस्कृतांतील संधि-नियमाकडे पूर्ण दुर्लक्ष केलेलें आढळतें. सुमारें १६००-१८०० च्या सुमारास खोर्द अवेस्ताच्या पहलवी भाषांतराच्या कांहीं भागांचे अर्वाचीन पर्शुलिपींत रूपांतर करण्यांत आलें. तसेंच १९ व्या शतकांत या पहलवी रूपांतराचीं गुजराथी भाषेंत दोन रूपांतरें झालीं व त्यांत बरींच चांगलीं वठलीं आहेत.

त्यानंतर पाश्चात्य यूरोपीय पंडितांचें याकडे लक्ष्य वेधलें. अवेस्ता ग्रंथाची मूळ लिपि शिकून त्या ग्रंथाचें भाषांतर करण्याचा पहिला मान अँनक्वेटिल डु पेरा या फ्रेंच विद्वानास देणें जरूर आहे. त्यानें हिंदुस्थानांत येऊन अतिशय संकटांत दिवस काढून मोठ्या खटपटीनें इराणी भटजीजवळ या ग्रंथाचें अध्ययन केलें; त्या ग्रंथाच्या कांहीं प्रती मिळविल्या व त्या धर्मांतील विधींचाहि त्यानें थोडाफार परिचय करून घेतला. पारिस येथें परत आल्यानंतर त्यानें सतत दहा वर्षे या ग्रंथाचें अध्ययन करून १७७१ सालीं या ग्रंथाचें सटीक भाषांतर केलें.

या भाषांतरामुळें यूरोपमध्यें खळबळ उडून गेली. पुष्कळ लोकांनीं डु पेरानें मिळवलेल्या ग्रंथाच्या खोटेपणाबद्दल शंका प्रदर्शित केली. यामध्यें सर जोन्स हा प्रमुख होता. त्यानें डु पेराला मिळालेली प्रत, साफ खोटी असून त्याला पारशांनीं चकविलें असें प्रतिपादन केलें. त्याच्या उलट फ्रान्समध्यें डु पेराला पुष्कळ अनुयायी मिळाले व जर्मनींतील विद्वान क्लूकर यानें तर या डु पेराच्या भाषांतराचें रूपांतर करून व त्यांत भरपूर माहितीची भर घालून तें पुस्तक प्रसिद्ध केलें.

१८२५ च्या सुमारास पाश्चात्य संस्कृत पंडितांचें इकडे लक्ष्य वेधलें. संस्कृत व अवेस्तन भाषेंत बरेंच साम्य आहे असें डु पेरा वगैरे विद्वानांनीं सिद्ध केलेंच होतें. पण रस्क नांवाच्या डॅनिश भाषाशास्त्रज्ञानें या दोन भाषांत काय साम्य आहे हें सप्रमाण दाखवून दिलें. हा पंडित स्वतः इराणमध्यें गेला होता व तेथून त्यानें अवेस्ता ग्रंथाच्या प्रती व पहलवी भाषांतरें जमवून आणलीं. १८२६ सालीं त्यानें एक छोटासा ग्रंथ लिहून त्यांत, अवेस्तन भाषा फार प्राचीन असून तिच्यामध्यें व संस्कृतमध्यें बरेंच साम्य आहे. ती भाषा संस्कृताहून भिन्न पण, निकटसंबद्ध आहे असें सिद्ध केलें व अवेस्ता ग्रंथांतील लिपीसंबंधाचेंहि त्यानें बरेच शोध केले.

यानंतर बर्नाफ नांवाच्या फ्रेंच पंडितानें अवेस्ताचा अभ्यास चालविला होता. डु पेराच्या भाषांतरांत बऱ्याच चुका त्याला आढळल्यामुळें त्यानें नेर्योसंघाच्या संस्कृत रूपांतराच्या साहाय्यानें अवेस्ता वाचला व डु पेराच्या भाषांतरांतील पुष्कळ चुका दुरुस्त केल्या. यानंतर या दिशेनें व विशेषतः अवेस्तन लिपीसंबंधानें बॉप, हॉग, विंडीशमन, वेस्तरगार्ड, रोट, स्पीजेल इत्यादि पंडितांनीं फार प्रयत्न केले. या पंडितांमध्यें, अवेस्ता ग्रंथाची माहिती करून घेण्याच्या कामीं, प्राचीन टीकाग्रंथाचा व तत्कालीन इतर उल्लेखांचा आश्रय करावयाचा अगर तौलनिक भाषाशास्त्राचें साहाय्य घ्यावयाचें यासंबंधीं वाद माजला होता. पण दोन्ही साधनें सापेक्ष व परस्परसाहाय्यकारी आहेत व त्या दोहोंचाहि उपयोग करून घेणें जरूर आहे हें मत हल्लीं प्रस्थापित झालें आहे. [ 'पारशी' पहा. ]

[संदर्भग्रंथः—मिल्स-गाथाज ( लिपझिग १८९२-९४ ); वेस्टर्गार्ड वेंदीदाद सादे ( पारिस १८२९-४३ ); अँटिया-वेंदीदाद सादे ( बाँबे १९०१ ); संजाना-नीरंगस्तान ( मुंबई १८९४ ); जमस्पजी अँड हॉग-ओल्ड झेंद-पहलवी ग्लॉसरी; अँन क्वेटिल डू पेरॉ-झेंद-अवेस्ता ऑग्रेजर झोरोआस्ट्रे २ व्हॉल्यूम्स, पारिस १७७१; क्ल्यूकर-झेंद-अवेस्ता, ९ भाग ( रिगा, लिपझिग, १८५२-६३ ); स्पीगेल-अवेस्ता ( इंग्रजी भाषांतरकार--ब्लीक ३ भाग, लंडन १८६४ ); डॉर्मेस्टेटर-झेंद-अवेस्ता (सेक्रेडबुक्स ऑफ दि ईस्ट सीरीज); जॅक्सन-अवेस्ता ग्रामर-स्टटर्ट १८९१; कांगा-प्रॅक्टिकल ग्रामर ऑफ दि अवेस्ता लँग्वेज ( बांबे १८९१ ); संजाना-दि पहलवी व्हर्शन ऑफ दि अवेस्ता वेंदीदाद ( बॉंबे १८९५ ); भरूचा-कलेक्टेड संस्कृत रायटिंग्ज ऑफ दि पारशीज(बांबे १९०६); वेस्ट-कॅंटेंटस ऑफ दि नस्क; हॉग-एसेज ऑन दि पारशीज, लंडन १८८४; ब्राऊन-लिटररी हिस्टरी ऑफ पर्शिया, लंडन १९०२; संजाना--झरथुष्ट्र अँड झरथुस्ट्रियानिझम इन अवेस्ता ( लिपझिग १९०६ ); मनोहर विष्णू कायवटे-पार्शीचा इतिहास. ]

**झेनागा**—सेनागा उर्फ झेनागांनीं आपलें नांव सेनेगाल संस्थानास दिलें आहे ( सेनेगाल पहा ). ही बर्बेरांची पोटजात होय. यांनीं मोरोक्को, स्पेन, आल्जीरिया इत्यादि देशांस राजघराणीं दिलीं. बर्बेर भाषेची झेनागा म्हणून एक पोटभाषा आहे. ही दक्षिण मोरोक्कोमध्यें, तशीच दक्षिण सेनेगालमधील सिद्दी लोकांकडून बोलली जाते.

**झेनाटा**—मोरोक्कोमधील बर्बेर राष्ट्रांतील पोटजात. हे मूळचे अल्जीरिआमध्यें ओरस् प्रांत आहे तेथील असावेत. हे आपण अरब आहोंत असें म्हणतात. तथापि अरब लोक विशेषेंकरून इतिहासकार इब्न खालत हा-हे लोक गोलिआथ म्हणजे फोनिशिअन लोकांचे वंशज असावेत असें म्हणतो. यांचा पूर्वी एक मोठा राष्ट्रसंघ होता आणि बर्बेर ( पहा ) राष्ट्राच्या इतिहासांत झेनाटांचें कार्य मोठें होतें.

**झेनिद**, वि भा ग.—बंगाल. जेसोर जिल्ह्यांतील एक वायव्येकडील विभाग. उ. अ. २३° २२' ते २३° ४७' व पू. रे. ८८° ५७' ते ८९° २३'. क्षेत्रफळ ६१६ चौ. मै. लो. सं. ( १९११ ) ३६२५१८. या विभागांत कोटचांदपूर हा गांव व ८३४ खेडीं आहेत विभागाचें मुख्य ठिकाण झेनिद हें आहे. जमीन मळईची आहे. येथील हवा जिल्ह्यांतील हवेपेक्षां वाईट आहे. यांत झेनिद तालुका असून त्याचें क्षेत्रफळ १८४ चौ. मै. असून लो. सं. ( १९११ ) ८८२२९ आहे. तालुक्यांत २६२ खेडीं आहेत.

गांव.—बंगाल,जेसोर जिल्हा. झेनिद विभागाचें हें मुख्य ठिकाण असून जेसोरच्या उत्तरेस २८ मैलांवर आहे. लो. सं. ( १९०१ ) ७९८. उ. अ. २३° ३३' व पू. रे. ८९° ११'. येथें व्यापार बराच चालतो. ईस्टर्न-बंगाल स्टेट

रेलवेच्या चौडंग स्टेशनापासून या गांवास जाण्यास एक रस्ता आहे.

**झेनोफोन**—हा ग्रीक इतिहासकार व तत्त्ववेत्ता इ. स. पूर्वी ४३० मध्यें अथेन्स येथें जन्मला. लहानपणापासूनच तो साक्रेटिसाचा अनुयायी झाला. पुढें प्रॉक्झिनस नांवाच्या त्याच्या मित्रानें, इराणच्या दुसऱ्या अर्टाक्सर्क्सेसच्या विरुद्ध सायरस याच्या वतीनें लढण्यास बोलावल्यावरून तो तिकडे गेला. पुढें कुनाक्साच्या लढाईंत सायरस मारला गेला व त्याचप्रमाणें सर्व ग्रीक सेनानायकहि मारले गेले. त्यामुळें सैन्यानें झेनोफेनला आपला नायक केलें व त्यानेंच सर्व धोरण संभाळून सेना परत आणली. परत येतांना त्यानें एका इराणी सरदारास कैद करून आणलें; त्याबद्दल जो दंड त्याला मिळाला त्यानें तो बराच गबर झाला. अथेन्स विषयीं त्याच्या अंतःकरणांत बिलकुल सहानुभूति नव्हती. स्पार्टन लोकांच्या वतीनें तो अथेन्सच्या विरुद्ध लढल्याबद्दल त्याला हद्दपार करण्यांत आलें. स्पार्टन लोकांनीं त्याची सर्व व्यवस्था लाविली.

पुढें जेव्हां स्पार्टन व अथेन्स लोकांचें सख्य झालें तेव्हां त्याची शिक्षा रद्द करण्यांत आली, परंतु तो अथेन्सला गेला किंवा नाहीं याला सबळ प्रमाण नाहीं. त्याच्या मृत्यूचा काल नक्की सांगतां येत नाहीं. तरीपण तो इ. स. पू. ३५५ सालानंतरच वारला असला पाहिजे. झेनोफोनच्या ग्रंथांत 'सायरोपीडिया' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे यांत सायरस याच्या बालपणाचा व शिक्षणक्रमाचा वृत्तांत दिला आहे. यांत विशेषतः इराणच्या साम्राज्याचा आरंभ व सायरसचा यशस्वी जीवनवृत्तांत यांचा अंतर्भाव होतो. वस्तुतः पाहतां कर्त्यानें यांत आपले शिक्षणविषयक विचार नमूद केले आहेत. ते विचार सॉक्रेटीसच्या शिकवणीला व स्पार्टाच्या वाग्याला साजेसे असेच आहेत. शिवाय हेलेनिका, मेमोरॅबिलिया वगैरे त्याचे अनेक ग्रंथ आहेत.

**झेनोबिआ**—पॅल्मायराची राणी व प्राचीन काळांतील एक वीरस्त्री. सौंदर्य, पौरुष व अचाट बुद्धिमत्ता यांविषयीं ही प्रख्यात असून ओडेनेटसची ही पत्नी शोभत असे. नवऱ्याच्या मृत्यूनंतर ( इ. स. २६६–६७ ) पॅल्मायराला पूर्वेकडील रोमन साम्राज्याची मालकीण बनविण्याची तिनें महत्त्वाकांक्षा धरिली. मुलगा लहान असल्यानें राज्यसूत्रें तिच्याच हातीं होतीं इ. स. २७० त पॅल्मायरेनीजनीं ईजिप्त पादाक्रांत केला व आशिनामायनरमध्यें अॅन्सायरा ( गॅलेशिआ ) व चाल्सेडॉनपर्यंत मोहीम नेली. कांहीं दिवसपर्यंत झेनोबिआनें रोमन बादशहाचें मांडलिकत्व तसेंच राहूं दिलें होतें पण ऑरेलियनच्या कारकीर्दींत तें पार झुगारून दिल्यासारखें केलें. साम्राज्याच्या एकीवर झेनोबिआनें आणलेलें संकट ऑरेलियनानें तात्काल ओळखून पॅल्मायराचे ईजिप्त व आशियामायनरमधील प्रदेश जिंकून साम्राज्यास जोडले. राणीनें कांहीं वेळ टिकाव धरला.पण शेवटीं तिला ऑरेलियनला शरण जावें लागलें. बादशहानें तिला जीवदान देऊन मरेपावेतों टायवर येथें सामान्य रोमन स्त्रीप्रमाणें राहूं दिलें. हिच्याविषयीं अनेक आख्यायिका प्रचलित आहेत. ज्यू रॅब्बींनां ( आचार्य–कायदेपंडितांनां ) तिनें आश्रय दिल्याचा टालमडमध्यें उल्लेख आहे. झेनोबिआ ही एक अरब राणी होती अशाविषयीं अरब दंतकथा आहेत.

**झेप्पेलिन,काउंट फर्डिनंड व्हॉन**–(१८३८–१९१७) हा प्रसिद्ध जर्मन वैमानिक व संशोधक बेडनमधील कॉन्स्टन्स येथें जन्मला. त्यानें लष्करी शिक्षण घेतल्यानंतर आपल्या वयाच्या २०व्या वर्षी सैन्यांतील एक अधिकाराची जागा मिळविली. अमेरिकन सिव्हिल वॉरमध्यें फेडरल सैन्यामध्यें स्वयंसेवक या नात्यानें यानें काम केलें.पुढें १८६६ मध्यें ऑस्ट्रियन युद्धांत व १८७० च्या फ्रँको–जर्मन युद्धांत त्यानें भाग घेतला होता. या युद्धांत त्याला जनरलचा हुद्दा मिळाला. पण पुढें त्यानें सैन्यामधलि आपल्या जागेला रामराम ठोकून विमानविद्येकडे आपलें लक्ष्य पुरविलें. १९०० सालीं त्यानें एक हवेंत उडणारें जहाज बांधलें. हें जहाज हवेमध्यें २० मिनिटें उडत होतें पण जमिनीवर येतांना तें एकदम जमिनीवर आदळून मोडलें. पुढें १९०६ सालीं त्यानें अशाच प्रकारचें आणखी एक जहाज बांधून तासीं ३० मैल या वेगानें तें जहाज त्यानें हवेंतून चालविलें. १९०७ सालीं त्यानें पुन्हां या जहाजामध्यें सुधारणा केली,यापुढें त्यानें आपलें सर्व लक्ष या कामीं लावलें. महायुद्धाच्या अमदानींत त्याच्या उडत्या जहाजांनीं खळबळ करून सोडली. अशा प्रकारचीं उडतीं जहाजें त्यानेंच प्रथम तयार केल्यामुळें या जहाजांनां झेप्पेलिन हेंच नांव रुढ झालें. झेप्पेलिन १९१७ सालीं मार्च महिन्यांत चार्लोटेनबर्ग येथें मरण पावला.

**झे पे लि न.**—स्वस्थतेच्या काळांत एरोप्लेनचा फारसा उपयोग होत नाहीं. कारण जरी त्याची गति फार असली तरी त्यांत माणसें किंवा माल फारसा मावत नाहीं, आणि एंजिन नादुरुस्त झालें तर तें एकदम खालीं धडाडण्याचा संभव फारच असतो. शांततेच्या काळीं अतिशय उपयोगी असें एअरशिप विमानच आहे. एरोप्लेन व झेपेलिन यांत मुळांतच जमीनअस्मानाचा तफावत आहे. एरोप्लेन हवेपेक्षां जड असल्यामुळें एंजिन चालू आहे तोंवरच तें उडत राहतें. झेपेलिनचें तसें मुळीच नाहीं. झेपेलिन म्हणजे हैड्रोजन भरलेला एक अवाढव्य फुगा व त्याच्याखालीं बांधलेल्या भाड्यांत दहा वीस माणसें बसण्याची व्यवस्था केलेली असा प्रकार आहे. मात्र त्या माणसांच्या हातीं हैड्रोजनवायु पुन्हां पुन्हां भरण्याची व एरोप्लेनप्रमाणें स्क्रूचे पंखे लावून ते एंजिननें गरगर फिरते ठेवण्याची व्यवस्था केलेली असते. झेपेलिनची लांबी सुमारें एक फर्लांग असते.झेपेलिनच्या फुग्याची उंची पंचवीस ते पसतीस फूट म्हणजे सुमारें पक्के तीन चार पुरुष असते,व

त्याचा परीघ पाउणशें ते शंभर फूट असतो. हा अंतर्द्रव्य फुगा मुळींच कधीं न निमटणारा असा भक्कम व कडक करण्यांत आलेला असतो. हा कडकपणा आणण्याकरितां आंतून आल्युमिनिअम धातूचा सांगाडा बसवतात व त्या सांगाड्याला बाहेरून पातळ पण चिवट अशा वॉटरप्रूफ कापडानें मढवून काढतात. त्या सांगाड्याचे दोन भाग करून वरच्या अर्ध्या भागांत बारकीं बारकीं २०-२२ फुगलेलीं विमानें असतात. त्यात हैड्रोजन वायु भरलेला असतो. हीं निरनिराळीं विमानें करण्याचा हेतु असा कीं कदाचित एखादें दुसरें चुकून फुटलें तरी एकदम सारें अवजार खालीं धडाडूं नये. वीस वावीस लहान वलूनशिवाय पेट्रोलच्या थोरल्या टांक्याहि फुग्यांतच असतात. झेपेलिनच्या एका टोंकापासून दुसऱ्यापर्यंत म्हणजे नाकापासून शेवटापर्यंत माणसाला चालत जातां येण्यासारखा छोटासा साडेचार इंच रुंदीचा रस्ता फुग्यांत ठेवलेला असतो. त्यावरून जपून गेलें तर चांगली सोय होते. झेपेलिनच्या फुग्याच्या माथ्यावर भोंक ठेवून तेथें चवुतऱ्यावर तोफ सज्ज करून ठेवलेली असते तेथपर्यंत गोलंदाजांनां चढून जाण्याकरितां फुग्याच्या तळापासून माथ्यापर्यंत शिडीची योजना असते.

मुख्य यंत्रें व कप्तान वगैरे मंडळी यांची बसण्याची जागा फुग्याच्या बाहेरच असते. फुग्यापासून रेशमी दोरांनीं टांगलेल्या अशा दोन होड्या फुग्याच्या खालीं अंतराळीं लोंबकळत असतात. ती कप्तान, खलाशी आणि उतारू यांची जागा होय. पुढच्या बाजूला म्हणजे नाकाकडे जी होडी असते तींत झेपेलिनचा कप्तान बसतो व तेथून तो झेपेलिन आपल्या कब्जांत ठेवतो. त्याच्या हाताखालीं सुमारें बारा इसम मदतीला असतात. बॉंब फेंकणें, सुकाणू चलाविणें, खालीं बिनतारी संदेश पाठविणें वगैरे सर्व कामें हे इसम करतात. या पुढच्या होडीप्रमाणें शेपटाकडे दुसरी एक होडी टांगलेली असते. तिच्यांत एंजिनें चालू असतात. तीं एरोप्लेनप्रमाणें पंखे फिरवितात. त्यांच्या योगानें झेपेलिन दर तासास ६०-७० मैलप्रमाणें चालूं शकतें.

एरोप्लेनची गति तासास दीडशें दोनशें, तर झेपेलिनची ६०-७५ मैलांपेक्षां जास्ती होऊं शकत नाहीं; हें जरी खरें तरी एरोप्लेनपेक्षां झेपेलिनचा उपयोग शांततेच्या काळांत कितीतरी जास्त आहे. एरोप्लेनवर पराकाष्ठा दहा पंधरा माणसें राहतात तर झेपेलिनमधून शंभरांपर्यंत नेतां येतात. तसेंच एरोप्लेनपेक्षां झेपेलिन कितीतरी जास्ती सुरक्षित असतें. कारण एरोप्लेनचे पंखे बंद झाले, कीं तें खालीं धडाडलेंच पाहिजे, पण झेपेलिनचे पंख बंद झाले तरी हैड्रोजन गॅसमुळें तें आकाशांत खुशाल तरंगत राहूं शकतें. एरोप्लेनपेक्षां झेपेलिनच्या अंगीं काटकपणाहि जास्त असतो. एरोप्लेनपेक्षां झेपेलिनच्या अंगीं दुसरा असा गुण आहे कीं, तें हवेमध्यें एकदम उंच चढूं शकतें. एरोप्लेन सुरू झालें कीं, हळूहळू वर चढत चढत जाणार, पण झेपेलिनच्या आंतल्या हैड्रोजन वायूमुळें तें हवेमध्यें झटकन खूप वर चढून जातें. झेपेलिनचीं एंजिनें जरी थांबलीं तरी तें हवेंत तरंगत रहातें पाहिजे त्या दिशेकडे वर, खालीं, उजवी-डावीकडे-हवें तिकडे झेपेलिन नेतां येतें. आंत ५० ते १०० माणसांनां फर्स्टक्लाससारखी बसण्याची जागा, चहा व कॉफी, खाणें वगैरेसारख्या सोयी केलेल्या असतात. मोटार जमीनीवर जितकी सुरक्षित तितकेंच आकाशांत संचार करण्यास झेपेलिनहि सुरक्षित आहे. याप्रमाणें पक्ष्यासारखें खुशाल स्वस्थपणें आकाशामध्यें भराऱ्या मारण्याचें साधन केवळ झेपेलिनच असून तें मनुष्यानें साध्य केलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. [ ब्रिटानिका; मनोरंजन, पु. २५. ]

**झेब-उन्-निसा बेगम**—ही अवरंगझेबाची वडील मुलगी, ५ फेब्रुवारी १६३९साली जन्मली हिला फारशी आणि अरबी भाषाचें ज्ञान उत्तम असून, सबंध कुराण हिला पाठ असे. हिचें अक्षर उत्तम होतें. कुराणावरील झेब-उल् तफासीर नांवाची टीका हिनेंच लिहिलेली आहे. ही चांगली कवयित्री असून, तिनें फारशी भाषेंत दिवाण एक काव्याचा प्रकार ) रचिले आहेत. काव्यामध्यें हिनें आपलें नांव मख्फी ( अज्ञातवासी ) असें प्रसिद्ध केलें आहे. ही मरेपर्यंत अविवाहितच होती. हिचा मृत्यू सन १७०९ साली झाला. दिल्लीतील काबुली वेशीजवळ पूर्वी हिची कवर बांधली होती. परंतु राजपुताना-माळवा रेल्वेची सडक तिच्या कबरस्थानामधून गेल्यावेळीं तिचा नाश करण्यांत आला. झेबचा एक अकीलखान नांवाचा अवरंगझेबाच्या दरबारांतील सरदार प्रेमपात्र म्हणून त्यावेळीं प्रख्यात होता. झेब ही विद्वानांची चहाती असून अरबी तत्वज्ञानांत वाकबगार होती. मख्फी याचा खरा अर्थ गुप्त असा आहे. हिचें प्रेम तिचा भाऊ अकबर यावर फार असून हिनें त्याला त्याच्या ( बापाच्या विरुद्ध ) बंडांत अंतस्थ मदत केली होती. पुढें अकबराचें बंड मोडल्यावर त्याच्या गोटांत हिचीं स्वदस्तूरचीं पत्रें सांपडल्यानें हिला अवरंगझेबानें पकडून मरेपर्यंत सलीमगड येथें कैदेंत ठेवलें ( १६८१-१७०२ ) व तिचा वार्षिक तनखा ( चार लाखांचा ) जप्त केला, मात्र ती मेल्यावर अवरंगझेबास फार दुःख झालें.

हिची व संभाजीची एक प्रेमविषयक गोष्ट बखरकारांनीं दिली आहे परंतु ती अगदीं खोटी आहे. कारण एक तर ही संभाजी( शिवाजीचा पुत्र )पेक्षां अठरा वर्षांनीं मोठी होती. दुसरें,संभाजी ज्यावेळीं आग्र्यास गेला,,त्यावेळीं ती आग्र्यास ( दिल्ली सोडून ) असल्याचा नक्की पुरावा नाहीं, तिसरें, संभाजी पोरसवदा होता. पुढें संभाजी मोठा झाल्यावर तिची व त्याची दृष्टिभेटहि झाली नाहीं, कारण बाप दक्षिणेंत जरी वीस पंचवीस वर्षें होता, तरी ही दिल्लीकडेच उत्तरेंत होती, खालीं मुळीं आलीच नाहीं. हिनें शाहूचा प्रतिपाल मुलासारखा केला ही नुसती गप्प होय. कारण संभाजी वारल्यावर व शाहूस औरंगझेबानें पकडलें, तेव्हां तर ही कैदेंत

होती. सारांश, संभाजीची व हिची जी सांगड घालण्यांत येते, ती सर्वथैव खोटी आहे.

कदाचित् शिवाजी आग्र्यास गेला असतां त्याची कीर्ति तिच्या कानांवर गेली असेल व तिचें मन त्याच्यावर वसलें असेल आणि शिवाजी व झेब यांच्याबद्दल प्रेमविषयक गोष्टी उत्तरेकडे प्रचलित आहेत; मात्र शिवाजी या बाबतींत पूर्णपणें अलिप्त होता [ बील; मासिरी आलमगीर; जदुनाथ-अवरंगझेब; संभाजी महाराजांची बखर. ]

**झेब्रा**—घोड्यांच्या जातींतील कोणत्याहि पट्टे असणाऱ्या घोड्यांस हें नांव देण्यांत येतें. परंतु एक्यूअस नांवाच्या डोंगरांतील खऱ्या घोड्यांनांच हें नांव वास्तविक दिलें पाहिजे. केपकॉलनींतील डोंगराळ प्रदेशांत झेब्रा जातीचे घोडे असतात. परंतु सुधारलेल्या मनुष्यांचा त्याठिकाणीं संचार फार होऊं लागल्यामुळें ही जात दिवसेंदिवस कमीच होत गेली आहे. अँगोला येथें थोडे फार झेब्रा जातीचे घोडे आहेत. ऑरेंज नदीपासून आफ्रिकेच्या ईशान्येकडील कांहीं भागापर्यंत, बर्चेल नामक झेब्रा जात थोडीशी आहे.

एक्यूअस बर्चेल या उभय उपजातींत, एक्यूअस घोड्याचे कान मोठे असतात व त्याची आयाळ आखूड असून त्याच्या शेंपटीचे केंस कमी असतात. त्याच्या सर्व शरीराचा रंग पांढरा असतो व त्यावर काळे पट्टे असतात. हे पट्टे पायाच्या खुरापर्यंत व शेंपटीच्या टोंकापर्यंतहि असतात. पृष्ठभागावरील पट्टे, या दोन्ही उपजातींत परस्पराहून भिन्न असतात असें दिसतें.

बर्चेल झेब्रा अथवा बॉंटेक्वॅग्गा हा प्राणी मोठा व सशक्त असतो व त्याचे कान व शेंपूट लहान असून आयाळ मात्र मोठी असते. त्याच्या अंगाचा रंग पिंवळट व तपकिरी असा असतो परंतु त्याचे अवयव पांढरे असून पट्टे काळ्या रंगाचे असतात. त्याच्या पाठीवरील पट्टे, पोटाच्या मध्यभागीं मिळतात असें दिसतें. या घोड्याचे कान बिनपट्ट्याचे व पांढरे शुभ्र असतात. अॅबिसीनियन व सोमाली ग्रेव्ही झेब्रा नांवाच्या प्राण्यांचे कान फार लांब असून त्यांच्या अंगावर बरेच पट्टे असतात. बर्चेल झेब्रा अथवा क्वॅग्गा या घोड्याचें मांस खाणारे लोक असून त्याचें कातडेंहि उपयुक्त असतें. वाहनाच्या कामीं झेब्रास शिक्षण देण्याचे बरेच प्रयत्न करण्यांत आले व घोड्याप्रमाणें झेब्रास बसण्याच्या कामीं सराईत करण्याचेहि प्रयत्न थोडेफार यशस्वी झाले. परंतु झेब्रा हा म्हणावा तसा माणसाळला नाहीं ही गोष्ट मात्र खरी आहे.

**झेरबस्ट**—जर्मनींतील एक शहर. हें 'अन् हाल्ट'च्या डचीमध्यें आहे. या शहरांत एक रोलंड स्तंभ आहे. त्यावर एका अज्ञात 'लोणीविक्या मुली'चा पुतळा आहे. येथें एक म्युनिसिपल म्युझिअम आहे. हें शहर फार जुनें आहे. याचा ९४९ सालीं ग्रंथांत उल्लेख सांपडतो. येथील बीअर दारू सुप्रसिद्ध आहे.

**झेरिआ**—बंगाल इलाख्यांतील मानभूम जिल्ह्यांतील एक गांव. येथें कोळशाची खाण असून ती प्रथम इ. स. १८९३ मध्यें उघडली. तिचें उत्पन्न वाढत वाढत सन १९०६ मध्यें तिनें राणीगंज खाणीच्या पुढें अघाडी मारिली. तेव्हांपासून हल्लींपर्यंत सर्व बंगाल इलाख्यांत या खाणीची रास ( नंबर ), कोळशाच्या उपजेमध्यें पहिली आहे. प्रथम येथील कोळसा कमी दर्जाचा निघत असे, हल्लीं उत्तम प्रकारचा निघतो. सन १९२१ मध्यें बंगालमधून एकंदर ४२५९६४२ टन कोळसा निघाला, त्यापैकीं निम्म या खाणींतील होता. [इंपे. गॅ पु. १४; बंगाल अॅडमि. रिपोर्ट. सन १९२१-२२; ज्ञा. को. पु. ११. ]

**झेर्नोविट्झ**—हें शहर ऑस्ट्रियामधील बुकोव्हिना जहागिरी (डची) ची राजधानी आहे. हें व्हिएन्नाच्या पूर्वेस ४२० मैलांवर प्रूथ नदीच्या तीरीं वसलें आहे. त्याचा देखावा फार रमणीय आहे. १९१४ सालीं लोकसंख्या सुमारें ९५ हजार होती. ह्या शहराच्या मुख्य इमारती म्हटल्या म्हणजे जुन्या सेंट पीटर्सबर्गमधील आयझॅक देवालयाच्या धर्तीवर बांधलेलें ऑर्थोडाक्स पंथाचें ग्रीक देवालय, गॉथिक व रीनेसन्स अशा मिश्र पद्धतीनें बांधलेलें आर्मेनियन लोकांचें देवालय, जेसुइट लोकांचें देवालय व ज्यू लोकांचें मूर धर्तीवर बांधलेलें देवालय ह्या होत ह्याखेरीज ह्या शहरीं बायझंटाइन धर्तीवर बांधलेला, एक मोठा राजवाडा आहे. ह्यास त्यावरील असलेल्या उंच मनोऱ्यानें विशेष शोभा आली आहे. ह्या राजवाड्यांत एक भव्य सभागृह आहे. येथें फ्रॅन्सिस जोसेफ नांवाचें विद्यापीठ आहे. ह्याची स्थापना इ. स. १८७५ त झाली. १९१६-१७ सालीं ह्या विद्यापिठांत ६७ शिक्षक व ५०० वर विद्यार्थी होते. ह्या विद्यापिठांत जर्मन भाषेंतून शिक्षण देण्यांत येतें. ह्यांतील शिक्षणाच्या धर्मशास्त्र, कायदा व तत्त्वज्ञान अशा तीन शाखा आहेत. ह्या शहरीं लांकूड, लोंकर, गुरें, दारू वगैरेंचा व्यापार चालतो. येथें जर्मन, रूथेनियन, रुमानियन, पोल, ज्यू आर्मेनियन, जिप्सी इतक्या प्रकारचे लोक राहतात.

**झेलम**, जिल्हा.—पंजाब. रावळपिंडी भागांतील जिल्हा. क्षेत्रफळ २७६९ चौरस मैल. उ. अ. ३२° २७' ते ३३° १५' व पू. रे. ७२° ३२' ते ७३° ४८' यांवर हा वसला आहे. पश्चिमेस शाहपुर आणि अटक जिल्हे; उत्तरेस रावळपिंडी जिल्हा; ईशान्येस झेलम नदी व पलीकडे काश्मीर संस्थान; दक्षिणेस व आग्नेयीस शाहपुर आणि गुजराथ हे प्रांत आहेत. या जिल्ह्याच्या दक्षिणेस पूर्व पश्चिम पसरलेल्या दोन मिठाच्या डोंगराच्या ओळी असून त्यांची सरासरी समुद्रसपाटीपासून २५०० फूट उंची आहे. या जिल्ह्यांतील वनस्पती या डोंगराखेरीज पश्चिम पंजाबांतल्याप्रमाणेंच आहेत. कोल्हे, लांडगे वगैरे प्राणी या जिल्ह्यांत पुष्कळ आढळतात. येथील हवा विशेष चांगली असून डोंगरांतील हवा तर साधारण समशीतोष्णच आहे. परंतु इतर भागांत कडक उन्हाळा व हिंवाळा असतो. या भागांत सरासरी १६ इंचांपासून २४ इंचांपर्यंत पाऊस पडतो.


गांव डुक्कर.


जिराफ.
जिराफाची लांब जीभ.


रान डुक्कर.


झेब्रा


आच्छादन असणारें डुक्कर


डांस.

## बीजाचीवाढ











## मुळांचे प्रकार.









इतिहासः—या जिल्ह्यांतील प्राचीन इतिहासच विशेष मनोरंजक आहे. येथाले खान्या डोंगरांत पांडवांनीं आपल्या वनवासाचे दिवस घालविले अशी एक दंतकथा आहे व त्या डोंगरांतील प्रत्येक विवक्षित ठिकाणाशीं त्या पुराणांतील गोष्टींचा संबंध जोडण्यांत आला आहे. अलेक्झांडर आणि पोरस (पुरु या शब्दाचा अपभ्रंश ) यांचें युद्ध या जिल्ह्यांत किंवा जवळच कोठे तरी झालें असावें असा समज आहे. निश्चित जागेसंबंधानें एकमत झालेलें नाहीं. सर अलेक्झांडर कनिंगहॅम हा, हें युद्ध चिलियनवाला जवळील मोंग येथें झालें असावें असें समजतो. परंतु व्हिन्सेंट स्मिथ हा झेलम गांवाच्या ईशान्येस दहा मैलांवर हें रणांगण असावें असें म्हणतो. त्याचप्रमाणें अलेक्झांडर जलालपुराजवळ झेलम नदी उतरला असें कनिंगहॅमचें म्हणणें आहे. यावेळेपासून मुसुलमानी अंमल सुरू होईपर्यंत या जिल्ह्यासंबंधीं माहिती फारशी उपलब्ध नाही. तथापि जवळच्या शाहपुर जिल्ह्या-प्रमाणें या जिल्ह्याचा इतिहास असावा असें मानण्यास हरकत नाहीं.साल्ट रेंज व उत्तरेकडील पठारावर वस्ती करून असलेले जंजुआ आणि जाट लोक हे येथील पहिले असावेत. पैकीं जंजुआ हे खरे रजपूत व जाट लोक, त्यांच्यापासूनच झालेले परंतु त्यांहून कमी दर्जाचे आहेत. गखर आणि अवान लोक जे या भागांत आढळतात ते पश्चिमेकडून या भागावर ज्या स्वाऱ्या झाल्या त्यावेळीं आलेले असावेत. मुसुलमा-नांच्या प्रथम ज्या स्वाऱ्या या प्रांतात झाल्या त्यावेळीं गखर लोक या भागांत प्रबळ होते व हिंदुस्थानांत मुसुल-मानांचा शिरकाव झाल्यापासून बरीच वर्षे ते स्वतंत्र होते. मोंगलांच्या कारकीर्दींत हे त्या घराण्याचे राजनिष्ठ मांडलिक असत. परंतु मोंगलांची सत्ता नष्ट झाल्यावर या बाजूच्या इतर भागाप्रमाणें हाहि भाग शिखांनीं जिंकला. इ. स. १७६५ मध्यें गुजरसिंगानें शेवटच्या गखर राजाचा पराभव केला. पुढें इ. स. १८१० मध्यें रणजितसिंगानें गुजरसिंगाच्या मुलास जिंकून हा प्रदेश आपल्या मुलखांत सामील केला. शिखांच्या कारकीर्दींत गखर व अवान लोक मागें पडत चालले व हल्लीं खेड्यांतील पाटलापेक्षां जास्त मोठ्या जागा या लोकांकडे नाहींत.

इ. स. १८४९ मध्यें इतर मुलखावरोबर हा जिल्हा शिखांकडून ब्रिटिशांकडे आला. १८५७ सालीं झेलम येथील सैन्यानें बंड केलें होतें. इ. स. १९०४ मध्यें तळगंग तहशील या जिल्ह्यांतून काढून अटक जिल्ह्यांत सामील करण्यांत आली.या जिल्ह्यांत आठव्या नवव्या शतकांत बांधलेल्या देव-ळांचे अवशेष आहेत. येथील लोकसंख्या (१९२१) ४७७०८८ आहे. या जिल्ह्यांत तीन तहशिली आहेत. त्यांचीं नांवें झेलम, पिंडदादन खान आणि चकवाल.जिल्ह्याचें मुख्य ठिकाण झेलम आहे. या जिल्ह्यांतील मुसुलमानाची वस्ती शेकडा ८९ आहे. येथील लोकांत पश्चिमेकडील पंजाबी भाषा प्रचलित आहे. या जिल्ह्यांतील लागवड बहुतेक पावसावरच अवलंबून आहे. गहूं, हरभरा, जवस, गळिताचीं धान्यें, ज्वारी, बाजरी वगैरे पिकें मुख्य होत.



या जिल्ह्यांत २६० चौरस मैल सरकारसंरक्षित जंगल आहे. जंगलाचें उत्पन्न इ. स १९०४–५ त ८२००० रु. होतें. सॉल्ट रेंजमध्यें मीठ पुष्कळ सांपडतें. खेवरा आणि नूर-पूर येथील खाणींतून मीठ काढण्यांत येतें. त्याचप्रमाणें या डोंगरांत दगडी कोळसाहि पुष्कळ ठिकाणीं आहे. हल्लीं दोन खाणींतून कोळसा काढण्यांत येतो. जिप्सम नांवाचें खनिज द्रव्य याच डोंगरांत सांपडतें.

या जिल्ह्यात उद्योगधंदे फारसे चालत नाहींत. झेलम येथून पुष्कळ इमारती लाकूड व मीठ बाहेर जातें. झेलम आणि पिंडदादनखान येथें मोठा व्यापार चालतो. नॉर्थ वेस्टर्न रेल्वे या जिल्ह्याच्या पूर्वभागांतून जाते व याच रेल्वेचे कांहीं लहान लहान फाटे या जिल्ह्यांत आहेत.

इसवी सन १७८३ मधला चालिसा नांवाचा दुष्काळ या भागास बराच भोंवला. त्याचप्रमाणें इ. स. १८१३ व १८३४ सालच्या दुष्काळामुळें येथें बरेंच नुकसान झालें होतें. १८४८ सालीं या भागावर टोळधाड पडली होती. पुढें १८६०–६१, १८९६–९७ व १८९९–१९०० या सालच्या दुष्काळांपैकीं १८९९—१९०० सालाचा दुष्काळ जास्त उग्र होता. जिल्ह्याचा अधिकारी डेप्युटी कमिशनर असतो. १९०३–४ सालीं जमीनमहसुलाचें उत्पन्न ९८९ हजार असून एकंदर वसूल १३४७ हजार होता. या जिल्ह्यांत झेलम आणि पिंडदादनखान येथें म्युनसिपालिटया आहेत.

तहशील.—झेलम जिल्ह्यांतील एक तहशील. क्षेत्र-फळ ८८९ चौरस मैल. हिच्या पूर्वेस आणि आग्नेयीस झेलम नदी व पलीकडे काश्मीर आणि गुजराथ जिल्हा आहे. लोकसंख्या ( इ. स. १९२१ )१७३१२२. झेलम हें तहशि-लीचें मुख्य ठिकाण असून या तहशिलींत४३१ खेडीं आहेत. या तहशिलींतील रोहटास किल्ला इतिहासांत प्रसिद्ध आहे.

गांव.—झेलम जिल्ह्याचें व तहशिलीचें मुख्य ठिकाण. उ. अ. ३२°५६'व पू. रे. ७३° ४७'. झेलम नदीच्या दक्षिण तीरावर हा गांव असून नॉर्थ वेस्टर्न रेलवेचें हें स्टेशन आहे. लोकसंख्या ( इ. स. १९११ ) १९६७८. हल्लींचा गांव हा अर्वाचीन आहे. पूर्वीचा गांव अलेक्झांडरच्या वेळचा बुकेफाला गांव होय असें कनिंगहॅमचें म्हणणें आहे व तो गांव नदीच्या वामतीरावर बसला होता. शिखांच्या अमदानींत या गांवास फारसें महत्त्व नव्हतें. ब्रिटिश अंमल सुरु झाल्यापासून यास महत्त्व येत चाललें आहे. इ.स. १८६७ त येथें म्युनसिपालिटीची स्थापना झाली.

झेलम कालवा—पंजाब इलाख्यांतीळ झेलम नदी-वरील कालवा. गुजराथ, जिल्ह्यांतील मोंग रसूल गांवाजवळ झेलम नदीस ४१०० फूट लांबीचा बांध घातलेला आहे. मुख्य कालवा १४० फूट रुंदीचा आहे. या कालव्याखालीं एकंदर २४०० चौरस मैल जमीन असून [illegible] १९००

चौरस मैल जमीन भिजेल असा अंदाज आहे. यांपैकीं ८५० चौरस मैल जमीन सरकारी असून ती कांहीं शर्तीवर भाडेपट्टयानें देण्याचें ठरविलें आहे. तेथें झालेल्या वसाहतीस 'झेलम कालनी' म्हणतात. येथील जमीन क्षारयुक्त होऊं नये म्हणून फार बारकाईनें सर्व जमिनीची तपासणी करून पुष्कळ नियम केले आहेत.

तारीख ३० आक्टोबर १९०१ रोजीं हा कालवा सुरू झाला. त्यावेळीं त्याचें सर्व काम पुरें झालें नव्हतें. तें १९०८ सालीं बहुतेक संपलें. या कालव्याला खर्च १८ लाख रुपये झाला आहे. दरवर्षी ८१०००० एकर जमीन भिजून एकंदर रकमेवर सुमारें १९ टक्के दरसाल सुटतील असा अंदाज आहे.

**झेलम नदी**—काश्मीर व पंजाब प्रांतांतून वहात असणारी एक नदी. ज्या पांच नद्यांमुळें 'पंजाब' हें नांव पडलें आहे त्या पांच नद्यांतील ही अगदीं पश्चिमेकडील नदी होय. हिचें संस्कृत नांव वितस्ता असें असून अलेक्झांडरच्या इतिहासकारानें तिचा उल्लेख हिडस्पेस व टॉलेमीनें बिडस्पेस असा केलेला आहे; मुसलमानी इतिहासकार तिचा उल्लेख विहत, विहट अथवा विहतव या नांवानें करतात. हिचें काश्मिरी अर्वाचीन नांव वेथ असें आहे. वीरनाग नांवाच्या मोठ्या झऱ्यापासून हिचा उगम असून पंधरा मैल उत्तरेस वहात गेल्यावर तिला खानबलजवळ कांहीं ओढे मिळतात व या ठिकाणापर्यंत ही नदी जलमार्गास उपयोगी आहे. खानबलपासून बारमुळापर्यंत १०२मैल अंतर असून ही जलमार्गास उपयोगी आहे.

या नदीस पुष्कळ नद्या मिळतात. बारमुळाच्या खालीं किशनगंगा नदी या नदीस मिळेपर्यंत मध्यंतरीं जुने पूल पुष्कळ बांधलेले आहेत. किशनगंगा व ही नदी यांचा संगम झाल्यानंतर ही डोंगराळ प्रदेशांतून वहात असल्यामुळें जलमार्गास उपयोगी नाहीं तथापि लांकडें त्या नदीच्या प्रवाहांतून येऊं शकतात. काश्मीरचा बहुतेक व्यापार या नदीवर अवलंबून आहे. रावळपिंडी जिल्ह्यांतील कोहाळ गांवाजवळ या नदीवर एक लोंबता पूल असून त्यानें ब्रिटिश मुलूख व काश्मीर संस्थानांतील मुलूख जोडला आहे. रावळपिंडीच्या पूर्वेस ४० मैलांवर झेलम नदींत होड्या चालू शकतात. ही नदी झेलम जिल्ह्यांतील भागांतून वहात असतां कांहीं ठिकाणीं तिला पूर येऊन पुष्कळ भागांची नासाडी होते. पुढें ती झांग जिल्ह्यांत वहात जाऊन त्रिम्मूजवळ चिनाब व झेलम यांचा संगम होतो. हिची एकंदर लांबी ४५० मैल असून पैकीं सुमारें २०० मैल ब्रिटिश मुलुखांत आहे. झेलम व चिनाब या दोन नद्यांमधील प्रदेशास चज दुआब असें म्हणतात.

या नदीतीरावर श्रीनगर, झेलम, पिंडदादनखान, मिआनी, भेर आणि खुशाब हीं गांवें आहेत. अलेक्झांडर हा झेलम जिल्ह्यांतील जलालपुर गांवाजवळ ही नदी पार झाला होता असें कनिंगह्यामचें म्हणणें आहे; झेलमं गांवाजवळ तो ही नदी उतरला असेंहि कांहीं लेखक म्हणतात. खुशाव येथें नदीवर एक होड्यांचा पूल बांधलेला आहे. या नदीवर झेलम व हरणपुर येथें रेल्वेचे पूल झालेले आहेत. लोअर झेलम कालवा गुजराथ जिल्ह्यांतील मोंग रसूल गांवाजवळ निघतो.

**झेलम वसाहत**—पंजाब इलाखा; शाहपुर जिल्हा व तहशिलींत वसविलेली एक वसाहत. या वसाहतीकरितां योग्य अशी एकंदर ५०६००० एकर जमीन आहे, तीपैकीं १९२१ पर्यंत ४३९००० एकर जमीन देण्यांत आली होती. चिनाब वसाहत ज्या अटीवर वसविली आहे ( चिनाब पट्टा ) त्याच अटी येथील वसाहतवाल्यांस लागू आहेत. परंतु येथील कांहीं वसाहतवाल्यांनीं घोड्याच्या चांगल्या अवलादीपैकीं एक तरी पाळला पाहिजे व या अवलादीची संतति सरकार मागेल तर सवलतीच्या दरानें दिली पाहिजे अशीहि एक अट आहे. या भागांत रेल्वेच्या शाखा पसरत आहेत. सरघोदा हें या वसाहतीचें मुख्य शहर असून त्याची चांगली भरभराट आहे.

**झैदपूर**—संयुक्तप्रांत, बाराबंकी जिल्हा. नवाबगंज तहशिलींतील हें शहर लखनौ फैझाबाद सडकेवर असून याची लो. सं. १९११ सालीं ७३६३ होती. झैदपूर पंधराव्या शतकांत कोणी सय्यदानें स्थापन केल्याकारणानें हें सय्यदांचें माहेरघर होऊन बसलेलें आहे. या ठिकाणीं व्यापार बरा चालतो. हातमागावर कापसाचें कापड निघतें. येथें एक शाळा व दवाखाना हीं आहेत.

**झैनखान कोक**—हा अकबराचा दूधभाऊ असून याच्या बापाचें नांव ख्वाजा हिरो आणि आईचें नांव पिच्छा जान होतें. तिला अकबराची दाई म्हणून ठेवण्यांत आलें होतें. त्यामुळें त्याला कोक म्हणजे दुधभाऊ असें म्हणत. अकबरानें याला पांच हजारी मन्सबदार बनविलें होतें. ह्याची चुलत बहीण ही शहाजादा सलीम ( जहांगीर ) यास दिली होती. त्या दोघांचा मुलगा शहाजादा पखेज हा होय इ. स. १५८६ मध्यें झैनखानाच्या हाताखालीं मोठें सैन्य देऊन त्याला सवाद आणि बिजाऊर येथील अफगाणांनीं केलेलें बंड मोडण्यास अकबरानें पाठविलें असतां त्याचा पराभव झाला आणि राजा बिरबल, अरबबक्षी वगैरे मोठे सरदार आठ हजार सैन्यानिशीं मारले गेले. इ. स. १५८८ मध्यें त्याला काबूल येथें सुभेदार नेमण्यांत आलें. तो आग्रा येथें इ. स. १३०० मध्यें मरण पावला. तो अकबराच्या काळांत एक उत्तम तंतुवाद्य वाजविणारा होता.

**झैनाबादी महाल**—ही औरंगझेबाची एक बेगम होती. हिचें सौंदर्य पाहून औरंगझेब हिच्यावर इतका भाळला होता कीं तो एके समयीं हिच्या सांगण्यावरून दारू पिण्यास देखील तयार झाला होता. हिच्याविषयीं जास्त माहिती ज्ञानकोश भाग ९ मध्यें औरंगझेब या नांवाखालीं सांपडेल.

**झैनुल आबेदिन**—हा सुलतान शिकंदर याचा मुलगा असून काश्मीरच्या राज्यावर इ. स. १४२३ मध्यें, आपला भाऊ अलीशहा याचा पराभव करून गादीवर बसला. यानें आपल्या पूर्वीच्या राजांपेक्षां देशांत पुष्कळ सुधारणा केल्या. त्यानें पूल, किल्ले बांधले, गांवें वसविलीं व नवशहर येथें एक मोठा बारा मजली ( दरएक मजल्यांत ५० दालनें असलेला ) राजवाडा बांधला. त्यानें श्रीनगर ही राजधानी वाढवून तिची पुष्कळ सुधारणा केली. तो इ. स. १४७४ त ५२ वर्षे राज्य करून मरण पावला. त्याच्या मागून त्याचा मुलगा हैदरशहा गादीवर आला.

**झैमुख्त**—हिंदुस्थानच्या वायव्येकडील सरहद्दीवरील एक पठाण जात. हे लोक मजबूत व देखणे असतात. यांच्यांतील लढाऊ लोकांची संख्या तीन चार हजार आहे. मिरनझाई आणि कुरम या दोन दर्‍यांमध्यें यांचा भरणा आहे.

**झैसान**—रशियाच्या ताब्यांत असलेल्या मध्यआशिया-मधील सेमिपाला टिन्स्क प्रांतांतील एक गांव. लो. सं. ( १८९७ ) ४४७१. झैसान सरोवर आलताई आणि तारब्य-गताई यांच्यामध्यें १३५५ फूट उंचीवर गोड्या पाण्याचें सरोवर म्हणून प्रसिद्ध आहे. येथील मच्छीमार कोसाक आहेत. नोव्हेंबरपासून एप्रिलपर्यंत हें तळें थिजलेलें असतें.

**झोडगे**—मुंबई, नाशिक जिल्हा. मालेगांवच्या ईशान्येस १५ मैलांवर आग्रारोडवर सुमारें २ हजार लोकवस्तीचा हा गांव असून हें पूर्वी तालुक्याचें मुख्य ठिकाण होतें. येथें शंकराचें एक सुंदर हेमाडपंती देवालय असून त्यांत एक अस्पष्ट शिलालेख आहे. देवालयास लहानसें वर्षासन आहे.

**झोब जिल्हा**—बलुचिस्तान, ईशान्येकडील जिल्हा. याचें क्षेत्रफळ ९१२६ चौ. मै. आहे. याच्या उत्तरेस अफ-गाणिस्तान व वायव्यसरहद्दप्रांत असून पूर्वेस सुलेमान पर्व-ताची रांग गेलेली आहे. पश्चिम व दक्षिण सीमा क्वेटा-पिशिन व लोरालै या जिल्ह्यांनीं व्यापिल्या आहेत. जिल्ह्याचा मोठा भाग डोंगराळ प्रदेशानें व्याप्त असून दक्षिणेकडे झोब नदी मधून वाहत गेलेली आहे. डोंगरी रांगांत सुलेमान व टोनकाकर हे पर्वत असून टोनकाकर याला काकर खोरासान असेंहि म्हणतात. उन्हाळ्यांत पुष्कळ लोक या ठिकाणीं थंड हवेचें ठिकाण म्हणून येत असतात. दोन्ही पर्वतांची उंची समुद्रसपाटीपासून ११००० फूट आहे. जिल्ह्यांत झोब, कुंदर व गोमल या नद्या मुख्य असून यांना मिळणाऱ्या दुसऱ्या लहान नद्या पुष्कळ आहेत. वन्य पशूंत लांडगे व कोल्हे हे सर्वसाधारणपणें येतात. जंगली डुक्कर झोब नदीच्या प्रदेशांत आढळतें. जिल्ह्यांतील हवा कोरडी असून वादळें झाल्यास तीं जुलैपासून सप्टेंबर महिन्यांत होतात. एकंदरींत हवापाणी चांगलें असतें. झोब जिल्ह्याच्या दक्षिण भागांत उष्णता फार कमी असते परंतु पश्चिम भागांत उन्हा-ळ्यांत हवा थंडच असते. पावसाचें मान अतिशय कमी म्हणजे १० इंचांच्या वर नसतें.

इ ति हा स.—हुएनत्संग हा चिनी प्रवासी असें लिहितो कीं, सातव्या शतकांत अफगाण लोकांची वस्ती येथेंच होती व त्यायोगानें हिंदुस्थानच्या संपत्तीबद्दल व राज्याबद्दल त्यांना मत्सर वाटूं लागला. १३५८ सालीं तैमूरलंगचा नातु पीर महंमद हा झोबपर्यंत चढून हिंदुस्थानवर स्वारी करण्याचा विचार करीत होता. अहमदशहा दुराणीनें १८व्या शतकांत झोबचा बेकर नांक याजला सुभा ही पदवी देऊन काकर लोकांवर अंमल बसविण्याकरितां नेमला होता. सन १८७९त शहाजहान व दोस्त महंमद या दोघांनीं या प्रांतांत धुंडावा करून इंग्रज सरकारला फार त्रास दिला.

जिल्ह्यांत २७६ खेडीं असून महत्त्वाचें शहर एकच फोर्ट सँडीमन हें आहे. १९११ सालीं लो. सं. ७०३६६ असून यांत बहुतेक सर्व पठाण आहेत.

शे त की.—जिल्ह्याचा बहुतेक भाग पहाडी असल्यामुळें जमीन रेताड व लाल रंगाची असते. एकदां लागवड केल्यावर २।४ वर्षे जमीन पडीत टाकावी लागते तेव्हां ती दुसरें पीक देण्याच्या लायकीची होते. दोन पिकें काढण्याची चाल आहे. पावसाळ्यातलें पीक जूनमध्यें पेरणी करून डिसें-बरमध्यें काढितात व हिंवाळ्यांतलें पीक अक्टोबर महिन्यांत पेरून मे महिन्यांत कापणी करितात. गहूं हें मुख्य धान्य असून तांदूळ, मका हीं धान्यें त्या बरोबरीचीं म्हणतां येतील. जिल्ह्याच्या उत्तर भागांत बागबगीचे पुष्कळ असून साल दरसाल त्यांची संख्या वाढत्या प्रमाणांत आहे. शेतकरी वर्ग विवक्षित असा नसून निरनिराळ्या जातींचे लोक शेतकी करितात. झोब जिल्ह्यांत बैल व गुरें कमी असून घोडे जास्त आहेत. उंटहि फार उपयोगी जनावर असतें. बकऱ्यांचे तर कळपच्या कळप नजरेस पडतात. एकंदर क्षेत्रफळांत शेंकडा ७४ वलित असतें. वलितांचें साधन नद्यांना धरणें बांधून त्यांचे पाट न्यावयाचें हेंच होय. सन १८९४ पासून जंगल-खात्याचा बंदोबस्त चांगला झाला आहे. १८९४ पासून १९०० पर्यंत जंगलचें उत्पन्न २६०० रु. पर्यंत वाढलें असून खर्च सारा ९५३ झाला होता. सदर प्रदेश सुधारणाबाबतींत फार मागसलेला आहे. यामुळें घरगुती शिवणकाम बायकाहि करितात. कांहीं कारागीर गालिचे तयार करितात परंतु अशी संख्या फार थोडी म्हणतां येईल. बाहेरदेशीं पाठ-विण्याचे जिन्नस लोकर व तूप असून बाहेरून जिल्ह्यांत येणारे साखर, तांदूळ, कडधान्यें धातूंचीं भांडीं व तयार कापड इत्यादि जिन्नस होत. डेरा इस्माईलखान शहरशीं याचा व्यापार फार चालतो. थोडें फार मीठ येथें तयार होऊन अफगाणिस्तानांत जातें. पक्क्या सडकांची लांबी २७ मैल असून कच्च्या सडका ७६६ मैल लांब भरतील. १९००-१९०१ सालीं दुष्काळ फार जाणवला गेला. गुरें पुष्कळ मेलीं. दुष्काळाकडे ५७००० रुपये खर्च करण्यांत येऊन ३८२५ रुपये गुरें खरेदण्याकरितां सरकारांनीं कर्जाऊ दिले.

रा ज्य व्य व स्था.—एजन्सी प्रांतांपैकीं झोब जिल्हा असून यांजवर मुख्य अधिकारी पोलिटिकल एजंट आहे.याचे २ दोन पोटविभाग असून अ. पो. एजंट हा पो. एजंटाच्या हाताखालीं काम करणारा असून मदतगार एक्स्ट्रा अ. पो. एजंट नेमलेला असतो. प्रत्येक तालुक्यांत एक तहशीलदार कामदार असून एकाच कामदाराकडे दिवाणी फौजदारी कामें सोंपविलेलीं असतात व अपील कोर्ट अ. पो. एजंटाचें असतें. पो. एजंट जिल्हा व सेशन जज्ज असतो.

इंग्रजांच्या अंमलापूर्वी येथील लोक शेतावद्दल सारा वगैरे पैसा कांहीं देत नसत. कांहीं विवक्षित प्रसंगीं जमादाराला वकरें दिलें म्हणजे झालें. पुढें इंग्रजांनीं सारा बसविला व पिकाचा षष्ठांश घ्यावा ही पद्धत सुरू केली. अशा रीतीनें १९०३–०४ सालीं स्यांडिमन तहाशिलीचा वसूल १ लक्षपर्यंत आला व कुरणाचें उत्पन्न ३१०००रु. आलें. लष्करी फौजेच्या छावण्या इकडील प्रदेशांत जरूरीच्या आहेत.

१९०४ सालीं जिल्ह्यांत ४ प्राथमिक शाळा असून त्यांत एक मुलींची होती ७४ विद्यार्थी शिक्षण घेत होते. याच्या प्रीत्यर्थ खर्च १६८८ रुपये झाला. इकडील लोकांनां विद्येची अभिरुचि कमी आहे.त्यांत मशिदींतून मुल्ला लोक मुलें पढवितात हें निराळें. जिल्ह्यांत ४ दवाखाने असून त्यांत एक जनानी आहे. सर्दीच्या तापाची सांथ पुष्कळ असते व थंड प्रदेश असल्यानें ताप हा साधारण रोग समजला जातो. देवीच्या सांथींत देवी काढवून घेतात, एरव्हीं नाहीं.

**झोब नदी**—बलुचिस्तानमधील एक नदी; हिचा उगम पिशिनच्या पूर्वेस होऊन, गोमल नदीला मिळेपर्यंत हिची लांबी २४० मैल आहे. नदीच्या वरील भागांत दोहों-बाजूंच्या दरडी उंच असल्याकारणानें हिचा उपयोग पाट वगैरे काढण्याकडे होत नाहीं. नदीच्या खालील बाजूस समखवाल शहरापासून पुढें कांहीं ठिकाणीं धरणें वगैरे बांधून यंत्रसाहाय्यानें पाणी वर चढवून जमिनींची मशागत केली गेली आहे.

**झोला, एमिली एडवर्ड चार्लस अँटायनी** ( १८४०–१९०२ )—हा फ्रेंच कादंबरीकार पॅरिस येथें जन्मला. याचें शिक्षण प्रारंभीं ऐक्स येथें झालें. इ. स. १८१८ मध्यें तो पॅरिस येथें गेला; या पुढील काळ त्याला गरीबींत काढावा लागला; पण इ. स. १८६२ त त्याला कारकुनाची नोकरी लागली. याच सालीं यानें आपला लेखन व्यवसाय सुरू केला. कॉंटेस एनिन्टॅन नांवानें त्याचें पहिलें पुस्तक १८६४ सालीं प्रसिद्ध झालें. झोलाचा विचार कादंबऱ्या लिहून आपल्या कुटुंबाचा इतिहास त्यांत ग्रथित करावा असा होता व त्याप्रमाणें त्यानें तो लिहिण्यास प्रारंभ केला. झोलाच्या कादंबऱ्यांत स्वभाववैचित्र्य अतिशय सांपडतें. झोला हा वस्तुस्थितिदर्शक कादंबऱ्यांचा प्रणेता होता. याची भाषा सोपी, रसभरित किंवा ओजस्वी नाहीं. पण कथानकांतील प्रसंगांचें भेसूर चित्र रेखाटण्यांत झोलाचा हात कोणी धरूं शकणार नाहीं. एकोणिसाव्या शतकाच्या शेवटीं फ्रेंच राजकरणांत सामाजिक बाबतींत झोला याला महत्त्वाचा भाग घ्यावा लागल्यामुळें त्याला स्वदेश सोडून इंग्लंडचा आश्रय धरावा लागला. ड्रेफस प्रकरणावरून झोलाच्या धैर्याची चांगली खात्री पटते. तो १९०२ सालीं मरण पावला.

---

ञ        ञ        पृ. १

ञ—या वर्णाची पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार लेखांत ( इ. स. पू. ३ रें शतक ) दुसरी क्षत्रपवंशी राजा रुद्रदामाच्या गिरनार लेखांत ( इ. स. २ रें शतक ) व तिसरी अवस्था समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद येथील स्तंभावरील लेखांत ( इ. स. ४ थें शतक ) 'ञ्ज' या जोडाक्षरांत दृष्टीस पडते. [ भारतीत प्राचीन लिपिमाला. ]

ट—या वर्णाला आजचें रूप प्राप्त होण्यास तीन अवस्थांतून जावें लागलें. ट = ( ( ( ( 'न' च्या तीन अवस्था ज्या तीन स्थळीं दृष्टीस पडतात तेथेंच 'ट' च्याहि अवस्था दृष्टीस पडतील.

**टंकारी**—मुंबई. भडोच जिल्ह्यांतील बंदर. प्राचीन काळीं या बंदरांत माळव्याची अफू, जंबुसार व आमोद येथील धान्य व कापूस यांचा व्यापार चालत असे.

**टक्कर देश**—हुएनत्संगानें वर्णिलेला टेका देश म्हणजेच टक्कर होय. त्याची पूर्वीची राजधानी शाकल उर्फ शियालकोट असून एक माजी राजा मिहिरकुल नांवाचा होता, असें त्यानें म्हटलें आहे. हुएनत्संगकालीन त्याची राजधानी आणि टेका हें नांव, हीं दोन्हीं आज कोणत्या नांवानें प्रसिद्ध आहेत हें अद्याप समजलेलें नाहीं. तरी टेका म्हणजे चचनामा नामक अरबी ग्रंथांत ज्या लोकांनें टाक हें नांव आलें असून, पृथ्वीराजाच्या वेळचीं जी ३६ राजघराण्यांची यादी दिली आहे, तींत तक्षक किंवा टाक घराणें म्हणून जें आलें तेंच हें होय असें कित्येक म्हणतात. टॉड म्हणतो कीं, १३ व्या शतकांत टाक घराणें मुसुलमान बनून त्याचें ऐतिहासिक अस्तित्व नष्ट झालें. हें टेकाचें राज्य बरेंच विस्तृत होतें. मूलस्थानपुर (मुलतान) आणि पर्वत हीं लहान राज्यें टेकाच्या अंकित होतीं असें हुएनत्संगानें लिहिलें आहे. हे सर्व प्रांत बौद्ध धर्माचे फारसे पुरस्कर्ते नसल्यामुळें साहजिकच हिंदुधर्माचें त्यांत वर्चस्व होतें. मिहिरकुल राजा तर बौद्धधर्मीयांचा छळ करी. मुलतान येथें फार प्रसिद्ध असें सूर्याचें देऊळ असून तेथें हिंदुस्थानच्या सर्व भागांतून दर्शनास लोक येत असत. पंजाबकडील राज्यांत टेकांचेंच राज्य विशेष महत्त्वाचें असून तें काश्मीर आणि ठाणेश्वर यांच्या दरम्यान असल्यामुळें त्याला हर्षाचें वर्चस्व मान्य करावें लागलें असावें.

जेव्हां काश्मीराधिपति शंकरवर्म्यानें नवव्या शतकांत गुर्जराधिपति अलीखानाना पराभव केला तेव्हां अलीखानानें आपल्या राज्यापैकीं टक्क देश, जो त्याला जोवापलीकडे वाटत होता तो त्याला देऊन टाकिला. राजतरंगिणीच्या एका प्रतींतील टीकेंत हा टक्क म्हणजेच अटक नदीच्या कांठचा शकरद नांवाचा प्रांत होय असें म्हटलें आहे.

याच शंकरवर्म्याच्या कारकीर्दीत थक्किय म्हणून जें राज्य कल्हणानें (राजतरंगिणींत) सांगितलें आहे तें टाकचेंच राज्य कीं काय हें खात्रीनें सांगतां येत नाहीं. कनोजच्या भोज राजानें थक्कियधर हल्ला चढविला, त्यावेळीं काश्मीरच्या शंकरवर्म्यानें त्याला साह्य केलें, एवढाच काय तो उल्लेख टाक राज्याविषयीं सांपडतो. याशिवाय या संस्थानचे राजे व त्यांचा इतिहास कांहीं कळत नाहीं. हुएनत्संग सिंधप्रांतांत जाऊन परत फिरल्यावर मुलतानला आला, त्यावेळचें मुलतानचें त्यानें जें वर्णन केलें आहे त्यावरून टाकचें राज्य एकाकाळीं सिंधुनदीपर्यंत पसरलेलें असून मोठें बलाढ्य होतें एवढें मात्र स्पष्ट होतें. हुएनत्संग म्हणतो त्यावेळीं मुलतान व त्याप्रमाणें पोफातो नांवाचें दुसरेंहि एक राज्य टाक राज्याच्या अंकित होतें. [प्राचीन भारतवर्ष; वैद्य; हुएनत्संग-वॅटर्स]

**टका**—हा मूळचा हिंदी शब्द. याची किंमत निरनिराळी आढळते. एक रुपाया, चार आणे, एक आणा, तीन पैसे यांसहि टका म्हणत. टका म्हणजे कर. जसें घरटका, लग्नटका इत्यादि. जमीनमोजणींत १२० चौरस विघ्यांना टका म्हणतात. अतिशय स्वस्त या अर्थी टका शेर भाजी अशी म्हण आहे.

**टक्की**—अपरबर्मा. ही श्विबो जिल्ह्याची टाऊनशिप (तहसील) आहे. क्षे. फ. ५८८ मै. हिच्यांत ४५ खेडीं असून टक्की हें मुख्य ठिकाण आहे. लोकसंख्या १९११ सालीं ३४२०४ होती. जमीनीच्या साऱ्यांच व थथमिडचें उत्पन्न ५३,९०० रुपये आहे.

**टनब्रिजवेल्स**—हें इंग्लंडमधील एक म्युनिसिपलबरो आहे. ह्याचा बराच भाग केंट मधील टनब्रिज पार्लमेंटरी विभागांत असून कांहीं भाग ससेक्सच्या पूर्व विभागांत आहे. याची लोकसंख्या (१९०१) ३३,३७३ असून, लोहगुणात्मक झऱ्यामुळें याची विशेष प्रसिद्धि आहे. हें रमणीय अशा डोंगराळ प्रदेशांत वसलेलें आहे. गांवापासून एक मैलावर 'टोडरॉक' नांवाचा विचित्र आकाराचा दगड आहे. आरोग्यकारक अशा टनब्रिज विहिरींनीं ६० एकर जमीन व्यापिली आहे. येथें पेठ्या, खेळणीं वगैरे सामानांचा बराच व्यापार चालतो. इ. स. १६०६ त उडले (लॉर्ड नॉर्थ) यानें औषधी झरे शोधून काढल्यामुळें या गांवची भरभराट झाली. गादीवर बसण्याच्या पूर्वी ॲन राणी येथें रहात होती व त्यावेळपासून लंडनची बडी मंडळी येथें येत असत.

**टरपेल**—(इंग्रजी-'ऑईल ऑफ टरपेनटाईन') एक प्रकारच्या देवदाराच्या (संस्कृ. सरल; इंग्र. पाईन) झाडांपासून हें तेल काढितात. सुश्रुतादि जुन्या ग्रंथांतून जरी शुद्ध टरपेलासंबंधींची माहिती दिलेली नाहीं, तरी पंजाबमध्यें, पुष्कळ दिवसांपासून शुद्ध तेल तयार करितात. ह्या तेलास गंधाबिरोजाचें तेल, कापूरका तेल, इत्यादि लोकप्रचारांतील नांवें आहेत. झाडास फांसण्या टाकून त्यांतून तेलकट व घट्ट असा

जो चिकट पदार्थ निघतो त्यास गंधाबिरोजा असें म्हणतात. भट्टीच्या साहाय्यानें गंधाबिरोजापासून शुद्ध तेल वेगळें काढितात. शुद्ध टरपेलास कसलाहि रंग नसतो, तें अगदीं स्वच्छ अथवा पारदर्शक असून फारच ज्वालाग्राही पातळ तेल आहे, त्याला एक प्रकारचा तीव्र वास असून त्याची रुचि तिखट व गरम आहे; पाण्यांत अंशतः तें मिसळलें जातें; मद्यार्कांतहि साधारणपणेंच मिसळतें. तथापि उडून न जाणाऱ्या अशा सर्व तेलांत (गोडें तेल, खोबरेल, तिळाचें तेल यांत) तें मिसळलें जातें; चर्वी, राळ वगैरे पदार्थ टरपेलामध्यें विद्रुत होतात. त्याचें विशिष्ट गुरुत्व ०·८६ भरतें. हवेंत उघडें ठेविल्यास तें ऑक्सिजन ओढून घेऊन पिवळट व थोडेसें दाट होतें. तें शुद्ध असलें तर परीक्षा करण्याच्या दोन्ही प्रकारच्या कागदांचा मुळीच रंग बदलत नाहीं. ह्या तेलापासून अनेक औषधी कल्प तयार करितात.

भूतोन्मादापासून अगर दुसऱ्या कारणांपासून झटके येऊं लागले असतां, एकदम मनुष्य बेशुद्ध होतो तेव्हां, किंवा टरपेल पोटांत देणें शक्य नसेल तेव्हां, एक औंस टरपेल व १५ औंस कांजी मिसळून बस्ती देतात.

टरपेलमिश्र चोळण्याचें तेल.—मृदु साबण दोन औंस, कापूर एक औंस व टरपेल सोळा औंस घ्यावें. टरपेलांत प्रथम कापूर विद्रुत करून नंतर साबण मिसळावें व तें सर्व एकत्र मिसळेपर्यंत खलावें. हें तेल किंवा ह्यासारख्या दुसऱ्या प्रकारच्या टरपेलमिश्र तेलाच्या अंगीं उत्तेजक व स्फोटकर असे अत्यंत उपयुक्त धर्म आहेत, त्यामुळें त्यांचा उपयोग कमरेंतील वायु, संधिवायु, वातविकार, इत्यादि जीर्ण व वेदनायुक्त विकारांत फार चांगला होतो.

टरपेलाचें मलम.—टरपेल एक औंस, राळेची पूड साठ ग्रेन, पिवळें मेण व तयार केलेली चर्बी हीं प्रत्येकीं अर्धा औंस घ्यावी. पाण्याच्या वाफेवर तीं सर्व मिसळेपर्यंत भांडें ठेवावें. मिसळल्यावर भांडें उतरून गार होईपर्यंत हलवीत जावें. ह्या मलमाचा उपयोग जीर्ण व लौकर बऱ्या न होणाऱ्या अथवा घाणेरड्या क्षतांवर फार चांगला होतो.

राळ ( रेझीन ).—अशुद्ध टरपेलापासून शुद्ध टरपेल काढून घेतल्यावर जो घट्टसा भाग राहतो तीच राळ होय. राळ पिंवळसर असून अर्धवट पारदर्शक असते, व ती ठिसूळ असल्यामुळें तेव्हांच तिची पूड करतां येते. राळ फोडून पाहतां आंत चमक दिसते; रुची व गंध हीं कांहीं अंशीं टरपेलाप्रमाणेंच असतात. थोड्याशा उष्णतेनें राळ वितळते व तिची ज्वाला पिंवळी व दाट असून तीपासून धूरहि पुष्कळ निघतो. राळ पाण्यांत मिसळत नाहीं. वरोपचाराच्या कामीच फक्त राळेचा उपयोग करतात. राळ व मेण मिळून मलम तयार करतात; व तें अनेक वाईट व्रणावर लावितात.

गुणधर्म.—टरपेलाच्या अंगीं कुजण्याची, नासण्याची व सडण्याची क्रिया बंद ठेवण्याचे धर्म [ ॲन्टिसेप्टिक] आहेत. अर्थात् त्यामुळें ह्या क्रिया ज्या सूक्ष्म जीवांतून घडतात ते जीव मरून जातात. टरपेलाचे बरेच औषधी उपयोग आहेत. तें नेहमीं जवळ ठेवण्यालायक औषध आहे. [ भिषग्विलास पु. १४ पहा. ]

**टर्गो, ॲन रॉबर्ट जॅक्स** ( १७२७–१७८१ )—हा फ्रेंच मुत्सद्दी व अर्थशास्त्रज्ञ पॅरिसमध्यें १७२७ मे रोजीं जन्मला. त्याचा बाप मायकेल ईटीन टर्गो हा पॅरिसच्या व्यापाऱ्यांचा मुख्य अधिकारी होता. टर्गो हें जुनें नार्मन घराणें आहे. चर्चमध्यें नोकरी करण्याच्या उद्देशानें टर्गोचें शिक्षण होऊन १७४९ सालीं त्याचा त्या नोकरींत शिरकावहि झाला. पण त्याला अर्थशास्त्राची व कविता करण्याची फार आवड असे. १७५० सालीं चर्चची नोकरी त्यानें सोडून दिली. १७५२मध्यें तो पॅरिसच्या पार्लमेंटचा कौन्सिलर व स.१७५४ मध्यें चेंबर रायलचा सभासद झाला. १७५५-५६ सालीं गोर्नेबरोबर तो फ्रान्समधील प्रांतांची व्यापारीदृष्ट्या पाहणी करीत फिरला. स.१७६० मध्यें त्याची व्होल्टेयरबरोबर ओळख होऊन दृढ मैत्री जमली. याच सुमारास बऱ्याच निसर्गवादी विद्वानांशीं त्याचा परिचय झाला. तसेंच या सर्व काळांत त्यानें अनेक शास्त्र-शाखांचा व प्राचीन आणि अर्वाचीन भाषांचा अभ्यास चालविला होता. १७६० पर्यंतच्या काळांत त्यानें अनेक भाषांतरित लेख, निबंध आणि एन्सायक्लोपीडिया( ज्ञानकोशा )करतां व डिक्शनरी ट्रू कॉमर्स( व्यापारी कोशा )करितां निरनिराळ्या विषयांवर लेख लिहिले. स.१७६१ मध्यें त्याला लिमोगेस या अत्यंत गरीब व करांच्या ओझ्याखालीं अत्यंत वांकलेल्या प्रांताच अधिकारी नेमण्यांत आलें. निसर्गवादाचीं तत्त्वें त्याला पटलेलीं असल्यामुळें तीं या प्रांतांत लागू करण्याच्या कार्यास त्यानें प्रारंभ करून त्यानें सर्व जमीनीची पुन्हां पाहणी केली व शेतसारा सर्वांवर योग्य प्रमाणांत बसावेला, व सडका वगैरे बांधून त्या प्रांताची अनेक प्रकारें सुधारणा केली. अर्थशास्त्रीयदृष्ट्या तो व्यक्तिस्वातंत्र्य व अनिर्बंध चढाओढ या तत्त्वांचा पुरस्कर्ता व सरकारी नियंत्रणाच्या तत्त्वाचा विरोधी होता; याविषयीं तो मधून मधून लेखहि लिहीत असे. १८६० सालीं त्यानें कन्ट्रोलर-जनरलला उद्देशून पत्रें लिहिलीं. त्यांत त्यानें खुला व्यापार या तत्त्वाचें जोरदार समर्थन केलेलें आहे. ' संपत्तीच्या विभागणीसंबंधानें विचार' या अर्थाचें त्याचें पुस्तक सर्वांत प्रसिद्ध आहे. त्यांत जमीन हेंच संपत्तीचें एकटें साधन होय. ह्या कल्पनेच्या सिद्धांताचें अधिक विवेचन करून शेतीच्या निरनिराळ्या पद्धतींचा विकास कसा होत गेला याचें विवरण केलें आहे.

१७७४ जुलै मध्यें मरीनखात्याचा ( समुद्रावरील व्यापाराचें खातें )त्याला मिनिस्टर नेमण्यांत आलें व नंतर एक महिन्यानेंच कॅन्ट्रोलर जनरलची जागा त्याला दिली. त्यावेळीं सरकारी जमाखर्चाची अत्यंत भयंकर स्थिति झालेली होती. टर्गोनें सर्व खात्यांच्या खर्चांत काटकसर करण्याचें कडक धोरण स्वीकारलें.वाटेल त्याला सरकारी अधिकाराच्या

जागा व पेन्शनें देण्याचें बंद करण्याबद्दल राजाला सुचविलें. अंदाजपत्रकहि त्यानें व्यवस्थेशीर तयार केलें. त्यामुळें खर्चांतील तूट बरीच कमी झाली व सरकारची पत वाढून डच पेढीवाले ४ टक्के व्याजानें कर्ज देण्यासहि तयार झाले. नंतर त्यानें खुला धान्याचा व्यापार सुरू करण्याचें ठरविलें. पण मोठमोठ्या व्यापाऱ्यांचा त्यांत तोटा असल्यामुळें-व या व्यापाऱ्यांत कांहीं राजघराण्यांतलेहि असल्यामुळें-त्यांनीं टर्गोला जोराचा विरोध केला. लिंगेट व नेकर हेहि विरोधी पक्षांत होते. त्यांत १७७४ मध्यें दुष्काळ पडला व रोटीच्या किंमती वाढल्या, त्यामुळें दंगे झाले व राज्यक्रांतीचीं तेव्हांपासून पूर्व चिन्हें दिसूं लागलीं. तथापि ते दंगे टर्गोनें मोठ्या कुशल व निश्चयी धोरणानें मिटविले. १७७६ मध्यें त्यानें सहा राजाज्ञापत्रें तयार केलीं. त्यांपैकीं एकांत त्यानें क्लर्जी ( पाद्री ) वगैरे विशिष्ट हक्कदार वर्गाचे हक्क काढून घेऊन त्या सर्वांवर इतरांप्रमाणेंच कर बसविण्याचा निश्चय जाहीर केला. त्यामुळें सर्व अमीरउमराव व वडे हक्कदार लोक त्याचें शत्रुत्व करूं लागले. याप्रमाणें खुल्या व्यापाराच्या तत्त्वाबद्दल व्यापारी वर्ग, करांच्या सार्वत्रिक वसुलीबद्दल सरदारादि हक्कदार वर्ग, व धार्मिक स्वातंत्र्याबद्दल खुद्द राजा व राणी हीं टर्गोवर नाखुष झालीं. शिवाय इतर मंत्रिमंडळींहि टर्गोला सर्व सुधारणा एकदम व घाईघाईनें हातीं घेतल्याबद्दल दोष देऊं लागलीं. ही गोष्ट लक्षांत घेऊन राजाहि टर्गोच्या धोरणाला संमति देत नाहींसा झाला. या सर्व कारणांत मॉरेपस नांवाच्या दुसऱ्या एका मंत्र्याच्या मत्सराची भर पडून १७७६ मे रोजीं राजानें टर्गोला राजीनामा देण्यास भाग पाडलें. नोकरी सोडल्यावर अखेरपर्यंत तो पॅरिसमध्येंच राहिला, व १७८१ मार्च १८ रोजीं मरण पावला.

टर्गोचा स्वभाव साधा, न्यायी व सभ्य तऱ्हेचा होता. सत्य व न्याय या तत्त्वांचा तो फार चहाता होता. व्यवहारशून्य ध्येयवादी, सिद्धान्तप्रेमी अशीं निंदास्पद विशेषणेंहि त्याचे शत्रू त्याला लावीत असत. ' नैसर्गिक हक्क ', ' नैसर्गिक नियम ' हे शब्द त्याच्या लेखांत फार येतात हेंहि खरें आहे. त्याच्या जिवलग मित्रमंडळींनां त्याचा सहवास आनंदी व मौजेचा वाटत असे; पण अनोळखी परक्या इसमावरोबर तो मूक व तटस्थवृत्तीनें वागे, त्यामुळें तो गर्विष्ठ व भिडस्त असल्याचें भासत असे. इतरांनां गोडीनें आपल्या हाताखालीं वागवून घेण्याची कला तर त्याच्या अंगीं मुळींच नव्हती, इतकेंच काय पण खुद्द राजाला लिहिलेल्या पत्रांतहि त्याची भाषा एखाद्या रागीट पंतोजीसारखी असे.

तो बऱ्याच उच्च प्रतीचा मुत्सद्दी होता व त्या वेळच्या बऱ्याचशा सुधारणांचें श्रेय त्याला आहे यांत शंका नाहीं. सदरहू सुधारणांच्या मूळ कल्पना त्याच्या स्वतःच्या नाहींत, पण त्यांनां राज्यकारभारांत महत्त्वास चढविण्याचें काम त्यानें केलें हें खरें आहे. पार्लमेंटरी राज्यकारभारपद्धतीपेक्षां हुषार व विद्वान राजाचा अनियंत्रित राज्यकारभार अधिक हितावह होय असें त्याचें मत होतें. म्हणूनच स्टेट्स-जनरलची सभा भरविण्याच्या तो विरुद्ध होता. करांची समान विभागणी व हक्कदारी पद्धतीचें समूळ उच्चाटन या सुधारणांचा पुरस्कार त्यानें वड्या वड्या लोकांच्या रोषासहि न जुमानतां केला व त्या सुधारणा अमलांत आल्या असत्या तर १७८९ मधील भयंकर राज्यक्रांतीहि टळली असती असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**टर्नेट**—हें मलायाद्वीपसमूहांतील बेट हाल्महेराच्या पश्चिमेकडे आहे. याचें क्षेत्रफळ सुमारें २५ चौरस मैल आहे. हें बेट जवळ जवळ ज्वालामुखी (५४०० फूट) मय आहे. येथें अनेक वेळां ज्वालामुखीचे स्फोट झाले आहेत. या बेटावर ३००० लोकवस्तीचें टर्नेट नांवाचें लहान शहर आहे. येथील बंदर उत्तम आहे. टर्नेट व टिडोरच्या प्राचीन राज्यांवर टर्नेटच्या डच रेसिडेन्सीची हुकमत चालते. टर्नेट रेसिडेन्सीचें एकंदर क्षेत्रफळ १५५८०० चौरस मैल आहे. टर्नेटच्या भागांत व हाल्महेरा, वेशिअन, आणि ओबीबेटांत डच सरकारचा प्रत्यक्ष अंमल व इतर भागांवर टर्नेट व टिडोरच्या सुलतानांचा अम्मल आहे.

रेसिडेन्सीची एकंदर लोकसंख्या (१९०५) १०८४१५ होती. येथें मुसुलमानी धर्माचे मलायाजातीचे लोक राहतात. १८८५ पासून जायफळाची लागवड करण्यास सर्वांस मोकळीक देण्यांत आली आहे. जरी येथें यूरोपिअन लोकांची संख्या वाढली आहे, तरी आधुनिक कालांत ख्रिस्ती धर्माचा अगदीं ऱ्हास होत आहे.

**टॅव्हर्नियर**—जॉन बॅप्टिस्टा टॅव्हर्नियर हा एक फ्रेंच जव्हेरी असून तो सन १६४१–६८ पर्यंत हिंदुस्थानांत व्यापारानिमित्त प्रवास करीत होता. त्याच्या प्रवासवृत्तांत व्यापारी माहितीच फार आहे. स्वदेशास परत जातांना आफ्रिकेकडून तो गेला. सुरत, आग्रा या ठिकाणीं तो बहुधा राही. बंगाल, गुजराथ, पंजाब, मद्रास, कर्नाटक वगैरे हिंदुस्थानच्या सर्व भागांत तो हिंडला होता. अफगाणिस्तान व इराण या देशांतहि त्यानें प्रवास केला होता. गोवळकोंड्यास मीरजुम्ला कारभारी असतांना हा तेथें गेला होता. त्यानें स्वतःची गाडी ठेविली होती. गाडीबैलास ६०० रु. पर्यंत खर्च आला. रोजीं वीस कोस याप्रमाणें सतत दोन दोन महिने ते बैल प्रवास करीत. सुरतेहून आग्र्यास किंवा गोवळकोंड्यास याप्रमाणें गेल्यास चार दिवस पुरत व भाडें ४० ते ५० रु. पडे. प्रवासी रस्ते रोमन लोकांच्या रस्त्याप्रमाणें चांगले असत; मुसुलमानी राज्यांत जसें मांस विकत मिळे, तसें हिंदु राज्यांत मिळत नसे, त्यामुळें यूरोपियनांनां प्रवासांत अडचण पडे; त्यावेळीं टपालाचीहि व्यवस्था उत्तम असे. रस्तेलुटी होऊं नये म्हणून सरकारी व गांवकऱ्यांचा बंदोबस्त उत्तम असे, वगैरे बरीच माहिती त्यानें आपल्या पुस्तकांत दिलेली आहे. तो विद्वान नसल्यानें पैसा व व्यापार याशिवाय त्यानें फारसें लिहिलेलें नाहीं. हिंदुस्थानांत कोठें कोणते

जिन्नस उत्पन्न होतात त्यांच्या याद्या त्यानें दिल्या आहेत. याच्या पुस्तकाचें भाषांतर इंग्रजींत झालें आहे.अवरंगझेबाची मधलीच कारकीर्द व शिवाजीच्या कारकीर्दीचा थोडासा भाग याच्या या पुस्तकांत पहावयास सांपडतो. [ मुसुलमानी रियासत; जदुनाथ—शिवाजी ॲन्ड हिज टाईम्स; इंडियन ट्रॅव्हलर्स.]

**टॅसिटस कॉर्नेलिअस** ( ५५–१२० )—या रोमन इतिहासकाराचा सर्वकालीन ग्रंथकारांत वर नंबर लागतो. त्याचें पूर्ण चरित्र उपलब्ध नसून त्याच्या ग्रंथांवरून व लहान प्लीनीनें त्याला उद्देशून लिहिलेल्या पत्रांवरून याची थोडीबहुत माहिती मिळते. क्लॉडिअसच्या कारकीर्दीच्या अखेरीस हा जन्मला असावा. प्रीटर व कॉन्सल अशा अधिकारावर तो असून रोमन वकीलहि होता. टॅसिटस हा जूलियस ॲग्रिकोलाचा जांवई होता; या मोठ्या घराण्याशीं त्याचा संबंध आल्यामुळें तो लवकर प्रसिद्धीस आला. इ. स. ८९ च्या सुमारास त्यानें रोम सोडलें. तो चार वर्षे बाहेर होता. या कालांतच त्यानें जर्मनी देश व तेथील लोक यांसंबंधीं माहिती मिळविली असावी. नर्व्हा व इतर राजे यांच्याहि कारकीर्दींत त्याची बरीच प्रसिद्धि झाली.

इ. सनाच्या ३ऱ्या शतकांत टॅसिटस बादशहानें आपण टॅसिटस कॉर्नेलियस याचे वंशज आहों असें सांगितलें. यावरून आपणांस त्याची माहिती कळते.प्लीनीचें आपल्या मित्राच्या योग्यतेविषयीं फारच उच्च मत होतें. 'दि डायलॉग ऑन ओरेटर्स' (वक्त्यांविषयीं संभाषण), 'दि लाइफ ऑफ ॲग्रिकोला' (ॲग्रिकोलाचें चरित्र), 'दि जर्मनी,' 'दि हिस्टरीज' व 'दि ॲनल्स' हीं त्याचीं मुख्य पुस्तकें आहेत. टॅसिटसचीं हस्तलिखितें ' पाहिलें ' व ' दुसरें ' मेडिसीन या नांवानें प्रसिद्ध आहेत.

इतिहास लिहिण्याकरितां अवश्य असलेलें साहित्य टॅसिटस जवळ पुष्कळ होतें आणि त्याचा त्यानें योग्य उपयोग करून घेतला. त्यानें पहिल्या शतकांतील राज्याचें खरेखुरें उठावदार चित्र रेखाटलें आहे. त्या कालांत अलंकारिक भाषेचा बराच उपयोग होत असल्यामुळें राज्यकर्त्यांचा वाईटपणा दाखविण्यांत थोडीशी अतिशयोक्ति झाली असावी. परंतु त्यानें आपला इतिहास उच्च हेतूंनीं लिहिला यांत संशय नाहीं. तत्कालीन सामाजिक अधोगति त्याला कळून चुकली होती व या अधोगतीचें कारण बादशाही सत्ता होय असें त्याचें मत होतें; तरी पण त्याच्या राजकीय ध्येयासंबंधीं निश्चित मत देणें कठिण आहे. त्याचा राजकारणापेक्षां नीतिधर्माच्या बाबतींत अधिक संबंध येतो. त्याच्या स्वातंत्र्याच्या अगर लोकसत्तेच्या कल्पना कितीहि उच्च असल्या तरी व्यावहारिकदृष्ट्या साम्राज्य आवश्यक आहे व त्यापासून प्रांताचा फायदा होतो असें त्याचें मत होतें. वास्तविक पहातां त्याला राजकारणपटु म्हणण्यापेक्षां नीतिशास्त्रज्ञ म्हणणें अधिक बरें.

आपल्या धार्मिक मतासंबंधीं तो कांहींच निश्चित सांगत नसे. त्याचे ज्योतिष, शकुन यांसंबंधीं कांहीं दृढ समज होते. एकंदरींत प्रत्येक मनुष्याचें आयुष्य त्याच्या जन्मापासून निश्चित झालें असतें, असें त्याचें मत होतें. त्याची भाषा अभ्यासी वाचकावर छाप पाडणारी असून आटपशीर आहे. टॅसिटस हा लोकप्रिय लेखक नसून त्याचे ग्रंथ समजण्याकरितां ते वारंवार वाचावे लागतात. कारण कित्येक महत्वाचे मुद्दे वरवर वाचणाराच्या लक्षांत लवकर येत नाहींत.

**टस्कुलम्**—इटलीमध्यें लॅटिअम् प्रांतांतील हें जुनें शहर आहे. हें शहर आलबन या ज्वालामुखी पर्वतावर वसलेलें असल्यामुळें आसपासचा सर्व प्रदेश या शहरापासून सहज नजरेस पडतो. या शहरापासून लाटिना मार्गें रोमला एक रस्ता जातो.

टेलेगोनस यानें हें शहर वसविलें अशी दंतकथा आहे. आक्टेव्हिअस मॅमिलस यानें लॅटिन संघाची स्थापना केल्यावर ख्रि. पू. ४९७ वर्षीं टस्कुलम्च्या लोकांचें रोमशीं युद्ध झालें व त्यांत मॅमिलस मारला जाऊन लॅटिन शहरावर रोमचा पगडा बसला. पुढें ख्रि. पू. ३८१ सालापर्यंत येथील लोक रोमशीं भांडत होते परंतु या सालीं टस्कुलम् येथील लोक रोमला शरण आले व त्यानंतर येथें स्थानिक स्वराज्यसंस्था स्थापल्या गेल्या. प्रजासत्ताक राजाच्या अखेर व साम्राज्याच्या कालांत टस्कुलम् येथें मोठमोठे श्रीमान् रोमन लोक रहात असत. सिसिरोच्या वेळेपर्यंत तेथें मोठालीं उद्यानगृहें होतीं. येथील इमारतींचे पुष्कळ अवशेष आहेत.

आलबन टेंकडीवर कांहीं नाटकगृहें, रंगशाळा व त्यांमध्यें एक न्यायमंदिर इत्यादि इमारतींचे अवशेष दिसतात. ११९१ सालापर्यंत येथें एक किल्ला होता. त्याचे अवशेष अद्याप दृष्टीस पडतात.

टस्कुलम् शहर व आसपासचा प्रांत यांमध्यें ' सिसिरो ' रहात होता व तेथें त्यानें टस्कुलम् डिस्प्यूटेशन्स व इतर तत्त्वज्ञानांवरील पुस्तकें लिहिलीं आहेत. टस्कुलम येथें सिसिरोचीं " लिसिअम " व ॲकेडमी " नांवाचीं दोन उपवनगृहें होतीं. त्यामध्यें नक्षीदार कलेचीं कामें होतीं.

साम्राज्याच्या काळानंतर जेव्हां राजधानी कान्स्टांटिनोपल येथें गेली,तेव्हांपासून टस्कुलम एक महत्वाचें ठाणें झालें होतें परंतु बाराव्या शतकांत टस्कुलम व रोम यांमध्यें अव्याहत झगडे झाले व शतकाच्या अखेर ११९१ त या रोमला जर्मन बादशहा मिळून त्यानें टस्कुलम् जमीनदोस्त केलें.

**टांकणखार**—याचीं नांवें:–सोहागा, टिंकाळ, अनावेदी, कुडियाखार, टांकणखार, बेंकारम, वेलिगारम, विलिगारू, लखिया, व्हस्वत, टांकण, टिंकर किंवा टांकर इत्यादि आहेत. पंजाबच्या सरहद्दीवरील कांहीं प्रांतांत व तिबेटांत यासच ' तासल ' किंवा साल ( शाळ ) असेंहि म्हणतात.

इतिहास.—संस्कृत ग्रंथकर्त्यांस या पदार्थाचें ज्ञान असावें. सुश्रुतानें याचा उल्लेख केला आहे. संस्कृतापासूनच

फारशी, व सर्व हिंदुस्थानांतील एतद्देशीय भाषेतील शब्दांची ( त्याचप्रमाणें टिंकल् ह्या इंग्रजी शब्दाची ) उत्पत्ति असली पाहिजे अबुल फाजल यानें ऐने ई-अकबरींत याचा टंगर म्हणून उल्लेख केला आहे. तिबेटांतील कांहीं सरोवरांच्या कांठीं, इराण व चीनमध्यें हें सांपडतें. काश्मीर येथील लडखच्या पुगा खोऱ्यांत कढत पाण्याच्या झऱ्यानजीक गंधकावरांवर टांकणखारहि सांपडतो. हिंदुस्थानांतील क्षेत्र पुगापासून पूर्वेकडे रडोखोच्या सरोवरापर्यंत पसरलें आहे.ल्हासाच्या दक्षिणेस यमडोक्खो येथें बोराक्स आढळतो तार्तरींतील ओसाड भागांत खळगे करतात व त्यांत टिंकल जमतो असें म्हणतात. पुगाचा माल कुलूकडून हिंदुस्थानांत येतो व सुलतानपुर येथें तो शुद्ध झाल्यानंतर मंडीभाजीवरून सिमल्यास जातो, किंवा समुद्रावरून जगाध्रि येथें रवाना होतो. तिबेटांतील ' टिंकल ' संयुक्तप्रांताच्या सरहद्दीवरून हिंदुस्थानांत येतो.

उ प यो ग.—टांकणखार हा रंगबंधकारक आहे. हा, अपचन, अग्निमांद्य व चर्मरोग इत्यादि विकारांवर गुणकारी आहे. याच्या अंगीं कोथघ्न कृमिनाशक गुण आहेत. घरगुती-कामाकरितां तर याचा फारच उपयोग होतो. साबण किंवा सोडा यांच्या ऐवजीं टांकणखारानें कपडे धुतल्यास रंग खराब होत नाहीं व इस्तरी करण्याच्या खळींत टाकल्यास इस्तरी चकचकीत होते. हा मांस नासूं देत नाहीं.

सर्वांत महत्वाचा उपयोग म्हटला म्हणजे मातीच्या भांड्यांस गिल्हई देण्याकरितां व घड्याळांच्या तबकड्या किंवा त्या सारख्या दुसऱ्या धातुकामाला रोगण अथवा " एनॅमल " देण्याकरितां होतो. कमी उष्णमानाला वितळणारी कांच करण्याकरितां टांकणखाराचा उपयोग होतो. व अशा कांचेनें नेहमीच्या कांचेवर नक्षीकाम करतां येतें. परंतु तें काम टिकाऊ मात्र नसतें. कारण वितळल्यानें टांकणखार जलरहित झालेला असतो, तो तसाच न राहतां कांहीं कालानें पाणी शोषून घेतो; व त्यामुळें कांचेला भेगा पडतात. साबणांत व अंगरागांत हा घालतात. मेणाचें व याचें मिश्रण करून नंतर त्याची मेणबत्ती तयार करतात.

व्या पा र.—कॅलिफोर्निआ व नेवाडा येथें याचा प्रचंड सांठा सांपडल्यामुळें, व इटलींत टांकणखारच्या फुलाचे व ( धुण्याच्या ) सोड्याचे कारखाने निघाल्यामुळे परदेशांतून यांस कमी मागणी येऊं लागली आहे.

१९०६–७ सालीं ५६९३ हंड्रे ( किं. ११५३०० रु. ) टांकणखार परदेशीं गेला. परंतु आंतरदेशीय खपात मुळींच कमतरता पडली नाहीं. १९०६–७ सालीं खुष्कीच्या मार्गानें झालेली आयात ३१५०६ हं. ( किं. २६०८६४ रु.) होती. त्याच सालीं ग्रेटब्रिटनहून २७९८ हं. ( किं. ३७०३९ रु. ) ची आयात झाली होती. [ नाट ]

**टांक तहशील**—वायव्यसरहद्दप्रांतांत डेराइस्मायलखान जिल्ह्याचा पोटविभाग व तहशील. क्षे.फ ६३८ चौ.मै. हिच्या पश्चिमेस वझिरीस्तान असून तें जिल्ह्याच्या वायव्य कोपऱ्यांत सुलेमान पर्वताच्या पायथ्याशीं आहे. मुलुख नापीक असल्यामुळें पुष्कळ दिवसपर्यंत त्यांत वस्ती नव्हती. अखेर पश्चिमेकडील डोंगराळ भागांत रहाणाऱ्या पठाण लोकांनीं त्यांत वसाहत केली. पूर्वीं ही तहशिल एक निम-स्वतंत्र संस्थान असून तेथील नवाब दौलतखेल टोळीपैकीं कतिखेल जातीचे होते. दौलतखानपासून अठ्ठाविसावा व शेवटला नवाब १८८२ सालीं मरण पावला व त्याच्या मरणापूर्वींच सर्व संस्थानचा कारभार इंग्रजांनीं आपणाकडे घेतला. तहशिलीची लो. सं. १९११ मध्यें ४७५०० होती. तिचें मुख्य ठिकाण टांक हें आहे इतर खेड्यांची संख्या ७१. खुद्द टांक गांवची लो सं. ( १९११ ) ५०५० आहे.

**टाकळ**—या झाडास संस्कृतमध्यें अग्निमंथ, मराठींत टाकळा, आरणी किंवा ऐरण, गुजराथींत अरणी, हिंदींत गनिअरि इत्यादि नांवें आहेत. टाकळींत ल्हान व मोठी अशा दोन जाती असून पांढरी व काळी अशाहि दोन जाती आहेत. लहान जातीचें झाड पुरुष दोन पुरुष उंच वाढतें; मोठ्या जातीचें झाड त्यापेक्षां बरेंच उंच होतें. टाकळीचीं पानें कात्रेदार असून तीं नरवेलाच्या पानांहून लहान असतात टाकळीच्या फुलांचा बहार येतो त्यावेळीं त्या फुलांवरून आलेली वायूची झुळक सुगंधी व आल्हादकर असते. कोंकणापेक्षां देशावर हीं झाडें फार होतात. काळ्या टाकळीच्या फळाचें तेल काढतात. आर्यवैद्यकांतील दशमूळांत हिचें मूळ असतें. पक्षघात, संधिवात, व सूजयांवर काळ्या टाकळीच्या मुळांचें तेल काढून लावितात.

**टाकळ घाट**—मध्यप्रांत, जिल्हा नागपूर, तहशिल नागपुर. कृष्णा नदीतीरीं नागपुरच्या नैर्ऋत्येस १९ मैलांवर व बोरी स्टेशनपासून चार मैलांवर हें एक खेडेगांव आहे. गांव फार लहान आहे. पण या गांवाजवळ सुमारें ५ एकर जमिनींत मातीचे उंचवटे व दगडाचीं वर्तुळें असून त्यांतून मडक्यांचे तुकडे, दगडी भाल्यांचीं टोंकें आणि कांहीं लोखंडी सामान खणून काढलें आहे. तें फार प्राचीन आहे.

**टाकळा**—हें एक जंगली झाड आहे. ह्यास लॅटिन मध्यें कॅसिआटोर, संस्कृतामध्यें चक्रमर्द, दद्रुघ्न, मराठींत टाकळा किंवा तरवटा, वगैरे नांवें आहेत. हें झाड शेताच्या ओसाड बांधावर अथवा परसांतील पडीत व ओसाड जागेंत पावसाळ्यांत पुष्कळ वाढलेलें आढळतें. त्याच्या पाल्याची औषधी भाजी करतात. वातानें अंग व सांधे दुखतात त्यावर ही भाजी गुणकारी आहे असें म्हणतात. टाकळ्याचा रस अंगावर निघा उठल्यास त्यावर लावितात तेणेंकरून निघा लवकर बरा होतो त्याचप्रमाणें तो रस गाई म्हशींच्या लहान वांसरांस दूध पाजून तीं पांढरें हगतात, त्यावेळीं त्यांस सुमारें अदपाव असा एक दोन दिवस पाजला असतां तीं बरीं होतात. टाकळ्यास पिंवळीं फुलें

येऊन चवळीसारख्या शेंगा येतात. ह्या झाडास मेथ्यासारखें बीं येतें तें भाजून त्याची भुकटी कॉफीप्रमाणें वित्येक लोक उपयोगांत आणितात म्हणून त्या बियास "इंडियन काफी" असेंहि म्हणतात.

**टाकळी**—समर्थ रामदास स्वामींचे पहिले शिष्य जे उद्धव गोसावी, त्यांच्या मठाचा व समाधीचा गांव. येथें समर्थांनीं १२ वर्षें पुरश्चरण केलें म्हणतात. हा गांव गोदावरीच्या कांठीं नाशकापासून सुमारें १ कोसावर आहे.

**टाकळी बुद्रुक**—मुंबई, पूर्वखानदेश. पाचोरे तालुक्यांत कजगांव रेलवे स्टेशनपासून आग्नेयीस ३ मैलांवर असून येथें एक महादेवाचें देऊळ आहे. तें टमडेऱ्यांच्या दिवाणानें १७८० च्या सुमारास बांधलें असें म्हणतात.

**टाकी** ( उत्तर पंजाब )—ह्यांत शिकंदर व बुद्ध यांच्या संबंधानें प्रसिद्ध व दंतकथांमुळेंहि प्रसिद्ध अशीं पुष्कळ शहरें येतात. तीं, निरनिराळ्या दुआबांतलीं, पुढें दिल्याप्रमाणें आहेत.

| | | | |
|---|---|---|---|
| सिंधसागर | १ जोवनाथनगर | किंवा | भेडा. |
| | २ बुकेफाला | ” | दिलावर |
| चाज | ३ निकिआ | ” | मांग |
| | ४ गुजराथ | | |
| रिचना | ५ शाकल | ” | संगल |
| | ६ टाकी | ” | अशरूर |
| | ७ नरसिंघ | ” | रानशी |
| | ८ अमाकाटीस | ” | अंबाकाणी |
| बारी | ९ लोहावर | ” | लाहोर |
| | १० कुशावर | ” | कुसूर |
| | ११ चिनापटी | ” | पटी |

**टाकी** ( अशरूर )—इ. स. ६३३ मध्यें ही टाकीची ( पंजाबची ) राजधानी होती. लाहोर आणि पिंडी-भाटीआन यांमधील मोठ्या रस्त्याच्या दक्षिणेस २ मैलांवर ही आहे. हल्लीं येथें फक्त सुमारें ५० घरें आहेत. लोक म्हणतात कीं, यास पूर्वी उद किंवा उदनगर म्हणत असत. तें पुष्कळ शतकें लोकांनीं सोडिलें होतें. पुढें अकबराच्या वेळेस उगरशहानें येथें एक मशीद बांधिली. येथें हल्लीं जुन्या इमारती इत्यादिकांचे अवशेष पुष्कळ आहेत. येथें १८ इंच लांब, १० इंच रुंद व ३ इंच जाड एवढ्याला विटा कनिंगह्यॅमला पुष्कळ सांपडल्या. येथें इंडो सिथियन राजांचीं नाणीं सांपडतात, ह्यावरून हें फार प्राचीन असावें. हुएनत्संगच्या वेळीं येथें बौद्धधर्मापेक्षां वैदिक धर्माचें विशेष प्राबल्य असे. [ प्राचीन भारतभूदर्शन; कनिंगह्याम. ]

**टाँगकिंग**—(टांकिन) फ्रेंच इंडो-चायनामधील विभाग. उ.अ. २०° व २३½' आणि पू. रे. १०२° व १०८½' यांच्या दरम्यान आहे. टाँगकिंग हें एक फ्रान्सचें संरक्षित संस्थान आहे. याच्या उत्तरेस, वांगटंग, वांग-सि, यूनन वगैरे चिनी प्रांत; पश्चिमेस लायस; दक्षिणेस आनाम आणि पूर्वेस टाँगकिंगचें आखात आहे. एकंदर लोकसंख्या ( १९१४ ) ६११९७२० असून त्यांपैकीं सुमारें ३३००० चिनी व ६००० यूरोपियन आहेत. बहुतेक वस्ती "अनामी" लोकांची आहे. कांहीं रानटी जाती—(उदा. मौंग, थो, थाइविन्न वगैरे ) उत्तरेकडील भागांत आढळतात. येथील हवा युरोपियनांस मानवेल अशीच आहे.

तांदूळ, कॉफी, तंबाखू, रॅमी, कागदी झाड ( पेपर ट्री ), कापूस, ताग, ऊंस वगैरेंची लागवड संस्थानांत होते. तांदुळाच्या लागवडीला विशेष महत्त्व देण्यांत येतें. अलीकडे रेशमी किडयांच्या वाढीच्या धंद्याला बरेंच महत्त्व येऊं लागलें आहे. सोनें, तांबें, जस्त, शिसें वगैरे धातूंच्या खाणी आढळतात. खाणी-काम अल्पप्रमाणांत चालतें. धान्य, दारू, कापड, पेट्रोलियम, कांचसामान, कागद, कमावलेलीं कातडीं, हत्यारें, दारूगोळा वगैरे ३५।३६ लक्ष पौंड किंमतीचा माल परदेशाहून येतो. तांदूळ, रबर, ताग वगैरे सुमारें १५ लाख पौंड किंमतीचा माल बाहेरदेशीं रवाना होतो. कांहीं ठिकाणीं ( उदा. हनाय, हायफांग, नामडिन्न ) सुताच्या गिरण्या आहेत. या प्रदेशांत कागदकारखान्यास विशेष महत्त्व आहे. मुलामा देणें, जडावाचें काम करणें, वगैरेसंबंधीं, येथील रहिवाशी फार कुशल आहेत. हांगकांग व युन्नान यांमधील टाँगकिंगच्या मार्गानें चालणारा देवघेवीचा व्यापार फार महत्त्वाचा आहे. व्यापार प्रायः चिनी लोकांच्या हातीं आहे. येथील नदी "सॉंग-कोई" फार महत्त्वाची असून तीवरूनच मालाची ने आण होते.

इ ति हा स.—टाँगकिंगचा पूर्वइतिहास प्रस्तावनाखंड भाग पहिला, पान १९७, वर सांपडेल. १८०१ पर्यंत टाँगकिंग हें अनामला जोडलेलें होतें व त्याच सालीं अनामच्या राजानें तें आपल्या ताब्यांत घेतलें. अनाम प्रांतांत १८६२ च्या तहाअन्वयें चांगला जम बसविल्यानंतर फ्रेंच लोकांचें टाँगकिंगकडे लक्ष्य वळलें. कारण खनिज द्रव्यासंबंधीं टाँगकिंगची फार प्रसिद्धि आहे. उत्तरेकडील प्रांतांत दंगेधोपे होऊं लागले हें पाहून फ्रेंचांनां, टाँगकिंगच्या कारभारांत लक्ष घालण्यास एक कारण सांपडलें. १८७० च्या फ्रॅंको-जर्मन युद्धामुळें या गोष्टीस आळा बसला होता. तथापि, जीअन डयूप्यूइज नामक एक व्यापारी, सॉंगकोइ नदीपर्यंत आपला प्रवेश व्हावा म्हणून तडजोड करीत होता. फ्रेंचांनां व्यापारी मार्ग खुला असावा म्हणून कॅप्टन सेनेझ हाहि प्रयत्न करीत होता. परंतु वरील व्यापारी व आरमारी अधिकारी यांनां टाँगकिंग लोक दाद देईनात, हें पाहून डयूप्यूइजनें नदीपर्यंत जुलमानें जाण्याचा बेत केला. डयूप्यूइज हा हॅनोइ येथें गेल्यानंतर त्यानें त्या ठिकाणाहून निघून जावें म्हणून हुकूम देण्यांत आला. टाँगकिंग अधिकाऱ्यांचें व गार्निअरचें पटेनासें झाल्यामुळें गार्निअरनें पांच किल्ले हस्तगत केले. पुढें टाँगकिंग लोकांनीं उलट हल्ला करून कांहीं हॅनोइ जवळचीं खेडीं परत मिळविलीं शेवटीं फिलॅस्ट्रे यानें अधिकाऱ्यांशीं तह केला व

त्यांत असें ठरलें कीं, सॅंगकोइ, हॅनोइ व हैफॉंग या ठिकाणीं व्यापार करण्यास फ्रेंचांनां अधिकार देण्यांत यावा.

मध्यंतरीं अनामी अधिकारी हे फ्रेंचांविरुद्ध चिनी लोकांची सहानुभूति व मदत मिळविण्याची खटपट करीत होते. अनामी राजानें पेकिंगच्या दरबारास पत्रें लिहिलीं व देणग्याहि पाठविल्या. पुढें १८८३ मध्यें एक तह झाला व त्याप्रमाणें टॉंगकिंगमधून आपलें अनामी सैन्य राजानें काढून न्यावें असें ठरलें.१८८४ सालीं एक तह झाला व त्यांत टॉंगकिंगच्या उत्तरेकडील प्रांतांमधून चीननें आपलें सैन्य न्यावें असें ठरलें, पुढें, ह्यू येथें एक दुसरा तह झाला. त्यांत अनाम व टॉंगकिंग येथील फ्रेंचांचें महत्त्व कायम राहण्यासंबंधीं ठराव झाला. १८८५ सालीं पुन्हां युद्धास सुरवात झाली व लॅंगसन् हें ठिकाण फ्रेंचांनीं हस्तगत केलें. सर रॉबर्ट हार्ट यांनें चीनबरोबर तह केला. जून १८८५ मध्यें टेंटसिन् येथें एक तह झाला व त्यांत असें ठरलें कीं, अनाम व टॉंगकिंग यांवर फ्रान्सची मालकी असावी व फ्रेंच लोकांनीं फोर्मोसा व पेस्कॅडोरेस हीं ठिकाणें सोडून द्यावींत.

रा ज्य व्य व स्था.–संस्थानाचे २० जिल्हे असून जिल्ह्यानिशीं एक अधिकारी असतो. त्यास "रेसिडेंट" असें म्हणतात. प्रत्येक जिल्ह्यास एक कार्यकारी मंडळ दिलेलें आहे. मंडळाचे सभासद लोकनियुक्त असतात. सभासदांनां 'नोटेबल्स' असें म्हणतात. मंडळाला, जिल्ह्याचें अंदाजपत्रक करणें वगैरेसंबंधीं हक्क दिलेले आहेत. फ्रेंच सरकारला जबाबदार असा सर्व संस्थानावर एक वरिष्ठ अधिकारी व प्रतिनिधी आहे. याला "रेसिडेंट सुपीरियर" असें म्हणतात. "अनाम" प्रमाणेंच एकंदर राज्यपद्धति आहे. रेसिडेंट-सुपीरियर हनोयी येथें असतो. हनोयी येथें फौजदारी व अपील कोर्ट आहे.

**टॉंगपेंग**–ब्रह्मदेश. उत्तर शान संस्थानांपैकीं एक संस्थान. याचें क्षेत्रफळ ७७८ चौरस मैल आहे. लो. सं. ( १९११ ) ३१९७६. येथील मुख्य धंदा म्हणजे चहाची लागवड व चहाचे कारखाने हा होय. कांहीं ठिकाणीं 'ली' जातीच्या तांदुळाचें पीक काढतात. कुन्टसा व कुन्त्थन या दोघांनीं मिळोन राजाविरुद्ध बंड केलें, परंतु दोघेहि मारले गेले. दुसरा 'सावब्वा' हा याचा प्रतिस्पर्धी जो 'कन्कोन' याच्याकडून मारला गेला. 'कन्कोन' हा मंडेलशीं मित्रत्वाच्या नात्यानें वागत असे. पण त्याच्यानंतर 'कम्मोंग' हा कमकुवत असल्यामुळें १८८७ सालीं इंग्लिशांनां भेटला नाहीं, व त्यामुळें त्याला राज्यावरून काढून टाकिलें. याचा मुलगा 'टॉनमोंग' हा १८८८ सालीं गादीवर बसला व १८९७ सालीं मरण पावला. याच्यानंतर हल्लींचा 'सावब्वा' हा गादीवर बसला.

**टांगानिका**–मध्यआफ्रिकेच्या पूर्वबाजूचें एक मोठें सरोवर. सर्व जगांत एवढ्या इतकें लांब, गोड्या पाण्याचें सरोवर नाहीं. याची लांबी ४०० मैल आहे व रुंदी ३० ते ४५ मैल आहे. क्षे फ. १२७०० चौ. मै. आहे. समुद्रसपाटीपासून याची उंची २६०० फूट आहे. हें सरोवर पूर्वी समुद्राचा भाग असावा असा त्यांत सांपडलेल्या कांहीं प्राण्यांवरून समज होत असे पण तें खरें नाहीं असें सिद्ध झालें आहे. या सरोवरांत बाजूच्या डोंगराळ प्रदेशांतून बरेच झरे वहात येतात. मलागरसी नांवाच्या उत्तरेकडील नदीचें सर्वांत जास्त पाणी या सरोवरास मिळतें. ही नदी मोठी असून हींत जहाजें चालतात.

हें सरोवर कांहीं ठिकाणीं ३५० पुरुष खोल असून कांहीं ठिकाणीं याचा थांग लागत नाहीं. या सरोवरांत सुसरीसारखीं जनावरें आहेत. सरोवराच्या पश्चिमेला नीग्रो लोकांची वस्ती आहे. पूर्वेकडील वस्ती थोडी हॅमिटिक वंशाची आहे व दक्षिणेकडील लोकांमध्यें झुलू लोकांच्या चालीरीतींच्या खुणा दिसतात.

यूरोपियन राष्ट्रांमध्यें आफ्रिकेची वांटणी झाली तेव्हां सरोवराच्या किनाऱ्यावरील प्रदेश बेल्जम, ग्रेटब्रिटन व जर्मनी यांनीं आपआपसांत वांटून घेतले. ग्रेटब्रिटनकडे दक्षिणभाग, जर्मनीकडे पूर्वभाग व बेल्जमकडे पश्चिम भाग आला. या सर्व ( तीनहि ) राष्ट्रांनीं आपलीं ठाणीं या सरोवरावर वसविलीं. गेल्या महायुद्धांत जर्मनीचा मुलूख ग्रेटब्रिटनकडे आला. [ हॊअर—लेक टांगानिका; बर्टन, लिव्हिंग्स्टन, कॅमेरॉन व स्टॅनले यांचे वृत्तांत. ]

**टांगानिका प्रदेश**—महायुद्धांत जर्मन पूर्व-आफ्रिकेचा जो भाग ग्रेटब्रिटननें आपल्या ताब्यांत घेतला त्याचें नांव टांगानिका असें १९२० सालीं ठेवण्यांत आलें. याचें क्षेत्रफळ १९२१ मध्यें ३८५००० चौ. मै. व लोकसंख्या ५० लक्ष होती. या प्रदेशांत दरएस सालेम, टांगा व टबोरा हीं तीन मोठीं शहरें आहेत. इ. स. १९१६–१९१७ मध्यें जर्मन पूर्वआफ्रिका जर्मनीपासून जिंकून घेतला. नंतर ब्रिटिश व बेल्जम सरकारांनीं आपापल्या जिंकलेल्या मुलखांत, राज्यव्यवस्था ठेवण्यास सुरवात केली. १९१८ च्या मार्च महिन्यांत, बेल्जमच्या ताब्यांत असतां टबोराचा मुलूख ब्रिटिशांच्या ताब्यांत आला. १९१९ च्या मार्चमध्यें जें सुप्रसिद्ध कौन्सील भरलें त्यामध्यें जर्मन ईस्टआफ्रिका ग्रेटब्रिटनला देण्यांत आली. पण बेल्जम सरकारनें, उरुंडी, रुआंडा, व उजीजी प्रांतांतला कांहीं भाग आपल्याकडे ठेवण्याचें ठरविलें.१९१९ सालीं इंग्लड व बेल्जम यांमध्यें करार होऊन उजीजी प्रांत हा ग्रेटब्रिटनला मिळाला. १९२१ च्या तहानें, किगोमा ते दरएससालेममधील रेल्वेमधून माल मोफत नेण्याची सवलत बेल्जमला मिळाली.

१९२० सालीं टांगानिका प्रदेशावर सरकार स्थापन करण्यांत येऊन, सर होरेस बॅट हा सुभेदार व सर विल्यम कार्टर हा मुख्य न्यायाधीश झाला. राष्ट्रसंघाच्या बैठकींत या विषयासंबंधीं चर्चा होऊन टांगानिका प्रदेशांत सर्व राष्ट्रांतील लोकांनां, वस्तीला व व्यापाराला मुभा असावी असें ठरलें.

यामुळें या प्रदेशांतील ब्रिटिश इंडियन लोकांचा दर्जा काय असावा हा प्रश्न उपस्थित झाला. राष्ट्रसंघाच्या ठरावानें, ब्रिटिश इंडियन लोकांनां इतर राष्ट्रांतील लोकांशीं समान असा दर्जा मिळाला पाहिजे होता. महायुद्ध चालू असतांना हा प्रदेश खास ब्रिटिश इंडियन प्रजेकरितांच राखून ठेवावा अशी एक सूचना पुढें मांडण्यांत आलेलीहि होती; पण ती मान्य होणें शक्यच नव्हतें. पण १९१९ सालीं आगष्ट महिन्यांत ब्रिटिश वसाहतमंत्र्यांनीं, इंडियन लोकांनां स्वतंत्र प्रदेश राखून ठेवण्याची आवश्यकता आहे किंवा नाहीं यासंबंधीं चौकशी करण्याकरतां सर बेंजामिन रॉबर्टसन यास पाठविलें. हिंदुस्थान सरकारनें एक खलिता पाठवून टांगानिका प्रदेशाकडे हिंदी शेतकरी जाणें शक्य नाहीं असें उत्तर दिलें. पण टांगानिकामध्यें जे ब्रिटिश इंडियन प्रजाजन आहेत त्यांना मात्र इतर राष्ट्रांतील लोकांच्या इतका समान दर्जा मिळणें जरूर आहे असें कळविलें. १९२१ सालीं या प्रदेशांत १५०० हिंदी लोक होते व त्यांनीं किरकोळ व्यापार आपल्या ताब्यात ठेवला होता. १९२० सालीं टांगानिकामध्यें, जमीन व खाणि यांच्या व्यवस्थेसाठीं एक खातें उघडण्यात आलें. टांगानिकामध्यें अभ्रक ( मायका ) एवढीच धातु मुबलक असून ती उलगुरू पर्वतात सापडते. १९१७ ते १९२० च्या दरम्यान ४०००० पौंड किंमतीच्या अभ्रकाची निर्गत झाली. १९१९–२० च्या दरम्यान, या प्रदेशात ११५८००० पौंडाच्या मालाची आयात व १३३०००० पौंडाच्या मालाची निर्गत झाली. कापड, तांदूळ व इतर धान्यें हे आयात मालातील प्रमुख जिन्नस असून, सिसल, कापूस, कातडीं, काफी, तूप इत्यादि निर्गत मालातील प्रमुख जिन्नस होत.

या प्रदेशाची नवीन शासनघटना करण्याच्या कामीं सर होरेस बॅट याला फार परिश्रम करावे लागले. त्यानें प्रथमतः गुलामगिरीची पद्धत मोडून टाकली. जर्मनांच्या सत्तेपूर्वीची जी जुनी जातवार संघटना अस्तित्वांत होती ती पुन्हा प्रस्थापित करण्यांत आली. इंडियन पीनल कोड येथें सुरु करण्यात आलें. १९२१ सालीं या प्रदेशाचें उत्पन्न १५९६००० पौंड व खर्च १३६५००० पौंड झाला. येथें १९२१ सालीं किंग्स आफ्रिकन रायफलच्या तीन पलटणी होत्या, व त्यांच्यावर २५०००० पौंड खर्च करण्यात आले. शहरांनां जीं जर्मन नांवें देण्यांत आलीं होतीं त्यांच्या बदली देशी नांवें देण्यांत आलीं.

[ संदर्भग्रंथ—रिपोर्ट ऑन टांगानिका टेरिटरी (१९२१); जी. जी. ब्राउन-दि साउथ अँड ईस्ट आफ्रिकन ईयर बुक अँड गाइड; जोएलसन--दि टांगानिका टेरिटरी ( १९२१ ) ]

**टागोर, देवेन्द्रनाथ** ( १८१८–१९०५ )—राममोहनराय यांच्या पश्चात् ब्राह्मोसमाजाचे दुसरे प्रसिद्ध प्रवर्तक देवेन्द्रनाथ हेच होत. यांचें घराणें नांवाला मात्र ब्राह्मण परंतु वास्तविक हिंदुसमाजापासून च्युत झालेलें होतें. देवेन्द्रनाथाचें शिक्षण हिंदू कॉलेजांत झालें व त्याठिकाणीं अज्ञेयवादाचा त्यांच्या मनावर संस्कार झाला. त्यांचें घराणें बरेंच श्रीमंत असल्यामुळें चैन, विलास व पैसा यांची तरुण देवेन्द्रास कधींच कमतरता पडली नाहीं. विशींच्या सुमारास एका कौटुंबिक आपत्तीमुळें देवेन्द्रबाबूंस अत्यंत दुःख झालें व त्याचवेळीं ऐहिक सुखाची नश्वरता मनाला पटून ईश्वरी प्रेमाची त्यांच्या अंतःकरणांत आवड उत्पन्न झाली. १८३९ सालीं देवेन्द्रबाबूंनीं 'तत्त्वबोधिनी सभा' स्थापन केली. या संस्थेचा उद्देश ब्राह्मधर्माचा प्रसार करावा असा होता. मूळ शास्त्राचें स्वरूप काय आहे व आजपर्यंत त्यामध्यें कोणते फरक होत गेले याचें संशोधन करून ज्योतिष, इतिहास इत्यादि शास्त्रांसंबंधीं स्वतंत्र ग्रंथ निर्माण करण्याचाहि वरील सभेचा हेतु होता. राममोहनरायांच्या कारकीर्दीत, ब्राह्मोसमाजांत पुष्कळ लोक येत असत व त्यांची व्याख्यानमाला सुरू असून दैनिक प्रार्थनाहि होत असे. परंतु यांपैकीं, बरेच 'समाजिस्ट' मूर्तिपूजक होते. देवेन्द्रनाथ १८४२ मध्यें ब्राह्मोसमाजाचे अनुयायी झाले व त्यांनीं समाजात अभिनव चैतन्य उत्पन्न केलें. १८४३ मध्यें 'तत्त्वबोधिनी सभे'त त्यांनीं 'ब्राह्मकरार' सुरू केला, व 'तत्त्वबोधिनी पत्रिका' नांवाचें एक मासिकहि सुरू करण्यांत आलें. १८४५ मध्यें ब्राह्मोसमाजातर्फे चार पंडितांनां काशीस वेदाध्ययन करण्याकरितां पाठविण्यांत आलें व त्यांनीं असा निष्कर्ष काढला कीं, वेद व उपनिषदें यांनां अमुक मार्गदर्शक या नात्यानें प्रामाण्य देतां येणार नाहीं. १८५० सालीं देवेन्द्रांनीं 'ब्राह्मधर्म' नामक एक ग्रंथ प्रसिद्ध केला. या ग्रंथाच्या पूर्वार्धात जगन्नियंत्याचे गुण वर्णन केलेले असून उत्तरार्धांत नैतिक तत्त्वें ग्रथित केलीं आहेत. देवेंद्रबाबू अगदीं सुधारक नव्हते म्हणून त्यांचा नवीन मंडळीशीं विरोध येई. देवेन्द्रांनीं औपनिषदीय उपदेशाला व तत्त्वांनां मान दिला आहे, हिंदुधर्म व शास्त्रें यांबद्दल देवेन्द्रनाथांस फार आदर वाटत असे. मूर्तिपूजा मात्र त्यांनां मान्य नव्हती. केशवचंद्रसेनानें नवीन पंथ काढल्यावर देवेन्द्रांच्या पंथाला 'आदिब्राह्मोसमाज' असें नांव पडलें ( 'केशवचंद्रसेन' पहा ). देवेन्द्रबाबूंचा स्वभाव अत्यंत प्रेमळ व परोपकारी असून त्यांची काव्यरचनाहि चांगल्या प्रकारची होती. महर्षि देवेन्द्रनाथ मोठे विद्वान व श्रीमंत असून त्यांनीं यूरोपांत प्रवासहि केला होता. यांचे एक चिरंजीव हिंदुस्थानचे प्रख्यात कवि रवींद्रनाथ टागोर होत.

**टागोर, राजा सौरेन्द्र मोहन** (जन्म १८४०)—एक हिंदी गायनशास्त्रज्ञ. नवव्या वर्षी यांचा प्रवेश हिंदु कॉलेजांत झाला. परंतु डॉक्टरच्या सल्ल्यामुळें त्यांस कॉलेज सोडावें लागलें. वयाच्या चौदाव्या वर्षी सौरेन्द्रांनीं इतिहास-भूगोलावर एक पुस्तक लिहिलें व बंगालींत एक नाटकहि प्रसिद्ध केलें. सोळाव्या वर्षी हिंदी गायनकलेच्या अभ्यासास सुरुवात करून सौरेन्द्रांनीं मोठा लौकिक मिळविला. एका जर्मन

प्रोफेसरानें त्यास पियानोवर आंग्ल गायनशास्त्राची माहिती करून दिली. त्यानंतर एतद्देशीय व पाश्चात्य ग्रंथांचें अध्ययन करून गायनशास्त्रांत त्यांनीं बरीच प्रगति केली. सौरेंद्रांच्या 'संगीतसार' नामक पुस्तकाची बंगालीमध्यें प्रसिद्धि आहे. पैशानें भरपूर पाठबळ असल्यामुळें १८७१ सालीं त्यांनीं चितपुररोड, कलकत्ता, येथें गायनशास्त्र व कला यांचें शिक्षण देणारी एक संस्था काढली. या शाळेसहि चांगलें स्वरूप प्राप्त झालें आहे. १८७५ मध्यें त्यांस, फिलाडेल्फिया युनिव्हर्सिटीकडून 'डॉक्टर ऑफ म्यूझिक' अशी पदवी मिळाली १८८० मध्यें व्हाईसरॉय लॉर्ड लिटन यानें त्यांस राजा असा किताब दिला. सौरेन्द्रराजांनीं इंग्रजींत व बंगालींत गायनकलेवर अनेक पुस्तकें लिहिलीं आहेत.

**टाटा, जमशेटजी नसरवानजी** (१८३९--१९०४). एक हिंदी कारखानदार. यांचा जन्म १८३९ सालीं, नवसरी येथें एका मध्यम स्थितीच्या परंतु कुलीन अशा घराण्यात झाला. लहानपणापासून टाटांच्या अंगीं चिकाटी आणि दृढनिश्चय हे गुण प्रामुख्यानें दिसून येत नवसरी येथें उच्च शिक्षणाची सोय नसल्यामुळें, वयाच्या तेराव्या वर्षी टाटास मुंबईस पाठविण्यांत आलें. मुंबईत १८५८ सालापर्यंत 'एलफिन्स्टन इन्स्टियूशन' मध्यें टाटांनीं शिक्षण संपादिलें. याच सुमारास जमशेटजींच्या बापाला व्यापारांत थोडाफार फायदा होऊन त्याची सांपत्तिक स्थिति सुधारली. तो चीन देशाशीं अफूचा व्यापार करीत असे. व्यापारधंद्यांतील लहान सहान गोष्टींचें ज्ञान व्हावें या हेतूनें टाटांनीं आपल्या बापाच्या 'फर्म' मध्यें कांहीं काळ काम केलें. याच सुमारास संधि साधून, टाटा हाँगकाँग शहरीं गेले व चीनशीं व्यापार करण्यास लागणारें अवश्य ज्ञान त्यांनीं मिळविलें.

यावेळीं टाटा कापसाचा व्यापार करीत असून मेसर्स प्रेमचंद रॉयचंद यांच्याशीं टाटांचा व्यापारी नात्यानें चांगला जम बसला होता. पुढें यंत्रकलेचें संपूर्ण ज्ञान मिळविण्याकरिता जमशेटजी मँचेस्टर येथें जाऊन परत हिंदुस्थानांत आल्यावर, नागपूर शहरीं १८७७ सालीं गिरणी उघडण्याचा समारंभ झाला. टाटाच्या अचाट धैर्यामुळें व दीर्घ प्रयत्नामुळें या एम्प्रेस मिलला अपूर्व यश मिळालें.

एम्प्रेस मिलला मिळालेलें यश पाहून, लोकर विणण्याचा आणखी एक कारखाना काढावा अशी कल्पना टाटांच्या मनांत आली. याला अनुसरून टाटांनीं एक नवीन कम्पनी स्थापन करून तिला 'स्वदेशी मिल' असें नांव दिलें. याच सुमारास, मुंबई इलाख्यांतील सर्वांत मोठ्या गिरण्यांपैकीं एक जी 'दि धरमसी मिल' ती विकीस निघाली. ती टाटांनीं विकत घेतली. या गिरणीचा कारभार सुरळीत चालण्यास प्रथम अनेक अडचणी आल्या. परंतु कंबर बांधून, टाटांनीं सर्व अडचणींस मोठ्या धैर्यानें तोंड दिलें व अखेर यश संपादन केलें. कापूस कांतण्याच्या व विणण्याच्या यंत्रांमधील सर्व नवीन नवीन शोधांस टाटांनीं योग्य स्थान दिलें व आपल्या शोधकदृष्टीनें प्रत्येकाचें पूर्ण परीक्षण करून यंत्रांत बरीच सुधारणा घडवून आणली. वरील सर्व प्रयत्न यशस्वी झाल्यानंतर टाटांनीं हिंदुस्थानांतील कापसाच्या लागवडींत लक्ष घालून, लांब धाग्याचा कापूस निर्माण करण्याविषयीं प्रयत्न केले. हिंदुस्थानांत तयार झालेलें कापसाचें कापड शक्य तितक्या कमी दरांत इतर ठिकाणीं विकतां यावें म्हणून टाटांनीं प्रयत्न केला.

१८९५ साल हें टाटांच्या वाढत्या उद्योगधंद्यांत व व्यापारांत अतिशय भरभराटीचें गेलें यावेळेस 'दि एम्प्रेस मिल' आणि 'दि स्वदेशी मिल' या गिरण्यांचें काम चांगल्या तऱ्हेनें चाललें असून, त्यांत कापडहि मोठ्या प्रमाणावर तयार होत असे या गिरण्यांची व्यवस्था टाटांनीं अनुभवी आणि निपुण अशा माणसांच्या हातीं दिली. या वेळेस हिंदी उमेदवारानां आय्. सी. एस्. च्या परीक्षेस बसतां यावें म्हणून टाटांनीं बरीच खटपट चालविली. हुशार विद्यार्थ्यांनां पैशाच्या अभावीं उपरिनिर्दिष्ट परीक्षेस बसतां न येण्याची अडचण दूर करण्याकरितां टाटांनीं फंड जमवून गरीब विद्यार्थ्यांनां बरीच मदत केली. प्रथम आपल्याच जातीच्या तरुणांकरितां टाटांनीं द्रव्यसाहाय्य देण्याचें कबूल केलें. परंतु पुढें हिंदुस्थानांतील कोणत्याहि युनिव्हर्सिटीच्या पदवीधरास वरील द्रव्यसहाय्याचा फायदा घेतां येईल अशी सोय करण्यात आली.

लोखंड व पोलाद यांचे कारखाने.—हिंदुस्थानांतील खाणींतून निघालेलें लोखंड देशांतल्या देशांत वितळवून, त्यापासून पोलाद करतां यावें अशी योजना टाटांच्या डोक्यांत आली व त्या दिशेनें त्यांनीं प्रयत्न करण्यास आरंभ केला. मध्यप्रांतांतील चांदा येथील खाणींतून निघणाऱ्या लोखंडापासून पोलाद तयार करण्याचा या योजनेचा मुख्य हेतु होता ही प्रचंड योजना सुरवातीस अशक्य व त्याज्य ठरविण्यांत आली. परंतु टाटांनीं आपल्या नेहमीच्या धिमेपणानें व चिकाटीनें तें काम हातीं घेऊन यशस्वी रीतीनें पार पाडून दाखविलें. आतां साकची येथील टाटांचे लोखंडी व पोलादी सामानाचे कारखाने प्रसिद्ध आहेत. हिंदुस्थानांतील औद्योगिक वावर्तांत टाटांच्या या कारखान्यामुळें नवें मन्वंतर सुरू झालें असें निःसंशय म्हणतां येईल. जमशेटजींच्या साकची येथील लोखंडी कारखान्यावरून त्या गांवालाच जमशेटपूर हें नांव १९१८ सालीं देण्यांत आलें.

यांची आणखी एक नवी योजना म्हणजे त्यांनीं बंगलोर येथें स्थापिलेली 'द रिसर्च इन्स्टिटयूशन' किंवा 'इन्स्टिटयूशन ऑफ सायन्स' ही संस्था होय. हिंदुस्थानांतील कलाकौशल्यांत शक्य तितक्या शास्त्रांचा उपयोग व्हावा व त्याच्यामुळें कला भरभराटीस यावी असा टाटांचा मुख्य हेतु होता. या इन्स्टिटयूशनला टाटांनीं ३० लाख रुपयांची देणगी देऊन पूर्ण करून ठेविलें आहे.

ज ल वि द्यु त् श क्ति.—सह्याद्रि पर्वतावर पडणाऱ्या पावसाच्या पाण्याच्या ओघापासून वीज उत्पन्न करण्याची कल्पना मि. डेव्हिड गॉस्लीम नांवाच्या एका इंजिनियरनें सुचविली होती. ती कल्पना जमशेटजी यांनीं अविश्रांत परिश्रम करून मूर्त स्वरूपास आणिली ('जलविद्युत्शक्ति' पहा).

सारांश आपल्या अनेक योजनांनां मूर्त स्वरूप आलेलें पहाण्यास टाटा जगले नाहींत. तथापि समाधानाची गोष्ट ही कीं, त्यांच्या उद्यमप्रिय मुलांनीं बापाच्या सर्व योजना मोठ्या प्रयासानें व नेटानें नांवारूपास आणिल्या. बंगलोर येथील 'रिसर्च इन्स्टिटयूट,, साकची येथील लोखंड व पोलाद यांचे कारखाने व 'हायड्रो-इलेक्ट्रिक वर्क्स' हे सर्व कारखाने प्रगमनशील असून दिवसेंदिवस त्यांची भरभराट होत आहे. हिंदुस्थानसारख्या, उद्योगधंद्यांची व कारखान्यांची उणीव भासत असलेल्या देशांत, टाटांनीं जो दांडगा उद्योग सुरू केला व जे अवाढव्य कारखाने स्थापिले त्यावरून टाटा किती कुशाग्र बुद्धीचे, खटपटी व धोरणी होते हें चांगलें प्रत्ययास येतें. जमशेटजी हे ता. १९ मे १९०४ रोजीं नान्हीम येथें वारले.

कै. जमशेटजी टाटा यांनां आपल्या अंगीकृत कार्यांत जें अलौकिक यश मिळालें त्याचें कारण नुसतें भरपूर भांडवल हें नसून टाटांच्या अंगीं असलेलें धैर्य, चिकाटी, उद्योगप्रियता, दृढनिश्चय आदिकरून सद्गुणच होत. तथापि देशाभिमान आणि सार्वजनिक काम करण्याची आवड हे गुण टाटांच्या अंगीं ठळकपणें वसत होते. हिंदुस्थानातील आधुनिक उद्योगधंद्यांचे ते आद्य जनक होत.

**टाटा, सर रतन** (१८७१–१९१८)—हे जमशेटजी टाटांचे चिरंजीव होत. यांचें शिक्षण मुंबईच्या झेवियर कॉलेजमध्यें झालें. नंतर त्यांनीं आपल्या वडिलांच्या धंद्यांत प्रवेश केला. जमशेटजींच्या निधनानंतर रतन व त्यांचा भाऊ दोराबजी यांनां जमशेटजींची अगणित संपत्ति मिळाली व तिचा व्यय, या बंधूंनीं, निरनिराळीं कृत्यें करण्यांत केला. १९०५ सालीं रतनजी यांनीं शास्त्रीय व वैद्यक विषयांत संशोधन करण्याकरितां एक संस्था स्थापन केली. १९१२ सालीं यांनीं मध्यप्रांतांत साकची येथें, टाटा आयर्न अँड स्टील कंपनी स्थापन केली व तिची थोडक्याच काळांत फार भरभराट झाली. पण यांनीं हातीं घेतलेलें सर्वांत मोठें काम म्हणजे पश्चिम घाटांत, पाण्याच्या जोरावर विद्युत्शक्ति निर्माण करून मुंबईला वीज पुरवणें हीं होय. यामुळें मुंबईतील औद्योगिक उन्नतीला फार मदत झाली. यांनां १९१६ सालीं 'नाईट' पदवी मिळाली. इंग्लंडमध्यें यॉर्क हॉऊस येथें यांनीं एक टोलेजंग इमारत बांधविली व १९१२ सालीं लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्समध्यें समाजशास्त्र व आधिभौतिक शास्त्रें शिकविण्याचें स्वतंत्र खातें उघडण्याची त्यांनीं व्यवस्था केली. याच सालीं त्यांनीं गरीबांच्या स्थितीचा अभ्यास करण्याकरितां लंडन युनिव्हर्सिटीमध्यें, रतन टाटा फंड उभारला. हे १९१८ सालीं कार्नवाल येथें वारले.

**टॉड, कर्नल** (१७८२–१८३५)—याचें नांव जेम्स होतें. हा प्रथम बंगाल्याकडील इंग्रजी सैन्यांत स. १७९९ त दाखल झाला. यानें राजपुतान्यांतील अनेक राजघराण्यांचा बखरवजा इतिहास लिहिला आहे. त्याचें नांव 'ॲनल्स अँन्ड ॲन्टिक्विटीज ऑफ राजस्तान' असें असून तो इ. स. १८२९ त प्रथम प्रसिद्ध केला. टॉड हा राजपुतान्यांत इ. स. १८१८–१८२३ पर्यंत नौकरीवर होता. त्यानें हिंदी भाषेच्या अभ्यासासाठीं एक जैन पंडित पदरीं बाळगला होता. राजपुतान्यांत पोलिटिकल एजंट म्हणून जाण्यापूर्वी तो दौलतराव शिंद्याच्या दरबारीं असणाऱ्या इंग्रज रेसिडेंटाचा असिस्टंट होता (१८१२–१८१७) व इंग्रजी गुप्त हेरांच्या खात्याचें कामहि या सुमारास याच्याकडे होतें. पेंढाऱ्यांच्या दंग्याच्या वेळीं यानें बरीच कामगिरी केली. यानें 'ट्रॅव्हल्स इन वेस्टर्न इंडिया' नांवाचें दुसरें एक पुस्तक लिहिलें आहे. तो विलायतेस १८२३ सालीं परत गेला व १८३५ सालीं मरण पावला. [स्मिथ; डफ.]

**टॉडहंटर, आयझॅक** (१८२०–१८८४)—एक इंग्रज गणितशास्त्रज्ञ. हेस्टिंग्स येथें शिक्षण झाल्यावर पेकहॅम येथील एका शाळेंत तो दुय्यम शिक्षकाचें काम करूं लागला व त्या दिवसांतच लंडनच्या युनिव्हर्सिटी–कॉलेजांतील रात्रीच्या शाळेंत तो शिकत असे. १८४२ सालीं तो बी. ए. झाला व पुढें एम्. ए. च्या परीक्षेंत त्याला सुवर्णपदक मिळालें. यानंतर तो केंब्रिज येथें सीनियर रँगलर होऊन कॉलेजांत शिकवूं लागला. १८६२ सालीं रॉयल सोसायटीचा फेलो व १८६५ सालीं लंडन येथील मॅथेमॅटिकल सोसायटीचा तो सभासद झाला. यांखेरीज त्याला बऱ्याच बहुमानाच्या पदव्या व जागा मिळाल्या.

त्या चे ग्रं थ.—ट्रीटाईज ऑन दि डिफरेन्शियल कॅल्क्युलस अँड एलेमेंट्स ऑफ दि इंटीग्रल कॅलक्युलस (१८५२); ट्रीटाईज ऑन अॅनॅलिटिकल स्टॅटिक्स (१८५३); ट्रीटाईज ऑन आलजिब्रा (१८५८); ट्रीटाईज ऑन जिऑमेट्री (१८५८); ट्रीटाईज ऑन प्लेन को–ऑर्डिनेट जिऑमेट्री (१८५८); प्लेन ट्रिगॉमेट्री (१८५९); स्फेरिकल ट्रिगॉमेट्री (१८५९); इत्यादि बरेच गणिती ग्रंथ त्यानें रचिले आहेत.

**टान्जीर**—आफ्रिका. मोरोक्कोमधील एक बंदर. हें जिब्राल्टरच्या सामुद्रधुनीवर वसलें असून केप स्पार्टेलच्या पूर्वेस १४ मैलांवर आहे. शहराची लोकसंख्या सुमारें ४०००० आहे. समुद्रावरून टान्जीरचा देखावा फारच सुंदर दिसतो. शहरांतील रस्ते निरुंद व वांकडेतिकडे आहेत, तरी पण शहराबाहेर बरेच नवीन रस्ते केलेले आहेत. कांहीं खाजगी कंपन्यांनीं टेलिफोन व विजेच्या दिव्यांची व्यवस्था केलेली आहे. 'बाबल मार्सा' नामक बंदराच्या वेशीपासून 'बाबल सॉक' नामक बाजाराच्या दरवाज्यापर्यंत जाणारा रस्ता शहरांतील मुख्य मार्ग होय. टान्जीरमध्यें जवळ जवळ कारखाने नाहींतच. बैल, मांस व अंडीं हे निर्गत व्यापाराचे मुख्य

जिन्नस होत. बहुतेक सर्व व्यापार यहुदी लोकांच्या हातीं आहे. टान्जीर बंदरांत १९१७ सालीं ८४९९२६ पौंडांची आयात व ११६६११ पौंडांची बंदरांतून निर्यात झाली. टान्जीरच्या उपसागरामुळे झालेलें बंदर फार विस्तृत व सबंध मोरोक्कोमध्यें उत्तम असें आहे. हवा समशीतोष्ण व निरोगी आहे.

यूरोपच्या अत्यंत जवळचें हें बंदर असल्यामुळे यूरोपीय सुधारणेचे परिणाम येथें उत्कृष्टरीतीनें दृष्टीस पडतात. १८ व्या शतकाच्या अखेरीपासून हें परराज्यांतील वकीलांचें मुख्य ठिकाण बनलें आहे. शहर पाहण्यास येणाऱ्या लोकांच्या वाढत्या संख्येकरितां उत्तम तऱ्हेचीं उपहारगृहें उघडण्यांत आलीं आहेत. १९०५ सालीं येथें सुमारें ९००० यूरोपीयन व १०००० यहुदी लोक होते. टान्जीरला अगदीं लागून अत्यन्त प्राचीन काळीं टिंगिस नांवाचें रोमन शहर होतें. ऑगस्टसच्या आमदानींत तें स्वतंत्र नगर बनलें. ओथोच्या अमदानींत टिंगिस हें 'मॉरिशेनिआ टिंगिटाना' प्रांताच्या राजधानीचें शहर होतें. पुढें व्हंडालस, वायझंटाइन्स व आरब, यांनीं तेथें आपला अंमल गाजविला. इ. स. ७८८ मध्यें टान्जीर मोरोक्कोच्या ताब्यांतील अत्यंत प्राचीन व अतिशय सुन्दर शहर असल्याबद्दचा उल्लेख आहे. १४७१ सालीं पोर्तुगीजांनीं टान्जीर घेतलें स. १५८० त तें स्पेनकडे गेलें व १६५६ सालीं फिरून पोर्तुगीजांच्या ताब्यांत आलें. १६६२ सालीं दुसऱ्या चार्लसचा कॅथराईन ऑफ ब्रॅगांझाशीं विवाह झाला त्यावेळीं तें चार्लसला आंदण म्हणून मिळालें, परंतु त्याच्या संरक्षणार्थ येणाऱ्या अतोनात खर्चामुळें तें १६८४ सालीं मूर लोकांनां देण्यांत आलें. १८४४ सालीं फ्रेंचांनीं टान्जीरवर तोफा डागल्या. १९०६ सालच्या अलजीसीराज परिषदेंत ठरल्याप्रमाणें जकातीचा ताबा यूरोपियनांकडे गेला.

**टॅपिओका** (कासावा)—टॅपिओकाचें झाड पांच सात फूट उंच वाढतें. हें झाड दिसण्यांत फार सुरेख दिसतें. याला जमिनींत मुळ्या येतात व त्यांपासून सत्त्व काढितात. याचें मूलस्थान दक्षिणअमेरिका आहे. याची लागवड हिंदुस्थानांत नेपाळ, दार्जिलिंग, आसाम, बंगाल, मद्रास, त्रावणकोर वगैरे ठिकाणीं करितात. कुडालोर, पाँडिचरीजवळ याचे मोठमोठे मळे आढळतात. याची लागवड रेवदंडा, आलेबाग, वसई, माहीम व उत्तरगुजराथेंत होण्यासारखी आहे. याच्या मुख्य जाती दोन आहेत. गोडी (पांढऱ्या देंठाची) व कडवी (तांबड्या देंठाची). कडू जातींत प्रूसिकॲसिड नांवाचा विपारी पदार्थ असतो. तो मुळ्या भाजल्यानें अगर शिजविल्यानें नाहींसा होतो.

टॅपिओकाची लागवड काळ्या व रेताड लापण जमिनींत चांगली होते. याच्या लागवडीसाठीं जमीन दोन वेळ नांगरून, कुळवून, ढेंकळें फोडून चांगली भुसभुशीत व नरम करावी. नंतर पांच सहा फूट हमचौरस अंतरानें खड्डे घेऊन त्यांत खत कालवून देंठांचे नऊपासून बारा इंच लांबीचे तुकडे घेऊन खड्ड्यांत तिरकस लावावे. लावतांना एक टोंक सुमारें दोन इंच जमिनीवर ठेवावें. हे सरळ ओळींत लाविल्यास तण काढण्याचें बहुतेक काम कोळप्यानें करतां येतें. पावसानंतर चारपांचदां पाणी द्यावें लागतें, जून महिन्यांत लागण केल्यास काढणीचा हंगाम नऊ दहा महिन्यांनीं म्हणजे फेब्रुवारी, मार्च महिन्यांत येतो. मुळ्या जमिनींत जास्त दिवस राहिल्यास त्या तंतुमय होतात. मुळ्या खणून काढतात. त्या काढल्यानंतर पाण्यांत धुतात व लागलीच सत्त्व काढण्याचें काम सुरू होतें. मुळ्या धुतल्यानंतर बाहेरची साल काढून त्या किसणीवर किसून कीस पाण्यांत खूप हालवावा व साधारण विरविरीत फडक्यांतून गाळावा. हें काम दोन तीन वेळ करावें लागतें. नंतर गाळून घेतलेलें पाणी एका डव्यांत स्वस्थ ठेवावें. म्हणजे तें सत्त्व तळाशीं बसतें. नंतर पाणी ओतून टाकून खालचें सत्त्व उन्हांत वाळवावें. हें वाळलें म्हणजे डब्यांत भरतात. मग तें विक्रीस तयार झालें. दर एकरीं सरासरी उत्पन्न–मुळांचें वजन--अजमासें १० टन असतें. सत्त्वाचें प्रमाण शेंकडा २५ असतें. दर एकरीं अजमासें ५००० पौंड सत्त्व निघतें.

त्रावणकोरकडे मुळ्या शिजवून त्यांच्या चकत्या करून वाळवितात व सांठवून ठेवितात. या वाळलेल्या चकत्या पाहिजे तिकडे पाठवितां येतात व त्या दळून पीठ करितां येतें. कासावाच्या रताळ्याप्रमाणेंच चकत्या करून शिजवितात. नंतर पाणी काढून टाकून चकत्यांत मीठ मसाला घालून भाजी करतात. याच्या मुळ्या भाजून मद्रासच्या बाजारांत विकतात.

**टायको ब्राही** (१५४५–१६०१)—एक डॅनिश ज्योतिषशास्त्रज्ञ. टायकोचें अल्प चरित्र व त्याची ज्योतिषविषयक कामगिरी, यांकरितां 'विज्ञानेतिहास' (पृ. ३४२–३४३) पहा.

**टायग्रे**—अबिसिनीयामधील एक उत्तरेकडील प्रांत. अबिसीनियाच्या नामधारी बादशहापेक्षां टायग्रीच्या राजाचीच हुकमत बहुतेक जास्त मान्य केली जात असे. ॲडोवा ही या प्रांताची राजधानी होय. प्राचीन इथिओपिक साम्राज्याच्या राजधानीचें शहर आक्सम हेंहि याच प्रांतांत आहे. इतिहासाकरितां 'अबिसीनिया' पहा.

**टायबर**—इटलीमधील लॅटिअम् प्रांतांतील जुनें शहर. हें शहर रोमपासून टायबरटिना या रस्त्यानें १८ मैलांवर असून ॲनिओच्या प्रसिद्ध धबधब्यानजीक वसलेलें आहे. या शहरांत हरक्युलीस व्हिक्टर याच्या देवळाचे अवशेष अद्याप आहेत. नवें शहर या हरक्युलीस व्हिक्टर देवळाच्या चवथऱ्यावर बांधलेलें आहे. १८९८ सालीं हरक्युलीस व्हिक्टरच्या देवळांतील भाजलेल्या लाल मातीच्या कांहीं देवता सांपडल्या होत्या. ॲनिओच्या वरच्या बाजूला, डोंगरावर, व्हिला ऑफ मिसेनास नांवाची इमारत आहे. शहराच्या ईशान्य दिशेस दोन लहान जुनीं देवळेंहि

आहेत. टॅपिओडेला टोसे व इतर कांहीं थडगीं व रोमन लोकांनीं बांधलेले दोन पूल हे या शहराचे जुने अवशेष होत. रोमन लोकांच्या काळांत टायवर हें एक रमणीय स्थान होतें व तेथें "ऑगस्टस ", " मिसेनास " यांचीं उपवनगृहें होतीं."होरेस", " कॅटुलस "व " स्टॅटिअस " यांच्या कवितेंत टायवरचीं वर्णनें आढळतात.होरेस येथें रहात होता असें म्हणतात. टायवर येथील अवशेषांत कांहीं उपवनगृहांचे व कांहीं पुतळयांचेहि अवशेष आहेत.या अवशेषांत चित्रविचित्र गारेचीं सुंदर कामें व नक्षीदार कामेहि आढळतात.

टायवर हें शहर टायवरटस, कोरॅक्से व कॅटिलिस यांनीं वसविलेलें होतें. लॅटिन लीग संघांत या शहराचा समावेश झाला होता. ख्रि. पू. ३६१ मध्यें येथील लोक गॉल लोकांना मिळाले व ख्रि. पू ३६०-३५४ या वर्षां त्यांनीं मोठा जय संपादन केला व पुढें येथील लोकांनीं रोमशीं सख्य जोडलें ख्रि. पू ९० या सालीं येथील लोकांना रोम साम्राज्यात प्रजेचे हक्क मिळाले. साम्राज्याच्या काळांत टायवर शहर चांगलें भरभराटीस आलें होतें. नार्सेसनें रोमवर हल्ला केला तेव्हां हें शहर लुटलें गेलें. परंतु इ. स. ५५७ सालीं नार्सेसनें हें पुन्हां वसविलें.

**टायबेरिअस**—हें गॅलिली समुद्राच्या पश्चिम किनाऱ्यावर आहे. याची लोकसंख्या सुमारें ४००० आहे. येथें कैमाल्कम अथवा दुय्यम सुभेदार ( आकाच्या सुभेदाराचा मदतनीस ) राहतो. हें हेराड अँटीपासनें एमाअस खेड्याजवळ वसविलें. जेरुसलेम पडल्यानंतर यहुदी लोक येथें येऊन राहिले. हें शहर इ. स. १६ व २२ च्या दरम्यान वसविलें असावें. टायबेरिअस बादशहाचें नांव यास दिलें. व्हेसपॅशियननें हें शहर घेऊन ॲग्रिपास दिलें. येथें प्रसिद्ध सुफी पंथ प्रस्थापित झाला. रब्बी जुडा हक्काडोरा ( मिश्नाहचा संपादक ) येथें राहत होता. जेरुसलेम टालमड हेंहि याच ठिकाणीं प्रसिद्ध झालें. रब्बी अकिवा व मैमोनाईडीज यांच्या कबरा या ठिकाणीं आहेत. ६३७ सालीं अरबांनीं हें शहर काबीज केलें. ११८७सालीं सलाउद्दीननें धर्मयोध्यांपासून घेतलें.प्रसिद्ध शेख दाहिर एल अमीर यानें १८ व्या शतकांत या शहराची तटबंदी केली. टायबेरिअस हें फार घाणेरडें शहर आहे. एका किल्याचे व यहुदी मंदीराचे अवशेष प्रेक्षणीय आहेत. जोसेफसनें उल्लेख केलेले उष्ण पाण्याचे झरे दाक्षिणेस अर्ध्या तासाच्या रस्त्यावर आहेत.

**टायर**—हें फोनीशियांतील प्रसिद्ध शहर होतें. हल्लीं हें शहर सूर या नांवानें प्रसिद्ध आहे. शिकंदरच्या स्वारीपर्यंत हें एका लहान बेटावर वसलेलें होतें. पण त्यानें समुद्रकांठीं जी मोर्चेबंदी केली होती ती वाळूच्या थरांनीं वाढत जाऊन या बेटास मिळाली व आतां तें द्विपकल्प बनलें आहे. रोमन लोकांच्या वेळीं शहराची फार भरभराट झाली होती. त्या वेळीं शहरची लोकसंख्या २५ हजार असून रोम येथील घरापेक्षां उंच अशा पुष्कळ मजल्यांच्या घरांतून लोक दाटीनें रहात. बेटांत पाणी नसल्यामुळें नजीकच्या देशांतून एक तासभर पाणी नेऊन तें मोठमोठ्या टाक्यांतून सांठवीत असत. अरबांच्या वेळींहि या शहराला व तेथील किल्ल्याला महत्त्व असे. इ. स. ११२४ ते १२९१ पर्यंत येथें क्रुसेडरांचें ठाणें असे. ख्रिश्चन लोकांनीं तें सोडल्यानंतर मुसुलमानांनीं त्याचा नाश केला. स. १७६६ त तें मिटेवीला यानें घेतलें. तेव्हांपासून हल्लींचें शहर भरभराटीस आलें.

**टारक्किनी**-इटलीमधील इट्रुरिया प्रांतांतील जुनें शहर. हल्लीं या शहरांत वस्ती नाहीं. १३०७ सालीं कोर्नेटो येथील लोकांनीं या शहरांतील प्राचीन अवशेष नाहींसे केले होते, तरी रोमन लोकांच्या वेळेच्या इमारतींच्या भिंतीचे कांहीं अवशेष अद्याप कोठें कोठें आढळतात. १८७६ सालीं कांहीं जुन्या इमारतींच्या चवथऱ्यांचा शोध लागलेला आहे. मध्ययुगांत बांधलेल्या टारक्किनी शहरभागाच्या आग्नेय दिशेस मॉन्टेरोझी डोंगरावर निरनिराळ्या आकाराचीं थडगीं सांपडलेलीं आहेत. कांहीं थडगीं डोंगरांत पोखरलेलीं असून त्यांत ग्रीक चित्रकलेचें काम केलेलें आहे.

डेमारॅटसच्या (कॉरिंथचा) वेळेस टारक्किनी शहर फार भरभराटीस आलें होतें. त्यावेळच्या इट्रुरियामधील १२ शहरामध्यें ह्या शहराचा नंबर पहिला होता. हल्लींचे येथील लोकाचे धार्मिक विधि व संस्कार या रोमन लोकांपासून चालत आलेले असावे असें म्हणतात. रोमन साम्राज्याखालीं "टारक्किनस प्रिस्कस व टारक्किनस सुपेरस" हे रोमन राजे टारक्किनी येथें रहात असत. या वेळेस येथून दारू, मोती, शिपा परदेशीं पाठविल्या जात होत्या.

**टारांटो**—इटली लेसप्रांतात हें अॅपुलिआ शहराचें बंदर असून शहरापासून रेल्वेनें ५०मैल दूर आहे. १९०१ सालीं शहरची लोकसंख्या ५०५९२ होती आणि कम्यूनची ६०३३१होती. समुद्रसपाटीपासून ५६ फूट उंचीवर असलेल्या एका खडकाळ ब्टावर हें बंदर आहे. हें बंदर टारांटोचें आखात आणि मेरिपिकोलो बेट यांच्यामध्यें आहे. सानपायट्रो आणि सानपॉलो या दोन बेटांमुळें या बंदराचा पुष्कळ बचाव होतो. स्ट्रॅडागॅरीबॉल्डी येथें राहणाऱ्या कोळी लोकांची ग्रीक भाषा असावी असें वाटतें. मुख्य प्रार्थनामंदिरांत असलेल्या पदार्थसंग्रहालयांत पुष्कळ प्राचीन वस्तू आहेत. याच्या जवळच असलेल्या पॅलॅझोडेग्ली युफीजी नांवाच्या इमारतींत सार्वजनिक कचेऱ्या आहेत. सिटानुओव्हा नांवाची दुसरी इमारत येथें आहे. शिंपल्याची लागवड करण्याशिवाय ऑलिव्ह तेल शुद्ध करण्याचे व साबूचे कारखाने येथें आहेत. धान्य, मध आणि फळें हा येथील निर्यात माल होय. मेरीपिकोलो येथें ९३ जातींचे उत्तम मासे सांपडतात. आरमारी शस्त्रागाराचें हें तिसरें महत्त्वाचें शहर आहे. येथील गोदीचे दोन भाग केले आहेत. मेरीपिकोलो हें जहाजें उभीं राहण्याचें ठिकाण

आहे. मेरिपिकोलोच्या बाहेरच्या बाजूस असलेल्या रेल्वे स्टेशनच्या दक्षिणेस व्यापाराचें बंदर आहे.

इ. सन ९२७ मध्यें हें सारसेन लोकांनीं उध्वस्त केलें.९६७ साली जेसिफोरस फोकसनें पुन्हां बांधलें. १०६३ सालीं रॉबर्ट गीसकर्डनें हें आपल्या ताब्यांत घेतलें. त्याच्यानंतर त्याचा मुलगा बोहेमदनें हें राजधानीचें शहर केलें. सीसली-च्या दुसऱ्या राजानें तें आपला मुलगा 'वाईट' (दि बॅड )वि-ल्यम यास दिलें. दुसऱ्या फ्रेडरिक बादशहानें येथें एक किल्ला बांधला. अंजूच्या दुसऱ्या चार्लसचा मुलगा फिलिफ हा १३०१ सालीं टारांटोचा राजपुत्र झाला.

**टारिसेली, इव्हांजेलिस्टा** (१६०८-१६४७)—इटा-लियन गणिती पदार्थशास्त्रज्ञ. याचा जन्म फेन्झा येथें झाला. बापाचा मृत्यु त्याच्या बालपणांतच झाला; परंतु त्याचा एक चुलता ख्रिस्ती संन्याशी होता; त्यानें त्याला शिक्षण दिलें व नंतर रोम येथील एका गणिताच्या प्रोफेसराच्या हाताखालीं शास्त्र शिकविण्यास पाठवून दिलें. तेथें त्यानें ग्यालिलिओचे ग्रंथ वाचले व त्यायोगानें त्याला शास्त्रीय स्फूर्ति उत्पन्न होऊन त्यानें एक पुस्तक लिहिलें. या पुस्तकाची माहिती ग्यालिलिओ याला मिळाली व ग्यालिलिओनें त्याला फ्लारेन्स येथें आपल्याजवळ बोलावून घेतलें. त्या ठिकाणीं त्यानें ग्यालिलिओच्या लेखकाचें काम तीन महिनेपर्यंत केलें. नंतर ग्यालिलिओचा काळ झाला. तेव्हां ग्यालिलिओच्या पाठीमागें त्याला फ्लारेन्स येथील अक्याडेमींत गणिताचा प्रोफेसर नेम-ण्यांत आलें. १६४३ सालीं त्यानें कांचेच्या नळींत पारा भरून ती नळी पारदपात्रांत उभी केली असतां पारद-स्तंभाची उंची ठराविक रहाते व त्या स्तंभावर निर्वात-स्थल असतें असें त्यानें दाखवून दिलें. या निर्वातस्थलास 'टारिसेलीची पोकळी' असें नांव देण्यांत आलें आहे. त्यानें शुद्ध गणितांतहि कांहीं शोध लावले आहेत.

यंत्रशास्त्रासंबंधीं त्यानें कित्येक तत्त्वें शोधून काढलीं आहेत. दुर्बीण आणि सूक्ष्मदर्शक यंत्रें यांत त्यानें कित्येक सुधारणा करून दाखविल्या. त्यानें तयार केलेलीं कित्येक लेन्सें ( अंतर्गोल-बहिर्गोल भिंगें ) अद्याप उपलब्ध आहेत. १६४७ सालीं फ्लारेन्स येथें त्याचा मृत्यु झाला.

**टारेंटम्**—दक्षिण इटलीमधील ग्रीक लोकांचें शहर. हें शहर टारेंटम् आखाताच्या उत्तर किनाऱ्यावर आहे. ख्रि. पू. आठव्या शतकांत स्पार्टन लोकांनीं येथें एक वसाहत केली होती. टारेंटम् येथें पहिली वसाहत फॅलॅन्थस यानें केली. हा देश सुपीक असून लोंकर, मासे, भांडीं इत्यादि जिनसांचा व्यापार मोठा असल्यामुळें या देशाचें बल व संपत्ति फार लौकर वाढली व त्याचा विस्तार आंत होऊं लागला. ख्रि पू. ४७३ या वर्षाच्या पराभवानें सुद्धां या देशाची भरभराट थांबली नाहीं. चवथ्या शतकांत मॅग्ना ग्रीसिया प्रांतांतील शहरांमध्ये टारेंटम्चा नंबर पहिला होता. लुकानिअन व रोमन लोकांशीं टारेंटम् येथील लोकांच्या नेहमीं लढाया होत असत. दुसऱ्या प्यूनिक लढाईमध्यें टारेंटम् हें हॅनिबॉलला मिळालें, परंतु लढाईत तें लुटलें गेलें

या नंतर ख्रि.पू.१२३च्या वर्षीं टारेंटम्ची स्थिति सुधारली. ऑगस्टसच्या कालानंतर टारेंटम्ला पुन्हां उतरती कळा लागली. टारेंटम् शहरच्या वायव्येकडील "टेरामारा" प्रांताचा शोध नुकताच लागला आहे. टारेंटम् शहराचे जुने अवशेष फक्त एका डोरिक देवळाचे आहेत. समुद्रकिनाऱ्यावरील प्रांतांत जुन्या रोमन लोकांचीं नाटकगृहें व स्नानगृहें यांचे शोध लागले आहेत. टारेंटम् येथील सांपडलेलीं जुनीं चांदीचीं भांडीं व कांहीं चित्रविचित्र कामें हीं हल्लीं म्यूझि-यममध्यें ठेवलेलीं आहेत. ह्या सर्व जिनसा ख्रि. पू. चवथ्या शतकांतील असाव्या असा अंदाज आहे.

**टॉर्के**—इंग्लंड. डेव्हनशायर परगण्यामधील एक बंदर व म्युनिसिपल बरो. हें टॉर्के-पार्लमेंटविभागांत असून इंग्लिश खाडीच्या टॉर उपसागरावर आहे. याची लो. संख्या(१९०१) ३३,६२५ होती. हें गांव मनोरम जागीं वसलेलें असून याच्या तीन बाजूंस टेंकड्या आहेत. दक्षिणेकडून समुद्रा-वरचा थंड वारा येतो. हिंवाळ्यांत राहण्याचें हें ठिकाण आहे. उत्तरेस सेंटमेरीचर्च नांवाचें भरवस्तीचें एक उपनगर आहे. येथें टॉर ॲबेचे कांहीं अवशेष आहेत. येथें नगर-भवन, पदार्थसंग्रहालय, नाटकगृह, कला व शास्त्र यांच्या शाळा वगैरे इमारती व संस्था आहेत. येथें दगडी कोळसा, इमार-तीचें लांकूड, व पाटया यांची आयात होते व संगम-रवरी दगड व इतर दगड यांची निर्गत होते. येथें टेरा-कोटा मातीच्या कुंड्या वगैरेंचें काम फार सुरेख होतें. ॲबेच्या स्थापनेपूर्वी येथें खेडें असावें. टॉरेजवळ रोमन वसाहतीच्या खुणा सांपडतात. ऑरेंजचा राजपुत्र विल्यम हा येथेंच प्रथम गलबतांतून उतरला.

**टार्नो**—हें शहर ऑस्ट्रियामधील गॅलिशिया प्रांतांत आहे. ह्याची लोकसंख्या १९०४ सालीं सुमारें ३८०००होती. पैकीं शेंकडा ४० लोक ज्यू होते. हें शहर बायला नदीच्या तीरावर असून रोमनकॅथोलिक धर्मगुरूचें राहण्याचें ठिकाण आहे. ह्या शहरापासून थोड्याच अंतरावर बायला नदीस डूनाजेक नांवाची दुसरी एक नदी मिळते. ह्या शहरीं रोमनकॅथोलिक लोकांचें गॉथिक पद्धतीनें बांधलेलें देवा-लय आहे. हें देवालय १५ व्या शतकांत बांधलें असावें. ह्या देवालयाच्या आवारांत टानेविस्की व आस्ट्रोस्की घरा-ण्यांतील लोकांचीं थडगीं आहेत. हें शहर पूर्वी ह्याच घरा-ण्याच्या ताब्यांत होतें. ह्या शहराजवळ मार्टीसबर्ग टेंकडी-वर एक जुना किल्ला मोडकळीस आलेला दृष्टीस पडतो. ह्या किल्ल्यांत एक लहानसें देऊळ आहे. हें ८०० वर्षांचें जुनें आहे. हा किल्ला देखील वरील घराण्याच्याच ताब्यांत होता. ह्याशिवाय येथील जुनी पाहण्यासारखी इमारत म्हटली म्हणजे

टाऊनहॉल ही होय. येथें शेतकीचीं आऊतें, कांच व चिकोरी हे जिन्नस तयार होतात.

**टार्सस**—हें प्राचीन शहर सिलिसिआच्या सुपीक मैदानांत होतें. सिडनस नदी शहराच्या मध्यभागांतून वहात होती. ही कदाचित क्रेरिअन अपोलेच्या देखरेखीखालीं वसविलेली प्राचीन अयोनियन वसाहत असावी. चांगलें बंदर, सुपीक प्रदेश व माउंटटॉरसवरून जाणाऱ्या रस्त्यावर मालकी, यांमुळें या शहराचें महत्त्व होतें.

असुरी ( ॲसीरियन ) सत्तेचा नाश झाल्यावर टार्सस येथें सायेनेसीस नांव धारण करणारे राजे राज्य करीत. इ.स. पूर्वी ४ थ्या शतकांत इराणी सत्रपांचा अंमल होता. स.१७१ त चवथ्या अँटीओकस एपिफेनेसनें या शहरास स्वातंत्र्य दिलें. इ. स. पूर्वी १०४ मध्यें हें रोमन सत्तेखालचें एक अतिशय श्रीमान व मोठें शहर होतें. अँटनीनें क्लिओपाट्राचें स्वागत याच ठिकाणीं केलें. या ठिकाणीं एक विश्वविद्यालय असून त्यांत ग्रीक तत्वज्ञान शिकविलें जाई.

टार्ससचें वैभव व्यापार, शांतता व सुराज्य यांवर अवलंबून असे. इ. स ६६० च्या नंतर अरबांनीं सर्व सिलिसिआ काबीज केलें. तेव्हांपासून एक शतकाहून अधिक वर्षें टार्ससला हीन दशा प्राप्त झाली होती. परंतु पुढें ७८७ सालीं हरुन अल् रशीदनें तें पुन्हां बांधिलें; व बायझन्टाईन साम्राज्यांशीं झालेल्या युद्धांत याला वायव्येकडील राजधानीचें पद प्राप्त झालें. इ. स. १०९९ मध्यें पहिल्या धर्मयुद्धांत बाल्डवीन व टॅन्क्रेड यांनीं टार्सस घेतलें व त्यांच्यांत त्याच ठिकाणीं भांडण झालें. ११८० सालानंतर जवळ जवळ तीन शतकांपर्यंत हें लेसर आर्मिनियाच्या राज्यांत होतें. १६ व्या शतकारंभीं, हें ओटोमन राज्यास जोडण्यांत आलें.

सार्डानेपॅलस, सॅन्डन, परस्युस, हेरेक्लीस हे असीरियन देव या शहराचे संस्थापक असावेत अशा दंतकथा प्रचलित आहेत. नियमित वेळीं सँडन देवाच्या नांवानें एक चिता रचून त्यांत देवाला जाळीत असत.

प्राचीन शहराचे अवशेष फार आहेत. नवीन शहराचा व्यापार व बाजार चांगला आहे. परंतु हवा खराब आहे. लोकसंख्या सुमारें२५०००असून त्यांत कांहीं हिंदूहि आहेत.

**टालबॉट, विल्यम हेनरी फॉक्स**(१८००-१८७७)-फोटोग्राफीच्या शास्त्रांतील एक सुप्रसिद्ध इंग्लिश संशोधक. त्याचें शिक्षण हॅरो येथें व केंब्रिजच्या ट्रिनिटी कॉलेजमध्यें झालें व १८२१ सालीं त्याला रँग्लरची पदवी मिळाली. लहानपणापासूनच नेत्रशास्त्राची त्याला गोडी असे. १८२६ तं त्यानें ' समएक्स्पेरिमेंट्स ऑन कलर्ड फ्लेम ' या विषयावर एक लेख ' एडिंबरो जर्नल ऑफ सायन्स ' या मासिकांत लिहिला. त्यानंतर 'क्वार्टर्ली जर्नल ऑफ सायन्स' या मासिकांत १८२७ सालीं ' एकरंगी प्रकाश (मोनोक्रोमॅटिक लाइट) हा लेख प्रकाशित केला. याशिवाय रसायनसंबंधीं अनेक विषयांवर त्यानें ' फिलॉसॉफिकल मॅगेझिन ' या मासिकांत लेख लिहिले. त्यांत ' रंगाचे रासायनिक फेरफार ' हा लेख महत्वाचा होय. प्रकाशाच्या द्वारें, काढलेलीं चित्रें डॅगेरी यानें जाहीर रीतीनें लोकांनां ज्यावेळीं दाखविलीं त्यावेळीं टॉलबॉटनेंहि स्वतःचे त्यांच विषयाचे शोध रॉयल एशियाटिक सोसायटीस कळविले. १८४१सालीं त्यानें कॅलोटाइप टालबाटिइप या पद्धतींचा शोध प्रसिद्ध केला व१८५१ त तात्कालिक चित्रें काढण्याची पद्धत निर्माण केली. १८४२सालीं 'पेन्सिल ऑफ नेचर' हा ग्रंथ त्यानें लिहिला. त्यावद्दल त्याला रॉयल सोसायटीचें रंफर्ड मेडल बक्षीस मिळालें. शास्त्रीय शोधाप्रमाणेंच पुराणवस्तुसंशोधनाचीहि त्याला आवड होती. त्यामुळें त्यानें स. १८३८-३९ च्या दरम्यान ' हर्मेस ऑर क्लासिकल अँड अँटिक्वेरियन रिसर्चेस '; व ' इलस्ट्रेशन्स ऑफ दि अँटिक्विटी ऑफ दि बुक ऑफ जेनेसिस' हीं पुस्तकें लिहिलीं. सर हेनरी रॉलिन्सन व डॉ. हिंक्स यांच्याप्रमाणेंच निनेवा येथील कीलाकृति लिपीमधील शिलालेख शोधण्याच्या व लावण्याच्या कामीं यालाहि श्रेय देणें जरूर आहे. यानें १८४२ सालीं इंग्लिश एटिमॉलजीज हा ग्रंथ लिहिला. टालबॉट १८७७ सालीं लॅकॉक ॲव येथें मरण पावला.

**टालमड**—यहुदी लोकांचा धर्मग्रंथ. ख्रिस्ती शकाच्या चौथ्या शतकापासून तो सहाव्या शतकापर्यंतच्या यहुदी लोकांच्या धार्मिक व सामाजिक चळवळींचा वृत्तांत यांत आलेला आढळतो. जुन्या कराराइतकीच याचीहि योग्यता यहुदी लोकांत मानतात. टालमड याचा अर्थ अध्ययन, अध्यापन असा आहे. टालमडमध्यें, मिश्नाह म्हणजे जुन्या करारामधील कायद्यांची धार्मिक व व्यावहारिक प्रश्नांच्या निर्णयांसह सुधारून वाढवलेली आवृत्ति, आणि जेमारांत धर्मव्यवहारविषयक जादा साहित्यांचा अंतर्भाव होतो. टालमडच्या दोन प्रती प्रसिद्ध आहेत. एक बाबिलोनी प्रत व दुसरी पॅलेस्टिनी प्रत. पैकीं पॅलेस्टिनी प्रत हल्लीं अजीबाद मार्गे पडली आहे. टालमडमध्यें, सुसंबद्धरीतीनें कायद्याचें उद्घाटन केलें आहे अशी कोणाची कल्पना असेल तर ती चूक होय. टालमडमध्यें निरनिराळ्या प्रकारचे भानगडींचे प्रश्न व तद्विषयक निर्णय यांची खिचडी आहे. विषयाची मांडणी अव्यवस्थित, आध्यात्मिक विषयावरून एकदम ऐहिक विषयावर व ऐहिक विषयावरून अध्यात्मावर उडी मारण्याची पद्धत, अनेक प्रकारच्या भाषासरणी, अशा तऱ्हेची धेडगुजरी स्थिति टालमडमध्यें दृष्टीस पडते. कांहीं ठिकाणीं टालमडची भाषा अगदींच सूत्रमय व दुर्बोध आहे; व मागील इतिहासाचा संदर्भ माहीत असल्याशिवाय वाक्यांचा अर्थ कळत नाहीं. त्यामुळें मिश्नाहाच्या स्पष्टीकरणार्थ जेमारा उर्फ टीकांची आवश्यकता भासूं लागली. टालमडला कायद्याचा ग्रंथ अगर धर्मग्रंथ हें नांव बरोबर नाहीं. त्याला ज्ञानकोश हें नांव अधिक यथार्थ दिसेल त्यामध्यें ख्रिस्ती शतकाच्या

पहिल्या तीन चार शतकांतील सर्व प्रकारच्या चळवळींचा उल्लेख आलेला आहे.

टालमडमध्यें दुसऱ्या कोणत्याहि यहुदी ग्रंथापेक्षां ओटनें स्थापित केलेल्या धर्माचा विकासच दृष्टीस पडतो. ओटच्या धर्मातील मुख्य मुख्य तत्त्वांचा समावेश टालमडमध्यें झाला आहे व त्याहीपुढें टालमडमध्यें मजल मारली आहे. धार्मिक व व्यावहारिक असा भेद टालमडमध्यें केलेला आढळत नाहीं. धर्माच्या प्रगतीचा नैतिक जीवन हाच पाया आहे असें टालमडची शिकवण असल्यामुळें, नैतिक जीवनाशीं संबद्ध अशा प्रश्नांचा टालमडमध्यें बराचा उहापोह केलेला आढळतो. त्याच्याबरोबर टालमडमध्यें आचारांचें स्तोम फार माजविलेलें आढळतें; पण धार्मिक व नैतिक तत्त्वांचा व आचारांचा मेळ बसविण्याचा टालमडमध्यें बराच प्रयत्न झालेला दिसतो व त्यांत थोडें फार यशहि आलेलें आढळतें. या अखिल विश्वांत परमेश्वर भरला आहे; त्याची पूजा प्रत्येक मनुष्यानें, घरींदारीं, रानांत, वनांत अनन्यभावानें केली पाहिजे, आपलें चित्त शुद्ध केलें पाहिजे, अशा प्रकारची उच्च शिकवण टालमडमध्यें केलेली आपल्याला आढळून येते. पण येवढ्यावरच टालमडची शिकवण थांबली नाहीं. टालमडमध्यें बुद्धीला चालना देणारें साहित्यहि पुष्कळ आहे. टालमडमध्यें निरनिराळ्या विषयांचा समावेश होत असल्यानें सामान्य यहुद्याला देखील टालमड वाचून पुष्कळ विषयांचें ज्ञान आपोआप होत असे, व वाचणाऱ्याच्या बुद्धीला अप्रत्यक्ष चालना मिळत असे. अशा प्रकारें टालमडमध्यें विविधता असल्यामुळें, त्यानंतर रचण्यांत आलेल्या मोझेस मैमोनिडस, जोसेफ कॅरोप्रभृति विद्वानांनीं रचलेल्या कायदेग्रंथांचेंहि टालमडपुढें फारसें तेज पडलें नाहीं. या कायदेग्रंथांत निश्चित प्रकारचें साहित्य आढळतें तर टालमडमध्यें सर्वत्र अनिश्चित परंतु विचारशक्तीला चालना देणारें साहित्य सांपडतें. तात्पर्य, टालमड हा एक अत्यंत महत्वाचा धर्मग्रंथ आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. यामध्यें मनुष्याच्या उन्नतीला अवश्यक अशा सर्व प्रश्नांचा उहापोह झालेला आढळतो. टालमडमध्यें टाकाऊ भाग नाहींच असें नाहीं. पण एकंदरींत सुंदर व महत्त्वाचा ग्रंथ आहे यांत कोणतीच शंका नाहीं. जुडापंथामध्यें जो गूढवाद आढळतो त्या वादाचीं बीजें टालमडमध्यें आढळून येतात.

टा ल म ड चा इ ति हा स.—ज्या शतकामध्यें टालमड ग्रंथ तयार झाला त्याच शतकामध्यें त्या ग्रंथाला व तत्संबद्ध वाङ्मयाच्या प्रसाराला अडथळा येण्यास सुरवात झाली. सन ५२३ मध्यें दोघां यहुद्यांमधील भांडण जस्टिनियन बादशहाकडे मिटविण्याकरितां आलें. वादाचा प्रश्न असा होता कीं एकाचें म्हणणें धर्मग्रंथाचें ग्रीक व हिब्रू या दोन्ही भाषांतून सार्वजनिक वाचन करण्यास हरकत नसावी; व दुसऱ्याचें म्हणणें फक्त हिब्रूमध्येंच या ग्रंथाचें वाचन व्हावें. जस्टिनियननें ग्रीक भाषाच वापरण्यांत यावी असा हुकूम दिला. टालमड हा धर्मग्रंथ व जुना करार त्यांत ख्रिस्ती धर्माचीं तत्त्वें बीजावस्थेंत दृग्गोचर होतात अशी दृष्टि ठेवून ते वाचण्यांत यावे असा जस्टिनियननें विक्षिप्तपणाचा हुकूम केला व त्यामुळें यहुद्यांवर व त्याच्या वाङ्मयावर अरिष्टें कोसळण्यास सुरवात झाली. पुढें १३ व्या शतकांत पॅरिसमध्यें टालमडची प्रत जाळण्यांत आल्यापासून या विरोधाला उग्र स्वरूप प्राप्त झालें. निकोलस डॉनिन या धर्मभ्रष्ट यहुद्यानें पोपला सल्ला देऊन, टालमड ग्रंथ सांपडेल तेथें जाळण्याची आज्ञा जाहीर करविली. फ्रान्समध्यें तर यहुद्यांच्या विरुद्ध जोराचा छळ सुरू झाला; आणि मौज ही होती कीं, ज्या यहुद्यांनीं धर्मांतर केलें होतें त्यांच्याकडूनच या छळाचें बीं पेरलें गेलें. यावेळीं 'कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ' अशी स्थिति झाली.

१६ व्या शतकांतहि टालमड ग्रंथाविरुद्ध चळवळ चालूच होती. पण या शतकांत, रुचलिन व फेफरकोर्न या दोन पंडितांचें टालमडवरील माजलेलें वाग्युद्ध फार महत्त्वाचें झालें. फेफरकोर्न हा ख्रिस्ती झालेला यहुदी होता. अर्थात धर्मांतराचा दुरभिमान त्याच्यामध्यें पूर्णपणें वसत होता. रुचलिन हा टालमडचा कैवारी व पंडित होता. 'टालमडमध्यें चुका असतील तर त्या काढून टाका पण तो ग्रंथ जाळणें मूर्खपणाचें व अन्यायाचें आहे' असें त्यानें प्रतिपादन केलें व याहि पुढें जाऊन विश्वविद्यालयामध्यें ही वाङ्मयाची शाखा सुरू करण्याचा त्यानें यशस्वी प्रयत्न केला. त्याच्याच प्रयत्नानें टालमड ग्रंथ सन १५१० त संपूर्ण रीतीनें प्रकाशित झाला. पण थोडक्याच वर्षांनंतर त्याच्यावर धाड आली. टालमड ग्रंथांत ख्रिस्ती धर्माला प्रतिकूल असा जो मजकूर असेल तेवढा गाळून बाकीचा टालमड छापण्यास कांहीं हरकत नाहीं असा ट्रेंटाईनच्या धर्मपरिषदेंत ठराव केला. १७५७ सालीं पोलंडमध्यें पुन्हां एकदां टालमड ग्रंथ जाळण्याची टूम निघाली पण अशा मूर्खपणाच्या कृत्यानें टालमड ग्रंथ नामशेष होण्याचें दूरच राहिलें व मूर्खपणा मात्र जाळणाऱ्यांच्या पदरीं पडला. तात्पर्य टालमडमध्यें कांहीं दोष असले तरी ते उदात्त आहेत. त्यांत गुणांचें प्रावल्य जास्त आहे. त्यांत उच्च तत्त्वांचा उहापोह आहे; व प्राचीन यहुद्यांच्या चळवळींचा इतिहास त्यांत अप्रत्यक्षपणें ग्रथित झाला आहे, या दृष्टीनेंहि टालमडचें महत्त्व आहे व तें अनंतकालपर्यंत राहीलहि यांत संशय नाहीं.

**टॉलस्टॉय, लिओ** (१८२८–१९१०)—रशियांतील एक विख्यात कादंबरीकार व समाजसुधारक. याचा जन्म ता. ९ सप्टेंबर १८२८—कोणी म्हणतात ता. २८ आगस्टरोजीं झाला. टॉलस्टॉयचें घराणें मूळचें जर्मन असून तें पीटर दि ग्रेटच्या काळांत रशियांत राहण्यास आलें. याच्या पूर्वजांपैकीं प्रथमच लौकिकास चढलेला मनुष्य पीटर ॲन्ड्रिव्हिच टॉलस्टॉय हा होय. टॉलस्टॉयचा बाप निकोलस हा सैन्यांत

काहीं दिवस नोकरीवर होता. पुढें त्याचें लग्न मराया व्हॉल-कनस्काया नांवाच्या एका राजकन्येशीं झालें. कौंट टॉलस्टॉय हा या दांपत्याच्या पांच अपत्यांपैकीं चौथें असून याची आई हा तीन वर्षांचा असतांना वारली. यानंतर सहा वर्षांनीं त्याचा बापहि वारला. लहानपणीं टॉलस्टॉय विचारशील व शोधकबुद्धीचा, प्रत्येक गोष्टींचें निरीक्षण करणारा असे खरा; परंतु, त्याची बुद्धिमत्ता त्यावेळेस फारशी झळकली नाहीं. त्याच्यावर मायेच्या दृष्टीनें नजर ठेवणारा कोणीच शिल्लक न उरल्यामुळें त्याला ही उणीव फार जाचक वाटे. तो मोठा झाल्यावरसुद्धां याच कारणानें आपल्या स्नेहीमंडळींतसुद्धां फारसा न मिसळतां तासचे तास एकान्तांत चिंतन करण्यांत घालवी. त्याच्या लहानपणांत एक दिवस त्याच्या मनांत "मरणाचें ताट आपल्यापुढें नेहमींच वाढून ठेविलेलें आहे; आपल्याला सुखी व्हावयाचें असेल तर चाललेली घडी आपली समजून भविष्यकालाचा विचार न करतां आनंदांत काळ घालवावा" असे विचार कसे आले त्याचें त्यानें वर्णन लिहून ठेविलें आहे. असे विचार येतांच त्यानें आपल्या पेन्सिली व बुकें फेंकून देऊन, विछान्यावर पडून खाणें, पिणें, मजा मारणें, कादंबऱ्या वाचणें वगैरेंत काळ घालविण्यास सुरवात केली. तरी परंतु, त्याच्या बापाला शिकारीचा वगैरे नाद असल्यामुळें, त्याच्या नादानें या प्रकारच्या त्याच्या वागण्यास थोडासा आळा बसला.

बापाच्या मृत्यूनंतर टॉलस्टॉय व त्याचीं भावंडें यांचें पालकत्व त्याच्या एकामागून एक दोन आत्यांकडे आलें. युक-शॉव्ह या आत्येचीं नीतीसंबंधाचीं मतें फार उदारपणाचीं होतीं, व ही बाई संगतिप्रिय असल्यामुळें कोणाहि आल्या-गेल्यास तिच्या घरीं मज्जाव नसे. या बाईच्या देखरेखीखालीं येण्याच्या वेळेस टॉलस्टॉय ११ वर्षांचा होता व या बाईच्या वर्तनाचा त्याच्यावर जो परिणाम झाला तो एकंदरीनें वाईटच होता, असें टॉलस्टाय स्वतः पुढें म्हणे. काझन येथील युनिव्हर्सिटींत प्रवेश करण्यापूर्वी टॉलस्टॉय व त्याचीं भावंडें एका फ्रेंच शिक्षकाच्या हाताखालीं शिकत असत. फुरसतीच्या वेळीं टॉलस्टॉय आपले दिवस मानवी चरित्रासंबंधाच्या निरनिराळ्या प्रश्नांचा विचार करण्यांत घालवी, व कधीं कधीं तो तालमींत कसरतहि करीत असे.

आपल्या वयाच्या १५ व्या वर्षीं टॉलस्टॉय युनिव्हर्सिटींत शिरला. या ( काझन ) युनिव्हर्सिटींत बडे बापके बेट्यांचा लौकर प्रवेश होई. असला या युनिव्हर्सिटीचा लौकिक असल्यामुळें टॉलस्टॉयला आपल्या आवडत्या विषयावर म्हणजे समाजासंबंधीं उत्पन्न होणाऱ्या निरनिराळ्या प्रश्नांवर विचार करण्यास सांपडत असे. मनुष्यानें जगांत कशाकरितां जगावयाचें अशासार... ...य नेहेमीं विचार करीत असे; व... ...णें इतर ग्रंथकारांच्या वचनां... ...विचार प्रगट करण्याकडे या... ...परिस्थि...

मुळें त्याचें लक्ष पौर्वात्य भाषांकडे वळलें. परंतु त्याच्या अष्टपैलु बुद्धीला तो एकांगी अभ्यास रुचेना, तेव्हां १८४५ सालीं त्यानें कायद्याकडे आपला मोर्चा वळविला. इतिहास, धर्म व कायदा यांचें अध्ययन करून त्यांत युनिव्हर्सिटीची पदवी घ्यावयाची असा शेवटीं त्याला बेत करावा लागला. धार्मिक बाबतींत त्याचें विलक्षण मतांतर होऊन टॉलस्टॉय पुरा नास्तिक बनला. इतिहास हा विषय तो कुचकामाचा समजे. शेवटीं १८४७ सालीं प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें युनिव्हर्सिटी सोडून टॉलस्टॉय बाहेर पडला व येथेंच त्याच्या शिक्षणाची इतिश्री झाली. याच्या बुद्धीची व स्वतंत्र विचारांची कांहीं थोडे लोक तारीफ करीत. परंतु, या त्याच्या सोबत्यांपैकीं एकाच्या मनांत टॉलस्टॉय म्हणजे पुढें सबंध रशियांतील प्रख्यात कादंबरीकार होणार आहे असें आलें नसेल.

पुढें शेतीभातीकडे लक्ष देऊन शेतकीची स्थिति सुधारावी व जमीनदार या नात्यानें आपलें कर्तव्य बजावावें म्हणून टॉलस्टॉय आपल्या गांवीं आला. परंतु १८४? सालींच दुष्काळ पडून लोकांची अन्नान्नदशा झाली. युनिव्हर्सिटींत काळ कंठीत असतांना यानें जीन जॅक्स रूसो याचे ग्रंथ वाचले होते. साधी राहणी, कामांत सचोटी, वगैरे बद्दलच्या रूसोच्या मतांचा याच्यावर विलक्षण परिणाम झालेला होता. या ध्येयाच्या प्राप्त्यर्थ प्रयत्न करावयाचे म्हणून तो मोठ्या उत्साहानें उद्योगास लागला. परंतु, वारंवार येणाऱ्या निराशेच्या लाटांशीं झगडण्याइतकें आत्मबल टॉलस्टॉयपाशीं अद्यापि आलेलें नव्हतें. म्हणून सहा महिनेपर्यंत असा झगडा केल्यावर शेवटीं त्यानें या बाबतींतला प्रयत्न टाकून दिल्यासारखें केलें. व अखेर अखेर तर त्यानें आपल्या भावाच्या संगतींत शिकार करणें, द्यूत खेळणें, वगैरेंत काळ काढून उच्च विचारांना अजीवाद वाऱ्यावर सोडून दिले. १८५१ सालीं हा आपल्या निकोलस नांवाच्या वडील भावाजवळ जाऊन राहिला व तेथें दरमहा १२ शिलिंग भाड्यानें एक झोंपडी घेऊन तींत अत्यंत काटकसरीनें राहूं लागला. पुढें भावाच्या व मोठमोठ्या हुद्द्यांवर असलेल्या नातलगांच्या भिडेमुळें टॉलस्टॉय लष्करांत शिरण्यास तयार झाला. टिफ्लिस येथें जाऊन जरूर ती परीक्षा पास होऊन त्या वर्षाच्या हिंवाळ्यांत तो लष्करांत सामील झाला. काकेशस पर्वतांतील लोकांपासून रशियाला या कालांत अत्यंत त्रास पोंहोंचत असे. हे लोक वारंवार येऊन पुंडावा करीत व लूट लुटून नेत. तथापि लष्करी काम किंवा खेळ यांत टॉलस्टॉयचें मन कधींच पूर्णपणें रंगलें नाहीं; आणि आतां त्याच्या ईश्वरदत्त देणगीच्या सुप्त असलेला प्रभाव जणूं जागृत झाला व त्यानें लेखणी उचलली. त्याचे सुरस ग्रंथ एकामागून एक बाहेर पडूं लागले. 'चाइल्डहुड' ( 'बाल्य' ) हा त्याचा पहिला ग्रंथ होय. टॉलस्टॉय ...ी चोवीस वर्षांचा होता. या ग्रंथानंतर 'लँडलॉर्डस्

मॉर्निंग ( जमीनदाराचा उषःकाल ), ' बॉयहुड (' पौगंडावस्था ), 'यूथ' ( तारुण्य ) वगैरे त्याचे ग्रंथ एकामागून एक प्रसिद्ध होऊं लागले. तो आपल्या मित्रांनां चरफडून सांगे कीं, " बाबांनों, मानवी जीविताचें रहस्य, व सुखाचें साधन आपल्यास अजून उमगलें नाहीं. साध्या सृष्टिनियमानुसार चालणाऱ्या जीवितक्रमांत काय मौज आहे ती अनुभवून पहा म्हणजे सृष्टीच्या नियमानुसार, त्यांत कृत्रिमपणा न आणतां वागण्यांतच खरें सुख आहे,सृष्टिवैभवाच्या अवलोकनांतच काय ती मौज आहे, सृष्टीशीं हितगुज करणें यांतच शुद्ध ब्रह्मानंद आहे असें तुमच्या अनुभवास येईल." याच वेळेस क्रिमिअन युद्ध सुरू होत होतें व टॉलस्टॉयहि कंटाळून घरीं परत जाऊं इच्छित होता.

टॉलस्टॉय स्वदेशीं आला तेव्हां तो अगदींच निराळ्या विचाराचा असा बनून आला. निःस्वार्थबुद्धीनें देशाकरितां शत्रूंशीं लढणारे शिपाई व त्यांची कामगिरी डोळ्यांनीं पाहून आल्यानंतर, स्वार्थासाठीं धडपडणाऱ्या उमरावांकडे पाहिल्याबरोबर त्याला या उमरावांपेक्षां ते सामान्य शिपाईच बरे वाटले. त्यानें जे जे प्रसंग डोळ्यांनीं पाहिले, गरीब शिपायांचा भाबार्थीपणा जो त्याच्या दृष्टीस पडला,त्याच्या योगानें त्याचा परमेश्वरावरील विश्वास वाढत चालला. सेबॅस्टपूल व काकेशस येथील गोष्टींच्या वर्णनानें त्याच्या कीर्तींत भर टाकली होती. रशियांत परत आल्यानंतर अधिकारी व सामान्य जनता त्याचें स्वागत करण्यास तयार होती. त्याचें ' बाल्य ' हें पुस्तक ज्या मासिकांत प्रथमतः प्रसिद्ध झालें त्याच्या लेखकवर्गांत बरीच ठळक ठळक मंडळी होती. या ग्रंथकारांच्या ओळीस बसण्याचा मान मिळणें ही मोठीच गोष्ट समजली जात असे. चोहोंकडून असा मानमरातबांचा वर्षाव होऊं लागल्यावर त्याची संन्यासप्रिय वृत्ति लुप्त होत चालली होती. तरी एका अर्थी त्या वृत्तीचा विकासहि त्याचमुळें झाला असें म्हणावयास हरकत नाहीं. त्याची मूळची प्रवृत्ति हळू हळू जोरावूं लागली व सत्यसंशोधनाकडे त्याचा कल वळला. सोयगैरसोय व कृत्रिम आचार या गोष्टींचे जे भोक्ते होते त्यांचा या निर्मळ सत्यसंशोधकाशीं वारंवार मतभेद उत्पन्न होऊं लागला.

टॉलस्टॉयला याप्रमाणें आपल्या परिस्थितीचा वीट येत चालला होता. दुसरा अलेक्झांडर गादीवर बसल्यापासून रशियामध्यें ' समाज ' व ' प्रगति ' ह्या दोन गोष्टी रशियन लोकांच्या कानाला फार प्रिय वाटत. जर्मनीमध्येंहि तीच स्थिति होती. सामाजिक कादंबरी या वाङ्मयप्रकाराचा उदय जर्मनींतच आरंभिला गेला व तेथून ती लाट रशियांत आली. या जर्मन गोष्टींचा टॉलस्टॉयच्या मनावर कायमचा संस्कार होऊन, आपल्या अंतःकरणांत गुप्त असलेल्या विचारांचाच प्रतिध्वनि जर्मनींत झालेला पाहतांच त्याला आत्मप्रत्यय आला. आजपर्यंत स्वस्थ बसल्यानें जणुं ठाणबंद झालेल्या त्याच्या स्फूर्तीला एकदम चेव येऊन त्यानें 'पॉलिकौश्क' ही कादंबरी लिहिली. शेवटीं प्रगति व सुधारणा या गोष्टींनीं त्याला भारून टाकलें व इतर देशांतील संस्थांचा अभ्यास करण्यासाठीं तो १८५७ सालच्या जानेवारी महिन्यांत जर्मनींत गेला. टॉलस्टॉयनें रशियाची सरहद्द फक्त तीनदां ओलांडिली व तीहि १८५७ ते १८६१ च्या दरम्यान.

इ. स. १८६१ मध्यें तो परत आला. नंतर त्यानें परदेशांत मिळविलेल्या माहितीवर विचार करण्यास सुरवात केली. त्याच्या मनानें त्याला चोहोंकडे निराशाच दिसत होती. जर्मनीमधील शिक्षणपद्धति मात्र नाहीं म्हणावयास त्याला कांहींशी आवडली. त्यानें जर्मनींत असतांना ऑरबॅकची ओळख करून घेतली. ऑरबॅकच्या प्राथमिक शाळांसंबंधाच्या विचारांनीं टॉलस्टॉयच्या मनावर बराच पगडा बसविला. फ्रोबेलच्या किंडरगार्टन पद्धतीनें तर जवळ जवळ याला भारून टाकलें. या पद्धतीवर शाळा काढण्यासाठीं खटपट करून त्यानें परवानगी मिळविली; व उत्साहाच्या तडफेबरोबर त्यानें ' यस्न्ययपोल्यनें ' नांवाचें एक शिक्षणविषय नियतकालिक काढण्यास सुरवात केली. ही शाळा काढण्यास टॉलस्टॉयनें वेळ मोठी चांगली पाहिली. कारण रशियांत यावेळेस सर्वत्र उदारमतवादीपणाचें वारें संचारलें होतें, नव्या मनूला आरंभ झाला होता. टॉलस्टॉयची शाळा सर्वच बाजूंनीं ' मोफत ' होती. टॉलस्टॉय फी घेत नसे इतकेंच नव्हे तर मुलें शाळेंत वाटेल तेव्हां येत; वाटेल तेव्हां जात, व वाटेल तें शिकत. ज्या गोष्टीला सक्तीचा नुसता वास येत आहे तिच्यापासून देखील राष्ट्राचें अकल्याण होईल अशी त्याची भावना होती. " आपल्या अंतःकरणप्रवृत्तीला पटत नाहीं असल्या अभ्यासक्रमाचें जोखड मानेवर घेण्याचें नाकारण्याची परवानगी-इतकी स्वतंत्रता विद्यार्थ्याला असली पाहिजे" असें त्याचें मत होतें. पुढच्या पिढीला काय पाहिजे हें जुन्या लोकांपेक्षां त्यांचें त्यांनांच कळतें असें तो म्हणे. अशा तत्त्वांवर टॉलस्टॉयची शाळा त्याच्याच घराशेजारच्या एका घरांत सुरू झाली; टॉलस्टॉय स्वतः चित्रकला, गायन व वाद्यवल शिकवी. 'ओल्ड टेस्टॅमेंट' हें त्याचें आदर्शपुस्तक असून या पुस्तकावांचून कोणतीहि शिक्षणपद्धति पुरी नाहीं, व या पुस्तकाचा कित्ता प्रत्येक पुस्तककर्त्यानें घ्यावा असें तो म्हणे.

टॉलस्टॉयचीं मतें सरकारमान्य नसल्यामुळें त्याच्या शाळेकडचा लोकांचा ओढा कमी होत चालला. दुसऱ्या वर्षी त्याला शाळा बंद करावी लागून त्याचें नियतकालिकहि थंडावलें. या गोष्टीनें त्याच्या मनाला एक प्रकारें धक्का बसला. पुढें कांहीं काळानें टॉलस्टॉयनें पुन्हां परवानगी मागितली; परंतु, सरकारी अधिकाऱ्यांनीं उर्मटपणानें ती नाकारिली.

टॉलस्टॉयचीं सामाजिक मतें आतां पूर्ण विकसित झालेलीं होतीं. तो सामान्य जनतेपुढें शिष्ट लोकांनां तुच्छ मानी. " शिष्ट लोकांनीं 'प्रगति' व 'शिक्षण' यांचा अर्थ एकच

समजण्यांत मोठी चूक केली व म्हणून ह्यांनीं सुरू केलेल्या सक्तीच्या शिक्षणाचे घातुक परिणाम झाले. मनुष्याच्या आयुष्यक्रमांत त्याचें शील बनविण्याच्या कामीं लिहिणें व वाचणें या दोन गोष्टींचा उपयोग फार थोडा आहे व मनुष्याची जीवितयात्रा सुखावह करण्याच्या कामीं त्यांची फारशी जरूरी नसते " असें याचें मत होतें. " हे प्रश्न जनतेवरच सोंपविणें बरें, जनतेला काय पाहिजे हें तिचें तिलाच अधिक कळतें," असा एकंदर टॉलस्टॉयच्या मतांचा मथितार्थ आहे. "शिष्टंमन्य लोकांपेक्षां सामान्य जनता हीच अधिक बलवान्, अधिक स्वतंत्र विचाराची, अधिक न्यायी असून तिलाच माणुसकीची चाड अधिक आहे. तेव्हां समाजाला सामान्य जनतेचीच जरूर अधिक. सामान्य जनतेनें शिष्टंमन्य लोकांच्या शाळांतून जाण्यापेक्षां या लोकांनींच जनतेपासून धडे घेतले पाहिजेत," हे टॉलस्टॉयचे विचार फ्रेंच सुधारक रूसा याच्या विचारासारखेच आहेत. पुढें टॉलस्टाय सामाजिक बाबतींत पूर्वीपेक्षां अधिक लक्ष घालूं लागला. या अवधींत त्यानें 'थ्री डेथ्स' (तीन मृत्यू ,१८५९) व 'कोसाक्स'(१८६३)हे दोन ग्रंथ प्रसिद्ध केले. यांपैकीं कोसाक्स ग्रंथ' तीन मृत्यू' या ग्रंथापूर्वीच दहा वर्षें लिहिला गेला होता. ह्याची मुख्य कल्पना म्हणजे " सुधारणा—भौतिक सुधारणा—ही खऱ्या सुखाच्या वाटेंतील एक धोंड आहे" ही होय. यानंतर टॉलस्टॉयचें त्याची जुनी मैत्रीण सोफाया हिच्याशीं लग्न झालें. सोफायाचा बाप एक शोकीन डॉक्टर असून त्याचा जन्म, शिक्षण वगैरे मॉस्को शहरींच झालें होतें. सोफाया ही त्याची दुसरी मुलगी. टॉलस्टॉयला एकंदर १३ अपत्यें झालीं; पैकीं, पहिल्याचा जन्म १८६३ च्या जूनमध्यें झाला. मुलांच्या शिक्षणाच्या बाबतींत तो प्रयोग वगैरे करण्याच्या भानगडींत पडला नाहीं. तो मुलांना शिक्षा फार थोडा वेळ करी. त्याची मुख्य शिक्षा म्हणजे ज्यानें कांहीं अपराध केला असेल त्याच्याशीं इतरांनीं अबोला धरावयाचा ही होय; व हा बहिष्कार त्या मुलानें स्वतःचा अपराध कबूल करीपर्यंत काढावयाचा नाहीं. टॉलस्टॉय आपल्या मुलांत मिसळून खेळे, त्यांच्याशीं कसरत वगैरे करी. त्याला स्वतः हातानें श्रमाचीं कामें करण्याचा नाद होता. त्याच्या शेतीभातीच्या कामाकडे त्या गोष्टीचा चांगला उपयोग होई. हा बाहेर फिरावयास गेला म्हणजे एखाद्या मजुराचें खुरपें किंवा विळा घेऊन मोठ्या आवडीनें काम करूं लागे.

'युद्ध व शांतता' व 'ॲना कॅरेनिना' या त्याच्या दोन कादंबऱ्या त्यानें या वेळेसच सुरू केल्या. परंतु रशियामधील ' कॉन्झरव्हेटिव्ह' किंवा' लिबरल, या दोन्ही पक्षांनीं त्याचा फारसा आनंदानें स्वीकार केला नाहीं. स्वभाववर्णन करण्यांत टॉलस्टॉय हा कुशल असे खरा; परंतु त्याला कादम्बरी लिहिण्याकरितां मुद्दाम म्हणून प्रयत्न करावा लागे. 'लेखणी घेऊन लिहावयास बसल्याखेरीज स्फूर्ति उत्पन्न होत नाहीं', असें तो म्हणे.

या कादम्बऱ्यांच्या संबंधानें टॉलस्टॉय व त्याचा स्नेही फेट यांच्यांत जो पत्रव्यवहार झाला त्यांत टॉलस्टॉयच्या शेतकीबद्दल व जमीनदारांबद्दल किरकोळ उल्लेख आहेत. तो म्हणे ' गुमास्ते, मुकादम, वगैरे लोक शेतीच्या कामीं अगदीं कुचकामाचे होत. त्यांच्यामुळें शेती वाढण्याच्या ऐवजीं कमी मात्र होते. या सर्वांना हांकून देऊन मालक जरी १०–१० वाजेपर्यंत बिछान्यांत पडून राहिला तरी त्यापासून फारसें नुकसान होणार नाहीं. "

टॉलस्टॉयनें विश्रांति न घेतां कादंबऱ्या लिहिण्याचें काम चालविलें होतें. परंतु, हे एकदम केलेले श्रम त्याला सहन झाले नाहींत व तो आजारी पडला; व १८७० सालीं त्याच्या बायकोनें त्याला समर येथें जाण्याची सल्ला दिली. समर येथील डॉक्टरांची पद्धति वगैरे त्याला पसंत होती. तो राहत होता त्या ठिकाणच्या लोकांची रहाणी वगैरे याच्या स्वभावाला अनुरूप अशीच होती. समर येथील या सफरीनें त्याच्या मनावर एवढा परिणाम झाला कीं, त्यानें लागलीच २००० एकरच्यावर जागा तेथें विकत घेतली. परंतु पुढें लवकरच दुष्काळ वगैरे पडल्यानें त्याला त्यापासून व्हावें तितकें सुख झालें नाहीं. टॉलस्टॉयनें शोपेनहारच्या तत्त्वज्ञानाचा थोडासा अभ्यास केला व त्याच्या ग्रंथांचीं भाषान्तरें करण्याचा उद्योग त्यानें आरंभिला.

कांहीं दिवस याप्रमाणें थोडेसे शांततेंत गेल्यावर टॉलस्टॉयवर संकटें येऊं लागलीं. १८७३ सालीं त्याचीं दोन मुलें वारलीं; व लागलीच त्याची प्रेमळ आत्या एर्गोल्स्काय ही हि वारली. या गोष्टींनीं व रूसो–टर्किश युद्धामुळें त्याचे विचार अधिकच प्रौढ बनले. पारमार्थिक विचारांकडे त्याचें मन जास्त जाऊं लागलें.

टॉलस्टॉय आतां आपल्या आयुष्याच्या तिसऱ्या अवस्थेंत होता. त्यानें स्वतःच आपल्या मानसिक विकासाच्या तीन अवस्था लिहून ठेविल्या आहेत. पहिली अवस्था म्हणजे आपल्या स्वतःच्या वैयक्तिक सुखाकरितां काळ काढणें ही होय. ह्या अवस्थेंत तो वयाच्या ३४ व्या वर्षापर्यंत होता. नंतर, समाजाच्या कार्यार्थ झटणें ही दुसरी अवस्था होय. पण, सर्वांत महत्त्वाची अवस्था म्हणजे तिसरी. या अवस्थेंत ' परमेश्वराची भक्ति ' हेंच त्याचें अवतारकार्य होऊन बसलें होतें. धर्मसंबंधानें त्याचीं मतें प्रत्येक अवस्थेंतून गेलेलीं होतीं. लहानपणीं तो निमूटपणें देवळांतून प्रार्थनेसाठीं वगैरे जात असे. तारुण्यांत त्यानें धर्माला केव्हांच रजा दिली होती; व पुढें प्रौढावस्थेंत पुन्हां त्याचे विचार आस्तिक्याकडे वळले. परंतु अखेर ' रूसो–टर्किश ' युद्धांत ' भिक्षुकवर्ग ' शत्रुनाशासाठीं प्रार्थना करितांना पाहून त्याची भावार्थबुद्धि नष्ट झाली व तो तत्त्वविषयक विचारांकडे वळला. येणेंप्रमाणें कादम्बरीकार टॉलस्टॉयचा अखेर तत्त्वज्ञ

टॉलस्टॉय वनला. दिवा मालविण्याच्या वेळेस जशी त्याची ज्योत मोठी होते तद्वत् टॉलस्टॉयच्या प्रतिभेनें पुन्हां एकदां उचल खाली व ' इव्हान इलिइचचा मृत्यु ' व ' अज्ञानाचा तडाखा ' या त्याच्या कादंबऱ्या बाहेर पडल्या. परंतु, या पुढचे त्याचे लेख बहुतेक नीतिविषयक होते. यावेळेस त्याचें वय ५० वर्षांचें होतें. त्याचें आयुष्य बाह्यतः दिसण्यांत शांततेचें होतें खरें; पण त्याला अनेक प्रकारचा मानसिक त्रास भोगावा लागला होता.

' साधेपणा ' हें त्याच्या राहणीचें आद्य तत्त्व होऊन वसलें होतें. परंतु एवढी खटपट जरी केली तरी टॉलस्टॉयला घरादाराचा त्याग करतां आला नाहीं. टॉलस्टॉयला जरी साधु बनावयाचें होतें, तरी मित्रमंडळी व इतर नात्यागोत्याचे लोक यांच्याकडे त्याला अगदीं दुर्लक्षच करितां आलें नाहीं. त्याला शहरच्या राहणीचा मनापासून कंटाळा आला होता. " मनुष्याच्या गरजा जेवढ्या थोड्या तेवढा तो जास्त सुखी " असें तो म्हणे. या त्याच्या एकंदर विचारामुळें त्याच्या मनःस्थितींत विलक्षण फरक पडला. कॉकेशसमधील ' डॅऊकहॉबरस् ' नांवाच्या लोकांच्या चळवळींत हा शेवटीं शेवटीं पडला होता; व ' रिसरेक्शन ' नांवाचा आपला ग्रंथ त्यानें या लोकांच्या मदतीदाखल लिहिला. या पुस्तकांत त्यानें जुन्या धार्मिक लोकांवर टीका केली. त्यामुळें २२ फेब्रुआरी १९०१ रोजीं त्याच्यावर धर्मगुरूंच्या आज्ञेनें बहिष्कार पडला. पुढें पुढें हा सर्व चळवळींत मन घाली. परंतु म्हातारपणामुळें त्याच्यानें सर्व गोष्टी झेंपत नसत. टॉलस्टॉय हा ता. २० नोव्हेंबर १९१० रोजीं अस्टपॉवो येथें निमोनिआच्या विकारानें मरण पावला.

" आपण जगतों कां ? " व " आपण आपलें जिणें कसें जगवावयाचें ? " या दोन प्रश्नांचीं समाधानकारक उत्तरें त्याला त्याच्या हयातींत मिळालींच नाहींत. " मनुष्याचें जिणें म्हणजे एक वेड्याखुळ्यांचा बाजार आहे. व जगावयाचें म्हणजे आहे तें गोड करून रहावयाचें इतकेंच"! असें त्याचें मत होतें. त्याच्या मतें, जर कोणाचें जीवित चांगलें व सुखी असेल तर तें शेतकऱ्यांचें व दरिद्री लोकांचें होय. इतर प्राण्यांप्रमाणें अतिशय थोड्या गरजांत आपलें काम भागवून राहणें हेंच सुखमय जीवित असें तो म्हणे. परमेश्वराच्या निर्देशाप्रमाणें वागणें म्हणजे सर्व ऐहिक सुखांचा त्याग करून सर्वभूतीं नम्र होऊन सर्वांनां उपकारक होईल अशा तऱ्हेनें वागणें होय असें टॉलस्टॉय म्हणत असे. या शुद्ध धर्मतत्त्वांखेरीज इतर गोष्टी त्याला अगदीं नापसंत होत्या. म्हणजे थोडक्यांत सांगावयाचें तर टॉलस्टॉय हा नास्तिक नव्हता तर त्याचा ख्रिश्चन आचारांविचारांवर विश्वास नसे इतकेंच. बायबल वाचून त्याचें असें मत झालें कीं, येशूनें पांचच नव्या आज्ञा पाळावयास सांगितल्या आहेत— ( १ ) सर्वांशीं गुण्यागोविंदानें राहाणें. अक्रोध, रागशून्यता, हा ख्रिस्तानुयायांचा पहिला गुण होय. ( २ ) एकपत्नीव्रतानें राहणें. ( ३ ) शपथ मुळींच न घेणें (यामध्यें कायद्याच्याकोर्टांतील शपथाहि येतात ). (४)पापाचा प्रतिकार न करणें. पाप नाहींसें करण्याचा उपाय,तें होण्याचीं कारणेंच नाहींशीं करणें हा होय. जबरदस्तीनें दाबून टाकून पापें नाहींशीं होत नाहींत.आणि(५)"आपल्या शत्रूंवरहि प्रेम करा " ही ख्रिस्ताची पांचवी आज्ञा होय. अर्थात् लढाया वगैरेंनां ख्रिस्ती धर्माची अनुज्ञा मुळींच नाहीं.

टॉलस्टॉयचीं मतें त्याच्या स्वतःच्या ग्रंथांत जितकीं स्पष्टपणें नमूद झालेलीं आहेत तितकीं कोठेंहि नसतील. 'बाल्य' ( १८५२ ), ' पौगंडावस्था ' ( १८५४ ) व ' तारुण्य ' (१८५५–५७) हे ग्रंथ जवळ जवळ आत्मचरित्रपरच म्हटले तरी चालतील. याच्या ग्रंथांत कथानक वगैरे फारसें नसून विचारांची उत्क्रान्तीच विशेषतः दाखविलेली आहे. यांतील कळकळ व आस्था हीं कौतुक करण्यासारखीं आहेत. ' युद्ध व शांतता ' ( १८६४–६९ ) या पुस्तकांत त्यानें रशियन समाजाचें चित्र रेखाटलें आहे. पुरुषांनां कीर्ति मिळविण्याची व सुख भोगण्याची हांव सुटलेली, व बायकांनां गप्पागोष्टी करण्याची हांव सुटलेली होती, असें यांत दाखविलें आहे. पीटर बेझोचॉव हें चित्र टॉलस्टॉयनें फारच सुंदर रंगविलें आहे. हा गृहस्थ म्हणजे प्रति टॉलस्टॉयच होय. याच्या नंतरचें पुस्तक म्हणजे ' ॲना कॅरिनाना ' हें होय. यांत अलीकडच्या रशियन समाजाचें चित्र रेखिलें असून प्रेमाभावामुळें शुष्क भासणारें वैवाहिक आयुष्य व प्रेमार्द्रतेमुळें सुखमय वाटणारें वैवाहिक आयुष्य यांच्यांतला विरोध मार्मिकपणें दाखविला आहे. १८९० सालीं यानें ' क्रूझर सोनाटा ' नांवाचें पुस्तक लिहून यांत रशियांतील विवाहसंस्थेवर तडाखे ओढले आहेत. टॉलस्टॉयचे ग्रंथ ज्यांनां माहीत नव्हते असले वाचक तर या ग्रंथानें स्तंभितच झाले. जेथें शुद्ध प्रेम आहे असलेंच लग्न व तेंहि केवळ मानववंश चालावा या हेतूनें केलेलें क्षम्य आहे. इतर लग्नें नीतिपोषक नसून उलट नीतीचा घात करणारीं होत, असें टॉलस्टॉयनें यांत प्रतिपादिलें आहे. १८९८ सालीं ' कला म्हणजे काय ? ' या विषयावर त्यानें पुस्तक लिहून सौंदर्यशास्त्राची मीमांसा केली आहे. या भावनेच्या सर्व व्याख्या नापसंत ठरवून कला म्हणजे ज्याच्या योगानें एकाच्या मनांतील भावना दुसऱ्याच्या मनांत उद्भूत होते ती होय, असें टॉलस्टॉय यानें म्हटलें आहे. देशाभिमान, धर्माभिमान किंवा वैषयिक प्रेम यांपैकीं कोणत्याहि गोष्टीचा पगडा न बसतां ज्याच्या योगानें मनांत प्रेम व आदर उत्पन्न होतो ती कला तें सौंदर्य असें टॉलस्टॉय म्हणत असे. निरभिलाप आनंद ज्यापासून होतो तें सौंदर्य, ही कॉटची व्याख्या किंवा शेले व हेगेल यांची ' पूर्णावस्थेचीं जवळजवळ बरोबरी करणारें तें सौंदर्य ' ही व्याख्या या सर्व टॉलस्टॉयनें नापसंत ठरविल्या होत्या. या विषयावर विचार करण्यांत त्यानें १५ वर्षें घालविलीं होतीं.

**टॉलेमी क्लॉडिअस**—हा प्रख्यात गणिती, ज्योतिषी व भूगोलशास्त्रज्ञ ईजिप्तचा रहिवाशी, थीबेड येथें जन्मला. अलेक्झांड्रिया येथें हा अँटोनिनस पायसचा नौकर म्हणून रहात असे. अलेक्झांड्रा बंदराजवळील क्यानोपस येथील सेरापीसच्या देवळांतील खांबावर, टॉलेमीनें लावलेल्या खगोलशास्त्रांतील शोध कोरून ठेविलेले आहेत. यानें इ. स. १२७ त पहिला व १५१ त शेवटचा शोध लावल्याचें आढळून आलें आहे. त्यानें अलेक्झांड्रा येथूनच ग्रहांचे वेध घेतले होते. कांहींचें म्हणणें कीं, हा अलेक्झांड्राच्या टॉलेमी राजघराण्यांतीलच एक पुरुष होता. परंतु या म्हणण्यास बळकट पुरावा नाहीं. अरबी दंतकथांवरून हा७८ वर्षें जगला असें दिसतें.याच्या भूगोल,ज्योतिष व गणितशास्त्रांबद्दलची माहिती ज्ञानकोशाच्या पांचव्या विभागांत( पृ.३३७–३९ व पृ. ५७१ ) आली आहे.

**टॉलेमी फिलाडेल्फस**—( ख्रि. पू. २८५—२४७ ) अलेक्झांडरनें ईजिप्त काबीज केला होता; त्याच्या मृत्यूनंतर त्यावर टॉलेमी या पुरुषाचा अंमल बसून, त्याची राजधानी अलेक्झांड्रिया झाली. यानें राजधानींत बंदराच्या जागीं शुभ्र संगमरवरी दगडांचा एक चारशें फूट उंचीचा दीपस्तंभ बांधला. त्याला जगांतील सात आश्चर्यांपैकीं एक मानतात. टॉलेमीनें व्यापार व नौकानयन यांत पुष्कळ सुधारणा केली. त्याचा मुलगा फिलाडेल्फस टॉलेमी होय. यानें व्यापारासाठीं व टायरचा व्यापार अलेक्झांड्रिया येथें यावा म्हणून, सुवेझच्या कालव्यासारखा १०० हात रुंद व ३० हात खोल असा एक कालवा खोदण्यास सुरुवात केली होती. तो अर्सिनो बंदरपासून नाईलच्या पूर्व फांट्यास मिळावयाचा होता; परंतु तो अपुरा राहिला. टॉलेमीनें तांबड्या समुद्रावर बर्निस बंदर वसविलें. तेथें हिंदुस्थानचा व्यापार पुष्कळ चाले; तेथून नाईल वरील काप्टास हें गांव देशांतील उतार पेठ असल्यानें हा २५० मैल अंतरावरील रस्ता त्यानें उत्तम बांधून मध्यें ठिकठिकाणीं धर्मशाळा बांधिल्या होत्या. हा रस्ता २५० वर्षें टिकला. टॉलेमीचा वकील डायोनिसियस हा हिंदुस्थानांत मौर्य सम्राटांच्या दरबारीं होता. त्यानें तत्कालीन माहिती बरीच लिहून ठेविली आहे.

**टालेरँड, पेरीगॉर्ड प्रिन्स** (१७५४–१८३८)—एक फ्रेंच मुत्सद्दी व राजकारणी पुरुष. हा कुलीन व मोठ्या प्रसिद्ध घराण्यांतील होता. लहानपणींच त्याचा एक पाय मोडला; त्यामुळें त्याच्या लष्करी पराक्रमाला वाव मिळाला नाहीं. त्याला ज्ञानाची फार गोडी होती आणि पॅरीसमध्यें असतांना त्याला मोठमोठ्या पंडितांचा सहवास घडला व ईश्वरविषयक शास्त्रांत त्याला पदवी मिळाली. १७८० सालीं फ्रान्सच्या उपाध्यायसंस्थेच्या एजंटजनरलची जागा मिळाली. त्यानें या जागेवर असतां उत्कृष्ट काम केलें, याबद्दल त्याला ३१००० लिव्हे बक्षीस मिळालें. १७८९ सालीं तो आटूनचा बिशप झाला. पुढें त्याला स्टेट्स जनरलची जागा मिळाली. फ्रेंच राज्यघटनेचा मसुदा तयार करण्याच्या कमीटीवर सभासद या नात्यानें त्याची नेमणूक झाली. प्रथमतः हा उपाध्यायमंडळाच्या बाजूचा होता. पण पुढें त्याचीं मतें पालटल्यामुळें तो त्यांच्याविरुद्ध झाला. त्यामुळें १७९१ सालीं त्यानें आटूनच्या बिशपगिरीचा राजीनामा दिला.

पॅरिस येथील 'डिपार्टमेंटचा' तो सभासद होता; व त्या अवधींत त्यानें पुष्कळ लोकोपयोगी काम केलें. १७९१ सालीं तो राजकीय आखाड्यांत उतरला. पण याच सुमारास फ्रान्समध्यें अंदाधुंदी माजली. ती मोडण्याची यानें पुष्कळ खटपट केली पण आपल्याच अंगावर बेतण्याची शंका वाटून तो अमेरिकेस गेला. पण पुढें १७९६ सालीं तो फ्रान्समध्यें परत आला. १७९७ सालीं मोठ्या खटपटीनें परराष्ट्रमंत्र्याची जागा त्याला मिळाली. या जागेवर असतां त्यानें चांगली कामगिरी केली. पण पुढें नेपोलियन बादशहाला त्याचा संशय आल्यावरून त्यानें टालेरँड यास बडतर्फ केलें. पण नेपोलियन एल्बा येथें असतां टालेरँड हा अठराव्या लुईचा प्रधान झाला. ह्यानंतर लुई फिलिफच्या कारकीर्दीत त्याला लंडन येथील परराष्ट्रवकीलाची जागा मिळाली १८३४ सालीं त्यानें फ्रान्स, इंग्लंड, स्पेन व पोर्तुगाल यांमध्यें सलोख्याचा तह घडवून आणला. तो १८३८ सालीं मरण पावला. त्याचा स्वभाव अत्यंत विनोदी, आनंदी असे. तो अतिशय चैनी व व्यसनी होता. तरी पण फ्रान्सच्या इतिहासांत त्याचें नांव, त्यानें जी उत्कृष्ट कामगिरी बजावली तीबद्दल कायम राहील यांत संशय नाहीं.

**टावी**—मुंबई, काठेवाड. झालावाड जिल्ह्यांतील एक लहानसें संस्थान. यांत एकच (टावी)गांव आहे. टावी लिमडीच्या उत्तरेस १३ मैलांवर व वढवाणच्या पूर्वेस सुमारें १२ मैलांवर आहे. तालुकदार झाल रजपूत व लिमडीचे भायाद आहेत.

**टासमन, अबेल जॅन्सेन** ( १६०२–१६५९ )—एक डच नाविक. १६४२ सालीं त्यानें टस्मानिया हें बेट शोधून काढलें व त्यानंतर थोड्याच दिवसांनीं न्यूझीलंडचा शोध लावला. १६४४ सालीं त्यानें ऑस्ट्रेलेशियाची सफर केली व त्या सफरींत त्यानें कॉर्पेटेरियाच्या सामुद्रधुनीचा शोध लावला. तो १६५९ सालीं मरण पावला.

**टासो** ( १५४४–१५९५ )—एक सुप्रसिद्ध इटालियन कवि. याचा बाप सालेर्नोच्या घराण्यांतील राजाचा खासगी कारभारी असून त्याची आई ही नीओपोलिन सरदारांच्या घराण्यांतलि होती. स्पेनच्या सत्तेशीं द्रोह केल्याच्या सबबीवर सालेर्नोच्या राजावर बंडखोरीचा आरोप ठेवण्यांत आला, व त्याचें राजपद बुडविण्यांत आलें. राजाप्रमाणें खासगी कारभाऱ्यावरहि बंडाचा आरोप ठेवण्यांत आला. त्यामुळें टासोचें लहानपण हलाखीच्या स्थितींत गेलें. लहानपणापासूनच त्याचे बुद्धिमत्तादि गुण लोकांच्या निदर्शनास आले. टासोचा बापहि बऱ्यापैकीं कवि होता.त्यामुळें त्याच

अर्बिनोच्या दरबारांत खुशामत्याची नोकरी मिळाली होती व त्या ठिकाणींच टासो याचें राजपुत्रांच्या सहवासांत आयुष्य गेलें. बापाच्यापाशीं त्यानें प्रसिद्ध कवींच्या काव्यांचें अध्ययन केलें. पुढें टासोला कायद्याचा अभ्यास करण्यासाठीं पाडुआला पाठवण्यांत आलें पण तेथें जातांच तत्त्वज्ञान व काव्य यांचाच अभ्यास टासोनें सुरू केला. १५६२ सालीं त्यानें रिनाल्डो हें काव्य प्रसिद्ध केलें. इतक्या लहानपणीं लिहिलेल्या या काव्यांतहि त्यानें अलौकिक गुण निदर्शनास आणले त्यामुळें त्याला कॉर्डिनल लुइगी ड्‌ एस्टे याच्या पदरीं नोकरी लागली. यानंतर त्यानें 'डिस्कोर्सेस ऑन दि आर्ट ऑफ पोएट्री' नांवाचें पुस्तक लिहिलें. यामुळें त्याची उत्कृष्ट टीकाकार या नात्यानें प्रसिद्धि झाली. पण त्यानें या पुस्तकांत घालून दिलेले साहित्याचे नियम त्यालाच पुढें जाचक होऊं लागले. कारण तो भावनाप्रधान कवि असल्याकारणानें काव्यासंबंधींचे रुक्ष नियम त्याच्या हातून पाळले जाणेंच शक्य नव्हतें.

स. १५६५–७० या दरम्यानचा टासोचा काळ मोठा सुखाचा गेला. राजकन्या लुक्रेझिया व लिओनारा यांच्या आश्रयाखालीं असतांना त्याला राजदरबारचें व तसेंच बाहेरच्या जगाचें फार ज्ञान झालें. लिओनारावर याचें प्रेम जडलें होतें असें म्हणतात. पुढें त्यानें फेराराच्या आल्फॉन्सो ड्यूकच्या पदरीं नोकरी धरिली. यानंतरच्या चार वर्षांत अमिंटा, जेरुसलेम लिबर्टा, हीं दोन काव्यें लिहिलीं. त्यांत अमिंटा हें नाटक फार साधें पण अत्युत्कृष्ट आहे. त्यांतील गाणीं कर्णमधुर व बहारीचीं आहेत. या नाटकाची छाप पुढील दोन शतकांतील नाटकांवर बसली होती या वरूनच त्याची योग्यता दिसून येते. जेरुसलेमा लिबर्टामधील विषय गंभीर होता, त्यामुळें मोठमोठ्या विचारवंत माणसांकडे त्यानें छापण्यापूर्वी तो ग्रंथ पाठवला होता. पण नाना प्रकारच्या टीकाकारांनीं नाना शंका कुशंका काढल्यामुळें त्यानें तो ग्रंथ छापण्याचें रहित केलें. पण पुढें तो पुष्कळ वर्षांनीं छापण्यांत आला. या ग्रंथांत टासोचें वैशिष्ट्य दिसून येतें. भावनेची उत्कटता, मधुर गाण्याची रेलचेल, सात्विक विकारांचा उत्कर्ष इत्यादि गुण प्रामुख्यानें आढळून येतात.

पुढें त्याचें व फेराराच्या ड्यूकचें जमेनासें होऊन व प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें त्यानें फेराराला न कळवितां दुसऱ्या राजाच्या पदरीं नोकरी धरण्याचा निश्चय केला. पण ड्यूक हा टासोसारख्या कवीला गमावण्यास तयार नव्हता त्यामुळें व प्रकृति फारच बिघडल्यामुळें त्यानें एकाएकीं वेषांतर करून पोबारा केला. पण पुन्हां कांहीं दिवसांनीं तो फेरारास परत आला व ड्यूकनें त्याच्या अपराधाची क्षमा करून त्याला आपल्या पदरीं पुन्हां ठेवलें. पण टासोची प्रकृति ढासळत चालली होती. पुन्हां पळून जा, पुन्हां परत ये, असें वेड्यासारखें वर्तन त्याच्या हातून होऊं लागलें. शेवटीं त्याला सात वर्षांच्या कैदेची शिक्षा देण्यांत आली.



या कैदेंत असतां त्यानें पुष्कळच वाङ्मय निर्माण केलें. त्यानें आपल्या स्नेह्यांना, हितचिंतकांना लिहिलेलीं पत्रें सुंदर आहेत. तात्विक व नैतिक विषयावर त्यानें पुष्कळ निबंध लिहिले. टासोची तुरुंगांतून सुटका झाल्यावर त्याला कोठेंच नोकरी नव्हती. त्यामुळें त्याला दुसऱ्यांच्या आश्रयास्तव भटकावें लागे. पण त्याची अतिशय प्रसिद्धि असल्यामुळें, व त्याच्याबद्दल प्रत्येकाच्या मनांत आदरभाव वसत असल्यानें त्याला कोणीहि अनादर करीत नसे. १५९०–१५९४ च्या दरम्यान तो निरनिराळ्या राजांच्या व सरदारांच्या आश्रयास राहिला. पण उत्तरोत्तर त्याची प्रकृति ढासळतच चालली. रोमच्या धर्माध्यक्षानें त्याला रोमला बोलावून आणून त्याचा अत्यंत सन्मान केला. त्याला धन व बहुमानाच्या पदव्या दिल्या. पण ते उपभोगण्याजोगी टासोची स्थिति नव्हती. अशा रीतीनें काळ कंठत असतां तो १५९५ च्या एप्रिल महिन्यांत वारला.

**टिकमगड**—मध्यहिंदुस्थान, बुंदेलखंड. हें ओरच्छा संस्थानाच्या राजधानीचें ठिकाण आहे. लोकसंख्या (१९११) १५४९५. यांतील मुख्य इमारती म्हटल्या म्हणजे महाराजाचा वाडा व किल्ला या होत. या गांवांत हायस्कूल, दवाखाना, डाक बंगला, सराई व पोस्ट ऑफिस हीं आहेत.

**टिटवी**—हा पक्षी इंग्लंड वगैरे देशांत विपुल असून आयर्लंडपासून जपानपर्यंतच्या भागांतहि टिटवी पक्ष्यांची वाढती संख्या असल्याचें आढळून येतें. त्यांपैकीं बरेच पक्षी हिंवाळ्यांत पंजाब, ईजिप्त व बार्बरी वगैरे दक्षिणेकडील प्रांतांत देशांतर करितात. तथापि ब्रिटन येथेंहि त्यासमयीं बरेच पक्षी असतात. आइस्लंड, ग्रीनलंड व आर्टिक प्रदेश येथें सुद्धा भटकणाऱ्या टिटव्या आढळतात. टिटवीच्या पंखाचा रंग व तिचें उड्डाण यामुळें हा पक्षी प्रसिद्ध असून टिटवीसारखे इतर प्राणी लुप्तप्राय झाले असले तरी टिटवी अजूनहि सर्वत्र आढळते. टिटवीच्या सोनेरी अंड्यास बाजारांत चांगला भाव येतो व पारध केलेल्या टिटव्याहि चांगल्या किंमतीस विकल्या जातात. टिटवी सर्वत्र टिकाव धरून राहिली याचें एक कारण असें आहे कीं तिच्यांत कोणत्याहि स्थळाशीं व परिस्थितीशीं जुळतें घेण्याचा एक गुण असतो. खडकाळ जमीन असो किंवा वनश्रीनें नटलेलीं कुरणें असोत, नांगरलेलें रान असो किंवा दलदलीची जागा असो, सर्वच स्थळें टिटवीला समसमान वाटतात. 'पिट्टि टू डू इट' अथवा "पीव्हिट" असा कर्कश आवाज ज्या ठिकाणाहून येईल तेथेंच जवळपास तिचें घरटें आहे असें समजावें. परंतु टिटवीचें घरटें व अंडीं सांपडणें बरेंच कठिण असतें. पूर्ण वाढ झालेल्या टिटवीचा रंग दुरून पांढरा व काळा दिसतो. परंतु जवळ जाऊन पाहणारांस त्यांत हिरव्या व करड्या रंगांचें मिश्रण दिसून येतें. टिटवीच्या तुऱ्यांत सहा पंख असतात. अनेक देशांतील खुल्या मैदानांत असणारी आणि संचार, उड्डाण व आवाज यामुळें आपलें अस्तित्व तेव्हांच

दुसऱ्यास कळविणारी ही पक्ष्याची जात महशूर आहे. टिटवीच्या हवेंतील संचाराचा वेग फार जलद असतो. टिटवीचें निवासस्थान नदी-नाल्याशेजारीं, शेतांत किंवा अरण्यांत असतें. उत्तरअमेरिकेंत हा पक्षी आढळत नाहीं; परंतु आफ्रिकेंत टिटव्यांची मोठी संख्या आहे. यूरोपांत टिटवीच्या तीन जाती आहेत परंतु त्यांपैकीं, दोन जाती आफ्रिका व आशिया येथूनच तिकडे गेलेल्या आहेत असें म्हणतात. टिटवी घरांवर बसून ओरडल्यास किंवा तिचा शब्द ऐकूं आल्यास हिंदु लोक अशुभ समजतात.

**टिटागड**—( टिटाघर ) बंगाल, चोवीसपरगणे जिल्ह्यांतील बराकपूर पोटविभागांत, हुगळी नदीच्या डाव्या तीरावर वसलेलें हें एक गांव आहे. हें ईस्टर्न-बंगाल रेल्वेवरचें स्टेशन असून कलकत्त्यापासून १३ मैलांवर आहे. १९११ सालीं लोकवस्ती ४५,१७१ होती. पूर्वी हें गांव रमणीय असून यूरोपियन लोकांचें राहण्याचें ठिकाण होतें; परंतु तेंच हल्लीं जंगी व्यापाराचें ठिकाण झालें असून त्यांत ५ तागाच्या व १ कागद तयार करण्याची अशा ६ गिरण्या आहेत आणि दोन लोखंडी कारखाने आहेत.

**टिडोर**—हें मलायाद्वीपसमूहाचें हालमाहेराच्या पश्चिम किनाऱ्याकडे टरनेटच्या दक्षिणेस असणारें एक बेट आहे. याचें क्षेत्रफळ सुमारें ३० चौरस मैल आहे. या बेटांत बरेंच जंगल व वन्याच्छ सुप्त ज्वालामुखींचीं ( ५७०० फूट ) उच्च शिखरें आहेत. मुख्य शहर टिडोर, याच्या भोंवतालीं प्राकार आहे. येथील सुलतान डच सरकारचा मांडलिक आहे. हा सुलतान व डच कमिशनर किंवा एजन्ट हे येथेंच रहातात. १८७९ च्या ठरावाप्रमाणें हालमाहेराच्या कांहीं भागावर, तसेंच पापन बेटें, न्यूगिनीचा पश्चिमार्ध व गीलव्हिङ्क आखातांतील बेटें या भागावर सुलतानचा अम्मल आहे. टरनेटच्या रेसिडेन्सीमध्यें या सुलतानचा समावेश केला आहे. येथील मुसुलमानी धर्माच्या मलाया जातीची लोकसंख्या सुमारें ८००० आहे. हे लोक शेतकी ( कापूस, तंबाखू, जायफळ, वगैरे पिकें ) व मासे धरणें यांवर उपजीविका करितात.

**टिन्डाल, जॉन** ( १८२०—१८९३ )—या ब्रिटिश निसर्गतत्त्ववेत्त्याचा जन्म आयर्लंडांतील को. कार्लो गांवीं झाला. त्याचा बाप एक लहानसा ( पण गरीब ) जमीनदार होता; परंतु सामान्य मनुष्यापेक्षां त्याची बुद्धिमत्ता पुष्कळच सरस होती. आधिभौतिक शास्त्रांतील मुख्य मुख्य तत्त्वें सर्वसामान्य जनतेच्या रोजच्या आचरणांत व सर्वसामान्य विचारसरणींत यावींत म्हणून एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापासून एक मोठें वाग्युद्ध सुरू झालें होतें; या युद्धांत शास्त्राच्या बाजूनें हक्स्ले, डार्विन आणि टिन्डॉल यांनीं उत्तमच कामगिरी बजाविली आहे. यामुळें कित्येक वर्षेपर्यंत पदार्थविज्ञानशास्त्राच्या प्रोफेसराचा नमुना पहावयाचा असल्यास इंग्लिश लोक टिन्डालकडे पहात असत. एखादी गोष्ट उत्तम प्रकारें ग्रहण करून ती समजावून सांगणें, लेखन आणि व्याख्यान यांच्या द्वारा सामान्य जनतेंत शास्त्रीय ज्ञानाचा प्रसार करणें, या दोन उत्तम गुणांच्या योगानें त्याची अत्यंत ख्याति झाली. निसर्गाचें बरोबर रीतीनें अवलोकन करण्याचा गुण त्याच्या अंगीं वास करीत होता. त्याच्या बापाची जरी गरीबीची स्थिति होती तरी त्यानें स्वप्रयत्नानें विद्या संपादन केली. कार्लाइलचे लेख वाचून अत्यंत उत्साहानें व नेटानें अभ्यास करण्याविषयीं त्याला आवड उत्पन्न झाली. सन १८३९ मध्यें त्यानें आयर्लंडांतील सर्व्हे खात्यांत एक लहानशी नोकरी पतकरली; व पुढें १८४२ सालीं इंग्लिश सर्व्हे खात्यांत त्यानें नोकरी पतकरली. इंग्लंडांत सर्व्हेचें काम करीत असतांना त्यानें लँकेशायर परगण्यांतील प्रेस्टन येथील यंत्रसंस्थेंतील व्याख्यानें ऐकलीं. पुढें रेल्वे एंजिनियरचें कांहीं काळपर्यंत काम केलें. सन १८४७ मध्यें ह्यान्टस येथील क्विनवुड कॉलेजांत शिक्षकाचें काम केलें. यानंतर त्याला कित्येक अडचणी आल्या तरी त्यांनां न जुमानतां मार्बर्ग येथील विश्वविद्यायांत प्रवेश करून तेथें अतिशय अभ्यास करून दोन वर्षांच्या अवधींत डॉक्टरची पदवी त्यानें संपादन केली. तेथें त्यानें स्क्रूच्या पृष्ठभागावर एक निबंध लिहिला.

टिन्डाल यानें पहिला स्वतंत्र लेख चुंबकत्वावर लिहिला. या लेखाकरितां त्यानें १८५० ते १८५५ पर्यंत प्रायोगिक काम केलें होतें. यावेळेस तो क्विनवुड कॉलेजांत व्याख्यानें देत होता. त्याच्या या लेखांमुळें त्याची प्रसिद्धि झाली व त्याला रायलसोसायटीचा सभासद करण्यांत आलें. याच सुमारास त्याची टी. एच. हक्स्ले याजबरोबर मैत्री झाली, व ती सर्व जन्मभर टिकली. १८५३ मध्यें त्याला रायल इन्स्टिटयूशनमध्यें प्रोफेसर नेमण्यांत आलें. तेथें त्याची फराडेबरोबर ओळख झाली. फराडेबद्दल त्याला किती आदर वाटत असे, याचें प्रत्यन्तर पहावयाचें असल्यास " संशोधक फराडे " नांवाचें टिन्डालचें पुस्तक पहावें.

उष्णताशास्त्रांत टिन्डाल यानें पुष्कळ भर घातली आहे. हिमप्रवाहासंबंधानें त्यानें कित्येक प्रयोग करून पाहिले व त्याचप्रमाणें स्वित्झर्लंडांत जाऊन त्यानें तेथील हिमप्रवाहांचें अनेक शास्त्रीय साधनांनीं अवलोकन केलें, व तद्विषयक कित्येक लेख लिहिले. निरनिराळे वायू आणि तत्संबद्ध बाष्प यांच्यासंबंधानें टिन्डाल यानें (१८५९ ते १८७१या) कित्येक वर्षेपर्यंत परिश्रम केले व एतद्विषयक जें त्यानें लिहिलें आहे तें त्याच्या सर्व आयुष्यांतील कामगिरींत अत्यंत महत्त्वाचें असें आहे. आकाशाचा रंग निळा कां असतो याचा खुलासा करण्याकरितां त्यानें कित्येक महत्त्वाचे प्रयोग केले आहेत. वातावरणांतील हवेच्या अंगीं असणाऱ्या ध्वनींच्या अपारगामित्वाबद्दल त्यानें प्रयोग करून पुष्कळ महत्त्वाची माहिती उपलब्ध केली; या माहितीचा समुद्रावर जहाजांनां सूचना देण्याकरितां व सामुद्रिक स्तंभावर अत्यंत उपयोग

झाला आहे. जंतुशास्त्रासंबंधानें त्यानें कांहीं प्रयोग केले व पदार्थांत जन्तू आपोआप उत्पन्न होतात या मताचें पूर्णपणें निरसन केलें. वारंवार मंदाग्नि देऊन एखाद्या पदार्थास निर्जन्तुक करण्याची पद्धत त्यानें बसविली व या पद्धतीचा हल्लीं पुष्कळ ठिकाणीं उपयोग करण्यांत येतो. टिन्डाल याची थोरवी त्याच्या शोधांतच नसून त्याच्या आचरणांतहि होती. शास्त्रीय शोध लावण्याकरितां व शास्त्राचा प्रसार करण्याकरितां त्यानें पैशाची परवा केली नाहीं. सन १८७२–७३ मध्यें त्यानें अमेरिकेंत सफर करून ठिकठिकाणीं व्याख्यानें दिलीं. या व्याख्यानमालिकेच्या योगानें त्याला कित्येक हजार पौन्डांची रक्कम मिळाली; परंतु त्यानें त्या रकमेला स्पर्शसुद्धा केला नाहीं. अमेरिकन लोकांची शास्त्रीय उन्नति करण्याकरितां ही सारी रक्कम त्यानें पंचांच्या स्वाधीन केली. धर्मविरुद्ध आधुनिक शास्त्रें असा जो वाद इंग्लंडांत चालला त्यांत हक्स्ले यानें बराच मोठा भाग उचलला व त्या वादांत टिन्डाल यानेंहि कांहीं भाग घेतला आहे. बेलफास्ट येथील ब्रिटिश असोशिएशनचा प्रेसिडेंट या नात्यानें त्यानें जें व्याख्यान दिलें त्या योगानें धार्मिक समजुतीच्या मनुष्यांत अत्यंत खळबळ ( सन १८७४ ) उडाली आहे. व्याख्याता या दृष्टीनें त्याच्या अंगीं पुष्कळ उत्तम गुण होते. राजकीय बाबतींत मात्र आयर्लंडच्या स्वातंत्र्य विलास विरोध करण्याकरितां तो ग्लाडस्टन याजपासून फुटून निघाला. एवढ्या एका गोष्टीखेरीज तो बाकीच्या सर्व राजकीय बाबतींत उदारपक्षाचा होता. आपल्या वयाच्या छप्पन्नाव्या वर्षी म्हणजे इ. सन १८७६ त त्यानें ( पहिलें ) लग्न केलें. वृद्धपणीं त्याची प्रकृति बरोबर रहात नसे. झोंप न येण्याचाहि त्याला आजार जडला होता. तारीख ७ डिसेंबर रोजीं झोपेचें औषध चुकीनें जास्त घेतल्यामुळें तो मृत्यु पावला.

**टिपगड डोंगर**—मध्यप्रांत, जिल्हा चांदा. मुरमगांव जमीनदारींत हे डोंगर असून सर्वांत उंच डोंगर समुद्रसपाटीपासून २००० फूट आहे. येथेंच टिपगडचा प्राचीन किल्ला आहे. आजूबाजूस दाट जंगल असल्यामुळें जवळ जवळ हा किल्ला मनुष्यवस्तीला पारखाच आहे. या किल्ल्याची तटबंदी व जागोजागचे बुरूज यांचा परिघ सुमारें दोन मैल होईल. किल्ल्यांत एक मोठा तलाव असून आंत उतरण्याकरतां पायऱ्या केलेल्या आहेत. या तळ्याचें पाणी कधीं आटत नाहीं व त्याची खोली किती आहे हें सांगतां येत नाहीं असें म्हणतात. तळ्याच्या पश्चिम भागांतून टिपगडी नदीचा उगम आहे व पावसाळ्यामध्यें ही नदी डोंगरांतून वहात असतांना तिचें फार भयंकर स्वरूप असतें. तलावाच्या दक्षिणेस बालेकिल्ला असून त्याभोंवतीं देखील चांगली तटबंदी आहे. किल्ल्याच्या स्वरूपावरून येथें कोणी तरी सामर्थ्यवान राजे रहात असावेत असें वाटतें. दंतकथेप्रमाणें येथें कोणी पूरमराजा नांवाचा गोंड राजा असून त्याजवळ २००० लढाऊ लोक, ५ हत्ती, २५ घोडे असून वैरागडचा सर्व प्रदेश याच्या ताब्यांत आला होता.

**टिपरा जात**—या लोकांची वस्ती बंगाल-आसाममध्यें आहे. एकंदर लोकसंख्या ( १९११ ) १३९०६५, पैकीं बंगाल्यांत १३००२५ व आसामांत ९०४० आहे. टिपारा लोक बोडोराष्ट्रजातीपैकीं एका पंथांतील असावेत. सिलहट् मधील हे लोक बहुधा आसपासच्या टेंकड्यांतून तेथें आले असावेत [ से. रि. ( १९११ ) आसाम ]

**टिप्पू सुलतान** ( १७४९–१७९९ )—म्हैसूरचा राजा. हा म्हैसूरच्या हैदरअल्लीचा वडील मुलगा. हा सन १७४९ त जन्मला आणि बापाच्या पश्चात सन १७८२ च्या डिसेंबरांत गादीवर बसला. गादीवर येण्यापूर्वीच तो लढायांत भाग घेत असे. मराठ्यांनीं हैदरवर केलेल्या सन १७७१ च्या मोहिमेंत यानें त्यांनां तोंड दिलें होतें. पुढें हैदरानें याला मराठ्यांनीं घेतलेला मुलूख परत मिळविण्यासाठीं पाठविलें होतें ( १७७३ ); त्याप्रमाणें त्यानें गुरमकोंडा व त्याच्या आसपासचा थोडासा प्रांत परत मिळविला ( १७७४ ). स. १७८० त हैदरावर इंग्रज चालून आले, त्यावेळीं त्यांचा मुख्य सेनापति मनरो हा असून, त्याच्या हाताखालीं कर्नल बेली होता. बेली हा गंतूरहून मनरोस मिळण्यासाठीं सातहजार फौजेनिशीं जात असतां, त्यांची गांठ न पडूं देतां,कांची येथें टिप्पूनें त्याच्यावर एकाएकीं हल्ला करून बेलीचा पराभव केला व त्याला त्याच्या साऱ्या फौजेसह बंदिवान केलें ( १० सप्टें० ), तेव्हां मनरो हा मद्रासेस पळून गेला. इतक्यांत कर्नल ब्रेथवेट हा दुसरा इंग्रज सेनापति टिप्पूवर चालून आला; पण तंजावर येथें त्याचाहि पराभव करून, टिप्पूनें त्याला त्याच्या सैन्यासह कैद केलें.हैदर वारल्यावर ( १७८२ डिसें० ०) टिप्पू गादीवर आला. त्याचें व फ्रेंचांचें सूत असल्यानें जेव्हां अमेरिकेच्या स्वातंत्र्ययुद्धांत फ्रेंच लोकांनीं अमेरिकेस मदत केली, तेव्हां टिप्पूनेंहि फ्रेंचांनां पाठिंबा दिला होता व फ्रेंचहि त्यास मदत करीत. इंग्रजांचा सेनापति आयरकूट हा टिपूवर आला असतां फ्रेंच सरदार बुसी हा त्याच्या मदतीस आला होता. पण यूरोपांत इंग्रज फ्रेंचांचा तह झाल्यानें बुसी परत गेला. सालबाईचा तह आपणांस मान्य आहे असें टिप्पू बरबर म्हणे, परंतु त्या तहांत हैदरानें इंग्रजांपासून घेतलेला मुलूख परत करावा ही जी अट होती ती मात्र तो मान्य करीना. त्यामुळें इंग्रजांनीं जलमार्गानें येऊन टिप्पूचा बेदनूर प्रांत घेतला. तेव्हां त्यानें त्यांच्यावर एकदम हल्ला करून त्यांचा पराभव करून व मंगळूर शहरास नऊ महिने वेढा घालून तें काबीज केलें व इंग्रज अधिकारी कैदेंत टाकिले. अखेर इंग्रजांनी तह करण्याकरितां आपले वकील टिप्पूकडे पाठविले. त्यानें प्रथम वकिलांचा उपमर्द करून मग ( ११ मार्च १७८४ ) त्यांच्याशीं मंगलोर येथें तह केला. या तहानें परस्परांनीं परस्परांचा घेतलेला प्रांत परस्परांस परत देण्याचें ठरलें.

या वेळीं ( १७८४ जून ) नाना फडणविसानें यादगीर येथें निजामअल्लीची भेट घेऊन, पेशवे व मोंगल या दोघांनीं मिळून टिप्पूवर स्वारी करून त्यानें घेतलेला आपला सर्व मुलूख परत मिळवावा असें ठरविलें. परंतु टिप्पूनें तिकडे एकदम नरगुंदकर व कित्तूरकर देसाई यांवर सैन्य पाठविलें, तेव्हां पेशवे व मोंगल यांची उभयतांचीहि तयारी नसल्याकारणानें त्यांनीं त्यावेळीं त्याच्याशीं समेट करण्याचा प्रयत्न केला. व टिप्पूहि वरकरणीं या तडजोडीस कबूल झाला.

मलप्रभेच्या दक्षिणेस १२ मैलांवर नरगुंद नांवाचा एक किल्ला असून तेथील देसाई पूर्वी पेशव्यांचा अंकित होता; परंतु कृष्णेच्या दक्षिणेकडील मुलूख हैदरास मिळाला तेव्हां ( १७७८ ) नरगुंदकर हा त्याच्या छत्राखालीं गेला. या देसायापासून पेशव्यांनां पूर्वी जितकी खंडणी मिळे तेवढीच हैदरहि त्याच्यापासून घेई. परंतु पुढें टिप्पूनें ती रक्कम वाढविली.देसायानें ती नाकारून पेशव्यांकडे मदत मागितली तेव्हां प्रथम नानाफडणविसानें टिप्पूस सामोपचारानें खंडणी न वाढविण्याबद्दल लिहिलें. परंतु टिप्पूनें तिकडे दुर्लक्ष करून उलट देसायाची खंडणी बळजबरीनें वसूल करण्याकरितां आपलें कांहीं सैन्य रवाना केलें.सैन्यानें नरगुंदला वेढा दिला (१७८५मार्च) तेव्हां गणेशपंत बेहरे व परशुरामभाऊ पटवर्धन हे नरगुंदकरांच्या कुमकीस आले.इकडे टिप्पूचा वकील अद्यापीहि पुणें दरबारींच होता.तिकडे लढाई सुरू झाल्यामुळें नानांनीं तुकोजी होळकरास भाऊच्या मदतीस पाठविलें. तेव्हां टिप्पूनें केलेल्या भांडणाबद्दल दिलगिरी प्रदर्शित करून समेटाची इच्छा दर्शविली व नरगुंद संस्थानावरील आपलें प्रभुत्व पेशवे मान्य करीत असल्यास, आपली मागील दोन वर्षांची राहिलेली खंडणीहि देण्यास कबूल झाला. त्यानंतर नरगुंदकर यांनां टिप्पूकडून कांहीं अपाय होणार नाहीं अशी खात्री करून घेऊन मराठे परतले. परंतु टिप्पूनें मराठ्यांनां चांगलेंच फसविलें. पावसाळा सुरू झाल्यानें उतार नव्हता. त्यामुळें यावेळीं मराठ्यांनां नरगुंदकरांच्या मदतीस येणें शक्य नव्हतें, ही संधि साधून टिप्पूनें पुन्हां नरगुंदावर चढाई केली. तेव्हां नाइलाजानें देसायानें किल्ला त्याच्या स्वाधीन केला. त्यावेळीं टिप्पूनें त्यास दिलेलें वचन मोडून देसायाला त्याच्या सर्व मंडळीसह कैद केलें व त्याच्या मुलीस आपल्या जनान्यांत ठेवून बाकीच्या मंडळीस काबुल दुर्गच्या किल्ल्यांत कैदेंत टाकिलें. यानंतर कित्तूरकर देसायाची देखील हीच स्थिति करून पावसाळा संपण्यापूर्वींच टिप्पूनें या दोन्ही किल्ल्यांचा चांगला बंदोबस्त केला (सन १७८५). याच वेळीं त्यानें जबरदस्तीनें अनेक हिंदू लोकांची सुंता करवून त्यांनां मुसुलमान केलें. त्यावेळीं ही विटंबना टाळण्याकरितां पुष्कळ ( दोन हजार ) हिंदूंनीं आत्महत्या केली.

या सालचा पावसाळा बराच लांबल्यानें डिसेंबरच्या पहिल्या तारखेपर्यंत मराठे पुण्यांतून बाहेर पडले नाहींत. या वेळीं त्यांच्या सैन्याचें आधिपत्य हरिपंत फडके याजकडे होतें .तो पुण्याहून निघून मुधोजी भोंसल्याला मिळण्यासाठीं पंढरपुरास गेला. येथेंच पुण्याहून नानाफडणवीसहि निजामाशीं खलबत करण्याकरितां आला ( १७८६ जानेवारी ). यानंतर हें सर्व सैन्य यादगीर येथें निजामाच्या लष्करास येऊन मिळालें ( मार्च ). येथें असें ठरलें कीं या संयुक्त सैन्यानें टिप्पूचा सर्व मुलूख काबीज केल्यावर त्याचे सहा भाग करून त्यांपैकीं दोन दोन भाग प्रत्येकीं पेशवे व मोंगल यांस व एक एक भाग होळकर व शिंदे यांस, याप्रमाणें वाटून घ्यावेत.

त्यानंतर प्रथम कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांमधील मराठ्यांचा मुलूख सोडवावा असें ठरवून, टिप्पूचा बऱ्हाणउद्दीन नांवाचा सरदार कित्तूरजवळ होता त्यास हांकून लावण्याकरितां तुकोजी होळकर व गणेशपंत बेहरे यांनां पन्नास हजार फौजेसह तिकडे रवाना करण्यांत आलें व बाकीचें सर्व सैन्य बदामी काबीज करण्याकरितां निघालें. दोस्तांचें लष्कर बदामी नजीक आलें असतां त्यांनां टिप्पू सर्व सैन्यासह आपल्याकडे चालून येत आहे असें कळलें. तेव्हां असें ठरलें कीं, तूर्त बदामीस वेढा न देतां तिच्याजवळ छावणी देऊन रहावें व पावसाळा सुरू होऊन तुंगभद्रेस पूर आला कीं बदामीस वेढा द्यावा. असें ठरल्यावर स्वतः मोहिमींत न राहतां पंचवीस हजार सैन्यासह तहवारजंग नांवाच्या आपल्या सरदारास हरिपंत फडक्याच्या स्वाधीन करून निजाम हैदराबादेस निघून गेला.

बदामीचा वेढा.—यावेळीं टिप्पूनें कांहीं सैन्य बदामीकडे रवाना करून तो स्वतः श्रीरंगपट्टणाकडे गेला. ही बातमी कळतांच बदामीस लागलीच वेढा देण्याचें ठरवून शहराच्या तटबंदीस मोर्चेबंदी केली (१ मे ). परंतु तीन आठवडे झाले तरी तटबंदीस भगदाड पडत नाहीं असें पाहून शेवटीं शिड्या लावून शहर हस्तगत करण्याचा प्रयत्न करण्यांत आला. शहराच्या संरक्षणार्थ पुष्कळ लोक होते. दोस्तांचा हल्ला येतांच या लोकांनीं अगोदरच खंदकांत तयार केलेल्या सुरुंगास बत्ती दिली. त्यांचा एकदम भडका होऊन दोस्तांचे कित्येक लोक जायबंदी झाले. तरीहि हल्ला तसाच पुढें नेटानें चालविण्यांत येऊन शहर हस्तगत करण्यांत आलें (२०मे). तेव्हां तेथील सैन्य किल्ल्यांत निघून गेलें व तेथून दोस्तांशीं लढूं लागलें. तथापि मराठ्यांनीं तो मार सहन करून शेवटीं बदामीचा किल्ला काबीज केलाच. बदामी फत्ते झाल्यावर नाना पुण्यास परत गेले. यानंतर हरिपंतानें वाटेंतील सिर्सीचा किल्ला हस्तगत करून, गजेंद्रगडास येऊन वेढा दिला. परंतु तो किल्ला फत्ते होण्यापूर्वींच टिप्पू हा आपल्या सैन्यासह अदवानीकडे त्वरेनें गेला असल्याचें वर्तमान दोस्तांनां कळलें. अदवानीच्या किल्ल्यांत निजामअल्लीचा पुतण्या मोहबतजंग होता. त्याची तितकी तयारी नसल्यामुळें लवकर मदतीस येण्याबद्दल त्यानें निजामास व हरिपंत यांस निरोप

पाठविला. तिकडे निजामानें होती नव्हती तेवढी फौज हैद्रावादेहून रवाना केली. इकडे हरिपंतानें आपल्यावरोवर असलेलें निजामाचें सर्व सैन्य व आप्पा बळवंत याच्या हाताखालीं आपली आणखी २०००० फौज, याप्रमाणें एकंदर ४५,००० लोक अदवानीकडे रवाना केलें (९ जून ). या सैन्याची व निजामानें हैद्रावादेहून पाठविलेल्या सुमारें १५००० सैन्याची वनूर येथें गांठ पडली. ही कुमक येऊन पोंचण्यापूर्वीच अदवानी सर करण्याचा टिप्पूनें आटोकाट प्रयत्न केला; परंतु तोंपर्यंत मोहवतजंगानें शौर्यानें किल्ला झुंजवून टिकाव धरला. आप्पाबळवंत अदवानीनजीक येतांच टिप्पू मोर्चे उठवून मागें सरला. ता. २२ जून रोजीं मराठ्यांच्या फौजेनें टिप्पूच्या सैन्याशीं लढाई दिली; तींत मोंगलांच्या ४०,००० फौजेनें मराठ्यांस काडीमात्रहि कुमक न करतां ती गोटांतच स्वस्थ वसून राहिली. यावेळीं पर्जन्यकाळ नजीक आल्यामुळें, तुंगभद्रेस पूर येऊन आपला देशीं जाण्याचा मार्ग केव्हां वंद होईल याचा नेम नाहीं व दोआवांतील मुलूख अजून पूर्णपणें आपल्या कवजांत आला नसल्यानें आपल्याला तुंगभद्रेपलीकडून रसद मिळण्याचा मुळींच संभव नाहीं, उलट टिप्पू स्वतःच्याच मुलखांत असल्यामुळें तो दाणावैरणीसंवंधानें अगदीं निर्धास्त आहे, वगैरे गोष्टींचा विचार करून मराठ्यांनीं अदवानीचें रक्षण करण्याच्या भानगडींत फारसें न पडतां, तेथील सर्व माणसांस घेऊन तुंगभद्रेपार होण्याचा निश्चय केला व त्याप्रमाणें किल्ला मोकळा करून त्यांनीं मोठ्या शिताफीनें आपले सर्व लोक मागें घेतले, आणि रिकामा किल्ला टिप्पूच्या हातीं लागला ( जुलै ). तिकडे गजेंद्रगडचा किल्ला हरिपंतानें लढून घेतला (११ जून ) व तो हस्तगत झाल्यावर हरिपंत अदवानीकडे निघाला. पण आप्पाबळवंत त्याला मार्गांतच येऊन मिळाल्यामुळें निजामाच्या सैन्यास परत पाठवून व वाटेंतील बहादुरबेंडा काबीज करून हरिपंत कोपळकडे वळला. इतक्यांत टिप्पू गलगनाथाजवळ अचानक तुंगभद्रा उतरून मराठ्यांच्या पुढें आला. मराठ्यांचें घोडदळ आपल्याहून अधिक असल्यामुळें मैदानांत आपला त्यांच्यापुढें क्षणभरहि टिकाव लागणार नाहीं हें जाणून तुंगभद्रा व वर्दा या नद्यांच्या संगमावर इटगें येथें अडचणीची जागा पाहून त्यानें आपली छावणी दिली. तुंगभद्रेपलीकडचा मुलूख टिप्पूच्याच ताब्यांत असल्यामुळें, त्याला तिकडून धान्यवैरण लागेल तेवढें आणवितां येई. उलटपक्षीं मराठ्यांचें घोडदळ पुष्कळ असल्यानें त्यांना वैरण फार लागे व ती त्यांना एकाच ठिकाणीं छावणी करून मिळवितां येणें शक्य नसे. मराठ्यांची छावणी टिप्पूपासून सुमारें सहा मैलांवर होती; तिच्यावर टिप्पूनें एकाएकीं रात्रीं छापा घातला( २८ आगष्ट ), परंतु त्यापासून मराठ्यांचें कांहींच नुकसान झालें नाहीं. मात्र मराठ्यांनीं आपली छावणी हालवून लक्ष्मेश्वराजवळ नेली. तेव्हां टिप्पूनें पुन्हां त्याच रात्रीं त्यांच्यावर दुसरा छापा घातला; पण यांतहि मराठ्यांचें विशेष नुकसान झालें नाहीं ( १२ सप्टेंवर ). यानंतर टिप्पूनेंहि आपली छावणी हालवून सावनूरपाशीं आणली. इकडे होळकर व वेहरे यांनीं कित्तूरचा किल्ला खेरीजकरून त्या प्रांतांतील वाकीचीं टिप्पूचीं ठाणीं हस्तगत करून घेतलीं. तिकडे टिप्पूनें राघवेंद्र नाईक याजवरोवर फौज देऊन त्यास सावनूरकर नवावापासून खंडणी वसूल करण्याकरितां पाठविलें. ही वातमी समजतांच होळकर व वेहेरे हे एका दिवसांत ४० कोसांची दौड करून एकदम सावनुरास गेले. परंतु मराठ्यांच्या आगमनाची वातमी लागून राघवेंद्र तुंगभद्रापार पळून गेला. यानंतर तुकोजीनें वेहऱ्यांच्या पथकास सावनुरासच नवावाच्या रक्षणाकरितां ठेविलें व आपण स्वतः लक्ष्मेश्वर जिल्ह्यांतील सावशी, मुळगुंद, गदग, तडस, वेहट्टी व नवलगुंद येथें आपलीं ठाणीं घालून, टिप्पूचा सरदार बुऱ्हाणउद्दीन हुवळीजवळ आला होता, तेथें पुन्हां त्याच्या तोंडावर येऊन राहिला. शेवटीं हताश होऊन बुऱ्हाणउद्दीन टिप्पूकडे निघून गेला व मग तुकोजीहि हरिपंतांना येऊन मिळाला(सप्टेंवर).

सावनूराच्या दोन्ही वाजूस समोरासमोर टिप्पू व हरिपंत हे सुमारें एक पंधरवडाभर स्वस्थ वसले होते. शेवटीं प्रथम टिप्पूनें मराठ्यांच्यावर अचानक छापा घातला (१ आक्टोवर ). या हल्ल्यांत सूर्योदयापासून दोनप्रहरपर्यंत दोन्ही पक्षांकडील तोफांची मारगिरी चालली होती. या लढाईंत मराठ्यांकडील लोक वरेच पडले व सावनूरच्या नवावास टिप्पूची दहशत वसून तो सावनूर सोडून मराठ्यांच्या गोटांत आला. टिप्पू आतांपर्यंत नेहमीं नदीकांठची अडचणीची जागा धरून राहत असल्यामुळें मराठ्यांचा त्यावर कांहीं लाग चालत नसे, म्हणून त्याला आतां मैदानांत खेचण्याकरितां हरिपंतानें खटपट केली. परंतु त्याचा हेतु साध्य झाला नाहीं. तेव्हां त्यानें शिरहट्टीवर तोफा डागून ती सर केली (१४ नोव्हेंवर ), तरीहि टिप्पू आपली जागा सोडून पुढें आला नाहीं. मात्र मराठे सावनुरापासून दूर जातांच, त्यानें तें शहर हस्तगत केलें व मोहरमपर्यंत तेथेंच राहून नंतर तो वंकापुरास गेला. तेथें त्यानें आपलें सर्व अवजड सामान ठेवलें व इटगें येथें येऊन एकाएकीं मराठ्यांच्यासमोर उतरला ( ३०नोव्हेंवर ), परंतु त्याच्या आगमनाची वातमी लागल्यानें दोस्तांचें लष्कर मागें हटत असतां टिप्पूनें छापा घालून मोंगलांकडील वरेंच सामान लुटून नेलें. परंतु हरिपंत मात्र व्यवस्थितपणें मागें सरकला. टिप्पूनें मराठ्यांच्या लष्करावर घातलेला हा शेवटचाच छापा होय. यानंतर दोन्ही पक्षांतील टोळ्यांत किरकोळ चकमकी होत असत.

डिसेंवर महिन्यापासून टिप्पू मराठ्यांशीं तह करण्यास विशेष उत्सुक दिसूं लागला. टिप्पू तहास इतका उतावीळ होण्याचें कारण, इंग्रज आपणाविरुद्ध मराठ्यांना मदत करतील अशी त्यास शंका आली व मराठ्यांनींहि ती

कायम राहण्यासाठीं, इंग्रजांचा वकील मॅलेट यास आपल्या लष्करांत बरेच दिवस ठेवून घेतलें होतें.

या पुढें मराठ्यांनीं पूर्वेकडे सरकण्याचा क्रम ठेविला. परंतु टिप्पू नदीकांठचीं खडकाळ जागा सोडून मैदानांत केव्हांहि आला नाहीं. टिप्पूचे वकील तुकोजी होळकरामार्फत तह घडवून आणण्याची खटपट करीत असतांच टिप्पूनें बहादुरबेंड्याचा किल्ला पुन्हां परत घेतला ( १३ जानेवारी १७८७ ). त्यामुळें टिप्पूच्या वकिलांच्या भाषणावर हरिपंताचा विश्वास बसेना. याचा परिणाम असा झाला कीं उभयपक्षीं लढाई बंद व्हावी असा ठराव ( १० फेब्रु० ) झाला होता तरी देखील पुढें कित्येक दिवसपर्यंत तह घडून आला नाहीं. टिप्पू तहाच्या कलमांत अतिशय घासाघीस लावीत असे, हें तहाला विलंब लावण्याचें दुसरें एक कारण होतें. सरतेशेवटीं नाइलाजानें टिप्पूनें एप्रिल महिन्यांत पुढीलप्रमाणें तह केला. टिप्पूनें तुंबून राहिलेल्या खंडणीदाखल मराठ्यांस ४८ लक्ष रुपये द्यावे. यांपैकीं ३२ लक्ष तूर्त रोख द्यावे व बाकीचे हप्त्यांनें द्यावे. गजेंद्रगड, बदामी, नरगुंद व कित्तूर हीं संस्थानें व [illegible] मराठ्यांस देऊन अदवानीचें संस्थान निजामच्या हवालीं करावें; आणि सावनूरकर नबाबाचा मुलूख व राजधानी सावनूरकरास परत द्यावी.

यानंतर मराठे कृष्णा ओलांडून पलीकडे गेले. तेव्हां तहाचीं कलमें विसरून टिप्पूनें त्यांनां परत केलेला कित्तूरचा किल्ला पुन्हां काबीज केला व बेदनूर येथें मराठ्यांच्या कोंकणांत स्वारी करण्यासाठीं सैन्य जमा केलें. याचवेळीं चेरिकाच्या राजास इंग्रजांच्या तेलिचेरीवर हल्ला करण्यास चिथावून देऊन इंग्रजांचा स्नेही जो त्रावणकोरचा राजा त्याचें राज्य काबीज करण्याचीहि तयारी चालविली.टिप्पू हा मुसुलमान असल्यामुळें मनांतून निजामअल्लीचा ओढा त्याच्याकडे असे व त्यामुळें त्यानें एकदा टिप्पूशीं दृढ स्नेहसंबंध जोडण्याचा शुभ प्रयत्नहि केला होता, परंतु टिप्पूनें त्याकरितां दोन्ही घराण्यांत शरीरसंबंध घडवून आणण्याची अट घातल्याकारणानें निजामास राग येऊन त्यानें तो नाद सोडून दिला. इकडे टिप्पूच्या एकंदर धोरणावरून कॉर्नवालीसचें मन त्याच्या हेतूविषयीं बरेंच साशंक होऊन तो निजाम व मराठे यांच्याशीं शक्य तितका दृढ स्नेह ठेवूं लागला. त्यानें निजामास तो टिप्पूवर स्वारी करील तर त्यास दोन पलटणी व तोफांची मदत देण्याचें गुप्तपणें कबूल केलें. हें समजतांच टिप्पूनें त्रावणकोरचें राज्य काबीज करण्याचा आपला उद्देश लपवून न ठेवतां उघडपणें [illegible] बर ) त्रावणकोरच्या तटबंदीवर जातीनें हल्ला [illegible] यश आलें नाहीं.

वरील कारणामुळें [illegible]
टिप्पूवर स[illegible]
दरबारचा [illegible]
तिघांनीं [illegible]

तथापि तहाचा खर्डा नक्की ठरून त्यावर पेशव्यांच्या सह्या होण्यास आणखी दोन महिने लागले ( जून १ ). तिकडे निजामअल्लीच्या मनांत यावेळीं निराळेंच डावपेंच असल्यामुळें जुलैच्या ४ थ्या तारखेपावेतों त्यानें तहावर सहीच केली नाहीं.

या मोहिमीस मे ( १७९० ) महिन्यांतच आरंभ झाला. या स्वारींत इंग्रज सेनापति मेडोज होता. त्यानें मद्रासहून निघून दक्षिणेकडून टिप्पूच्या मुलूखावर स्वारी करून कडूर, दिंदिगल, कोइंबतूर वगैरे स्थळें काबीज केलीं. कर्नल हार्टले हा मुंबईचें सैन्य घेऊन जलमार्गानें पश्चिमेकडून आला व कालीकतजवळ टिप्पूचें कांहीं सैन्य होतें त्याची त्यानें दाणादाण केली. पुढें जानरल आबरक्रोंबी हा मुंबईहून आणखी सैन्य घेऊन हार्टलेयास मिळाला व त्यानें लवकरच टिप्पूचा बहुतेक मलबार प्रांत काबीज केला मेडोज हा आपल्या मोहिमेचें काम संपवून जानेवारींत ( १७९१ ) मद्रासेस आला व त्या नंतर लॉर्ड कॉर्नवालीस हा स्वतः सेनापति बनला.

मराठ्यांच्या तर्फे आरंभीं परशुरामभाऊ पटवर्धन हे सेनापति होते. ते ( मे १७९० ) पुण्याहून निघून तासगांवास आले. इकडे टिप्पूकडे थकलेल्या खंडणीपैकीं कांहीं वसूल झाल्यास पहावें म्हणून नाना फडणविसांनीं टिप्पूच्या वकिलास आगस्टपावेतों [illegible]निरोप दिला नव्हता. मराठ्यांच्या मदतीस मुंबईहून कॅ[illegible] लिटल हा मे महिन्यांत निघून जलमार्गें संगमेश्वरास [illegible] आला व तेथून अंबाघाट चढून ( जून १८ ) [illegible]नगांवानजीक कुमठे गांवीं येऊन परशुरामभाऊ यांना [illegible] ला. नंतर या सर्व सैन्यासह परशुरामभाऊ कृष्णापार [illegible] होऊन ( ११ आगस्ट ) त्यांनीं कर्नाटकांतील टिप्पूचीं निरा[illegible]निराळीं ठाणीं काबीज केलीं. याप्रमाणें ठाणीं घेत घेत भाऊ ध[illegible]रवाडानजीक ( नरेंद्र गांवीं ) पोहोंचले ( १४ सप्टेंबर ).

यावेळीं भाऊंचें ( इंग्रज पलट[illegible]णीशिवाय ) लष्कर १०००० स्वार व ३००० प्यादे इतकें ह[illegible]तें. तुंगभद्रेच्या दक्षिणेस टिप्पूचे सरदार बद्रुलजमानखान व कुतुबुद्दीन हे सुमारें ५००० सैन्यासह होते, यावेळीं निजामाचें सैन्यहि हैद्राबादेहून निघून कृष्णा उतरून कोपळच्या व बहादुरबेंड्याच्या किल्ल्यास वेढा द्यावयास आलें. तेव्हां कुतुबुद्दीन हा मोंगलांच्या तोंडावर राहिला व बद्रुलजमान हा धारवाडच्या किल्ल्यांत राहिला. किल्ल्यांतील शिबंदी दहा हजार होती.

धा र वा ड चा वे ढा.—परशुरामभाऊ व इंग्रज धारवाडास आले तरी त्यांच्याजवळ मोर्चेबंदी करण्यालायक तोफा नसल्यामुळें, कित्येक दिवसपर्यंत त्यांनीं किल्ल्यावर नुसती गोळागोळी चालविली, मात्र त्यावेळीं निरनिराळ्या मराठे सरदारांबरोबर फौजा पाठवून टिप्पूचा [illegible] काबीज केला ( १७९१ फेब्रुवारी ). नंतर [illegible] ३१ ) नरेंद्राहून कूच करून धारवाडच्या [illegible] नवलूर येथें मुक्काम केला. दुसऱ्या

भाऊ टेंकडीवर मोर्चे बांधण्यास गेले असतां किल्ल्यांतील लोकांनीं त्यांच्यावर हल्ला केला.परंतु त्यांत त्यांचाच पराभव होऊन भाऊनीं त्यांनां हांकून लाविलें व कांहीं तोफा काबीज केल्या. मराठयांनीं किल्ल्यांत रसद मुळींच जाऊं न दिल्यानें किल्ल्यांतील लोक हळूहळू पळून जाऊं लागले. अशा स्थितींत धारवाडच्या पेठेवर हल्ला चढवून भाऊनीं ती काबीज केली ( १३ डिसेंबर ).

तोफांचा व दारूगोळ्यांचा चांगला पुरवठा केल्यास धारवाडचा किल्ला लवकर पडेल असें लिटलनें मुंबई सरकारास वेळोवेळीं लिहिलें होतें. परंतु त्यांनीं तोफा व दारुगोळा न पाठवितां कॅ. फ्रेड्रिक यास यूरोपियन शिपायांची एक पलटण व कांहीं हिंदी शिपाई बरोबर देऊन रवाना केलें. दारूगोळ्याच्या कमतरतेमुळें मराठयांनां किल्ल्यावर तोफांचा मारा अव्याहत चालू ठेवता येईना त्यामुळें त्यांच्या तोफा बंद पडल्या कीं किल्ल्यांतील लोक पडलेली तटबंदी दुरुस्त करून घेत. या चेंगटपणास कंटाळून फ्रेड्रिक हा मोठ्या आव्यतेनें म्हणला कीं,"हल्ल्याखेरीज किल्ला हातीं येत नाहीं; तुम्ही तरी हल्ला करा नाहीं तरी आम्ही तरी करितों; हल्ल्यांत तुम्ही आमची कुमक करूं नये आम्ही तुमची करणार नाहीं." भाऊंनीं हल्ल्यानें किल्ला पडणार नाहीं वगैरे त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न केला परंतु त्याचा फारच आग्रह पाहून शेवटीं त्यास परवानगी दिली. तेव्हां फ्रेड्रिक यानें गवताच्या भाऱ्यांनीं खंदक भरून त्यांवरून पलीकडे जाऊन तटबंदीवर हल्ला चढविला ( ७ फेब्रु. ). परंतु किल्ल्यांतील लोकांनीं या वाळलेल्या भाऱ्यांनां आग लाविल्यामुळें फ्रेड्रिक यास मोठ्या धांदलीनें आपले शिपाई परत आणावे लागले;त्यावेळीं त्याचे बरेच लोक ठार झाले. या अपयशामुळें फ्रेड्रिक झुरणीस लागून मेला ( १३ मार्च ). धारवाडचा हा वेढा सात महिने टिकला.शेवटीं रसदेच्या अभावीं व टुलजमानानें टेकीस येऊन किल्ला मराठ्यांच्या स्वाधीन केला व ता. ६ एप्रिलला पेशव्यांचें निशाण किल्ल्यावर चढलें. तिकडे लॉर्ड कॉर्नवालीस हा मद्रासेहून ( ५ फेब्रु. ) वेलोरास आला व तेथून एक महिन्यानें बंगलोरास दाखल होऊन लगेच तेथील किल्ल्यास वेढा देऊन पंधरा दिवसांनीं त्यानें किल्ला सर केला ( २१ मार्च ). याच सुमारास कोपळ व बहादुरबेंडा हे किल्लेहि निजामानें घेतले. याच सुमारास नाना फडणविसानें परशुरामभाऊ पटवर्धन यांच्या मदतीस हरिपंत फडक्यानां पाठविलें. ते कृष्णा ओलांडून पानगल येथें निजामच्या मुलाखतीस आले. तेथें दोघांत असें ठरलें कीं सर्वांनीं मिळून टिप्पूला नरम करावें पण त्याच्या सत्तेचा समूळ नाश मात्र करूं नये. नंतर पानगलहून हरिपंत कर्नोळ येथें आले.

बंगलोर पडल्यानंतर निजामानें आपली दहा हजार फौज कॉर्नवालीस याच्या मदतीस रवाना केली,मार्गांत टिपूचा सरदार कुतुबुद्दीन याचा पराभव करून ही फौज इंग्रजांस येऊन मिळाली. मराठ्यांनां देखील इंग्रजांनीं श्रीरंगपट्टण सर करण्यापूर्वीं आपल्या फौजेनें त्यांनां जाऊन मिळावें असें वाटत होतें. म्हणून बंगलोर पडल्याचें समजल्यावर हरिपंतानें कर्नोळ येथून आपली छावणी हलवली व शिरें घेऊन व मदगिरी काबीज करण्यास सैन्य रवाना करून तो श्रीरंगपट्टणच्या रोखें निघाला आणि वाटेंत माकलीदुर्ग, भूसगाग व रतनागिरी हीं ठाणीं त्यानें काबीज केलीं.

धारवाड घेतल्यावर भाऊहि पुढें निघाले. बंगलोर घेतल्यावर कार्नवालीसनें आवरकांबी यास पश्चिमेकडून येऊन मिळण्याविषयीं पत्रें पाठविलीं परंतु आपण दक्षिणेकडे गेल्यावर मार्गे शत्रूनें आपली रसद व मार्ग बंद करूं नये म्हणून मार्गांत ठिकठिकाणीं आपलीं ठाणीं बसवीत भाऊ पुढें येत होते. मात्र यावेळीं इंग्रजी लष्कराच्या हालचाली कळेनात. कारण टिप्पूच्या बेरडांनीं इंग्रजी जासुदांनां मध्येंच कापून काढण्याचा सपाटा चालविला. निजाम येऊन मिळाल्यावर कार्नवालीस यानें पट्टणाकडे कूच केलें, परंतु टिप्पूनें इंग्रजांच्या वाटेंतील आपला मुलुख वेचिराख केल्यामुळें त्यांच्या गुरांस वैरण मिळेना. तसेंच त्यांची बाहेरची रसदहि टिप्पूनें लुटली. नंतर टिप्पूनें अरीकेरा येथें,इंग्रजांवर हल्ला केला व त्यांत त्याचाच पराजय झाला ( १५ मे ). पुढें चार दिवसांनीं कार्नवालीसनें श्रीरंगपट्टणच्या पश्चिमेकडील कनियामबाडी गांवीं आपली छावणी केली. तो पट्टणाच्या इतक्या समीप आला, तरी धान्यवैरणाच्या अभावामुळें त्याच्या छावणींतील शिपायांची व गुरांची फार हलाखी झाली व त्यामुळें त्याला वेढ्याचें काम हातीं घेणें अशक्य झालें. म्हणून त्यानें आवरकांबी यास परत पाठवून व बरोबरच्या तोफा फोडून आणि दारूगोळ्याचा नाश करून तो सर्व सैन्यासह मेलकोटयाकडे जावयास निघाला ( २६ मे ). इतक्यांत भाऊ व फडके हे मेलकोटयास आले. इंग्रज व मराठे परस्परांपासून जवळ असतांहि त्यांनां एकमेकाविषयीं कांहींच वार्ता नव्हती कारण जासुदांस टिप्पूचे बेरड रस्त्यांतच मारून टाकीत. ज्या दिवशीं कार्नवालीस मेलकोटयाकडे यावयास निघाला त्याच दिवशीं मराठेहि मेलकोटयाहून निघाले होते. वाटेंतच मराठ्यांची व इंग्रजांची गांठ पडली; तेव्हां इंग्रजांच्या सैन्यास व अंमलदारास अतिशय आनंद झाला. मराठ्यांच्या बरोबर धान्य वगैरे सामान भरपूर होतें. स्वतःच्या छावणींत महर्गता होईल याची पर्वा न करितां केवल भूतदयेनें प्रेरित होऊन भाऊ व हरिपंतानीं आपल्या दोस्तांच्या उपाशीं लोकांचें दुःख निवारण करण्याची स्वतःकडून शक्य तेवढी खटपट केली.

दोस्तांचें हें प्रचंड लष्कर दहा दिवसपर्यंत श्रीरंगपट्टण जवळ मुक्काम करून होतें. या अवधींत मराठ्यांची रसद यावयाची होती; ती दोस्तांच्या छावणींत येऊन दाखल झाली व मग सर्व लष्कर कूच करून नागमंगलम् येथें आलें. नंतर हरिपंतानें लिटलच्या पलटणीसह परशुरामभाऊस उत्तरेकडे शिरें वगैरे प्रांत ताब्यांत घेण्यासाठीं पाठविलें.

कायम राहण्यासाठीं, इंग्रजांचा वकील मॅलेट यास आपल्या लष्करांत बरेच दिवस ठेवून घेतलें होतें.

या पुढें मराठ्यांनीं पूर्वेकडे सरकण्याचा क्रम ठेविला. परंतु टिप्पू नदीकांठची खडकाळ जागा सोडून मैदानांत केव्हांहि आला नाहीं. टिप्पूचे वकील तुकोजी होळकरामार्फत तह घडवून आणण्याची खटपट करीत असतांच टिप्पूनें बहादुरबेंड्याचा किल्ला पुन्हां परत घेतला ( १३ जानेवारी १७८७ ). त्यामुळें टिप्पूच्या वकिलांच्या भाषणावर हरिपंताचा विश्वास बसेना. याचा परिणाम असा झाला कीं उभयपक्षीं लढाई बंद व्हावी असा ठराव ( १० फेब्रु० ) झाला होता तरी देखील पुढें कित्येक दिवसपर्यंत तह घडून आला नाहीं. टिप्पू तहाच्या कलमांत अतिशय घासाघीस लावीत असे, हें तहाला विलंब लावण्याचें दुसरें एक कारण होतें. सरतेशेवटीं नाइलाजानें टिप्पूनें एप्रिल महिन्यांत पुढीलप्रमाणें तह केला. टिप्पूनें तुंबून राहिलेल्या खंडणीदाखल मराठ्यांस ४८ लक्ष रुपये द्यावे. यापैकीं ३२ लक्ष तूर्त रोख द्यावे व बाकीचे हप्त्यांनें द्यावे. गजेंद्रगड, बदामी, नरगुंद व कित्तूर हीं संस्थानें व [illegible] हे मराठ्यांस देऊन अदवानीचें संस्थान निजामच्या हवालीं करावें; आणि सावनूरकर नवाबाचा मुलुख व राजधानी सावनूरकरास परत द्यावी.

यानंतर मराठे कृष्णा ओलांडून पलीकडे गेले. तेव्हां तहाचीं कलमें विसरून टिप्पूनें त्यांनां परत केलेला कित्तूरचा किल्ला पुन्हां काबीज केला व बेदनूर येथें मराठ्यांच्या कोंकणांत स्वारी करण्यासाठीं सैन्य जमा केलें. याचवेळीं चेरिकाच्या राजास इंग्रजांच्या तेलिचेरीवर हल्ला करण्यास चिथावून देऊन इंग्रजांचा स्नेही जो त्रावणकोरचा राजा त्याचें राज्य काबीज करण्याचीहि तयारी चालविली. टिप्पू हा मुसुलमान असल्यामुळें मनांतून निजामअलीचा ओढा त्याच्याकडे असे व त्यामुळें त्यानें एकदां टिप्पूशीं दृढ स्नेहसंबंध जोडण्याचा गुप्त प्रयत्नहि केला होता, परंतु टिप्पूनें त्याकरितां दोन्ही घराण्यांत शरीरसंबंध घडवून आणण्याची अट घातल्याकारणानें निजामास राग येऊन त्यानें तो नाद सोडून दिला. इकडे टिप्पूच्या एकंदर धोरणावरून कॉर्नवालिसचें मन त्याच्या हेतूविषयीं बरेंच साशंक होऊन तो निजाम व मराठे यांच्याशीं शक्य तितका दृढ स्नेह ठेवूं लागला. त्यानें निजामास तो टिप्पूवर स्वारी करील तर त्यास दोन पलटणी व तोफांची मदत देण्याचें गुप्तपणें कबूल केलें. हें समजतांच टिप्पूनें त्रावणकोरचें राज्य काबीज करण्याचा आपला उद्देश लपवून न ठेवतां उघडपणें ( २९ डिसेंबर ) त्रावणकोरच्या तटबंदीवर जातीनें हल्ला चढविला. मात्र त्यांत त्याला यश आलें नाहीं.

वरील कारणामुळें इंग्रजांनीं नानाफडणवीस व निजाम यांची टिप्पूवर स्वारी करण्यास मदत मागितली व इंग्रजांचा पुणें दरबारचा वकील मॅलेट याच्या तर्फे ( ता. २९ मार्च ) या तिघांनीं टिप्पूचा मुलूख आपसांत वांटून घ्यावा असें ठरविलें. तथापि तहाचा खर्डा नक्की ठरून त्यावर पेशव्यांच्या सह्या होण्यास आणखी दोन महिने लागले ( जून १ ). तिकडे निजामअलीच्या मनांत यावेळीं निराळेच डावपेंच असल्यामुळें जुलैच्या ४ थ्या तारखेपावेतों त्यानें तहावर सहीच केली नाहीं.

या मोहिमीस मे ( १७९० ) महिन्यांतच आरंभ झाला. या स्वारींत इंग्रज सेनापति मेडोज होता. त्यानें मद्रासहून निघून दक्षिणेकडून टिप्पूच्या मुलूखावर स्वारी करून कडूर, दिंदिगल, कोइंबतूर वगैरे स्थळें काबीज केलीं. कर्नल हार्टले हा मुंबईचें सैन्य घेऊन जलमार्गानें पश्चिमेकडून आला व कालीकतजवळ टिपूचें कांहीं सैन्य होतें त्याची त्यानें दाणादाण केली. पुढें जनरल आबरक्रोंबी हा मुंबईहून आणखी सैन्य घेऊन हार्टलेयास मिळाला व त्यानें लवकरच टिप्पूचा बहुतेक मलबार प्रांत काबीज केला मेडोज हा आपल्या मोहिमेचें काम संपवून जानेवारींत ( १७९१ ) मद्रासेस आला व त्या नंतर लॉर्ड कॉर्नवालीस हा स्वतः सेनापति बनला.

मराठ्यांच्या तर्फें आरंभीं परशुरामभाऊ पटवर्धन हे सेनापति होते. ते ( मे १७९० ) पुण्याहून निघून तासगांवास आले. इकडे टिप्पूकडे थकलेल्या खंडणीपैकीं कांहीं वसूल झाल्यास पहावें म्हणून नाना फडणविसांनीं टिपूच्या वकिलास आगस्टपावेतों [illegible]निरोप दिला नव्हता. मराठ्यांच्या मदतीस मुंबईहून कॅ[illegible]न लिटल हा मे महिन्यांत निघून जलमार्गें संगमेश्वरास [illegible] आला व तेथून अंबाघाट चढून ( जून १८ ) [illegible]गांवानजीक कुमठे गांवीं येऊन परशुरामभाऊ यानां [illegible]ळाला. नंतर या सर्व सैन्यासह परशुरामभाऊ कृष्णापार [illegible] होऊन ( ११ आगस्ट ) त्यानीं कर्नाटकांतील टिप्पूचीं निरा[illegible]निराळीं ठाणीं काबीज केलीं. याप्रमाणें ठाणीं घेत घेत भाऊ ध[illegible]रवाडानजीक ( नरेंद्र गांवीं ) पोहोंचले ( १४ सप्टेंबर ).

यावेळीं भाऊंचें ( इंग्रज पलट[illegible]गीशिवाय ) लष्कर १०००० स्वार व ३००० प्यादे इतकें ह[illegible]तें. तुंगभद्रेच्या दक्षिणेस टिप्पूचे सरदार बद्रुलजमानखान व कुतुबुद्दीन हे सुमारें ५००० सैन्यासह होते, यावेळीं निजामाचें सैन्यहि हैद्राबादेहून निघून कृष्णा उतरून कोपळच्या व बहादुरबेंड्याच्या किल्ल्यास वेढा द्यावयास आलें. तेव्हां कुतुबुद्दीन हा मोंगलांच्या तोंडावर राहिला व बद्रुलजमान हा धारवाडच्या किल्ल्यांत राहिला. किल्ल्यांतील शिबंदी दहा हजार होती.

धा र वा ड चा वे ढा.—परशुरामभाऊ व इंग्रज धारवाडास आले तरी त्यांच्याजवळ मोर्चेबंदी करण्यालायक तोफा नसल्यामुळें, कित्येक दिवसपर्यंत त्यांनीं किल्ल्यावर नुसती गोळागोळी चालविली, मात्र त्यावेळीं निरनिराळ्या मराठे सरदारांबरोबर फौजा पाठवून टिप्पूचा पुष्कळ मुलूख काबीज केला ( १७९१ फेब्रुवारी ). नंतर भाऊनीं ( आक्टो. ३१ ) नरेंद्राहून कूच करून धारवाडच्या पूर्वेस एक कोसावर नवलूर येथें मुक्काम केला. दुसऱ्या

भाऊ टेंकडीवर मोर्चे बांधण्यास गेले असतां किल्ल्यांतील लोकांनीं त्यांच्यावर हल्ला केला.परंतु त्यांत त्यांचाच पराभव होऊन भाऊनीं त्यांनां हांकून लाविलें व कांहीं तोफा काबीज केल्या. मराठ्यांनीं किल्ल्यांत रसद मुळींच जाऊं न दिल्यानें किल्ल्यांतील लोक हळूहळू पळून जाऊं लागले. अशा स्थितींत धारवाडच्या पेठेवर हल्ला चढवून भाऊनीं ती काबीज केली (१३ डिसेंबर).

तोफांचा व दारूगोळ्यांचा चांगला पुरवठा केल्यास धारवाडचा किल्ला लवकर पडेल असें लिटलनें मुंबई सरकारास वेळोवेळीं लिहिलें होतें. परंतु त्यांनीं तोफा व दारूगोळा न पाठवितां कॅ. फ्रेड्रिक यास यूरोपियन शिपायांची एक पलटण व कांहीं हिंदी शिपाई बरोबर देऊन रवाना केलें. दारूगोळ्याच्या कमतरतेमुळें मराठ्यांनां किल्ल्यावर तोफांचा मारा अव्याहत चालू ठेवता येईना त्यामुळें त्यांच्या तोफा बंद पडल्या कीं किल्ल्यांतील लोक पडलेली तटबंदी दुरुस्त करून घेत. या चेंगटपणास कंटाळून फ्रेड्रिक हा नोव्हा आव्हेतेनें म्हणला कीं,"हल्ल्याखेरीज किल्ला हातीं येत नाहीं; तुम्ही तरी हल्ला करा नाहीं तरी आम्ही तरी करितों; हल्ल्यांत तुम्ही आमची कुमक करूं नये आम्ही तुमची करणार नाहीं." भाऊंनीं हल्ल्यानें किल्ला पडणार नाहीं वगैरे त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न केला परंतु त्याचा फारच आग्रह पाहून शेवटीं त्यास परवानगी दिली. तेव्हां फ्रेड्रिक यानें गवताच्या भाऱ्यांनीं खंदक भरून त्यांवरून पलीकडे जाऊन तटबंदीवर हल्ला चढविला (७ फेब्रु.). परंतु किल्ल्यांतील लोकांनीं या वाळलेल्या भाऱ्यांनां आग लाविल्यामुळें फ्रेड्रिक यास मोठ्या धांदलीनें आपले शिपाई परत आणावे लागले;त्यावेळीं त्याचे बरेच लोक ठार झाले. या अपयशामुळें फ्रेड्रिक झुरणीस लागून मेला (१३ मार्च). धारवाडचा हा वेढा सात महिने टिकला.शेवटीं रसदेच्या अभावीं व हुलजमानानें टेकीस येऊन किल्ला मराठ्यांच्या स्वाधीन केला व ता. ६ एप्रिलला पेशव्यांचें निशाण किल्ल्यावर चढलें. तिकडे लॉर्ड कॉर्नवालीस हा मद्रासेहून (५ फेब्रु.) वेलोरास आला व तेथून एक महिन्यानें बंगलोरास दाखल होऊन लगेच तेथील किल्ल्यास वेढा देऊन पंधरा दिवसांनीं त्यानें किल्ला सर केला (२१ मार्च). याच सुमारास कोपळ व बहादुरबेंडा हे किल्लेहि निजामानें घेतले. याच सुमारास नाना फडणविसानें परशुरामभाऊ पटवर्धन यांच्या मदतीस हरिपंत फडक्यानां पाठविलें. ते कृष्णा ओलांडून पानगल येथें निजामच्या मुलाखतीस आले. तेथें दोघांत असें ठरलें कीं सर्वांनीं मिळून टिप्पूला नरम करावें पण त्याच्या सत्तेचा समूळ नाश मात्र करूं नये. नंतर पानगलहून हरिपंत कर्नोळ येथें आले.

बंगलोर पडल्यानंतर निजामानें आपली दहा हजार फौज कॉर्नवालीस याच्या मदतीस रवाना केली,मार्गांत टिपूचा सरदार कुतुबुद्दीन याचा पराभव करून ही फौज इंग्रजांस येऊन मिळाली. मराठ्यांनां देखील इंग्रजांनीं श्रीरंगपट्टण सर करण्यापूर्वी आपल्या फौजेनें त्यांनां जाऊन मिळावें असें वाटत होतें. म्हणून बंगलोर पडल्याचें समजल्यावर हरिपंतानें कर्नोळ येथून आपली छावणी हलवली व शिरें घेऊन व मदगिरी काबीज करण्यास सैन्य रवाना करून तो श्रीरंगपट्टणच्या रोखें निघाला आणि वाटेंत माकलीदुर्ग, भूसगाग व रतनागिरी हीं ठाणीं त्यानें काबीज केलीं.

धारवाड घेतल्यावर भाऊहि पुढें निघाले. बंगलोर घेतल्यावर कार्नवालीसनें आवरक्रांबी यास पश्चिमेकडून येऊन मिळण्याविषयीं पत्रें पाठविलीं परंतु आपण दक्षिणेकडे गेल्यावर मार्गे शत्रूनें आपली रसद व मार्ग बंद करूं नये म्हणून मार्गांत ठिकठिकाणीं आपलीं ठाणीं बसवीत भाऊ पुढें येत होते. मात्र यावेळीं इंग्रजी लष्कराच्या हालचाली कळेनात. कारण टिप्पूच्या बेरडांनीं इंग्रजी जासुदांनां मध्येंच कापून काढण्याचा सपाटा चालविला. निजाम येऊन मिळाल्यावर कार्नवालीस यानें पट्टणाकडे कूच केलें, परंतु टिप्पूनें इंग्रजांच्या वाटेंतील आपला मुलुख बेचिराख केल्यामुळें त्यांच्या गुरांस वैरण मिळेना. तसेंच त्यांची बाहेरची रसदहि टिप्पूनें लुटली. नंतर टिप्पूनें अरीकेरा येथें,इंग्रजांवर हल्ला केला व त्यांत त्याचाच पराजय झाला (१५ मे). पुढें चार दिवसांनीं कार्नवालीसनें श्रीरंगपट्टणच्या पश्चिमेकडील कनियामबाडी गावीं आपली छावणी केली. तो पट्टणाच्या इतक्या समीप आला, तरी धान्यवैरणाच्या अभावामुळें त्याच्या छावणींतील शिपायांची व गुरांची फार हलाखी झाली व त्यामुळें त्याला वेढ्याचें काम हातीं घेणें अशक्य झालें. म्हणून त्यानें आवरक्रांबी यास परत पाठवून व बरोबरच्या तोफा फोडून आणि दारूगोळ्याचा नाश करून तो सर्व सैन्यासह मेलकोट्याकडे जावयास निघाला (२६ मे). इतक्यांत भाऊ व फडके हे मेलकोट्यास आले. इंग्रज व मराठे परस्परांपासून जवळ असतांहि त्यांनां एकमेकांविषयीं कांहींच वार्ता नव्हती कारण जासुदांस टिप्पूचे बेरड रस्त्यांतच मारून टाकीत. ज्या दिवशीं कार्नवालीस मेलकोट्याकडे यावयास निघाला त्याच दिवशीं मराठेहि मेलकोट्याहून निघाले होते. वाटेंतच मराठ्यांची व इंग्रजांची गांठ पडली; तेव्हां इंग्रजांच्या सैन्यास व अंमलदारास अतिशय आनंद झाला. मराठ्यांच्या बरोबर धान्य वगैरे सामान भरपूर होतें. स्वतःच्या छावणींत महर्गता होईल याची पर्वा न करितां केवळ भूतदयेनें प्रेरित होऊन भाऊ व हरिपंतानीं आपल्या दोस्तांच्या उपाशीं लोकांचें दुःख निवारण करण्याची स्वतःकडून शक्य तेवढी खटपट केली.

दोस्तांचें हें प्रचंड लष्कर दहा दिवसपर्यंत श्रीरंगपट्टण जवळ मुक्काम करून होतें. या अवधींत मराठ्यांची रसद यावयाची होती; ती दोस्तांच्या छावणींत येऊन दाखल झाली व मग सर्व लष्कर कूच करून नागमंगलम् येथें आलें. नंतर हरिपंतानें लिटलच्या पलटणीसह परशुरामभाऊस उत्तरेकडे शिरें वगैरे प्रांत ताब्यांत घेण्यासाठीं ...

भाऊनें प्रथम निजगलचा किल्ला घेऊन व निजगलची पेठ जाळून आणि शिरें घेऊन अचानक चित्रदुर्गास जाऊन वेढा घातला परंतु चित्रदुर्ग किल्ला हस्तगत होईना. तेव्हां त्यानें आसमंतांतील दुसरीं कित्येक तटबंदीचीं ठिकाणें घेतलीं.

इकडे कार्नवालीस यानें कृष्णगिरी खेरीज बाकीचा सर्व बारामहाल प्रांत जिंकून घेतला; व मग बंगलोर व गुरमकोंडा यांच्या दरम्यानचे किल्ले सर करण्याचें ठरवून तो त्या उद्योगास लागला. उत्तरेकडे मोंगलांनींहि पेन्नार नदीकांठचा गंडीकोट्टा किल्ला काबीज करून गुरमकोंड्यास वेढा घातला. परंतु पुष्कळ दिवस वेढा घातला तरी तो पडेना म्हणून नंदिदुर्ग घेतल्यावर कार्नवालीसनें त्याच्या मदतीस कांहीं मोठ्या तोफा व फौज आपण बंगलोरास राहिला.

यापुढें परशुरामभाऊनें फार दिवसांपासून मनांत असलेलें बेदनूर काबीज करण्याचें काम हातीं घेतलें. प्रथम होळेहोनूर हस्तगत करून, शिमोग्याच्या रोखें तो निघाला. शिवमोघ्याचा किल्ल्यांत टिप्पूचा रेझासाहेब नांवाचा सेनापति ७००० प्यादे, ८०० स्वार व १० तोफा एवढ्या सरंजामासह होता. भाऊ वेढा देण्याकरितां येत आहे असें पाहून रेझा आपल्या लोकांसह किल्ल्याच्या नैर्ऋत्येस झाडींत जाऊन राहिला. तेव्हां भाऊनेंहि प्रथम किल्ला न घेतां रेझा जेथें दडून बसला होता तेथें येऊन छावणी केली. येथें आल्यावर भाऊनें आपला मुलगा आप्पासाहेब यास रेझावर पाठविलें. रेझाची जागा झाडींत असून फार अडचणीची असल्यामुळें तेथें घोडदळाचा कांहीं उपाय चालण्यासारखा नव्हता. म्हणून आप्पानें प्रथम पायदळाचा हल्ला करून शत्रूस तळावरून हुसकून लाविलें, व मग त्यावर घोडस्वार घालून पराभव केला. रेझाचा मोड झाल्यावर थोड्याच दिवसांत शिवमोघ्याच्या किल्लाहि भाऊच्या हातीं पडला (२जानेवारी १७९२). नंतर शिवमोघ्याच्या आसमंतात आपलीं ठाणीं घालून भाऊ बिदनूरकडे वळले. याच वेळी कार्नवालीसनें बंगलोरहून निघून सावनदुर्ग, रामगिरी वगैरे किल्ले घेतले.

निजाम गुरमकोंड्यास वेढा देऊन बसला होता परंतु त्याला तो किल्ला अखेरपावेतों सर करितां आला नाहीं. त्यानें बऱ्याच प्रयत्नाअंतीं खालचा किल्ला मात्र काबीज केला. कार्नवालीस श्रीरंगपट्टणाच्या रोखें जात आहे असें समजल्यावर वरील किल्ला हस्तगत करण्याची आशा सोडून मोंगल तेथून निघाला व कार्नवालीसला येऊन मिळाला (२५ जाने.). मात्र त्यानें गुरमकोंडयाच्या खालच्या किल्ल्यांत भरपूर शिबंदी ठेविली. भाऊ शिमोघ्याहून निघाला तो बिदनुरास दाखल झाला व त्यानें किल्ल्यास घेरा घालण्याची तयारी चालविली परंतु बिदनूरच्या वेढ्याचें काम तसेंच टाकून एकदम श्रीरंगपट्टणास निघून जावें अशीं नाना फडणविसाचीं त्यास दररोज पत्रें येऊं लागलीं, म्हणून बिदनूर घेण्याचा बेत रहित करून भाऊ श्रीरंगपट्टणाकडे तडकाफडकीं वळले. याप्रमाणें कार्नवालीस, हरिपंत फडके व निजाम अलीचा पुत्र सिकंदर जहा यांचें संयुक्त सैन्य श्रीरंगपट्टणासमोर आलें (५ फेब्रु.). दुसऱ्याच दिवशीं दोस्तांनीं किल्ल्याच्या बाहेरील टिप्पूच्या सेनेवर हल्ला करून तटबंदीबाहेरचा सर्व भाग आपल्या ताब्यांत घेतला. आतां टिप्पू दोस्तांशीं तह करण्याकरितां खटपट करूं लागला, परंतु दोस्तांनीं तिकडे दुर्लक्ष केलें. सरतेशेवटीं टिप्पूकडून अधिक नरमाईचीं बोलणीं आल्यानें त्यांनीं तिकडे त्याच्या वकिलाची भेट घेतली. मात्र दोस्तांनीं आपल्या वेढ्याच्या कामांत बिलकुल व्यत्यय येऊं दिला नाहीं. इतक्यांत पश्चिमेकडून आबरक्रांबीची तुकडी येऊन पोंचली तेव्हां तिच्यावर टिप्पूनें हल्ला केला पण तो परतवून लावण्यांत आला. मात्र इकडे तहाची वाटाघाट चालूच होती. शेवटीं बरीच भवति न भवति होऊन टिप्पूनें दोस्तांच्या अटीस आपली संमति दिली व लागलीच युद्ध तहकूब करण्यांत आलें (२३ फेब्रुवारी). या तहान्वयें असें ठरलें कीं, युद्धाच्या सुरवातीपूर्वी टिप्पूकडे जेवढा मुलूख होता त्याचा अर्धा त्यानें दोस्तांच्या हवालीं करावा, आणि शिवाय तीन कोटी तीस हजार रुपये खंडणी भरावी; या खंडणीपैकीं अर्धी रक्कम ताबडतोब द्यावी व बाकीच्या रकमेची फेड एका वर्षांत करावी; हैदरच्या वेळेपासून दोस्तांकडील जेवढे लोक कैदेंत होते त्या सर्वांची मुक्तता करावी; आणि या सर्वांच्या हमीदाखल आपले दोन पुत्र दोस्तांजवळ ओलीस ठेवावे. त्याप्रमाणें टिप्पूचे दोन मुलगे इंग्रजांच्या छावणींत येऊन दाखल झाले व खंडणीची अर्ध्याहून अधिक रक्कमहि दोस्तांच्या पदरांत पडली. परंतु इतक्यांत दोस्तांच्या स्वाधीन जो मुलुख करावयाचा, त्यांत कूर्ग संस्थान जातें ही गोष्ट टिप्पूच्या ध्यानांत येऊन तो गडबड करूं लागला. कूर्ग हें श्रीरंगपट्टणाचें दारच असल्यामुळें तें मला तुमच्या स्वाधीन करितां येत नाहीं अशी त्यानें हरकत घेतली. तेव्हां दोस्तांनीं वेढ्याची लागलीच तयारी केली व तहाच्या अटींमध्यें आपण अणुमात्रहि सवलत देण्यास तयार नाहीं असें जाहीर केलें. त्यामुळें टिप्पूनें आपला आग्रह सोडला. या युद्धांत जो कांहीं एकंदर फायदा झाला त्याचे तीन सारखे विभाग करून ते दोस्तांनीं आपसांत वांटून घ्यावेत असें ठरून मार्च महिन्याच्या अखेरीस दोस्तांचीं लष्करें आपापल्या मुलखाकडे निघालीं.

नेपोलियननें ईजिप्तवर स्वारी केली असतां त्याच्या मनांत हिंदुस्थानावर स्वारी करण्याचें आलें होतें; पण त्याला इकडची माहिती चांगली नव्हती. टिप्पूनें या बाबतींत त्याला पत्रें पाठविलीं होतीं व मदत देण्याचेंहि कबूल केलें होतें; परंतु, टिप्पूलाहि यूरोपियन राजकारण, त्यांचें बलाबल व भौगोलिक आणि ऐतिहासिक माहिती अगदींच त्रोटक असल्यानें या मसलतीचा कांहीं उपयोग झाला नाहीं व दोघांचा हेतु अखेरपर्यंत तडीस गेला नाहीं (सन १७९८).

मात्र फ्रेंचांशीं टिप्पूनें दोस्तीचा तह करून व त्यांचीं पलटणें चाकरी ठेवून इंग्रजांनां हाकलून लावण्याचा उद्योग

आरंभला (जून १७९८). तेव्हां वेलस्लीनें यांबद्दल खुलासा मागितला असतां टिप्पूनें त्याला धुडकावून लाविलें. त्यामुळें वेलस्लीनें टिप्पूशीं युद्ध पुकारलें ( २२फेब्रुवारी १७९९). या लढाईच्या हालचाली फार सपाट्यानें वेलस्लीनें चालविल्या. मुंबईहून जलमार्गानें आलेल्या इंग्रज फौजेनें टिप्पूच्या कूर्ग प्रांतांतील सैन्याचा पराभव केला ( ६ मार्च ). इंग्रजी मुख्य फौज ( ३७००० ) जनरल हॅरिस याच्या हाताखालीं होती, तिनें टिप्पूच्या राज्यांत प्रवेश करून ( ५ मार्च ), म्हैसूरच्या पूर्वेस असलेल्या ( चौदा कोसांवरील ) मळवेली गांवीं टिप्पूचा पराभव केला ( २७ मार्च ) व श्रीरंगपट्टणावर चौड करून त्यास वेढा घातला. वेढा उठविण्यासाठीं टिप्पू शेवटपर्यंत मोठ्या शौर्यानें लढला; अखेर पट्टणच्या वेशींत इंग्रजांनां अडवीत असतां डोक्यांत गोळी लागून तो ठार झाला ( ४ मे ). तेथील प्रेतांच्या खचांतून त्याचें प्रेत ओळखून काढून, तें हैदरअल्लीच्या कबरस्थानाजवळच लालबागेंत दुसऱ्या दिवशीं पुरण्यांत आलें; त्यावेळीं इंग्रजांनीं त्याला योग्य तो राजकीय मान दिला. त्यानंतर इंग्रजांनीं पट्टण लुटलें, त्यांत त्यांनीं ताळतंत्र सोडून भयंकर लूट केली. वेलस्ली म्हणतो, कीं " लूट थांबविण्यासाठीं मला अतिशय त्रास पडला; सैनिकांनां शिक्षा करावी लागली, फटके मारावे लागले, एवढेंच नव्हे तर पुष्कळांनां फांशीहि द्यावें लागलें. "

टिप्पूच्या मृत्यूसमयीं त्याचें राज्य ३०,४०,००० होनांचें ( १ कोटी ६ लक्ष रुपये ) होतें. तें इंग्रज, मराठे व निजाम यांनीं आपसांत वांटून घेतलें व थोडेसें म्हैसूरच्या पूर्वीच्या राजाच्या चामराज नांवाच्या वंशजाच्या स्वाधीन केलें. पट्टण घेतल्यावर इंग्रजांनीं टिप्पूच्या कुटुंबास आपल्या ताब्यांत घेऊन त्याच्या खर्चास २,४०,००० होनांचा मुलुख लावून दिला व त्यांनां वेलोर येथें ठेवण्यात आलें. पुढें वेलोर येथील शिपायांनीं इंग्रजांविरुद्ध बंड केलें ( १० जुलै १८०६). त्यांत टिप्पूच्या मुलांचा हात असावा असें ठरवून इंग्रजांनीं त्यांची जहागीर जप्त करून त्यांनां तेथून काढून कलकत्ता येथें नेऊन ठेविलें. विल्सन म्हणतो कीं, मुलें दंग्यांत सामील असल्याबद्दलचा पुरावा मुळींच मिळाला नव्हता.

टिप्पूनें १७ वर्षें राज्यकारभार केला. त्याचा स्वभाव चंचल, लोभी, अविश्वासी, क्रूर व धर्मवेडा असा होता. बापानें तर त्याला वेडा ठरविलें होतें. त्याची हिंदु प्रजाहि त्यास कंटाळली होती. कारण त्यानें पुष्कळ हिंदूंस हालहाल करून बाटविलें व जे बाटेनात त्यांनां ठार केलें. एक नवीन धर्म स्थापन करून आपण त्याचे पैगंबर व्हावें अशी त्याची मनीषा होती. तथापि तो शूर व महत्त्वाकांक्षी होता. त्यानें नवीन कालगणना ( वर्षाच्या महिन्यांचीं नांवें व आठवडा वगैरे ) सुरू केली; त्याचप्रमाणें मापें, वजनें व नाणींहि नवीनच पाडलीं. तो स्वतःस फार शहाणा समजे. मात्र त्यानें आपला राज्यकारभार शिस्तवार चालविला व लष्करी व मुलकी सुधारणाहि केल्या. तो आपले हुकूम स्वतः लिहून काढी. फारशी, कानडी व उर्दू या भाषा त्याला चांगल्याच अवगत होत्या. तो धर्मवेडा होता तरी पण संकटसमयीं ब्राह्मणांनां अनुग्रानें वस्त्रविन्यास व देवांची प्रार्थना करण्यास सांगे. तो आपल्या कैद्यांनां फार क्रूरपणें वागवी. कलाकौशल्याचा व वाङ्मयाचा तो शोकी होता. त्यानें आपल्या राजवाड्यांत फार मोठा ग्रंथसंग्रह जमविला होता; त्यांत १० व्या शतकापासूनचे वरेचसे संस्कृत हस्तलिखित ग्रंथ होते. तसेंच कुराणाचीं भाषांतरें, मोंगल इतिहासाच्या बखरी, हिंदुस्थानच्या इतिहासाच्या तवारिखा वगैरे ग्रंथहि होते. हा सर्व संग्रह कलकत्ता येथें नेऊन ठेवला असून त्याची एक यादी कॅप्टन स्टुअर्ट यानें केलेली छापिली आहे. टिप्पूनें स्वतः दोन ग्रंथ तयार केले होते त्यांत पत्रांचाच भरणा विशेष आहे; एकाचें नांव फर्मान—बनाम—अलीराज असून दुसऱ्यास फतह्-उल्—मजाहिदीन म्हणतात; पैकीं दुसऱ्या ग्रंथाचा कांहीं भाग भाषांतरित करून मि. स्क्रिप यानें छापिला आहे. टिप्पूचें खरें नांव फत्तेअलीखान असून त्याला बारा मुलें झालीं होतीं. त्यांपैकीं महम्मद सुलतान ( गुलाम महंमुद ) हा स. १८७७ त मरण पावला व मुहम्मद यासीन सुलतान हा सन १८४९ मध्यें मेला. बाकीचीं लहानपणींच वारलीं.

टिप्पूचें सिंहासन फार मौल्यवान व शोभिवंत होतें. तें अष्टकोनाकृति असून आठहि बाजूस वाघांचीं तोंडें बसविलेलें व वाघाप्रमाणें पाय असलेलें होतें. तें सर्व सोन्याचें असून वाघाचे दांत व डोळे रत्नांचे होते. टिप्पूस वाघ हें जनावर फार आवडे व तेंच त्याचें राजचिन्ह असे. " विजयी पुरुष हा ईश्वराचा वाघ आहे" असें वाक्य त्याच्या सर्व वस्तूंवर ( वाघाच्या तोंडासह )कोरलेलें असे,समारंभपूर्वक तो या सिंहासनावर अखेरपर्यंत बसला नाहीं असें म्हणतात. लढाईनंतर हें सिंहासन व पुढें दिलेल्या वस्तू विलायतेस ई.इं. कंपनीच्या अजबखान्यांत ठेविल्या. पुढें (१८३१)त्या चौथ्या विल्यम राजास नजर केल्या.तेव्हांपासून त्या अद्यापि विंडसर कॅसल या राजवाड्यांत ठेविलेल्या आहेत. या सिंहासनावर मोत्यांची झालरी, छत व त्यांवर एक रत्नजडित हुम्मा पक्षी होता. तो खबुतराएवढा असून त्याच्या छातींत राजकीय शिक्षा व कुराणांतील दोन वाक्यें कोरलेलीं आहेत. टिप्पूची रत्नजडित तलवारहि हल्लीं विंडसर कॅसलमध्येंच आहे. हिच्या मुठीवर वाघाचीं तोंडें असून तिच्या पात्यावर दोहोंकडे कुराणांतलि वाक्यें कोरलेलीं आहेत; याशिवाय टिप्पूची बंदुक,शिरस्त्राण, निशाण वगैरे वस्तूहि वरील अजबखान्यांत आहेत. पट्टण येथील टिप्पूच्या कबरस्थानास पुढें डलहौसीनें हस्तिदंताची नकशी काढलेले शिसवी दरवाजे नजर केले. लालबाग व किल्ला यांच्या दरम्यान कावेरीतीरीं टिप्पूचा राजवाडा दर्यादौलतबाग नांवाचा आहे. येथें कांहीं

दिवस वेल्स्ली राहिला होता. हा संगमरवरी महाल फार सुंदर असून त्याच्या भिंतीवर नक्षी कोरलेली आहे. पूर्वी या नक्षींत सोनें भरलेलें होतें. भिंतीवर रंगीत चित्रें असून तीं बहुधां टिप्पूनें केलेल्या इंग्रजांच्या पराभवाचीं निदर्शक आहेत; त्यातल्या त्यांत वेली हा टिप्पूला ससैन्य शरण आल्याचें चित्र उत्कृष्ट आहे. त्याची डागडुजी दोन वेळ झाली आहे.

[ संदर्भग्रंथः—स्मिथ—ऑक्सफोर्ड हिस्टरी ऑफ इंडिया; खरे शास्त्री यांचे खंड, ७, ८, ९; डफ पु २, ३; विल्क्स—म्हैसूर; वील; वेलस्ली—डिस्पॅचेस; इतिहास संग्रह; बौरिंग—टिप्पू सुलतान ]

**टिप्पेरा,** जि ल्हा.-बंगाल, चित्तगांव विभागांतील जिल्हा. उ. अ. २३°२' ते २४°१६' व पू रे. ९०°३४' ते ९१°२२'. याचें क्षेत्रफळ २४९९ चौ. मैल. याच्या वायव्येस डाक्का व मैमनसिंग जिल्हे, ईशान्येस सिलहट, पूर्वेस हिलटिप्पेरा संस्थान, दक्षिणेस नोआखाली व पश्चिमेस मेघना नदी व त्यापलीकडे फरिदपूर, डाक्का व मैमेनसिंग जिल्हे आहेत. कोमिल्लाच्या पश्चिमेस ५ मैलांवर लालमई टेंकड्या आहेत. इतरत्र जमीन सपाट आहे. पूर्वेस जंगलमय अशा कांहीं हिल-टिप्पेराचा भाग आहे. या जिल्ह्यांत मेघना, गोमती, दाकातिया, तितास या नद्या आहेत. गोमतीचा उगम टिप्पेरा टेंकड्यांत होतो व दौदकान्डीजवळ मेघनेस जाऊन मिळते. दाकातिया देखील टिप्पेरा टेंकड्यांत उगम पावून मेघनेस जाऊन मिळते. तितास ही जिल्ह्याच्या उत्तर भागांतील प्रमुख नदी होय. मुहारी, विजयगंगा, व बर्हिगंगा या इतर नद्या होत. ह्या सर्व नद्यांच्या पात्रांतून ४ टन वजनाच्या बोटी जाऊं शकतात. लालमई टेंकड्यांवर जंगल विपुल आहे. जंगलांतून, चित्ते, वाघ, रानडुकरें आढळतात. उष्णमान मध्यम. पावसाळा मार्च एप्रिलमध्येंच सुरू होतो. वार्षिक पाऊस सरासरी ७५ इंच पडतो.

इतिहास.—सन १७३३ पावेतों ह्या जिल्ह्याचा हिलटिप्पेरा संस्थानांत समावेश होत असे. तेव्हां अर्थात् तोंपावेतोंचा ह्या जिल्ह्याचा इतिहास त्या संस्थानांत अंतर्भूत आहे. १२७९, १३४५ व १६२० ह्या सालीं मुसुलमानांनीं ह्या संस्थानावर स्वाऱ्या केल्या. पण एकाहि वेळीं राजानें आपलें स्वातंत्र्य गमाविलें नाहीं. १७३३ सालीं बंगालचा अधिकारी सुजाउद्दीनखान यानें या प्रदेशावर स्वारी करून तो घेतला. तेव्हांपासून ह्या जिल्ह्याचा प्रदेश मोंगलांकडे राहिला. १७६५ सालीं ह्या जिल्ह्याची व्यवस्था कंपनी सरकाराकडे आली. तरीपण जिल्ह्याचा ⅚ भाग राजाच्या ताब्यांत होताच व तो त्याबद्दल खंडणीहि देत असे. त्यावेळीं टिप्पेरा व नोआखाली जिल्ह्यांचा जलाल विभागांत समावेश होत असे. १७७२ सालीं उत्पन्नाकरितां नोआखाली व टिप्पेरा ह्या दोघांचा एक जिल्हा करण्यांत आला. १८२२ सालीं ते वेगळे वेगळे करण्यांत आले. स. १८६० मध्यें कुकी लोकांनीं ह्या जिल्ह्यावर स्वारी केली होती. स.१८६१मध्यें ह्यांच्यावर सैन्य पाठविण्यांत आलें पण लुशी लोक जंगलांत पळून गेल्यामुळें पाठलाग करणें अशक्य होतें. लोकसंख्या वाढत्या प्रमाणावर आहे. लो. सं. (१९२१) २७४३०७३. वीस वर्षांपूर्वी ही साठ हजारांनीं कमी होती. जिल्ह्यांत तीन शहरें (कोमिल्ला, ब्राम्हणबारिया, चांदपूर) व खेडीं ६९१६ आहेत. लोक मेघनेच्या सुपीक प्रदेशाच्या बाजूनें जास्ती वस्ती करून आहेत. कोमिल्लाच्या पूर्व,उत्तर, व दक्षिण भागांतहि वस्ती दाट आहे. जिल्ह्याच्या दक्षिण व मध्यभागीं मात्र लोकवस्ती अगदीं पातळ आहे. भाषा बंगाली असून ह्या भाषेस पूर्व अथवा मुसुलमानी-बंगाली ह्या नांवानें ओळखतात. शेंकडा ७१ लोक मुसुलमान व २९ हिंदू आहेत. बहुतेक सर्व मुसुलमान शेख ज्ञातीचे आहेत. हिंदुजाती—चांडाळ, कैवर्त, जुगी, कायस्थ व ब्राह्मण या मुख्य होत. शेंकडा ७९ लोक शेतकीवर उपजीविका करितात. येथील जमीन फार सुपीक आहे पाऊसहि ठीक पडतो. पाटाच्या पाण्याच्या मदतीची जरूरी नसते. वहीत जमीन १७२८ चौ. मैल असून पडीत २२२ चौ. मै. आहे. तांदुळाचें उत्पन्न मुख्य आहे. ह्याच्या खालोखाल उत्पन्न तागाचें. बंगालप्रांतांत सर्वांत जास्ती ताग येथें पेरतात. कांहीं गळिताचीं धान्येंहि काढतात. शेतकरी वर्ग खाऊन पिऊन सधन आहे. उन्हाळ्यांत बाटाकान्डि येथें गुरांचा मोठा बाजार भरतो. नद्यांस बांध घालून पाणी चढविण्याची चाल आहे कालवे वगैरे नाहींत. कोमिल्ला जवळ मैनामत्ती कापड होतें. पितळेचीं भांडीं, मातीचीं भांडीं, शेतकीचीं हत्यारें वगैरे मालहि तयार करितात. चांदपूर, अखौरा व चातलपूर येथें यंत्रानें तागाचे गठ्ठे बनवितात. पूर्वभागांत आसाम-बंगाल रेल्वेनें दळणवळण होतें. पश्चिमभागांत नद्यांच्या पात्राचा उपयोग होतो. बाहेर पाठविला जाणारा मुख्य माल म्हणजे तांदूळ व ताग होय. येथून तागाचे गठ्ठे नारायणगंज, कलकत्ता व चित्तगांव येथें पाठविले जातात. १९०३-४ सालीं २६००० टन तांदूळ बाहेरगांवीं गेला. तांदूळ बहुतेक आसाम, नारायणगंज व चित्तगांव येथें जातो. याशिवाय इतर बाहेर जाणारा माल सुपाऱ्या, पोतीं, चामडें, चटया, मिरच्या, गळिताचीं धान्यें व गांवठी कापड हा होय. जिल्ह्यांत येणारा माल सुती कापड, मीठ व मातीचें तेल हा आहे. चांदपूर मेघनेवरील मतलबबाजार, हाजीगंज, चितोसी, दौलतगंज,दाकातिया नदीवरील बाघमार, कोमिल्ला, गौरीपूर, लालपूर, जाफरगंज, कंपनीगंज, गोमती नदीवर पंचपुकुरिया चांदुरिया, ब्राह्मणबारिया, अखौरा व तितास-नदीवर रामचंद्रपूर हीं व्यापाराचीं मुख्य ठिकाणें होत. ह्या जिल्ह्याचे तीन पोटविभाग पाडले आहेत. त्यांचीं नांवें कोमिल्ला, ब्राह्मणबारिया व चांदपूर. डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्जांच्या कचेऱ्या कोमिल्ला येथें आहेत.

कायमच्या धारावंदीच्या वेळीं ह्या जिल्ह्याचें व नोआखाली जिल्ह्याचें मिळून उत्पन्न ९·९४ लाख रुपये ठरलें गेलें. १८००

सालीं त्याचा सारा ११.५६ लाख रु. करण्यांत आला. पैकीं टिप्पेरांत २३७६ इस्टेटी असल्यामुळें त्याचें उत्पन्न १०.८९ लाख रुपये होतें त्या जिल्ह्यांत चकला रोशनाबाद इस्टेट ही एकच महत्त्वाची इस्टेट आहे. ती हिलटिप्पेराच्या राजाकडे आहे. जमनिसारा व उत्पन्न ( १९०३-४ ) ११०५ हजार व एकंदर उत्पन्न २४६८ हजार आहे. कोमिल्ला, ब्राह्मणाबाद, चांदपूर या ठिकाणीं म्युनिसिपालिट्या आहेत. कोमिल्लाजवळ गोमतीचें पाणी बांध घालून अडवितात. शिक्षणसंस्था एकंदर अडीच तीन हजारांपर्यंत असून त्यांत एक कॉलेज व शंभर सवाशें दुय्यम शिक्षणाच्या शाळा येतात.

सं स्था न.—बंगालमधील एक संस्थान. याला हिल-टिप्पेरा असें म्हणतात. तेव्हां याची माहिती त्या नांवाखालीं दिलेली आहे.

**टिफ्लिस,** प्रां त.—रशियन ट्रान्सकाकेशियांतील संस्थान. त्या संस्थानांत खनिज द्रव्यें फार आहेत. परंतु फक्त तांबें काढलें जातें.पेट्रोलियम व दुसरे खनिज तेलांचे झरे येथें पुष्कळ आहेत या संस्थानांतून कुरा व तिला मिळणाऱ्या नद्या वाहतात. या संस्थानचें क्षेत्रफळ १५७७६ चौरस मैल आहे. १९१५ सालीं लोकसंख्या १३९४८०० होती. यांत नऊ जिल्हे आहेत. शेती हा येथील मुख्य धंदा आहे. येथें उत्तम रेशीम तयार करितात. ⅓ क्षेत्रावर जंगल आहे. येथील रहिवाशांत कातड्याचा, धातूचा व लोंकरीचा माल तयार करण्यांत बरीच कर्तबगारी दिसते.

श ह र.—रशियन कांकेशिया प्रांतांतील टिफ्लिस हें एक शहर असून याच नांवाच्या प्रांताची ही राजधानी आहे. उंच पर्वताच्या पायथ्याशीं कुरा नदीच्या दोन्ही कांठांवर हें वसलेलें आहे. येथून रेल्वेरस्ता निघून तो यूरोपियन रशियांत गेलेला आहे. शहरांत उत्तम ख्रिस्ती चर्चें व मशीदी, बागा, रस्ते व इमारती आहेत. येथें बंदुका व तरवारी चांगल्या होतात. सुती व रेशमी कापडाचे कारखाने आहेत. लोकसंख्या ( १९१३ ) ३२७८०० आहे. इ. सन. ३८० च्या सुमारास जॉर्जिअन लोकांनीं हें शहर वसविलें. ५७० सालीं इराणनें हें घेतलें पण त्याच्या ताब्यांत तें फार वर्षे टिकलें नाहीं. ग्रीक, खजार, अरब या लोकांनीं हें शहर अनेक वेळां लुटलें. तैमुरलंगानें या शहरावर स्वारी केली होती. या स्वारीनंतर तें इराणच्या हातीं मधून मधून जाई. स. १७९५त इराणच्या शहानें हें शहर लुटलें. त्यावेळीं रशियानें आपलें सैन्य शहराच्या रक्षणाकरितां पाठविलें. स. १७९९ पासून तें रशियाच्या ताब्यांत आहे.

**टिंबक्टु**—फ्रेंच पश्चिम आफ्रिका; टिंबक्टु राज्याचें मुख्य शहर. नायगरच्या मुख्य प्रवाहापासून उत्तरेस नऊ मैलांवर उ. अ. १६° व पू. रे ५° यांच्यामध्यें आहे. या शहराला उंट व होडया ( कॅनो ) यांची भेटण्याची जागा, किंवा सहाऱ्यांतील सूदनचें बंदर म्हणतात. हें उत्तर आफ्रिकेंतील व नायगरच्या दक्षिण व पश्चिम भागांतील मालांच्या देवघेवीचें ठिकाण आहे. फ्रेंचांनीं १८९३-९४ सालीं हें शहर काबीज करण्यापूर्वी हें फार मोठें होतें. शहराच्या उत्तरेस व पश्चिमेस विस्तीर्ण जुन्या शहराचे पडके भाग दिसतात. फ्रेंचांनीं उत्तरेस व दक्षिणेस दोन किल्ले बांधलेले आहेत. हे वालुकामय अरण्याकडे व नदीकडे जाण्याच्या रस्त्यांचें संरक्षण करतात. फ्रेंचांच्या संरक्षणाखालीं लोक फिरून आल्यावर, येथील व्यापार वाढला, रस्ते बांधण्यांत आले यूरोपियन शाळा, धर्ममंदिर व इतर संस्था स्थापण्यांत आल्या, कापसाचें कापड विणणें, मातीचीं भांडीं करणें, कातड्याचें काम, कलाबतूचें काम हे येथील कमी महत्त्वाचे धंदे असून बहुतेक लोक फक्त व्यापार करतात. आसमंतांतील प्रदेशांशीं व्यापार येथूनच चालतो. येथें फ्रेंच नाणें चालतें. येथें कांहीं मौल्यवान् अरबी हस्तलिखितें आहेत. विशेषतः टिंबक्टूच्या अबुरहमन सादीनें लिहिलेला सतराव्या शतकाचा सूदनचा इतिहास तारिख-एस-सुडान यांत आहे. हें मुसुलमानी शिक्षणाचें केंद्र आहे. पश्चिमेकडील मुख्य सूदन लोक व सहारांतील जाती येथें एकत्र सांपडतात. पश्चिमेस अरब अथवा अरब झालेले बर्बर लोक; लगतच सोंघोई लोक; नायगरच्या पलीकडे दक्षिणेस होम्ब्रोई टेंकडयांपर्यंत हरेघेनाटेन अथवा मिश्र ट्वारेग लोक; शहराच्या जवळ फुला, मँडिंगो व बंबारा लोक; व उत्तरेस आणि पूर्वेस इमोशाघ लोक आहेत. राज्यकारभार एका रुमा घराण्यांतलि कहिया म्हणजे मेयरच्या हातीं वंशपरंपरागत असतो. १९ व्या शतकांत हा कहिया सत्ताधीश बखे घराण्याच्या तंत्रानें चालत होता. या घराण्याचा शेरीफ म्हणून याला पश्चिम सहाऱ्यांत मान आहे.

इ ति हा स.—टिंबक्टूचा इतिहास जेने शहर व सोंघोई राज्य यांच्या इतिहासाशीं संलग्न आहे. सोंघोई लोक निग्रो जातीचे असून नाईल नदीच्या खोऱ्यांतून नायगर प्रदेशांत आले आहेत असें म्हणतात. आठव्या शतकांत या लोकांनीं नायगर वळणांतील बराच प्रदेश काबीज करून टिंबक्टूपासून अगदीं आग्नेयीस सरळ रेषेंत २०० मैलांवर असलेलें गांव शहर बनविलें व तीं आपली राजधानी केली. अकराव्या शतकांत ते मुसुलमान झाले. याशिवाय सोंघोई लोकांनीं जेने वसविलें व या शहराला लवकरच बरेंच व्यापारी महत्त्व प्राप्त झालें. मध्यंतरीं ( ११ व्या शतकांत ) टिंबक्टु येथें ट्वारेगांनीं वसाहत केली. येथून उत्तरेस व्यापाराच्या सवलती आहेत असें पाहून जेनेच्या व्यापाऱ्यांनीं आपले लोक ( मुनीम ) येथें पाठविले. सहारा व बर्बरीच्या व्यापाऱ्यांनां टिंबक्टु हें मीठ व इतर माल विकण्याचें व पश्चिम सूदनचा माल विकत घेण्याकरितां चांगलें ठिकाण आहे असें लवकरच माहीत झालें. बाराव्या अथवा तेराव्या शतकांत टिंबक्टु मँडिंगो राजांच्या हातीं लागलें. येथील सोनें व मीठ यांच्या व्यापाराची ख्याति यूरोपांत देखील पसरली. १३५३ सालीं

प्रसिद्ध प्रवाशी इब्नबतूता हा येथें आला होता. १४३४ सालीं द्वारेग लोक या शहराचे मालक बनले. १४६९ सालीं सोंघोई राजा सुन्निअली यानें हें शहर काबीज केलें. सुन्नीचा मुलगा आस्किया याच्या कारकीर्दीत (१४९४-१५२९) या शहराचें वैभव फारच वाढलें. सांकोरचें विश्वविद्यालय पश्चिम सूदनमध्यें मुख्य झालें व येथें अहमदबाबा हा फार मोठा विद्वान् होऊन गेला. टिंबक्टूच्या संपत्तीनें मोरोक्कोचा सुलतान मोहून जाऊन त्यानें या शहरावर सैन्य पाठविलें. या सैन्यानें सोंघाई राज्याचा मोड करून हें शहर घेतलें. मूर लोकांनीं येथें आपली राजधानी केली. मोरोक्कोहून नेमलेल्या पाशानें वीस वर्षें येथें राज्य केलें व मोरोक्को येथून फार लांब असल्यामुळें येथील मूर लोकांनीं मोरोक्कोच्या सुलतानाची सत्ता झुगारून दिली. एल् मन्सूरच्या बंदूकवाल्या शिपायांवरून नायगरच्या मूर लोकांना रुमा म्हणत असत. हे लोक नेहमीं आपसांत भांडत व निग्रो लोकांना छळत असत. दोनशें वर्षांनंतर या जुलमामुळें १८ व्या शतकांत टिंबक्टू उजाड झालें होतें. बहुतेक देशांत बेबंदशाही माजली होती. १८०० सालीं टुारेग लोकांनीं हें शहर काबीज केलें; १८११ सालीं त्यांच्यापासून फुला लोकांनीं तें घेतलें. व यांच्यापासून १८४० सालीं टुकुलोर लोकांनीं घेतलें. १८९३ सालीं फ्रेंच लोक येथें आले तेव्हां हें शहर टुारेग लोकांच्या ताब्यांत होतें. फुला व ट्वारेग लोकांच्या जुलमास येथील लोक इतके त्रासून गेले होते कीं त्यांनीं फ्रेंच तेथें आल्यावरोबर मुकाट्यानें शहराच्या वेशी उघडून त्यांनां आंत घेतलें.

फ्रेंच लोकांची शिबंदी यावेळीं फार थोडी होती; तिचा टुारेग लोकांनीं नाश केला. १८९४ सालीं मोप्टीहून कर्नल वोनियर, हा फ्रेंच लोकांच्या मदतीस आला. हा कर्नल व शभर लोक ट्वारेग लोकांनीं रात्रीं छापा घालून मारले परंतु आपल्या विजयाचा फायदा घेतला नाहीं. लवकरच फ्रेंच सत्ता टिंबक्टु येथें कायमची स्थापली गेली.

फ्रेंच लोकांनीं काबीज करण्यापूर्वी या शहरांत १९ व्या शतकांत चार यूरोपियनप्रवाशी आले होते. १९०४सालीं टिंबक्टु अप्पर सेनीगाल व नायगर या वसाहतींचा भाग झालें. टिंबक्टूशीं ब्रिटिशांचा झालेला संबंध थोडक्यांत सांगावयाचा म्हणजे वार्थ हा ब्रिटिश सरकारचा मुखत्यार म्हणून पश्चिम आफ्रिकेंत गेला. टिंबक्टु येथें वार्थ शेख सिदी महंमद एल-बॅके याच्या रक्षणाखालीं होता. याजपासून ब्रिटिशसरकाराशीं मैत्री जोडण्याचीं पत्रें तो इंग्लंडला घेऊन गेला. उलट परराष्ट्रीय मंत्र्यानें १८५९ सालीं एलवॅकेला पत्र लिहिलें. शेखाचा पुतण्या त्रिपोलीस गेला असतांना तेथील ब्रिटिश कान्सलनें एलवॅके व इतर नायक यांनां नजराणे दिले. यानंतर राजकीय संबंध वाढविण्याचा कोणताच प्रयत्न ब्रिटिश सरकारनें केला नाही व वार्थ गेल्यावर एलवॅकेची सत्ता फार वेळ टिकली नाहीं.

**टिंवा**—मुंबई, महीकांठा. नानी मारवाडमधील एक तीन गांवांचें लहान संस्थान.

**टिवेस्टी**—मध्य सहारांतील डोंगराळ व अप्रसिद्ध असा एक प्रदेश. या ठिकाणीं टिब्यू लोक राहातात. गस्टाव नॉक्टिगाल यानें १८७० सालीं ह्या देशाचा कांहीं भाग शोधून काढला. स. १९१० पर्यंत या ठिकाणीं कोणताहि यूरोपिअन फिरकला नाहीं स. १८९९च्या अँग्लोफ्रेंच करारान्वयें टिवेस्टी फ्रान्सकडे सोपविण्यांत आला.

**टिम्गाड**—आफ्रिका. हें आल्जीरियांतील कान्स्टन्टाईन विभागांतील पडकें शहर असून बॅटनच्या आग्नेयीस २३ मैलांवर आहे. टिम्गाड अथवा रोमन थॅम्युगास हें सहा रस्त्यांच्या मिलाफावर वसलेलें होतें. ज्युपिटरचें देवालय या शहराच्या नैर्ऋत्य भागांत आहे. याच्या उत्तरेस मोठा बाजार व पूर्वेस फोरम, नाटकगृह व न्यायमंदिर ह्या इमारती होत्या. डेक्युमॅनस मॅक्झीमस रस्त्यावर ट्रेजनची कमान आहे. यांशिवाय येथें प्रार्थनामंदिराचे अवशेष, पडका अंतर्दुर्ग व पदार्थसंग्रहालय आहे.

येथें बरेच शिलालेख सांपडले व त्यावरून येथील इतिहास लिहितां येतो. सन. १०० त ट्रेजन बादशहानें टेव्हेस्टे व लॅंबीसिस यांमधील मजबूत ठिकाणीं शहर वसविण्यास हुकूम दिला व त्याचें नांव कोलोनिया -मार्सिआना-ट्रेजना थेम्युगॅस असें ठेविलें. हें शहर वसविण्यास १७ वर्षें लागलीं. ४थ्या शतकापर्यंत ह्या शहराची फार भरभराट झाली. ५ व्या शतकांत व्हॅंडालच्या स्वारीनंतर या शहराचें महत्त्व गेलें. बायझन्टाईन सेनापति सॉलोमनला ५३५ सालीं हें शहर अगदीं पडक्या स्थितींत आढळलें. जवळच्या डोंगरांत राहणाऱ्या बर्बर लोकांनीं याचा नाश केला असा समज आहे. यांत पुन्हां लोक रहाण्यास आले व ७ व्या शतकांत हें ख्रिस्ती शहर बनलें. अरबांनीं ६४७ सालीं आफ्रिकेचा गव्हर्नर ग्रेगोरियस याचा पराभव केल्यानंतर थॅम्पसॅकसचा इतिहासांत पुन्हां उल्लेख आला नाहीं. जेम्सब्रुस (१७६५), सरआर लॅंबर्ट प्लेफेयर (१८७५) व प्रोफेसर मॅसकेरे यांनीं येथें शोध लाविले. त्यांत मोजण्याचीं कांहीं दगडी मापें येथें सांपडलीं. याच्या पश्चिमेस १७ मैलांवर लॅंबिसीस या रोमन शहराच्या जागीं सध्याचें लॅंबेसा हें शहर आहे.

**टिरोल**—ऑस्ट्रियन साम्राज्याचा एक अगदीं दक्षिणेकडील प्रांत. सेंट जर्मेनीच्या तहानें टिरोलचे उत्तर टिरोल व लिंझचा जिल्हा असे दोन भाग पाडण्यांत आले. या सर्व प्रदेशाचें क्षेत्रफळ ४७८७ चौ. मै. असून त्यापैकीं लिंझ जिल्ह्याचें ७६३ चौ. मै. होतें. १९२० सालीं या प्रदेशाची लोकसंख्या ३०६१५६ व लिंझची २९००० होती. या प्रदेशांत जर्मन व रोमन कॅथोलिक लोकांचीच संख्या अधिक आहे. राज्यकारभाराच्या सोयीसाठीं उत्तर टिरोलचे सात जिल्हे पाडण्यात आले आहेत. इन्सब्रक हीं उत्तर टिरोलची राजधानी असून तेथील लोकसंख्या १९२० सालीं ५५६५५९होती.

लिंझ हा स्वतंत्र जिल्हा आहे. इन्सब्रकशिवाय उत्तर टिरोलमध्यें इनाझ, हल, कुफस्टीन, वोरगल, लंडेक हीं प्रमुख शहरें आहेत. टिरोलमधील सुमारें निम्मी जमीन शेतकीला उपयुक्त आहे व बाकीची जंगलवजा आहे. शेतकी व गुरेंढोरें यांची पैदास करणें हे येथील मुख्य धंदे आहेत. येथील गुरांची फार प्रसिद्धि आहे. हालवी इन्सब्रक येथें मिठागरें असून, त्यांतून १९१५ सालीं १५००० टन मीठ निघालें. याशिवाय तांबें, शिसें, जस्त गंधक, अ‍ॅस्फाहल्ट इत्यादि खनिज पदार्थ येथें सांपडतात. येथील उद्योगधंदे अद्यापि बाल्यावस्थेंत आहेत, लांकूडकाम, लोखंड, कापड, भांडीं, कांचकाम यांचे कारखाने आहेत. इन्सब्रक ते स्त्रुवाइअल व मिटनवल्ड येथपर्यंत रेल्वेचा फांटा आहे. [ विडमन–यूनिटी ऑफ टिरोल (१९१९). ]

**टिलोता खेरी**—मध्यप्रांत, जिल्हा भंडारा. भंडाऱ्याच्या दक्षिणेस २४ मैलांवर हें लहानसें खेडें आहे. या ठिकाणीं दोन उभ्या दगडांवर एक आडवा दगड ठेविलेला आहे. असे दगड जवळच असलेल्या चांदा जिल्ह्यांत पुष्कळ सांपडतात व ते कुरमवार धनगरांच्या वेळचे असावे असा समज आहे. यास राक्षसाचा टिलोता (कढई) असें म्हणतात.

**टिलिसट**—पूर्व प्रशिया या प्रशियन प्रांतांतील, मेमेल नदीच्या डाव्या किनाऱ्यावर वसलेलें जर्मनीचें एक शहर. लोकसंख्या(१९०५)३७१४८. हें शहर आगगाडीनें कोनिंग्जबर्गच्या ईशान्येस ७२ मैलांवर आहे. येथें पोस्टऑफिस, नगरभवन, दवाखाना, न्यायकचेऱ्या इत्यादि कित्येक सुंदर आधुनिक इमारती आहेत. या ठिकाणीं यंत्रें, रासायनिक द्रव्यें, कमावलेलीं कातडीं, जोडे, कांचेचें सामान वगैरे वस्तू तयार होतात, व लोखंडाच्या ओतीव कामाचे कारखाने, कलालाच्या भट्ट्या व वाफेनें चालणाऱ्या पिठाच्या आणि लांकडाचे तक्ते पाडण्याच्या गिरण्या आहेत. इमारती लांकूड, धान्य, सण व कोळसा हे येथील व्यापाराचे जिन्नस आहेत. या शहराचा पूर्वी रशियाशीं मोठा व्यापार चालत असे. पण कोनिग्जबर्ग व कोव्हनो हीं दोन शहरें आगगाडीनें जोडलीं गेल्यापासून तो मंदावला आहे. टिलिसटचें मेमेल, कोव्हनो व कोनिग्जबर्ग या शहरांशीं नदींतून आगबोटींनें दळणवळण आहे. १८०७ त येथें प्रशियानें नेपोलियनशीं जो नामुष्कीचा तह केला त्यामुळें हें प्रसिद्धीस आलें आहे.

**टिळक, बाळ गंगाधर**—( २२ जुलै १८५६–१ १९२० आगस्ट ) कोंकणप्रांतीं रत्नागिरी जिल्ह्यांत दापोली तालुक्यांत चिखलगांव म्हणून जो गांव आहे तो टिळक घराण्याचा मूळ गांव होय. या गांवची खोती टिळक घराण्याकडे ०से. बळवंतराव टिळक यांचे पणजे केशवराव हे कर्तृत्ववान पुरुष असल्याकारणानें त्यांनीं पेशवाईंत अंजनवेलची मामलतहि मिळविली. पण पुढें पेशवाई बुडाल्यावर त्यांनीं ती सोडून देऊन, ते घरीं स्वस्थ बसले. यांचा सर्वांत वडील मुलगा रामचंद्र हा बळवंतरावांचा आजा होय. घरची गरीबी असल्यामुळें रामचंद्रपंतांचें शिक्षण बेताबेताचें झालें व त्यांनीं मोजणी खात्यांत नोकरी धरली. रामचंद्रपंतांना आपल्या वयाच्या १८ व्या वर्षी पहिला मुलगा गंगाधर हा झाला. बळवंतरावाचे हे वडील होत. रामचंद्रपंतांनां कौटुंबिक अडचणीमुळें वैताग प्राप्त होऊन, ते घर सोडून निघून गेल्यामुळें, गंगाधरपंतांचा विद्याभ्यास पुरा होण्यापूर्वीच त्यानां पोटासाठीं नोकरी धरणें भाग पडलें. हे संस्कृत व गणित या विषयांत प्रवीण असल्यामुळें त्यांनीं आपल्या कर्तृत्वाच्या जोरावर आपली सांपत्तिक स्थिति थोडी फार सुधारली. गंगाधरपंतांनां १८५६ सालीं मोठ्या नवसानें मुलगा झाला व तेच प्रस्तुत बळवंतराव होत. लहानपणापासूनच बळवंतरावांच्या अंगांतील बुद्धिमत्ता, करारीपणा इत्यादि गुण निदर्शनास येऊं लागले होते. वयाच्या दहाव्या–बाराव्या वर्षीच त्यांचें संस्कृत व गणित इंग्लिश सहावी सातवी इयत्तेतल्या मुलाइतकें गंगाधरपंतांनीं करून घेतलें होतें. १८७२ सालीं गंगाधरपंत वारल्यामुळें बळवंतरावाची घरची व्यवस्था त्यांचे चुलते पाहूं लागले. हायस्कूलमधील शिक्षणक्रम संपवून बळवंतरावांनीं डेक्कनकॉलेजमध्यें १८७३ सालीं प्रवेश केला. १८७६ सालीं ते बी. ए. परीक्षा पास झाले व१८७९ सालीं एल्‌ एल्‌. बी. झाले. एम. ए. लाहि ते एक दोन वेळ बसले पण त्यांत त्यानां यश आलें नाहीं. कॉलेजमध्यें असतांनाच आपल्या देशाची अनिष्ट स्थिति कशी सुधारतां येईल याविषयीं त्यांचे विचार चालत असत. आगरकरादि मंडळीबरोबर या विषयासंबंधीं त्यांचे मोठे कडाक्याचे वादविवादहि होत असत. देशाची व समाजाची स्थिति सुधारण्याचे जे बरेच मार्ग आहेत त्यांपैकीं जनतेला शिक्षण देणें हा मार्ग टिळकांनां विशेष पसंत पडला होता व याच सुमारास विष्णुशास्त्री चिपळूणकरांनींहि सरकारी नोकरी सोडून पुण्यास खासगी शाळा काढावयाचें ठरविल्यामुळें त्यानां टिळक जाऊन मिळाले या शाळेचें नांव न्यू इंग्लिश स्कूल असें होतें. या शाळेला पुढें आगरकर, वामनराव आपटे इत्यादि मंडळी मिळाल्यामुळें ही फारच भरभराटीस आली पुढें याच मंडळींनीं शाळेला जोडून छापखाना काढला व केसरी व मराठा हीं पत्रें सुरू करण्यांत आलीं. १८८२ सालीं बर्वे प्रकरण उपस्थित होऊन त्यांत टिळक–आगरकरांनां शिक्षा भोगावी लागली. पण त्यामुळें टिळकांची लोकप्रियता वाढूं लागली.

इ. स. १८८४ मध्यें डेक्कन एज्युकेशन सोसायटीची स्थापना झाली व पुढें थोड्याच दिवसांनीं फर्ग्यूसन कॉलेज काढण्यांत आलें. यांस टिळकांचे श्रम मुख्यतः कारणीभूत झाले ही गोष्ट विसरून चालवयाचें नाहीं. प्रोफेसर या नात्यानेंहि टिळकांची ख्याति असे. पुढें डे. ए. सोसायटीच्या धोरणासंबंधीं व इतर अनेक भानगडी उपस्थित झाल्यामुळें, या

सोसायटींत फूट पडली; व त्यामुळें टिळकांनीं सोसायटींतून १८९० सालीं अंग काढून घेतलें.

त्यानंतर टिळकांनां सार्वजनिक बाबतींत पडावयास फुरसत सांपडली. केसरी व मराठा पत्रेंहि त्यांच्या मालकीचीं झालीं होतीं. त्यानीं लोकांची बाजू पुढें मांडण्यास सुरवात केली. क्रॉफर्ड कमिशनच्या वेळीं कित्येक मामलतदारांनां बळवंतरावांनीं उत्तम प्रकारचें साहाय्य केलें. संमतिवयाचा कायदा व्हाईसरायाच्या कौन्सिलपुढें वाटाघाटींस निघाला त्यावेळीं परक्या लोकांनीं आपल्या सामाजिक सुधारणेच्या बाबतींत हात घालावयाचें कारण नाहीं या पक्षाचें समर्थन त्यानीं केलें व त्यामुळें त्यांच्यांत व सुधारक पक्षांत खडाजंगी उडाली. हिंदु व मुसुलमान यांच्यामध्यें जे १८९३ मध्यें दंगे झाले त्यांचें कारण सरकारची फूट पाडण्याची कावेबाज युक्ति होय असें त्यांनीं प्रतिपादन केलें. लोकांनां राजकीय शिक्षण देण्यासाठीं १८९४ सालीं गणेशोत्सव सुरू केला; या नंतरचा शिवाजीउत्सव हाहि महाराष्ट्रांत लवकरच फैलावला. १८९५ सालीं रायगडच्या शिवाजीमहाराजांच्या समाधीच्या अनवस्थेवर त्यानीं झणझणीत टीका केली. १८९६ त मुंबई इलाख्यांत भयंकर दुष्काळ पडला तेव्हां फॅमिनकोडप्रमाणें सरकारनें सवलती द्याव्या म्हणून टिळकांनीं जोरदार लेख लिहिले व फॅमिनकोड लोकांस समजून सांगण्याकरितां त्यानीं महाराष्ट्रांत उपदेशक पाठविले.स्वतः त्यानीं तर लोकांसाठीं जिवापाड मेहनत केली. १८९७ सालीं वैशाखांत पुण्यांत प्लेगचा कहर उसळला. त्यावेळीं पुण्यांतील सर्व पुढारी प्लेगच्या भीतीनें बाहेर पळाले असतां एकट्या टिळकांनीं पुण्यांत राहून प्लेगग्रस्त लोकांनां मदत केली. हिंदु हॉस्पिटल स्थापन केलें. प्लेगमध्यें गोऱ्या लोकांनीं अत्यंत जुलुम केल्यामुळें त्याचा शेवट रँडसाहेबाचा खून करण्यांत झाला. त्याच सुमारास राजद्रोहाचा खटला टिळकांवर होऊन त्यानां १८ महिन्यांची सक्तमजुरीची शिक्षा मिळाली. पण टिळकांच्या विद्वत्तेची कीर्ति मॅक्समुल्लर इत्यादि पाश्चात्यांच्या कानीं गेली असल्यामुळें त्यांनीं महाराणी व्हिक्टोरियाकडे विनंति करून हीं शिक्षा कमी करविली व त्यांची मुक्तता करण्यांत आली. तुरुंगांतून सुटून आल्यानंतर एक दोन वर्षांनंतरच ताईमहाराज प्रकरण उपस्थित झालें. त्यांत टिळकांवर खटला होऊन खालच्या कोर्टानें १॥ वर्षाची सक्तमजुरीची शिक्षा ठोठावली पण हायकोर्टानें त्यानां सोडून दिलें.

कॅांग्रेसच्या जन्मापासूनच टिळकांचें कांग्रेसकडे फार लक्ष असे. सन १८९५ त पुण्यास कांग्रेस भरली होती त्यावेळीं टिळकांनीं बराच पुढाकार स्वीकारला होता. पण कॅांग्रेसमध्यें विचारविनिमयाशिवाय आणि ठराव पसार करण्याशिवाय दुसरें कांहींच होत नव्हतें. या सुमारास कॅांग्रेस ही मेथांच्या ताब्यांत होती. ती आपल्या ताब्यांत आणण्याचा टिळकांनीं उद्योग चालविला. १९०५ सालीं वंगभंगाविरुद्ध चळवळ सुरू झाली. तिचा फायदा घेऊन महाराष्ट्रामध्यें बळवंतरावानीं अपूर्व जागृति केली. त्याचप्रमाणें सदरहू चळवळींतून निघालेली स्वदेशी--बहिष्काराची चळवळहि टिळकांनीं महाराष्ट्रांत फैलावली. स्वदेशी, राष्ट्रीय शिक्षण,बहिष्कार व स्वराज्य या चतुःसूत्री महामंत्राची घोषणा सर्व हिंदुस्थानांत व विशेषतः महाराष्ट्रांत टिळकांच्यामुळें झाली. कांग्रेसनें चालविलेली भिक्षांदेहींची वृत्ति त्याज्य आहे असें टिळक व इतर तरुण पुढाऱ्यांनां वाटत होतें. पण त्यामुळें मवाळ उर्फ प्रागतिक पक्षांत भयंकर रणें माजून शेवटीं सुरत कांग्रेसमध्यें स्फोट झाला व टिळकपक्षीयांनीं कांग्रेस सोडली.

१९०८ च्या बॅांब प्रकरणासंबंधीं केसरींतून लेख येऊं लागले. सरकारनें दडपशाहीचें धोरण सुरू केलें होतें. त्या धोरणाचे किती भयंकर परिणाम होतील याचें चित्र टिळकांनीं यथार्थ रीतीनें लोकांपुढें मांडलें. त्या निमित्तानें पुन्हां टिळकांच्यावर खटला होऊन त्यांत टिळकांनां सहा वर्षांची शिक्षा झाली. या खटल्यांत टिळकांनीं, स्वतःच आपला खटला चालविला. या खटल्यामुळें टिळकांची लोकप्रियता हिंदुस्थानभर झाली.

मंडालेंत असतांना त्यांनीं गीतारहस्य हा उत्कृष्ट ग्रंथ लिहिला व तुरुंगांतून आल्यावर तो प्रसिद्ध केला. या ग्रंथानें जुन्या व नव्या पिढीच्या लोकांत विलक्षण खळबळ उडवून दिली. तुरुंगांतून सुटून आल्यावर, त्यानीं मराठ्यांत पत्र लिहून आपली राजनिष्ठा व्यक्त केली. कॅांग्रेसमधील दुफळी मोडून पुन्हां कॅांग्रेस अभेद्य करण्याचा निश्चय करून त्यानीं तें काम तडीस नेलें; व कॅांग्रेसमध्यें शिरून त्यानीं लगेच १९१६ सालीं कॅांग्रेस आपल्या पक्षाची व जिवंत अशी बनविली. याच वेळीं त्यानीं होमरूलची चळवळ सुरू केली व सर्व महाराष्ट्रभर त्या चळवळीचा फैलाव करण्याचें काम चालविलें. त्यामुळें सरकारला भीति वाटून टिळकांकडून ४००० रुपयांची रक्कम, सद्वर्तनाबद्दल जामीन मागितली पण हायकोर्टानें त्यानां दोषमुक्त केलें.

टिळकांच्या वयाला ६० वर्षे पुरीं झालीं त्यानिमित्त टिळकांनां सर्व महाराष्ट्रानें मिळून एक लाख रुपायांची थैली अर्पण केली पण ती त्यानीं परत राष्ट्रसेवेंतच खर्च करावयाचें ठरविलें. महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं होमरूल संस्था स्थापन करवून, कॅांग्रेसच्या कार्याला त्यानीं चालना दिली. या कार्याचा परदेशांत प्रसार करण्यासाठीं १९१८ सालीं टिळक विलायतेस जाण्यास निघाले पण कोलंबोहूनच त्यानां परत फिरावें लागलें. १९१८ मध्यें जुलै महिन्यांत मॅांटेग्यू चेम्सफर्ड सुधारणांचा रिपोर्ट प्रसिद्ध झाला त्या सुधारणा निराशा–जनक, अपुऱ्या व असमाधानकारक आहेत असें टिळकांनीं आपलें मत प्रसिद्ध केलें व तेंच पुढें सन १९१९च्या अमृतसर कॅांग्रेसमध्यें त्यानीं पास करून घेतलें. तथापि याचा शक्य तो उपयोग करून घ्यावा अशाच मताचे ते होते.

पुढें चिरोलच्या खटल्यानिमित्त व इंग्लंडमध्यें सुधारणासंबंधीचें हिंदी लोकांचें मत काय आहे हें इंग्लिश लोकांना स्पष्ट कळविण्यासाठीं ते इंग्लंडास गेले. तेथें असतांना त्यांनीं शांततापरिषदेकडे एक हिंदी आकांक्षा स्पष्टपणें पुढें मांडणारा खलिता पाठविला. चिरोलकेसमध्यें टिळकांना अपयश आलें व त्यांना खर्चासुद्धां चिरोलला नुकसान भरून द्यावें लागलें. पण महाराष्ट्रानें ती सर्व रक्कम टिळकांकरतां सोसली. इंग्लडमध्यें टिळकांनीं व्याख्यान व लेखनद्वारां महत्त्वाची कामगिरी केली. हिंदुस्थानांत परत येतांच टिळकांनीं पंजाब व खिलाफत प्रकरणांत सरकारावर जोराची टीका केली. पण महात्मा गांधींच्या व त्यांच्यामध्यें वरील प्रश्नावर पुष्कळ मतभेद होते. १९२०मध्यें कॉंग्रेसडेमोक्रॅटिक पक्षाची त्यांनीं स्थापना करून त्या पक्षाचें धोरण समजावून सांगण्याकरतां आपल्या पक्षाचा जाहीरनामा प्रसिद्ध केला. पण पुढें थोडक्याच महिन्यांत त्यांची प्रकृति बिघडून त्यांचें देहावसान झालें. त्यांच्या शवदहनाच्या प्रसंगीं मुंबईस पांच सहा लाख लोकांची गर्दी जमली होती. त्यावरून, त्यांची लोकमान्यता प्रत्ययास येते.

टिळक व समाजसुधारणा.—समाजसुधारणाविषयक टिळकांचीं मतें कोणतीं होतीं हें सांगणें कठिण आहे. कारण समाजसुधारणेची नक्की दिशा त्यांनीं आपल्या डोळ्यापुढें ठेविलीच नव्हती. त्यांचें प्रमुख कार्य राजकीय स्वरूपाचें असल्यामुळें त्यांनीं समाजसुधारणेच्या प्रश्नावर पूर्ण विचार केला नव्हता. त्यांनीं वेळोवेळीं जीं सामाजिक बाबतींत आपलीं मतें प्रतिपादन केलीं तीं मुख्यतः सामाजिक सुधारणावादी सुधारकांच्या अचकट विचकट मतांचें खंडन करण्यासाठीं व पुराणमतवाद्यांच्या संरक्षणासाठीं होतीं. टिळकांच्या वेळचे समाजसुधारक पाश्चात्य कल्पनांनीं भारून गेलेले, जुनें तेवढें त्याज्य या मतांचा पुरस्कार करणारे, अविचारी व अव्यवहारी होते. त्यामुळें टिळकांना त्यांच्या अतिरेकावर हत्यार उपसावें लागलें. ते स्वतः समाजसुधारणेला विरोधी नव्हते. कोणतीहि समंजस सुधारणा करण्याच्या बाबतींत ते कधींच विरोध करीत नसत. स्वतः त्यांनीं आपल्या मुलींनां चांगल्या प्रकारचें शिक्षण दिलें होतें. त्यांनीं आपल्या मुलींचीं लग्नें प्रौढपणींच केलीं होतीं. तात्पर्य टिळक हे समाजसुधारणेला विरोधी होते हें म्हणणें चुकीचें आहे.

टिळक व राजकीय सुधारणा.—टिळकांचें प्रमुख कार्य म्हटलें म्हणजे राजकीय हक्क हिंदुस्थानला प्राप्त करून देणें हें होय. पण तें कोणत्या दिशेनें करावयाचें त्याची दिशा त्यांनीं १९१४ पर्यंत निश्चितपणें आंखली नव्हती. पण त्याबद्दल त्यांना दोष देणें योग्य होणार नाहीं. कारण टिळकांच्यावेळीं या दिशेनें विचार करणारीं माणसें हाताच्या बोटांवर मोजण्याइतकींच होतीं. तेव्हां प्रथम लोकांच्यामध्यें राजकीय जागृति करणें हेंच त्यांना आवश्यक वाटलें व त्यासाठीं जमेल त्या रीतीनें व शुळतील त्या साधनांनीं त्यांनीं लोकजागृति केली. १९१४ नंतर मात्र त्यांच्या राजकीय मतांना निश्चित स्वरूप आलें. त्यांनीं साम्राज्यांतर्गत स्वराज्य हेंच हिंदुस्थानचें राजकीय ध्येय ( तात्पुरतें कां होईना) ठरविलें व तेवढ्यावरून प्रागतिकांनीं टिळक हे आमच्याच मताचा पुरस्कार करूं लागले म्हणून त्यांच्याशीं सहकार्य करण्यास सुरवात केली, पण टिळक व प्रागतिक मवाळ यांच्यामध्यें फरक हा कीं, टिळकांनीं आपल्या नेहमींच्या धडाडीनें व प्रचंड परिश्रमानें तीन चार वर्षांच्या अवधींत सर्व हिंदुस्थानमध्यें ही चळवळ फैलावली व प्रागतिकांच्या कडून तें कार्य २० वर्षांतहि झालें नव्हतें. इंग्लंडमध्यें जाऊन आल्यानंतर त्यांच्या राजकीय व सामाजिक मतांत कांहीं क्रांति घडून आली होती; व ते आणखी कांहीं काळ जगते तर स्वमतप्रसाराचें कार्य त्यांनीं केलें असतें व तें पार पडलें असतें असें मानावयास जागा आहे.

टिळकांची विद्वत्ता.—टिळकांची बुद्धिमत्ता फार दांडगी होती. त्यांचे प्रमुख ग्रंथ म्हणजे ओरायन, आर्टिक होम इन दि वेदाज व गीतारहस्य हे होत. पहिल्या दोन ग्रंथांत, वेदकालनिर्णय व आर्यांचें वसतिस्थान या संबंधींचा उहापोह केला आहे. त्यांचीं मतें अद्यापि सर्वमान्य झालीं नाहींत. तथापि तीं विचारक्षेत्रांत खळबळ करून टाकणारीं आहेत व साधारण विद्वानांच्या हातून त्यांचें खंडन-मंडण होणें शक्य नाहीं ही निर्विवाद गोष्ट आहे. वेदांवरील त्यांचा व्यासंग जबरा होता. गीतारहस्यांत त्यांनीं निष्कामकर्मयोगाचा पुरस्कार केला आहे. या ग्रंथानें हिंदुसमाजांत फार क्रांति करून टाकली. या ग्रंथाशिवाय 'ए मिसिंग व्हर्स इन सांख्य कारिका' हें छोटें पुस्तक, खाल्डियन लोकांसंबंधींचा त्यांचा लेख, वेदांगज्योतिषावरील त्यांचा निबंध हीं त्यांची अगाध विद्वत्ता, मार्मिकता, संशोधकबुद्धि इत्यादि गुण प्रगट करतात.

[ संदर्भग्रंथः— न. चिं. केळकर-टिळक चरित्र; वा. त्र्यं. आपटे, व गं. कृ. लेले—टिळक चरित्र; डी. के. आटल्ये-लाइफ आफ बी. जी. टिळक; इंदुप्रकाश-टिळकगुणकलाप इ. ]

**टीजिआ**—ग्रीसमधील आरकेडीआ प्रांतांतील एक शहर. हें पारथेनिअम आणि मीनालस या दोन पर्वतांमधील उंच सपाटीवर किंवा पठारावर वसलें आहे. युरोटास आणि आलफीअस या जलविभाजक क्षेत्रांजवळ हें असल्यामुळें याचें आणि स्पार्टाचें वैर माजलें.

दंतकथेप्रमाणें हें शहर आलीअस या काल्पनिक राजानें वसविलें. ऐतिहासिक कालापूर्वी टीजिआचा समुद्रापलीकडील देशांशीं संबंध असावा असें दिसतें. टीजिआच्या एकीमस या राजानें हेराक्लीच्या स्वारीला अतिशय जोराचा विरोध केला होता असें दंतकथेवरून कळतें. इराणच्या स्वारीच्या वेळीं इराणला विरोध करण्याची टीजिअनांनीं विलक्षण तत्परता दाखविली आणि प्लेटीआच्या लढाईंत शत्रूच्या छावणींत

तेच प्रथम घुसले. इ. स. पूर्वी सुमारें ४६८या वर्षी आरकेडीअन व आरगाईव्ह संघांचें आधिपत्य स्वीकारून स्पार्टाशीं युद्ध केलें पण टीजिआ व डिपीआ येथील लढाईत त्यांचा पराभव झाला. इ. स. पूर्वी ४२३ या वर्षी त्यांनीं मांटीनीअनांशीं युध्द पुकारून स्पार्टाशीं तह केला. परंतु ल्युक्ट्राच्या लढाईनंतर आरकेडीअन संघाची पुन्हां स्थापना करून स्पार्टन विरोधाचें धोरण फिरून स्वीकारलें. इ. स. पूर्वी २६५ या वर्षी मॅसेडोनियाविरुद्ध निर्माण झालेल्या कीमोनिडीअन संघाला टीजिआ येऊन मिळालें. इ. स. पूर्व २१८ या वर्षी स्पार्टन सैन्यानें टीजिआ घेतलें. परंतु इ. स. पूर्वी २०७ मध्यें तें पुन्हां परत घेण्यांत आलें. सन ३९५ च्या गॉथ लोकांच्या स्वारीनंतर टीजिआचें एक ग्रीक शहर या नात्यानें अस्तित्व राहिलें नाहीं.

टीजिआ येथें अथेना एलीआचें एक प्रसिद्ध देवालय आहे. हें टीजिआचा संस्थापक ऑलीस यानें बांधलें अशी दंतकथा आहे. इ. स. पूर्वी ३९५ त हें जळल्यामुळें स्कोपस या शिल्पशास्त्रज्ञानें तें फिरून पूर्वीपेक्षां मोठें बांधलें. याच्या पुढील भागावर वराहच्या शिकारीचें एक चित्र असून मागील बाजूस अचीलीज आणि टेलीफस यांच्या लढायांचें चित्र आहे. १९०० सालीं फ्रेंच शोधकांनां या ठिकाणीं हेराक्लीजच्या पुतळ्याचें डोकें सांपडलें.

**टीरिआ**—( अलीकडील बोगॅझ क्युइ ) हें कॅपिडोशियांतील गोऱ्या सीरियन लोकांचें राजधानीचें शहर होतें. खिस्तपूर्व सहाव्या शतकार्धात लीडियाचा क्रोसस यानें हें काबीज केलें. येथील गोरे सिरियन लोक हिटाईट असावेत अथवा त्यांनीं हिटाईट संस्कृति तरी उचलली असावी. हें शहर फार जुनें असून येथें प्राचीन काळचीं लेणीं सांपडतात. बॅबिलोनियन व तेथील स्थानिक भाषेंत लिहिलेले पुष्कळ शिलालेख सांपडले आहेत. या सर्व लेखांवरून खिस्ती शकाच्या पूर्वी १६ व्या शतकार्धापासून ख्रि.पू. १२०० पर्यंत हें एका हट्टी घराण्याच्या ताब्यांत असून याचें प्राचीन नांव हट्टी असेंच होतें असें अनुमान निघतें.

**टुलुझ**—फ्रान्सच्या नैर्ऋत्य भागांतील हॉटगरोन विभागाचें मुख्य शहर. लोकसंख्या (१९११) १४९५७६. टुलुझ गरोन नदीच्या उजव्या कांठावर वसलें असून ईशान्येकडे वाहणाऱ्या नदीचा ओघ येथूनच वायव्येकडे वळतो. पूर्वेस व उत्तरेस मिडीचा कालवा असून एकेबाजूनें येणाऱ्या गरोन कालव्यांत मिळतो. शहराच्या मध्य भागांतील कॅपिटोल भागांत शहरांतील सर्व भागांचे रस्ते येऊन मिळतात. येथून जवळच रहदारीचे दोन रुंद रस्ते परस्परास मिळतात.

टुलुझच्या इमारतींत सर्वांत चित्ताकर्षक असें सेंट सेरनिन किंवा सॅटर्निनचें खिस्ती देवालय होय. टुलुझमध्यें प्रथम ह्या सॅटर्निननें खिस्तीधर्माचा उपदेश केला असें म्हणतात. येथें आर्चबिशपचें राहण्याचें ठिकाण असून दिवाणी कचेरी, अपील कचेरी व प्रीफेक्टचें राहण्याचें स्थान आहे. येथें उच्च शिक्षणाच्या बहुतेक सर्व शाखा आहेत.

टुलुझ हें व्यापारी व उद्योगाचें लँग्युडॉकमधील केंद्रस्थान असून येथें घोडे, दारू, धान्य, फुलें, कातडीं, तेल व शेतीच्या उत्पन्नाचा बाजार भरतो. येथें तंबाखूचे कारखाने, धान्य दळण्याच्या चक्या, व लांकूड कापण्याचे कारखाने, इंजिनियरचें कारखाने, शेतकीस लागणारीं अवजारें तयार करण्याचे कारखाने, खत तयार करणें वगैरे उद्योग चालतात.

रोमन अमलाखालीं गॉल देश असतांना टुलुझला फारसें महत्त्व नव्हतें. येथें एक अर्धवर्तुळाकृती नाटकगृह होतें. परंतु जुनें टुलुझ हें नव्या टुलुझपासून ५–६ मैल पूर्वेस असून मातीच्या भिंतींचा मोडकळीस आलेला कांहीं भाग अद्याप सांपडतो. ह्याच ठिकाणीं इ. स. पूर्वीच्या २ ऱ्या शतकाच्या नंतरचीं नाणीं सांपडलीं आहेत. औसोनिअस आपल्या पुस्तकांत ह्या ठिकाणच्या मोठ्या लोकसंख्येचा उल्लेख करतो. हें ४१९ मध्यें व्हिसिगॉथच्या राज्याचें मुख्य शहर झालें. ५०७ सालीं क्लाविसच्या हातीं हें शहर पडलें तेव्हां येथील खजीना तो घेऊन गेला. ग्रेगरीच्या काळांत ह्या शहरचा बराच उल्लेख होतो. टुलुझच्या खऱ्या इतिहासास ७८० किंवा ७८१ सालीं प्रारंभ होतो. ह्यावेळीं शार्लमेन ह्यानें आपल्या लहान मुलास अक्विटेनचा राजा नेमून टुलुझ ही राजधानी केली. राजाच्या लहानपणीं त्याचा शिक्षक चारसन ह्यानें ड्यूक किंवा काउंट ही पदवी घेऊन राज्याचें काम आपल्या हातीं घेतलें, पण ७९१ सालीं वर्म्सच्या सभेनें त्याच्या ठिकाणीं विल्यम कर्टनेझ या दक्षिण फ्रान्सच्या प्रसिद्ध वीराची नेमणूक केली. ह्या स. ८१२त निवर्तला. ८४४ सालीं चार्ल्स दि बोल्डनें वेढा घातला. पुढें ४ वर्षांनीं नार्मन लोकांकडे हें शहर आलें. ८५२ सालीं पहिला रेमंड येथील काउंट झाला. ह्याच्या वंशांतील पुरुषच पुढें येथील काउंट झाले. १२७१ सालीं जोन व आल्फॉन्सो यांच्या मरणानंतर येथलि अधिकार राजाकडे आला. १४४३ सालीं येथें एक प्रतिनिधिसभा स्थापण्यांत आली. या सभेनें १६१९ सालीं व्हॅनिनि नांवाच्या तत्त्ववेत्त्यास जाळलें. येथें १२२९ सालीं एक विश्वविद्यालय स्थापन झालें. येथें प्रसिद्ध 'फ्लोरल गेम्स' नांवाची कवींची सभा १३२३–२४ सालीं स्थापण्यांत आली.

**टूर्ने**—बेल्जम. हें शहर शेल्ट नदीवर वसविलें असून तें हेनोट प्रांतांत आहे. हें शहर व्हेन्डॉल, नॉरमन, फ्रेंच व स्पानियार्ड लोकांनीं कित्येकदां लुटलें असूनहि येथील जुन्या वस्तू अजून कायम आहेत. नोटरडाम हें एक अतिशय जुनें देऊळ आहे. व हें रोमन धर्तीवर बांधलें आहे. येथें जुनी चित्रकला दाखविणारीं कांहीं सुंदर चित्रेंहि आहेत. जुन्या वस्तूंत ३०० मधमाशांच्या प्रतिमा आहेत. नेपोलियननें या आपल्या झग्यास लावण्याकरितां पसंत केल्या

होत्या. येथील तेराव्या शतकांतील घरें अजून कायम असून त्यांत लोक राहतात. १५८१ सालीं प्रिन्सेस डेपिनॉय हिनें पारमाबरोबर लढून टूर्नेचें रक्षण केलें. तिचा एक पुतळा येथें उभा केला आहे.

येथें ब्रुसेल्स नांवाच्या चटया व दुसऱ्या बऱ्याच वस्तू करण्यांत येतात. या शहराच्या इतिहासाला सुरवात जूलियस सीझरपासून होते. ५व्या शतकांत टूर्ने फ्रेंचांनीं घेतलें. १६व्या शतकांत हें इंग्रजांकडे आलें व पहिल्या हेनरीनें तें पहिल्या फ्रान्सिसला विकलें पण हें फ्रेंचांकडे न राहतां तें पांचव्या चार्लसच्या जनरलनें घेऊन स्पेनला जोडून दिलें. टूर्नेजवळ १७४५ मध्यें फॉन्टेनॉयची प्रसिद्ध लढाई झाली.

**तूलाँ**—हें फ्रान्स देशांतील व्हर विभागांतील एक बंदर, पहिल्या प्रतीचा किल्ला व आरमाराचें ठिकाण. भूमध्यसमुद्रावर मार्सेलिसपासून आग्नेयीस ४२ मैलांवर वसलें असून तूलाँ अरॉंडाइजमेंटचें मुख्य शहर आहे. लोकसंख्या (सन १९११) १०४५८२. ह्याच्या पूर्वेस असणाऱ्या उपसागराचे ग्रॅंडरेड व पेटिटरेड असे दोन भाग आहेत. बंदराचा उत्तर व पश्चिम दिग्भाग उंच पर्वतांनीं वेढला असून दक्षिणेकडे सिसी व सीपेटच्या द्वीपकल्पानें बंद केला गेला आहे. पूर्वभागांत उंच बंधारे असून प्रवेशमार्गावर रक्षण पाणसुरुंगानीं केलें जातें. येथें येणाऱ्या जहाजांस किती तरी दुर्गांमधून व तोफखान्यांमधून आपला मार्ग काढावा लागतो, तेव्हां कोठें तीं पेटिट-रेडमध्यें पोहोंचतात. तसेंच इतर भागांतहि संरक्षणार्थ निरनिराळे व्यूह रचण्यांत आले आहेत. दुसऱ्या साम्राज्याचे वेळीं शहराचा उत्तरेकडील भाग वाढविण्यांत आला आहे. हा शहराचा अर्वाचीन भाग होय. ह्याशिवाय शहराच्या प्राचीन भागांत सर्व ठिकाणीं अरुंद व घाणेरडे लहान मोठे रस्ते आहेत. ह्यामुळेंच १८८४ सालीं पटकीची सांथ पसरली होती. येथील इमारतींत सेंट मेरी मेजरचें देवालय, सेंट लुईचें देवालय, आरमारी व लष्करी दवाखाना, व त्यासच लागून असलेलें प्राणिसंग्रहालय व पदार्थसंग्रहालय, आरमारी वैद्यकशाळा, नौकानयनविद्याशाळा मोठमोठ्या लष्करी शिपायांच्या चाळी ह्या मुख्य होत. विद्याकलापुनरुज्जीवक इमारत (१८८३ ते १८८७ मध्यें) बांधली असून येथें चित्रसंग्रहालय व शहरचें वाचनालय ठेवण्यात आलें आहे.

दारू, धान्य, लांकूड, कोळसा, ताग, लोखंड, साखर, कॉफी, व ताजे मासे ह्या येथील आयात माल असून मीठ, अशुद्ध तांबें, कातडीं कमावण्याकरितां व तेलाकरितां लागणाऱ्या झाडाच्या साली हा निर्गत माल आहे. शस्त्रें तयार करण्याचे कारखाने, जहाजें बांधणें, मासे भरणें, फीत करणें, व दारू तयार करणें हा येथील व्यवसाय होय. येथें एक वनस्पतिबाग व वेधशाळा आहे.

ह्या शहरावर अनुक्रमें गॉथ, बर्गंडी, फ्रँक, सॅरासीन या लोकांनीं स्वाऱ्या केल्या. मध्ययुगाच्या सुरवातीपावेतों, १२५९ सालीं ऑंजोच्या चार्लसनें ह्या शहरावर विजय मिळविण्यापूर्वी येथील अधिपतींकडेच हें शहर होतें. पुढें हें मॉर्सेल्स व आलसच्या प्रजासत्ताक राज्याचें दोस्त झालें. सेंट लुई व मुख्यतः १२ वा लुई व पहिला फ्रॅन्सिस यांनीं या शहराची तटबंदी मजबूत केली. ५ व्या चार्लसनें १५२४ व १५३६ सालीं या शहरास वेढा घातला. चौथ्या चार्लसनें येथें आरमारी शस्त्रागार बांधलें व पुढें ह्यास रिचेल्यूनें ज्यास्त मजबूत केलें व व्होबॉंनें येथें एक नवीन गोदी व बरेच किल्ले बांधले व तोफा, गरनळे बुरजावर ठेविले. १७०७ सालीं सेव्हायचा ड्यूक प्रिन्स युजीननें व इंग्रजी आरमारानें वेढा दिला होता परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. १७२० सालीं येथें प्लेगची सांथ आली. १७९२ सालीं बऱ्याच रक्तपातानंतर शहरांतील राजसत्तावादी लोक इंग्रज व स्पेनच्या आरमारी रक्षणाखालीं गेले व त्यांनीं आपल्या बंदरांत इंग्रजांस येऊं दिलें. १७९३ सालीं प्रजासत्तावादी लोकांचा गराडा पडला. ह्यांत नेपोलियन बोनापार्टनें योद्धा म्हणून नांव मिळविलें. पुढें ईजिप्तवर स्वारी करण्याकरितां नेपोलियननें येथेंच सर्व फौज एकत्र केली. येथील तटबंदी पहिल्या नेपोलियननें, लुई नेपोलियननें व तिसऱ्या नेपोलियननें अधिकाधिक बळकट केली.

**टेकचंद मुनशी**—हा कवि असून याचें कवितेंतील नांव बहार होतें. हा जातीनें खत्री (हिंदु) असून यानें बहार-अजम आणि नवादीर उल् मसादीर हे दोन ग्रंथ केले आहेत. पैकीं पहिला हा फारशी भाषेतील म्हणींचा कोश आहे, तो त्यानें १७३९ सालीं लिहिला. याशिवाय त्यानें अव्वाल झरूरत हाहि एक ग्रंथ केला आहे.

**टेक्सस**—उत्तर अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं एक संस्थान. याचें क्षेत्रफळ २६५८९६ चौ. मै. असून त्यांपैकीं ३४९८ चौ. मैलांचा प्रदेश पाण्यानें व्यापिला आहे. लोकसंख्या (१९२०) ४६६३२२८. नीग्रो लोकांचा भरणा या संस्थानांत विशेष आहे. ऑस्टिन हें राजधानीचें शहर आहे. सान आन्टोनिओ, डल्लास, फोर्टवर्थ, हौस्टन हीं दुसरीं मोठीं शहरें आहेत. बॅप्टिस्ट आणि मेथाडिस्ट हे संस्थानांतील मुख्य धर्मपंथ असून या संप्रदायांचे लोक संस्थानांत हजारों आहेत. याच्या खालोखाल, कॅथोलिक, प्रेसबिटेरियन आणि एपिस्कोपोलियन ह्या धर्मसंप्रदायांचे लोक संस्थानांत आहेत. चौदा वर्षांच्या वयाखालील निरक्षर मुलांस नोकरीस ठेवणें बेकायदेशीर मानलें जातें. गोऱ्या आणि निग्रो लोकांच्या मुलांकरितां वेगवेगळ्या शाळा आहेत. १९१७ सालीं शालोपयोगी क्रमिक पुस्तकें विद्यार्थ्यांना फुकट देण्याचा कायदा करण्यांत आला. उच्च शिक्षणाकरितां, संस्थानांत अनेक विश्वविद्यालयें (युनिव्हर्सिटीज्) असून त्यांपैकीं कांहीं मुख्य पुढीलप्रमाणें—(१) युनिव्हर्सिटीज

ऑफ टेक्सस्, ऑस्टिन; ( २ ) एस्. डब्ल्यू. युनिव्हर्सिटी, जॉर्जटौन; ( ३ ) टेक्सस ख्रिश्चन युनिव्हर्सिटी, फोर्ट वर्थ; ( ४ ) बेलॉर युनिव्हर्सिटी, वॅको इ. या संस्थानांतील कित्येक शहरीं अनाथपंगुगृहें असून, १९१० सालीं अनाथांचें प्रमाण दर लक्षास २२·१ इतकें होतें. १९१८ सालीं, एकंदर जमा २३५९९३८३ डॉलर व खर्च १९५६३५४२ डॉलर होता.

पि कें, ख नि ज सं प त्ति, व उ द्यो ग धं दे.—कृषिकर्म हा संस्थानचा मुख्य धंदा असून, या धंद्यांत या संस्थानचा नंबर बराच वर लागेल. १९१० सालीं,संस्थांत २७३६०६६६ एकर जमीन लागवडीस योग्य होती. मका,गहूं, ओट, तांदूळ, बटाटे, आणि कापूस हीं महत्त्वाचीं पिकें होत. १९१८ सालीं ३६३७८०००० डॉलर किंमतीच्या कापसाची निपज संस्थानांत झाली. तंबाखू, ऊंस, सोरघम, फळफळावळ इत्यादिकांचेंहि पीक येतें. घोडे, खेचरें, गायी, मेंढ्या आणि डुकरें हीं संस्थानांत आढळणारीं मुख्य जनावरें होत. १९१७ सालीं मेंढ्यांपासून १००४५००० पौंड लोंकर काढण्यांत आली.पाऱ्याच्या ( क्किकसिल्व्हर )निर्गतींत, संयुक्त संस्थानांत या संस्थानचा नंबर दुसरा लागतो. कोळसा, पेट्रोलियम, क्षार, सिमेंट, जिप्सम, ग्रॅनाईट, कुरुंदाचा दगड, चुनखडी, हीं मुख्य खनिज द्रव्यें येथें सांपडतात. चांदी, तांबें आणि झिंक या धातूहि थोड्या प्रमाणांत सापडतात. १९१५ सालीं २९२६९२६३ डॉलर किंमतीचा खनिज माल संस्थानांतून बाहेरदेशीं रवाना झाला. शिसें वितळवून शुद्ध करण्याचे कारखाने येथें आहेत.कृत्रिम बर्फ तयार करण्याचे कारखानेहि पुष्कळ आहेत. पुस्तकें छापणें व प्रसिद्ध करणें, पाव भाजणें कापड विणणें हे धंदे संस्थानांत मुख्यत्त्वेंकरून चालतात.

१९१६ सालीं, टेक्सस संस्थानांत १५,८६६ मैल लांबीचा वाफेच्या गाडीचा आणि ९७७ मैल लांबीचा विजेच्या गाडीचा रस्ता होता. याशिवाय मोठमोठ्या शहरांतून नेलेला ९१ मैल लांबीचा रेल्वेरस्ता आहे.

येथें ३१ सभासदांचें वरिष्ठ मंडळ ( सेनेट ), आणि १४२ सभासदांचें प्रतिनिधिमंडळ असतें. पहिल्या मंडळांतील सभासदांची दर चार वर्षांनीं आणि दुसऱ्या मंडळांतील सभासदांची दर दोन वर्षांनीं नवी निवडणूक होते. मतदानाचा हक्क जवळ जवळ प्रत्येक वयांतील ( जाणत्या ) नागरिकास असतो. कॉंग्रेसमध्यें, या संस्थानातर्फे वरिष्ठ मंडळांतील २ सभासद आणि प्रतिनिधिमंडळां( हाउस ऑफ रिप्रेझेंटेटिव्हज् )तील १८ सभासद जातात. हें संस्थान २५२ परगण्यांमध्यें ( कौन्टी ) विभागलें गेलें आहे.

येथील राज्यव्यवस्थेसाठीं, निरनिराळीं खातीं असून त्यांवर निरनिराळे अधिकारी नेमलेले आहेत. हे अधिकारी कायदेमंडळानें निवडावयाचे असतात. त्यांची मुदत दोन ते सहा वर्षांपर्यंत असते. सेक्रेटरी ऑफ स्टेट मात्र गव्हर्नरनें नेमावयाचा असतो. १९१३ सालीं इंडस्ट्रियअल ॲक्सिडंट्स बोर्ड स्थापन करण्यांत आलें. १९१७ सालीं हाय वे कमिशन स्थापन करण्यांत येऊन त्याकडे संस्थानांतील राजरस्त्यांची व्यवस्था पहाण्याचें काम देण्यांत आलें. १९२० सालीं स्टेटबोर्ड ऑफ कंट्रोलचें खातें निर्माण करण्यांत येऊन त्याकडे संस्थानचें अंदाजपत्र ठरविणें वगैरे गोष्टी सोंपविण्यांत आल्या. त्यांच्यावर कायदेमंडळाला देखरेख करण्याची व अंदाजपत्रकांत अदलाबदल करण्याची मोकळीक असते.

सु धा र णा.—१८८० पासूनच या संस्थानांत मद्यपानबंदीची चळवळ सुरू झाली. पण मद्यपानबंदीचा कायदा १९१९ सालीं पसार करण्यांत आला. तत्पूर्वी संस्थानांतील कांहीं प्रमुख शहरांनीं आपल्या अधिकारांत मद्यपानबंदीचा कायदा आपापल्या शहरीं मंजूर केला. पण १९१९ च्या कायद्यानें सर्व संस्थानमध्यें दारूची बंदी करण्यांत आली. त्याचप्रमाणें १९१८ सालीं स्त्रियांना मत देण्याच्या परवानगीचा कायदा पसार करण्यांत आला. टेक्सस संस्थानांत एकंदर १७७५१२ इतकें सैन्य होतें.

**टेगर्नसी**—हें सरोवर बव्हेरियांत म्यूनिकच्या दक्षिणेस ३४ मैलांवर डोंगराळ प्रदेशांत आहे. समुद्रसपाटीपासून हें २३८२ फूट उंच आहे. याची लांबी व रुंदी अनुक्रमें ४ व १॥ मैल असून खोली २३५ फू. आहे. यांतील पाणी मॅग्फॉलमधून इनमध्यें जातें. दक्षिणेच्या बाजूस फारच नयनमनोहर वनश्री आहे. म्यूनिकच्या आसपासचे लोक उन्हाळ्याचे दिवस येथेंच घालवतात. टेगर्नसी हें गांव याच्या पूर्वकिनाऱ्यावर आहे.

**टेग्युसीगलपा**—हें होंडुरस टेग्युसीगलपा डिपार्टमेंटची राजधानी आहे. हें चोलुटेका नदीवर वसलें असून येथील लोकसंख्या १९१४ सालीं २८९५० होती. येथें फ्रान्सिस्को मोराझान या शूर शिपायाचा पुतळा आहे. मोठ्या इमारती म्हटल्या म्हणजे येथील विश्वविद्यालय, औद्योगिक शाळा व कोर्टें ह्या होत. १८८० सालीं टेग्युसीगलपा ही होंडुरसची राजधानी झाली. पूर्वी येथें सोनें, रुपें व संगमरवर यांच्या खाणी होत्या, पण आतां त्यांची किंमत फार कमी झाली आहे. येथील शेती हा मुख्य धंदा आहे.

**टेट, पिटर गथ्री** ( १८३१–१९०१ )—या स्कॉटिश पदार्थविज्ञानशास्त्रवेत्त्याचा जन्म डालकीथ येथें झाला. प्रथमतः त्यानें कांहीं दिवस एडिम्बरो येथील विश्वविद्यालयांत शिक्षण घेतलें व नंतर तो केंब्रिज येथें शिक्षण घेण्यास गेला; व १८५२ सालीं त्यानें ' स्मिथ ' पारितोषक आणि सीनिअर रँगलरची पदवी मिळविली. पुढें दोन वर्षें केंब्रिज येथें घालवून तो बेलफास्ट येथील क्वीन्स कॉलेजांत प्रोफेसर झाला. त्याठिकाणीं थॉमस अन्ड्रू याच्याशीं त्याची ओळख झाली. येथें या दोघांनीं मिळून ओझोन वायूवर प्रयोग केले व ऑक्सिजन आणि इतर वायू यांच्यांतून विद्युत्प्रवाह गेला असतां काय परिणाम होतात यासंबंधानें त्यांनीं प्रयोग करून पाहिले. पुढें टेटची हॅमिल्टनबरोबर ओळख झाली.

१८६० सालीं त्याला एडिंबरोच्या कॉलेजांत निसर्गतत्त्वज्ञानाचा प्रोफेसर नेमिलें. याठिकाणीं त्यानें शेवटपर्यंत काम केलें. तारीख ४ जुलै १९०१ रोजीं त्याचा एडिंबरो येथें काळ झाला.

१८६० सालापासून टेट यानें शास्त्रीय लेख लिहिण्यास सुरुवात केली. प्रथम जे लेख त्यानें लिहिले ते सारे गणितविषयक होते; विशेषेंकरून काल्पनिक चातुर्थिक-संख्या-गणितासंबंधानेंच त्यानें जास्त लेख या काळांत लिहिले आहेत. मिल्टन या गणित्यास वगळलें तर टेट यानेंच या अर्वाचीन गणितशाखेचा पाया घातला असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. प्रायोगिक पदार्थविज्ञानशास्त्रावर त्यानें कित्येक उत्तम उत्तम लेख लिहिले आहेत. १८६४ सालीं त्यानें गत्युष्णताशास्त्रावर एक लहानसा निबंध लिहिला व यानंतर त्यानें एतत्सदृश विषयावर कित्येक महत्त्वाचे लेख लिहिले आहेत. कोळशाच्या योगानें उत्पन्न केलेल्या निर्वातस्थळासंबंधानें त्यानें कित्येक प्रयोग करून क्रुकच्या विसर्जनमापक यंत्राचें कार्य कसें होतें यासंबंधानें त्यानें उलगडा करून दाखविला. खोल समुद्रांतील अंतर्भागाचें उष्णमान घेत असतांना उष्णता-मापक यंत्रावर पाण्याचा अत्यंत दाब पडतो; व त्यायोगानें बरोबर रीतीनें त्या स्थळाचें उष्णमान निघूं शकत नाहीं तेव्हां हें उष्णमान बरोबर करून घ्यावयाचें असल्यास कोणता गुणक कशा रीतीनें मिळवावा असा प्रश्न उत्पन्न होतो. याचें उत्तर देतां यावें म्हणून त्यानें सन १८७९ ते १८८८ पर्यंत अत्यंत श्रम करून नवीन माहिती उपलब्ध केली. वायूच्या अणुगतिविषयक सिद्धांतासंबंधानें त्यानें कित्येक प्रयोग केले व लेख लिहिले. गतिशास्त्रावर त्यानें उत्तम पुस्तक लिहिलें आहे. उष्णता, प्रकाश, द्रव्याचे गुणधर्म, गतिशास्त्र, गत्युष्णता शास्त्र यांवर त्यानें उत्तम ग्रंथ लिहिले आहेत. लॉर्ड केल्व्हिन आणि टेट या दोघांनीं मिळून पदार्थविज्ञानशास्त्र नूतन पद्धतीनें लिहिण्याचें ठरविलें. या धोरणानुसार या दोघांनीं अठरा वर्षें स्वतंत्र रीतीनें काम केलें.

**टेन, हिप्पोलाइट अडोल्फ** (१८२८—१८९३)— हा फ्रेंच टीकाकार व इतिहासकार व्होझिअर्स येथें जन्मला. विद्यार्थिदशेंत त्याची हुषारी दिसून आली व शाळेंतहि त्यानें अनेक प्रकारचीं बक्षिसें मिळविलीं. फ्रेंच व लॅटिन गद्य किंवा पद्य लिहिण्यांत त्याचा हातखंडा होता. त्यानें प्लेटो, अरिस्टॉटल वगैरे तत्त्ववेत्त्यांचे ग्रंथ वाचून टाकले. १८५१ सालीं त्यास टूलाँ येथील विद्यालयांत कांहीं दिवसांकरितां तत्त्वज्ञानाचा अध्यापक नेमलें. लोकसत्ताक राज्यपद्धतींतील मध्यक्षाच्या जाहीरनाम्यावर त्यानें सही करण्याचें नाकारल्यावरून त्याला पॉयॅटिअर्सच्या लिसीमध्यें सहाव्या दर्जाचा अध्यापक नेमलें. १८६३ सालीं त्याला लष्करी ॲकेडमीमध्यें इतिहास व जर्मन भाषेचा परीक्षक नेमलें. इ. स १८७१ मध्यें त्याला युनिव्हर्सिटीनें डॉक्टरची पदवी दिली.

यानंतर फ्रेंच राज्यक्रांतीवर त्यानें ग्रंथ लिहिण्याचें ठरविलें. १८८४ सालीं आपला अध्यापकाचा धंदा सोडून तो वाङ्मयसेवक बनला. फ्रेंच राज्यक्रांतीवर तो लिहित असलेल्या पुस्तकांपैकीं कांहीं पुस्तकें अपुरींच राहिलीं. तो ता. ५ मार्च १८९३ रोजीं पारीस येथें मरण पावला. हा प्रत्यक्षज्ञानवादी तत्त्ववेत्ता होता. त्याच्या ग्रंथांपैकीं 'ला फिलॉसॉफी डी ला आर्ट', 'ला एन्शंट रेजीम', 'ला रेव्होल्यूशन' व 'ला रेजीम मॉडर्न' वगैरे ग्रंथ मुख्य आहेत.

**टेनेस्सी**—उत्तर अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं एक संस्थान. याचें क्षेत्रफळ ४२०२२ चौ. मै. असून त्यापैकीं ३३५ चौ. मैलांचा प्रदेश पाण्यानें आच्छादिला आहे. लो.सं. (१९१८) २३२१२५३ नॅशव्हिले हें संस्थानच्या राजधानीचें शहर आहे. मेम्फिस, चॅटनूगा, नॉक्सव्हिले हीं मोठीं शहरें होत. संस्थानांतील शेकडा ४० लोक बॅप्टिस्ट आणि शेकडा ३३ लोक मेथाडिस्ट संप्रदायाचे आहेत. यांच्या खालोखाल प्रेसबिटेरीयन आणि रोमन कॅथॉलिक या संप्रदायांचे लोक आहेत. प्राथमिक शिक्षण सक्तीचें केलें असून १४ वर्षे वयाच्या आंतील मुलांस कारखान्यांत अगर खाणींत नोकरीस ठेवणें बेकायदेशीर मानलें जातें. गोरे लोक आणि निग्रो लोक यांच्या मुलांकरितां वेगवेगळ्या शाळा आहेत संस्थानांत ४ नॉर्मल स्कूल्स आहेत (१९१५). उच्च शिक्षण देणारीं एकंदर २६ विश्वविद्यालयें आणि कॉलेजें आहेत. स्त्रियांकरितां ७ कॉलेजें, व्यापारी शिक्षण देणाऱ्या ८ शाळा व निग्रो विद्यार्थ्यांकरितां ३ विश्वविद्यालयें संस्थानांत आहेत. अनाथांकरितां अनाथपंगुगृहेंहि आहेत. १९१८ सालीं संस्थानचें उत्पन्न ८३२३४६८ डॉलर व खर्च ७४८१७८६ डॉलर होता. म्हणजे १९१८ सालची शिल्लक ८४१६८२ डॉलर्स होती. १९१०सालीं संस्थानांत २००४१६५७ एकर शेतीची जमीन असून त्यापैकीं १०८९०४८४ एकर जमीन लागवडीस योग्य होती. मका आणि गहूं हीं महत्त्वाचीं पिकें होत. ओट, गवत, बटाटे, वाटाणा, सोरघम इत्यादि पिकें व फळेंहि पुष्कळ होतात. कापूस आणि तंबाखू यांचें पीक कमी अधिक प्रमाणांत येतें. टेनेस्सीच्या खोऱ्यांत फळफळावळ (विशेषतः स्ट्रॉबेरी) विपुल पिकते. २७३०० मैलांचा प्रदेश दाट अरण्यांनीं झांकला गेला असून त्यांतून पुष्कळ किंमतीचें लांकूड सांपडतें. घोडे, खेचरें, दुभत्या गायी, मेंढ्या आणि डुकरें हीं संस्थानांत आढळणारीं मुख्य उपयुक्त जनावरें आहेत. मेंढ्यांपासून पुष्कळ किंमतीची लोंकर काढून परदेशीं पाठवितात.

टेनेस्सी संस्थानांत सांपडणारा मुख्य व महत्त्वाचा खनिज पदार्थ म्हटला म्हणजे कोळसा होय. कोळशाच्या खाणींनीं संस्थानांतील सुमारें४४००चौ. मैलांचा प्रदेश व्यापिला आहे.

ऑफ टेक्सस्, ऑस्टिनः ( २ ) एस्. डब्ल्यू. युनिव्हर्सिटी, जॉर्जटौन; ( ३ ) टेक्सस ख्रिश्चन युनिव्हर्सिटी, फोर्ट वर्थ; ( ४ ) वेलॉर युनिव्हर्सिटी, वॅको इ. या संस्थानांतील कित्येक शहरीं अनाथपंगुगृहें असून, १९१० सालीं अनाथांचें प्रमाण दर लक्षास २२·१ इतकें होतें. १९१८ सालीं, एकंदर जमा २३५९९३८३ डॉलर व खर्च १९५६३५४२ डॉलर होता.

पि कें, ख नि ज सं प त्ति, व उ द्यो ग धं दे.—कृषिकर्म हा संस्थानचा मुख्य धंदा असून, या धंद्यांत या संस्थानचा नंबर बराच वर लागेल. १९१० सालीं,संस्थांत २७३६०६६६ एकर जमीन लागवडीस योग्य होती. मका,गहूं, ओट, तांदूळ, बटाटे, आणि कापूस हीं महत्त्वाचीं पिकें होत. १९१८ सालीं ३६३७८०००० डॉलर किंमतीच्या कापसाची निपज संस्थानांत झाली. तंबाखू, ऊंस, सोरघम, फळफळावळ इत्यादिकांचेंहि पीक येतें. घोडे, खेचरें, गायी, मेंढ्या आणि डुकरें हीं संस्थानांत आढळणारीं मुख्य जनावरें होत. १९१७ सालीं मेंढ्यांपासून १००४५००० पौंड लोंकर काढण्यांत आली.पाऱ्याच्या ( क्किक्सिल्व्हर )निर्गतींत, संयुक्त संस्थानांत या संस्थानचा नंबर दुसरा लागतो. कोळसा, पेट्रोलियम, क्षार, सिमेंट, जिप्सम, ग्रॅनाईट, कुरुंदाचा दगड, चुनखडी, हीं मुख्य खनिज द्रव्यें येथें सांपडतात. चांदी, तांबें आणि झिंक या धातूहि थोड्या प्रमाणांत सापडतात. १९१५ सालीं २९२६९२६३ डॉलर किंमतीचा खनिज माल संस्थानांतून बाहेरदेशीं रवाना झाला. शिसें वितळवून शुद्ध करण्याचे कारखाने येथें आहेत.कृत्रिम वर्फ तयार करण्याचे कारखानेहि पुष्कळ आहेत. पुस्तकें छापणें व प्रसिद्ध करणें, पाव भाजणें कापड विणणें हे धंदे संस्थानांत मुख्यत्त्वेंकरून चालतात.

१९१६ सालीं, टेक्सस संस्थानांत १५,८६६ मैल लांबीचा वाफेच्या गाडीचा आणि ९७७ मैल लांबीचा विजेच्या गाडीचा रस्ता होता. याशिवाय मोठमोठ्या शहरांतून नेलेला ९१ मैल लांबीचा रेल्वेरस्ता आहे.

येथें ३१ सभासदांचें वरिष्ठ मंडळ ( सेनेट ), आणि १४२ सभासदांचें प्रतिनिधिमंडळ असतें. पहिल्या मंडळांतील सभासदांची दर चार वर्षांनीं आणि दुसऱ्या मंडळांतील सभासदांची दर दोन वर्षांनीं नवी निवडणूक होते. मतदानाचा हक्क जवळ जवळ प्रत्येक वयांतील ( जाणत्या ) नागरिकास असतो. कॉंग्रेसमध्यें, या संस्थानातर्फे वरिष्ठ मंडळांतील २ सभासद आणि प्रतिनिधिमंडळां( हाऊस ऑफ रिप्रेझेंटेटिव्हज् )तील १८ सभासद जातात. हें संस्थान २५२ परगण्यांमध्यें ( कौन्टी ) विभागलें गेलें आहे.

येथील राज्यव्यवस्थेसाठीं, निरनिराळीं खातीं असून त्यांवर निरनिराळे अधिकारी नेमलेले आहेत. हे अधिकारी कायदेमंडळानें निवडावयाचे असतात. त्यांची मुदत दोन ते सहा वर्षांपर्यंत असते. सेक्रेटरी ऑफ स्टेट मात्र गव्हर्नरनें नेमावयाचा असतो. १९१३ सालीं इंडस्ट्रियअल अॅक्सिडंट्स बोर्ड स्थापन करण्यांत आलें. १९१७ सालीं हाय वे कमिशन स्थापन करण्यांत येऊन त्याकडे संस्थानांतील राजरस्त्यांची व्यवस्था पहाण्याचें काम देण्यांत आलें. १९२० सालीं स्टेटबोर्ड ऑफ कंट्रोलचें खातें निर्माण करण्यांत येऊन त्याकडे संस्थानचें अंदाजपत्र ठरविणें वगैरे गोष्टी सोंपविण्यांत आल्या. त्यांच्यावर कायदेमंडळाला देखरेख करण्याची व अंदाजपत्रकांत अदलाबदल करण्याची मोकळीक असते.

सु धा र णा.—१८८० पासूनच या संस्थानांत मद्यपानबंदीची चळवळ सुरु झाली. पण मद्यपानबंदीचा कायदा १९१९ सालीं पसार करण्यांत आला. तत्पूर्वी संस्थानांतील कांहीं प्रमुख शहरांनीं आपल्या अधिकारांत मद्यपानबंदीचा कायदा आपापल्या शहरीं मंजूर केला. पण १९१९ च्या कायद्यानें सर्व संस्थानमध्यें दारूची बंदी करण्यांत आली. त्याचप्रमाणें १९१८ सालीं स्त्रियांना मत देण्याच्या परवानगीचा कायदा पसार करण्यांत आला. टेक्सस संस्थानांत एकंदर १७७५१२ इतकें सैन्य होतें.

**टेगर्नसी**—हें सरोवर बव्हेरियांत म्यूनिकच्या दक्षिणेस ३४ मैलांवर डोंगराळ प्रदेशांत आहे. समुद्रसपाटीपासून हें २३८२ फूट उंच आहे. याची लांबी व रुंदी अनुक्रमें ४ व १॥ मैल असून खोली २३५ फू. आहे. यांतील पाणी मॅन्गफॉलमधून इनमध्यें जातें. दक्षिणेच्या बाजूस फारच नयनमनोहर वनश्री आहे. म्यूनिकच्या आसपासचे लोक उन्हाळ्याचे दिवस येथेंच घालवतात. टेगर्नसी हें गांव याच्या पूर्वकिनाऱ्यावर आहे.

**टेग्युसीगलपा**—हें हॉंडुरस टेग्युसीगलपा डिपार्टमेंटची राजधानी आहे. हें चोलुटेका नदीवर वसलें असून येथील लोकसंख्या १९१४ सालीं २८९५० होती. येथें फ्रान्सिस्को मोराझान या शूर शिपायाचा पुतळा आहे. मोठ्या इमारती म्हटल्या म्हणजे येथील विश्वविद्यालय,औद्योगिक शाळा व कोर्ट ह्या होत. १८८० सालीं टेग्युसीगलपा ही हॉंडुरसची राजधानी झाली. पूर्वी येथें सोनें, रुपें व संगमरवर यांच्या खाणी होत्या पण आतां त्यांची किंमत फार कमी झाली आहे. येथील [illegible] हा मुख्य धंदा आहे.

**टेट, पिटर गथ्री** ( १८३१-१९०१ )—या स्क[illegible] पदार्थविज्ञानशास्त्रवेत्त्याचा जन्म डालकीथ येथें झाला. मतः त्यानें कांहीं दिवस एडिम्बरो येथील विश्ववि[illegible] शिक्षण घेतलें व नंतर तो केंब्रिज येथें शिक्षण घेण्य[illegible] व १८५२ सालीं त्यानें ' स्मिथ ' पारितोषक आ[illegible] अर रँगलरची पदवी मिळविली. पुढें दोन वर्षे घालवून तो बेलफास्ट येथील क्वीन्स कॉलेजांत प्रो[illegible] त्याठिकाणीं थॉमस अन्ड्रूज याच्याशीं त्याची [illegible] येथें या दोघांनीं मिळून ओझोन वायूवर [illegible] ऑक्सिजन आणि इतर वायू यांच्यांतून [illegible] असतां काय परिणाम होतात यासंबंधानें करून पाहिले. पुढें टेटची हॅमिल्टनबरोब[illegible]

कृत्रिम खतें तयार करण्याचे व दारू गाळण्याचे कारखाने आहेत. हें शहर फार जुनें आहे. १५५३ सालीं तुर्कांनीं हें शहर जिंकलें स. १७१६ पर्यंत हें त्यांच्याच ताब्यांत होतें. पुढें सॅव्हॉयचा राजपुत्र युजीन यानें हें तुर्कांपासून परत घेतलें.

**टेराडेलफ्यूगो**–दक्षिण अमेरिकेच्या दक्षिण टोंकाकडील एक द्वीपसमूह. हा द्वीपसमूह दक्षिण अक्षांश ५२° ४०' ते ५५° ५९' आणि पश्चिम रेखांश ६३° ३०' ते ७४° ३०' यांच्या दरम्यान असून "पॅटॅगोनियन अँडिस" च्या समान्तर रेषेंत ४०० मैलपर्यंत पसरलेला आहे. द्वीपसमूहाचा कांहीं भाग अर्जेंटिना व कांहीं भाग चिलि यांमध्यें समावला जातो. अर्जेंटिनांत समाविष्ट होणाऱ्या भागास "टेराडेलफ्यूगो" असें प्रायः संबोधण्यांत येतें. चिलींत समाविष्ट होणारा भाग मॅगॅलनसच्या मुलुखांत जोडला गेला आहे. ( १ ) मुख्य बेट, ( २ ) बीगल खाडीमुळें पृथक् झालेलीं अशीं दक्षिणबाजूकडील बेटें, व ( ३ ) पश्चिमेकडील बेटें; असे या द्वीपसमूहाचे नैसर्गिक तीन विभाग झाले आहेत.

द्वीपसमूह समुद्रसपाटीपासून ३०० फूट उंचीवर असून हिंवाळ्यात अतिशय थंडी असली तरी बार्ली, ओट वगैरे धान्यें पिकतात. या दृष्टीनें, बीगल खाडीच्या आसपासचा प्रदेश सुपीक आहे असें म्हणतां येईल. समूहाचा दक्षिण भाग उंचीवर असून पश्चिम भाग डोंगराळ आहे. सोलियर व फॅग्न्यानो या नावांचीं दोन सरोवरें या भागांत आहेत. फॅग्न्यानो सरोवराच्या दक्षिणेस 'कॉर्डिलेरा' पर्वतराजी पसरल्या असून त्यांवरील कांहीं शिखरें प्रसिद्ध आहेत. उपसागरांपैकीं यँडेगिया, लपशिया व उशाया हे तीन उपसागर प्रसिद्ध आहेत. समूहाच्या दक्षिण भागांत, "इस्टे", "नाव्हारिन", "गॉर्डन", "लंडनडेरी" वगैरे बेटांचा समावेश होतो. त्याचप्रमाणें पश्चिम भागांत "डॉसन", "क्लॅरेन्स" बेटें, "डेसोलेशन लँड" नांवाचा बेटसंग्रह वगैरे समाविष्ट होतात. येथील, दक्षिण टोंकवर, क्लेरेन्स बेटालगत असलेलें बेट महत्त्वाचें आहे. डॉसन बेटांत चिलियन सरकारची एक वसाहत आहे. द्वीपसमूहांत रानटी लोकांची वस्ती आहे. याची संख्या वर्षानुवर्ष कमी होत चालली आहे. रे. टॉमस ब्रिजेसच्या म्हणण्याप्रमाणें ५० वर्षांपूर्वी एकंदर लोकवस्ती सुमारें १०००० होती. २० व्या शतकारंभीं एकंदर १००० लोकसंख्या आढळून आली. मुख्य बेटांत "ओनस" नांवाचे रानटी लोक, दक्षिण भागांत "यागन" व पश्चिम भागांत "अलाकालूफ" नांवाचे रानटी लोक, रहिवाशी आहेत. "ओनस" लोकांची उपजीविका शिकारीवर असते. हे नेहेमीं फिरतीवर असतात. "यागन" ही एक क्रूर रानटी जात आहे. "अलाकालूफ" ही एक दगलबाज व क्रूर जात आहे. यांच्यासंबंधीं विशेष नमूद करण्यासारखें कांहीं नाहीं. टेराडेलफ्यूगोमध्यें एखादा मुलगा वयांत येऊन धीवराच्या अथवा पारध्याच्या धंद्यावर स्वकष्टार्जनानें आपलें बायकोचें पोट भरण्यास समर्थ होतांच तो एखाद्या मुलीच्या आप्तसंबंधीं लोकांच्या संमतीनें त्या मुलीच्या वडिलांचें कांहीं काम करून देतो. उदाहरणार्थ, नौका बांधण्यास त्यांनां मदत करणें, सील माशांची चामडीं कमावून तयार करणें, वगैरे. नंतर तो दुसरी एक होडी बांधून ठेवितो, अगर कोणाची उपटून आणितो; आणि मग संधि साधून तींत आपल्या नवरीला बसवून तिजसह पळून जातो. जर त्याच्याबरोबर जाण्यास नवरी नाखूष असली, तर ती जंगलांत कोठेंतरी लपून बसते. मग तिच्यावर फिदा असलेला तरुण मनुष्य तिला अंतःकरणपूर्वक शोधून शोधून थकला, म्हणजे तिचा नाद सोडून देतो. परंतु असें फार क्वचित् घडून येतें ( वलोनीकृत लग्नविधि व सोहाळे. ). "फर्नांडो डी मागालन" यानें प्रथम १५२० सालीं टेराडेलफ्यूगो द्वीपसमूहाचा शोध लावला. पूर्वी याला "लॅन्ड ऑफ फायर" असें म्हणत असत. द्वीपसमूहासंबंधीं उपलब्ध असलेली माहिती म्हणजे त्यानंतर बऱ्याच शोधकांनीं व प्रवाशांनीं केलेल्या एकंदर निरीक्षणाचें फळ आहे.

**टेलर, फिलिप मेडोज्** ( १८०८–१८७६ )—एक आंग्लेइंडियन कादंबरीकार हा लिव्हरपूलमध्यें जन्मला. वयाच्या पंधराव्या वर्षी, मुंबईच्या एका व्यापाऱ्याकडे कारकुनाची नोकरी धरण्यासाठीं तो विलायतेंतून इकडे आला. परंतु तेथें न जमल्यामुळें, टेलरनें निझामाच्या पदरीं लष्करी नोकरी धरली. त्याचें सर्व आयुष्य निझामाच्याच पदरीं गेलें. कांहीं दिवसांनीं त्याला लष्करी कामावरून काढून मुलकी व दिवाणी कामावर नेमिलें. त्यानें दक्षिणेंतील मुख्य भाषांचें व लोकांचें ज्ञान संपादिलें. कायदेशास्त्र, भूगर्भशास्त्र, हिंदुस्थानांतील प्राचीन कलाकौशल्य इत्यादिकांचा त्यानें अभ्यास केला. १८४० सालीं, त्यानें 'कन्फेशन्स् ऑफ ए ठग' ( ठगाची जबानी ) ही कादंबरी प्रसिद्ध केली. या कादंबरीनंतर 'टिप्पू सुलतान', 'तारा', 'राल्फ डार्नेल,' 'सीता' ( १८७२ ), 'नोबल क्वीन' ( चांदबिबी ) इत्यादि कादंबऱ्या त्यानें प्रसिद्ध केल्या. या सर्व पुस्तकांतून त्यानें तत्कालीन लोकस्थितीचें वर्णन केलें आहे. हिंदुस्थानांतील प्राचीन संस्कृति आणि दंतकथा यांविषयींचा त्याचा आदर त्याच्या ग्रंथांतून चांगला दिसून येतो. स. १८४० ते १८५३ सालापर्यंत त्यानें टाईम्स पत्राचा बातमीदार म्हणून काम केलें. त्यानें एक हिंदुस्थानचा शालेय इतिहासहि लिहिला आहे. पुढें निझामनें शोरापूरच्या अज्ञान राजपुत्राच्या राज्याची व्यवस्था पाहण्याकरितां त्याची नेमणूक केली. पुष्कळ वर्षेंपर्यंत मेडोजनें हें काम उत्तम प्रकारें व सचोटीनें केलें. कर्नल टेलरच्या अंगचे गुण इंग्रज सरकारास—जरी तो ई. इं. कंपनीचा नोकर नव्हता तरी—चांगले कळून आले, आणि इंग्रज सरकारनें त्यास डेप्युटी कमिशनरच्या हुद्यावर नेमिलें. आपल्या दीर्घ प्रयत्नांमुळें टेलरनें ई. इं. कंपनीच्या मदतीशिवाय हिंदुस्थानांतील परिस्थितीचें यथार्थ ज्ञान संपादन केलें. पुढें १८६० सालीं, तो विलायतेस परत गेला तेव्हां

लोखंड, तांबें, झिंक, सोनें, कुरुंदाचा दगड व चुनखडीचा दगड हीं मुख्य खनिज द्रव्यें सांपडतात. १९१५ सालीं या संस्थानांतून २२१६६४९४ डॉलर किंमतीचा खनिज माल बाहेरदेशीं रवाना झाला. लोखंड आणि पोलाद यांचे अनेक कारखाने संस्थानांत आहेत. सरकीपासून तेल व पेंड करून बाहेरदेशीं रवाना केली जाते. कातडीं कमावण्याचे पुष्कळ कारखाने असून दिवसेंदिवस त्यांची भरभराट होत आहे. तंबाखूपासून सिगारेट वगैरे तयार करण्याचे कारखाने आहेत.

संस्थानांत १९१८ सालीं ४०९० मैल लांबीचे विजेच्या गाडीचे रस्ते होते. १९१५ सालीं संस्थानांत ३३सेव्हिंग्ज बँका होत्या. या संस्थानचे ९६ परगणे पाडण्यांत आले आहेत.३३ सभासदांचें वरिष्ठ मंडळ ( सेनेट ) आणि ९९ सभासदांचें प्रतिनिधिमंडळ ( हाऊस ऑफ रेप्रेझेंटेटिव्हज् ) असतें. दोन्ही मंडळांतील सभासदाच्या दर दोन वर्षांनीं नव्या निवडणुकी होतात. कृष्णींमनला कोणत्याहि मंडळांत निवडून येण्याचा हक्क नसतो. कांहीं अपवाद सोडून दिल्यास पोल-टॅक्स देणाऱ्या प्रत्येक जाणत्या नागरिकास मतदानाचा हक्क असतो. काँग्रेसमध्यें या संस्थानांतून २ वरिष्ठ मंडळांतील सभासद आणि १० प्रतिनिधीमंडळांतील सभासद पाठविले जातात.

**टेंपलवार**—हें लंडनमधील एक इतिहासप्रसिद्ध स्थळ आहे. सध्यां जेथें स्ट्रँड व फ्लीट रस्ते मिळतात तेथें टेंपलवार होतें. येथेंच सर क्रिस्टोफर रेन याच्या कल्पनेबरहुकूम असा एक दरवाजा बांधण्यात आला. हा स. १८७८ त येथून काढून थेओबाल्डस पार्कच्या प्रवेशद्वाराला लावण्यांत आला. जेव्हां राजा टेंपलवार अथवा अन्य मार्गानें शहरांत येतो त्यावेळीं जुन्या चालीप्रमाणें लॉर्ड मेयर,राजाला शहराची तरवार देतो व राजा ती तलवार लगेच परत करतो. पूर्वी हा समारंभ होईपर्यंत राजाला दरवाज्याच्या आंत जातां येत नसे.

**टेबल माउंटन**—हें नांव ज्या टेंकड्यांचा वरचा भाग पठारासारखा असतो त्यांना देतात. पण आफ्रिकेंत टेबल बे (आखाता)च्या जवळील डोंगराला हें विशिष्ट नांव आहे हा डोंगर केप (भुशिर) असून ह्याच्या पायथ्याशीं केपटाऊन शहर आहे. ह्याची उत्तरेकडील बाजू सुमारें दोन मैल लांब असून उंची ३५०० मैल आहे. ह्याच्या पूर्वेकडे व पश्चिमेकडे टेंकड्या आहेत. पूर्वेस डेव्हिल्सपीक (३३००) फूट व पश्चिमेस लायन्सहेड अशीं ह्याचीं दोन शिखरें आहेत. ह्याचें सर्वांत उंच शिखर ३८५० फूट आहे. ह्याच्यावर उत्तम झाडी असून ह्यावर 'सिल्व्हर ट्री'(रौप्यवृक्ष)आहेत. येथील वनश्रीचा देखावा फारच सुंदर आहे. ह्याच्या शिखरावरून फार चांगली शोभा दिसते. येथें 'टेबल क्लॉथ' (टेबलावरचें वस्त्र ) नांवाची निसर्ग शोभा कधीं कधीं पहावयास मिळते. ह्यावेळीं मळकट पांढऱ्या रंगाचे ढग या डोंगराचा वरचा भाग आच्छादून टाकितात. याच्या शिखरावर ७२.१४ इंच पाऊस पडतो. डोंगराच्या शिखरावर झाडी असल्यानें कारण तेथील जास्त पाऊस व ढगांचा ओलावा हें आहे.

**टेंभुरणी**—या झाडास संस्कृतमध्यें तिंदुकी, मराठींत टेंभुरणी, गुजराथींत टिंबरू, हिंदींत तेंदु इत्यादि नांवें आहेत. हीं झाडें फार मोठीं होतात. त्यांचीं पानें बरीच मोठीं व लांबट आकाराचीं असतात. ह्या झाडास बोराएवढीं जीं फळें येतात, तीं खातातहि. ह्या झाडाच्या पानांत तंबाखू घालून त्याच्या विड्या तयार करतात. त्यांचा खप दिवसेंदिवस फार वाढत्या प्रमाणावर आहे. म्हणून या पानास चांगली किंमत येते. टेंभुरणी तुरट, कडु, स्निग्ध, उष्ण व मधुर असून वायु व व्रण यांचा नाश करते. या झाडाचें फळ तुरट, ग्राहक, शीत, स्वादु, मलस्तंभक व वातहारक आहे. [पदे.]

**टेंभुरणी**—मुंबई, सोलापूर जिल्हा. टेंभुरणी हें गांव पुणें-सोलापूर सडकेवर वार्शीरोड स्टेशनच्या नैर्ऋत्येस १५ मैलांवर जी. आय. पी. रेल्वेवर स्टेशन आहे. लोकसंख्या सुमारें दोन हजार. येथें शुक्रवारीं बाजार भरतो. या गांवाच्या भरभराटीचा आरंभ, जेव्हां हें गांव दुसऱ्या बाजीरावाचा कारभारी सदाशिव माणकेश्वर यास इनाम मिळून त्यानें एक किल्ला बांधला तेव्हांपासून झाला. हा किल्ला हल्लीं मोडकळीस आलेला आहे. येथें रामाचें व विठोबाचें अशीं दोन देवळें आहेत. व पोलीसचौकी आहे. सदाशिव माणकेश्वरानंतर त्याचा दत्तक पुत्र लक्ष्मणराव व नंतर त्याची विधवा स्त्री यांजकडे हा गांव येऊन त्या बाईच्या मरणापर्यंत ( १८७९ ) इनाम चालत होता. सोलापूर जिल्ह्यांत प्रथम याच गांवीं गाड्या तयार होऊं लागल्या.

**टेमेश्वार**--हें शहर हंगेरी देशच्या टेमेस विभागांत आहे. ह्याची लोकसंख्या १९१० सालीं ७२५५५ होती. हें शहर वेगा नदीवर वसलें आहे. येथें या नदीचे कालवे आहेत. या कालव्यांतून नावा व लहान जहाजें चालतात. पूर्वी ह्या शहरास मोठी तटबंदी असे. ह्या शहराबाहेरील रुंद उतरत्या जागेत कित्येक बागा आहेत. शहरांतून शेजारच्या खेड्यांस जाण्याकरितां ह्या क्रीडावनांतून मोठमोठे वृक्षाच्छादित रस्ते आहेत. हें शहर रोमनकॅथोलिक व ग्रीक ऑर्थोडॉक्स (पुराणमतवादी ) धर्मगुरुंचें वसतिस्थान आहे. येथील इमारतींपैकीं मुख्य इमारती म्हटल्या म्हणजे रोमनकॅथोलिक देवालय, ग्रीक ऑर्थोडॉक्स देवालय, पदार्थसंग्रहालय वगैरे होत. रोमनपंथाचें देवालय मराया थेरेसानें बांधलें.येथें १४४२ त बांधलेला एक किल्ला आहे. ह्याचा उपयोग अलीकडे युद्धसामुग्री सांठविण्यांकडे व तयार करण्याकडे होतो. ह्या शहरच्या मुख्य चौकांत फ्रॅन्सीस जोसेफ यानें उभारलेला ४० फूट-उंचीचा खांब आहे, हा खांब येथील लोकांनीं स.१८४९ मध्यें वेढवाल्या लोकांविरुद्ध १०७ दिवस टिकाव धरल्याचें द्योतक आहे. ह्या शहरचा व्यापार धान्य, पीठ, दारू व घोडे ह्यांत बराच चालतो. ह्या शहरीं तंबाखू तयार करण्याचे, कपडा विणण्याचे, आगपेट्यांचे, कमावलेलीं कातडीं तयार करण्याचे,

कृत्रिम खतें तयार करण्याचे व दारू गाळण्याचे कारखाने आहेत. हें शहर फार जुनें आहे. १५५३ सालीं तुर्कांनीं हें शहर जिंकलें स. १७१६ पर्यंत हें त्यांच्याच ताब्यांत होतें. पुढें सॅव्हॉयचा राजपुत्र युजीन यानें हें तुर्कांपासून परत घेतलें.

**टेराडेलफ्यूगो**-दक्षिण अमेरिकेच्या दक्षिण टोंकाकडील एक द्वीपसमूह. हा द्वीपसमूह दक्षिण अक्षांश ५२° ४०′ ते ५५° ५९′ आणि पश्चिम रेखांश ६३° ३०′ ते ७४° ३०′ यांच्या दरम्यान असून "पॅटॅगोनियन अँडिस" च्या समान्तर रेषेंत ४०० मैलपर्यंत पसरलेला आहे. द्वीपसमूहाचा कांहीं भाग अर्जेंटिना व कांहीं भाग चिलि यांमध्यें समावला जातो. अर्जेंटिनांत समाविष्ट होणाऱ्या भागास "टेराडेलफ्यूगो" असें प्रायः संबोधण्यांत येतें. चिलींत समाविष्ट होणारा भाग मॅगॅलनसच्या मुलुखात जोडला गेला आहे. (१) मुख्य बेट, (२) बीगल खाडीमुळें पृथक् झालेलीं अशीं दक्षिण-बाजूकडील बेटें, व (३) पश्चिमेकडील बेटें; असे या द्वीपसमूहाचे नैसर्गिक तीन विभाग झाले आहेत.

द्वीपसमूह समुद्रसपाटीपासून ३०० फूट उंचीवर असून हिंवाळ्यात अतिशय थंडी असली तरी बार्ली, ओट वगैरे धान्यें पिकतात. या दृष्टीनें, बीगल खाडीच्या आसपासचा प्रदेश सुपीक आहे असें म्हणतां येईल. समूहाचा दक्षिण भाग उंचीवर असून पश्चिम भाग डोंगराळ आहे. सोलियर व फॅन्यानो या नावांचीं दोन सरोवरें या भागांत आहेत. फॅन्यानो सरोवराच्या दक्षिणेस 'कॉर्डिलेरा' पर्वतराजी पसरल्या असून त्यांवरील कांहीं शिखरें प्रसिद्ध आहेत. उपसागरांपैकीं येंडेगिया, लपशिया व उशिया हे तीन उपसागर प्रसिद्ध आहेत. समूहाच्या दक्षिण भागात, "हस्टे", "नाव्हारिन", "गॉर्डन", "लंडनडेरी" वगैरे बेटांचा समावेश होतो. त्याचप्रमाणें पश्चिम भागांत "डॉसन", "क्लॅरेन्स" बेटें, "डेसोलेशन लॅंड" नांवाचा बेटसंग्रह वगैरे समाविष्ट होतात. येथील, दक्षिण टोंकवर, क्लॅरेन्स बेटालगत असलेलें बेट महत्त्वाचें आहे. डॉसन बेटांत चिलियन सरकारची एक वसाहत आहे. द्वीपसमूहांत रानटी लोकांची वस्ती आहे. याची संख्या वर्षानुवर्ष कमी होत चालली आहे. रे. टॉमस ब्रिजेसच्या म्हणण्याप्रमाणें ५० वर्षांपूर्वी एकंदर लोकवस्ती सुमारें १०००० होती. २० व्या शतकारंभीं एकंदर १००० लोकसंख्या आढळून आली. मुख्य बेटांत "ओनस" नांवाचे रानटी लोक, दक्षिण भागांत "यागन" व पश्चिम भागांत "अलाकालूफ" नांवाचे रानटी लोक, रहिवाशी आहेत. "ओनस" लोकांची उपजीविका शिकारीवर असते. हे नेहेमीं फिरतीवर असतात. "यागन" ही एक क्रूर रानटी जात आहे. "अलाकालूफ" ही एक दगलबाज व क्रूर जात आहे. यांच्यासंबंधीं विशेष नमूद करण्यासारखें कांहीं नाहीं. टेराडेलफ्यूगोमध्यें एखादा मुलगा वयांत येऊन धीवराच्या अथवा पारध्याच्या धंद्यावर स्वकष्टार्जनानें आपलें बायकोचें पोट भरण्यास समर्थ होतांच तो एखाद्या मुलीच्या आप्तसंबंधीं लोकांच्या संमतीनें त्या मुलीच्या वडिलंचें कांहीं काम करून देतो. उदाहरणार्थ, नौका बांधण्यास त्यांनां मदत करणें, सील माशांचीं चामडीं कमावून तयार करणें, वगैरे. नंतर तो दुसरी एक होडी बांधून टेवितो, अगर कोणाची उपटून आणितो; आणि मग संधि साधून तींत आपल्या नवरीला बसवून तिजसह पळून जातो. जर त्याच्याबरोबर जाण्यास नवरी नाखूष असली, तर ती जंगलांत कोठेंतरी लपून बसते. मग तिच्यावर फिदा असलेला तरुण मनुष्य तिला अंतःकरणपूर्वक शोधून शोधून थकला, म्हणजे तिचा नाद सोडून देतो. परंतु असें फार क्वचित् घडून येतें (अलोनीकृत लग्नविधि व सोहाळे.). "फर्नांडो डी मागाल्हन" यानें प्रथम १५२० सालीं टेराडेलफ्यूगो द्वीपसमूहाचा शोध लावला. पूर्वी याला "लॅन्ड ऑफ फायर" असें म्हणत असत. द्वीपसमूहासंबंधीं उपलब्ध असलेली माहिती म्हणजे त्यानंतर बऱ्याच शोधकांनीं व प्रवाशांनीं केलेल्या एकंदर निरीक्षणाचें फळ आहे.

**टेलर, फिलिप मेडोज्** (१८०८-१८७६)—एक आंग्लोइंडियन कादंबरीकार हा लिव्हरपूलमध्यें जन्मला. वयाच्या पंधराव्या वर्षी, मुंबईच्या एका व्यापाऱ्याकडे कारकुनाची नोकरी धरण्यासाठीं तो विलायतेंतून इकडे आला. परंतु तेथें न जमल्यामुळें, टेलरनें निझामाच्या पदरीं लष्करी नोकरी धरली. त्याचें सर्व आयुष्य निझामाच्याच पदरीं गेलें. कांहीं दिवसांनीं त्याला लष्करी कामावरून काढून मुलकी व दिवाणी कामावर नेमिलें. त्यानें दक्षिणेंतील मुख्य भाषांचें व लोकांचें ज्ञान संपादिलें. कायदेशास्त्र, भूगर्भशास्त्र, हिंदुस्थानांतील प्राचीन कलाकौशल्य इत्यादिकांचा त्यानें अभ्यास केला. १८४० सालीं, त्यानें 'कन्फेशन्स् ऑफ ए ठग' (ठगाची जबानी) ही कादंबरी प्रसिद्ध केली. या कादंबरीनंतर 'टिप्पू सुलतान', 'तारा', 'राल्फ डार्नेल,' 'सीता' (१८७२), 'नोबल क्वीन' (चांदबिबी) इत्यादि कादंबऱ्या त्यानें प्रसिद्ध केल्या. या सर्व पुस्तकांतून त्यानें तत्कालीन लोकस्थितीचें वर्णन केलें आहे. हिंदुस्थानांतील प्राचीन संस्कृति आणि दंतकथा यांविषयींचा त्याचा आदर त्याच्या ग्रंथांतून चांगला दिसून येतो. स. १८४० ते १८५३ सालापर्यंत त्यानें टाईम्स पत्राचा बातमीदार म्हणून काम केलें. त्यानें एक हिंदुस्थानचा शालेय इतिहासहि लिहिला आहे. पुढें निझामनें शोरापूरच्या अज्ञान राजपुत्राच्या राज्याची व्यवस्था पाहण्याकरितां त्याची नेमणूक केली. पुष्कळ वर्षेंपर्यंत मेडोजनें हें काम उत्तम प्रकारें व सचोटीनें केलें. कर्नल टेलरच्या अंगचे गुण इंग्रज सरकारास—जरी तो ई. इं. कंपनीचा नोकर नव्हता तरी—चांगले कळून आले, आणि इंग्रज सरकारनें त्यास डेप्युटी कमिशनरच्या हुद्यावर नेमिलें. आपल्या दीर्घ प्रयत्नांमुळें टेलरनें ई. इं. कंपनीच्या मदतीशिवाय हिंदुस्थानांतील परिस्थितीचें यथार्थ ज्ञान संपादन केलें. पुढें १८६० सालीं, तो विलायतेस परत गेला

त्यास सी. एस्. आय. ची पदवी देऊन त्याचा गौरव करण्यांत आला. तो, ता. १३ मे १८७६ रोजीं मरण पावला.

**टेसिफॉन**—हें तैग्रिस नदीच्या डाव्या तीरावरील एक मोठें गांव आहे. इ. स. पूर्वी १२९ व्या वर्षी पार्थियन अर्सेसिदने युफ्रेटिसच्या पूर्वेकडील प्रदेश जिंकून टेसिफॉन येथें हिवाळयांत ठाणें दिलें होतें. पहिल्या अर्देशिरनें सस्सानियन साम्राज्य स्थापून ( २२६ ) टेसिफॉन हें राहण्याचें ठिकाण केलें. रोमन व इराणी साम्राज्यांच्या युद्धांत टेसिफॉनला बरेच वेळां वेढे वसून तें लुटलें गेलें. कादिशियाच्या युद्धानंतर टेसिफॉन व दुसरीं शहरें यांची अरबांनीं लूट केली. या वेळेपासून बसरा व बगदाद यांच्या उत्कर्षापुढें हीं शहरें फिकीं पडलीं. या शहराच्या जागेंत एका मोठ्या विटांच्या इमारतीचे अवशेष आहेत. याला ' तख्तीं खेसरा ' ( खुसरुचें तख्त ) असें म्हणतात. ही इमारत सस्सानियन शिल्पशास्त्राचा उत्कृष्ट नमुनाच आहे.

**टैन-शान पर्वत** ( अथवा स्वर्गीय पर्वत )—ह्या आशियांतील विस्तीर्ण पर्वताच्या ओळी असून पश्चिम बाजूस अरल-कास्पियन खोलगट प्रदेशाच्या पूर्व टोंकापासून (पू. रे. ६७° ) तों तहत पूर्व बाजूस वांग-होच्या वळणापर्यंत ( पू. रे. १०३°) पसरलेल्या आहेत. 'झुंगारियन-अलाताऊ,' 'अलाई' 'ट्रान्सअलाई ' वगैरे बऱ्याच वेगळाल्या पर्वतांचा या पर्वतांत समावेश केला जावा किंवा नाहीं यासंबंधीं मतभेद आहे. वर्णनाच्या सोयीकरितां (१) खान-टेंगरी व मध्यटैशान, ( २ ) पूर्व उत्तरभाग, ( ३ ) पश्चिम व दक्षिण भाग, असे तीन वेगळाले भाग करतां येतील. ( १ ) खान-टेंगरी व मध्य टैन-शानः—खान-टेंगरी शिखराची उंची २२८०० फूट आहे. हें शिखर मध्यटैनशानच्या जलविभाजक क्षेत्रांत असून याशिवाय येथें ३००० पासून३५००फूट उंचीचीं अशीं वरीच शिखरें आहेत.

खान-टेंगरी डोंगरसमूहालगतच पूर्व बाजूस खाळक-टाऊ नांवाचा डोंगरसमूह आहे व पश्चिमबाजूस " टेरेस्की-अलाताऊ ",'कोक्शल-ताऊ',' सरिजस ' या नांवाच्या तीन फांकलेल्या पर्वताच्या ओळी आहेत. 'टैरेस्की-अला-ताऊ'पर्वताच्या शिखरांची उंची १५००० पासून १८००० फुटांपर्यंत आहे. या ओळींत कांहीं घाटहि आहेत. कोक्शलताऊ पर्वतओळींत बऱ्याच वर्फवाहिनी नद्या आहेत. यांतील सर्वांत उंच शिखर उत्तर बाजूस आहे. 'सर्यजस' पर्वतओळींत ११००० फुटांहून जास्त उंचीचे दोन घाट (तेझ व अकवल )आहेत. ( २ ) पूर्व व उत्तर भागः—या भागाला "वरकल पर्वत" असें स्थानिक नांव आहे. मध्यभाग प्रायः वर्फाच्छादित असतो. या भागांतील शिखरें १४००० पासून १५००० फुटांपर्यंतच्या उंचीचीं आहेत. पूर्व बाजूकडील दोन घाटांशिवाय ( उंची ९६००—१०६०० फूट ) या भागांत घाट नाहींत. "वरकल" पर्वताच्या पश्चिम टोंकाकडे दोन प्रसिद्ध खळगीचे मुलूख ( ओटनकोझा व उर्मोची ) असून यांच्या मध्यें एक वर्फाच्छादित ओळ ( 'बोगडो ओला' ) आहे. ( ३ ) पश्चिम व दक्षिण भागः—या भागांत समान्तर रेषेंत पसरलेल्या दोन पर्वतांच्या ओळी ( ट्रान्सलीअलाताऊ व कंघेईअलाताऊ ) मुख्य असून यांशिवाय या भागांत अलेक्झांडर अलाई, ट्रान्स-अलाई, वगैरे अनेक पर्वतांचा समावेश होतो. " ट्रान्सली " पर्वतावरील एक शिखर ( माउन्ट टलघर ) हें १४९९० फूट उंचीवर आहे. या दोन पर्वतओळींत ( ट्रान्सअली व कंघेई ) घाट आहेत. त्यापैकीं "ट्रान्सअली" मधील ८ ते ११००० फूट उंचीचा घाट ( अलमटी ) व कंगेईमधील ९ ते १०८८५ फूट उंचीचा घाट ( करमेंटी ) हे दोन घाट प्रसिद्ध आहेत. अलेक्झांडर पर्वताची उंची फारच कमी म्हणजे २४६० फूट आहे. तरीपण पूर्वेकडे ती १४००० फुटांपर्यंत वाढत जाते; व यांतील एक शिखर ( माउन्ट सेमेनव्ह ) १५००० फूट उंचीचें आहे. पर्वतावर ६५५० पासून ११८२५ फूट उंचीवर असे कांहीं घाट आहेत. अलेक्झांडर पर्वताच्या मध्यभागापासून ( पूर्व रेखांश७४° ) नैर्ऋत्य दिशेकडे एक पर्वताचा फांटा पसरला आहे. यांस " टलसटाऊ " असें म्हणतात. " टलसटाऊ " साधारणतः १४००० पासून १५००० फूट उंच असून यावर वर्फाच्छादित शिखरें ( उंची १५७५० फूट ) व कांहीं घाट ( उंची— ८००० ते १६०५० फूट ) आहेत.

या भागांत ( पश्चिम व दक्षिण टैनशान ) समाविष्ट होणारे अलाइ व ट्रान्स-अलाई या दोन पर्वतराजी फेरगणा दरीच्या उत्तरेकडील सरहद्दीवर आहेत. या पर्वतराजींची उंची १६००० फुटांपासून १९००० फुटांपर्यंत आहे. बुखारा व पामीर पठार व काश्गर व फेरगणा या दोहोंमधील दळणवळण " अलाई " दरीच्या मार्गानें होतें. अलाई पर्वतओळीवर कांहीं घाट आहेत. त्यांपैकीं १४०१५ फूट उंचीचा कायझल-अर्टचा घाट प्रसिद्ध आहे. ट्रान्स-अलाई पर्वतावर एक शिखर ( काफमन ) असून उंची २३००० फूट आहे. या पर्वतावर घाट आहेत. घाट सरासरी१०००० ते १३१०० फूटउंचीवर असून जाण्यायेण्यास फार अवघड आहेत.

पर्वतांतील एकंदर मोठ्या वर्फवाहिन्या नद्या नमूद करण्यासारख्या आहेत. त्यांचीं नांवें:—( १ ) सेमेनोव्ह, ( २ ) मुस्केटोव्ह, ( ३ ) इनालचिक व ( ४ ) कायंडी. एकंदर पर्वताच्या दक्षिण भागापेक्षां उत्तरेकडील भाग जास्त सुपीक व अरण्यमय असा आहे; व उत्तर भागांत पाऊसहि जास्त पडतो. उत्तर भागांत ९५०० फूट उंचीपर्यंतचा प्रदेश माळरानाचा आहे. त्यापुढें ४३०० फुटांपर्यंतचा सुपीक व कृषियोग्य असा आहे. यापुढें पर्वतावर निरनिराळ्या प्रकारचीं झाडें व वनस्पती दृष्टीस पडतात. ११००० फुटांपासून मात्र पर्वत वहुतेक वर्फाच्छादित असतो. दक्षिण भागांत पाऊस कमी असल्यामुळें प्रदेश नापीक व रखरखीत आहे.

**टोंक,** संस्था न.—याचा कांहीं भाग राजपुतान्यांत व कांहीं भाग मध्यहिंदुस्थानांत असून त्यांत एकंदर ६ जिल्हे आहेत; पैकीं राजपुतान्याकडील भागांत तीन (१) टोंक,(२) अलिगड व (३) निम्बेहेर व मध्यहिंदुस्थानाकडील भागांत तीन, (१) छब्रा, (२) पिराव व (३) सिरोन्ज आहेत. हें संस्थान उत्तर अक्षांश २३° ५२' व २६° २९' आणि पूर्व रेखांश ७४° १३' ते ७७° ५७' यांच्या दरम्यान असून त्याचें क्षेत्रफळ २५५३ चौ. मै.; पैकीं राजपुतान्यांतील भागाचें क्षेत्रफळ १११४ चौ मै. व मध्यहिंदुस्थानांतील १४३९ चौ. मै. आहे. याची लोकसंख्या ( १९२१ )२८७८९८ आहे व संस्थानचें उत्पन्न २११०३४२ रु. आहे. टोंक व अलीगड हे जिल्हे सपाट असून, कोठें कोठें लहान लहान टेंकड्या आहेत. निंवहेरचा भाग मात्र डोंगराळ आहे. ईशान्येकडील कोंपऱ्यांत चितोडचे डोंगर आहेत. छब्रा जिल्ह्याचा उत्तर व मध्यभाग मात्र सपाट असून इतरत्र जंगल व डोंगर आहेत. पिराव व सिरोन्जचा प्रदेश उच्चनीच असून दोहोंचाहि दक्षिण भाग डोंगराळ व जंगली आहे. विंध्य पर्वताची एक ओळ सिरोन्जमध्यें उत्तर–दक्षिण अशी पसरलेली आहे. मुख्य नद्या बनास व पार्वती या असून बनासला माशी, सोहद, गंभीर व बेरव ह्या नद्या मिळतात. सिरोन्जमध्यें सिंध नांवाची एक लहानशी नदी आहे. निम्बेहेर जिल्ह्यांत चुनखडीचे डोंगर आहेत. टोंक व अलिगडची हवा शुष्क व आरोग्यदायक आहे. पावसाळ्यांत मात्र मलेरिया उत्पन्न होतो. एप्रिल–मेमध्यें उष्ण वारे वाहतात; पण रात्रीं थंडावा येतो माळव्यानजीकच्या जिल्ह्यांत हवामान ठीक आहे. पावसाची सरासरी २५ किंवा २६ इंच.

इतिहासः–येथील नवाब हा बुनर जातींतील पठाण अथवा अफगाण वंशाचा आहे. महंमदशहाच्या कारकीर्दीत कोणी तालेरखान नांवाचा पुरुष आपलें घरदार व बुनेर देश सोडून प्रसिद्ध रोहिला अलिमहमदखान ह्याच्याकडे नोकरीस येऊन राहिला.त्याचा पुत्र हैयातखान ह्यास मुरादाबादमध्यें कांहीं जमीनजुमला मिळाला. त्यास १७६८ सालीं ह्या संस्थानचा संस्थापक प्रख्यात पेंढारी अमीर अल्लीखान हा पुत्र झाला.कांहीं काळ भाडोत्री शिपायाचें काम केल्यानंतर, १७९८ साली तो यशवंतराव होळकराचा सेनापति बनला. ('अमीरखान' पहा).

जिंकलेला प्रदेश व लूट अर्धी अर्धी वांटून घ्यावयाची असें अमीरखानाचें व होळकराचें ठरलें होतें. त्याप्रमाणें अमीरखानास सिरोन्जचा जिल्हा मिळाला. नंतर त्यास १८०६ मध्यें टोंक व पिराव हे जिल्हे व १८०९ त निम्बेहेर आणि स.१८१६ त छब्रा हे जिल्हे मिळाले. इंग्रज जेव्हां माळव्यांत आले,तेव्हां त्यांची अमीरखानाशीं झटापट सुरू झाली.

होळकरानें खानास दिलेल्या वरील जहागिरी मिळून टोंक संस्थान बनलें होतें. तें इंग्रजांनीं त्याच्याकडे कायम करून, व त्याच्या मुलास पलवल प्रांत बक्षीस दिला. मात्र त्याची फौज बरीच कमी केली व त्याच्याशीं १८१७ सालीं तह केला. पुढें इंग्रजांनीं रामपुरा परगणा व किल्ला अमीरखानास दिला. नवाब महंमद अमीरखान बहादूर हा १८३४ सालीं मरण पावला व त्याचा पुत्र वझीर महंमदखान हा गादीवर आला. अमीरखानाचें चरित्र ज्ञानकोशाच्या सहाव्या भागांत पहावें.

महंमदखानानें १८५७ च्या बंडाच्या वेळीं बांदाचा नवाब व तात्या टोपी ह्यांनीं टोंक किल्ल्यावर केलेला हल्ला परतवून इंग्रजांना मदत केली ह्यावद्दल त्यास १७ तोफांची सलामी मिळाली व त्यास मुसुलमानी शास्त्राप्रमाणें पुत्र नसला तरी वंशाकडे गादी ठेवण्याची सनदहि मिळाली. पुढें तो मरण पावला. तदनंतर त्याचा पुत्र महंमूद अल्लीखान हा गादीवर आला. ह्यानें आपल्या संस्थानांत देवालयें बांधावयाची मनाई केली.तो लवकरच प्रजेच्या मनांतून उतरला त्यानें जहागीरदारांजवळून व शेतकऱ्यांजवळून बरेच पैसे उकळले. त्यामुळें त्याला १८६६ सालीं ब्रिटिश सरकारानें गादीवरून काढून टाकिलें व बनारस येथें नेऊन ठेविलें.

महमदखानानंतर त्याचा पुत्र गादीवर बसला. सांप्रत हाच नवाब असून त्याचें नांव हिज हायनेस अमीनुद्दौला वझीरुमुल्क सर हफीज महंमद इब्राहिम अलीखान बहादुर जी. सी. एस. आय; जी. सी. आय. ई. असें आहे, प्रथम दोन वर्षेंपर्यंत या संस्थानची व्यवस्था इंग्रज सरकाराकडे होती. हल्लीं चार मेंबरांच्या कौन्सिलच्या सल्ल्यानें राज्यकारभार चालतो.

संस्थानांत मोठीं गांवें ५ व खेडीं १२८९ आहेत. टोंक नांवाचें एकच शहर आहे. हिंदूंची संख्या शेंकडा ८२ आहे व मुसुलमानांची शेंकडा १५ आहे. बहुतेक मुसुलमान सुनीपंथाचे आहेत. भाषा राजपुताना परगण्यांत हिंदी, मेवाडी, उर्दू, व मध्य हिंदुस्थानांतील जिल्ह्यांत माळवी आहे. संस्थानची जमीन सुपीक असून पाण्याचीहि कुरकुर नाहीं. जमीनीचे पुढील तीन प्रकार आहेत. काळी, भुरी व पठार. निम्बेहेर व पिरावमध्यें उत्तम खसखसांच्या लागवडीची काळी जमीन आहे. सिरोन्जमधील जमीनहि चांगल्यापैकीं आहे. संस्थानांत विहिरी व तलाव बरेच आहेत.

छब्रा व सिरोन्जमध्यें साग व टेंभुरणीचीं झाडें आहेत; त्यांचें लांकूड इमारतीसाठीं वापरतात. पिरावमध्यें चंदनाचीं झाडें आहेत.अलीगड जिल्ह्यांत अमली येथें, निम्बेहेर जिल्ह्यांत डुन्गलेनजीक, व सिरोन्ज भागांत लटेन्हरी येथें लोखंडाच्या खाणी होत्या. पण हल्लीं त्या बंद करण्यांत आल्या. निम्बहेर येथें दगडी लाद्या उत्तम मिळतात. संस्थानांत चांगलें कापड तयार होतें. निम्बहेरमध्यें वापरावयाचीं भांडीं तयार होतात. कापूस वटण्याचे व गठ्ठे बांधण्याचे कारखाने आहेत. कापूस, अफू, चामडें, सुती कापड व धान्य हा माल संस्थानांतून निर्गत होतो आणि मीठ, साखर, तंबाखू व लोखंड हा माल आयात होतो. येथून जयपूर, इन्दूर, भोपाळ, झांशी या शहरांशीं व्यापार चालतो. राजपुताना माळवा रेल्वे निम्बहेर जिल्ह्यांतून जाते.

येथील राज्यव्यवस्थेत पोलिटिकल एजंटचा बराच हात असतो. प्रत्येक घराण्यावर एक नाझिम असून त्याच्या मदतीस दोन पेशकार असतात. टोंक व अलीगड जिल्हे हे सोडून नाझीमला दिवाणी अधिकार मुळींच नसतो. दोन हजारांपेक्षां जास्ती रकमेचे दावे टोंक येथें असलेल्या नाझिम दिवाणीच्या कोर्टांत चालतात. फौजदारी खटलेहि निकालासाठीं नाझिम व पेशकाराकडेच येतात. नाझिम फौजदारी नांवाचें मुख्य कोर्ट राजधानीच्या शहरीं आहे. नाझिम दिवाणी व नाझिम फौजदारीवर एक अपीलसुनावणीचें कोर्ट आहे त्याचा निवाडा मंत्रिमंडळ व नवाब करतात. नवाबास फांशीची शिक्षा सांगण्याचा अधिकार आहे.

येथें चालणाऱ्या नाण्यांस चनवरशाही ही संज्ञा आहे. टोंक येथें स. १८७३ पासून टांकसाळ आहे. संस्थानांत जहागीर, इस्तिमरारी, माफी व खालसा अशा चार तऱ्हेच्या जमीनी आहेत. बहुतेक जहागिरदारांचें राजघराण्यांशीं नातें आहे. खालसा जमीनींत रयतवारी पद्धत सुरू आहे माफी जमीनीवर प्रतिवर्षीं " सलान ' म्हणून कांहीं रक्कम सरकारांत भरावी लागते.

इस्तिमरारदारांनां कांहीं ठरलेली रक्कम द्यावी लागते व वर नजराणा द्यावा लागतो. संस्थानांत इंपिरियल सर्व्हिस ट्रूप्स ( दीड हजार सैन्य ) असून त्याचा खर्च १.४ लाख आहे. संस्थानांत शिक्षणसंस्था १५ असून शेंकडा २.३ लोकांस लिहितां वाचतां येतें; शिक्षणखात्याकडील खर्च सालीना ९००० रु. पर्यंत आहे.

जि ल्हा.—राजपुतान्याच्या पूर्वभागीं असलेल्या टोंक संस्थानामधील एक मोठा परगणा. क्षेत्रफळ ५७४ चौ. मै. वायव्येस लाव संस्थान असून इतर बाजूस जयपूरचें राज्य आहे. हा प्रदेश सपाट आहे. मुख्य नदी, बनास व तिच्या उपनद्या माशी व सोहद्र. बाराव्या शतकाच्या मध्यांत चव्हाण राजा सातुर्जी ह्याच्याकडे असलेल्या तोडी जिल्ह्यांत, टोंकचा समावेश होत असे अशी दंतकथा आहे अकबराच्या कारकीर्दीत जयपूरच्या मानसिंहानें हें घेतलें होतें. पण १६४२ सालीं कोणी रायसिंग शिसोदियानें तें परत मिळविलें. पुढें १६४३ सालीं भोला नांवाच्या एका ब्राह्मणास १२ ओसाड गांवांची जहागीर मिळाली व त्यानें पुरातन टोंक शहर वसविलें. नंतर १६९६ ते १७०७ पर्यंत हें हाडा रजपुतांकडे होतें व पुढें तें सवाई जयसिंगानें घेतलें. १८०४ सालीं तें ब्रिटिशांनीं घेऊन जयपूरच्या राजास दिलें;पण त्याच्या जवळून तें यशवंतराव होळकरानें घेतलें व १८०६ सालीं त्यानें तें अमीरखानास दिलें. येथील मुख्य पीक ज्वारी, गहूं, चणे, जवस, बाजरी व कापूस हें आहे. येथील जमीन सुपीक आहे. या जिल्ह्याचें उत्पन्न ३.७ लाख रुपये आहे. पैकीं २ लाख खालीचें व अंदाजे १ लाख करवसुलीचें आहे.

श ह र.—हें शहर राजपुतान्यांत बनास नदीच्या कांठीं दिल्लीच्या नैर्ऋत्येस १०५ कोसांवर असून टोंक जिल्ह्याचें मुख्य ठिकाण व टोंक संस्थानच्या राजधानीचें मुख्य शहर आहे. हें शहर भोला नांवाच्या ब्राह्मणानें १६४३ च्या सुमारास वसविलें. या शहराच्या दक्षिणेला भूमगड नांवाचा किल्ला आहे. १९११ सालीं येथील लोकसंख्या ३३८६४ होती. पैकीं १७९३८ मुसलमान व १४८९९ हिंदु होते. यांत १० शाळा आहेत. [ गोडबोले—संस्थानांचा इतिहास; इंपेरियल ग्याझेटियर, पु. २३; पिअर्स—सेटलमेंट रिपोर्ट, १८९३; टाइम्सईयर बुक, १९२५.]

**टोकिओ**—हें शहर जपानी साम्राज्याच्या राजधानीचें ठिकाण आहे. हें त्याच नांवाच्या आखातावर वसलें असून उत्तर अक्षांश ३५°४१' व पूर्व रेखांश १३९°४५' आहे. हें आगगाड्यांचें एक मोठें जंक्शन आहे. येथील हवामान समशीतोष्ण असून प्रकृतीला मानवेल असें आहे. या शहराचें क्षेत्रफळ ३० चौरस मैल आहे. येथें विद्युतशक्तीच्या योगें ट्रॅमगाड्या चालतात. येथें साम्राज्यपदार्थसंग्रहालय, पुस्तकालय व प्राणिसंग्रहालय हीं आहेत. याशिवाय येथें एक कृपादेवीचें देवालय असून याठिकाणीं सर्वदा मेळा भरलेला असतो. येथें एक लष्करी पदार्थसंग्रहालय असून त्यांत रशिया व चीन या देशांशीं केलेल्या युद्धांत जिंकलेल्या वस्तूंचा संग्रह केला आहे. या शहराच्या राजकीय सोईसाठीं १७ विभाग केले असून आसपासच्या खेड्यांचें ८ विभाग केले आहेत. हे सर्व विभाग एका गव्हर्नरच्या ताब्यांत असून खुद्द शहराच्या १७ विभागाकरितां एक म्युनिसिपल कमेटीची नेमणूक केली आहे. याशिवाय येथें एक विद्यापीठ असून त्यांत कायदा, वैद्यक, वाङ्मय, शास्त्रें, इंजिनियरिंग व कृषि वगैरेंचें शिक्षण देणारीं कॉलेजें यांचा समावेश होतो. येथें पुष्कळ कारखाने आहेत. याची लोकसंख्या १९२० च्या खानेसुमारीप्रमाणें २४७८२३३ आहे. हें शहर १२ व्या शतकाच्या अखेर अस्तित्वांत आलें. १४५७ सालीं हें टाडोकान नावाच्या सरदारानें घेतलें. १५९० सालीं हें आयेयासू यानें हस्तगत केलें. पुढें ३०० वर्षें तें याच्याच वंशजाच्या ताब्यांत राहिलें. या शहरास राजधानी केल्यावर याची बरीच भरभराट झाली. पण तिगस्ताच्या भूकंपानें हें शहर अगदीं वसल्यासारखें झालें. तारीख १ सप्टेंबर १९२३ रोजीं झालेल्या भूकंपानें टोकिओची लोकसंख्या बरीच कमी झाली. एकंदर प्राणहानि ५००००० इतकी झाली. उपर्युक्त भूकंपाच्या पूर्वी टोकिओची लोकसंख्या २४७८२३३ होती.

आधुनिक जपानचा विशेष म्हणजे टोकिओ नगर हा होय. त्याठिकाणीं सृष्टिसौंदर्य जरी बेताचेंच असलें तरी पूर्वकालीन वास्तुविद्येचे उत्कृष्ट अवशेष तेथें बरेच आढळतात. ९०० स्क्वेअर मैलांच्या मैदानांत, आधुनिक उद्योगधंदे व व्यापार यांचें केंद्र बनलेल्या या शहराची वस्ती झालेली आहे राजवाडा, मोठाले खंदक, चित्रविचित्र नौका ज्यांत संचार करतात असे मोठाले कालवे इतस्ततः

दृग्गोचर होणाऱ्या वृक्षराजि, लहान लहान टेंकड्यांच्या पायथ्याशीं असलेल्या उद्यानवाटिका, जनपदांची लहान व सुंदर गृहें आणि दूर अंतरावर असलेला व या राजधानीपासून दृष्टीस पडणारा फ्यूजि पर्वत इत्यादि गोष्टी टोकिओनगरीच्या सौन्दर्याचे विशेष होत. टोकिओ हा जपानचा आदर्श असून त्यांत जपानी मनोरचना व जपानी अंतःकरण प्रतिबिंबित झालें आहे. रेल्वे, टेलिग्राफ, ट्रॅम्वे, मोटारगाड्या, विद्युतयंत्रें वगैरे आधुनिक सुधारणेच्या अनेक गोष्टी त्या ठिकाणीं पाहावयास सांपडतात.लंडन व पॅरिसप्रमाणें गगनचुंबी इमारती, लांब,रुंद व सुंदर रस्ते, प्रशस्त उपवनें आणि शैक्षणिक संस्था तेथें बऱ्याच आहेत. जनसम्मर्दानें गजबजलेलीं अनेक देवालयें पाहून टोकिओपुरस्थांची धर्मश्रद्धा प्रगट होते.

परकीय प्रवाशाला तेथें एक विशेष गोष्ट आढळून येते; ती अशी कीं, सार्वजनिक इमारती, कारखाने इत्यादि बांधण्याच्या बाबतींत जरी जपानी लोकांनीं परस्थांचें अनुकरण केलेलें असलें तथापि त्यांनीं आपली मुळ वास्तुविद्या सोडलेली नाहीं. याचें प्रत्यंतर टोकिओंत आढळतें. सरकारी व सार्वजनिक इमारती जरी यूरोपियन थाटाच्या असल्या तरी या शहरांत लोकांचीं घरें, जुन्या वळणाचीं, लांकडी,कागदी व दोन तीन मजले असलेलीं अशींच आहेत. परकीयांचें अनेक बाबतींत बरेंच अनुकरण केलेलें असूनहि जपानी लोक हे खासगी गोष्टींत व एकंदर रीतिभातींत व अंतःकरणानें अस्सल जपानीच राहिले आहेत ही मुख्य गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. पोस्ट, टेलिफोन, टेलिग्राफ व सक्तीचें शिक्षण याकडे जपानी सरकारचें दुर्लक्ष आहे; आणि याचें इंगित असें आहे कीं, जपानला सर्व पैसा आरमार व लष्कर या खात्यांकडे खर्च करावयाचा आहे. लष्करी सामर्थ्याशिवाय जगांत आपली इभ्रत राहणार नाहीं हें जपान पूर्ण ओळखून आहे. [ ‘जपान’ पहा. ]

**टोगोलंड**—आफ्रिका. गीनीच्या आखातावरील एक माजी जर्मन वसाहत.ही १८८४ सालीं जर्मनीनें आपल्या ताब्यांत घेतली. हिच्या दक्षिणेस अटलांटिक महासागर, पश्चिमेस गोल्डकोस्टवरील ब्रिटिश मुलूख, उत्तरेस अपर सॅनिगाल व नायगरची फ्रेंच वसाहत, व पूर्वेस डहोमे, इत्यादि देश आहेत. टोगोलॅंडचा किनारा फक्त ३२ मैल लांबीचा आहे. वसाहतीचें क्षेत्रफळ सुमारें ३३७०० चौरस मैल असून लोकसंख्या अजमासें १०००००० आहे. १९०९ सालीं ३३० यूरोपीय लोक या ठिकाणीं होते, व त्यांपैकीं ३०० जर्मन होते. पण स १९१८ त फक्त ११० यूरोपियन असून जर्मन सारा एकच होता. किनाऱ्यावरील हवा फार उष्ण, त्याचप्रमाणें रोगकारकहि आहे. या ठिकाणीं मार्च ते जून व सप्टेंबर ते नोव्हेंबर असे दोन पर्जन्यकाल असतात.

येथील रहिवाशी निग्रो व निग्रॉइड वंशांचे आहेत. उत्तरेस हौसा राष्ट्रजात राहते. किनाऱ्यावर राहणारे लोक पोर्तुगीज रक्ताचे आहेत. बहुतेक सर्व बंदरांतून ब्राझील येथील निग्रो लोकांचे वंशज दृष्टीस पडतात. उत्तरेस तेथील राष्ट्रजातीचीं लहान लहान पण सुसंघटित राज्यें आहेत. किनाऱ्यावरील प्रदेशांतील लोक शेतकरी व व्यापारी आहेत. येथील जातींपैकीं कांहीं मुसुलमान, कांहीं मूर्तिपूजक, व थोडे ख्रिस्तोपासक आहेत. नैसर्गिक उत्पन्नाच्या बाबतींत हा देश फार समृद्ध आहे. ताडाचें तेल, रबर, कापूस, मका, भुईमुग, नीळ, एबनी वगैरे निर्यात व्यापाराचे मुख्य जिन्नस होत. चिनी मातीचीं भांडीं करणें, लोहारकाम व लांकडी खोदकाम करणें, इत्यादि धंदे एतद्देशीय लोक करतात. ते सुंदर शाली तयार करतात. निरनिराळ्या धातू, लोखंडी सामान व कापड ह्या आयात व्यापाराच्या मुख्य वस्तू होत.

जर्मन वसाहतीचा राज्यकारभार गव्हर्नर पाहत असे. त्याला सल्ला देण्याकरितां निमसरकारी पण सरकारनियुक्त सभासदांचें एक कौंसिल असे. किनाऱ्यावरील प्रत्येक शहरांतून सरकारनें शाळा घातल्या होत्या. मिशनऱ्यांच्या कांहीं शाळा आहेत. जर्मनीनें ही वसाहत आपल्याकडे घेण्याच्या अगोदर तेथील खाटणांत पोर्तुगीज वखारी होत्या लिटलपोपो व टोगो हीं लहान लहान स्वतंत्र राज्यांचीं राजधानीचीं शहरें होतीं. अद्यापपर्यंत टोगोच्या राजाच्या मुलुखावर कोणाच यूरोपीयन राष्ट्राचें लक्ष गेलें नव्हतें. जर्मन व्यापाऱ्यांच्या टोगो व ब्रिमेन येथें कांहीं वखारी होत्या. डॉ. गस्टाव्ह नॅटिगाल यानें टोगोच्या राजापासून त्याचा देश जर्मन आधिपत्याखालीं घेतला. १८९९ सालीं फ्रान्स व ग्रेटब्रिटनच्या सहकारितेनें सर्व बाजूंच्या सरहद्दी ठरविण्यांत आल्या.

अ र्वा ची न इ ति हा स.—जर्मनीच्या ताब्यामधील हें संरक्षित संस्थान १९१४ सालीं इंग्लंड व फ्रान्सच्या सैन्यांनीं जिंकून घेतलें व तद्दानंतर तें या दोन्हीं राष्ट्रांच्या ताब्यांत तहपरिषदेनें दिलें. १९१४ सालच्या पूर्वी कांहीं वर्षें जर्मनीनें या संस्थानांत आपलें वर्चस्व पूर्णपणें स्थापन करण्याचा प्रयत्न चालविला होता. तेथील शाळांतून, इंग्लिश भाषेला अजीबात फांटा देण्यांत येऊन त्याबद्दलीं जर्मन भाषा शिकविली जात होती. त्या संस्थानचा गव्हर्नर हर हॉर्न यानें अनेक युक्तीप्रयुक्तीनें तेथील रहिवाशांवर जर्मन सत्तेची छाप बसविण्याची खटपट आरंभिली होती. हॉर्न हा फार जुलमी असल्याकारणानें त्याच्या जागीं कौंट झेच याला गव्हर्नर नेमण्यांत आलें. यानें तेथील रहिवाशांशीं गोडीगुलाबीनें वागून आपलें वर्चस्व कायम ठेवण्याचा प्रयत्न केला. या नवीन गव्हर्नरनें आपल्या कारकीर्दींत व्यापाराला चांगलें उत्तेजन दिलें व रेल्वे वगैरेंसारखीं दळणवळणांचीं साधनें सुलभ नेलीं. १९१२ मध्यें जर्मनीनें ड्यूक अॅडॉल्फ फ्रेडरिक ऑफ मेक्लेनबर्ग याला या संस्थानचा गव्हर्नर नेमलें टोगोलंड व जर्मनी यांच्यामधील संबंध, अंतर्जल-केबल्सच्या द्वारां दृढतर करण्यांत आला होता. या गव्हर्नरनें राजीनामा दिल्याकारणानें त्याच्या जागीं मेजर

डोरिंग याची तात्पुरती नेमणूक करण्यांत आली. महायुद्धाला सुरवात होतांच डोरिंगनें डहोमी प्रांतावर स्वारी केली. पण ग्रेटब्रिटनचें सैन्य आपल्यावर चाल करून येण्यास सज्ज आहे असें पहातांच टोगोलेंड व त्याच्या आसपासच्या इंग्लिश व फ्रेंच वसाहतींनीं महायुद्धांत तटस्थ राहावें अशी सूचना त्यानें पुढें मांडली; पण ब्रिटिशांनीं ती फेंटाळून लावली. तेव्हां निदान टोगोलेंडमधील कामिना हें बिनतारी विद्युत्संदेशाचें ठिकाण तरी आपल्या ताब्यांत रहावें यासाठीं जर्मनांनीं ब्रिटिश सैन्याशीं टक्कर द्यावयाचें ठरविलें. पण शेवटीं टोगोलेंड ब्रिटिशांच्या ताब्यांत देऊन त्यांना तेथून पाय काढणें भाग पडलें. अशा रीतीनें दक्षिण टोगोलेंड दोस्तांच्या हातीं आलें. इकडे उत्तर टोगोलेंड हळू हळू फ्रेंच सैन्यानें जिंकून आपल्या ताब्यांत आणलें.

टोगोलेंड प्रांत जिंकून घेतल्यानंतर अर्थातच त्याची व्यवस्था लावण्याचें काम दोस्तांवर येऊन पडलें. इंग्लंडनें राज्यकारभाराच्या दृष्टीनें पश्चिम टोगोलेंडचा भाग घेतला व बाकीचा फ्रेंचांच्या ताब्यांत आला. १९१९ सालच्या सुप्रीम कौन्सिलनें टोगोलेंड संस्थान ब्रिटिश व फ्रेंच यांच्या ताब्यांत दिल्याचें जाहीर केलें. यानंतर टोगोलेंडची पुन्हां इंग्लंड व फ्रान्सनें आपापसांत वाटणी करून घेतली. लोमे प्रांत व समुद्रकांठचा प्रदेश फ्रान्सच्या ताब्यांत आला व इंग्लंडच्या ताब्यांत डगोंबाचा प्रदेश राहिला.

१९२० सालीं या संस्थानची लोकसंख्या साडेबारा लाख इतकी भरली. त्यापैकीं फ्रेंचांच्या मुलुखांत साडे आठ लाख लोक होते. टोगोलेंडमधील रेल्वे फ्रेंचांच्या ताब्यांत आल्या होत्या. त्यांची लांबी सुमारें १०१ मैल होती. या संस्थानांत तेल, ताड, कापूस, मका, कोकोमा, गुरेढोरें, रबर, सिसॉल इत्यादि जिनसाचा व्यापार चालतो. १९१९ सालीं टोगोलेंड संस्थानांतून ८८०००० पौंड किंमतीच्या मालाची निर्गत व ६८०००० पौंड किंमतीच्या मालाची आयात झाली.

१९२० च्या आगष्ट महिन्यांत फ्रेंचांनीं आपल्या ताब्यांतील मुलुखांतील राज्यव्यवस्थेसाठीं एक मंडळ नेमलें. त्यामध्यें तेथील रहिवाशांतर्फे ५ प्रतिनिधीहि घेण्यांत आला होता. ब्रिटिश व फ्रेंच अमलाखालीं हा प्रांत चांगला भरभराटीस आला.

[ संदर्भग्रंथः—टोगोलेंड, ए ब्रिटिश फॉरिन ऑफिस हँडबुक (१९२०):कॉरेस्पांडन्स रिलेटिंग टु दि मिलिटरी ऑपरेशन्स इन टोगोलेंड; ए. एफ. कॅल्व्हर्ट-टोगोलेंड (१९१८);].

**टोचीनदी**—वायव्य सरहद्दप्रांतांत ही एक नदी आहे हिचा उगम अफगाणिस्तानांत आहे. वझिरीस्तान व बन्नू जिल्ह्याच्या उत्तर भागांतून वहात जाऊन ही नदी पुढें कुर्रम नदीला मिळते. या जिल्ह्यांत पुष्कळशा जमीनीला या नदीचें पाणी पुरविलें जातें.

**टोन, थिओबाल्ड वूल्फ** (१७६३—१७९८)—एक आयरिश देशभक्त. हा डब्लिनमधील वूल्फटोन पिटरटोन नांवाच्या गाडीवाल्याचा मुलगा. हा ट्रिनिटि कॉलेजमध्यें असतांना त्यानें आपल्या अभ्यासाकडे फार थोडें लक्ष पुरविलें. त्याला लष्करी पेशाची फार आवड होती. पण मॅटिल्डा वुइदरिंग्टन नांवाच्या एका कुमारिकेच्या प्रेमपाशांत सांपडल्यामुळें त्यानें १७८६ सालीं कॉलेजचीच पदवी घेतली व वकीलीचा अभ्यास केला. १७८९ सालीं तो वकीलीची परीक्षा पास झाला त्यानें, साउथ सीजमध्यें एक नवीन लष्करी वसाहत स्थापण्यासंबंधींचा मसुदा तयार करून पिटकडे पाठविला. पण त्याकडे पिटनें लक्षच दिलें नाहीं; त्यामुळें चिडून जाऊन त्यानें आयरिश राजकारणाकडे आपलें लक्ष वळविलें. १७९० सालीं बकिंगहॅमच्या राज्यकारभारावर सणसणीत टीकात्मक लेख लिहिल्यामुळें तो व्हिग संघाच्या नजरेस आला. त्याचप्रमाणें १७९१ सालीं 'नार्दर्न व्हिग' या नांवाखालीं एक जहाल निबंध लिहिल्यामुळें तो प्रसिद्धीस आला.

या निबंधामध्यें प्रॉटेस्टंट व कॅथोलिक लोकांमधील ऐक्य होण्याची आवश्यकता त्यानें जोरानें पुढें मांडली. तसेंच ग्रेटब्रिटननें आपल्या प्रचंड उद्योगानें पार्लमेंटमध्यें जा सुधारणा घडवून आणली होती तींसंबंधानें या निबंधांत टोननें पूर्ण तिरस्कार व्यक्त केला होता.

आपल्या कल्पनांना मूर्त स्वरूप देण्यासाठीं त्यानें 'संयुक्त आयरिश राष्ट्रमंडळ, या नांवाची सभा, थॉमस रसेल, व नॅप्पटॅडी यांच्या सहाय्यानें स्थापन केली. या सभेचा मूळ उद्देश कॅथोलिक व प्रॉटेस्टंट लोकांमध्यें ऐक्य घडवून आणणें व कायदेशीर पद्धतीनें राज्यकारभारांत सुधारणा घडवून आणणें हा होता. पण या सौम्यदर्शीर मार्गांनीं देशाचें कल्याण साधणार नाहीं असें त्याला कळून आल्यानें त्यानें त्या मंडळांतील सभासदांच्या बहुमतानें, सशस्त्र दंडाच्या सहायानें स्वातंत्र्य मिळविण्याचें या मंडळानें धोरण निश्चित केलें. इंग्रजांविषयीं टोनच्या मनांत आत्याच द्वेष होता व त्याप्रमाणें तो स्वतः कबूल करीत असे. वर सांगितल्याप्रमाणें आयरिश संयुक्त राष्ट्रमंडळानें आपलें धोरण बदलल्यामुळें, त्यांतील लॉर्ड केनमेरच्या नेतृत्वाखालीं ६८ नेमस्त मतांचीं मंडळी फुटली व त्यामुळें संयुक्त आयरिश राष्ट्रमंडळाची सत्रें जहाल मंडळींच्या हातांत आलीं. या जहाल मंडळींतील अग्रणी डब्लिन येथील व्यापारी जॉन केओघ होता. १७९२ त रोमनकॅथोलिक कमिटीनें टोन हा प्रॉटेस्टंट असतांना सुद्धां त्याला आपल्या कमिटीचा चिटणीस निवडलें व त्यामुळें संयुक्त राष्ट्रीय मंडळामध्यें कॅथोलिक लोकांना सुद्धां अधिक उत्साहानें भाग घेतां येऊं लागला. फ्रान्समधील जॅकोबाईट लोकांच्या धर्ममतांचा संसर्ग लागूं नये या कारणास्तव आयरिश धर्मोपाध्यांना आयर्लंडमध्यें शिक्षण देण्यांत यावें अशा प्रकारचे यत्न बर्क व मेंटन यांनीं चालविले होते. टोननें देखील हीच कल्पना पण अगदीं उलट हेतूनें अंमलांत आणण्याची खटपट केली. आयर्लंड

मध्येंच या उपाध्यायांच्या शिक्षणाची सोय झाल्यास या उपाध्यायांना देखील आपल्या गोटामध्यें ओढून घेतां येईल हा त्याचा अंतस्थ हेतु होता. आयरिश पार्लमेंटमध्यें आपलीं मतें मान्य होणें शक्य नाहीं असें वाटल्यामुळें संयुक्त आयरिश राष्ट्रमंडळानें आपली सर्व भिस्त फ्रेंचांच्या मदतीवर ठेवली.

कर्मधर्मसंयोगानें सन १७९४ साली फ्रान्समध्यें बरीच वर्षे राहिलेला विल्यम जॅक्सन नांवाचा एक धर्मोपदेशक फ्रेंच राज्यमंडळाकडून आयरिश राष्ट्रमंडळाची वाटाघाट करण्यासाठीं आयर्लंडमध्यें आला. याला सर्व माहिती समजून देण्याच्या निमित्तानें टोननें एक मसुदा तयार केला. त्यांत आयर्लंडची हीन स्थिति कशी झाली आहे याचें वर्णन करून आयर्लंड हें बंडाला तयार आहे असें दाखविलें. याबद्दल टोनला शिक्षा झाली असती पण त्यानें इंग्रजी अधिकारीवर्गांतील आपल्या मित्रांचें वजन खर्च करून आपली सुटका करून घेतली व तो १७९५ मध्यें अमेरिकेला निघून गेला.

अमेरिकेमध्यें गेल्यावर रेनॉल्ड्स, रोमन, नॅपर, टँडी इत्यादि साथीदारांच्या सहाय्यानें त्यानें आपलें काम करण्यास पुन्हां सुरवात केली; पण परत पॅरिस येथें येऊन त्यानें आयर्लंडला स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं फ्रेंच अधिकाऱ्यांचीं मनें वळविण्यास सुरवात केली. डीला क्रॉइ व कार्नो हे त्याचा उत्साह व कार्यनिष्ठा पाहून फार प्रसन्न झाले. कार्नो यानें टोनला अडज्युटंट जनरलच्या कामावर नेमलें. फ्रेंच सैन्य आयर्लंडमध्यें उतरतांच आयर्लंडमध्यें लगेच बंड होईल व फ्रेंचांच्या साहाय्यानें आयर्लंड स्वतंत्र होईल असें त्यानें कार्नोला सांगितलें. फ्रेंच अधिकाऱ्यांनीं फिट्झिराल्ड व ओकोनार यांच्याशीं पत्रव्यवहारानें टोनच्या म्हणण्याची खात्री करून घेऊन हॉचच्या आधिपत्याखाली सैन्य पाठविण्याचें कबूल केलें. १७९६ सालच्या डिसेंबरच्या सोळाव्या तारखेस ब्रेस्ट येथून तीस जहाजें व १५००० सैन्य आयरिश लोकांना दारूगोळा व हत्यारें पुरविण्याकरितां निघालें. फ्रेंचांच्या आरमाराची अगोदरच असावी तशी व्यवस्था नव्हती व त्यांतच वादळ सुटल्यामुळें आरमाराची अत्यंत दुर्दशा झाली व त्यामुळें आरमाराला परत फ्रान्सला येणें भाग पडलें. तरी पण टोननें आपला धीर खचूं दिला नाहीं. फिरून तो डच आरमाराच्या मदतीनें आयर्लंडमध्यें स्वारी करण्याच्या बेतानें आला पण त्याच्या दुर्दैवानें याहि वेळीं प्रतिकूल वारा सुटून आरमाराची दुर्दशा झाली व त्यामुळें कँपरडौनच्या लढाईमध्यें आरमाराचा पूर्ण पराजय झाला व टोन हा पॅरिस येथें परत आला. याच वेळीं टोनची ज्याच्यावर भिस्त होती तो हॉच सेनापतीहि मरण पावला. अशा रीतीनें टोनच्या मागें दुर्दैव हात धुवून सारखें लागलें होतें. नेपोलियन बोनापार्टच्या टोननें पुष्कळ वेळां मुलाखती घेतल्या पण हॉचच्या इतका नेपोलियन हा आयर्लंडच्या बाबतींत उत्साही नव्हता. त्यामुळें १७९८ सालीं आयर्लंडमध्यें बंडाळी होण्याच्या वेळींच नेपोलियन हा ईजिप्तकडे निघून गेला. फ्रेंच अधिकाऱ्यांनींहि किरकोळ सैन्याच्या तुकड्यांशिवाय अधिक कुमक पाठविली नाहीं. हम्बर्ट नांवाच्या फ्रेंच सेनापतीनें आपल्या हजाराच्या तुकडीसह आयर्लंडच्या किनाऱ्यावर येऊन तेथील इंग्रजी सैन्याचा पराभव केला व तो पुढें चाल करून जाऊं लागला. पण लेक व कॉर्नवालीस यांनीं आपल्या २०००० सैन्याच्या योगानें त्याचा पराभव केला. या लढाईत टोनचा भाऊ पकडला जाऊन त्याला फांसावर चढविण्यांत आलें. दुसऱ्या तुकडीचा डोनेगलच्या बंदरामध्येंच पराभव झाला. याचवेळीं फ्रेंचांनींहि हार्डी नांवाच्या सेनापतीला ५००० सैन्यानिशीं टोनच्या मदतीला पाठविलें. पण लफखिली येथें मोठी लढाई होऊन फ्रेंचांचा पराभव झाला. टोन हा यावेळीं फ्रेंच सरदाराच्या पोषाखांत असल्यानें तो फ्रेंचांचा सरदार आहे असें समजून, त्याला पकडल्यानंतर सन्मानानें वागविण्यांत आलें. पण सर जॉर्ज हिल नांवाच्या एका आयरिश मित्रानें त्याला आयत्यावेळीं ओळखल्यामुळें त्याच्या पायांत बिड्या पडल्या. टोननें आपल्या खटल्याच्या वेळीं धैर्यानें व सडेतोडपणानें भाषण केलें. 'इंग्लंडशीं लढाई करून आयर्लंडला स्वतंत्र करण्याची मी उघड खटपट केली' असें त्यानें कोर्टांत सांगितलें. फ्रेंच सैन्यांतील सरदार अगर अधिकारी या नात्यानें फांशीची शिक्षा देण्याच्या ऐवजीं लष्करी मानाप्रमाणें आपल्याला तोफेच्या तोंडीं देण्यांत यावें यासाठीं त्यानें कोर्टाची विनवणी केली, पण ती मान्य न करतां फांशीची शिक्षा फर्मावली. पण आदले दिवशीं रात्रीं चाकूनें आपला गळा कापून त्यानें आत्महत्या केली. अशा रीतीनें या देशभक्ताचा १७९८ सालीं अंत झाला.

टोनच्या अंगीं जरी मोठेपणाचे विशेष गुण नव्हते तरी तो आपल्या उद्योगशीलतेनें व साहसानें प्रसिद्धीस आला असें लेकीनें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें लेकीनें असेंहि म्हटलें आहे कीं, मोठ्या माणसांच्या अंगीं देखील, फाजील वक्तृत्व, हलकें मन, मत्सरी स्वभाव, अविवेक, संकुचित बुद्धि इत्यादि जे दोष दिसून येतात त्यांपासून हा अलिप्त असून व्यापक दृष्टीचा, धैर्यशाली व करारी माणूस होता. आपल्या लहानपणीं जडलेलें मद्यपानव्यसन त्यानें आपल्या निश्चयानें नाहींसें केलें. स्वार्थत्याग व विवेक यांचा संवय त्यानें अंगीं बाणून घेतली होती; व यामुळें फ्रान्स व हॉलंडमध्यें देखील त्याचें फार वजन पडलें. त्यानें पॅरिसमध्यें असलेल्या राहणीच्या आपल्या डायरीमध्यें सुंदर हकीकत लिहून ठेवली होती व त्याच्या मुलानें त्याच्या मरणोत्तर ती प्रसिद्ध केली. त्यानें लिहिलेलें एक आत्म चित्रहि आहे.

**टोपल्या**—झाडांच्या डाहाळ्या, वांबू, वेत वगैरे पदार्थ, तसेंच तांबें, पितळ किंवा लोखंडाच्या तारा या पदार्थांच्या गुंफून तयार केलेल्या निरनिराळ्या आकाराच्या व विविध कामीं

लागणाऱ्या पात्रांस टोपल्या म्हणतात. त्यांचा उपयोग संसारोपयोगी जिन्नस सांठविण्याकरितां किंवा जिन्नस एका जागेवरून दुसरीकडे नेण्याकरितां केला जातो. जगांतील अगदीं जंगली व अशिक्षित अशा जातींपासून तों सुधारणेच्या शिखरास पोंचलेल्या लोकांपर्यंत सर्वांस टोपल्यांची जरूरी लागते. यामुळें जगांतील अतिप्राचीन कलांपैकीं ही एक कला आहे. कारण या कलेपासूनच कपडे विणण्याची कल्पना मनुष्यास सुचली असावी असें कांहीं लोकांचें म्हणणें आहे. चिनी मातीचीं भांडीं करण्याकरितां लागणारे सांचे सुद्धां टोपल्यांप्रमाणें झाडांच्या डाहाळयांनीच तयार करीत असत असा पुरावा आढळतो. उत्तर अमेरिकेंतील मूळचे इंडियन लोक एक जातीच्या मजबूत व पाणीहि गळून जाणार नाहीं अशा तऱ्हेच्या टोपल्या तयार करतात; व त्यांवर रंगी बेरंगी नाना प्रकारचें नक्षीकाम करतात; रेडइंडियन लोकांपैकीं पिढीजात श्रीमंत घराण्यांतील मंडळींजवळून अमेरिकेंतील कांहीं लक्षाधीश लोकांनीं जुने टोपल्यांचे नमुने नगापाठीमागें ३०० पौंडांपर्यंत किंमत देऊन विकत घेतले आहेत. लाखों रुपये किंमतीचा हा माल अमेरिकेंत दरवर्षी खपला जातो. ग्रीसमध्यें पुरातनकाळीं झाडांच्या डाहाळ्यांच्या ढाली करून त्या कातड्यानें मढवीत असत; व तीच तऱ्हा अद्याप कांहीं जंगली जातींत प्रचलित आहे. घराच्या आंतील भिंती किंवा कूड अद्याप कित्येक ठिकाणीं झाडांच्या फांद्या विणून तयार करतात. टोपल्या विणण्यास हस्तकौशल्याशिवाय दुसरी यंत्रसामुग्री लागत नाहीं. थोडीं हत्यारें पुरीं होतात. तीक्ष्ण धारेच्या कांहीं सुऱ्या, कोयते वगैरे साधें सामान लागतें.

टोपल्या वगैरेंचें विणकाम करण्यास लागणारे जिन्नस.—(१) बाभळीच्या डहाळयांपासून उपयोगासाठीं लागणाऱ्या टोपल्या होतात. (२) वांबूच्या पट्या यांपासून सर्व कामास लागणाऱ्या टोपल्या तयार होतात. हिमालयाच्या पायथ्याशीं पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत, वांबूच्या टोपल्या करण्याचा मुख्य धंदा आहे. आसाम आणि ब्रह्मदेशांतील शेतकऱ्यांच्या छत्रीसारख्या टोप्या व तसेंच शान लोकांच्या अतिशय कसबानें तयार केलेल्या टोप्या वांबूच्या असतात. बंगाल प्रांतांत मासे धरण्याचीं जाळीं आणि पक्ष्यांचे पिंजरे वांबूचेच करितात. (३) ताडाच्या झावळ्या, (४) नुरीचे फोंक. (५). वेताच्या फार मजबूत टोपल्या बहुतेक बंगालप्रांतांत तयार होतात. पुणें, रत्नागिरी, कर्नाटक, म्हैसुरांतील शिमोगा आणि कूर्गमध्यें निरनिराळ्या ठिकाणीं वेताचें सुबक काम होतें. (६) पिशोर, किल्लर किंवा हिपलेच झुडुपः—हें वायव्यहिमालयांत होतें. हें झुडुप फार उपयोगी असतें. याच्या फांद्या गठ्ठे बांधणें, मजबूत टोपल्या करणें आणि झुले करण्यासाठीं उपयोगी पडतात. (७) शिंदीचे झाडः—या झाडाच्या पानांच्या पट्या तयार करून मद्रासमध्यें खुट्यांच्या पेट्यांवर लावतात. या पानांना भुत्र किंवा खुशव म्हणतात व त्यांच्या टोपल्या, पंखे, दोऱ्या वगैरे जिनसा करितात. देठांच्या उत्तम छड्या, करंड्या व पाट्या होतात. पंजाब, रोहटक, कर्नूल आणि दिल्ली याठिकाणीं पानांचे पंखे बनवितात. मद्रास आणि मुंबई इलाख्यांत, पंजावांत, तसेंच सिंध, बलुचिस्तान व अफगाणिस्तान याठिकाणीं पानांच्या मधमाशांच्या पोळ्याच्या आकाराच्या टोपल्या करतात. बंगालच्या पूर्वभागांत पानांच्या चट्या विणतात. (८) मुंजगवतः—याच्या अनेक जाती आहेत. याची वेद किंवा वेत हीं सामान्य नांवें आहेत. याशिवाय याचीं दुसरीं नांवें म्हणजे बिन, बोस, बैश, भैंस, वगैरे होत. वजनदार जिनसा वाहून नेण्यासाठीं याच्या एक विशिष्ट प्रकारच्या टोपल्या करितात. तुरुंगांत व अनाथगृहांत याच्या टोपल्या व खुर्च्या बनवितात. याच्या फोकांच्या कुडाच्या भिंती, वांध व छपरें करितात. फोंक सोलून, सालीचा दोऱ्याप्रमाणें उपयोग करितात व सोललेले फोंक जाळून त्याचा कोळसा करितात. या कोळशांत कांहीं विशेष औषधी गुण असतो असा समज आहे. (९) कपाशीच्या पराटीच्याहि टोपल्या, कूड वगैरे करतात.

**टोबेगो**—हें ब्रिटिश वेस्ट इंडीजमधील बेट ट्रिनिदादच्या ईशान्येस २० मैलांवर आहे. हें उ. अ. ११° १५' ते पू. रे. ६०° ४०' यांवर असून याची लोकसंख्या सुमारें १८ हजार आहे. हें बेट २६ मै. लांब व ७॥ मै. रुंद असून ह्याचें क्षेत्रफळ ११४ चौ. मैल आहे. यांत एकच पर्वत असून त्याची उत्पत्ति ज्वालामुखीपासून असावी. येथील जमीन सुपीक असून तींत रबर, कापूस, साखर, काफी, कोको, तंबाखू व जायफळ इत्यादि जिन्नस होतात. शाळांना सरकारी मदत मिळते. स्कारबरो राजधानी आहे. कोलंबसानें टोबेगो (मूळचें टोबेको) १४९८ सालीं शोधून काढिलें व त्याला असम्पशन हें नांव दिलें. १५८० सालीं हें ब्रिटिशांच्या ताब्यांत आलें. नंतर डच व फ्रेंच लोकांच्या हातीं जाऊन १८१४ सालीं हें पुन्हां ब्रिटिशांस मिळालें. सध्यां हें ट्रिनिदाद बेटांच्या ताब्यांत असून, तेथें त्याच बेटाचा कायदा चालतो.

**टोमाटो**—हें एक भाजीचें लहान झुडुप आहे. यास लॅटिनमध्यें लायकोपर्सिकम एस्कु लॅंटम, इंग्रजींत टोमाटो, मराठींत वेलवांगें किंवा टोमाटो अशीं नांवें आहेत. त्याचीं फळें हिरवेपणीं वांग्यासारखीं असतात व झाड वेलासारखें पसरतें म्हणून त्यास 'वेलवांगें' हें नांव पडलें आहे. यूरोपांत टोमाटोच्या झाडाच्या वाढीवरून, फळाच्या आकारावरून व रंगावरून अनेक जाती झालेल्या आहेत. महाराष्ट्रांत यूरोपियन लोक आपल्या बंगल्याच्या आवारांत आपल्या आवडीप्रमाणें निरनिराळ्या टोमाटोच्या जाती लावितात.

जा ती.—टोमाटोच्या पुष्कळच जाती आहेत. त्यांत कांहीं लवकर येणाऱ्या तर कांहीं उशीरा येणाऱ्या आहेत. त्याचप्रमाणें या जातींच्या रंगांतहि फरक दिसून येतो. तांबडा, गडदतांबडा, पिंवळा, तांबडापिंवळा व हिरवा या तिन्हीं

रंगांच्या छटा असलेला; याप्रमाणें वेगवेगळ्या रंगांच्या टोमाटोच्या जाती आहेत; तसेंच यांच्या आकारामध्येंहि बरेच फरक दिसून येतात. कांहींचीं फळें चपटीं तर कांहींचीं वाटोळीं, लांबट, पेरूच्या आकाराचीं, चेंडूच्या आकाराचीं, बोराच्या आकाराचीं अशीं असतात.

टोमाटोचे मुख्य दोन वर्ग करतात. एक लवकर तयार होणाऱ्या जातीचा व दुसरा उशीरा तयार होणाऱ्या जातीचा. यामध्येंहि त्यांच्या निरनिराळ्या प्रकारच्या उपयोगाप्रमाणें पुढील पोटवर्ग करतातः—(१) चालू बाजाराकरितां उपयोगी. (२) फळसंरक्षणाकरितां उपयोगी (फळें जशींच्यातशीं डब्यांत भरून बंद करून पाठविण्याकरितां). (३) फळें न बिघडतां लांब अंतरावर पाठविण्यास उपयोगी. (४) लोणचीं, मुरंबे ज्यांस इंग्रजीमध्यें सॅलड, प्रिझर्व्स वगैरे म्हणतात त्यांस उपयोगी.

सध्यां लागवडींत असलेल्या व आपल्याकडील बीबियाणें विकणाऱ्या कंपन्या ज्या जातींचें बीं विक्रीकरितां ठेवितात, अशा कांहीं जाती म्हणजेः—(१) ट्रॉफी, (२) पॉंडिरोसा, (३) मिक्याडो, (४) किंग हरबर्ट, (५) पीच, (६) अपटुडेट, (७) गोल्डन–सन्–राईझ, (८) पिअर शेप्ड यलो, (९) मॉनर्क, (१०) रेडचेरी, (११) अर्लीयाना, (१२) इंपीरिअल, (१३) स्टोन, (१४) ड्वार्फ स्टोन, (१५) ड्वार्फ चांपिअन, (१६) ड्वार्फ अरिस्टोक्रॅट, (१७) बोनी बेस्ट, (१८) लिव्हिंगस्टन्स ग्लोब, (१९) सॅनजोस कॅनर व (२०) मॉरसिस सॅन जोस कॅनर या होत. या जातींपैकीं कांहीं लवकर व कांहीं उशीरा तयार होणाऱ्या आहेत (महाराष्ट्र कृषीवल, नोव्हेंबर व डिसेंबर, १९२४.).

बाजारांत पाठविण्याकरितां मळेवाले लोक २।३ जातींचेच टोमाटो लावितात. विलायती बियापेक्षां आपल्याकडे विलायती बियापासून वाढलेल्या झाडांच्या फळांचें बीं धरून त्यापासून जीं झाडें होतात त्यांस जास्त फळें येतात व तीं चांगलीं व मोठालींहि होतात; म्हणून विलायतीपेक्षां गांवठी बीच पुष्कळ वापरण्यांत येतें.

टोमाटोचें बीं वांग्याच्या बियाप्रमाणें वाफ्यांत पेरून वांग्यासारखें रोप करितात. वांग्याच्या बियापेक्षां टोमाटोचें बीं लवकर उगवून (६।७ दिवसांत) रोप सुमारें वीतभर उंच वाढलें म्हणजे ४।६ फुटांच्या अंतरानें लावणी करितात. रोप सरीच्या वाफ्यांत लाविल्यानें वाफ्यास दिलेलें पाणी फळास लागत नाहीं. फळाची साल पातळ असल्यामुळें तें ओल्या जमिनीस टेकल्या ठिकाणीं कुजतें व उन्हाचा चटका लागल्यास करपतें. टोमाटोचें झाड उत्तम रीतीनें वाढवून चांगलीं फळें येणें असल्यास प्रत्येक झाडाजवळ काठी रोंवून तीस झाड बांधणें अवश्य आहे. पुण्याच्या आसपास टोमाटो पुष्कळ करितात. पण काठीची मेहनत कोणी घेत नाहीं व म्हणून यूरोपांतल्याप्रमाणें इकडे फळें पाहण्यांत येत नाहींत. टोमाटो तिन्ही काळांत होतात. पैकीं पावसाळ्यांत व हिंवाळ्यांत चांगलीं होतात उन्हाळ्यांतहि फळें पुष्कळ येतात परंतु चैत्र वैशाखाच्या उन्हानें फळांची उन्हाकडील बाजू करपून जाते. तशांत वळीव पाऊस जर पडला तर फळें शिजल्यासारखीं होऊन नासून जातात व कधीं कधीं फार नुकसान होतें. पावसाळ्यांत आणि थंडींत पुष्कळ फळें विकावयास येतात. म्हणून कधीं कधीं हाराभर टोमाटोचे ४।८ आणेच येतात. तेवढ्याच टोमाटोचे उन्हाळ्यांत दोन चार रुपयेहि होतात.

यूरोपियन व मुसुलमान वगैरे मांसाहारी लोक टोमाटोचा मांसाच्या भाजींत उपयोग करितात अथवा सालीट व कांदे घालून कोशिंबिरीसारखा उपयोग करितात, अथवा स्वादिष्ट चटणीहि करितात. हिंदु लोकीहि तशाच प्रकारचे पदार्थ करावयास लागले आहेत. हिरव्या टोमाटोचें 'डाळवांगें' फारच रुचकर होतें. टोमाटोच्या अंगीं जातीचाच आंबटपणा असल्यामुळें पदार्थांत चिंच अगर अमसुलें घालण्याची जरूर नाहीं. पण गूळ मात्र जास्त लागतो. टोमाटो ब्राह्मणांत निषिद्ध मानले जात असत परंतु बटाट्याप्रमाणें त्यांचाहि दोष अलीकडे कमी मानला जात आहे. टोमाटोनें खरूज येत असा पुष्कळ लोकांचा समज आहे. पण त्यानें रक्तशुद्धि होते असें अलीकडे ऐकण्यांत येतें.

टोमाटो हें एक आरोग्यदृष्ट्या अत्यंत महत्त्वाचें व उपयुक्त फळ आहे. सर वाल्टर रॅले यास हें फळ रोलको नांवाच्या बेटांत सांपडलें व तेथून त्यानें त्याची लागवड करण्यासाठीं तें यूरोपमध्यें नेलें असें इतिहासावरून दिसून येतें.

प्रथमतः टोमाटोची एक शोभिवंत फळ म्हणून लागवड करण्यांत येत असे. फक्त गेल्या सत्तर–पाऊणशें वर्षांतच टोमाटोचा खाण्यासाठीं लोक उपयोग करूं लागले आहेत. पाश्चिमात्य देशांतून टोमाटोला कांहीं वर्षांपूर्वी–म्हणजे जेव्हां तें एक शोभिवंत फळ म्हणून समजण्यांत येत असे त्यावेळीं–इंग्रजींत लव्ह ॲपल असें म्हणत. अगदीं प्रथमतः टोमाटोचा खाण्यासाठीं उपयोग करूं लागले त्यावेळीं, टोमाटोपासून गुल्म नांवाचा रोग होतो अशी पुष्कळांची भ्रामक समजूत होती. व त्यामुळें पुष्कळ लोक, इच्छा असतांहि, टोमाटो खाण्यास भीत असत. ही समजूत अगदींच निराधार होती व टोमाटो खाल्ल्यानें गुल्म होत नाहीं असें आतां शास्त्रीय शोधावरून पूर्णपणें सिद्ध झालें आहे. हळूहळू टोमाटोसंबंधीं लोकांच्या या निराधार कल्पना नाहींशा होऊन टोमाटोचा पुष्कळ लोक घरोघरीं खाण्यासाठीं उपयोग करूं लागले. मागणीच्या मानानें टोमाटोची मोठ्या प्रमाणांत वाढ होऊं लागली व हल्लीं अमेरिका, मेक्सीको, इटली व इतर देशांतून फळ भाज्यांपैकीं बटाट्याच्या खालोखाल टोमाटोचा खप होत असून टोमाटोची शास्त्रशुद्ध लागवड व संवर्धनहि मोठ्या प्रमाणांत होत आहे.

**टोरांटो**—कानडामधील ओन्टारियो प्रांतांतील प्रमुख शहर. याची लोकसंख्या १९२१ सालीं ६ लक्ष होती. या शहराच्या आसपास चोंहोंकडे मोठमोठे कारखाने

आहेत. खुद्द टोरॉंटो शहरांतच १९२१ सालीं १४०० कारखाने होते, व त्यांत जवळ जवळ ८५००० मजूर काम करीत होते. याच सालीं या शहरीं १४ बँका होत्या.

१९११ सालानंतर या शहरामध्यें पुष्कळच भव्य व सुंदर इमारती बांधण्यांत आल्या. त्यापैकीं ३००० लोकांची सोय होईल एवढें मोठें 'सेंट पॉल्स ॲंग्लिकन चर्च,' 'दि टिमॉथी ईटन मेमोरियल चर्च', 'रायल बँक ऑफ कॅनडा' ची वीस मजली इमारत, कानडा पॅसिफिक रेल्वेची जंगी इमारत व टोरॉंटो विश्वविद्यालयाच्या मोठमोठ्या इमारती व यूनियन स्टेशनची इमारत या प्रमुख होत. टोरॉंटोमधील विजेच्या साहाय्यानें पाणी पुरवण्याची पद्धत, सर्व अमेरिकेंत नमुनेदार म्हणून नांवाजलेली आहे. १९२१ सालीं टोरॉंटो सरकारनें खासगी कंपन्यांकडून आपल्याकडे टोरॉंटो मधील रेल्वेचा ताबा घेतला. १९१९ सालीं टोरॉंटो येथें एक मोठें प्रदर्शन भरवण्यांत आलें; त्याला १२ लक्ष लोकांनीं भेट दिली असें म्हणतात. याशिवाय टोरॉंटोमध्यें नवीन बंदरें बांधण्याचें काम चालू आहे. १९१७ मध्यें टोरॉंटो विश्वविद्यालयाला संगीत व स्थापत्य या शास्त्रांच्या शाखा जोडण्यांत आल्या. त्या सालीं टोरॉंटो येथील विश्वविद्यालयांत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या ५००० हून अधिक होती.

गोरे लोक येण्यापूर्वीं हें शहर इंडियन जातींचें केंद्रस्थान होतें व या शहराचें नांवहि 'जमण्याची जागा' या अर्थाच्या इंडियन नांवावरून पडलें आहे. १७४९ सालीं फ्रेंच लोकांनीं येथें एक किल्ला बांधून व्यापारास सुरुवात केली. नंतर ब्रिटिश व्यापाऱ्यांशीं स्पर्धा सुरू झाली. १७९४त याला यॉर्क असें नांव देऊन उत्तर कानडाची राजधानी करण्यांत आली. १९ व्या शतकाच्या आरंभीं इंग्लिश फ्रेंचांचा तह झाल्यानंतर या शहराची भरभराट होऊं लागली. पुढें याला स्थानिक स्वराज्याचे हक्क मिळून टोरॉंटो हें नांव पुन्हां वापरण्यांत येऊं लागलें.

**टोरी फत्तेपूर**—मध्य हिंदुस्थानांत, बुंदेलखंड एजन्सीच्या अधिकाराखालीं असलेलें हें एक लहानसें सनदी संस्थान आहे. क्षेत्रफळ ३६ चौरस मैल. यांत ११ गांवें आहेत. लोकसंख्या ( १९११ ) ६१७१. बुंदेलखंडचा दिवाण रायसिंग यानें ही जहागीर, दिवाण हिंदूसिंग नांवाच्या आपल्या मुलास दिली. १८२३ सालीं इंग्रज सरकारनें दिवाण हरप्रसाद याला या जहागिरीची सनद दिली. या जहागिरींत १२ खेडीं आहेत. वहीत जमीन १९ चौरस मैल आहे. खाऱ्याचें उत्पन्न २४,००० रुपये. टोरी फत्तेपूर हें गांव या जहागिरीचें मुख्य ठिकाण आहे.

**टोलेडो**, प्रांत.—स्पेन. मध्य स्पेनचा एक प्रांत. याच्या पूर्वेस क्युएन्का, उत्तरेस ॲव्हिला आणि मॅड्रिड, दक्षिणेस क्युएरिअल आणि पश्चिमेस कॅसेरस आहे. याचें क्षेत्रफळ ५९१९ चौरस मैल व लोकसंख्या १९१७ सालीं ४४२१६२ होती. या प्रांतांतील जमीन उंचवटयाची असून बहुतेक भागांत पर्वत आहेत. हे पर्वत फार उंचीचे नसून १९ व्या शतकापर्यंत यांच्यावर दाट जंगलें होतीं. ह्या प्रांताला, टेगस आणि तिला मिळणाऱ्या नद्यांमुळें, पाण्याचा पुरवठा चांगला आहे. या प्रांतांतून तीन आगगाडीचे रस्ते गेले आहेत. शेतींत तयार होणारे जिन्नस फार थोडे बाहेर जातात. येथें रेशमी व लोकरीचा कपडा, मातीचीं भांडीं, साबण, तेल, दारू, चाकोलेट इत्यादि जिनसा तयार होतात.

शहर.—स्पेन. ही पूर्वीं स्पेनची राजधानी होती. हल्लीं फक्त टोलेडो प्रांताचीच राजधानी आहे. हें मॅड्रिडपासून ४७ मैल आहे. लोकसंख्या १९०० सालीं २३३१७ होती. हें शहर टेकडीवर असून उत्तरखेरीज याच्या सर्व बाजूला टेगस नदी आहे हें शहर गॉथिक धर्तीवर वसलेलें आहे. येथें टेगस नदावर दोन पूल बांधलेले आहेत. कारागिरांच्या दृष्टीनें पाहिलें असतां येथील प्रार्थनामंदिरें फार महत्त्वाचीं आहेत; व विशेषतः गॉथिक प्रार्थनामंदिर अतिशय भव्य आहे. टोलेडो येथें १४९८ पासून १८४५ पर्यंत विश्वविद्यालय होतें. हल्लींहि हें शहर विद्येचें केंद्रस्थान म्हणून प्रसिद्ध आहे. मुख्य धंदा तरवारी तयार करण्याचा आहे. हें शहर तरवारींच्या पात्यांकरितां प्रसिद्ध आहे.

स्पेनमध्यें ज्या दंतकथा आहेत त्यांवरून हें शहर हरक्युलस्, टयुबल अथवा ज्यू लोक यांनीं स्थापिलेलें असावें. रोमन सत्तेखालीं हें करापेटानियाची राजधानी झालें. ख्रिस्ती धर्म स्पेनमध्यें सुरू झाल्यापासून या शहरास धार्मिकदृष्टया महत्त्व प्राप्त झालें. आथेनागील्डच्या कारकीर्दीपासून ( ४३४–५४७ ) मूरलोकांच्या विजयापर्यंत ( ७१२ ) हें शहर व्हिसिगॉथिक स्पेनची राजधानी होतें. मूर लोकांच्या कारकीर्दींत याला टोलेटोला असें म्हणत असत व तेव्हां अमीराच्या सत्तेखालीं असलेल्या प्रांताची राजधानी म्हणून व पुढें स्वतंत्र संस्थान म्हणून हें फार भरभराटीस आलें. १०८५ सालीं लिऑं आणि क्यास्टाईलच्या सहाव्या आलफॉन्सोनें टोलेडो काबीज केलें. १४९२ सालीं ज्यू लोकांना हांकून लावण्यांत आलें व १५८० सालीं अरब भाषेस येथें बंदी करण्यांत आली. १५६० सालीं दुसऱ्या फिलिपनें मॅड्रिड शहरीं राजधानी नेली. तेव्हांपासून या शहरचें व्यापारी व राजकीय महत्त्व कमी झालें.

**टोलेडो**—अमेरिका, ओहिओ संस्थानांत हें शहर व बंदर मॉमी नदीच्या दोन्ही तीरांवर वसलेलें आहे. लोकसंख्या ( १९१७ ) २०२१०. लोकसंख्येपैकीं सुमारें २००० नीग्रो सोडून बाकीचे यूरोपियन आहेत. या ठिकाणीं रेल्वेचे फांटे १० वर आहेत येर सरोवरांतून जहाजें शहरांत येण्याकरितां एक कालवा आहे. शहरांतील बागांत ओटावापार्क,

पेव्हूपार्क, सेंट्रल ग्रोव्हपार्क असे बगीचे आहेत. शहरांतील मुख्य इमारती म्हटल्या म्हणजे काउंटीकोर्ट, वाचनालय, टोलेडोचें संग्रहालय, वैद्यकशाळा वगैरे होत. येथून लोखंड, तांबें, लांकूड, पेट्रोलियम, कोळसा, फळें, दागा ह्या वस्तू बाहेर पाठविण्यांत येतात. मुलांच्या गाड्या, बायसिकली वगैरे वस्तू येथें तयार होतात. १८३७ सालीं याला शहराचे हक्क प्रथमतः मिळाले.

**टोवला**—उडिया संस्थानांतील अनार्य लोकांची ही एक जात आहे. यांची संख्या२००० होती पण आतां यांपैकी लोक या प्रांतांत कोणी नाहींत. ज्या लोकांचें अन्न हे खातात त्या लोकांनीं यांच्या बायकांबरोबर व्यभिचार केला तर चालतो चास लोकांस तर हे आपले नातेवाईक समजतात, कारण पूर्वी चास लोकांच्या शेतांत हे नौकरी करीत व यांच्या बायका चासांच्या उपयोगीं पडत व त्यांच्यापासून संततिहि करून घेत. बायकोनें आपल्या बांगड्या नवऱ्यास परत दिल्या व पंचायतीसमोर जाऊन नवऱ्याचें नांव मोठ्यानें उच्चारलें म्हणजे काडी मोडली. हे अंगूल जिल्ह्यांतील कालपाट देवाची पूजा करतात. हे नागाची पूजा करतात, पुनर्जन्म मानतात, प्रेतास पुरतात किंवा दहन करतात. हे शेतावर मजुरीचें काम करतात. [ रसेल व हिरालाल. ]

**टोशाम**—पंजाब. हिस्सार जिल्ह्यांतील भवानी तहशिलींत हें एक खेडेगांव आहे. या खेड्यालगतच ८०० फूट उंचीची एक टेंकडी आहे. या टेंकडीवर एक तलाव असून येथें दरवर्षी जत्रा भरते. दुसऱ्या एका टेंकडीवर एक बारद्वारी आहे, तिला पृथ्वीराजाची कचेरी असें म्हणतात.

**टोळ**—टोळ ही एक समुदाय करून राहणारी कीटकांची जात असून ती जगांत सर्वत्र असलेली आढळून येते. त्यांची संख्या अत्यंत वेगानें वाढत असल्यामुळें सगळ्या देशाच्या पिकाचें नुकसान हे कीटक सहज करूं शकतात. यूरोपांत आढळून येणाऱ्या या प्राण्यांच्या उपजाती लहान असून कित्येक टोळ बरेच मोठेहि असतात. वनस्पति हेंच त्यांचें मुख्य भक्ष्य होय. वसंत व ग्रीष्म ऋतूंत हे टोळ, अंडीं फोडून बाहेर येण्यापूर्वीच्या स्थितींत असतात व त्यावेळीं त्यांना पंख नसतात. परंतु उन्हाळा संपतांना ते कीटकावस्थेस पोहोंचतात. टोळांसारखे कांहीं इतर कीटक ( ऑर्थोपटेरा ) असून, ध्वनि उत्पन्न करण्याची त्यांना शक्ति असते. टोळधाड हवेंतून संचार करूं लागली कीं मोठा कर्कश आवाज होतो. टोळांच्या सर्व उपजातींपैकीं, देशांतर करणारी जातच मनुष्यास फार घातक असते. त्यांची निपज फार जलद होत असल्यानें, वाढत्या संख्येच्या बळावर, टोळ पिकांच्या पिकें उध्वस्त करतात, व नंतर दुसऱ्या मुलुखांत प्रवेश करितात. त्यावेळीं त्यांच्या प्रचंड संख्येमुळें आकाश अगदीं आच्छादित होतें व त्यांच्या संचारांतील टापू अगदीं उजाड पडतो. यूरोप, आशिया, ईजिप्त व सीरिया या ठिकाणीं टोळधाड पाळीनें जाते. टोळांचीं अंडीं व पूर्ण वाढ झालेले टोळ यांचा शास्त्रीयदृष्ट्या शोध लावणारांस यूरोपांत बक्षिसेंहि ठेवण्यांत आलीं होतीं. दक्षिण आफ्रिकेंत टोळांची एक सुंदर जात आहे, पण ती कित्येक ऋतूंत फारच विघातक असते. कित्येक देशांतील लोक टोळ खातात असें ऐकण्यांत येतें.

**टौंगी**—ब्रह्मदेश. दक्षिण शान संस्थानांचे सुपरिंटेंडेंट व इतर अधिकारी यांचें हें मुख्य ठिकाण आहे. या गांवाच्या उत्तरेकडील देखावा फार सुरेख असून बाकीच्या तीन्ही बाजूंनीं टेंकड्या आहेत. यांतील सार्वजनिक इमारती म्हणजे रेसिडेन्सी, दरबार हॉल, मामुली सरकारी कचेऱ्या, आणि सरदार लोकांच्या मुलांकरितां शाळा, ह्या होत. येथें दर पांच दिवसांनीं बाजार भरतो; या गांवांत शान, ब्रह्मी, चिनी, आणि यूरोपियन लोकांची वस्ती आहे.

**टौंगुप**—लोअर बर्मा. संडोवे जिल्ह्याची अगदीं उत्तरेकडील एक तहशील ( टाउनशिप ). क्षेत्रफळ १६६३ चौ. मै. हिच्यांत ८१ खेडीं असून टौंगुप हें गांव मुख्य ठिकाण आहे. १९११ सालीं लोकसंख्या ३०६२५ होती. तहशिलीचें उत्पन्न सुमारें चाळीस हजार रुपये आहे.

**टौंगू, जिल्हा**.—ब्रह्मदेशाच्या खालील प्रदेशाच्या तेनासरिम भागांतील जिल्हा. हा प्रांताच्या पूर्वेस असून उत्तर अक्षांश १७°३३' ते १९°२९' आणि पूर्व रेखांश९५°४८' ते ९७° १३' यामध्यें वसलेला आहे. याचें क्षेत्रफळ ६१७२ चौरस मैल आहे. ह्याच्या उत्तरेस पेगुयोमापासून पूर्वेकडे जाणारी दगडाच्या खांबांची रांग आहे. पूर्वबाजूस हा जिल्हा, दक्षिण शान संस्थानें, करेंनी आणि सालवीन जिल्हा ह्यांच्यापासून टेंकड्यांच्या ओळींनीं विभागला आहे. दक्षिणेस थाटन जिल्ह्यापासून क्योंपगु नदीनें आणि पश्चिमेस पेगु जिल्ह्यापासून सित्तांग आणि कुन या नद्यांनीं व प्रोम थरावडी आणि यमेदिन्यो जिल्ह्यापासून पेगुयोमानें विभागलेला आहे. १८९५ सालीं प्राचीन श्वेगीन जिल्ह्याचा श्वेगीन पोटविभाग ह्या जिल्ह्यास मिळवून त्याची मर्यादा वाढविली. ह्या भागांत पुष्कळ नद्या व सरोवरें आहेत. जिल्ह्याच्या मध्यभागांत गावाच्या जमिनी आहेत. पूर्वेकडील भागांत जेंबूर नांवाच्या दगडाचे खडक आणि पश्चिमेकडील भागांत पेगु समुदायांतील चिकण जमून झालेले मायोसीन नांवाचे खडक आहेत. श्वेगीन नदीच्या उपनद्यांच्या भागांत सोनें सांपडतें. याशिवाय तांबें, जस्त, शिसें आणि कोळसा सांपडतो. जिल्ह्याच्या दोन्ही बाजूंना असलेल्या टेंकड्यांच्या पायथ्याशीं हत्ती, गेंडे, वाघ, चित्ते, अस्वल आणि रानडुकरें पुष्कळ आहेत. येथील हवा सर्द असून उत्तरेकडील भागांत कोरडी होत गेलेली आहे. उष्णमान सरासरी ८०° असतें. जिल्ह्याच्या मुख्य ठिकाणच्या ईशान्येस थानडौंग ह्या ठिकाणची हवा थंड आहे व येथें पुष्कळ लोक राहण्याकरितां येतात. ह्या जिल्ह्याचा इतिहासदृष्ट्या टौंगू घराण्याशीं संबंध आहे. हा वंश १६ व्या शतकांत ब्रह्मदेशाच्या इतिहासांत फार प्रसिद्धीस आला होता. इतरांच्या

टौंगू शहराच्या जवळच अशोक राजानें इ. स. पूर्वी ३२१ ह्या वर्षी कांहीं देवालयें बांधिलीं असा तिकडील इतिहासांत उल्लेख आहे. ब्रह्मदेश, तलैंग आणि तवोयन ह्या देशांच्या इतिहासांत धार्मिक गणला गेलेला पगनचा राजा नरपदिसिधु हा देवालयें शोधीत शोधीत इ. स. नंतर ११९१ ह्या वर्षी सित्तांग नदी ओलांडून गेला. हीं देवालयें सांपडल्यानंतर ह्यानें टौंगू येथें एक सुभेदार नेमिला. १८२६ साली मार्ताबानचा राजा वरियु ह्यानें टौंगूवर स्वारी करून सुभेदारास हांकून दिलें. तेराव्या शतकाच्या उत्तरार्धांत पगनराज्याचा न्हास होऊं लागल्यापासून येथील राजांनीं प्रांताच्या कारभारांत मुळींच हात घातला नाहीं. अशा रीतीनें त्यांना स्वतंत्र राज्य स्थापण्याची संधि मिळाली. टौंगूचा पहिला राजा थवुंगी ह्यास अठरा वर्षे राज्य केल्यानंतर १३१७ सालीं ठार मारिलें. परंतु त्याचें राज्य दिवसेंदिवस प्रबळ होत चाललें; १४१७ सालीं सौलतपिंकर नांवाचा राजा आणि पेगूचा राजा ह्या दोघांनीं प्रोमच्या राजावर हल्ला केला. सौलतपिंकरच्या मरणानंतर टौंगूच्या प्रत्येक राजानें आव्हा अथवा पेगूच्या राजास अधिराज मानून आपली गादी कायम ठेविली. मींगीन यो ह्यानें बंड करून पेगु येथील सैन्याचा पराभव केला. यानंतर लवकरच त्यानें आव्याच्या राजानें पाठविलेल्या सैन्याचा पराभव केला आणि टौंगू राज्यावर पूर्ण ताबा मिळविला. मींगीनूं याच्या नंतर तबिनश्वेति गादीवर आला. ह्यानें तलैंग देशावर तीन वेळ स्वारी करून शेवटीं १५३८ सालीं पेगूची गादी मिळविली. ह्यानें लवकरच प्रोम व मार्ताबन ह्या राज्यांवर आपला अंमल बसविला. ह्या वेळेपासून पेगु राज्याचा न्हास होऊं लागला. टौंगूच्या राजानें ही संधि पाहून १५९६ सालीं आपल्यास स्वतंत्र करून घेतलें परंतु १६१२ सालीं महधम्मराज ह्यानें टौंगू आपल्या हाताखालीं घेतलें व ह्या वेळेपासून टौंगू हें राज्य ब्रह्मी लोकांच्या ताब्यांत राहिलें. ह्या जिल्ह्याच्या आग्नेयीकडील भागांत पहिली ब्रह्मी लोकांची लढाई झाली. ब्रह्मी लोकांच्या दुसऱ्या लढाईत या ठिकाणीं इंग्रजी लोकांचें सैन्य आलें व त्यानें हा जिल्हा व पेगु प्रांताचा कांहीं भाग हस्तगत केला. पूर्वी हा हल्लींचा जिल्हा, तेनासेरिम् भागाचा श्वेगीन जिल्हा आणि पेगु भागाचा टौंगू जिल्हा यांत होता. १८९५ सालीं श्वेगीन जिल्हा मोडून टाकला व टौंगू जिल्ह्यास श्वेगीन पोटविभाग जोडून नवीन टौंगू जिल्हा बनविला.

ह्या जिल्ह्याच्या पश्चिमेस ६ मैलांवर १२७९सालीं स्थापन केलेल्या द्वायवदि राजधानीचे कांहीं भाग अजून शिल्लक आहेत. जिल्ह्याच्या मुख्य ठिकाणाहून वायव्येस २४ मैलांवर स्वा येथें ११९४ सालीं पगनचा नरपदिसिधु याचा जांवई नंदपुरीया यानें स्थापन केलेल्या शहराचे कांहीं भाग अजून दिसतात. ह्या जिल्ह्याच्या दक्षिणेस तबिनश्वेतीचा सेनापति बेयिननौंग ह्यानें १५५० सालीं स्थापन केलेलें क्षेयवदि शहर आहे. जिल्ह्यांत टौंगू मुख्य ठिकाण आणि श्वेगीन हीं दोन शहरें आहेत. १९०१ सालीं २२६७०० बुद्धधर्मी, १५०० वन्य व २७३०० ख्रिस्ती धर्माचे लोक होते. येथें शेंकडा ७० लोक ब्रह्मी आणि २० करेण भाषा बोलतात. ब्रह्मदेशांत टौंगू हें मिशनरी लोकांचें मुख्य ठाणें आहे १८७३ सालीं ह्या ठिकाणीं अँग्लिकन मिशन स्थापन झालें.

ह्या ठिकाणीं अमेरिकन बॅप्टिस्ट मिशनच्या तीन शाखा आहेत. मंडालेला आगगाडी सुरू झाल्यापासून हा जिल्हा बराच प्रसिद्धीस आलेला आहे. जिल्ह्याच्या मध्य भागांत तांदूळ फार पिकतो. सित्तांग व तिच्या कुन आणि युया उपनद्यांमधील जमीन फार सुपीक असून तांदूळाच्या उपयोगी आहे. तांदूळ हें जिल्ह्याचें मुख्य पीक आहे. श्वेगीन येथें तीळ व तंबाखू मुख्यत्वेंकरून पेरतात. यु येथें उत्तम केळीं पिकतात. ह्या ठिकाणीं गुरांकरितां मोठालीं जंगलें आहेत. येथें बैल, गाई व घोडे शान संस्थानांतून आणतात. जिल्ह्यांतलि जंगलाचे दोन भाग केले आहेत व टौंगू आणि श्वेगीन हीं जंगलाचीं मुख्य ठाणीं आहेत. श्वेगीन येथें सोनें सांपडतें. सित्तांगच्या पूर्वेस करेण जिल्ह्यांत जस्त सांपडतें असें म्हणतात. जिल्ह्यांत सूत व रेशीम विणण्याचे कारखाने आहेत परंतु विलायती माल येऊं लागल्यापासून हे कारखाने नाहींसे होत चालले आहेत. मातीचीं मडकीं जिल्ह्याच्या कांहीं भागांत करतात व जिल्ह्याच्या आसपासच्या खेड्यांत शान लोक चटया बनवितात.

यबेन व करेण लोक रेशीम तयार करून बाजारांत पाठवितात. जिल्ह्यांत टौंगू व येदशे येथें दोन तांदुळाच्या चक्क्या आहेत. टौंगू येथें एक दारू गाळण्याचा कारखाना आहे. ह्या ठिकाणाहून शान संस्थानांमध्यें वाळलेले मासे, रेशीम, गूळ आणि टौंगू येथून इमारती लांकूड पाठविलें जातें. जिल्ह्याचे टौंगू, यु आणि श्वेगीन असे तीन भाग केले आहेत. टौंगूमध्यें येदशे, टौंगू आणि लेक्थो; यूमध्यें यु, ओटविन आणि तंतबिन् आणि श्वेगीनमध्यें क्योक्यै आणि श्वेगीन हे ग्रामप्रदेश येतात. हे ग्रामप्रदेश अंमलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्याच्या हाताखालीं आहेत. टौंगू व पेगु येथें एक डिस्ट्रिक्ट जज्ज असून त्याचें मुख्य ठिकाण पेगु येथें आहे. यू व ओटविन आणि टौंगू व येदशे ह्या दोन ग्रामप्रदेशांकरितां दोन न्यायाधीश नेमलेले आहेत. येथे दोन रुग्णालयें आहेत.

टाऊनशिप.—टौंगू जिल्ह्यांतील एक तहशील. क्षेत्रफळ २७० चौरस मैल. १९११सालीं लोकसंख्या ५३०३२ होती. या टाऊनशिपमध्यें ७४ खेडीं असून टौंगू हें जिल्ह्याचें व टाऊनशिपचें मुख्य ठिकाण आहे. १९०३–४ सालीं वहित जमीन ४५ चौरस मैल असून ५३००० रुपये सान्याचें उत्पन्न होतें.

गांव.—टौंगू जिल्ह्याचें हें गांव मुख्य ठिकाण आहे. या गांवाची रचना सुरेख असून यांत दीड मैल लांब व अर्धा

मैल रुंद असा एक तलाव आहे. गांवाच्या भोंवतालीं १७० फूट रुंदीचा खंदक असून तो पावसाळ्यांत तुडुंब भरलेला असतो. या गांवचें उत्पन्न (१९०३-४) ८४,००० रुपये होतें. येथें मामुली कचेऱ्या, तुरुंग, दवाखाना व शाळा आहेत. शिवाय या गांवचा बाजार फार मोठा आहे.

**टँगथ**—अपरब्रह्मदेशांत मिंग्यन जिल्ह्याची ही एक टाउनशिप (तहशील) आहे. हिचें क्षेत्रफळ ५१६ चौरस मैल आहे. इरावती नदीच्या बाजूकडील जमिनींत ज्वारी, कापूस आणि तीळ पिकतो. हिच्यांत १२५ खेडीं असून मुख्य ठिकाण टँगथ हें आहे.

**टँगथु**—हे जंगली लोक मूळचे करेण जातीचे असून ब्रह्मदेशच्या पूर्व सरहद्दीवर व शान संस्थानच्या मध्य भागीं व पश्चिम सरहद्दीवरच्या प्रदेशांत राहतात. १९११ सालीं या लोकांची संख्या १८३०५४ होती. हे लोक जवळ जवळ करेण भाषेसारखीच भाषा बोलतात. यांच्यांतील पुरुषांचा पेहराव शान लोकांप्रमाणें आहे. म्हणजे हे लोक साधें जाकीट व ढिली विजार घालतात. या लोकांच्या बायका अंगावर एक मोठें पांघरूण घेऊन आंतून पैरण घालतात. ही पैरण सदऱ्यासारखी असून ती घोंटयापर्यंत पोहोंचते. हे नांवाचेच बौद्धधर्मी आहेत. कारण ते पिशाच्चादिकांची पूजा करतात.

**ट्युनिस**—हें शहर ट्युनिशियाची राजधानी असून उत्तर आफ्रिकेंतील ईजिप्तच्या बाहेरचें सर्वांत मोठें शहर आहे. उत्तर अ. ३६° ४८' व पूर्व रे. १०°१२' सेबक्ता-इल-सेजुमी व इलबहिरा अथवा ट्युनिसचें सरोवर यांच्यामध्यें असलेल्या संयोगभूमीवर हें शहर वसलेलें आहे. इलबहिरा सरोवर कृत्रिम खाडीनें ट्युनिसच्या आखाताशीं जोडल्यानें या शहराचें रूपांतर बंदरांत झालेलें आहे. याच्या वायव्येस व नैर्ऋत्येस डोंगरी किल्ले असून त्यांपैकीं सिदी बेलहसनपासून दक्षिणेकडील किल्ले मध्ययुगापासून आहेत. या शहराचा आकार अर्धचंद्राकृति असून कसबा अथवा बालेकिल्ला अगदीं उंचावर आहे. जुनें शहर मेदिना हें रिब्रल-इल-सोविका आणि रिबन बॅबेल जेझिरा या दोन नगरोपान्त शहरांमध्यें आहे. बॅबएल बहर, समुद्राचें पोर्टे द फ्रान्स याच्या पलीकडील कार्टीयर फ्रँक नांवाची नाविक पेठ १८८१ सालीं फ्रेंचांच्या अमलांत बांधली. शहर नवीन बनविण्याचा फ्रेंचांनीं कांहींच प्रयत्न केला नाहीं.

यू रो पि य न पे ठ.—धक्क्यापासून जो रस्ता निघतो तो ॲव्हेन्यू ज्यूल्स फेरी अथवा द्लामरिनमध्यें जातो. हा फ्रेसदला रेसिडन्स येथें संपतो. त्याच्या उत्तरेस रोमन कॅथोलिक कॅथेड्रल व दक्षिणेस फ्रेंच रेसिडेंट जनरल याचा राजवाडा आहे. मुख्य रस्ता पोर्टे द फ्रान्समध्यें जातो. येथून बंदरापर्यंत व एतद्देशीय पेठेस वळसा घालणाऱ्या विजेच्या ट्राम्स आहेत. ॲव्हेन्यु द फ्रान्समध्यें मुख्य हॉटेल, उपहारगृहें, नाटकगृहें, पेढया व उत्तम दुकानें आहेत. याच्या उत्तरेच्या भागांत मुख्यतः माल्टीज लोकांची वस्ती आहे.

ए त द्दे शी य पे ठ.—मशिदींत ख्रिस्ती लोकांनां जाण्याला मनाई आहे. बालेकिल्ल्याकडे जाणाऱ्या रस्त्यांत उजवीकडचा रुदला कसबा व डावीकडचा डार-ईल-बे होय. डावीकडचा मार्ग जमा-आल-झैतुना या मुख्य मशिदीकडे जातो. या मशिदीची स्थापना६९८ त झाली. हिला बरेच घुमट आहेत. या मशिदीला जोडलेलें एक विद्यालय असून त्यांत बरेच मुसुलमान विद्यार्थी आहेत. डार-ईल-बेमध्यें बऱ्याच सुशोभित खोल्या असून न्यायमंदिराचा घुमट फार उत्तम आहे व येथील नक्षीकामाला 'नक्षहदिदा' म्हणतात. कसब्यांत १२३२ त बांधलेली एक मशीद आहे. जुन्या कसब्याच्या भिंतीचे अवशेष मात्र दिसतात. या कसब्यांत किल्ल्याखेरीज पूर्वी राजवाडा, जॅनिसरी लोकांसाठीं बराकी व ख्रिस्ती गुलामासाठीं तुरुंग असे. इ.स. १५३५ त जेव्हां पांचव्या चार्लसनें स्पॅनिश लोकांसह ट्युनिसवर हल्ला केला त्यावेळीं येथील ख्रिस्ती गुलामांनीं बंड करून त्यांनां मदत केली. कसब्याच्या उत्तरेस सादिकी कॉलेज असून त्याच्याहि उत्तरेस 'पॅले द जस्टिस' आहे. याच्या ईशान्येस सर्वांत मोठी मशीद असून तिला मुसुलमानांच्या ५ व्या शतकांत प्रसिद्ध असलेल्या सिद्दी महरेझ नांवाच्या साधुपुरुषाचें नांव देण्यांत आलें आहे. यांत कर्जबाजारी लोक जाऊन बसतात व कर्जाच्या त्रासांतून मुक्त होतात. या मशिदीच्या पूर्वेस ग्रेट जॉर्ज नांवाचें प्रॉटेस्टंटांचें स्मशान आहे.

बा जा र.—रुदला कसबाच्या उत्तरेस यहुदी लोकांची पेठ आहे. हिच्या पलीकडे रिबत-इल-सीवैकामध्यें गरीब मुसुलमान नेहमीं जमतात. येथें देशी उपहारगृहें आहेत. रुदला कसबाच्या दक्षिणेस बाजारओळ असून तींतील रस्ते फार अरुंद आहेत. यांनां 'सुक' म्हणतात. या प्रत्येक 'सुकां'त एकच पदार्थाची पेठ आहे. इलअत्तरीन (सुगंधी पेठ), इलफराशिन (कापड व गालीचे यांची पेठ), इलसराजिन (जिनाची पेठ), इलबिर्का (जवाहिरीपेठ) या मुख्य पेठा असून इलबिर्कींत पूर्वी गुलामांचा व्यापार चालत असे.

सा र्व ज नि क सं स्था.—ट्युनिस शहरांत चांगली इस्पितळें व वृक्ष असून लोकांस उपयोगी संस्था आहेत. जुम्मा-आलझैतूना (ऑलिव्ह झाडाची मशीद) मशिदीला जोडलेलें विद्यालय, सादिकी कॉलेज, शिक्षकांची शाळा वगैरे शिक्षण संस्था आहेत.

बं द र.—बाहिरा व भूमध्यसमुद्र यांस जोडणारी खाडी ७ मैल लांब असून मध्यभागीं जहाजें जाण्यासाठीं तिची रुंदी १४७ फूट केली आहे. येथील बंदरांत येणाऱ्या जहाजांत निम्मीं फ्रेंच, एकतृतियांश इटालियन व बाकीचीं ब्रिटिश असतात. मुख्य व्यापार फ्रान्सशीं चालतो. फास्फेट, खनिजपदार्थ, द्विदलधान्यें, ऑलिव्ह तेल, गुरेंढोरें, कातडीं, स्पंज व मेण या मालाची निर्गत होते. कापड, पीठ, लोखंडी सामान,

कोळसा, साखर, चहा, कॉफी वगैरे माल परक्या देशांतून येतो.

लो क सं ख्या.—येथील लोकसंख्या ( सन १९१३ ) १६४६०८ मुसलमान, ४३००० ज्यू, आणि ६९४७५फ्रेंच, इटालियन व माल्टीज, अशी आहे.

स भों व ता ल चा भा ग.—टयुनिसच्या आसमंतांतील भाग फार रमणीय आहे. आग्नेयीस एका सुंदर टेंकडीवर फ्रेंच किल्ला असून शहराच्या वायव्य वेशीपासून सव्वामैलावर वार्डो नांवाचा प्राचीन राजवाडा आहे. यातील गच्ची फारच सुंदर आहे. येथील पदार्थसंग्रहालयांत रोमन व कार्थेजियन कलेचे अवशेष व नमुने ठेवण्यांत आले आहेत. गोलेटाच्या उत्तरेस कांहीं मैलांवर कार्थेजचे अवशेष दृष्टीस पडतात.

इ ति हा स.—टयुनिस हें शहर कार्थेजहून जुनें असावें. कार्थेजचें हें मांडलिक असून प्युनिक युद्धांत याचा बराच उल्लेख येतो. येथील गरम पाण्याच्या झऱ्यांचा व खाणींचा उल्लेख स्ट्रॅबोनें केला आहे. अरबांच्या स्वारीनंतर कार्थेजचा ऱ्हास झाला व टयुनिसनें व्यापारांत व राजकीय दृष्टीनें त्याची जाग पटकाविली. कैरावनहून स्पेनला जाणारे उतारू ह्या बंदरांतून जात असत. ॲघलाबाईट घराण्याचें (८००-९०९) हें एक राहण्याचें ठिकाण होतें. फातिमाईट खलीफ आलकेम व अबुताहिर इस्माएल-इल-मनसुर यांचे सुनीपंथी पुढारी अबुयझीद व झेनटा बर्बर यांच्यावरोबर झालेल्या युद्धांत टयुनीसचें बरेंच नुकसान झालें.

**टयुनीशिआ** (रीजन्सी ऑफ टयूनिस)—उत्तर आफ्रिकेंतील फ्रान्सच्या संरक्षणाखालील एक देश. याच्या उत्तरेस भूमध्यसमुद्र, पश्चिमेस अल्जीरिआ, पूर्वेस ट्रिपोली, व दक्षिणेस साहारा वाळवंट आहे. हा देश उत्तर अक्षांश ७° ११' आणि पूर्व रेखांश ४०°, ३५" यांत वसला आहे. क्षेत्रफळ सुमारें ५०००० चौरस मैल व लोकसंख्या सु. ( १९२१ ) १९ लाख आहे. तीपैकीं मुसुलमान बर्बर १७ लक्ष व बाकीच्या २ लक्षांत यूरोपियन, माल्ट व ज्यू आहेत. यूरोपियनांत फ्रेंच लोक ६२ हजार आहेत. येथील मुसुलमान लोक अरबी भाषा बोलतात. अल्जीरिआमधील ऑरीज पर्वताची रांग टयुनीशिआंत उत्तरेकडून वायव्येकडे पसरली आहे. वायझर्टा व टयुनीसचें आखात यांमधील प्रदेश फारच रम्य आहे. या प्रदेशांत पाण्याचा पुरवठा मुबलक आहे. मध्यवर्ती डोंगराळ प्रदेश बहुतेक नेहमीं वनस्पतींनीं आच्छादिलेला असतो. साहेल म्हणून जी किनाऱ्याची पट्टी आहे, ती चांगली सुपीक असून तींत पाणीहि मुबलक आहे. टयुनीशिआच्या दक्षिणेकडील बहुतेक भाग रुक्ष व निर्जन आहे.

गरम पाण्याचे झरे ( उन्हाळीं ) टयुनीशियांत पुष्कळ आहेत. पावसाळा बहुधा जानेवारी महिन्यांत सुरू होऊन दोन महिनेपर्यंत टिकतो. टयुनीशिआंत जो साहाराचा भाग आहे, त्यांत पाऊस कधीं पडेल याचा नेमच नसतो. कदाचित् दोन तीन वर्षें पाऊस पडतहि नाहीं. व एखादे वेळीं अकस्मात् मुसळधारेसारखा पाऊस पडून सर्वत्र जलमय होऊन जातें. तांबें व जस्त या धातूंच्या खाणी या ठिकाणीं आहेत; केफ प्रांतांत लोखंडहि सांपडतें; मॅजरडा नदीच्या खोऱ्यांत संगमरवरी दगड सांपडतात व इतरत्र फॉस्फेटचे अवशेष फार सांपडतात. सन १९१९ त ३६६९२३२५ फ्रॅंकच्या किंमतीचा फॉस्फेट काढण्यांत आला. मॅजरडा पर्वताच्या आसमंतांत घनदाट व अति प्राचीन असें अरण्य आहे. त्यांत ओकाचीं व बुचाचीं झाडें आहेत. खिमरिआ पर्वतांत पॉप्लर, मॅपल, पाईन वगैरेंचीं झाडें वाढतात, व जरबा येथें खजूरीचीं झाडें अतिशय आहेत. तरस व चित्ते तर देशाच्या सर्व भागांत दृष्टोत्पत्तीस येतात. उत्तर टयुनीशिआंत, रानम्हशी व रानरेडे यांचे मोठमोठे कळप आहेत. टयुनीशिआ येथील हल्लींचे एतद्देशीय लोक बर्बर व अरब या दोन वंशांचे असून त्यांत सुमारें ३/४ बर्बर वंशाचे व १/४ अरब वंशाचे आहेत. हे बर्बर लोक म्हणजे एकदां स्वतंत्र असलेल्या प्राचीन चार वंशांच्या मिश्रणापासून उत्पन्न झालेले होत. ( १ ) 'नीआंडरथाल' वळणाचे बर्बर. (२ ) साधे बर्बर; हे पिंगट वर्णाचे असून विशेषतः पूर्वेस व दक्षिणेस राहतात. ( ३ ) लहान डोक्याचे बर्बर; हे साहारा विभाग, जरवा बेट, केप बॉनचें द्वीपकल्प, कैरवान सुसा वगैरे ठिकाणीं रहातात. (४) सांवळ्या वर्णाचे बर्बर; हे लोक टयुनीशिआच्या पश्चिमेस व वायव्येस राहतात.

अरब लोक हे मॅजरडाच्या दक्षिणेस, सुसाचा उत्तर समुद्रकिनारा व अल्जीरिआची सरहद्द यांच्यामधील प्रदेशांत राहतात. या लोकांच्या चालीरीती व सवयी रानटी आहेत. ११ व्या शतकांत जी दुसरी अरब स्वारी झाली, त्या स्वारींतील लोकांचे हे वंशज आहेत. जरबाबेट, माटमाटा व टयुनीशिअन साहारा इत्यादि ठिकाणीं बर्बर व तिच्या पोटभाषा बोलण्यांत येतात, बाकीच्या ठिकाणीं अरबी भाषा प्रचारांत आहे. बर्बर लोकांच्या सुसंघटित अशा राष्ट्रजाती असून त्यांच्यांत लोकसत्ताकराज्यपद्धति प्रचलित आहे. टयुनीशिआच्या वायव्येकडील समुद्रकांठच्या प्रदेशांत निरनिराळ्या ( ग्रीक, इटालियन वगैरे ) मिश्र रक्ताचे लोक राहतात. केप किनाऱ्यावरील शहरांतून मूर लोकांची दाट वस्ती आहे.

येथील रोमनकालीन व इतर वेळचे प्राचीन अवशेष म्हटले म्हणजे, राजधानी नजीकचे कालवे, झाघवान येथील देवालय, कार्थेज जवळील प्रचंड पाण्याचा खजिना व एलजेम येथील अर्धचंद्राकार नाटकगृह इत्यादि होत. शेती हा येथील मुख्य धंदा आहे. ओट, गहूं व जव हीं उत्तरेचीं मुख्य धान्यें होत; मध्यभागांत ऑलिव्हची विस्तृत प्रमाणांत लागवड करण्यांत येते; दक्षिणेंत खजूराची लागवड करतात. याप्रमाणें हा देश कृषिप्रधान असल्यानें खाद्य धान्यें विस्तृत प्रमाणावर पिकवितात. स. १९१९ मध्यें १४५०००० क्विंटल इतका गहूं या देशांत पिकला. येथें द्राक्षांची लागवड फार होते. स. १९१९ त या द्राक्षांची ४४४१५७ हेक्टोलिटर्सची दारू काढण्यांत

झाले. लोंकर कातणें व विणणें, चटया तयार करणें, चिनी मातीची भांडीं व खोगिरें वनविणें व मासे धरणें इत्यादि धंदे एतद्देशीय लोक करतात.

हा देश फ्रान्सच्या संरक्षणाखालीं आल्यापासून येथील व्यापार बराच भरभराटला आहे. ऑलिव्ह झाडांची समृद्धि असल्यानें ऑलिव्ह तेल, गहूं, जव, खजूर, लोंकर, तांबें, जस्त, इत्यादि जिन्नस येथून परदेशीं जातात. यूरोपांत तयार झालेलें सामान, यंत्रें, साखर, इमारती लांकूड, मद्यार्क, कोळसा व पेट्रोलिअम इत्यादि वस्तू बाहेरून येथें येतात. सन १९१९ मध्यें ४८०७७८९००० फ्रँकच्या किंमतीच्या मालाचा व्यापार येथें झाला; त्यापैकीं २८५७६१००० फ्रँकचा आयात माल होता. उंट हें इकडे मुख्य वाहन आहे.

एतद्देशीयांच्या दृष्टीनें पहातां ट्युनीशिआवर ट्युनिसचा सुभेदार, त्याचें अरब प्रधानमंडळ व अधिकारीमंडळ यांचीच शासनसत्ता आहे, व या एतद्देशीयांवर फ्रान्सची फक्त अप्रत्यक्ष देखरेख आहे. मात्र सर्व ख्रिस्ती लोकांवर व परकीयांवर फ्रान्सची प्रत्यक्ष सत्ता आहे. एतद्देशीय शासनव्यवस्था पाहण्याकरितां ४५ फ्रेंच अधिकारी, पंधरा मूळचे रहिवाशी व एक ज्यू अशा ६१ लोकांचें एक सल्लागार मंडळ आहे. राज्यांतील सात खात्यांचे अधिकारी फ्रेंच लोकच आहेत. रेसिडेंट-जनरल व असिस्टंट रेसिडेंट हे फ्रान्सचे ट्युनीशिआंतील प्रतिनिधी होत. १९१८ सालीं ट्युनीशिआंत २८७ सार्वजनिक शाळा, ८ विद्यालयें व २३ खाजगी शाळा होत्या.

इ ति हा स.—फोनिशिअन वसाहतींच्या स्थापनेपासूनच ट्युनीशिआच्या इतिहासास आरंभ होतो. येथील किनाऱ्यावरील लोकांत प्युनिक भाषा व प्युनिक संस्कृति कांहीं काळ पावेतों प्रचारांत होती. पुढें हा रोमन लोकांच्या ताब्यांत गेला. त्यावेळीं पूर्वसंस्कृतीची जागा लॅटिन संस्कृतीनें घेतली. या भागास रोमन लोकांनीं ' आफ्रिका ' असें नांव दिलें. रोमन साम्राज्याखालीं हा आफ्रिका प्रांत भरभराटीच्या शिखरास जाऊन पोहोंचला. या प्रांतांतच ट्युनीशिआचा समावेश होत असे. आफ्रिका प्रांतच ख्रिस्ती लॅटिन वाङ्मयाची जननी आहे. व्हँडाल लोकांनीं कार्थेज घेतलें त्यावेळींच रोमचा आफ्रिका प्रांतावरील ताबा नाहींसा झाला. सन ५३३-३४ त तो फिरून रोमकडे गेला पण त्यानंतर ( ६४८-६९ ) तेथें अरबांचें स्वामित्व स्थापिलें गेलें. ऑकबा-बिन-नाफा या जेत्यानें कैरवान शहर स्थापिलें ( ६७३ ). बर्बरांनीं स्वखुषीनें इस्लाम धर्म स्वीकारला पण आपलें वैशिष्ट्य व राष्ट्रीयत्व मात्र नष्ट होऊं दिलें नाहीं. फातिमाईट साम्राज्याची मजबुती बर्बर मदतीवर अवलंबून असे. फातिमाईट साम्राज्याचें मुख्य स्थान ज्या वेळीं मिसरदेश येथें हालविलें गेलें, त्या वेळीं सानहाजा या बर्बर घराण्यांतील झीराईटस हे त्या साम्राज्याचे प्रतिनिधी म्हणून महदीया येथें राज्य करीत होते. सन १०५०च्या सुमारास या घराण्यांतील मोइझ यानें फातिमाईट साम्राज्याची सत्ता झुगारून दिली व सबंध आफ्रिका प्रांत उध्वस्त करून टाकला आणि बर्बरांना दऱ्याखोऱ्यांत पिटाळून लाविलें. सिसिलीच्या पहिल्या रॉजरनें झीराईट वंशाचा समूळ निःपात करून स. ११४८ त महदीया घेतलें व आपली सत्ता ट्युनीशिआच्या किनाऱ्यावर स्थापिली. अबदुल मुमिन या खलीफानें ११६० त महदीया घेऊन अलमोहिद साम्राज्याची स्थापना केली. पुढें स. १२३६ त अबु झकारिया यानें अलमोहिद साम्राज्याची सत्ता झुगारून हफसाईत ( हवसाणी ) या स्वतंत्र वंशाची स्थापना केली. हें साम्राज्य आपल्या वैभवाच्या काळांत ट्लेमसेनपासून ट्रिपोलीपर्यंत पसरलें होतें. या वैभवसंपन्न साम्राज्याचा पुढें केवळ गृहकलहामुळें व भाऊबंदकीमुळें नाश झाला.

महंमद हफसाईत हा १५२५ त मरण पावल्यानंतर त्याच्या वारसांत गादीविषयीं तंटे लागले. अलजीअर्स बळकाऊन बसलेल्या तुर्कांनीं या भांडणापासून लाभ करून घेण्याचा प्रयत्न केला. पण पांचव्या चार्लस बादशहाच्या मदतीनें महंमदाचा मुलगा अल-हसन हा स्पेनचा अंकित म्हणून त्याच्या मदतीनें राज्यावर बसला. ही स्पेनची सत्ता केवळ किनाऱ्यापुरतीच होती. या व्यवस्थेनें ट्युनीशिआच्या अन्तर्भागांतील बेबंदशाही व कलहाग्नि विझला नाहीं. सन १५७० त अलजीअर्सचा तुर्की सरदार अली-पाशा यानें हसनचा मुलगा हमीद याचा पूर्ण पराभव करून ट्युनिस काबीज केलें. पराभूत राजाच्या मदतीस डान जॉन धावून आल्यामुळें क्षणैक तुर्कांनीं ट्युनिस सोडलें. पण पुढच्याच वर्षी सुलतान दुसरा सेलीम यानें मोठें सैन्य पाठवून स्पॅनिश लोकांना ट्युनिसमधून हांकून लावलें व सबंध देशांत तुर्की सत्ता स्थापन केली. प्रथम दिवाणी कारभार पाशाच्या नियंत्रणाखालीं देण्यांत आला. नंतर थोड्याच वर्षांनीं तुर्की लष्करानें निवडलेल्या सुभेदाराकडे तो गेला. पुढें १७०५ सालीं साम्राज्यसरकारानें या प्रांतावर गव्हर्नर नेमला. तेव्हां या तुर्की लष्करी सुभेदारांत व गव्हर्नरांत सारखी चुरस सुरू झाली. इब्राहीम या शेवटच्या गव्हर्नरानें लष्करी सुभेदारांच्या सत्तेचा समूळ नाश करून आपल्याकडे सर्व राज्याची मालकी घेतली. परंतु तो पुढें लवकरच मारला गेल्यामुळें हें राज्य पुन्हां लष्करी सुभेदाराकडे गेलें व तेव्हांपासून त्याच राजघराण्यांत येथील राजसत्ता स्थापन झाली, ती आजतागाइत तशीच कायम आहे. या सुलतानांना 'बे' ही पदवी आहे. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत ट्युनीशिआ म्हणजे एक चांच्यांचें राज्य होतें; पुढें ( १८१९ ) यूरोपीय राष्ट्रांकडून तंबी मिळाल्यामुळें चांचेगिरीला आळा घालण्यांत आला. यूरोपीय सुधारणा व यूरोपीय शोधांच्या भरीस लागून देशाच्या अन्तःस्थितीकडे दुर्लक्ष झाल्यामुळें ती अधिकच खालावत चालली. कर्ज अतोनात वाढलें व उत्पन्न कमी होत चाललें. या परिस्थितीचा फायदा घेऊन स. १८७८च्या बर्लिनच्या काँग्रेसमध्यें फ्रान्सनें

इंग्लंडपासून ट्युनीशिआंत 'अनिर्बंध संचार' करण्याची मोकळीक मिळविली.

सन १८८१ साली फ्रेंच सैन्यानें अलजीरिअन सरहद्द ओलांडली व ट्युनीशिआच्या राजधानीवर चाल करून तेथील सुलतानाला फ्रेंच वर्चस्व मान्य करण्यास भाग पाडलें; १८८३ साली इंग्लंडनेंहि फ्रान्सची ट्युनीशिआमधील सत्ता मान्य केली. तुर्कस्ताननें मात्र या फ्रेंच सत्तेस मान्यता दिली नाहीं. पण शाब्दिक निषेधापलीकडे तुर्कस्तान कांहींच करूं शकलें नाहीं. जॅनेटचा प्रदेश १९०६ सालीं फ्रान्सनें काबीज केला परंतु १९१० सालीं तो तुर्क सैन्यानें फ्रान्सपासून परत घेतला. तेव्हां फ्रान्सनें या कृत्याचा जोराचा निषेध करून तंबी दिल्यामुळें तुर्कांनीं आपलें सैन्य तेथून काढून घेतलें [ एन्सायक्लो. ब्रिटा. पु. २७. ]

**ट्यूस**—हीं उत्तर इराणची जुनी राजधानी होय. मश्हदच्या उत्तरेची केशेफरुद नदी व हेरत नदी यांचा संगम बनून जी तर्जेद नदी बनून, तुर्कोमन मैदानाच्या उत्तरेकडील दलदलीच्या प्रदेशांत वहात जाते तिच्यापासून साधारण ५० यार्डांच्या अंतरावर या " ट्यूस " शहराची जागा आहे. त्याच्या पडक्या तटाच्या आंत सर्वत्र जुन्या घरांचे अवशेष पसरलेले दिसतात. अगदीं मध्यावर फवई कवीची व इमामरेझा( तेथील पूर्वीचा राजा )च्या पुतण्याची अशी दोघांची मिळून एक कबर आहे. ती मोठी असून तिच्या चारी बाजूंस दरवाजे वगैरे आहेत व त्यांवर घुमट आहे आणि त्यावर नकसकामहि केलेलें आहे. घुमटाच्या मध्यावर थडगें आहे; त्यांतील कांहीं संगमरवरी दगड रशियन प्रवासी घेऊन गेले असें सांगतात. छतावर आणि बाजूस कुराणांतील वचनें कोरिलीं आहेत. ही इमारत आजूबाजूच्या २० मैलांवरून दिसते.ट्यूस शहर जवळ जवळ ४०० वर्षें ओसाड पडलेलें आहे. मश्हद शहराची जसजशी भरभराट होत चालली तसतसें ह्या खोरासानच्या जुन्या राजधानीस लोक सोडून गेले असावे.केशेफ रुद या नदीच्या पुरामुळें येथील जमीनीस पाण्याचा पुरवठा होतो. येथें जवळच एक कालवा आहे [ इंडियन अँटिक्वरी. पु. १० ].

**ट्रॅलिझ**—( आधुनिक गुझेल हिसर ). हें कॅरिआंतील ( आशियामायनर ) प्राचीन शहर मिआंडर नदीस मिळणाऱ्या युदन नदीवर आहे. येथें अर्जिव्ह व थ्रेशियन वसाहत असून, हें बराच कालपर्यंत इराणी अंमलाखालीं होतें. सेल्युसिद व पर्गामियन राजांनीं याची तटबंदी करून याला सेल्युसिआ व अँटिओकिया नांव दिलें होतें. सन १३३ त हें रोमन लोकांच्या ताब्यांत गेलें. ह्या ठिकाणीं सांपडलेल्या अवशेषांवरून प्राचीन कालीं ह्या ठिकाणीं सुंदर कामें होत असावींत असें दिसतें. १२८० सालीं दुसऱ्या अँड्रोनिकसनें हें शहर सुधारलें परंतु सेल्जुक विजयानंतर अमीर ऐदिननें वसविलेल्या नवीन शहरामुळें हें मागें पडलें.

**ट्रान्सवाल**—दक्षिण आफ्रिका संघांतील एक प्रांत. हा व्हाल व लिंपोपो या नद्यांच्या मध्यें द.अ. २२½° ते २७½° आणि पू. रे. २५° ३२° यांमध्यें वसला आहे. यांच्या दक्षिणेस ऑरेंजफ्रीस्टेट व नाताळ, पश्चिमेस केप प्रांत व बेच्वाना लँड प्रोटेक्टरेट, उत्तरेस ऱ्होडेसिआ, पूर्वेस पोर्तुगीज ईस्ट आफ्रिका व स्वाझीलँड आहे. एकंदर क्षेत्रफळ ११०४५० चौरस मैल आहे. या देशाचा सुमारें ⅘ प्रांत ड्रेकनसवर्ग पर्वताच्या पश्चिमेस असून तो उंच सखल आहे. देशांत चार मोठ्या नद्या आहेत. त्या कोमारी, पांगोला ( या हिंदी महासागरास जाऊन मिळतात ), व्हाल व लिंपोपो. हा प्रदेश उष्ण कटिबंधाजवळ व कांहींसा उष्ण कटिबंधांत असला तरी देशाच्या साधारण उंचीमुळें येथील हवा आरोग्यकारक आहे. कित्येक भागांतील हवा तर उत्कृष्ट आहे. नोव्हेंबर, जानेवारी हे अतिशय उष्ण महिने आहेत व जून, जुलै हे कडक थंडीचे महिने होत. सन १९०४ सालीं ज्यावेळीं ट्रान्सवालची प्रथम खानेसुमारी करण्यांत आली, त्यावेळीं लोकसंख्या १२६९९५१ होती. तींत शेंकडा २०.६७ यूरोपियन होते. यूरोपियनांत डच व ब्रिटिश असे मुख्य दोन भेद आहेत. डच अथवा बोअर लोक हे टाल नांवाची भाषा बोलतात. एतद्देशीय लोक मुख्यतः झुटपँस्वर्ग विभागांत आहेत.हे लोक बांटु–निग्रोवंशोत्पन्न आहेत व बासुटो बेचुआना, बाव्हेंडा, ह्या त्यांच्या मुख्य जाती होत. या जाती येथील मूळच्या रहिवाशी नसून १८१७–२० च्या दरम्यान बाहेरून या ठिकाणीं आल्या आहेत. याशिवाय ट्रान्सवाल मध्यें काफीर, शांगान बुशमेन, हाटेंटाट इत्यादि जातींहि राहतात. सन १९०४ मध्यें ट्रान्सवालांत तद्देशीय लोकांची संख्या ९७२६७४ होती. सन १९११ त एकंदर लोकसंख्या १६८६२१२ होती. राज्यकारभाराच्या सोयीकरितां देशाचे सोळा विभाग केले आहेत. प्रत्येक विभागावर एक मॅजिस्ट्रेट असतो. या विभागाचे पुन्हां उपविभाग केलेले असून त्या प्रत्येकावर एक एक लष्करी अंमलदार असतो; शिवाय पार्लमेन्टमध्यें पाठविण्याकरितां मतदारसंघाचे निरनिराळे प्रांतवाचक भाग पाडले आहेत. सन १८८८ त सरकारनें वाफेची ट्रामगाडी सुरू केली व १८९० सालीं प्रिटोरिया डेलागोआ हा आगगाडीचा पहिला फांटा काढला. यापुढें बरेच आगगाडीचे फांटे काढण्यांत आले ट्रान्सवाल ही जगप्रख्यात अशी सुवर्णभूमि आहे. या ठिकाणीं सोन्याच्या, हिऱ्याच्या, चांदीच्या, तांब्याच्या व कोळशाच्या खाणी आहेत. व्हेटरस्कूल, क्लर्कर्भसडॉर्प व वाटरबर्ग या भागांत सोन्याच्या व प्रिटोरिआ येथें हिऱ्याच्या आणि इरबर्ग व माराबॅस्टँड येथें लोखंड व तांबें यांच्या खाणी आहेत. खाणीसंबंधींचा धंदा वगळल्यास दुसरा महत्त्वाचा धंदा म्हटला म्हणजे शेतीचा होय. गुरांची पैदास करणें हा शेतकऱ्यांपैकीं बहुतेकांचा धंदा आहे. प्रांताच्या क्षेत्रफळाच्या मानानें पाहतां उंचवट्यादरील शेतजमीन फारच थोडी आहे. देशांत पाऊस फारसा

पडत नाहीं शिवाय पाटबंधाऱ्यांचाहि अभाव आहे. गहूं व मका यांची मुख्यतः लागवड करण्यांत येते. मका हें काफीरांचें मुख्य खाद्य आहे. ओट, जव व ज्वारी यांचा मुख्यतः घांसदाण्याकडे उपयोग होतो. बहुतेक सर्वत्र तंबाखूची लागवड होते. १९०२ सालीं शेतकीखातें स्थापन करण्यांत आलें. त्या खात्यानें कृषिकर्मपद्धतींत बऱ्याच सुधारणा केल्या आहेत. १९१० सालीं या ठिकाणीं एक शेतकी विद्यालयहि काढलें.

प्रचलित असलेल्या शासनपद्धतीचा प्रारंभ १९१० सालीं झाला. सर्व देश मिळून युनिअन पार्लमेंटांत आठ व हाऊस ऑफ असेंब्लीमध्यें छत्तीस असे एकंदर ४४ लोकनियुक्त सभासद असतात; पहिल्या आठांना सिनेटर्स म्हणतात. पार्लमेंटच्या निवडणुकीच्या सोयीकरितां म्हणून, एक एकच सभासद पाठविणारे असे मतदारसंघविषयक जिल्हे केलेले आहेत. प्रत्येक वयांत आलेल्या गोऱ्या ब्रिटिश प्रजाजनाला मतदानाचा अधिकार आहे; यांत मालमिळकतीची वगैरे कांहींच अट नाहीं.

कार्यकारी मंडळाच्या मुख्य अधिकाऱ्याची निवड संयुक्त प्रधानमंडळाकडून होते, त्याची मुदत पांच वर्षांची असून प्रांतिक कायदेमंडळानें निवडून दिलेल्या चार सभासदांचें एक कार्यकारी मंडळ त्याच्या मदतीस असतें. प्रांतिक कायदेमंडळांत ३६ सभासद असतात. या मंडळाचा सत्ता केवळ स्थानिक कार्यापुरती असून त्याची मुदत तीन वर्षांची असते. लोकसत्ताक राज्याच्या वेळीं जी या पोटविभागांतून लष्करी राज्यव्यवस्था होती येथें हल्लीं प्रांतिक सरकारनें नेमिलेले लष्करी अंमलदारच आहेत परंतु त्यांच्याकडे जन्ममरणाची व मतदारांची नोंदणी करण्याचें, सार्वजनिक रस्त्यांची सुस्थिति राखण्याचें वगैरे फक्त मुलकी कामच दिलें आहे. मुख्य स्थानिक संस्था म्हणजे म्युनिसिपालिट्या होत. ज्यांची १०० पौंड किंमतीची स्वतःची मालमत्ता आहे, अथवा जे ३०० पौंड किंमतीच्या जमीनजुमल्याचे भाडेकरी आहेत, किंवा जे वार्षिक २४ पौंड कर देतात, अशांना म्युनिसिपल निवडणुकींत मतदानाचा हक्क आहे, परक्यांना अथवा काळ्या ब्रिटिश प्रजाजनांना हा हक्क नाहीं.

जकाती, खाणी, आगगाड्या, पोस्ट व तारखातें, जमीनमहसूल, व व्यापारधंद्यावरील कर ह्या उत्पन्नाच्या मुख्य बाबी होत. सन १९०७ मध्यें अबकारी खातें प्रथम उघडण्यांत आलें व १९१० सालीं सरकारी जमाबंदीवरील ताबा यूनिअन पार्लमेंटकडे गेला. तरी पण प्रांतिक कायदेमंडळांना प्रांतिक कामाकरितां प्रत्यक्ष कर बसविण्याचा हक्क आहे.

रोमन-डच कायद्याच्या आधारावर जरूर तेथें स्थानिक वहिवाटीस अनुसरून, तेथील हल्लींचे कायदे बनविले आहेत. जोहान्सबर्ग येथें हायकोर्ट आहे. १९१० पासून प्राथमिक शिक्षणाव्यतिरिक्त इतर शिक्षण हें पार्लमेंटच्या हातीं व प्राथमिक शिक्षण प्रांतिक कायदेमंडळाच्या हातीं आहे. १९०७ पासून गोऱ्या मुलांच्या प्राथमिक शिक्षणाकरितां मोफत शिक्षणाच्या सरकारी शाळा काढल्या आहेत. त्यांत ७ पासून १४ पर्यंतच्या मुलांनीं गेलेंच पाहिजे असा नियम आहे. खासगी शाळांना सरकारी मदत नसते. प्रिटोरिआ, जोहान्सबर्ग वगैरे ठिकाणीं कॉलेजें आहेत.

एकंदर लोकसंख्येपैकीं शेंकडा २६.६९ लोक ख्रिस्ती आहेत. ख्रिस्ती लोकांपैकीं शेंकडा ८० गोरे आहेत. गोऱ्या समाजापैकीं जवळजवळ अर्धे लोक कोणत्यांना कोणत्या तरी डच प्रार्थनामंदिराचे अनुयायी आहेत. ६७८८२ अँग्लिकन्स आहेत. १९८२१ प्रेसबिटेरिअन्स व ३१८१२ मेथॉडिस्ट आहेत. गोऱ्या लोकांपैकी शेंकडा ३५ प्रॉटेस्टन्ट व बाकीचे रोमनकॅथोलिक, मेथाडिस्ट, प्रेसबिटेरिअन वगैरे आहेत व १५४७८ हिब्रू आहेत.

इ ति हा स.—१९ व्या शतकाच्या सुरुवातीस ट्रान्सवाल मध्यें बाव्हेंडा, बुशेमन व हॉटेंटाट वगैरे लोक असत. स. १८१७ च्या सुमारास माझी लीकाटझी नांवाच्या झुलू सरदारानें हा देश पादाक्रांत केला; तेव्हां बाव्हेंडा लोक उत्तरेस वाटरबर्ग कडे जाऊन राहिले. १८२९ व १८३६ च्या दरम्यान कांहीं ब्रिटिश व्यापारी ट्रान्सवाल येथें आले.

ब्रिटिश अंमलापासून विभक्त होऊन स्वतंत्र राज्य स्थापण्याच्या उद्देशानें बोअर लोकांनीं केप कॉलनी सोडली. १८३५ सालीं ट्रिचर्ड व जॅन व्हान रेन्सबर्ग यांच्या नेतृत्वाखालीं ९८ बोअरांनीं व्हाल नदी ओलांडून झुटॅन्सबर्ग गांठलें. रेन्सबर्गच्या हाताखालील लोक एतद्देशीयांकडून लवकरच मारले गेले पण ट्रिचर्डचे लोक १८३८ त बेचे किनाऱ्यास जाऊन लागले, तेथून ते नाताळला गेले. स. १८३६ त दुसऱ्या एका बोअर टोळीनें व्हेट नदीच्या तीरावर ठाणें दिलें होतें. या टोळीनें माझीलीकाटझीवर हल्ला करून त्याचें बरेंच नुकसान केलें. १८३८ सालीं माझीलीकाटझी लिंपोपोच्या पैलतीरास कायमचाच पळाला. व त्याचा प्रांत बोअराच्या हातीं आला आणि त्यांनीं मूई नदीच्या तीरावर वस्ती केली. होतां होईतों ब्रिटिशांचा संपर्क नको या हेतूनें या बोअर लोकांनीं डेलागोआबेकडे सरकून झुटपॅन्सबर्ग येथें वसाहत केली. व त्याच्या दक्षिणेकडील प्रदेशांत इतर बोअरांनीं वस्ती केली. स. १८४८ त प्रिटोरीअस हा बोअरांचा नायक होता. बोअरांचें स्वातंत्र्य मान्य करण्याच्या समर्थ ब्रिटिश सरकारनें याच प्रिटोरीअसच्या द्वारें त्यांच्याशीं बोलणें लाविलें होतें; १८५२ च्या जानेवारीच्या १७ व्या तारखेस बोअरांना ब्रिटिशांनीं स्वातंत्र्य दिलें. १८५३ सालीं पोटगिअर व प्रिटोरिअस हे दोन्ही पुढारी मरण पावले.

प्रिटोरिअसच्या मरणानंतर त्याचा मुलगा मार्थीनस हा पुढें आला. लहान लहान स्वतंत्र विभागांऐवजीं एक सुसंघटित मध्यवर्ती सरकार स्थापण्याचा प्रश्न यानें लोकांपुढें मांडला. तो लोकांना पसंत पडून एक नवीन शासनपद्धति निर्माण करण्यांत येऊन तिला दक्षिण आफ्रिकेंतील प्रजासत्ताक राज्य असें नांव देण्यांत आलें व लोकनियुक्त लोकसभेचा

( वॉलक्राद ) स्थापना करण्यांत आली. लोकसभेच्या अध्यक्षास एका कार्यकारी मंडळाची मदत असते. लोकसभा व कार्यकारी मंडळ या दोन्ही संस्थांचे सभासद यूरोपीअन रक्ताचे असले पाहिजेत अशी अट घालण्यांत आली. धार्मिक अथवा राजकीय कोणत्याहि बाबतींत काळ्या लोकांनीं बरोबरी करण्याचा प्रयत्न केल्यास तो खपणार नाहीं अशी सक्त ताकीद असे. ही नूतन शासनपद्धति १८५६ सालीं अंमलांत आली.

ही नूतन योजना झुटपॅन्सबर्ग व लिडनबर्ग येथील बोअरांनां प्रथम पसंत पडली नाहीं. याचें कारण तेथील बोअरांचा प्रिटोरिअसच्या घराण्यावर १८५२ पासूनच रोष होता. वडील प्रिटोरिअसनें सँडरिव्हर कन्व्हेन्शनवर जी सही केली ती आपल्या एकट्याच्या जबाबदारीवर व अहंमन्यतेच्या भरांत केली असा यांचा त्याच्यावर आरोप असे. तो राग यावेळीं त्यांनीं अशा रीतीनें काढला, पण नूतन लोकसभेनें तो चालू दिला नाहीं. शेवटीं १८६० सालीं झुटपॅन्सबर्ग व लिडनबर्ग हीं दोन्ही शहरें नूतन प्रजासत्ताक राज्यास येऊन मिळालीं. प्रजासत्ताक राज्याचा पहिला अध्यक्ष धाकटा प्रिटोरिअस हा झाला व राजधानी प्रिटोरिआ झाली.

ट्रान्सवालचा अध्यक्ष असतांहि त्याच वेळीं प्रिटोरिअसला ऑरेंजफ्रीस्टेटचाहि अध्यक्ष नेमण्यांत आलें. तेव्हां या दोन्ही प्रजासत्ताक राज्यांची एकी घडवून आणण्याचा प्रयत्न करण्याकरितां तो ब्लोएमफॉंटेन येथें गेला. लीडनबर्ग येथील लोकांनीं ट्रान्सवाल व ऑरेंजफ्रीस्टेट हीं एकत्रित करण्याच्या प्रयत्नाचा व दोन्ही ठिकाणचा एकाच वेळीं अध्यक्ष झाल्याबद्दल प्रिटोरिअसचा निषेध केला.आणि त्यामुळें त्रासून जाऊन प्रिटोरिअसनें ट्रान्सवालच्या अध्यक्षपदाचा राजीनामा दिला. प्रिटोरिअसचा पक्ष व लीडनबर्ग पक्ष या दोन विरोधी पक्षांत भांडण लागून कांहीं काळ ट्रान्सवालमध्यें बेबंदशाही माजली. तेव्हां स.१८६३ त प्रिटोरिअसनें ऑरेंजफ्रीस्टेटचें अध्यक्षपदहि सोडलें, व शिकस्तीनें त्यानें ही यादवी थांबविली.स.१८६४ त दोन्ही पक्षांत तडजोड होऊन पुन्हां प्रिटोरिअसलाच अध्यक्ष निवडण्यांत आलें.

अशा रीतीनें हा अन्तःकलह शमविण्यांत आला खरा, पण त्याचे परिणाम राज्यास भोंवल्यावांचून राहिले नाहींत. खजिना रिकामा झाल्यामुळें तो भरून काढण्याकरितां कडक उपाय अंमलांत आले. स.१८६५ त झुटपॅन्स येथील एतद्देशीयांनीं बंड उभारलें तेव्हां त्यांच्याशीं तह करून सरकारनें कसें तरी स्थिरस्थावर केलें ( १८६९ ).

याच सुमारास टाटी येथें सोन्याच्या खाणींचा शोध लागल्यामुळें अध्यक्ष प्रिटोरिअस यानें जाहीरनामा काढून उत्तरेस व पश्चिमेस आपल्या राज्याची सीमा वाढविली(१८६८). त्यायोगें बेचुआनालँड व डेलागोआबेचा कांहीं भाग दक्षिण आफ्रिकेच्या प्रजासत्ताक राज्यांत मोडूं लागला.इंग्लंड व पोर्तुगालनें या कृत्याचा निषेध केला.तेव्हां पोर्तुगालशीं तह होऊन पूर्व व पश्चिम मर्यादा ठरविण्यांत आल्या.

या गडबडींत ब्लोएमहॉफ जिल्हा प्रिटोरिअन सरकारच्या ताब्यांतून काढून घेण्यांत आला. या कृत्यामुळें संतापून प्रिटोरिअसनें अध्यक्षपदाचा राजीनामा दिला. तेव्हां थामसबर्गर्स हा अध्यक्ष झाला ( १८७२ ). याच्या कारकीर्दींत देशांत सर्वत्र अंदाधुंदी माजली. या बेबंदशाहीचें कारण त्याचा गैरमुत्सद्दीपणा होय. तेव्हां ही बेबंदशाही नाहींशी करण्यासाठीं इंग्रजांचा वसाहतमंत्री लॉर्ड कारनरव्हॉन याला कळवळा येऊन ट्रान्सवालची सुरक्षितता व सुबत्ता ब्रिटिश अमलाखालींच होणें शक्य आहे असें यानें ठरविलें व त्याच उद्देशाकरितां शेपस्टोन याला ट्रान्सवालमध्यें पाठविण्यांत आलें व त्यावेळच्या ( देशाच्या ) असहाय स्थितीचा फायदा घेऊन ट्रान्सवाल ब्रिटिश अमलाखालीं घेण्याचा जाहीरनामा काढण्यांत आला ( १८७७ ). त्यावेळीं हें कृत्य कित्येक इंग्रजांनां देखील आवडलें नाहीं, म्हणून इंग्रज सरकारतर्फे ह्या कृत्याचें पुढीलप्रमाणें समर्थन करण्यांत आलें. " खुद्द बोअरांनांच जर या कृत्यामुळें निरतिशय आनंद झाला तर दुसरा या कृत्याच्या आवश्यकतेचा व सरळपणाचा कोणता पुरावा पाहिजे ? " बोअरांनां हें कृत्य आवडलें असो वा नसो, पाल क्रूगरला मात्र तें मनापासून आवडलें नाहीं हें खास. या संबंधांत त्याच्या नेतृत्वाखालीं इंग्लंडला एक शिष्टमंडळ पाठविण्यात आलें. पण त्या मंडळाच्या मागणीस वाटाण्याच्या अक्षता लावण्यांत आल्या. स्वराज्य घ्या पण तें राणीच्या छत्राखालीं घ्या असा त्यांनां जबाब मिळाला. पुढें झुलू लोकांनीं ब्रिटिशांवर स्वारी केली असतां ( १८७९ ) स्वातंत्र्य मिळविण्याची हीच योग्य संधि असें वाटून बोअरांनीं ब्रिटिश सरकारास कुमक देण्याचें साफ नाकारलें. झुलु लोकांचा पराभव झाला पण ब्रिटिशांचेंहि अत्यंत नुकसान झालें. सेनापति वुल्से यानें यावेळीं बोअरांनां स्पष्ट सांगितलें कीं, यापुढें तुमच्यावर सतत ब्रिटिश सत्तेचा अंमल राहील. इकडे इंग्लंडमध्यें याच सुमारास ग्लॅडस्टन ह्यानें पार्लमेंटांत केलेल्या भाषणानें बोअर लोकांनां साहजिकच उत्तेजन आलें. ' ट्रान्सवालचा अपहार म्हणजे एक संभावित चोरी होय. या कृत्यामुळें इंग्लंडला मोठें लांछन लागलें आहे. ' अशाप्रकारच्या त्याच्या भाषणामुळें बोअर-चळवळ जास्तच फोंफावली. अशा आणीबाणीच्या प्रसंगींहि जेव्हां त्यांच्यावर करांचें नवीन ओझें लादण्यांत येऊं लागलें तेव्हां तर त्यांचा त्वेष अनावर झाला. एका शेतकऱ्यानें कर न भरल्यामुळें त्याच्या गाड्या धरण्यांत आल्या, त्या लोकांनीं बळजबरीनें सोडविल्या. परिस्थितीनें उग्र स्वरूप धारण केलें व बोअरांनीं प्रचंड सभा भरवून लोकसत्ताक राज्य पुकारलें. प्रिटोरिअस, क्रूगर व जॉबर्ट या तिघांच्या मंडळाला तात्पुरतें लोकसत्ताक सरकारचे सर्व अधिकार देण्यांत आले व इंग्रजांबरोबर लढाईस सुरवात झाली. या लढायांत माजुबा हिल येथील

लढाई अत्यन्त महत्त्वाची होय ( १८८१ ); तींत सर जॉर्ज कोले हा मारला गेला व बोअर विजयी झाले. अर्थात तडजोडीच्या बोलण्यास सुरवात झाली. ट्रान्सवालला इंग्रज अधिराज्याखालीं पूर्ण अन्तःस्वातंत्र्य देण्याचें ठरलें, व बोअरांनीं नाहीं होय करतां करतां मान्य केलें. व त्याप्रमाणें सर्व राज्यकारभार वरील तिघा पुढाऱ्यांच्या हातीं सोंपविला ( ८ आगष्ट १८८१ ). तिघांपैकीं क्रूगरला १८८३ मध्यें अध्यक्ष निवडण्यांत आलें.

या प्राप्त झालेल्या विजयामुळें राज्यमर्यादा विस्तृत करण्याची तेथील बोअर लोकांची हांव मात्रच वाढली. पश्चिम सरहद्दीवरील बोअरांनां त्यांच्या प्रांतांतून हुसकावून देऊन त्या जागीं स्टेलालँड व गॉशेन हीं प्रजासत्ताक राज्यें स्थापण्यांत आलीं. लार्ड डर्बी या वसाहतमंत्र्याच्या निषेधास न जुमानतां हीं दोन प्रजासत्ताक राज्यें संयुक्त करण्यांत आलीं. ( १८८३ ). पाल क्रूगर वगैरे पुढाऱ्यांची इच्छा ब्रिटिश सत्तेचा थोडा देखील संपर्क नसलेलें निर्भेळ स्वातंत्र्य मिळविण्याची होती त्यावद्दल खटपट करण्याकरितां क्रूगर लंडन येथें लार्ड डर्बीला भेटला. याचा परिणाम स.१८८४ चें लंडन कन्व्हेन्शन भरविण्यांत होऊन ट्रान्सवालला बेचुआनालँड सरहद्दीवर कांहीं सवलती मिळाल्या.

पश्चिम सरहद्दीवरील मुलुख काबीज करून बोअरांच्या राज्यतृष्णेला खुलें असलेलें पश्चिमद्वार ब्रिटिशांनीं बंद केलें तेव्हां बोअरांच्या साम्राज्यलालसेचा लोंढा पूर्वेकडे वळाला. १८८४ सालीं डिनिझुलु याला झुलु राज्यावर बसविल्यामुळें बोअरांनीं झुलु लोकांपासून पारितोषिक म्हणून थोडा मुलुख घेतला व त्याचा ट्रान्सवालच्या राज्यांत समावेश करून घेतला (१८८८) व थोड्याच वर्षांत त्यांनीं स्वाझीलँडहि काबीज केला. याच सुमारास जोहान्सबर्ग, बारबर्टन वगैरे ठिकाणीं नवीन सोन्याच्या खाणींचा शोध लागल्यामुळें जमीनीचीहि किंमत चढली व ट्रान्सवालच्या खजिन्यांत अतोनात धनसंचय झाला. जमीनीची किंमत इतकी चढली कीं सबंध जमीनीपैकीं ⅓ जमीन बोअर सरकारनें युटिलँडर लोकांनां विकून टाकली. सोन्याच्या खाणीचा धंदा किफायतशीर होण्याचें कारण, युटिलँडर लोकांचे श्रम होत. पण या लोकांनां राजकीय अथवा व्यापारी सवलती कांहींच न मिळाल्यामुळें हे लोक असंतुष्ट असत. आपल्या गाऱ्हाण्यांची योग्य दाद लावून घेण्याकरितां चळवळ करण्याचें ठरवून त्यांनीं संघ स्थापन केले. ट्रुडहोप हा त्यांचा पुढारी होता. सर्व नागरिकांनां समान हक्क देणें, मक्त्यांचीं व त्यावरोबरच इतर गाऱ्हाणीं नाहींशीं करणें हे या संघांचे उद्देश होते. संघाच्या प्रतिनिधींनीं क्रूगरची भेट घेतली परंतु त्यानें त्यांनां हात हालवीत परत पाठविलें.

लंडन कन्व्हेन्शनच्या अटींत ब्रिटिशसाम्राज्यछत्रासंबंधीं लेखी उल्लेख जरी नसला, तरी ट्रान्सवाल हें ब्रिटिश साम्राज्यसत्तेखालील स्वराज्योपभोगी राष्ट्र होय, असा निदान समज तरी त्यांत अन्तर्भूत होता व क्रूगरला हेंच नको होतें. १८९५ त इंग्रजांनीं टोंगालँड व कॉसोबे हीं आपल्या राज्यास जोडलीं. ट्रान्सवालला चांगलेसें बंदर नसल्यामुळें क्रूगरचा कॉसोबेवर फार दिवसांपासून डोळा होता. अर्थातच या कृत्याचा त्यानें जोरानें निषेध केला.

१८९५ च्या आगस्टांत युटिलँडर्सनीं आपलीं गाऱ्हाणीं पुनः क्रूगरला कळविलीं. पण या खेपेसहि त्यांनां तरवारीच्या जोरावर वाटल्यास हक्क मिळवा असें त्यानें सडेतोड उत्तर दिलें. आपल्याच उद्योगामुळें सरकारचा खजिना फुगत असतां आपणाला मतदानाचा हक्क मिळूं नये, हें युटिलँडर्सनां खपलें नाहीं. शेवटीं त्यांनीं बंड करण्याचें ठरविलें. परंतु त्यांचा कट फसला व मुख्य मुख्य पुढाऱ्यांस फांशीं देण्यांत आलें व जोहान्सबर्ग येथील लोकांचीं हत्यारें काढून घेतलीं.

शेवटीं युटिलँडर्सनीं व्हिक्टोरिया राणीकडे विनंति-अर्ज पाठवून मदतीची याचना केली. याचा परिणाम असा झाला कीं, ब्लोएमफॉटेन येथें एक परिषद भरून युटिलँडर्सचा प्रश्न सर आल्फ्रेड मिलनर यानें क्रूगरपुढें मांडला. परंतु तेथेंहि समाधानकारक निकाल लागला नाहीं कांहीं तरी निर्वाणीचा उपाय योजिल्याशिवाय प्रेसिडेंट क्रूगर या बाबतींत नमणार नाहीं असें इंग्रजी जनतेचें मत बनलें उलटपक्षीं युटिलँडर्सचा प्रश्न हा आमच्या अंतःकारभाराचा आहे व इंग्लंडला त्यांत हात घालण्याचा कांहीं एक अधिकार नाहीं असें क्रूगर प्रतिपादूं लागला. दोन्ही देश सैन्यांची जमवाजमव करूं लागले. ट्रान्सवालसरकारनें राणीसरकाराकडे निर्वाणीचा खलिता धाडला व ४८तासांच्या आंत त्याचें उत्तर मागितलें(९।१०।१८९९). उत्तर न धाडतां इंग्लंड युद्धास तयार झालें व ट्रान्सवालच्या पश्चिम सरहद्दीजवळ युद्धास तोंड लागलें.

लढाईच्या सुरवातीस बोअर लोकांनीं चांगलीच मर्दुमकी गाजविली. लेडीस्मिथला बोअर सैन्याचा अभेद्य वेढा पडला. इंग्रज सेनापति बुलर यानें बोअर सैन्यावर लागोपाठ हल्ले केले पण त्याचा कांहींच उपयोग होईना व बोअरांनांच विजय मिळण्याचा रंग दिसूं लागला. इतक्यांत सेनापति रावर्ट्स तेथें येऊन ठेपला; व त्यानें मोठ्या शिकस्तीनें लेडिस्मिथ येथील वेढा उठविला ( फेब्रु० २८ ); बोअर सेनापति क्रॉजे ब्रिटिश सैन्यास शरण गेला. या पराभवामुळें बोअरांचा दम थोडा खचला. रॉबर्ट्स यानें ब्लोएमफॉटेमवर चाल केली, व नंतर त्याचें सैन्य ऑरेंजफ्रीस्टेटच्या राजधानींत शिरलें ( १३ मार्च १९०० ). इतक्यांत बोअरांचा प्रख्यात सेनापति डीवेट यानें आपल्या फौजांची जमवाजमव करून ब्रिटिश सेनानींचा ठिकठिकाणीं पराभव केला व रावर्ट्स याच्या चढावाच्या धोरणास आळा घातला.

आपल्या ढिलाईचा फायदा बोअरांनीं घेतला असें पाहून रॉबर्ट्स यानें तावडतोब सैन्याचा बंदोबस्त करून प्रिटोरिआवर चाल केली. मॅफेकिंगची मुक्तता करून ( १७ मे ) जोहान्सबर्ग काबीज करण्यांत आलें ( ३१ मे ) व ऑरेंज

फ्रीस्टेट ब्रिटिश अंमलास जोडलें; आणि ५ जूनच्या ट्रान्सवालची राजधानी प्रिटोरिआ ब्रिटिशांच्या हस्तगत झाली.प्रिटोरिआ पडलें तरी डीवेट हातीं लागला नाहीं. मात्र ब्रिटिश सैन्यानें वोथाचा बेलफास्ट येथें पराभव केला (२७ आगष्ट) व क्रूगर यूरोपमध्यें पळून गेला; आणि सरतेशेवटीं ट्रान्सवाल ब्रिटिश राज्यास जोडण्यांत आलें ( २५ आक्टो. ).

इतकें झालें तरी डीवेट हा अजून इंग्रजांचा पिच्छा सोडीना. केप कॉलनी व ऑरेंजरिव्हर वसाहतींतील लोकांना यानें त्यांच्याविरुद्ध उठविलें, तितक्यांत बोथानेंहि मिडलवर्ग रेल्वेवरील ठाणीं घेतलीं.१९०१च्या फेब्रुआरीच्या १० व्या तारखेस तिकडे डीवेटनें केप कॉलनीवर चाल केली पण त्यांत त्याचा पराभव झाला ( १० फेब्रु. १९०१ ) व इंग्रज सेनापति फ्रेंच यानेंहि बोथाला पळावयास लाविलें. शेवटीं यापुढें विरोध करणें निष्फळ आहे असें ठरवून बोथानें किचनेरशीं तहाचें बोलणें लाविलें पण त्याचा उपयोग झाला नाहीं.

आगस्टमध्यें इंग्रजांनीं जाहीरनामा काढला कीं जे बोअर पुढारी शरण येणार नाहींत त्यांना दक्षिण आफ्रिकेंतून कायमचे हद्दपार करण्यांत येईल. पण या धमकावणीचा उपयोग झाला नाहीं. केपकॉलनींत फिरून बंडाळी माजून लष्करी कायदा पुकारण्यांत आला. बोअरांचा जमाव अजून २५००० होता. जानेवारी ( १९०२ ) मध्यें बोअर सेनापति व्हिलजोएन यास पकडण्यांत आलें. शेवटीं नाइलाजानें बोअर सरकारचे प्रतिनिधी प्रिटोरिआ येथें आले व त्यांनीं इंग्रजांशीं तहाचें बोलणें चालविलें नंतर व्हेरीनीगिंग येथें जनरल केंप याच्या अध्यक्षतेखालीं प्रतिनिधींची सभा भरून तहाच्या अटी ठरविल्या. लष्करी राज्यव्यवस्था मोडून पूर्वीप्रमाणें मुलकी राज्यव्यवस्था सुरू करण्याचें व एतद्देशीयांच्या मताधिकाराच्या प्रश्नाचा विचार स्वराज्य मिळाल्यानंतर करण्याचें ठरलें. ट्रान्सवाल हें विटिश अंमलास याच्या अगोदरच जोडण्यांत आलें होतें. रॉबर्ट्स परत गेल्यावर त्याच्या जागीं सर आलफ्रेड मिलनर हा आला. त्यानें ट्रान्सवालच्या राज्यव्यवस्थेची पुनर्घटना केली. न्याय, कायदा, जमाबंदी, वगैरे खात्यांत सुधारणा करण्यांत आल्या व जोहान्सबर्गला एक शहर-कौन्सिल देण्यांत आलें. पुढें मिलनरला ट्रान्सवालचा गव्हर्नर करण्यांत येऊन व त्याच्या मदतीस एक कार्यकारी मंडळ स्थापून लष्करी राज्यव्यवस्थेची समाप्ति करण्यांत आली ( २१ जून ). यानंतर ट्रान्सवालला प्रातिनिधिक राज्यपद्धति मिळावी म्हणून चळवळ सुरू झाली व शेवटीं ही मागणी इंग्लंडनें कबूल केली ( १९०४ ) आणि त्याप्रमाणें १९०५ सालीं ट्रान्सवालला स्वराज्य मिळालें व जनरल बोथा याच्या हाताखालीं एक प्रधानमंडळ बनविण्यांत आलें. या प्रधानमंडळानें ब्रिटिश हिंदी लोकांचा हक्क झिडकारून ट्रान्सवाल हा गोऱ्या लोकांचाच देश राखण्यांत येईल, असा आपला निश्चय जाहीर केला. स्वतःला नोंदून न घेतल्यामुळें मोहनदास करमचंद गांधी व इतर हिंदी पुढाऱ्यांना तुरुंगांत टाकलें व ८००० हिंदी लोकांना हद्दपार केलें ( १९०९ ). नोंदणीचा कायदा न पाळल्यामुळें २५०० लोकांना बंदिवास पत्करावा लागला.

दक्षिणआफ्रिकासंघ ज्यावेळीं स्थापन करण्यांत आला त्यावेळीं जनरल बोथा याला संयुक्तप्रधानमंडळाचा मुख्य प्रधान करण्यांत आलें. पुढें ट्रान्सवालचा समावेश यूनीअन ऑफ साऊथ आफ्रिकेंत करण्यांत येऊन त्याची राजधानी प्रिटोरिया येथें केली ( ३१मे १९१० ). या यूनीअनवर एक इंग्रज गव्हर्नरजनरल असून, त्याच्या मदतीस एक कार्यकारीमंडळ व एक ( ४५ सभासदांचें ) कायदेमंडळ आहे. गव्हर्नर जनरलचा पगार वार्षिक १०००० पौंड आहे. ट्रान्सवालमध्यें सर्वांत मोठें शहर जोहान्सबर्ग आहे; कारण सोन्याच्या खाणींच्या प्रांतांतील तें मुख्य ठाणें आहे. कायदेकौन्सिलचा ठराव नामंजूर करण्यास गव्हर्नर जनरलला व्हेटोचा अधिकार आहे.

एक हार्बर आणि रेल्वे बोर्ड असून त्याच्या ताब्यांत आगगाड्या व बंदरें दिलीं आहेत; याच्या कामासाठीं रेल्वे व हार्बर फंड असून, त्याचा खर्च आगगाड्या व बंदरांतील व्यापार यांच्या उत्पन्नांतून भागविला जातो.

डच व इंग्लिश या दोन्हीहि भाषा सरकारदरबारीं चालू आहेत. आशियाटिक व तद्देशज लोकांच्याबद्दल कायदेकानु करण्याचा अखेरचा अखत्यार ग. जनरल व त्याचें कौन्सिल यांच्या हातांत असतो.

कोळशाच्या खाणीपासून बरेंच उत्पन्न होतें; देशांत एकंदर ५ हजार चौ. मै. चा प्रदेश या खाणींखालीं असून त्यांतून ६६४१२२९ टन कोळसा सन १९१७ त बाहेर निघाला. देशांत मीठहि बरेंच बनतें; वरील सालीं १३४७६ टन मीठ निघालें. देशांत एकंदर १६०० च्यावर निरनिराळे कारखाने आहेत. यांतून खाद्यपेयांचे निरनिराळे पदार्थ तयार करणें, धातूंचे पत्रे, दळण्याच्या चक्क्या, विटा, कौलें, तंबाखूचे पदार्थ, साबू, मेणबत्त्या, एन्जीनियरिंगचीं यंत्रें, चाकू, कात्र्या, कापड, सूत वगैरे तयार करतात. सोनें व हिऱ्यांच्या खाणीपासून फार उत्पन्न होतें. सन १९१७ मध्यें ३८३०६३८१ पौंड किंमतीचें सोनें व १६६७२९९ पौंडांचे हिरे बाहेर पडले.

युनिव्हर्सिटीखेरीज बाकीचें शिक्षण सोपीवखात्याकडे आहे. प्रत्येक शाळेंत मुलांच्या पालकांनीं निवडून दिलेल्या लोकांची एक कमिटी असते व तिची देखरेख शाळेवर असते. बहुतेक ( वरिष्ठ शिवाय ) शिक्षण मोफत आहे. १९२१ सालच्या खानेसुमारीप्रमाणें ट्रान्सवालमध्यें हिंदी लोकांची संख्या १३४०५ आहे.

[संदर्भग्रंथः—डयूकेन–हिस्टरी ऑफ दि वार इन साउथ आफ्रिका; बोथा–बोअर टु बोअर; ब्राईस–इम्प्रेशन्स ऑफ आफ्रिका; केसविक–ट्रान्सवाल वॉर; फिटझ पॅट्रिक–ट्रान्सवाल फ्राम वुइदिन; क्रूगर–मेमॉयर्स; लीडस–अनेक्झेशन ऑफ

ट्रान्सवाल; नेविङ्गनसन–लेडीस्मिथ; प्राग-ट्रान्सवाल अँड इस्ट् माईन्स.]

**ट्राम्वे**—हमरस्त्यांतून, लोकांनां जाण्यायेण्याकरितां रुळावरून, जनावरांच्या किंवा यंत्रशक्तीच्या साहाय्यानें चाल-णाऱ्या गाडीस ट्राम्वे असें म्हणतात. कधीं कधीं हिचा उपयोग सामान वाहतुकीकडेहि करितात. जमीनीखालून किंवा वरून कोळसा व इतर माल नेण्याकरितां, व इतर उपयोगाकरितां, लहानशा आगगाडीसहि ट्राम्वे असें नांव आहे. पहिली ट्राम्वे न्यूयार्क शहरीं इ.स. १८३२त बांधली. हिच्या चाकांनां बाहेरच्या बाजूस कडा असत. ह्या तऱ्हेच्या ट्राम्वे लवकरच नामशेष झाल्या. पुढें इ. स. १८५२ त एका फ्रेंच एंजिनि-यरनें नवीन तऱ्हेची ट्राम्वे न्यूयार्क शहरींच तयार केली. त्यानें प्रथम रस्त्यावर जेथें रूळ घालावयाचे त्याच्याखालीं लांकडी तुळयांचें अंथरूण घातलें आणि त्याजवर वरच्या अंगाला मध्यभागीं खोवण असलेले रूळ घातले. रुळांनां पाडलेली खोवण रेल्वेच्या चाकाप्रमाणें, ट्राम्वेचीं कडा असलेलीं चाकें त्यांत बसण्याकरितां केलेली असे. ती ह्या अमेरिकन तऱ्हेच्या ट्राम्वेंनां धोक्याची आहे असें उघडकीस आलें. तेव्हां ह्यावर उपाय म्हणून इ. स. १८५५ त फिलाडेल्फिया येथें रूळ– त्याच्या एका कडेला अदमासें ⅞ इंच उंच पायरी केलेला असा– वनविण्यांत आला. इ. स. १८६० मध्यें इंग्लंडांत जेव्हां ट्राम्वे आल्या, तेव्हां वरच्या रुळासारखे रूळ वापरण्यांत आले.

इंग्लिश लोकांस ह्या पायरीच्या रुळाचा त्रास वाटूं लागला तेव्हां लंडनमधील बहुतेक ठिकाणचे हे रूळ काढून टाकावे लागले. अशा रीतीनें इकडे युनायटेड स्टेट्समध्यें पायरीचा रूळ नमुनेदार झाला तर तिकडे यूरोपमध्यें खोवण पाडलेला रूळच बहुतेक उपयोगांत येऊं लागला. ट्राम्वेच्या दृष्टीनें पाहिलें असतां, पायरीच्या रुळापासून पुष्कळ फायदे आहेत; कारण खोवणींत बर्फ, घाण वगैरे सांठून रहाते व वळणाच्या ठिकाणीं चाकांच्या कडांनां विरोध होतो. तथापि, खोवणीच्या रुळापासून इतर वाहानांनां त्रास होत नाहीं. कांहीं अमेरिकेंतल्या मोठमोठ्या शहरीं हे रूळ वापरूं लागले आहेत.

इ. स. १८७० मध्यें ट्राम्वेज् अॅक्ट केल्यापासून तिची वाढ फार झपाट्यानें झाली. चपटा खोवणीचा रूळ लांक-डावर पक्का करून कांक्रीट घालून तयार केलेल्या जमीनींत बसवीत. आतांपर्यंत ट्राम्वे रस्ता तयार करण्यामध्यें फरक झाला असेल तर तो रुळाच्या नमुन्यांमध्यें आणि कांक्री-टच्या पायावर तो बसविण्याच्या पद्धतीमध्येंच; इतर कोठें नाहीं. रुळाचा खालचा भाग चपटा असल्याकारणानें, लेव्हलेंत त्याला ताठपणा अथवा जोर नसे; त्याकरितां दोन्ही कडांनां खालच्या बाजूस दोन पट्या बाढवि-ण्यांत आल्या. या पट्या खालच्या लांकडांत गच्च बसत असल्याकारणानें लेव्हलेंत, वरच्या बाजूस जोर येऊन सपा-टीवरहि सरकण्याची भीति राहिली नाहीं.

ह्यापुढील फरक म्हणजे इ. स. १८७२ मध्यें किंकडनें रूळ बसविण्यासाठीं लोखंडाच्या खोवणीवजा ओतीव खुर्च्या उपयोगांत आणल्या. तेव्हां त्याकरितां रुळहि बदलावे लागले. दोन कडेच्या पट्याऐवजीं त्या खुर्च्यांमध्यें मधोमध नीट बसेल अशी एकच पट्टी जोडून रूळ तयार केला. जेव्हां १८८० सालीं वाफेच्या शक्तीनें वाहनें ओढण्यास सुरवात झाली तेव्हां ह्या वरील रुळाच्या तऱ्हा मोडून आगगा-डीच्या रुळासारखे खालीं रुंद बैठक असलेले नवे रूळ काढले. त्यांची जाडी व भरीवपणा फार उपयोगी पडला. दुसऱ्या प्रका-रच्या रुळांमधील सर्व दोष त्यांत नाहींसे झाले आहेत. हेच रूळ चांगले तयार होऊन, हल्लीं सर्व जगभर ट्राम्वेकरितां वापरतात.

यूरोपमध्यें उपयोगांत असणाऱ्या ट्राम्वेच्या रुळांस बहु-तेक एका कडेला खोवण असते. तींतील माती, केर, चाकाच्या कडांच्यायोगें बाहेर पडतो. कांहीं थोड्या रुळांनां मधोमध खोवण असते. रुळांमधील अंतर सर्व ठिकाणीं सारखें नसतें. लंडन वगैरे कांहीं मोठ्या शहरीं ४ फू. ८॥ इंच हें रुळांमधील ठराविक अंतर दृष्टीस पडतें. विजेची शक्ति उपयोगांत आल्यावर गाड्यांचें वजन व वेग हीं वाढलीं व त्यामुळें रूळ निरुपयोगी ठरून भारी वजनाचे (एक यार्ड लांब रुळाचें वजन ९५ ते १०० पौंड असणारे) रूळ वापरावे लागले; तेव्हां रुळाचे प्रकार वारंवार बदलूं लागल्यानें, कारखानदारांस त्रास होऊं लागला; म्हणून १९०३ सालीं एंजिनियर स्टॅन्डर्ड कमिटीनें "स्टॅंडर्ड ट्राम्वे" रुळाची लांबी रुंदी वगैरे मापें ठरवून टाकिलीं.

**वाफेनें आणि तारांच्या योगें चालणाऱ्या ट्राम्वे.**—खडकाळ प्रदेशांत घोडे ओढीत असलेल्या गाड्या चाल-ण्यास फार अडचण पडते; म्हणूनच ट्राम्वेच्या इतिहासांत वाफेच्या शक्तीनें आणि तारांनीं ओढल्या जाणाऱ्या गाड्यांचे उल्लेख आहेत इंग्लंडांत १८८० सालीं वाफेच्या इंजिनमध्यें पुष्कळ सुधारणा केल्यानंतर ट्राम्वेकडे ह्या साधनाचा उपयोग करण्यांत येऊं लागला. तारांची पहिली ट्राम्वे १८७३ मध्यें सॅन्स फ्रॅन्सिस्कोमध्यें तयार केली. इ. स १८८४ सालीं याची सुरवात झाली. या तऱ्हेच्या ट्राम्वेकरितां रस्ता तयार करण्याला फार खर्च येतो व त्यांचा वेगहि कमी असतो म्हणून त्या हल्लीं मुळींच प्रचारांत नाहींत म्हटल्यास चालेल. एडिंबरो, बर्मिंगहॅम, म्याटलाक्, ब्रिक्स्टन वगैरे थोड्या ठिकाणीं अशा तऱ्हेची ट्राम्वे उपयोगांत आणलेली आहे. फक्त सामान्य पृष्ठाकर्षणाला भारी असा चढउतार आक्रमण्याच्या कामीं हिचा चांगला होतो. ह्या ट्राम्वेकरितां लागणाऱ्या तारा ज्यांतून जातात असे नळ तयार करून रस्तोरस्तीं घालणें हें फार खर्चाचें काम आहे.

विजेच्या ट्राम्वे.—सध्यां वीज ही ट्राम्वेची सर्वसामान्य चालक शक्ति होऊन बसली आहे. ही तीन पद्धतींनीं उपयोजितात ( १ ) डोक्यावरची ( उंचीची ) किंवा ट्रॉलीची पद्धत. ( २ ) उघड्या नळांची पद्धत. ( ३ ) पृष्ठसंयोगाची ( किंवा झांकलेल्या नळांची ) पद्धत.

(१) डोक्यावरची ट्रॉलीः—ह्या पद्धतीनें चालणाऱ्या गाड्यांस विद्युत्प्रवाह डोक्यावर असलेल्या दोन विद्युत्‌ग्राहक तारांकडून पोहोंचतो. हे विद्युत्वाहक हमेशा रुळापासून अदमासें २१ फूट उंच बांधलेले असतात. तारांकरितां रस्त्यांवर अदमासें ४० यार्ड लांबीवर खांब रोंविलेले असतात.

(२) उघडे नळः—कांहीं शहरांतून हे उंचीवरून नेलेले विद्युद्वाहक खपत नाहींत तेव्हां त्याकरितां उघड्या नळ्यांच्या आणि पृष्ठसंयोगाच्या ट्राम्वे तेथें उपयोगांत आणलेल्या असतात. ह्या नळांच्या पद्धतींत विद्युद्वाहक रस्त्यांखालून नेलेले असतात व विद्युत्प्रवाह गाड्यांनां केलेल्या हलाक्रांति विद्युत्कर्षकाच्या द्वारां वर खेंचला जातो. ह्यांत दोन प्रकार आहे. एकांत नळ कडेला एका रुळाखालीं असतो व दुसऱ्यांत तो दोन रुळांच्या मध्यें असतो. पहिल्या प्रकारच्या ट्राम्वे इंग्लंडांत फक्त बोर्नमौथ येथेंच आहेत; पण व्हिएन्ना, ब्रुसेल्स, पॅरिस, बर्लिन व बुडापेस्ट येथें ह्याच ट्राम्वेंचा उपयोग केला आहे. मधोमध नळ बांधलेले आहेत अशा ट्राम्वे लंडन, बोर्डो, न्यूयार्क, वाशिंग्टन वगैरे ठिकाणीं आढळतात. कडेला नळ घालण्यांत कांहीं फायदे आहेत. रस्ता तय्यार करण्यास खडी कमी लागते, फरसबंदीचा फारसा नाश होत नाहीं व बांधकामास खर्च कमी येतो. हे नळ सिमेंट कांक्रीटचे बांधलेले असतात. यांत मोठी अडचण जी असते ती नळ्यांतून घाण व पाणी सांचतें ही होय. लंडनच्या ट्रामरस्त्यावर ६० यार्डांच्या अंतरानें विहिरी बांधल्या आहेत. त्यांत नळांतील हें घाण पाणी पडतें; या विहिरी गटारांनां जोडून दिल्या आहेत. तेव्हां या नळाच्या पद्धतीस मोठी हरकत म्हणजे तिला लागणारा जबरदस्त खर्च. उंचावरच्या ट्रालीपद्धतीनें जर दर मैलीं, सिंगल लाईनला ८००० पौंड खर्च आला तर ह्या पद्धतीस १३००० पौंड खर्च येतो.

(३) पृष्ठसंयोगः—ह्या बांधणीचा जबरदस्त खर्चच पृष्ठसंयोग पद्धत शोधून काढण्यास कारणीभूत झाला. ह्या पद्धतीचे अनेक नमुने निघाले. ह्यांतील सर्वसाधारण घटना म्हणजे, रस्त्यांत दोन रुळांच्या मध्यभागीं लोखंडी घोडे ठेविलेले असतात; त्यांमधून विद्युत्प्रवाह गाडींतील यांत्रिक जोड्यांत जातो. हे घोडे एकमेकांपासून १० । १५ फूट अंतरावर असतात; यांनां फिरती विजेची कडी असते, ती गाडीखालील लोहचुंबकाच्यायोगें उभी राहून विद्युत्संग्राहक जोड्याला लागतो व अशा रीतीनें गाडीला गति मिळते. पृष्ठसंयोग पद्धतीच्या ट्राम्वेगाडीवर विद्युत्संग्राहक जोडा व लोहचुंबक ह्यांचें वजन फार भरतें व लवकर लवकर एक जोडा बदलून दुसरा घ्यावा लागतो. रस्त्यानें जाणाऱ्या वाहनांत कार्यक्षमवाहन कोणतें हें ठरवावयाचें असल्यास, घातलेल्या भांडवलाचा योग्य मोबदला देऊन, रस्त्याची खराबी न करतां लोकांच्या नेहमीं व चटकन उपयोगीं पडणाऱ्या सोयींवार याच गाड्या होत असेंच म्हणावें लागेल.

रुळावरून चालणाऱ्या ट्रामगाड्या प्रवासास पूर्वींच्या साध्या गाड्यांपेक्षां फार सुखकर वाटूं लागल्या. घोडे जुंपलेल्या वाहनांचें वजन कमी असे, म्हणून भरधांव चालणारी, जास्त, मोठ्या व अधिक सोयींच्या वाफेच्या गाड्या त्या ठिकाणीं आल्या. पण ह्यांत दोष म्हणजे, कमी शक्ति व गाड्या कितीहि जरी हलक्या केल्या तरी बांधण्यास व बाळगण्यास खर्च फार. तारांनीं चालणाऱ्या गाड्यांस, जर नफा करून घ्यावयाचा असेल तर वाहतुक जास्त लागते. ह्यांचा फायदा हाच कीं, विकट चढउतारावर अशा गाड्या सुरक्षितपणें जाऊं शकतात व एकदां सुरवात करून दिल्यावर पुढें खर्च कमी येतो.

विद्युच्छक्तिसंचायक गाड्यांचे प्रयोग १८९० सालीं बार्मिंगहॅम येथें करून पाहिले पण पुढें असमाधानकारक व निरुपयोगी म्हणून त्याचें नांव टाकलें. या गाड्यांनां खर्च फार लागे व त्या मानानें शक्तिसंचय फार कमी होऊन उलट विद्युदुत्पादक भांड्यांचेंच वजन त्यांवर फार होई. ज्यांनां बाहेरून विद्युच्छक्तीचा पुरवठा होतो अशाच विजेच्या गाड्या फायदेशीर होतात. एक गाडीचें वजन कमी, वेग पाहिजे तितका जास्त, शक्तिसंचय मोठा, गाडींत स्वच्छता, व आवाज कमी. विजेच्या नळांच्या (विद्युन्नलिकेच्या) ट्राम्वेंत जसे फायदे आहेत तसे तोटेहि पण आहेत. त्याचप्रमाणें पृष्ठसंयोगाच्या ट्राम्वेमध्येंहि, कांहीं गैरसोयी आहेत.

कृतींत सोपी म्हटली तर डोक्यावरच्या पद्धतीची ट्राम्वे पहिली येईल. हिच्यांतील विद्युद्वाहक आटोक्याबाहेर उंच असून त्यांनां विद्युत्स्थापकांची दुहेरी तिहेरी आवरणें लागतील तशीं करतां येतात. हिच्या खांब व तारांपासून रस्त्यांत कांहीं अडथळा येत नाहीं; व विद्युत्शक्तीच्या पुरवठ्यास अतिशय पाऊस, बर्फ किंवा इतर हवेंतील फरक ह्यांपासून विरोध येत नाहीं.

ट्राम्वे गाड्या.—प्रचलित ट्राम्वे गाडीचे दोन भाग पाडतां येतील. (१) बैठक व(२)वरखालीं होणारी साटी. साटी हा एक सांगाडा असून स्प्रिंगच्या योगानें खोबळ्यावर (तुंब्यावर ) बसविला असतो आणि पुन्हां ह्या सांगाड्यावर स्प्रिंग घालून बैठक बसविली असते. साटीमध्यें चालक ( मोटार ) यंत्रें असतात. हल्लींच्या गाडीच्या बैठकी, एका चार चाकी न फिरत्या साटीवर किंवा दोन चार चाकी फिरत्या साट्यांवर बसविलेल्या असतात. न फिरत्या साटीच्या पुढील व मागील चाकजोडीमधील अंतर सहापासून सात फुटांपर्यंत असतें व तें अवघडांत अवघड व सूक्ष्म वळणा(वांका)च्या

त्रिज्येवरून ठरवितात. एका गाडीवर बहुतांशीं दोन चालक ( मोटार ) यंत्रें असतात.

ग्रेटब्रिटन व आयर्लंडमध्यें दुमजली ट्रामगाड्या फार आहेत. त्यांतून एकमजली गाड्यांपेक्षां दुप्पट माणसें बसून शिवाय नोकर लोक व विद्युच्छक्ति जवळ जवळ तितकीच लागते. एक मजली गाड्या आटपशीर व वेगवान् असतात. ह्याखेरीज आणखी कांहीं ट्रॅम्‌गाड्यांच्या तऱ्हा आहेत; पण त्या फारशा उपयोगीत नाहींत.

व्या पा री मा हि ती.—विद्युद्वाहनांत व्यापारी दृष्टीनें बराच फायदा आहे. विजेच्या ट्रॅम्वेच्या तीन पद्धतींपैकीं पहिलीला ( डोक्यावरची ट्रॉली पद्धत ) खर्च कमी येतो. त्या तिन्ही पद्धतींच्या खर्चाचें प्रमाण २, १॥ आणि १ असें आहे. ब्रिटिश ट्रॅम्वे सुरू करण्याच्या वेळीं अंदाजानें तिच्या खर्चाचे आंकडे तयार केले होते ते पुढें दिले आहेत. हे आंकडे सिंगल लाईनला दर मैली खर्चाचे आहेत.

| भांडवल | पौंड |
|---|---|
| कायम रस्ता बाँडिंग धरून | ५०५० |
| डोक्यावरच्या पद्धतीची सामुग्री | ७५० |
| पोषक तारा | ४०० |
| गाड्या प्रत्येक ७०० पौंड | २१०० |
| गाड्या ठेवण्याकरितां पडव्या वगैरे | १२०० |
| एकंदर | ९५०० |

| चालविण्याचा खर्च दर ( गाडीच्या ) मैली. | पेन्स |
|---|---|
| विद्युत्शक्ति | १·५० |
| ड्रायव्हर व कंडक्टरचे पगार | १·१० |
| पडव्यांना खर्च, मजुरी व सामान | ०·५५ |
| इतर कांहीं खर्च | ०·९० |
| मोडतोड वगैरे | १·२५ |
| एकंदर | ५·३० |

गाडीच्या दर मैलीं १० पेन्स हें उत्पन्नाचें प्रमाण पडे. ग्रेटब्रिटनमध्यें असा अनुभव आहे कीं, विद्युद्वहनांत घातलेल्या भांडवलावर फारसा नफा होत नाहीं. भांडवल जास्त वाढविलें तर ( तिकिटाचे पैसे ) भाडें कमी केलें जातें; त्यामुळें व्हावा तसा नफा होत नाहीं. वाहतुक जास्त होत चालल्यानें त्याकरितां जरूर त्या सोयी कराव्या लागतात. विद्युच्छक्तींत काटकसर करण्यास ती स्वतः तयार न करितां बाहेरून घेणें चांगलें. तिकडे ट्राम्वेकरितां लागणाऱ्या विजेच्या एका मूलमानाला पडणारी किंमत १.०६ पेन्स असते. ठरलेल्या वेगापेक्षां गाड्यांस कांहीं जास्त वेग दिल्यास कांहीं खर्च कमी पडतो. ट्राम्वे गाड्या पार्सलें वगैरे नेऊं लागल्या किंवा भाड्यानें देण्यांत येऊं लागल्या तर उत्पन्नाची धाव वाढते. वहातुकीला सोयीवार होईल असा गाड्यांना आकार देणें अवश्य आहे. ट्राम्वेवर इन्शुअरन्सच्या खर्चाचा जो एक मोठा बोजा बसतो त्यामुळें तिचें नुकसान होतें.

१९०९ जानेवारींतील प्रसिद्ध झालेल्या आंकड्यांवरून असें दिसून येईल कीं खर्च केलेल्या भांडवलावर इ. स १८७८ त शेंकडा अदमासें ५। टक्के नफा पडला व १९०८ सालीं ६३/४ टक्के नफा पडला.

आतां घोडे, वाफ व वीज ह्या तीन वाहकांच्या योगानें चालणाऱ्या ट्राम्वेकडे तुलनात्मक दृष्टीनें पाहू.

तुलनात्मक कोष्टक.

| | घोड्यांचा काळ. | वाफेचा काळ | विजेचा काळ |
|---|---|---|---|
| सन | १८७१ | १८९६ | १९०७ ते १९०८ |
| चालू रस्त्याची लांबी. | ३२१·२७ | १००९ | २४६४·२२ |
| आंत बसलेल्या माणसांची संख्या | ३५०८८१५१५ | ७५९४६६०४७ | २६२५५३२८९५ |
| भांडवलावर मिळालेला शेंकडा नफा. | ३·९७ | ६·८८ | ६·८१ |
| मिळकतीवर खर्चाचें शेंकडा प्रमाण | ८३·८१ | ७४·७९ | ६२·६४ |
| चालू वाटेवरं दरमैली वहातुक | ४६९६४१ | ७५२६९१ | १०६५४६२ |
| माणसी सरासरी भाडें पेन्स. | १·८४ | १·६३ | १·०९ |

वरील तक्त्यावरून हें उघड होतें कीं विद्युद्वाहनें सुरू झाल्यानें दर मैलीं खर्चण्यास लागणारें भांडवल वाढलें पण भांडवलावर मिळणाऱ्या नफ्याचें प्रमाण कमी होत चाललें; इतकें असून चालू खर्च कमी झाला, गाडींत बसणाऱ्यांची दर मैलीं संख्या वाढली व गाडीभाडें प्रमाणाबाहेर उतरलें.

**ट्रॉय अथवा ट्रोड**—हा देश आशियाचें वायव्येकडील मुशिर आहे. ट्रोड म्हणजे पश्चिम व नैऋत्य मिशिया असावा. ट्रोडची दक्षिणोत्तर लांबी ४० मैल आहे. रुंदी यापेक्षां जास्त नसावी. यामधून मेंडेरेस ( प्राचीन स्कॅमँडर ) नदी वाहते.

ह्या प्रांतांत इमारतीचें लांकूड, ओक, एल्म वगैरे वृक्ष व कळिंगडें होतात. कापूस, गहूं वगैरे पिकतो. येथील जमीन सुपीक आहे.

होमरनें लिहिलेली ट्रोडची हकीकत ह्मणजे निव्वळ कविकल्पना होय. इ. स. पूर्वी ७ व्या शतकारंभीं थ्रेशियन टोळधाड येऊन तिनें ट्रोडमध्यें धुमाकूळ मांडिला असावा. ग्रीक वसाहतीपासून ट्रोडच्या खऱ्या इतिहासाच्या भागास सुरवात होते. प्रथम येथें एओलिफ वसाहत झाली. यांनींच आथेनियनांस विरोध केला.

उत्तरेस इलियम, दक्षिणेस आसुस व पश्चिमेस अलेक्झांड्रिआ ट्रोआस हीं ट्रोडमध्यें मुख्य ग्रीक शहरें होतीं. इलियम शहराच्या ठिकाणीं सध्यां हिसार्लिक टेंकाड, हेलेस्पान्टपासून तीन मैलांवर आहे. येथें क्सर्क्सिसनें इलियन आथेना देवीला कांहीं बळी दिले. इ.स.पूर्वी ३३४ मध्यें येथील लोकांनीं शिकंदरला ट्रोजन युद्धांतील शस्त्रें दाखविलीं. ह्यानें शहरास राजकीय स्वातंत्र्य दिलें. इ. स. पूर्वी ३ ऱ्या शतकांत स्वतंत्र ग्रीक शहरसंघाचें प्रामुख्य इलियमकडे होतें. ह्याच शतकांत गॉल लोकांनीं इलियमवर दोनदां स्वारी केली होती. २ ऱ्या शतकांत इलियमच्या ऱ्हासास सुरवात झाली. इ. स. पूर्वी १९० त रोमन लोक ट्रोडमध्यें शिरले. फिम्ब्रीआनें हें शहर इ. स. पूर्वी८५ मध्यें घेऊन पुन्हां मोडकळीस आलेल्या स्थितींतच सोडून दिलें. परंतु सुलानें तें बांधिलें. ४ थ्या शतकानंतर ह्याचा ऱ्हास होत गेला.

ट्रॉ य श ह र चे अ व शे प.—ट्रायच्या जागीं सध्यां हिसार्लिक टेंकाड आहे. हें दार्दानेलसपासून ३॥ मैलांवर आहे. ह्या ठिकाणीं खणून शोध करण्याचें काम प्रथम श्लिमन व नंतर विल्हेम डॅारफेल्ड यांनीं केलें होमरच्या कथानकांतील बारीक सारीक खुणांचा जरी ह्या ठिकाणीं पत्ता लागत नाहीं तरी कांहीं मोठ्या जागा ओळखतां येतात.

दं त क थाः—ग्रीक दंतकथेप्रमाणें टयुसर हा ट्रोडमधील अतिशय जुन्या शहराचा संस्थापक होय. ह्या शहराचें नांव स्मिथियम होतें. ह्याच्या वेळेस झ्युस व इलेक्ट्राचा मुलगा डार्डेनस हा ट्रोडच्या किनाऱ्यावर एका तापयावरोवर वाहून आला. टयुसरनें ह्याला आपली मुलगी व कांहीं जमीन दिली. टयुसरच्या नंतर डार्डेनस राजा झाला. याचा नातु ट्रॉस यानें देशाला ट्राय व लोकांस ट्रोजन हीं नांवें दिलीं. ट्रॉसचा पुत्र इलस यानें इलियन शहर वसविलें. इलसचा नातु प्रायम व प्रायमचे हेक्टर व पॅरिस हे पुत्र होते. पॅरिसनें स्पार्टाहून हेलेनला पळवून आणली. त्यामुळें ॲगामेम्ननच्या आधिपत्याखालीं ग्रीकांनीं ट्रॉयला दहा वर्षें वेढा दिला. शेवटीं शत्रूला हुलकावणी देऊन पुष्कळसे ग्रीक वीर त्यांनीं तयार केलेल्या लांकडी घोड्याच्या विस्तीर्ण उदरांत बसले इतर सैन्य व आरमार यांनीं वेढा उठवून परत जाण्याचें ढोंग केलें व लष्करी घोडा भोळ्या ट्रोजन लोकांनीं शहरांत नेला. रात्र पडल्यावर ग्रीक वीर घोड्याच्या उदरांतू बाहेर पडले व त्यांनीं आपल्या बांधवांस दरवाजे उघडले. अशा रीतीनें ग्रीकांनीं ट्रॉय शहर घेतलें.

**ट्रिनिदाद**—हें ब्रिटिश वेस्ट इंडीज बेटांपैकीं अतिशय दाक्षिणेकडील असून जमेकापेक्षां लहान आहे. याची लोकसंख्या ( १९१७ ) ३७७०२१. हें उत्तर अक्षांश १०° ३' ते १०° ५०° व पश्चि रे. ६०° ३९' ते ६२° यांमध्यें आहे. याची लांबी ४८ मै.,रुंदी ३५ मै व क्षेत्रफळ १८६•चौ. मैल आहे. उत्तर व दक्षिण भागांत पर्वतांच्या ओळी आहेत.

भूस्तर, वनस्पति व प्राणी या बाबतींत ट्रिनिदाद हें इतर भागांहून निराळें नाहीं. वॅराफांसचा धवधवा व पिच सरोवर हीं दोन कायती विशेप महत्वाचीं ठिकाणें आहेत. धवधवा ३१२ फूट उंचीवरून खालीं पडतो. दलदलीच्या जागीं असलेले ज्वालामुखी कधीं कधीं दृष्टीस पडतात.

ट्रिनिदाद येथें तेल काढणाऱ्या कंपन्या १९१७ सालीं ११ होत्या. त्या सालीं ५६०८०१९४ गॅलन कच्चें तेल काढण्यांत आलें. जमीन फार सुपीक असून तींत ऊंस व कॉफी हीं मुख्य पिकें होतात. राजांच्या मालकीच्या जमिनींत मौल्यवान लांकूड होतें. कोको, साखर, रम, काकवी, कॉफी, तंबाखू, नारळ, इमारती लांकूड, रबर, डामर इत्यादि पदार्थांची निर्गत होते.

ह्या बेटांवर वादळें होत नाहींत. प्राथमिक शिक्षणाच्या सरकारी पद्धतीनें चाललेल्या शाळा असून त्या बहुतेक मोफत आहेत.शेतकी हा आवश्यक विषय असतो.उच्च शिक्षणाच्याहि सोयी आहेत.ह्या बेटांत लोकसंख्येच्या एकतृतीयांश हिंदी लोक असून हिंदुस्थानांतून मजूर आणण्याचें काम सरकारी सल्ल्यानें होतें वरिष्ठ दर्जाच्या लोकांत ब्रिटिश, फ्रेंच व स्पॅनिश रक्त असून खालच्या दर्जांत निग्रो व चिनी यांचा समावेश होतो. १०८ मैल लांबीची रेल्वे असून मुख्य शहरांत ह्या रेल्वेनेंच जावें लागतें.

ह्या वसाहतीवर ( ट्रिनिदाद व टोबॅगो ) एक गव्हर्नर असून,त्याच्या मदतीस एक कार्यकारी व एक कायदेकौन्सिल असतें. कायदेकौन्सिलांत सरकारी १० व राजनियुक्त १० असे वीस सभासद असतात. पोर्ट ऑफ स्पेन हें राजधानीचें फार सुंदर शहर आहे. या शहरांत मुख्य मुख्य सरकारी इमारती, ग्रंथसंग्रहालय, वनस्पतिशास्त्रास उपयोगी असा एक सुंदर बाग वगैरे आहेत. या शहराशिवाय दुसरीं शहरें सॅन फरॅनडो व ॲरिमा हीं होत. कोलंबसानें ट्रिनिदाद हें १४९६ सालीं शोधून काढलें. स.१७९७पर्यंत हें स्पेनच्या ताब्यांत होतें. नंतर मार्टिनिक येथून ब्रिटिशांनीं केलेल्या स्वारींत त्यांनां हें मिळालें. स. १८०२ च्या अमीन्स तहानें त्याच्यावर ब्रिटिश मालकी प्रस्थापित झाली.

**ट्रिपोली**,प्रां त.–हा उत्तर आफ्रिकेंतील प्रांत १९११-१२ पर्यंत तुर्कस्तानचा होता. नंतर तो इटालीनें घेतला. त्याच्या उत्तरेस भूमध्यसमुद्र असून सुमारें ११८० मैलांचा याचा किनारा आहे. यांत क्रमांत व मी पांच जिल्हे येतातः—खुद्द

ट्रिपोली, बार्का डोंगरपठार (सिरीनेका), ऑजिला ओलाव्याची जागा, फेझन व घॅडेम्स व घाट या ओलाव्याच्या जागा. हा प्रांत ट्युनीशिया व ईजिप्तच्यामध्यें असून याचें क्षेत्रफळ सुमारें ४ लक्ष चौ. मैल व लोकसंख्या ( १९११ ) ५,२३,१७६ तद्देशीय आणि ५१६हजार यूरोपीय अशी आहे. दक्षिणेस व पूर्वेस याची सरहद्द ठरली नाहीं. पश्चिमेकडील सरहद्द १८९२साली फ्रेंचसरकारच्या संमतीनें ठरली. घॅडेम्सपर्यंतची सरहद्द१९१० सालीं ठरली. त्याच्या दक्षिणेकडील प्रदेशासंबंधीं तुर्कस्तान व फ्रान्स यांत लढा आहे.

राजधानीच्या दक्षिणेच्या बाजूस जेबेल'नांवाच्या डोंगराच्या रांगेत टकूट(टेकूक) नांवानें ज्वालमुखीचें शिखर (२८००फूट) आहे. खास ट्रिपोली व फेझन खोलवटा यांमध्यें४०००० मैल क्षेत्रफळानें हमदा-इल-होमरा नांवाचें डोंगरपठार आहे. या निर्जन 'तांबड्या हमदा' तून पूर्वी नद्या वहात होत्या. या पठाराच्या दक्षिणेस पर्वताच्या ओळी असून त्यांत जेबेल-एस-सुदा ही विशेष प्रसिद्ध आहे व तीची साधारण उंची २८०० फूट आहे. ओसाड घॅडेम्स जिल्ह्याच्या पलीकडे पुष्कळसे हिरवें गवत असलेले भाग, खजुराचीं झाडें व कांहीं पाण्याचीं तळीं आहेत.

नेडीकघांटाच्या ईशान्येस ओलवणांच्या रांगा असून त्यांना ऑजिला खांचा म्हणतात. हीं ओलवणें नागमोडी खोऱ्याप्रमाणें दिसतात. बार्कापठार हें या प्रांतांतील प्रेक्षणीय असून भूमध्यसमुद्राच्या बाजूस तें सटबंदीप्रमाणें आहे. हवा, पाणी, भाजीपाला यामुळें येथें बऱ्याच ग्रीक वसाहती झाल्या व त्यांत सायरिनी (खि.पू. ६३०)ही फार प्रसिद्ध होती. या वसाहतींवरून त्या सर्व प्रांताला सिरीनेका नांव मिळालें. सायरिनी, अपोलोनिया, अरसिनोई, बेरेनाईस व बार्का या पांच मुख्य शहरांमुळें याला पेन्टापोलीस असें म्हणत. सिरीनेका पठाराची उंची२०००फूट असून जेबेल अखदारला त्याची ३५०० फूट उंची आहे. अगदीं पूर्वेस सोलमच्या आखाताचें टोंक आहे. ऑजिलाच्या दक्षिणेस कुफ्रा ओलवणें आहेत. यांची संख्या पांच असून क्षेत्रफळ ७००० चौ. मै. व ७ हजार भटकणारे अरब-बर्बर लोक आहेत. हें ठिकाण सेकसाईटपंथाचें केन्द्र आहे. जोफ येथील या पंथाच्या मठाचें महत्त्व जॅराबुब ( सिरीनेकांतील ) येथील मठावरोबर समजतात; सुपिकता आणि सिरीनेका व वडाई यांमधील रस्त्यावरील मध्यवर्ती ठिकाण यांनीं या प्रांताचा दर्जा वाढला आहे; पूर्वी सेनुसी पंथाचा येथें ताबा होता. परंतु स. १९१० पासून तुर्की सैन्यानें याचा ताबा घेतला. घाट समुद्रापासून २४०० फूट उंचीवर असून त्याचा सहाराच्या वाळवंटांत समावेश होतो. याच्या मध्यभागीं मोठें मैदान असून दरवर्षी जत्रा भरते. या ओलवणांत १०००० लोकसंख्या असून बहुतेक इझाजेनीन ट्वारेग लोक आहेत. निम्मी संख्या घाट शहरांतच आहे. रॅम्सा हें रोमन साम्राज्यांत व्यापाराचें व लष्करी शहर होतें. घॅडेम्स हें गारामांटीस लोकांचें सिडामस असून कार्नेलियस बॅलबस मायनरनें तें घेतल्यानें त्यांचें साम्राज्य लयास गेलें. शहर नैर्ऋत्येस असून त्यांत ७००० लोक आहेत. यांत अंजीर, खजूर, बदाम व भाज्या विपूल होतात. पुष्कळशा व्यापारी रस्त्यावर हें असून ट्रिपोली, ट्युनिशिया व सुदान यांच्याशीं याचा संबंध येतो.

हवामानः—ट्रिपोलीचें हवामान नेहमीं बदलत असतें. दिवसा उष्मा होतो व रात्रीं थंडी पडते. उत्तरेकडे ५ पासून १५ इंचांपर्यंत दरवर्षी पाऊस पडतो. किनाऱ्यावरील उष्णमान ६८° असतें.

वनस्पति व प्राणीः—खजूराचीं झाडें सर्वत्र आढळतात. ओक, पाईन, ऑलिव्ह वगैरे वृक्ष असून बदाम, अंजीर, डाळींब, जरदाळू वगैरे फळझाडें येथें आहेत. कांहीं जिल्ह्यांत द्राक्षें होतात. जनावरांत रानडुकर, तरस व कोल्हे हीं सांपडतात. उंट हा येथील मुख्य प्राणी आहे. शहामृग, गिधाडें वगैरे पक्षी असून निर्गतींत मध हा मुख्य पदार्थ आहे.

लोकः—१९ व्या शतकाच्या शेवटच्या ५० वर्षांत येथें खणून जे शोध झाले त्यांवरून असें दिसतें कीं, येथें आदिमानव यांची वस्ती होती एवढेंच नाहीं तर आयबेरिया, ब्रिटनी, व ब्रिटिश बेटें याप्रमाणें येथें प्रास्तर संस्कृति होती. त्याचप्रमाणें अखंड दगडाचे स्तंभ, ओबडधोबड दगडी स्तंभ, कबरी, वगैरे अवशेष येथें दृष्टीस पडतात. जेबेलम्सिद व इतर जिल्ह्यांत ' सेनाम ' अथवा तीन दगडांचे स्तंभ बरेच आहेत. हे स्तंभ बांधणाऱ्या लोकांचे बर्बर लोक वंशज असावे असें म्हणण्यास बराचआधार आहे. ह्याच लोकांची ट्रिपोलींत वस्ती असून यांना अरबांच्या भटक्या टोळीनें हुसकावून दिलें होतें. यामुळें अरबांचा भरणा राजधानीच्या भोंवतालच्या भागांत, सिरीनेका, मार्मारिका, व ऑजिला ओलवण यांत फार आहे. फेझन भागांत साहारांतील बर्बरांची संख्या जास्त आहे. त्यांच्यांत निग्रो लोकांचें मिश्रण आढळतें. वरच्या भागांतील बरेच बर्बर अरब बनले आहेत. या लोकांखेरीज यहुदी लोक येथें असून ते टॉलेमीच्या वेळीं ईजिप्तमधून आले. हे धुरीदाच्या उतरणींत असलेल्या चुनखडीच्या गुहांत राहतात. मोठ्या शहरांत यांचा भरणा असून तेथें तुर्क, माल्टीज, इटालियन, क्रीटन, व दक्षिण यूरोपांतील व्यापारी व कारागीर राहतात. खि. पू. ७ व्या शतकांत सिरीनिकांत वसाहत करणारे ग्रीक अथवा त्यांच्यापूर्वी आलेले फिनिशियन, ज्यांनीं ईआ सॅब्राटा, लेप्तीमॅग्ना हीं मोठीं शहरें वसविलीं त्यांचा कांहीं मागमूस देखील लागत नाहीं. ईआ दोन्हीं शहरांच्यामध्यें असून तें प्रांताचें मुख्य ठिकाण झाल्यावर त्याला ट्रिपोली ( तीन शहरें ) असें नांव मिळालें. रोमन काळापासून हेंच नांव कायम असून सीरियांतील ट्रिपोलीपासून हें ओळखण्यासाठीं याला वेस्ट ( पश्चिम ) ट्रिपोली म्हणतात, यावरून या प्रांताचें मुख्य शहर ट्रिपोली हें जगांतील एक प्राचीन

शहर असून ऐतिहासिकदृष्ट्या प्रसिद्ध अशा व्यापारी मार्गावर हें वसलें आहे. बेंगझी ( प्राचीन बेरेनिस ) हें बार्कातील मुख्य शहर आहे. किल्ला पडल्यामुळें याचें बंदर अगदीं बुजून गेलें आहे. याच्या पूर्वेस मर्ज ( प्राचीन बार्का ) व डेर्नाबंदर आहे. मार्सासुसा ( प्राचीन अॅपोलोनिया ) हें जवळच्या प्राचीन सायरिनी ( ऐनशाहतमेन ) शहराचें व्यापारी ठिकाण होतें. १८९७ ते १९०३ पर्यंत या जिल्ह्यांत तुर्की सरकारनें वरीच चळवळ दाखविली व क्रीटबेटांतील असंतुष्ट मुसुलमानांनां येथें आणलें.

शेतकी व व्यापारः—ट्रिपोली हा निव्वळ शेतकीचा व व्यापाराचा देश असून यांत उद्योगधंदे नाहींत व मिठा खेरीज दुसरे खानिज पदार्थ देखील नाहींत. अवर्षण, निकस जमीन व कर यांमुळें १० व्या शतकाच्या अखेरीस येथील शेतकीची फार वाईट अवस्था होती. यामुळें गव्हाच्याऐवजीं जंवाची पेरणी होऊन एक तऱ्हेच्या गवताची निर्गत होते.गहूं, जंव, गवत, आलिव्ह, केशर, अंजीर, खजूर वगैरे पदार्थ होतात. नारिंग, लिंबू वगैरे फळें व भाजीपाला येथें विपुल होतो. स्पंजाचा व्यापार ग्रीक लोकांच्या हातांत आहे.

पूर्वी येथें निग्रो गुलामांचा व्यापार चालत असे. सांप्रत गवत, जंव, अंडीं, गुरेंढोरें, स्पंज, चटया, आणि मध्यआफ्रिकेंतून हस्तिदंत, शहामृगाचीं पिसें, कमावलेलीं कातडीं ( बकऱ्याचीं ) व सोने सांपडणारी माती या पदार्थांचा व्यापार चालतो. बेंगझी प्रांतांतून ईजिप्त, माल्टा व क्रीट यांत लाखों मेंढ्या पाठवितात. बेंगझीचा व्यापार खेरीज १९ व्या शतकांत येथील आयात व निर्गत व्यापार सरासरी दरवर्षी ७७,००० पौं. होता. येथें खाद्यपदार्थ, कापड, तंबाखू, धातू, व लोखंडाचें सामान यांची आयात होते. बेंगझी व डेनी या बंदरांतून दरवर्षी २१४००० पौं. चा माल आयात व ४५५७०० पौंडांचा माल निर्गत होतो.

जंव हें येथील मुख्य धान्य आहे. भटक्या अरबांजवळ उंट, गुरेंढोरें, व मेंढ्या असतात. हे जाडीभरडीं लोकरीचीं वस्त्रें, चटया, वगैरे तयार करतात. येथील व सूदनमधील लोकांत चहाची संवय वरीच वाढली आहे.

दळणवळणाचीं साधनें:-देशांत बहुतेक उंटाच्या तांड्यानें व्यापार चालतो. समुद्रमार्गानें चालणारा बहुतेक व्यापार इटालियन लोकांच्या ताब्यांत आहे व इटालियन जहाजें डेनी व बेंगझी येथें थांबतात. डेनी व ऱ्होडसमध्यें बिनतारी विद्युयंत्र आहे. १९२० त येथें १५७ मैल रेल्वे होती.

राज्यपद्धतिः—येथील वली अथवा गव्हर्नर जनरलची नेमणूक तुर्की सुलतानाकडून होत असे व त्याच्या हातांत दिवाणी व लष्करी अधिकार असत. स्थानिक स्वातंत्र्याखेरीज इतर बाबतींत येथील राज्यपद्धति इतर तुर्की प्रांतांप्रमाणें होती. बेंगझी अथवा बार्का प्रांताचा कारभार स्वतंत्र असून तें सरकार फक्त कॉन्स्टांटिनोपलला जबाबदार असे. जकात, व्हर्गो नांवाची डोईपट्टी वगैरेंपासून मुख्य उत्पन्न असे. येथें १०००० तुर्की फौज ठेविली असल्यानें उत्पन्नापेक्षां खर्च नेहमीं जास्त असे. १९००–०५ या वर्षांत दरवर्षी सुमारें १५०००० पौंड उत्पन्न असून १७०००० खर्च होता. पैकीं १०००००पौंड लष्करासाठींच खर्च असावा.

इतिहासः—सिरीनेका व ट्रिपोली यांचा प्राचीन इतिहास साधारण सारखा पण वेगळा आहे. सिरीनेकांत प्रथम ग्रीकांनीं वसाहत केली, नंतर तो प्रांत टॉलेमीच्या ताब्यांत गेला. शेवटीं रोमन लोकांनीं हा प्रांत काबीज केला. ट्रिपोलींत प्रथम फिनिशियन लोकांची वसाहत होती. यानंतर यावर कार्थेजचा अंमल बसला व त्याच्याप्रमाणें याची स्थिति होत गेली. रोमन लोकांपासून यास ट्रिपोली हें नांव प्राप्त झालें. ५ व्या शतकांत ट्रिपोली व सिरीनेका हे प्रांत व्हँडाल लोकांनीं जिंकले. यांची सत्ता पुढील शतकांत बेली सॅरियस नांवाच्या बायझन्टाईन सेनापतीनें मोडली. ७ व्या शतकांत अरबांनीं हा देश उध्वस्त करून येथें इस्लामी संप्रदायाची स्थापना केली. यावेळेपासून बरीच शतकेंपर्यंत हा देश ट्युनिशियाच्या राजांच्या ताब्यांत असे. थेनी अमर यानें १३२१ सालीं स्वतंत्र राज्य स्थापन केलें व मधलीं १५ वर्षें खेरीज करून स.१४०१पर्यंत ट्रिपोली याच घराण्याच्या ताब्यांत होता.स.१५१०त हा देश स्पेनच्या फर्डिनांडनें घेऊन १५२८ सालीं सेंट जॉनच्या सरदारांनां दिला. परंतु ड्रेगुट व सिवान नांवाच्या चांच्यांनीं स.१५३३ त सरदारांनां हुसकावून दिलें. ड्रेगुटच्या मृत्यूनंतर ट्रिपोली व कॉन्स्टांटीनोपल यांच्यांतील संबंध बराच ढिला पडला. परंतु भूमध्यसमुद्रांत ट्रिपोलीच्या चांच्यांवर बरीच दहशत बसली. १७१४ सालीं अहमदपाशा कॅरामॅनली हा जवळ जवळ स्वतंत्र झाला. खंडणी अथवा 'नजराण्या 'च्या रुपानें तुर्की सत्ता त्यानें मान्य केली व आपण राजप्रतिनिधि असल्याचें दाखविलें. स. १८०१ मध्यें येथील पाशानें आफ्रिका भूमध्यसमुद्रांतील व्यापाराचा चांच्यांपासून बचाव होण्याकरितां जी खंडणी अमेरिका देत असे तीपेक्षां जास्त मागणी केली. अमेरिकेनें ती नाकबूल करून युद्ध जाहीर केलें. ४ वर्षें लढाई चालून अखेरीस पाशाला आपली मागणी परत घ्यावी लागली. स. १८१५ त पुन्हां असेंच अमेरिकेशीं युद्ध झालें परंतु या वेळेला सुद्धां पाशाला हार खावी लागली. इ. स. १८३५ त येथें आपसांत लढाई होत आहे असें पाहून तुर्कांनीं हा प्रदेश साम्राज्यास जोडला. फ्रेंचांनीं ट्युनिशिया घेतल्यानें ( १८८१ ) तुर्कांनीं आपली शिबंदी वाढविली.स. १८८९ च्या अँग्लो फ्रेंच तहानें मध्यसहारा फ्रेंच अंमलाखालीं असल्याचें मान्य झाल्यानें समुद्रकांठच्या प्रदेशासंबधीं बराच लढा पडला. सेनुसाईटसारख्या अर्ध्या धार्मिक व अर्ध्या राजकीय संस्थांचें ट्रिपोलींत बरेंच प्राबल्य आहे.१९११–१२च्या दरम्यान इटली व तुर्कस्तानमध्यें लढाई होऊन लढाईनंतर,ट्रिपोली व बेंगझी या जहागिरी तुर्कस्तानपासून इटलीला मिळाल्या. या दोन्ही जहागिरींनां मिळून 'लिबिया इटालियाना' असें नांव देण्यांत

आलें. पण या दोन्ही जहागिरींची राज्यव्यवस्था स्वतंत्र रीतीनें हांकली जाऊं लागली. इटली व तुर्कस्तानमध्यें जो तह झाला त्याला फ्रान्सनें संमति दिली व ग्रेटब्रिटनचीहि त्याला गर्भित संमति होतीच. ट्रिपोलीवर तुर्कांची सत्ता या पुढें जरी राहिली नाहीं तरी ट्रिपोलीमधील तुर्कांचे हितसंबंध राखण्याकरतां, ट्रिपोली येथें एक अधिकारी व एक धर्माधिकारी नेमावयास सुलताननें इटलीकडून कबुली मिळविली होती व मुसुलमान लोकांनां सार्वजनिक प्रार्थनेच्या वेळेला, तुर्कस्तानच्या सुलतानाला खलीफा असेंहि संबोधण्याची परवानगी इटलीनें दिली होती.

लॉसेन येथील तहान्वयें तुर्कस्ताननें ट्रिपोलीमधून आपलें सैन्य काढून घेण्यास लागलीच सुरवात केली. नंतर इटलीनें या मुलखांत शांतता राखण्यास सुरवात केली. जेफेरा नांवाच्या जातीच्या लोकांनीं इटलीचें वर्चस्व तावडतोब कबूल केलें. पण बर्बर लोक मात्र त्याला कबूल होईनात. जेबेल नेफुस्ताचा मुख्य बर्बर जातीचा नायक सुलेमान एल बरूनी हा इटालियन लोकांचा पक्का द्वेष्टा होता. तुर्कस्तानच्या ताब्यांत ज्यावेळीं ट्रिपोली होती त्यावेळीं ट्रिपोलीतर्फे तुर्की-पार्लमेंटमध्यें याची निवडणूक झालेली होती. याला पाशा हा किताब देण्यांत आला होता. यानें ट्रिपोलीच्या जवळच एका डोंगरांत आपलें स्वतंत्र राज्य स्थापन केलें होतें. तो पॅन-इस्लामिझमच्या चळवळीला पुरा अनुकूल होता. अशा प्रकारच्या या पुंड सरदाराला गप्प बसविणें जवळजवळ अशक्यच होतें. तेव्हां इटलीला त्याच्यावर सैन्य पाठवणें भाग पडलें. स. १९१३ च्या ऑगस्ट सप्टेंबरपर्यंत त्यानें इटलीला दाद दिली नाहीं पण पुढें त्याचा नाइलाज होऊन त्यानें यूरोपमध्यें पलायन केलें. हा कांटा काढून टाकल्यावर सर्व ट्रिपोली हां हां म्हणतां इटलीच्या ताब्यांत आला.

अशा रीतीनें अंतस्थ शांतता प्रस्थापित केल्यावर बंदरें सुधारणें, रस्ते तयार करणें, शाळा व रुग्णालयें स्थापन करणें, आरोग्यमंडळें काढणें व शेतकी व उद्योगधंद्याला उत्तेजन देणें या गोष्टींकडे इटलीनें आपलें लक्ष पुरविलें. ट्रिपोलीच्या पुनर्घटनेसाठीं इटलीच्या लोकांनींहि पुष्कळच द्रव्यसहाय्य केलें. ट्रिपोली हा मूळचा इटलीचा पण तो पुढें तुर्कांकडे गेला होता. तेव्हां तो परत मिळाल्याबद्दल इटालियन लोकांनां आनंद वाटणें साहजिकच होतें. पुष्कळ इटालियन लोक ट्रिपोलीमध्यें वस्ती करण्यास जाऊं लागले, व तेथें शेतकीचा धंदा करण्यास त्यांनीं सुरवात केली; पण इटली सरकारनें याला उत्तेजन दिलें नाहीं. ट्रिपोलीमधील अरब व बर्बर लोकांमध्यें इटालियन सत्तेविषयीं प्रेम व विश्वास उत्पन्न व्हावा व त्यांनीं बंडास प्रवृत्त होऊं नये हा विशिष्ट हेतू मनांत धरून बर्बर लोकांच्या अगर अरब लोकांच्या ज्या जमिनी होत्या,त्या जमीनीवरील त्यांचा ताबा इटलीनें काढून घेतला नाहीं.पण इटालियन सरकारचा हा उद्देश साध्य झाला नाहीं. ट्रिपोलीबरोबरच ट्रिपोलीनजीकचा बेंगझी उर्फ सिरेनैकाचा प्रदेश इटलीला मिळाला होता. पण या टापूंत अद्यापि इटलीला शांतता प्रस्थापित करतां आली नव्हती.येथें अद्यापीहि तुर्कांचेंच प्राबल्य होतें व येथील बंडखोरांनां आंतून सरकारचें साहाय्यहि होतें. याचा परिणाम ट्रिपोलीमधील या पुंड जातीवर झाल्याशिवाय राहिला नाहीं. या सिरेनैकामध्यें सेनूसाइट लोकांचें प्राबल्य होतें व त्यांचेच जातभाई फेझानी लोक यांचें ट्रिपोलीमध्यें वास्तव्य होतें.

१९१४ सालीं महायुद्धाला सुरवात झाली. त्यावेळीं ट्रिपोलीमध्यें वरील प्रकारें स्थिति होती. इटलीनें अद्यापि ताटस्थ्यच राखिलें होतें. १९१४ च्या सप्टेंबरमध्यें सेनूसाईट शेख लोकांच्या चिथावणीवरून, फेझानी लोकांनीं ट्रिपोलीमध्यें बंड केलें; व मुर्झूक व इतर बंदरांवर त्यांनीं हल्ला केला. अहमद एल अबिद यानें मुर्झूक येथें आपली सत्ता स्थापन झाल्याचें जाहीर केलें. अशा रीतीनें हा बंडाचा वणवा भराभर पसरूं लागला. त्यामुळें जनरल मियानीला फेझन शहर सोडणें भाग पडलें. जनरल मियानीच्या या हल्यामुळें घट व घडमेस या ठिकाणच्या फौजेला संकटांत पडल्यासारखें झालें. तेव्हां घटामधील सैन्यानें फ्रेंचांच्या मुलुखाचा आश्रय घेतला व घडमेसमधील सैन्यानें ट्युनीशियन साहारा या ठिकाणीं वसती केली. पण लवकरच इटालियन सैन्यानें दोन्हीं ठिकाणें पुन्हां जिंकून घेतलीं पण ट्रिपोलीच्या पूर्व भागांत इटलीला अपयश मिळालें; तेथें सेनूसी लोकांचें वर्चस्व स्थापन झालें व त्यांनीं ट्रिपोलीमध्यें इटालियनांविषयीं द्वेष पसरविण्यास सुरवात केली. तुर्कस्तान व जर्मनी या राष्ट्रांनीहि याला मनोभावें साहाय्य केलें. १९१५ सालीं इटलीनें ऑस्ट्रियाविरुद्ध लढाई पुकारतांच या सेनूसी लोकांनीं एकदम बंड उभारलें. त्यामुळें इटलीला मोठ्या कष्टानें आपलें सैन्य ट्रिपोलीमधून काढून न्यावें लागलें. ट्रिपोली व होम्स एवढींच काय तीं बंदरें इटलीच्या ताब्यांत उरलीं होतीं व त्यांचें संरक्षण करण्याचें इटालियन लोकांनीं ठरविलें.अशा रीतीनें ट्रिपोलीमध्यें तुर्की लोकांचें वर्चस्व स्थापन झाल्यामुळें ट्रिनिशियांत व अल्जीरियांतहि बंड उभारण्याची खटपट या लोकांनीं सुरू केली. पण तेथें त्यांनां यश आलें नाहीं. १९१६ सालीं इटालियन लोकांनीं झुआरचें बंदर काबीज करून घेतलें.

१९१६ सालच्या सप्टेंबरमध्यें, सुलेमान एल बरूनीची स्वारी यूरोपमधून अचानकरीतीनें ट्रिपोलीस, येथें आली. येतांनां त्यानें तुर्कस्तानच्या सुलतानाकडून आपल्याला ट्रिपोली, ट्यूनीस व अल्जीरियाचा सुभेदार नेमल्याबद्दलचें फर्मान आणलें होतें. तो मिसुरटा येथें आला व त्याला साधान एल स्वेवी व नूरी बे या पुंड सरदारांनीं साहाय्य करण्याचें अभिवचन दिलें. यांच्या साहाय्यानें सुलेमाननें इटलीच्या सैन्याला सळो की पळो करून सोडलें होतें. १९१७ सालीं ट्रिपोलींत सेनूसी लोकांचेंच वर्चस्व होतें. पण हळू हळू सुलेमान व साधान स्वेवी यांच्यांत व सेनूसी

लोकांतच दुफळी माजूं लागली होती. अशी स्थिति पाहतांच नूरी बे यानें ट्रिपोलीमधून आपला पाय काढला. त्याच्या बदलीं सुलतान मुरादचा नातु राजपुत्र ओस्मान फूआद याला ट्रिपोलींत पाठविण्यांत आलें. त्यानें ही दुफळी मोडून टाकण्याचा प्रयत्न केला पण त्यांत त्याला यश आलें नाहीं.

१९१८ सालीं महायुद्ध संपलें. या युद्धांत जर्मनीचा पराभव झाल्यामुळें तुर्कस्तानची नांगी ढिली पडली. त्यामुळें इटलीला ट्रिपोली व सिरेनैकामध्यें आपलें वर्चस्व स्थापन करण्याची संधि प्राप्त झाली. इटलीनें शक्य तों सामानेंच हें प्रकरण मिटविण्याचें ठरविलें. एलबेरूनी व इतर जातिनायकांशीं इटलीनें बोलणें सुरू केलें. १९१९ सालीं इटालियन सरकारनें जाहीरनामा काढून ट्रिपोलीमधील सर्व लोकांना स्वातंत्र्य दिल्याचें जाहीर केलें. निरनिराळ्या जातींच्या नायकांनीं इटालियन गव्हर्नरच्या सल्ल्यानें आपापल्या मुलुखावर राज्य करावें असें ठरविण्यांत आलें. त्यामुळें हळू हळू ट्रिपोलीमधील स्थिति सुधारत चालली; व १९२१ सालीं इटलीला ट्यूनीशियामध्यें कांहीं आर्थिक सवलती मिळाल्या.

श ह र.—ट्रिपोली ( टॅराबुलस इल–धार्ब अथवा पश्चिमेकडील ट्रिपोली ) हें उत्तर आफ्रिकेंतलि ट्रिपोली विलायत ( प्रांत )चें मुख्य शहर असून हें भूमध्यसमुद्रांतील एका भूशिरावर वसलेलें आहे. उ. अ. ३०° ५४' व पू. रे. १३° ११'. प्राचीन किल्ल्यांची रांग बंदराच्या एका बाजूचें संरक्षण करीत असून दुसऱ्या बाजूस अंतर्दुर्ग आहे हा दुर्ग स्पॅनिश सत्तेच्या वेळचा असून यांत गव्हर्नर राहतो. पश्चिमेस ओसाड मैदान असून पूर्वेस हिरवीगार असलेली मेशीयाची ओलवण आहे. या ओलवणींत कारामान्लियन सुलतानांच्या कबरी व सिद्दी हार्मोदाचा बारा घुमट असलेला कुवा आहे. शहर दिसण्यांत रमणीय असून त्यावर पौरस्त्य छटा दिसते. तुर्क लोकांच्या वस्तींत मशिदी आहेत. मोठी मशीद व पाशा मशीद यांचे मनोरे अष्टकोनी आहेत. बऱ्याच रस्त्यांवर कमानी आहेत. बंदराजवळ एक रोमन विजयकमान आहे. हिचें काम अँटोनियन बादशहाच्या कारकीर्दींत सुरू होऊन मार्कस ऑरेलियसच्या वेळेस तें पुरें झालें.

रेशीम, गालिचे व कार्डोव्हा चामडें यांचें काम लहान प्रमाणावर येथें चालतें. हें व्यापारी शहर असून याच मार्गानें भूमध्यसमुद्राचा साहाराशीं व्यापार चालतो. येथील लोकसंख्या ( १९२० ) ७३००० असून तींत बर्बर, अरब, तुर्क, यहुदी, माल्टीज इटालियन व निग्रो हे लोक येतात. स्थानिक व्यापार यहुदी व माल्टीज लोकांच्या ताब्यांत असून समुद्रमार्गानें होणारा व्यापार इटालियनांच्या ताब्यांत आहे. इटलीचा ताबा झाल्यानंतरची माहिती देशवर्णनाखालीं आहे.

[ संदर्भग्रंथ—ए. ब्रि. ब्रिटिश आरमारी खात्यानें प्रसिद्ध केलेलें–ए हँडबुक ऑफ लिबिया ( १९२० ); ब्रिटिश परराष्ट्र खात्यानें प्रसिद्ध केलेलें–इटालियन लिबिया ( १९२० ) ].

**ट्रिबिझाँड**—हें आशियामायनरमधील शहर असून काळ्या समुद्राच्या आग्नेय कोंपऱ्यावर आहे. ग्रीकांनीं येथें वसाहत केल्यापासून हें व्यापाराचें केंद्र बनलें. हें अर्वाच शतकेंपर्यंत एका साम्राज्याच्या राजधानीचें ठिकाण होतें. इराण, मध्यआशिया व इतर देश यांतून यूरोपांत जाणारे जिन्नस या बंदरांतून जात असल्यामुळें या शहराचें महत्त्व वाढलें आहे. आशियामायनरच्या बाजूला उंच पर्वत आहेत. शहराभोंवतीं पूर्वीं बांधलेल्या भिंती आहेत. येथें हवा उत्तम असते. जुन्या शहराला हल्लीं काले असें म्हणतात व येथें तुर्क राहतात. याची लोकसंख्या ४० हजार असून निम्मे मुसुलमान व बाकी ख्रिस्ती आहेत. हें प्रांताचें मुख्य ठिकाण आहे.

पूर्वीं येथें सीनोप लोकांनीं वसाहत केली होती. पर्वतांमुळें हें शहर जमिनीपासून निराळें झाल्यामुळें हेलेनिक राजांच्या वेळींहि याची प्रसिद्धि फारशी नव्हती. १२०४सालीं बायझंटाइन साम्राज्याचा नाश झाल्यावर आलेक्झस काम्निअस यानें येथें राज्य स्थापून किनाऱ्यावरील बराच प्रदेश आपल्या सत्तेखालीं आणला. स. १४६१ त दुसऱ्या महंमदानें हें शहर घेतल्यावर या राज्याचा नाश झाला. पर्वतांच्या योगानें हें राज्य संरक्षित असल्यामुळें ऑटोमन, सेल्जुक वगैरेंच्या स्वाऱ्यांचा त्यावर कांहीं परिणाम झाला नाहीं. राजघराण्यांतील स्त्रियांची सौंदर्याबद्दल ख्याति असल्यामुळें आजूबाजूच्या अनेक राजेलोकांचीं लग्नें या कुटुंबांतील मुलींशीं झालीं होतीं. राजवाडा फार भव्य होता. बऱ्या लोकांत चैन व अनीति वाढली होती. राजांना विद्याभिरुचि असल्यामुळें अनेक विद्वान तेथें राहिले होते व ग्रंथसंग्रहालयांत उत्तम ग्रंथांची भर पडली होती. शहरांत उत्तम घरें, देवळें मठ व बागा होत्या. सेल्जुकांचा राजा पहिला आंड्रोनिकस यानें शहरावर दोनदां स्वारी केली पण तींत त्याचा पराभव झाला. त्या वेळच्या राजांनीं बांधलेलीं कित्येक देवळें अद्याप कायम असून त्यांच्या वरील खोदकाम प्रेक्षणीय आहे.

**ट्रीएस्टे**—हें शहर ऑस्ट्रियांतील एक बंदर आहे. ह्याची लोकसंख्या १९१० सालीं २४६००० होती; पैकीं ३/४ इटालियन असून बाकीची जर्मन, ज्यू, ग्रीक, इंग्लिश व फ्रेंच आहे. हें शहर ट्रीस्टच्या आखातावर वसलें असून याचा देखावा फार रमणीय आहे. येथें १६८० सालीं बांधलेला एक किल्ला आहे. ह्या शहराचे जुने व नवे असे दोन भाग आहेत. यांपैकीं नवीन भाग चंद्राकृति आखाताच्या सपाटीवर वसला आहे. यांतील रस्ते रुंद असून येथील कित्येक चौक शिल्पचातुर्ययुक्त स्मारकांनीं विभूषिले गेले आहेत. येथील सांटा मरायामगोरचें ख्रिस्ती देवालय जेसुइट लोकांच्या शिल्पकलेचा उत्कृष्ट मासला होय. हें देवालय इ. १६२७ ते १६८२ च्या दरम्यान बांधलें. येथील पुराणधर्मी ग्रीक देवालय बायझंटाईन

पद्धतीनें बांधलेल्या ऑस्ट्रियांतील सर्व इमारतींत उत्तम आहे. ही इमारत स.१७८२ त बांधली. येथील इतर महत्त्वाच्या इमारती म्हटल्या म्हणजे नगरभवन, प्रांतिक प्रतिनिधिसभागृह, व्यापाराची कचेरी वगैरे होत. येथें एक मोठी नौकानयन संस्था व पदार्थसंग्रहालयहि आहे.

ह्या शहरीं पेट्रोल शुद्ध करण्याचे, रासायनिक द्रव्यें तयार करण्याचे, साबण बनविण्याचे, जहाजांचें सामान तयार करण्याचे, रेशीम कातण्याचे असे अनेक कारखाने आहेत. ह्या शहरच्या अवाढव्य व्यापाराकरितां बंदरात बऱ्याच सुधारणा केल्या आहेत. ह्या बंदरांतून ऑस्ट्रिया देशांत कापूस, सुती कापड, कॉफी, कोळसा वगैरे जिन्नस येऊन परदेशीं लोकर, गरम कपडा, साखर, कागद, यंत्रें वगैरे जिन्नस जातात.

**ट्रीट्श्के, हेन्रिक व्हॉन** (१८३४-१८९६)—हा जर्मन इतिहासकार व राजकीय लेखक ड्रेस्डेन येथें १५ सप्टेंबर १८३४ रोजीं जन्मला. ह्याच्या बापाला सॅक्सनच्या सैन्यांत मोठा हुद्दा होता. पुढें तो ड्रेस्डेनचा गव्हर्नर झाला. हेन्रीक हा बहिरा असल्यामुळें त्याला सार्वजनिक कामांत लक्ष घालतां आलें नाहीं. लिप्झिग व बॉन येथील अभ्यासक्रम पुरा झाल्यानंतर तो लिप्झिग येथें इतिहास व राजनीति यावर व्याख्यानें देत असे. विद्यार्थ्यांवर त्याची विलक्षण छाप असे. तो त्यावेळीं उदारमतवादी असून, सर्व लहान मोठीं संस्थानें एक होऊन, जर्मनीची घटना व्हावी, अशी त्याची उत्कट इच्छा होती. १८६६ सालच्या युद्धारंभीं त्याची प्रशियाबद्दलची कळकळ इतकी बलवत्तर झाली कीं तो बर्लिनला जाऊन प्रशियाच्या प्रजेंत स्वतःची गणना करूं लागला. हॅनोव्हर व सॅक्सनी या डची खालसा व्हाव्या यासंबंधीं एक कडक लेख त्यानें लिहिला, त्यामुळें बापलेकांचें बिनसलें. १८७४ सालीं तो बर्लिन येथें प्रोफेसर झाला. पुढें एका ऐतिहासिक मासिकाचा संपादक झाला. तरुण पिढीच्या मनःसंस्कृतीचें बरेचसें श्रेय त्याच्याकडे आहे. सोशिआलिस्ट, पोललोक व रोमन कॅथॉलिक लोक, यांचा पाडाव करण्यास सरकारास त्यानें पुष्टि दिली. तो ब्रिटिश लोकांचा कट्टा दुष्मन् होता व १९ व्या शतकाच्या अखेर ब्रिटिशांच्या विरुद्ध उत्पन्न झालेल्या वातावरणास हाच कारणीभूत आहे अखेरीस तो नेमस्त रूढमतवादी झाला. २८ एप्रिल १८९६ रोजीं तो बर्लिन येथें मरण पावला.

इतिहासकार या नात्यानें त्याची योग्यता अत्यंत मोठी आहे. त्याचा इतिहासाचा अभ्यास मुत्सद्दी दृष्टीचा आहे. प्रशियाच्या पलीकडे त्याचें लक्ष बहुतेक जात नसे. '१९ व्या शतकांतील जर्मनीचा इतिहास' हा त्याचा मुख्य ग्रंथ होय. हें पुस्तक नीट क्रमवार लाविलें नाहीं. परंतु यांत त्याची भाषाशैली, व घडलेल्या गोष्टी लिहिण्याची पद्धत हीं चांगली दिसून येतात. याशिवाय त्याचे आणखीहि बरेच लेख आहेत.

**ट्रेंट**—ऑस्ट्रियाच्या ताब्यांत असलेल्या टिरोल प्रांताच्या दक्षिण भागाची राजधानी. ॲडीजे नांवाच्या एका नदीच्या तीरावर हें शहर वसलेलें असून शहराच्या भोंवतीं प्रचंड तट असल्यामुळें व चोहींबाजूनें मधून मधून बुरुज असल्यानें या शहराला फार बळकटी आली आहे. या शहराच्या जवळच थोडयाशा अंतरावर डॉस ट्रेंटो नांवाचा एक अभेद्य किल्ला आहे व अशाच प्रकारचे किल्ले ट्रेंटच्या इतर दिशांनांहि बांधलेले आहेत. या शहरांत मोठे राजवाडे असून शहर फार रमणीय आहे. अजबखाने, भव्य प्रार्थनामंदिरें, मोठें ग्रंथसंग्रहालय, डँटे कवीचा पुतळा, विस्तीर्ण टाऊनहाल यामुळें तर शहराच्या रमणीयतेंत भरच पडली आहे. ट्रेंट हें उद्योगधंदे अगर व्यापारासाठीं मुळींच प्रसिद्ध नाहीं. ऐतिहासिकदृष्ट्या ट्रेंटला पुष्कळ महत्व आहे. ट्रेंटच्या इतिहासांत 'कौन्सिल ऑफ ट्रेंट' उर्फ ट्रेंटची धर्मपरिषद इला फार महत्त्व प्राप्त झालें आहे.

१५ व्या शतकामध्यें पोपच्या सत्तेलाहि नियंत्रण घालणारें एक धर्ममंडळ असावें अशी इच्छा लोकांच्या मनांत प्रादुर्भूत झाली होती व कान्स्टंटस व बसेल येथें तशा प्रकारचीं धर्ममंडळें स्थापन करण्याचा प्रयत्न झाला होता. पण आपल्या धर्माज्ञेविरुद्ध, दुसरीकडे आश्रय मागण्याचा कोणालाहि अधिकार नाहीं असें पोपनें जाहीर केलें. त्यामुळें लोकांना चीड आली. पोपच्या जुलमी आज्ञामध्यें सुधारणा घडून आणविण्याची जरूरी तीव्रतेनें भासूं लागली. फ्रान्सचा बादशहा, चार्लस बादशहा, व जर्मनींतलि राजे इत्यादि सर्व राजकीय सत्ताधीशांनींहि पोपच्या सत्तेला आळा घालणारें धर्ममंडळ असावें असें अट्टाहासानें प्रतिपादन केलें. चार्लस राजानें मोठी धर्मपरिषद भरविण्याची सूचना केली व त्याप्रमाणें पोपकडूनच त्यानें त्यावद्दलचें एक फर्मान काढवलें. ट्रेंट येथें ही बैठक भरण्याचें ठरलें. बैठकीपुढें तीन महत्त्वाचे मुद्दे चर्चेला निघावयाचें ठरलें होतें. (१) धार्मिक मतमतांतराचा गलबला अधिकारयुक्त वाणीनें मिटविणें, (२) धर्मसंस्थामधील अव्यवस्थेमध्यें सुधारणा करणें (३) ख्रिस्तेतरांच्या विरुद्ध मोहीम काढण्याचा विचार करणें.

पण फर्मान निघालें तरी पोपनें शक्य तितकी दिरंगाई करून परिषद् लांबेल तितकी लांबवण्याचा प्रयत्न केला. पण शेवटीं सन १५४५ च्या डिसेंबर महिन्याच्या १३ व्या तारखेस धर्मपरिषदेला सुरवात झाली. पण धर्मपरिषदेचें कार्य कशा प्रकारें चालवण्यांत यावें यासंबंधीची निश्चित दिशाच धर्मपरिषदेनें आंखली नसल्यामुळें पोपनें ठरविलेल्या दिशेनेंच धर्मपरिषदेचें कार्य चालावें असें ठरलें. ट्रेंटमध्यें इटालियन प्रतिनिधींचें बहुमत असल्याकारणानें व बाहेरच्या देशांतले पुष्कळसे प्रतिनिधि येणें शक्य नसल्यामुळें पोपचाच पक्ष प्रबल होता. सभेचा अध्यक्षहि पोपचाच पक्षपाती असल्यामुळें रोमन कॅथॉलिकांचेंच वर्चस्व अधिक होतें.

त्यामुळें चार्ल्स राजाला चीड आली. पुढें ट्रेंटमध्यें सांथीचा उपद्रव झाल्याच्या निमित्तावरून बोलोना येथें बैठक सुरू व्हावयाचें पोपनें ठरविलें. यामुळें चार्लसनें पोपला न विचारतां ऑग्सवर्ग येथें रोमन कॅथॉलिक व प्रॉटेस्टंट या दोन्ही धर्मपंथांची छोटीशी परिषद् भरविली व ट्रेंटच्या धर्मपरिषदेची बैठक खलास होऊन तींतील ठराव सगळीकडे जाहीर होईपावेतों, ऑग्सवर्गमधील परिषदेनें केलेले ठराव आपल्या साम्राज्यांत बंधनकारक आहेत असें त्यानें जाहीर केलें. अशा रीतीनें चार्ल्स व पोप यांच्यांमध्यें बेबनाव होऊन त्याचे भयंकर परिणाम होतील असें दिसूं लागलें. पण याच आणीबाणीच्या प्रसंगीं पोप हा ख्रिस्तवासी झाल्यामुळें सर्व परिस्थितीला निराळेंच वळण लागलें.

मृत पोपच्या गादीवर तिसरा ज्यूलियस हा बसला. यानें १५५१ सालीं कार्डिनल क्रेसेंटियोच्या अध्यक्षतेखालीं, ट्रेंट येथें चाललेली व मध्यंतरीं बंद पडलेली धर्मपरिषद पुन्हां बोलावली. या धर्मपरिषदेस, जेसुईट, लायनेझ, सल्मेरॉन इत्यादि धर्मपंथांचेहि प्रतिनिधि घेण्यांत आले.चार्लस राजाच्या आज्ञेवरून, जर्मन प्रॉटेस्टंट प्रतिनिधींनींहि या परिषदेंत भाग घेतला. पण फ्रेंचांचा एकहि प्रतिनिधी आला नाहीं व स्पेनच्या धर्मगुरूनींहि तटस्थ राहावयाचें ठरविलें. इतक्यांत सन १५५२ मध्यें सॅक्सनीच्या राजानें बंडाचें निशाण उभारल्यामुळें धर्मपरिषदेचें कार्य लांबणीवर टाकण्यांत आलें.

पुढें १० वर्षांनंतर ट्रेंट येथें तिसऱ्यांदा धर्मपरिषद भरली. सन १८६२ च्या जानेवारीमध्यें या परिषदेच्या कामास सुरवात झाली. प्रॉटेस्टंट प्रतिनिधीहि या बैठकीस हजर होते. पण मागील अपुऱ्या राहिलेल्या परिषदेचाच उत्तरभाग म्हणजे ही परिषद असें चौथ्या पायसनें जाहीर केलें. त्याला कोणी कबूल होईनात. मागील धर्मपरिषदेच्याहून ही पूर्ण स्वतंत्र परिषद आहे व तिला मागील परिषदांमधील ठराव रद्द करण्याची अखत्यारी आहे असें प्रॉटेस्टंट व फ्रेंच प्रतिनिधि यांचें म्हणणें पडलें. शेवटीं कसा तरी समेट होऊन परिषदेच्या कार्यास सुरवात झाली. परिषदेंत कांहीं महत्त्वाचे ठराव पास झाले पण धर्मसंस्थांमधील दोष नाहींसे करण्याचें जें मुख्य काम तें अपुरेंच राहिलें. पोपची सत्ता पूर्वीप्रमाणेंच दृढमूल राहिली. धर्मपरिषदेचे ठराव पोपच्या संमतिशिवाय बंधनकारक व्हावयाचे नाहींत असा ठराव पास झाला. धर्मविरुद्ध पुस्तकें कोणतीं आहेत हें ठरविणें, धर्मग्रंथ प्रसिद्ध करणें इत्यादि संबंधींचे सर्व अधिकार पोपला देण्यांत आले. तात्पर्य धर्मपरिषदेचा मूळ हेतु तडीस गेला नाहीं.

पण या धर्मपरिषदेच्या ठरावाला फ्रान्सच्या बादशहानीं व स्पेनच्या बादशहाच्या प्रतिनिधींनीं संमत्ति दिली नाहीं. तात्त्विक स्वरूपाच्या ठरावांनां विशेष विरोध करण्यांत आला नाहीं. पण आचारविषयक ठरावानें धार्मिक सत्ता व ऐहिक राजसत्ता यांच्यामध्यें विरोध उत्पन्न होण्याचा फार संभव असल्यामुळें या प्रकारच्या ठरावांना फ्रेंच व स्पॅनिश राजांनीं संमति देण्याचें नाकारलें. त्यामुळें या आचारविषयक ठरावांनां कोणीच विचारीनासें झालें. तथापि ट्रेंटच्या धर्मपरिषदेनें लोकांमध्यें धर्मविषयक जागृती उत्पन्न केली,रोमन कॅथॉलिक लोकांची संघटना करून प्रॉटेस्टंटांना प्रबल शत्रु निर्माण केला;पोपचें अबाधित वर्चस्व स्थापन केलें एवढें मात्र खरें व या दृष्टीनें या धर्मपरिषदेचें यूरोपच्या धार्मिक चळवळीच्या इतिहासांत फार महत्त्व आहे.

**ट्विकनहॅम**—इंग्लंड. मिड्ल सेक्स परगण्यांतील ब्रेंटफर्ड पार्लमेंटरी विभागांतील थेम्स नदीवर एक शहर आहे. लोकसंख्या (१९०१),२०,९९१. या गांवाजवळ कांहीं ऐतिहासिक महत्त्वाचीं घरें आहेत. याचें प्राचीन नांव ट्विटनहॅम होतें. येथील जहागीर एडमंड राजानें ख्राईस्ट चर्चच्या भिक्षूंनां दिली (इ. स. ९४१). आठव्या हेनरीच्या वेळीं ती राजाच्या ताब्यांत आली. नंतर ती पहिला व दुसरा चार्लस यांच्या राण्यांनां जहागीर म्हणून दिली होती.

**ट्वेन, मार्क** (१८३५-१९१०)—हें सॅम्युअल लँगहोर्न क्लेमेन्स या अमेरिकन ग्रंथकाराचें टोपण नांव आहे. तो फ्लॉरिडा येथें जन्मला. बारा वर्षांचा असतांनाच ह्याचा बाप वारला. वयाच्या सतराव्या वर्षी नदीवरील एका जहाजावर तो नावाडी झाला पण १८६१ सालीं लढाई सुरू झाल्यामुळें त्याची नोकरी गेली व पुढें तो आपल्या भावाबरोबर पश्चिमेकडे गेला; तेथें गेल्यावर तो 'मार्क टेन' या टोपण नांवाखालीं स्थानिक वर्तमानपत्रांत लिहूं लागला. १८६७ सालीं एका वर्तमानपत्रातर्फे तो भूमध्यसमुद्रांतील बंदराकडे जाणाऱ्या बोटींबरोबर गेला. प्रवास करीत असतांना त्यानें लिहिलेलीं पत्रें ' दि इनोसंट ॲब्रॉड ' या नांवाच्या पुस्तकांत प्रसिद्ध झालीं आहेत. हें पुस्तक लवकरच लोकप्रिय झालें. पुढें लवकरच तो बफेलो येथें एक दैनिक काढूं लागला.

त्याचीं सर्व पुस्तकें २२ भागांत प्रसिद्ध झालीं आहेत. पुस्तकांवर मिळविलेल्या सर्व पैशानें त्यानें आपलें सर्व कर्ज फेडलें. ख्रिश्चन सायन्सवर त्यानें अत्यन्त कडक व मनोरंजक टीका लिहिली. १९०७ सालीं त्याला ऑक्सफोर्ड विद्यापीठाची डॉक्टरची पदवी मिळाली. ता. २१ एप्रिल १९१० रोजीं रेडींग येथें तो मरण पावला. अमेरिकन ग्रंथकारांत मार्क ट्वेन बरेच दिवस लोकप्रिय होता. तो विनोदी लेखक म्हणून प्रसिद्ध आहे. पण ज्या पुस्तकांत विनोद आढळतो तीं त्याचीं उत्कृष्ट पुस्तकें नाहींत. तो जरी विनोदि असला तरी विनोदांतहि त्याचा गंभीरपणा दिसून येत असे.त्याचीं नैतिक तत्त्वें अत्यंत उच्च दर्जाचीं होतीं. 'टॉम सोयर' 'हकलबेरी फिन ', 'पुडन हेड विल्सन',' ए ट्रॅम्प अब्रॉड ', ' ख्रिश्चन सायन्स ' वगैरे त्याचीं मुख्य पुस्तकें होत.

**ठ**—हा वर्ण तीन अवस्थांतून गेलेला आहे. पहिली अवस्था अशोकाच्या दिल्ली येथील शिवालिक स्तंभावरील लेखांत, व दुसरी आणि तिसरी अवस्था इ. स. ११ व्या शतकांतील उज्जयनीच्या लेखांत दृष्टोत्पत्तीस येईल. दहाव्या शतकापर्यंत 'ठ' म्हणजे नुसता वर्तुळाकृति (पहिल्या अवस्थेसारखा) होता.

ठ = ० ठ ठ ठ

**ठग-ठगी**—ठग हा एक धार्मिक मारेकऱ्यांचा संप्रदाय आहे. स्थग या संस्कृत व ठक या पाली शब्दांपासून ठग हा शब्द बनला असावा; याचा धात्वर्थ ठकविणारा, फसविणारा असा आहे. यांनां फांसीगर असेंहि म्हणतात. लार्ड विल्यम बेंटिंक या गव्हर्नर जनरलच्या कारकीर्दींत ठगांचा नायनाट होण्याच्या आधीं पुष्कळ वर्षांपासून या संप्रदायाचा प्रसार हिंदुस्थानांत सर्वत्र झाला होता. त्यांची मुख्य देवता हिंदूंची काली ( ठाकुराणी ), दुर्गा अथवा भवानी नांवाची देवी असे. या पंथांत हिंदू मुसुलमान दोन्हीहि समाविष्ट होत व भांडणंतंटा न करतां भावांप्रमाणें रहात. त्यांच्यांत शिस्त उत्तम असून गुप्तपणा फार राखीत. या देवीला रक्तपाताशिवाय माणसाचा बळी देणें हा ते धार्मिक विधि मानीत व बळी देऊन मग त्याचा माल लुटीत. देवीवर त्यांची फार निष्ठा असे. तिच्या रागास ते फार भीत; त्यांनां माणसाचा प्राण घेण्याबद्दल कांहींच क्षिति किंवा पाप वाटत नसे. आपलें हें एक धार्मिक कृत्यच होय अशी त्यांची खरोखरची समजूत असे. या कृत्यावरच त्यांची उपजीविका असे. पण ते बायकांनां कधींहि मारीत नसत. एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत या ठगांचा प्रसार फार झाला होता. त्या सुमारास दर वर्षी हजारों लोकांचा प्राण या ठगांनीं घेतला होता. एका ठगानें तर आपल्या आयुष्यांत एकंदर ७१९ माणसांचा जीव घेण्यांत आपला हात होता असें कबूल केलें होतें.

या लोकांच्या संस्था फार गुप्तपणानें चालत असत. कोंकणाशिवाय बाकीच्या सर्व हिंदुस्थानांत हे लोक पसरले होते. त्यांची भाषा सांकेतिक असे. व ती त्यांच्याशिवाय दुसऱ्यास मुळींच समजत नसे. तसेंच त्यांच्या कांहीं खुणाहि असत. त्या खुणांवरून अमुक माणूस ठग आहे असें समजून येई; मात्र ही ओळख त्यांची त्यांनांच पटे.

ठगाची दीक्षा देण्याचा प्रकार मोठ्या समारंभाचा असे. त्यावेळीं त्यांचा उपाध्याय ( हा बहुतेक हिंदू व त्यांतल्यात्यांत ब्राह्मण असे ) एका कुऱ्हाडीच्या साहाय्यानें हा विधि करीत असे. प्रमुख प्रमुख ठग या समारंभास हजर रहात. त्यावेळच्या शकुनांवर यांचा फार भरंवसा असे. नवीन माणूस संप्रदायांत दाखल केल्यावर गूळ वाटीत. त्यांची शिस्त कडक असे निरनिराळीं कामें वांटून दिलेलीं असत व तीं ज्यांचीं त्यानें पार पाडलींच पाहिजेत असा त्यांचा सक्त नियम असे. गळफांस देणारा, प्रेतें पुरण्यासाठीं खड्डा खोदणारा, हेराचें काम करणारा, माणसाला फूस लावून आणणारा वगैरे लोक निरनिराळे असत. हे लोक मोठमोठ्या टोळ्या करून प्रवास करीत. केव्हां केव्हां त्यांच्या टोळींत तीनशें ते चारशेंपर्यंत लोक असत. यांनां देशांतील कांहीं व्यापारी, सावकार, जहागीरदार, शेतकरी, पोलीस, जमीनदार यांचा गुप्त आसरा होता असें म्हणतात. लुटलेला माल यांच्यामार्फत ठग लोक विकीत असत. कांहीं व्यापारी तर यांच्या गुप्तसंस्थांचे सभासदहि असत. कांहीं ठग यूरोपियन अधिकाऱ्यांच्या पदरीं नौकरीस रहात व मधून मधून रजा घेऊन ठगांच्या टोळ्यांत ( ते ज्या टोळींत असत तींत ) आपापलें काम करण्यास जात.

शंभर वर्षांपूर्वी प्रवासाचे रस्ते हल्लींच्या सारखे उत्तम व निर्भय झाले नव्हते व पोलीसचा बंदोबस्तहि जितक्यास तितकाच होता. त्यामुळें ठगांनां रस्तेलूट करण्यास फारसा अडथळा येत नसे. यात्रेकरू, कापडी, संन्यासी, व्यापारी वगैरेंचे वेष घेऊन ठगांच्या टोळ्यांच्या टोळ्या मोठमोठ्या रस्त्यानें हिंडत व मार्गांत आढळणाऱ्या श्रीमान् प्रवाशांनां किंवा व्यापाऱ्यांनां गांठून लुटीत व गळफांस घालून ठार करीत. अशा लोकांनां त्यांच्या मालासह नाना प्रकारच्या युक्त्यांनीं फसवून ते आपल्या गोटांत आणीत; या गोटांच्या जवळ प्रारंभींच न दिसेल अशा ठिकाणीं या लोकांचीं प्रेतें पुरण्यासाठीं खड्डे खणून ठेविलेले असत. या फूस लावून आणलेल्या लोकांनां आणून एका मोठ्या मांडवांत बसवीत. नंतर त्या प्रत्येक माणसाच्या मागें एक एक ठग आपला रुमाल हातांत घेऊन बसे. या रुमालाला एका टोंकास एक पैसा ( फांस लवकर आंवळला जाण्यासाठीं ) बांधलेला असे. व्यापाराच्या अथवा इतर गप्पा चालल्या असतां, ठगांचा नाईक एक खुणेचा शब्द एकदम उच्चारी त्याबरोबर लागलीच प्रत्येक माणसाच्या मागें बसलेला ठग आपला रुमाल त्या माणसाच्या गळ्यावर टाकून, त्याला खालीं पाडी व फांस घालून त्याचा जीव घेई. त्या माणसाची धडपड फार थोडी चाले. हें सारें कृत्य एक दोन मिनिटांच्या आंत उरके. फांस घालणारा ठग आपल्या कामांत अत्यंत तरबेज असे. अशा ठगाच्या हातून ( फांस

न वसतां )पांचशेंत एखादाच माणूस सटे. अशीं क्वचित उदाहरणें होत असत. परंतु त्याला लागलीच पकडून दुसऱ्यांदा फांस घालीत व मारीत. रुमालाच्या फांसाशिवाय इतर कोणत्याहि साधनानें ठग लोक माणसांचा प्राण घेत नसत. प्राण घेतल्यानंतर त्या लोकांचा सर्व माल ते लुटीत. कापडचोपड व नक्त पैशांशिवाय बाकीचा माल वर सांगितल्याप्रमाणें भेद्या व्यापारांनां विकून टाकीत. नंतर असा आलेला पैसा टोळीच्या नायकाच्या देखरेखीखालीं ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें बक्षीस मिळे. त्यांच्यांत अधिकारपरत्वें बरेच लोक असत. लुटींत बायका मिळाल्यास त्या गुलाम म्हणून विकीत. पुढें जेव्हां एका ठगानें आपखुषीनें जबानी दिली तेव्हां त्यांचीं सर्व कृत्यें उजेडांत आलीं.

प्राण गेल्यानंतर प्रेतें उचलून जवळच्या खड्ड्यांत पुरीत व त्यांवर झाडें वगैरे टाकून खड्डे बुजवून टाकीत अशा खड्ड्यांच्या जागा पुष्कळ होत्या कर्नल स्लीमन यानें असल्या २७४ जागा एका अयोध्या प्रांतांतच हुडकून काढल्या. तो नरसिंगपुरास ( मध्यप्रांत ) राहत असतां, त्याच्या बंगल्यापासून एका हांकेच्या अंतरावर असली एक जागा होती. ठगांची शिस्त, गुप्तपणा व लोकांवर त्यांचा दरारा इतका होता कीं, त्यांच्या टोळीपैकीं एखादा ठग पकडल्यास त्याच्यावर गुन्हा शाबीत करण्याइतका भक्कम पुरावा मुळींच मिळत नसे. त्यामुळें त्यांच्या कृत्यांची पूर्णपणें माहितीहि कांहीं आढळत नसे.

ठग जात बरीच जुनी होती. त्यांच्यामधील कांहीं लोकांचें म्हणणें तर असें होतें कीं वेरूळच्या लेण्यांतील कांहीं चित्रांत आमच्या धंद्याचीं चित्रें असून तेव्हांपासून(८ वें श.) हा धंदा सुरू आहे.दिल्लीचा (१४वें शतक)मुसुलमान अवलिया निजामुद्दीन ठगच होता व त्यानें ठगीवरच इतकी संपत्ति मिळविली असेंहि ठग म्हणत. ठगांचा ऐतिहासिक उल्लेख तेराव्या शतकांतील दिल्लीचा पातशहा जलालुद्दीन खिलजीच्या कारकीर्दीतील आढळतो. त्याच्या पुढें एक हजार ठग लोक आणले असतां, त्यानें त्यांनां शिक्षा न देतां बंगालमध्यें हद्दपार केलें आणि तेव्हांपासून त्या लोकांनीं नदीवरील चांच्यांचा धंदा सुरू केला. अकबरानें इटावा भागां( संयुक्तप्रांत )त पांचशें ठग लोकांनां फांशीं दिल्याचाहि उल्लेख आढळतो. अवरंगझेबाच्या वेळीं थिवेनॉट या फ्रेंच प्रवाशानें त्या वेळच्या ठगांच्या कृत्यांची साग्र माहिती दिलेली आहे. फ्रायर म्हणतो कीं सुरतेस अवरंगझेबानें पंधरा ठगांनां फांशी दिलेलें मी पाहिलें.

टिप्पूचें राज्य खालसा केल्यावर इंग्रजांच्या सैन्यांतील बरेचसे शिपायी एकाएकीं नाहींसे झाले ( १७९९ ) व त्याच वेळीं दक्खनमध्यें ठगी जास्त बोकाळली. सन १८१८-१९ पासून ठगीचा मोड करण्यास प्रारंभ झाला व एखादा दुसरा ठग पकडून त्याला फांशीहि देत. परंतु १८२९ सालीं जेव्हां त्यांच्यांपैकीं एका प्रख्यात(फिरंग्या नांवाच्या)ठकानें माफीचा साक्षीदार बनून, आपल्या मार्गाच्या व पंथाच्या सर्व गुप्त माहितीचा परिस्फोट केला, तेव्हां मात्र ठगीचा नायनाट लवकर झाला. कर्नल स्लीमन याला,याच्या हाताखालीं सैन्य देऊन केवळ याच कामावर नेमिलें होतें. वरील फितुरी ठगाच्या जबानीवरून भराभर ठग लोक पकडले गेले व त्यांच्या प्रेतें पुरण्याचा खड्ड्यांचाहि शोध लागला. तेव्हां त्यांच्यावर खुनांचे आरोप ठेवून त्यांनां फांशीं देण्यांत आलें. सर विल्यम स्लीमन याला त्या काळीं ठगी स्लीमन म्हणत असत. त्यानें ठगीचा नायनाट करण्यासाठीं जीं जीं कृत्यें केलीं, तीं सर्व कायदेशीर गणण्यासाठीं तत्कालीन ग. जनरल लॉर्ड बेंटिंक यानें कायदे बनविले. १८३१-३७ पर्यंत ३२६६ ठगांचा नायनाट ( वाटेल त्या कृत्यानें ) करण्यांत आला. त्यांपैकीं ४८३ ठगांनीं कबुलीजबाब दिल्यानें, त्यांचा प्राण न घेतां त्यांनां पुष्कळ दिवसपर्यंत जबलपूर येथें एका स्वतंत्र तुरुंगांत डांबून ठेविलें होतें. [ हापकिन्स—रिलिजन्स ऑफ इंडिया; स्लीमन—ठग्स; हटन—ठग्स अँड डेकॉइट्स; मेडोज टेलर-कन्फेशन आफ ए ठग. ]

**ठट्टा, ता लु का.**—मुंबई, सिंधप्रांत. कराची जिल्ह्यांतील एक तालुका. याचें क्षेत्रफळ १२२५ चौरस मैल असून यांत४४खेडीं आहेत. तालुक्याची लोकसंख्या १९११ सालीं ४७२२१ होती. यांत ६ मुख्य कालवे असून त्यांचें पाणी जमीनीला पुरविलें जातें. तांदूळ, ऊंस, गहूं, जव, ज्वारी, बाजरी, आणि तीळ हीं या तालुक्यांतील मुख्य पिकें आहेत.

श ह र.—हें गांव ठट्टा तालुक्याचें मुख्य ठिकाण असून सिंधूच्या पश्चिम तीरापासून तीन मैलांवर आणि सिंधूची पूर्व शाखा बागर ही, सिंधूपासून जेथें वेगळी होते, तेथून ४ मैलांवर आहे. एक दोन ग्रंथकारांच्या लेखांवरून हें पूर्वीं सिंधूवर असावें असें दिसतें. ठट्टा शब्दाचा अर्थ तीर असा आहे हें सिंधचा अधिकारी निजामउद्दीन यानें इ. स. १४९५ त स्थापिलें. त्यापूर्वी समा लोकांची राजधानी सामीनगर, जी ठट्टाच्या वायव्येस ३ मैलांवर होती, ती खालील सिंधची राजधानी होती. सामीनगरची स्थापना दिल्लीचा बादशहा अल्लाउद्दीन ( इ. स. १२९५-१३१५ ) याच्या वेळीं झाली असें म्हणतात. ठट्टाच्या नैर्ऋत्येस ४मैलांवर कल्याणकोट किंवा तघलखकोट आहे, तें पूर्वीचें असावें.

ठट्टा हें गांव अलीकडचें आहे. परंतु सामीनगर आणि कल्याणकोट यांचीं स्थानें जुनीं आहेत. हें ठिकाण व्यापारास फार सोईचें आहे. परंतु नद्यांच्या फेरफारामुळें प्रवाह बदलतो. यामुळें शहराची जागा व त्याचें नांवहि पुष्कळ वेळां बदललें असावें. अरब भूगोलवेत्त्यांचें मनहाबरी आणि पेरिप्लुस ग्रंथांतलें मीनागरा ह्यांचें स्थान ठट्टा हेंच असावें असें कांहीं प्रमाणांवरून सिद्ध होतें. मांड जातीचे लोक खालील सिंधमध्यें ख्रिस्ती शकाच्या आरंभापासून आहेत. रशीदउद्दीन लिहितो कीं, नोहाचा मुलगा हाम याचे वंशज मेड आणि जाट हे सिंधच्या लोकांचे महाभारतापूर्वीचे पूर्वज

होते. मेर, मेड, मंड, मिंड इतक्या प्रकारांनीं हें नांव लिहिलें आहे. त्या मांड लोकांच्या नांवावरून मिनागर (मिनांचें नगर) हें नांव पडलें व तेथें सिथियन लोक अंमल करीत होते असें कनिंगहॅमनें बऱ्याच खटपटीनें दाखविलें आहे. मिनागरा हें कोठें होतें हें ग्रीक ग्रंथांत लिहिलेलें नाहीं. मिननगर आणि मनहाबरी (मंडआबरी) हीं एकच हें खरें असेल तर मिनागरा ही इंडो सिथियन राजांची राजधानी निःसंशय ठट्टा येथें होती. तिहींच्या स्थितीचीं वर्णनें जुळतात.

अकबरानें सिंध आपल्या राज्यास जोडिला तेव्हां हें गांव मिरझाजानीबेगकडे जहागीर म्हणून होतें. इ. स. १७३९ त हें गांव इराणच्या नादीरशहानें घेतलें. त्याच्याजवळून कल्हो राज व कल्होराजापासून तालपूर मीर याच्याकडे गेलें. अलेक्झांडर हॅमिल्टन १६९९ सालीं येथें आला होता. व तो म्हणतो कीं, त्या वेळेस या गांवांत ८०००० लोक प्लेगनें मेले. त्यावेळेस याची लांबी ३ मैल व रुंदी १॥ मैल होती. पॉटिंजर नांवाचा गृहस्थ म्हणतो कीं, ज्यावेळेस नादीरशहा येथें आला त्यावेळेस या गांवांत ४०००० विणकर, २०००० इतर कारागीर व ६०००० इतर धंदेवाले, इतके लोक होते. या गांवीं कापूस व रेशीम यांचीं वस्त्रें विणण्याचे कारखाने आहेत.

**ठाकुर**—यांची एकंदर लोकसंख्या (१९११) २४५७८४ असून ही जात मुख्यत्वेंकरून मुंबई, पंजाब व काश्मीर या इलाख्यांत आढळते. ठाकुर लोकांत हिंदु, मुसुलमान, शीख व बौद्ध या धर्मांचे लोक आहेत. यांनां ठक्कर असेंहि दुसरें नांव आहे. ठाकुर ही पदवी लहान रजपूत संस्थानिकांनां लावण्याचा प्रघात आहे. यावरून कित्येकांची अशी समजूत आहे कीं ठाकुर जात रजपुतांशीं मिश्रण होऊन झालेली आहे. नाशिक जिल्ह्यांत इगतपुरी येथें एका ठाकराजवळ एक ताम्रपट आहे, त्यांत ठाकूर शब्द जातिवाचक अर्थी उपयोजिलेला आहे. नाशिक व ठाणें जिल्ह्यांतील ठाकूर मूळचे गुजराथेंतून पळून आलेले असावे. प्रथमतः ते शेतकी व मजूरी करून उदरनिर्वाह करीत. पुढें ते जळाऊ लांकडाचा व्यापर करूं लागले. उद्योग करून उदरभरण न झालें तर जंगली कंदमुळांवर ते रहात. काठाकूर व माठाकूर असे त्यांचे दोन भेद आहेत. त्यांच्यात रोटीबेटीव्यवहार चालू नाहींत. माठाकूर श्रेष्ठ समजले जातात. कारण ते मराठे ठाकूर असतात. काठाकूर म्हणजे कडु (दासीपुत्र) होत. त्यांच्या देवकांत सूर्यफूल, तलवार, अंबा, उंबर, साग, जांभूळ हीं असतात. मामेबहिणीशीं लग्न करतां येतें पण आतेबहिणीशी व मावसबहिणीशीं करतां येत नाहीं. एकाच वेळीं दोन बहिणींशीं लग्नें करतां येतात. हे मांसाहारी व मद्यपी असून कुणबी, धनगर व गोपाळ यांच्या हातचें अन्न खातात. यांचे मुख्य देव हिरवा, चेडा, वाघ्या, बहिरी, भवानी, सुपाली, खंडेराव, वेताळ व मोखाडा पेट्यांतील डोंगरांवरचीं भुतें होत. कांहीं वर्षांपूर्वी त्यांचे धार्मिक संस्कार तेच करीत परंतु अलीकडे ते ब्राह्मण उपाध्यायामार्फत करूं लागले आहेत.

ठाणें जिल्ह्यांत मोखाडा पेट्यांतील ठाकुर लोकांची एक सदरपंचायत आहे. पंचायतींत पांच पंच व मुख्य सरपंच हे पिढीजाद असतात. जातींतील तंट्यांचा निकाल लग्नाच्या वेळीं अथवा अंत्यविधीप्रसंगीं भोजनोत्तर केला जातो. गुन्ह्यांनां दंडाची शिक्षा दिली जाते नाशिक जिल्ह्यांत त्रिंबक गांवीं ठाकुर जातीची कायमची एक संस्था आहे, तिचा अंमल शहापूर, वाडे, भिवंडी, कल्याण (ठाणें जिल्हा) व नाशिक, इगतपुरी वगैरे तालुक्यांत चालतो. पंचांच्या बोलावणेकऱ्याचें नांव 'गवडा' असतें. दंडापैकीं गवडा यास १ रुपया मिळतो. त्रिंबक येथील सदरपंचायतींत जो दंड वसूल होतो त्यापैकीं कांहीं रक्कम इगतपुरी जवळील बोरलई देवीला देतात. या शिवाय जर कांहीं रक्कम शिल्लक राहिली तर ती पंचायतींत खर्ची घालतात.

ठाकुरांच्याबद्दल जुनाट माहिती फारशी नाहीं. हे मूळचे डोंगरी व रानटी लोक होते. पूर्वेकडून येऊन कोळ्यांनीं वारल्यांप्रमाणें ठाकुरांचाहि मुलुख बळकाविला. ठाकुरांची वस्ती जशी उत्तर कोंकणांत आहे, तशीच नाशिक प्रांतींहि आहे. या ठाणें-नाशिक भागांतील ठाकुरांत वरले हें आडनांव आहे. वरले म्हणजे जे कोंकणांतून वरघांटीं गेले ते. वारली हे मुळचे ठाकुरच होत असें कांहींचें म्हणणें आहे. ज्या ठाकुराच्या विनंतीवरून पुलकेशीच्या पुतण्यानें एका शिवलिंगाच्या पूजेसाठीं एक गांव तोडून दिला, तो ठाकूर मूळचा त्र्यंबकेश्वरीचा रहिवाशी ठरतो व जो गांव दिला तो गोपराष्ट्रांत मोडत होता. त्यावरून ठाकूर हे मूळचे गोपराष्ट्रांमधील ठरतात.

पंजाबांतील ठाकुरांनां ठक्कर असेंहि म्हणतात त्यांची लोकसंख्या (१९११) ६९८२ आहे. हे लोक मुख्यतः हिंदू असून, दिल्ली, गुरुदासपूर हे जिल्हे व मांडी, सुकेत व चंबा हीं संस्थानें यांत आढळतात. डोंगरांतील ठक्कर लोक हे मूळचे रजपूत असून पुढें बाटून मुसुलमान झाले. परंतु यांच्यापैकीं हल्लीं पुष्कळ आपणांस रजपूत म्हणवितात. पश्चिम पंजाबांत हे लोक नदीची पूजा करतात. रजपूत लोकांतील वरच्या दर्जाचे लोक आपणांस ठाकूर म्हणवितात परंतु ठक्कर व ठाकूर हे निराळे आहेत असें कोणी म्हणतात.

काश्मीरमधील ठाकुरांनांहि ठक्कर म्हणतात. या जातीची तिकडील लोकसंख्या १०४६९४ असून हे लोक हिंदू, आर्यसमाजी व मुसुलमानी धर्माचे आहेत. या लोकांतील विधवाविवाह, नैतिक बंधनांची ढिलाई व जातिनिर्बंध पाळण्याची हयगय यांमुळें अस्सल रजपूत त्यांनां कमी दर्जाचे समजतात. ब्राह्मण व रजपूत लोकांनीं हलका मानलेला शेतीचा धंदा हे लोक करितात. [ सेन्सस रिपोर्ट.

१९११; ठाणें ग्याझेटियर; नाशिक ग्याझेटियर; विविधज्ञानविस्तार. पु. २३. पृ. १११.]

**ठाकुरगांव**—पूर्वबंगाल, राजशाही विभाग. दिनाजपूर जिल्ह्याचा हा एक उत्तरेकडील पोटविभाग आहे. क्षेत्रफळ ११७१ चौरस मैल. यांत २९८० खेडीं असून लोकसंख्या १९११ सालीं ५४५५६६ होती. ठाकुरगांव हें या पोटविभागाचें मुख्य ठिकाण असून जवळच्या कांतनगर येथें एक सुंदर देवालय आहे. या पोटविभागांत ठाकुरगांवाशिवाय राणीसंखील, पीरगंज व बीरगंज हे पेटे आहेत. खुद्द ठाकुरगांव पेट्याची लोकसंख्या (१९११) २२३६७१ असून क्षेत्रफळ ४४१ चौ. मै यांत १०५३ खेडीं आहेत. [इंपे ग्याझे. पु. २३.]

**ठाकूरदासबोवा**—हा कनोजा ब्राह्मण असून शिनराजपूरचा राहणारा होता. ह्याचें मूळचें नांव बालाप्रसाद. ह्याच्या बापाचें नांव नीळकंठ, उपनांव द्विवेदी, गोत्र काश्यप. याला उपरति होऊन हा अकरा वर्षांचा असतांच घरून निघाला व यात्रा करीत करीत हैद्राबादेस (निजाम) आला. त्याच्या भजनकीर्तनावर लुब्ध होऊन हैद्राबादच्या चंदूलाल दिवाणानें त्याला आपल्या पदरीं ठेविलें. तेथें कांहीं दिवस राहून तो रामेश्वराकडे गेला व तेथून फिरत फिरत पंढरपुरास आला.तेथील भजनाचा सोहळा त्यानें पाहिला व तो त्या ठिकाणीं पुष्कळ वर्षें राहिला. येथें असतां त्यानें आपलें नांव ' ठाकूरदास " ठेविलें. एकेसमयीं श्री. बाजीराव रघुनाथ पेशवे, बापू गोखले व पंडित भूदेव मिश्र हे पंढरपुरास आले. भूदेवमिश्रानें ठाकूरदासाचें कीर्तन ऐकलें आणि तो लुब्ध होऊन गेला. ती वार्ता त्यानें श्रीमंतांस सांगितली. दुसऱ्या दिवशीं बाजीराव व बापू गोखले हे कीर्तनास आले. कीर्तन ऐकून बापू गोखला इतका रमला कीं तो लगेच बोवांचा चेला बनला. बापूच्या सांगण्यावरून पेशव्यानें बोवाला तारगांव (सातारा जिल्हा) इनाम दिला. यानें सहजबोध नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. (इतिहास संग्र. जुन्या ऐतिहासिक गोष्टी पृ. १२)

**ठाकूरद्वार**—संयुक्त प्रांत, मुरादाबाद जिल्ह्यांतील उत्तरेकडील तहशील. क्षेत्रफळ २४० चौरस मैल. तहशिलींत २६१ खेडीं असून ठाकूरद्वार हें मुख्य ठिकाण आहे. १९११ सालीं लोकसंख्या १२१३१६ होती. मुख्य पीक तांदुळाचें आहे. उंसाची लागवडहि फार मोठी आहे. १९०२–३ सालीं वहीत जमीन १६४ चौ. मै. होती. ठाकूरद्वार हें गांव महंमदशहाच्या वेळेस (१७१९-४८) वसलें. १८०५ मध्यें हें अमीरखानानें (पेंढारी) लुटलें होतें.

**ठाणभवान**—संयुक्त प्रांत, जिल्हा मुझफरनगर. कैरान तहशिलींत हें गांव आहे. येथें असणाऱ्या एका जुन्या भवानीच्या देवालयावरून या गांवाचें हें नांव पडलें. १८५७ सालीं येथील लोकांनीं, काजी महबूब अलीखान आणि पुतण्या इनायत अली यांनां पुढारी करून उघडपणें बंड केलें होतें.लवकरच इंग्रजांनीं शीख व गुरखे पाठवून तें मोडलें व गांव परत घेतलें.

**ठाणें**, जिल्हा.—मुंबई इलाख्याच्या उत्तरविभागांतील एक जिल्हा. याचें क्षेत्रफळ ३५७३ चौरस. मैल. उत्तरेस दमण (पोर्तुगीज) व सुरत जिल्हा; पूर्वेस पश्चिम घांट; दक्षिणेस कुलाबा जिल्हा; आणि पश्चिमेस आरबी समुद्र आहे. हा जिल्हा सखल असून त्यांत पूर्वेस व ईशान्येस १०० ते २५०० फू. उंचीचे पुष्कळ डोंगर आहेत. किनाऱ्याजवळील वैतरणीच्या कांठची जमीन सखल व सुपिक आहे. डहाणूकडे कोंकणपेक्षां गुजराथी छाया जास्त दिसते. तेथें भाषाहि मराठी ऐवजीं गुजराथी चालते. बहुतेक गांवें दाट वस्तींचीं आहेत. ईशान्येकडील अरण्याच्छादित दऱ्यांमधून थोडथोडी लागवड होते. बहुधां सर्व भागांत पाणी मुबलक असून झाडी पुष्कळ आहे. पाण्याच्या मुबलकपणानें भाताचें पीक मुख्यतः काढतात. या जिल्ह्यांत मिठागरेंहि पुष्कळ आहेत. वैतरणी ही मुख्य नदी नाशिक जिल्ह्यांतील त्र्यंबक डोंगरांत (गोदावरीजवळ) उगम पावते. त्यामुळें तिला फार पवित्र मानतात. दख्खनचा उत्तर भाग व समुद्र यांच्या दरम्यान होणाऱ्या व्यापाराचा सर्वांत जुना मार्ग तिच्या खोऱ्यांतून होता. त्या खोऱ्यांच्या रमणीयपणामुळें प्राचीनकाळीं आर्य लोकांनी तिच्या कांठीं वसाहत केली होती. महाभारतांत या नदीचा उल्लेख आलेला आहे. आगाशीपासून मनोरपर्यंत या नदींतून लहान नावा चालतात. उल्हास नदी बोरघांटाच्या उत्तरेकडील खिंडींत उगम पावून वायव्य दिशेनें ४० कोसांपर्यंत वहात गेल्यावर वसईच्या खाडीला मिळते. वसईच्या खाडीखेरीज इतर खाड्या समुद्रापासून १० मैलांच्या आंतच उथळ होतात.

या जिल्ह्यांतील विहार, तुळशी व तान्सा या कृत्रिम तलावांच्या योगानें मुंबईला पाण्याचा पुरवठा होतो. विहार तलाव मुंबईपासून १५ मैलांवर कुर्ले व ठाणें यांच्यामध्यें असून त्याचें क्षे. फ. सुमारें १४०० एकर आहे. यांच्या जवळच तुळशी तलाव आहे. मुंबई शहराच्या ज्या उंच भागांत विहाराचें पाणी चढत नाहीं त्या भागाला या तलावाचें पाणी दिलेलें आहे. ठाण्याच्या वायव्येस दोन मैलांवर असलेल्या पोकर्ण तलावाचें पाणी ठाणें गांवाला मिळतें.

थळ घांटापासून दक्षिणेकडे गेलेला सह्याद्रि या जिल्ह्याची पूर्वेकडील एक नैसर्गिकच मर्यादा बनला आहे. इतर डोंगरांपैकीं साष्टींमधून दक्षिणोत्तर जाणारी रांग, आणि वैतरणी व वसईची खाडी यांच्या दरम्यान दक्षिणोत्तर जाणारी रांग, या रांगा महत्वाच्या आहेत. याशिवाय दुसरे कित्येक तुटक डोंगर असून त्यांवर प्राचीन काळीं मजबूत किल्ले होते. त्यांपैकीं मादुली, कामणदुर्ग व मलंगगड हे पहाण्यासारखे आहेत.

या जिल्ह्याच्या किनाऱ्याला पुष्कळ बेटें आहेत. त्यांमध्यें साष्टी हें सर्वांत मोठें आहे. वसई बेटाचा उल्लेख इतिहासांत

आलेला असून अद्यापिहि तें बेट व मुख्य जमीन यांच्या मधून वसईची खाडी वहाते. वसई तालुक्यांत अर्नाळा बेटावर अर्नाळा नांवाचाच किल्ला आहे. त्यांत मुसुलमानी अवशेष, दारावर संस्कृत व मराठी शिलालेख, आणि आंत जुनें हिंदू देऊळ आहे ( अर्नाळा पहा ).

या जिल्ह्यांत प्रमुख उन्हाळीं माहीम, वार्डे, भिवंडी आणि वसई येथें आहेत; परंतु माहीमखेरीज वाकींचे झरे तान्सा नदीच्या पात्रांत किंवा पात्राजवळ आहेत. किनाऱ्याजवळ ताडीचीं झाडें पुष्कळ होतात. त्यांच्यापासून ताडी काढून विकतात. या धंद्यावर सरकारी नियंत्रण आहे. फळझाडांत कलमी आंबे फार उत्तम होतात. वसई तालुक्यांत आगाशी, वसई वगैरे ठिकाणीं सुमारें १० प्रकारचीं सुकेळीं होतात.

नवदाव्या शतकाच्या आरंभीं या जिल्ह्यांत कित्येक 'काळे सिंह' होते असें फ्रायर ओडेरिक लिहितो. हल्लीं जंगलांत वाघ, चित्ते, तरस, कोल्हे व सायाळ हे प्राणी सामान्यपणें आणि गवा व चितळ हे कधीं कधीं आढळतात. विषारी व निर्विष साप फार आहेत.

सहा महिने हवेंत आर्द्रता अतिशय असल्यानें येथील हवा सामान्यतः रोगट ( मलेरियाची ) असते. समुद्रावरील वारे नेहमीं येत असल्यामुळें निरनिराळ्या ऋतूंत उष्णमानामध्यें फारसा फरक होत नाहीं. उष्णमान जानेवारीत ५८° व एप्रिलमध्यें १०३ होतें हिंवाळा फार थोडा व सौम्य असतो. किनाऱ्याला सरासरी वार्षिक पाऊस ६२ ते ६९ इंच होतो. सर्वांत जास्त पाऊस ( १११ इंच ) शहापुर जिल्ह्यांत आणि सर्वांत कमी ( ६२ इंच ) उंबरगांव पेट्यांत पडतो.

इतिहासः—येथें खि. पू. तिसऱ्या शतकांतील एक अशोकाचा बौद्ध स्तूप आढळला. त्यावरून त्याचें राज्य या भागावर सोपार येथें असल्याचें सिद्ध होतें. अशोकानंतर आंध्रभृत्य, त्यांच्यामागून शक किंवा पश्चिम क्षत्रप, व पुढें कल्याणचे चालुक्य ( यांनीं प्राचीन घराण्याचा उच्छेद केला ) हे येथें राज्यकर्ते झाले. इ. स. ८१० ते १२६० पर्यंत हा भाग शिलाहारांकडे असून त्यांची राजधानी पुरी (ठाणें) येथें होती. त्यांच्या अमदानींत मुसुलमानानांनीं स्वारी केली, परंतु १५०० च्या सुमारास गुजराथच्या नवाबाची सत्ता येथें कायमची स्थापन होण्यापूर्वीं येथें मुसुलमानांचें वर्चस्व नव्हतें मात्र होतें. १५३३ सालीं पोर्तुगीज लोकांनीं गुजराथच्या नवाबापासून वसई घेऊन तेथें किल्ला बांधला; पुढें तें हळू हळू किनाऱ्यावरील मुलुख आपल्या ताब्यांत घेऊं लागल्यामुळें त्यांचें अहमदनगरच्या राजांशीं व जव्हारच्या कोळी राजाशीं वैमनस्य पडलें. स. १६६६ त शिवाजीनें या जिल्ह्याचा आग्नेय भाग काबीज करून साष्टी बेटांतील पोर्तुगीज लोकांवर हल्ला केला आणि कल्याणपर्यंत सर्व मुलुखांत आपली सत्ता अनिर्बंध रीतीनें प्रस्थापित केली ( १६७५ ). पुढें कांहीं दिवसांनीं मोंगलांनीं आपला गेलेला मुलुख परत मिळवून पोर्तुगीजांवर हल्ला केला. जंजिऱ्याच्या शिद्याच्या व मराठ्यांच्या जलयुद्धामुळें या प्रांताच्या सुरक्षितपणाला धक्का बसत असे. अखेर यांच्यांनीं पोर्तुगीजांचा मुलुख उध्वस्त केला व अवरंगझेबाच्या मृत्यूनंतर आंग्र्यानें बोरघांटापासून भिवंडीपर्यंत सर्व मुलुख आपल्या ताब्यांत आणिला. पुढें १७३९ पर्यंत पेशव्यांनीं ठाणें व वसई या बंदरासुद्धां पोर्तुगीजांचा सर्व मुलुख जिंकून घेतला. पेशव्यांच्या गृहकलहांत राघोबा दादानें वसई व साष्टी व त्याच्या भोंवतालचा मुलुख इंग्रजांस देऊन इंग्रजांशीं तह केला; परंतु पुढें सालबाईच्या तहान्वयें तो मुलुख इंग्रजांनीं पेशव्यांना परत दिला. शेवटीं रावबाजीनें (१८१७) इंग्रजांच्या मदतीबद्दल त्यांना ठाणें जिल्ह्याचा उत्तरभाग दिला.

प्राचीन अवशेषः—या जिल्ह्यांत मुख्यतः हिंदूंचे प्राचीन अवशेष बरेच आहेत. पोर्तुगीज लोकांचे महत्त्वाचे अवशेष म्हणजे वसई, मंडपेश्वर, घोडबंदर व इतर ठिकाणचे त्यांचे किल्ले आणि प्रार्थनामंदिरें हे होत; भिवंडी व कल्याण येथील मशिदी, थडगीं, आणि टाकीं हे मुख्य मुसुलमानी अवशेष होत. कान्हेरी, कोंदिवटी व भिवंडी येथें बौद्धांचीं कोरीव लेणीं आहेत; त्यांपैकीं कान्हेरी येथील व डहाणु तालुक्यांतील इंद्रगड व जीवधन येथील आणि साष्टी तालुक्यांतील जोगेश्वरी व मंडपेश्वर येथील लेणीं पाहण्यासारखीं आहेत कल्याण तालुक्यांत अंबरनाथ, भिवंडी तालुक्यांत लोणाद व शहापूर तालुक्यांत अटगांव व वशली येथील जुनीं कोरीव देवालयें प्रेक्षणीय आहेत.

लोकसंख्याः—ठाणें जिल्ह्यांत ७ मोठीं गांवें असून १६९७ खेडीं आहेत. त्यांत १०३ इनामी आहेत. एकंदर लो. सं. ( १९२१ ) ७५९९१६. पैकीं शेंकडा ९० हिंदु व शेंकडा ५ मुसुलमान आहेत. शेंकडा ८८ लोक मराठी भाषा बोलतात. वारली, ठाकुर, कातकरी, कायोडी, आगरी आणि कोळी वगैरे मूळच्या (अनार्य) लोकांचा भरणा ठाणें जिल्ह्यांत बराच आहे. पहिल्या चार जाती जंगली असून आगरी लोक शेतकरी व मीठ तयार करणारे आहेत, आणि कोळी लोक मासे मारण्याचा व खलाशांचा धंदा करतात. हे लोक मद्यपी फार आहेत. हंगामाच्या वेळीं या जिल्ह्यांत घांटावरून पुष्कळ कुणबी येतात. भंडारी जातीचे लोक माडी काढण्याचा धंदा करितात. लोकसंख्येपैकीं शेंकडा फक्त चारच उद्योगधंद्यावर आपलें पोट भरतात.

शेतीः—गोडी व खारी असे जमिनीचे दोन प्रकार असून गोडी जमीन काळी किंवा तांबडी असते. काळ्या जमिनीला शेतजमीन व तांबडीला माळवर्कस असें म्हणतात. ज्या जमिनीला बांध घातलेले असतात किंवा जी सखल असल्यामुळें बांधाखेरीज जींत पाणी राहूं शकतें अशा भाताच्या जमिनीला बांधणी असें नांव आहे; व भाताच्या इतर खुल्या जमिनीला माळखंडी असें म्हणतात. भात हें मुख्य

पीक असून त्याच्या खालोखाल नागली व वरी हीं पिकें होतात. किनाऱ्याकांठीं असलेल्या बागांतून आंबे व केळीं होतात. मासे मारण्याचा धंदा बराच महत्त्वाचा असून फायद्याचा आहे. जंगलांतून इमारती लांकूड, जळाऊ लांकूड, कोळसा, बांबू वगैरे माल निघतो.

शेतीच्या खालोखाल समुद्राच्या पाण्यापासून मीठ तयार करणें हा या जिल्ह्यांतील महत्त्वाचा धंदा आहे. पितळेचीं व मातीचीं भांडीं कांहीं ठिकाणीं होतात. ठाणें व भिवंडी येथें रेशमी व सुती कापड निघतें. कुर्ला येथें सूत कातण्याच्या, कापड विणण्याच्या व हाडांचें खत तयार करण्याच्या गिरण्या आहेत.

ह्या जिल्ह्यांतून तांदूळ, मीठ, लांकूड, चुना व खारेमासे हे जिन्नस बाहेर जातात आणि कापड, धान्य, तंबाखू, नारळ, साखर व गूळ हे जिन्नस बाहेरून आणावे लागतात. समुद्रकिनाऱ्यानें व खाड्यांतून जहाजें व पडाव यांच्या योगानें दळणवळण होतें. या जिल्ह्यांतून बी. बी. आणि सी. आय्. व जी. आय्. पी. या रेल्वे आणि थळघांटावरून नाशिककडे जाणारा आग्रा रोड आणि बोरघाटांतून जाणारा पुणें रस्ता या दोन मुख्य सडका आहेत. कोंकणच्या इतर भागांप्रमाणें ठाणें जिल्ह्यांतहि सहसा अवर्षण पडत नाहीं.

ह्या जिल्ह्यांत नऊ तालुके व दोन पेटे आहेत. ते—वसई, भिवंडी, डहाणू, कल्याण, माहीम, मुरबाड, साष्टी, शाहापूर, वाडे आणि उंबरगांव व मोखाडें पेटे. ह्या जिल्ह्यांतच जव्हार संस्थान आहे. या जिल्ह्यांत थळ, शीर, अवंधा, पिंपरी, मालशेज व नाणें हे घांट आहेत. उंबरगांव, दांतिवरें, वसई, कल्याण, तुर्भे, ठाणें, डहाणू, चिंचणीतारापूर, केळवें, भिवंडी या ठिकाणीं खाड्या असून हीं गांवें बंदरेंहि आहेत. निर्मळ, महालक्ष्मी, वज्रेश्वरी, कवाड, अंबरनाथ व शाहापूर हीं यात्रेचीं ठिकाणें आहेत. चिंचणीस बांगड्या; भिवंडी, सोपारें येथें लुगडीं; वसईस गूळ, केळीं; व भिवंडी, पडघें येथें गाड्या तयार होतात.

साष्टी तालुक्यांत खोती पद्धतीची शेती बरीच आहे. खोताकडे कांहीं गांवें पट्टयानें लागलेलीं आहेत. दुसरी इसाफत व तिसरी शिलोत्री म्हणून सारापद्धत आहे. मुसुलमानी अंमलापूर्वी हिंदूराजवटीपासून शिलोत्री ही पद्धत चालू आहे. ह्या पद्धतीचीं दुसरीं नांवें ढेप, हुन्डाबंधी, मुडाबंधी, कासबंधी, तकबंधी व तोकाबंधी हीं आहेत. तालुक्याच्या गांवीं म्युनिसिपालीट्या असून शिवाय डिस्ट्रिक्टबोर्ड व तालुकाबोर्ड आहेत. नवापाड येथें वेड्याचें इस्पितळ आहे.

श ह र.—हें गांव या जिल्ह्याचें व साष्टी तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. हें शहर खाडीच्या कांठीं असून बंदर व रेल्वेस्टेशन आहे. लोकसंख्या ( १९११ ) १५५९१ हें पूर्वीं एका स्वतंत्र ( यादव ) हिंदुराज्याच्या राजधानीचें ठिकाण होतें. पुढें मुबारक खिलजीनें हें गांव जिंकून त्या ठिकाणीं एक मुसुलमान गव्हरनर नेमिला ( १३१८ ). त्यानंतर हें पोर्तुगीज लोकांनां मिळालें ( १५३३ ). त्यांच्यापासून मराठ्यांनीं काबीज करून घेतलें व शेवटीं इंग्रजांच्या हातीं आलें. येथें फिरंगी लोकांनीं बांधिलेला जुना किल्ला आहे. त्याचा सध्यां तुरुंगासारखा उपयोग करितात. येथें उत्तम सुती कापड निघतें. येथें म्युनिसिपालिटी आहे. गांवांत तीन दवाखाने आहेत. एक हायस्कूल, एक पारशी मुलांकरितां व एक मुलींकरितां शाळा आहे. [ संदर्भग्रंथ—हारेन—हिस्टारिकल रिसर्चेस; ग्रँटडफ; ग्रोस—व्हॉयेज; महिकावतीची बखर; ठाणें ग्याझेटियर; नेर्ने—कोंकण. ]



ड—पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार शिलालेखांत, दुसरी 'ट'सदृश असलेली क्षत्रपवंशी राजा रुद्रदामाच्या गिरनार लेखांत (इ. स. २ रें शतक), तिसरी समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद येथील स्तंभावरील लेखांत (४ थें शतक), व चौथी अबूचा परमार राजा धारावर्ष याच्या वेळच्या उडिया लेखांत (इ. स १२०८) आढळून येते. नागरी लिपीच्या जैन शैलींत 'ड' चें फक्त शेवटचें रूप निराळें आहे. [प्राचीन लिपिमाला.]

डंडी—हें स्कॉटलंडमधील फारफरशायर परगण्यांतलें बंदर असून रॉयल-म्युनिसिपल व पार्लमेंटरी बरो (गांव) आहे. याची लोकसंख्या (१९२१) १६८३१५ आहे. हें टे खाडीच्या उत्तर किनाऱ्यावर आहे. डंडी शहराचा जलमार्गानें व खुष्कीनें बराच व्यापार चालतो. तरीपण तागाच्या कारखान्याबद्दल याची विशेष प्रसिद्धि आहे.

येथें नगरभवन, आल्बर्ट स्क्वेअरमधील बाजार व आल्बर्ट संस्था या मुख्य इमारती आहेत. आल्बर्ट संस्थेंत चित्रसंग्रहालय, मोफत ग्रंथालय आणि पदार्थसंग्रहालय आहेत. डडहोप किल्ल्यांत औद्योगिक पदार्थसंग्रहालय आहे. येथें सेंटमेरी, सेंटपॉल, व सेंटक्लेमेंट हीं तीन महत्त्वाचीं प्रार्थनामंदिरें आहेत. येथें बऱ्याच सार्वजनिक बागा आहेत. सेंट अँड्र्यूज विश्वविद्यालयाला जोडलेलें युनिव्हर्सिटी कॉलेज येथें आहे. जवळच धंदेशिक्षणाची शाळा आहे. याशिवाय येथें दुसऱ्या कित्येक शिक्षणासाहि वाहिलेल्या संस्था आहेत. शहराच्या मध्यभागीं अनाथपंगुगृहाची भव्य इमारत आहे. येथील मुख्य उद्योगधंदा म्हणजे तागासंबंधी होय. तागाच्या व्यापारास वाहिलेल्या जहाजांतून सुमारें ३००००० टन कच्चा ताग दरवर्षी हिंदुस्थानातून डंडी शहरांत येतो. त्याचप्रमाणें बंगालमधील पुष्कळ तागाच्या गिरण्या डंडी येथील व्यापाऱ्यांच्या मालकीच्या आहेत. येथें तागाचें कापड विणण्याच्या गिरण्या आहेत तागाच्या सर्व कारखान्यांत मिळून एकंदर ५०००० मजूर काम करतात. येथें कॅनव्हास, दोर, गालिचे, मिठाई वगैरे पदार्थ होतात. धुणें, रंग देणें, यंत्रशिल्पाचें काम, जहाजें बांधणें, कातडीं कमावणें, कातड्याचे बूट व सामान तयार करणें असे कित्येक धंदे आहेत. डंडी येथें बऱ्याच गोद्या आहेत. त्यामुळें डंडी बंदराचा जलमार्गानें पुष्कळ व्यापार चालतो. डंडीतर्फे पार्लमेंटांत दोन सभासद असतात. इ. स. १२०० मधील एक दोन पत्रांत डंडी शहराचा उल्लेख सांपडतो. स्कॉच लोकांच्या स्वातंत्र्ययुद्धांत डंडी शहरानें फार महत्त्वाचा भाग घेतला होता. वॉलेसचें शिक्षण ह्याच शहरांत झालें. इ. स. १२९१ त हें शहर इंग्रजांच्या हातीं लागलें. १३८५ सालीं इंग्रजांनीं शहराच्या कांहीं भागाचा नाश केला. धार्मिक सुधारणा फैलावण्याच्या बाबतींत डंडी शहरानें पुढाकार घेऊन फार जोराचा प्रयत्न केला. अंतस्थ यादवीच्या वेळीं ह्या शहरावर बरेच अनर्थ गुदरले.

इ. स. १६४५ त मॉंटरोजनें हें शहर जाळलें. सेनापति मंकनें क्रॉमवेलच्या विरुद्ध असलेल्या डंडी शहरास शह देऊन तें घेतलें व तेथील बऱ्याच लोकांची कत्तल उडविली. यापुढें ह्या शहरानें राष्ट्रीय घडामोडींत विशेष भाग घेतला नाहीं. येथील टाऊन हॉलमध्यें महत्त्वाचे जुने कागदपत्र आहेत. १९ व्या शतकाच्या मध्यांत व शेवटीं येथील बऱ्याच कोंदट व भव्य इमारती पाडून नवीन रस्ते करण्यांत आले. त्यामुळें हें शहर आरोग्याच्या दृष्टीनें चांगलें सुधारलें आहे. अॅडमिरल डंकन, व्हायकौंट डंडी, व इतर बऱ्याच प्रसिद्ध पुढाऱ्यांचा जन्म डंडी शहरांत झाला.

डॅन—(१) एका इस्रायल जातीचें नांव. यांचा पूर्वज जेकब व बिल्हा यांचा एक पुत्र होता. पूर्वी डॅन लोक झोरा, एश्टाओल व किर्जथ-जीरिम येथें होते. तेथून हाकलपट्टी झाल्यामुळें त्यांनीं लेश (लेशेम) घेऊन त्याला डॅन हें नांव दिलें. मोझेसचा नातु जोनाथन याच्या देखरेखीखालीं येथें एक देवालय बांधण्यांत आलें.

(२) हें एक प्राचीन इस्रायल शहर आहे. हें जोर्डन नदी जवळ असून, याचें पूर्वीचें नांव लेश अथवा लेशेम होतें. येथील व्यापारी रहिवाश्यांना डॅनाईट लोकांनीं जिंकिलें. येथील मायकाहच्या देवळामुळें हें शहर पवित्र गणलें जात होतें. त्याचप्रमाणें जेरोबोमनें येथें दुसरें एक देऊळ बांधिलें. हें पॅलेस्टाईनचें उत्तर टोंक आहे. दमास्कसच्या बेनहृदादनें हें शहर लुटल्यापासून याला उतरती कळा लागली. हें टेल-एल-कादी या टेंकडीजवळ असावें. पण कित्येकांच्या मतें हें शहर पूर्वेस ४ मैलांवर असलेल्या बॅनिआस (जुने सेझारिया फिलिप्पी) येथें असावें.

डॅनियल (१७९०-१८४५)— हा इंग्रज पदार्थविज्ञान व रसायनशास्त्रज्ञ लंडन येथें जन्मला. सन १८३१ मध्यें नव्या राजविद्यालयांत लंडन येथें हा रसायनशास्त्राचा अध्यापक झाला. सध्यां टेलिग्राफ व इतर ठिकाणीं उपयोगांत येणाऱ्या डॅनिएलच्या विद्युत्घटावरून याचें

नांव प्रसिद्ध आहे. दंवबिंदु ठरविण्याचें दंवमापनयंत्र ( हायग्रोमीटर ) यानेंच शोधून काढलें. १८३० सालीं राजसंस्थेच्या दिवाणखान्यांत त्यानें पाण्याचें भारमापक यंत्र उभें केलें. टर्पेंटाइन व लाख यांपासून जाळण्याचा वायु यानें शोधिला. याचा प्रचार न्यूयार्क शहरांत कांहीं दिवस होता. याच्या ग्रंथांत विद्युत्‌उल्कांवर निबंध, वनस्पतीकरितां कृत्रिम हवा व रसायनशास्त्रतत्त्वज्ञानाच्या अध्ययनार्थ प्रस्तावना हे तीन मुख्य आहेत. दुसऱ्या ग्रंथांत उष्ण कटिबंधांतील झाडें शीतकटिबंधांत लावण्याकरितां उष्णगृहांची योजना दिली आहे १८१३ सालीं हा राजसंस्थेचा सभासद झाला व १८३९ सालीं परराष्ट्रचिटणीस झाला. ता. १३ मार्च १८४५ त राजसंस्थेच्या सभेचें काम चाललें असतां हा तेथें बसला होता व एकाएकीं वायूचा झटका येऊन तो अकस्मात् मरण पावला.

**डन्कर्क**—उत्तर फ्रान्समधील एक बंदर. हें नार्ड विभागाच्या एका अरॉंडाजइमेंटचें मुख्य शहर असून डोव्हरच्या सामुद्रधुनींत लिलीच्या वायव्येस ५३ मैलांवर आहे. लोकसंख्या ( १९११ ) ३८८९१. वाटरिंगगॅसच्या खोल परंतु सुपीक प्रांतांत हें शहर वसलें आहे. हें बोर्डोप्रमाणेंच महत्त्वाचें असून फ्रान्स देशांत ह्याचें महत्त्व पॅरिस व बोर्डोच्या खालोखाल म्हणजे तिसऱ्या नंबरचें आहे. येथील नोत्रडामच्या देवालयांत एक लहान मूर्ति आहे व हिच्या दर्शनास बरेच यात्रेकरू लोक येतात. सामान्य व व्यापारी न्यायकचेऱ्या, दलालमंडळ, हुंडीबाजार, फ्रान्सच्या पेढीची एक शाखा वगैरे संस्था आहेत. येथें व्यापारी संस्थेची एक भव्य इमारत आहे. बेल्जियन सरहद्दीकडे सैन्य पसरविण्याकरितां सोपें जावें म्हणून पूर्वेस किल्ल्यांची रांग बांधलेली आहे. येथील बंदरांत मोठालीं जहाजेंहि येऊं शकतात. येथें १९३ फूट उंचीचें एक दीपगृह असून तें १९ मैलांवरून दिसतें.

डन्कर्कहून कॉड व हेरिंग मासे धरण्यास प्रतिवर्षी जहाजांचे तांडे पाठवितात. येथें अर्जेन्टाइन व आस्ट्रेलियाहून बरीच लोंकर येते. न्यूयॉर्क, लंडन व संयुक्त संस्थानांतील मुख्य मुख्य बंदरांशीं डन्कर्कचें बरेंच दळणवळण आहे. लोंकरीशिवाय ताग, जवस, कापूस, इमारती लांकूड, पेट्रोलियम, कोळसा, डांबर, दारू, धान्य, गळिताचीं धान्यें, पेंड, सिंधुनात्रित व दुसरे रासायनिक पदार्थ व धातू,मुख्य आयात मालांत गणले जातात. साखर, कोळसा, धान्य, लोंकर, गवत, सिमिट, खडू, फॉस्फेट, लोखंड, पोलाद, हत्यारें व धातूचें सामान, सूत व भाजीपाला हा मुख्य निर्गत माल आहे. येथें कापूस व तागाचें कापड विणण्याचे कारखाने व लोखंड शोधण्याच्या भट्ट्या, व साबू वगैरेंचे कारखाने आहेत व जहाज बांधण्याचें कामहि होतें.

७ व्या शतकांतील सेंट एलॉयनें बांधलेल्या एका देवालयाचें पुढें लवकरच डन्कर्क खेडें झालें व दहाव्या शतकांत तिसरा बाल्डविन फ्लॅंडर्सचा काउंट यानें ह्या शहराची तटबंदी केली. पुढें हें शहर अनुक्रमें बर्गंडी, ऑस्ट्रिया व स्पेनकडे आलें. १५, १६ व १७ व्या शतकांत ह्या शहराच्या मालकीबद्दल फ्रान्स व स्पेनमध्यें बरेच तंटे झाले व१६५८च्या डयूनसच्या टयूरेनेच्या विजयानें शेवटीं हें फ्रान्सकडे आलें व तें नंतर इंग्रजांना दिलें गेलें. पुढें दुसऱ्या चार्लसनें १४ व्या लुईला हें शहर विकलें. स. १७१३ च्या युट्रेटच्या तहान्वयें ह्या शहराची तटबंदी पाडण्यांत आली. १७९३ सालीं यॉर्कचा ड्यूक फ्रेडरिक ऑगस्टस ह्याच्या नेतृत्वाखालीं इंग्रजांनीं ह्या शहरास वेढा दिला पण हॉनशूट याच्या पराजयानंतर त्यास हा वेढा उठवावा लागला. गेल्या महायुद्धांत या शहरास बरेंच महत्त्व आलें होतें.

**डॅन्झिग**—जर्मनी. व्हिश्चुला नदीच्या पश्चिम प्रवाहाच्या डाव्या किनाऱ्यावर असलेलें पश्चिम प्रशिया प्रांताच्या राजधानीचें शहर.या शहराला चांगली तटबंदी असून हें बंदरहि आहे. लोकसंख्या ( १९१० ) १७०३३७. व्हिश्चुला नदीला जाऊन मिळणाऱ्या मॉटलॉ नांवाच्या नदींतून मोठीं जहाजें शहरांतील धक्क्यापावेतों जाऊं शकतात. वेळ पडल्यास शहराच्या पूर्वेकडचा भाग पाण्याखालीं बुडवितां यावा अशी व्यवस्था केली आहे, व पश्चिम भागाच्या संरक्षणाकरितां त्या बाजूस किल्ल्याची नाकेबंदी केली आहे.

मोठमोठ्या जर्मन शहरांपैकीं फक्त डॅन्झिगनेंच आपलें मध्ययुगीन मनोहारित्व अजून कायम राखिलें आहे. उंच उंच नकशी काम केलेल्या चांद्या व सज्जांच्या खिडक्या असलेलीं जुनीं घरें पाहून आल्हाद होतो. येथील सेंट मेरीचें जुनें देऊळ हें आजतागाईत जीं प्रॉटेस्टंट देवळें आहेत त्यांतील सर्वांत मोठ्यापैकीं एक आहे. याशिवाय गॉथिक नगरभवन,फ्रान्सिस्कन मठ(यांत हल्लीं म्युनिसिपालिटीची चित्रांची गॅलेरी व पुराणवस्तुसंग्रहालय आहेत ), सरकारी कचेऱ्या, पोष्ट ऑफिस,येथें असलेल्या १७ व्या पलटणीच्या सेनापतीचा वाडा व प्रांतिक कायदेकौन्सिलगृह या येथील कांहीं ठळक ठळक इमारती आहेत.

येथें शस्त्रें व तोफा तयार करण्याचें काम मोठ्या प्रमाणावर चालतें. शिवाय येथें सरकारी व खासगी गोद्या आणि जहाजें बांधण्याचे कारखाने आहेत. मद्यें व इमारती लांकूड यांकरितां हें शहर प्रसिद्ध आहे. पूर्वी पोलंड व आसपासचे रशियन व प्रशियन प्रांत यांत होणारें धान्य येथील बंदरांतून परप्रांतीं रवाना होत असल्यामुळें या शहराच्या व्यापारास महत्त्व आलें होतें. आतां हा व्यापार मंदावला आहे; तरी शहराचें महत्त्व कमी होऊं नये म्हणून, लढाऊ व व्यापारी जहाजें बांधणें, पोलादाचें ओतीव काम करणें, साखर शुद्ध करणें, मद्य तयार करणें, पिठाच्या व तेलाच्या गिरण्या काढणें इत्यादि उद्योगधंद्यांस उत्तेजन देण्याचे प्रयत्न होत आहेत.

इ. स. ९९७ च्या कागदपत्रांत डॅन्झिगचा प्रथम उल्लेख केलेला सांपडतो. पॉमेरानिया, पोलंड, ब्रॅंडेनबर्ग, डेन्मार्क इत्यादि निरनिराळ्या देशांच्या ताब्यांत जाऊन, शेवटीं १३०८ सालीं हें ट्युटॉनिक सरदारांच्या हातीं आलें. त्यांच्या कारकीर्दीत शहराची पुष्कळ भरभराट झाली. थॉर्नच्या तहानें स. १४५५ नंतर हें शहर पश्चिम-प्रशियाबरोबरच पोलंडकडे आलें. १७ व्या व १८ व्या शतकांतील युद्धांत याचें बरेंच नुकसान झालें. १७७२ सालीं पोलंडची पहिली फाळणी झाली तेव्हां हें त्या देशापासून अलग झालें व १७९३ सालीं प्रशियाच्या ताब्यांत आलें. प्रशिया व फ्रान्स यांच्यामधील युद्धाच्या वेळीं हें १८०७ सालीं फ्रेंचांनीं घेतलें; परंतु १८१४ सालीं परत प्रशियास दिलें गेलें.

**डफरिन, लार्ड** ( १८२६-१९०२ )—हा मोठा विद्वान मुत्सद्दी म्हणून नांवाजलेला होता. इटलीमध्यें, फ्लॉरेन्स शहरीं ता. २१ जून रोजीं हा जन्मला. त्याचें लहानपणचें शिक्षण ईटन ( १८३९-१८४३ ) येथें झालें. दुय्यम शिक्षण संपल्यानंतर त्यानें ऑक्सफोर्ड येथील ख्राईस्ट चर्च कॉलेजमध्यें प्रवेश केला. १८४१ सालीं त्याचा बाप मरण पावल्यामुळें, आपलें शिक्षण आटोपून तो आयर्लंडमध्यें आपल्या वतनाची व्यवस्था लावण्याकरितां कांहीं काळ जाऊन राहिला. १८४६-४८ सालीं आयर्लंडमध्यें दुष्काळ पडल्यामुळें पिकें बुडालीं. तरी आपल्या कुळांबरोबर तो दयाळूपणें आणि सभ्यतेनें वागत असे. ग्लॅडस्टननें आयर्लंडला देऊं केलेल्या स्वराज्या( होमरूल)ची योजना डफरिन यास पसंत पडली नाहीं, तथापि त्यानें ग्लॅडस्टनच्या 'होमरूलच्या योजनेस विरोध केला नाहीं. लॉर्ड पामरस्टन आणि जॉन रसेल यांच्या मंत्रिमंडळांत 'हिंदुस्थानचा अंडर-सेक्रेटरी' ( १८६४-६६ ) आणि 'युद्धखात्याचा अंडरसेक्रेटरी' ( १८६६ ) या नात्यानें त्यानें कामें केलीं. १८७१ सालीं त्याला 'अर्ल ऑफ डफरिन' असा किताब मिळाला.

१८७२ सालीं त्याला कानडाचा गव्हर्नर-जनरल नेमण्यांत आलें. कानडांत असतांना उत्तम वक्ता, नाणावलेला मुत्सद्दी व राजकारणविशारद अशी त्याची ख्याति झाली. तदनंतर ब्रिटिशांचा वकील म्हणून लॉर्ड बीकन्सफील्डनें रशियांत त्याची नेमणूक केली. येथें दोन वर्षे काम केल्यानंतर कॉन्स्टान्टिनोपल येथें तुर्कस्तानांतील ब्रिटिशांचा वकील या नात्यानें तो राहूं लागला. पुढें आक्टोबर १८२२ ते मे १८८३ पर्यंत तो ब्रिटिश कमिशनरच्या हुद्दयावर ईजिप्तमध्यें होता. इ. स. १८८४ त हिंदुस्थानांत गव्हर्नर-जनरलच्या जागीं त्याची नेमणूक झाली. लॉर्ड रिपनच्या पाठीमागून हा हिंदुस्थानचा व्हाइसराय झाला. ह्याच्या वेळेस उत्तर ब्रह्मदेशचा राजा थीबा ह्यानें इंग्रजांशीं द्वेषभाव धारण केल्यामुळें, त्याच्याशीं युद्ध करून इंग्रजांनीं ब्रह्मदेश जिंकला. थीबा राजास पदच्युत करून डफरिननें त्यास रत्नागिरीस नेऊन ठेविलें आणि ता. १ जानेवारी सन १८८६ रोजीं ब्रह्मदेश ब्रिटिश राज्यांत सामील केला. ब्रह्मदेश ब्रिटिश राज्यास जोडल्यामुळेंच तो विलायतेस परत गेल्यावर त्यास 'मार्क्विस ऑफ डफरिन ॲन्ड आवा' ( १८८८ ) हा किताब मिळाला.

अफगाणिस्तानांत इंग्रजांचें वर्चस्व कायम राखण्याकरितां डफरिननें खटपट केली. पेंज्डेह प्रकरणाचा निकाल लावून त्यानें वायव्य सरहद्दीची मर्यादा आंखून टाकली ( १८८५ ). इ. स. १८८६ त ब्रिटिश सरकारनें ग्वाल्हेरचा किल्ला शिंद्यास परत दिला. सन १८८७ त महाराणी व्हिक्टोरियाच्या पन्नासाव्या वाढदिवसाचा ज्युबिलीमहोत्सव सर्व हिंदुस्थानभर झाला. लॉर्ड डफरिनची पत्नी लेडी डफरिन हिच्या नांवानें वर्गण्या गोळा करून, हिंदुस्थानांतील बायकांकरितां दवाखाने स्थापण्याची योजना करण्यांत आली. विलायतेस परत गेल्यावर, रोम येथील इंग्रजांचा वकील ( ॲम्बॅसेडर ) म्हणून डफरिनची नेमणूक झाली (इ. स. १८८८). १८९२ सालीं वकील या नात्यानें त्याची पॅरिस शहरीं नेमणूक झाली. येथें तो सन १८९६ पावेतों होता. नंतर सार्वजनिक कामांतून त्यानें आपलें अंग काढून घेतलें. लॉर्ड डफरिनचे मुत्सद्दीगिरी, सौजन्य, उदारमतवादीपणा, राजकारणकुशलता इत्यादि गुण वाखाणण्याजोगे होते. १९०२ सालीं फेब्रुवारीच्या बाराव्या तारखेस तो मरण पावला. मृत्यूसमयीं त्याचें वय ७६ वर्षांचें होतें. [ सर आल्फ्रेड लायल; दि ऑफिशिअल लाइफ ऑफ डफरिन; लेडी डफरिन; अवर व्हाईसरीगल लाइफ इन इंडिया ( १८८९ ), कॅनेडियन जर्नल ( १८९१ ); हिस्टरी ऑफ इंडिया इ. ]

**डफळे**—डफळे हे मूळचे जत परगण्याचे देशमुख होते. चव्हाण हें यांचें मूळचें नांव होतें. परंतु डफळापूर नांवाच्या खेड्याचे हे वंशपरंपरा पाटील असल्यामुळें त्यांना डफळे हें नांव मिळालें होतें. विजापूरच्या राज्यांत यांच्याकडे मनसब होती. यांच्याबद्दल जास्त माहिती ज्ञानकोशाच्या तेराव्या भागांत जत या शब्दाखालीं पहावी.

**डंबल**— मुंबई इलाखा, धारवाड जिल्हा. गदगच्या आग्नेयीस सुमारें १३ मैलांवर हा गांव आहे. स. १८६२ पर्यंत डंबल हें पेट्याचें मुख्य ठाणें होतें. येथें पेरू व द्राक्षें पुष्कळ पिकतात. येथें दोड्ड बसाप्पा, कालेश्वर आणि सोमेश्वर यांचीं जुनीं देवळें आहेत. गांवाबाहेर तोंडस्वामीचा मठ आहे. डंबल गांवाच्या आसपासच्या खेड्यांत या मठाच्या पुष्कळ शाखा आहेत, त्या सर्वांस जमिनी इनाम आहेत. गांवाच्या पश्चिमेस जुन्या किल्ल्याचे अवशेष दिसतात. किल्ल्यांत एक मोडकळीस आलेलें जैन मंदिर आहे. कर्नल वेलस्ली यानें 'हा किल्ला बळकट असून त्या सभोंवारचा खंदक कोरडा आहे व तट सुमारें ३० फूट उंच आहे' असें याचें वर्णन केलेलें होतें. कांहीं दिवस येथें इंग्रजी सैन्याच्या दोन तुकड्या असत. पुढें ( १८६२ ) हा किल्ला निरुपयोगी झाला. गांवाच्या पश्चिमेस मोठा तलाव आहे. किल्ल्यांतील जैन मंदिरांत १०५५ सालचा एक शिलालेख आहे.

त्याचप्रमाणें कालेश्वराच्या देवळांत दोन शिलालेख असून, जवळच्या विहिरीवरहि एक शिलालेख आहे. त्याचप्रमाणें डंवलच्या देसायाजवळ विजयानगरचा तिसरा राजा. दुसरा हरीहर ( इ. स. १३७९—१४०१ ) याच्या वेळचे नऊ ताम्रपट आहेत.

इ ति हा स.—अकराव्या व वाराव्या शतकांत या शहराचें नांव धर्मपूर ( धमवोलाल ) असें असून त्यावर चालुक्यांचा ताबा होता. त्यावेळीं येथें दोन बौद्धांचे मठ होते. इ. स. १६९० मध्यें डंवलचा देसाई अवरंझेबाचा मांडलिक बनला. नंतर मराठ्यांनीं डंवल काबीज केलें. पुढें हैदरअल्लीच्या ताब्यांत डंवल गेलें.

इ. स. १८०० च्या एप्रिल महिन्यांत धोंडी वाघानें डंवलास वेढा घातला.रामचंद्रअप्पा पटवर्धन यांचा पराभव करून त्यानें किल्ला ताब्यांत घेतला. पुढें कर्नल वेलस्लीनें धोंडोपंत गोखल्याच्या मदतीनें किल्ला सर केला व किल्लेदार श्रीनिवास वेंकटाद्रि बहादूर यास फांशीं दिलें. परंतु पुढें जनरल वेलस्ली यास या कृत्याबद्दल वाईट वाटून त्यानें हिंदुस्थान सोडतांना त्याच्या विधवेस दत्तक घेण्याची परवानगी देऊन दत्तकास त्या घराण्याचे सर्व अधिकार मिळावे अशी व्यवस्था केली. या श्रीनिवासाचा नातु १८५८ सालच्या बंडांत सामील झाल्यामुळें त्याला फांशीं देण्यांत येऊन त्याची जहागीर जप्त झाली. [ फ्लीट—कानरीज डिनॅस्टिज; इंडियन अँटिक्वरी, पु. १०, १२; वेलिंग्टन—डिस्पॅचेस; विल्क्स—साउथ इंडिया. ]

**डवलबीन**—हा एक भाजीचा वेल आहे. हा सुमारें दोन वर्षें टिकूं शकतो. याच्या शेंगा जंबियाच्या आकाराच्या व बीं मोठें व निरनिराळ्या रंगाचें असतें.हें रोप मूळचें ब्राझिल देशांतील आहे असें डी क्यॅंडोल म्हणतो. हिंदुस्थानांत आसाम, ब्रम्हदेश, बंगाल, संयुक्तप्रांत व पंजाब वगैरे प्रांतांत याची लागवड होते.याचीं कुरसुंबुले पल्ली,बंबरवुट्टी,श्विम हीं मराठी व हिंदीत डबलबीन वगैरे नांवें आहेत. सपाटीच्या प्रदेशांत पावसाळ्यानंतर व डोंगराळ भागांत मार्च ते जूनपर्यंत लागण करतात. पक्के बीं हस्तिदंताप्रमाणें पांढरें असतें.

उ प यो ग.—याच्या शेंगांचा शिजवून भाजीपाल्याप्रमाणें उपयोग करतात. परंतु हें केव्हां केव्हां विषारी असतें असें अलीकडे आढळून आलें आहे. रासायनिक परीक्षणावरून त्यांत कर्बनीत्रदोत्पादक ग्लूकोसाइड व एक फेनोत्पादक ( विपाक ) द्रव्य असतें असें समजतें व हे दोन्हीं पदार्थ एकमेकांच्या संनिध आणले असतां फेनोत्पादनाच्या योगानें ग्लूकोसाईडचें विघटन होऊन जे पदार्थ बनतात त्यांपैकीं प्रशिकाम्ल (शें.०.•४ते ०.०९) हा एक असतो निळ्या कवचीच्या बियांत प्रशिकाम्लाचें प्रमाण सर्वांत जास्त व पांढऱ्या कवचीच्या फळांत सर्वांत कमी असतें. चांगल्या जमिनींत पूर्णपणें लागवड केलेल्या झाडांच्या बियांच्या कवचीचा रंग गुलाबी असून त्यावर मधून मधून जांभळे ठिपके असतात व आंत साईसारखा फिकट अथवा पांढरा पदार्थ असतो; व रानांत आपोआप वाढलेल्या झाडांच्या बियांपेक्षां वरील रंगाचें बीं निःसंशय कमी विषारी असतें असें डन्स्टन म्हणतो.ब्रह्मदेशांत तांबड्या व पांढऱ्या रंगाच्या बियांची लागवड केली जात असून त्यांचा उपयोगहि केला जात आहे; परंतु त्यामुळें विषप्रयोग झाल्याचें उदाहरण अद्याप पहाण्यांत नाहीं. हें जरी खरें आहे, तरी ज्या अर्थी त्यांत निरनिराळ्या प्रमाणांत प्रशिकाम्ल तयार होतें त्या अर्थी खाण्याच्या पदार्थांकडे त्याचा उपयोग करणें श्रेयस्कर नाहीं.

**डंवार्टन**—डंवार्टन हें स्कॉटलंड देशांतील डंवार्टनशायर परगण्यांतलें मुख्य शहर व बंदर असून, रॉयल-म्युनिसिपल व पोलिसबरो आहे. हें लेव्हन व क्लाईड या नद्यांच्या संगमावर आहे. येथील लोकसंख्या ( १९०१ ) १९९८५ आहे. याला ब्रिटिश लोक आल्क्लुईथ व केल्ट लोक डनब्रिटेन म्हणत. येथें रोमन लोकांचें थेओडोशिआ नांवाचें आरमारी ठाणें होतें. यावरून हें फार प्राचीन ठिकाण असावें. येथील ' रॉक ' नांवाच्या टेंकडीवर बांधिलेल्या किल्ल्यामुळें याचें ऐतिहासिक महत्त्व वाढलें आहे. हा किल्ला पिक्ट व उत्तरेकडील लोक यांच्या ताब्यांत गेला. मेरी राणीच्या अनुयायांपासून हा किल्ला क्रॉफर्डनें मोठ्या शौर्यानें व युक्तीनें जिंकिला. १३०५ सालीं येथें विल्यम वॅलेस याला कैदेंत ठेविलें होतें. डंवार्टन हें इ. स. १२२१ त रॉयलबरो झालें. क्लाईडनदीवरील लॉकलाँग व केल्व्हिन यांच्यामधील तारवांवर कर घेण्याचा याला हक्क होता.

शहराचा बहुतेक भाग लेव्हन नदीवर आहे. वर्ग दिवाणखाना, विद्यालय, डेनी मेमोरियल, वाङ्मय व यंत्रशिल्प यांची संस्था, ग्रंथालय, ह्या मुख्य इमारती येथें आहेत. बरोचा मॅजिस्ट्रेट व कौन्सिल यांच्या हातीं या गांवाचा सारा अधिकार आहे. डंवार्टन, पोर्ट ग्लासगो, रेनफ्रयू, रुथरग्लेन, किल्मॅर्नाक हीं पांच गांवें मिळून पार्लमेंटसाठीं एक सभासद निवडतात. येथें जहाजें बांधण्याचा मुख्य धंदा चालतो. शिवाय येथें यंत्रशिल्पाचे वरेच कारखाने आहेत.

**डब्लिन**—ही आयर्लंडची राजधानी लिन्स्टर विभागांत डब्लिन उपसागराच्या मुखावरील बेटावर वसली आहे. येथील लोकसंख्या ( १९२१ ) १७२३९४ असून हें शहर लिफे नदीवर आहे. येथील कस्टमहाऊस ( जकातघर ), रोटंडा, वगैरे इमारती पाहण्यासारख्या आहेत. ख्राइस्ट चर्च व सेंट पॅट्रिक चर्च हीं ख्रिस्ती मंदिरेंहि चांगलीं असून त्यांत स्विफ्ट वगैरे सारख्या प्रसिद्ध पुरुषांचीं थडगीं आहेत.

ख्राइस्ट चर्चजवळच डब्लिन किल्ला आहे. येथून समोरच नगरभवन असून यांत ग्राटन, तिसरा जार्ज, डॅनिएल ओकॉनेल, थॉमस ड्रमॉंड वगैरेंचे पुतळे आहेत. येथील ट्रिनिटि कॉलेजमधील ग्रंथसंग्रहालयांत, संयुक्तराज्यांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक पुस्तकाची एक प्रत पाठविण्याबद्दल

'कापीराइट ॲक्ट' मध्यें नमूद केलें आहे. तसेंच केल्स वगैरेंचा प्राचीन आयरिश हस्तलेखसंग्रहहि बराच आहे. या विश्वविद्यालयांत वनस्पतिबाग, पदार्थसंग्रहालय वगैरे आहेत. याशिवाय येथें स. १८६५च्या अंतरराष्ट्रीय प्रदर्शनाची चिरस्थायी इमारत सेंटस्टीफन्स ग्रीनच्या विहारभूमिजवळ असून स. १९०८ पावेतों या इमारतींत आयर्लंडचें रायल विश्वविद्यालय होतें. आतां या विश्वविद्यालयाचें आयर्लंडचें नॅशनल विश्वविद्यालय करण्यांत आलें आहे. सेंट स्टीफन्स ग्रीनच्या पश्चिमेस कॅथोलिक विश्वविद्यालय आहे. ट्रिनिटि कॉलेज व सेंट स्टीफन्स ग्रीनच्या दरम्यान 'रायल डब्लिन सोसायटी,' शास्त्र व कलांचें पदार्थसंग्रहालय, नॅशनल ग्रंथसंग्रहालय, प्राणिसंग्रहालय, वगैरे बऱ्याच इमारती आहेत. येथील सेंट फ्रान्सिस झेव्हिअरच्या गार्डिनर रस्त्यावरील ख्रिस्ती देऊळ आयर्लंड देशांत सर्वांत उत्तम आधुनिक देवळांपैकीं एक आहे.

राज्यकारभार.—१८८५ पर्यंत आयर्लंडला दोन प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क होता. नंतर ते ४ करण्यांत आले. आयर्लंडचा कारभार अध्यक्षाकडे असतो. परंतु तेथें जी म्युनिसिपालिटी आहे तिचें कर्तव्य म्हणजे शहराची व्यवस्था करणें हें आहे. म्युनिसिपालिटींत १ लॉर्ड मेयर, २० ॲल्डरमेन, आणि ६० कौन्सिलर असतात. पोलिस किंवा न्यायकोर्टें यांचा मुळींच संबंध नाहीं तो सर्व कारभार अध्यक्षाकडे सोंपविला आहे.

व्यापार.—राज्यक्रान्तिकाळाच्या सुमारास येथें लोकरीच्या व्यापाराची प्रगति झाली. परंतु इंग्लिश लोकांनीं पुढें ३ ऱ्या विल्यमकडून नवीन कायदे करून येथून इंग्लंडशिवाय दुसऱ्या देशांत जाणारा माल बंद पाडला व अशा रीतीनें हा व्यापार बुडाला. पुढें १७१५च्या सुमारास पार्लमेंटनें तागाच्या व्यापारास मदत केली व कांहीं दिवसांनंतर कापसाचा व्यापार चालू केला व रेशमी कापड तयार करूं लागले. या व्यापारास हितकर असे कायदे करण्यांत आले. परंतु १ ला व ३ रा जार्ज यांच्या वेळीं पुन्हां जे कायदे झाले त्यांमुळे येथील कारखाने पार बुडाले. तागाच्या व्यापाराचीहि तीच दशा झाली. आतां येथून फक्त व्हिस्की व पोर्टर ( दारू ) बाहेरगांवीं जाते व शेतकीच्या उत्पन्नाचा देशांतील निर्गत व्यापार या शहरांतून होतो. येथें क्यूकोटचा दवाखाना, स्टीव्हेन्स दवाखाना, राटन्डा, डानिब्रूक, सेंटपॅट्रिक वगैरे दवाखानें व बरेच पागलखाने आहेत. या सर्व धर्मार्थ संस्था आहेत.

इतिहास.—२९१ सालीं लिन्स्टनच्या लोकांस डब्लिनच्या लोकांनीं जिंकिलें असा उल्लेख आहे. ४५० च्या सुमारास सेंट पॅट्रिक यानें ख्रिस्ती धर्माचा प्रसार केला. ९ व्या शतकांत डेन्स लोकांनीं डब्लिन घेतलें. स. ८३२ मध्यें १ ला थारकेल (हा पहिला नार्समन राजा होता,) यानें आरमाघ येथें आपला पाया दृढ केला. स. १०१४ मध्यें क्लान टार्फच्या युद्धांत मन्स्टरचा बोरायमे राजा, त्याचें ११००० सैन्य व पुत्र इतकी मंडळी मरण पावली. पुढें डेन्स व आयरिश लोकांत अनेक झटापटी होऊन स. ११७१ सालीं शेवटीं आंग्लनार्मन लोकांनीं डेन्स लोकांस कायमचें घालवून दिलें. स. ११७२ मध्यें २ रा हेनरी वारफर्ड येथें उतरून डब्लिनला आला व आपल्या दरबारांत आयरिश अधिपतींनां उत्तम रीतीनें वागवून त्यानें त्यांच्याशीं सलोखा केला. याच वेळीं ह्यूडी लेसी याजकडे राज्यशासनाचा अधिकार देऊन त्याच्या ब्रिस्टल प्रजेस डब्लिन येथें राहण्याचा व पूर्ण स्वातंत्र्याचा हक्क दिला. ११७६ सालीं पेम्ब्रूकचा अर्ल स्ट्रांगबो येथें मरण पावला. स. १२०७ मध्यें जान राजाकडून डब्लिनच्या प्रजेस दुसरी सनद मिळाली. पुढें दोन वर्षांनीं डब्लिनचे रहिवाशी कलेन्सवुड येथें ईस्टरचा उत्सव करीत असतां आसपासच्या आयरिश रहिवाश्यांनीं यांपैकीं ५०० लोकांस ब्लडी फील्डमध्यें ठार केलें. स. १२१६ मध्यें ३ऱ्या हेनरीपासून आयरिश लोकांनां मॅग्ना चार्टा (सनद) मिळाला. स १२१७ च्या सुमारास येथें बरेच मठ स्थापन झाले.

स. १३१५च्या सुमारास एडवर्ड ब्रूसच्या स्वारीच्या वेळीं डब्लिनच्या आसपासचीं खेडीं ब्रूसच्या हातीं लागूं नयेत म्हणून जाळण्यांत आलीं व ग्रीन किल्ल्याचा गव्हर्नर ब्रूसला शरण गेला म्हणून त्याला उपाशीं मारण्यांत आलें. रिचर्ड ( दुसरा ) यानें राबर्ट डी व्हेरे यास आयर्लंडचा ड्यूक केलें. व स. १३९४ मध्यें डब्लिन येथें मोठ्या थाटानें येऊन येथील बऱ्याच देशी संस्थानिकांस सरदार बनविलें. १५३४ त लार्ड थॉमस फिट्झेराल्ड ( सिल्केन थामस ) लार्ड, डेप्युटी किल्डरे, याच्या मुलानें लंडन टावरमध्यें कैदेंत असलेल्या आपल्या बापाचा खून झाला असावा या संशयावरून इंग्रज सरकारविरुद्ध बंड उभारलें. पुष्कळ झटापटीनंतर १५३६ सालीं टायबर्न येथें त्यास व त्याच्या अनुयायांस फांशी दिलें. स. १६४१ च्या सुमारास आपसांतील यादवी सुरू झाली. शेवटीं १६४९ सालीं आरमॉंडे यास ओल्ड रायमाइन्सजवळ बागोट्राथच्या युद्धांत पूर्ण पराजित केलें. याच वर्षी क्रामवेल डब्लिनमध्यें पार्लमेंटतर्फे मुख्य सेनापति होऊन आला होता. १६८९ सालीं ब्रिटिश गादीवरील आपला हक्क सांगण्याकरतां दुसरा जेम्स आयर्लंडमध्यें आला होता. पुढें बॉयनेच्या युद्धांत पराभव झाल्यानंतर पुन्हां डब्लिन येथें तो आला होता; परंतु दुसऱ्याच दिवशीं निघून गेला. यानंतर तिसरा विल्यम सेंट पॅट्रिकच्या मंदिरांत आपल्या विजयाबद्दल आभारप्रदर्शन करण्याकरतां आला. १७८३ सालीं पार्लमेंटमध्यें सुधारणा करण्याकरितां आयर्लंडच्या सर्व स्वयंसैनिकपथकांच्या व्हालन्टिअरकोरची प्रतिनिधिसभा भरविण्यांत आली होती परंतु हाउस ऑफ कामन्सनें या बाबतींत विचार करण्यानें नाकारल्यामुळें कांहींच निकाल न लागतां ही सभा बरखास्त करण्यांत आली. १७९८ सालीं युनाइटेड आयरिशमेन यांचा कट उघडकीस आला व लार्ड एडवर्ड फिट्झेराल्ड यास पकडण्यांत आलें. हा कैदेंत असतानांच मरण पावला. १८०३

साली रॉबर्ट एमेट याचें बंड मोडलें व १८४८ साली विल्यम स्मिथ ओब्राएन पार्लमेंटचा सभासद, यानें टिपेरारी येथें बंड उपस्थित केलें होतें तें मोडण्यांत आलें. १८६७ साली फेनिअनचा भयंकर कट उघडकीस आला म्हणून हेबीस कार्पस ॲक्ट दोन्ही हाउसेस ऑफ पार्लमेंट यांनीं तहकूब ठेवला आणि सुमारें ९६० जणांनां डब्लिन शहरांत पकडलें.या शहराची तटबंदी करण्यांत आली व कांहीं आठवडे पावेतों येथील लोक अस्वस्थ राहिले ( आयर्लंड पहा ).

**डभई**—मुंबई,बडोदें संस्थान. डभई पोटभागांतील शहर. उ. अ. २०°८' व पू. रे. ७३°२८'. लोकसंख्या ( १९११ ) ९११७. गायकवाडच्या मुलुखांत प्राचीन इतिहासाच्या विशेषतः तटबंदी व दरवाजे यांच्या शोभेच्या बाबतींत हें शहर फार महत्त्वाचें आहे.

इ ति हा स.—पुष्कळ शतकांपूर्वी सदर जयसिंग नांवाचा राजा पट्टण येथें राज्य करीत होता. राजपुत्राच्या जन्मानिमित्त त्यानें जें शहर वसविलें त्यांत भोवे नांवाचा मुख्य कारागीर होता व शहर वसविण्याचें काम पूर्ण झाल्यावर त्याला कांहीं एक पारितोषक न देतां त्याच्या इच्छेप्रमाणें शहराला त्याचें नांव ठेविलें. तटबंदीच्या आंत मुसुलमानांनां मज्जाव असे. यामुळें मुसुलमानांनीं याला वेढा देऊन अखेर हें जिंकलें. १७२५ साली सेनापति दाभाडे यानें डभई हें आपलें मुख्य ठिकाण केलें. स. १७७९ त कर्नल गॉडार्डनें हें जिंकून घेतलें. येथील ' डायमंड गेट ' वर हत्ती, घोडे, सिंह, उंट, पक्षी, साप, घोडेस्वार व युद्धाचीं शस्त्रास्त्रें फारच सुंदर तऱ्हेनें काढलीं आहेत. ' डायमंड गेट ' च्या उजव्या बाजूला भद्रकालिकामातेचें देऊळ व डाव्या बाजूला महादेवाचें देऊळ आहे. कांहीं रस्त्यांच्या बाजूलाच फक्त सुंदर लांकडी खोदकाम केलेलीं घरें आढळतात. आतां येथें सरकारी कचेऱ्या, शाळा, दवाखाने वगैरे आहेत. येथील लोक चीट, कापड, लांकडाचें खोदकाम व जातीं करतात.

**डमडम**—बंगाल इलाख्यांतील चोवीसपरगण्याच्या जिल्ह्याच्या बराकपूर पोटविभागांतील एक गांव. हें कलकत्त्याच्या ईशान्येस ७ मैलांवर आहे. ह्या गांवांत उत्तर डमडमची म्युनिसिपालीटी व डमडम कॅन्टोन्मेंट येतात. उत्तर डमडमची लोकसंख्या ( १९११) ८८६५ व डमडमची ३८१८ आहे. येथें सरकारी तोफखाना सन १८५३ पावेतों होता पण पुढें तो मीरत येथें नेण्यांत आला. सध्यां येथें फक्त ब्रिटिश पायदळाचा तुकडी आहे. येथें लढाईकरितां लागणारा दारूगोळा तयार करण्याचा एक कारखाना आहे. १८४१ साली काबूलहून झालेल्या पिछेहाटींत कामास आलेल्या कांहीं योद्धयांचीं येथें थडगीं आहेत. त्याचप्रमाणें ज्या तहावरहुकूम नवाब सिराजउद्दौलानें इंग्रजाचीं ठाणीं कलकत्ता, कासिमबाझार व ढाका हीं परत केलीं तो तह व त्या तहनाम्यावर सही देखील डमडम येथेंच झाली ( १७५७ ).

डमडम हा पहिल्यानें अगदीं वेगळा पोटविभाग होता पण १८९३ साली तो बारासत यास जोडण्यांत आला. तेव्हांपासून बराकपूरच्या कँप मॅजिस्ट्रेटच्या हातीं फौजदारी व दिवाणी सत्ता देण्यांत आली. डमडम हें पूर्व-बंगाल-स्टेट रेल्वेवर स्टेशन असून डमडम छावणीकरितांहि एक वेगळें स्टेशन आहे. शाह फरिद नांवाच्या मुसुलमान सांईच्या स्मरणार्थ येथें एक मोठा वार्षिक मेळा भरत असतो. दखिनदारा येथें एक मोठी तागाची गिरणी काढण्यांत आली आहे.

**डरहॅम**—इंग्लंड. डरहॅम कौन्टींतील एक शहर व म्युनिसिपल व पार्लमेंटरी बरो. १९२१ त येथील लोकसंख्या १७३२९ होती. १०७२ साली विल्यम दि कॉन्करनें मुख्य मंदिराच्या उत्तरेस एक किल्ला बांधला. १८३३ साली येथें एक विद्यापीठ स्थापलें गेलें. १८३७ साली चवथ्या विल्यमनें या विद्यापीठाला सनद दिली. लोखंडाचे, पायमोज्याचे व सतरंज्याचे कारखाने येथें आहेत. प्रतिनिधीविभागांतून पार्लमेंटांत सभासद जातो. शहरचें क्षेत्रफळ १०७० एकर आहे.

इ ति हा स.—१०व्या शतकाच्या शेवटीं हें शहर वसलें. प्रथम येथें बिशपनें नेमलेल्या बेलिफची सत्ता होती. १६०२सालापासून येथील राज्यकारभार एक मेयर, १२ सनदी अधिकारी व २४ रहिवासी यांच्याकडे होता. १६८४ साली कार्पोरेशनला आपले सर्व हक्क बिशप क्रूच्या स्वाधीन करणें भाग पडलें. राज्यक्रांतीच्या वेळीं बिशप मॅथूची सनद पुन्हां सुरु झाली. ती १७७० सालपर्यंत अमलांत होती. १६७३ सालच्या कायद्याप्रमाणें येथून २ सभासद जात असत.

**डर्बी**—इंग्लंड. डर्बीशायरपरगणा. डर्बी नांवाचा म्युनिसीपालटीचा प्रांत व प्रतिनिधिविभाग. लंडनच्या उत्तर वायव्येस मिडलंड रेल्वेनें हें १२८¾ मैल आहे. १९२१ साली येथील लोकसंख्या १३१८०० होती. डरवेंट नदीच्या पश्चिम तीरावर हें शहर आहे. मिडलंड रेल्वे कंपनीचें हें मुख्य ठिकाण झाल्यापासून याची पुष्कळ भरभराट झाली. सेंट पीटर, सेंट अल्कमंड, सेंट अँड्र्यू, ऑलसेंट व कॅथोलिक पंथाचें सेंटमेरी हीं प्रार्थनामंदीरें येथें आहेत. स्टूट कुटुंबाच्या हेलेनहाऊस वाड्यांत व्याकरणशाळा आहे. धंदेशिक्षणाचें विद्यालय जमातीच्या ताब्यांत आहे पदार्थविज्ञानशाळा, कलाभुवन, मोफत वाचनालय, पदार्थसंग्रहालय व धर्मार्थ संस्था येथें आहेत. हें शहर चिनी मातीच्या भाड्यांकरितां प्रसिद्ध असून, स्पार खनिज पदार्थाचे कारखाने येथें आहेत. रेशमाच्या पायमोज्यांचे, धंदाचे व कापसाचे कारखाने पूर्वीं बरेच चांगल्या स्थितींत होते. पांढरा व लाल रंग, वार्नीस व कमावलेलीं कातडीं येथें होतात. प्रतिनिधिविभागांतून पार्लमेंटांत दोन सभासद जातात. शहराचा राज्य कारभार मेअर, १६ सनदी अधिकारी व ४२ सभासदांच्या हातांत असतो. हें घोड्यांच्या शर्यतीकरितां प्रसिद्ध आहे.

**डलहौसी, लॉर्ड**—डलहौसी जेम्स ॲन्ड्रू. ( १८१२–१८६० )—इंग्लंडांतील एक मुत्सद्दी, आणि हिंदुस्थानचा गव्हर्नर-जनरल. हा स्कॉटलंडमध्यें, डलहौसी कॅसल येथें, इ. स. १८१२, एप्रिलमध्यें जन्मला. तरुणपणीं त्यानें इंग्लंडमध्यें अनेक महत्त्वाचीं व लोकोपयोगीं कामें केलीं. हिंदुस्थानांत इंग्रजांची सत्ता अढळ करून, इंग्रजांचें राज्य विस्तृत करणाऱ्या चौघां गव्हर्नर-जनरलांपैकीं हा एक होता. हिंदुस्थानांत १८५७ सालच्या बंडाचा जो वणवा पेटला त्याला याचीं अनेक बेकायदेशीर कृत्यें कारण झाल्यामुळें त्याला लोकापवाद सहन करावा लागला. एतद्देशीय संस्थानें ( त्यांनां दत्तकाची परवानगी न देतां ) खालसा करून तीं ब्रिटिश राज्यास जोडण्याचा यानेंच प्रथम उपक्रम केला. हिंदुस्थानाभोंवतीं ब्रिटिश सत्तेचा विळखा घट्ट बसविण्याकरितां त्यानें कसून प्रयत्न चालविले. यामुळें संस्थानिक लोक असंतुष्ट झाले. याचा बाप राम्से हा हिंदुस्थानांत कमांडर इन चिफ होता. त्यामुळें डलहौसीला हिंदुस्थानची माहिती लहानपणापासून होती. १८३६ सालीं लेडी सुसान ले या विदुषीबरोबर त्यानें लग्न लाविलें.

इ. स. १८४३ सालीं, ग्लॅडस्टनच्या मंत्रिमंडळानें त्याला 'बोर्ड ऑफ ट्रेड' चा उपाध्यक्ष नेमिलें. 'कॉर्न लॉ संबंधी' च्या झगडयांत डलहौसीनें सर रॉबर्ट पीलची बाजू उचलून धरिली होती. पुढें लॉर्ड जॉन रसेल याला नवें मंत्रिमंडळ स्थापतां न आल्यामुळें डलहौसीनें आपल्या उपाध्यक्षपदाचा राजीनामा दिला.रसेलनें कॅबिनेटमध्यें देऊं केलेली जागा डलहौसीनें नाकारली. पुढें १८४७ सालीं लॉर्ड हार्डिंजच्या नंतर त्याला हिंदुस्थानच्या गव्हर्नर-जनरलच्या जागेवर नेमिलें.

बंगालचा गव्हर्नर आणि हिंदुस्थानचा गव्हर्नर-जनरल हे दोन्ही अधिकार डलहौसीकडे सोंपविण्यांत आले. सर जॉन हॉबहाऊस हा 'बोर्ड ऑफ ट्रेड' चा तत्कालीन अध्यक्ष असून, हिंदुस्थानांत सर्वत्र शांतता आहे अशा अर्थाची खबर डलहौसी त्याजकडे नित्य पाठवी. परंतु ती विलायतेस पोहोंचण्यापूर्वीच हिंदुस्थानांत दंगे उपस्थित होत असत.

१८४८ सालीं, डलहौसीनें मुलतानच्या मूलराज नामक दिवाणाकडे ( मुलतानचा कारभार आपल्या ताब्यांत घेण्याच्या हेतूनें) दोन प्रतिनिधी पाठविले. परंतु त्यांचा खून होऊन , शीखांनीं उघड उघड बंड उभारलें. या बंडाचा बीमोड करण्याच्या सबबीवर सबंध पंजाब खालसा करण्याचें डलहौसीनें ठरविलें व स्वतः मोठ्या फौजेनिशीं पंजाबकडे निघाला ( १८४८). इंग्रजांचा सेनापति गो यानें रामनगर, सादलापूर आणि चिलियनवाला या ठिकाणीं मूलराजच्या फौजेचा पराभव केला. तरी त्याच्या फौजेनें मोठ्या शिकस्तीनें युद्ध केलें. अखेर जनरल व्हिशनें ता. २२ जानेवारी १८४९ रोजीं मुलतानचा किल्ला सर केला व पुढें एक महिन्यांत ( ता. २१ फेब्रुवारी ) रावळपिंडी येथें शीख सैन्य इंग्रजांनां शरण गेलें. या विजयाबद्दल ब्रिटिश पार्लमेंटनें डलहौसीचे आभार मानले आणि त्यास 'मार्क्विसची' पदवी दिली.

अशा रीतीनें युद्ध संपल्यानंतर पार्लमेंटच्या संमतीची वाट न पाहतां डलहौसीनें, पंजाब प्रांत ब्रिटिश राज्यास जोडला व पंजाबचा महाराज धूलीपसिंग यास सालीना पांच लक्षांची नेमणूक करून दिली. इंग्रजांनीं सर्व शीख फौजेस रजा देऊन शीख लोकांचीं सर्व हत्यारें काढून घेतलीं. त्याचप्रमाणें इंग्लंड व वेल्स या दोहोंच्या दीडपट एवढें मोठें नवीन राज्य डलहौसीनें काबीज केलें. यांदाबूच्या तहान्वयें ( इ. स. १८२६ ) ब्रम्ही सरकारच्या ताब्यांतील समुद्रांत असलेल्या ब्रिटिश जहाजांचें रक्षण करण्यास ब्रम्ही सरकार बांधलें गेलें होतें. परंतु ब्रह्मी सरकारनें ही अट न पाळल्यामुळें आवा येथील ब्रह्मी दरबारांत ब्रिटिशांचा अपमान झाला. या अपमानामुळें चिडून जाऊन डलहौसीनें ब्रम्ही लोकांवर स्वारी करून ( ता.५ एप्रिल १८५२ ) मार्ताबान घेतलें. थोड्याच दिवसांनीं रंगून आणि बेसिन हीं ठाणींहि इंग्रज फौजेनें सर केलीं.

अथापिहि आवा येथील ब्रम्ही सरकार इंग्रजांनां शरण आल्यामुळें इंग्रजांनीं युद्धाची दुसरी मोहीम आरंभून प्रोम आणि पेगु प्रांत हस्तगत करून घेतले. आराकान प्रांत तेनासरीमला जोडून, कंपनीच्या ताब्यांत आलेल्या प्रदेशांवर इंग्रजी सत्ता दृढ करावी असा डलहौसीचा हेतु होता, डलहौसी स्वतः ब्रम्हदेशांत गेला, आणि नोव्हेंबर (स. १८५२) पर्यंत सर्व ठिकाणें काबीज करून डिसेंबरांत दक्षिण ब्रम्हदेश त्यानें ब्रिटिश राज्यास जोडिला.

राज्यें खालसा करणें.—इंग्रजांची सार्वभौम सत्ता स्थापन होऊन पन्नास वर्षें होऊन गेलीं; आणि त्यावेळीं उपयोगी पडलेली तैनाती फौजेची पद्धत आतां निरुपयोगी ठरली. तेव्हां एतद्देशीय हिंदु संस्थानें खालसा करण्याचें एक निराळेंच धोरण ठेवून डलहौसीनें तें अमलांत आणिलें. संस्थानें खालसा करण्याच्या त्याच्या प्रमुख योजना अशा—(१) केव्हां दत्तक वारस नामंजूरीवर,(२) केव्हां बेवारसाच्या सबबीवर, ( ३ )केव्हां अव्यवस्थेच्या कारणानें व( ४ ) केव्हां विनाकारण युद्धें उपस्थित करून. याप्रमाणें होतील तितकीं राज्यें खालसा करण्याचा त्यानें निश्चय केला.

पहिल्या सदराखालीं त्यानें प्रथम साताऱ्चें राज्य खालसा केलें ( १८४९ जाने. ). साताऱ्चा राजा प्रतापसिंह ह्यास पदच्युत करून, त्याचा भाऊ शहाजी ह्यास इंग्रजांनीं गादीवर बसविलें (सन १८३९ ).पुढें हे दोघेहि भाऊ स. १८४७ व १८४८ च्या दरम्यान वारले. दोघांनींहि औरस संतति नसल्यामुळें दत्तक घेतले होते. हीं दत्तविधानें बेकायदेशीर ठरवून आणि औरस संतति नाहीं म्हणून साताऱ्चें राज्य खालसा केलें.याच सबबीवर व त्याच वर्षी (स. १८४९ )जैतपूर आणि संबळपूरचीं राज्येंहि खालसा करून व १८५३ सालीं, नागपूर आणि झांशी हीं संस्थानेंहि औरस वारस नसल्यामुळें ५

केलीं. अघत आणि उदयपूर हीं दोन लहान राज्यें डलहौसीनें १८५१ व १८५२ सालीं खालसा केलीं होतीं; परंतु ब्रिटिश पार्लमेंटच्या सांगण्यावरून, तद्देशीय संस्थानिकांस तीं परत करण्यांत आलीं.

राजव्यवस्थेचीं कृत्यें.—आजपर्यंत गव्हर्नर-जनरलची पदवी बंगालचा गव्हर्नर जनरल अशी असून, त्याच्याकडे बंगाल इलाख्याचेंहि कच्चें काम असे. परंतु डलहौसीनें पार्लमेंटकडून बंगाल इलाखा वेगळा केला आणि त्याजवर निराळ्या लेफ्टेनंटची नेमणूक केली. सर्व हिंदुस्थानच्या राज्यकारभाराचें मुख्य काम गव्हर्नर-जनरलकडे ह्याच वेळेपासून गेलें. त्यानें तारायंत्र व आगगाडीचे रस्ते चालू करून त्यायोगें मुख्यतः लष्कराच्या व व्यापाऱ्यांच्या सोयी केल्या. रस्ते, कालवे वगैरे कामें करण्याकरतां त्यानें निरनिराळीं खातीं काढिलीं. तसेंच पोस्टाचीं टिकिटें छापण्याची सोय करून हंशिलाचे दर कमी केले. त्यानें तुरुंगांची योग्य पहाणी करून ते सुधारण्याची खटपट केली. मनुष्याचा बळी देणें यासारखे क्रूर प्रकार त्यानें मोठ्या खटपटीनें बंद करविले. निरनिराळ्या जिल्ह्यांची राज्यव्यवस्थाविषयक माहिती ( अॅडमिनिस्ट्रेटिव्ह रिपोर्ट ) छापून प्रसिद्ध करण्याचा उपक्रम त्यानें सुरू केला. जंगलें राखणें, चहाची लागवड करणें, हिंदुस्थानांतील प्राचीन शिल्पकला व ऐतिहासिक स्थळें यांचे अवशेष कायम राखणें हीहि कामें त्यानें केलीं. तसेंच हिंदुस्थानांतील गोऱ्या अंमलदारांकरितां फार खर्च करून त्यानें चांगले बंगले व बाग करविल्या व त्यानें सिव्हिल सर्व्हिस परिक्षेस एतद्देशीय उमेदवार घेण्याचा हुकूम काढला.

बाजीराव पेशवे ब्रह्मावर्त येथें मरण पावल्यानंतर ( स. १८५२ ) बाजीरावाच्या सालीना ८ लाखांच्या नेमणुकीची नानासाहेबानीं इंग्रजांकडे मागणी केली. या नानासाहेबास बाजीरावानें दत्तक घेतलें होतें. बाजीरावाचा तो औरस पुत्र नाहीं या सबबीवर डलहौसीनें त्याची मागणी नाकबूल करून पेशव्यांची ८ लाखांची नेमणूक खालसा केली. तसेंच सन १७९९ त तंजावरचें राज्य खालसा झाल्यापासून राजाच्या कुटुंबाकडे बरीच मोठी नेमणूक चालू होती; स. १८५५ त शिवाजी राजा निपुत्रिक मरण पावल्यामुळें डलहौसीनें त्याची तीन लाखांची जहागीर खालसा केली. संबळपूर हें लहानसें संस्थानहि तेथील राजा निपुत्रिक मृत्यु पावल्यामुळें खालसा करण्यांत आलें. नागपूरकर रघूजी भोंसले १८५३ सालच्या नोव्हेंबरांत निपुत्रिक मरण पावल्यामुळें राज्यास कोणी वारस नाहीं म्हणून तेंहि संस्थान खालसा करण्यांत आलें. खैरपूरच्या संस्थानिकाची जहागीर डलहौसीनें १५ लाखांनीं कमी केली. सिक्किमचा राजा इंग्रजांशीं उद्दामपणें वागूं लागला तेव्हां त्यानें संस्थानचा कांहीं भाग जिंकून आपल्या ताब्यांत घेतला.

१८५४ मध्यें डलहौसीनें लखनौ येथील रेसिडेंटाच्या जागीं जनरल औट्रामची नेमणूक केली. यानें त्या प्रांतांत फिरून तेथील कच्ची हकीकत डलहौसीला कळविली. अयोध्येचें राज्य इंग्रजसरकारनें एकदम आपल्या ताब्यांत घ्यावें अशीहि त्यानें डलहौसीला शिफारस केली. तिजवर कौन्सिलदारांचे अभिप्राय होऊन हें प्रकरण डलहौसीपुढें आलें. त्यावर आपलें मत लिहून डलहौसीनें तें प्रकरण विलायतेस पाठविलें. विलायतेहून राज्य खालसा करण्याचा हुकुम आल्यानंतर औट्रामच्या हाताखालीं फौज पाठवून तें राज्य डलहौसीनें खालसा केलें ( १३ फेब्रुवारी १८५६ ) व अयोध्येच्या नवाबास सालीना बारा लाखांची नेमणूक करून कलकत्त्यास ठेविलें. अयोध्याप्रकरणाचा निकाल लावणें हेंच डलहौसीचें हिंदुस्थानांतील शेवटचें कृत्य होय. विलायतेस गेल्यानंतर तेथें त्यानें केलेल्या हिंदुस्थानांतील कामगिरीबद्दल त्याची वाखाणणी करण्यांत आली. व त्याला ५००० पौंडांचें वार्षिक पेन्शन मिळालें इतक्यांत हिंदुस्थानांत सत्तावन सालचें बंड उद्भवलें व त्याचें पाप डलहौसीच्या माथीं मारण्यांत आलें. हिंदुस्थानांत असतांना त्यानें केलेल्या बेकायदेशीर कृत्यांचाच परिणाम म्हणजे हें बंड होय असें कित्येक उघड म्हणूं लागले. हा लोकापवाद शेवटपर्यंत डलहौसीला सहन करावा लागला अखेर तो डलहौसी किल्ल्यांत मरण पावला ( १९ डिसेंबर १८६० ). हिंदुस्थानांत ब्रिटिश राज्याची स्थापना मुख्यतः वॉरन हेस्टिंग्ज, लॉर्ड वेल्स्ली, लॉर्ड हेस्टिंग्ज आणि डलहौसी या चार मुत्सद्द्यांनीं केली.

[ संदर्भग्रंथः—सर इ. आर्नोल्ड; " डलहौसीज् अॅडमिनिस्ट्रेशन ऑफ ब्रिटिश इंडिया "; सर सी. जॅक्सन्; " व्हिंडिकेशन ऑफ डलहौसीज् अॅडमिनिस्ट्रेशन "; सर डब्ल्यू. हंटर; डलहौसी; कॅ. ट्रॉटर; लाईफ ऑफ दि मार्किस ऑफ डलहौसी, डयूक ऑफ अर्गाईल; " इंडिया अंडर डलहौसी अॅन्ड कॅनिंग "; सर विल्यम ली. वॉर्नर; लाईफ ऑफ दि मार्किस ऑफ डलहौसी, के. टी. ]

**डलास**—अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं टेक्सस संस्थानांमधील डलास कौंटीचें मुख्य ठिकाण. हें ट्रिनिटी नदीच्या पूर्वतीरावर आहे. लो. सं. ( १९१७ ) १२९७३८. याचें क्षेत्रफळ सुमारें १५ चौरस मैल आहे. हें सुमारें ८ रेलवेचें केंद्रस्थान आहे. नदीचें पात्र खोल करून जहाजें जाण्याची व्यवस्था केली आहे. सार्वजनिक इमारतींत कार्नेजी वाचनालय, कोर्ट, सिटीहॉल, सेंट मॅथ्यूचें देवालय वगैरे इमारती येतात. येथें एक वैद्यकशाळा आहे. येथून आजूबाजूच्या ठिकाणचा गहूं, कापूस व फळफळावळ हीं पाठविण्यांत येतात. येथील राज्यकारभार मेयर व चार कमिशनर मिळून पाहतात.

**डहोमे**—पश्चिम आफ्रिकेंतील एक देश. डहोमे येथें पूर्वी स्वतंत्र राज्य होतें परंतु सध्यां तेथें फ्रेंच वसाहत आहे. याच्या दक्षिणेस गिनीचें आखात, पूर्वेस ब्रिटिश नायगेरिया,

उत्तरेस व वायव्येस मध्य नायगरवरील फ्रेंचांचा मुलूख, व पश्चिमेस टोगोलँड ही जर्मन वसाहत आहे. यांत बोर्गुच्या पश्चिम भागाचा समावेश होतो.

आंत पन्नास मैलपर्यंत हा देश सपाट आहे. पहिले एक दोन मैल चालून गेलें कीं रमणीय अरण्य लागतें. पन्नास मैलांपलीकडील अन्तर्भाग हा चढउतारांचा असून रुक्ष आहे. तुरळक जंगलांत मधून मधून नारळ, तमाल व ताडांचीं झाडें आहेत. नायगरकांठच्या प्रदेशांत सिंह पुष्कळ आढळतात.

समुद्रकिनाऱ्याजवळील प्रदेशांची हवा उष्ण व सर्द आहे. समुद्राजवळील सरासरी उष्णमान सुमारें ८० अंश आहे. किनाऱ्याजवळील भागांतले लोक शुद्ध निग्रो वंशाचे आहेत. डाहोमी लोकांनां त्यांच्या स्वतःच्या भाषेंत फॉन अथवा फाविन असें म्हणतात. हे उंच, मजबूत बांध्यांचे, मानी, परकीयांशीं सभ्यपणें वागणारे, लढवय्ये व व्यापारांत दक्ष असे लोक आहेत. इस्लामधर्मीय झालेले कांहीं लोक उत्तर भागांत आहेत. पण खुद्द डाहोमी लोक भुताखेतांची पूजा करणारे व क्षुद्र देवतोपासक आहेत. हे लोक बहुधा शेतकी व व्यापारावर आपली उपजीविका करतात. येथील जमीन निसर्गतःच सुपीक व लागवडीस योग्य अशी आहे. येथील मुख्य उत्पन्नाची बाब म्हणजे ताडाचें तेल होय. मका, रताळीं, केळीं, नारळ, संत्रीं, लिंबें, व सफरचंद वगैरे जिन्नस होतात. रबराचीं झाडेंहि आहेत. व्यापार बहुतेक जर्मनी व ग्रेटब्रिटनशीं आहे. कोटोनुपासून नायगरपर्यंत आगगाडीचा मुख्य रस्ता असून त्यापासून वसाहतीच्या पूर्व-भागांत एक फांटा नेलेला आहे. आगबोट, तारायंत्रें वगैरे दळणवळणाचीं साधनें आहेतच.

येथील राज्यकारभार लेफ्टनंट गव्हर्नर पाहतो व त्याला मदतगार म्हणून सरकारी व बिनसरकारी लोकांचें एक सल्लागार मंडळ आहे राज्यकारभाराच्या सोयीकरितां वसाहतीचे लहान लहान प्रांत(विभाग) केले असून तद्देशीय संस्थानांत फ्रेंच सरकार होतांहोईतों तेथीलच कायदे लागू करतें. तथापि फ्रेंच कायद्याच्या संरक्षणाखालीं राहण्याची तद्देशीयांनां मनाई नाहीं.

सतराव्या शतकाच्या आरंभापासून डहोमेच्या इतिहासाला सुरवात होते. त्यावेळीं सध्यां आपण ज्याला डहोमे देश म्हणतो, तो अलादा अथवा आर्द्राच्या विस्तीर्ण राज्यांत समाविष्ट झाला होता. त्या देशाची अलादा ही राजधानी तेथील राजाच्या मृत्यूनंतर विस्कळित होऊन तीन निराळीं राज्यें निर्माण करण्यांत आलीं, त्यांपैकीं डहोमेचें राज्य एक होय. १७२४–२८ त डाहोमी लोकांनीं अलादा व व्हायदा जिंकलें. १९ व्या शतकाच्या आरंभास पोर्टोनोव्हो हें डहोमेचें मांडलिक बनलें. यावेळीं गीझो हा राजा राज्य करीत होता. यानें अमेझॉन स्त्रियांचें पथक जास्त संघटित व जोरदार करून आपली राज्यमर्यादा उत्तरेपर्यंत रेटीत नेली. १८५१ सालीं यानें फ्रान्सशीं व्यापारी तह करून व्हायदा येथील फ्रेंचांच्या मुलुखाला हात न लावण्याचें अभिवचन दिलें. १८५८ सालीं गीझो हा मरण पावला व त्याचा मुलगा ग्लेगल हा राज्यारूढ झाला.

ग्लेगलनें तद्देशीय ख्रिस्तानुयायांचा छळ मांडल्यामुळें व गुलामांच्या व्यापाराला उत्तेजन दिल्यामुळें त्याचें व ग्रेट-ब्रिटनचें वैर सुरू झालें. त्याचप्रमाणें फ्रान्सशीं तेढ पडून १८६३ सालीं फ्रान्सनें पोर्टोनोव्हो आपल्या संरक्षणाखालीं घेतलें. १८८२ च्या सुमारास यूरोपांतील राष्ट्रांत आफ्रिकेंतील प्रदेश काबीज करण्यासंबंधानें झुंज लागली होती. १८८९ च्या करारनाम्यान्वयें इंग्लंडनें फ्रान्सला कोटोनु देऊन टाकलें पण त्याच वर्षीं ग्लेगल व फ्रेंच यांत वैमनस्य उत्पन्न झालें. ग्लेगल यानें कोटोनु येथील जकात वसूलीचा व पोर्टोनोव्होच्या राजास पदच्युत करण्याचा हक्क आपला आहे असें म्हणून पोर्टोनोव्हाच्या राजावर स्वारी केली; परंतु दुर्दैवानें मध्येंच तो मृत्यु पावल्यामुळें त्याचे सारे बेत जागच्याजागींच जिरले. त्याचा मुलगा बेहांझिन याचें व फ्रेंचांचें युद्ध माजून बेहांझिनला कोटोनु व पोर्टोनोव्हो फ्रान्सला देणें भाग पडलें. परंतु १८९२ त पुनः फ्रान्स व डहोमेंत युद्ध उपस्थित होऊन बेहांझिनला, फ्रान्सला दांतीं तृण धरून शरण येणें भाग पडलें. १९०६ सालीं बेहांझिन अल्जीरिआ येथें मरण पावला.

याप्रमाणें डहोमेचें स्वतंत्र अस्तित्व नाहींसें झालें. फ्रेंचांनीं डहोमेचे अबोमे व अलादा असे दोन भाग करून अबोमेच्या राज्यावर बेहांझिनच्या भावास बसविलें, व्हायदा व जवळचा प्रांत फ्रान्सला जोडला व बाकीच्याचें डहोमेच्या फ्रेंच संरक्षित संस्थानांत रूपांतर करण्यांत आलें. फ्रेंचांविरुद्ध कट करण्याच्या आरोपावरून अबोमे येथील राजपुत्राला इ. स. १९०० मध्यें हद्दपार करण्यांत आलें. १८९७ च्या फ्रान्स व जर्मनीमधील करारनाम्यानें डहोमेची पश्चिम मर्यादा ठरविण्यांत आली व १८९८ च्या इंग्लंड व फ्रान्स मधील करारानें पूर्व सरहद्द ठरविण्यांत आली.

डहोमे येथील लोकांच्या चालीरीती चमत्कारिक व अंगावर शहारे आणण्यासारख्या होत्या. राजा मरण पावला म्हणजे त्याच्या थडग्यावर पुरुष व बायका यांचा बळी देण्यांत येई. या चालीचा उद्देश राजाला परलोकीं बायका व नोकर मिळवित असा होता. डहोमे येथील लक्षांत ठेवण्यासारखी संस्था म्हणजे बायकांनां लष्करी शिक्षण देणें ही होय. जेवढ्या म्हणून अविवाहित बायका असत तेवढ्या साऱ्यांवर राजाचा अप्रतिहत ताबा असे. आवडीच्या स्त्रियांबरोबर एकतर तो लग्न लावी अथवा त्यांनां सैन्यांत पाठवी. या स्त्रियांचें पथक डहोमेंत अत्यन्त उत्तम गणलें जात असे. या बायकांची सहनशक्ति कमालीची असे अशी पुष्कळ यूरोपियनांनीं साक्ष दिली आहे. असें सांगतात कीं या बायका

आपल्या बचावाची विशेष तजवीज न करतां अनवाणी पायांनीं शत्रूवर छापा घालीत व एकदम नाहींसा होत.

**डॉक ( गोदी )**—गोदी बांधणें हा विषय स्थापत्यशास्त्र व यंत्रशास्त्र या दोहोंच्याहि क्षेत्रांत येतो. गोद्यांची रचना व नकाशा हा विषय स्थापत्यशास्त्राचा असून, त्यांतील साधनांचा व एकंदर व्यवस्थेचा विषय यांत्रिक शिल्पविद्येंत अंतर्भूत होतो.

गोद्यांचे तीन प्रकार असतात. ज्यांत जहाज केवळ तरंगत राहूं शकेल, इतकें पाणी असतें अशी आर्द्रगोदी, विनपाण्याची सुकी गोदी व खोल पाण्याची तरती गोदी, हे ते तीन प्रकार होत. भरती असो वा नसो केव्हांहि आंत घेण्याकरितां पहिल्या प्रकारची गोदी असते. सुक्या गोदींत जहाजें साधारणतः दुरुस्तीकरितांच आणलीं जातात; व तरत्या गोदींत जहाजें जलपृष्ठभागावर तरंगत असतांना त्यांची मोडतोड पाहण्यांत येत असते. मालाची व उतारूंची नेआण करणाऱ्या वाहतुकीच्या वाफेच्या जहाजामुळें व लढाऊ बोटींमुळें गोद्यांची संख्या व त्यांचें एकंदर विस्तारक्षेत्र या दोन बाबतींत पूर्वीपेक्षां हल्लीं बरीच प्रगति झालेली आहे. एकंदर गोदींचा विस्तार, धक्क्याची लांबी, भिंती व अनेक तऱ्हेच्या मालाच्या समावेशाकरितां गोद्यांची यथायोग्य जुळणी करणें, दरवाजे व त्यांची कार्यपद्धति, पूल, छपरें व यारी इत्यादि अनेक बाबी, गोद्यांचे नकाशे आखतांना लक्ष्यांत घ्यावे लागतात. नैसर्गिक पाया कोठें आहे व त्यावर कायमच्या बाजूच्या भिंती कशा उभारतां येतील वगैरे प्रश्नांचा, गोद्या बांधीत असतांना, विचार करणें जरूर असतें. नैसर्गिक पाया सांपडला नाहीं, तर कृत्रिम पाया कसा करावा हा प्रश्न उभा राहतो व लोखंडाचे किंवा कॉंक्रेटचे, पायाचे खांब कसे उभारावे हें ठरविण्यांत येतें. गोद्यांचे प्रवेशदरवाजे भरती किंवा ओहटी असतांना केव्हांहि उघडण्याची व झांकण्याची सोय असावी लागते; कारण एखाद्या मोठ्या जहाजांस भरतीकरितां बाहेर खोळंबून ठेवणें हें खर्चाचें असतें. ओहटीच्या दारांतून बोटींनां आंत घेणें खर्चाचें असतें. कारण हीं फक्त भरती असते त्यावेळींच उपयोगांत आणतां येतात व नादुरुस्त झाल्यास आंतील जहाजांची नुकसानी होऊन गोदीच्या कामांत बराच व्यत्यय येतो; याकरितां चार दरवाजे ठेवणें ही उपयुक्त योजना होय. भरतीच्या वेळीं गोद्यांचीं द्वारें बंद करण्यांत येतात परंतु अर्धवट भरतीच्या समुद्रकांठच्या गोद्या खुल्या राखण्यांत येतात. जहाजांनां जाण्यायेण्यापुरेसें पाणी दरवाजावर असेपर्यंतच जहाजांस ना ये करतां येते.

धक्का, जहाज खुंटविण्याची जागा, व बंधारा वगैरे संरक्षक व मार्गदर्शक कामें गोदीच्या ठिकाणीं असतात. गोदीपासून समुद्राकडे भिंतीसारखी जी रचना करण्यांत येते त्या रचनेस ठोकळ मानानें वरील नांवें देण्यांत येतात; परंतु बंधारे हे मात्र केवळ संरक्षणाच्या दृष्टीनें उभारण्यांत येतात; या कामांतहि रचनेच्या अनेक पद्धती व कॉंक्रीटचें काम बरेंच असतें. तात्पुरता तापा किंवा पूल, झुलते पूल अशा अनेक तऱ्हेच्या पुलांची चांगल्या गोदीस आवश्यकता असते. पाण्यांत तरंगणाऱ्या व धक्क्याजवळ खुंटून टाकलेल्या याऱ्याहि गोदींत असतात.

**गोदींतील यारी.**—जहाजांचा पठाण साफ करण्याकरितां बांधलेल्या गोदींमध्यें कामाकारितां म्हणून या अवजड यारींचा उपयोग करण्यांत येतो. २५ ते २०० टनांपर्यंत माल उचलण्याइतकी शक्ति या यारींत असते. तशाच हलवतां येण्यासारख्या लहान याऱ्या असतात परंतु अवजड याऱ्या तेथें पक्क्या करून ठेवितात. असल्या यारीची त्रिज्या बरीच मोठी असते.

**डॉक कैसन्स.**—गोदी बंद करण्यास दरवाज्यांच्या ऐवजीं कैसन नांवाच्या होडीसारख्या तराफ्यांचा उपयोग करण्यांत येतो. कैसन्सचा दुसरा असा एक फायदा आहे कीं, त्यांचा पुलासारखाहि उपयोग होतो. हे चार पांच प्रकारचे आहेत. हलक्या तराफ्यांचा उपयोग पुलासारखा होतो. फिरत्या तराफ्यांचे, सरकणारा, फिरणारा व तरंगणारा असे तीन वर्ग आहेत. सरकणाऱ्या तराफ्यांनां दोरखंडांचें बेटोळें अथवा डफरा असतो. तरंगणारे कैसन्स पेटीच्या आकाराचे अथवा जहाजाच्या आकाराचे असतात. एन्जिन, बॉयलर व पंप वगैरे अनेक यांत्रिक गोष्टी डॉक कैसन्समध्यें असतात.

**गोदीचे दरवाजे.**—गोदींचीं प्रवेशद्वारें उघडण्याकरितां व झांकण्याकरितां, बिजागिरीच्या आधारावर बसविलेलीं द्वारें असतात व तीं लांकूड, लोखंड व पोलाद यांचीं केलेलीं असतात. ओक, पाइन व ग्रीनहार्ट वगैरे लांकडांचीं दारें लोखंड व पोलाद यांच्या दारांपेक्षां जड असतात. भरीवपणा व लवचीकपणा यामुळें कोणतेहि आघात सोसण्याला ग्रीनहार्टसारखें लांकूड हेंच योग्य होय; कारण लोखंडाचे पत्रे फारसे टिकाऊ असल्याचें आढळत नाहीं.

**डाका, जिल्हा.**—बंगाल प्रांतांतील एक जिल्हा. क्षे. फ. २७८२ चौ. मै. याच्या नैर्ऋत्येस पद्मावतीच्या पलीकडे फरीदपूर; पूर्वेस ब्रह्मपुत्रा नदीचें जुनें पात्र व तिच्या पलीकडे टिप्पेरा; उत्तरेस मैमेनसिंग; व वायव्य कोंपऱ्याला ब्रह्मपुत्रा ( किंवा यमुना जमुना? ) व तिच्या पलीकडे पाटण जिल्हा.

स्वाभाविक वर्णन:—पद्मा किंवा हल्लींचें गंगेचें पात्र व मेघना याच्यामध्यें असलेल्या या जिल्ह्याचा आकार निमुळता असून, नद्यांची खळमळ व पूर यांच्या योगानें येथील भुसभुशीत जमिनींत वारंवार फरक होत असतो. एक शतकापूर्वी ब्रह्मपुत्रेचें पात्र या जिल्ह्याच्या पूर्व सरहद्दीवरून गेलेलें असून तिचा पद्मेशीं संगम दक्षिण टोंकास झाला होता. परंतु हा प्रवाह सध्यां पश्चिमेकडे गेलेला असून, जिल्ह्याच्या वायव्य टोंकाला गोवलुंदोजवळ तो पद्मेस मिळतो; व पुढें हे एकच झालेले प्रवाह मेघना या नदीमुखानें उपसागरास मिळतात. हा जिल्हा एक सपाट मैदान असून त्यांत मधुपूर

हे एकच वन आहे; ह्या वनांतून वहाणाऱ्या वन्ही व लख्या नद्यांच्या पात्रामुळें झालेल्या खोल दऱ्यांतील शोभा सुंदर आहे. या जिल्ह्यांत तीन नद्यांची पात्रें असल्यामुळें, पावसाच्या व हिमालयावरील वर्फ वितळून आलेल्या पाण्याच्या योगानें नद्यांनां पूर येऊन बराच प्रदेश जलमय होऊन जातो. एप्रिल ते सप्टेंबरपर्यंत उष्णमान ८४° व हिंवाळ्यांत ६७° असतें. वार्षिक पाऊस सरासरी ७२ इंच पडतो.

इतिहासः—धलेश्वरी नदी ही कामरूपच्या राज्याची दक्षिण सीमा होती व करतोया नदी ही पश्चिम सीमा होती. यशपालाच्या स्मरणार्थ डाकरी येथें, हरिश्चंद्रपालाच्या स्मरणार्थ साभार येथें टेंकड्या आहेत; म्हणून येथें शिशुपाल रहात होता असें म्हणतात. ९ व्या शतकाच्या प्रथमार्धात वंगालमध्यें सत्ताधीश असलेल्या बुद्धधर्मी पाल घराण्याशीं या पाल राजांचा कांहीं संबंध असावा. धलेश्वरीच्या दक्षिणेस विक्रमादित्याच्या नांवावरून बनलेला विक्रमपूर नांवाचा परगणा आहे. त्यांतील रामपाल या ठिकाणीं विक्रमादित्याच्या वेळेपासून मुसुलमानांच्या वेळेपर्यंत हिंदू राजांची राजधानी होती. वंगालचा अति प्रसिद्ध वल्लाळसेन याचा दरबार येथें भरत असे.

मुसुलमान लोक बंगाल प्रांतांत प्रथम ११९९ सालीं आले. स. १२९६ त दिल्लीचा बादशहा झाल्यावर अल्लाउद्दीनानें बंगालची विभागणी करून बहादुरशहाला आग्नेय भागाचा सुभेदार नेमिलें; त्याची राजधानी हल्लींच्या डाका शहराच्या पूर्वेस १५ मैलांवर मेघना नदीच्या कांठीं सोनारगांव येथें होती. स. १३३० त महंमद तघलखानें तीन प्रांत स्थापून नंतर बहरामखानाला सोनारगांवचा सुभेदार नेमिलें. स. १३५१ त शमसुद्दीनानें बंगाल प्रांत एक केल्यापासून सोनारगांव ही बंगालच्या सुभेदारांची राजधानी होती. स. १६०८ त शेख इस्लामखानानें आपली राजधानी राजमहालाहून डाका येथें आणली. याचें कारण त्यावेळीं सरहद्दीवर परक्यांच्या स्वाऱ्या होत होत्या; उत्तरेकडे आसामचे अहोम व दक्षिणेकडून मघ किंवा आर्कनी, पोर्तुगीज यांचे लोकांच्या मदतीनें स्वाऱ्या करीत होते. मोंगल सुभेदारानें पोर्तुगीज लोकांच्या हाताखालीं जहाजांवर पुष्कळ सैन्य ठेवून आपल्या सरहद्दीचें संरक्षण केलें. १६६० सालीं मीरजुमला बंगालचा सुभेदार असतां डाका जिल्ह्याची फार भरभराट झाली. मघांच्या स्वाऱ्यांपासून बचाव करण्याकरितां, लख्या व धलेश्वरी यांच्या संगमावर त्यानें बांधिलेल्या किल्ल्यांचे अवशेष अद्यापहि दिसतात. मीर जुमल्याच्या पाठोमागून नूरजहानचा पुतण्या शाइस्तेखान हा सुभेदार झाला. त्यानें चित्तगांव साम्राज्यास जोडून अवरंगझेबाच्या हुकुमानें इंग्रजांच्या वखारी जप्त करून डाका येथील व्यापारी गुमास्त्यांस तुरुंगांत टाकिलें. या दोन्ही सुभेदारांनीं इमारती व सार्वजनिक कामें करण्याला पुष्कळ उत्तेजन दिलें. १७०४ सालीं मुर्शिद कुलीखानानें मुर्शिदाबाद येथें राजधानी नेल्यापासून डाकाच्या उतरत्या कळेस प्रारंभ झाला. १७५७ सालीं येथें ब्रिटिश सत्ता स्थापन झाली.

लोकसंख्याः—१९०१ सालीं या जिल्ह्यांतील लोकसंख्या २६४९५२२ होती. माणिकगजचा पश्चिम भाग सोडून इतर ठिकाणची हवा निरोगी असल्यामुळें लोकांची भरभराट होत आहे. बहुतेक भागांत वस्ती फार दाट झाल्यामुळें लोकसंख्या पूर्वीप्रमाणें झपाट्यानें वाढणें शक्य नाहीं. ह्या जिल्ह्यांतून कांहीं लोक बकरगंजकडे शेतीच्या कामांत मदत करण्याकरितां जातात; परंतु संयुक्त प्रांत व बहारमधून तागाच्या कामाकरितां लोक आल्यामुळें लोकसंख्येंत फारसा फरक पडत नाहीं. येथील मुख्य भाषा बंगाली आहे. लो. सं. पैकीं शें. ६० च्यावर मुसुलमान आहेत व शेंकडा ३७ हिंदू आहेत.

शेतकीः—जमीन, हवा व नद्या हीं सर्वच शेतकीला अनुकूल असून पाऊसहि भरपूर पडल्यामुळें कृत्रिम रीतीनें पाणी देण्याची फारच थोडी गरज लागते. वार्षिक पुरानें जिल्ह्याचा बराच भाग जलमय होत असल्यामुळें येथील मुख्य पीक जें भात तें थोडेंबहुत वाढल्यानंतर पावसावर अवलंबून नसतें, शिवाय नदीच्या पाण्यानें गाळ सांचत जाऊन जमीन जास्त सुपीक होत जात आहे. भाताच्या खालोखाल महत्त्वाचें पीक ताग होय. यांशिवाय कडधान्यें, मोहरी, गळिताचीं धान्यें, तीळ ऊंस वगैरे जिन्सहि होतात.

व्यापारः—सूत काढणें व धुणें आणि मलमल तयार करणें हे धंदे येथें प्राचीन काळापासून चालत आहेत; कशिद्याचें काम मुसुलमानी अंमलानंतर होऊं लागलें आहे. सुंदर मलमल व निरनिराळ्या प्रकारचा कशिदा काढलेलीं रेशमी वस्त्रें यूरोप व पश्चिम आशियामध्यें मोठ्या प्रमाणावर पाठविलीं जात असत. पण विलायतेंत यंत्रसाहाय्यानें तयार होणाऱ्या मालाशीं चढाओढींत न टिकल्यामुळें हा धंदा खालावत चालला.

आबावान किंवा शबम नांवाच्या सुंदर कापडाचे जुने तुकडे १० चौ. यार्डास ३०० ते ५०० रुपयांस अद्यापहि विकले जातात. येथील राजधानी नाहींशी झाल्यावर या मौल्यवान वस्तूंचा खप बंद झाला, तरी विणकामाचा धंदा अद्याप महत्त्वाचा असून डाका शहरचे कोष्टी आपल्या कामांत अत्यंत कुशल आहेत. १८२१ पासून विलायती सूत येऊं लागल्यामुळें येथील सुताचा धंदा बसला. कशिदा व झाप्पण नांवाचें कापड अफगाणिस्तान, इराण, अरबस्तान, तुर्कस्तान वगैरे देशांत रवाना होतें. डाका शहरांत व त्याच्या आसपास होणारें कशिद्याचें काम फार मौल्यवान असतें. कशिदा काढलेल्या ५ यार्ड लांब व ४५ इंच रुंद मलमलीच्या तुकड्याला ५०० रुपयेपर्यंत किंमत पडते. डाका येथील कोरीं वस्त्रें ओपविण्याच्या कलेंतील नैपुण्य कांहीं विशेषच आहे. बंगालच्या इतर भागांपेक्षां भंडावाचें काम करणारे लोक येथें पुष्कळ आहेत. कदच्या खालोखाल डाकाची जर उत्तम असते. जहाजें बांधण्याचा धंदा येथें प्राचीन काळापासून

चालू आहे. तागाचे कारखाने वाढले असून, १९०३ सालीं त्यांची संख्या ३३ व गठ्ठे दाबणाऱ्या कारखान्यांची संख्या ७३ होती.

या जिल्ह्याचा आयात व निर्गत व्यापार नारायणगंज-वरून होतो. कापड, मीठ, रॉकेल, दारू, जोडे आणि छत्र्या हे जिन्नस कलकत्त्याहून व चुना आणि दगडी कोळसा आसामांतून येतो. याशिवाय बकरगंज येथून तांदूळ, मसाला, गूळ व सुपाऱ्या येतात; ताग हा येथील मुख्य निर्गत माल होय. इतर निर्गत माल फारसा महत्त्वाचा नाहीं. नारायणगंज व डाका यांशिवाय जिल्ह्यांतील सर्व भागांत जलमार्गावर व्यापाराचीं ठाणीं आहेत. त्यांपैकीं धलेश्वरीच्या कांठीं नागीरहाट, वैद्यबाजार, नरसिंगडी; मेघनाच्या कांठीं मुनशीरहाट; पद्माच्याकांठीं लोहगंज हीं मुख्य आहेत. सोनारगांवाजवळ नांगलबंद, धामई व लोहगंज येथें धार्मिक उत्सव होत असतात.

दळणवळणः—( १ ) आगगाड्या— नारायणगंजपासून मैमनसिंगपर्यंत आगगाडीचा फांटा गेलेला आहे; हा कलकत्त्याशीं आगगाडीनें व गोवलुंदोकडून जलमार्गानें जोडला गेला आहे. ( २ ) रस्तेः—मुख्य रस्ते आहेत ते येणेंप्रमाणेः तुंगीपासून कालीगंज व पुढें नरसिंगडीजवळ मेघनानदीपर्यंत जाणारा रस्ता; श्रीपूर व राजेंद्रपूर हीं गांवें अनुक्रमें गोसिंग व कापासिया यांशीं जोडणारे रस्ते; राजेंद्रपूर ते मिरझापूर व जयदेवपूर ते कद्दपर्यंत जाणारे रस्ते. डाका शहर ते वैद्यबाजारपर्यंत जाणाऱ्या रस्त्याची एक शाखा नारायणगंज-पर्यंत जाते. (३) जलमार्गः—मोठ्या नद्यांमध्यें कालव्यांचें जाळें करून जलमार्गानें दळणवळण करण्याची सोय झालेली आहे. मुख्य कालवे पद्मा व धलेश्वरी यांच्यामध्यें, हिलसामारी, इच्छामती, तालतोल व श्रीनगर हे खोल आहेत; मेघना व जुनी ब्रह्मपुत्रा यांनां जोडणारे अरियालखान व मेंडिखाली. पावसाळ्यांत जलमार्गानें जेथें जातां येत नाहीं अशीं ठिकाणें फारच थोडीं आहेत. मोठ्या नद्यांतून सर्व काळीं जहाजें जाऊं शकतात. नारायणगंज, काचर, सिलहट, गोवलुंदो, चांदपूर, बारिसाल आणि खुलना यांच्या दरम्यान रोज बोटी जातात; व डाका, नारायणगंज आणि कलकत्ता ( सुंदरबनावरून ) यांच्या दरम्यान आठवड्यास माल नेणारीं गलबतें चालू असतात. कलकत्त्याशीं बहुतेक व्यापार याच मार्गानें होतो.

राज्यव्यवस्थाः—ह्या जिल्ह्याचे चार पोटविभाग असून त्यांचीं मुख्य ठिकाणें डाका शहर, नारायणगंज, दसर ( माणिकगंज ) व मुनशीगंज येथें आहेत. जिल्ह्याचा म्याजिस्ट्रेट कलेक्टर डाका येथें राहतो. नारायणगंजवर इंडियन सिव्हिलसर्व्हिसचा मनुष्य व इतर विभागांवर डेप्युटि-मॅजिस्ट्रेट कलेक्टर आहेत. डाका व नारायणगंज येथील म्युनिसिपालिट्या खेरीज इतर ठिकाणचा स्थानिक कारभार जिल्हा बोर्डाकडे आहे.

शिक्षणः—१९०१सालीं लो. संख्येपैकीं शें. ६.५( पु.पैकीं शें. १२·१ व स्त्रियांपैकीं शें. १ ) लोकांनां लिहितांवाचतां येत होतें. अलीकडे शिक्षणाचा प्रसार बराच झालेला आहे. १९०३–४ सालीं येथें दोन कॉलेजें, १७१ दुय्यम शाळा व १६३२ प्राथमिक शाळा होत्या; व याच सालीं जिल्ह्यांतील छापखान्यांची संख्या २४ असून त्यांपैकीं ६ मध्यें वर्तमानपत्रें ( पैकीं ३ इंग्रजींत ) निघत होतीं.

शहर.—बंगालमधील डाका जिल्ह्याचें मुख्य ठिकाण, हें शहर बुऱ्ही गंगानदीच्या उत्तर तीराला असून, कलकत्त्यापासून आगगाडीनें व जलमार्गानें ( राणीगंज व गोवलुंदोकडून ) २५४ मैल लांब आहे. ढाक झाडांच्या नांवावरून या शहराचें नांव पडलें असावें असा साधारण समज आहे; तर येथें असलेल्या ढाकेश्वरीच्या नांवावरून तें पडलें असावें असें कांहींचें मत आहे. हें शहर बरेंच मोठें असून याची लो. सं. ( १९०१ ) ९०५४२ होती; ब्रिटिश अंमलापूर्वी हें शहर फार भरभराटींत असून येथील मलमल यूरोपांत रवाना होत असे. स.१८०१ त या शहराची लोकसंख्या २०००० होती; परंतु फ्रेंच युद्धांत, या शहराच्या भरभराटीला जबरदस्त धक्का पोहोंचून १८३० त येथील लो. सं. केवळ ६७००० झाली. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत झप्पण, कशिदा,यांचे कारखाने व ताग आणि कातडीं यांचा व्यापार यामुळें या शहराला थोडीबहुत बरी स्थिति येऊं लागली आहे.

हें शहर बुऱ्ही गंगेच्या कांठीं ६ मैलपर्यंत पसरलेलें असून उत्तरेकडील बाजूस याचा विस्तार १। मैलपर्यंत गेला आहे. शहरांतून दोलई नदीची शाखा ( खाडी? ) गेलेली आहे. येथील दोन रस्ते एकमेकांस काटकोनांत छेदितात. एक रस्ता लालबाग राजवाड्यापासून दोलई खाडी (नदी;) पर्यंत नदीशीं समांतर जातो; दुसरा रस्ता सुंदर व रुंद असून नदीपासून उत्तरेस जुन्या लष्करी छावणीकडे गेलेला आहे. बाजारचौक शहरच्या बहुतेक मध्यावर आहे. येथील घरें लहान व गल्ल्या अरुंद आणि वांकड्यातिकड्या आहेत.

या प्रांतांतील मुसुलमानांची राजधानी प्रथम सोनारगांव येथें होती. परंतु आसामाचे अहोम व पोर्तुगीज यांचे लोकांविरुद्ध चाल करून जाण्याकरितां डाका हें सोयीचें ठिकाण आहे म्हणून, इ. स. १६०८ त इस्लामखान या सुभेदारानें या प्रांताची राजधानी राजमहालहून डाका येथें नेली. त्यानंतर या शहराची भरभराट होत गेली व येथें इंग्रज, फ्रेंच, डच व पोर्तुगीज लोकांच्या वखारी होत्या. स. १७०४ त नवाब मुर्शिद कुलीखान यानें येथून राजधानी हलवून मुर्शिदाबाद येथें नेल्यामुळें या शहरचें वैभव लवकरच कमी झालें; व सध्यां तर या शहरांत पूर्वीचें महत्त्वनिदर्शक गोष्टी फारच थोड्या दृष्टीस पडतात. जहांगीरच्या कारकीर्दीत बांधलेला जुना किल्ला अजिबात नाहींसा झाला आहे; जुन्या इमारतींपैकीं कत्रा नांवाच्या बाजारपेठा व लालबागचा

राजवाडा अद्याप आहे; पण ह्या इमारती मोडकळीस आलेल्या आहेत. १८५७ साली येथील शिपाई बंडांत सामील झाले होते. स. १९०५ त पूर्वबंगाल व आसाम प्रांत निराळा झाला होता तेव्हां डाका ही स्थानिक सरकारची राजधानी होती.

डाकाची म्युनिसिपालिटी १८६४ साली स्थापन झाली. तिचें १९०१-०२ पूर्वीच्या १० वर्षांतील सरासरी उत्पन्न १७५००० रु. होतें. आसपासचा प्रदेश सुपीक व मोठ्या नद्यांजवळ असल्यामुळे डाका शहराची वाढ होत आहे;व नारायणगंज आणि मदनगंज या नदीकांठच्या बंदरांचा व्यापार धरला असतां येथील व्यापार पूर्वबंगाल व आसामांत सर्वांत मोठा आहे. ताग, गळिताचीं धान्यें, कातडीं येथून रवाना होतात, व कापड, राकेल वगैरे येथें येतात. येथें तांदुळाचाहि बराच मोठा व्यापार चालतो

येथें शिक्षणाची सोय चांगली आहे. डाका विद्यापीठ, जगन्नाथ विद्यापीठ, वैद्यकीय शाळा, अरबी व फारशी शाळा, मोजणी शाळा, व इंजिनियरिंग कॉलेज ह्या संस्थांशिवाय दुय्यम व प्राथमिक शाळा येथें आहेत.. मिट्फोर्ड, ह्यास्पिटल, लेडी डफरिन झनाना हॉस्पिटल व बंडयांचें हॉस्पिटल ह्या येथील मुख्य वैद्यकीय संस्था होत.

डा का ची म ल म ल.—सतराव्या शतकांत 'डाका' ही पूर्व बंगालची राजधानी होती. सतराव्या शतकापासूनच नव्हे तर त्या पूर्वीहि मलमलीबद्दल पूर्वबंगाल फार प्रसिद्ध होतें. कौटिल्याचें अर्थशास्त्र या ग्रंथास २००० वर्षें झालीं. त्यामध्यें देखील बंगदेशीय सुंदर तलम कापडाचा उल्लेख केलेला आढळतो. तेव्हांपासून ज्या ज्या एतद्देशीय आणि परदेशी ग्रंथकारांनां, इतिहासकारांनां आणि प्रवाशांनां हिंदुस्थानचें वर्णन करण्याचा प्रसंग आला. त्यांनीं पूर्वबंगालच्या मलमलीची स्तुतिच केली आहे. उदाहरणार्थ सुलेमान नांवाच्या नवव्या शतकांतील अरबी प्रवाशानें असें वर्णन केलें आहे कीं, "पूर्वबंगालचें सुती कापड इतकें सुंदर आणि नाजुक असतें कीं त्याचा पोषाख केला असतां तो हाताच्या बोटांत घालावयाच्या अंगठींतून जाईल." त्यानंतर राफ फिच ह्या नांवाचा इंग्रज प्रवासी (१५८३) आणि अकबरचा सुप्रसिद्ध मंत्री अबुलफजल ह्यांनींहि डाकाच्या मलमलीसंबंधानें गौरवपर उद्गार काढले आहेत.

डाकाच्या मलमलीचा तलमपणा दाखविणारी आणखी एक गोष्ट प्रसिद्ध आहे ती अशीः—"अवरंगझेबाची लाडकी कन्या झेबुन्निसा ही एकदां डाकाच्या मलमलीचें वस्त्र नेसली असतां त्यांतून तिचें अंग दिसत होतें म्हणून अवरंगझेब तिच्यावर फार रागावला. तेव्हां हें एक वस्त्र नाहीं अशीं सात वस्त्रें मी नेसलें आहे असा तिनें त्याला उलट जबाब दिला." ही गोष्ट ईस्ट इंडिया कंपनीचा एक नोकर मि. विल्यम बोल्ट्स् ह्यानें आपल्या 'कन्सिडरेशन्स ऑन इंडियन अफेअर्स' ह्या नांवाच्या एका ग्रंथांत लिहिली आहे.

अगदीं अलीकडील ताजें उदाहरण द्यावयाचें म्हणजे डाकाच्या विश्वविद्यालयाच्या अर्थशास्त्राचे प्रोफेसर श्री. जगदीशचंद्रसिंह एम्. ए. ह्यांचें होय. ह्यांनीं त्याच विश्वविद्यालयामध्यें डाकाच्या मलमलीसंबंधीं सांगोपांग विचार करणारें एक विचारपरिप्लुत व्याख्यान दिलें आहे, त्यामध्येंहि त्यांनीं पन्नास वर्षांपूर्वीचा डाकाच्या मलमलीचा एक तुकडा पाहून हाच अभिप्राय व्यक्त केला आहे. त्यांनीं जो तुकडा पाहिला तो एकवार पन्ह्याचा असून दहा हात लांब होता तरी त्याचें वजन अवघें ७॥ तोळे झालें होतें.

वरील विवेचनावरून डाक्याची मलमल किती तलम असे याची स्पष्ट कल्पना होईलच. डाक्याच्या मलमलीचा हा तलमपणा त्या मलमलीचें जें काव्यमय वर्णन उर्दू भाषेंत केलें आहे, त्यावरूनहि व्यक्त होतो. ह्या मलमलीचें 'अबङ्खन', 'बफ्त हवा' व 'शबनाम' असें विविध कल्पनायुक्त वर्णन करण्यांत येतें. अब-इ-खन म्हणजे 'वाहतें पाणी'; असें म्हणण्याचें कारण ती इतकी तलम असते कीं पाण्याच्या प्रवाहामध्यें ठेवली असतां ती क्वचितच दिसून येते. 'बफ्त हवा' म्हणजे 'विणलेली हवा,' ही मलमल म्हणजे जणू काय हवाच विणलेली आहे असें भासे, कारण त्या मलमलीला जर हवेंत सोडून दिलें तर ती स्वच्छ पांढऱ्या ढगाप्रमाणें हवेंत पसरत असे. 'शब नाम' म्हणजे 'संध्याकाळचें दंव'; डाक्याची मलमल जमिनीवर पसरली असतांना तिच्यांत आणि गवतावर पसरलेल्या दवामध्यें फरक करतां येत नाहीं इतकी ती तलम असे.

डाकाच्या मलमलीला लागणारा कापूस हा डाका जिल्ह्यांतच तयार होत असे ह्या कापसाचा हंगाम वर्षांतून दोनदां एप्रिल-मे आणि सप्टेंबर-आक्टोबर असा येत असे. ह्यांपैकीं एप्रिल-मे महिन्यांत येणारा कापूस सर्वोत्कृष्ट असे. ह्या कापसाचा एक गुण असा असे कीं, तो सरकीला अगदीं चिकटून असे. देवकापसाप्रमाणें हा कापूस सरकीपासून निखालस अलग होत नसे.

ह्या कापसाच्या एकंदर वर्णनावरून असें वाटणें साहजिक आहे कीं, हा कापूस लांब धाग्याचा असावा आणि ह्याचे तंतुहि हिंदुस्थानांत होणाऱ्या दुसऱ्या कोणत्याहि कापसापेक्षां अधिक सफाईदार आणि रेशमासारखे असावेत; परंतु ही कल्पना चुकीची आहे. तौलानिक दृष्टीनें पहावयाचें असल्यास हल्लींचा अमेरिकन कापूस हाच त्याच्यापेक्षां अधिक लांब धाग्याचा असून अधिक सफाईदारहि आहे. डाकाच्या मलमलीचा कापूस हा आंखूड धाग्याचा आहे आणि म्हणूनच त्याचें हातानें अत्युत्कृष्ट सूत निघूं शकतें. त्याचें यंत्रावर इतकें सफाईदार सूत निघणें शक्य नाहीं. १८११ सालीं ईस्ट इंडिया कंपनीच्या लोकांनीं त्या वेळच्या कातणाऱ्या स्त्रियांनां लांब धाग्याचा अमेरिकन कापूस कांतायला दिला असतांना त्यांतून तितका बारीक धागा निघेना

अशी त्या स्त्रियांनीं त्या अमेरिकन कापसाविरुद्ध तक्रार केली होती. डाक्याच्या कापसाचा दुसरा विशिष्ट गुण म्हटला म्हणजे त्या कापसाचा धागा धुतल्यानंतर फुगत नसे हा त्या पाण्याचा विशिष्ट गुण होता असें म्हणतात.

ह्या वर्णनावरून उघडच होत आहे कीं, डाक्याच्या मलमलीचा तलमपणा हा त्या कापसावर आणि त्यापेक्षांहि अधिक तो कापूस कांतण्याच्या आणि विणण्याच्या विशिष्ट प्रकारच्या कौशल्यावर अवलंबून होता. कपाशींतून सरकी काढण्यापासून तों त्याचें कापड विणीपर्यंतच्या सर्व क्रिया ह्या कापसाच्या विशिष्ट पद्धतीनेंच होत. सामान्य कापूस वठण्याचा जो चरखा असतो तो ह्याला उपयोगी पडत नसे. एका सपाट लांकडी फळीवर एक लोखंडी रूळ बसवून तो गोल फिरवितां येईल अशी व्यवस्था केलेली असते. साध्या वठण्याच्या चरख्यापेक्षां ह्यांत त्या पद्धतीनें तंतूंना धक्का कमी बसतो. हा कापूस पिंजण्याकरितां एक लहानशी मांजराच्या तातेची धनुकली असते. अतिशय बारीक धागा काढावयाचा असेल तर ' बोल ' नांवाच्या एका प्रकारच्या मृत माशाला मध्येंच फाडून त्याच्या दातांनीं तो विंचरण्याचा प्रघात होता. नंतर हा कापूस ' चीतल ' नांवाच्या माशाच्या सुक्या कातड्याच्या मऊ पृष्ठभागावर ठेवण्यांत येऊन त्याचे पिळू करण्यांत येत असत. शंभराच्या आंतल्या नंबरचें सूत हें साध्या चरख्यावर काढीत असत. परंतु त्यापेक्षां वरच्या नंबरचें सूत काढण्यास चातीचाच उपयोग करण्यांत येत असे. ही चाती म्हणजे एक मजबूत जाड सुई असून तिची लांबी दहापासून चौदा इंच असे. ही चाती फिरवितांना किंचित् वजनदार लागावी म्हणून त्या चातीच्या खालीं एक मातीची गोळी लावण्यांत येत असे. चातीवर कांतण्याची उत्तम वेळ म्हटली म्हणजे साधारणतः ८२ डिग्रीचें उष्णमान असून हवा किंचित् दमट पाहिजे. कांतणाऱ्या स्त्रिया साधारणतः सकाळीं पहाटेस सुरवात करून ९–१० वाजेपर्यंत कांतीत असत आणि दुपारी ३–४ला सुरुवात करून सूर्यास्ताला बंद करीत असत. उत्कृष्ट प्रतीचें सूत हें सूर्योदयापूर्वीच कांतण्यांत येत असे. जेव्हां हवा अतिशय कोरडी असेल तेव्हां उथळ भांड्यांत ती चाती ठेवून सूत कातण्यांत येत असे. डाक्याचा कापसाचा तंतु अधिक लवचिक असून सूत काढतांनाच त्याला साहजिकपणें अधिक पीळ बसत असे. उत्कृष्ट प्रकारचें सूत काढण्याचें काम बहुतकरून स्त्रियाच करीत असत. त्यांतहि ज्या स्त्रियांमध्यें हा धंदा वंशपरंपरा चालत आला होता त्या स्त्रिया ह्या कलेंत विशेष तरबेज होत्या. हें सूत काढणाऱ्या स्त्रियांची दृष्टि फार शाबूत असावी लागते म्हणून साधारणतः मध्यम वयाच्याच स्त्रिया हें सूत कांतीत असत. हातसूत हें ५०० च्या वरच्या नंबरचेंहि निघत होतें ( हल्लीं देखील ९२० नंबरचें सूत निघालेलें आपण प्रदर्शनांत पाहतों ). पण हें सूत विणतां येत नाहीं इतकें तें बारीक असतें. हातचें सूत धुतल्यानंतर अधिक मजबूत आणि सफाईदार होतें. डाक्याच्या मलमलीचा मोठा गुण म्हणजे ती पारदर्शक होती. मलमलीस लागणारें उत्कृष्ट प्रतीचें सूत काढावयाचें असल्यास उत्तम कांतणारीनें जर आपला सकाळचा सबंध वेळ दिला तर तें फक्त $\frac{1}{2}$ तोळाच भरे. हें काम करण्याला लागणारी चिकाटी आणि कौशल्य हींच डाक्याच्या सुताच्या उत्कृष्टपणाचीं कारणें होत. हें कौशल्य आणि त्यांचीं तीं प्राचीन अवजारें पाहिलीं म्हणजे त्यांचें कौतुक केल्याविना कोणाच्यानें राहवणार नाहीं. ज्या कच्च्या मालापासून ह्या स्त्रिया सूत काढीत असत त्या प्रकारच्या मालापासून यंत्राच्या सहाय्यानें मिळालेला धागा आज देखील त्या सुताची बरोबरी करूं शकत नाहीं इतकें तें सूत सफाईदार असे.

ही मलमल विणण्याचे जे माग असत ते माग आणि आज प्रचारांत असलेले माग ह्यांमध्यें कांहीं विशेष फरक नसे फक्त त्यावेळीं ते विणकर जो धोटा उपयोगांत आणीत तो पुष्कळच हलका असे. ह्यासंबंधीं एकच गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे आणि ती म्हणजे उत्कृष्ट प्रतीची मलमल विणतांना हवेमध्यें ओलावा लागत असे. जेव्हां पुष्कळ पाऊस पडत असे आणि हवा फार सर्द असे तेव्हां मागाखालीं मंद उष्णता देणारी शेगडी ठेवीत. जेव्हां फार उष्णता असेल तेव्हां ताण्याच्या खालीं उथळ पाण्याच्या पराती ठेवाव्या लागत असत. डाक्याच्या मलमलीचे अठरा प्रकार होते. विशिष्ट प्रकारची मलमल काढण्याचें काम विशिष्ट माणसाकडेच असे त्यामुळें कौशल्य वंशपरंपरा दिसून येत असे. हें कापड विणण्यामध्यें इतकें कौशल्य आणि इतकी सहिष्णुता लागे कीं, उत्कृष्ट प्रतीचें १ वार पन्ह्याचें १० वार कापड विणण्यास ( ज्याचें वजन अवघें ४॥ औंस भरे ) पांच महिन्यांपेक्षां काल कमी लागत नसे, आणि म्हणून ह्याची किंमतहि तितकी भारी असे. एक वार औरस चौरस कापड काढण्यास त्यावेळेला दहा रुपये लागत असत. परंतु त्यावेळचे दहा रुपये म्हणजे आतांचे तीस रुपये इतका फरक पडला आहे.

ज्या वेळेला विणण्याच्या कलेचा हिंदुस्थानांत परमोच्च विकास झाला होता, त्या वेळेला मौल्यवान कपडे धुण्याची कलाहि पूर्णत्वाला पोहोंचली होती. त्यावेळीं यूरोप ह्या कलेमध्यें फार मागसलेलें होतें. ही कला पूर्णत्वास जाण्यास केवळ डाक्याच्या आसपासच्या पाण्याचाच गुण कारणीभूत होता. असें नव्हे तर त्या वेळच्या साबूचे गुणधर्म आणि कापड विणण्याचें कौशल्य हींहि तितक्याच श्रेष्ठ दर्जाचीं होतीं.

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे डाक्याचें सूत आणि डाक्याची मलमल इतकी उत्कृष्ट होती कीं इंग्लंडमध्येंहि आज यंत्राच्या साहाय्यानें तिच्या तोडीचें सूत आणि कापड निघूं शकत नाहीं. अशा पूर्णत्वाला गेलेली कला आज कां नामशेष झाली याचें मुख्य कारण हेंच कीं त्या कलेला आज राजाश्रय नाहीं. डाक्याच्या मलमलीसारखें उत्कृष्ट कापड पूर्वी मोठमोठे राजे

महाराजे, आणि सरदार लोकच वापरीत असत. त्यांनीं विशिष्ट प्रकारचा नमुना द्यावयाचा व आणि त्याप्रमाणें विणकऱ्यांनीं तो विणून द्यावयाचा अशी पूर्वीची पद्धति असल्यामुळें दोघांचीहि सोय होत होती. राजाश्रयाचा अभाव हें तर मुख्य कारण खरेंच परंतु त्याशिवायहि अठराव्या आणि एकोणिसाव्या शतकांतील हिंदुस्थानच्या मालावर इंग्लंडनें लादलेली जकात, ईस्ट इंडिया कंपनीच्या लोकांनीं हिंदी विणकऱ्यांवर केलेला जुलूम हींहि कारणें होतीं हें विसरतां कामा नये.

**डाकोर**—मुंबई इलाख्यांतील खेडा जिल्ह्याच्या थासा तालुक्यांतील एक यात्रेचें स्थान. मुंबई, बडोदा आणि मध्य हिंदुस्थान रेल्वेच्या गोध्रा-रतलाम शाखेवर आनंदच्या ईशान्येस ९ मैल आहे. येथें रणछोडजीचें देवालय आहे. बोधानो नांवाच्या रजपुतानें ही मूर्ति द्वारकेहून आणिली. येथें मासिक मेळेहि भरत असून वार्षिक एक लक्ष लोकांचा जंगी मेळा आश्विन-कार्तिक पौर्णिमेस भरतो. येथें एक दवाखाना असून चार शिक्षणसंस्था आहे.

**डांग**—खानदेश व नाशिक या जिल्ह्यांच्या साधारणतः मध्यें हीं पंधरा डांग संस्थानें आहेत. येथील संस्थानिक भिल्ल अथवा भ्रष्ट रजपूत आहेत.हे लोक पूर्वी लुटालूट व वाटमाऱ्यांचा धंदा करीत असत. अद्यापिहि यांची प्रजा साधारण हाच धंदा मधून मधून करिते. हा प्रदेश अत्यंत डोंगराळ, झाडीचा असल्यानें व तेथील हवा रोगट असल्यानें तेथें व्यवस्थित बंदोबस्त राखतां येत नाहीं. येथील लोक गरीब,आळशी, दारूबाज आहेत. डांग हा शब्द हिंदी असून त्याचा धात्वर्थ माथा, पर्वतशिखर असा आहे.ज्यांत अतिशय झाडी व बारीकसारीक उंचवटे असतात असा पर्वताचा दऱ्याखोऱ्यांचा भाग म्हणजे डांग होय. पुणें भागांत ज्याला मावळ म्हणतात, तसल्याच प्रदेशाला नाशकाकडे साधारणतः डांग म्हणतात. 'डंगवीपुराण' म्हणून एक पुराण प्रसिद्ध आहे. डांग देश उत्तर अक्षांश २०°२२' ते २१°५' आणि पूर्व रे.७३°२८' ते ७३° ५२' यांच्या दरम्यान, दक्षिणोत्तर ५२ व पूर्वपश्चिम २८ मैल लांबीरुंदीचा जवळ जवळ ८०० चौ. मैलांचा, चोवीसपासून पंचवीस हजार लोकसंख्येचा व तितक्याच उत्पन्नाचा आहे. त्याच्या वायव्येस रेवाकांठा, ईशान्येस व पूर्वेस खानदेश,नाशिक जिल्हे व सह्याद्रीच्या रांगा, दक्षिणेस पेठ व सुरगाण संस्थान, पश्चिमेस सुरत जिल्ह्यांतील चिखली पेटा व गायकवाडी अंतापुर जिल्हा आहे.

डांग देशाच्या पुढील पंधरा जहागिरी आहेत अमाळ, अवचार्र, चिंचली, देरभवती, दुर्भे, धारवी, झाडी गरखंडी, केकत कडुपाद, किर्ली, पळासविहीर, पिंपळादेवी, पिंप्रा, शिवबारें, वढावण आणि वासुर्णे. या प्रत्येकीचा स्वतंत्र जहागीरदार आहे. त्या सर्वांचा मुख्य धारवीकर आहे. पूर्णा, अंबिका, काप्री व कुडा या नद्या यांत मुख्य आहेत. बाबुलर्णे, जखरीधारी, कांचन, चौंप, वगैरे घांट आहेत. रूपगड नांवाचा एक किल्लाहि आहे. नद्यांत पाणी कांहीं ठिकाणीं विष कालवून विषारी करून त्यायोगें मासे पकडण्याचा धंदा येथील लोक करतात. या डोंगरांत लोखंड पुष्कळ सांपडेल. मार्च ते मेपर्यंत इकडील हवा बरी असते. नंतर अतिशय वाईट होते; मलेरिया सर्वत्र पसरतो. पाऊस फार पडतो. साग, शिसू हीं इमारती लांकडें फार आहेत. मोहाचीं झाडेंहि पुष्कळ असल्यानें दारूचें उत्पन्न बरेंच होतें. हिरड्यापासून रंग पूर्वी करीत असत. डांग देशांतील अरण्यानें जवळ जवळ एक हजार चौ. मै. जागा व्यापिली आहे. येथील सागाला उम्या झाडास दर खंडीस (१२॥ घनफूट )१२ ते १५ रु. किंमत येते. इमारती लांकडाचेंच उत्पन्न जास्त येतें वाघ चित्ते, अस्वल, सांबर, रानडुकर व चितळ हीं जनावरें पुष्कळ आढळतात.

मुख्यतः भील व इतर कुणबी, कोंकणी, वारली, काथोडी वगैरे लोकांची वस्ती आहे. नागली, वाजरी, भात, कोद्रु वगैरे हलकीं धान्यें पिकवून हे लोक आपला उदरनिर्वाह करितात. बहुतेकांजवळ धनुष्यबाण असतात व त्यायोगानें पशुपक्ष्यांची शिकार करून त्यांवरहि हे पोट भरतात. हे लोक स्वभावतः इमानी, पापभीरू व भित्रे आहेत, परंतु अलीकडे ते कावेबाज होत चालले आहेत. रोगाची सांथ, गुरांचा अथवा जादुटोण्याचा प्रयोग यामुळें एका ठिकाणाहून वस्ती उठून दुसरीकडे जाते; जातांना आपल्या पहिल्या झोंपड्या जाळण्याचीहि चाल आहे. वाघदेव, शिवेवरील म्हसोबा व नाग ( साप ) हे त्यांचे मुख्य देव आहेत. गुजराथी, हिंदुस्थानी व मराठी यांची मिश्र भाषा हे बोलतात.

वासुर्णे व अमाळ भागांतील जमीन पिकाऊ आहे. तूर, उडीद, गहूं, भात, व क्वचित् भुईखंड नांवाचा बटाटा या भागांत पिकतो. या देशांत गाडीरस्ता असा फारच थोडा ( ५० मैल ) आहे. इमारती लांकडाशिवाय बाकी व्यापार नाहीं व आहे तो वंजारी लोकांच्या हातीं आहे. लांकडाच्या मोबदल्यांत वंजारी लोक, कापड, स्वस्त दागदागिने, मीठ, भांडीं वगैरे माल डांगी लोकांना देतात. काताचा धंदा बराच चालतो.

डांग राजे आपल्याला रजपूतवंशी म्हणवितात.त्यांचा मुख्य धारवीकर आहे. पूर्वी हे सारे जहागीरदार मुल्हेर येथील देशमुखाच्या हाताखालीं असत. इंग्रजी राज्य झाल्यावर हे स्वतंत्र बनले. त्यांचे कांहीं हक्क गायकवाडींत होते, त्यांची व्यवस्था इंग्रजांनीं लावून दिली व इमारती लांकडाबद्दल राजभाग म्हणून ठराविक रक्कम घेवून सर्व जंगल त्यांच्या ताब्यांत ठेविलें. मुल्हेरकर देशमुखाला यांच्यापासून थोडीशी खंडणी पूर्वापार मिळते, त्याशिवाय हे कोणालाहि ( इंग्रज सरकारास सुद्धा ) खंडणी देत नाहींत. सुरत जिल्ह्याचा कलेक्टर हाच यांचा पोलिटिकल एजंट आहे.

शेतसारा हा नांगरावर असून तो धान्यरूपानें अथवा नक्त (नक्त असल्यास, दर नांगरीं पांच रुपये )हि वसूल करितात.

न्यायनिवाडा येथील राजे लोकच करितात पूर्वी मृत्यूची शिक्षा बाण मारून ( व चेटकी असल्यास तिला जिवंत जाळून ) अंमलांत येई. हल्लीं त्यांनां हा अधिकार नाहीं; किरकोळ दंडखंडाचा अधिकार आहे.

काळींचें व जंगलचें मिळून सालीना वीस हजारांपर्यंत उत्पन्न आहे. अबकारीचें सर्व उत्पन्न व कारभार इंग्रज सरकारच्या हातीं आहे,फक्त कांहीं नक्त रकम राजे लोकांनां हक्कादाखल देण्यांत येते.

येथें शाळा मुळींच नाहींत. कांहीं कांहीं राजे सुद्धां अक्षर शत्रू आहेत. नुक्तीच ( १९२४ ) गायकवाडी भागांत या लोकांची सुधारणा करण्याकरितां म्हणजे दारूबंदी व शिक्षणासाठीं "कालीप्रजाचळवळ" सुरू झाली आहे. या लोकांनीं श्री. सयाजीराव गायकवाडांची समक्ष भेट घेऊन आपली थोडी फार दाद लाविली.

संस्थानें.—(१) अमाळें. २०० चौ. मै.; लो. सं. पांच हजार; वार्षिक उत्पन्न तीन हजार रुपये; राजधानी मोदळ; राजा भिल्ल. ( २ ) अवचारें– ८ चौ. मै; लो. सं. ३००; वा. उ. १०० रु; राजा भिल्ल. ( ३ ) चिंचली.–२२ चौ. मै; लो. सं. ८००; वा. उ. ८००; राजधानी कडमळें; भिल्ल राजा. ( ४ ) देरभवती– १७० चौ. मै; लो. सं. तीन हजार; वा. उ. चार हजार; राजधानी ऊर्गे; राजा भिल्ल. ( ५ ) दुर्घे. लो. सं. १५०; वा. उ. १००; राजा कुणवी. ( ६ ) धारवी. ३०० चौ. मै.; लो. सं. ३३००;वा. उ. पांच हजार; येथील देवीसिंग नांवाच्या राजानें स. १८५० च्या सुमारास बरेचसे भिल्ल जमवून बंडाळी सुरू केली होती; परंतु पुढें इंग्रज सरकारनें ती मोडली. येथील राजा कुणवी आहे. ( ७ ) झाडी गरखंडी.–लो. सं. २००; वा. उ. १००; राजा भिल्ल. ( ८ ) केतक कडुपाद.–लो. सं. १००; वा. उ. १५०; भिल्ल राजा. ( ९ ) किलीं–लो. सं. ८००; वा. उ.५००;भिल्ल राजा. ( १० ) पळासविहीर– लो. सं. ३००; वा. उ. २५०; भिल्ल राजा; हल्लीं तापीव्हॅली रेल्वेचें पळासविहीर हें एक स्टेशन झालें आहे. ( ११ ) पिंपळा देवी–लो. सं. १००; वा. उ. १००; भिल्ल राजा– ( १२ )पिंप्री. १००; चौ. मै; लो. सं. चार हजार; वा. उ. तीन हजार; भिल्ल राजा. ( १३ ) शिवावारें–लो. सं. २५०; वा. उ. ४५०; भिल्ल राजा. ( १४ ) वढावण; लो. स. १००; वा. उ. २५०. भिल्ल राजा. ( १५ ) वासुर्णे; २०० चौ. मै. लो. सं. साडे चार हजार; वा. उ.; अडीच हजार भिल्ल राजा; राजधानी वरधुंड.

या सर्व राजे लोकांनां कायदेशीर दत्तकाचा अधिकार नसून वारसाहक्क ज्येष्ठपणावर ( वडिलकीवर ) आहे.धारवी, देरभवती, अमाळें, पिंप्री आणि वासुर्णे येथलि संस्थानिकांस राजे व बाकीच्यांनां नाईक म्हणतात. [ इंडि. अँटि. पु ५. ३३७; बाँबे गव्हर्न. सिलेक्शन्स. पु. २६; गिब्ज–रिपोर्ट; राम्से–रिपोर्टः खानदेश ग्याझेटियर; नाशिक ग्याझेटियर. ]

**डांगची**—मुंबई इलाखा. खानदेशांत सर्वांत मागसलेली ही एक रानटी जात आहे. हे लोक दुर्व्यसनी असल्यामुळें प्रायः खुजट असून कावाडकष्ट व दारिद्र्यानें गांजल्यामुळें मनाचे दुर्बल असतात. यांची रहाणी अत्यंत किळसवाणी असते. हे वाटेल तें भक्षण करतात. माकड, उंदीर, जीवजंतु वगैरे सर्व प्राणी हे खातात. शेतकीवर यांचा उदरनिर्वाह असतो. परंतु हे काम करण्यास नेहमीं कंटाळा करतात. त्यामुळें कोंकणी व वारली कुळांपासून पिकाचा जो कांहीं वांटा मिळेल त्यावरच यांनां गुजराण करावी लागते. हे वाघाला पूज्य मानतात व वाघ देवतेची पूजा करतात. हे सदोदित आपल्या जवळ चकमक बाळगतात

**डांगर**—ताग पिकवून त्याची पोतीं तयार करणारांची ही एक जात मध्यप्रांतांत आढळते. यांस उत्तरेकडील जिल्ह्यांत कुमरावत व छत्तीसगडांत पाटबीना म्हणतात. हे आपणांस रजपूत वंशज म्हणवितात. पण खारिया लोकांत कुमरावत नांवाचा एक वर्ग आहे. यावरून तागाचा धंदा स्वीकारल्यामुळें मुख्य वर्गापासून निराळे होऊन यांनीं ही स्वतंत्र जात बनविली आहे. हे आपापसांतच लग्नें करतात. मुली कमी असल्यामुळें हे लग्नें फार लहानपणीं करतात. जबलपुराकडे यांचा दर्जा काचीं लोकासारखांच असतो.

**डांगी**—शेतकी करणारी ही जात आहे. यांची लो. सं. २४०००;यांपैकीं२३००० फक्त सागर जिल्ह्यात आहेत. रजपुताना व मध्य हिंदुस्थानांत यांच्यापैकीं बरेच लोक आहेत पण सागरांत हे पुष्कळ पूर्वी आलेले आहेत. गडपान्याचे राजे डांगी असत व त्या भागास पूर्वी डांगीवाडा म्हणत. अजून विलेहऱ्याचे जहागीरदार डांगीच आहेत व ते गडपान्याच्या राजांचेच वंशज आहेत.

गडपान्याच्या रजपूत राजानें २२ विवाहित स्त्रियांच्या पालख्या अडकावून ठेविल्या आणि त्यांस आपल्या जनानखान्यांत ठेविलें. त्यांची संतति डांगी लोक आहेत असें ते सांगतात. पण डांग शब्द फारशी आहे. त्याचा अर्थ डोंगराळ किंवा रानवट असा आहे. बुंदेलखंडांत अजून डांग शब्द रान या अर्थात वापरतात. तेव्हां डांगी ह्मणजे डोंगरांत व रानांत राहणारीं माणसें असा अर्थ निघतो. चांगल्या स्थितींत असलेले डांगी आतां स्वतःस राजपुतांचे वंशज ह्मणवितात. पण यांच्या रक्तांत जरी रजपूत अंश असला तरी इतर जातींचें बरेंच मिश्रण झालें आहे. कारण यांचीं कुलनामें राव्या ह्मणजे कुंभारिणीचीं मुलें, धोबिया--धोबिणीचीं मुलें, पवनिया-कोष्टिणीचीं मुलें अशीं आहेत. पूर्वी हे रजपूत व मराठा सैन्यांत नौकरी करीत असत. नागपुराजवळ इंदुरी गावांत यांची वसाहत आहे. हे भोसल्यांच्या सैन्यांत नोकर असत.

डांगींचे तीन वर्ग आहेत. त्यांचीं नांवें नाहोनिया, भायोनिया व नादिया. यांशिवाय इतर वर्ग २२ आहेत, त्यांस बाईसा म्हणतात. यांचा मूळ पुरुष पृथ्वीपत डांगी हा होता. त्यानें आपल्या २२ बायकांस एक एक गांव दिला होता. व

त्या त्या गांवावरून त्या त्या कुळाचें नांव पडलें. पण आतां यांपैकीं फक्त १३ कुलेंच शिल्लक उरलीं आहेत. कांहीं लोक महोब्याहून आले त्यांस महोबिया व नरवराहून आले त्यांस नरवरिया म्हणतात. सोलांखी कुल सोलांखी रजपुतांचे दासीपुत्र असावे. पन्थाचा प्राणनाथ गुरु, त्याचे शिष्य प्रणामी म्हणवितात. रजपूत लोक पहिल्या तीन कुलांतील मुली करतात, व हीं तीन कुलें पृथ्वीपताच्या १३ कुळांतील मुली करतात. व पृथ्वीपत कुलें इतर डांगींच्या मुली करतात पण यांपैकीं कोणीहि खालच्या वर्गातील मुली करीत नाहींत. पण आतां प्रत्येक कुल आपसांतच लग्नें उरकून घेतें. उच्च कुलांतील मुलास ५०० पासून १००० रुपयेपर्यंत हुंडा द्यावा लागतो. अगदीं उच्च कुलांत आणखी एक भेद आहे. जयसिंग नगरचा राजा जयसिंग याच्याकडे जे जेवले त्यांस 'संक्रोदिया' व जे जेवले नाहींत त्यांस 'देवताओंका संसार' म्हणतात. रजपूत लोक यांच्याच मुली करतात. कुलांतल्या कुलांत किंवा आईच्या कुलांत लग्नें निषिद्ध समजतात.

मुलींचीं लग्नें ७ ते १२ वर्षांपर्यंत होतात पण न्हाण आल्यावर हीं लग्नें झालेलीं चालतात. लग्नें आईबाप घडवून आणतात. ब्राह्मणाकडून पत्रिका मिळवितात. वाङ्निश्चय वराच्या बापास नारळ दिला म्हणजे होतो व हा निश्चय बदलण्यासारखा असतो. हुंडा कधीं २००० रुपये पडतो. वधू मोठी असली तर गौना (गर्भाधान) लागलीच करतात नाहीं तर चार पांच वर्षांनंतर होतें. विधवाविवाह प्रचारांत नाहीं पण झाल्याचीं उदाहरणें आहेत. व्यभिचारिणीस अजांचात जातींतून काढून टाकतात.

दुर्गा देवीची पूजा हे लोक फार भाविकपणानें करतात. आश्विन व चैत्र महिन्यांत तिची पूजा होते आणि तेव्हांच शस्त्रांचीहि पूजा होते. प्रेतें जाळण्याची चाल यांच्यांत आहे. जिझोटिया ब्राह्मण यांचे पुरोहित आहेत.

हे आतां शेतकी करतात. यांच्या बायकाहि कष्टाचीं कामें करतात. हे कुसुंबा व तागाची पेरणी करतात. यांचा पोशाक सागराकडील स्त्रीपुरुषांप्रमाणें असतो. बायका गोंदवितात.

**डांग्या खोकला**—हा एक संसर्गजन्य श्वसनेंद्रियाचा विशिष्ट जंतूंमुळें होणारा रोग असून त्या मार्गाच्या श्लेष्मावरणांत दाह उत्पन्न करतो व त्यामुळें अति दीर्घ सूं सूं वाजणारे श्वास आंत घेणें व त्याबरोबर पुनःपुनः येणाऱ्या खोकल्याचा उमळ ही या खोकल्याचीं मुख्य लक्षणें असतात. हा रोग मुख्यत्वेंकरून लेंकरांत फार आढळतो खरा पण मोठ्या माणसांत तो अगदींच आढळत नाहीं असें मात्र नाहीं; व कोणत्याहि वयाच्या माणसांना तो होऊं शकतो असें पहाण्यांत आलें आहे. शैशवावस्थेंत मुलांना धोक्याचे असे जे रोग असतात त्यांपैकीं हा एक आहे व यामुळें होणारी मृत्युसंख्या कांहीं थोडी नसते. त्यांपैकीं बहुतेक एक वर्षाच्या आंतील असतात. शेंकडा ९७ मुलें पांच वर्षाच्या आंतील असतात असें एका शास्त्रज्ञानें आंकड्यांनीं सिद्ध केलें आहे. त्यांतल्या त्यांत मुलांपेक्षां मुलींनां हा रोग विशेष झालेला दिसतो. या रोगाची गर्भावस्था दोन ते दहा दिवसपर्यंत असते. त्याच्या आरंभापासून शेवटपर्यंत तीन अवस्था पहाण्यांत येतातः—( १ ) पडसें व खोकला येणें; ( २ ) खोकल्याच्या उमळी दिवसांतून फार वेळां येणें व ( ३ ) उतार पडत हळूहळू रोग कमी होणें.



(१) प्रथमावस्थेंत शिंका, पडसें, खोकला, डोळ्यास पाणी येणें इत्यादि, घशांत खाजणें, दाह होणें, थोडा ताप, याप्रमाणें एरवीं जशी सर्दी होते तशीं हुबेहूब लक्षणें होतात व पुढें हें मोठें दुखणें होणार आहे याची कल्पनाहि येत नाहीं. परंतु पुढील रोगाचें सूचक चिन्ह म्हणजे जिभेखालीं शिवणीवर एक फोड येऊन तो फुटणें. आणि हें चिन्ह खात्रीचें आहे असें म्हणतात. ही रोगाची अवस्था दहा ते चवदा दिवसपर्यंत टिकते.

(२) दुसरी अवस्था सुरू झाली म्हणजे पडसें व सर्दी कमी होते पण खोकल्याचा जोर फार होऊन तो दिवसारात्रीं त्रास देतो. प्रत्येक उमळ आली म्हणजे एकामागून एक असे लहान लहान खोकल्यासारखे निश्वास भराभर येऊन त्यांच्या शेवटीं भला मोठा दीर्घ आसा हूं अथवा हूंप असा वाजणारा उच्छ्वास रोगी घेतो. उमळ येऊन खोकतांना मोठ्या जोरानें फुप्फुसांतील सर्व हवा बाहेर निघून जाते व उमळ थांबेपर्यंत श्वास आंत न घेतां आल्यामुळें दम कोंडून गुदमरल्यासारखें होतें, म्हणून चेहरा काळवंडतो अगर लालहि होतो. डोळे अगदीं घाबरल्यासारखे पुढें येतात व दम कोंडतो किंवा काय असें वाटतें न वाटतें तोंच वर सांगितलेल्या दीर्घ उच्छ्वासामुळें आंत हवा जाऊन आराम पडतो. उमळीसरशी कोणाच्या नाकातोंडांतून अगर कानांतून रक्तहि येतें किंवा बुबुळाजवळील डोळ्यांच्या पांढऱ्या भागाखालीं रक्त सांखळतें. याप्रमाणें प्रत्येक उमळ बहुधां अर्धा ते पाऊण मिनिटापेक्षां जास्त टिकत नाहीं खरी तरी पण वरील दीर्घ उच्छ्वास घेतल्यानंतर लागलीच दुसऱ्या उमळीस सुरवात होऊन बरींच मिनिटेंपर्यंत अशा कित्येक उमळी येतात व जातात, व शेवटीं थोडा कफ खोकून पडून अगर थोडें अन्न ओकून पडून नंतर ती उमळ थांबते. नंतर रोगी बरा आहे असें दिसतें; अथवा एखादा रोगी फारच दमून जातो किंवा त्रासून पडतो. रोगाची तीव्रता असेल त्या मानानें अशा उमळी दिवसांतून कमी अगर अधिक येतात. म्हणजे कोणाला सबंध दिवसांत दोनतीनच उमळी येतात तर एखाद्या मुलाला एका तासांतच कित्येक उमळी येतात. अन्न खाणें, बोलणें, हसणें, रडणें असलीं क्षुल्लक कारणेंहि रोग जोराचा असल्यास उमळीची सुरवात होण्यास पुरेशीं होतात. कित्येकदां तर उमळ सुरू होण्यास कांहीं निमित्तहि लागत नाहीं. पण मुलास आतां उमळ येणार, असें घशांत खाजल्यासारखें होऊन कळतें आणि मग तें शेजारीं आई अगर दाई वगैरे मोठ्या माणसास चिकटून बसतें. अगर तें

नसेल तर तें शेजारीं आधार घेऊन टेंकण्यासारखा जो पदार्थ असेल तेथें ती उमळ शांत होईपर्यंत बसतें. मूल यामुळें फार थकून जातें खरें पण पुन्हां ताजेतवानें होऊन ज्या खेळांत अगर उद्योगांत गढलें असेल तो पुन्हां सुरू करतें. याप्रमाणें एक महिना किंवा दीड पावणेदोन महिनेपर्यंत ही द्वितीयावस्था टिकते. व कधीं याहून कमी कालपर्यंत तर कधीं जास्ती कालपर्यंतहि टिकते.या अवस्थेंत अनेक दुष्परिमाण व दोष प्रकृतींत होऊन मूळ रोगापेक्षांहि अधिक भय उत्पन्न करतात, त्यांपैकीं कांहीं मुख्य पुढें दिले आहेत :—फुप्फुसें व श्वसननलिकांचे दाहादि विकार,ज्यांच्या तीव्रतेमुळें जिवास अपाय होईल असे आंचके व आंकडी नांवाचा वातरोग इ.

( ३ ) रोगी या अवस्थेंतून पार पडला म्हणजे रोगाच्या तिसऱ्या व शेवटच्या अवस्थेस प्रारंभ होतो. तीमध्यें अहोरात्र मिळून जितक्या खोकल्याच्या उमळी यावयाच्या त्यापेक्षां त्या खास कमी येऊं लागतात व त्यांतील सूंकार किंवा हूंपकार असा विशिष्ट दीर्घोच्छ्वासहि नाहींसा होतो. दम कोंडून रोगी बेजार होणें कमी झाल्यानें रोग्याची एकंदर स्थिति पुष्कळ सुधारते व उरलेलीं सर्व लक्षणें एक ते तीन आठवड्यांत नाहींशीं होतात. या रोग्यासंबंधीं एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे ती ही कीं आणखी बराच कालपर्यंत सर्दीमुळें त्यास सार्धे पडसें, खोकला जरी आला तरी श्वासनलिका वातामुळें एकदम आकुंचित होऊन पूर्वीप्रमाणें खोकल्याची उमळ येते.पण त्यामुळें हा रोग पुन्हां उलटला असें मानण्याचें कारण नाहीं. रोगाची तीव्रता फारच असल्यास फुप्फुसांच्या रचनेंत कायमच्या विकृती होऊन त्यांच्पासून रोग ( उदाहरणार्थ फुप्फुसविस्तरण ) होऊन रोग्यास कास व श्वास होतो अगर दम्याची व्यथा जडते. ज्यामुळें प्रकृतींत अत्यंत दौर्बल्य येऊन कोणत्याहि रोगानें ती सहज विघडण्यासारखी होते असे जे कांहीं थोडे पण महत्त्वाचे रोग आहेत त्यांपैकीं हा एक आहे व अशा वेळीं कांहीं आनुवंशिक रोग कुटुंबांत असेल तर तो प्रगट होण्यास किंवा क्षयरोग आपलें बिऱ्हाड ठेवण्यास प्रारंभ करतो.

उ प चा र.—सौम्य रोग असल्यास रोग्यानें बिछान्यांत अगदीं निजूनच राहिलें पाहिजे असें नाहीं. रोग्यास चांगले उबदार कपडे घालावे. जेणेंकरून त्याची एकंदर प्रकृति सुधारेल असे उपाय करावे. त्याच्या खोलींत स्वच्छ व ताजी हवा भरपूर असावी.

साध्या खोकल्यापडशांत किंवा श्वासनलिकादाह झाला असतां जीं औषधें द्यावयाचीं तींच औषधें सौम्य प्रकारच्या या रोगावर द्यावीं; व शिवाय छातीच्या चामडीवर प्रतिप्रकोपन क्रिया सुरू व्हावी म्हणून छातीस चोळण्यासाठीं तेलें द्यावीं व त्याचा उपयोग हा रोग निखालस बरा होईपर्यंत करावा. हिंवाळ्यांत किंवा पावसाळ्यांत ज्या दिवशीं बाहेर फार गारठा नसेल तेव्हांच रोग्यास बाहेर हिंडूं द्यावें. खोकल्याच्या श्रमानें अंतर्गळ हा रोग होण्याचा संभव असतो. त्यास प्रतिबंधक उपाय म्हणून सर्वदा पोटाभोंवती एक जाड पट्टा बांधावा. रोगी जो कफ थुंकतो तो त्यास तस्तांत किंवा पिकदाणींतच थुंकण्यास सांगून त्यांत जंतुघ्न धावन ( रसकापूर १:४००० इत्यादि ) मिश्र करावें किंवा तो कफ जाळून टाकावा म्हणजे रोगाचा फैलाव कमी होतो. रोग कडक व भयंकर असला म्हणजे उमळीची तीव्रता कमी करून रोग्याचे हाल कमी करण्यासाठीं पुष्कळ औषधें निघालीं आहेत. पण त्यांतील मुख्य व चांगलीं औषधें अमोनियम व पोटॅशियम ब्रोमाइड, क्लोरल हैड्रेट, कोडिया हीं आहेत. पण तीं कशीं व किती द्यावयाचीं हें डाक्टरांनां विचारून किंवा त्यांच्याकडूनच घेणें प्रशस्त होय. कारण तीं योजून देतांना वैयक्तिक सर्व लक्षणें व दुष्परिणाम हे विचारांत घेऊन मग तीं द्यावीत. बेलाडोना हेंहि उपयुक्त औषध आहे. या सर्व औषधांमुळें रोगाची मुदत कांहींशी कमी होते. रोग बरा झाल्यावरहि उमळ कांहीं दिवस टिकते. अशा वेळीं रोग्यास हवापालट करण्यास पाठविलें असतां फार फायदा होतो.

**डाग्वेरे, एल्. जे. एम.**— एल. जे. एम्. डाग्वेरे हा एक फ्रेंच चितारी आणि पदार्थविज्ञानशास्त्रवेत्ता होऊन गेला. याचा जन्म १७८९ सालीं फ्रान्स देशांत झाला आणि तारीख १२ जुलै १८६१ रोजीं हा मृत्यु पावला. प्रथमतः हा चिताऱ्याचा धंदा करूं लागला परंतु पुढें हा फोटोग्राफीची कला शिकण्याच्या मागें लागला. जे. नैसफोर नैपिसे यानें १८१४ सालापासून प्रकाशाच्या सहाय्यानें चित्रें तयार करण्याचा प्रयत्न केला; सन १८२९ सालीं त्यानें डाग्वेरे याला यासंबंधानें माहिती करून दिली. यानंतर कांहीं कालपर्यंत या उभयतांनीं यासंबंधानें सहकार्य करून प्रयोग केले. हे प्रयोग सन १८२९ते सन १८३३ पर्यंत चालले होते. सन १८३३ मध्यें जे. नैसफोर नैपिसे याचा मृत्यु झाला; यानंतर एकट्या डाग्वेरे यानेंच पुढें प्रयोग चालू ठेविले. १८३९ सालीं अरागो यानें अक्याडेमी आफ् सायन्सेस नांवाच्या संस्थेंत डाग्वेरेच्या प्रकाशलेखनपद्धतीचें महत्त्व शास्त्रज्ञांच्या नजरेस आणलें. डाग्वेरे याला लिजन ऑफ ऑनर नांवाच्या एका संस्थेचा आधिकारी नेमून त्याचा सन्मान करण्यांत आला;व फ्रान्स देशाचा राज्यकरभार चालविणाऱ्या चेम्बर नांवाच्या दोन्ही सभांनीं तारीख २२ आगष्ट रोजीं पुढें दिल्याप्रमाणें एक ठराव पास केला. "नैपिसे याचे वारस आणि डाग्वेरे यांनीं प्रकाशलेखनाची कला अक्याडेमीला कळवावी व त्याबद्दल डाग्वेरे याला सालिना ६००० फ्रान्क आणि नैपिसे याच्या वारसास ४००० फ्रान्क याप्रमाणें सालीना मिळत जावे," याप्रमाणें हा ठराव होऊन नंतर २आगष्ट रोजीं फ्रेंच सरकारनें प्रकाशलेखनाची प्रसिद्धि केली व ती युक्ति लवकरच सर्वश्रुत झाली.

**डॉन नदी**—हिचा उगम रशियांतील इव्हान तलावापासून होतो त्याची उंची समुद्रसपाटीपासून ५८० फूट आहे. नदीची लांबी १३२५ मैल आहे. व्होलगापासून पुढें हिच्यांत बरींच जहाजें चालतात. हिच्या उपनद्यांतूनहि जहाजें चालतात. त्यांचीं नांवें– व्हेरोनेझ, खोपर, मेडवीसा. या नदीला दोन पूर येतात. एक ऊन पाण्याचा व एक थंड पाण्याचा. या नदींतील माशांवर रशियांतील कित्येक लोक आपली उपजीविका चालवितात.

**डान्टे** ( १२५६–१३२१ )—इटलींतील अत्यन्त प्रसिद्ध कवि. हा फ्लॉरेन्स येथें जन्मला. त्याचें घराणें फार प्राचीन होतें. परंतु त्याचा दर्जा फार उच्च नव्हता. त्याचा बाप एक वन्यांपैकीं वकील होता. डान्टे हा लहानपणीं फारच मेहनती विद्यार्थी होता व ब्रुनेटो लॅटिनी यांचें त्याच्यावर फार वजन होतें. व्हर्जिल, होरेस वगैरे कवींचे ग्रंथ वाचून त्यानें आपल्या वयाच्या १८ व्या वर्षापासूनच काव्यलेखनास प्रारंभ केला. तत्त्वज्ञान, ईश्वरविषयकज्ञान, ज्योतिष, गणित, भूमिति वगैरे शास्त्रांचा त्यानें अभ्यास केला. चित्रकलाहि त्याला अवगत होती. डान्टे जन्मला त्यावेळेस फ्लॉरेन्समध्यें यादवी सुरू होती व पुढें डान्टेनेंहि या युद्धांत भाग घेतला होता. यांतून मोकळा होऊन १२८९ त तो आपल्या अध्ययनाकडे व आवडत्या विषयाकडे पुन्हां वळला.

बिॲट्रिस पोर्टिनरी या बाईवरील प्रेम ही डान्टेच्या पूर्व वयांतील मुख्य गोष्ट होय. १२७४ मध्यें ही डान्टेच्या प्रथम अवलोकनांत आली व पुढेंहि तिला त्यानें एक दोनदांच पाहिली; आणि तिला तर डान्टेबद्दल बहुधा फार अल्प माहिती होती. तिचें लग्न सिमानेडी बार्डी नांवाच्या इसमाशीं झालें; व ती सन १२९० मध्यें मरण पावली. पण या सर्व काळांत व पुढेंहि डान्टेचें बिॲटिसवर विलक्षण प्रेम जडलें व त्याबद्दलचें सविस्तर वर्णन त्यानें आपल्या अनेक काव्यांत दिलें आहे. बिॲट्रिसच्या मरणानंतर १२९२ मध्यें डान्टेनें गेम्मा नांवाच्या स्त्रीशीं लग्न केलें व त्याला तिजपासून दोन मुलगे व दोन मुली झाल्या. १२९२ पासून डान्टेनें स्थानिक राजकारणांत भाग घेण्यास सुरवात केली. १३०० त म्हणजे ज्या वेळीं डान्टे हा प्रायरच्या जागीं होता त्यावेळीं फ्लारेन्समध्यें ' गोरे ' व ' काळे ' ( ब्लॅक ) असे दोन तट झाले. पोप ( धर्मगुरु ) व डान्टे यांनीं दोन्हीकडील प्रमुख लोकांस दूर दूर हद्दपार करून यादवीचा मोड केला. परंतु तिचा पुरा नाश झाला नाहीं.

१३०२ मध्यें पैसे खाल्याच्या आरोपावरून डान्टेला बराचसा दंड व हद्दपारी अशी शिक्षा फर्मावण्यांत आली. सीना, ॲरेझा व फोर्ली याठिकाणीं थोडथोडा काळ राहून १३०४ नंतर तो व्हेरोना येथें गेला पण तेथील आश्रयहि लवकरच सुटला.

पुढें तो इटलींतील अनेक ठिकाणीं रहात रहात शेवटीं रॅव्हेना येथें गेला. १३१५ च्या सुमारास हद्दपार केलेल्या लोकांस कांहीं अटींवर परत येण्याची परवानगी मिळाली. परंतु त्या अटी अपमानकारक असल्यानें डान्टेनें स्वदेशीं परत जाण्याचें नाकारलें. त्यानें आपल्या आयुष्याचीं शेवटचीं तीन वर्षें रॅव्हेना येथें घालविलीं. तो १४ सप्टेंबर १३२१ रोजीं मरण पावला.

ज्याच्यामुळें सर्व सुशिक्षित जगास डान्टे माहीत झाला व ज्याच्यामुळें जगांतील होमर, मिल्टन वगैरे अर्धा डझन सर्वोत्तम लेखकांत त्याची गणना झाली तो डान्टेचा ' डिव्हाइन कॉमेडी ' नामक ग्रंथ होय. त्या काळांत स्वतंत्र विचाराचे अनेक विद्वान लोक होऊन गेले. पण डान्टे हा सर्व विद्यांनीं विभूषित होता. केवळ करमणूक हा त्याच्या ग्रंथाचा हेतु नसून मानवी आयुष्यांतील कोणत्या सत्कृत्याबद्दल बक्षीस व कोणत्या दुष्कृत्याबद्दल शिक्षा मिळते हें दाखवून मानवानें चरित्र सुधारावें, या उद्देशानें डान्टेनें हें महाकाव्य लिहिलें. याचें संविधानक असें आहे—ईस्टरच्या अगोदरच्या गुरुवारीं अरण्यांत दिशाभूल झाली असतां, लांडगा, सिंह व चित्ता यांनीं कवीचा मार्ग रोखून धरिला—हें सर्व दृष्टांतात्मक आहे.—व्हर्जिलबरोबर त्याचा पाताळ ( हेल ) व पर्गेटरी येथील प्रवास समाप्त झाला. या प्रवासांत पृथ्वीवरील सर्व लोक त्याच्या दृष्टीस पडले. पाताळ म्हणजे शंक्वाकृति पोकळी असून ती पृथ्वीच्या मध्यापर्यंत पोंचलेली आहे असें वर्णन त्यानें केलेलें आहे. यामधून नंतर कवि स्वर्गांत जाऊन बिॲट्रिसशीं त्याची गांठ पडली आहे वगैरे वर्णन दिलें आहे.'व्हिटा नुओव्हा' ग्रंथांत त्यानें आपली बिॲट्रिसविषयक प्रेमकहाणी सांगितली आहे. ' डी मॉनर्किया ' या ग्रंथांत त्यानें राजकीय विचार नमूद केले आहेत. डान्टेच्या कीर्तीचीं अनेक दिव्यांतरें झालीं. मरणोत्तर कांहीं काळ इटलींतील युनिव्हर्सिट्यांत त्याचे ग्रंथ वाचले जात होते. पण ग्रीक व लॅटिन ग्रंथांच्या पुनरुज्जीवनाच्या ( रेनेसन्स ) काळांत तो मागें पडला आणि १७ व्या व १८ व्या शतकांत तर त्याचें नांव बहुतेक मुळींच ऐकूं येत नव्हतें. पण १९ व्या शतकांत त्याची कीर्ति पुन्हां प्रस्थापित होऊन युरोप व अमेरिकेमध्यें त्याच्या ग्रंथांचीं भाषांतरें व सटीक आवृत्त्या सर्वत्र निघाल्या.

**डान्यूब नदी**—हिचा उगम डोनेशिंजेनमधील ब्लॅकफॉरेस्टमध्यें होतो. समुद्रसपाटीपासून हिची उंची २१८७ फूट आहे. येथून पूर्वेस वहात जाऊन काळ्या समुद्रास ही मिळते. हिची लांबी १७६० मैल असून पूर्व पश्चिम वहाणारी हीच एक नदी युरोपांत आहे. उलम येथें इलर नदी हिला मिळते. तेथून पुढें तींत जहाजें चालतात. हिला सुमारें ३०० उपनद्या मिळाल्या आहेत. त्यांतील मुख्य म्हटल्या म्हणजे उजव्या बाजूनें इन, ड्रेव्ह व सेव्ह असून डाव्या बाजूनें टिसजा, ओल्ट, सेर्थ व प्रुथ या होत. युरोपच्या इतिहासांत या नदीला बरेंच अग्रस्थान आहे. पूर्वी या नदीच्या तीरावर रोमन राज्याची सीमा होती. अजूनहि तेथें कांहीं जुन्या रोमन इमारती

पडक्या स्थितींत आढळतात. यानंतर नेपोलियनच्या वन्याच लढाया हिच्या तीरावरच झाल्या. आतां ही नदी कोणच्याच देशाची सीमा नसून व्यापारासाठीं तिचा उपयोग होतो. पण व्यापारासाठीं तिचा चांगला उपयोग व्हावा म्हणून यूरोपांतील देशांनीं ह्या नदीची स्थिति सुधारण्याचें मनावर घेऊन त्याप्रीत्यर्थ कित्येक प्रयत्न केले १८५६ सालीं डान्यूब कमिशन नेमून नदींत व तिच्या मुखाकडे वन्याच सुधारणा करविण्यांत आल्या आहेत.

**डावी**—मध्यहिंदुस्थानांतील माळवा एजन्सींतील एक ठाकुरात.

**डामर**(डांवर)-हा २ प्रकारचा असतो; (१) निरनिराळ्या झाडांपासून होणारा, व ( २ ) कोळशापासून होणारा. यूरोपांत रशिया, फिनलंड व स्वीडन या देशांतील पाइन झाडांच्या अरण्यांत पहिल्या प्रकारचा डामर तयार होतो. युनायटेड-स्टेट्स् देशांतील कॅरोलिना, जॉर्जिया, वगैरे संस्थानांतहि पाइन झाडांपासून डामर करतात. या डामराचा रंग काळा किंवा पिंगट असतो. त्यांत थोडें असेटिक ॲसिड असतें. तो या ॲसिडमध्यें किंवा अल्कोहोलमध्यें विरघळतो हिंदुस्थानांत ज्या झाडापासून डामर होतो त्याला नांवें आहेत तीं– पिने व्हानिश, इंडियन कोपल अथवा मलबार टॅलो; देशी नांवें– कहरुवा, संद्रस, राळ, वेलै-कुन्त्रिकम्, पैनिपिशिन, कुंगिलियम्, पिनेमरम्, गुगलि, दुपामरम्, धुपद, पयनि इ.

हीं नेहमीं हिरवीं असणारीं झाडें कर्नाटकपासून त्रावणकोरपर्यंत, पश्चिमघाटाच्या पायथ्याशीं ( ४००० फुटांपर्यंत ) वाढतात. कधीं कधीं हीं झाडें रस्त्याच्या बाजूलाहि लावतात. अंबोयना बेट व मलाया द्वीपकल्प यांतहि डामर निघणारीं झाडें आहेत. याचा रस झाडांच्या फांद्यावर व बुंधावर आपोआप वाहून येऊन त्याचे घट्ट गोळे होतात. हा पदार्थ राळेसारखा दिसतो; व त्याला हिंदी भाषेंत राळ म्हणतात. याला संस्कृतांत यक्षधूप असें नांव आहे. ह्या राळेलाच सफेत डामर म्हणतात. हा मद्यार्कांत फारच थोडा विद्रुत होतो पण टर्पेंटाइनमध्यें व सुकणाऱ्या तेलांत चांगला विद्राव्य आहे. कोपलप्रमाणें याचाहि उपयोग रोगण देण्याकरितां होतो. कांहीं ठिकाणीं ह्या राळेंत खोबरेल मिसळून मेणबत्त्या तयार करतात.

कोळशापासून डामर होतो.पूर्वी याला 'गॅस–टार' म्हणत. कोल–गॅस तयार करतांना हा पैदा होत असे हल्लींहि या प्रकारें डामर बराच निघतो. पण कोळशापासून दुसऱ्या रीतीनेंहि डामर करतात. १८६० सालीं ' किंग्स्टन ' नांवाच्या एंजिनियरनें कोळशापासून डामर वगैरे करण्याची कृति पूर्णत्वास नेली. ' अशुद्ध नाफ्था, ' हलकें तेल, ' कॅर्बोलिक तेल, ' ' कृमिनाशक तेल ', ' रंगाल ( अंथ्रासीन ) तेल ' या डामराच्या पंचांगांपासून अग्निशोधन क्रियेनें ' बेन्झीन ', ' टूलीन ', ' झायलीन ' ' नाफ्थालीन ' अंथ्रासीन ','फेनौल','क्रेसौल' इत्यादि बहुमोल द्रव्यें निघूं लागलीं आणि याच द्रव्यांपासून पुढें क्रमाक्रमानें आणि योग्य रसक्रियेनें सर्व प्रकारचे, अत्यंत उपयोगी, सुंदर, कृत्रिम रंग, नाजुक कृत्रिम अत्तरें, खरी परिणामकारी कृत्रिम औषधें, खतें, कृत्रिम साखर, भयंकर ज्वालाग्राही उत्पातद्रव्यें,अग्निवारणद्रव्यें, वारिवारणद्रव्यें, मोटारीचें तेल ( स्पिरिट ), कृत्रिम रसायनद्रव्यें, किंबहुना कृत्रिम अन्नसत्त्वहि रोजच्या रोज खंडोगणती उत्पन्न होऊं लागलें. जो ' डामर ' लोकांनां, कारखानदारांनां, म्युनिसिपालिट्यांनां आणि सरकारला अगदीं नको नकोसा झाला होता, तोच दगडी कोळशाचा डामर आतां पृथ्वीवरील सर्व राष्ट्रांनां सोन्याची खाण होऊन बसला आहे. जर्मन रसायनशास्त्रज्ञांनीं आपल्या अतुल बुद्धिबलानें आणि प्रयोगकुशलतेनें या डामराचे काय वाटेल ते कृत्रिम पदार्थ तयार केले आहेत. हे कृत्रिम पदार्थ इतके गुणकारी, उपयोगी आणि बहुमोल झाले आहेत कीं, त्यांच्या अभावीं आतांच्या सुधारलेल्या जगांतील मनुष्याचें सुसंस्कृत जीवन एक दिवस देखील सुखानें चालणार नाहीं. इंग्लंड आपला डामर घाण म्हणून आणि थोडा पैसाहि येतो, म्हणून आतांपर्यंत जर्मनीला पाठवीत होतें; परंतु ही अकल्पित ' संपत्संभवता ' पाहून ' इंग्लंडचा उत्पन्न होईल तितका डामर इंग्लंमध्येंच राहिला आणि उपयोगिला पाहिजे' अशा प्रकारची न्याय्य मागणी इंग्लिश लोकांनीं आणि कारखानदारांनीं नुकतीच एकमतानें केली आहे.

सृष्टींमध्यें असणारे आणि नसणारेहि हजारों प्रकारचे सुंदर रंग डामरापासून तयार होतात. त्यांमध्यें हिंदुस्थानच्या दृष्टीनें विचार करतां, 'कृत्रिम नीळ ' आणि 'कृत्रिम मंजिष्ठ ' या दोनच रंगांचा उल्लेख केला असतां पुरे होणार आहे. ' कृत्रिम नीळ ' कॅर्बोलिक तेलापासून–नाफ्थालीनपासून, त्याप्रमाणेंच इतर अनेक पद्धतींनीं तयार करितात. ' कृत्रिम नीळ ' बनविण्याच्या एकंदर ३१६ निरनिराळ्या पद्धतींचें ' सर्वाधिकारत्व ' रसायनसंशोधकांनीं जर्मनींमध्यें घेतलेलें आहे. ' डामर ' किंवा डामरजन्य पदार्थ हें या सर्व पद्धतींचें मूळ आहे. ' कृत्रिम मंजिष्ठ ' रंगाल ( अंथ्रासीन ) तेलापासून तयार करितात. या दोन सुंदर, बहुमोल, नैसर्गिक रंगांचा केवढा मोठा व्यापार हिंदुस्थानांत चालत होता ? आणि त्या व्यापारावर किती लोक आपल्या पोटापाण्याला सुखासमाधानानें मिळवीत होते? थोड्याच वर्षांपूर्वी १५ लक्ष एकर जमीन व्यापणारी ' नीळ ' आतां जेमतेम ३ लक्ष एकर जमिनींत पिकविली जाते. नैसर्गिक मंजिष्ठ तर पार ठार झाला ! दुसरेहि अनेक बहुमोल रंग स्मरणांतूनहि नाहींसे झाले ! हिंदी रंगाचा व्यापार पार बुडाल्यानें लक्षावधि लोकांच्या नशिबीं दारिद्र्य आलें आहे.

डामरापासून उत्पन्न होणाऱ्या कृत्रिम अत्तरांमध्यें, गुलाब, जाई, कस्तुरी आणि विशेषतः ' कुमारीन् ', ' व्हानिलिन् ' आणि ' हेलिओट्रापीन् ' या फारच नाजुक, मोहक आणि किंमतवान् अत्तरांचा अवश्य उल्लेख केला पाहिजे. सृष्टींमध्यें उत्पन्न होणाऱ्या सर्व फुलांचीं अत्तरें आतां कृत्रिम रीतीनें

तयार करूं लागले आहेत. नैसर्गिक 'कुमारीन्' 'व्हानिलिन्' आणि नैसर्गिक 'हेलिओट्रापीन' या अत्तरांची किंमत दर शेरीं अनुक्रमें २७५, ७१०, आणि २१५० रुपये होती. हीं सारीं मधुर वासांचीं आणि अंतःकरणाला गुंगविणारी अत्तेरें आतां डामरजन्य 'बेंझिन' आणि 'कॅर्बालिक तेल' या द्रव्यांपासून तयार करतात. यांत मधुरता वहुतेक नैसर्गिक अत्तरांचीच; पण किंमत मात्र दरशेरीं अनुक्रमें १९, २३, आणि ८ रुपये पडते. कोठें २१५० रुपये आणि कोठें ८ रुपये!

डामरापासून ज्वरहारक, ग्लानिहारक, कफहारक, शुद्धिहारक आणि मृत्युंजय इत्यादि गुणांचीं सुमारें ५००० कृत्रिम औषधें सध्यां तयार करतात; हीं रोगहारक, आरोग्यसंवर्धक आणि प्रसंगविशेषीं मृत्यूलाहि जिंकणारीं औषधें 'बेंझीन' 'टूलीन,' 'क्षायलीन' इत्यादि द्रव्यांपासून विशिष्ट रासायनिक क्रियांनीं तयार करतात. गेल्या २५ वर्षांतील इन्फ्लुएंझाच्या साथींमध्यें वर दिलेल्या कृत्रिम औषधांपासून जर्मनीला बरीच प्राप्ति झाली या अकल्पित प्राप्तीमुळें जर्मन रसायनसंशोधकांचे, व्यापाऱ्यांचे आणि कारखानदारांचे प्रयोग, प्रयत्न आणि कारखाने दसपट अधिक धडाडीनें आणि शेंकडोंपट अधिक फायद्यानें चालू लागले. प्रयोग चालू असतांना रसायनशास्त्रज्ञांना आणि डॉक्टरांना "ॲड्रेनॅलीन" नांवाच्या औषधाचे फारच विलक्षण गुणधर्म दिसून येऊं लागले. 'ॲड्रेनॅलीन' अनेक प्रसंगीं मृत्यूवरहि जय मिळवूं लागलें. परंतु हें औषध फारच दुर्मिळ, केवळ राजे महाराजांनांच त्याचा उपयोग करतां येत असे. एक शेर 'ॲड्रेनॅलीन' तयार करण्यास ४०००० बैलांच्या मूत्रपिंडा( सुप्रऱ्या रीनल ग्ल्यांड्स ) चें सत्व लागत असे. या मृत्युंजय परंतु दुर्मिळ 'ॲड्रेनॅलीन' कडे, अर्थातच जर्मन रसायनशास्त्रज्ञांचें आणि कारखानदारांचें लक्ष गेलें. 'एफ् स्टोल्झ' नांवाच्या रसायनशास्त्रज्ञानें 'ॲड्रेनॅलीन' चें रासायनिक स्वरूप प्रथम निश्चित केलें, आणि नंतर लागलीच 'कॅटचोल' नांवाच्या फोटोग्राफीमध्यें फारच उपयोगी पडणाऱ्या व डामर द्रव्यांपासून तयार होणाऱ्या पदार्थापासून 'स्टोल्झ' यानें कृत्रिम 'ॲड्रेनॅलिन' तयार केलें. ४०००० बैलांच्या मूत्रपिंडांचें मोठया विकट प्रयोगांनीं मिळणारें किंवहुना अत्यंत दुर्मिळ असें सत्व कोणीकडे, आणि सर्वत्र विपुलतेनें मिळणारा विनखर्ची 'डामर' कोणीकडे! 'स्टोल्झ' च्या या लोकोत्तर लोकसेवेनें 'ॲड्रेनॅलीन' हें मृत्युंजय औषध आतां गरीबांनांहि सुलभ झालें आहे. बर्मिंगहॅमचा डॉ. बाकर यानें 'ॲड्रेनॅलीन' चें सत्व शरीरांत टोंचून एक ११ महिन्यांचें मूल आणि ३० वर्षांची तरुण बाई मृत्यूच्या दाढेंतून परत आणून, शास्त्रज्ञ आणि सामान्य जगांमध्यें विलक्षण खळवळ उडवून दिली. रक्ताभावामुळें मृत्यूच्या कराल दाढेंत सांपडलेल्या लोकांनां 'ॲड्रेनॅलीन' च्या मृत्युंजय गुणामुळें जगांमध्यें परत येऊन चांगल्या रीतानें जगण्याची पुनः आशा वाटूं लागली!

**डायमंड हारबर, पोट विभाग.**—बंगालमधील चोवीस परगणा जिल्ह्याच्या नैर्ऋत्येकडील एक पोटविभाग. क्षेत्रफळ १२८३ चौ. मै. पैकीं ९०७ चौरस मैल भाग सुंदरवनमध्यें जातो. १९०१ सालीं लोकसंख्या ४६०७६८. खेडीं १५७५; पैकीं डायमन्ड हारबर हें मुख्य खेडें आहे. या परगण्यांत मोठा एकहि गांव नाहीं.

खेडें.—बंगालमधील चोवीस परगणा जिल्ह्याच्या डायमन्ड हारबर पोटविभागाचें मुख्य ठिकाण. हें खेडें हुगळी नदीच्या डाव्या तीरावर आहे लोकसंख्या (१९०१) १०३६. सन १८६४ च्या चक्रवातांत पुष्कळ जीवांचें नुकसान झाली. डायमन्ड हारबर व कलकत्ता यांमधें रेलवे आहे. दक्षिणेस 'चिंग्रिखाली' नांवाचा किल्ला आहे.

**डायमंड बेट**—ब्रम्हदेशाच्या किनाऱ्यानें, बेसिन नदीच्या मुखाच्या दक्षिणेस, नेग्रेस बेटापासून बरोबर ८ मैलांवर हें बेट आहे. बेटावरील सर्व प्रदेश जंगलमय असून निर्जन आहे. त्याचा आकार हिऱ्यासारखा आहे म्हणून त्यास डायमन्ड बेट म्हणतात. हें बेट बिनतारी विद्युत् संदेश पाठविण्याचें एक स्थान आहे म्हणून त्यास बरेंच महत्त्व आलें आहे. येथून अंदमानशीं संबंध जोडला आहे.

**डायोजेनीस** ( इ. पू. ४१२–३२३ ).—हा ग्रीक तत्त्ववेत्ता सिनोप येथें जन्मला. त्याचा बाप सराफीचा धंदा करीत असे. डायोजेनीस ॲंटिस्थेनीचा शिष्य बनून वैराग्य–मार्गास शिरला व लवकरच त्यांत गुरूच्या सवाई तयार झाला. त्याच्याबद्दल बऱ्याच गोष्टी प्रसिद्ध आहेत. शीतोष्णसहिष्णु बनण्याकरतां तो एक पिपामध्यें राहात असे. पाण्याकरितां एक लांकडाचा तुंबा इतकीच कायती इस्टेट त्याच्या जवळ असे; पण एका शेतकऱ्याच्या मुलाला हाताच्या ओंजळीनें पाणी पितांना पाहताच त्या तुंब्याचीहि जरूर नाहीं असें ठरवून त्यानें तो तात्काळ फेकून दिला. एकदां प्रवासांत असतां त्याला चांचे लोकांनीं पकडून क्रीट बेटांतील एका गृहस्थाला विकत दिला. तेव्हां काय धंदा येतो, असा प्रश्न त्या गृहस्थानें विचारल्यावरून, लोकांनां हाताखालीं वागविण्याचा याशिवाय दुसरा कांहीं धंदा येत नाहीं असें त्यानें उत्तर दिलें, व ज्या माणसाला मालक पाहिजे असेल त्याला विकत देऊन टाकण्याबद्दल त्या गृहस्थास विनंति केली. परंतु त्या थोर गृहस्थानें डायोजिनीसची योग्यता तात्काळ ओळखून स्वतःच्या मुलांनां शिक्षक म्हणून त्याला कॉरिंथ येथें आपल्या घरीं आजन्म ठेवून घेतलें. तेथें असतां सार्वजनिक खेळांच्या सामन्यांच्या प्रसंगीं तो व्याख्यानें देत असे. अशाच सामन्याच्या एका प्रसंगीं खुद्द अलेक्झांडर बादशहा तेथें हजर असतां त्याची सावली डायोजेनीसवर पडली होती, तेव्हां आपण दूर व्हा मला आनंदानें सूर्याचें ऊन खाऊं द्या अशी एकच लहानशी विनंति त्यानें बादशहास

केला. तेव्हां ती असामान्य निर्लोभता पाहून अलेक्झांडर बादशहाच्या तोंडांतून सानंदाश्चर्यानें पुढील उद्गार निघाले. "मी जर अलेक्झांडर नसतो, तर मी आनंदानें डायोजेनीस झालों असतो." त्याच्या मरणानंतर स्मारक म्हणून कॉरिंथियन लोकांनीं एक स्तंभ उभारून त्यावर एक दगडाचा कुत्रा बसविला आहे.

डायोजेनिस सिनिक पंथाचा होता. या पंथाच्या लोकांची राहणी कुत्र्याप्रमाणें निसर्गप्रवर्तित पशुवृत्तीची, तुसडेपणाची व अत्यल्प गरजांची असे, व हें डायोजिनीसच्या चरित्रांत स्पष्ट दिसतेंच आहे मनुष्यांतील अत्युच्च सद्गुण म्हणजे आत्यंतिक शारीरिक सुखनिरपेक्षता हा होय. समाजांतील कृत्रिम सुखांची वाढ ही मनुष्यांतील सत्यप्रीति व चांगुलपणा यांना विघातक असून खरी नीतिनिष्ठा म्हणजे नैसर्गिक साधेपणा अशीं या पंथाचीं तत्वें होतीं. खुद्द डायोजेनीसची वागणूक या तत्त्वांबरहुकूम होती, पण त्याच्या कांहीं अनुयायांच्या नीतिभ्रष्ट आचरणामुळें त्याच्या लौकिकास कांहींसा कमीपणा आलेला आहे.

**डार्टमाउथ**-इंग्लंडमधील डेव्हॉनशायरच्या टॉरक्वे प्रतिनिधिविभागांत डार्टमाउथ बंदर, हें बाजारचें शहर असून म्युनिसिपालिटीचा एक विभाग आहे.प्लायमाउथच्या पूर्वेस २७ मैलांवर हें आहे. १९०१ सालीं येथील लोकसंख्या ६५७९ होती. पश्चिम तीरावर डार्ट नदीच्या मुखाजवळ हें आहे.येथून किंगस्वेअरपर्यंत आगबोटीचें दळणवळण होतें. सेंट सेव्हिअर प्रार्थनामंदिर व डार्टमाऊथ किल्ला येथें आहे. बाष्प एंजिनाचा शोधक थॉमस निकोमन ह्याच्या झोपडीचे भाग अजून राखून ठेवले आहेत. याटबोटींचे, जहाजें बांधण्याचे, दारूचे व शिल्पकलेचे वगैरे कारखाने येथें आहेत.कोळसा हा येथील आयात माल आहे. ४ मेअर, सनदी शहरचे अधिकारी व १२ सभासद हे कारभार पाहतात. शहराचें क्षेत्रफळ १९२४ एकर आहे. १३०२ सालीं इंग्लंडच्या राजानें स्कॉटलंडवर स्वारी करण्याकरितां दोन आरमारी जहाजें घेतलीं. १३३७ सालीं येथील लोकांची डोईपट्टी माफ झाली. १३४२ सालीं हें शहर संघटित झालें. १४०४ सालीं फ्रेंचांनीं डार्टमाउथवर हल्ला केला पण त्याचा पुरा मोड झाला. १४ व्या आणि १५ व्या शतकांत बोर्डो व ब्रिटनीशीं याचा व्यापार होता.

**डार्डनेल्स, सामुद्रधुनी.**—डार्डनेल्स सामुद्रधुनी (तुर्की-बहर-सफेद बोघसी) मार्मोराचा समुद्र व ईजियनसमुद्र यांना जोडते. हिचें प्राचीन नांव हेलेस्पांट असें होतें. अगदीं अरुंद भागाचें रक्षण करणाऱ्या दोन किल्ल्यांवरून हिला डार्डनेल्स म्हणतात व सुला व मिथ्रडेटस यांच्या तहाबद्दल (ख्रिस्तपूर्व ८४) प्रसिद्ध असलेलें ट्रोडमधील डार्डनेस्सचें नांव या सामुद्रधुनीला आहे. हिचा वायव्य किनारा म्हणजे गॅलिपोलीचें द्वीपकल्प असून आशियामायनरचा भाग म्हणजे आग्नेय किनारा आहे. या सामुद्रधुनीची लांबी ४७ मैल असून रुंदी सरासरी ३-४ मैल आहे. ईजियन बेटाकडे यूरोप व आशिया खंडांत अनुक्रमें सेदिल बहर व कुमकले नांवाचे किल्ले आहेत. मार्मोराच्या बाजूला अनुक्रमें उत्तर व दक्षिण बेटावर गॅलिपोली व लॅमसई अथवा लॅपसकी हीं दोन गांवें आहेत. डार्डनेलेसचे दोन चांगले किल्ले म्हणजे चनक-कलेहसी व सुलतानिए कलेहसी अथवा टालमियालियाचा जुना किल्ला आणि किलिर बहर अथवा रुमेलियाचा जुना किल्ला. डार्डनेल्स ऐतिहासिक दृष्ट्या फार प्रसिद्ध असून क्सर्क्सीझ व शिकंदर यांनीं होड्यांचा पूल करून ही सामुद्रधुनी ओलांडली होती. व्यूहरचनाशास्त्राच्या दृष्टीनें सुद्धां डार्डनेल्सचें महत्त्व असून भूमध्यसमुद्रांतून कॉन्स्टांटिनोपलकडे येणाऱ्या मार्गाचें हें नाक आहे.या मार्गाचें रक्षण करण्यास फार त्रास पडत नाहीं इतकें असून सुद्धां इंग्लिश ॲडमिरल डकवर्थ हा सर्व किल्ल्यावरून मार्मोराच्या समुद्रांत शिरला. स. १८४१ जुलैचा तह व स. १८५६ चा पॅरिसचा तह यांच्या अन्वयें तुर्की सरकारच्या हुकुमाशिवाय कोणत्याहि लढाऊ जहाजांस आंत शिरतां येत नसे. परंतु गेल्या महायुद्धानंतर ही सामुद्रधुनी सर्वांस खुली ठेवण्यांत आली आहे.

शहर.—डार्डनेल्स (तुर्की-सुलतानिए कलेहसी अथवा चनक कलेहसी) हें आशियामायनरमधील बिघा नांवाच्या लहान तुर्की प्रांताचें मुख्य शहर आहे. हें होडियस नदीच्या मुखाशीं असून डार्डनेलेस सामुद्रधुनीच्या सर्वांत अरुंद भागावर आहे. ह्या ठिकाणीं सामुद्रधुनीची रुंदी ३ मैल आहे. अलीकडे हें शहर फार भरभराटीस चढलें. लष्करी लोक खेरीजकरून येथील लोकसंख्या १३००० आहे, तींत निम्मे तुर्क आहेत. येथील गव्हर्नर व सामुद्रधुनीच्या दोन्ही कांठावर असलेल्या किल्ल्यांचे किल्लेदार येथें राहतात. तुर्की आरमार नागारा (प्राचीन अबिडॉस) येथें आहे. दरवर्षी सुमारें १२००० व्यापारी गलबतें या सामुद्रधुनींतून जातात. तयार माल, साखर, पीठ, कॉफी, तांदूळ, कातडीं व लोखंड यांची आयात होते व निर्गत मालांत व्हॅलोनिया ओक, गहूं, जव, वीन (कडधान्य), इमारती लांकूड, मद्य व मातीचीं भांडीं हा मुख्य माल आहे.

**डार्विन, चार्लस रॉबर्ट** (१८०९—१८८२)—हा प्रसिद्ध आंग्लसृष्टपदार्थवेत्ता, श्रूसबरी येथें १२ फेब्रुवारी १८०९ रोजीं जन्मला. डॉ. सॅम्युअल बटलर यांच्या हाताखालीं डार्विनचें प्राथमिक शिक्षण श्रूस्बरी या ठिकाणीं झालें.स.१८२५ मध्यें त्यास वैद्यकीय शिक्षणार्थ एडिंबरो येथें पाठविण्यांत आलें; परंतु हें शिक्षण त्याच्या अभिरुचीस न पटणारें असल्यामुळें, डार्विननें तें सोडून दिलें. पुढें त्यास केंब्रिज येथें शिक्षणार्थ पाठविण्यांत आलें. १८३१ सालीं डार्विन पदवीधर झाला. कॉलेजांत असतांना डार्विन निबंध लिहून ते विद्वान लोकांस दाखवीत असे. बाप व चुलता यांच्या संम्मतीनें डार्विननें मोठी पृथ्वीप्रदक्षणा केली. ॲटलांटिक महासागरांतील बेटें, दक्षिण अमेरिकेचे किनारे, न्यूझीलंड, टॅस्मॉनिया,

ऑस्ट्रेलिया, ब्राझिल, सेंटहेलिना इत्यादि अनेक स्थळीं त्यानें प्रवास केला व या देशांच्या भूस्तरांबद्दल परत आल्यावर त्यानें अनेक ग्रंथ लिहून प्रसिद्ध केले. या प्रवासांत त्यानें रोजनिशी ठेविली होती, तींत सूक्ष्म अवलोकनानें सुचलेल्या नव्या गोष्टी त्यानें नमूद केल्या आहेत. १८३१ ते १८३६पर्यंत सर्वकाळ डार्विननें प्रवासांत घालविला व उपरिनिर्दिष्ट प्रवास ह्याच डार्विनच्या शास्त्रीय शोधांचा पाया होय. १८३९ सालीं डार्विनचें एमा वेजवुडशीं लग्न झालें. डार्विनवर नितांत भक्ति असल्याबद्दल या बाईची फार प्रसिद्धि आहे.

१८३८ सालीं डार्विननें 'मालथस ऑन पॉप्युलेशन' नामक पुस्तकाचें अध्ययन केलें. नैसर्गिक निवडानिवड कशी होते याबद्दल त्याचें असें मत आहे कीं, जीवनार्थ कलहांत योग्य असतील तेच टिकून राहतात व अयोग्य प्राणी मात्र नष्ट होतात. यावरून नव्या उपजातीची घटना होत असावी असें डार्विनला सुचलें. शास्त्रीय शोधाची चर्चा करण्याच्या कामीं वॅलेस, लाएल, हूकर प्रभृति शास्त्रज्ञांचा डार्विन यास फार उपयोग झाला. भौगोलिक इतिहास, पिंडवृद्धिशास्त्र, गुरुत्वाकर्षण, इत्यादि विषयासंबंधीं विचार करीत असतांना त्याला सर्वत्र सामान्य अशा असणाऱ्या ज्या गोष्टी आढळल्या त्यांवरून विकासतत्त्वाबद्दल त्याची निष्ठा दृढ होऊं लागली प्राणिजातींत फेरबदल होत असतात याबद्दल त्यास शंका नव्हती. पोटजातीच्या उत्पत्तीबद्दल त्याचें असें मत आहे कीं प्रथम दिसावयास सहजोत्पन्न असे फरक उत्पन्न होतात व नंतर त्या विशिष्ट स्वरूपाच्या प्राण्यापासून स्वतंत्र उत्पत्ति करवीत गेल्यास त्या विशिष्ट प्रकारची पोटजात कायमची बनते. १८५९ सालीं डार्विनचा मोठा ग्रंथ प्रसिद्ध झाला. "नैसर्गिक निवडीच्या साहाय्यानें होणारी जीवजातींची उत्पत्ति" उर्फ "जीवनकलहामध्यें अनुगृहीत जातींचें होत असलेलें संरक्षण" असें या ग्रंथाचें नांव होतें. या ग्रंथानें बौद्धिक जगांत मोठीच खळबळ उडवून दिली. उपर्युक्त 'ऑरिजिन ऑफ स्पेसीज' हा ग्रंथ १८५९ सालीं प्रसिद्ध झाल्यानंतर डार्विनचा "डीसेंट ऑफ मॅन अँड सिलेक्शन इन रिलेशन टू सेक्स" नामक दुसरा ग्रंथ स १८७१ मध्यें प्रसिद्ध झाला; आणि १८७६ मध्यें "व्होलकॅनिक आयलंडस् अँड साउथ अमेरिका" हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. डार्विनचे वनस्पतिशास्त्रावरहि अनेक ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत.

सर्व जन्मभर शास्त्रीय शोध लावण्याच्या कामीं अत्यंत परिश्रम घेणारा हा प्रसिद्ध शास्त्रज्ञ १९ एप्रिल १८८२ सालीं ख्रिस्तवासी झाला व त्याचें शव वेस्टमिनिस्टर ॲबेमध्यें पुरण्यांत आलें. डार्विनची शरीरप्रकृति चांगली नव्हती तरी त्यानें जिवापाड मेहनत घेण्यांत मुळींच कसूर केली नाहीं. डार्विननें आपल्या सिद्धांतामुळें जगांत मोठीच खळबळ उडवून दिली यांत शंका नाहीं. त्याचा गोड स्वभाव, साधी रहाणी, उद्योगाची चिकाटी, बुद्धिमत्ता इत्यादि गुणांसंबंधीं फ्रॅन्सिस डार्विनकृत "लाइफ अँड लेटर्स" या पुस्तकांत बरीच माहिती दिलेली आहे. डार्विनच्या विकासवादावर अलीकडे बरेच आक्षेप घेण्यांत आलेले आहेत. [प्रस्तावनाखंड, विभाग ५ वा, पानें ६१५ ते ६२२, या ठिकाणीं दिलेली डार्विनच्या सिद्धांताची विस्तृत माहिती पहा].

**डॉलफिनचें नोज**—मद्रास इलाख्यांतील विजगापट्टम् जिल्ह्यांत व तहशिलींत असलेल्या विजगापट्टम् बंदराच्या दक्षिण भूशिरास हें नांव आहे. याची समुद्रसपाटीपासून उंची १५०० फूट आहे.

**डाल्टन, जॉन**—(१७६६—१८४४)—हा इंग्रज पदार्थविज्ञान आणि रसायनशास्त्रज्ञ कंबरलंडमध्यें ईगल्स फील्ड येथें तारीख ६ सप्टेंबर १७६६ रोजीं जन्मला. याचा बाप जोसेफ डाल्टन हा गरीब कोष्टी होता. याच्या आईचें नांव डेबोरा ग्रीनप असें होतें. याला जोनाथन व मेरी या नांवांचीं दोन भावंडें होतीं. जॉन याचें प्राथमिक शिक्षण त्याच्या बापाजवळ व जॉन फ्लेचर नांवाच्या तेथील शाळा मास्तराजवळ झालें १७७८सालीं फ्लेचरनें नोकरी सोडल्यानंतर डाल्टन यानें तेथेंच शाळा काढली. या प्रयत्नांत त्यास यश आलें नाहीं म्हणून दोन वर्षांनंतर तो शेती करूं लागला तो राबिन्सन नांवाच्या आपल्या नातेवाईकाजवळ गणित शिकला होता. तेथून तो १७८१ सालीं केंडाल येथें एका शाळेंत पुन्हां नोकरी करण्यास गेला. १७८५ सालीं तो व त्याचा भाऊ जोनाथन तेथील शाळेचे व्यवस्थापक झाले डाल्टनला कायदा व आयुर्वेद शिकण्याची इच्छा झाली परंतु त्याला कोणी पाठिंबा देईना पुढें १७९३सालीं तो मँचेस्टर येथें गेला व तेथें मरेपर्यंत राहिला. जानगौफ नांवाच्या एका आंधळ्या तत्त्ववेत्याजवळ तो शास्त्र शिकला व पुढें गणित व पदार्थविज्ञानशास्त्रांचा तेथील अध्यापक झाला. स. १७९३त त्यानें "विद्युत् उल्कादींचें निरीक्षण व इतर निबंध" नांवाचें पुस्तक लिहिलें. या पुस्तकाची फारशी चहा झाली नाहीं. १८०१ सालीं इंग्रजी व्याकरणाचीं मूलतत्त्वें नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलें. १७९४ सालीं मँचेस्टर येथील साहित्य व तात्त्विक संस्थेचा तो सभासद निवडला गेला व त्यानें "रंगाविषयीं विलक्षण माहिती" नांवाचा लेख लिहिला. यांत डाल्टोनिझम किंवा रंगांधत्व याचा उहापोह केलेला होता. निळा व जांभळा यांखेरीज तिसरा रंग पिवळा हा होय व हिरवा, नारिंगी वगैरे पिवळ्याचेच प्रकार आहेत असें त्यांत सुचविलें होतें. याशिवाय पाऊस, दंव, झऱ्यांचा उगम, उष्णता, आकाशाचा रंग, वाफ, प्रकाशपरावर्तन व वर्क्रीभवन, सहाय्यक क्रियापदें व धातुसाधित अव्ययें इत्यादि विषयांवर त्यानें लेख लिहिले. सन. १८०० त तो त्या संस्थेचा चिटणीस झाल्यावर त्यानें मिश्रवायूची घटना, निर्वात प्रदेशांत व हवेंत पाण्याच्या व इतर द्रव्यांच्या वाफेचा जोर; बाष्पीभवन व उष्णतेनें वायूचें प्रसरण इत्यादि लेख लिहिले. या वेळेसच त्यानें वायूप्रसरणाचा नियम ठरविला व पुढें तो नियम गेलुसाक यानें प्रसिद्धीस आणला. पुढें एक दोन वर्षांत पाणी व इतर द्रव यांजकडून

वायूचें शोषण व आंशिक भाराचा नियम यांवर लेख लिहिले.

याचे विशेष महत्त्वाचे शोध 'अणुवाद' या विषयावर होत. वातावरण व इतर वायू यांच्या भौतिक गुणधर्मांवरूनच त्याला ही कल्पना सुचली असें त्याच्या हस्तलिखित लेखावरून दिसतें. वायूंचें शोषण या लेखांत तो म्हणतोः "पाणी सर्व वायूंस सारखेंच कां शोषून घेत नाहीं ? मला वाटतें कीं वायूंच्या परमाणूंच्या वजनावर व संख्येवर ही गोष्ट अवलंबून असावी" यानंतर त्यानें अणुभारांकांचें कोष्टक दिलें आहे. डाल्टन यानें आपली " अणुकल्पना " डॉ. थामसन यास कळविली व त्यानें ती आपल्या "रसायनशास्त्रपद्धति" नांवाच्या पुस्तकांत १८०७ सालीं प्रसिद्ध केली. डाल्टन यानें याविषयीं आणखी माहिती " रसायनशास्त्रीयतत्त्वज्ञानाची नवी पद्धत " या पुस्तकांत १८०८ सालीं प्रसिद्ध केली.

मँचेस्टरच्या संस्थेचा स. १८१७ पासून अंतकालपर्यंत म्हणजे स. १८४४ पर्यंत तो अध्यक्ष होता. तेथें त्यानें एकंदर ११६ निबंध लिहिले. १८१४सालांतलि एका निबंधांत आकारमानपृथक्करणासंबंधीं उल्लेख आहे. १८४० सालीं त्यानें स्फुरितें व तालितें यांवर निबंध लिहिला परंतु तो राजसंस्थेनें प्रसिद्ध करण्याचें नाकारलें. म्हणून तो लेख त्यानें स्वतःच प्रसिद्ध केला. असेच त्यानें आणखी ४ लेख प्रसिद्ध केले. एक क्षारांत अम्ल, अनाम्ल व क्षार यांचें प्रमाण " व दुसरा " शर्करापृथक्करणाची नवी व सोपी रीत" हे दोन होते. या दोन लेखांत त्याचा महत्त्वाचा शोध होता तो हा कीं जेव्हां कांहीं क्षार पाण्यांत विरघळतात तेव्हां पाण्याचें आकारमान वाढत नाहीं. यावरून क्षाराचे परमाणू पाण्याच्या अणूंमधील छिद्रांत शिरत असले पाहिजेत.

प्रयोग करण्याकरितां याला सुबक व बिनचुक यंत्रें लागत नसत. त्याचें काम चालचलाऊ यंत्रावर भागत असे. प्रयोगापेक्षां त्याची आपल्या अकलेवरच फार भिस्त असे. दुसऱ्याच्या प्रयोगांवर व प्रयोगनिर्णयावर त्याचा फारसा विश्वास नसे. गेलुसाकच्या "वायूंचें आकारमानाच्या प्रमाणांत मिळणें" या निर्णयावर त्याचा भरंवसा नव्हता. डेव्हीनें हरवायूच्या गुणधर्मांविषयीं पुरी चिकित्सा केल्यानंतर देखील याच्या त्या वायूविषयीं कांहीं विचित्र कल्पना होत्या. इतर रसायनशास्त्रज्ञांनीं अणुभारांकांचीं कोष्टकें तपासून नवीं तयार केल्यानंतरहि हा आपलेंच कोष्टक वापरीत असे. बर्झेलियसची रासायनिक पदार्थांची नामावली सोपी व सोईस्कर ठरलेली असूनहि हा आपलीच चक्राकार चिन्हांची नामावली वापरीत असे. त्याचें पुस्तकालय खांकोटीस मारण्याइतकें लहान होतें. परंतु त्यांतलीं अर्धीं पुस्तकेंहि त्यानें वाचलेलीं नव्हतीं. तो मँचेस्टर येथें १८४४ सालीं अर्धांगवायूनें मेला. १८३३सालीं लोकांनीं वर्गणी गोळा करून ठेवली होती तींतून त्याचा अर्धा पुतळा करवून मँचेस्टर येथील राजसंस्थेच्या समोरच्या दिवाणखान्यांत उभा केला.

**डास**—हा एक अत्यंत त्रासदायक प्राणी असून क्यूलिसिडा नामक वर्गांत त्याची गणना होते. वेस्ट इन्डीज, अमेरिका, दक्षिणआफ्रिका व हिंदुस्थान या ठिकाणीं या प्राण्याची उत्पत्ति होते. डासाचा आकार लहान असून कातड्यास छिद्र पाडून रक्त शोषून घेण्याकरितां त्यास पांच अणकुचीदार लहान अवयव असतात. डास हे दिवसा सहसा आढळत नाहींत, परंतु रात्रीं मात्र ते अत्यंत त्रासदायक होतात. डास अथवा मच्छर हा प्राणी साध्या माशीसारखा दिसतो. सूक्ष्म व्रण करून रक्त शोषण्याच्या कामीं या कीटकांतील मादी प्रसिद्ध असते. डबक्याजवळ किंवा कोणत्याहि पाणथळ्यावर डासांची फार उत्पत्ति होते. ॲनोफेलिस जातीचा डास मलेरियाचे जंतु, मनुष्यास चावून व अन्य साधनांनीं प्रसृत करीत असतो. जगांत डास हे साधारणतः सर्व ठिकाणीं असतात, परंतु उन्हाळ्यांत ते विशेषतः बाधक होतात व त्यांच्या विषारी दंशामुळें मनुष्यास फार पीडा होते. डासांचा रंग फारसा उठावदार नसतो तरी पण वरील ॲनोफेलिस जातीच्या डासांच्या पंखावर ठिपके असतात. क्यूलिसिडा जातीपेक्षां ठिपके असणें हा या डासांचा एक विशेष असतो. ॲनोफेलिस जातीचे सर्वच डास विषारी नसतात. मलेरिया ताप व पिवळा ताप वगैरे रोग विषारी डास प्रसृत करतात एवढेंच नव्हे तर आणखी कित्येक रोगास डास हे कारणीभूत आहेत असा तज्ज्ञांचा तर्क आहे. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस रॉसनें हिंदुस्थानांत आणि ग्रॅसी प्रभृतींनीं इटलीमध्यें अनेक प्रयोग व संशोधनाचें कार्य केलें. डास हेंच मलेरिया तापाचें मूळ होय असा शोध लावून वरील गृहस्थांनीं या भयंकर प्राण्याकडे जगाचें लक्ष वेधलें. त्याचा परिणाम असा झाला आहे कीं, जगांत चोहोंकडे नामांकित वैद्य व प्राणिशास्त्रवेत्ते, डासासंबंधीं प्रयोग, विचार व संशोधन करीत आहेत. डासांच्या सुमारें १०० जाती व ७०० उपजाती आतां आढळून आल्या असून रोगप्रसार करणाऱ्या या प्राण्याबद्दल कोणते उपाय योजावे याबद्दल सर्वच तज्ज्ञांमध्यें विचार सुरू आहे.

**डाहाणु**, ता लु का.—मुंबई इलाख्यांतील ठाणें जिल्ह्याचा एक अगदीं उत्तरेकडचा तालुका. याचें क्षेत्रफळ ६४४ चौ मै. असून यांतच उम्बरगांव पेट्याचा समावेश होतो. लोकसंख्या ( १९०१ ) १२९८१५. एकंदर खेडीं २१२ असून पैकीं डहाणु हें मुख्य खेडें आहे. सारावसुली व इतर करवसुली १९०३–०४ सालीं जवळ जवळ दोन लाख होती सर्व तालुकाभर कमजास्त उंचीचे दाट जंगल असलेले डोंगर आहेत व त्यांमुळें तालुक्यास विशेष रमणीय स्वरूप आलेलें आहे. समुद्रकिनाऱ्याच्या बाजूनें जमीन सपाट आहे. तालुक्यांतील हवा रोगकारक असून समुद्रकिनाऱ्याची हवा सुखकारक आहे. पण पावसाळ्यानंतर मलेरियाजनक आहे.

गां व.—मुंबई इलाख्यांतील ठाणें जिल्ह्याच्या डाहाणु तालुक्याचें मुख्य गांव. मुंबईहून ७८ मैल व मुंबई–बडोदा

आणि मध्यहिंदुस्थान रेल्वेवरील डाहाणु रोड स्टेशनापासून दोन मैल आहे. लोकसंख्या ( १९०१ ) ४५७३. नाशिकच्या खोदलेल्या लेण्यांत 'दाहानुका' हें नांव आहे. हें गांव पोर्तुगीज लोकांनीं आपल्या ताब्यांत घेतलें होतें. येथें असलेल्या 'नोसा सेन्होरा डीस ऑगस्टस' मूर्तीबद्दल ह्या गांवाची ख्याति आहे. डाहाणु नदीच्या उत्तर तीरावर एक लहानसा किल्ला आहे ह्या बंदरांतून बराच लांकूडफांटा बाहेर जातो. येथें एक सबजज्जचें कोर्ट असून दोन शाळा आहेत.

**डाळिंब**—डाळिंबाची लागवड फार प्राचीन काळापासून होत आहे. होमरच्या ओडीसी ग्रंथांत याचा उल्लेख आहे. ग्रीक व रोमन लोकांनां डाळिंबाच्या सालीचा वगैरे उपयोग माहीत होता. याच्याहि पूर्वी असीरियन व ईजिप्शियन लोकांच्या कोरीव कामावर डाळिंबाचीं चित्रें अद्याप दृष्टीस पडतात. फ्रान्समधील वरगंडी प्रांतांत प्लिओसीन काळांतील अश्मीभूत अशीं डाळिंबाचीं फळें सांपडलीं आहेत असें म्हणतात. डाळिंबाचा उल्लेख शुक्रनीतींत आहे. हें फळ इतकें प्राचीन असल्यामुळें याचें मूलस्थान कोणतें हें खात्रीनें सांगतां येत नाहीं. तरी तें इराण किंवा अफगाणिस्तानांत असावें अशी सामान्य समजूत आहे. अफगाणिस्तानांत कंदाहार येथें उत्तम डाळिंबें होतात बलुचिस्तानांतील डाळिंबें फार प्रसिद्ध आहेत. वायव्येकडील प्रांतांतील पेशावर येथून वर्षास ३७ हजार मणापेक्षां अधिक डाळिंबें इतर प्रांतांत रवाना होतात; व तीं विशेषतः कलकत्ता व रंगून या बाजूला जातात. जलालाबाद व लखनौ येथील डाळिंबें फार नामांकित आहेत; काश्मीर, राजपुताना व ब्रह्मदेश या प्रांतांतहि डाळिंबाची थोडीबहूत लागवड आहे. अमेरिकेंत फ्लारिडा, जार्जिआ वगैरे दक्षिणेकडील संस्थानांत हल्लीं डाळिंबाची लागवड वाढत्या प्रमाणावर होऊं लागली आहे.

मुंबई इलाख्यांत सिंध प्रांतांत हैद्राबाद, खैरपूर, सक्कर, व कराची या सर्व ठिकाणीं डाळिंबाची लागवड बरीच होते. गुजराथेंत काठेवाड, अहमदाबाद, धोलका; महाराष्ट्रांत पुणें, नगर, सातारा या जिल्ह्यांत डाळिंबाची लागवड बरीच होते.

डाळिंबाला हवामान फार उष्ण, खरखरीत व कोरडें लागतें. सर्द हवेच्या प्रांतांत किंवा फार पाऊस पडतो त्या ठिकाणीं डाळिंबाला फळ चांगलें येत नाहीं. झाडें मात्र चांगलीं होतात. डाळिंबाला जमीन फार हलक्या दर्जाची चालते. जी जमीन शेतकीच्या कामाला मुळींच उपयोगी पडणार नाहीं ती किंवा तशाच प्रकारची जमीन बहुधां डाळिंबाला घेतात. जमीन भारीपैकीं असली तर फळ वर्षास येत नाहीं. जमिनीमध्यें चुन्याचें प्रमाण बरेंच असावें, निचरा चांगला असावा. मऊ व मुरबाड जमिनींत डाळिंबें चांगलीं येतात. अशा जमिनीवर माती अगदींच थोडी म्हणजे एक दोन इंच असली किंवा नसली तरी हरकत नाहीं. एकंदरींत डाळिंब हा गरीब शेतकऱ्यांचा उत्तम मित्र आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण ज्या जमिनीवर कोणतेंच पीक येणार नाहीं किंवा नुसतें गवतहि चांगलें येणार नाहीं अशा ठिकाणीं डाळिंबाची लागवड करतात. फक्त चार महिने पाणी देण्यापुरती विहिरीची किंवा पाटाची सोय असली म्हणजे झालें. दुष्काळाच्या वर्षी पाऊस पडला नाहीं किंवा विहिरीचें पाणी आटून बहुतेक वर्षभर झाडांनां पाणी मिळालें नाहीं तरी इतर झाडांप्रमाणें डाळिंबाचीं झाडें सहसा मरून जात नाहींत, फक्त त्यावर्षी उत्पन्न मात्र कांहींच येत नाहीं. जमीन फार हलक्या दर्जाची असल्यामुळें नांगरणी फारशी लागत नाही व ती करतांहि येत नाहीं. त्याचप्रमाणें डाळिंबाच्या जमिनी बऱ्याच ठिकाणीं डोंगराच्या कडेला असल्यामुळें त्यास पाट नसतात, तरीपण माती धुपून जाईल या भीतीनें मोठमोठ्या ताली घालाव्या लागत नाहींत. वरची माती वेताची असल्यामुळें ती वाहून न जाईल इतक्या वेताच्या लहान लहान ताली घातल्या म्हणजे पुरे.

डाळिंबाच्या तीन जाती आहेत; तांबडी, पांढरी व काळी. तांबडी अगर लाल जात पुणें, नगर, सातारा वगैरे प्रांतांत होते. पांढरी जात अहमदाबाद, धोलका वगैरे ठिकाणीं होते. काळी जात उत्तर हिंदुस्थानांत होते. तांबड्या जातीचा दाणा तयार होण्यापूर्वी पांढरा असतो. महाराष्ट्रांतील लोकांस पांढरी जात फारशी आवडत नाहीं. काबूल व मस्कत येथील उत्तम डाळिंबें आणून त्यांचीं झाडें इकडे लावलीं परंतु तीं इकडील झाडांच्या मानानें फार लहान राहून त्यांनां फळ मुळींच येत नाहीं. आपल्या इकडील गांवठी झाडांवर त्यांचीं कलमें बांधलीं तरी देखील त्यांनां फळें येत नाहींत, व फळें आलींच तर तीं भरत नाहींत.

डाळिंबाची पैदास मुख्यत्वेंकरून बियांपासून करतात. बीं नेहमींप्रमाणें वाफ्यांत पेरून रोपें पावसाळ्याच्या आरंभीं कायम जागीं लावतात. पन्हेरी (रोपें) तीन ते सहा रुपये शेंकडा या भावानें मिळते. झाडांसाठीं खड्डे शक्य तितके मोठे—तीन फूट हमचौरस असे १५ फुटांवर घ्यावे. खड्ड्यांत चांगली माती व दोन दोन टोपल्या शेणखत घालावें. म्हणजे जमीन जरी हलकी असली तरी झाडें लवकर जोमांत येतात; व त्यांनां फळहि लवकर येतें. पाणी आठदहा दिवसांनीं असें दोन वर्षेपर्यंत द्यावें. जमिनींत दुसरें कसलेंहि पीक होण्यासारखें असेल तर तें काढून घ्यावें म्हणजे वर खर्च निघून येतो. दरवर्षी पावसाळ्याच्या आरंभीं प्रत्येक झाडाला दोन टोपल्या शेणखत द्यावें. झाडें पांच फूट वाढलीं म्हणजे त्यांचा बहार धरण्याला तीं योग्य झालीं. याचे बहार तीन आहेत. आंबेबहार, मृगबहार व हस्तबहार. यापैकीं कोणतातरी एक घ्यावा. कोणताहि बहार धरण्यापूर्वी सर्व झाडांनां तीन महिने तरी ताण मिळाला पाहिजे. हस्तबहार धरण्यापूर्वी पाऊस असल्यामुळें झाडाला ताण मिळत नाहीं; यासाठीं कोणी हस्तबहार धरीत नाहींत. डाळिंबाचें झाड

असल्यामुळें आपल्या सवडीनुसार विहिरींतील पाण्याचा अंदाज व जमिनीचा मगदूर पाहून कोणता बहार घ्यावयाचा व झाडांनां पाणी केव्हां द्यावयाचें हें ठरवावें. पाणी सर्व उन्हाळाभर भरपूर पुरण्यासारखें असल्यास आंबेबहार धरण्यासाठीं मकरसंक्रांतीच्या वेळीं पाणी द्यावें, तें न साधेल तर शिवरात्रीच्या अगर रंगपंचमीच्या सुमारास द्यावें, अगर त्यापुढें अक्षय्यतृतीयेला द्यावें. यांपैकीं कोणतेंच पाणी देणें शक्य नसल्यास मृगबहार धरावा. इतक्या निरनिराळ्या वेळीं हें पीक धरतां येण्यासारखें आहे तरी होतां होईतों वर्षास नेमल्या वेळीं हीं कामें करण्याची वहिवाट ठेवावी; म्हणजे झाडांनां नियमित वेळीं फुलण्याची आपोआप संवय लागेल. पहिल्यानें बहार धरण्यापूर्वीं निदान दोन महिने तरी झाडांचें पाणी तोडलेलें असावें. यानंतर फळें काढून घेतल्यापासून तों पुन्हां फळें धरण्याचा हंगाम येईपर्यंत खणणी, खुरपणी, पाणी देणें वगैरे बाबतींत बागेकडे लक्ष देण्याचें कारण नाहीं. या काळांत झाडांचीं सर्व पानें वाळून त्यांतील बरींचशीं गळून पडतील. पाणी देण्यापूर्वीं एक महिना अगोदर सर्व बाग नांगरून किंवा खणून घ्यावा; नंतर अळीं खणून मुळ्या उघड्या कराव्या; जारवा ( कोंवळ्या मुळ्या ) छाटाव्या आणि झाडांवरील सर्व मर व बांडगूळ वगैरे असल्यास काढून टाकावें. मुळ्या दहा ते पंधरा दिवस उघड्या ठेवून बाग वाळूं द्यावा; म्हणजे आणखी पानें गळून पडतील. दरम्यान दर झाडास ४ ते ६ टोपल्या चांगलें कुजलेलें गांवखत सर्व आळ्यांत पसरून टाकावें व अळीं व पाट बांधून पाणी द्यावें. एखाद्या वर्षी अजमासापेक्षां पाणी कमी पडल्यास झाडाच्या बुंध्यापासून दोन फुटांवर एक फूट रुंदीचें बांगडीसारखें अळें करावें व त्यांत पाणी सोडावें. त्याच्या योगानें पाण्याची पुष्कळ बचत होते. पहिलें पाणी दिल्यावर एक महिन्यानें सर्व झाडें फुलतात. त्यावेळीं पाणी वेळेवर देण्यास चुकूं नये. तसेंच फळें तीन महिन्यांचीं झालीं म्हणजे राखण ठेवावी व मधून मधून बागेला थोडी चाळणी द्यावी म्हणजे फळें मोठीं होतील. झाडांची निगा चांगली राखल्यास झाडें तीस वर्षेंपर्यंत टिकण्यास हरकत नाहीं. कांहीं ठिकाणीं पाऊणशें वर्षांचे बाग दृष्टीस पडतात. डाळिंबाच्या झाडाला खालपासूनच पुष्कळ फांद्या फुटतात व त्यांमुळें सर्व बाग दाट होऊन त्यामध्यें काम करण्यास फार अडचण पडते व उत्पन्न यावें तसें येत नाहीं. यासाठीं सर्व झाडें जमिनीबरोबर तोडून टाकतात म्हणजे तीं सर्व पुन्हां बुंध्यापासून फुटून जुन्या खोडांपासूनच नवीन झाडें लवकर तयार होतात. अशा रीतीनें पुन्हां फुटलेलीं झाडें व मूळचीं बियांपासून आलेलीं झाडें यांमध्यें कांहींच फरक दिसत नाहीं.

रो ग.—डाळिंबाच्या झाडाला व फळाला अनेक रोग होतात. परंतु डाळिंबाचें पीक थोड्या खर्चांत बरेंच मिळत असल्यामुळें शेतकऱ्यांचें रोगाकडे फारसें लक्ष लागत नाहीं. डाळिंबाचे रोग एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जाण्यास फारसे अडथळे येत नसल्यामुळें रोग हटविणें हें एकट्याच्या हातून होण्यासारखें काम नसून तें सर्व बागवाल्यांनीं मनापासून, दक्षतेनें व सहकारितेनें वेळच्यावेळीं केल्यास रोग हटण्याचा संभव आहे. डाळिंबाचे मुख्य रोग पुढें दिले आहेत.

सुरसाः—फुलें येण्याच्या सुमारास फुलावर पाकळ्या असतात तेथें पाकोळी एक एक अंडें घालते. तें अंडें फुटून आळी बाहेर आल्यावर ती फळ पोंखरून आंत जाते. ती आंतील बी खाऊन टाकते. आळी काळसर असून तिच्या अंगावर बारीक बारीक केंस असतात. या अळीलाच सुरसा म्हणतात. आळीची पूर्ण वाढ झाल्याबरोबर ती बाहेर येते, आणि फळ व देंठ हीं धाग्यांनीं पक्कीं बांधून टाकते. त्यामुळें फळ गळून पडत नाहीं. नंतर ती पुन्हां फळांत जाऊन कोश करते. कांहीं दिवसांनीं कोशांतून पाकोळी बाहेर पडते. एकदां ही अळी फळांत शिरली कीं तें फळ फुकट जातें. यावर उपायः—भोंकें पडलेलीं व सुरसा लागलेलीं सर्व फळें रोजच्यारोज काढून जाळून टाकावीं. म्हणजे पुढच्या वर्षी तरी रोग जास्त फैलावणार नाहीं. दुसरा उपाय म्हणजे फूल फुलल्याबरोबर प्रत्येक फुलावर कापडाची पिशवी बांधावी म्हणजे फळावर पाकोळी बसून अंडें घालणार नाहीं. हें काम फार दगदगीचें आहे.

चिकटा.—पानांच्या पाठीमागें लहान लहान काळे कीटक असतात; ह्यांनां पावसाळ्याच्या आरंभीं पंख फुटून ते सर्व बाहेर उडूं लागतातः व पुन्हां नवीन पानांवर अंडीं घालून त्यांच्यापासून आणखी रोग उत्पन्न होतो. यास उपाय–फिश ऑईल,रेझीन ( राळ मिश्रीत माशाच्या तेलाचा साबण ) हा एक भाग घेऊन त्यांत शंभरपट पाणी घालून तें मिश्रण झाडावर मारावें.

याशिवाय झाडांच्या खोडाला भेरूडसारखा किडा असतो तो झाडाचें खोड पोंखरून आंत जातो व त्यामुळें झाड लवकर जायबंदी होतें. उपाय—सळईनें किडा मारून टाकावा अगर त्यामध्यें टरपेन्टाइन तेल घालावें म्हणजे किडा मरतो.

वरील रोगांशिवाय डाळिंबाच्या झाडास आणखी एक वनस्पतिजन्य रोग होतो; त्याच्यायोगानें पुष्कळ फळें कुजून फुकट जातात. पहिल्यानें फळाची वरची साल काळी पडते; व हळूहळू आंतील भाग कुजत जातो. हा रोग नर ( फकडी ) फुलांनां व मादी फुलांनां दोहोंनांहि होतो. रोग झाल्यावर फुलें गळून पडतात. रोगट फळ कोंवळें असल्यास तें कुजून खालीं पडतें किंवा सुकून जाऊन तसेंच झाडांवर पुष्कळ दिवस रहातें. हा रोग सर्व ऋतूंत दृष्टीस पडतो परंतु पावसाळ्यांत तो विशेष दृष्टीस पडतो. यास उपाय–सर्व रोगट फळें गोळा करून तीं जाळून टाकावीं.फळें लहान असतांनाच सर्व फळांवर बोर्डो मिश्रण शिंपडावें.

उ प यो ग.—डाळिंबाचा उपयोग सर्वांस माहीतच आहे. डाळिंबाच्या रसाचा औषधासाठीं लेह करतात. फळाच्या

सालीचा उपयोग वाळंतकडून व काढयांत घालण्यासाठीं करतात. मुळांची व खोडाची साल कातडीं कमावण्यासाठीं उपयोगी पडते. याची निर्गत वायव्यप्रांतांतून फार होते.

**डिंक**—श्वेत नाइल नदीच्या पश्चिम किनाऱ्यावर वहरेल –गझल नदीच्या मुखासभोंवतीं व पश्चिम किनाऱ्यावर व सोवट नदीच्या दोन्ही किनाऱ्यांवर रहाणाऱ्या निग्रो लोकांनां डिंक म्हणतात. ते उंच व श्याम वर्णाचे आहेत. पुरुष बहुतेक वस्त्ररहित असतात व बायका मात्र थोडीं वस्त्रें वापरतात. त्यांचीं शरीरें गोंदलेलीं असतात. दागिने घालण्याकरितां ते कानाला व ओठांनां भोंकें पाडतात व लोखंड, हस्तिदंत, व पितळ यांचीं भूषणें घालतात. त्या लोकांत बहुतेकजण डोक्यावरील सर्व केंस काढतात. त्यांच्यामध्यें बहुपत्नीत्वाचा चाल प्रचलित आहे. पुरुष गुरें पाळण्याचा धंदा करतात पण त्यांस शेतीचें काम करणें आवडत नाहीं;तीं कामें बायका पहातात. ते दुष्काळाखेरीज गुरांचें मांस खात नाहींत; व गाय व साप यांनां पूज्य मानतात. इ. स.१८९९ मध्यें डिंक लोक सूदनच्या राजसत्तेखालीं आले.

**डिकन्स, चार्लस**—या प्रसिद्ध इंग्लिश कादंबरीकाराचा जन्म स.१८१२ त झाला. लहानपणीं त्याचें बहुतेक शिक्षण घरींच आईच्या देखरेखीखालीं झालें. पुस्तकांतून वाचलेल्या भूमिकांची बतावणी करण्याची त्याला लहानपणीं संवय असे. त्याचें बालपण बहुतेक केंटमध्येंच गेल्यामुळें त्या स्थलाचा त्याला मोठा अभिमान असे व तें त्यानें लिहिलेल्या 'ग्रेट एक्स्पेक्टेशन्स्' या पुस्तकावरून स्पष्ट सिद्ध होतें. सांपत्तिक स्थिति चांगली नसल्यामुळें डिकन्सला अगदीं बालवयांतच नोकरी करावी लागली व बऱ्याच अडचणी सोसाव्या लागल्या परंतु त्यानें पुढें लिहिलेल्या पुस्तकांनां या वेळचा अनुभव फार उपयोगी पडला. लवकरच लघुलेखन कला शिकून तो बऱ्याच मासिकांचा बातमीदार झाला व या संधीचा फायदा घेऊन स्वतःचे लेख मासिकांतून लिहिण्यास त्यानें आरंभ केला. निरनिराळीं छापलेलीं 'पिकविक पेपर्स' चीं प्रकरणें त्यानें १८३७ सालीं एकत्र करून पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलीं. या पुस्तकानें डिकन्सचें नांव जगप्रसिद्ध झालें आहे. धाडसी कृत्यांची गुंतागुंत, मनुष्यांचें परस्पर वर्तन, मानवी जीविताचीं भवितव्यें व रहस्यें यांचा घोंटाळा, या पुस्तकांत चांगल्याच तऱ्हेनें दाखविला आहे.

बऱ्याच वाचकांनां त्याच्या लेखांत नाविन्य दिसून येत असे व त्याच्या विचारांत बरीच उलथापालथ होत असे. त्याचे लेख स्वाभिमान व नागरिकत्वाची जाणीव करून देत. ग्रंथलेखनाच्या कलेंत प्राविण्य मिळविण्यापेक्षां वाचकवर्गाची सहानुभूति मिळविण्याकडे त्याचें जास्त लक्ष असे. लोकांनां काय पाहिजे आहे तें जाणण्याची कला त्याला चांगली अवगत होती व हेंच त्याच्या लोकप्रियतेचें मूळ कारण होय. त्याची निरीक्षण शक्ति फार दांडगी असे. त्याच्या एका, 'ऑलिव्हर ट्विस्ट' नांवाच्या प्रसिद्ध पुस्तकांत एका पोरक्या मुलाचें वर्णन त्यानें फारच मार्मिक तऱ्हेनें केलें आहे. ऑलिव्हर व लहान डिक यांच्या ताटातुटीच्या वेळचा ओढून ताणून आणलेला करुणरस जरी लक्षपूर्वक वाचणाऱ्याच्या लक्षांत येतो तरी पहिल्या कांहीं प्रकरणांतून अंतःकरणाला हालवून टाकण्यासारख्या वस्तुस्थितीचें चित्र त्यानें रेखाटलें आहे. त्याच्या स्पष्टवक्तेपणा व लेखनपद्धति यांची कल्पना या पुस्तकावरून वाचकांनां होण्यासारखी आहे. डिकन्सचीं कथानकें जरा भानगडीचीं असल्यामुळें समजण्यास कठिण जातात. भपकेदार वर्णनें व पुनरुक्ति हे दोष जरी याच्या पुस्तकांतून आढळतात तरी तत्कालीन स्थिति वर्णन करण्यांत त्याचा हातखंडा असल्यामुळें त्याच्या पुस्तकांतील गोडी कधींहि नाहींशी होणार नाहीं. हा कादंबरीकार १८७० सालीं मरण पावला. त्यानें लिहिलेल्या पुस्तकांपैकीं 'डेव्हीड कॉपरफिल्ड', 'निकोलस निकोलबी' व 'ओल्ड क्युरिऑसिटी शॉप' हीं बरींच लोकप्रिय आहेत.

**डिकेमाली**—या झाडास संस्कृतमध्यें हिंगुफळ, मराठींत डिकेमाली अशीं नांवें आहेत. हीं झाडें मोठालीं होतात. तीं बहुधां डोंगराळ प्रदेशांत सांपडतात. कोंकणांत व देशावर हे वृक्ष पुष्कळ आढळतात. याचीं पानें पेरूच्या पानांएवढीं असून आकारानेंहि तशीं असतात. त्यास तोंडल्याएवढीं फळें येतात. या झाडांच्या डेखांतून हिंवाळ्यांत हिरवट पिंवळा चीक निघतो. त्यासच डिकेमाली म्हणतात. फळाचें लोणचें होतें. जंगली लोक चिकाच्या वड्या करून विकतात व करतांना त्यांत डेखांचीहि भेसळ करतात. डिकेमाली तिखट, उष्ण व अग्निदीपक असून कफ, वायु, मलबंध व आम यांचा नाश करते. ही फार उपयुक्त औषधि आहे.

**डिकेन्सि, थॉमस**—थॉमस डिकेन्सि या प्रसिद्ध इंग्लिश निबंधलेखकाचा जन्म मँचेस्टर येथें इ. स. १७८५ मध्यें झाला. हा लहानपणापासून लाजाळू, कोंवळ्या मनाचा, हुषार व कल्पक असे. वयाच्या १५ व्या वर्षांपूर्वीच फार परिश्रम घेऊन त्यानें ग्रीक भाषेंत बरेंच प्राविण्य मिळविलें. परंतु वडील माणसांची शिक्षणपद्धति त्याला नापसंत असल्यामुळें त्यानें इ. स. १८०२ मध्यें घरांतून पळ काढिला. तो कांहीं दिवस वेल्समध्यें होता व नंतर लंडन येथें आला. लंडन येथें द्रव्याच्या अभावामुळें त्याचे बरेच हाल झाले. पुढें लवकरच वडील मनुष्यांचा व त्याचा सलोखा होऊन त्याला ऑक्सफोर्ड येथील विद्यालयांत पाठविण्यांत आलें.

विद्यालयांत तो पांच वर्षें होता व येथें त्यानें जर्मन भाषेचा अभ्यास केला. या कालांत त्याची वर्डस्वर्थ, लँब, हॅझलिट् वगैरे विद्वानांशीं ओळख झाली. विद्यालयांत असतांनाच मज्जातंतुव्यथा असह्य झाल्यामुळें त्याला अफू खाण्याची संवय लागली. विद्यार्थिदशा संपल्यावर सुमारें दीड वर्ष 'वेस्टमुरलंड ग्याझेट'चा हा संपादक होता व पुढें

तो कित्येक मासिकांतून आपले लेख प्रसिद्ध करीत असे. इ. स. १८२२ त त्यानें ' कन्फेशन्स ऑफ अॅन् इंग्लिश ओपिअम ईटर, ' या नांवाचें पुस्तक छापून प्रसिद्ध केलें. या पुस्तकांत कल्पनासृष्टीचें चित्र फारच चांगल्या तऱ्हेनें रेखाटलें गेल्यामुळें तें लवकरच लोकप्रिय झालें व ग्रंथकर्त्याचा लौकिक दूरवर पसरला. या पुस्तकामुळें त्याचें नांव अजरामर झालें आहे. स. १८३७ च्या त्याच्या पत्नीच्या निधनापासून तो एके ठिकाणीं फार दिवस कधींच राहिला नाहीं राहाती खोली कागदांनीं भरली म्हणजे तो दुसरीकडे राहावयास जात असे. लेखन हें डिक्वेन्सीच्या जीवनाचें साधन होतें. प्राप्तीपेक्षां खर्च जास्त करण्याच्या संवयीमुळें तो नेहमीं कर्जबाजारी असे. डिक्वेन्सीचा लेखनशैली मनोवृत्ति हालवून टाकणारी असे. त्याच्याप्रमाणें कल्पक वाचकालाच त्याच्या लेखांतील मर्म कळतें. संगतवार वर्णन, क्वचित् स्थळीं करुणरस, सहानुभूति, विनोद व व्याजोक्ति या गुणांमुळें ह्या ग्रंथकर्त्याचे लेख फारच लोकप्रिय झाले आहेत. तत्कालीन राजकीय चळवळींत त्याचें फारसें अंग दिसून येत नसे तरी पण त्यानें राजकीय विषयांचा व अर्थशास्त्राचा बराच अभ्यास केला होता. वयमानाप्रमाणें त्याचीं मतेंहि उदार झालीं. त्याच्याशीं संभाषण करण्यांत लोकांनां एक तऱ्हेचा आनंद वाटत असे. कारण तो लहान मोठा हा भेदभाव मनांत न आणतां सर्वांशीं उत्तम तऱ्हेनें बोलत असे. आपल्या नैसर्गिक मनाच्या प्रवृत्तींत अगर वाङ्मयाच्या अध्ययनांत त्यानें आपलें सर्व आयुष्य घालविल्यामुळें जगांतील बंधनाचें त्याला फारसें महत्व वाटत नसे. हा ग्रंथकर्ता १८५९ सालीं मरण पावला.

**डिंगरी**—या झाडास लॅटिनमध्यें रॅफानस साटिव्हस व मराठींत डिंगरी हीं नांवें आहेत. थंडींत मुळ्याचे बुडखे लाविल्यास त्यास शेंगा येतात; त्यांस डिंगऱ्या म्हणतात. पौष महिन्यांत मुळ्यांकरितां लावलेल्या बियांसहि मुळें येत नाहींत. झाड थोडे दिवस वाढून फुलांचा दांडोरा वर येतो व डिंगऱ्या धरावयास लागतात. उन्हाळ्याच्या आरंभास डिंगऱ्या बाजारांत यावयास लागतात. त्यांची उकडून भाजी चांगली होते. या भाजीचे गुणधर्म मुळ्याप्रमाणेंच आहेत. " मुळा " या शब्दाखालीं दिलेली माहिति पहावी.

**डिंगणकर, मोरो विश्वनाथ**—हा सागर ( मध्यप्रांत ) कडील एक छोटासा जहागीरदार. गोंडवणांतील चौरागड येथील गोंडराजे गोवध करीत म्हणून मोरोपंतानें त्यांच्या वर स्वारी करून चौरागड काबीज केलें. दमोह येथील गोंड राज्यहि पंतानें जिंकलें. धाकट्या रघूजी भोसल्यानें पंतास कळविलें कीं तुमचा प्रांत गढा हा आम्हांस द्यावा, नाहीं तर जबरीनें आम्हीं घेऊं. परंतु पंत लढाईस तयार झाला. रघूजीचें सैन्य ४०।५० हजारांपर्यंत होतें व पंताजवळ सारे दोन हजार स्वार होते. रघूजीची फौज विठ्ठलपंताच्या हाताखालीं गढ्यावर चालून आली. तेव्हां पंतानें एका रात्रीं त्या फौजेवर एकाएकीं हल्ला केला. प्रथम आपण फौजेंतीलच छावण्याचे स्वार आहों असें सांगून दहा बारा स्वारांनिशीं पंतानें थेट विठ्ठलपंताचा तंबू गाठला व तंबूचे तणावे कापून भोसल्याचा दुय्यम सेनापति वेणीसिंग यास ठार मारलें, तेव्हां विठ्ठलपंत व त्याची फौज पळून गेली. मोरोपंत हा यानंतर थोड्या दिवसांनीं वारला. त्याला युद्धाची फार आवड असे सागरवाल्या संस्थानिकाचा कांहीं दिवस तो सेनापति होता व त्या काळांत यानें सागरवाल्याच्या ताब्यांत बराच नवा मुलुख आणून दिला. त्याचा मुलगाहि त्याच्यासारखा शूर होता. [ नागपुरकरांची बखर व कागदपत्रें. ]

**डिडीमी**—डिडीमा अथवा डिडीमा ( आधुनिक-हायेरोन्टा ) हें अपोलोचें प्राचीन देवालय आशियामायनरमध्यें होतें. हें मिलेटसपासून दक्षिणेस १० मैलांवर असून, पोसीडीआन भुशिरावर होतें. येथील भिक्षुवर्गावरून याला ब्रॅन्कीडी म्हणत. तेथें प्रसिद्ध देववाणी होत असे. इराणच्या दरायसनें डिडीमी लुटलें. इ. स. पूर्वी ४८१ त या देवस्थानावर हल्ला करून हें जाळिलें व ब्रॅंकीडी लोकांनां हाकून दिलें. कॅनाकसनें केलेला अपोलोचा इराणांत नेलेला पुतळा पहिल्या सेल्युकसनें २९५ सालीं परत आणला. दीडशें वर्षेंपर्यंत येथील देववाणी बंद होती. इ. स. पूर्वी ३३२ पर्यंत हें बांधण्याचें काम मिलेशियनानां हातीं घेतां आलें नाहीं. परंतु शिकंदरच्या आज्ञेवरून देववाणी पुन्हां सुरू झाली. पण नवीन इमारत पहिल्यासारखी झाली नाहीं. स. १४४६ त ह्या इमारतीचा कांहीं भाग होता, पण १६७३ सालीं सर्व इमारत पडली. देऊळ आयोनिक पद्धतीचें आहे, हें फार मोठें असून फारच चांगल्या रीतीनें सुशोभित केलेलें होतें. सध्यां ह्या भागांत हायेरोन्टा हें एक मोठें ग्रीक गांव आहे. याचें कोव्हेला नांवाचें बंदर २॥ मैलांवर आहे.

**डिडेरोट डेनिस** ( १७१३–१७८४ )—हा फ्रेंच ग्रंथकार व फ्रेंच ज्ञानकोशाचा संपादक म्हणून प्रसिद्ध आहे. हा कॅथॉलिक धर्माचा शत्रु होता. याच्या बापाची, त्यानें वैद्यकशास्त्राचा व कायद्याचा अभ्यास करावा अशी इच्छा होती, पण आपल्या बापास नाराज करून त्यानें पुस्तकें विकण्याचें दुकान काढलें. त्याला कौटुंबिक सुख मुळींच मिळालें नाहीं. हा जरी मोठा ग्रंथकार नव्हता तरी हा कल्पनाप्रचुर, सूचक व धारिष्टवान असा लेखक होता. प्रारंभीं त्यानें परकीय पुस्तकांचें फ्रेंच भाषेत भाषांतर करण्यास सुरवात केली. नैतिक पुस्तकांकडून गोष्टी लिहिण्याकडे त्याचें मन वळलें. त्यानंतर त्यानें वेदान्तविषयक पुस्तकें लिहिण्यास प्रारंभ केला; आणि याच वेळीं त्याची कल्पक लेखक म्हणून प्रसिद्धि झाली. त्याची विचारसरणी अधिकाऱ्यांनां पसंत न पडल्या कारणानें त्याला कैदेंत जावें लागलें. कैदेंतून सुटका झाल्यावर त्यानें फ्रेंच भाषेत ज्ञानकोश लिहिण्याचें ठरविलें. त्यानें प्रकाशकांचा भाषान्तर करण्याचा मूळ बेत रहित करून या ज्ञानकोशाची स्वतंत्र रचना करण्याचें ठरविलें. हें कार्य करीत असतांना त्याला अनेक अडथळे आले, संकटें उद्भवलीं; तरी त्यानें

अंगीकृत कार्य सोडलें नाहीं. या कार्यांत त्याला अधिकाऱ्यांची अप्रीति संपादन करावी लागली. हें कार्य करीत असतांना जरी कित्येक निराशाजनक प्रसंग ओढवले तरी त्यानें सतत वावीस वर्षे अविरत परिश्रम करून अंगीकृत कार्य तडीस नेलें. यानंतर त्यानें कांहीं नाटकें लिहिलीं व प्रसिद्धि मिळविली. तो चिकित्सक होता; पण हेकेखोर मात्र नव्हता. समाजाच्या विरुद्ध त्याचीं मतें होतीं. जरी हा अत्यंत नांवाजलेला होता तरी गरीब होता त्याला शेवटीं आपलें पुस्तकालय महाराणी कॅथेराईन हिला विकावें लागलें. डिडेरॉट हा ता. ३० जुलै १७८४ रोजीं मरणपावला. 'लेट्रेस सुर लेस सूर्डस्,' 'ला रिलीजस' वगैरे याचीं पुष्कळ पुस्तकें आहेत.

**डिफो, डयानिअल**—या इंग्लिश ग्रंथकर्त्याचा जन्म स. १७५९ मध्यें सेंट गाइल्स नांवाच्या एका खेड्यांत झाला. याचा बाप लंडनचा रहिवासी असून खाटकाचा धंदा करीत असे. शिक्षणानंतर डिफोनें निरनिराळ्या तऱ्हेचे बरेच धंदे करून पैसे मिळविले. त्याच्या आयुष्यक्रमाला निराळी दिशा लावणारी गोष्ट म्हणजे तिसऱ्या विल्यमशीं झालेला त्याचा परिचय ही होय. त्यानें 'खरा इंग्रज' या नांवाचें एक औपरोधिक चोपडें १७०१ सालीं प्रसिद्ध केलें. याच सुमाराला त्यानें लोकमत जागृत करण्याकरितां धार्मिक विषयावरहि लहान लहान पुस्तकें लिहिलीं. या दोन्ही चळवळींत त्याला यावें तसें यश आलें नाहीं. विल्यमच्या मरणानें डिफोच्या विरुद्ध पक्षाला बराच जोर आला व डिफो याला पाठवळ नाहींसें झालें. ॲन राणीच्या राज्यारोहणानंतर लवकरच डिफोनें 'शॉर्टेस्ट वे वुइथ दि डिसेंटर्स' नांवाचें एक पुस्तक छापिलें. परंतु हें पुस्तक अप्रिय होऊन डिफोला शिक्षा व दंड करण्यांत आला. पण या शिक्षेमुळें तो फार लोकप्रिय झाला. पुढें रावर्ट हारलेच्या मध्यस्थीनें डिफोला कैदेंतून सोडून देण्यांत आलें. सुटका झाल्यावर १७०४ सालीं त्यानें 'दि रिव्ह्यु' नांवाचें एक साप्ताहिक पत्र सुरू केलें व यांत तो निरनिराळ्या विषयांची चर्चा करीत असे.

त्याची लेखनपद्धति साधी पण भारदस्त असे.योग्य उदाहरणें देऊन तो आपलें म्हणणें लोकांच्या मनांत चांगलें बिंबवून देत असे. १७०६ सालापासून दोन तीन वेळां स्कॉटलंड व इंग्लंड या दोन देशांचें पार्लमेंटच्या बाबतींत एकीकरण करण्याच्या कामीं डिफोची योजना करण्यांत आली.पुढें त्यानें 'रॉबिनसन् क्रूसो' हें पुस्तक लिहिलें व तें फारच लोकप्रिय झालें. १७२६ सालीं 'एव्हरिवडीज् बिझिनेज इज नोवडीज् बिझिनेस' हें चमत्कारिक व मनोरंजक पुस्तक त्यानें प्रसिद्ध केलें. याच वर्षी त्यानें 'पोलिटिकल हिस्ट्री ऑफ देव्हील' म्हणून एक पुस्तक लिहिलें व त्यावरून वाचकांनां ग्रंथकर्त्याच्या नैतिक कल्पनांची बरीच माहिती होते. डिफोनें स. १७१५ पासून १७२८ पर्यंत मुख्यत्वेंकरून फार पुस्तकें लिहिलीं. त्याच्या पुस्तकांतील विषय स्पष्ट व कोणाला तरी उद्देशून लिहिलेला असतो असें स्कॉटचें म्हणणें आहे. डिफो १७३१ सालीं मरण पावला. त्याच्या मरणकाळच्या स्थितीची विश्वसनीय माहिती उपलब्ध नाहीं. मरतांना त्याचें दिवाळें निघालें होतें असें कांहीं म्हणतात व तो तुरुंगांत मेला असें इतरांचें म्हणणें आहे. त्यानें लिहिलेल्या राजकीय व आर्थिक विषयांवरील पुस्तकांत त्याचीं मतें फार स्पष्टपणानें मांडलीं गेलीं आहेत. त्याचे लेख नेहमीं एककल्ली असून विरुद्ध मतांकडे तो दुर्लक्ष करीत असे.

**डिवार, सर जेम्स** (१८४२– )–ह्याला लंडन रॉयल इन्स्टिट्यूटमध्यें रसायनशास्त्राचा मुख्य अध्यापक १८७७ सालीं नेमला. ह्यानें रसायनशास्त्रांत पुष्कळ संशोधन केलें. हा मुख्यतः अनेक वायू द्रवरूपांत आणल्याबद्दल प्रसिद्ध आहे.ह्यानें मुद्दाम बनविलेल्या उपकरणांच्या साहाय्यानें प्राणवायु द्रवरूपांत आणला व तो सांचवून ठेवण्याकरितां भांडें तयार केलें व त्यांत ठेवतां येऊं लागला. कांहीं दिवसांनीं त्यानें उज्जवायु देखील तसाच द्रवरूपांत आणतां येतो हें प्रयोगानें सिद्ध केलें व त्याकरितां एक नवीन मोठें यंत्रहि बनविलें. तसेच द्रवरूपांत ह्या निरनिराळ्या वायूंच्या गुणधर्मांचें संशोधन करून त्यावर बरीच माहिती मिळविली.

**डी अलॅंवर्ट** (१७१७–१७८३)—या प्रसिद्ध तत्त्वदर्शी व गणितशास्त्रज्ञाचा पॅरिस येथें जन्म झाला. जिअन ली रॉंड नामक चर्चनजीक रस्त्यांत आढळलेलें अज्ञातपितृक असें हें बालक रूसो नांवाच्या बाईनें जतन केलें. अलॅंवर्ट हें आडनांव त्यानें नंतर धारण केलें. स. १७३० त ह्याचा मॅझॅरिन कॉलेजांत प्रवेश झाला व त्या ठिकाणीं त्याची गणिताबद्दल फार वाहवा झाली. कॉलेज सोडल्यावर तो आपल्या मानलेल्या आईकडे आला व नंतर त्यानें कायद्याचा अभ्यास केला. १७३८ सालीं ॲडव्होकेट झाल्यानंतर त्यानें वैद्यकीय अध्ययनास सुरवात केली. तथापि त्याची गणिताची आवड वाढतच होती. १७४१ सालीं ॲकॅडेमी ऑफ सायन्सेस नामक संस्थेचा तो सदस्य झाला व त्यामुळें त्याचा लौकिक वाढूं लागला. भौतिकशास्त्रासंबंधीं त्यानें अनेक शोध लाविले. फ्रेडरिक दि ग्रेटनें त्यास वर्लिन येथें रहावयास येण्याबद्दल पाचारण केलें. वर्लिनच्या विद्यापीठानें त्यास अध्यक्षपद देऊं केलें होतें परंतु त्यानें तें स्वीकारलें नाहीं. स. १७४१ ते १७५४ पर्यंतचा काल त्यानें नवीन शोध लावण्यांत व त्यासंबंधीं ग्रंथ लिहिण्यांत घालविला. त्यानंतर त्यानें डिडेरोटच्या ज्ञानकोशाकरितां गणित, तत्त्वज्ञान, वाङ्मय इत्यादि विषयांवर लेख लिहिण्यास सुरवात केली. त्याच्या जिनिव्हा नामक लेखाबद्दल बराच वाद माजला होता. कारण त्यांत काल्व्हिनिझम व नाटकें यांबद्दल वादग्रस्त चर्चा आली होती. स. १७५९ मध्यें त्याचा तत्त्वज्ञानासंबंधीं ग्रंथ प्रसिद्ध झाला. स. १७७९ मध्यें त्यानें संगीतकलेसंबंधींहि एक पुस्तक लिहिलें. त्याचा स्वभाव स्वतंत्र बाण्याचा व निरपेक्ष असा होता.स.१७६२ त त्यास रशियाच्या कॅथेराइन

राणींचें बोलावणें आलें होतें परंतु तेंहि त्यानें नाकारलें. डेव्हिड ह्यूम नांवाच्या प्रसिद्ध तत्त्वज्ञाचा व अलेंबर्टचा चांगला स्नेह होता. रूसोचें व अलेंबर्टचें पटलें नाहीं. परंतु डिडेरोट व व्हॉल्टेअर यांच्याशीं त्याचा स्नेह व पत्रव्यवहार कायम टिकला. डिडेरोप्रभृति फ्रेंच ज्ञानकोशमंडळाचा तो एक प्रमुख पुढारी मानला जात असे. अलेंबर्टचें खासगी वर्तन साधें होतें. त्याचा परोपकारी व स्वतंत्र असा स्वभाव होता. प्रेमाच्या बाबतींत अलेंबर्टची पूर्ण निराशा झाली होती. तथापि त्यानें आपला विद्याव्यासंग सोडला नाहीं. त्याची धार्मिक मतें व्हॉलटेअरशीं झालेल्या त्याच्या पत्रव्यवहारावरून दिसून येतात. त्याच्या शास्त्रीय ग्रंथांचे आठ विभाग झाले असून वाङ्मय व तत्त्वज्ञान यांसंबंधीं त्याचे ग्रंथ १८ विभागांत प्रसिद्ध झाले आहेत. हा विद्वान पुरुष पॅरिस येथें २९ आक्टोबर १७८३ रोजीं निवर्तला.

**डीग**—रजपुतान्यांतील भरतपूर संस्थानांमध्यें डीग तहशिलीचें व निझामतीचें मुख्य ठिकाण. हें भरतपूरच्या उत्तरेस २० मैल आहे. लोकसंख्या (१९०१) १५४०९. गांवाभोंवतीं तट आहे येथें म्युनिसिपल बोर्डाची स्थापना झाली आहे. ह्या गांवाचें पुरातन नांव दीर्घ होतें असें म्हणतात. किंवा यास दुर्गपूर देखील म्हणत असत. स्कंदपुराणांत व भागवतमाहात्म्यांत ह्या नांवाचा उल्लेख आलेला आहे. इ. स. च्या १८ व्या शतकाच्या सुरवातीस जाट लोकांच्या ताब्यांत हें गेलें त्यांच्याजवळून १७७६ सालीं नजफखानानें घेतलें व नंतर तें भरतपूरच्या रणजितसिंग महाराजास परत देण्यांत आलें. १८०४ सालीं जनरल फ्रेझरनें येथें होळकरांचा पराभव केला. नंतर तो किल्ला जाट लोकांस परत देण्यांत आला. येथें सुरजमल्लनें बांधलेले मोठमोठे वाडे आहेत. नन्दभवनांतील लांकडी कामावर उत्तमपैकीं नकशीकाम केलेलें आहे.

**डीगची लढाई**—होळकर व इंग्रज यांच्या स. १८०४ मधील झगड्यांत होळकरांचें पायदळ थोड्याशा फौजेसह भरतपूरच्या जाटाच्या डीग नांवाच्या किल्ल्यानजीक येऊन राहिलें होतें. त्याच्या पाठीवर सेनापति लेक यानें पाठविलेली फौज १२ नोव्हेंबर रोजीं डीग जवळ येऊन पोंचली. होळकराच्या पायदळानें ज्या ठिकाणीं आपली छावणी दिली होती तिच्यासमोर एक तळें व विस्तीर्ण दलदलीची जागा असून तिच्या डाव्या बाजूस एक तटबंदी असलेला गांव व उजव्या बाजूस डीगचा किल्ला होता. ती जागा लढविण्याकरितां मराठ्यांनीं तोफांच्या वातेऱ्यांच्या एकामागून एक अशा रांगा केल्या होत्या. तेराव्या तारखेस सकाळीं इंग्रज सेनापति फ्रेझर हा आपल्या सैन्याच्या दोन रांगा करून हल्ला चढविण्याकरितां शत्रूवर चालून गेला. प्रथमतः त्यानें मराठ्यांच्या डाव्या बाजूस असलेला तटबंदीचा गांव हस्तगत करून, मग त्या गांवाच्या तटबंदी खालीं असलेल्या वातेऱ्यांच्या रांगेवर हल्ला केला. मराठ्यांच्या तोफांतून गोळ्यांचा भयंकर वर्षाव होत होता. परंतु कांहीं वेळपर्यंत शत्रूच्या हल्ल्यांस तोंड दिल्यावर शेवटीं मराठे तोफांची पहिली रांग सोडून दुसरीवर गेले. पहिली रांग हस्तगत झाल्यावर फ्रेझर यानें तत्काळ दुसऱ्या रांगेवरहि हल्ला करून ती काबीज केली. या हल्ल्यांत फ्रेझर हा जखमी झाला व सैन्याचें आधिपत्य कर्नल मॉन्सन याजकडे आलें यानंतर इंग्रजांनीं एकामागून एक तोफांच्या सर्व रांगा हस्तगत करून मराठ्यांच्या सैन्यास डीगच्या किल्ल्याचा आश्रय घ्यावयास लाविलें. लढाई चालली असतां एकदां मराठ्यांनीं आपल्या तोफांची रांग पुन्हां परत मिळवून इंग्रजांच्या पिछाडीवर कांहीं वेळ तोफांचा मारा चालू ठेविला होता. परंतु इंग्रजांनीं ती मराठ्यांच्या ताब्यांत फार वेळ राहूं दिली नाहीं. त्या लढाईत इंग्रजांकडील ठार व जखमी मिळून ६४३ लोक कामास आले. त्यांत २२ यूरोपीयन अधिकारी होते [ डफ ].

**डी बॉइने**—हा जातीचा फ्रेंच असून सार्डीनियाच्या राजाच्या हद्दींतील सॅव्हाय प्रांतांत शांबेरी येथें जन्मला. हा प्रथमतः फ्रान्सच्या सैन्यांत निशाणबारदार म्हणून होता. परंतु येथें बढतीची कांहीं आशा नाहीं असें पाहून तो रशियाच्या सैन्यांत चाकरी धरण्यासाठीं ट्यूरिनला गेला व तेथून सार्डीनियाच्या कारभाऱ्यापासून शिफारसपत्र घेऊन ग्रीस देशांत आला. यावेळीं यूरोपमध्यें रशिया व तुर्कस्तान यांच्या दरम्यान युद्ध चालू होतें. त्यामुळें ट्यूरिनला आल्यावर रशियन सैन्यांत त्याला कप्तानाची जागा मिळाली. टेनेडोज नांवाच्या बेटावर स्वारी करण्याच्या कामीं याची योजना झाली असतां हा बंदिवान होऊन तुर्कांच्या हातीं लागला.

लढाई संपल्यानंतर याची सुटका होऊन तो स्मर्ना शहरीं आला असतां, त्याला तेथें हिंदुस्थानांतून आलेले कांहीं इंग्रज लोक भेटले. त्यांनीं त्याला हिंदुस्थानसंबंधीं जी कांहीं हकीकत सांगितली ती ऐकून त्यानें हिंदुस्थानांत जाण्याचें ठरविलें. अलेप्पो-बगदाद या मार्गानें व्यापाऱ्यांच्या एका तांड्यावरोबर हिंदुस्तानांत जाण्याचा त्याचा पहिला प्रयत्न फसल्यावर मग तो ग्रँड कैरो येथें आला. तेथील ब्रिटिश वकिलाच्या मदतीनें याची हिंदुस्तानांत जाण्याची सोय झाली. एवढेंच नाहीं तर त्या गृहस्थाच्या शिफारसपत्रामुळें मद्रासला आल्यावर याला त्या इलाख्यांतील हिंदी शिपायांच्या ६ व्या पलटणींत अधिकाराची जागाहि मिळाली. टिपूनें कांचीजवळ कर्नल बैलीचें जें सैन्य कापून काढलें त्यांत याची पलटण होती; परंतु हा त्यावेळीं रसद संभाळून आणण्याकरितां दुसरीकडे गेला असल्यामुळें त्या कत्तलींतून बचावला ( १७८० ). यानंतर एका अॅड्ज्युटंटच्या जागेवर आपला हक्क असतां ती अन्यायानें दुसऱ्यास दिली गेली असें पाहून, यानें रशियांत जाण्याच्या उद्देशानें कंपनीच्या नोकरीचा राजीनामा दिला. कलकत्यास आल्यावर

गव्हर्नरजनरलनें त्यास मार्गांतील ब्रिटिश अधिकारी व दोस्त संस्थानिक यांच्या नांवचीं पत्रें दिलीं. या पत्रांपासून डी बॉइनेला फार फायदा झाला. विशेषतः लखनौच्या नवाबानें त्याला देणग्या देऊन शिवाय काबूल व कंदहार या शहरांवर १२००० रुपयांच्या हुंड्या लिहून दिल्या. तेथून तो मेजर ब्राऊन नांवाच्या ब्रिटिश अधिकाऱ्यावरोबर प्रवासास निघाला. परंतु दिल्लीच्या बादशहाच्या दरबारांतील लोकांस शंका घेऊन त्यांनीं या दोघांनां मार्गांतच अडविलें. त्या सुमारास शिंद्यांच्या छावणींतून अँडर्सननें बोलाविल्यावरून डी बॉइन त्याच्या भेटीस गेला. आपल्या छावणींत हा गृहस्थ कशाकरितां आला आहे याचा छडा लावण्याकरितां शिंद्यानें याचे सर्व कागदपत्र जप्त केले. तेव्हां हे महत्वाचे कागद गेल्यामुळें आपला पूर्वीचा बेत बदलून एखाद्या संस्थानिकाकडे नोकरी धरण्याचें डी बॉइनेनें ठरविलें. यावेळीं महादजी शिंद्यानें गोहदकर राण्याच्या ग्वालेरच्या किल्ल्यास वेढा दिला होता. आपणांस एक लक्ष रुपये आगाऊ दिल्यास आपण मोंगल मुलखांत गुप्तपणें दोन पलटणी उभ्या करून शिंद्याच्या छावणीवर अचानक हल्ला करूं, अशी त्यानें राण्याच्या पदरीं असलेल्या सँग्स्टर नांवाच्या स्कॉच अधिकाऱ्यामार्फत राण्यास सूचना केली. डी बॉइनेला एवढी मोठी रक्कम देण्यास राण्याचा धीर होईना, परंतु शिंद्याला भेडसावण्याकरितां मात्र त्यानें ही गोष्ट प्रसिद्ध केली. यामुळें शिंद्यानें डी बॉइनेवर दोष ठेवला. पुढें डीबॉइनेच्या विनंतीवरून जयपूरकरानें त्याला दोन पलटणी उभारण्याची परवानगी दिली. परंतु मध्यंतरीं कलकत्त्याहून इंग्रजांचें बोलावणें येऊन तो तिकडे गेला असतां राजाचा बेत फिरून त्यानें आपली परवानगी काढून घेतली. त्यामुळें डी बॉइनेची फार निराशा झाली, मात्र त्याला राजाकडून सैन्य उभारण्यासाठीं अगाऊ जे दहा हजार रुपये मिळाले होते तेवढे तो दडपून बसला. या सुमारास शिंद्याच्या मनांत बुंदेलखंडावर स्वारी करावयाची आहे असें समजल्यावरून डी बॉइनेनें शिंद्यास अर्ज करून त्याच्याकडून साडेआठशेंची एकेक अशा दोन पलटणी उभ्या करण्याची परवानगी मिळविली. त्यांत डी बॉइनेला दरमहा १०० रुपये पगार व त्याच्या हाताखालच्या माणसांबद्दल सरसगट प्रत्येकीं आठ रुपये देण्याचें ठरविलें. डी बॉइने आपल्या शिपायांस ५॥ रुपये महिना देई व त्यामुळें जी बचत रहात असे तींतून अंमलदारांचा व त्याचा भत्ता वगैरे निघे. त्यानें शक्य तोंपावेतों इंग्लिश पद्धतीवरच आपल्या पलटणी उभ्या करून त्यांचे शिक्षण, पोशाख, हत्यारें वगैरे सर्व त्याच पद्धतीचें ठेविलें व भेदाभेद न करतां सर्व राष्ट्रांचे यूरोपियन अधिकारी नेमले. गोहदच्या राण्याच्या पदरीं असलेला सँग्स्टरहि पुढें त्याला येऊन मिळाला. त्याला त्यानें तोफा ओतण्याच्या कारखान्यावर नेमलें. यानंतर बुंदेलखंड, जयपूर वगैरेकडील मोहिमांत डी बॉइनचीं पलटणें गेलीं होतीं ( १७८५-८६ ).

गुलामकादर व इस्मायलबेग यांनीं दिलेला आग्र्याचा वेढा उठविण्याकरितां महादजीनें डी बॉइनेच्या दोन पलटणी राणेखानाबरोबर पाठविल्या ( १७८८ ). राणेखानास आग्र्याकडे येतांना पाहून मोंगल सैन्य वेढा उठवून पुढें आलें. दोन्ही सैन्यांत ता. २४ एप्रिल रोजीं भरतपूरजवळ झालेल्या लढाईंत डी बॉइनच्या पलटणींनीं जी चिकाटी व जें धैर्य दाखविलें तें वाखाणण्यासारखें होतें. यानंतर राणेखानाच्या व जाटाच्या सैन्यांचें आग्रा येथें मोंगलांशीं निकराचें युद्ध होऊन इस्मायलबेगचा पराभव झाला. त्यावेळींहि डी बॉइननें व त्याच्या पलटणींनीं चांगला नांवलौकिक मिळविला ( १८ जून ).

सन १७९० च्या आरंभीं डी बॉइनेच्या हाताखालीं सात सातशें शिपायांची एक पलटण अशा आठ पलटणींचें एक ब्रिगेड होतें. त्यांत महादजीनें हळू हळू भर घालून शेवटीं त्याच्या तीन ब्रिगेड केल्या. त्याचा तोफखानाहि वाढतां वाढतां शेवटीं एकंदर दोनशेंवर तोफा झाल्या होत्या. यांतील ६० तोफा सँग्स्टरनें आपल्या कारखान्यांतच ओतून तयार केल्या होत्या. डी बॉइनेच्या प्रत्येक पलटणीबरोबर सहा पौंड वजनाचा गोळा फेंकणाऱ्या दोन, तीन पौंड वजनाचा गोळा फेंकणाऱ्या दोन व एक हॉविट्झर एवढा सरंजाम असून प्रत्येक ब्रिगेडला ५०० घोडस्वारांचें एक एक पथक जोडलेलें होतें. डी बॉइनेचा पगार शेवटीं दरमहा १०,०००रुपयांपर्यंत वाढविण्यांत आला होता. याशिवाय त्याच्या पायदळाच्या व तोफखान्याच्या खर्चाकरितां कांहीं जमिनी लावून दिल्या असून त्यांच्या ऐन वसुलावर शेंकडा दोन टक्के नफा घेण्याची त्यास परवानगी देण्यांत आली होती. सध्या सैन्याशिवाय डी बॉइनेजवळ कांहीं निवडक हंगामी पायदळहि असे. यांतील शिपायांजवळ तोड्याच्या बंदुका असत;पण डी बॉइनेनें त्यांनां संगीनी लावण्याची युक्ति काढून या पायदळाची उपयुक्तता बरीच वाढविली होती. इस्मायलबेगशीं झालेल्या पाटणच्या लढाईंत ( २० जून १७९०) महादजी शिंद्याचा जो विजय झाला तो मुख्यतः डी बॉईनच्या पलटणीमुळेंच (१२ सप्टेंबर १७९१). डी बॉईननें जोधपूरच्या राज्यांत मेरट येथें रजपुतांच्या लष्करावर अचानक छापा घालून जोधपूरकराचा पराभव केला.

सन १७९२ मध्यें त्याच्या हाताखालीं कवायती पायदळ १८००० व कराल स्वार ६०० असून शिवाय बिन कवायती प्यादे ६०००, स्वार २००० व २०० शें वर तोफा असून, आग्र्याचा किल्लाहि ताब्यांत होता. या लष्कराचा खर्च चालविण्याकरितां दोआबांतील २२ लाख ऐन वसुलाचे जिल्हे त्याच्या स्वाधीन करण्यांत आले होते.

या सालीं होळकर व शिंदे यांच्या सैन्यांत अजमेरजवळ लखेरी येथें जी लढाई झाली तींत हा हजर होता. पुढें खर्डी येथें मराठ्यांची निजामअल्लीबरोबर जी लढाई झाली तींतहि हा १०,००० कवायती पायदळासह हजर होता ( १७९० ).

पुढल्या वर्षी प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें हा शिपायाची नोकरी सोडून यूरोपमध्यें परत गेला. डी वॉइने हा धाडशी, समजूतदार व दूरदर्शीहि होता. त्याला फ्रेंच लोकांची क्रांतिकारक तत्त्वें मुळींच पसंत नव्हतीं. हिंदुस्थानांत राज्य मिळविण्याची त्याच्या जातभाईंची कल्पना त्याला पटली नाहीं [ ग्रांटडफ; खरे-ऐतिहासिक लेखसंग्रह खंड ७, ८, ९ ].

**डीसा**—मुंबई इलाख्यांतील पालनपूर एजन्सींतील एक लष्करी छावणीचें गांव. हें बना नदीकांठीं वसलें असून लोकसंख्या छावणींत ११०४७ व गावांत ३६८६. तद्देशीय लोकांची एक पायदळाची तुकडी येथें असते. गांवाभोंवतीं भिंत होती पण ती सध्यां मोडक्या स्थितींत आहे. येथें एक हिंदु व दोन जैन प्राचीन देवळें आहेत. बडोद्याच्या गायकवाडसरकारचे व राधनपूर सैन्याचे हल्ले यांनीं नेटानें मागें हटवून लावले आहेत.

**डुकर**—ऋग्वेदांत याचा सूकर या शब्दानें उल्लेख येतो. यूरोप व एशिया येथील समशीतोष्ण हवेच्या सर्व भागांत हा प्राणी आढळतो. यूरोप व हिंदुस्थान या ठिकाणीं शिकार करण्यास योग्य अशा प्राण्यांमध्यें रानडुकराची गणना करण्यांत येते. साध्या डुकरापेक्षां रानडुकर हें जास्त धष्टपुष्ट व हाडांनें कणखर असतें. तें एक दोन वर्षांचें झालें कीं, त्याचा रंग पिवळट व तांबूस असा होतो. त्याच्या अंगावरील ताठर केसांत थोडे मऊ केसहि असतात. साध्या डुकरापेक्षां रानडुकराची आरोळी मोठी व भयप्रद असते. त्याचा स्वभाव अत्यंत क्रूर असून त्याच्या दाढा फार बळकट असतात. त्यांच्या साह्यानें शत्रूस जखमी करण्याचें त्याच्यांत सामर्थ्य असतें. रानडुकरें कळप करून रहातात. हे शेताची बरीच नासाडी करतात; व त्यांच्यावर हल्ला करण्यांत आला म्हणजे कळपापैकीं मोठे धिप्पाड डुकर त्या हल्ल्यास प्रथम तोंड देतात. मोठाले भाले घेऊन व पाठलाग करून प्राचीन रोमन लोक रानडुकराची शिकार करीत असत. विल्यम दि कॉंकरर यानें रानडुकराची शिकार करण्यास सक्त मनाई केली होती. अलीकडे ग्रेटब्रिटनमध्यें रानडुकरें जवळ जवळ नाहींतच; परंतु हिंदुस्थानांत व यूरोपांतील जंगलांत तीं बरींच आढळतात.

सस नांवाच्या मुख्य जातीच्या दोन उपजाती अनुक्रमें रानडुकर व गावठी डुकर अशा आहेत. गावठी डुकर आपली उपजीविका वनस्पति व मांस वगैरे जिनसावर करतें. त्रिनी डुकराचें डोकें व पाय लहान असतात. गावठी डुकराचा रंग काळा असतो व त्याचे कान ताठ असतात. त्यास शिंगें नसून त्याचें शरीर बरेंच ओबडधोबड असतें. या डुकरास बरीच प्रजा होते. यूरोप व अमेरिकेंतील लोक डुकराचें मांस आवडीनें खातात. परंतु ज्यू व मुसुलमान लोकांनां हा प्राणी अत्यंत अशुभ, अपवित्र अतएव खाण्यास अगदीं वर्ज्य असा वाटतो. डुकराची चरबी औषधीदृष्ट्या उपयुक्त आहे असें म्हणतात. डुकराच्या कातड्याचा उपयोग खोगीर करण्याकडे होतो व त्याच्या केंसाचे ब्रश करतात. अबिसीनियन डुकराचे दांत फार मोठे असतात व हा प्राणीहि अत्यंत उपयुक्त आहे असें म्हणतात.

**डुकी, पो ट वि भा ग.**—बलुचिस्तानमधील लोरलई जिल्ह्याचा एक पोटविभाग. ह्यांत डुकी व सन्जावी या तहशिलींचा समावेश होतो.

**त ह शी ल.**—बलुचिस्तानमधील लोरलई जिल्ह्याची एक तहशील. क्षेत्रफळ १९५१ चौरस मैल. लोकसंख्या (१९०१) १२३६५०. समुद्रसपाटीपासून ही तहशील ३००० ते ५००० फूट उंच आहे. या तहशिलींत ६६खेडीं आहेत. येथें उत्तम कुरणें आहेत.

**डुक्करकंद**—ही एका जातीची वेल आहे. तीस लॅटिनमध्यें डायोस्कोरनसटिव्ह, संस्कृतमध्यें वाराही, ब्रह्मपुत्रिका, शबरकंद, मराठींत भिवोंली, डुक्करकंद, गुजराथींत वाराहीकंद, हिंदींत भिवोंलिकंद इत्यादि नांवें आहेत ही वेल जमिनीवर पसरते.हिची उत्पत्ति बहुतेक सर्व मोठमोठ्या पर्वतावर आपोआप होते. ही वेल बगाच्यांतूनहि लावतात. ह्या वेलीचीं पानें नागवेलीच्या पानाप्रमाणें असून त्यांचे देंठ लांब असतात व तीं कांड्यास समोरासमोर येतात व त्यांवर जाळ्याप्रमाणें शिरा असतात. या वेलीस फुलांचे घोंस येतात व हिचा कंद मुख्यत्वेंकरून फार उपयोगी आहे. कंदाचा आकार लांबट असून त्यावर डुकराप्रमाणें राठ केस असतात. यावरून यास डुक्करकंद म्हणतात. हे कंद हात हात खोल जमिनींत सांपडतात. आर्यवैद्यकांत हा कंद फार महत्त्वाचा मानला जातो. असल कंद हल्लीं दुर्मिळ झाला आहे असें म्हणतात.

**डुंगर**—काठेवाड. माहुवाच्या पश्चिमेस १३ मैलांवरील प्राचीन शहर. याचीं जुनीं नांवें दम्रापुरी अथवा दमरकोट अशीं आहेत. चावडा राजे येथें राज्य करीत होते असें कांहीं गीतांवरून समजतें.कधीं कधीं मातीचीं व धातूचीं प्राचीन भांडीं आणि हत्यारें येथें खोदतांना आढळतात. जवळ गेरवा नांवाच्या टेकडींत रक्तलोहपरिआम्लजित सांपडतें. येथील व्यापारी सुखवस्तू व धाडशी असून ते धान्य, कापूस व इमारतीचें लांकूड यांचा व्यापार करतात. येथें मुख्यत्त्वेंकरून कापूस उत्तम जातीचा होतो व ऊंस मुबलक पिकतो. लोकसंख्या सुमारें तीन हजार.

**डुप्ले**—जोसेफ फ्रांक्वा डुप्ले हा १ जानेवारी १६९७ रोजीं जन्मला. त्याचा बाप प्रथम जकातदार होता; पुढें फ्रेंच ईस्ट इंडिया कंपनीच्या तंबाखूच्या व्यापाराचा तो मक्तेदार बनला. डुप्ले आपल्या १८ व्या वर्षी प्रथम हिंदुस्थानांत येऊन गेला. त्यानंतर तो तीन वर्षें फ्रान्समध्यें होता. तारुण्यांतील हूडपणानें त्याच्या बापानें कंटाळून त्याला फ्रेंच ईस्ट इं. कंपनींत नोकरीस लावून हिंदुस्थानांत पाठविलें. त्याला पांडेचरीच्या गव्हर्नराच्या कौन्सिलांत वरिष्ठ सभासदाची व तेथील मुख्य

सेनापतीची जागा मिळून, तो फ्रान्सहून २९ जून १७२१ रोजीं निघाला.

जहाजावर सुरतच्या फ्रेंच वखारीचा कमिशनर डुलिव्हर हा होता; तो वाटेंतच मेला; त्यानें डुप्लेला चारशें पागोडे (१ पागोडा =४॥ ते ५॥ रुपये) कर्जाऊ दिले होते. याच रकमेवर डुप्लेनें सट्टे व व्यापार करून अगणित पैका मिळविला. तो पांडेचरीला १६ आगष्ट ( १७२२ ) रोजीं आला; व वरिष्ठ सभासदाच्या जागीं २५०० लिव्हर पगारावर कायम झाला. परंतु एक महिन्यांतच त्याचा हुद्दा कमी करून ९०० लिव्हर पगाराच्या जागीं (चौथा सभासद म्हणून) त्यास नेमिलें. पुढें डुप्लेनें, पोर्टोनोव्होच्या संस्थानिकानें फ्रेंचांची आगळीक केल्यावरून त्याचा पराभव केला. यानंतर त्याला चीन देशांत माल विकण्यास जीं गलबतें जात होतीं त्यांवर देखरेख करण्यास नेमिलें ( १७२४ ). या ठिकाणीं त्यानें पैका बराच खाल्ला; त्यामुळें त्याची चौकशी होऊन त्याला कांहीं दिवस बडतर्फीहि केलें; परंतु त्यानें अर्ज वगैरे खटपट करून पुन्हां नोकरी मिळविली ( १७२७–२९ ). नोकरीवरून निघाला तेव्हां त्याची हलाखी नव्हती एवढेंच नव्हे तर त्यानें स्वदेशीं आपल्या घरीं वीस हजार पागोडा किंमतीचें जवाहिर पाठविलें होतें. हिंदुस्थानांतील देशी राजकारणाचा अभ्यास करण्यास त्यानें याच वेळीं आरंभ केला.

बंगाल्यांतील फ्रेंचांचा व्यापार मंदावला होता, तो सुधारण्यासाठीं डुप्लेला चंद्रनगरच्या वखारीवर नेमिलें ( १७३१ ). त्यानें येतांक्षणीं अनेक खटपटी करून व्यापार वाढविला व कासीमबाजार आणि पाटणा येथें नवीन वखारी घातल्या; मात्र स्वतः खाजगी व्यापार करून बराच पैसा मिळविला, इतका कीं पुढें त्याची नेमणूक पांडेचरीस गव्हर्नरच्या जागीं झाली असतांहि, चंद्रनगर ( व बंगाल ) सोडण्याचें त्याच्या जिवावर आलें. वास्तविक कंपनीच्या नोकरांनीं खाजगी व्यापार करूं नये असे नियम होते पण अधिकारी लोक ते धाब्यावर बसवीत व डुप्लेहि त्यांपैकींच एक होता. अशा कारणांनीं फ्रेंच कंपनी डबघाईस आली.

यावेळची त्याची रहाणी सरदारी होती. त्याला इंग्रजी फारसें येत नसे, मात्र तो इंग्रजी वर्तमानपत्रें भाषांतर करून घेई स. १७३५ या वर्षी मात्र त्याला व्यापारांत बरीच ठोकर बसली; त्याचीं कांहीं जहाजें बुडालीं, नोकरांनीं त्याला लुबाडलें, बाप मेला व त्यानें आपली सर्व मिळकत डुप्लेला न देतां त्याच्या वडील भावाला दिली; त्यानें लांच देऊन पदवी मिळविण्याची खटपट केली, पण ती व्यर्थ गेली; मात्र पाटणा व कासीमबाजार येथें वखारी काढल्यामुळें कंपनीनें त्याला रोख बक्षीस दिलें. यानंतर १७३७ व १७३९ या वर्षी त्याला व्यापारांत जबर तोटा आला. नादीरशहाच्या दिल्लीवरील स्वारीनें एकंदर व्यापारासच धक्का बसला होता. इतक्यांत त्याच्यावर सरकारी पैसा खाल्याचा आरोपहि आला. त्यामुळें तो फारच वैतागला.

यावेळीं दिल्लीस असलेल्या एका फ्रेंच वैद्यानें बादशहाकडून डुप्लेला पंचहजारी मनसब मिळवून दिली. परंतु कंपनीला यापासून फायदा होणार नाहीं म्हणून त्यानें ती परत केली. कर्नाटकांत तंजावरकर व कर्नाटकचा नवाब यांच्यांत तंटे लागून फ्रेंचांनीं नवाबास मदत केल्यानें, नवाबानें त्यांनां तंजावरकराचा करिकाल प्रांत दिला. या राजकारणास ड्यूमास या गव्हर्नरानें कंपनीची परवानगी घेतली नव्हती. तेव्हां हीच पद्धत ( कंपनीच्या विगर परवानगीनें राजेरजवाड्यांस मदत करून येथील प्रांत बळकावण्याची ) पुढें डुप्लेनें स्वीकारली. सन १७३९ मध्यें ड्यूमास यानें राजीनामा दिला व डुप्लेची नेमणूक पांडेचरीस गव्हर्नर म्हणून झाली. याच वेळीं कर्नाटकांत बरीच भानगड उडाली. कर्नाटकचा नवाब दोस्तअली हा स्वतंत्र झाला, तेव्हां निजामानें मराठ्यांची मदत मागितली. रघूजी भोंसल्यानें स्वारी करून दोस्तअलीस लढाईत ठार केलें तेव्हां त्याच्या माणसांस फ्रेंचांनीं आश्रय दिला ( १७४० मे ). यामुळें त्यांचें व मराठ्यांचें वांकडें आलें. मराठ्यांनीं सफदरअली( दोस्तअलीचा मुलगा )च्या विनंतीवरून पुन्हां स्वारी करून त्याचा प्रतिस्पर्धी चंदासाहेब यास पकडून कैदेंत ठेविलें.

डुप्लेला गव्हर्नर नेमिलें, तरी चंद्रनगर सोडून दख्खनमध्यें जाण्याची त्याची तयारी नव्हती; कारण त्याला खाजगी व्यापार करून पैसा मिळविण्याची चटक लागली होती. शिवाय या सुमारास त्याला व्यापारांत खोट बसून कर्जहि झालें होतें. त्याचा एक मित्र व्हिनसेनीज याचेंच देणें पुष्कळ होतें; परंतु तो यावेळीं मेला आणि डुप्लेनें त्याच्या विधवेशीं लग्न लाविलें आणि देणें निकालांत काढिलें. त्याच्या या नव्या बायकोला व्हिनसेनीजपासून आठ मुलें झालेलीं होतीं. पाट लावला तेव्हां ती ३५ वर्षांची होती. ती मोठी कारस्थानी व जहांबाज बायको होती; तिचें वजन डुप्लेवर फार होतें; तिच्यामुळें त्याला पुष्कळ त्रास झाला. तिला तामीळ भाषा येत होती. डुप्लेच्या हेरखात्यावर तिची देखरेख असे. पांडेचरीस ( १७४८ ) इंग्रजांचा वेढा पडला असतां, शत्रूकडील वित्तंबातमी तिनेंच मिळविला. या कामासाठीं शिपायांची एक तुकडीहि तिच्या दिमतीस होती. डुप्लेपासून तिला एक मुलगा झाला होता परंतु तो उपजतच मेलेला होता. ( १७४२ ). तिनें आपले हेर खुद्द मद्रासेस इंग्रजांच्या किल्ल्यांत पेरले होते.

डुप्ले हा पांडेचरीचा गव्हर्नर १७४२ ते १७५४ पर्यंत होता. त्यानें प्रथम माही येथील नायरांचें बंड मोडलें व मग चंदासाहेबाच्या राजकारणांत भाग घेतला. यासाठीं दिल्लीच्या पातशहानें त्याला पदव्या व पोशाख पाठविला होता. चंदासाहेबाला जसा फ्रेंचांचा आश्रय होता तसा सफदरअलीला इंग्रजांचा होता. याप्रमाणें कर्नाटकांत गोंधळ माजला. कर्नाटकांतील लोकांनांहि या दोन्ही नवाबांबद्दल

फारसें प्रेम नव्हतें. अशा स्थितींत बळजोरीनें कर्नाटक हस्तगत करण्याची संधि डुप्ले पाहूं लागला.

सन १७४४ त इंग्लंड व फ्रान्स यांमध्यें युद्धास सुरवात झाली. इंग्रजांनीं मलाक्काजवळ कॅंतानहून येणारीं फ्रेंच जहाजें लुटलीं, त्यांवर डुप्लेची खासगी मिळकत बरीच होती तीहि गेली. फ्रेंच सरकारचें व त्याचेंहि नुकसान झालें. तेव्हां त्यानें इंग्रजांवर हल्ला करण्याची तयारी केली. परंतु फ्रान्सहून त्याला कुमक येईना. इकडे इंग्रजांच्या वखारी नवाब अनवरुद्दीनच्या रक्षणखालीं होत्या, त्यामुळें त्यानें इंग्रजांचा पक्ष धरला व डुप्लेला उलट धमकावण्या दिल्या. डुप्लेचा मुख्य उद्देश फ्रेंच व्यापारास हिंदीमहासागरांत व चीनच्या समुद्रांत निर्बंध नसावा व फ्रेंच वखारींचें संरक्षण व्हावें असा होता.

मद्रासच्या इंग्रज लोकांनीं 'वरील लुटीशीं आपला संबंध नाहीं, तो काफिला थेट इंग्लंडच्या हुकमतीखालीं आहे' असें जाहीर करून व आंतून त्या काफिल्यास पांडेचरीवर न येतां दर्यांतच चांचेगिरी करावी, असे हुकूम पाठवून तूर्त लढाईचा प्रसंग टाळला. परंतु लाबदोनें या फ्रेंच अधिकाऱ्यानें डुप्लेचें मन वळवून व फ्रेंचसरकारचा हुकूम (हिंदुस्थानांत युद्ध सुरू करूं नये हा) धाब्यावर बसवून इंग्रजांशीं लढण्याची जय्यत तयारी केली. नवाबाला यामुळें फ्रेंचांच्या बळाची खात्री पटली व डुप्लेनें त्याला ५० हजार पागोडे नजर केल्यानें त्यानें या स्वारीस (मद्रास आपल्याला देण्याच्या अटीवर) परवानगी दिली.

याप्रमाणें लाबदोनेनें जाऊन मद्रासवर हल्ला चढवून तें कावीज केलें (सप्टेंबर) तेथें लुटालूट न करितां तें नवाबाच्या हवालीं त्यानें करावें असा डुप्लेचा हुकूम असतां, लाबदोनेनें तो धाब्यावर बसवून मद्रास लुटलें. या सर्व भानगडी कंपनीच्या आज्ञेच्या विरुद्ध डुप्लेनें केल्या होत्या, त्यामुळें तो यावेळीं तोंडघशीं पडला. लाबदोनेची त्यानें पुष्कळ समजूत केली, परंतु उपयोग झाला नाहीं. शेवटीं डुप्लेचाहि बेत फिरून तो मद्रास नवाबाला देईना. म्हणून नवाबानें त्याच्यावर सैन्य पाठविलें. परंतु त्याचा डुप्लेनें पराभव केला. लाबदोनेनें इंग्रजांशीं केलेले करार आपण मानणार नाहीं असें डुप्लेनें जाहीर करून, इंग्रजांच्या सर्व वखारी जप्त केल्या व सर्व इंग्रज लोक आणि त्यांचे अनुयायी यांनां कैद केलें; फोर्ट सेंट डेव्हिडवर त्यानें हल्ला केला, परंतु त्यांत त्याचा पराभव झाला. इतक्यांत विलायतेस फ्रेंच-इंग्रजांत तह होऊन लढाई थांबली व परस्परांचा मुलूख परस्परांस परत मिळाला (१७४८). डुप्लेच्या मनांत मद्रास परत करण्याचें मुळींच नव्हतें; 'कलकत्ता व मद्रास हीं इंग्रज वसाहतींचीं शहरें मी फिरून मच्छीमार खेडीं बनवीन' अशी त्यानें प्रतिज्ञा केली होती. पांडेचरीवर यावेळीं इंग्रजांनीं चढाई केली असतां ती यशस्वीपणानें लढविल्यामुळें डुप्लेला मोठमोठ्या रणगाजींनां मिळणारा 'कारडन सेंट लुई' हा किताब फ्रेंच सरकारनें दिला. यावेळीं मद्रास परत न देतां त्याबद्दल ब्रिटनमधील लुईसबर्ग इंग्रजांनां द्यावें व इंग्रज सत्ता दक्षिणेंतून अजीबात नाहींशी करावी असा डुप्लेचा बेत होता.

तह झाला तरी दक्षिणेंत गोंधळ असल्यामुळें त्याचा फायदा घेऊन व देशी राजांनां मदत करतो या सबबीवर आपापली सत्ता पुन्हां वाढवावी असें दोन्ही कंपन्यांनां वाटूं लागलें. तिकडील देशी राजांची त्यांनां मुळींच भीति वाटत नव्हती; या कामीं प्रथम इंग्रजांनीं डाव टाकला. तंजावरच्या राजघराण्यांतील भाऊबंदकीचा फायदा घेऊन इंग्रजांनीं देवीकोटचा बळकट किल्ला घशाखालीं उतरवून शहाजी तंजावरकरास पोलिटिकल पेन्शन नेमून दिलें (या पोलिटिकल पेन्शनाचा प्रारंभ याप्रमाणें येथून झाला).

इकडे निजामाच्या गादीबद्दल व कर्नाटकच्या नवाबीबद्दल तंटे लागले, तेव्हां डुप्लेनें नासीरजंगाचा पक्ष घेतला व चंदासाहेबासहि मदत केली आणि अंबूरच्या लढाईत अनवरुद्दिनास मारून चंदा यास कर्नाटकची नवाबगिरी मिळवून दिली. या लढाईंत बूसी हा प्रसिद्धीस आला. यापुढें तो डुप्लेचा प्रमुख हस्तक बनला. चंदानें याबद्दल पांडेचरीच्या आसपासचीं ८० गांवें फ्रेंचांनां देऊन खास डुप्ले, त्याची बायको व सैन्यांतील एक दोन अधिकारी यांनां मोठ्या जहागिरी दिल्या.

या फ्रेंचांच्या जयानें इंग्रजांचें धाबें दणाणलें. इकडे नासीरजंग हा मुझफरजंगवर चालून आला. तेव्हां डुप्लेनें मुझफरची व इंग्रजांनीं नासीरची बाजू घेतली. डुप्लेनें इंग्रजांचा पराभव करून जिंजीचा किल्ला काबीज केला. या लढाईंत नासीरचा खून झाला. यानंतर डुप्लेनें मुझफरजंगाला निजामाच्या गादीवर व चंदासाहेबाला अर्काटच्या गादीवर बसवून सर्व दक्खन आपल्या हातीं आणली व विजयाच्या स्मारकासाठीं त्यानें अंबूर येथें एक फतियाबाद नांवाचें शहर वसविलें. थोड्याच दिवसांत मुझफरचा खून झाला तेव्हां डुप्लेनें सलाबतजंग याला गादीवर बसविलें. त्याबद्दल त्यानें डुप्लेला कर्नाटकची नवाबगिरी, मदुरा, त्रिचनापल्ली हे प्रांत व त्याच्या संरक्षणासाठीं ठेवलेल्या फ्रेंच सैन्याच्या खर्चास दरमहा दोन लाख रुपये दिले. डुप्लेनें पोर्तुगीज व त्रावणकोरचा राजा यांच्याशीं या सुमारास तह केले. तेव्हां इतक्या भानगडी करूं नयेत असें डायरेक्टरांनीं डुप्लेस कळविलें, परंतु तें त्यानें जुमानलें नाहीं.

यावेळीं डुप्लेचें प्रस्थ दक्खनमध्यें फार माजलें व इंग्रज फिक्के पडले (सन १७५१). चंदासाहेबानें त्रिचनापल्ली घेऊन महंमदअल्लीला पिटाळलें, तेव्हां मराठ्यांच्या मदतीनें महंमदनें चंदाचा पराभव केला. येथून डुप्लेच्या ऱ्हासास प्रारंभ झाला (१७५२). लारेन्स या इंग्रज सेनापतीनें फतियाबाद उध्वस्त करून त्रिचनापल्लीवर हल्ला केला व फ्रेंचांचा पराभव केला. फ्रेंच सेनापति लॉ हा चंदासाहेबासह इंग्रजांच्या स्वाधीन झाला. या अपयशामुळें कंपनीचे डायरेक्टर

डुप्लेवर रागावले. तेव्हां त्यानें तिसऱ्यांत महंमदअल्ली, म्हैसूरकर व मराठे यांच्यांत विघाड आणून चंदाच्या मुलाला अर्काटचा नवाव वनविलें व जिंजीजवळ इंग्रजांचा पराभव करून फोर्ट सेंट डेव्हिडलाहि वेढा घातला. वास्तविक यूरोपमध्यें यावेळीं फ्रान्स व इंग्लंड हे मित्र होते. हिंदुस्थानांत त्यांनीं हें युद्ध उपस्थित केलें तें निव्वळ राज्यलालसेनें; परंतु देशी संस्थानिकांना आम्हीं फक्त मदत करतों; आमचें राज्य वाढावें म्हणून नव्हे असें त्यांनीं जाहीर केलें. वहूरच्या लढाईत लारेन्सनें फ्रेंचांचा पराभव केला. या वेळीं डुप्ले हा मार्क्विस वनला.

डुप्लेनें हिंदुस्थानांत फ्रेंच साम्राज्य स्थापण्याची कल्पना, त्याला परत देशीं वोलावण्याच्या फक्त आधीं दोनच महिने डायरेक्टरांपुढें मांडली. ती जर पुष्कळ आधीं मांडली असती तर डायरेक्टरांनीं तिला पाठवळ दिलें असतें. त्यानें इंग्रजांवर शेवटचा विजय १७५४ सालीं मिळविला. सरकारी पैशाचा हिशेव चोख न ठेवल्यामुळें व स्वतः जहागिरी मिळविल्यानें व विनाकारण भानगडी करून उधळपट्टी करून कंपनीचें दिवाळें वाजविल्यामुळें (केवळ त्या आरोपावर) डायरेक्टरांनीं डुप्लेला परत वोलाविलें व पांडेचरीस दुसरा गव्हर्नर नेमून पाठविला. त्यानें डुप्लेची पैशाच्या अफरातफरीवद्दल अप्रतिष्ठा न करितां त्याला सांभाळून घेतलें. डुप्लेनें १४ आक्टोवर ( १७५४ ) रोजीं हिंदुस्थान सोडलें. तो देशीं गेला त्यावेळीं त्याच्यावद्दल लोकमत निवळत चाललें होतें. त्यानें कंपनीला जेव्हां पैशाची चणचण भासली तेव्हां आपला खाजगी पैका मदतीदाखल वराचसा खर्च केला होता. त्याच्या उगवणीसाठी त्यानें यावेळीं कंपनीवर दावा लावला, परंतु पुढें प्रधानमंडळाच्या मध्यस्थीनें तो काढून घेतला. त्याची वायको स. १७५६ त मेल्यामुळें त्यानें दुसरें लग्न केलें. पुढें विशेष कांहीं न होतां ( ११ नोव्हेंवर ) १७६३ सालीं तो मरण पावला.

जर डुप्लेच्या कल्पनेला फ्रान्सनें सक्रीय पाठिंवा दिला असता, तर हिंदुस्थानांत फ्रेंचांची राजकीय सत्ता वरीच फैलावली असती. फ्रान्समधून इकडे जे कामगार येत, तेहि सामान्यच असत. वुसी मात्र धडाडीचा होता; परंतु त्याला जांवई करावें म्हणून डुप्ले त्याला मोठमोठया कामगिरीवर धाडीत नसे; ही त्याची चूक झाली. इंग्रजी आरमाराशीं टक्कर देणारें आरमार त्याच्याजवळ नव्हतें. त्यानें कंपनीच्या व्यापाराकडे अगदीं दुर्लक्ष्य केल्यानें पैशाचें पाठवळ कमी होत चाललें. तो शास्ता चांगला होता, मात्र उत्तम सेनापति नव्हता. 'हिंदुस्थानांत युरोपियन साम्राज्य स्थापणें शक्य आहे व तेंहि हिंदी लोकांच्याच भाडोत्री सैन्याच्या आधारानें' हें यानेंच प्रथम निदर्शनास आणिलें. त्याच्या मसलतींच्या नकला, प्लासीच्या लढाईनंतर क्लाईव्हनें उचलल्या. डुप्ले फार महत्त्वाकांक्षी, धाडसी, मुत्सद्दी, मानी, मत्सरी व शिरजोर होता. एका इंग्रज चरित्रकारानें म्हटलें आहे कीं, डुप्ले जर नसता तर क्लाईव्ह प्रसिद्धीस आलाच नसता. [ मॅलेसन, जॉन विडल्फ, हॅमन्ट आणि एम. कुलत्रु यांचीं डुप्लेचीं चारित्रें. ]

**डुम जात**—काश्मीरमधील एक जात. यांची लोकसंख्या ५२०९९ असून ह्या जातीचे लोक हिंदू, मुसलमानी व शीख धर्मांचे आहेत. हिंदु भंगी व हे लोक एकच होत.

**डुराझो**—डुराझो ( प्राचीन एपिडॅमनस आणि डायरॅचियम ) हें अलवानियांतील ( तुर्कस्थान ) इयानिना विलायतमधल्या डुराझो संज्ञाकाचें वंदर व राजधानी आहे. याची लोकसंख्या ( १९०० ) सुमारें ५००० असून हें स्कुटारीच्या दक्षिणेस ५० मैलांवर डुराझो उपसागरावर वसलेलें आहे. येथें रोमनकॅथोलिक आर्चविशप राहतो. हें शहर सध्यां अगदीं मोडकळीस आलें असून येथील प्राचीन वायझन्टाईन भव्य वुरुजावर झाडें उगवलीं आहेत. जुनें वंदर वुजत आलें आहे. येथील जुना धक्का, त्यावरील तोफांच्या रांगा व ७५० फूट लांबीचा पूल वगैरे अद्यापि प्रेक्षणीय आहेत. येथून या प्रदेशांतील ऑलिव्ह तेल, गहूं, ओट, जव, मातीचीं भांडीं व कातडीं यांची निर्गत होते.

ख्रिस्तपूर्व ७ व्या शतकाच्या अखेरीस कॉर्सिरियन व कॉरिंथियन यांच्या संयुक्त संघानें हें शहर वसविलें व हें लवकरच महत्त्वास चढलें. लोकसत्ताक पक्षाच्या विरोधानें अल्पजनसत्ताक राज्यपद्धति मोडणें, कॉर्सिरा व कॉरिंथमधील लढा व अथेन्सचे कार्सिराच्या वाजूनें ढवळाढवळ हीं पेलोपोनेशियन युद्धांत ( ख्रि. पू. ४३१–४०४ ) येतात. ख्रि. पू. ३१२ त हें इलिरियन राजा ग्लासियस याच्या ताव्यांत आलें व नंतर रोमन लोकांनीं हस्तगत करून घेतलें. याच वेळीं याला डायरॅचियम हें रोमन नांव मिळालें. या वेळेपासून एपिडॅमनस (डुराझो )चा उदय झाला. येथेंच रोमन सैन्य नेहमीं जहाजांतून उतरत असे. याच्या भोंवतीं मोठाल्या दलदली असल्यानें हें शहर अजिंक्य झालें होतें. ख्रि. पू ४८ त येथें पांपेनें सीझरचा प्रतिकार केला म्हणून याची प्रसिद्धि आहे. ॲक्टियमच्या युद्धानंतर ( ख्रि. पू. ३१ ) ऑगस्टसनें आपल्या कसलेल्या सैनिकांस हें शहर वसाहत करण्यास दिलें. नंतर हें व्यापाराचें मोठें केन्द्र झालें. ४ थ्या शतकाच्या अखेरीस याच्या अभ्युदयाचा पराकाष्ठा होऊन हें पायरस नोव्हाची राजधानी वनलें. पूर्वेकडील रोमन वादशहा थिओडोरस यानें ४८१ सालीं या शहराला वेढा दिला. १० व्या व ११ व्या शतकांत ह्या शहराला वल्गेरियन लोकांपासून स्वतःचें रक्षण करावें लागलें. १२७३ सालीं भूकंपानें हें शहर अगदीं जमीनदोस्त झालें. नंतर लवकरच सुधारून याची स्वतंत्र जहागीर वनली. १३३३ सालीं एकिआ, १३३६ सालीं सर्व्हिया व स. १३९४ त व्हेनिस यांच्या ताव्यांत हें शहर गेलें. व १५०१ सालीं हें तुर्कांच्या ताव्यांत आलें.

**डूमास**—हा फ्रेंच रसायनशास्त्रज्ञ अले येथें १५ जुलै सन १८०० त जन्मला. आरमारखात्यांत शिरण्याचा

त्याचा प्रयत्न निष्फळ झाल्यामुळें, तो एका गांवांत एका औषधविक्याच्या दुकानीं उमेदवार राहिला. परंतु त्या धंद्यांत यश येण्याची उमेद न दिसल्यामुळें तो जीनीवा येथें गेला.तेथें त्यानें पदार्थविज्ञानशास्त्रावर एम. ए. पिक्टेट याचीं, रसायनशास्त्रावर सी. जी. डी लारिव्ह याचीं व वनस्पतिशास्त्रावर ए. पी. डी. कंडोल याचीं व्याख्यानें ऐकिलीं व लवकरच पिरो प्रिव्होस्ट याजबरोबर त्यानें प्राणिगुणधर्मासंबंधीं रसायनशास्त्रांत शोध सुरू केले. १८२३ सालीं ए. व्हॉन हुंबोल्ट याच्या सल्ल्यावरून त्यानें जीनीवा शहर सोडलें व पॅरिस शहरीं आला. तेथेंच तो जन्मभर होता. तेथें त्याची तेथील कित्येक शास्त्रज्ञ लोकांशीं मैत्री जमली. त्यानें तेथें लवकरच नांव मिळविलें व दहा वर्षांच्या अंतं तो शास्त्रविद्यापीठाचा सभासद झाला. वयाच्या पन्नासाव्या वर्षाच्या सुमारास तो राजकारणांत शिरला व राष्ट्रीय कायदे करणाऱ्या मंडळीचा सभासद झाला. १८५० ते १८५१ सालांच्या सुमारास कांहीं महिने तो व्यापार व शेतकीखात्याचा प्रधान झाला होता. नंतर लवकरच सिनेटर, पॅरिस म्युनिसिपालिटीचा अध्यक्ष व फ्रेंच टांकसाळीचा तो मुख्य झाला. परंतु दुसऱ्या साम्राज्याच्या ऱ्हासाबरोबर याच्या राजकीय कारकीर्दीचाहि अंत झाला. हा ता. ११ एप्रिल १८८४ रोजीं कॅन्नी येथें मरण पावला.

एकोणिसाव्या शतकांतील प्रमुख शास्त्रज्ञांत याची गणना होते. बर्झेलियसच्या विद्युद्रसायनवादावर टीका करणारा हा पहिला गृहस्थ होय. त्याच्या कल्पनेचा त्यावेळेस फार प्रसार झालेला होता व तीच कल्पना खरी अशी लोकांची समजूत होती. त्याच्या धंगी कल्पनेच्या विरुद्ध यानें आपलें एकांगी मत प्रसिद्ध केलें. संयुक्त द्रव्यांत अणूंची अदलाबदल होऊं शकते हें यानें प्रथम ठरविलें. याच्या सिध्यर्थ त्यानें पुष्कळ प्रयोग केले व त्यांतच सिरकाम्लांत उज्जाणूंऐवजीं हरवायूचे अणू घालून त्यानें त्रिहरसिकाम्ल तयार करून दाखविला. १८२६ सालीं त्यानें एक निबंध प्रसिद्ध केला. त्यांत त्यानें वाफेचें वि. गुरुत्व मोजण्याची नवीन व उपयुक्त पद्धति दाखविली व तिच्या साहाय्यानें कर्ब व प्राणवायु यांचे अणुभारांक तपासून पाहिले व १८४८ सालीं जवळ जवळ ३० मूलद्रव्यांचे अणुभारांक तपासून नवी यादी प्रसिद्ध केली. तसेंच प्राणिज पदार्थांतील नत्रवायूचें प्रमाण काढण्याकरतां प्राणिज पदार्थांचें परिमाणदृष्ट्या पृथक्करण करण्याची रीत त्यानें शोधून काढली. प्राणिजपदार्थांचें वर्गीकरण त्यानेंच केलें.

डूमास हा हुषार लेखक होता. त्याची पुस्तकें, निबंध, मानपत्रांचे नमुने वगैरे लिहिण्याची पद्धत फार सुंदर असे. व्यावहारिक रसायनशास्त्रावर त्यानें आठ ग्रंथ लिहिले. पैकीं पहिला १८२८ सालीं प्रसिद्ध केला व शेवटचा त्यानंतर वीस वर्षांनीं प्रसिद्ध केला. जे. बी. जे. डी. बोसिंगॉल्ट याच्या मदतीनें त्यानें प्राणी व वनस्पती यांच्या मदतीनें रसायनशास्त्र लिहिलें. त्यासंबंधीं त्याचा व लीबिक याचा थोडा मतभेद होता. १८४० सालापासून तो पदार्थविज्ञान व रसायनशास्त्र यांचा इतिहास या पत्रकाचा संपादक होता. शिक्षक या दृष्टीनेंहि डूमास याचीं रसायनशास्त्रावरील शुद्ध व व्यावहारिक व्याख्यानें फार महत्त्वाचीं असत शिक्षणांत प्रयोगशाळेचें महत्त्व व उपयुक्तता जाणणारांपैकीं हा एक होता.

**डूरिअन**—हें फळ मलाया व तेनासरीम प्रांतांतलें असून त्याची लागवड दक्षिण ब्रह्मदेश व सीलोन या देशांत होते. हें झाड फार मोठें असून त्याची लागवड बियांपासून करतात. फळाला फणसासारखा अतिशय उग्र वास येतो; व तो पुष्कळ लोकांना मुळींच सहन होत नाहीं. पण फळाची एकदां गोडी लागली म्हणजे यासारखें दुसरें फळ नाहीं असें वाटूं लागतें. हें फळ ब्रह्मी व सिलोनी लोकांना फार आवडतें. याचीं झाडें इकडे आणून लावण्याचा प्रयत्न झाला परंतु अद्याप या कामीं फारसें यश आलें नाहीं.

**डूलचेन्यो**—अल्बेनियन सरहद्दीपासून ८ मैलांवर आड्रियाटिक समुद्राच्या किनाऱ्यावर डूलचेन्यो हें मांटेनिग्रोमध्यें बंदर आहे. मांटेनिग्रोंतील शहरांत हें सर्वांत सुंदर आहे. येथील लोकसंख्या सन १९०० मध्यें सुमारें ५००० होती. येथील बाजार, मशिदी, लहान मनोरे व बुरख्यांतील बायका पाहून हें शहर तुर्कांचें असावें असें वाटतें. या शहरांत पुष्कळशी वस्ती तुर्कांची आहे.येथें रोमनकॅथोलिक देवालय आहे. या ठिकाणीं निवाऱ्याची जागा नाहीं.

इ. स. पूर्व १६७ सालीं रोमन लोकांनीं हें घेतलें. ते याला अलसिनियम् म्हणत. मध्ययुगांत हें चांचे लोकांच्या उपद्रवामुळें प्रसिद्ध होतें. स. १८८० पर्यंत हें तुर्कांच्या ताब्यांत होतें. १८७८ च्या बर्लिनच्या तहाप्रमाणें १८८० मध्यें मांटिनिग्रोकडे हें आलें.

**डूलाँग**—हा फ्रेंच पदार्थविज्ञान व रसायनशास्त्रज्ञ रूआं येथें ता. १२ ( किंवा १३ ) फेब्रुवारी १७८५ रोजीं जन्मला. प्रथम तो पॅरिसच्या एका भागांत वैद्याचा धंदा करीत असे. परंतु लवकरच त्यानें तो धंदा सोडून शास्त्रीय शोधांकडे आपली दृष्टि वळवली. तो बर्थोलेच्या हाताखालीं कांहीं दिवस शिकला व मग अल्फर्ट येथें रसायनशाळेंत व शिक्षकशाळेंत त्याला अध्यापकाची जागा मिळाली. लवकरच १८२० त एकोल पोलिटेक्निक येथें त्याला अध्यापकाची जागा मिळाली व तेथेंच तो पुढें डायरेक्टर झाला ( स. १८३० ). तो पॅरिस येथें ता. १८ ( किंवा १९ ) जुलै १८३८ रोजीं मरण पावला.

त्यानें प्रथम रसायनशास्त्रांतच शोध सुरू केले. १८११ त नत्रहरिद त्यानें शोधून काढलें. तो प्रयोग करीत असतां दोन वेळ स्फोट झाला. त्यामुळें त्याचा एक डोळा गेला व त्याच्या एका हातासहि जबर दुखापत झाली. यानें स्फुर व नत्र यांच्या प्राणिदांचा शोध लावला व प्रत्येक अम्लांत उज्ज असलाच पाहिजे ही गोष्ट त्यानेंच प्रथम निदर्शनास

आणली. १८१५ सालीं एकोल येथील अध्यापक अलेक्सिस थेरीसी पेटिट ( १७९१-१८२० ) याच्या मदतीनें पान्याचें उष्णमानमापकयंत्र व हवेचें उष्णमानमापक यंत्र यांची तुलना केली. घन, द्रव व वायुरूप पदार्थांच्या प्रसरणाविषयीं व उष्णमानमापन यंत्र योग्य करण्याविषयीं त्यानें पुष्कळ प्रयोग केले. पेटिट व डूलॉंग यांनीं १८१९ त "उष्णतेच्या कल्पनेविषयीं महत्त्वाचे मुद्दे" हा निबंध प्रसिद्ध केला. त्यांत त्यांनीं असें दर्शविलें कीं, "सर्व मूलद्रव्यांच्या अणूंची विशिष्ट उष्णता सारखीच असते." याला डूलॉंग व पेटिट यांचा नियम असें म्हणतात. १८२० त बर्झेलियस बरोबर "पाण्याच्या घटनेचें प्रमाण व स्थितिस्थापक द्रवपदार्थांचें विशिष्टगुरुत्व" यांविषयीं शोध लावले. १८२६ मध्यें वायूंची प्रकाशवक्रीकरणाची शक्ति व १८२९ मध्यें वायूंचें वि. गुरुत्व हें त्यानें ठरविलें. सन १८३० मध्यें त्यानें अरॅगो-बरोबर प्रयोग करून "उष्णमान वाढलें असतां वाफेंत स्थितिस्थापकत्व येतें" हा शोध लाविला. याकरितां त्यानें ८ मिटर लांब व ५ मिलिमिटर रुंदीच्या १३ कांचेच्या नळ्या पान्यानें भरून एक यंत्र तयार केलें. या यंत्राचा उद्देश भार वाढविला असतां हवेच्या आकारमानांत काय फरक पडतो हें पाहण्याचा होता व या यंत्रानें 'हवेच्या दावाच्या २७ पट दाव वाढविला असतां बॉइलचा नियम लागू पडतो' असें निष्पन्न झालें. हेच नियम वाफेला ( पाण्याच्या ) लागू आहेत किंवा नाहींत हें पहावयाचें होतें परंतु ती जागा मोडकळीस आली असल्यामुळें स्फोट झाल्यास कोसळून पडेल या भीतीनें तें यंत्र तेथून वेधशाळेंत नेण्यांत आलें. प्रथम हवेच्या दावाच्या तीसपट दाव वाढविण्याचा विचार होता, परंतु २४ पट वाढविल्यानंतर जास्त वाढविणें शक्य नसल्यामुळें तो प्रयत्न सोडून द्यावा लागला.

डूलॉंगच्या मरणानंतर १८३८ त त्याचे कांहीं कागदपत्र प्रसिद्ध झाले. त्यांत पदार्थांचा संयोग होतांना बाहेर पड-लेल्या उष्णतेसंबंधीं प्रयोगाचें वर्णन आहे व त्यानें उपयोगांत आणलेल्या उष्णतामापक यंत्राची( कॅलोरिमीटर) हि माहिती आहे.

**डेकॅपोलिस**—हा दहा शहरांचा एक संघ असून एका-खेरीज सर्व शहरें जार्डन व टायबेरियस समुद्रावर आहेत. दहा शहरांचीं नांवें:—दमास्कस, फिलाडेल्फिया, रॅफाना, स्कायथोपोलिस (वेथशान-सध्या वैसन--जॉर्डनच्या पश्चिमेस), गॅडारा, हायपॉस, डायन,पेल्ला,जेरेसा आणि कॅनाथा. यांपैकीं दमास्कसचें महत्व अजून कायम आहे. स्कायथोपोलिस हें ग्रीक शहरांचा समुद्रावर जाण्याचा जो मार्ग होता त्यावर असल्यामुळें फार महत्वाचें गणलें जाई. या संघाचा उद्देश दोन जातींपासून संरक्षण करणें हा होता. पांपेच्या ( ख्रिस्त पूर्व ६४-६३ ) स्वाऱ्यांनंतर हा संघ अस्तित्वांत आला. हा संघ सीरियाच्या सुभेदाराच्या स्वामित्वाखालीं होता.

**डेकार्टे** ( १५९६-१६५० )— हा फ्रेंच तत्त्ववेत्ता पॉईटर्सनजीक लाहे येथें १५९६ मार्च ३१ रोजीं जन्मला. लाफ्लीच येथें जेसुइट पंथाच्या शाळेंत त्याचें शिक्षण झालें. त्यानें लष्करी शिक्षणहि घेतलें, नंतर तो पॅरिसला गेला व तेथें एका प्रसिद्ध गणितज्ञाजवळ गणितविषयाचा अभ्यास करूं लागला, पण लवकरच फ्रान्समध्यें राजकीय धामधूम उडाल्यामुळें तो पॅरिस सोडून नेदर्लंड्सला गेला. तेथें कांहीं वर्षे राहून नंतर बव्हेरियामध्यें सैन्यामध्यें नोकरी करून नंतर स्वित्झर्लंडमध्यें व इटालींत प्रवास करून परत १६२५ सालीं पॅरिसमध्यें तो येऊन राहिला. आतांपर्यंत चालविलेला गणिताचा अभ्यास सोडून देऊन तो प्रकाशादि पदार्थविज्ञानशास्त्राचा अभ्यास करूं लागला; आणि शेवटीं सत्यसंशोधन करण्यांतच सर्व आयुष्य घालविण्याचें ठरवून तो हालंडमध्यें कायमच जाऊन राहिला. प्रत्यक्ष प्रयोग व विचार यांमध्यें त्याचें आयुष्य गेलें. शास्त्रांना तो झाडाची उपमा देत असे. झाडाचें जें मूळ तें अध्यात्मशास्त्र, बुंधा पदार्थविज्ञान आणि मुख्य तीन खांद्या यंत्रशास्त्र,औषधिशास्त्र,व नीतिशास्त्र या होत. १६३३ त त्यानें 'जग' हें पुस्तक लिहून तयार केलें, परंतु नुकत्याच ग्यालिलिओच्या पुस्तकाच्या प्रती रोममध्यें जाळून टाकून त्याला शिक्षा झालेली ऐकल्यामुळें त्यानें आपलें पुस्तक छाप-विण्याचा बेत रहित केला. तथापि पॅरिसमधील विद्वानापुढें तो आपलीं मतें मांडीत असे; त्यांवर कडाक्याचे वादविवाद होत, आणि कित्येक वेळां मॅजिस्ट्रेटकडून, धर्मोपदेशकांकडून व मत्सरी विद्वानांकडून त्याला त्रास पोहोंचे. स.१६४४ मध्यें त्यानें आपला 'तत्त्वज्ञानाचे सिद्धान्त' हा ग्रंथ प्रसिद्ध केला व फ्रान्सप्रमाणें डेन्मार्क, स्वीडन, इटली ह्या देशांत हळूहळू त्याचीं मतें प्रसार व मान्यता पावूं लागलीं. स.१६४९ मध्यें स्वीडनमध्यें येण्याबद्दल तेथील दरबारांतून आग्रहाचें निमंत्रण आल्यामुळें तो तिकडे स्टाकहोमला गेला. तेथील राणीनें नवीन सुरू व्हावयाच्या शास्त्रीय विद्यालयाकरितां कोड तयार करण्याचें, व स्वतःला दररोज एक तास तत्वज्ञान शिकविण्याचें काम डेकार्टेला सांगितलें, व लवकरच त्याला मोठी जहागीर देऊन 'नोबल' म्हणजे सरदार करण्याचें ठरविलें. परंतु दुर्दैवानें तेथील हवेमुळें तो आजारी पडून त्यांतच १ फेब्रुवारी १६५० रोजीं मरण पावला. डेकार्टेनें विवाह केलाच नाहीं, व त्याला भोगेच्छाहि विशेष नसे. डेकार्टे हा बुद्धिप्रामाण्यवादीपंथाचा आद्यप्रवर्तक होय.

**डेडिआगॅच**—डेडिआगॅच हें यूरोपियन तुर्कस्तानांतील बंदर आहे. हें आड्रियानोपल विभागामध्यें असून इनोसच्या आखातावर आहे. याची लोकसंख्या सुमारें (१९०५) ३००० असून बहुतेक ग्रीक लोकांची वस्ती आहे.स. १८७१पर्यंत येथें नुसत्या कोळ्यांच्या झोंपड्या होत्या. नंतर नवीन शहराची रचना होण्यास सुरवात झाली. जवळच व्हॅलोनिया ओक झाडांचीं अरण्यें असल्यानें येथील व्यापार वाढेल अशी

कल्पना होती. १८७३ सालीं याला काझादजी प्राप्त होऊन कैमाकमचा नेमणूक झाली. १८८४ त याचें नांव संजाक पडलें. कॉन्स्टांटिनोपल-सॅलोनिका रेलवे सुरू झाल्यामुळें येथें स्टेशन झालें व इनॉस येथील व्यापार डेडिआगॅचहून होऊं लागला. परंतु काळ्या समुद्रावर बर्गास येथें रेल्वे झाल्यामुळें येथील दांडगा व्यापार अगदीं कमी झाला. येथील बंदरांत सुरक्षित ठिकाण नाहीं. सध्यां आड्रियानोपल, डेमोटिका व झांती येथील धान्य याच बंदरांतून रवाना होतें. व्हॅलोनिया ओकाचा व्यापार वाढला असून त्याच्या बरोबर इमारतीचें लांकूड व बदाम यांचा व्यापार चालतो. १८७१ सालीं घरांचे पाये खणतांना बरींच थडगीं आढळलीं; हे प्राचीन ग्रीकांच्या स्मशानभूमीचे अवशेष नसून १५ व्या शतकांत येथें असलेल्या डेडे पंथाच्या दरवेशांचीं थडगीं असावींत.

**डेन्मार्क**—डेन्मार्कचें राज्य हें द्वीपकल्प, बाल्टिक समुद्र व उत्तर समुद्र यांनां वेगळें करणारीं बेटें यांचें बनलेलें आहे. हें राज्य उ. अ. ५४°३३′ ते ५७ ° ४५′ व पू. रे. ८°४′–५४″ ते १२ ° ४७′–२५″ यांच्या दरम्यान आहे. द्वीपकल्प हें डेन्मार्क व जर्मनी या दोघांचें आहे. डॅनिश भाग उत्तरेकडचा असून मोठा आहे व त्याला जटलंड म्हणतात. व्हर्सेलिसच्या तहानें उत्तर स्लेस्विग हा प्रांत डेन्मार्कच्या ताब्यांत आल्यामुळें डेन्मार्कचें क्षेत्रफळ १९२० सालीं १६९५८ चौ. मैल होतें; याशिवाय डेन्मार्कच्या ताब्यांतील फेरोज व ग्रीनलंड या प्रदेशांचें क्षेत्रफळ निराळेंच. डेन्मार्कच्या भूपृष्ठभागांत फारच थोडें वैचित्र्य आहे. हा प्रदेश सर्वसाधारणपणें सखल आहे, परंतु हॉलंडप्रमाणें समुद्रसपाटीच्या खालीं नाहीं. समुद्रकिनाऱ्याजवळचा प्रदेश उंच असून आंतील भाग सपाट आहे. प्रदेश सुपीक आहे. त्यांत "बीच" वृक्षांचीं रानें, लागवडी शेतें व कुरणें आहेत. लहान सरोवरें पुष्कळ आहेत. एरेसो व एस्रोम्सो या नांवाचीं दोन मोठीं सरोवरें आहेत. गुडेना ही या देशांतील मोठी नदी होय. समुद्रकिनारा सखल व वालुकामय आहे.

मुख्य खंडावरील या देशाचा भाग जटलंट हाच होय. फ्युनेन, झीलंड व त्यांच्या लगतचीं बेटें असे दोन बेटांचे विभाग आहेत. हीं बेटें सुपीक असून तेथें चांगली लागवड केलेली आहे. एरोस्कजोबिंग, रुडक्जोबिंग व लॅंगलॅंड हीं येथील मुख्य बंदरें होत. फ्युनेनमधील शहरें समुद्रकिनाऱ्यावर आहेत. ओडेन्स हें मुख्य शहर गणलें जातें. नायबोर्ग, स्व्हेंडबोर्ग, फाबोर्ग, आसेन्स, मिडलफार्ट, बोजेन्स, हीं इतर शहरें आहेत. ओडेन्सहून या सर्व शहरांनां रेल्वे गेली आहे. झीलंड व फ्युनेन यांच्यामध्यें "ग्रेटबेल्ट" आहे. झीलंड अथवा सीलंड हें दक्षिणोत्तर ८० मैल व पूर्वपश्चिम ६८ मैल आहे. याचा किनारा फोर्डनीं दुभागलेला आहे. राजधानीचें शहर कोपनहेगन, व रोस्किल्डे, स्लगेल्स, कॉर्सार, नीस्टव्हेड व एल्सिनोर हीं इतर शहरें या बेटांत आहेत. फाल्स्टरवर नायकजोबिंग हें बंदर आहे, येथून ३ मैल लांब असा एक पूल लालंड बेटापर्यंत आहे. मारिबो, सॅक्सजोबिंग व रॉड्बी हीं इतर शहरें आहेत. बोर्नहोम बेट या द्वीपसमूहाच्या जवळच्या टोंकाच्या पूर्वेस ८६ मैलांवर आहे.

भू स्त र व र्ण न.—डेन्मार्कचा भूपृष्ठभाग साधारणतः "बोल्डरक्ले"चा बनलेला आहे. 'हिमप्रलयकालांत' नॉर्वेजियन पर्वतांवरील बर्फामुळें हे बोल्डरक्लेचे प्रदेश बनलेले आहेत. यांचे थर नाहींत; परंतु पाण्याची त्यांच्यावर क्रिया घडून हे थर बनले आहेत. यांपैकीं कांहीं थर माती व आर्टिकमहासागरांतील प्राण्यांचे अवशेष भाग यांचे बनलेले आहेत व कांहीं फार विस्तीर्ण थर, वाळू व मुरूम यांचे बनलेले आहेत. "क्रेटेशस" (खडूच्या) काळाच्या अंतानंतर डेन्मार्कचे कांहीं भाग समुद्रसपाटीच्या वर आलेले आहेत असें समजतात, परंतु सर्वसाधारणपणें हिमप्रलयकाळ संपेपर्यंत समुद्रसपाटीच्या वर फारसा भाग नसावा.

ह वा, व न स्प ती व प्रा णी.—डेन्मार्कची हवा त्याच अक्षांशांतील ग्रेटब्रिटन येथील प्रदेशांतील हवेपेक्षां फारशी निराळी नाहीं, परंतु उन्हाळा व हिंवाळा हे थोडेसे जास्त कडक असतात; वास्तव हिंवाळ्यांत इंग्लिश बगीच्यांत जे पदार्थ पिकतात ते उघड्या डेन्मार्कमध्यें होत नाहींत. जुलै ते नोव्हेंबरपर्यंत पाऊस पडतो. उन्हाळ्यांत वादळें होतात. बेटांत व पूर्व किनाऱ्यावर उत्तर यूरोपांतील सर्वसाधारण झाडें होतात व हीथवर व अटलांटिक महासागराच्या लगतच्या वालुकामय टेंकड्यावर निरनिराळ्या प्रकारच्या वनस्पती होतात. येथील जंगलांत बीच झाडें होतात. ओक, अॅश व एल्म हे क्वचितच सांपडतात. परंतु फर व पाइन झाडें विपुल आहेत. बोर्नहोम बेटांत पाइन, बर्च व अॅश हीं झाडें पुष्कळ आहेत. डेन्मार्कमध्यें बाकीच्या मध्य यूरोपांत सांपडणारे पशु-पक्षी सांपडतात. मोठे चतुष्पाद प्राणी नाहींसे झाले आहेत. वकऱ्यांशिवाय इतर माणसाळलेले प्राणी येथें अनेक आहेत. समुद्रामध्यें मासे धरणें हा तेथील लोकांचा फार महत्त्वाचा धंदा आहे. कालवे( ऑइस्टर ) कोठें कोठें सांपडतात. गुडेना हीच एकटी सामन नांवाचे मासे असलेली नदी आहे.

लो क सं ख्या.—१९२० सालीं डेन्मार्कची लोकसंख्या ३२ लक्ष होती. जटलंडमध्यें एका चौरस मैलास १०९ व इतर बेटांत एका चौरस मैलास २७२·९५ असें लोकसंख्येचें मान ( १९०१ ) होतें. डेन्स लोक पिवळ्या केसाचे निळ्या डोळ्यांचे, व मध्यम बांध्याचे आहेत. हे टयुटॉनिक वंशाचे असून स्कँडेनेव्हियन लोकांशीं यांचें बरेंच साम्य आहे स्विडिश लोकांपेक्षां यांची राहणी उत्तरेकडील जर्मन लोकांशीं अधिक सदृश आहे. पुष्कळ शेतकरी जमीनीचे मालक असल्यामुळें हे लोक बहुधा निष्काळजी असतात. हे कांहींसे मंद व अनिश्चित असतात. परंतु राजकीय विषयांत बरेंच लक्ष घालतात. डेन्स लोक फार देशाभिमानी

आहेत. वेस्ट इंडियन बेटें खेरीजकरून सर्व भागांत स्कँडिनेव्हियन भाषा बोलतात. पुरुषांपेक्षां बायकांचें प्रमाण१००० : १०५२ या प्रमाणांत जास्त आहे, त्यामुळें अनौरस संततीचें प्रमाण मोठें आहे. कोपनहेगन येथें तर शेंकडा २० मुलें अनौरस असतात.

दळणवळणाचे मार्ग.—येथील रस्ते रुंद व चांगले आहेत. रेल्वे बहुतेक चोहोंकडे आहे. स्लेस्विगहून सरहद्दीमधून दोन रेल्वेचे रस्ते डेन्मार्कमध्यें येतात. मुख्य डॅनिश रस्ते दोन तीन आहेत. लहान लहान बेटांमध्यें 'स्टीमफेरी' (वाफेनें चालणाऱ्या बोटी) आहेत. बहुतेक बाल्टिक समुद्रावरील बंदरें व कोपनहेगन यांच्यामध्यें दळणवळण आहे. स्वीडन व डेन्मार्क यांचें दळणवळण कोपनहेगन व मालमो आणि एल्सिनोर व हेल्सिंगबोर्ग यांच्या दरम्यानच्या साउंडवरील फेरींच्या योगानें चालतें. तारखातें व टेलिफोनखातें यांचें काम व व्यवस्था डाकखात्याकडे आहे.

शेती.—शेतकी हा येथील मुख्य धंदा आहे. ⅔ लोक या धंद्यावर उपजीविका करतात. देशांतील जमीनीपैकीं शेंकडा ७४ इतकी शेतकीकडे जमीन आहे. पैकीं ⅓ जमीनीवर कुरणें आहेत. मुख्य पिकें ओट, जव, राय व गहूं आहेत. बीट फार विपुल पिकतें. १९ व्या शतकाच्या उत्तरार्धापासून दूधदुभत्याचा धंदा फारच वाढला आहे व शास्त्रीय पद्धति व यंत्रें यांच्या सहाय्यानें हा धंदा या देशांत पूर्णावस्थेस जाऊन पोहोंचला आहे. लोणी काढणें, कोंबडीं व बदकें पाळणें व डुकरें वाढविणें हे येथील धंदे आहेत. जंगली ससे फार सांपडत नाहींत. पाळीव ससे बाहेरदेशीं पाठवितात. या देशांतील क्षेत्रफळाच्या शेंकडा ७ एवढा भाग जंगलमय आहे. झाडें तोडण्याची मनाई आहे.

इ. सन १९१९ मध्यें शेतकीसंबंधानें पुष्कळ कायदे करण्यांत आले; व सरकारच्या ताब्यांत ज्या जमीनी होत्या त्यांचे तुकडे पाडण्यात येऊन ते खंडानें लोकांनां देण्यांत आले. महायुद्धाच्या पूर्वी डेन्मार्कमधून पुष्कळ धान्य परदेशीं जात असे. महायुद्ध सुरू झाल्यानंतर डेन्मार्कमध्यें कच्चा माल फारसा येईनासा झाला, त्यामुळें शेतकीचा धंदा थोडासा बसला पण १९१८सालानंतर पुन्हां शेतकीला ऊर्जितावस्था प्राप्त झाली. १९११ सालीं लोण्याच्या निर्गतीसंबंधानें एक कायदा करण्यांत येऊन, बाहेर जाणाऱ्या लोण्याला सरकारी परवानगी घेतली पाहिजे असें ठरविण्यांत आलें

इतर धंदे.—खनिज द्रव्यांच्या बाबतींत हा देश फार दरिद्री आहे. या देशांत निरनिराळ्या प्रकारची चिकणमाती सांपडते. बोर्नहोम बेटांमध्यें अति मऊ दगड व संगमरवरी दगड यांच्या खाणी आहेत. येथील कारखान्यांत स्थानिक गरजा पुरविण्यापुरता माल उत्पन्न होतो. मोठ्या कारखान्यांत एंजिनें व लोखंडी जहाजें तयार करतात. लोंकरीचें कापड, कापसाचें कापड, तागाचें कापड, साखर शुद्ध करणें, कागदाच्या गिरण्या, कलालीं भट्या व दारू गाळण्याचे कारखाने हे इतर धंदे आहेत. मातीचीं भांडी करणें हा त्यांचा फार महत्त्वाचा धंदा आहे. या देशांत मजूरसंघ आहेत व वारंवार संप होतात.

उद्योगधंदे.—डेन्मार्कमध्यें कोळसा फार कमी उत्पन्न होत असल्यामुळें त्याच्या साहाय्यानें जे धंदे चालूं शकतात ते धंदे डेन्मार्कमध्यें चांगल्या रीतीनें चालणें शक्य नाहीं. कातड्याचा कारखाना, सीमेंट, मार्गराइन, तंबाखू, स्पिरिट, साखर, बीर, तेल, काड्याच्या पेट्या, कागद, शेतकीला लागणारीं यंत्रें इत्यादि जिन्नस तयार करण्याचे कारखाने डेन्मार्कमध्यें आहेत. १९१९ सालीं डेन्मार्कमध्यें ९९४ जॉईंटस्टॉक कंपन्या होत्या. १९१९ सालच्या अखेरीस, डेन्मार्कमध्यें दर्यावरील गलबतांची संख्या १५,८४ होती. १९२० सालीं डेन्मार्कमध्यें ३१४२ दशलक्ष क्रौन किंमतीच्या मालाची आयात व १८१४ दशलक्षाच्या किंमतीची निर्गत झाली.

व्यापार.—पूर्वी डेन्मार्कचे व्यापारी-कायदे असे होते कीं बाहेरील देशांतून आणलेला माल जकातीच्या अधिकाऱ्यांच्या हवालीं करावा लागे, तेथें तो जाहीर लिलांवानें विकला जात असे व माल मागवणाराला जकात वजा जातां बाकीची किंमत मिळत असे. याशिवाय देशांतील कर होतेच व रस्ते चांगले नसल्यामुळें व्यापाराची वाढ होत नव्हती. तथापि १९ व्या शतकांत डेन्मार्क व इतर यूरोपियन राष्ट्रें यांच्यामध्यें अनेक व्यापारी तह होऊन डॅनिश जकातीचें व करांचें प्रमाण बरेंच नियमित व सैल करण्यांत आलें.

साऊंडमधून जाणाऱ्या जहाजांवर कर घेण्याचा जो हक्क त्याबद्दल पुष्कळ शतकें वाद व तंटा चालला होता. पण त्या प्रश्नाचा निकाल लागून १८५७ सालीं हे कर उठविण्यांत आले. डेन्मार्कचा मुख्य व्यापार म्हणजे देशांत माल पैदा करणें व त्याचा देशांतच व्यय करणें हा होय; परंतु बाहेरदेशीं फिरून परत पाठविण्याच्या इरादानें कांहीं माल परदेशाहून येतो, व या बाबतींत सरकारनें फ्रीपोर्ट व कोपनहेगन येथील वखारी यांनां सवलती दिल्या आहेत. या देशांतून बाहेरदेशीं खाण्याचे पदार्थ रवाना होतात. यांमध्यें लोणी विशेष महत्त्वाचा पदार्थ आहे. डेन्मार्कची या पदार्थाबद्दल ख्याति आहे. इतर जिन्नस मॅर्गराइन, बेकन (डुकराचें मांस) व अंडीं वगैरे होत. भाजीपाला, लोंकर, हाडें, चरबी, दुभत्याचीं यंत्रें व सीमेंट हे कमी महत्त्वाचे पदार्थ बाहेरदेशीं पाठवितात. गुरें व बकऱ्याचें मांसहि पाठवितात. इमारतीचें लांकूड, कोळसा, खनिज पदार्थ हीं बाहेरदेशांहून मागवितात.

डेन्मार्कचा आयात व्यापार जर्मनी, ग्रेटब्रिटन व अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें यांशीं चालतो; व निर्गत व्यापार ग्रेटब्रिटन, जर्मनी व स्वीडन या देशांबरोबर चालतो. ४ मे १९०७ च्या कायद्यान्वयें मिट्रिकसिस्टिमचीं वजनें व मापें सरकारीरीत्या तीन वर्षांत व लौकिकरीत्या पांच वर्षांत व्यवहारांत वापरलीं जावींत असें ठरलें.

पैसा व पेढ्या.—डॅनिश मुख्य नाणें क्रोन ( क्राऊन ) म्हणजे एक शिलिंग ११/३ पेन्स आहे. याचे १०० ओर होतात ७१/२ ओर म्हणजे एक पेन्स. २० व १० क्रोनचीं सोन्याचीं नाणीं पडण्यांत आलीं होतीं परंतु लोकांनां बँक नोटा फार पसंत आहेत. कोपनहेगन येथील नॅशनल बँक ही मुख्य पेढी असून हिला नोटा काढण्याचा अधिकार आहे. या नोटा १०, ५०, १०० व ५०० क्रोन किंमतीच्या असतात. डॅन्स्की लँडमॅंड्स बँक, हँडेल्स बँक, प्रायव्हेट बँक या इतर कोपनहेगन येथील पेढ्या आहेत प्रांतिक पेढ्याहि पुष्कळ आहेत. या पेढ्या सेव्हिंग बँक्सहि आहेत. यांचा व्याजाचा दर शें.३॥ते ४ आहे. याशिवाय परस्पर सहकारी पतपेढ्या आहेत; त्यांमधून गहाणावर कर्ज मिळतें. सर्व गहाणखतें नोंदलीं पाहिजेत असा या देशाचा कायदा आहे. परंतु ही पद्धत फार सोपी आहे. यामुळें या देशाची फार सुधारणा झाली आहे. सर्व प्रकारचे विमे उतरणाऱ्या कंपन्या येथें आहेत. आयुष्याचा विमा उतरण्याची सर्वांत मोठी कचेरी सरकारी आहे. ९ एप्रिल १८९१ च्या कायद्यान्वयें ६० वर्षांच्या वरील वयाच्या लोकांकरितां म्हातारपणीं पेन्शन देण्याची एक पद्धत काढण्यांत आली.

राज्यव्यवस्था.—येथील राज्यव्यवस्था नियंत्रित राजसत्ताक पद्धतीची आहे. राजाची सत्ता पार्लमेंट(रिग्स्डॅग्) नें नियंत्रित केलेली असते. याचे दोन विभाग आहेत. ( १ ) लँड्स्थिंग् व ( २ ) फोकथिंग्; परंतु यांच्या रचनेमध्यें मोठासा फरक नसतो. राज्यकारभारयंत्रांतील पुराणमतवादी लोकांचें लँडस्थिंग बनलेलें असतें. फोकथिंगमधील १४० सभासद चार वर्षांकरितां निवडलेले असतात. मताचा अधिकार २५ वर्षें वयाच्या प्रत्येक स्त्रीपुरुषास आहे. लँडस्थिंगमधील ७२ सभासदांपैकीं १८ जणांनां जुने प्रतिनिधी निवडतात. बाकीचे ५४ आठ वर्षांकरितां डेप्युटी इलेक्टर लोकांचे प्रतिनिधी म्हणून निवडलेले असतात. या दोन्ही विभागांतील प्रत्येक उमेदवाराचें वय २५ हून जास्त असलें पाहिजे व प्रत्येकाला पार्लमेंटची बैठक सुरू असतांना दररोज १५ क्रोन व प्रवासखर्च देतात. फोकथिंकची पद्धत अशी आहे कीं प्रत्येक १६००० रहिवाशांबद्दल एक सभासद घ्यावयाचा. रॅडिकल, लिबरल, कॉंझर्व्हेटिव्ह, सोशॅलिस्ट व इंडिपेंडंट असे पांच राजकीय पक्ष आहेत. हें पार्लमेंट दरवर्षी आक्टोबर महिन्याच्या पहिल्या मंगळवारीं सुरू होतें. यांत बजेटवर वादविवाद होतो. जकात, अबकारी, जमीनमहसूल, घरपट्टी, स्टॅम्प, रेल्वे, कोर्टांची फी, सरकारी लॉटरी व मृत्युकर या उत्पन्नाच्या बाबी आहेत.

स्थानिक राज्यकारभार.—राज्यकारभाराच्या सोयीकरितां या राज्याचे १८ प्रांत ( कौंटी ) केले आहेत. या प्रांतांमध्यें मुख्य अधिकारी ॲम्टमंड होय. स्थानिक कामकाज अम्टसराड व सोग्नेराड (इंग्लंडमधील प्रांतिक कौन्सिल व स्थानिक कौन्सिल ) पाहतात. या संस्था स.१८४१ पासून आहेत पण त्यांत बरेच फेरफार झाले आहेत. या कौन्सिलांचे सभासद लोक लँडस्थिंगच्या सभासद निवडण्याच्या पद्धतीनें निवडले जातात. हाच प्रकार प्रांतिक शहरांतील कौन्सिलांचा आहे. निदान ४०० क्रोन उत्पन्नावर ज्यांनां कर द्यावा लागतो ते लोक कोपनहेगन येथील कौन्सिल निवडतात. कोपहेगन येथील बर्गोमास्टर ( मेयर ) यास राजाच्या संमतीनें शहरचें कौन्सिल निवडतें व इतर ठिकाणचे बर्गोमास्टर राजा नेमितो. येथील म्युनिसिपालिटीची सांपत्तिक स्थिति साधारण बरी असते.

न्याय.—न्याय देण्याकरितां या राज्याचे हेरेड (शतकें) केलेले आहेत. यांपैकीं कित्येक इतके लहान आहेत कीं कांहींवर एकच न्यायाधीश काम करूं शकतो. प्रत्येक शहर एका स्वतंत्र 'बायफोगेड'च्या हातीं असतें. असे १२६ न्यायाधीश आहेत. प्रत्येकजण आपआपल्या जिल्ह्यांतील सर्व प्रकारच्या दाव्यांचा निकाल लावतो; शिवाय तो पोलिसचा मुख्य अधिकारी असतो. एक कोपनहेगन येथें व दुसरें व्हायबोर्ग येथें अशीं दोन अपील कोर्टें ( ओव्हरेट ) आहेत. मुख्य अपील कोर्ट (होजेस्टेरेट)कोपनहेगन येथें आहे. व्यापार व समुद्रावरील खटल्याकरितां एक निराळें कोर्ट आहे. शेतीसंबंधीं प्रश्नांचा निकाल लँडकमिशनें लावतात. डॅनिश न्यायपद्धतीची मुख्य गोष्ट ही आहे कीं आपसांत निकाल लावण्याचा प्रयत्न केल्याशिवाय कोणताहि दिवाणी दावा कोर्टापुढें येत नाहीं. हें काम 'कान्सिलिएशन'( तडजोड ) कमिटया करतात, व कायदेशीर रीतीनें काम सुरू करण्यापूर्वीं कोर्ट देखील आपसांत निकाल लावण्याचें काम करतें. याप्रकारें ३/४ प्रकरणांचा निकाल लागतो. आरोग्यव्यवस्था बोर्ड ऑफ हेल्थच्या स्वाधीन आहे. या देशाचे कित्येक जिल्हे केले आहेत, व प्रत्येक जिल्ह्यावर एक पगारी वैद्यकी अधिकारी नेमलेला असतो. याचें काम गरीब लोकांची शुश्रुषा करणें व आरोग्यबाबतींत व मृत्युनंतर पंचनामा करण्याच्या कामीं स्थानिक अधिकाऱ्यांनां मदत करणें हें होय. बाहेर रिलिफचीं कामें काढून गरीब लोकांची चांगली सोय केली आहे. शिवाय गरीब पण काम करण्यास लायक अशा लोकांकरितां काम करण्याचीं घरें ( वर्क हाऊस ) स्थापन झालीं आहेत. भिक्षागृहें व इतर संस्थाहि आहेत.

सैन्य व आरमार.—डेन्मार्कमध्यें राष्ट्रीय सैन्याची पद्धति आहे. प्रत्येक अव्यंग माणसाला सैन्यांत नोकरी करावी लागते. या नोकरीला २० व्या वर्षी सुरवात होऊन तिची मुदत १६ वर्षांची असते.पैकीं पहिलीं आठ वर्षें प्रत्यक्ष काम करावें लागतें. डेन्मार्कचें सैन्य(१९१७) दोन लाईफगार्ड बॅटेलियनें, १५ पायदळाचीं रेजिमेंटें, ४ घोडदळ रेजिमेंटें व चार चार तोफांच्या २० बानेच्या ( बॅटरी ) मिळून बनलें होतें. ६ लहान लढाऊ बोटी, ३ किनारासंरक्षक बोटी, ५ क्रूझर्स, ५ गन–बोटी, व१२४ टार्पेडो मिळून डेन्मार्कचें आरमार बनलें आहे.

धर्म.—डेन्मार्कचें चर्च राष्ट्रीय लूथर पंथाचें आहे.राजा याच पंथाचा असावा लागतो. येथें पूर्ण धर्मसहिष्णुता आहे. मोर्मोन ॲपोस्तल( धर्मसाधू )नीं डॅनिश शेतकऱ्यांत धर्मप्रचार केला व कांहीं लोक या पंथाचे बनले. धार्मिक नियंत्रणाकरितां देशाचे दहा विभाग केले आहेत. मुख्य धर्मगुरू कोपनहेगन येथें राहतो. परंतु त्याचें चर्च रोस्किल्डे येथें आहे. बिशप लोक राज्यकारभारांत हात घालतात. यांनां ठराविक पगार असतात.

शिक्षण व कला.—प्राथमिक शिक्षण १९१४ सालापासून सक्तीचें व मोफत आहे. प्रत्येक मुलानें वयाच्या ७ व्या वर्षापासून १४ व्या वर्षापर्यंत खेड्यांतील शाळेंत गेलेंच पाहिजे, अथवा अन्यरीतीनें त्याच्या शिक्षणाची योग्य तजवीज केली आहे असें आईबापांनां सिद्ध करावें लागतें. दुय्यम शिक्षणाच्या शाळा शहरांत असतात. यांमध्यें थोडीशी फी घेतात. सार्वजनिक व्याकरण शाळा आहेत. विश्वविद्यालय कोपनहेगन येथें आहे. शास्त्रीय शिक्षण व इतर शिक्षण देण्याकरितां असंख्य संस्था आहेत. यांपैकीं मुख्य पोलिटेक्निक ( विविधकला शाळा ) स्कूल, शेतकी व पशुवैद्यकांच्या शाळा, बादशाही पुस्तकालय, शास्त्रांची रॉयल सोसायटी, उत्तरेकडील पुरातन वस्तुसंग्रहालय व सोसायटी इत्यादि या होत. कलासंग्रहालयें फारशीं नाहींत, कोपनहेगन येथील संग्रहालय चांगलें आहे. मात्र पहिल्या प्रतीचें कलाशिक्षण रॉयल ॲकॅडमी ऑफ आर्टस व इतर शाळा यांच्यामध्यें दिलें जातें.

प्राचीन इतिहास.—डेन्मार्कविषयीं पुरातन माहिती प्लिनीच्या ग्रंथांत मिळते. स्कँडिया नामक तीन बेटांचा तो उल्लेख करतो. या बेटांच्या रहिवाशांसंबंधीं तो माहिती देत नाहीं, पण जुटिश द्वीपकल्प अथवा किम्ब्रिक खर्सोनीजसंबंधीं तो वर्णन देतो. या द्वीपकल्पाच्या उत्तर टोंकावरील ॲलोकियाई नांवाच्या तीन बेटांचाहि तो उल्लेख करतो. मॉन्युमेन्टम ॲन्सिरेनमध्यें सांगितलें आहे कीं, किंब्री व चॅरिडीज यांनीं आगस्टसकडे इ. स. पूर्वी पांचव्या शतकांत वकील पाठविले होते. ख्रि. पू. दुसऱ्या शतकाच्या अखेरीस गॉल व इटली यांच्यावर ज्यांनीं स्वारी केली तेच हे किंब्री व टयूटन लोक असावेत असा रोमन लोकांचा समज झाला होता.

अलीकडील डॅनिश दंतकथेवरून डेन्मार्क देश व्हियेस्लीथ ( झीलंड, मूएन, फाल्स्टर व लालंड ), जटलंड व स्कानी यांचा बनलेला होता. डेन्स लोकांचा मूळ पुरुष डॅन यानें जटलंड मिळविलें होतें. झीलंड पूर्वीपासून राज्यकारभाराचें ठिकाण होतें व लेज्रे हें राजाचें वसतिस्थान होतें. आंग्लोसॅक्सन दंतकथेंत स्किल्ड( स्किओल्डर )चा उल्लेख आहे; हा स्किल्ड डॅनिश व इंग्लिश राजघराण्यांचा मूळ पुरुष होय.

स्कँडिनेव्हियन दंतकथेंतील दुसरा मोठा पुरुष फ्रोई हा होय. पण ५ व्या शतकापूर्वीच्या राजांनीं विश्वसनीय अशीं नांवें मुळींच आढळत नाहींत हाल्फडेनीचें राज्य पांचव्या शतकाच्या शेवटच्या अर्धांत होतें. हॅयकुल्फचें राज्य सहाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास होतें. पुढें सहाव्या शतकाच्या मध्यापासून आठव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत डॅनिश इतिहासासंबंधीं कांहींच माहिती नाहीं. सॅक्सोमध्यें बरेच राजे सांगितले आहेत परंतु त्यांचें ऐतिहासिक दृष्टया अस्तित्व दाखविणारा पुरावा नाहीं. आठव्या शतकाच्या आरंभीं डॅनिश राजा ओन्जेन्ड याचा उल्लेख आहे. हॅराल्डर राजानें बरींच वर्षें भरभराटीनें राज्य केल्यावर ब्रॅव्हालाच्या मोठ्या लढाईत तो मरण पावला.

ही लढाई ७५० च्या सुमारास झाली. यानंतर पन्नास वर्षांनीं यूरोपखंडांतील इतिहासांत डेन्स लोकांचा वारंवार उल्लेख सांपडतो. ७७७–७९८ या वर्षीं डेन्स लोकांचा सिगिफ्रिडस राजा झाला. हा शार्लमेनवर मोठी स्वारी करण्याच्या तयारींत होता. पण त्याच्या अनुयायानें त्याला ८१० सालीं मारलें. याच्या मागून याचा भाऊ हेमिंगस राज्यावर आला पण हा स. ८१२ मध्यें मेला. यानंतर सिगेफ्रिडस नेपॉस गॉडेफ्रिडि रेगिस व ॲनुलो नेपॉस हेरिओल्डी क्वॉन्डम रेगिस यांच्यामध्यें गादीबद्दल तंटा लागला; मोठी लढाई झाली व दोघेहि मारले गेले, परंतु ॲनुलोचा पक्ष विजयी झाला व त्यांनीं ॲनुलोचे भाऊ हेरिओल्डस व रेगिनफ्रिडस यांनां राजे केले. गॉडेफ्रिडसच्या मुलांनीं त्यांनां हांकून लावलें. हेरिओल्डसला बादशहाचा आश्रय मिळाला व तडजोडीनें त्यांनीं राज्य वांटून घेतलें. ८२० मध्यें मेन्झ येथें हेरिओल्डस ख्रिस्ती झाला. ८२७सालीं त्याला हांकून लावण्यांत आलें, परंतु ख्रिस्ती धर्मोपदेशक सेंट अन्स्कार ह्याला राहूं दिलें. ८३६त हॅरिक हा डेन्स लोकांचा राजा होता. हा गॉडेफ्रिडसचा मुलगा होता. ८५०त हॅरिकवर त्याच्या पुतण्यांनीं हल्ला करून राज्याची वांटणी केली.स.८५२ मध्यें हेरिओल्डस फसवेगिरीच्या आरोपावरून फ्रँक लोकांकडून मारला गेला. ८५४सालीं डेन्मार्कमध्यें राज्यक्रांति झाली. हॅरिकचा पुतण्या गॉड्विन हा नॉर्थमेन लोकांचें सैन्य घेऊन आला व त्यानें चुलत्याचा पराभव केला व राजघराण्यांतील एका मुलाखेरीज सर्व पुरुष या लढाईंत मारले गेले. हाच मुलगा हॅरिक ज्यूनियर या नांवानें राजा झाला. याच्यासंबंधीं माहिती नाहीं. याच्यानंतर सिगफ्रिड, हाल्फडेनि व गॉडेफ्रिडस राजे झाले. यांच्यासंबंधीं फारशी माहिती नाहीं. परंतु एवढें माहीत आहे कीं, हाल्फडेनि स्कॉटलंडमध्यें८७७ सालीं मेला,गोडेफ्रिडसला स.८८५मध्यें सॅक्सनीच्या हेनरीनें विश्वासघातानें मारलें. सिगेफ्रिडस व गॉडेफ्रिडस नांवाचे राजे यानंतर कांहीं वर्षांनीं झाले व दोघेहि ८९१ सालीं डाइलवरच्या मोठ्या लढाईंत मारले गेले.

यानंतर हीलिगो ओलेफ व त्याचे मुलगे ग्नॅाब व गुर्थ राजे झाले.यानंतर सिगेरिक हिलीगो डॅनिश राजा झाला व त्याच्या मागून नॉर्वेहून हार्डेगॉन राजा आला. स. ९१६ नंतर कांहीं वर्षांनीं हॉर्डेकनथ अर्म हा राज्य करीत होता. हार्डेकनथ-

र्थम हाच प्रसिद्ध गोर्म असावा. यानें थायरा डेन्मार्कोवॉटशीं लग्न लाविलें होतें. यांचा मुलगा हॅरोल्ड ब्ल्युटूथ हा होता.

मध्ययुगीन व अर्वाचीनः—नवव्या शतकाच्या आरंभीं खऱ्या डॅनिश इतिहासाला आरंभ होतो. स्कँडिनेव्हियन घराण्यांतील अगदीं दक्षिणेकडील शाखा म्हणजे डेन्स लोक हे जटलंड व स्कॅनिया ह्या बेटांत राहात असून ७७७ सालीं फ्रँक लोकांच्या राज्याशीं विरोध करण्यास समर्थ होते व ते त्या राज्यांतून पळून आलेल्या लोकांनां आश्रय देत असत. चार्लस दि ग्रेटला ७८२ सालीं लिप्पे येथें शरण आलेल्या राजांमध्यें डॅनिश राजा सिगाफ्रिड हा होता. याच वेळीं उट्रेक्टहून विलीब्रॉईडनें रानटी डेन्स लोकांनां ख्रिस्ती दीक्षा देण्याचा प्रयत्न केला पण तो फसला. व्हायकिंग लोकांच्या कालापूर्वीची डॅनिश इतिहासाबद्दल एवढीच माहिती आहे. ७९३ सालीं लिंडिस्फारर्नी उध्वस्त करण्यांत आला व ९११ सालीं नार्मंडीमध्यें रोलोनें वस्ती केली. इंग्लंडच्या दक्षिण भागांत व नार्मंडीमध्यें ज्या भटकणाऱ्या लोकांनीं वसाहत केली ते लोक डेन्स होते.

डेन्स लोकांचा ख्रिस्ती धर्मस्वीकारः—पश्चिम यूरोपांत सरंजामी पद्धति स्थापन होण्याच्या कारणांपैकीं व्हायकिंग लोकांच्या स्वाऱ्या हें एक कारण होय. या आडदांड लोकांनां चर्चनें आपल्या अंकित केलें. ७९३ च्या पूर्वी इंग्लंड व जटलंडमधील समुद्रांत जहाजांत बसून गेल्याचें कोणालाहि स्मरत नव्हतें. आपलें ज्युटिश राज्य बचावण्याच्या हेतूनेंच हॅरोल्ड क्लॅक राजा ८२६ मध्यें इन्गेल्हेम येथें आला व आपली बायको, मुलगा गॉडफ्रेड व बरोबरचे लोक यांसह ख्रिस्ती झाला व अन्स्गार या ख्रिस्ती मिशनऱ्याला डेन्मार्कमध्यें घेऊन गेला. श्लेस्विग राइव व आऱ्हस येथें बिशपाची स्थापना झाली परंतु खरोखर ख्रिस्ती धर्माचा प्रसार हॅरोल्ड ब्ल्युटूथ हा राजा ख्रिस्ती झाल्यापासून झाला ( ९६० ).

डॅनिश लोकांचा विस्तारः—व्हिश्चुला नदीपर्यंत बाल्टिक समुद्रकांठचा प्रदेश व्यापणाऱ्या जर्मन व वेंड लोकांच्या योगानें आपली अभिवृद्धि करण्याचा प्रयत्न डॅनिश राजे करीत होते. हॅरोल्ड ब्ल्युटूथ यानें इडरच्या दक्षिणेचा जर्मन प्रदेश जिंकला ( ९४०—९८६ ) व ओडर नदीच्या मुखाजवळ जुलिन अथवा जोम्सबर्ग ही लष्करी वसाहत केली. नॉर्वेचा कांहीं भाग डॅनिश व स्वीडिश लोकांनीं एकत्र होऊन जिंकला व १०२८ व १०३५ यांच्यामध्यें कॅन्यूट दि ग्रेट यानें तें सर्व राज्य आपल्या राज्यास जोडलें, परंतु त्याच्यामागून ही एकी फार काळपर्यंत टिकली नाहीं. इंग्लंडमधील राज्यहि अल्प काळपर्यंतच टिकलें.

कॅन्यूटचा मृत्यु व पहिल्या व्हाल्डेमारचें राज्यारोहण यांमधील काळ डेन्मार्कमध्यें फार धामधुमीचा होता. या राज्याचे तोतया राजांनीं हिस्से पाडले होते व ते शेजारच्या राजांची व वेंड लोकांची मदत मागत असत. परंतु या घोटाळ्यांमुळें एक गोष्ट निश्चित झाली ती ही कीं, राष्ट्रीय चर्च निर्माण झालें व लंडन येथें ( इ. स. ११०४ च्या सुमारास ) आर्चबिशपची स्थापना झाली. ॲबसॅलोन ( डेन्मार्कचा मोठा मुत्सद्दी ) हा तिसरा आर्चबिशप होता. यानें व्हाल्डेमार ( पहिला ) व सहावा कॅन्यूट यांनां बाल्टिकवर डेन्मार्कचा विस्तार करण्यांत मदत केली.

व्हाल्डेमार राजांचा काळ डॅनिश इतिहासांत फार महत्त्वाचा होता. याच काळांत जुनी पितृसत्ताक पद्धत जाऊन इस्टेटींची वांटणी करण्याची पद्धत आली. राजसत्ता पूर्वीपेक्षां जास्त बलवान होती व सरदार लोकांनां लष्करी नोकरी करण्याच्या करारावर जमिनी देण्यांत आल्या होत्या व याच लोकांचें बादशाही राड अथवा कौन्सिल ( मंडळ ) बनलेलें होतें. धर्मोपदेशक लोक राजाश्रयामुळें बरेच वजनदार बनले होते व शिक्षणप्रसारहि होत होता. पुष्कळ डेन लोक पॅरिस येथील विश्वविद्यालयांत शिकत होते. मध्यमवर्ग हेरिंग नांवाचे मासे पकडणें, तसेंच घोडे व गुरें यांची पैदास करणें, या धंद्यांच्या योगानें भरभराटीस आला. बॉंडर अथवा शेतकरी लोक मातबर व स्वतंत्र होते. डॅनिश राज्याचा विस्तार ६०,००० चौरस किलोमिटर होता. लोकसंख्या ७००००० होती व राष्ट्राच्या संरक्षणाकरितां १६०००० सैन्य व १४०० जहाजें होतीं.

विभागणीचा काळः—दुसऱ्या व्हाल्डेमारच्या मृत्यूनंतर विभागणीचा काळ सुरू झाला. याच्यामागून एरिक प्लोव्हपेनिंग हा गादीवर बसला. तेराव्या व चौदाव्या शतकांत राजे लोकांमध्यें व सरदारांमध्यें तसेंच राजे व पोप यांच्यामध्यें भांडणें चालू होतीं. स.१२८२मध्यें सरदार लोकांनीं एरिकला एक सनद देणें भाग पाडलें. या सनदेच्या योगानें डेन हॉफला राष्ट्रीयसभा मानण्यांत आलें. दुसरा ख्रिस्टोफर यास तर याहूनहि जास्त हक्क द्यावयास लावलें. परंतु सरदार लोकांनां दिलेले हक्क, राजांच्या कमकुवतपणाइतकेच त्रासदायक ठरले व सर्व राज्याचे निरनिराळे तुकडे पडले.

चौथा व्हाल्डेमार ( १३४०–१३७५ ):—चौथ्या व्हाल्डेमारनें हे सर्व तुकडे एकत्र करून बाल्टिक समुद्रावर डेन्मार्कचें मोठें राज्य प्रस्थापित केलें. त्यानें सामाजिक स्थिति सुधारून राज्यव्यवस्थेंतहि फेरफार केले. यानें राजाचें उत्पन्न वाढविण्याचा प्रयत्न केला. या वेळेपासून वार्षिक लँडगिल्डे अथवा राज्यांतील शेतकऱ्यांनीं दिलेला सारा हेंच राजाचें उत्पन्न बनलें व अतःपर सर्व जमीन ही राजाची वंशपरंपरागत मालमत्ता समजली जाऊं लागली. राष्ट्रीय सैन्याची जुन्या धर्तीवर स्थापना झाली; शहरांनांहि शिपाई व जहाजें पुरवावीं लागत व शेतकऱ्यांनां तिरंदाज लोक द्यावे लागत. व्हाल्डेमारनें लांडगे धरण्याकरितां जाळीं शोधून काढलीं व पुष्कळ पाणचक्क्या बनविल्या. अशा रीतीनें त्यानें राज्यांत शांतता स्थापिली.

कालमरचा संघ ( १३९७ ):—व्हाल्डेमारचें काम त्याची मुलगी मार्गारेट हिनें तडीस नेलें. तिनें स्वीडन, नार्वे व डेन्मार्क या उत्तरेकडील तिन्ही देशांचें एक राज्य बनविलें. प्रत्येक राष्ट्रानें आपापले कायदे पाळावेत व तेथील लोकांनीच त्यांच्यावर राज्य करावें ही अट मार्गारेट व तिचे वारस यांनीं मोडली. त्यामुळें हें एकीकरण नार्वे व स्वीडन या दोन्ही देशांत फार अप्रिय झालें. पुढील राजा, सातवा एरिक याला पदच्युत करून हॅंसियाटिक लीग व होल्स्टेनर लोक यांनीं बव्हेरियाच्या ख्रिस्तोफरला गादीवर बसविलें. एरिकला पदच्युत केल्यानंतर सरदार लोकांचें प्राबल्य पुन्हां माजलें व शेतकरी लोकांची स्थिति केवळ गुलामाप्रमाणें बनली.

संघाचा भंगः—ख्रिस्टोफर मेल्यावर १८४८ सालीं रिग्स्डाडनें ओल्डेनबर्गच्या कौंउट ख्रिश्चियनला गादीवर बसविलें. परंतु स्वीडननें कार्ल नटसन (चार्लस आठवा) हा पसंत केला व नॉर्वे डेन्मार्कला मिळालें.नंतर आपापसांत लढाया सुरु झाल्या व ब्लॅकडेथ नांवाच्या रोगानें या देशाची पूर्ण नासाडी झाली.स्वीडनमध्यें धर्मोपदेशक व सरदार लोक या संघाला अनुकूल होते परंतु सामान्य लोक फार विरुद्ध होते. याच वेळीं डॅनिश आरमार बाल्टिक समुद्रांत श्रेष्ठ बनलें.

दुसरा ख्रिश्चियन (१५१३–१५२३):—या राजाच्या कारकीर्दीत स्कॅंडेनेव्हियन राज्याचें मार्गारेटचें स्वप्न खरें ठरण्याचा योग आला.हा तरुण राजा करारी स्वभावाचा व बुद्धिमान होता. हा डेन्मार्क व नार्वेचा राजा असून त्यानें स्वीडनची शक्ति हत्यारांच्या जोरानें कमी केली. परंतु स्टॉकहोम येथील कत्तलीमुळें स्वीडिश लोक डेन्मार्कचे कट्टे वैरी बनले. त्याचा हेतु उत्तरेकडील तिन्ही राज्यें एकत्र करून हंसालीगची अथवा कोण्याहि परकीय राष्ट्राची ढवळाढवळ नाहींशी करण्याचा होता. तो धर्मोपदेशकांचें महत्त्व कमी समजत असे. पण त्याचें वर्तन क्रूर व धरसोडीचें होतें.

पहिला फ्रेडरिक व धर्मसुधारणाः—दुसरा ख्रिश्चियन पळाल्यावर त्याचा चुलता पहिला फ्रेडरिक(१५२३–१५३३) गादीवर बसला व चर्चचें पूर्वीचें वर्चस्व पुन्हां स्थापित झालें. प्रथम नवीन राजा तटस्थ होता. परंतु लुथेरियन धर्माची लाट इतकी जोरानें आली कीं, सबंध डेन्मार्कमध्यें तिला कोणीच अडथळा करूं शकला नाहीं. हॅन्स टॅसिनला मुख्य बादशाही चॅप्लेन नेमलें व त्याच्या वारा अनुयायांच्या वक्तृत्वानें डॅनिश लोकांवर फारच परिणाम होऊं लागला. यावेळीं जितक्या बिशपच्या जागा रिकाम्या झाल्या तितक्या सर्व राजानें आपल्या पसंतीच्या लोकांनां दिल्या. स्वतः राजा अंतर्यामी लुथेरन होता. स. १५२७ मधील हुकुमानें दोन्ही पंथांनां ( लुथेरन व रोमनकॅथोलिक ) बरोबरीचे मानलें. ख्रिश्चियननें नॉर्वेवर ( १५३१ ) स्वारी केली व कौंटची लढाई ( १५३४–३६ ) झाली. या दोन गोष्टींनीं ही धर्मसंबंधी आणीबाणीची वेळ दिरंगाईवर पडली.१५३६ मधील हुकुमानें असें ठरविण्यांत आलें कीं, बिशप लोकांचें पारलौकिक व ऐहिक वर्चस्व नष्ट होऊन त्यांच्या जमिनी त्यांच्यापासून हिसकावल्या जातील व लोककल्याणास्तव राजाच्या स्वाधीन केल्या जातील. परंतु लूथरच्या उपदेशानें कॅथोलिक धर्माचें समूळ उच्चाटण झालें नाहीं.

धर्मसुधारणेचे परिणामः—धर्मसुधारणेपासून डेन्मार्कच्या शिक्षणास प्रथम फार थोडा फायदा झाला व डेन्मार्कचें पारमार्थिक जीवन जरी हलक्या प्रतीचें होतें तरी राजकीय दृष्ट्या ही धर्मसुधारणा राष्ट्राला फायद्याची झाली. चर्चची मालमत्ता जप्त केल्यामुळें राजाला दोन रीतींनें फायदा झाला. एक तर त्याला कायमचें उत्पन्न मिळालें व दुसरें पुष्कळ मालमत्ता ताब्यांत येऊन राज्यकारभार फायदेशीर रीतीनें चालवितां आला. यामुळें तिसऱ्या ख्रिश्चियनला आपल्या जर्मन भाडोत्री शिपायांचा पगार चुकवितां आला, आरमार वाढवितां आलें व अधिकारी लोकांनां पुरेसा पगार देतां आला. त्यामुळें त्यांची लायकी वाढून जॉन फ्रिअस, पिडरऑक्स, हेर्लफ ट्रोले व पिडर स्कॅम सारखे मुत्सद्दी व दर्यावर्दी निपजले. उत्पन्न वाढल्यामुळें डेन्मार्कला उत्तरेकडील संस्थानांचें या ( १५४४–१६२६ ) काळांत धुरीणत्व प्राप्त झालें व डेन्मार्कचें समुद्रावरील वर्चस्व सर्वांनीं कबूल केलें.

चौथ्या ख्रिश्चियनच्या राज्यारोहणप्रसंगीं डेन्मार्कची स्थिति ( १५८८ ):—ऱ्हास घराण्यांतील राजाच्या कारकीर्दीत स्वीडनची भरभराट होत असतांना डेन्मार्क दिवसेंदिवस ऱ्हास पावत होतें. निवडलेल्या राजाचा नैसर्गिक दुबळेपणा व शास्ता व शासित यांच्यामधील प्रेमभावाचा लोप हीं दोन कारणें या ऱ्हासाच्या मुळाशीं होतीं. डेन्मार्कमध्यें राजा सत्ताधीश नसून तो सरदार लोकांच्या रिग्स्राडचा अंकित होता. नवीन राजा निवडला जाण्याच्या पूर्वी त्याला नवीन सनद करून द्यावी लागे. या काळाला डॅनिश इतिहासांत ॲडेल्स्वाल्डे अथवा सरदारांचें राज्य म्हणतात. राजा व सरदार यांच्या खालच्या लोकांस प्रजा म्हणत. यांपैकीं धर्मोपदेशक लोक यांच्या धर्मसुधारणापासून जमिनी गेल्या होत्या तरी हे.रिग्स्डॅगमध्यें होते. हे संरक्षण व चरितार्थ यावद्दल राजावर अवलंबून होते.

बर्जेस लोकांचे प्रतिनिधी रिग्स्डॅगमध्यें होते व डॅनिश व नॉर्वेजियन व्यापाऱ्यांची फार भरभराट झाली होती. या समाजसोपानाची शेवटची पायरी शेतकरी लोकांची होती. यांची स्थिति फार खालावलेली होती.धान्याचे भाव वाढल्यामुळें व कर कायमच राहिल्यामुळें त्यांची सांपत्तिक स्थिति सुधारली होती परंतु स्वतंत्र शेतकऱ्यांची संख्या कमी झाली होती व सरदार लोकांच्या जमिनींवर काम करण्याचे दिवस वाढत चालल्यामुळें ते केवळ गुलाम बनले होते. त्यांनां कांहींच राजकीय हक्क नव्हते व त्यांचे प्रतिनिधी रिग्स्डॅगमध्यें नव्हते.

चौथा ख्रिश्चियन ( १५८८-१६४८ ).—चौथा ख्रिश्चियन १५८८ सालीं गादीवर बसला. कोपनहेगन, एल्सिनोर व इतर शहरें येथील बंदरें विस्तृत करण्यांत आलीं. हॅंझियाटिक शहरांचे राहिलेले हक्क काढून टाकले, व्यापार व उद्योग धंदे सुधारण्याचे निरनिराळे प्रयत्न करण्यांत आले. डेन्मार्क बाकीच्या प्रॉटेस्टंट संस्थानचें वैरी होतें. काल्मार लढाई संपल्यावर डेन्मार्क व स्वीडन यांचा समेट होऊन हे देश पुढें तीस वर्षें शांततेनें राहिले परंतु तीस वर्षांच्या लढाईमध्यें या दोन देशांमध्यें पुन्हां लढा उपस्थित झाला व ख्रिश्चियनच्या शौर्यामुळें डेन्मार्कची बाजू राखली. ब्रोम्सेब्रोच्या तहानें ( १६४५ ) ओसेल व गॉटलंड बेटें, व जेम्टलॅंड व हर्जेडॅल हे प्रांत कायमचे व हॅलॅंड तीस वर्षेंपर्यंत डेन्मार्कला द्यावें लागलें. बाल्टिक समुद्रावरील स्वीडनच्या प्रांतापासून जकात घेऊं नये असेंहि ठरविण्यांत आलें.

तिसरा फ्रेडरिक ( १६४७-१६७० ):—या तहापासून डेन्मार्कची फारच हलाखी होत चालली. परराष्ट्रीय कारभार राजाच्या हातांतून रिग्सडाग्च्या हातांत गेला. स.१६५७मध्यें तिसऱ्या फ्रेडरिकनें स्वीडनशीं लढाई पुकारली.स.१६५८ मध्यें रॉस्किल्डेचा तह झाला. या तहानें डेन्मार्कनें तीन स्कॅनियन प्रांत, बोर्नहोम बेट, बाहुस व ट्रॉंढ्ह्येमप्रांत देण्याचें कबूल केलें, व स्वीडनविरुद्ध सर्व तह मोडून स्वीडिश जहाजावरील सर्व कर उठविण्यांत आले. परंतु लवकरच कोपनहेगनचा तह झाला. यानें ट्रॉंढ्ह्येम प्रांत व बोर्नहोम बेट परत करण्यांत आलें व रोस्किल्डे तहाच्या पुष्कळ अटींतून डेन्मार्कला मुक्त करण्यांत आलें.

वंशपरंपरागत राजसत्तेची स्थापना ( १६६० ):—या नुकत्याच संपलेल्या लढाईमुळें एक महत्त्वाचा राजकीय परिणाम घडून आला. यामुळें सरदार लोकांची सत्ता नाहींशी झाली. कोपनहेगननें सार्वजनिक कामांत मत देण्याचा अधिकार मागितला. राजाचें वर्चस्व पूर्वीपेक्षां वाढलें होतें. नुकत्याच झालेल्या लढाईंत दाखविलेल्या धैर्य व शौर्यादि गुणांमुळें फ्रेडरिकची लोकप्रियता अतिशय वाढली होती.

१६६० सालीं रिग्सडाग कोपनहेगन येथें भरली व पहिलें बिल आलें तें असें कीं, खाण्याच्या पदार्थावर एक कर बसवावा, व गुरेंढोरें यांवरहि कर घ्यावा. सरदार लोकांनीं या कराबद्दल माफी मागितली, परंतु धर्मोपदेशक व बर्जेस ( नगरवासी लोक ) यांचें म्हणणें पडलें कीं सर्वांवर सारखे कर बसवावेत. अखेरीस सरदार लोकांस या बिलास संमति देणें भाग पडलें. याप्रमाणें सांपत्तिक प्रश्नाचा निकाल लागला. लष्करी नोकरीबद्दल दिलेल्या सर्व जहागिरी राजाच्या सत्तेखालीं ठेवण्यांत आल्या व यांवर कर घेण्याचा व जो जास्त पैसे देईल त्याला भाड्यानें देण्याचा अधिकार रा[illegible]ला. यामुळें सरदारांची सत्ता नष्ट झाली. या[illegible] नॅन्सेन व क्रिस्टोफर हॅन्सेन यांनीं अशी सूचना आणली कीं डेन्मार्कचें राज्य राजाला वंशपरंपरागत द्यावें. याला " इंस्ट्रुमेंट " म्हणत. पण हें रिग्सडाग्नें अजिबात फेटाळून लाविलें. राजानें शहराची शिबंदी दुप्पट केली, शहरांतील कवायती लोकांनां दारुगोळा देण्यांत आला व त्याच दिवशीं राजानें रिग्सडाग्जवळून स्पष्ट जबाब मागितला. रिग्सडाग शरण आली व १३ आक्टोबर रोजीं एका करारनाम्यावर सही करून या सभेनें असें कबूल केलें कीं खालच्या सभेप्रमाणें ( लोअर एस्टेट ) या सभेनेंहि राजा व त्याचे वारस यांनां डेन्मार्कचें राज्य वंशपरंपरागत दिलें आहे.

परंतु जरी वंशपरंपरागत राजसत्ता प्रस्थापित झाली। तरी देशाचे कायदे रद्द झाले नव्हते. नंतर एक कमिटी नेमण्यांत आली. तिनें ठरविलें कीं राजाला शपथ घ्यावयास लावावें व त्यानें करून दिलेली सनद त्याला परत द्यावी, व राजानें आपल्या व लोकांच्या कल्याणाकरितां एक नवी राज्यघटना जाहीर करावी. ही सनद राजाला परत देण्यांत आली व त्यानें सर्व दर्जाच्या लोकांचा दरबार भरवून जाहीर केलें कीं, मी खऱ्या वंशपरंपरागत ख्रिश्चन राजाप्रमाणें राज्य करीन व चांगली राज्यव्यवस्था स्थापन करीन. यानंतर मेजवानी झाली. परंतु ' राज्यघटने 'संबंधानें पुढें कांहींच ऐकूं आलें नाहीं.

अनियंत्रित राजसत्तेची स्थापनाः—याप्रमाणें नियंत्रित राजसत्तेचें हळू हळू अनियंत्रित राजसत्तेंत रूपांतर झालें. स. १६६१ मधील इंस्ट्रुमेंट न[illegible]च्या कायद्यानें डेन्मार्क व नॉर्वेचें वंशपरंपरागत राज्य व सर्व हक्क राजाला देण्यांत आले. कोपनहेगन येथें " कॉंगलेव्ह " अथवा राजाचा कायदा पास झाला. राज्यें अविभक्त राखणें, धर्म पाळणें, " कॉंगलेव्ह " पाळणें एवढीच राजाचीं कर्तव्यें होतीं. १६६० सालच्या राज्यक्रांतीमुळें नार्वेचा फायदा झाला. १६६१ सालीं राज्याची सांपत्तिक व आर्थिक स्थिति तपासण्याकरितां एक नवीन कमिशन नेमण्यांत आलें. " लष्करी जहागिरी " मोडून " कौंटी" बनविण्यांत आल्या. सरदार लोकांवर कर बसविण्यांत आले. १६६२ सालीं नॉर्वेमधील शहरांनां कांहीं विशिष्ट हक्क देण्यांत आले.

पांचवा ख्रिश्चन ( १६७०-१७९९ ):—ही अनियंत्रित राजसत्ता डॅनिश संस्थानला फायदेशीर झाली. त्याचा तात्कालिक परिणाम पुढें दिल्याप्रमाणें झालाः—मध्यम वर्गातील लोकांनां राज्यकारभारांतील सर्व अधिकाराच्या जागा खुल्या झाल्या. याचवेळीं इकडे फ्रेंच राजा लुई यानें नेदरलंड घेण्याच्या इराद्यानें स्वीडनशीं तह केला, व नेदरलंडवर सैन्य पाठविलें. यानंतर बॅंडन्बर्गच्या इलेक्टरनें लिओपोल्ड बादशहाशीं तह केला व त्यास डेन्मार्कला द्यावयास लाविलें.

*उत्तरेकडील महायुद्धाच्या वेळचा डेन्मार्कः*—यावेळीं डेन्मार्कला तटस्थ राहणें कठिण होतें. फ्रान्सला मिळाल्यास स्वीडनच्या अंकित व्हावें लागणार व नेदरलंडशीं दोस्ती केली तर स्वीडनच्या हल्लयास तोंड द्यावें लागणार अशा पेंचांत ग्रिफेनफेल्डट पडला. अखेरीस १६७३ सालीं कोपनहेगन येथें एक तह होऊन असें ठरलें कीं १०००० माणसें व वीस लढाऊ जहाजें डेन्मार्कनें यावींत व नेदरलंडनें मोठी खंडणी यावी. स्वीडनला फ्रान्सपासून अलग करण्याचा प्रयत्न ग्रिफेनफेल्डट यानें केला व त्याला अँटी-फ्रेंच लीगमध्यें जबरदस्तीनें भाग घ्यावा लागला. यामुळें २०००० सैन्य तयार ठेवावें लागलें. पुढें ग्रिफेनफेल्डटची सत्ता नष्ट झाली व डेन्मार्कला फॉन्टेनेब्लोचा तह करावा लागला.

फॉन्टेनेब्लोच्या तहानें फ्रान्स व स्वीडनच्या फायद्याकरितां डेन्मार्कचें नुकसान केलें. ४१ वर्षांनंतर हॅनोव्हर व प्रशियाच्या फायद्याकरितां डेन्मार्कचें फिरून नुकसान झालें. उत्तरेकडील लडाईंत स्वीडिश आरमारापासून जर्मन संस्थानांचा बचाव डॅनिश आरमारानें केला. परंतु याबद्दल ६००००० रिक्सडॉलरशिवाय डेन्मार्कला कांहीं एक मिळालें नाहीं. ब्रेमेन व व्हर्नेन येथील बिशपांच्या जागा, पोमेरॅनिया प्रांत व रूगेन बेट हीं अंशतः हॅनोव्हरचा इलेक्टर व अंशतः प्रशियाचा राजा यांनां देण्यांत आलीं.

चौथा फ्रेडरिक ( १६९९–१७३० ):—या राजानें देशाची सांपत्तिक स्थिति सुधारण्याचे बरेच प्रयत्न केले दरबारनें शिक्षणप्रसारार्थ बराच यत्न केला. राजा गादीवर बसल्यानंतर जन्मलेल्या बादशाही शेतांतील सर्व शेतकऱ्यांची गुलामगिरींतून मुक्तता झाली.

सहावा ख्रिश्चन ( १७३०–१७४६ )—या राजानें राष्ट्रीय " मिलशिया " सैन्य मोडून टाकलें. धान्याचे भाव उतरले तेव्हां शेतकरी लोक बाहेरदेशीं जाऊं लागले. १७३३ सालीं एक कायदा करण्यांत आला त्यायोगें नऊ ते चाळीस वर्षांच्या दरम्यान प्रत्येक शेतकऱ्यानें देशांतच राहिलें पाहिजे असें ठरविण्यांत आलें; व मिलिशिया सैन्य पुन्हां जमविण्यांत आलें.

पांचवा फ्रेडरिक (१७४६–१७६६):—या राजाच्या कारकीर्दींत व्यापार, उद्योगधंदे व शेती सुधारण्याकरितां बरेच यत्न करण्यांत आले. डेन्मार्कचा माल नेआण करण्याचा व्यापार वाढविण्याकरितां, बार्बरी स्टेट, नेपल्स, जिनोआ यांशीं कांहीं तह करण्यांत आले. तथापि यावेळीं शेतकऱ्यांची स्थिति खालावलेलीच होती. १७५७ त नेमलेल्या कमिशननें शेतकीखात्यांतील पुष्कळ दोष नाहींसे केले; वंशपरंपरागत पट्टे देण्याची पुष्कळ जमीनदारांनीं सुरवात केली; व शेतकऱ्यांची गुलामगिरी मोडून टाकण्यांत आली.

सातवा ख्रिश्चन(१७६६–१८०८):-परराष्ट्रीय राज्यकारभार जे. एच्. इ. बर्नस्टॉर्फ व त्याच्यामागून त्याचा पुतण्या अँड्रीज बर्नस्टॉर्फ यांच्या हातीं होता. यांनीं डेन्मार्कला तटस्थ राखण्याचें धोरण ठेविलें. राजा स्वतः अर्धवट वेडा होता. परंतु याचवेळीं सी. डी. एफ. रेव्हेनट्लो व ओव्ह ह्यूज गुल्डबर्ग वगैरे विद्वानमंडळी पुढें आली.

शेतकरी लोकांचें दास्यविमोचन हाच त्यावेळीं मुख्य राष्ट्रीय प्रश्न होता व याचा व्यावहारिकरीत्या निकाल लावण्याचें श्रेय रेव्हेंटलो यालाच दिलें पाहिजे. सर्फडम ( शेतकऱ्यांची गुलामगिरी ) मोडून टाकण्यांत आली. १७८८ सालीं धान्याच्या व्यापारावरील कर माफ झाला असें जाहीर करण्यांत आलें. निग्रो लोकांनां गुलाम करून विकण्याचा व्यापार बंद करण्यांत आला व भाषणस्वातंत्र्य जास्त देण्यांत आलें. तरी रशियन बादशहा पॉल याच्या आग्रहावरून मर्यादित सेन्सारशिप ( मुद्रणनियंत्रण ) स्थापण्यांत आलें.

*नेपोलियनच्या लढाईच्या वेळचें डेन्मार्क व ग्रेटब्रिटनः*—रशियाची खुशामत करण्याकरितां डेन्मार्कची व ग्रेटब्रिटनची पहिली लढाई झाली. १८०० सालीं झारनें डॅनिश सरकारला " आर्मड् न्युट्रॅलिटी लीग " ( सशस्त्र तटस्थता )ला संमति द्यावयास लावलें. ग्रेटब्रिटननें आपल्या बंदरांतील लीगमधील राष्ट्रांच्या व्यापारी जहाजांनां जाण्याची मनाई केली; व पार्कर व नेलसन यांच्या आधिपत्याखालीं एक आरमार डेन्मार्कवर पाठविलें. डॅनिश आरमाराचा मोड झाला व त्यांनां नुकसानकारक तह करावा लागला.

*आपला तटस्थपणा कायम राखण्याच्या निरर्थक प्रयत्नामुळें* डेन्मार्कची व इंग्लंडची दुसरी लढाई झाली. इंग्लंडनें त्यांनां आपल्याशीं दोस्ती करण्याविषयीं विचारलें व पुष्कळ सढळ अटी दाखविण्यांत आल्या, परंतु राजप्रतिनिधीनें त्या अमान्य केल्या. ब्रिटिश आरमारानें तोफांचा मारा करून कोपनहेगनला शरण यावयास लाविलें. यानंतर डेन्मार्क नेपोलियनच्या पक्षाला जाऊन मिळालें व त्याबद्दल त्याला चांगली शिक्षाहि मिळाली. कीलच्या तहान्वयें डेन्मार्कला नॉर्वे स्विडनला देणें भाग पडलें.

*१८१५ नंतरची डेन्मार्कची स्थितिः*—यानंतर या देशाची स्थिति फार शोचनीय झाली. धान्याचे भाव उतरले. सहाव्या फ्रेडरिक राजाच्या शेवटच्या दोन वर्षांच्या कारकीर्दींत राजकीय चळवळ पुन्हां उपस्थित झाली. प्रांतिक सभा जटलंड, श्लेस्विग, व हॉल्स्टेन येथें स्थापित झाल्या व फ्रेडरिक व त्याचा वारस आठवा ख्रिश्चन ( १८३९–१८४८ ) यांच्या कारकीर्दींत स्वतंत्र राज्यव्यवस्थेबद्दल चळवळ फार जोरांत चालू होती. जर्मनींतील राष्ट्रीय मत श्लेस्विग व हॉल्स्टेनला स्वतंत्र होण्यास उत्तेजन देत होतें. आठव्या ख्रिश्चननें योजलेली व सातव्या फ्रेडरिकनें (१८४८–१८६३) प्रचारांत आणलेली संयुक्त राज्यपद्धति प्रशियाच्या सशस्त्र चळवळीस कारणीभूत झाली; व १८५१ सालीं प्रशियन, आस्ट्रियन व डॅनिश सभासदांचें मिळून बनलेलें

आंतरराष्ट्रीय कमिशन नेमून डेन्मार्कला हॉल्स्टोनच्या सरकारास शरण जावें लागलें.

मध्यंतरीं अर्वाचीन पद्धतीवर पार्लमेंट बनविण्याच्या उद्योगांत डेन्मार्क गुंतलें होतें १८४८ सालीं असें ठरविण्यांत आलें कीं, १५२ प्रतिनिधींचें राष्ट्रीय मंडळ स्थापन करावें, यांपैकीं ३८ प्रतिनिधी राजानें निवडावे, यांच्या सभेस अपर हॉऊस ( लँडस्टिंग ) म्हणावें व बाकीचे प्रति धी लोकांनीं निवडून यावे व त्यांच्या सभेला लोकसभा ( फोकस्टिंग ) म्हणावें. राजाला प्रतिनिधी निवडण्याचा अधिकार नसावा असें फिलो-पेझंट पक्षाचें म्हणणें होतें. परंतु राष्ट्रीय उदारमतवाद्यांचा ( लिबरल्स ) जय होऊन समानहक्कप्रतिपादक लोकांनांहि बहुमतांत सामील व्हावें लागलें, व १८४९ जून रोजीं नवीन राज्यव्यवस्थेला राजाची संमति मिळाली.

जर्मनी व डॅनिश डची —याच वेळीं डेन्मार्कच्या परराष्ट्रीय संबंधामुळें या देशाच्या अंतिम राज्यव्यवस्थेस बराच बाध आला. १८५१--५२ मधील कन्व्हेन्शन (ठराव) मुळें राज्यांतील प्रत्येक भागाला स्थानिक स्वातंत्र्य असावें व सर्वसाधारण कारभार पाहण्यासाठीं मध्यवर्ती सरकार असावें असें ठरलें. होल्स्टेन डेन्मार्कला परत देण्यांत आलें. लंडन येथील कान्फरन्समध्यें डेन्मार्कची अविभक्तता स्थापित करण्यांत आली, व प्रिन्स खिश्चनला गादीचा वारस ठरविण्यांत आलें.

राज्यपद्धति.—सन. १८५५ मध्यें (सर्वसाधारण ) मध्यवर्ती राज्यपद्धतीचा प्रसार करण्यांत आला. रिगस्डाड ( पार्लमेंट ) मधील डचीचे नवीन प्रतिनिधी या पद्धतीच्या विरुद्ध होते व त्यांनां जर्मन संस्थानिकांचें पाठबळ होतें. १८५७सालीं कार्ल ख्रिश्चन हॉल हा मुख्य प्रधान झाला. यानें जर्मन संस्थानिकांनां सात वर्षेंपर्यंत चातुर्यानें झुलविलें परंतु १८६२ सालीं राजाच्या जाहीरनाम्यानें मध्यवर्ती राज्यव्यवस्थेपासून होल्स्टिन शक्य तितकें अलग करण्यांत आलें. पुढल्या वर्षीं डेन्मार्क व श्लेस्विगकरितां मध्यवर्ती राज्यव्यवस्था स्थापन करण्याबद्दल बिल त्यानें रिगस्डाडमध्यें आणलें. या सुमारास सातवा फ्रेडरिक राजा मेला व त्याच्या गादीवर नववा ख्रिश्चन बसला. यानें प्रजेला संतुष्ट राखण्याकरितां या बिलाला संमति दिली व १८ नोव्हेंबर १८६३ सालीं नवीन राज्यपद्धतीला कायद्याचें स्वरूप प्राप्त झालें. यामुळें प्रुसोडॅनिश युद्ध उपस्थित झालें. डेन्मार्कसंबंधीं या प्रश्नाचा निकाल १८६४ मधील व्हिएन्नाच्या तहानें लागला व या तहान्वयें श्लेस्विग व होल्स्टेन या दोन्ही डची ( जहागीरी ) डेन्मार्कच्या ताब्यांतून कायमच्या गेल्या. यानंतरच्या वर्षांतील डॅनिश राजकारभाराचा मुख्य विषय म्हटला म्हणजे 'फोकस्टिंग' व ' लँडस्टिंग ' मधील तंटे हा होय हें भांडण १८७२ त सुरू झालें व सर्व जहाल उदारमतवाद्यांचा युनायटेड लेफ्ट नांवाचा एक संघ होऊन त्यानें सरकारविषयीं अविश्वास प्रदर्शित केला व बजेट नामंजूर केलें. १८७५ मध्यें जे. बि. इस्ट्रूप हा मुख्य प्रधान झाला. यानें जमाबंदीची प्रधानकी आपल्या ताब्यांत ठेविली व राजा लँडस्टिंग व देशांतील कांहीं लोक यांच्या आश्रयाच्या बळावर यानें लँडस्टिंग, व फोकस्टिंग यांच्यामधील समेट करणें व यूरोपांतील राज्यांत लढाई उपस्थित झाल्यास डेन्मार्कला आपली तटस्थवृत्ति कायम राखतां यावी म्हणून फौज वाढविणें हीं दोन कामें करण्याकडे त्यानें आपलें सर्व लक्ष लाविलें. १८७९ सालच्या निवडणुकीमुळें जहाल उदारमतवाद्यांमध्यें बरीच फूट पडली व त्या कारणामुळें इस्ट्रूपला ' सैन्य व आरमार संरक्षणबिल ' व ' नवीन लष्करी पीनलकोड ' पास करून घेतां आला.

१८८१ सालच्या निवडणुकीनंतर जहाल उदारमतवादी लोकांच्या निरनिराळ्या पक्षांची एकजूट होऊन सरकारला जोराचा प्रतिकार होऊं लागला. तरी इस्ट्रूप हा मुख्य प्रधान होता. त्याच्या मतें यावेळीं डेन्मार्कला पुराणमतवादी प्रधानमंडळाची फार गरज होती. जेव्हां रिगस्डाडनें बजेट नामंजूर केलें तेव्हां त्यानें राजाला तात्पुरता पैशाचा हुकूम काढण्याची सल्ला दिली व पुढेंहि ज्या ज्या वेळीं पैशाची गरज लागे त्यात्यावेळीं असेच हुकूम काढीत असत. स. १८८६ मध्यें युनायटेड पक्षानें सरकारशीं तडजोड करण्याचें योजिलें व १८९४सालीं फोकस्टिंग आणि सरकार व लँडस्टिंग यांच्या मध्यें समेट होऊन इस्ट्रूपनें प्रधानमंडळ सोडलें. १८९४ सालीं समेट झाला होता [illegible] फोकस्टिंग व लँडस्टिंगमधील तंटे [illegible] राजकारणांत वारंवार दृष्टोत्पत्तीस येत असत. स.१९०१ त लेफ्ट पक्षाचें प्रधानमंडळ बनलें. त्यानें जर्मनीशीं सलोखा केला. १९०६ सालीं खिश्चियन राजा वारला व त्याचा मुलगा आठवा फ्रेडरिक गादीवर आला.

आधुनिक इतिहास.–१९०८त ख्रिस्तेन्सन व त्याच्या मंत्रिमंडळानें राजीनामा दिला व त्या जागीं नील्स नीलगार्ड व त्याचा मवाळ पक्ष अधिकारारूढ झाला. या पक्षाच्या अमदानींत राष्ट्रसंरक्षणाचा प्रश्न प्रामुख्यानें पुढें येऊन त्याच्यावर मोठीं रणें माजल्यामुळें नीलगार्डच्या मंत्रिमंडळाला राजीनामा द्यावा लागला; व कौंटहोलस्टीन लेड्रेबॉर्ग हा प्रधान झाला. याच्या अमदानींत राष्ट्रसंरक्षणाचा प्रश्न तडीला लागून सैन्य व आरमार यांची वाढ व्हावयाचें ठरलें. कोपनहेगनच्या संरक्षणासाठीं आरमाराची जय्यत तयारी करावयाची व इतर सैन्याची संख्या १९२२च्या आंत कमी करायवाची असेंहि ठरवण्यांत आलें. अशा रीतीनें होलस्टीननें या क्लिष्ट प्रश्नाची विल्हेवाट लावली. पण फोकस्टिंगमध्यें या पक्षाला बहुमत नसल्याकारणानें याचा इतर प्रश्नांच्या बाबतींत पराभव होऊं लागल्यामुळें होलस्टीनला प्रधानपद सोडणें भाग पडलें व त्याच्या बदली झहले या रॅडिकल पक्षाच्या पुढाऱ्यानें आपलें मंत्रिमंडळ बनविलें. पण त्याच्या पक्षाला देखील पुरेसें मताधिक्य नव्हतें त्यामुळें याच्या पक्षाचा कार्यक्रमहि याला अमलांत

आणतां आला नाहीं. डेन्मार्कची शासनपद्धति लोकसत्ताक असावी असें या पक्षाचें म्हणणें होतें व तशा प्रकारचें एक बिल या पक्षानें राष्ट्रसभेंत आणलें. पण या बिलाला अर्धचंद्र मिळाल्याकारणानें झहले व त्याचा पक्ष पदभ्रष्ट झाला व मवाळपक्ष पुन्हां अधिकारारूढ झाला. या मवाळ पक्षाचें धुरीणत्व क्लेअस बर्टसेन याच्याकडे आलें. १९१२ सालीं मे महिन्याच्या १४ व्या तारखेस फ्रेडरिक राजा मरण पावल्यामुळें त्याच्या जागीं दहावा ख्रिश्चियन हा राज्यावर बसला. रॅडिकल व सोशियालिस्ट पक्षांच्या सहाय्यानें बर्टसेन यानें शासनपद्धतींत बदल करण्याचें बिल पुन्हां चर्चेकरितां पुढें आणलें, पण लँड्स्टिंग उर्फ वरिष्ठ सभेमध्यें सरकारी मताचें प्राबल्य असल्यामुळें या बिलाचा कायमचा कांहींच निकाल लागला नाहीं, त्यामुळें पुन्हां निवडणुकी झाल्या व फोकस्टिंग उर्फ खालच्या कायदेमंडळांत रॅडिकल व सोशियालिस्ट पक्षांनें बहुमत झालें. पुन्हां झहले हा प्रधान झाला व त्यानें हें बिल चर्चेकरितां पुढें आणलें. पुन्हां सरकारी पक्षानें याला कसून निषेध केला; तेव्हां डेन्मार्कसरकारनें लँडस्टिंग सभा बरखास्त करून टाकली. पण इतक्यांत महायुद्ध सुरू झाल्यामुळें या बिलाचा निकाल लांबणीवर पडला. महायुद्ध सुरू झाल्यमुळें डेन्मार्कला आपल्या राज्यवर संकट ओढवणार अशी धास्ती वाटूं लागली. यासाठीं डेन्मार्कनें आपली फौज गोळा करण्यास आरंभ केला. डेन्मार्कनें या युद्धांत तटस्थ रहावयाचें ठरविलें महायुद्धामुळें डेन्मार्कवर आर्थिक दृष्ट्याहि बराच परिणाम होईल या भीतीनें, धान्याचा तुटवडा होऊं नये व महर्गता होऊं नये यासाठीं अगोदरपासूनच डेन्मार्कनें धान्याचा संग्रह करण्यास सुरवात केली व धान्याच्या किंमती ठरवून दिल्या. त्याचप्रमाणें युरोपांतील राष्ट्रांशीं संधान बांधून दोन्हीं पक्षाशीं सूत ठेवण्याचें डेन्मार्कनें धोरण ठेवलें; व अशा रीतीनें या महायुद्धाच्या कचाटींतून डेन्मार्कनें मोठ्या शिताफीनें आपलें रक्षण करून घेतलें.

महायुद्धापासून आपल्या राष्ट्रास विशेष धोका नाहीं. अशी खात्री करून घेतांच पुन्हां प्रधानमंडळानें शासनपद्धतींत सुधारणा करण्याचें बिल पुढें आणलें. लँड्स्टिंगमधील हुजूरपक्षाचें प्राबल्य कमी होत असल्यामुळें हें बिल मंजूर होण्याला फारशी अडचण पडली नाहीं. दोन्हीं कायदेमंडळांत हें बिल पास झाल्यामुळें राजानेंहि याला मंजुरी दिली. यामुळें दोन्हीं कायदेमंडळांच्या निवडणुकींच्या बाबतींत मतदारांना सारख्याच अटी लागू झाल्या. स.१९१६ च्या एप्रिल महिन्याच्या १९ व्या तारखेस न्यायखात्यांत सुधारणा घडवून आणण्याचा ठराव पास होऊन त्या ठरावान्वयें न्यायखात्याची व कार्यकारीमंडळांची फारकत झाली. फौजदारी व राजकीय दावे, ज्यूररच्या साहाय्यानें चालवेत असें ठरविण्यांत आलें व अपघाताबद्दल विम्याचा कायदा पसार होऊन मजुरांच्या जीविताबद्दल त्यांचा विमा मालकांनीं उतरावयाचा असें ठरविण्यांत आलें. १९१६ सालपर्यंत राज्यकारभार सुरळीत चालला होता. व डेन्मार्कच्या राजानें व त्याच्या सल्लागार मंडळानें अमेरिकेशीं तह करून डेन्मार्कच्या ताब्यांत असलेलीं वेस्टइंडीज बेटें अमेरिकेकडून २५० लक्ष डॉलर मोबदला घेऊन द्यावयाचें ठरविलें. यामुळें सर्व डेन्मार्कभर मोठी खळबळ उडून गेली. वेस्ट इंडीजचा प्रश्न महायुद्ध संपेतों तहकूब ठेवावा असें लोकांनीं व कायदेमंडळानें जाहीर केलें. पण राजाच्या विनंतीवरून सर्व पक्षांमध्यें समेट होऊन, लोकांच्या मतानें या प्रश्नाचा निकाल लावण्याचें ठरविण्यांत येऊन लोकांनीं आपखुषीनें राजाच्या मोहबतीखातर वेस्ट इंडीज बेटें विकावयाचें ठरविलें. अशाच प्रकारें लोकांमध्यें खळबळ उडवून टाकणारा प्रश्न म्हणजे आइसलंडसंबंधाचा होय. आइसलंड हें डेन्मार्कपासून स्वतंत्र होऊं पहात होतें व तेथील लोकांनीं आपली स्वातंत्र्याची चळवळ नेटानें चालविली होती. डेन्मार्कमधील हुजूरपक्ष याला विरुद्ध होता पण इतर पक्ष आइसलंडला स्वातंत्र्य देण्याला अनुकूल होते. शेवटीं १९१८ सालीं ॲक्ट ऑफ यूनियन पास होऊन त्याअन्वयें आइसलंडला साम्राज्यान्तर्गत स्वराज्य देण्यांत आलें. आइसलंडचें परराष्ट्रीय धोरण मात्र डेन्मार्कवर अवलंबून असावें व या ॲक्ट ऑफ यूनियनची मर्यादा १९४० सालापर्यंत असावी असें ठरविण्यांत आलें. १९१७ सालापासून इतर राष्ट्रांप्रमाणें डेन्मार्कमध्येंहि अन्नाची टंचाई जाणवूं लागली. पण डेन्मार्क सरकारनें यासंबंधीं पूर्वीपासूनच खबरदारी घेतल्यामुळें लोकांना ही टंचाई फारशी जाणवली नाहीं.१९१८ सालीं नवीन निवडणुकी झाल्या. त्यांत रॅडिकल व सोशियालिस्ट पक्षांचेंच बहुमत झालें. महायुद्धाच्या तहकुबीनंतर डेन्मार्कनें आपल्या सैन्याला रजा दिली. दोस्तांचा या महायुद्धांत जय झाल्यामुळें, स्लेसविग हा प्रांत जर्मनाच्या ताब्यांत होता तो परत मिळविण्याची डेन्मार्कनें खटपट सुरू केली. शांततापरिषदेपुढें हा प्रश्न चर्चेला निघून उत्तर स्लेस्विग प्रांत डेन्मार्कला देण्यांत आला. मध्यस्लेस्विगमधील लोकांनीं डेन्मार्कच्या विरुद्ध मत दिल्यामुळें तो प्रांत मात्र डेन्मार्कला मिळाला नाहीं. उत्तर स्लेस्विग प्रांत डेन्मार्कच्या ताब्यांत आल्यानंतर नवीन निवडणुकी झाल्या त्यांत मवाळ पक्षाला बहुमत मिळालें व नीलगार्ड हा पुन्हां मुख्य प्रधान झाला.

डॅ नि श भा षा.—डेन्मार्कमधील सांप्रतची भाषा स्वीडनची भाषा ज्या मूळ भाषेपासून निघाली तिच्यापासूनच निघालेली असून त्या दोघींचीहि जननी जुनी स्कँडिनेव्हियन भाषा ही होय. ही स्कँडिनेव्हियन भाषा अद्यापहि थोड्याफार फरकानें आईस्लंडमध्यें आहे आणि इ. सन ११०० पर्यंत सर्व स्कँडिनेव्हियन व नार्वेचें वाङ्मय त्याच भाषेंत निर्माण होत होतें. या जुन्या भाषेपासून अलीकडील डॅनिश भाषा स्वतंत्र निर्माण होण्याला प्रथम लो जर्मन भाषा व नंतर हाय जर्मन भाषा यांचा परिणाम कारणीभूत झालेला आहे.

१२ व्या शतकापासूनच हा फरक पडण्यास सुरवात झाली. भाषेची वाढ परिपूर्ण होण्याच्या एकंदर काळाचे चार विभाग पडतात. पहिल्या ११००–१२५० दरम्याच्या काळांत प्रथम शब्दांचीं रूपें बनण्याच्या नियमांमध्यें थोडथोडा फरक पडूं लागला. दुसऱ्या १४०० पर्यंतच्या काळांत स्वरांच्या पद्धतींतील फरक कायम होत गेला आणि क्रियापदांच्या रूपांमध्यें सोपेपणा येत चालला. तिसऱ्या १५३० पर्यंतच्या काळांत जर्मन भाषेचा डॅनिश भाषेवर पूर्ण पगडा बसून धर्मसुधारणेच्या वेळीं त्याचा शेवट झाला. शेवटीं चवथ्या (१५३० ते १३८० च्या) काळांत हें वाढीचें काम तडीस जाऊन सांप्रतची डॅनिश भाषा तयार झाली.

[ संदर्भग्रंथ—डेन्मार्क्स रिगेस हिस्टरी ( कोपनहेगन १८९८–१९०५ ); आर. निस्बेट बेन—स्कांडिनेव्हिया ( १९०४ ); एच्. वीटेमेयर—डेन्मार्क ( १९०१ ); अडॉल्फ डिटलेव्ह जॉर्गेन्सन—हिस्टरी आफांड लिंगेर ( १८९८ ); सॅक्सो—गेस्टा डॅनोरम ( १८८६ ); लुडविग होलवर्ग—कोंग ओग डेनहोफ ( १८९५ ); पौल फ्रेडरिक बारफोर्ड—डेन्मार्कस् हिस्टरी १३१९–१५३६ ( १८८५ ); नील्स पीटर जेन्सन—डेन अंडेन स्लेस्विग क्रिग; एस्. एन्. मौरिटसेन—व्हॉर फॉर्फेटॅनिग्ज हिस्टरी ( १८९४ ) ]

वा ङ्म य.—डेन्मार्कमधील सर्वांत जुना ग्रंथ म्हटला म्हणजे एका इंग्लिश मंकनें नूड साधूचें लॅटिन भाषेंत लिहिलेलें चरित्र हा होय. डेन्मार्कमध्यें आणखी कित्येक लॅटिन लेखक होऊन गेले असून त्यांच्या ग्रंथांपैकीं डेन्मार्कसंबंधीं बखरीवजा व इतिहासवजा लिहिलेले ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

१६ व्या शतकापर्यंत डेन्मार्कमध्यें देशी भाषेंत वाङ्मय होण्यास सामान्यपणें सुरवात झाली नव्हती. जुने जुने कायदेलेख उपलब्ध आहेत. त्यांवर १३ व्या शतकापासूनचे सन आढळतात. १३ व्या शतकांतला वैद्यकावरील फक्त एकच ग्रंथ हार्पस्ट्रेंगनें लिहिलेला हयात आहे. डॅनिशमध्यें लिहिलेल्या एका राजाज्ञापत्रकावर १३८६ हा सन आढळतो; आणि स. १३९७ मध्यें लिहिलेला कॉलमार येथील एकीकरणाचा कायदा (ॲक्ट ऑफ यूनियन) हा १४ व्या शतकांतील अत्यंत महत्त्वाचा लेख होय. तथापि १३०० ते १५०० च्या दरम्यान रचल्या गेलेल्या सुमारें ५०० कवितांचा उर्फ डॅनिश पोवाड्यांचा संग्रह हींच मध्ययुगांतील डेन्मार्कची अत्यंत अमूल्य देणगी होय. या कवितांच्या कर्त्यासंबंधीं आज आपणांस कांहींच माहिती नाहीं; पण त्यांत 'शिव्हलरिक' युगांतील प्रतापी योद्धयांच्या व रमणीय युवतींच्या साहसकथा अगदीं अकृत्रिम पण बहुशः अत्यंत सुंदर भाषेंत वर्णन केल्या आहेत. त्यांतील कित्येक विषय जुन्या पुराणांतले आहेत; कांहीं ख्रिस्ती दंतकथांतले आहेत व पुष्कळ राष्ट्रीय इतिहासांतील आहेत. त्या पोवाड्यांची भाषा १६ व्या व १७ व्या शतकांतील आहे व ती तोंडीपरंपरेंत बदलत जात जात अगदीं आधुनिक बनली आहे. ते पोवाडे खंडशः प्रसिद्ध होतां होतां १८८३ सालीं पांच भागांमध्यें ग्रुंडव्हिगरनें प्रसिद्ध केले.

१४९० सालीं प्रथम कोपनहेगन येथें गॉटफ्रीडनें छापखाना काढला. तो त्यानें वेस्टफॅलियाहून आणिला होता. नंतर पांच वर्षांनीं त्यांतून पहिलें डॅनिश पुस्तक छापून निघालें. तें पुस्तक म्हणजे डेन्मार्कचा पद्यमय इतिहास होय. त्यांत १ ल्या ख्रिश्चियनच्या स. १४८१ तील मृत्यूपर्यंतची हकीगत आहे. १५०६सालीं कोपनहेगनच्या युनिव्हर्सिटीची स्थापना झाली. मिकेलनें ' कुमारी मेरीची गुलाबमाला, ' ' सृष्ट्युत्पत्ति, ' व ' मानवी जीवित ' हीं पुस्तकें १५१४त प्रसिद्ध केली. यांबरोबरच लॅटिन ग्रंथ मात्र पुष्कळच झाले. डॅनिश वाङ्मयाला खरें उत्तेजन धर्मसुधारणेच्या चळवळीमुळें मिळालें. पेडरसेन हा डेन्मार्कमधील पहिला विद्वान मनुष्य होय. यानें अनेक स्तोत्रें, (साम्स), न्यू टेस्टामेंट व बायबल यांचें भाषांतर केलें. धर्मसुधारणेच्या चळवळींतील अत्यंत उत्तम वक्ता व उपदेशक ट्युसेन यानेंहि धर्मग्रंथांचें भाषांतर व स्वतंत्र उपदेशपर गोष्टी लिहिण्याचें काम केलें आहे. तद्विरुद्ध कॅथॉलिक पक्षामधील उत्तम विवादपटु हेल्गेसेन यानें लूथरविरुद्ध स्वीडनच्या पहिल्या गुस्टॅव्हसच्या वारा धार्मिक प्रश्नांनां उत्तर दिलें आहे व ' स्किबी क्रॉनिकल ' म्हणून इतिहासवजा एक पुस्तक लिहून त्यांत ऐतिहासिक प्रसंगांवरील मतेंहि प्रदर्शित केलीं आहेत. ह्यूटफील्डनें डेन्मार्कच्या राज्याची बखर १० भागांत प्रसिद्ध केली आहे.

धर्मसुधारणेपूर्वी नाटकें क्वचित झालेलीं आढळतात. त्यांत स्थेनचें 'कोटव्हेन्डिंग' ( दैवाचा बदल ), हॅनसेनचें ' दि फेथलेस वाईफ (स्वैरिणी स्त्री).' रँचचें कॉग सॅलोमन्स हिल्डिंग ( सॉलोमन राजाचा राज्याभिषेक ) व सॅम्सन्स फेंगसेल ( सॅम्सनचा तुरुंगवास ) आणि कॅरिग निडिंग ( कृपण पापी मनुष्य ) वगैरे नाटकें प्रसिद्ध आहेत. शिवाय क्लौसेन, अरेबो, वगैरे कवी व थॉट व उल्फेल्ड या लेखिका प्रसिद्ध आहेत. डॅनिश वाङ्मयाचा प्राथमिक काळ १७०० च्या सुमारास संपतो; त्या काळांतील किंगो व ब्रोर्सन हे अखेरचे कवी होत. किंगोची भाषा सुंदर व सुलभ असून तिच्यामध्यें मोहक कल्पनाशक्ति होती. आधुनिक डॅनिश वाङ्मयाचा पाया हालबर्ग ( १६८४–१७५४ ) यानें घातला. त्याच्या कित्येक ग्रंथांतील चित्ताकर्षकता अद्याप कायम आहे. इतिहासकार या नात्यानें त्याची लेखनपद्धति मोजकी व ओजस्वी, त्याची वृत्ति तत्त्वविवेचक आणि माहिती अगदीं बिनचूक आहे. त्या काळाच्या मानानें तो अत्यंत सुसंकृत मनुष्य असून शिवाय अत्यंत व्यवहारकुशलहि होता; व त्यामुळें अशिक्षित माणसांनां झटपट शिक्षण मिळून फायदा कशानें होईल, हें तो स्पष्ट जाणत असे. त्यानें आपलीं तेहेतीस नाटकें मोलियरच्या थोडेबहुत अनुकरण करून लिहिलीं असून त्यांच्यायोगानें डॅनिश वाङ्मयांत अतिशय महत्त्वाची भर घातली आहे.

होलबर्गच्या अनुयायांचा म्हणून स्वतंत्र असा एकहि संप्रदाय जरी निघाला नव्हता, तरी त्याच्या ग्रंथाचा चोहोंकडे तत्काल परिणाम दिसूं लागला. कोपनहेगन युनिव्हर्सिटीप्रमाणें ग्रॅमनें स्थापन केलेली डॅनिश रॉयल अकेडमी ऑफ सायन्सेस, लँगबेकची डॅनिश भाषा सुधारणारी सोसायटी यांना व कायदेशास्त्राचा लेखक होईर, प्राणिशास्त्राचा पाँटोपीडन या व इतर अनेक विद्वानांना ५ व्या फ्रेडरिकचा चांगला राजाश्रय असे. यानंतर क्लॉपस्टॉक नांवाचा प्रसिद्ध जर्मन कवि कोपनहेगनला येऊन राहिला. त्यानें ललितकलांकरितां सोसायटी काढली व मोठाल्या देणग्या मिळवून उत्तम लायक लोकांना काव्यादि लेखनांबद्दल मोठमोठीं बक्षिसें देण्याचें सुरू केलें.

रसात्मक काव्यांचें पुनरुज्जीवनः—स. १७४२ ते १७४९ च्या दरम्यान म्हणजे ज्यावेळीं होलबर्गचा लेखनव्यवसाय अगदीं शिखराला पोहोंचला होता अशा काळांत अनेक कवी जन्माला आले व त्यांनीं आपल्या काव्यांनीं वाङ्मयांत उत्तम भर घातली. त्यांपैकीं वेसेल व एवाल्ड यांनीं ओजस्वी ग्रंथरचना करून व आपल्या अल्पायुष्यक्रमांत हालअपेष्टा सोसून नवीन पिढीचें लक्ष्य वेधिलें. एवाल्डसारखा कवि तर सर्व यूरोपमध्येंहि १८ व्या शतकांत क्वचितच झाला असेल. होलबर्गनंतर व्होल्टेवरचीं दुःखपर्यवसायी नाटकें डेन्मार्कमध्यें फार होतीं. अशा वेळीं वेसेलनें एक 'लव्ह विदाउट स्टॉकिंग्ज' नांवाचें फ्रेंच धर्तीवर नाटक लिहिलें, त्यानें केवळ जादूसारखा परिणाम होऊन फ्रेंच नाटकें व इटालियन ऑपेरा सुद्धां होण्याचें अजीबात बंद झालें; व प्रत्येक नाटकप्रयोगाला राष्ट्रीय वळण लागून ते प्रयोग डॅनिश भाषेंतच होऊं लागला. ऑपेरा म्हणजे संगीत नाटकांची उणीव हार्टमननें व देशी गवयांनीं नाटकें करून भरून काढली. ब्रुन, फ्रिमन वगैरे लेखकांनीं 'क्रिटिकल आवझर्वर' नांवाचें सौंदर्यशास्त्रविषयक मासिक उत्तम रीतीनें चालविलें होतें. दुसरे कित्येक कवी नॉर्वेमध्यें जन्माला येऊन कोपनहेगनला अभ्यासक्रम संपल्यावर त्यांनीं मोठमोठे पर्वत, नद्या वगैरे निसर्गदत्त सृष्टिसौंदर्ययुक्त विषयांवर कविता लिहून डेन्मार्कसारख्या रुक्ष देशांतील लोकांना नवीन गोडी लावून दिली. आतां त्यांच्या काव्यग्रंथांवर नार्वेजियन लोक हक्क सांगूं लागले आहेत, परंतु मूळ त्यांनीं डेन्स लोकांकरितां ग्रंथ लिहिलेले असल्याकारणानें डॅनिश वाङ्मयांतच त्या ग्रंथांची गणना केली पाहिजे.

त्यावेळच्या गद्यग्रंथकारांमध्यें वैद्यग्रंथकार टोड, इतिहासकार सूह्म, व तत्त्ववेत्ता ट्रेसची, वगैरे ग्रंथकार होऊन गेले. काव्यलेखन मंदावलें पण गद्यग्रंथ चांगले निर्माण होऊं लागले. राहबेक यानें गोड कादंबऱ्या व नाटकें लिहिलीं. ब्रून हा भूगोलकार, ऑलुफसेन हा प्राणिशास्त्र व अर्थशास्त्रकार, न्येरप हा भाषा-वाङ्मयेतिहासकार, एंजलस्टॉफ्ट हा इतिहासकार, मिन्स्टर हा ईश्वरविज्ञानवेत्ता वगैरे विद्वान गद्यग्रंथकार होऊन गेले. अद्भुतकथालेखनाची चळवळ सुरू होण्याच्या सुमारास बॅगसेन नामक डेन्मार्कमधील सर्वोत्कृष्ट विनोदी कवि झाला; सर्व डेन्स लोकांत औपरोधिक व विनोदी कविता लिहिण्यांत त्याच्या तोडीचा दुसरा लेखक नाहीं.

अद्भुतकथालेखनप्रवृत्ति ( रोमँटिसिझम ):—१९ व्या शतकाच्या आरंभीं तत्वज्ञान व काव्य या वाङ्मयप्रांतांत एक नवीनच प्रतिभा चमकूं लागली. ती मूळ जर्मनींत उत्पन्न होऊन सर्व यूरोपभर पसरली व त्याबरोबर तिनें डेन्मार्कमध्येंहि प्रवेश केला व तिचा परिणाम डेन्मार्क-इतका जलद व उज्वल दुसऱ्या कोणत्याहि देशांत झाला नसेल. डेन्मार्कमध्यें एक नवीन कविवर्ग उदयास आला, त्याची प्रसिद्धि यूरोपांतील सर्व देशांत झाली, इतकेंच नव्हे तर कोणत्याहि देशांत किंवा कोणत्याहि युगांत मानमान्यतेस चढण्यासारखेच ते कवी होते. त्यांच्या उदयाबरोबर उत्कृष्ट काव्यरचनेपुढें इतर सर्व वाङ्मयशाखा मागें पडल्या; व कवितावद्ध-लेखनकलेंतील कौशल्य अगदीं शिखरास पोहोंचलें. या कवींतला पहिला जर्मनींत जन्मलेला स्टॅफेल्ड होय. याची कविता फार रसाळ व नवीन शास्त्रीयशोधांस धरून आहे. त्यानंतरचा ओहलेनश्लेगर हा डेन्मार्कमधला सर्वश्रेष्ठ कवि होय. त्यानें आपल्या देशबांधवांमध्यें आपल्या प्राचीन स्कँडिनेव्हियन राष्ट्रीयत्वाची जागृति करून दिली. ओहलेनश्लेगरनंतर जटलंडर ब्लिचर हा 'ए व्हिलेज सेक्स्टन' स डायरी', दि स्पिनिंग रूम' वगैरेंचा कर्ता, इंगेमन हा वाल्टर स्कॉटसारखा ऐतिहासिक अद्भुत गोष्टी लिहिणारा, हॉबर्ग हा टीकाकार, त्याची आई बॅरोनेट गिलेंबर्ग-इहरेनस्वॉर्ड ही कादंबरीकर्ती, वॅाटचर हा गीतकार व या वर्गातील शेवटला हेर्ट्झ हा उपहासात्मक व विनोदी लेखक इत्यादि ग्रंथकार होऊन गेले.

या अद्भुतकथालेखन काळांतील सर्व मोठमोठे कवी दीर्घायुषी होते ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. अँडरसन यानें १८३५ सालीं एक फेअरीटेल्स( कल्पितकथा )चा भाग प्रसिद्ध करून पुढें दरसाल नाताळच्या सुमारास एक किंवा दोन गोष्टी प्रसिद्ध करण्याचा क्रम आजन्म चालविला. फ्रे. मुल्लर याचीं पौराणिक व इतर नाटकें, गीतें, आनन्दपर्यवसायी काव्यें, 'कॅलॅनस' नांवाचें शोकपर्यवसायी नाटक हीं फार उत्तम असून त्यांत त्याची अगाध कल्पनाशक्ति व व्यापक ग्राहकशक्ति दिसून येते. या काळांत डेन्मार्कमधील वाङ्मयावर कवींचा पूर्ण पगडा बसलेला होता. तथापि रास्क हा भाषाशास्त्रज्ञ, अॅर्ट हा वनस्पतिशास्त्रज्ञ व पुराणवस्तुशास्त्रज्ञ, मोलबेक हा कोशकार, वगैरे विद्वान त्याच कालांतील आहेत. तसेंच कीर्केगार्ड हा तत्कालीन प्रसिद्ध तत्ववेत्ता आहे. शेक्सपियरचा उत्तम भाषांतरकार फ्रेओर्सम व आनन्दपर्यवसायी नाटककार व डॅनिश रंगभूमीचा इतिहासकार ओव्हरस्को हे नाट्यशाखेंतील लेखक होत. यांशिवाय अद्भूतकथालेखनकाळ व तदनंतरचा

काळ यांच्या दरम्यान ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिणारा इवाल्ड, उत्कृष्ट नाटकें लिहिणारा हॉस्टरप, तत्त्ववेत्ता नीलसेन, वगैरे होऊन गेले.

निसर्गवादित्व ( नॅचरॅलिझम ):—काल्पनिक वाङ्मयाच्या वाढीला १९ व्या शतकोत्तरार्धांत निश्चित स्वरूप येत चाललें. अद्भुत-कथा-लेखन-काळांतील कवींच्या मृत्यूबरोबरच ती लेखनपद्धतीहि बंद पडत चालली. व काल्पनिकध्येयवाद्यांच्या ( आयाडिआलिस्ट ) जागीं नवे लेखक आले. त्यांनां निसर्गवादी असें नांव आहे. त्यांचा ओढा फ्रेंच वाङ्मयाकडे होता. त्यांपैकीं ड्रॅकमन ( १८४६–१९०८ ) यानें आपल्या स्वतःच्या समुद्रसफरींतील अनुभवांच्या आधारावर अनेक गोष्टी लिहिल्या. स्कॅंडॉर्फनें ' कंट्री लाइफ ' व ' विदाउट ए सेंटर' हीं पुस्तकें, व मौपॅसंटर्नें 'लिटल फोक' ही कादंबरी प्रसिद्ध केली. या निसर्गवादी उर्फ सत्यवादी (रिॲलिझम) पंथांत जेलेरप, स्क्रॅम, ब्रँडेस, बॅग वगैरे होऊन गेले. नॅन्सेन यानें अनेक सुंदर पण फाजील शृंगारिक गोष्टी लिहून कुप्रसिद्धि मिळविली.या निसर्गवाद्यांच्या काळांत पूर्वींच्या काळांतलि पद्धतीवर लिहिणारे कित्येक निघालेच.

सन १८८५ते१८९२मधील काळ हा डॅनिश वाङ्मयांतील संक्रमणकाल होय. तोंपर्यंत सर्व प्रमुख लेखकांनां निसर्गवादित्व हेंच तत्त्व कबूल झालेलें होतें. स.१८८५ च्या सुमारास ड्रॅकमन नांवाच्या त्यावेळीं पहिल्या नंबरच्या असलेल्या कवीनें प्रचलित तत्त्व झुगारून देऊन उघडपणें पुराणवादित्व पत्करलें आणि राष्ट्रीय देशभक्तीचें धोरण स्वीकारलें. हळू हळू होतकरू लेखकांपैकीं कित्येक त्याला येऊन मिळाले. परंतु कांहीं ब्रँडेसच्या निसर्गवादित्वाला चिकटून राहिले. या संक्रमणकाळांतील लेखकांमध्यें प्रसिद्ध पाँपेपिडन हा फारच जोरदार कादंबरीकार होऊन गेला. डॅनिश समाजाला निव्वळ सत्यवादित्वाचा कंटाळा आल्याकारणानें या नवीन पंथाची वरीच चहा होऊं लागली. ड्रॅकमनचे जॉर्जेन्सेन, फोन्स, इप्सेन वगैरे अनुयायी निघाले.

नाट्यकलेची वराच काल डेन्मार्कमध्यें भरभराट चालू होती. मुख्य थिएटरांत नवीन नाटककारांनां संधि मिळत असेच; पण शिवाय डॅनिश लोक या कलेचे विशेष शोकी असल्याकारणानें खासगी दिवाणखान्यांतून व खासगी थिएटरांतून प्रयोगांनां भरपूर संधि मिळत असे. ड्रॅकमननेंच कितीएक अद्भुत नाटकें राष्ट्रीय दंतकथांच्या आधारावर लिहिलीं होतीं आणि वर उल्लेख केलेल्या वहुतेक लेखकांनीं व कवींनीं नाटकें लिहिण्याच्या कमी अधिक प्रयत्न केला आहे. ईश्वरविज्ञान या विषयामध्यें गेल्या काळांतल्या क्लौसेन, मार्टेनसेन यांच्या योग्यतेचा एकहि लेखक निघाला नाहीं. परंतु इतिहासविषयांत मात्र डॅनिश लोकांचे फार प्रयत्न चालू होते. स. १८८० मध्यें स्टीनस्ट्रॅप याच्या प्रामुख्याखालीं अनेक तरुण लेखकांनीं डॅनिश इतिहासाच्या साधनांचें संशोधन करून तीं छापण्याचें ठरविलें. १८९६ सालीं या साधनांच्या आधारानें एक विस्तृत इतिहास लिहिण्याचें ठरलें. तत्त्वज्ञानामध्यें नांव घेण्यासारखा कोणीच लेखक अलीकडे निघाला नाहीं. तथापि हॉफडिंग हा बराच प्रसिद्ध असून त्याच्या ' प्रॉब्लेम्स ऑफ रिलिजन ' आणि 'फिलासफी ऑफ रिलिजन' या पुस्तकांचें सन १९०६ मध्यें इंग्लिशमध्यें भाषांतर झालें आहे. लेह्मन हा मानसशास्त्रावरील लेखक बराच पुढें आलेला आहे. रोनिंगनें डेन्मार्कमधील विचारप्रगतीचा इतिहास (हिस्ट्री ऑफ थॉट) लिहिला आहे. कलांवरील टीकाकार म्हणून लँग व मॅडसेन हे प्रसिद्ध आहेत. वाङ्मयटीकाकार म्हणून ब्रँडिस हा बहुत दिवसांचा अगदीं प्रमुख असून त्यानें कला व विचार (ऑर्ट ॲन्ड थॉट) यांनां उत्तम वळण लावून दिलेलें असून त्या कालांत त्याच्या इतका वजनदार लेखक दुसरा कोणीहि झालेला नाहीं.

इसवी सन १९१० ते १९२१ यांच्या मधील डॅनिश वाङ्मयाच्या उत्पादकांपैकीं, कार्लेजरलस, हरमन बंग, पीटर नान्सेन, विल्हेम बार्सो, सोफस बॉडिट्स, ट्रोएल्स फ्रेड्रिक लंड, एडवर्ड होल्म, फ्रेडेरिका, इत्यादि ग्रंथकार मरण पावल्यामुळें डॅनिश वाङ्मयानी फार हानि झाली. हेन्रीक पांटोप्पीडन या कादंबरीकाराला १९१७ सालीं नोबल प्राईज मिळालें.

तथापि या काळामध्यें पुष्कळ नवीन ग्रंथकार निर्माण झाले. त्यांपैकीं नील्स मोल्लर व लुडविग होल्स्टीन हे प्रमुख होत. यांच्या काव्यांत १८८०सालच्या सुमारास डेन्मार्कमध्यें जो दांभिकपणा माजला होता त्याचें प्रतिबिंब दिसून येतें. व्हिगो स्टकेनबर्ग, सोफस क्लासेन, सोफस मायकेलिस, एडवर्ड ब्लामुल्लर यांच्या कवितांत, निसर्गसौंदर्याचीं वर्णनें आढळून येतात. स्टुकेनबर्ग व मायकेलियस हे कादंबरीकारहि होते. पण सर्वांत उत्कृष्ट कवी म्हणजे, व्हल्डेमर रोरडम व हल्डोरोड हे होत. रोरडम, लंगे, मोलर इत्यादि कवींनीं परकीय काव्यांचींहि बरींच भाषांतरें केलीं आहेत. याशिवाय नील्सन, काइ हॉफमन, ओलाफ हान्सेन, थोगर लारसेन इत्यादि कवींचीं काव्येंहि चांगलीं आहेत.

कादंबरीवाङ्मयामध्यें, हॅराल्ड किड्डे, व जोहान्स बुखोल्ट्झ हे प्रसिद्ध कादंबरीकार होत. १८ व्या शतकाच्या उत्तरार्धापासून, डॅनिश वाङ्मयांत प्रांतिक अभिमानाची छटा दिसून येऊं लागली होती. ही छटा, जेकब नुडसेन याच्या कादंबऱ्यांत प्रामुख्यानें झळकते. नुडसेन हा प्रतिभासंपन्न कादंबरीकार होता. जेप्पे अकजेर हा कादंबरीकार स्फूर्तिदायक गोष्टी व निबंध लिहिण्याबद्दल नांवाजलेला आहे. जेन्सेनच्या कादंबऱ्यांतील डॅनिश भाषा फारच ओजस्वी आहे. यांशिवाय मॉर्टेन कॉर्च, थॉरकिल्ड ग्रंन्हलंड, नड जोर्टो, मार्टिन अँडर्सन नेक्सो, बर्गस्टेर इत्यादि कादंबरीकार प्रसिद्ध आहेत.

पुराणवस्तुसंशोधनक्षेत्रांत सोफस विम्मर यांचें नांव अग्रस्थानीं चमकतें. लुडविग विम्मर हा लिपिशास्त्रज्ञ म्हणून फार प्रसिद्ध आहे. फीलबर्ग, फँग क्रिस्टेन्सेन, मॅक्सेल ओलिरिक, ट्रॉएल्स लंड, विल्हेल्म अँडरसेन, व लेमार वेडेल हे ग्रंथकार पौराणिक गोष्टी लिहिण्यांत प्रसिद्ध आहेत.

[ संदर्भग्रंथ.—आर. न्येरुप—डेन डॅन डिग्टेकुंस्टस् हिस्टरी ( १८००–१८०८ ); एन्. एम्. पीटरसेन—लिटरेचर हिस्टरी ( १८६७—१८७१ ); ब्रुन—बिब्लिओथेका डॅनिका ( १८७२–१८९६ ); पी. हॅनूसेन—इलस्ट्रेरे डॅन्स्क लिटरेचर हिस्टरी ( १९०१–१९०३ ) ]

**डेन्व्हर**—हें अमेरिकेंतील संयुक्त प्रांतांत कोलोरॅडोचें मुख्य शहर आहे. कानसस व मसोरी संस्थानांमध्यें हें सर्वांत मोठें आहे. लोकसंख्या ( १९०० ) १३३८५९. यांपैकीं ३९९३ नीग्रो व बाकीचे जर्मन, आयरिश, स्वीडिश, इंग्लिश, रशियन, स्कॉट वगैरे लोक आहेत. येथें रेल्वेचें केंद्रस्थान आहे. हें शहर साउथ प्लेट नदीवर वसलेलें आहे. आजूबाजूच्या डोंगरांतील निसर्ग शोभा प्रेक्षणीय आहे. लाँगपीक, ग्रेसीक वगैरे शिखरें डेन्व्हरहून फार लांब नाहींत. स्टेट कॅपिटॉल नांवाची इमारत बरीच सुंदर आहे. याशिवाय कोर्ट, कस्टमहाउस वगैरे इमारतीहि प्रेक्षणीय आहेत. येथील संग्रह फार चांगला आहे. शहरांतील वाचनालयांत ३ लाखांवर पुस्तकें आहेत. डेन्व्हरचें विश्वविद्यालय येथें आहे. त्याचप्रमाणें संगीत विद्यालय वगैरे येथें आहेत. आजूबाजूच्या खाणी व शहरांतील कारखाने यांना येथील रेल्वेची चांगली मदत होते. मांस वगैरेहि येथून बंद करून पाठविण्यांत येतें. या शहराच्या इतिहासाची सुरवात सुमारें १८५८ सालापासून होते. १८६७ सालीं डेन्व्हर हें राजधानीचें शहर झालें.

**डेमॉस्थेनीस** ( इ. पू. ३८४–३२२ )—हा महान् वक्ता व मुत्सद्दी अथेन्समध्यें होऊन गेला. त्याच्या बापाचें नांव डेमॉस्थेनीस हेंच होतें व तो अथेन्सचा रहिवाशी होता. त्याच्या चुलतभावांनीं अफरातफर केल्यामुळें, डेमॉस्थेनीस वयांत आल्यावर सुमारें ५०–६० पौंड वार्षिक उत्पन्नाचें पितृधन त्याच्या पदरांत पडलें. डेमॉस्थेनीसनें पूर्ववयांत इसॅअस नांवाच्या विद्वान शिक्षकाजवळ वक्तृत्वकला व ॲटिक कायदा यांचा अभ्यास केला. पुढें त्यानें न्यायकोर्टांतील पक्षकारांकरतां भाषणें उर्फ तक्रारी लिहून देण्याचा धंदा सुरू केला; कधींकधीं तो स्वतः पक्षकारांतर्फे बोलत असे. परंतु त्याच्या वाणीमध्यें दोष असल्यामुळें साधारणतः नीटसें भाषण करण्यास त्याला फार प्रयास पडत असत. ही गोष्ट लक्षांत घेऊन ते दोष नाहींसे करण्याकरतां व उत्तमोत्तम वक्ता होण्याची महत्त्वकांक्षा धरून त्यानें भगीरथ प्रयत्न केले. त्यानें तोंडांत गोट्या धरून समुद्रतीरावर लाटांच्या खळखळाटांत जोरानें भाषण करण्याचा क्रम कांहीं दिवस ठेवला. टेंकडीवर पळत जात असतां मोठ्यानें बोलण्याचा त्यानें अभ्यास कांहीं दिवस केला; थुसिडाइडसचा इतिहास आठ वेळां लिहून काढला व एकदां सभेमध्यें प्रेक्षकांनीं फजिती केल्यामुळें एका प्रसिद्ध नटाजवळ तो अभिनयकला शिकला. याप्रमाणें अवाज कमावून, भाषेवर प्रभुत्व मिळवून व तिला उचित अभिनयाची जोड देऊन तो पहिल्या प्रतीचा वक्ता बनला. पुढें राजकारणांत पडल्यावरहि त्यानें आपला न्यायकोर्टांतील ( वकिलीचा ) धंदा चालू ठेवला होताच. त्यानें राजकारणांत इ. पू. ३५५ ते ३२२ मधील मरेपर्यंतचें सर्व आयुष्य एका धोरणानें घालविलें. अथेन्स, ग्रीक उर्फ हेलेनिक जीवनक्रम किंवा संस्कृति यांचा रानटी लोकांच्या हल्ल्यापासून बचाव करून अथिनियन किंवा सर्व ग्रीक लोकांचें स्वातंत्र्य कायम राखावयाचें, हें त्याच्या राजकारणांतलें ध्येय किंवा धोरण होतें.

इ. पू. ३५५ मध्यें २९ व्या वर्षी " अगन्स्ट अँड्रोशन " म्हणजे बरखास्त होणाऱ्या सेनेटचा सोनेरी मुकुटानें सन्मान करावा या ठरावाविरुद्ध त्यानें भाषण करून युद्धविषयक तयारी करण्याबद्दलचें भाषण केलें. ३५२ मध्यें स्पार्टा व मेगालोपोलिस यांत लढा उत्पन्न झाला असतां स्पार्टाला दोष देऊन मेगालोपोलिसचें स्वातंत्र्य कायम राखण्याच्या बाजूनें तो बोलला. या सर्व प्रकरणांत, लोकांनीं मुत्सद्द्यांना जबाबदार धरणें, सार्वजनीक पैशाची अफरातफर न होऊं देणें, योग्य कारण व योग्य तयारी असल्याशिवाय युद्ध सुरू न करणें दुर्बळ ग्रीक संस्थानांचें किंवा शहरांचें स्वातंत्र्य कायम राखणें हीं तत्त्वें डेमॉस्थेनीसनें स्वीकारलीं होतीं.

पुढें अथेन्सला फिलिप हा जबरदस्त शत्रु उत्पन्न झाला. त्याच्या विरुद्ध पहिलें फिलिपिक ३५१ त व तिसरें फिलिपिक ३४१ त त्यानें केलें व मध्यंतरीं फिलिपिकच्याच विरुद्ध एकंदर आठ भाषणें केलीं. त्यानें आपल्या ' पहिल्या फिलिपिक ' भाषणांत अथेन्सच्या सैन्यांतील दोष दाखवून ते सुधारण्याची दिशा दाखविली. नंतर र्‍होडसला कोरियाविरुद्ध स्वातंत्र्य मिळविण्याच्या कामांत अथेन्सनें मदत करावी, असें भाषण करून त्यानें स्वातंत्र्याचा योग्य कैवार घेतला. पुढें युबियांतील अंतस्थ भानगडींत पडण्याच्या विरुद्ध त्यानें भाषण केलें. त्याच प्रकरणांत कोणा एका धनिक दंगेखोरानें डेमॉस्थेनीसला मारण्याचा प्रयत्न केला; पण तो फसला व तें प्रकरणहि शेवटीं आपसांत मिटलें. पुढें फिलिपनें ऑलिंथसवर स्वारी केली, तेव्हां ऑलिंथियनांना मदत देण्याविषयीं त्यानें तीन भाषणें केलीं. तिकडे फिलिपचा जय होत गेला व त्यानें बत्तीस शहरें जमीनदोस्त केलीं. याप्रमाणें फिलिप ग्रीसमध्यें तर शिरलाच; आतां त्याला अडवून कोठें धरावयाचा, एवढाच प्रश्न उरला. या सुमारास एश्चिनस नांवाचा एक जोरदार वक्ता राजकारणांत पुढें आला होता; त्यानें लोकांचीं मनें फिलिपबरोबर युद्ध करण्यास तयार केलीं. पण डेमॉस्थेनीस तह करण्याच्या मताचा होता. अखेर अकरा जणांचें एक वकीलमंडळ फिलिपकडे तहाचें बोलणें करण्यास जाऊन फिलोकेटसचा तह स. ३४६ फेब्रुवारींत झाला. त्यांत

तारखेस ताब्यांत असलेला मुलुख ज्याचा त्यानें घ्यावा असें ठरलें. परंतु या तहांत हेलियन व फोशियन लोकांचा अन्तर्भाव झाला नव्हता. त्याचा फायदा घेऊन फिलिपनें त्यांच्याबरोबर लवकरच युद्ध सुरू केलें व फोसिया जिंकून घेतला, ॲंफिक्टिऑनिक कौन्सिलमध्यें आपलें वर्चस्व स्थापिलें व डेल्फी ओरॅकल अथेन्सहून फिलिपनें नेलें. तेव्हां युद्ध करण्यास अथिनियन लोक एका पायावर तयार असतांहि डेमॉस्थेनीसनें दूरदृष्टीनें त्यांनां युद्धापासून परावृत्त केलें. कारण त्यावेळीं ओरोपस, ॲंफिपोलिस, कार्डिया, चिऑस; कॉस, ऱ्होडस, बायझंटियम वगैरे सर्व ठिकाणें हातचीं गेल्यामुळें अथेन्सला मदतनीस दोस्त कोणी उरलें नव्हतें. त्यामुळें त्यावेळीं युद्ध न करणेंच योग्य होतें.

पुढील आठ वर्षांच्या शांततेच्या काळांत डेमॉस्थेनीसचें वर्चस्व सारखें वाढत गेलें व शेवटीं तो सर्वश्रेष्ठ मुत्सद्दी झाला. ख्रि. पू. ३४४ त त्यानें स्वतः पेलॉपोनेसिसमध्यें जाऊन फिलिपच्या जाळ्यांत न सांपडण्याबद्दल त्यांनां उपदेश केला. फिलिप ॲड्रिॲटिक समुद्रापासून हेलेस्पांटपर्यंत आपली सत्ता वाढवीत गेला. तेव्हां 'दुसरें फिलिपिक' व 'तिसरें फिलिपिक' हीं भाषणें करून थेबियन लोकांनां त्यानें अथेन्सच्या बाजूला वळविलें. तथापि ख्रि. पू. ३३८ मधील चेरोनियाच्या लढाईत फिलिपचाच जय झाला; त्यामुळें डेमॉस्थेनीसची सर्व धडपड व्यर्थ गेली.

तथापि उरलेल्या आयुष्यांत ( ३३८–३२२ इ. स. पू. ) डेमॉस्थेनीसनें अथेन्सचीं महत्त्वाचीं अनेक कामें केलीं. शेवटीं अथेन्सच्या राज्यातर्फे त्यानें सोनेरी मुकुट ग्रहण करावा असें सेनेटनें ठरविलें. परंतु एश्चिनसनें डेमॉस्थेनीसबद्दलच्या मत्सरानें ग्रस्त होऊन लोकसभेंत डेमॉस्थेनीसच्या एकंदर सार्वजनिक कामगिरीवर कडक टीका केली. त्यावर उत्तरादाखल 'मुगुटावर' हें आपलें चिरस्मरणीय, अत्यंत वक्तृत्वपूर्ण, अत्यंत ओजस्वी व अत्यंत हृदयस्पर्शी असें भाषण केलें. ख्रि. पू. ३२५।३२४ च्या सुमारास फिलिपचा जगज्जेता पुत्र अलेक्झांडर हा आशियाखंडांत दिग्विजयास जात असतां त्याच्याबरोबरचा एक अधिकारी हार्पेलस हा पळून ग्रीसमध्यें दहा बारा लाखांचा ऐवज व ८ हजार सैन्यासह माघारा आला.व तो अलेक्झांडर विरुद्ध सर्व ग्रीक लोकांस स्वातंत्र्याकरितां युद्ध करण्यास चिथवूं लागला. त्या एकंदर प्रकरणांत पैशांची अफरातफर होऊन डेमॉस्थेनीस राजनिष्ठ राहून सर्व ऐवज अलेक्झांडरला परत देण्याविषयीं खटपट करीत असतांहि त्यास ५० टॅलेंट दंड झाला ! ख्रि. पू. ३२३ त अलेक्झांडर मरण पावला; त्याबरोबर डेमॉस्थेनीसनें आपले वाग्रूपी रणशिंग फुंकून सर्व ग्रीक लोकांनां मॅसिडोनबरोबर लढण्याकरितां समरांगणावर उभे केलें. परंतु या लढाईंतहि अपयश येऊन लॅमियन युद्धाचा सर्वस्वीं ग्रीकांच्या विरुद्ध निकाल झाला. मॅसिडोनियाच्या ॲंटिपेटरनें अथिनियन पुढाऱ्यांस हवालीं करण्याची तहांत अट घातली. तेव्हां लोकसभेनेंच डेमॉस्थेनीस, हायपरीडस वगैरेंनां देशद्रोही ठरवून मरणाची शिक्षा सांगितली. तेव्हां डेमॉस्थेनीस पळून जाऊन आर्गोलिस बेटांतील कॅलॅरियाच्या देवालयांत राहिला. तेथून पकडून नेण्याकरितां ॲंटिपेटरनें पाठविलेल्या आर्कियस यानें, प्रथम डेमॉस्थेनीसला त्या पवित्र देवालयांतून बाहेर काढण्याकरितां आमीष, विनंत्या व धमक्या दाखविल्यानंतर त्याचे शिपाई त्यास धरण्याकरितां देवळांत शिरूं लागले, इतक्यांत डेमॉस्थेनिसनें लेखणींत ठेवलेलें विष खाल्लें व लवकरच प्राण सोडला ! ! त्याचें प्रेत मात्र ख्रि.पू.(३२२ आक्टोबरमध्यें) त्याच्या कट्ट्या शत्रूच्या हातीं लागलें. याप्रमाणें या महान् अथिनियन देशभक्ताचा अत्यंत हृदयद्रावक रीतीनें अंत झाला.

आपल्या देशाला पारतंत्र्यापासून वांचविण्याचें महद्भाग्य डेमॉस्थेनिसला लाभलें नाहीं. हें खरें; तथापि महत्कृत्यांस उत्तेजन देऊन, संकटांत सांत्वन करून व सदोदित उच्च ध्येय डोळ्यांपुढें ठेवण्यांत डेमॉस्थेनीसनें अलौकिक देशकार्य केलें आहे. देशभक्ति जागृत करणें, राजकीय सामर्थ्य वाढविणें व सर्व हेलेनिक लोकांत अथेन्सचें वजन प्रस्थापित करणें हें त्याचें जीवनकर्तव्य होतें; आणि अथेन्सपुढें उच्च उच्च ध्येयें ठेवण्याचें काम त्यानें आजन्म केलें, हाच त्याचा दिग्विजय होय. वक्ता या नात्यानें त्याच्यामध्यें वक्तृत्वकलेंतील पारंगततेबरोबर नैतिक पावित्र्य व बौद्धिक तीक्ष्णता असा त्रिवेणीसंगम झालेला होता. उत्कृष्ट वक्तृत्वकलेला उत्कट देशभक्तीची व दूरदर्शी मुत्सद्दीगिरीची जोड मिळाल्यामुळें डेमॉस्थेनीस हा केवळ अद्वितीय पुरुष होऊन गेला. चॅथॅम व सिसिरो हेहि त्याच्या पुढें फिके पडतात. एकंदर एकसष्ट व्याख्यानें आज डेमॉस्थेनीसच्या नांवावर मोडतात. परंतु त्यांपैकीं निम्मीं प्रक्षिप्त असावींत असें वाटतें.

**डेमिएटा**—हें ईजिप्तच्या दक्षिण भागांतील एक शहर असून नाइलच्या पूर्व ( डेमिएटा किंवा फेटनिटिक ) शाखेवर मुखापासून सुमारें १२ मैलांवर व केरोपासून रेल्वेनें १२५ मैल उत्तर-ईशान्येस आहे. येथील लोकसंख्या ( १९०७ ) २९,३५४ असून हें शहर मेंझाला सरोवर व नाइल नदीचें पूर्व तीर यांमध्ये आहे. या सरोवरांतील मासे धरून ते सुकवून व खारवून विकतात. केरो व अलेक्झांड्रिआच्या खालोखाल ह्या शहराचें महत्व होतें परंतु येथील बंदरांत बराच गाळ जमून तें निरुपयोगी झाल्यामुळें व पोर्टसैदचें महत्त्व वाढत असल्यामुळें ह्याचें पूर्वीप्रमाणें महत्व राहिलें नाहीं. डेमिएटा हें हल्लींपेक्षां ४ मैल समुद्राजवळ होतें व पेलुसिअमच्या नाशानंतर पहिल्याप्रथम महत्त्वास चढलें. सारासन लोकांच्या अंमलांत ह्या शहराची संपत्ति व व्यापार यांची भरभराट झाली. या शहरावर धर्मयोद्ध्यांनीं वारंवार हल्ले चढविले. ह्यांपैकीं स.१२१८ च्या जूनपासून १२१९ च्या नोव्हेंबरचा हल्ला फार महत्त्वाचा आहे. या हल्ल्यांत शेवटीं शहर घेतलें गेलें परंतु लवकरच हें शहर परत मुसुलमानांच्या

हातीं आलें. १२४९ साली फ्रान्सचा लुई यानें अनायासानें हें शहर घेतलें परंतु फेब्रुआरी महिन्यांत मलसुरा येथें पराभव होऊन एप्रिलमध्यें तो मुसुलमानांचा कैदी झाला, यामुळें त्यानें हें शहर त्यांस परत करून आपली सुटका करविली. पुढें समुद्राकडून हल्ले न व्हावे म्हणून मामेलुक सुलतान बिबर्स यानें स.१२६०च्या सुमारास नाइलचें फेटानेटिक मुख बंद केलें व नवीन शहर ह्या स्थानावर वसविलें. येथें व्यापारी भरभराट बऱ्याच काळ राहिली परंतु पोर्टसेडच्या भरभराटीमुळें ह्याचें महत्व खालावलें. येथें पूर्वी डिमिटी नांवाचें पट्टेदार कापड होत असे. सुती व रेशमी मालें अजून होतो.

**डेमोक्रिटस** ( इ. पू. ४७० च्या सुमारास )—भौतिकवादी ग्रीक तत्त्ववेत्त्यांमध्यें हा सर्वश्रेष्ठ तत्त्ववेत्ता होय. हा थ्रेसमध्यें जन्मला. वडिलार्जित मोठी इस्टेट त्याला मिळाल्यामुळें दूरदूरच्या पौरस्त्य देशांत प्रवास करून त्यानें ज्ञान संपादन केलें. पुढें ईजिप्तमध्यें सात वर्षे राहून गणित व भौतिकशास्त्रांचा अभ्यास त्यानें केला. त्याच्या चरित्राची नक्की माहिती फारशी नाहीं. कोणी म्हणतात, तो नव्वद वर्षे जगला, व त्यानें बहात्तर ग्रंथ लिहिले. त्याला ' हंसरा तत्त्ववेत्ता ' हें नांव पडलें होतें. त्याच्या ग्रंथांचें महत्त्व कित्येक शतकें कोणास कळलेंच नव्हतें. प्रथम बेकननें त्याची योग्यता निदर्शनास आणिली. प्लेटो, अरिस्टॉटल यांच्या ग्रंथांइतका परिणाम डेमोक्रिटसच्या ग्रंथांचाहि ग्रीक व अर्वाचीन विचारांवर झालेला आहे. परमाणु व विश्वरचना, आत्मा, धर्मशास्त्र, नीतिशास्त्र ह्या विषयांवर त्याचे ग्रंथ आहेत.

**डेराइस्मायलखान,** जिल्हा.—हा वायव्य सरहद्दीवरील प्रांताचा अगदीं दक्षिणेकडील जिल्हा आहे. याचें क्षेत्रफळ ३७८० चौरस मैल आहे. व आकार अनियमित, त्रिकोणासारखा असून, त्याचें टोंक दक्षिणेकडे व भित्रनी व भरवत या रांगा असलेला पाया उत्तरेस आहे आणि याच्या पूर्वेस सिंधु नदी व पश्चिमेस शिराणी आणि सुलेमान डोंगर आहेत. दक्षिण टोंकाची रुंदी जवळ जवळ २० मैल आहे व तें डेरागाझीखान जिल्ह्याला लागलेलें आहे. ईशान्य टोंकाला खिसोर रांग कांहीं मैल आंत आलेली आहे. या शिवाय उरलेल्या जिल्ह्याचे दोन भाग आहेत; कची म्हणजे सिंधूच्या कांठचा प्रदेश व दामन म्हणजे कचीपासून डोंगरापर्यंतचा सपाट प्रदेश. दामनमध्यें लागवड केलेल्या प्रदेशाशिवाय झाडें किंवा गवत दिसत नाहीं. पावसाळ्यांत ह्यांतून पुष्कळ प्रवाह वाहतात; पण उन्हाळ्यांत ते बहुतेक कोरडे असतात. बन्नू किंवा डेरागाझीखान जिल्ह्यापेक्षां येथील हवा कोरडी आहे. चाळीस वर्षांपूर्वी येथील सर्वांत जास्त उष्णमान ११०° च्या वर कधींच जात नसे, पण अलीकडे ११६° उष्णमानाशिवाय उन्हाळा क्वचितच जातो. हिवाळ्यांत थंडी इतकी असते कीं, उघड्या हवेंत आंब्याचीं झाडें वाढत नाहींत. वार्षिक पाऊस १० इंच पडतो.

इतिहासः—१५ व्या शतकाच्या अखेर मलिक सोहराबच्या सत्तेखालीं बलुची लोक येथें राहण्यास आले. त्याचे मुलगे इस्मायलखान व फत्तेखान; यांनीं येथें स्थापन केलेल्या गांवांना अद्याप त्यांचींच नांवें चालू आहेत. होत घराणें ( बलुची घराण्याचें नांव ) स्वतंत्रपणें ३०० वर्षे म्हणजे १७५० त अहमदशहा दुराणीचें मांडलिक होईपर्यंत वरच्या डेराजातवर राज्य करीत होतें. १७९४ त शहा झमान दुराणी यानें हा प्रदेश सदोझे टोळींतील महंमदखान नांवाच्या अफगाणाला देऊन त्याला नवाब अशी पदवी दिली. महंमदखानानें हा सर्व जिल्हा आणि सिंधूच्या पूर्वेकडील मुलुख घेऊन त्यावर वीस वर्षे राज्य केलें. तो १८१५ सालीं मरण पावल्यावर त्याचा नातू गादीवर आला; पण लवकरच रणजितसिंगानें सिंधूच्या पूर्वेकडील प्रदेश घेतल्यामुळें, डेराइस्मायलखानांत परत येऊन तो डेराजात येथें राज्य करूं लागला. त्याला शीख लोकांना थोडासा सारा द्यावा लागत असे. हा सारा थकल्यामुळें १८३६ सालीं नव निहालसिंग यानें सैन्यासह सिंधूपलीकडे चाल करून हा जिल्हा लाहोरराज्यास जोडला व नवाबाला चरितार्थ चालविण्याकरितां उत्पन्नाचा कांहीं भाग तोडून दिला. त्यांपैकीं कांहीं भाग व नवाब ही पदवी अद्यापहि त्यांच्या वंशांत चालू आहे. शीख अंमलांत वरचा डेराजात दिवाण लखीमल याला मक्त्यानें देण्यांत आला होता. त्याच्यामागून हा प्रदेश त्याचा मुलगा दौलतराय याजकडे गेला. १८४७ सालीं लाहोर दरबारनें लेफ्टनंट एडवर्ड्स याला सरहद्दीवर जमाबंदी करण्याकरितां पाठविलें. त्याच्या पुढल्या वर्षी एडवर्ड्स यानें डेराइस्मायलखान व बन्नू येथून गोळा केलेलें सैन्य मुलतानवर नेऊन त्याच्या मदतीनें युद्ध पुरें केल्यावर पंजाब प्रांत ब्रिटिश राज्यास जोडला, तेव्हां हा जिल्हाहि ब्रिटिश अंमलाखालीं गेला.

लोकसंख्याः—लो. सं. ( १९०१ ) २४७८५७. मागील दशकांत वाढ शें. ८ होती. लो. सं. पैकीं शें. ८७मुसुलमान, २१४३४ हिंदू व ४३६२ शीख आहेत. डोंगराच्या पायथ्याच्या प्रदेशांत पश्तू व इतर ठिकाणीं जत्की ( पंजाबी व सिंधी यांच्या मिश्रणानें झालेली भाषा ) भाषा बोलतात. शें. ५० लोकांचा उदरनिर्वाह शेतकीवर होतो. शें. ९.३ पुरुषांना व शें. १.५ स्त्रियांना लिहितां वाचतां येतें.

शेतकीः—या जिल्ह्यांतील जमिनीचे ५ निरनिराळे प्रकार असेः—दामन, पनियाली, डोंगरी जागा, कची व रुगपहारपूर. बहुतेक जमिनी पट्टीदारी व भय्याचारा पद्धतीनें केलेल्या आहेत व २५० चौ. मै. जमीन जमिनदारी पद्धतीनें दिलेली आहे. गहूं व ज्वारी हीं येथील मुख्य पिकें आहेत.

व्यापार व दळणवळणः—या जिल्ह्यांतील कारखाने महत्वाचे नाहींत. खेडेंगांवांतून जाडेंभरडें कापड तयार होतें. डेराइस्मायलखान व पहाडपुर येथें उत्तम कातकाम होतें. हिंदुस्थान व खोरासन यांच्या दरम्यान चालणाऱ्या

व्यापाराचा मार्ग या जि ह्यांतून जातो; त्या व्यापाराचा या जिल्ह्याशीं प्रत्यक्ष संबंध येत नाहीं. डेराइस्मायलखान, टांक व कुलाचीं हीं स्थानिक व्यापाराचीं मुख्य ठिकाणें आहेत. कापड, कातडीं, मीठ व धातूचे जिन्नस बाहेरून येतात; आणि गहूं व ज्वारी हीं धान्यें सिंधुनदींतून मुलतान, सक्कर, व कराची-येथें रवाना होतात.

राजव्यवस्थाः—डेराइस्मायलखान, कुलाची व टांक असे या जिल्ह्याचे तीन तालुके आहेत. प्रत्येक तालुक्यावर तहशिलदार व नायब तहशीलदार असतो. जिल्ह्याचा डेपुटी कमिशनर डेराइस्मायलखान येथें रहातो. डेराइस्मायलखान, कुलाची व टांक "नोटिफाईड एरिआ" यांशिवाय इतर ठिकाणचा स्थानिक कारभार जिल्हा बोर्डाकडे आहे.

तहशील.—वायव्य सरहद्दीवरील प्रांतांतील डेराइस्मायलखान जिल्ह्याची मुख्य तहशिल. क्षेत्रफळ १६९९ चौ मै. येथें पाण्याचा फारच दुष्काळ असतो. उन्हाळ्यांत तर लोक गांवेंच्या गांवें सोडून सिंधूच्या कांठीं जाऊन रहातात. लोकसंख्या १४४३३७. डेराइस्मायलखान हें मुख्य गांव असून ह्या तहशिलीमध्यें २५० खेडीं आहेत.

गांव.—वायव्य सरहद्दीवरील प्रांतांतील डेराइस्माइलखान जिल्ह्याचें व तहशिलीचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या ३१७३७; पैकीं मुसुलमान अर्ध्याहून अधिक आहेत. ३४५० लोक छावणींत रहातात. मलिक सोन्हावचा पुत्र इस्मायलखान ह्यानें हा गांव वसविला. १८२३ सालीं जुना गांव सर्व वाहून गेला. हल्लीं वसविलेला नवीन आहे. गांवाभोंवतीं कच्च्या मातीचा तट आहे. वायव्येकडे अकालगड किल्ला आहे. येथून खोरासान वगैरे परदेशांत जाणारा माल जातो. बाहेर जाणारा माल धान्य, लांकूडफांटा व तूप हा आहे.

**डेरागाझीखान**, जिल्हा.—पंजाबांत मुलतान विभागांतील जिल्हा. पंजाबांत सिंधूनदीच्या पलीकडे असलेला हा एकच जिल्हा आहे. क्षे. फ. ५३०६ चौ. मैल. मर्यादाः पूर्वेस व आग्नेयीस सिंधुनदी व तिच्या पलीकडे मियानवाला आणि मुझफरगड जिल्हे व भावलपूर संस्थान; दक्षिणेस सिंधमधील सक्कर जिल्हा; पश्चिमेस बलुचिस्तान व उत्तरेस वायव्यसरहद्दीवरील प्रांताचा डेराइस्मायलखान जिल्हा.

स्वाभाविक वर्णनः—या जिल्ह्याच्या उत्तरेस सुलेमान पर्वताचीं शिखरें १०००० फुटांपर्यंत उंच असून, पर्वताची मुख्य रांग व मैदान यांच्यांमध्यें, मुख्य रांगेशीं समांतर दोन लहान रांगा गेलेल्या आहेत. मुख्य रांग दक्षिणेकडे कमी कमी होत जाऊन मारी डोंगरावर विस्तीर्ण व सपाट असें पठार आहे. ह्या डोंगरांतून पुष्कळ प्रवाह निघालेले आहेत; त्यांपैकीं निहोव, संगर, व कहा ह्यांखेरीज इतरांना पावसाळ्याखेरीज पाणी नसतें. नद्यांमधून आलेला गाळ सिंधुनदी व डोंगराचा पायथा यांमध्यें बसून तेथें पच्छाडा नांवाची जमीन तयार झालेली आहे. सिंधुनदीजवळ जुखरीचीं झाडें पुष्कळ होतात.

या जिल्ह्याची हवा अत्यंत कोरडी असून रोगट नाहीं. हिंवाळा फक्त दोन महिने असतो; उन्हाळ्यांत उष्ण वारे वाहतात व त्यामुळें कधीं कधीं मनुष्यांच्या जीवासहि अपाय होतो; डोंगराळ प्रदेशांतील हवा सौम्य व सुखकारक असते. फोर्ट मनरो येथें वर्षास सुमारें १२ इंच व इतरत्र ४ पासून ६ इंचपर्यंत पाऊस पडतो. हा जिल्हा सिंधु नदीच्या कांठीं असल्यामुळें येथें पुरापासून नेहमीं भीति असते. पुष्कळ दिवसांपासून सिंधुनदीचा प्रवाह हळू हळू पण सारखा पश्चिमेकडे जात चालला होताः पण स. १८८९ त तो डेरागाझीखानपाशीं येईपर्यंत त्याला प्रतिबंध करण्यांत आला नव्हता. दगडी बांधानें प्रवाहाची दिशा बदलून देण्याचें काम फार चांगलें झालें आहे.

इतिहासः—सुलेमान पर्वत व सिंधु नदी यांच्या दरम्यानच्या प्रदेशांत हिंदू राज्य असावें; पण स्थानिक दंतकथा फार संदिग्ध व असंबद्ध आहेत. पूर्वी हरंद, मारी व असनी एवढींच काय तीं गांवें असून बाकीचा प्रदेश ओसाड होता असें म्हणतात नृसिंहानें मारिलेल्या हिरण्याक्ष दैत्याच्या नांवावरून हरंद हें नांव पडलें अशी स्थानिक दंतकथा आहे; त्याचप्रमाणें पंजाबचा पौराणिक राजा सालू याच्या आसन ह्या राजधानीच्या गांवावरून असनी आणि त्याची गैरचालीची राणी कोक्लिान हिची मारी म्हणजे राहाण्याचें ठिकाण, यावरून मारी गांवाचें नांव पडलें असेंहि त्याच दंतकथेवरून समजतें. राजनपूरच्या दक्षिणेचें कोत खेमाली हें खेव राजाकडे होतें.

सिंधप्रांतावरोबर हा जिल्हा स.७१२ त हिंदुस्थानांत स्वारी करणारा पहिला मुसुलमान सरदार महंमद बिन कासीम, याच्या हातांत गेला. स. १४४५ त हा लधा घराण्याच्या सत्तेखालीं स्वतंत्र झाला व स. १४५० त दिल्लीच्या लोदी घराण्याशीं संबंध असलेल्या नाहर घराण्यानें कीन व सितपूर येथें स्वतंत्र राज्य स्थापन केलें. नाहर घराण्यानें लवकरच आपल्या राज्याचा विस्तार केला, परंतु पश्चिमेकडील बलुची लोकांनीं त्याची सत्ता बरीच कमी केली. मलिक सोहराव बलुची यानें लधा राजापासून लष्करी जहागीर मिळविली. त्याच्या मागून आलेल्या हाजीखान ह्या मिराणी सरदाराच्या मुलानें गाझीखान हें शहर वसविलें. या घराण्यांतले अठरा राजे डेराजात येथें होऊन गेले. त्यांचीं नांवें आळीपाळीनें हाजी व गाझीखान अशीं होतीं. लवकरच मिराणी आणि नाहर यांच्यामध्यें तंटे होऊन नाहर लोकांना जिल्ह्याच्या दक्षिण भागांत राहणें भाग पडलें.

अकबराच्या कारकीर्दींत गाझीखान घराणें नांवाला मात्र-मोंगलाचें मांडलिक झालें. १७०० सालांत म्हणजे औरंगझेबाच्या कारकीर्दीच्या अखेरीस गाझीखान घराण्यांतील एकानें बंड केलें, पण मुलतानच्या सुभेदारानें त्याचा पराभव

केला. यावेळच्या सुमारास कोल्हार घराणें सिंधमध्यें उदयास येऊन इतकें प्रबल झालें कीं, १७३९ सालांत नादीरशहाच्या स्वारीनंतर सिंधुनदीच्या पश्चिमेचा सर्व प्रदेश त्याच्या कडे आला असतां त्यानें मिराणी सरदाराला गाझीखानचा सुभेदार न करितां,नूरमहंमद कोल्हारच्या हाताखालीं आपला गुजार वजीर तेथें नेमला. गाझीखान घराण्यांतील शेवटचा पुरुष १७५८ सालीं मरण पावला नादीरच्या हातून बलुची लोकांनीं कीन हें पूर्वीच घेतलें होतें, व त्यावेळीं मुकदम शीख राजन (त्याच्याच नांवावरून राजनपूर हें नांव पडलें) यानें त्यांना सितपुरमधूनहि घालवून दिलें. नंतर दुराणी घराण्यांत पुष्कळ राजे होऊन गेले; या काळांत बलुची टोळ्यांमध्यें अंतःकलह फार माजले होते. पुढें लवकरच राज्यांतील व्यवस्था पार नाहींशी होऊन बेबंदशाही सुरू झाली व जिल्ह्याची स्थिति फार खालावत चालली. मध्यंतरीं पंजाबांत शीख लोकांची सत्ता वाढत चालली होती. १८१९ सालीं रणजितसिंगानें आपली सत्ता सिंधूनदीच्या पलीकडे वाढवून हल्लींच्या जिल्ह्याचा दक्षिण भाग आपल्या राज्यास जोडला. हा प्रदेश भावलपूरच्या नवाबाला लाहोरास वार्षिक खंडणी पाठविण्याच्या अटीवर, लष्करी जहागीर म्हणून मिळाला. १८२७ सालीं या नवाबानें उत्तर भागावर स्वारी करून तोहि शीख लोकांच्या अंमलाखालीं आणला. तीन वर्षांनंतर हा प्रदेश त्याजकडून काढून सेनापति वेंतुरा याजकडे देण्यांत आला. १८३२ त मुलतानचा प्रसिद्ध सावन मल यानें हा जिल्हा खंडानें घेतला व दुसऱ्या शीख युद्धानंतर इंग्रजांकडे जाईपर्यंत हा जिल्हा त्याच्या मुलाच्या ताब्यात होता. इंग्रजांच्या ताब्यांत आल्यापासून येथें शांतता नांदत आहे.

लोकसंख्याः—१९०१ सालीं या जिल्ह्याची लोकसंख्या ४७११४० होती. शेंकडा. ८७ मुसलमान, ५७८१५ हिंदू व १२०७ शीख आहेत. येथें बलुची व पश्चिम पंजाबी या भाषा चालतात. शें. ४९ लोकांचा उदरनिर्वाह शेतकीवर होतो. १९०१ सालीं शें. ६.७ पुरुषांनां व शें. ०.२ स्त्रियांनां लिहितां वाचतां येत होतें.

शेतकीः—पाऊस कमी पडत असल्यामुळें शेतीवरच्या पाण्यावर अवलंबून असते. सिंधच्या बहुतेक भागांत विहिरी व कालवे आहेत व पहाडामधील शेती उन्हाळ्यांत डोंगरावर पडणाऱ्या पावसावर अवलंबून असते. या जिल्ह्यांत मुख्यत्वेंकरून मय्याचारा आणि पट्टादारी व थोडीबहुत जमीनदारी पद्धत चालू आहे. गहूं, हरभरा, बाजरी, खसखस, तंबाखू, तांदूळ, कापूस, नीळ वगैरे पिकें येथें होतात.

व्यापार व दळणवळणः—सरहद्दीवरील डोंगराळ प्रदेशांत लोकरीचें कापड तयार करितात. सपाटीच्या प्रदेशांत कांबळी, चटया, सुताडे व लोंकरीचे दुसरे जिन्नस तयार होतात. डेरागाझीखान येथें रेशमी कापड व हस्तिदंती बांगड्या होतात. या गांवीं दळण्याची व कापूस पिंजण्याची एक गिरणी आहे. गहूं, बाजरी, नीळ, अफू, कापूस, कातडीं, आणि मोहरी हे जिन्नस सिंधुनदीमधून कराची व मुलतानकडे पाठविले जातात आणि गहूं व हरभरा हे जिन्नस येथें येतात. या जिल्ह्यांत आगगाड्या नाहींत. डेरागाझीखान गांव व सिंधुनदीच्या पूर्वतीरावरील गाझी घांट येथील रेल्वेस्टेशन यांच्या मधील दळणवळण आगबोटींच्या योगानें चालतें. सखीसरवर कबरीपर्यंत जाणाऱ्या पक्क्या रस्त्याशिवाय इतर बहुतेक रस्ते गाड्यांच्या उपयोगाचे नाहींत.

राज्यव्यवस्थाः—डेरागाझीखान, राजनपूर, जामपूर व संगर असे या जिल्ह्याचे ४ तालुके असून त्यांवर तहशिलदार आणि नायब तहशिलदार असतात. जिल्ह्याचा डेप्युटी कमिशनर डेरागाझीखान येथें असतो. डेरागाझीखान, राजनपूर, दाजल, व मिठणकोट येथील म्युनिसिपालिट्या खेरीज इतर ठिकाणचा स्थानिक कारभार जिल्हाबोर्डाकडे आहे.

तहशील.—पंजाबांतील डेरागाझीखान जिल्ह्याची एक तहशील. क्षेत्रफळ १४५७ चौ. मै. पूर्वेस सिंधु नदी असून पश्चिमेस स्वतंत्र राज्य आहे. ह्या तहशिलींत एक भाई व मनरो किल्ला ह्या दोन उंच पहाण्यालायक जागा आहेत. लोकसंख्या (१९०१) १९३७४४. डेरागाझीखान हा गांव तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. खेडीं २१५. तहशिलींत सखीसरवरची कबर आहे.

गांव.—पंजाबांत डेरागाझीखान जिल्हा व तालुका यांचें मुख्य ठिकाण. हें सिंधुनदीच्या उजव्या तीरावर आहे. लो.सं. (१९०१)२३७३१; पैकीं १३२९५ मुसलमान व ९९८८हिंदू. १५ व्या शतकाच्या अखेर, मिराणी सरदार गाझीखान यानें स्थापन केल्यापासून हें गांव, स्थानिक राज्यकारभाराचें मुख्य ठिकाण आहे. कांठावर दाट आंबराई असलेल्या कस्तुरी कालव्यानें याची पूर्व दिशा मर्यादित केली आहे. पश्चिमेस एका मैलावर सिव्हिल स्टेशन आणि छावणी आहे. गाझीखान, अबदुल जवार, छुटाखान वगैरेंनीं बांधिलेल्या मशिदीमुळें गांवाला फार शोभा आलेली आहे. हें गांव व नार्थवेस्टर्न रेल्वेचें स्टेशन यांच्यामधून सिंधु नदी वहाते बन्नू व डेराइस्मायलखानपासून जाकोबाबादपर्यंत जाणारा रस्ता ह्या गांवांतून जातो. येथें हस्तिदंती बांगड्या करण्याचा कारखाना भरभराटींत असून, रेशमी कापड व पितळेचीं भांडीं करण्याचे कारखानेहि आहेत. धान्य, कापूस व तीळ यांचा निर्गत व्यापार येथें बराच चालतो. गांवांत कापसांतील सरकी काढण्याची एक गिरणी असून तेथें दळण व तेल काढणें हीं कामेंहि होतात.

सिंधु नदीच्या पुरामुळें गांवाचें व छावणीचें वारंवार नुकसान झालेलें आहे. १८५६ सालीं गांव आणि छावणी व १८७८ सालीं नवी छावणी वाहून गेली होती. पुरापासून गांवाचें संरक्षण करण्याकरितां तयार केलेले बरेच बंधारे जरी वाहून गेले तरी नदीचें मुख्य पात्र गाळानें भरून निघाल्यामुळें तूर्त धोका राहिलेला नाहीं.

येथें १८६७ सालीं म्युनिसिपालिटी स्थापन झाली. तिचें १९०३–०४ सालचें उत्पन्न ७९५०० रु. होतें. येथें आंग्लो-व्हर्नाक्युलर हायस्कूल व सरकारी दवाखाना आहे. छावणींत बलुर्ची लोकांनीं उभारलेलें सैन्य असून छावणीचें १९०२–०३ सालपूर्वींच्या १० वर्षांतील सरासरी उत्पन्न १५०० रु. होतें.

**डेरागोपीपूर**—पंजाबांतील कांग्रा जिल्ह्याची एक तहशील. क्षेत्रफळ ५१५ चौ. मै. लोकसंख्या १२५५३६. खेडीं १४५. ह्यांत डेरागोपीपूर, हरीपूर व जवालमखी ह्या गांवांचा समावेश होतो.

**डेराजात**—पंजाब व वायव्येकडील प्रांतांत सिंधुनदी व सुलेमान टेकड्यांच्या मधील प्रदेशास हें नांव आहे. डेराइस्मायलखान, डेराफत्तेखान व डेरागाझीखान ह्या तीन नांवांपासून हें नांव तयार झालें आहे. ह्या प्रदेशाच्या उत्तरेस शेखबुदिन पर्वताची ओळ असून दक्षिणेस जामपूर गांव आहे. याची रुंदी ५० व लांबी ३२५ मैल आहे. मुलतानच्या सुलतान हुसेननें हा प्रदेश जहागीर म्हणून मलिक सोन्हाव दोदईला दिला. सोन्हावचे दोन पुत्र इस्माइल व फत्तेहखान ह्यांनीं दोन डेरे स्थापिले; व गाजीखाननें गाजीखानडेरा वसविला. बाबरच्या मरणानंतर डेराजातचा प्रदेश त्याचा पुत्र व काबुलचा अधिकारी कामरान ह्यांच्या हातीं आला. हुमायूनच्या कारकीर्दींत बलोच लोक बरेच आले व त्यांनीं नाहर लोकांस दक्षिणेस हांकून लावलें. सर्व बलोच जातींनीं मिराणी नवाबांची सत्ता कबूल केली. डेराइस्मायलखान येथें 'होत बलोच' जातीच्या लोकांनीं राज्य केलें. अठराव्या शतकाच्या सुरवातीस मिराणी जाऊन त्यांच्या ऐवजीं सिंधचे कोल्हार आले. १७३९ सालीं नादीरशहानें सिंधचे पश्चिमेकडील सर्व प्रदेश आपल्या ताब्यांत घेतला; व त्यानें मिराणी वझीर महमदखान गुजार ह्यास डेरागाझीखान येथें अधिकारी नेमलें. महमदखान गुजारनंतर त्याचा पुतण्या अधिकारपदारूढ झाला पण तो १७७९ सालीं मारला गेला. तेव्हां दुराणी आपल्या देशांतूनच अधिकारी पाठवूं लागला. इस्मायलखानला देखील गादीवरून काढून टाकून ( १७७० ) काबुलहून येथील राज्यसूत्रें हालूं लागलीं. १७९४ सालीं झामनशाह दुराणीजवळून राज्य बळकाविण्याचा हुमायूनशहाचा प्रयत्न फोल ठरला, उलटा तोच मात्र पकडला गेला. त्याला पकडण्याबद्दल झामनशाहानें महमदखान सदोझईस डेराइस्मायलखानचा प्रांत दिला. त्याचा जांवई हाफिज अहमदखान हा रणजितसिंगास मन्केरा येथें १८२१ त शरण आला; व शीख लोक टांक व सागरच्या अधिपतींजवळून खंडणी घेऊं लागले. डेराफत्तेखाननें त्यांनां आपल्या ताब्यांत घेतलें. स. १८३६ ते १८४३त दिवाण लखीमल हा सरदार होता व त्याच्यानंतर दिवाण दौलतराय हा आला. सर्व मुलतानी पठाण सरदार ह्याच्या बाजूचेच होते. त्याच्या विरुद्ध मलिक फत्तेहखान तिवान हा उठला पण त्यांत निष्पन्न कांहीं झालें नाहीं. १८४९ सालीं डेराजात ब्रिटिशांच्या हातीं आला तेव्हां त्याचे विभाग करून डेरागाझीखान हा पंजाबास व डेराइस्माइलखान हा वायव्य सरहद्दीवरील प्रांतास जोडण्यांत आला.

**डेरानानक**—पंजाबांतील गुरुदासपूर जिल्ह्याच्या बटाला तहशिलींतील एक गांव. रावी नदीच्या दक्षिणतीरावर असून गुरुदासपूर गांवापासून हें २२ मैल दूर आहे. लोकसंख्या ५११८. शीख लोकांचा पहिला गुरु बाबा नानक हा पखोली येथें वारला व त्याचे वंशज 'वेडिस' पखोलीसच रहात,पण पखोली हा गांव रावी नदीस पूर येऊन स. १७४४त वाहून गेला.तेव्हां त्यांनीं नदीच्या दक्षिणेस आपल्या गुरूच्या स्मरणार्थ डेरानानक हें गांव वसविलें. येथें दरबारसाहेब नांवाचें एक शीख लोकांचें देवालय आहे. यात्रेकरितां येथें पुष्कळ शीख लोक येतात. देवळाच्या खर्चाकरितां एक वेगळी जहागिरी आहे. तालीसाहेब नांवाचें एक दुसरें देवालय आहे.तिसरेंहि एक देवालय असून त्याचें नांव चोलासाहेब आहे. येथें शालीच्या फर्दावर नकशदार किनार काढण्याचें काम होतें.

**डेरापूर**—संयुक्त प्रांतांतील कानपूर जिल्ह्याची एक तहशील. ही डेरापूर परगण्याच्या सीमेलगत आहे. क्षेत्रफळ ३०८ चौ. मै. लोकसंख्या १४९५९३.ह्यांत खेडीं २७५ असून शहरें मुळींच नाहींत.तहशिलीच्या उत्तरेकडून रिंद नदी वहात असून दक्षिणेकडून सेनगर नदी वहाते.त्याचप्रमाणें लोअरगंगा काल्व्याची एटावा शाखा दक्षिणेकडील भागांत पाणी पुरविते.

**डेलफाय**—प्राचीन ग्रीसमधील फोसीस या विभागांतील एक शहर. याच्या उत्तरेस सुमारें ७ मैलांच्या अंतरावर पर्णासस पर्वताच्या बाजूला कॉरिसिअन गुहा म्हणून एक प्रसिद्ध गुहा आहे. इराणी लोकांच्या स्वारीपासून आपलें संरक्षण व्हावें म्हणून डेलफाय येथील लोक या गुहेंत दडून वसत असत. सध्यां या गुहेला 'सॅर्टोकोर्ट्स' अशी संज्ञा आहे. हींत ३००० लोक सहज राहूं शकतील असें म्हणतात. येथें अपोलोचें इतिहासप्रसिद्ध देवालय आणि त्याच्या दैवी वाणीचें वास्तव्य असल्यामुळें या ठिकाणाला फार महत्त्व आलें आहे.

फ्रेंच शोधकांच्या प्रयत्नामुळें एक अतिशय प्राचीन काळची हेलेनिको या नांवाची विहीर जशीच्या तशी सांपडली आहे. या विहिरीलगत असलेल्या टेंकडीच्या पूर्व टोंकाला पॅन्सॉनिअर या भूगोलवेत्त्यानें उल्लेख केलेल्या 'पवित्रमार्गा'चें मुख्य द्वार आहे. याच मार्गाच्या मध्यावर एक शर्यतीची जागा आहे. या मार्गापासून निरनिराळे अरुंद व चिंचोळे रस्ते निघाले आहे.

'पवित्रमार्गा'च्या द्वाराच्या बाहेरील बाजूस एक रोमकालीन भव्य चौक असून त्याच्या उत्तरेला लासिडिमोनियन लोकांचें हवनस्थान आहे. हें स्थल चतुष्कोणी असून दगडी आहे. येथील एका उच्चासनावर देवांच्या व आरमारी सेनापतींच्या मोटमोठया मूर्ती होत्या. पीयोनवधाचें

नाटक होत असलेलें रंगस्थल हें 'पवित्र पथाच्या' खालच्या बाजूस असून याच्या उलट दिशेस अथेनिअन लोकांची स्तंभपंक्ति आहे. या स्तंभावलीवरील शिलालेखावरून, ही स्तंभपंक्ति पेलोपोनेसिअन युद्धाच्या वेळची नसून, होमोलीच्या म्हणण्याप्रमाणें सहाव्या शतकाच्या अखेरीची आहे, असें सिद्ध झालें आहे. याखेरीज येथें प्राचीन काळचे पुष्कळ अवशेष आहेत.

डेलफाय येथील देवीवाणीचा इतिहास हा जरा संदिग्ध आणि अस्पष्ट आहे असें सांगतात कीं इच्छित प्रश्न कागदावर लिहावे लागत असत आणि उपाध्यीण त्यांची उत्तरें देत असे. प्राचीन काळीं ही कुमारिका असे. पुढें पन्नाशीच्या सुमाराची स्त्री असे पण तिचा वेष मात्र कुमारिकेचा असे. हीं वाक्यें भविष्यवादी व साधु लोक कवितावद्ध करून ठेवीत असत.

अपोलोची पूजा सुरू होण्यापूर्वी हें देऊळ असावें व तें धरणीमातेचें असावें असें म्हणतात. येथें पहिलें मंदिर ट्रोफोनिअस व अगॅमिडस यांनीं बांधलें व त्याचा अल्समिओनीडीयानें जीर्णोद्धार केला असें म्हणतात. असें सांगतात कीं, इ. स. पूर्वी ४८० या वर्षी इराणी लोकांनीं डेलफायवर केलेल्या स्वारीचा प्रत्यक्ष अपोलोनें वादळ किंवा धरणीकंप उत्पन्न करून प्रतिकार केला. इ. सनापूर्वी ३५६–३४६ मध्यें जें धर्म युद्ध झालें, त्यांत फोसिअननीं अत्याचार करून देवालयाची खराबी केली. इ. सनापूर्वी ८६ या वर्षी एल्. कॉर्नेलीअस सला यानें आपल्या शिपायांचा पगार देण्याकरितां म्हणून देवळांतील निधि लुटला. ज्युलिअननें ऑरिबसिअसला देवळाचा पुनरुद्धार करण्याकरितां पाठविलें असतां, असें सांगतात कीं, देववाणी गतवैभवाबद्दल हळहळून आर्तस्वर उद्गारली.

**डेलवेअर**—उत्तर अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं एक संस्थान. याचें क्षेत्रफळ २३७० चौ. मै. असून त्यापैकीं ४०५ चौ. मैलांचा प्रदेश पाण्यानें व्यापिला आहे. लो. सं. (१९१८) २१६९४१ असून डोव्हर हें राजधानीचें शहर व त्याची लो सं. (१९१०) ३७२० आहे. विल्मिंग्टन हें संस्थानांतील सर्वांत मोठें शहर आहे. या शहराची लो. सं. (१९१७) ९५३६९. मिलफोर्ड (लो. सं. २६०३) हेंहि एक मोठें शहर आहे.

*धार्मिक पंथ इत्यादि.*—मेथॉडिस्ट, रोमन कॅथोलिक, प्रेसबिटेरियन, एपिस्कोपेलियन आणि बॅप्टिस्ट हे संस्थानांतील मुख्य धर्मसंप्रदाय होत.

*शिक्षण.*—संस्थानांत सार्वजनिक शाळा अनेक असून त्यांतून प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें आहे. निग्रो लोकांच्या मुलांकरितां वेगळ्या शाळा आहेत. नेवार्क शहरीं उच्च शिक्षणाकरितां एक कॉलेज असून त्यास 'डेलवेअर कॉलेज' म्हणतात. डोव्हर येथें निग्रो जातीच्या विद्यार्थ्यांकरितां एक कॉलेज आहे.

संस्थानांत एक रुग्णालय असून मुलींकरितां स्थापिलेली उद्योगशाळा आहे आंधळे, बहिरे आणि मुके यांना शिक्षण देणाऱ्या संस्था असून अशा संस्थांना संस्थानांकडून मदत मिळते. प्रत्येक परगण्यांत, अनाथपंगुगृहें असून त्यांची सर्व व्यवस्था ट्रस्टींच्या हातीं असते. आपल्या व्यंग असलेल्या मुलांचें पोषण आईबापांना करावें लागतें. भणंग भिकाऱ्यांना परगण्यांत येण्याची बंदी असून या नियमाविरुद्ध वर्तन करणाऱ्यास शिक्षा होते. येथील जमाखर्चात 'स्टेट जनरल फंडाची' जमा (१९१८) ३२९४३३८२ व खर्च १०५२९५० डॉलर्स होता.

*खनिज संपत्ति व उद्योग धंदे.*—हें संस्थान कृषिप्रधान असून शेंकडा ८५ एकर जमीन लागवडीखालीं (१९१०) आहे. मका, आणि गहूं हीं मुख्य पिकें होत. टोमाटो आणि फळफळावळ यांचें मोठ्या प्रमाणावर उत्पादन होतें. सुमारें १६००० एकर जमीन टोमाटोकरतां राखून ठेविली आहे. टोमाटोच्या निर्गतींत डेलवेअर संस्थानचा नंबर संयुक्त संस्थानांत दुसरा लागतो. घोडे, खेचरें, मेंढ्या, डुकरें व दुभत्या गाई हीं जनावरें मुख्य आहेत. मासे मारण्याचा धंदाहि दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणांत चालत आहे. १९१५ त डेलवेअरमधील २८२२९२ डॉलर किंमतीच्या खनिज मालाची निर्गत झाली. वकऱ्याची कातडीं, लोकरीचें सामान (होजिअरी) आणि फळफळावळ यांची निपज मोठ्या प्रमाणावर होते.

*रेल्वे.*—१९१६ सालीं संस्थानांत ३३५ मैल लांबीची रेल्वे होती. शिवाय १५३ मै. लांबीची विजेची रेल्वे होती. विल्मिंग्टन व न्यूयॉर्क या शहरांच्या मध्यें जलमार्गानें बराच व्यापार चालतो. १९१७ सालीं संस्थानांत २ सेव्हिंग्ज बँका असून, ३९,३१८ लोकांनीं त्यांत ठेवी ठेविल्या होत्या.

*राज्यव्यवस्था.*—१७ सभासदांचें वरिष्ठ मंडळ (सेनेट) आणि ३५ सभासदांचें प्रतिनिधिमंडळ असतें. वरिष्ठ मंडळांतील सभासदांची दर चार वर्षांनीं आणि प्रतिनिधिमंडळांतील सभासदांची दर दोन वर्षांनीं नवी निवडणूक होते, सेनेटर २७ वर्षांचा आणि प्रतिनिधि २४ वर्षे वयाचा असावा लागतो. कॉंग्रेसमध्यें डेलवेअर संस्थानांतून वरिष्ठ मंडळांतील २ सभासद आणि प्रतिनिधिमंडळांतील १ सभासद जातो. डेलवेअर संस्थान तीन परगण्यांत विभागलें गेलें आहे.

**डेव्हनपोर्ट**—हें इंग्लंडांतील डेव्हनशायरचा म्युनिसिपालिटीचा विभाग व प्रतिनिधिविभाग आहे. हें आरमारी व लष्करी ठाणें आहे. १९०१ सालीं येथील लोकसंख्या ७०४३७ होती. हायमौथ साउंडधुनीच्या वायव्यकोनावर हें शहर आहे. ग्रेट वेस्टर्न रेल्वे व लंडन आणि साउथवेस्टर्न रेल्वे या शहरावरून जातात. डेव्हनपोर्टबद्दलचा

हाउस शहराची लोकसंख्या १५११३ आहे. स्टोक व मॉरीसटौन नांवाचीं खेडीं येथून जवळच आहेत. या शहरच्या नामविधिप्रीत्यर्थ नगरभवनाजवळ एक स्तंभ उभारला आहे. आरमारी शिल्पविद्यालय, म्युनिसिपालिटीच्या धंदेशिक्षणाच्या शाळा, आरमारी चाळी, रॅग्लेन चाळी आणि आरमारी व लष्करी रुग्णालयें येथें आहेत. वाइज पर्वतावर लष्करी ठाणें आहे. येथील सरकारी गोदी फार प्रशस्त व प्रेक्षणीय आहे. तिसऱ्या विल्यमनें १६८९ सालीं ही बांधिली. येथें दोरखंडाचे कारखाने आहेत. १८३२ सालच्या सुधारणाकायद्याप्रमाणें डेव्हनपोर्टचा प्रतिनिधिविभागांत समावेश होऊन येथून पार्लमेंटांत दोन सभासद जात असत. शहर ज्या ठिकाणावर वसलें आहे तें ठिकाण ऑबिन घराण्याच्या मालकीचें आहे. शहराचा राज्यकारभार मेअर, १६ सनदी शहरचे अधिकारी व ४८ सभासद यांच्या हातांत असतो. शहराचें क्षेत्रफळ ३०४४ एकर आहे.

**डेव्ही**—हा इंग्रज रसायनशास्त्रज्ञ कॉर्नवालजवळ पेंझान्स येथें ता. १७ डिसेंबर १७७८ त जन्मला. याच्या प्राथमिक शिक्षणाच्या वेळेस याला शास्त्रीय विषयांची गोडी नव्हती. त्यावेळीं जुन्या भाषांतील कवितांचें भाषांतर करण्याचा व गप्पा मारण्याचा त्यास नाद असे. स. १७९४ त याचा बाप रॉबर्ट डेव्ही हा मरण पावला. तेव्हां त्याची आई व चार भावंडें यांच्या चरितार्थाचा भार यावरच पडला. तेव्हां तो वैद्यकी शिकण्याकरितां एका औषधेंविक्या वैद्याकडे उमेदवार राहिला. तेथें अध्यात्मविद्याशास्त्र, नीतिशास्त्र, गणित इत्यादि शास्त्रांचा अभ्यास केल्यावर स.१७९७त त्याची दृष्टि रसायनशास्त्राकडे वळली. निकोल्सन व लव्हॉझिए यांचीं त्या शास्त्रावरील पुस्तकें वाचून उष्णता व प्रकाश यांसंबंधीं यानें एक नवी कल्पना काढली. १७९८ सालीं त्याची व थॉमस वेडीस याची ओळख झाली व तो त्याच्या वैद्यककार्यालयांत व्यवस्थापक झाला.

१७९९ सालीं त्यानें असा शोध लावला कीं, नत्रसप्राणिद अपायकारक नाहीं परंतु त्यानें अंमल चढतो. स. १८०० त त्यानें ‘ नत्रसप्राणिदावर शोध ’ नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध केला. त्यामुळें त्याची रसायनशास्त्रज्ञ अशी ख्याति झाली. लंडन येथें राजसंस्थेंत १८०२सालीं त्याला साहाय्यक व्याख्यात्याची जागा मिळाली. एका महिन्याच्या आंत तो व्याख्याता झाला व १८०३ सालीं अध्यापक झाला. औद्योगिकरीत्या कातडें कमावण्याच्या धंद्यासंबंधीं व्याख्यानें देण्याचा त्याला हुकूम झाला व तीन महिन्यांची रजा देण्यात आली. पुढें त्यानें आपले शोध १८०३ सालीं राजसंस्थेपुढें मांडले.१८०२ सालीं शेतकीविषयाकडे लक्ष्य द्यावें अशी शेतकीखात्यानें त्यास विनंति केली होती. यामुळेंच १८१३ सालीं “ शेतकीच्या रसायनशास्त्राचीं मूलतत्त्वें ” हा ग्रंथ प्रसिद्ध केला. विद्युद्रसायनशास्त्रावर त्याचा फार भर असे.त्यावेळेपर्यंत विद्युद्‌घटांत दोन धातू व एक द्रव किंवा एक धातू, एक कर्बखंड व एक द्रव अशी योजना करीत असत. परंतु एक धातु व दोन द्रव मिळून विद्युद्‌घट करणें शक्य आहे असें यानें दाखविलें. पुढें ५ वर्षांनंतर राजसंस्थेपुढें त्यानें आपलें पहिलें व्याख्यान वाचलें. उज्ज, अल्क, धातू व कांहीं धातूंचे प्राणिद हे ऋण विद्युद्धातुखंडांतून आकर्षिले जातात व प्राणवायु, अम्ल, हे घनविद्युद्धातुखंडांतून आकर्षिले जातात. परंतु ऋणविद्युत्खंडांकडून दूर केले जातात असें त्यानें प्रतिपादन केलें. शिवाय क्षारांचें पृथक्करण काटकसरीनें करतां येऊन मूलद्रव्यें काढतां येतील असें त्यानें दाखविलें. या लेखामुळें त्याला नेपोलियनचें पदक मिळालें व १८०७ त त्यानें विद्युद्‌घटमालेच्या साहाय्यानें सिंधु व पालाश या धातू मूलरूपांत निराळ्या काढल्या.पुढें लोकांनीं वर्गणी करून त्याला नवी विद्युद्‌घटमाला करून दिली. स. १८०९ मध्यें त्यानें पालाश ही मूल धातूच आहे हें सिद्ध केलें व पुढच्या वर्षी हरवायु हें मूलद्रव्य आहे असें त्यानें सिद्ध केलें.

या सुमारास याची फारच प्रसिद्धि झाली. १००० श्रोत्यांपुढें तो व्याख्यान देऊं लागला व त्याची कीर्ति लंडनच्या बाहेरहि पसरली. स.१८१० त त्याला डब्लिन संस्थेनें पाचारण केलें. तेथें जाऊन त्यानें विद्युद्रसायनशास्त्रावर व्याख्यानें दिलीं. पुढच्या वर्षी तो पुन्हां डब्लिन येथें गेला. या वेळेस तेथील विश्वविद्यालयानें त्याला एल. एल. डी. ची बहुमानाची पदवी दिली. यानंतर कांहीं महिन्यांनीं त्यानें “ रसायनशास्त्रतत्त्वज्ञानाचीं मूलतत्त्वें ” या नांवाचें एक पुस्तक लिहिलें व तें आपल्या बायकोस अर्पण केलें. त्याला पुन्हां अध्यापकाची जागा मिळत होती पण त्यानें व्याख्यानें देण्याचें नाकारलें या वर्षीच नत्रहरिदावर त्यानें प्रयोग सुरू केले. परंतु एका प्रयोगांत स्फोट होऊन त्याच्या डोळ्यास इजा झाली व त्यानें तो नाद सोडला. १८१३ सालच्या आक्टोबरांत तो यूरोपखंडांत आपल्या स्त्रीसह प्रवासास गेला. त्याच्याबरोबर मायकेल फराडे हा मदतनीस म्हणून गेला. तो प्रथम पॅरिस शहरीं गेला. तेथें त्याचा तेथील विद्वानांनीं फार गौरव केला. यानें मात्र आपल्या वागणुकीनें त्यास खुष केलें नाहीं. त्यांस याचा थोडा रागच आला. त्यावेळीं अदद्रव्याबद्दल शोध चालले होते. यानें आपल्या जुजबी प्रयोग साहित्याच्या मदतीनें तें मूलद्रव्यच आहे अशी त्यांची खात्री पटवली.पुढें डिसेंबरांत तो इटलीस गेला. जीनोवा येथें टॉर्पिडोमाशांतील विद्युत्‌ त्यानें तपासून पाहिली. फ्लॉरेन्स येथें हिरा जाळून तो कोळशाचाच एक प्रकार आहे असें त्यानें ठरविलें. जर्मनींतून स. १८१५ त लंडन येथें परत आल्यावर त्याला ‘सुरक्षित दिवा’ तयार करण्याकरतां खाणीवाल्यांनीं विनंति केली. प्रयोगांतीं त्याला आढळलें कीं, खाणींतील स्फोटकारक द्रव्यें बारीक नळ्यांतून जाऊं शकत नाहींत म्हणून त्यानें ९ नोव्हेंबर रोजीं राजसंस्थेपुढें एक लेख वाचला, त्यांत त्यानें सांगितलें कीं, धातु विद्युद्वाहक असल्यामुळें

कांचेच्या नळ्यांपेक्षां धातूच्या नळ्याच जास्त चांगल्या. स.१८१६ च्या लेखांत धातूंच्या तारांची जाळी उपयोगांत आणण्याविषयीं त्यानें सुचविलें व त्याप्रमाणें तो" सुरक्षित दिवा' उपयोगांत येऊं लागला. त्यानें या शोधाबद्दल पेटंट घेतलें नाहीं. या त्याच्या स्वार्थत्यागाबद्दल न्यूकॅसल येथील खाणीवाल्यांनीं त्याला चांदीच्या ताटांचा संच नजर केला. पुढें ही चांदी वितळवून त्या पैशांतून एक पदक, यूरोपखंडांत उत्तम शास्त्रीय शोध लावणारास 'डेव्ही पदक' नांवानें देण्यांत येऊं लागलें.

स.१८१८ त त्याला बॅरोनेटची पदवी मिळाली.स १८२० च्या नोव्हेंबरांत तो राजसंस्थेचा अध्यक्ष निवडला गेला. पुढें आरमारखात्यानें गलबतांत तांब्याचे पत्रे न गंजण्याकरितां उपाय सुचविण्याकरितां राजसंस्थेस विनंति केली. डेव्हीनें त्यांस कल्हई करण्यास सुचविलें,परंतु त्या कल्पनेस यश आलें नाहीं. १८२३ सालीं त्याची प्रकृति बिघडूं लागली व १८२७ सालीं त्याला अर्धांगवायूचा झटका आला. म्हणून त्याला हवापालट करण्याकरतां यूरोपखंडांत पाठविलें. तो रव्हेना येथें राहून मग साल्झबर्ग येथें गेला. परंतु त्याची प्रकृति न सुधारल्यामुळें त्यानें राजसंस्थेच्या अध्यक्षपदाच्या जागेचा राजीनामा दिला. पुढें तो इंग्लंडास परत आला. त्यानंतर तो रोम येथें गेला व तेथून "टॉर्पेडो माशाची विद्युत्" असा लेख त्यानें राजसंस्थेस पाठविला. १८२९ च्या फेब्रुवारीच्या २० व्या तारखेस त्याला अर्धांगवायूचा पुन्हां झटका आला व त्यानें त्याची उजवी बाजू निरुपयोगी झाली. त्याचा भाऊ डॉ. जॉन डेव्ही यानें त्याला काळजीपूर्वक जिनीवा येथें आणलें परंतु तेथेंच मेच्या २९ तारखेस त्याचा अंत झाला.

याचा स्वभाव चिडखोर व रागीट असे. तो प्रत्येक काम फार कळकळीनें करीत असे. त्याचें मन कल्पनामय असे असें त्याच्या लेखांवरून दिसतें. कोलेरिज कवि म्हणत असे कीं जर हा प्रसिद्ध रसायनशास्त्रज्ञ झाला नसता तर तो प्रसिद्ध कवि झाला असता. सौदे म्हणे, त्याच्यांत कवीचे सर्व गुण आहेत. तो विषयाचें स्पष्टीकरण फार चांगलें करी. यामुळें त्याचीं व्याख्यानें हृदयंगम होत असत. त्याचे प्रयोग प्रज्ञावंत असत व तो ते तडफेनें करित असे. कोलेरिज कवि आपला रूपकांचा सांठा वाढविण्याकरितां डेव्हींचीं व्याख्यानें ऐकण्यास जात असे. कीर्ति मिळविणें ही डेव्हीची महत्त्वाकांक्षा होती. तरी पण तो कोणाचा द्वेष करीत नसे व आपल्या कार्यानें मनुष्यप्राण्याचें कल्याण व्हावें ही त्याची फार इच्छा असे. तो शिष्टाचारपद्धतीची पर्वा करीत नसे, म्हणून कधीं कधीं लहानशा कारणावरून इतर मंडळी त्याजवर नाराज होत असत.

**डेहराडून, जिल्हा.**—संयुक्तप्रांतांतील मिरत विभागांतील जिल्हा. याचें क्षे. फ. १२०९ चौ मै याच्या ईशान्येस तेहरी संस्थान; वायव्येस सिरमूर, रवेन, तरोच व जुब्बल हीं पंजाबमधील संस्थानें, नैर्ऋत्येस सहारणपूर जिल्हा व आग्नेयीस गऱ्हवाल जिल्हा.

*स्वाभाविक वर्णनः*—ह्या जिल्ह्याचा मोठा भाग हिमालय पर्वत व सिवालिक डोंगर यांच्या दरम्यानच्या खोऱ्यांत आहे. या दोन डोंगरांना जोडणाऱ्या टेकड्यांच्या रांगेनें या प्रदेशाचे दोन भाग होतात; पूर्वेदूनमध्ये जलप्रवाहांचें जाळें असून सर्व प्रवाह गंगेस मिळतात; व पश्चिमदून प्रदेश यमुनेपर्यंत पसरलेला आहे. उत्तरेकडे, हिमालयाची बाहेरची रांग ७००० किंवा ८००० फूट उंच असून येथें मसूरी हें डोंगरी ठाणें आणि लँडोर व चक्राता हीं लष्करी ठाणीं आहेत. खोऱ्याच्या नैर्ऋत्येकडे सिवालिक डोंगर थोडे थोडे उंच होत जातात, परंतु दुआबाच्या मैदानाजवळ त्यांची उंची एकदम कमी होते. या डोंगरांत रानटी हत्ती व जंगलांत वाघ, चित्ता, अस्वल, हरणें, वानर वगैरे प्राणी आढळतात. खोऱ्यांत उन्हाळा व हिंवाळा हे दोन्ही ऋतु कडक नसतात; हिमालयाच्या सान्निध्यामुळें वातावरण थंड रहातें खोऱ्यांतील उष्णमान ३७° ते १०१° व मसूरी येथील २७° ते ८१° च्या दरम्यान असतें. पाऊस सर्व ठिकाणीं सारखा पडत नाहीं. डेहरा येथें ८९ इंच, हिमालयाच्या पायथ्याजवळ राजपूर येथें १२१ इंच मसूरी येथें ९६ इंच व चक्राता येथें ८० इंच पाऊस पडतो.

*इतिहासः*—प्राचीन काळीं हा जिल्हा केदारखंडाचा भाग होता. येथें शिव रहात असल्यामुळें येथील डोंगराला शिवालिक असें नांव पडलें. रावणाच्या वधानंतर प्रायश्चित्त घेण्याकरितां रामलक्ष्मण येथें आले होते; व महापथाच्या पवित्र शिखरावर देहविसर्जन करण्यापूर्वी पांडवांनीं येथें वास केला होता अशा दंतकथा आहेत.नागसिद्ध डोंगरावरील बामुन नामक नागाविषयींच्या दंतकथेवरून येथें नाग राजे होऊन गेले असावे असें वाटतें. यमुनेच्या उजव्या तीरावर, हरिपूरजवळच्या कालसी शिळेवर अशोकाचीं शासनें आहेत, त्यांवरून ही पूर्वी उत्तराहिंदुस्थानची सरहद्द असावी असें वाटतें. हा प्रदेश १२ व्या शतकापर्यंत निर्जन होता व बेजारा लोक उंटांचा तांडा या देशांतून नेत असतां, येथील सृष्टिशोभा पाहून ते येथेंच कायमचे राहूं लागले अशी दंतकथा आहे. सतराव्या शतकापर्यंत डेहराडूनचा विश्वसनीय इतिहास मिळत नाहीं. त्यानंतर हा जिल्हा गऱ्हवालच्या राज्यांत होता. पंजाबमधून, औरसपणाबद्दल संशय येऊन घालवून लाविलेला रामराय हा शीख गुरू औरंगजेबाच्या शिफारसीनें गऱ्हवालच्या फत्तेशहाकडे आला. तेथें त्याला पुष्कळ शिष्य मिळाले व त्याच्या रहाण्याच्या ठिकाणीं गुरुद्वार किंवा डेहरा हें गांव वसलें. या गुरुला वाटेल त्यावेळीं मूर्च्छा होतां येत असे; परंतु एकदां त्याचा अंदाज चुकल्यामुळें तो फिरून जिवंत झाला नाहीं. ज्या बिछान्यावर तो मरण पावला तो

अद्यापहि पवित्र समजला जातो. रामरायाच्या आगमनानंतर लवकरच फतेशहा मरण पावला; त्याच्या मागून त्याचा अज्ञान नातु प्रतापशहा हा गादीवर आला(१६९९). यानें पुष्कळ वर्षें राज्य केलें. पण याच्या राज्यांतील भरभराट झालेली पाहून, सहारणपूरचा सुभेदार नजीब उद्दौला यानें रोहिला सैन्यासह शिवालिक ओलांडून कांहीं अडथळा न होतां तो देश काबीज केला. नजीबउद्दौल्याच्या सुधारलेल्या व चांगल्या राज्यपद्धतीमुळें जिल्ह्याची फारच भरभराट झाली;पण स.१७७० त तो मरण पावल्यावर देशाच्या विपन्न स्थितीला सुरुवात झाली व रजपूत, गुजर, शीख व गुरखे यांच्या स्वाऱ्यांमुळें हा सुपीक देश ओसाड व नापीक होऊन गेला.

मध्यंतरीं गुरखे लोक पश्चिमेकडे येत येत गऱ्हवालपर्यंत आले; १८०३ सालीं परदुमन शहा श्रीनगरहून पळून प्रथम डूनला व नंतर सहाराणला गेला व गुरख्यांनीं सर्व खोरें कांहीं एक अडथळा न होतां आपल्या ताब्यांत घेतलें. याच वेळीं ब्रिटिशांनीं सहारणपूरमध्यें प्रवेश केला.सरहद्दीवर गुरख्यांकडून वारंवार हल्ले होऊं लागल्यामुळें १८१४ सालीं त्यांच्या विरुद्ध युद्ध पुकारून डेहरा काबीज केलें व नालापाणी किंवा कलंगच्या डोंगरी किल्ल्याला वेढा देऊन बऱ्याच नुकसानीनंतर तो सर केला. स. १८१५ त तह होऊन हा प्रदेश इंग्रजांस मिळाला. तेव्हांपासून येथें बहुतेक पूर्ण शांतता असून, सडका व कालवे तयार झाले आहेत, आणि शेतकी व उद्योगधंदे यांची वाढ होत आहे. चक्राता तहशिलीमधील जौन्सार बावर हा भागहि डूनच्या बरोबरच इंग्रजांनीं ताब्यांत घेतला. कालसीच्या शिलालेखावरून अशोकाच्या वेळच्या पाश्चिमात्य राजांचीं नांवें समजतात. कालसीच्या ईशान्येस २५ मैलांवर, यमुनेच्या कांठीं मधा येथें कांहीं जुनीं देवालयें व अवशेष आहेत. त्यांपैकीं लख्खा मंदिरांत इ. स. ६०० ते ८०० च्या सुमारचे दोन शिलालेख आहेत.त्यांपैकीं एका लेखांत जालंधरच्या राजकन्येनें एका देवालयाचा पाया बसविल्याचा उल्लेख आहे. गंगानदीच्या कांठीं हृषीकेश येथें श्रीशंकराचार्यांनीं बांधविलेलें देवालय आहे.

लोकसंख्याः—१९०१ सालीं ह्या जिल्ह्याची लोकसंख्या १७८१९५ होती. शें. ८३ हिंदू व शें. १४ मुसलमान आहेत. हिंदूमध्यें रजपुतांचा भरणा बराच आहे. खोऱ्यांत मुख्य भाषा पश्चिमहिंदी चालते, व डोंगरांवरील लोक जौनसारी भाषा बोलतात. येथें युरोपियन लोक बरेच असल्यामुळें पुरुषांपैकीं लिहितां वाचतां येणाऱ्यांचें प्रमाण शें. १०.७ व स्त्रियांपैकीं शें. २ असें आहे.

शेतकी आणि जंगलः—या जिल्ह्यांत गहूं, तांदूळ, मका, आणि बाजरी हीं धान्यें पिकतात; पण पीक पुरेसें होत नसल्यामुळें धान्य बाहेरून आणावें लागतें. राखलेल्या जंगलाचें क्षेत्रफळ ४२० चौ. मै. आहे. डूनमधील जंगलांत साल, हल्डू, आओन्ल, व बहेर इत्यादि झाडें होतात. नद्यांच्या कांठीं खैर व शिसवी आणि जौन्सारच्या जंगलांत चीर, केला, देवदार वगैरे इमारती लांकूड होतें.

व्यापार व दळणवळणः—मसूरी येथें दारू गाळण्याचे दोन कारखाने आहेत; व चक्राता येथेंहि एक आहे. या जिल्ह्यांतून इमारती लांकूड, वांबू, चुना, कोळसा व चहा हे पदार्थ बाहेर जातात व कापड, कांबळी, मीठ, साखर, धान्य, तंबाखू, आणि मसाले हे पदार्थ येथें येतात. अयोध्या आणि रोहिलखंड रेल्वेच्या मुख्य फांट्यावरील लक्सार स्टेशनपासून हरिद्वारपर्यंत जाणारा फांटा वाढवून डेहरापर्यंत नेलेला आहे. या जिल्ह्यांत पक्की सडक ५० मैल व कच्ची सडक २७२ मैल आहे.

राज्यव्यवस्थाः—डेहराडून वरील अधिकाऱ्याला सुपरिंटेंडंट असें म्हणतात. डेहरा व चक्राता या तहशिलींवर तहशिलदार आहेत. डेहरा व मसूरी येथें म्युनिसिपालिट्या आहेत. व राजपूर आणि कालसी यांचा कारभार स. १८५६ च्या २० व्या कायद्याप्रमाणें चालतो.

त ह शी ल —संयुक्त प्रांतांतील डेराडून जिल्ह्यांतील एक तहशील. क्षेत्रफळ ७३१ चौ. मै. पूर्वडून व पश्चिम डून असे याचे दोन परगणे पाडले आहेत यमुना ते गंगा पर्यंतचा हिमालय व सिवालिक टेंकड्यांच्या खोऱ्यांतील सर्व प्रदेशाचा ह्यांत समावेश होतो. लोकसंख्या १२७०१४. या तहशिलींत मोठीं गांवें डेहरा, मसुरी, लढौर. राजपूर हीं असून खेडीं ३७७ आहेत. ह्या तहशिलींतील बराच भाग जंगलानें व्यापलेला आहे. ह्या तहशिलींत १५ चहाचे मळे आहेत.

श ह र.—संयुक्त प्रांतांतील याच नांवाच्या जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण. समुद्रसपाटीपासून उंची २३०० फूट.हरिद्वार-डेहरा रेल्वेचें हें शेवटचें टोंक आहे व मैदानाच्या प्रदेशांतून मुसुरीकडे जाणारा रस्ता या गांवावरून जातो. लो. सं. ( १९०१ ) म्युनिसिपालिटी व छावणीसुद्धा २८०९५. शीख लोकांचा गुरु म्हणविण्याचा प्रयत्न व्यर्थ झाल्यावर उदासी पंथाची स्थापना करणारा गुरू रामराय यानें हें शहर स्थापन केलें. १६९९ सालीं बांधिलेल्या या गुरूच्या देवालयांत जहांगीर बादशहाच्या थडग्याप्रमाणें तयार केलेल्या गर्भगृहामध्यें त्या गुरूचा बिछाना अद्याप ठेवण्यांत आला आहे. देवळाच्या बाहेरच्या मोठ्या दरवाज्यावर धार्मिक व ऐतिहासिक व्यक्तींचीं चित्रें काढण्यांत आलीं आहेत. देवळांत तीन टांकीं असून त्यांपैकीं एक २३० फूट लांब व १८४ फूट रुंद आहे.

जिल्ह्यांतील अधिकारी हिवाळ्यांत डेहरा येथें रहातात; हिंदुस्थान सरकारच्या त्रिकोणमिती व जंगलमोजणीखात्याचें त्याचप्रमाणें कृषिकर्मरसायनज्ञ व परोपजीवनशास्त्रज्ञ यांचें हें रहाण्याचें ठिकाण आहे. फॉरेस्टस्कूल ही इमारत सर्वांत सुंदर असून येथें जंगलांतील वस्तूंचा मोठा संग्रह आहे.सर्व हिंदुस्थानाकरितां लागणारे जंगल-अधिकारी येथून शिकून

तयार होतात. इंपीरियल कॅडेटकोअरचे मेंबर शिक्षणाकरितां येथें रहातात. अफगाणिस्तानच्या माजी अमीराचें येथें घर आहे. येथील म्युनिसिपालिटी १८६७ सालीं स्थापन झाली. १९०१ सालीं येथील लो. सं. २४०३९, व १९०३–४ मधील उत्पन्न ५९००० रु. होतें. हिमालयांतील कोलुखेतपासून व कलंगड डोंगरांतील नालापाणीपासून या शहराचा पाणीपुरवठा होतो. डेहराच्या छावणींत २ गुरखा पलटणी असतात.

**डोंगरगड**—खैरागड संस्थानांतील भरभराटीचें कसब्याचें गांव. हें बंगाल–नागपूर रेल्वेचें एक स्टेशन आहे. क्षेत्रफळ १५३ एकर व लोकसंख्या ६९०००. येथें दवाखाना, शाळा व तहशीलकचेरी असून व्यापारी पेठेचें हें गांव आहे. येथें कामकुण्डला नांवाचा तलाव असून त्याच्या विषयीं कांहीं दंतकथा आहेत. बोमलाई देवीचें देऊळ एका टेंकडीवर असून दर पोळयाच्या दिवशीं पूजाअर्चा होत असते. या गांवांत म्युनिसिपालिटी स. १९०७ त स्थापन झाली असून तिचें उत्पन्न १२,५०० रु. व खर्च ८००० रु. होता. येथील आयात माल कापड, मीठ, नारळ, मसाल्याचे पदार्थ, साखर, धातु, तूप, तंबाखू आणि कांचेचें सामान व निर्यात माल शेतांत व जंगलांत उत्पन्न झालेले पदार्थ

**डोंगरपाली**—सारंगगड संस्थानांत सरिया घराण्यांत संबलपुर जिल्ह्याच्या बाजूस असलेली लहान जमीनदारी. हींत १८ गांवें असून क्षेत्रफळ ९८६८ एकर आहे; जमीनदार गोंड जातीचा असून जमीनीचा सारा तोच गोळा करतो व राजास टाकोली देत असतो. जमीदारींतील जंगलावर जमीनदाराची मालकी नसून कुळांच्या साऱ्यांत फेरबदल करण्याचा अधिकारहि त्यास नाहीं. जमाबंदीच्या वेळीं हे वसूल ठरलेले असतात.

**डोंगरपुर**—या संस्थानास डुंगरपुर असेंहि नांव असून त्याच्या उत्तरेस व पूर्वेस उदेपूर संस्थान, आग्नेयीस बांसवाडा आणि दक्षिणेस व नैर्ऋत्येस महीकांटा प्रांत आहेत. येथील राजास महारावळ म्हणतात. चितोडचा राणा करमसी याचा वडील पुत्र महेसजी यानें बापाच्या आज्ञेवरून आपला गादीवरील हक्क सोडून व गादीवर धाकट्या भावास बसवून, आपण डुंगरपुर येथें नवीन राज्य स्थापिलें; ही गोष्ट बाराव्या शतकांतील होय. महेसजीचा नववा वंशज समरसी यानें दिल्लीच्या बादशहाचें मांडलिक बनून डुंगरपुरहून राजधानी हलवून बडोदें ( त्याच संस्थानांतील एक गांव, गुजराथेंतील नव्हे ) येथें नेली. परंतु त्याच्या वीरसिंह या नातवानें पुन्हां डुंगरपुरास ठाणें केलें. त्याचा नववा वंशज उदयसिंह हा एका लढाईंत मारला गेला. त्यानें आपलें राज्य आपल्या पृथ्वीराज व जगमल्ल या दोन पुत्रांत वांटलें; त्यांत महीनदीच्या पश्चिमेकडील प्रदेश पृथ्वीराजास व पूर्वेकडील जगमल्लास मिळून अनुक्रमें डुंगरपुर व बांसवाडा हीं संस्थानें निर्माण झालीं. औरंगझेबापर्यंत डुंगरपुर मुसुलमानी साम्राज्यांत होतें; परंतु पुढें त्यावर मराठ्यांचें अधिराज्य झालें व धारच्या पोंवारांच्या देखरेखेखालीं सालीना ३५ हजार खंडणी देऊन आलें. पेशवाई नष्ट झाल्यावर हें इंग्रजांच्या अमलाखालीं गेलें व वरील रकमेची खंडणी इंग्रजांना मिळूं लागली. कांहीं वर्षांनीं खंडणी २०३८७ करण्यांत आली; तीच हल्लीं कायम आहे. सन १८१९ च्या पुढें संस्थानची भरभराट होऊन वसूल वाढेनासा झाला; पुढें पांच वर्षांनीं संस्थानिकाचें व त्याच्या अंमलाखालील ठाकुरांचें हक्कावर्तें त भांडण जुंपून ठाकुरांनीं भिल्ल वगैरे जमवून बंड उभारण्याची तयारी केली. तेव्हां रावळानें इंग्रजांची मदत मागितली व बंड मोडलें. परंतु रावळ जसवंतसिंग हा व्यसनी व नालायक असल्यानें, इंग्रजांनीं त्याला पदच्युत करून त्याचा दत्तक पुत्र दलपतसिंग यास गादीवर बसविलें ( १८२५ ); परंतु त्याच्यानेंहि नीट व्यवस्था होईना; फिरून ठाकरांनीं बंड केलें व इंग्रजांच्या मदतीनें त्यानें तें मोडलें ( १८३१ ). दलपतचा मूळ घरचा आजा प्रतापगडचा राजा मेल्यामुळें तेथील गादीवरहि तोच बसला व एक मुलगा दत्तक घेऊन त्यास त्यानें डुंगरपुरच्या गादीवर बसविलें ( १८४४ ), या मुलाचें नांव उदयसिंग.

डुंगरपुर व बांसवाडा मिळून या प्रांतास प्राचीन वागेर असें नांव होतें. हल्लींच्या संस्थानिकाचें नांव हिज हायनेस रायरायन महारावळ श्रीलक्ष्मणसिंहजी असून त्यांचा जन्म ता. ७ मार्च १९०८ रोजीं होऊन त्यांना १५ नोव्हेंबर १९१८ रोजीं गादी मिळाली. सांप्रत ( १९२५ ) राजा अज्ञान असल्यानें राज्यकारभार राजपुतान्याच्या पोलिटिकल एजंटाच्या देखरेखीखालीं एका कार्यकारीमंडळाच्या तर्फे चालत आहे.

संस्थानांत आगगाडी मुळींच नाहीं. उदेपूर हेंच या संस्थानांत येण्याचें आगगाडीचें स्टेशन असून तें येथून ३३ कोसांवर आहे. संस्थानचें वार्षिक उत्पन्न साडे सहा लाखांवर असून त्याचें क्षेत्रफळ १४४७ चौरस मैल व लोकसंख्या ( सन १९२१ ) १८९२७२ आहे. संस्थानांत ७१६ गांवें आहेत. खुद्द डोंगरपुरास म्युनिसिपालिटी असून तेथील लोकसंख्या साडे सहा हजार आहे. गालियाकोट व सगवाडा हीं दोन मोठीं गांवें असून तेथेंहि म्युनिसिपालिट्या आहेत. संस्थानांत लोकसंख्येपैकीं ७२ हिंदू आहेत व शेकडा २० साक्षर आहेत; राजस्थानी व अजमेरी, शेखावती, जयपुरी, माळवी, मेवाडी, हिंदी व उर्दू या भाषा चालतात; मुख्य धंदा शेतीचा. डोंगरपुर व सगवाडा हे दोन जिल्हे आहेत. [ सेन्सस रिपोर्ट, १९११; टाइम्स—इयरबुक, १९२५; गोडबोले—एतद्देशीय संस्थानें. ]

**डोंगरळी जमीनदारी**—विरसोळा स्टेशनपासून सुमारें ४ मैलांवर ही असून हींत एकच खेडें आहे. क्षेत्रफळ १९३४ एकर. लोकसंख्या ६६५. इ. स. १८०० च्या पूर्वीं हें खेडें भोसल्यांनीं एका रजपुतास वसाहत करण्याकरितां दिलें. मालगुजार या ठिकाणीं बहुतेक रहात नाहींत.

दुसरी इस्टेट बालाघाट येथें आहे. उत्पन्न १४०० रुपये व टाकोळी २०० रुपये आहे.

**डोंगरा**—ही एक पंजाबांतील जात. लो. सं. ६८४७३. ही अर्धवट गुराखी व अर्धवट शेतकरी यांची जात आहे. हे रजपुतांपासून झाले असें म्हणतात. त्यांच्या चालीरीती गुजर लोकांच्या सारख्या आहेत. ते मुख्यतः मुसुलमान आहेत. दिल्ली, जालंध्र व लाहोर प्रांत व कपुरथळा, फरीदपूर व पतियाळा संस्थान येथें हे आढळतात. डोग्रा हें एक दुसरें प्रादेशिक नांव आहे. ते एका रजपुत जातीला लावतात. त्याचा व डोंगरा यांचा कांहीं एक संबंध नाहीं परंतु त्यांच्यांत बरेंच साम्य असल्यामुळें त्या दोन जाती एकच असें वाटण्याचा संभव आहे.

**डोंगरे, वासुदेव नारायण** ( १८५०–१९०५ )—एक जुने महाराष्ट्रीय नाटककार. हे अण्णासाहेब किर्लोस्करांचे समकालीन व प्रतिस्पर्धी नाटककार व नाटकमंडळीचे मालक होते. यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांत वाडाजून गांवीं झाला. यांचा मॅट्रिक्युलेशनपर्यंतचा अभ्यास मुंबईस झाला. पुढें संस्कृतचा अभ्यास करून इ. स. १८८० मध्यें त्यांनीं नाटकें लिहिण्यास सुरवात केली. किर्लोसकरांनीं संगीत शाकुंतलाचा प्रयोग केल्यावर चार पांच महिन्यांनीच ( १८८२ एप्रिल ) डोंगरे यांनीं मुंबईस आपल्या शाकुंतलाचा प्रयोग करून दाखविला. डोंगरे यांची पद्यरचना जास्त शास्त्रशुद्ध व गवई चिजांच्या चालीवर असे. किर्लोस्कर कंपनींतल्याप्रमाणेंच यांच्या कंपनींत नारायणबुवा मिरजकर, गजाननबुवा, नथुबुवा गुरव यांसारखीं चांगलीं पात्रें होतीं. यांचा शाकुंतल नाटकाचा प्रयोग लोकप्रिय झाल्यावर, डोंगरे यांनीं वेणीसंहार, रत्नावली, मृच्छकटिक, विक्रमोर्वशीय, मालतीमाधव वगैरे नाटकांचीं संगीतांत भाषांतरें करून त्यांचे रंगभूमीवर प्रयोग करून दाखविले. उर्दू भाषेंतील "इंद्रसभा" हें नाटक मराठींत वसवून त्यांत त्यांनीं नाच, सीनसिनरी यांची रेलचेल उडवून दिली.

डोंगरे यांच्या कंपनीनें दक्षिण महाराष्ट्रांत सफरी करून तिकडील लोकांना संगीत नाटकांची गोडी लावून दिली. "संगीत रंगीनायकीण" हें यांचें वेश्यागमनावरचें प्रहसन लोकप्रिय झालें. यांच्या मंडळींत पात्रें टिकून रहात नसल्यामुळें १८९५ सालीं त्यांना हा धंदा बंद करावा लागला. पुढें त्यांनीं सर्व व्याप सोडून आमरण स्वस्थपणें इकडे तिकडे दिवस घालविले. स. १९०५ मध्यें ते पुणें येथें वारले.

महाराष्ट्रीय रंगभूमीला वळण लावण्याचें कार्य किर्लोस्कराप्रमाणें यांनींहि बरेंच केलें. हे उत्तम नट व गायक होते. यांची कंपनी टिकली असती तर संगीत नाटक कंपनींत तिनें अग्रेसरत्व मिळविलें असतें. डोंगरे यांची नाट्यरचना संस्कृतच्या धर्तीवर व सभ्य होती; यांची भाषा प्रौढ असे व विचार प्रगल्भ असत.

**डोडोना**-एगायरसमधील ग्रीक लोकांची पुण्यभूमि.दक्षिणेंतील ग्रीक लोकांचे थवेच्या थवे येथें पूजेकरितां धांव घेत असत. येथील देवालयांत देखील देववाणी होत असे; तथापि येथील उत्तरें मिळविण्याची तऱ्हा डेलफाय येथील तऱ्हेहून फार भिन्न प्रकारची होती. एका अति जुनाट ओकवृक्षाच्या चलनावरून उत्तरें समजून घ्यावीं लागत असत.सर्वत्र प्रसृत असलेल्या वृक्षपूजेचा हा एक अवशेष असावासें दिसतें. वायूचा ध्वनि, झऱ्याचें खळखळणें इत्यादिकांवरूनहि उत्तरें समजून घेत असत. ईलिअड आणि ओडिसी या प्रसिद्ध ग्रंथांत डोडोनाविषयीं उल्लेख आले आहेत. हिरोडोटस असें लिहितो कीं फिनिशिअनांनीं ईजिप्तमधून आणलेली एक उपासकबाई डोडोना येथील देवस्थानची संस्थापक होय. दुसऱ्या एका दंतकथेवरून असें समजतें कीं ही उपासकबाई कृष्णकपोताच्या रूपांत आली होती.

शोधकांनीं पुष्कळ ठिकाणच्या जागा खणून काढून डोडोनाचा प्राचीन इतिहास उपलब्ध करून ठेवला आहे. अथेन्स येथील राष्ट्रीय पदार्थसंग्रहालयांत डोडोना येथील पुष्कळ प्राचीन अवशेष एकत्रित करून ठेवलेले आहेत. त्यांत पिऱ्हस या राजानें रोमन लोकांपासून हिरावून घेतलेलीं शस्त्रें ऐतिहासिकदृष्ट्या फार महत्त्वाचीं आहेत. इ. सनापूर्वी २१९ व्या वर्षी एटोलियन या लोकांनीं डोडोना येथील देवालयाचा विध्वंस केला परंतु त्यांतील देववाणी ज्युलिअन बादशहाच्या वेळेपावेतों अस्तित्वांत होती.

**डोनाटेलो** ( १३८६–१४६६)—एक इटालियन मूर्तिकार ( स्कल्पटर ). बिचर्टी नांवाच्या एका प्रसिद्ध मूर्तिकाराच्या हाताखालीं राहून त्यानें या मूर्तिकलेचें प्राथमिक शिक्षण संपादन केलें. पुढें ब्रुनेलेशी नांवाच्या दुसऱ्या एका मूर्तिकाराच्या बरोबर तो मूर्तिकलेचें माहेरघर जें रोम त्याठिकाणीं पुढील अध्ययन करण्यासाठीं गेला. ब्रूनेलेशीच्या सहवासांत त्याला या कलेचें उत्तम ज्ञान झालें. १५ व्या शतकाच्या मूर्तिकलेच्या इतिहासांत ब्रूनेलेशीप्रमाणेंच यानेंहि आपलें नांव गाजविलें.

१४०५ सालीं तो फ्लोरेन्स येथें आला. तेथील प्रार्थनामंदिराच्या उत्तर दरवाज्याच्या बाजूस बसविण्याकरितां त्यानें 'प्रेषिता '( मेसाया )च्या दोन संगमरवरी मूर्ती तयार केल्या; व त्याबद्दल त्याला चांगलें वेतनहि मिळालें. त्यानंतर त्याला 'डेव्हिड' चा पुतळा तयार करण्याची व सेंट जॉन दि इव्हँजेलिस्टचा बैठा पुतळा बनविण्याची कामगिरी मिळाली. १४१२-१४१५ या सालांच्या दरम्यान त्यानें 'सेंट पीटर', 'सेंट जॉर्ज' व 'सेंट मार्क' यांचे पुतळे तयार केले. ते ऑरसान मायकेलच्या प्रार्थनामंदिरांत बसविले आहेत. याच सुमारास त्यानें क्रूसावर चढविलेल्या ख्रिस्ताची लांकडामध्यें कोरलेली मूर्ति तयार केली; ती फार नामी साधली आहे. नग्न मूर्ति तयार करण्याचा हा त्याचा पहिलाच प्रयत्न होय, व या मूर्तीचें जो निरीक्षण करील त्याला डोनाटेलोचें हुबेहुब

आकृति करण्याचें कौशल्य दिसून येईलच. त्यानें तयार केलेला सेंटमार्कचा पुतळा, ज्याच्यासाठीं त्यानें तयार केला त्याला तो पसंत पडला नाहीं पण लोकांनां व विशेषतः मायकेल अँजेलो या नामांकित मूर्तिकारास तो पसंत पडला. ओरव्हिएटो प्रार्थनामंदिराच्या आवारांत बसविण्यासाठीं त्यानें, ' बाप्टिस्ट ' चा ब्रॉंझ धातूचा भव्य पुतळा तयार केला. पण तो त्यानें प्रार्थनामंदिरांत दिला नाहीं व हल्लीं तो बर्लिन येथील अजबखान्यांत आहे. यानंतर त्यानें ' अब्राहाम ',' जेरेमिया ' व' हबकक ' इत्यादिकांच्या मूर्ती तयार केल्या. या मूर्तीमध्यें व त्याच्या मागील मूर्तीमध्यें पुष्कळ फरक दृष्टीस पडतो. या मूर्ती तयार करण्यांत डोनाटेलोनें आपली स्वतंत्र व कल्पक बुद्धि प्रगट केलेली आढळते. शिवाय यानंतरच्या मूर्ती कल्पनेनें तयार केल्या नसून तत्कालीन लोकांच्या चेहऱ्यावरहुकूम तयार केलेल्या आहेत.

या पुढील डोनाटेलोनें तयार केलेल्या मूर्तीमध्यें डोनाटेलोचें कलाकौशल्य परिणतावस्थेला पोहोंचलेलें दिसतें. नेपल्स येथील ' स्वर्गारोहण ' हा पुतळा पाहिल्यास तत्कालीन इटलींतील कलाकौशल्याचें यानें फार सूक्ष्म निरीक्षण केलें होतें हें व्यक्त झाल्याशिवाय रहात नाहीं. १४३४ सालीं त्यानें मायकेलोझोच्या मदतीनें प्रेटो येथील प्रार्थनामंदिराकरितां संगमरवरी वेदी ( आल्टर ) तयार करून देण्याची कामगिरी पत्करली; व ती स. १४४० मध्यें पुरी केली. या वेदीच्या बाजूंनां त्यानें जे पुतळे कोरलेले आहेत त्यांत एका नर्तिकेचें चित्र असून त्या नर्तिकेचे हावभाव, तिची उभें रहाण्याची पद्धत फार उत्कृष्ट रीतीनें डोनाटेलोनें दाखविली आहे. इ.स. १४४३ मध्यें डोनाटेलो हा पादुआ येथील अँटोनियोच्या प्रार्थनामंदिरामधील वेदी तयार करण्यासाठीं तेथें गेला. या वेदीसाठीं त्यानें ख्रिस्त क्रूसावर चढल्याची मूर्ति तयार केली. ही मूर्ति पूर्वी तयार केलेल्या लांकडाच्या मूर्तीपेक्षां पुष्कळच उच्च दर्जाची आहे. या मूर्तीमध्यें ख्रिस्ताच्या चेहऱ्यावर उमदेपणाची झांक अधिक दृग्गोचर होते व एकंदर शरीराचे अवयवहि प्रमाणशीर दिसतात. पादुआ येथील प्रसिद्ध मूर्तिकार गट्टमेलता हा डोनाटेलो पादुआमध्यें असतांनाच वारल्यामुळें त्याचा भव्य पुतळा उभारण्याचें काम डोनाटेलोकडे सोंपविण्यांत आलें. हा पुतळा त्यानें १४५३ सालीं संपविला व तो सर्वांनां पसंत पडला.

पुढें डोनाटेलो हा फ्लारेन्स येथें परत आला व व येथेंच त्यानें आपलीं शेवटचीं वर्षे घालविलीं. तेथें असतांना त्यानें ' जूडिथ ', ' क्रूसारोहण ' इत्यादि पुष्कळ उत्कृष्ट मूर्ती तयार केल्या. तो १४६६ सालीं मरण पावला. मूर्तिकार या नात्यानें त्याची प्रसिद्धि त्याच्या हयातींत पुष्कळ झाली व मायकेल अँजेलो, रफायल इत्यादि अद्वितीय मूर्तिकारांनींहि त्याची प्रशंसा केली.१८ व्या व १९ व्या शतकाच्या पूर्वपादांत त्याची लोकांनां विस्मृति पडली होती पण अलीकडे त्यानें केलेल्या मूर्ती बॉर्गेलो येथील एका भव्य इमारतींत आणून ठेवल्या आहेत; व त्यांचें अध्ययन करण्यांत येऊं लागलें आहे. १८६६ सालीं त्याला मेल्याला ४०० वर्षे झालीं व त्या समयीं व त्याच्या जन्मतिथींसहि मोठा उत्सव करण्यांत येऊन त्याचें गुणवर्णन करण्यांत आलें.

**डौंवगांव**—मोंगलाईंत परांडे तालुक्यांत हा गांव आहे. रामदासस्वामींचा पट्टशिष्य कल्याण याचा मठ येथें आहे. मठांत रामदासांनीं सांगितलेला व कल्याणानें स्वहस्तानें लिहिलेला दासबोध आहे. त्याचप्रमाणें रामदासांनीं कल्याणास आपल्या हातानें काढून दिलेला कित्ता व त्यांच्या कांहीं इतर वस्तूहि आहेत. रामदासांच्या मागें कल्याण पुष्कळ दिवस जगला होता. त्याची समाधि डौंवगांवींच नदीकांठीं आहे. मठास शाहूछत्रपतींनीं इनाम गांवें दिलीं आहेत.

**डोबरेनर** ( १७८०–१८४९ )—हा जर्मन रसायनशास्त्रज्ञ वव्हेरियांत हॉफ् येथें ता. १५ डिसेंबर १७८० सालीं जन्मला. मंचवर्ग येथें त्यानें वैद्यकीचा अभ्यास केला व नंतर १८०३ सालीं रासायनिक द्रव्यांचा कारखाना काढला. १८१० सालीं त्याला येना येथें रसायनशास्त्र, वैद्यक व यंत्रशास्त्र यांच्या अध्यापकाची जागा मिळाली. येथेंच २९ मार्च स.१८४९मध्यें त्याचा अंत झाला. राजसंस्थेच्या (रॉयलसोसायटी ) यादींत याचे १७१ निबंध आहेत. त्यानें चूर्णस्थितींतल्या प्लाटिनमविषयीं व मद्यार्काच्या ( अल्कोहोल ) प्राणिदीकरणाविषयीं पुष्कळ प्रयोग केले. स. १८२२ त यानें प्लाटिनमचूर्णावर मद्यार्काचे थेंब सोडले व हवेचा शिरकाव येतानें केला तर सिरकाम्ल व पाणी तयार होतें असें सिद्ध केलें. यावरूनच स्फुटझेंक यानें त्वरित द्राक्षासव करण्याची पद्धत शोधून काढली. नरम प्लाटिनम, प्राणवायूच्या सान्निध्यानें उज्जवायूचें ज्वलन करूं शकतें असें त्याला आढळलें. यावरून पुढें त्यानें आपोआप जळणाऱ्या ग्यासच्या दिव्यांची रचना केली. मद्यार्कापासून अल्डिहाइड काढण्याच्या अनेक कृती त्यानें शोधून काढल्या व फरफुरोल हें द्रव्य त्यानेंच शोधून काढलें. १८२३ सालीं वायूंचें संमिश्रण ( डिफ्यूजन ) कसें होतें हें त्यानें लक्षपूर्वक पाहिलें त्यानें हवारसायनशास्त्र व आंबविण्याचें रसायनशास्त्र या विषयांवर दोन पुस्तकें लिहिलीं. सॅक्सविनरचा ड्यूक चार्लस आगष्ट व ;गोथी यांशीं झालेला त्याचा पत्रव्यवहार पुढें स. १८५६ त छापून प्रसिद्ध झाला.

**डौंवारी**—हे विशेषतः मद्रास इलाख्यांत तुमकुर व कोलार जिल्ह्यांत आढळतात. या लोकांचा धंदा कोलांट्या मारणें, दोरावरून नाचणें वगैरे कसरतीचा आहे; पण कांहीं लोक शेतीहि करतात. त्यांचा गुरु वैष्णव ब्राह्मण असतो. हे भटके असल्यामुळें त्यांच्या ज्या निरनिराळ्या टोळ्या असतात त्या प्रत्येकांवर एक नाईक असतो. हे लोक मूळचे तेलगू असून कुर्नुल व नेलोर जिल्ह्यांत रहाणारे आहेत. हे मुलींनां दोऱ्यावरून नाच करावयास शिकवितात व त्या त्यांत प्रवीण झाल्यास अविवाहित रहातात व वे-

करतात. यांच्यांत श्राद्धविधि नाहीं. येलम्मा, संकडाम्मा, गुरुमूर्ती वगैरे यांच्यांतील प्रमुख देवता आहेत. उच्च जातींतील लोक हे आपल्या जातींत घेतात. टोळ्यांतील पुरुष शेतांत मजुरी करतात व स्त्रिया भिक्षा मागतात. हे लोक पक्षी पकडण्यांत अत्यन्त प्रवीण असतात. फिरतीच्या वेळीं यांचीं वाहनें गाढवें व बैल असतात. या जातीची लोकसंख्या ( १९११ ) हिंदु, ९५३१८, मुसुलमान ५८ व वन्य २०२० मिळून ९७४५६ आहे. [ सेन्सस रिपोर्ट १९११. ]

**डोब्रूजा**—रुमानियांतील एक प्रांत. हा प्रदेश यूरोपच्या आग्नेय भागांत आहे याच्या पश्चिमेस व उत्तरेस डान्यूब नदी, पूर्वेस काळा समुद्र व दक्षिणेस बल्गेरिया आहे. यांत चार जिल्हे असून या प्रांताची लोकसंख्या ( १९१२ ) ३८१३०६ व क्षेत्रफळ ६००० चौरस मैल आहे. अलीकडील काळांत १८२८, १८५४ व १८७८ या साली हा प्रांत रशिया व तुर्कस्तान यांचें रणक्षेत्र होतें १८७८साली बर्लिनच्या तहान्वयें रशियानें आपला दोस्त रुमानिया याला हा प्रदेश देऊन बेसअरेबिया हा रुमानियाचा देश आपल्या राज्यास जोडला. १८८० नंतर परदेशचे लोक या प्रांतांतून बरेच कमी झाल्यामुळें व काळ्या समुद्रावरील बंदराच्या सुधारणेमुळें डोब्रूजा प्रांत रुमानियाच्या भरभराटीचें कारण झालें. बुखारेस्टच्या तहाप्रमाणें ( १९१३ ) हा प्रांत जर्मनी व आस्ट्रिया यांनां देणें रुमानियास भाग पडलें. यावेळीं तुर्क, तार्तर, बल्गर, रशियन, जर्मन वगैरे परदेशी लोक या प्रांतांत फार होते. त्यांची संख्या जवळ जवळ १ कोटी २० लक्ष होती. महायुद्धानंतर हा प्रांत रुमानियाकडे पुन्हां आला आहे.

**डोम** ( डोंब )—हिंदुस्थानांत सर्वत्र पसरलेली ही एक हलकी जात असून ती द्रवीड जातीपासून उत्पन्न झाली आहे असें म्हणतात. बंगालमधील विहारी-मघय्या ही डोम जात फार प्रसिद्ध आहे. ही जात मुख्यतः अनार्य लोकांपासुन झालेली आहे, तथापि हींत बरेंच मिश्रण झालें आहे. उत्तर हिंदुस्थानांतील डोम जातीचे मुख्यतः तीन प्रांतिक विभाग आहेत. संयुक्त प्रांताच्या पूर्वेकडील व विहारमधील जात हिमालयांतील डोमजात व पंजाबचे मिराशी डोम, असे उपर्युक्त तीन विभाग प्रसिद्ध आहेत.

पूर्वेकडील गंगाकांठच्या डोम लोकांच्या अनेक जाती असून बानफोर, बासर वगैरे जाती मुख्य आहेत. मघय्या डोम हें नांव मगध या नांवावरून पडलें असावें. ही एक भटकणारी जात असून या लोकांचा धंदा चोरी करणें, भिक्षा मागणें, लूट करणें अशा स्वरूपाचा आहे. गंडक व सामैय्या नामक त्यांच्या मुख्य देवता होत. या देवतांनां बळी देण्यांत येतात. मघय्या जातीपेक्षां वरच्या दर्जाचे लोक भवानीची उपासना करतात. संयुक्त प्रांतांतील डोम कुकर्मी नामक देवाची उपासना करतात. या जातींतील लोकांचा भुताखेतांवर बराच विश्वास आहे.

विहारवासी डोम लोकांपेक्षां हिमालयांतील डोम जरा वरच्या दर्जाचे आहेत. गंगानाथ व भोलानाथ हीं त्यांचीं मुख्य दैवतें असून मसाण हा त्यांचा स्मशानांतील देव होय. शिवाय क्षेत्रपाल, रूनिया वगैरे अनेक देवता असून त्यांनां ते बळी अर्पण करतात.

पंजाबांतील मिराशी डोम हे ढोल वाजविणें, पोवाडे गाणें वगैरे धंदे करतात, व त्यांच्या स्त्रियाहि गातात व झनान्यांतील दासी म्हणून कामें करतात. हीं पंजाबांतील डोम जात जवळ जवळ मुसुलमान बनलेली आहे. तथापि कांहीं मूळच्या चालीरीती त्यांच्यांतून अद्याप गेल्या नाहींत. १९११ सालच्या खानेसुमारीच्य अहवालावरून डोम जातीची लोकसंख्या पुढें दिल्याप्रमाणें होती. हिंदू ९०२६३७, शीख १३५, जैन ४, बुद्ध १, मुसुलमान ७३४९५ व वन्य ७५४.

बृहत्संहितेंत ' श्वपचादयः ' म्हणजे जे कुत्र्याचें मांस शिजवून खातात ते व त्यांच्यासारखे इतर लोक म्हणजे डोंब असें म्हटलें आहे व टीकेंत ' श्वपचा डोंबाः ' कुत्र्याचें मास शिजविणारे लोक डोंब असतात असें म्हटलें आहे. डोंब शब्द रुद्रदेवाच्या शिलालेखांतहि आढळतो. यूरोपियन संशोधक हे डोंबलोकांनां जिप्सी असें म्हणतात. [ प्रस्तावनाखंड, हिंदुस्थान आणि जग, पृ. २५२ पहा. ]

पंजाबमधील हे लोक मुख्यतः हिंदु असून, कांगा, होशियापुर, गुरुदासपुर, सियालकोट आणि नहन, मांडी-सुकेत, चंबा पतियाळा व सिमला या प्रांतांत आढळतात चंबामध्यें या जातीस डम असें म्हणतात. ते गंग्याचा व बांबूच्या टोपल्या वगैरे तयार करण्याचा धंदा करितात. सुतारांचें काम करणाऱ्या डोमास डोंब, डोंगरे किंवा भंजरा असें म्हणतात.

प्राचीनकाळीं हे लोक स्तुतिपाठकाचा धंदा करीत असावे. काशीस अद्यापिहि प्रेत जाळण्याचा मान या जातीकडे असून, त्यानें स्पर्श केलेल्या प्रेतास सद्गति मिळते असा समज आहे.

संयुक्त प्रांतांत हे लोक मीरत, बनारस, गाझीपूर, गोरखपूर, रोहिलखंड, अलाहाबाद, झांशी, लखनौ, अल्मोरा, बाराबंकी वगैरे जिल्ह्यांत सांपडतात. तिकडील त्यांची संख्या जवळ जवळ दोन लक्ष आहे. इकडे त्यांनां डोम्रा असेंहि म्हणतात. ह्यांचे दोन भेद करतां येतातः—(१) पूर्वदेशीय डोम लोक-गोरखपूर व बनारस भागाच्या जवळचे जिल्हे ह्यांत सांपडणारे आणि ( २ , पश्चिमदेशीय अथवा टेकडीवरचे डोम लोक—हे पूर्वदेशीय डोम लोकांपेक्षां संख्येनें अधिक आहेत.

वास्तविक पाहिलें तर ह्या दोन भिन्न पोटजाती आहेत. ह्या जातीचा तिसरा पोटभेद डूम अथवा डोम मिरासी असा आहे. ते गाण्याचा धंदा करतात. त्यांचा समाजांतील दर्जा फार कनिष्ठ प्रकारचा आहे. परंतु लग्नसमारंभांत ते हजर असतात व वंशावली वगैरे गातात. हे मिरासी लोक भाटांप्रमाणें वंशपरंपरा सेवक असतात.

पूर्वदेशीय डोम लोक हे रजपूतवंशीय आहेत अशी यांच्यांत दंतकथा आहे. डोम्रा लोक फार खादाड आहेत. ते मद्यपीहि आहेत. कित्येक डोम अथवा डोम्रा जाती वायव्य प्रांताच्या पश्चिमेकडील जिल्ह्यांत व बुंदेलखंड आणि सागर यांत आढळून येतात. दोर, पंखे, चटया वगैरे वस्तू करणें हे त्यांचे धंदे होत. गोरखपूरच्या डोमांविषयीं एक गोष्ट अशी आहे कीं, जरी ते जंगली जातीचे आहेत तरी त्यांना कोणत्याहि प्रकारची शिकार आवडत नाहीं, व जंगली प्राण्यांच्या मांसाचा ते मुळींच उपयोग करीत नाहींत.

हे सर्व पूर्वदेशीय डोम लोक मगध्या अथवा प्राचीन मगध राज्यांतील रहिवाशी म्हणून एका वर्गात मोडतात त्यांचे पुढील पोटभेद आहेतः—काशीवाला, चान्वाड, हेला, बान्सफोर, घरामी, बतविन्या, धरकार, पट्टारी, हलालखोर. दरोडे, लुटालूट, चोऱ्या व बेकायदेशीरपणें दारू गाळणें हे यांचे मुख्य गुन्हे आहेत.

टेंकडीवरचे डोम लोक हे कृष्णवर्णाचे असतात. हे कित्येक शतकांपासून खासिया लोकांचे गुलाम आहेत. शास्त्रविरुद्ध गोष्टी ते कधींहि आचरीत नाहींत. उदाहरणार्थ, रजपूत अथवा ब्राह्मण यांचें भांडें व हुक्का यांचा उपयोग ते करीत नाहींत. हे लोक काश्मीरकडील हिंदु व डोग्र लोकांमध्यें आढळतात. तिकडे त्यांचे पुढील पोटभेद आहेतः—अगुरी, वेम, कोहली, डोमंग, ओरा, नेवार. [ इंडियन अँटिक्वरी पु. ११, १५; सेन्सस ऑफ इंडिया १९११; बृहत्संहिता ४४, ७७; रोज–ग्लॉसरी; बुकॅनन–ईस्टर्न इंडिया. पु. २; नॉर्थवेस्ट प्राव्हिन्स यांखेरीज. ]

**डोमल जात**—काश्मीरमधील एक जात. यांची लोकसंख्या ६९५३. या लोकांचा धर्म मुसुलमानी आहे. डुमा अगर डोंब ( टॉम्स ) जातीहून ही जात अगदीं निराळी आहे. या जातींतील लोकांचा धंदा शेतीचा असून त्यांचें रजपूत लोकांशीं बरेंच साम्य आहे.

**डोमिनिका**—हा वेस्टइंडीजमधील, लीवर्ड बेटाच्या वसाहतींतील पांच इलाख्यांपैकीं सर्वांत मोठा इलाखा आहे. हें बेट मार्तिनिक व ग्वादेलोप या दोन फ्रेंच बेटांमध्यें असून उत्तर अक्षांश१५°३०′ व पश्चिम रेखांश६१°२०′ यांवर वसलेलें आहे. याची लांबी २९ मैल, रुंदी १६ मैल व क्षेत्रफळ २९१चौ. मैल आहे. या बेटाच्या उत्तरेकडून दक्षिणेकडे जाणारी एक पर्वताची ओळ आहे. जमीनींतून निघणारी गंधकाची वाफ, व गरम पाण्याचे झरे यांवरून येथें ज्वालामुखी पर्वतांचीं चिन्हें दिसतात. दक्षिणेकडे प्रसिद्ध उकळणारें सरोवर आहे. येथें वेगवेगळया जातींचीं झाडें व इमारती लांकूड आहे. कॉफी, लिंबें, संत्रीं, खराचीं झाडें, मसाले व इतर फळें यांची चांगली पैदास होते. डोमिनिकांत लहान मोठे असे तीन ओढे असल्यामुळें पाणी मुबलक आहे. साखर, लिंबाचा अर्क व तेलें येथें होतात. कॉफी, कोको, साखर, लिंबाचा अर्क, तेलें व फळफळावळ यांची निर्गत होते. लोकसंख्या (१९०१) २८८९४ असून त्यांत निग्रो जास्त आहेत, मूळच्या रहिवाशांपैकीं कांहीं थोडे गरीब लोक आहेत. रोजो(वस्ती५७६४) हें राजधानीचें व तटबंदीचें शहर आणि बंदर आहे. पोर्टस् माउथ हें दुसरें शहर आहे. रोमनकॅथोलिक धर्म या बेटांत आहे. शिक्षण मोफत व सक्तीचें आहे. कोलंबसाला हें ३ नोव्हेंबर १४९३ सालांत सांपडलें म्हणून याचें डोमिनिका नांव ठेवण्यांत आलें. प्रथम या ठिकाणीं फ्रेंचांनीं वसाहत केली. १७६३ सालीं पॅरिसच्या तहानें हें बेट ब्रिटिशांना मिळालें. १८०५ सालीं फ्रेंच सेनापति लाग्रांज यानें या बेटाची राखरांगोळी केली. शेवटीं हें ब्रिटिशांच्या ताब्यांत राहिलें. या बेटांवर एक शासनाधिकारी (अॅडमिनिस्ट्रेटर) असून त्याला १०सभासदांचें एक कार्यकारी मंडळ मदतनीस म्हणून आहे.

**डोरली**—या झाडास संस्कृतमध्यें वार्ताकी व मराठींत डोरली म्हणतात. हें झाड हुबेहुब वांग्याच्या झाडासारखें असतें. यास रानवांगें असेंहि म्हणतात. हें झाड कंबरेइतकें उंच वाढतें. याच्या फळाचा रंग पिंवळा असून त्याचा आकार गोल सुपारीसारखा असतो. गरीब लोक या फळांची भाजी करतात. कोंकणांत या झाडांची एक जात आहे, तीस मोतरिंगणी किंवा चिचुरटी असें म्हणतात. मोतरिंगणीचीं फळें डोरलीपेक्षां बारीक असतात. डोरली तिखट, उष्ण, कडू, असून वांति, दमा, खोकला कृमि, हृद्रोग, अग्निमांद्य यांचा नाश करते.

**डोव्हर**—इंग्लंडांतील केंटचें डोव्हर बंदर असून म्युनिसिपालिटीचा विभाग व प्रतिनिधि विभाग आहे. हें लंडनच्या उत्तर आग्नेयीस साउथ ईस्टर्न व चॅथॅम रेल्वेनें ७६ मैल आहे. १९०१ सालीं येथील लोकसंख्या ४१७९४ होती. डोर नदीच्या मुखाजवळ हें शहर आहे. हें उन्हाळ्याचें ठिकाण असून येथील हवा आरोग्यकारक आहे. तोफखाना आणि किल्ल्याच्या दरम्यान जुनें शहर आहे. या किल्ल्याच्या आवारांत रोमन दीपगृह आहे. सेंटमेरी प्रार्थनामंदिर येथें आहे. सॅक्सन किल्ल्याचे अवशेष अजून दृष्टीस पडतात. टेंपलर लोकांच्या प्रार्थनामंदिराचे अवशेष १८५४ सालीं सांपडले. जुन्या डोव्हरच्या नैर्ऋत्येस शार्चीक्लिफ किल्ला आहे.

सेंट मार्टिन व सेंटमेरी प्रार्थनामंदिराचे अवशेष अजून आहेत. येथें सेंट जेम्स प्रार्थनामंदीर आहे. सेंट मार्टिन मठाचे बरेच अवशेष भाग आहेत. सेंट मार्टिन विद्यालय येथें आहे, सर्व राष्ट्रांच्या यात्रेकरूंच्या सोईकरितां ह्यूबर्ट डी बर्गनें हायस्ट्रीट सडकेवर बांधलेली मेसनड्यू इमारत जमातीनें विकत घेतली. १८४९ सालीं येथें पदार्थसंग्रहालय बांधलें येथें पुष्कळ धार्मिक संस्था असून होली, ट्रिनिटी, ख्राइस्ट, चार्लटन व बकलंड प्रार्थनामंदिरें आहेत. येथें एक विद्यालय आहे

येथून कॅले व ऑस्टेंडपर्यंत आगबोटीचें दळणवळण आहे. आरमाराच्या सोईकरितां येथें एक कृत्रिम बंदर बांधण्यांत आलें. जहाजें बांधण्याचा, इमारतीच्या लांकडाचा व दोरखंडाचा व्यापार येथें आहे. कँटरबरीपीठांत हें मदतनीस बिशपचें

ठिकाण आहे. प्रतिनिधि विभागांतून एक सभासद पाठविला जातो. येथील राज्यकारभार मेअर, ६ सनदी अधिकारी व १८ सभासदांच्या हातांत असतो. शहरचें क्षेत्रफळ २०२६ एकर आहे.

इतिहास.—रोमनकालीं सर्व खंडांतील व्यापाराच्या बंदरांपैकीं हें एक होतें. ४ थ्या शतकांत बंदराच्या रक्षणाकरितां येथें एक किल्ला बांधण्यांत आला. इंग्लंडच्या दक्षिणेस असणाऱ्या पांच बंदरांपैकीं हें एक आहे. मध्ययुगांत या किल्ल्याकारितां बरींच युद्धें व परकीय स्वाऱ्या झाल्या. १२१६ सालीं ह्युबर्टडी वर्जनें फ्रेंचांच्या विरुद्ध या किल्ल्याचें रक्षण केलें.

१९२० सालीं डोव्हरची लोकसंख्या ४१४०८ होती. १९२१ सालीं डोव्हरच्या म्युनिसिपालिटीच्या ताब्यांत रिव्हर थॅडिच्या टापूंतील ७० एकर जागा व बंदरच्या आसपासची जागा देण्यांत आली. एक नवीन पोस्ट ऑफिस १९१४सालीं बांधण्यांत आलें. चार्लटन व बर्नवासचीं चर्चेंहि नवीन बांधण्यांत आलीं. लंडन येथें जें रॉयल मिलिटरी स्कूल होतें तें डोव्हर येथें आणण्यांत आलें. शिपाई लोकांसाठीं राहण्याच्या खोल्या १९१५ सालीं बांधण्यांत आल्या. १९१४ सालीं डोव्हरच्या बंदरामध्यें पुष्कळ सुधारणा करण्यांत आल्या.

प्रिन्स ऑफ वेल्स पीयरपर्यंत आगगाडी नेण्यासाठीं एक तरता पूल बांधण्यांत आला व महायुद्धांत मालाच्या झटपट नेआणीच्या कामीं या पुलाचा फारच उपयोग झाला. डोव्हरच्या सामुद्रधुनीचें रक्षण करण्यासाठीं येथें पुष्कळशा विनाशिका व पाणबुड्या ठेवलेल्या आहेत. महायुद्धांत डोव्हरच्या भोंवतीं मोठा खंदक खणण्यांत आला. स्विंकगेटच्या भागांत मोठें विमानगृह बांधण्यांत येऊन त्या ठिकाणीं विमानासंबंधीचें शिक्षण देण्यांत येऊं लागलें. महायुद्धांत झेपेलिनचे पुष्कळ हल्ले डोव्हरवर झाले पण डोव्हर येथील वैमानिकांनीं हे हल्ले परतवून लावले. डोव्हरच्या किल्ल्यावरहि शत्रूंनीं आकाशांतून पुष्कळ बांब टाकले पण किल्ल्याचें विशेषसें नुकसान झालें नाहीं. महायुद्धाच्या पूर्वार्धांत डोव्हर हें आरमारचें केंद्र होतें पण पुढें तें बदलण्यांत आलें व त्याचा मुख्यतः व्यापारासाठीं उपयोग करण्यांत येऊं लागला. डोव्हरचें ऐतिहासिक महत्त्व असल्याकारणानें येथील किल्ला व इतर पुरातन इमारतींची डागडुजी करण्यासाठीं पुराणवस्तुखात्यानें बरेच परीश्रम चालवले आहेत. या ठिकाणीं सी. एल. बी. आर. अशीं अक्षरें असलेल्या विटा सांपडल्या असून रोमनकालीन डोव्हर याच जागीं असावें असें सिद्ध झालें आहे. स. १९२० नंतर डोव्हरच्या टापूंतील केंट येथील कोळशाच्या खाणी खणण्यांत आल्या. या खाणी खणण्याच्या कामीं डोव्हर येथें एक स्वतंत्र कंपनी स्थापन झाली आहे. [ बॅव्हिंग्टन जोन्स–दि ॲनल्स ऑफ दि डोव्हर ( १९१६ ). ]

**डोहर**—वऱ्हाडांत ही एक लहानशी जात आहे. हे लोक बहुधा चांभार आहेत. यांची संख्या ६००० आहे. हिंदुसमाजांत आपला दर्जा वाढविण्याकरितां हे प्राण्यांस दयेनें वागवितात. त्यांस दगड किंवा काठी मारीत नाहींत. कोणी कसायास गाय विकली तर बहिष्कार घालतात पण त्याला पश्चात्ताप होऊन जर ती मारली जाण्यापूर्वीं परत आणली तर ५ रुपये दंडावर तो सुटतो. परंतु जर सोडविण्यापूर्वीच ती मारली गेली तर त्याच्या मुलीच्या लग्नांत त्यानें शुल्क घेतां कामा नये आणि ५० रुपये दंड दिला पाहिजे. न दिला तर जातींतून बहिष्कार घालतात. परदेशीं डोहोर तर बालविवाहाची चाल फार कडकपणें पाळतात. १० व्या वर्षीं मुलीचें लग्न न झालें तर आईबापांस दंड करतात व दंड न दिला तर जातींतून बाहेर घालवितात. मुलीला कांहीं रोग असला किंवा इतर कांहीं व्यंग असलें व त्यामुळें लग्नास अडथळा आला तरी सुद्धां दंड द्यावा लागतो. यांस हिंदु देवळांत प्रवेश नाहीं. न्हावी यांची हजामत करीत नाहींत व धोबी यांचे कपडे धूत नाहींत. प्रथम विवाह विधवेबरोबर करणें फार कमीपणा समजला जातो. अशा वरावें प्रथम रुईच्या झाडाबरोबर लग्न लावतात. तरी अशा संबंधाचीं मुलें गोलक समजलीं जातात व त्यांचीं लग्नें अशाच लोकांत होतात. पंचाइतीस अर्ज देऊन नवराबायको दोघांनींहि काडी मोडतां येते. अशा बाईचें विधवाविवाहविधीनें पुन्हां लग्न होण्यास अडचण नाहीं. बोकड व मेंढरें देवांस बळी देण्यापूर्वीं त्यांची पूजा करतात. दसऱ्यास कातडें सोलण्याच्या हत्यारांची व सुईची पूजा करतात. प्रेतांस दहन करतात. पण अविवाहितांचीं प्रेतें पुरतात.

**ड्युडरनेक**—हा फ्रेंच मनुष्य तुकोजी होळकराच्या सैन्यांतील एक लष्करी अंमलदार होता. याला तुकोजीनें सन १७९२ च्या सुमारास चाकरीस ठेवून त्याच्याकडून पायदळाचीं चार पलटणें कवाईत शिकवून तयार करून घेतलीं. याच सालीं हा व शिंद्याचा सेनापति डी बॉईन हे दोघेहि रजपुतांच्या मुलुखांत खंडण्या गोळा करीत फिरत असतां, एकदां वांटणीसंबंधांत दोघांमध्यें कांहीं भांडण उपस्थित होऊन अजमेरजवळ लखैरी येथें दोघांची लढाई झाली. शिंद्याच्या बाजूस गोपाळरावभाऊ, लखबादादा व डीबॉईन हे सरदार असून त्यांच्याजवळ २०००० स्वार व ९००० पायदळ एवढा सरंजाम होता. ड्यूडरनेकजवळ ३०००० फौज व पायदळाच्या चार पलटणी होत्या. आयत्या वेळीं दारूच्या १२ बुधल्यांस आग लागून भडका उडल्यामुळें शिंद्याच्या सैन्यांत एकच गोंधळ उडाला. तरीहि शिंद्याचें सैन्य झाडींत असल्याकारणानें ड्यूडरनेकला या गोंधळाचा फायदा घेतां आला नाहीं. या लढाईंत ड्यूडरनेकच्या चारीहि पलटणी जवळ जवळ सर्वच गारद होईपर्यंत शिंद्याच्या सैन्याशीं मोठ्या शौर्यानें लढल्या. परंतु शेवटीं ड्यूडरनेकचा पराभव झाला. खर्डा येथें मराठ्यांची निजामअल्लीबरोबर जी लढाई झाली तींत ड्यूडरनेक हा आपल्या २००० कवाइती पायदळासह तुकोजी होळकराबरोबर होता ( १७९५ ). तुकोजी होळकराच्या मृत्यूनंतर हा आरंभीं

खासेरावाच्या पक्षाकडे होता. परंतु इ. स. १८०० च्या सुमारास यशवंतरावाच्या धाडशीपणामुळें त्याचें त्याच्याविषयीं अनुकूल मत होऊन तो आपलें सर्व पायदळ व तोफखाना घेऊन त्याला मिळाला. इंदूरच्या लढाईत यशवंतरावाचा पराभव झाल्यावर डयूडरनेक त्याचा पक्ष सोडण्यास तयार झाला. परंतु त्याच्या पलटणींस त्याचा हेतु कळतांच त्या त्याला सोडून यशवंतरावाकडे निघून गेल्या ( १८०२ ).

१८०३ सालच्या आगस्ट महिन्यांत शिंद्यांचें इंग्रजांशीं युद्ध सुरू झालें तेव्हां शिंद्यानें डयूडरनेक याजबरोबर सात पलटणी देऊन त्यास दक्षिणेंतून उत्तरहिंदुस्थानांत पेरॉनच्या मदतीस पाठविलें. डयूडरनेक आपल्या पलटणींसह आक्टोबर महिन्यांत हिंदुस्थानांत आला. परंतु इंग्रजांशीं लढण्याच्या ऐवजीं तो त्या महिन्याच्या ३० व्या तारखेस फितूर होऊन इंग्रजांस जाऊन मिळाला. [ ग्रँटडफ; कीन– महादजी शिंदे ]

**डयुबॉपिएरी** ( १२५०–१३१२ ) —हा फ्रेंच ग्रंथकार फिलिप दि फेअर या राजाच्या कारकीर्दीत प्रसिद्धीस आला. ह्यानें राजकीय विषयांवर बरींचशीं लहान लहान चोपडीं लिहून प्रसिद्ध केलीं. एकोणिसाव्या शतकामध्यें याची बरीच प्रसिद्धि झाली. याचें शिक्षण पारीस येथें झालें. ह्यानें रॉजर बेकन याच्या मतांचा अभ्यास केला होता. इ. स. १३०० मध्यें यानें राजकीय विषयावर एक निनांवी लेख लिहिला होता. त्यावरून हा राजवाड्यांतील विश्वासाच्या माणसांपैकीं एक असावा असें वाटतें. इ. स. १३०६ सालीं तो ग्वाएन्नांमध्यें पहिल्या एडवर्डचा वकील म्हणून होता. याच वर्षी त्यानें डी रेक्युपरेशन टेरे सॅक्टी या नांवाचें पुस्तक लिहून तें पहिल्या एडवर्डला अर्पण केलें. यानें राजकारणांत अत्यंत महत्त्वाचा भाग घेतला व सैन्य, चर्च, धर्म वगैरे बाबतींत सुधारणा करण्याचें ठरविलें.

**डयुसेलडॉर्फ**—प्रशियाच्या ऱ्हाइन नदीच्या प्रांतांतील जर्मनीचें शहर. लोकसंख्या ( १९०५ ) २५२६३०. हें कोलोनच्या वायव्येस आगगाडीच्या रस्त्यानें २४ मैलांवर ऱ्हाइन नदीच्या उजव्या किनाऱ्यावर वसलेलें आहे. पश्चिम जर्मनींतील सुंदर शहरांत डयुसेलडॉर्फची गणना होत असून, तें मध्ययुरोपांतील मोठ्या जलमार्गांवर, व आगगाडीच्या मुख्य रस्त्यांच्या संगमबिंदूवर असल्यामुळें तेथील उद्योगधंद्यांची झपाट्यानें वाढ झाली आहे. वेस्टफालियांतील कोळशाच्या व लोखंडाच्या व्यापाराची सावकारी येथें चालते. कसल्याशिवाय बाकीचें शहर पद्धतशीर बांधलें असून त्यांत मोकळीं मैदानें व सार्वजनिक चौक पुष्कळ असल्यामुळें त्याला बरेंच वैचित्र्य आलें आहे. १८९८ सालीं ऱ्हाइन नदीवर २०८७ फूट लांबीचा एक पूल बांधला आहे; त्याच्या वरून क्रेफेल्डकडे विजेची ट्राम जाते. येथें उद्योगधंद्यांतील कलाकौशल्याचें पदार्थसंग्रहालय, ऐतिहासिक अजबखाना, ग्रंथसंग्रहालय, उद्योगधंद्याच्या शिक्षणासाठीं शाळा या संस्था असून बऱ्याच व्यापारी मंडळया व विद्वान लोकांच्या मंडळ्याहि आहेत. परंतु हें शहर प्रसिद्धीस येण्याचें मुख्य कारण येथील चित्रकलेचें विद्यापीठ होय. ह्या ठिकाणच्या चित्रप्रदर्शनाच्या दिवाणखान्यांतील बराच मोठा चित्रांचा संग्रह १८०५ सालीं म्यूनिच येथें नेला; तरी देखील अजून येथें चांगल्या चांगल्या चित्रकारांचीं पुष्कळ दर्शनीय चित्रें आहेत. शहराच्या एका नगरोपान्तांत बंदर आहे; त्यांत मोठमोठीं जहाजें उभे राहण्याकरितां विस्तृत धक्के असल्यामुळें डयूसेल्डॉर्फचा लंडन व डच शहरांशीं चालणारा व्यापार पुष्कळ वाढला आहे. अलीकडे अलीकडे तर तें उद्योगधंद्यांत बरेंच पुढें आलें आहे. येथील उद्योगधंद्यांत लोखंडाचे कारखाने, विणकाम व त्यास आनुषंगिक असे दुसरे धंदे मुख्य आहेत. शहराच्या उत्तरेस, जवळच डयुसेलथाल नांवाच्या खेड्यांत अनाथ मुलांकरितां एक संस्था आहे.

डयुसेलडॉर्फ हें स. १२८८ त शहराच्या पदवीस पोहोंचलें. यूरोपांतील ३० वर्षांच्या युद्धांत व स्पेनच्या गादीच्या वारसासंबंधींच्या युद्धांत ह्याचें बरेंच नुकसान झालें. स. १७९५ त फ्रेंचांनीं कुलपी गोळ्यांचा भयंकर भडिमार करून हें घेतलें, आणि ल्युनेव्हिलेच्या तहानंतर याची तटबंदी पाडून टाकली. स. १८०५त नेपोलियनच्या बर्ग संस्थानाचें हें राजधानीचें शहर झालें, पण १८१५ त हें त्या संस्थानासह प्रशियाकडे आलें.

**डयूमा अलेक्झांडर**—( १८०२—१८७० )—हा फ्रेंच कादंबरीकार व नाटककार ता. २४ जुलै १८०२ रोजीं जन्मला. याचा बाप सैन्यांतील अधिकारी असून पीरिनीज, आल्प्स व वान्डेन्डी, येथें तो मुख्य सेनापति होता. नेपोलियननें ईजिप्तमध्यें स्वारी केली त्यावेळीं नेपोलियनची याजवरील मर्जी उडाली. ज्यावेळीं सेनापति डयूमास मरण पावला त्यावेळीं अलेक्झांडर हा ( कादंबरीकार ) अवघा चार वर्षांचा होता. याला एका धर्मोपदेशकाकडून शिक्षण मिळालें व तो स्थानिक सॉलिसिटरचें काम करूं लागला. १८२३ सालीं तो पॅरिस येथें गेला व तेथेंच राहण्याचें त्याचें ठरल्यावरून ऑर्लीन्सच्या डयूकच्या येथें तो नोकर राहिला. इ. स. १८२४ मध्यें याला मुलगा झाला. तोहि पुढें कादंबरीकार म्हणून प्रसिद्धीस आला. 'ला चेसिएट लामूर' या नांवाचें पहिलें पुस्तक डयूमानें लिहिलें व क्रिस्टाइन नांवाचें नाटक रचलें. यानंतर त्यानें तिसरा हेनरी नांवाचें नाटक रचलें. पण यापूर्वीच त्याला आपली नोकरी सोडावी लागली. इसवी स. १८३० च्या राज्यक्रांतीमुळें डयूमासचें लक्ष कांहीं काळ राजकारणाकडे वळलें. यानंतर त्यानें नेपोलियन बोनापार्ट, ॲन्टनी वगैरे नाटकें लिहिलीं. व १८४९ सालापर्यंत त्यानें २० हून अधिक नाटकें लिहिलीं. १८४० सालीं यानें इडाफेरिअर नांवाच्या स्त्रीशीं लग्न झालें. कादंबऱ्या लिहिण्यास लागण्यापूर्वी

प्रारंभीं लहान गोष्टी लिहिण्यास सुरुवात केली. १८३९ सालीं त्यानें मॅकेच्या मदतीनें कादंबऱ्या लिहिण्यास सुरुवात केली.

फ्रेंच राष्ट्राचा इतिहास अनेक कादंबऱ्यांच्या रूपानें लोकांपुढें मांडण्याची हिम्मत बाळगून त्यानें कादंबऱ्यामागून कादंबऱ्यांची झोड उठवून दिली. १८४४ सालीं 'ला ट्रायमस्केटेयर' ही प्रसिद्ध कादंबरी प्रसिद्ध केली. या तीन शिलेदारांची साहसें व इतर आनुषंगिक प्रसंगांत त्यावेळची वस्तुस्थिति उत्तम रेखाटली आहे. या कादंबऱ्यांमुळें इंग्लंड व फ्रान्समध्यें त्याची फार प्रसिद्धि झाली.स.१८४४च्या सुमारास त्यानें 'ला कौंट द मॉंटे क्रिस्तो' ही अद्भुत कादंबरी बारा भागांत प्रसिद्ध केली होहि कादंबरी अतिशय सुंदर आहे नंतर चौथ्या हेनरीवर 'ला रीनी मागो' व तिसऱ्या हेनरीवर 'ला डेम द मान्सारो' (८ भाग) या कादंबऱ्या लिहिल्या. उधळपट्टीची सवय असल्यामुळें डयूमाला वाढविलेला खर्च भागविण्याकरितां व कर्ज फेडण्याकरितां वृद्धापकाळीं अत्यन्त परिश्रम करावे लागले. त्यानें इमारती बांधण्याच्या कामीं अतोनात पैसा खर्च केला व त्यामुळें त्याला अतिशय कर्ज झालें. याचीं मतें क्रांतिकारक पक्षाचीं होतीं. सन १८५३ सालीं त्यानें एक दैनिक पत्र पॅरिस येथें काढलें. यानंतर १८५७ सालीं त्यानें साप्ताहिक पत्र काढलें. १८६० सालीं ड्यूमानें रशियांतून कॅकेशसकडे प्रवास केला व सिसिलीमध्यें तो गॅरिबाल्डीस जाऊन मिळाला. नेपल्समध्यें चार वर्षे राहून तो पॅरिसला परत आला. या उतारवयांत त्याला सावकाराकडून अतिशय त्रास झाला. शेवटीं त्याच्या मुलीनें त्याला कर्जातून मुक्त केलें. हा ता. ५ डिसेंबर १८७० रोजीं मरण पावला.

**डयूमा अलेक्झान्डर** (१८२४-१८९५)—ता. २७ जुलै इ. स. १८२४ रोजीं पॅरिस येथें हा फ्रेंच कादंबरीकार व नाटककार जन्मास आला. त्याच्या आईनें अत्यंत मेहनत घेऊन त्याला वाढविला. हा अलेक्झांडर डयूमाचा दासीपुत्र (अनौरस मुलगा) होता. आपल्या बापाच्या सहवासांत पॅरिसमधील चालीरीतींचें व मनुष्यस्वभावाचें यथार्थ ज्ञान त्याला सहजच प्राप्त झालें. आपल्या बापाची संपत्ति अतिशय आहे तेव्हां आपणांस पैशाची उणीव भासणार नाहीं अशी पुष्कळ दिवस त्याची समजूत होती. पण ती निखालस खोटी ठरली व शेवटीं त्याला लेखकाचा धंदा स्वीकारावा लागला. व तो जात्या तरतरीत बुद्धीचा असल्यानें या धंद्यांत पुढें येण्यास त्याला वेळ लागला नाहीं. स. १८४७ सालीं त्यानें 'पेशे द जूनेसे' हा छोटासा काव्यसंग्रह प्रसिद्ध केला. १८४८ सालीं त्यानें ला डेम ऑक्स कॅमेलिआस नांवाची तत्कालीन समाजस्थितिदर्शक कादंबरी लिहिली व ती कादंबरी बरीच लोकप्रिय झाली. त्यामुळें उत्तेजन येऊन त्यानें १८४८ मध्यें 'ला रोमन डूने फेमे' १८५१ मध्यें 'द यानें द लीस' या कादंबऱ्या लिहिल्या. पुढें त्यानें आपली पहिली कादंबरी 'ला डेम ऑक्स कॅमेलि' हिला नाटकाचा पेहराव चढविला. पण त्यावेळीं मुद्रणस्वातंत्र्याचा अभाव असल्यामुळें बरेच दिवस त्याला तें नाटक रंगभूमीवर आणण्याला परवानगी मिळाली नाहीं. पण एकदोन वर्षांनंतर त्याला परवानगी मिळून त्याचे प्रयोगहि झाले व ते अत्यंत यशस्वी ठरले. प्रतिभादि गुणांपेक्षां नटाला आपलें कौशल्य दाखविण्याला या नाटकांत संधि असल्यामुळेंच या नाटकाला यश प्राप्त झालें. याशिवाय 'डायना डी लायस, ला क्श्वन डार्जेन्ट वगैरे याचीं प्रमुख नाटकें आहेत. या सर्व पुस्तकांत वाजवीपेक्षां फाजील उपदेश करण्याची ग्रंथकाराची हाव दृग्गोचर होते. विशेषतः स्त्रीवर्गासंबंधीच्या बाबतींत पुरुषवर्गानें वर्तन कसें असावें यासंबंधीचा उपदेश त्याच्या ग्रंथांत दिसून येतो. 'ला फेमे द क्लाड' या कादंबरींत त्यानें व्यभिचारी पत्नीला नवऱ्यानें ठार मारण्यास हरकत नाहीं असें म्हटलें आहे. हा उच्च प्रतीचा नाटककार होऊन गेला. त्याची भाषा उत्तम व जुन्या वळणाची व विनोदपूर्ण आहे. ता. ३० जानेवारी १८७४ सालीं फ्रेंच ॲकेडमींमध्यें याची निवडणूक झाली. डयूमा हा ता. २७ नोव्हेंबर १८९५ रोजीं मरण पावला.

**ड्यूरर आल्ब्रेक्ट** (१४७१-१५२८)—एक सुप्रसिद्ध खोदकलाभिज्ञ (एन्ग्रेव्हर). हा नूरेंबर्ग येथें जन्मला. याचा बापहि खोदकामांत कसबी मनुष्य होता. त्यानें आल्ब्रेक्टला प्रथम सोनाराचें काम करण्यास लावलें पण तिकडे आपल्या मुलाचें लक्ष नसून चित्रकलेकडे कल आहे असें त्याला आढळून येतांच त्यानें आल्ब्रेक्टला त्या गांवच्या वोल्गेमट नांवाच्या सुप्रसिद्ध चित्रकलाभिज्ञाकडे उमेदवार म्हणून ठेवलें. उमेदवार असतांना ड्यूररला चित्रकलेचें व नक्षीकामाचेंहि बरेंच ज्ञान मिळालें. १४९० सालीं तो तत्कालीन पद्धतीला अनुसरून प्रवासास निघाला. जर्मनीच्या सर्व भागांतून प्रवास करीत करीत कोलमर येथें शौंगूर या सुप्रसिद्ध चित्रकारापाशीं शिक्षण घेण्याच्या निमित्तानें तो आला पण तेथें येतांच त्याला शौंगूर मेल्याची बातमी समजली. पण शौंगूरच्या भावांनीं त्याला आपल्यापाशीं ठेवून घेऊन धातूखोदकाम व लांकडावरील नक्षी कोरण्याचें काम शिकविलें. आल्ब्रेक्टनें या सुमारास 'सेंट जेरोम' चें लांकडामध्यें कोरलेलें चित्र अद्यापि बेसेल येथील अजबखान्यांत पहावयास सांपडतें. १४९४ सालीं तो नूरेंबर्गला परत आला. प्रवासामध्यें असतांना त्यानें आपलें स्वतःचें चित्र, घोडेस्वार, एका तरुणाचा शिरच्छेद करणारा मांग, बालख्रिस्त, नग्न स्त्री, इत्यादि बरींच चित्रें काढलीं. या चित्रांमध्यें शौंगूरच्या चित्रकलापद्धतीची छाया दृग्गोचर होते. बाह्यरूपरेषा व छाया (शेडिंग) या बाबतींत तो अतिशय दक्षता बाळगीत असे हें या चित्रावरून आढळून येतें.

नूरेंबर्ग येथें आल्यावर त्याचा ॲग्नीस फ्रे नांवाच्या कुमारिकेशीं विवाह झाला. नंतर कांहीं दिवसांनीं तो चित्रकलेचें ज्ञान संपादन करण्याकरतां इटलीस गेला. इटलीमध्यें

असतांना व प्रवासांतहि त्यानें कांहीं व्यक्तींचीं चित्रें, टिरोल व ट्रेंटीनो येथील घांटांतील देखाव्यांचीं चित्रें. व्हेनिसमधील वेश्यांचीं चित्रें, इत्यादि बरेंच नक्षीकाम केलें. तो इटलींत सुमारें एक वर्ष होता. पंधराव्या शतकाच्या शेवटच्या काळांत जर्मनीमध्यें पुनरुज्जीवनाची चळवळ चालू झाली होती. सन १४९५ च्या सुमारास तो नूरेंबर्ग येथें परत आला. या बौद्धिक व नैतिक विकासाच्या कालांत आल्ब्रेक्ट याला आपली करामत दाखविण्याला पुष्कळच अवसर सांपडला. नूरेंबर्ग हें तर जर्मनींतील महत्त्वाचें व्यापारी केंद्र होतें. त्या ठिकाणीं आल्ब्रेक्टनें, थोडक्याच दिवसांत आपलें चांगलें वस्तान बसाविलें. हार्टमन होडेल,कोनरॅड,सेल्टिस इत्यादि नवीन विचारांच्या लोकांच्या सहवासांत 'पुनरुज्जीवन चळवळींतील' मुख्य तत्त्वांचें त्याला ज्ञान झालें होतें व त्यांचा त्याच्या मनावर पगडा बसला होता. पण त्याच्या उलट त्याच्या भोंवतालचें वातावरण व तो ज्या परिस्थितींत वाढला ती परिस्थिति जुनीपुराणी होती. यामुळें त्याच्या चित्रांत या दोन तत्त्वांचें मिश्रण झालेलें दिसून येतें. या पुनरुज्जीवनाच्या काळांत त्यानें विशेषतः लांकडांवर चित्रें कोरण्याचें काम मुख्यतः केलें. भविष्योद्‌दोधना( ॲपोकॅलिप्स ) संबंधींची चित्रकला त्यानें काढून सत्संबंधाचीं १६ चित्रें काढिलीं. या चित्रांमध्यें गॉथिक चित्रकलापद्धति, व नूतन पद्धति यांचें मिश्रण झालेलें आढळतें. यानंतर, 'ग्रेट पॅशन' 'होली फॅमिली' व 'व्हर्जिन' इत्यादि धार्मिक प्रसंगांवरचीं त्यानें कोरलेलीं चित्रेंहि उत्तम साधलीं आहेत.

जाड तांब्यावर चित्रें कोरण्याच्या कलेचाहि त्यानें आस्थेनें अभ्यास चालविला होता व त्यांत त्याला यशहि येत चाललें होतें. लांकडावर तो वाटेल तशीं अवघड चित्रें कोरीत असे पण तांब्यावर मात्र तो प्रथम प्रथम अगदीं साधीं व अप्रसिद्ध व्यक्तींचीं चित्रें काढीत असे. १५०३सालीं त्यानें 'नेमेसिस'चें नग्नस्थितींतील चित्र काढलें आहे व तें उत्कृष्ट साधलें आहे. जर्मन बायकांमध्यें दिसून येणारा पुरुषीपणा, शरीराची पिळदार बांधणी, वगैरे गोष्टी या चित्रांत दिसून येतात. 'अॅडम ॲंड ईव्ह' या चित्रांत त्यानें आपलें सारें कौशल्य खर्च केलें आहे. या चित्रांतील छाया अरण्याची दाखविली असून ती फारच मोहक आहे. शिवाय 'नेटिव्हिटी', 'लिटल् हॉर्स', 'ग्रेट हॉर्स' इत्यादि चित्रेंहि सुरेख आहेत. १५००–१५०५ या काळांतील ड्यूररचीं चित्रें चांगलीं आहेत. तथापि त्यांत प्रमाणबद्धता, साधेपणा व कल्पकता प्रामुख्यानें दिसून येत नसून बाह्य भपकेपणाकडेच अधिक कल दिसून येतो.

१५०५ सालीं ड्यूरर हा इटलीला गेला. तेथील जर्मन रहिवाश्यांकडून त्याला सेंट बार्थोलोम्यूच्या प्रार्थनामंदिरासाठीं एक चित्र काढण्याचें काम मिळालें. हें चित्र 'फीस्ट ऑफ रोज गार्लंड्स' या नांवानें प्रसिद्ध आहे. यांतील रंग तर इतके सुंदर भरलेले होते कीं, त्यामुळें इटलींतील नामांकित चित्रकलाभिज्ञांनीं देखील तोंडांत बोटें घातलीं. याशिवाय व्हेनीसमध्यें असतांना 'ख्राइस्ट क्रूसिफाईड', 'दि व्हर्जिन ॲंड दि चाइल्ड वुइथ गोल्डफिंच' वगैरे चित्रें काढलीं, व त्यामुळें इटलींत त्याचा सर्वत्र बोलबाला झाला, एवढेंच नव्हे तर यूरोपभर त्याची प्रसिद्धि झाली. रफायलसारखे त्याच्या धंद्यांतील उत्कृष्ट चित्रकार त्याला मान देऊं लागले. अमीरउमराव व यूरोपमधील राजे लोक यांनांहि त्यानें वेड लावलें.

१५०७–१५११ सालच्या दरम्यानच्या काळांत त्यानें 'अॅडम ॲंड ईव्ह', 'व्हर्जिन वुइथ दि इरिस', 'मॅसॅकर ऑफ टेन थाउझंड', 'मार्टर्स ऑफ निकोमीडिया' इत्यादि चित्रें रंगविलीं. १५१२ सालीं 'लिटल पॅशन' या विषयासंबंधीं १५ चित्रें त्यानें तांब्यामध्यें कोरलीं. १५१३–१४ सालीं 'दि नाइट ॲंड डेथ', 'मेलंकोलिया', 'सेंट जेरोम इन हिज स्टडी' हीं चित्रें तांब्यावर कोरलीं. 'नाइट ॲंड डेथ' या चित्रांतील घोड्याचें चित्र चांगलें वठलें आहे. १५१९ सालीं त्यानें जर्मन बादशहाच्या प्रार्थनाबुकाच्या प्रत्येक पानावर सुंदर व विविध प्रकारचें चित्र काढून दिलें. १५२० सालीं तो नेदर्लंडमध्यें गेला व तेथें असतांना त्यानें पुष्कळ चित्रें काढलीं. नंतर तो नुरेंबर्गला परत आला. १५२१–२४ सालांच्या अवधींत त्यानें 'लॅमेंटेशन ओव्हर दि बॉडी ऑफ ख्राइस्ट', 'अॅडोरेशन ऑफ दि किंग्स', 'मार्च टु कॅव्हलरी' हीं चित्रें काढलीं. हीं सर्व चित्रें धार्मिक स्वरूपाचीं आहेत. चित्रकलेच्या बरोबर त्यानें इतरहि विषयांचा अभ्यास केला होता. 'जॉमिट्री ॲंड पर्स्पेक्टिव्ह', 'ह्यूमन प्रपोर्शन', 'फॉर्टिफिकेशन' इत्यादि पुस्तकें त्यानें लिहिलीं. याशिवाय त्याचीं पत्रें व लिखाणहि पुष्कळच आहे. ड्यूररनें काढलेल्या चित्रांचा संग्रह व्हिएन्ना येथील आल्बर्टिना म्यूझियममध्यें तसेंच बर्लिन व ब्रिटिश म्यूझियममध्यें करण्यांत आला आहे.

**ड्रायडन, जॉन**—ड्रायडन या इंग्लिश कवीचा जन्म स. १६३१त झाला. त्याचें लहानपणचें शिक्षण त्याच्या उच्च कुलाला साजेसेंच झालें होतें. सन १६५७ मध्यें विद्यालयांतील शिक्षण संपवून तो लंडन येथें राहावयास आला. ऑलिव्हर क्रॉमवेलवर रचलेल्या वीररसपूर्ण काव्यामुळें त्याची कवि अशी पहिल्यानें प्रसिद्धि झाली. सुरवातीच्या कविता या त्याची मेहनत, चिकाटी व विद्याव्यासंग यांची चांगली साक्ष देतात. प्राप्ति अपुरी असल्यामुळें द्रव्यार्जनाकरितां लेखनाचा उपयोग करणें त्याला भाग पडलें. शोकपर्यवसायी नाटकें लिहिण्याकडे त्याचा कल असतांहि तत्कालिन लोकप्रिय अशीं आनंदपर्यवसायी नाटकें प्रथम त्याला लिहावीं लागलीं, परंतु त्यांत त्याला फारसें यश आलें नाहीं. परंतु पुढें वस्तुस्थिति प्रतिकूल असतांहि वीररसप्रधान शोकपर्य-

नाटकांची अभिरुचि त्यानें समाजांत उत्पन्न केली. 'दि इंडियन क्वीन' व दि 'इंडियन एम्परर' या नांवाचे दोन खेळ लवकरच लोकप्रिय झाले. या नाटकांतून हिंदुस्तानांतील देखावे व भूमिका असल्यामुळें लोकांनां त्यांत बरेंच नावीन्य वाटलें. ड्रायडनच्या पुस्तकांतील विनोद मर्यादित नसत. त्याच्या विनोदांतून नवशिक्याचा अडाणीपणा व बेताल बीभत्सपणा आढळतो. यानें लिहिलेलें 'ऑल फॉर लव्ह' हें नाटक शेक्सपियरच्या 'अँन्टोनी अँड क्लिओपाट्रा' याचें रूपांतर आहे. तरी पण ड्रायडनच्या नाटकांतील नायक व नायिका यांचें परस्परांवरील प्रेम शेक्सपिअरच्या नाटकापेक्षां फारच निस्सीम तन्हेंचें दाखविलें आहे व यामुळें नाटकाचें नांव व कथानक यांची जोड चांगलीच जमली आहे.

ड्रायडनचें दुसरें चांगलें नाटक म्हटलें म्हणजे ' डॉन सेबास्टीयन ' हें आहे. ' ऑल फॉर लव्ह ' या नाटकापेक्षां यांतील कथानक जरा जास्त भानगडीचें असून त्यांत वीररसहि अधिक आहे. मनोविकार व आवेश या गोष्टींत या नाटकाचें ' दि इंडियन एम्परर ' शीं बरेंच साम्य आहे. १६८१ सालीं दुसरा चार्लस् याच्या विरुद्ध बंडफितुरी केल्यावरून शाफ्टस्बरीवर खटला करण्यांत आला त्यावेळीं ड्रायडनूनें राजाची बाजू घेऊन उपहासात्मक लेख लिहिण्यास सुरवात केली व त्याच सालीं त्यानें ' दि स्पॅनिश फ्रायर ' नांवाच्या पुस्तकांत रोमन कॅथोलिक धर्मोपदेशकांचा उपहास करून लोकांची मर्जी संपादिली. वस्तुस्थित्यात्मक नाटकें लिहिण्याचा छंद ड्रायडनला फार नव्हता. त्याला नवीन कथानकें रचण्याची कला व स्वतःसंबंधानें सहानुभूति उत्पन्न करण्याची विद्या अवगत नव्हती. त्याचे ग्रंथ कोणत्याना कोणत्यातरी जुन्या ग्रंथाच्या आधारावर लिहिलेले आहेत. मिल्टन, फुल्लर व ब्रॉऊन यांच्यासारखी श्रमसाधित परंतु जास्त समगतिक भाषा वापरण्याच्या ऐवजीं व्यवहारोपयोगी व छंदानुरोधी भाषा वापरण्याचा प्रघात ड्रायडनपासूनच सुरू झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. हा कवि १७०० सालीं मरण पावला. मरणाच्या पूर्वी बरेच दिवस हा इंग्लंडच्या दरबारचा राजकवि होता.

**ड्रॉयसन** ( १८०८-१८८४ )—जोहान गुस्टव्ह ड्रॉयसन हा जर्मनींतील एक मोठा इतिहासकार होऊन गेला. याचा जन्म ६ जुलै १८०८ रोजीं ट्रिप्टो येथें झाला. याचा बाप सैन्यामध्यें उपाध्यायाचें काम करीत होता. यामुळें लहानपणींच त्याला "स्वातंत्र्ययुद्धा"मध्यें चाललेल्या सैन्यांच्या चकमकी व हालचाली पहावयास मिळाल्या आणि अशा तऱ्हेनें त्याच्या अंतःकरणांत प्रशियाबद्दल प्रेमभाव उत्पन्न झाला. त्याचें सर्व शिक्षण स्टेटिन येथें व बर्लिन विश्वविद्यालयांत झालें. स. १८२९ त तो बर्लिनमधील ग्रेन क्लोस्टर येथें शिक्षक झाला. स. १८४० त कील येथें त्याला इतिहासविषयाचा अध्यापक नेमिलें. त्यानें त्यावेळीं उपस्थित झालेल्या राजकीय चळवळीच्या वेळीं डेन्मार्कविरुद्ध डचांची बाजू चांगली उचलून धरिली. स. १८४८ त फ्रॅन्कफोर्टच्या पार्लमेंटचा तो सभासद निवडून आला. स. १८५१ नंतर त्याला कील येथें राहणें अशक्य वाटूं लागलें. नंतर त्याला येना येथें प्रोफेसर नेमण्यांत आलें. स. १८५९ मध्यें तो बर्लिन येथें गेला. तो मरेपर्यंत तेथेंच होता. १९ जून स. १८८४ रोजीं तो मृत्यु पावला. त्याच्या ग्रंथांमध्यें अलेक्झांडरचा इतिहास, प्रशिया, डेन्मार्क व श्लेस्विग होल्स्टेन यांच्या संबंधीचा इतिहास हे प्रमुख आहेत.

**ड्रेस्डेन**—हें बर्लिनच्या दक्षिणेस रेल्वेनें १११ मैल असलेलें जर्मनींतील सॅक्सनीच्या राजधानीचें शहर एल्ब नदीच्या दोन्ही किनाऱ्यावर वसलेलें असून, त्यापैकीं डाव्या बाजूस कसबा व उजव्या बाजूस नवें शहर आहे. नदीवर पांच सुंदर पूल बांधून हीं दोन्हीं शहरें एकमेकांस जोडलेलीं आहेत. जुन्या शहरांतील सडका अरुंद व वाईट आहेत, परंतु नवीन शहरातील सडका रुंद असून पद्धतशीर बांधलेल्या आहेत. मनोहर नगररचना व अनेक प्रेक्षणीय स्थळें यांमुळें ड्रेस्डेन शहरास पुष्कळ वेळां जर्मन फ्लारेन्स असें म्हणतात. कलाकौशल्याची समृद्धि, शिक्षणाच्या सोयी व भोंवतालचा रम्य प्रदेश यांनां लुब्ध होऊन पुष्कळ सुखवस्तू लोक येथें येऊन राहतात. येथें आस्ट्रो-हंगेरियन, रशियन, इंग्लिश, अमेरिकन इत्यादि अन्यदेशीय लोकांची बरीच वस्ती आहे. लोकसंख्या ( १९०५ ) ५,१५,९९६. येथील राजघराणें जरी रोमनकॅथॉलिक धर्माचें आहे, तरी शहरांतील बरेच लोक प्रॉटेस्टंट धर्माचे अनुयायी आहेत. इकडील लोकांस हिंदुस्थान अमेरिकेंत आहे कीं आशियांत आहे एवढेंहि ज्ञान नाहीं. या शहरांतील विजेच्या ट्रामगाड्यांत दैनिक वर्तमानपत्राचा एकएक अंक लोकांनां वाचण्याकरितां मोफत ठेवण्याची तऱ्हा ड्रेसडेनशिवाय दुसरीकडे कोठें फारशी पाहण्यांत येत नाहीं. जर्मनींतील लोक डोक्यावर केस फार वाढवून त्यांत भांग पाडीत नाहींत, तर सर्व केस कातरून ते आठ दहा दिवसांची हजामत वाढल्याप्रमाणें अगदीं खुरटे करून ठेवतात. असें केल्यानें मनुष्याचा मेंदु शांत व थंड राहतो असें तेथील डाक्टरांचें मत आहे.

ड्रेस्डेन शहराची बहुतेक वाढ १९ व्या शतकांतील अखेरच्या २० वर्षांत झाली असून आतां तें जर्मनींतील व्यापारांत व उद्योगधंद्यांत प्रमुख असलेल्या शहरांत गणलें जातें. हल्लीं कसब्याचें मध्ययुगीन स्वरूप फार नाहींसें झालें असून सर्वत्र आधुनिक इमारती दृष्टीस पडतात. जुन्या शहरांतील चौकांपैकीं एकांत शिलिंगनें केलेला जॉन राजाचा अश्वारोही पुतळा आहे; व एकांत १८७०-७१ सालच्या युद्धाचें स्मारक आहे. नव्या शहरांतील बाजारचौकांत आगस्टस-दि-स्ट्राँगचा एक ब्राँझ धातूचा अश्वारोही पुतळा पहावयास सांपडतो. येथें कलाकौशल्याचीं कामें असलेलीं, रोमनकॅथॉलिक व प्राटेस्टंट धर्माचीं देवळें अनेक आहेत. इतर इमारतींपैकीं बहुतेक प्रेक्षणीय

इमारती जुन्या शहरांत नदीच्या काठीं आहेत. त्यांपैकीं राजवाडा ही फारच भव्य व सुंदर इमारत आहे. हिच्या खालून गाड्याघोड्यांच्या रहदारीचा राजमार्ग जात असून वर ३८७ फूट उंचीचें उत्तुंग शिखर आहे. नव्या शहरांत जपानी राजमहाल आहे. हा कांहीं पौरस्त्य आकृतींनीं सुशोभित केलेला असल्यामुळें याला वरील नांव मिळालें आहे. अल्बर्टिनम येथें पूर्वी शस्त्रागार होतें; परंतु ती इमारत पुन्हां बांधून काढून त्या ठिकाणीं आतां पौरस्त्य व सर्वोत्कृष्ट पुरातन वस्तूंचा अजबखाना केला आहे. सरकारी जुने लेखहि येथेंच ठेवलेले असतात. येथें जीं अनेक सार्वजनिक स्मारकें उभारलेलीं आहेत; त्यांत सहल करण्याच्या मार्गावर बिस्मार्कचा एक पुतळा आहे.

ड्रेस्डेनचा एवढा नांवलौकिक होण्याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे येथें असलेला कलाकौशल्याच्या, साहित्याच्या व शास्त्रीय वस्तूंचा प्रचंड संग्रह होय. यांत पहिली जागा अजबखान्यांत असलेल्या चित्रांच्या दिवाणखाण्यास दिली पाहिजे. येथें २५०० चित्रें असून त्यांत इटालियन, डच व फ्लेमिश चित्रकलांचे उत्कृष्ट मासले आहेत. याशिवाय त्या अजबखान्यांत नक्षीकामांचा संग्रह आहे; त्यांत वर्गीकरण करून ठेवलेले चार लक्षांच्या वर नमुने आहेत येथें ओतकामाचा जो संग्रह आहे, तो अशा रितीनें मांडून ठेवला आहे कीं, तो पाहून ईजिप्शियन व असीरियन कालापासून आतांपावेतों त्या कलेची वाढ कशी कशी होत गेली हें प्रेक्षकांच्या सहज ध्यानांत यावें. 'जपानी राजमहालांत' सार्वजनिक ग्रंथसंग्रहालय आहे. त्यांत ४ लक्ष पुस्तकें, ३००० हस्तलेख व २०००० नकाशे आहेत. येथें ग्रीक व लॅटिन भाषेंतील उत्तम उत्तम प्राचीन ग्रंथ, वाङ्मयाच्या इतिहासावरील ग्रंथ, व जर्मनी, पोलंड व फ्रान्स यांच्या इतिहासावरील ग्रंथ पुष्कळ आहेत. या महालांत मोती, जवाहीर, व सोनें, रुपें, अंबर आणि हस्तिदंत यांवरील कलाकौशल्याचीं कामें, यांचा जसा संग्रह आहे तसा पृथ्वीवर अन्य कोठेंहि नाहीं. याशिवाय येथें नाण्यांचा व ऐतिहासिकदृष्टया महत्वाच्या पुरातन शस्त्रास्त्रांचाहि संग्रह केला आहे.

या ठिकाणीं सुप्रसिद्ध अशा कित्येक शास्त्रीय मंडळ्या असून निरनिराळ्या प्रकारच्या पुष्कळ शिक्षणसंस्था आहेत. त्यांत कलाभुवन, गुरांच्या रोगांचें अध्ययन करण्याकरितां कॉलेज, अर्थशास्त्राची संस्था, गृहशिल्पशास्त्राची शाळा, संगीतकलांचें शिक्षण देण्याकरितां शाळा इत्यादिकांचा समावेश होतो.

ड्रेस्डेन हें लोहमार्गांचें एक केंद्रस्थान असून येथून उत्तर व मध्य जर्मनीच्या, आस्ट्रियाच्या किंवा पूर्वेच्या कोणत्याहि शहराशीं दळणवळण ठेवतां येतें. बर्लिनहून व्हिएन्नाकडे जाणारा मुख्य लोहमार्ग या शहरावरूनच जातो. याशिवाय एल्ब नदींतून बोहीमिया व मॅगडेबर्ग-हॅम्बर्गशीं आगबोटीनें व्यापार चालतो. चिनी मातीचीं भांडीं, सोन्यारुप्याचे दागिने, सिगारेट, चाकोलेट, रंगीत पोस्टकार्डें, सुगंधी सामान, गवती विणकाम, कृत्रिम फुलें, शेतकी आउतें, कागद, फोटोग्राफीचें सामान व शास्त्रीय उपकरणीं हे येथील मुख्य मुख्य उद्योगधंदे आहेत.

हें शहर १२०६ सालच्या पूर्वीपासून अस्तित्वांत आहे. परंतु १८ व्या शतकाच्या पूर्वार्धापासूनच याला हल्लींचें स्वरूप थोडें थोडें येऊं लागलें. हें पूर्वी एल्ब नदीच्या उजव्या किनाऱ्यावर वसलेलें होतें. परंतु स. १४९१ त आग लागून या शहराची राखरांगोळी झाल्यामुळें तें पुन्हां वसवावें लागलें. १५ व्या शतकांत याला तटबंदी केली. 'सात वर्षांच्या' युद्धांत यावर कुलपी गोळ्यांचा भडिमार केला गेल्यामुळें याचें बरेंच नुकसान झालें. पुन्हां स. १८१३ त या शहराजवळ दोस्तांची व फ्रेंचांची लढाई झाली. नेपोलियनला जे मोठमोठे विजय मिळाले त्यांतील हा शेवटलाच होता. ही लढाई दोन दिवस चालली होती. यावेळीं दोस्तांकडे २ लक्ष, व फ्रेंचांकडे ९६००० फौज होती. या लढाईंत फ्रेंचांचे १०००० लोक मेले. दोस्ताकडील मेलेल्यांची, जखमी झालेल्यांची व कैदी झालेल्यांची संख्या ३८००० होती. फ्रेंचांच्या हातीं लागल्यावर त्यांनीं या शहराची तटबंदी पाडून टाकली. १८४९ सालच्या राज्यक्रांतींतहि याचें बरेंच नुकसान झालें. हें स. १८६६ त प्रशियनांनीं घेतलें, पण पुढें लवकरच त्यांनीं तें सोडून दिलें.

१९१९ सालच्या खानेसुमारींत ड्रेस्डेनची लोकसंख्या ५२९३२६ होती. महायुद्धांत जर्मनींतील इतर कोणत्याहि शहरांपेक्षां ड्रेस्डेन शहराचें अतिशय नुकसान झालें. ड्रेस्डेन हें ललितकलांचें माहेरघर असल्याकारणानें, विलासी वस्तूंचें तें प्रदर्शनगृह असल्याकारणानें तेथें दररोज परदेशीय पाहुणेमंडळी येत असत; व वाटेल तसा पैसा खर्च करीत असत, पण महायुद्ध सुरू झाल्यानंतर पाहुण्यांची संख्या नाहींशीच झाली. त्यामुळें तेथील वस्तूंचा खप नाहींसा झाला व अर्थातच ड्रेस्डेनची आर्थिक परिस्थिति खालावली. पुढें जर्मनींत ज्या वेळीं राज्यक्रांति घडून आली त्यावेळीं ड्रेस्डेनमध्यें कामगार लोकांत जहाल मतांचा प्रसार जारीनें झाला व त्यामुळें जहाल व नेमस्तांमध्यें दररोज खटके उडूं लागले. बंडखोर लोकांनीं खून जाळपोळ इत्यादि प्रकारास सुरवात केली. युद्धमंत्री न्यूरिंग याचा खून झाल्यामुळें तर सर्वत्र हाहाःकार उडाला. १९१४ सालापासून पुढें ड्रेस्डेन शहर विस्तृत करण्याची कल्पना विराम पावली. त्यामुळें घरें भाड्यानें मिळण्याचीहि टंचाई पडूं लागली. ड्रेस्डेनमधील म्युनिसिपालिटींत जहाल लोकांचें प्राबल्य असल्यामुळें नगरविस्ताराची कल्पना लवकर रुजण्याचा संभव नाहींसा झाला. सिगारेट तयार करण्याचा धंदा महायुद्धांत पूर्णपणें बसला. तरी पण हल्लीं तो पुन्हां सुरू झाला. ड्रेस्डेन येथील सर्व वस्तुसंग्रहालयें प्रेक्षणीय आहेत.

**ड्रोघेडा**—हें आयर्लंडांतील दक्षिण पार्लमेंटरी विभागांतील लाउथ परगण्याचें दक्षिण सरहद्दीवरच्या प…र शहर, बंदर व म्युनिसिपालिटीचें बरो. बॉयने नदीवर,

उपसागरांतील या नदीच्या मुखापासून सुमारें ४ मैल वरच्या बाजूस वसलें आहे. हें शहर ग्रेट नार्दर्न रेल्वेवर डब्लिनच्या वायव्येकडे ३१½ मैलांवर आहे. येथील लोकसंख्या ( १९०१ ) १२७६० होती. प्राचीन तटबंदीचे आतां फक्त सेंट लारेन्स व बटलर गेट या वेशींचे अवशेष आढळतात. डॉमिनिकन मठांत आर्चबिशप आलिव्हर प्लन्केट याचें शिर अद्याप राखून ठेवलें आहे. या निरपराधी मनुष्यास १६८१ सालीं टायबर्न येथें राजद्रोहाच्या अपराधावरून फांसावर चढविण्यांत आलें होतें.

येथें डॉमिनिक, फ्रान्सिस, ऑगस्टाइन, कार्मेलाइट पंथांचे व सेंट जॉनच्या अनुयायांचे मठ आहेत, तसेंच इरास्मस स्मिथ यानें स्थापन केलेली उत्कृष्ट शाळा आहे. येथील राजमार्गांत बेंजामिन व्हाइटवर्थ एम्. पी. या दानशूर पुरुषाचा पुतळा आहे. येथें साधें तागाचें कापड विणण्याचे कारखाने, दळण्याची चक्की, कातडें कमविण्याचे, मीठ आणि साबू तसेंच दारू, रसायनें व यंत्रकला वगैरेंचे कारखाने आहेत. येथें सालमन मासे धरण्याचें मुख्य ठाणें आहे. येथें लिव्हरपूल व ग्लासगो या शहरांशीं फार करून शेतकीच्या उत्पन्नाचा व्यापार चालतो. एक मेयर, ६ आल्डरमेन व १८ कौन्सिलर्स मिळून ह्या शहरचा कारभार पहातात.

या शहराला पूर्वी इन्व्हर कॉलपा किंवा कॉलपाचें बंदर असें म्हणत असत. १२२४ सालीं ड्रोघेडा येथें डॉमिनिकन मठ स्थापन करण्यांत आला. या शहराच्या दोन्ही कार्पोरेशन एकत्र करण्याबद्दल स.१४१२ च्या नोव्हेंबरमध्यें ४थ्या हेनरीनें सनद दिली. ३ऱ्या एडवर्डच्या वेळीं डब्लिन, वाटरफर्ड वगैरे प्रमाणेंच आंग्ल लोकांस या शहराचें महत्त्व वाटत होतें. ओनील व ओडोनेल इतर अल्स्टरलिन्स्टरचा संस्थानिक २ रा रिचर्ड यास डॉमिनिकन मठांत शरण आले. १४९५ सालीं या शहरांत पार्लमेंटनें पॉयनिंगचा कायदा पास झाला. १६४९ सालीं क्रॉमवेल यानें हें शहर हस्तगत करून येथील लोकांची सरसकट कत्तल उडविली. त्यांपैकीं पळालेल्या ३० जणांस बार्बाडोस येथें गुलाम करून पाठविलें. १८८५ व १८९८ सालीं या शहराचा पार्लमेंटमध्यें प्रतिनिधि पाठविण्याचा व काउन्टीचा हक्क काढून घेण्यांत आला. स. १८८५ पूर्वी व १८०० पूर्वी येथून अनुक्रमें १ व ४ प्रतिनिधी आयर्लंडच्या पार्लमेंटमध्यें निवडून जात असत. १४१७ सालापासून पुढें आयर्लंडच्या आर्चबिशपचें राहण्याचें ठिकाण आहे.

**ड्विन्स्क**—पश्चिम रशियांत असलेल्या ड्युनाबर्ग नांवाच्या किल्ल्याला व शहराला स.१८९३ पासून ड्विन्स्क असें म्हणतात. हें शहर ड्विना नदीच्या उजव्या किनाऱ्यावर वसलेलें आहे. या ठिकाणीं दोन आगगाडीचे रस्ते मिळतात. ड्विना नदीच्या रक्षणाकरितां हें शहर लष्करीदृष्ट्या महत्त्वाचें आहे. येथील कारखान्यांत कातडीं कमावण्याचे कारखाने, दारूच्या भट्या, करवतण्याचे कारखाने वगैरे मुख्य आहेत.

ड्युनाबर्ग हें १२७८ सालीं "लिव्होनियन नाईटस ऑफ दि सोर्ड" नीं वसविलें. १५५९ सालीं या सरदारांच्या मुख्यानें पोलंडच्या राज्याकडे हें गहाण ठेविलें. १५७६ सालीं रशियाच्या इव्हॅन दि टेरिबल यानें हें काबीज केलें, परंतु पुन्हां पोलंडला परत दिलें. १७ व्या शतकांत हें शहर अनुक्रमें स्वीडिश व रशियन लोकांच्या ताब्यांत गेलें. १७७२ सालीं हें शहर कायमचें रशियाला जोडलें. १८१२ सालीं फ्रेंच लोकांनीं हें घेतलें परंतु लौकरच मॅक्डोनल्डच्या आधिपत्याखालीं रशियन लोकांनीं तें परत घेतलें.

ढ—नागरी लिपीच्या वर्णमालेपैकीं 'ढ' हें एकच अक्षर असें आहे कीं, जें आपल्या मूळ स्वरूपांतच अद्यापहि बहुतेक बऱ्याच्या तसें कायम आहे. मात्र प्रचलित ढ या अक्षराचा शिरोभाग मूळच्या अक्षराहून अधिक बांकदार झाला आहे.

ढ = ढ ढ

**ढक्की भाषा**-बंगालच्या पूर्वेकडील प्रांतांतील ढक्क भाषेचाच ढक्की या नांवानें निर्देश करतात व तीच भाषा मृच्छकटिक नाटकामध्यें जुगारीच्या घराचा मालक माथुर व त्याच्या बरोबरचे जुगार खेळणारे लोक यांच्या तोंडीं घातलेली आहे. गोडबोले हे ढक्कीचा अपभ्रंशभाषांप्रमाणें शाकारी, चांडाली आणि शाबारी यांच्या बरोबरच उल्लेख करतात. तिच्या भौगोलिक स्थानाप्रमाणेंच ही ढक्की भाषाहि मागधी व अपभ्रंश या दोन भाषांमधील संक्रमणभाषा आहे. पृथ्वीधराच्या मतें वर्णोच्चारदृष्ट्या ह्या भाषेंतील विशेष प्रकार म्हणजे ल चा सार्वत्रिक उपयोग, तालव्य श व दंत्य स या दोन उष्णवर्णांचा उपयोग हे होत. "लकारप्राया ढक्कविभाषा संस्कृत प्रायत्वे दंत्यतालव्य-स-श-कारद्वययुक्ताच." याचा अर्थ असा कीं, मागधी भाषेंतल्याप्रमाणेंच यांत र चा ल होतो, व षचा स होतो आणि स व श हे संस्कृत शब्दांत जसे जेथें असतील तसेच कायम रहातात. छापील ग्रंथांत सर्वत्र वर सांगितल्याप्रमाणें वर्ण येतातच असें नाहीं पण हस्तलिखित प्रतींत बहुतकरून ते तसे असतातच. तथापि कांहीं ठिकाणीं र हि आढळतो.

शौरसेनी मागधीच्या प्रमाणेंच ढक्की भाषेंतीलहि हस्तलिखित प्रतींवर बिलकुल विश्वास ठेवतां येत नाहीं; आणि तूर्त आपणांस त्या भाषेंतील ग्रंथ थोडकेच उपलब्ध असल्यामुळें त्या भाषेसंबंधानें निःसंदिग्ध रीतीनें माहिती सांगतां येईल अशी मुळींच आशा वाटत नाहीं.

**ढालगज**—ढाल याचा एक अर्थ निशाण असा आहे; ढाला फिरविल्या म्हणजे सैन्याचीं निशाणें त्या रोखानें वळलीं ( ढाल म्हणजे चामड्याचें संरक्षक साधन, ज्यावर हत्यारांचे वार घेतात तें हा एक अर्थ आहे ). ढालगज म्हणजे मुख्य निशाणाचा हत्ती. या निशाणावर सेनापतीचें अथवा त्या त्या राजाचें निशाण असतें व त्याच्या रक्षणार्थ शिपायांची एक तुकडी असते व त्याच्या अंगावर सर्वत्र चिलखत असतें. शत्रूवर चाल करून जाऊन त्याचा हा निशाणाचा हत्ती वळवून आपल्या सैन्यांत घेऊन येणें, हें एक बहादुरीचें काम समजलें जाई, अशा वेळीं, आपला हत्ती शत्रूनें नेऊं नये म्हणून त्या पक्षाचे लोक त्याचें रक्षण मोठ्या अरेतुरेनें करीत. हल्लीं हा शब्द उपहासानें एखाद्या धीट, भांडकुदळ, उद्धट व मर्दानी स्त्रीस लावितात. ढाल: उलटविणें याचा अर्थ बंड करणें असा होता.

**ढालाईत**—मराठी राज्यांत ढालाइत म्हणून नौकर असत. यांच्याजवळ ढाल व तरवार असे. हे खुद्द छत्रपति, पेशवे व इतर मोठमोठ्या सरदारांजवळ असत. एखाद्या अपराध्यास पकडून आणावयाचें असल्यास यांना पाठवीत. बहुधा ही जोडी जाई. त्यांच्याजवळ पकडून आणण्याचा सरकारी हुकूम असे. त्या हुकुमाप्रमाणें अपराधी आपण होऊन त्यांच्या स्वाधीन झाल्यास ते त्यास त्रास देत नसत; परंतु त्यानें आडकाठी केल्यास हाणामार करून त्याच्या मुसक्या बांधून त्यास घेऊन जात. त्यांचा खाण्यापिण्याचा खर्च सरकार त्या अपराध्याकडून वसूल करून घेई. त्यास मसाला असें नांव असे. या ढालाइतांना मोठमोठे लोक भीत एवढेंच नव्हे तर छत्रपतीचे व पेशव्यांचे ढालाईत आल्यास मोठे सरदारहि कुरकुर न करतां व त्यांना आडथळा न करतां त्यांच्या स्वाधीन होत व सरकार दरबारीं जात. त्यांचा अपमान म्हणजे राजाज्ञेचा अपमान समजला जाई.

**ढींमर**—मासे मारणारांची व पालख्या वाहणारांची ही जात मध्यप्रांत-वऱ्हाडांत विशेषतः मराठी जिल्ह्यांतून पुष्कळ आहे. यांची संख्या २८४००० आहे. उत्तरेकडे भोई व ढीमर या निराळ्या जाती आहेत पण मध्यप्रांतांत तशा नाहींत. गोंड लोक भोई शब्द फार सन्मानाचा समजतात. यावरून बरेच गोंड ढीमर व भोई जातींत शिरले असावे असा रसेल तर्क करतो. यांचास मासे धरणाऱ्यांस पालेवार असें तेलगू नांव आहे.

यांचे उपवर्ग बरेच आहेत. शिंगाडे पेरणारांस सिंगारिया, नद्यां व नाल्याच्या कांठीं रहाणारांस बाढा, पाटा व जातें सुधारणारांस टांकीवाले, झिंग धरणारा झिंगा, गळ टाकणारांस बनसिया याप्रमाणेंच सराइया, बंधाइया व धुरीया अशीं नांवें उपवर्गांचीं आहेत; हीं अर्थात् धंद्यावरून पडलीं आहेत. धुरिया हे लाह्या व पोहे विकतात व यांचा मूळ पुरुष महादेवानें पार्वतीची पालखी वाहून नेण्याकरितां मूठभर मातीपासून निर्माण केला अशी त्यांची समजूत आहे व हे छत्तीसगडांतील धुरी लोकांपैकीं असावे. सोनझारा ढीमर सोनें मिळविण्याकरितां झारेकऱ्याचें काम करतात. त्यांची निराळीच जात बनली आहे. कसधोनिया हे स्नानाच्या वेळीं

क्षेत्रांतील नद्यांतून लोकांनीं टाकलेले पैसे उचलतात. गोंडी ढीमर हे गोंडापासून झालेले असावे पण बहुतेक ढीमर वर्ग गोंड व कोल लोकांपासून झाला असावा असें मानण्यास पुष्कळ जागा आहे. कारण गोंड व विशेषत. कोल लोक पालखी वाहण्यांत फार कुशल आहेत. सुवरहा लोकांचें नांव डुकरावरून पडलें आहे. यांचा दर्जा इतरांपेक्षां फार नीच आहे. गधेवाले ढीमर ओझ्याचीं गाढवें बाळगतात.

यांच्यांत बरेच असगोत्रविवाही, पशुपक्षी व झाडांचीं नांवें घेतलेले लोक आहेत. जसें वाघमारे, ओझवे, गुरूपहचान, मिदोईया (सीमा राखविणारे), गिधवे ( गिधाड ), गधेखाय, कस्तूरे, तुमसरे, नागपूरकर मडगी, भोयर, पिंडारिया, गोडिया व गोधली. कच्छवा हें रजपूत नांव आहे असें रसेल म्हणतो ( पण कासव धरणें हा धंदा करणारे जे लोक असतील त्यांस कच्छवा हें नांव पडलें असावें. ).

सकुलविवाह आणि आते, मामे व मावस भावंडांचे विवाह निषिद्ध आहेत. पुष्कळ ठिकाणीं ज्या ज्या कुलांस नातीं ठाऊक आहेत तीं कुलें परस्परांत विवाह करीत नाहींत. नध व केहरा या जाती आपसांत लग्नें करीत नाहींत. यांच्यांपैकीं जर कोणास दुसऱ्याची मुलगी वधू पाहिजेच असली तर त्यानें वधूच्या जातींत येऊन दीक्षा घेऊन प्रवेश करावा व मग लग्न करावें. एखाद्या अविवाहित स्त्रीनें स्वजातीशीं किंवा उच्च जातीपाशीं व्यभिचार केला तर तिला जातिभोजन घेऊन शुद्ध करतात अथवा तिच्या केंसाची बट कापून तिला शुद्ध करतात. दोन कुलें आपसांत मुली बदलून घेतात व लग्नें करतात. हिंदुस्थानी जिल्ह्यांत बायका वरातीबरोबर जात नाहींत पण मराठी जिल्ह्यांतून जातात. भनाराढीमर लग्नविधि वधूकडे केल्यास वधूशुल्क १६ रुपये व वराकडे केल्यास २० रुपये घेतात. चांद्यांतील ढीमर लोकांत काटकसर करण्याकरितां विवाहविधि लांबणीवर टाकतात. मुलीच्या बापास १। रुपाया देऊन मुलगी घरांत आणावयाची आणि जातीस भोजन घालावयाचें. मग ती पत्नीसारखा व्यवहार करूं लागते व म्हातारपणीं मरण्याच्यापूर्वी तिचा लग्नविधि करून घेतात कारण त्या संस्काराखेरीज आलेलें मरण चांगलें नाहीं अशी समजूत आहे. अशा रीतीनें आजा, आजी, आईबाप, मुलगा व सून यांचीं लग्नें कधीं कधीं एकाच वेळीं एकाच मंडपांत झाल्याचीं उदाहरणें आहेत. छिंदवाड्यांतील शिंगाडे ढीमर लग्नाच्या पूर्वी मगर मारून अवश्य खातात व सोनेझार ढीमरांत मगर नदींतून काढून आणून त्याची पूजा करून पुन्हां नदींत सोडतात.

भंडारा जिल्ह्यांत वरास जाळें व वधूस शिधोरा देतात व तीं दोघे मासे मारण्याकरितां नदीस जातात पण वधूचा भाऊ त्यांस वाटेंतूनच परतवून आणतो. मंडल्यांत वराच्या घरातल्या उंबऱ्याखालीं डुकर गाडतात व त्याच्यावरून पाय देऊन वरानें घरांत गेलें पाहिजे. विधवाविवाहास पूर्ण मोकळीक आहे. मंडल्यांत रविवार, मंगळवार व शनिवार या रात्री खेरीजकरून कोणत्याहि रात्रीं विधवाविवाह करतात. घटस्फोटाला परवानगी देतात पण फारच क्वचित. बायकोच्या व्यभिचाराला नवरा नेहमीं क्षमा करतो आणि अतिशयच बोभाटा झाल्याखेरीज घटस्फोट सहसा करीत नाहीं.

प्रेतांस बहुतेक दारिद्र्यामुळें हे लोक पुरतात. अशौच १० दिवस पाळतात. पण कान टोंचलेल्या मुलाचें १ दिवसच पाळतात. वऱ्हाडांत ढीमरांचा अंत्यविधि गोंडांसारखाच असतो. यांचा देव दुल्हादेव आहे. कदंबाच्या लांकडाची देवाची प्रतिमा करून त्यावर शेंदूर फांसतात. वऱ्हाडांत अन्नपूर्णादेवीची प्रार्थना करतात. तिची घोड्यावर बसलेली आकृति पितळेच्या पत्र्यावर काढतात व तिला हळद, कुंकू वाहतात. पाण्यांत शिरण्यापूर्वी जलदेवतेनें संरक्षण करावें म्हणून कांहीं वेळ प्रार्थना करतात. गंगेला गंगामाई म्हणतात. उतारूंना नदीवरून नेणारे ढीमर घटोईया देवाची पूजा करतात. वडाच्या देवतेस बरमदेव ह्मणतात. गांवच्या पुरोहिताच्या आत्म्यास परिहार ह्मणतात आणि फार मोठ्या साधूसंतास गुसांई देव ह्मणतात. देवीला काळ्या बकरांचा बळी देतात आणि घरांतील खड्यांत बकरांचीं हाडें व इतर शरीरांतील निरुपयोगी भाग पडूं देतात व त्यांत यांखेरीज कांहीं पडलें तर तें बाहेर न काढतां त्यासकट पुरून खड्डा बुजवितात. एकदां एक लहान मूल त्यांत पडलें असतां तें तसेंच पुरलें पण दुसऱ्या वर्षी खोदलें तेव्हां तें खेळतांना सांपडलें अशी एक कथा हे लोक सांगतात. दुसरी बायको आपल्या पहिल्या सवतीच्या नांवाचा ताईत गळ्यांत घालते.

यांचे धंदे मासे मारणें, होड्या चालविणें, कावडींतून पाणी आणणें, भांडीं घासणें, हंगामाच्या वेळीं शेतांत शिजविलेलीं बोरें व रताळू नेऊन विकणें व पालखी वाहणें हे आहेत. जेथें यांनीं मळलेली कणीक लोकांस चालते तेथें हे तें काम सुद्धा करतात.

क्रूक म्हणतो कीं " उत्तर हिंदुस्थानांत कहरास मेहर म्हणतात व याचा संबंध त्यानें महिला या संस्कृत शब्दाशीं जुळवून जनानखान्यांत सुद्धा यांना राखण व काम करण्यास ठेवीत म्हणून हें नांव यांचें पडलें असावें असें म्हणतो. ढीमर आपल्या मालकाचा हुक्का भरतो व कसा भरला गेला हें पाहण्याकरितां प्रथम स्वतः ओढून मग मालकास देतो. ढीमर स्त्रियांस मध्यप्रांताच्या उत्तरेकडील जिल्ह्यांत बरोणी म्हणतात. यांना घरांतील झाडझूड व इतर कामें करण्यास नौकर ठेवतात व कांहीं मालक कधींकधीं आपली लहर त्यांच्यावर पुरवून घेतात. ढीमर हा बहुधां कुंटणपणाहि करतो. ढीमर लाह्या व पोहे विकतो, कोणी तागाचीं तरटें विणतात व कोणी डुकरे पाळतात. महाराच्या नारायण देवाला बळी दिलेल्या डुकराच्या प्रसादांत ढीमर सामील होतो. हे लोक कोशाचे जंतू पाळून कोशाची जोपासना करतात. लागवडीच्या हंगामांत हे दोन महिने रानांत एक वेळ खाऊन व स्त्रीसंग वर्ज्य करून राहतात.

कोशाच्या सुरवंटांची अंडीं झाडांवर ठेवतांना त्या झाडांत पाटदेवाची भावना करून त्याला रेशीम गुंडाळतात. कोशाच्या सुरवंटांची जोपासना करणें, त्यांची वाढ होऊन कोश तयार झाल्यावर त्यांनां ठकवणें इत्यादि सर्व प्रक्रिया फार धर्मबुद्धीनें करतात व त्या सर्वकाळीं स्त्रीसंग वर्ज्य करतात. विवाहारंभीं सुरवंट खाण्याचा विधि मगर खाण्याच्या विधीप्रमाणेंच आहे. यांचा दर्जा समाजांत फार विचित्र झाला आहे. यांच्या हातचें पाणी बहुतेक सर्व पितात. हे पालख्या वाहतात म्हणून ब्राह्मणांनीं यांनां अस्पृश्य जातींतून काढून स्पृश्य जातींत घेतलें आहे. पण जबलपुरांत रेकवार, बंट, बरमैयान, पवेह या उपवर्गांतील स्त्रिया एकमेकींच्या हातचें जेवत नाहींत व मडक्यांत ठेवलेलें पाणीहि त्यांस आपसांत चालत नाहीं. पितळेच्या भांड्यांतून तार्ने विहिरींतून काढलेलें पाणी असेल तर चालतें. वर्षांतून एकदां मोहोरमांत हे लोक मुसुलमानांच्या हातचें जेवतात. त्या दिवसांत भीक मागून आणलेलें अन्न फकीराजवळ नेतात; तो तें हुसेनाच्या ताजियावर वाहून यांनां प्रसाद देतो. उत्तरहिंदुस्थानांत नाई व बारी या ढीमर जाती घरांतलीं कामें करतात व त्यांस पावनी प्रजा म्हणतात. कधीं कधीं यांची जागा अहीर घेतात. लग्नकार्यांत यांच्या पंक्तींत स्वतंत्र निराळ्या भांड्यांतून वाढण्याची व्यवस्था करतात. नीच जातीच्या स्त्रीपुरुषांच्या हातचें जेवल्यास किंवा इतर अंगसंग व्यवहार केल्यास अजीवात जातींतून बहिष्कार घालतात. पण जर अविवाहितांनीं तसें केल्यास त्याला प्रायश्चित्तानें शुद्ध करतात. मांजर, कुत्रा, खार मारल्यास, जखमेंत किडे पडल्यास व तुरुंगांत गेल्यास प्रायश्चित्तानें शुद्ध करतात. तसेंच अगदीं नीच जातीशीं व्यभिचार केल्यासहि प्रायश्चित्तानें शुद्धि होते. यांची शुद्धि यांच्या जातीच्या भटानें केली पाहिजे. तो गुन्हेगारास नदीवर नेतो, त्याला स्नान घालून त्याच्या केसांची एक बट कापतो व नारळ फोडून त्याला पंचगव्य देतो. मग सर्व एकत्र जेवतात. भटाला ११ रु. दक्षणा द्यावी लागते. वऱ्हाडांत बहिष्कृत भोयास ब्राह्मणाच्या पायाच्या तीर्थानें शुद्ध करतात. मात्र त्यानंतर जातवाल्यास दारू पाजावी लागते.

**ढुंढये जैन**—श्वेतांबरांतच ढुंढया या नांवाची एक शाखा आहे. या लोकांचा उल्लेख पूर्वी अनेक जागीं आला आहे. यांनां माळव्यांत शेवडे असें नांव आहे. पण हे स्वतःस साधुमार्गी अथवा मठमार्गी म्हणवितात. कारण हे लोक बहुधा मठांत राहतात. हा पंथ फार विचित्र आहे. ते मूर्तिपूजा मानीत नाहींत; अर्थात या लोकांनां मंदिराची आवश्यकता नाहीं. मनोविकारांचें दमन करणें हाच मोठा धर्म असें ते समजतात; आणि या धर्माचें चिंतन तीच त्यांची मानसपूजा. तीर्थंकराच्या पवित्र आचरणाचा कित्ता बळवावा असें ते म्हणतात. पण तीर्थंकरांनां विशेष मान देण्याचा प्रघात त्यांच्यांत नाहीं. त्यांचे गुरु शुभ्र वर्णाचीं पण मळकीं वस्त्रें पांघरतात, श्वासोच्छ्वास करतांना उष्ण श्वासानें हवेंतले क्षुद्र जीव मरूं नयेत म्हणून तोंडावर कापडाची एक पट्टी बांधतात, व रस्त्यानें चालतांना पाय पडून जीवजंतूंची प्राणहानि होऊं नये म्हणून झाडण्यासाठीं हातांत एक कुंचा घेऊन फिरतात. या कुंच्याला रजोहरण असें म्हणतात. यालाच कुटासना किंवा ओगा अशीहि नांवें आहेत. हे लोक सगळ्या जन्मांत कधीं स्नान करीत नाहींत व हजामत करवीत नाहींत; हातानें केस उपटतात. यांचें राहणें मठांत असतें. या मठाला थानक म्हणतात. यांच्यांत शिकलेले लोक फार थोडे आहेत. संस्कृत भाषेंतील जैन धर्माचीं पुस्तकें समजण्याइतकी विद्वत्ता एखाद्याच्याच अंगीं असते; जीं सूत्रें गुजराथींत भाषांतर होऊन आलीं आहेत, तेवढींच घोकून त्यावर ते निर्वाह करतात. यांच्यांत स्त्रियांनांहि आजन्म ब्रह्मचर्यानें राहण्याची परवानगी आहे. त्याहि पांढरे पण मळके कपडे घालून व तोंडावर पट्टी आणि हातांत कुंचा घेऊन दारोदार फिरतांना आढळतात.

**ढेकूण**—कीटकांतील दंशिक जातींतील हा एक प्राणी आहे. याचा आकार लांबसर व रंग विटकरीसारखा असतो व त्याला चिवडल्यास त्याची घाण येते. याला पंख नाहींत. याला एक लहानशी सोंड असून तिला करवतीप्रमाणें दांते असतात. ती तो माणसाच्या अंगांत खुपसून माणसाचें रक्त शोषण करतो. दिवसां ते भिंतीच्या फटींत, लांकडी सामानाच्या भेगांत, कपड्यालत्त्यांच्या घड्यांत लपून बसतात व रात्रीं भक्ष्यशोधार्थ बाहेर पडतात. घराच्या आढ्यावरून ते अंथरुणावर उड्या मारतात. या जातीची मादी वसंतऋतूच्या प्रारंभीं वळचणींतून अंडीं घालते व तीन आठवड्यांनीं अंडीं फोडून त्यांतून ढेकणाचीं लहान लहान, पारदर्शक व पांडुरकीं पिलें बाहेर पडतात. अकरा आठवड्यांत या पिलांची पूर्ण वाढ होते.

दोनशें वर्षांपूर्वी इंग्लंडांत ढेकूण अस्तित्त्वांत नव्हता. इकडे उन्हाळ्याच्या दिवसांत यांच्यापासून विशेष त्रास होतो. सांनिपातिक ज्वर आणि चौथरी हिंवताप या रोगांवर औषध म्हणून विड्यांतून ढेकूण देण्याची चाल आहे. ढेकणांचा फैलाव अल्पकाळांत फार होतो. यांचा पूर्णपणें नाश करणारें एकहि औषध अजून सांपडलें नाहीं. 'कटोल पावडर' या सारखीं कांहीं औषधें यांच्या नाशाकरतां कित्येक लोक वापरतात. माणसाचें रक्त हेंच ढेकणाचें खाद्य होय. दोन अगर तीन आठवडेपर्यंतहि ढेकूण रक्त खाण्याशिवाय जगूं शकतो.

**ढेरा**—बंगालकडे असलेल्या सोनापूर संस्थानांत या तेलगू कोष्ट्यांची बरीच वस्ती आहे. यांस सोनापूरच्या राजानें देवाचे कपडे विणण्याकरितां ओरिसामधून बोलाविलें होतें. यांचीं गोत्रनामें पशु व वनस्पतींपासून घेतलेलीं आहेत. अशाच प्रकारचीं यांचीं देवकेंहि आहेत. सूर्य देवकाचे लोक ग्रहणांत जेवीत नाहींत. नक्षाकुल काळे कपडे वापरीत नाहींत. वनसेठी व भनाला कुळें 'बंडी' नांवाचा खटारा(गाडी) वापरीत नाहींत. गुंड लोक बंदुकीनें मारलेले प्राणी खात

यांच्यांत सकुलविवाह वर्ज्य आहेत. मामाच्या मुलीबरोबर लग्न अवश्य करवितात. हें नातें लहानपणापासूनच ठरवून परस्परांत व्याही, मेहुणे व शालक अशा हांका मारतात. लग्न झाल्यावर वधूवर घरीं आले म्हणजे वराची वहीण दारांत बसून वधूला आंत येऊं देत नाहीं. मी आपली मुलगा तुझ्या मुलाला देईन असें वचन भावजयीपासून घेतल्या-खेरीज तिला आंत जाऊं देत नाहीं. लग्नें ऋतुप्राप्तीपूर्वीच झालीं पाहिजेत. त्या काळापर्यंत लग्न जुळलेंच नाहीं तर वहिणीच्या नवऱ्याबरोबर किंवा दुसऱ्या कोणा विवाहित पुरुषाबरोबर तिचें लग्न लावतात. या माणसाबरोबर तिनें बायकोप्रमाणें व्यवहार केलाच पाहिजे अशी सक्ति नाहीं. त्याच्या संमतीनें तिनें विधवाविवाहविधीनें पुन्हां लग्न करावें. मात्र अविवाहितानें अशा मुलीबरोबर लग्न करण्याच्यापूर्वी सहरा झाडाबरोबर प्रथम लग्न केलें पाहिजे. वाङ्निश्चय करण्यास जो कोणी वडील मनुष्य जातो, तो वधूपक्षास तीनदां हें लग्न ठरलें ना असें विचारतो व प्रत्येक होकारार्थी वधू-वाला आपल्या पदरास ३ गाठीं बांधतो. नंतर एकजण वराकडे जाऊन एका बैठकीवर त्या गाठीं सोडतो व त्या वचन-रूप गाठीं त्या बैठकींत गुंडाळून सुरक्षितपणें ठेवतात.

**ढोर**—लो.सं.१३४०६.दक्षिण हिंदुस्थान,बेळगांव व विजापूर या प्रांतभर हे लोक थोडे थोडे आढळतात. या लोकांचा धंदा गुरांची कातडीं कमविण्याचा आहे. यांमध्यें सात पोटजाती असून त्या पोटजातींच्या लोकांत रोटी व बेटी व्यवहार होत नाहींत. यांच्या आडनांवावरून यांचीं कुळें ठरलीं जातात. उंबर, जांभूळ, इत्यादि यांचीं देवकें असून एकच देवक असणाऱ्या लोकांमध्यें विवाहसंबंध होत नाहीं. मामेबहीण व चुलतबहीण यांच्याशीं लग्न लावितां येतें. लग्नाच्या वेळीं५० रु.–५०० रु. पर्यंत मुलीची किंमत घेतली जाते. पुनर्विवाह व घटस्फोट या चाली यांमध्यें रूढ आहेत. ढोर लोक मांसाहारी आहेत. महार व मांग लोकांच्या हातची हे पक्की रसोई खातात. यांच्या कुलदेवता भवानी, जनानी, खंडोबा, महादेव व विठोबा ह्या आहेत. यांचे विधिसंस्कार ब्राह्मण व लिंगायत उपाध्ये चालवितात.

यांच्यांत मराठे, हिंदुस्थानी, कर्नाटकी असे तीन मुख्य भेद आहेत; हे एकमेकांशीं रोटी–बेटीव्यवहार करीत नाहींत; त्यांच्या भाषाहि अनुक्रमें मराठी, हिंदुस्थानी व कानडी आहेत त्यांची रहाणी गलिच्छ असते व घरेंहि घाणेरडीं, लहान झोंपडीवजा असतात. लंगोटी, पागोटें व बंडी हा त्यांचा पोशाख असतो. पागोटें म्हणजे बहुतेक चिंध्यांचा गळाठा असतो. बायकांचा पोशाख चांभारांच्या बायकांसारखा असतो. हे गोमांस तेवढें खात नाहींत बाकी सर्व पशूंचें मांस खातात व दारू पितात. दुसऱ्याला बकऱ्याचा बळी देतात व मेलेल्या जनावरांचें मांस खातात. कातडीं कमावण्याप्रमाणेंच, कातड्याचे मसक, पोहरा, ढोल, लगाम, तोबरा, पेटारा वगैरे जिन्नसहि तयार करतात. बायका मुलींच कामें ( मजुरीचीं व इतर ) करीत नाहींत. दहा बारा वर्षांच्या नंतर मुलांनां कामाला लावतात. हे आपलीं प्रेतें पुरतात. या संस्कारास लिंगायत अय्या लागतो व लग्नास ब्राह्मण लागतो. मेलेल्या व्यक्तीस हे आपला संरक्षक समजतात. मंत्रतंत्र, कौल लावणें व देवरुषी यांवर यांचा भरवसा असतो. यांच्यांत अद्यापि जातपंचायती चांगल्या स्थापिल्या गेल्या नसून, ते आपले तंटे जातींतील वृद्धवृद्ध लोकांच्या सल्ल्यानें तोडतात. यांना चरितार्थ बहुतेक मजुरीवरच असल्यानें याच्यांत श्रीमंत कोणी आढळत नाहीं. हल्लीं विलायती चामड्याचे पदार्थ ( वर सांगितलेले ) बरेचसे येत चालल्यानें यांचा तो धंदाहि बसून ते जास्त दरिद्री होत चालले आहेत.

त—या अक्षराचें सर्वांत जुनें रूप अशोकाच्या (ख्रि. पू. ३रें शतक) शिलालेखांत. दुसरें पहिल्या रूपापासून जरा खालच्या तंगड्यांनां गोलपणा येऊन तयार झालें आहे. हें दुसरें रूप भट्टिप्रोलु येथील स्तूपांत सांपडलेल्या लेखांत सांपडतें (ख्रि. पू. २ रें शतक). तिसरें रूप सराहा (चंबा राज्य) येथें सांपडलेल्या सात्यकीच्या वेळच्या प्रशस्तीमध्यें (इ. स. १० वें शतक) आहे.

**तगर**—तगरीचें झाड बरेंच मोठें होतें. तगरीचें पान लांबट असून शेवटीं त्यास टोंक असतें. ह्या झाडास गोंडे तगर असेंहि म्हणतात. एकेरी तगरीचें फूल पारिजातकाच्या फुलांपेक्षां कांहींसें मोठें असतें. त्यास पांच सहा पाकळ्या असतात. तगरीच्या फुलास लांब दांडा असतो. याच्या फुलास सकाळीं मात्र कांहीं वास असतो. पुढें वास रहात नाहीं. तगरीचे गुण गाव्या तगरीसारखे आहेत. मस्तक-शूलावर तगरीचें मूळ उगाळून डोक्यावर लेप द्यावा.

**तगर (गाठ्या).**—ह्या तगराचीं झाडें हिमालयपर्वत व अलमोराच्या पहाड यांवर होतात. याच्या मुळास "तगर मूळ" असें म्हणतात. ह्या जातीचा तगर फार सुवासिक असतो. याचा धुपांत उपयोग करतात. तगर मूळाचा रंग कांहींसा तपकिरीसारखा असतो. सुवासिक उटणीं आणि सुगंधी पदार्थांत याचा फार उपयोग होतो. तगर शीतल, पथ्यकर, कडू, मधुर, लघु, स्निग्ध, नेत्ररोग, मस्तकरोग, इत्यादि व्याधींचा नाश करतो असें आर्यवैद्यकांत सांगितलें आहे.

**तंगैल, पोटविभाग.**—आसाममध्यें मैमनसिंग जिल्ह्यांत हा एक नैर्ऋत्येकडील पोटविभाग. येथील जमीन सुपीक आहे.

**गांव.**—तंगैल पोटविभागाचें मुख्य ठिकाण. येथें कापडाचा बराचसा व्यापार चालतो. यांत मामुली कचेऱ्या आहेत. या गांवांत 'प्रमथमन्मथ' नांवाचें कॉलेज आहे.

**तंगौंग**—अपरब्रह्मदेशांतील रुबी माइन्स जिल्ह्याच्या उत्तरेकडील एक टाउनशिप. क्षेत्रफळ ६१६ चौरस मैल. लो. सं. (१९०१) ८६०९. हींत खेडीं ७१ आहेत. तगौंग मुख्य ठिकाण इरावती तीरावर आहे.

**तंजावर, जिल्हा.**—मद्रास इलाख्याच्या दक्षिण भागांत किनाऱ्याच्या कांठचा एक जिल्हा. क्षे. फ ३७१० चौ. मै. मर्यादा—उत्तरेस कोलेरून व तिच्या पलीकडे त्रिचनापल्ली व दक्षिण अर्काट जिल्हे; पश्चिमेस पुदुकोत्तई संस्थान व त्रिचनापल्ली जिल्हा; व दक्षिणेस मदुरा जिल्हा. किनाऱ्यावर कारीकाल ही फ्रेंच वसाहत आहे.

स्वाभाविक वर्णनः—उत्तर व पूर्वेकडील प्रदेशांत कावेरी व तिच्या शाखांच्या योगानें शेतीला पाणी मिळण्याची सोय उत्तम असल्यामुळें, तेथें वस्ती सर्वांत दाट आहे. या भागापेक्षां दक्षिण भागाची उंची ५० फूट जास्त उंच असून प्रदेश रुक्ष आहे. या जिल्ह्यांत कोल्हा व खोंकड यांखेरीज इतर रानटी जनावरें आढळण्यांत येत नाहींत. जिल्ह्याची हवा एकंदरींत आरोग्यकारक आहे; सर्व जिल्ह्यांत सरासरी पाऊस वर्षास ४८ इंच होतो.

इतिहासः—दहाव्या शतकाच्या मध्यभागापर्यंत हा जिल्हा चोलांच्या राज्यांत मोडत होता. पहिल्या राजराजाच्या कारकीर्दीत त्या घराण्याची सत्ता कळसास पोहोंचली. त्यावेळीं त्यांच्या राज्यांत हल्लींचा सर्व मद्रास इलाखा, म्हैसूर, कुर्ग व सिलोनचा उत्तर भाग, एवढ्या प्रदेशाचा समावेश झाला होता. राजराजाच्या सैन्याचा सरंजाम व त्याची तयारी ही फार उच्च प्रकारची असून सैन्यांत घोडेस्वार, पायदळ, व गोलंदाज यांच्या तुकड्या केलेल्या होत्या. त्यानें लागवडीखालच्या सर्व जमिनीची मोजणी करून तिचा सारा ठरविला व देवालयें आणि सार्वजनिक इमारती बांधून तंजावर सुशोभित केलें. त्याच्या कारकीर्दीत दिवाणी कारभाराचीहि व्यवस्था नीट लावण्यांत आली. प्रत्येक गांवांत अगर ग्रामसमूहांत स्थानिक अधिकाऱ्यांच्या देखरेखीखालीं एक महासभा असून, गांवासंबंधीं सर्व प्रकारच्या बाबतींत तिला पूर्ण बहुतेक अधिकार असत. कांहीं ग्रामसमूह मिळून एक जिल्हा व कांहीं जिल्हे मिळून एक प्रांत होत असे. चोलांच्या राज्यांत असे सहा प्रांत होते. राजराजानें स्थापन केलेलें राज्य त्याच्या मृत्यूनंतर पुष्कळ काळपर्यंत कायम राहिलें. राजराज चोळ व त्याच्या मागून गादीवर बसलेले राजे, त्याच्याप्रमाणेंच शूर व राज्यकारभारदक्ष होते. कावेरी व कोलेरून नद्यांनां विभक्त करणारा मोठा बंधारा त्यांनींच बांधला.

तेराव्या शतकांत चोलांच्या इतर मुलखाबरोबर तंजावरहि द्वारसमुद्राच्या होयसळ बल्लाळांच्या आणि मदुरा येथील पांड्यांच्या अंमलाखालीं गेलें. चवदाव्या शतकाच्या अखेरीस उदयोन्मुख विजयनगरच्या राज्यांत सामील होण्यापूर्वी, हा जिल्हा सर्व दक्षिणेबरोबर मलिक काफूरच्या मागून आलेल्या मुसुलमानांच्या स्वाऱ्यांनां बळी पडला असावा. सोळाव्या शतकांत विजयानगरच्या एका सेनापतीनें आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें व त्याच्या नंतरच्या पुरुषानें सतराव्या शतकाच्या प्रारंभीच्या वर्षांत तंजावर येथें नायक घराणें

यांच्यांत सकुलविवाह वर्ज्य आहेत. मामाच्या मुलीबरोबर लग्नें अवश्य करवितात. हीं नातें लहानपणापासूनच ठरवून परस्परांत व्याही, मेहुणे व शालक अशा हांका मारतात. लग्न झाल्यावर वधूवर घरीं आले म्हणजे वराची बहीण दारांत बसून वधूला आंत येऊं देत नाहीं. मी आपली मुलगी तुझ्या मुलाला देईन असें वचन भावजयीपासून घेतल्या-खेरीज तिला आंत जाऊं देत नाहीं. लग्नें ऋतुप्राप्तीपूर्वीच झालीं पाहिजेत. त्या काळापर्यंत लग्न जुळलेंच नाहीं तर बहिणीच्या नवऱ्याबरोबर किंवा दुसऱ्या कोणा विवाहित पुरुषाबरोबर तिचें लग्न लावतात. या माणसाबरोबर तिनें बायकोप्रमाणें व्यवहार केलाच पाहिजे अशी सक्ति नाहीं. त्याच्या संमतीनें तिनें विधवाविवाहविधीनें पुन्हां लग्न करावें. मात्र अविवाहितानें अशा मुलीबरोबर लग्न करण्याच्यापूर्वी सहरा झाडाबरोबर प्रथम लग्न केलें पाहिजे. वाङ्निश्चय करण्यास जो कोणी वडील मनुष्य जातो, तो वधूपक्षास तीनदां हें लग्न ठरलें नां असें विचारतो व प्रत्येक होकारार्थी जबाबाला आपल्या पदरास ३ गाठी बांधतो. नंतर एकजण वराकडे जाऊन एका बैठकीवर त्या गाठी सोडतो व त्या वचन-रूप गाठी त्या बैठकींत गुंडाळून सुरक्षितपणें ठेवतात.

**ढोर**—लो.सं.१३४०६.दक्षिणहिंदुस्थान,बेळगांव व विजापूर या प्रांतभर हे लोक थोडे थोडे आढळतात. या लोकांचा धंदा गुरांची कातडीं कमविण्याचा आहे. यांमध्यें सात पोटजाती असून त्या पोटजातींच्या लोकांत रोटी व बेटी व्यवहार होत नाहींत. यांच्या आडनांवावरून यांचीं कुळें ठरलीं जातात. उंबर, जांभूळ, इत्यादि यांचीं देवकें असून एकच देवक असणाऱ्या लोकांमध्यें विवाहसंबंध होत नाहीं. मामेबहीण व चुलतबहीण यांच्याशीं लग्न लावितां येतें. लग्नाच्या वेळीं५० रु.–५०० रु. पर्यंत मुलीची किंमत घेतली जाते. पुनर्विवाह व घटस्फोट या चाली यांमध्यें रूढ आहेत. ढोर लोक मांसाहारी आहेत. महार व मांग लोकांच्या हातची हे पक्की रसोई खातात. यांच्या कुलदेवता भवानी, जनानी, खंडोबा, महादेव व विठोबा ह्या आहेत. यांचे विधिसंस्कार ब्राह्मण व लिंगायत उपाध्ये चालवितात.

यांच्यांत मराठे, हिंदुस्थानी, कर्नाटकी असे तीन मुख्य भेद आहेत; हे एकमेकांशीं रोटी–बेटीव्यवहार करीत नाहींत; त्यांच्या भाषाहि अनुक्रमें मराठी, हिंदुस्थानी व कानडी आहेत त्यांची रहाणी गलिच्छ असते व घरेंहि घाणेरडीं, लहान झोंपडीवजा असतात. लंगोटी, पागोटें व बंडी हा त्यांचा पोशाख असतो. पागोटें म्हणजे बहुतेक चिंध्यांचा गठ्ठाठा असतो. बायकांचा पोशाख चांभारांच्या बायकांसारखा असतो. हे गोमांस तेवढें खात नाहींत बाकी सर्व पशूंचें मांस खातात व दारू पितात. दसऱ्याला बकऱ्याचा बळी देतात व मेलेल्या जनावरांचें मांस खातात. कातडीं कमावण्याप्रमाणेंच, कातड्याचे मसक, पोहरा, ढोल, लगाम, तोबरा, पेटारा वगैरे जिन्नसहि तयार करतात. बायका मुलींच कामें ( मजुरीचीं व इतर ) करीत नाहींत. दहा बारा वर्षांच्या नंतर मुलांना कामाला लावतात. हे आपलीं प्रेतें पुरतात. या संस्कारास लिंगायत अय्या लागतो व लग्नास ब्राह्मण लागतो. मेलेल्या व्यक्तीस हे आपला संरक्षक समजतात. मंत्रतंत्र, कौल लावणें व देवरुषी यांवर यांचा भरवसा असतो. यांच्यांत अद्यापि जातपंचायती चांगल्या स्थापिल्या गेल्या नसून, ते आपले तंटे जातींतील वृद्धवृद्ध लोकांच्या सल्ल्यानें तोडतात. यांचा चरितार्थ बहुतेक मजुरीवरच असल्यानें यांच्यांत श्रीमंत कोणी आढळत नाहीं. हल्लीं विलायती चामड्याचे पदार्थ ( वर सांगितलेले ) बरेचसे येत चालल्यानें यांचा तो धंदाहि बसून ते जास्त दरिद्री होत चालले आहेत.

---



**ण**—णच्या अक्षरविकासांत दिलेलें शेवटचें रूप हें

ण = I [illegible] ण ण

दक्षिणेकडील नागरी लिपींतच फक्त प्रचलित आहे व इतर ठिकाणच्या नागरी लिपींत अक्षरविकासांतील सहावें रूप रूढ आहे. या सहाव्या रूपापासून शेवटचें रूप बनलें तें या अक्षराचा पहिला भाग लेखणी न उचलतां एकदम लिहिण्यानें तयार झालें आहे. या अक्षराचें पहिलें रूप अशोकाच्या शिलालेखांत आहे. पहिल्या व दुसऱ्या शतकांतील कुशानवंशी राजाच्या वेळचे मथुरा, सारनाथ व चारगांव ह्या ठिकाणीं जे लेख उपलब्ध झाले आहेत त्यांत दुसरें रूप आढळतें. दुसऱ्यापासून तिसरें रूप बनलें आहे. चौथें रूप स. ५३२ च्या सुमाराचा राजा यशोधर्मन् याच्या कारकीर्दींतील मंदसोर येथील लेखांत आहे. पांचवें रूप जपानमधील होर्युजी येथील मठांत सांपडलेल्या ताडपत्रावरील ‘ उष्णीषविजयधारिणी ’ या ग्रंथांत व प्राचीन हस्तलिखित पुस्तकांत सांपडतें.

त—या अक्षराचें सर्वांत जुनें रूप अशोकाच्या (ख्रि. पू. ३रें शतक) शिलालेखांत. त = ⅄ ꠸ त त दुसरें पहिल्या रूपापासून जरा खालच्या तंगड्यांनां गोलपणा येऊन तयार झालें आहे. हें दुसरें रूप भट्टिप्रोलु येथील स्तूपांत सांपडलेल्या लेखांत सांपडतें (ख्रि. पू. २ रें शतक). तिसरें रूप सराहा (चंबा राज्य) येथें सांपडलेल्या सात्यकीच्या वेळच्या प्रशस्तीमध्यें (इ. स.१० वें शतक) आहे.

**तगर**—तगरांचें झाड बरेंच मोठें होतें. तगरांचें पान लांबट असून शेवटीं त्यास टोंक असतें.ह्या झाडास गोंडे तगर असेंहि म्हणतात.एकेरी तगरीचें फूल पारिजातकाच्या फुलांपेक्षां कांहींसें मोठें असतें. त्यास पांच सहा पाकळ्या असतात. तगरीच्या फुलास लांब दांडा असतो. याच्या फुलास सकाळीं मात्र कांहीं वास असतो. पुढें वास रहात नाहीं. तगरीचे गुण गाळ्या तगरीसारखे आहेत. मस्तक-शूलावर तगरीचें मूळ उगाळून डोक्यावर लेप द्यावा.

**तगर (गाठ्या).**—ह्या तगराचीं झाडें हिमालयपर्वत व अलमोराचा पहाड यांवर होतात. याच्या मुळास "तगर मूळ" असें म्हणतात.ह्या जातीचा तगर फार सुवासिक असतो. याचा धुपांत उपयोग करतात. तगर मूळाचा रंग कांहींसा तपकिरीसारखा असतो.सुवासिक उटणीं आणि सुगंधी पदार्थांत याचा फार उपयोग होतो. तगर शीतल,पथ्यकर, कडू, मधुर, लघु, स्निग्ध, नेत्ररोग, मस्तकरोग, इत्यादि व्याधींचा नाश करतो असें आर्यवैद्यकांत सांगितलें आहे.

**तंगेल, पोटविभाग.**—आसाममध्यें मैमनसिंग जिल्ह्यांत हा एक नैर्ऋत्येकडील पोटविभाग. येथील जमीन सुपीक आहे.

**गांव.**—तंगेल पोटविभागाचें मुख्य ठिकाण.येथें कापडाचा बराचसा व्यापार चालतो. यांत मामुली कचेऱ्या आहेत. या गांवांत 'प्रमथमन्मथ' नांवाचें कॉलेज आहे.

**तंगोंग**—अपरब्रह्मदेशांतील रुबी माइन्स जिल्ह्याच्या उत्तरेकडील एक टाउनशिप. क्षेत्रफळ ६१६ चौरस मैल. लो. सं. (१९०१) ८६०९. हींत खेडीं ७१ आहेत. तगोंग मुख्य ठिकाण इरावती तीरावर आहे.

**तंजावर, जिल्हा.**—मद्रास इलाख्याच्या दक्षिण भागांत किनाऱ्याच्या कांठचा एक जिल्हा. क्षे. फ ३७१० चौ. मै. मर्यादा—उत्तरेस कोलेरून व तिच्या पलीकडे त्रिचनापल्ली व दक्षिण अर्काट जिल्हे; पश्चिमेस पुदुकोत्तई संस्थान व त्रिचनापल्ली जिल्हा; व दक्षिणेस मदुरा जिल्हा. किनाऱ्यावर कारीकाल ही फ्रेंच वसाहत आहे.

स्वाभाविक वर्णनः—उत्तर व पूर्वेकडील प्रदेशांत कावेरी व तिच्या शाखांच्या योगानें शेतीला पाणी मिळण्याची सोय उत्तम असल्यामुळें, तेथें वस्ती सर्वांत दाट आहे. या भागापेक्षां दक्षिण भागाची उंची ५० फूट जास्त उंच असून प्रदेश रुक्ष आहे. या जिल्ह्यांत कोल्हा व खोंकड यांखेरीज इतर रानटी जनावरें आढळण्यांत येत नाहींत. जिल्ह्याची हवा एकंदरींत आरोग्यकारक आहे; सर्व जिल्ह्यांत सरासरी पाऊस वर्षास ४८ इंच होतो.

इतिहासः—दहाव्या शतकाच्या मध्यभागापर्यंत हा जिल्हा चोलांच्या राज्यांत मोडत होता.पहिल्या राजराजाच्या कारकीर्दीत त्या घराण्याची सत्ता कळसास पोहोंचली. त्यावेळीं त्यांच्या राज्यांत हल्लींचा सर्व मद्रास इलाखा, म्हैसूर, कुर्ग व सिलोनचा उत्तर भाग, एवढ्या प्रदेशाचा समावेश झाला होता. राजराजाच्या सैन्याचा सरंजाम व त्याची तयारी ही फार उच्च प्रकारची असून सैन्यांत घोडेस्वार, पायदळ, व गोलंदाज यांच्या तुकड्या केलेल्या होत्या. त्यानें लागवडीखालच्या सर्व जमिनीची मोजणी करून तिचा सारा ठरविला व देवालयें आणि सार्वजनिक इमारती बांधून तंजावर सुशोभित केलें. त्याच्या कारकीर्दीत दिवाणी कारभाराचीहि व्यवस्था नीट लावण्यांत आली. प्रत्येक गांवांत अगर ग्रामसमूहांत स्थानिक अधिकाऱ्यांच्या देखरेखीखालीं एक महासभा असून, गांवासंबंधीं सर्व प्रकारच्या बाबतींत तिला पूर्ण बहुतेक अधिकार असत. कांहीं ग्रामसमूह मिळून एक जिल्हा व कांहीं जिल्हे मिळून एक प्रांत होत असे. चोलांच्या राज्यांत असे सहा प्रांत होते. राजराजानें स्थापन केलेलें राज्य त्याच्या मृत्यूनंतर पुष्कळ काळपर्यंत कायम राहिलें. राजराज चोळ व त्याच्या मागून गादीवर बसलेले राजे, त्याच्याप्रमाणेंच शूर व राज्यकारभारदक्ष होते. कावेरी व कोलेरून नद्यांनां विभक्त करणारा मोठा बंधारा त्यांनींच बांधला.

तेराव्या शतकांत चोलांच्या इतर मुलुखावरोबर तंजावरहि द्वारसमुद्राच्या होयसळ बल्लाळांच्या आणि मदुरा येथील पांड्यांच्या अंमलाखालीं गेलें. चवदाव्या शतकाच्या अखेरीस उदयोन्मुख विजयनगरच्या राज्यांत सामील होण्यापूर्वी, हा जिल्हा सर्व दक्षिणेबरोबर मलिक काफूरच्या मागून आलेल्या मुसुलमानांच्या स्वाऱ्यांनां बळी पडला असावा. सोळाव्या शतकांत विजयानगरच्या एका सेनापतीनें आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें व त्याच्या नंतरच्या पुरुषानें १८ शतकाच्या प्रारंभीच्या वर्षांत तंजावर येथें नायक

स्थापन केलें. ह्या घराण्यांतील राजांनीं जिल्ह्यांतील बहुतेक किल्ले व वैष्णव मंदिरें बांधिलीं आहेत. नायक घराण्यांतील शेवटल्या राजाला मदुरा नायक चोक्कनाथ यानें स.१६६२ त वेढा दिला; त्यावेळीं बचाव करणें अशक्य आहे असें पाहून त्यानें राजवाडा व झनाना उडवून दिला, व आपण आपल्या पुत्रांसह वेढा देणाऱ्या लोकांवर तुटून पडून लढतां लढतां मरण पावला. तथापि त्याचा एक लहान मुलगा वचावला; मुलाच्या अनुयायांनीं विजापूरच्या मुसुलमान राजाची मदत मागितल्यावरून विजापूरहून शिवाजीचा सावत्र भाऊ व्यंकोजी यास तंजावरवर पाठविण्यांत आलें व्यंकोजीनें प्रथम बाल नायकाला गादीवर बसविलें. परंतु पुढें लवकरच ती गादी आपण स्वतः बळकावून तेथें मराठी घराण्याची त्यानें स्थापना केली. अठराव्या शतकाच्या अखेरपर्यंत या घराण्याची सत्ता कायम होती. पहिलीं सुमारें सत्तर वर्षे मात्र मुसुलमानांशीं त्यांचें वतेन सलोख्याचें असून त्यांनां ते खंडणी देत असत.

स. १७४९ त येथील गादीसंबंधीं तंटा चालू असतां इंग्रजांनीं एक पक्ष स्वीकारून देवी कोट्टईवर हल्ला केला व अखेर तें गांव घेतलें. कर्नाटकच्या युद्धांत राजा इंग्रज व महंमद अल्ली यांच्या बाजूला मिळाला होता परंतु एकंदरींत त्यानें युद्धांत फारसा भाग घेतला नाहीं. पुढें १७७३ सालीं राजा हैदरअल्ली व मराठे यांजबरोबर कांहीं मसलत करीत आहे असें वाटल्यावरून इंग्रजांनीं तंजावर आपल्या ताब्यांत घेतलें. परंतु १७७६ त कंपनीशीं झालेल्या तहान्वयें तें परत करण्यांत आलें. स. १७९९ त सरफोजी राजानें आपला सर्व मुलुख कंपनीच्या हवालीं करून आपण पेन्शन घेतलें. १८५५ सालीं सरफोजीचा मुलगा शिवाजी हा निपुत्रिक वारल्यामुळें तंजावर गांव व किल्लाहि ब्रिटिशांच्या ताब्यांत गेला. या जिल्ह्यांत पुराणवस्तुसंशोधकांच्या दृष्टीनें महत्त्वाचीं ठिकाणें म्हणजे तेथील धार्मिक इमारती होत. सर्व देवालयांत तंजावर येथील पहिल्या राजराजानें बांधलेलें मंदिर महत्त्वाचें आहे.

*लोकसंख्याः*—सर्व इलाख्यांत ह्या जिल्ह्याची लोकवस्ती फार दाट असून,घनतेचें प्रमाण द. चौ. मैलास ६०५ लोक असें आहे. जिल्ह्यांत लहान मोठीं २५२९ गांवें आहेत. एकंदर लो. सं. ( १९२१) २३२६२६५. पैकीं शें. ९१ हिंदू, शें. ५मुसुलमान व शें. ४ ख्रिस्ती आहेत. जिल्ह्यांतील बायकांचें पुरुषांशीं प्रमाण ११:१० असें आहे. याचें कारण येथून ब्रह्मदेश, सीलोन, वगैरे ठिकाणीं पुष्कळ लोक जातात व बरोबर स्त्रिया नेत नाहींत हें होय. जिल्ह्यांत सर्वत्र तामीळ

रांच्या खोऱ्यांत मुख्यतः भाताची लागवड होते, व इतर भागांत वरगू नांवाचें धान्य सर्वांत ज्यास्त पिकतें. शेतीकरितां लागणाऱ्या पाण्याचा बहुतेक पुरवठा कावेरी व तिच्या शाखांपासून होतो. जिल्ह्याच्या उत्तर मर्यादेवरून वाहणारी कोलेरून ही कावेरीची शाखा असून तिचा प्रवाह मुख्य पात्रापेक्षां सखल जागेवरून वहात असल्यामुळें कावेरीचें बरेंच पाणी कोलेरूनमधून जात असे. याकरितां दोन मोठे बांध किंवा धरणें घालून कावेरीच्या पाण्याचा उपयोग तंजावर जिल्ह्यांतील शेतीकरितां करून घेण्यांत आलेला आहे. या जिल्ह्यांत महत्त्वाचीं जंगलें मुळींच नाहींत. वल्लम येथें गार सांपडते व जिल्ह्याच्या नैर्ऋत्य भागांत लॅटराइट व चुनखडी हीं मुबलक आहेत. तंजावर तालुक्यांत पिंवळी काव व नागोरजवळ शिरगोळा हे खनिज सांपडतात.

*व्यापार व दळणवळणः*—विणकाम व धातुकाम हे येथील मुख्य उद्योगधंदे आहेत. एके काळीं तंजावरचें रेशमी कापड प्रसिद्ध असे; परंतु कृत्रिम रंग निघाल्यापासून आणि स्वस्त विलायती माल मिळूं लागल्यापासून हा धंदा बहुतेक बसला आहे. कोर्नाद व अय्यंमपेट्टाई हीं गांवें रेशमी कापड आणि गालीचे यांकरितां प्रसिद्ध होतीं. तंजावर व कुंभकोणम येथें अद्यापहि काशिद्याचें व जरीचें काम चांगलें होते. दक्षिणेंत तंजावरच्या तोडीचें धातुकाम मदुरेखेरीज इतर कोठेंहि होत नाहीं. मदुरेंतील कारागीर फक्त पितळेचें काम करितात; परंतु तंजावरमध्यें पितळ, तांबें व रुपें या तिन्हीहि धातूंचा उपयोग केला जातो. या धातूंच्या देवाच्या मूर्ती व इतर नक्षीदार जिन्नस तयार केले जातात. तंजावर शहर, कुंभकोणम व मन्नारगुडी हीं धातुकामाचीं मुख्य ठिकाणें होत. इतर किरकोळ धंद्यांपैकीं पिसानतूरचें काचेचें काम आणि वाद्यें व खेळणीं तयार करण्याच्या कारखान्यांचा उल्लेख करणें जरूर आहे. कलाकौशल्याच्या कामाखेरीज, केवळ कारखाने असे तंजावरमध्यें फारसे नाहींत.

*तंजावर जिल्हा समुद्रकांठीं असून त्यांतून रेल्वेचे फांटे* पुष्कळ गेलेले असल्यामुळें तो व्यापारदृष्ट्या फार सोयीचा आहे. त्यांत एकंदर १५ बंदरें असून नेगापट्टम् हें सर्वांत महत्त्वाचें आहे. त्रांकिबार, नागोर, ( नगावर? ) मुत्तुपेट, अदिरांपट्टम, व अम्मपट्टम हीं बंदरेंहि साधारण बरीं आहेत. नेनापट्टम खेरीज, तंजावर, कुंभकोणम, मायावरम, व मन्नारगुडी हीं दुसरीं व्यापाराचीं ठिकाणें आहेत. खुष्कीनें व जलमार्गानें होणारा बहुतेक व्यापार चेट्टी व मुसुलमान

डाळी, वगैरे जिन्नस येतात. तुतिकोरीन बंदर झाल्यापासून या जिल्ह्याचा समुद्रावरून होणारा व्यापार कमी झाला आहे.

साक्षरतेच्या बाबतींत तंजावर जिल्ह्याचा नंबर मद्रास शहरच्या खालोखाल लागत असून, शें. २०·३ पुरुषांना व शें. ०. ९ स्त्रियांना लिहितां वाचतां येतें. १९०४ सालीं जिल्ह्यांत ११८२ प्राथमिक शाळा, ७८ दुय्यम शाळा, ७ विशिष्ट शाळा, ३ शिक्षकांच्या शाळा, व ३ आर्टस कॉलेजें होतीं. या जिल्ह्यांत स्थानिक बोर्डें व म्युनिसिपालीटया यांनीं चालविलेलीं १६ रुग्णालयें व २२ दवाखाने आहेत. तंजावर शहरच्या रुग्णालयाला एक मेडिकल स्कूल जोडलेलें आहे.

ता लु का.—मद्रास इलाख्यांत तंजावर जिल्ह्याचा पश्चिम तालुका व पोटविभाग. क्षे. फ. ६८९ चौ. मै. आहे. लो. सं. ( १९०१ ) ४०७०३९. यांत ३६२ खेडीं व तंजावर शहर ( जिल्ह्याचें आणि तालुक्याचें मुख्य ठिकाण ), तिरुवाडी हें पवित्र गांव, कलेक्टरचें राहण्याचें ठिकाण वल्लम, व गालिचाकरितां प्रसिद्ध असलेलें अय्यंपेट्टई अशीं चार मोठीं गांवें आहेत. या तालुक्यांत कल्लण नांवाचे चोऱ्या करणारे लोक फार आहेत. यांत तांदूळ, कंवू, रगी, भुईमूग, तांवडा हरभरा, वगैरे पिकें होतात.

श ह र.—मद्रास इलाख्यांत याच नांवाच्या जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें शहर साऊथ इंडियन रेल्वेच्या मुख्य फांटयावर मद्रासपासून २१६ मैल व तुतिकोरीनपासून २२६ मैल अंतरावर आहे. लो. सं. ( १९२१ ) ५९९१३. तंजावर हें मद्रास इलाख्यांतलि आठवें मोठें शहर आहे. तंजावर हें अनुक्रमानें चोल, नायक व मराठे लोकांचें राजधानीचें ठिकाण होतें. या शहराला, १७४९ सालीं फ्रेंच व चंदासाहेब यांनीं आणि १७५८ सालीं लालीच्या हाताखालीं फ्रेंचांनीं वेढा दिला होता; परंतु ते वेढे निष्फळ झाले. सं.१७७३ त कर्नल जोसेफ स्मिथ यानें हें शहर काबीज केलें व स. १७७६ त तें पुन्हां महाराजाकडे देण्यांत आलें. स.१७९९ त तंजावरचा राजा सरभोजी यानें आपला सर्व मुलूख इंग्रजांनां दिला त्यावेळीं तंजावर शहर मात्र आपल्या ताब्यांत ठेविलें होतें; त्याचा मुलगा १८५५ सालीं निपुत्रिक वारल्यावर तेंहि इंग्रजांच्या राज्यांत सामील झालें. राजाच्या चार राण्या व कुटुंबांतील इतर मंडळी, किल्ल्याच्या मध्यभागीं असलेल्या राजवाड्यांत रहात असत ( १९०८ ). राजवाड्यांत मराठे व नायक यांचे दरबारी दिवाणखाने, शस्त्रागार व निरनिराळ्या भाषांतील २२००० पुस्तकें असलेलें वाचनालय हीं आहेत.

किल्ल्याचा तट पाडून टाकलेला आहे. किल्ल्याच्या आंतल्या बाजूला शिवगंगा नांवाचा लहानसा किल्ला असून त्यांत शिवगंगा टाकें, व बृहदीश्वर स्वामींचें प्रख्यात देवालय आहे. भिंतीवरील लेखावरून हें देऊळ ११ व्या शतकांत, चोल राजा पहिला राजराज यानें बांधलें असें समजतें. एतद्देशीय राजांच्या अमदानींत तंजावर हें कलांचें माहेरघर समजलें जात असे. अद्यापहि येथें कांहीं कुशल कारागीर आहेत. तंजावरसारखें धातुकाम व वाद्यें या इलाख्यांत बहुधां दुसऱ्या कोठेंहि होत नाहींत; व येथील रेशमी विणकाम, फीत, कशिद्याचें व जवाहिरी काम आणि कृत्रिम हार फार प्रसिद्ध आहेत.

तंजावर हें १८६० सालीं जिल्ह्याचें मुख्य ठिकाण झालें; व तेव्हांपासून येथें सर्व जिल्हा कामगार आहेत. उत्तरेकडील करंतत्तान नांवाच्या उपांत भागांत ब्राह्मणवसति असून आग्नेयीकडील मानंबुचावाडींत यूरोपियन लोक रहातात. येथें ख्रिस्ती लोकांच्या निरनिराळ्या धर्मपंथांच्या मिशनरी मंडळ्या आणि एस. पी. जी. मिशन सोसायटीचें कॉलेज, खासगी लोकांनीं चालविलेलें हायस्कूल, शिक्षकांकरितां ट्रेनिंग स्कूल व टेकनिकल इन्स्टिट्यूट या शिक्षणसंस्था आहेत. येथील म्युनिसिपालिटी १८६६ सालीं स्थापन झाली. १९०३–४ सालीं तिचें उत्पन्न १०३००० रु. होतें. वेन्नर नदीच्या पात्रांतील विहिरींचें पाणी पंपानें वर काढून शहराला दिलेलें आहे. किल्ल्याच्या भागांतील मैलमोऱ्यांचें काम १८४० सालीं राजाच्या वेळीं झालें. सार्वजनिक वर्गण्या गोळा करून १८८० सालीं स्थापन झालेल्या रुग्णालयाला मेडिकल स्कूल जोडलेलें आहे.

**तंजावरचें राजघराणें**—तंजावरच्या प्राचीन चोलराजांची माहिती ज्ञानकोशाच्या १३ व्या विभागांत चोल या नांवाखालीं दिली आहे; येथें भोंसले घराण्याची माहिती देण्यांत येत आहे. चोल राजे हे फार पूर्वीपासून इ. स. १२४४ पर्यंत राज्य करीत होते; त्यानंतर पाण्ड्य राजांनीं स. १५५९ पर्यंत आणि त्यांच्या मागून नायक राजांनीं स. १६७३ पर्यंत आपला अंमल चालविला; त्यांच्यानंतर भोंसले हे तंजावरचे राजे झाले.

मदुरा व तंजावर येथील नायक राजांत नेहमीं भांडणें होत. तंजावरचा शेवटचा नायक राजा विजयराघव होता; त्याच्यावर मदुरेच्या चोकनाथ नायकानें स्वारी करून त्यास लढाईंत ठार केलें. त्याचा मुलगा सेंगमल ( चेंगमल ) दास नांवाचा होता. त्यानें विजापुरास जाऊन चोकनाथाविरुद्ध आदिलशहाची मदत मागितली व शहानें शहाजीस तंजावरावर पाठविलें. त्यानें चोकनाथापासून तंजावर काबीज करून सेंगमल यास नेमणूक करून देऊन तो सर्व प्रांत आपल्या हाताखालीं घालून त्या प्रांतांतील विष्णुपूर, कावेरीपट्टण, श्रीरंगपट्टण, चंदी, मदुरा, वालगुंडपुर वगैरे ठिकाणचे नायक राजे जिंकले ( १६३७–४८ ) आणि देशाची जमाबंदी करून व धारे ठरवून सर्वत्र उत्तम व्यवस्था लाविली. या सुमारास शहाजीचा मुलगा संभाजी हा कनकगिरीच्या पाळेगारांचें बंड मोडण्यास गेला असतां लढाईंत मारला गेला. शहाजीनें आपल्या आयुष्याचीं शेवटचीं दहा वर्षें तंजावर व बंगलूर

स्थापन केलें. ह्या घराण्यांतील राजांनीं जिल्ह्यांतील बहुतेक किल्ले व वैष्णव मंदिरें बांधिलीं आहेत. नायक घराण्यांतील शेवटल्या राजाला मदुरा नायक चोक्कनाथ यानें स.१६६२ त वेढा दिला; त्यावेळीं बचाव करणें अशक्य आहे असें पाहून त्यानें राजवाडा व झनाना उडवून दिला, व आपण आपल्या पुत्रांसह वेढा देणाऱ्या लोकांवर तुटून पडून लढतां लढतां मरण पावला. तथापि त्याचा एक लहान मुलगा बचावला; मुलाच्या अनुयायांनीं विजापूरच्या मुसुलमान राजाची मदत मागितल्यावरून विजापूरहून शिवाजीचा सावत्र भाऊ व्यंकोजी यास तंजावरवर पाठविण्यांत आलें व्यंकोजीनें प्रथम बाल नायकाला गादीवर बसविलें. परंतु पुढें लवकरच ती गादी आपण स्वतः बळकावून तेथें मराठी घराण्याची त्यानें स्थापना केली. अठराव्या शतकाच्या अखेरपर्यंत या घराण्याची सत्ता कायम होती. पहिलीं सुमारें सत्तर वर्षें मात्र मुसुलमानांशीं त्यांचें वर्तन सलोख्याचें असून त्यांनां ते खंडणी देत असत.

स. १७४९ त येथील गादीसंबंधीं तंटा चालू असतां इंग्रजांनीं एक पक्ष स्वीकारून देवी कोट्टईवर हल्ला केला व अखेर तें गांव घेतलें. कर्नाटकच्या युद्धांत राजा इंग्रज व महंमद अल्ली यांच्या बाजूला मिळाला होता परंतु एकंदरींत त्यानें युद्धांत फारसा भाग घेतला नाहीं. पुढें १७७३ सालीं राजा हैदरअल्ली व मराठे यांजबरोबर कांहीं मसलत करीत आहे असें वाटल्यावरून इंग्रजांनीं तंजावर आपल्या ताब्यांत घेतलें. परंतु १७७६ त कंपनीशीं झालेल्या तहान्वयें तें परत करण्यांत आलें. स. १७९९ त सरफोजी राजानें आपला सर्व मुलुख कंपनीच्या हवालीं करून आपण पेन्शन घेतलें. १८५५ सालीं सरफोजीचा मुलगा शिवाजी हा निपुत्रिक वारल्यामुळें तंजावर गांव व किल्लाहि ब्रिटिशांच्या ताब्यांत गेला. या जिल्ह्यांत पुराणवस्तुसंशोधकांच्या दृष्टीनें महत्त्वाचीं ठिकाणें म्हणजे तेथील धार्मिक इमारती होत. सर्व देवालयांत तंजावर येथील पहिल्या राजराजानें बांधलेलें मंदिर महत्त्वाचें आहे.

लोकसंख्याः—सर्व इलाख्यांत ह्या जिल्ह्याची लोकवस्ती फार दाट असून,घनतेचें प्रमाण द. चौ. मैलास ६०५ लोक असें आहे. जिल्ह्यांत लहान मोठी २५२९ गांवें आहेत. एकंदर लो. सं. ( १९२१ ) २३२६२६५. पैकीं शें. ९१ हिंदू, शें. ५मुसुलमान व शें. ४ ख्रिस्ती आहेत. जिल्ह्यांतील बायकांचें पुरुषांशीं प्रमाण ११:१० असें आहे. याचें कारण येथून ब्रह्मदेश, सीलोन, वगैरे ठिकाणीं पुष्कळ लोक जातात व बरोबर स्त्रिया नेत नाहींत हें होय. जिल्ह्यांत सर्वत्र तामीळ भाषा चालते. केवळ शेतीवर उदरनिर्वाह करणारा वर्ग या जिल्ह्यांत इतर ठिकाणच्या मानानें कमी आहे; याचें कारण पुष्कळ लोक व्यापार, सोनारकाम वगैरे किरकोळ धंद्यांवर चरितार्थ चालवितात.

शेतीः—या जिल्ह्यांत मुख्यतः रयतवारी पद्धत चालू असून कांहीं जमीनदारी व इनामी जमिनीहि आहेत. कावेरीच्या खोऱ्यांत मुख्यतः भाताची लागवड होते, व इतर भागांत वरगू नांवाचें धान्य सर्वांत ज्यास्त पिकतें. शेतीकरितां लागणाऱ्या पाण्याचा बहुतेक पुरवठा कावेरी व तिच्या शाखांपासून होतो. जिल्ह्याच्या उत्तर मर्यादेवरून वाहणारी कोलेरून ही कावेरीची शाखा असून तिचा प्रवाह मुख्य पात्रापेक्षां सखल जागेवरून वहात असल्यामुळें कावेरीचें बरेंच पाणी कोलेरूनमधून जात असे. याकरितां दोन मोठे बांध किंवा धरणें घालून कावेरीच्या पाण्याचा उपयोग तंजावर जिल्ह्यांतील शेतीकरितां करून घेण्यांत आलेला आहे. या जिल्ह्यांत महत्त्वाचीं जंगलें मुळींच नाहींत. वल्लम येथें गार सांपडते व जिल्ह्याच्या नैर्ऋत्य भागांत लॅटराइट व चुनखडी हीं मुबलक आहेत. तंजावर तालुक्यांत पिंवळी काव व नागोरजवळ शिरगोळा हें खनिज सांपडतात.

व्यापार व दळणवळणः—विणकाम व धातुकाम हे येथील मुख्य उद्योगधंदे आहेत. एके काळीं तंजावरचें रेशमी कापड प्रसिद्ध असे; परंतु कृत्रिम रंग निघाल्यापासून आणि स्वस्त विलायती माल मिळूं लागल्यापासून हा धंदा बहुतेक बसला आहे. कोर्नाद व अय्यंमपेट्टाई हीं गांवें रेशमी कापड आणि गालीचे यांकरितां प्रसिद्ध होतीं. तंजावर व कुंभकोणम येथें अद्यापहि कशिद्याचें व जरीचें काम चांगलें होतें. दक्षिणेंत तंजावरच्या तोडीचें धातुकाम मदुरेखेरीज इतर कोठेंहि होत नाहीं. मदुरेंतील कारागीर फक्त पितळेचें काम करितात; परंतु तंजावरमध्यें पितळ, तांबें व रुपें या तिन्हीहि धातूंचा उपयोग केला जातो. या धातूंच्या देवाच्या मूर्ती व इतर नक्षीदार जिन्नस तयार केले जातात. तंजावर शहर, कुंभकोणम व मन्नारगुडी हीं धातुकामाचीं मुख्य ठिकाणें होत. इतर किरकोळ धंद्यांपैकीं पिसानतूरचें काशाचें काम आणि वाद्यें व खेळणीं तयार करण्याच्या कारखान्यांचा उल्लेख करणें जरूर आहे. कलाकौशल्याच्या कामाखेरीज, केवळ कारखाने असे तंजावरमध्यें फारसे नाहींत.

तंजावर जिल्हा समुद्रकांठीं असून त्यांतून रेल्वेचे फांटे पुष्कळ गेलेले असल्यामुळें तो व्यापारदृष्ट्या फार सोयीचा आहे. त्यांत एकंदर १५ बंदरें असून नेगापट्टम् हें सर्वांत महत्त्वाचें आहे. त्रांक्विबार, नागोर, ( नगावर? ) मुत्तुपेट, अदिरांपट्टम, व अम्मपट्टम हीं बंदरेंहि साधारण बरीं आहेत. नेगापट्टम खेरीज, तंजावर, कुंभकोणम, मायावरम, व मन्नारगुडी हीं दुसरीं व्यापाराचीं ठिकाणें आहेत. खुष्कीनें व जलमार्गानें होणारा बहुतेक व्यापार चेट्टी व मुसुलमान लोकांच्या हातीं आहे.

तांदूळ, विड्याचीं पानें, भुईमुगाच्या शेंगा, धातूंचीं भांडीं व कापड हे खुष्कीमार्गानें जाणारे मुख्य निर्गत जिन्नस आहेत. तुतिकोरीनहून मीठ; म्हैसूर व तिनेवल्लीहून सरकी, मद्रासहून राकेल; पश्चिम किनाऱ्यावरून चिंच व इमारती लांकूड; आणि आजूबाजूच्या जिल्ह्यांतून तूप, मिरची,

डाळी, वगैरे जिन्नस येतात. तुतिकोरीन बंदर झाल्यापासून या जिल्ह्याचा समुद्रावरून होणारा व्यापार कमी झाला आहे.

साक्षरतेच्या बाबतींत तंजावर जिल्ह्याचा नंबर मद्रास शहरच्या खालोखाल लागत असून, शें. २०·३ पुरुषांनां व शें. ०. ९ स्त्रियांनां लिहितां वाचतां येतें. १९०४ सालीं जिल्ह्यांत ११८२ प्राथमिक शाळा, ७८ दुय्यम शाळा, ७ विशिष्ट शाळा, ३ शिक्षकांच्या शाळा, व ३ आर्टस कॉलेजें होतीं. या जिल्ह्यांत स्थानिक बोर्डे व म्युनिसिपालीटया यांनीं चालविलेलीं १६ रुग्णालयें व २२ दवाखाने आहेत. तंजावर शहरच्या रुग्णालयाला एक मेडिकल स्कूल जोडलेलें आहे.

ता लु का.—मद्रास इलाख्यांत तंजावर जिल्ह्याचा पश्चिम तालुका व पोटविभाग. क्षे. फ. ६८९ चौ. मै. आहे. लो. सं. ( १९०१ ) ४०७०३९. यांत ३६२ खेडीं व तंजावर शहर ( जिल्ह्याचें आणि तालुक्याचें मुख्य ठिकाण ), तिरुवाडी हें पवित्र गांव, कलेक्टरचें राहण्याचें ठिकाण वल्लम, व गालिचाकरितां प्रसिद्ध असलेलें अय्यंपेट्टई अशीं चार मोठीं गांवें आहेत. या तालुक्यांत कल्लण नांवाचे चोऱ्या करणारे लोक फार आहेत. यांत तांदूळ, कंबू, रगी, मुर्द्दमूग, तांबडा हरभरा, वगैरे पिकें होतात.

श ह र.—मद्रास इलाख्यांत याच नांवाच्या जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें शहर साऊथ इंडियन रेल्वेच्या मुख्य फांट्यावर मद्रासपासून २१६ मैल व तुतिकोरीनपासून २२६ मैल अंतरावर आहे. लो. सं. ( १९२१ ) ५९९१२. तंजावर हें मद्रास इलाख्यांतील आठवें मोठें शहर आहे. तंजावर हें अनुक्रमानें चोल, नायक व मराठे लोकांचें राजधानीचें ठिकाण होतें. या शहराला, १७४९ सालीं फ्रेंच व चंदासाहेब यांनीं आणि १७५८ सालीं लालीच्या हाताखालीं फ्रेंचांनीं वेढा दिला होता; परंतु ते वेढे निष्फळ झाले. स. १७७३ त कर्नल जोसेफ स्मिथ यानें हें शहर काबीज केलें व स. १७७६ त तें पुन्हां महाराजाकडे देण्यांत आलें. स. १७९९ त तंजावरचा राजा सरभोजी यानें आपला सर्व मुलुख इंग्रजांनां दिला त्यावेळीं तंजावर शहर मात्र आपल्या ताब्यांत ठेविलें होतें; त्याचा मुलगा १८५५ सालीं निपुत्रिक वारल्यावर तेंहि इंग्रजांच्या राज्यांत सामील झालें. राजाच्या चार राण्या व कुटुंबांतील इतर मंडळी, किल्ल्याच्या मध्यभागीं असलेल्या राजवाड्यांत रहात असत ( १९०८ ). राजवाड्यांत मराठे व नायक यांचे दरबारी दिवाणखाने, शस्त्रागार व निरनिराळ्या भाषांतील २२००० पुस्तकें असलेलें वाचनालय हीं आहेत.

किल्ल्याचा तट पाडून टाकलेला आहे. किल्ल्याच्या आंतल्या बाजूला शिवगंगा नांवाचा लहानसा किल्ला असून त्यांत शिवगंगा टाकें, व बृहदीश्वर स्वामींचें प्रख्यात देवालय आहे. भिंतीवरील लेखावरून हें देऊळ ११ व्या शतकांत, चोल राजा पहिला राजराज यानें बांधलें असें समजतें. एतद्देशीय राजांच्या अमदानींत तंजावर हें कलांचें माहेरघर समजलें जात असे. अद्यापहि येथें कांहीं कुशल कारागीर आहेत. तंजावरसारखें धातुकाम व वाद्यें या इलाख्यांत बहुधां दुसऱ्या कोठेंहि होत नाहींत; व येथील रेशमी विणकाम, फीत, कशिद्याचें व जवाहिरी काम आणि कृत्रिम हार फार प्रसिद्ध आहेत.

तंजावर हें १८६० सालीं जिल्ह्याचें मुख्य ठिकाण झालें; व तेव्हांपासून येथें सर्व जिल्हा कामगार आहेत. उत्तरेकडील करंतत्तान नांवाच्या उपांत भागांत ब्राह्मणवसति असून आग्नेयीकडील मानंबुचावाडींत यूरोपियन लोक रहातात. येथें ख्रिस्ती लोकांच्या निरनिराळ्या धर्मपंथांच्या मिशनरी मंडळ्या आणि एस. पी. जी. मिशन सोसायटीचें कॉलेज, खासगी लोकांनीं चालविलेलें हायस्कूल, शिक्षकाकरितां ट्रेनिंग स्कूल व टेकनिकल इन्स्टिट्यूट या शिक्षणसंस्था आहेत. येथील म्युनिसिपालिटी १८६६ सालीं स्थापन झाली. १९०३–४ सालीं तिचें उत्पन्न १०३००० रु. होतें. वेन्नर नदीच्या पात्रांतील विहिरींचें पाणी पंपानें वर काढून शहराला दिलेलें आहे. किल्ल्याच्या भागांतील मैलमोऱ्यांचें काम १८४० सालीं राजाच्या वेळीं झालें. सार्वजनिक वर्गण्या गोळा करून १८८० सालीं स्थापन झालेल्या रुग्णालयाला मेडिकल स्कूल जोडलेलें आहे.

**तंजावरचें राजघराणें**—तंजावरच्या प्राचीन चोलराजांची माहिती ज्ञानकोशाच्या १३ व्या विभागांत चोल या नांवाखालीं दिली आहे; येथें भोंसले घराण्याची माहिती देण्यांत येत आहे. चोल राजे हे फार पूर्वीपासून इ. स. १२४४ पर्यंत राज्य करीत होते; त्यानंतर पाण्ड्य राजांनीं स. १५५९ पर्यंत आणि त्यांच्या मागून नायक राजांनीं स. १६७३ पर्यंत आपला अंमल चालविला; त्यांच्यानंतर भोंसले हे तंजावरचे राजे झाले.

मदुरा व तंजावर येथील नायक राजांत नेहमीं भांडणें होत. तंजावरचा शेवटचा नायक राजा विजयराघव होता; त्याच्यावर मदुरेच्या चोकनाथ नायकानें स्वारी करून त्यास लढाईंत ठार केलें. त्याचा मुलगा सेंगमल ( चेंगमल ) दास नांवाचा होता. त्यानें विजापुरास जाऊन चोकनाथाविरुद्ध आदिलशहाची मदत मागितली व शहानें शहाजीस तंजावरावर पाठविलें. त्यानें चोकनाथापासून तंजावर काबीज करून सेंगमल यास नेमणूक करून देऊन तो सर्व प्रांत आपल्या हाताखालीं घालून त्या प्रांतांतील विधुपूर, कावेरीपट्टण, श्रीरंगपट्टण, चंदी, मदुरा, बाळगुंडपुर वगैरे ठिकाणचे नायक राजे जिंकले ( १६३७–४८ ) आणि देशाची जमाबंदी करून व धारे ठरवून सर्वत्र उत्तम व्यवस्था लाविली. या सुमारास शहाजीचा मुलगा संभाजी हा कनकगिरीच्या पाळेगाराचें बंड मोडण्यास गेला असतां लढाईंत मारला गेला. शहाजीनें आपल्या आयुष्याचीं शेवटचीं दहा वर्षे तंजावर व बंगळूर.

येथें आपला मुलगा व्यंकोजी याच्यासह काढिली. पुढें वेदनूरच्या नायकावर स्वारी करण्यास जात असतां शहाजी हा वाटेंत मरण पावला व व्यंकोजी हा जहागिरीचा मुख्य मालक झाला (१६६४).

व्यंकोजी (१६३१–१६८२).—याची आई तुकाबाई मोहिते. ही शहाजीची दुसरी स्त्री; तिच्या पोटीं व्यंकोजी १६३१ सालीं जन्मला. याला येकोजी असेंहि म्हणत. याच्या लहानपणची हकीकत चांगलीशी सांपडत नाहीं. शहाजी हा बेंगरुळास असतांना, व्यंकोजी त्याच्या जवळ असे; त्यामुळें त्याला राज्यकारभाराचें ज्ञान आपोआप झालें. शहाजी धरला गेला असतां, व्यंकोजी हा वडीलभाऊ संभाजी याच्या नजरेखालीं बेंगरूळासच होता. पुढें शहाजी सुटून आल्यावर व्यंकोजी व त्याची आई वगैरे मंडळी कांहीं दिवस पुण्याकडे शिवाजीपाशीं राहिली होती. बाप मरण पावल्यावर त्याची जहागीर व्यंकोजीला आदिलशहानें कायम केली. पुढें व्यंकोजीनें त्रिचनापल्लीच्या नायकाचा पराभव करून तिकडील दंगेधोपे मोडले. शहाजीनें जरी तंजावर आपल्या जहागिरीस जोडलें होतें, तरी सेंगमल हा तेथें नेमणूक घेऊन राहत होता. यावेळीं त्याच्यावर त्रिचनापल्लीच्या नायकानें स्वारी केली, तेव्हां वरीलवशी खंडणी देण्याच्या करारानें त्यानें व्यंकोजीस मदतीस बोलाविलें. व्यंकोजीनें जाऊन त्रिचनापल्लीकरास हांकून लाविलें. परंतु ठरल्याप्रमाणें सेंगमल हा खंडणी देईना, एवढेंच नव्हे तर उलट तो व्यंकोजीला दगा करण्याचा बेत करूं लागला; तेव्हां व्यंकोजीनें त्याच्यावर चाल करून त्याला लढाईंत ठार करून तंजावर काबीज केलें (१६७४) व तेथें पुढील सालीं चैत्रांत स्वतःस राज्याभिषेक करविला. तत्पूर्वी जेव्हां शिवाजीनें औरंझेबातर्फे म्हणून आदिलशाहीवर स्वारी केली होती, तेव्हां व्यंकोजी हा आदिलशहाच्या बाजूनें शिवाजीवर चालून गेला होता; परंतु त्यांचें युद्ध होण्यापूर्वीच शिवाजी आग्र्याकडे गेला (१६६५ नोव्हेंबर). त्रिचनापल्लीकराप्रमाणें व्यंकोजीनें मदुरा, रामनाथ वगैरे ठिकाणच्या नायकांना जिंकून आपलें राज्य वाढविलें. याप्रमाणें संपत्ति व प्रभुत्व मिळाल्यानें व्यंकोजी गर्विष्ठ बनला व (मुत्सद्दी नसल्यानें) हलक्या लोकांच्या नादीं लागला. बापाच्या वेळच्या रघुनाथपंत हणमंत्यासारख्या मुत्सद्यांच्या सल्ल्यानें न चालतां तो मुसुल्मान लोकांच्या मताप्रमाणें चालू लागला. शिवाजीसारखें हिंदु राज्य स्थापण्याचें किंवा निदान शिवाजीला त्या कालीं मदत करण्याचेंहि त्याच्या मनीं येईना.मुसुलमान बादशाहीचाच त्याच्या मनावर पगडा बसला होता, त्यामुळें रघुनाथपंतानें शिवाजीचा कित्ता गिरविण्याबद्दलचा केलेला उपदेश त्यानें ऐकला नाहीं; उलट त्याचा अपमान केला. तेव्हां 'आम्ही सेवक खरें, पण तुमच्या अर्ध्या आसनीं बसण्यास योग्य आहों, असें स्पष्ट बोलून पंतानें शिवाजीकडे, व्यंकोजीपासून भाऊपणाचा वांटा मागण्याचें व या निमित्तानें दक्षिणदिग्विजय करण्याचें राजकारण केलें. शिवाजीनें प्रथम सौम्यपणें व्यंकोजीस आपला वांटा देण्याबद्दल व मुसुलमानांना हुसकावून आपल्यासारखें स्वतंत्र बनण्याबद्दल उपदेश केला; पण त्यानें तिकडे दुर्लक्ष्य केलें. अखेर रघुनाथपंताच्या म्हणण्याप्रमाणें शिवाजी हा कर्नाटकच्या स्वारीस निघाला. (१६७६) प्रथम व्यंकोजीचा बेत मदुरेचा नायक व आपले मुसुलमान सरदार यांच्यासह शिवाजीशीं लढाई करावी असा होता; परंतु शिवाजीनें धडाक्यांत कर्नाटकाचा बराचसा भाग काबीज केलेला पाहून हे लोक घाबरले. अखेर व्यंकोजी त्रिमलवाडीस शिवाजीस येऊन भेटला. त्याचा आदर करून शिवाजीनें आपला वांटा मागितला, परंतु तो कबूल होईना. तेव्हां त्याला तंजावरास पाठवून आपले हंबीररावादि लोक या नवीन घेतलेल्या प्रांतांवर नेमून शिवाजी परत गेला. त्याबरोबर लागलीच व्यंकोजीनें हंबीरराव मोहित्यावर स्वारी केली, तींत त्याचाच पराभव झाला. हें ऐकून शिवाजीनें त्याला सांत्वनपर व वांटा देण्याबद्दलचीं पत्रें पाठविलीं. हीं पत्रें फार महत्त्वाचीं आहेत. त्यांत शिवाजीनें आपल्या हिंदु राज्यस्थापनेच्या हेतूचीं कारणें उघड दिलेलीं आहेत; परंतु व्यंकोजीनें तिकडे दुर्लक्ष्य केलें. शेवटीं त्याची राणी दीपाबाई हिनें त्याला बोध करून मार्गावर आणिलें; तेव्हां त्यानें रघुनाथपंतास बोलावून आणून राज्याची वांटणी केली. हा वांटणीचा तह एकोणीस कलमी आहे.त्यांत हिंदुद्वेषी लोकांना राज्यांतून काढून द्यावें व विजापुरकरांचे मांडलीक राहूं नये अशी शिवाजीची व्यंकोजीला आज्ञा असून दीपाबाईनें केलेल्या कामगिरीबद्दल तिला पांच लाख होनांचा प्रांत चोळीबांगडीसाठीं, सात लाखांचा खुद्द व्यंकोजीस दूधभातासाठीं म्हणून शिवाजीनें इनाम दिला. या राजकारणामुळें शिवाजीनें व्यंकोजीस आपल्या कह्यांत आणून, त्याजवर आपल्या स्वराज्याचें वर्चस्व स्थापून, कर्नाटक व महाराष्ट्र या दोन्ही राज्यांचा एकजीव केला आणि तंजावरावरील आदिलशाहीचें सार्वभौमत्व नाहींसें केलें (१६७९). याच सुमारास विजापुरावर औरंगझेबाची स्वारी झाली व तेथील दिवाणानें शिवाजीस मदतीस बोलाविलें. त्याप्रमाणें शिवाजीनें जाऊन मोंगलांचा पराभव केला. यामुळें दिवाणानें कोपळ वगैरे प्रांत व द्रविड आणि तंजावर प्रांतांवरील सार्वभौमत्व आपण होऊन शिवाजीला देऊन टाकिलें. परंतु या सर्व कृत्यामुळें व्यंकोजी उदास बनून राज्यकारभार पाहीना. तेव्हां शिवाजीनें त्याला उपदेशपर पत्रें पाठविलीं. "शहाजीनें राज्य कसें मिळविलें तें पहा, आम्हींहि कोणे तऱ्हेनें राज्य मिळविलें तें लक्ष्यांत घ्या; कार्यप्रयोजनाचा उद्योग सोडून शरीराची उपेक्षा कां करितां ? आम्ही तुम्हांस वडील असतां चिंता कशाची करितां; हे कार्याचे दिवस आहेत, आम्हास तमाशा दाखवा, वैराग्य उत्तरवयीं करा" वगैरे उपदेश त्यांत आहे. त्याचा परिणाम होऊन व्यंकोजीनें उदासपणा सोडला. यानंतर थोड्याच दिवसांत व्यंकोजी नारला (१६८२). तो मानीव वैभवाचा विशेष तोरा बाळगणारा होता. शौर्य व साहस त्याच्या अंगीं होतें; परंतु

त्याचा बहुतेक काळ मुसुलमानांच्या सेवेंत गेल्यानें शिवाजीस स्वराज्यस्थापनेच्या कामीं त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं; उलट तो मुसुलमान सल्लागारांच्या मतानें वागे. असें असलें तरी तंजावर येथें त्यानें मराठ्यांची गादी स्वतंत्र स्थापिली हें विशेष केलें. शिवाजीस वांटा दिल्यानंतर त्यानें शांतपणें आपलें राज्य चालविलें.

व्यंकोजीला दीपाबाई, सईबाई व अनुबाई या तीन राण्या व नऊ नाटकशाळा होत्या. त्याला दीपाबाईच्या पोटीं शहाजी ( १६७१ ), शरफोजी ( १६७४ ) व तुकोजी ( १६७६ ) असे तीन पुत्र झाले; शिवाय चंद्रभान, सूर्यभान वगैरे नऊ लेकवळे नाटकशाळांपासून झाले; अनुबाईस दोन मुली झाल्या. व्यंकोजीच्या राज्याचे पांच सुभे ( त्रिवेदी, कुंभकोण, मायावर, मन्नारगुडी व पट्टकोटा ) असून, त्यांत ५७५३ गांवें होतीं आणि एकंदर वसूल २,४०,३७,५०० मणांचा ( भाताचा ) होता.

श हा जी (१६८२–१७११).—व्यंकोजीनंतर हा गादीवर आला. यानें आपली आई दीपाबाई व दोन्ही भाऊ यांच्या सल्लामसलतीनें कारभार शांतपणानें केला. त्याला चिमाबाई म्हणून एकच राणी होती; त्याला पुत्र झाला नाहीं. त्यानें कांहीं पाळेगारांचा पराभव करून आपलें राज्य थोडेसें वाढविलें. मध्यंतरीं त्यानें रायगडास संभाजीकडे ( १६७९ तील ) करारप्रमाणें वसूल पाठविला नाहीं; उलट त्याच्या विरुद्ध तो विजापूरकरांस मिळाला. तेव्हां संभाजीनें आपले सरदार पाठवून कर्नाटकचा वसूल उगवून घेतला. पुढें आदिलशाही बुडाल्यावर शहाजी आपणांस स्वतंत्र राजा म्हणवूं लागला. म्हैसूरकरानें त्याचा होस्टकोट परगणा उपटला; त्यावेळीं त्यानें संभाजीचा सरदार हरजी महाडीक याची मदत घेतली असती तर तो परगणा त्याला परत मिळता, परंतु अशानें आपली दुर्बलता दिसेल म्हणून शहाजीनें मदत मागितली नाहीं. तरी पण तो त्याच्याशीं मिळून मिसळून वागे. दीपाबाईहि त्याला पोक्त सल्ला देई. तो शहाणा व कर्तृत्ववान असल्यानें त्यानें व हरजीनें त्या भागांत मराठ्यांची सत्ता चांगली राखिली. अवरंगझेबाची फौज बंगरूळकडे फिरूं लागल्यावर ( १६८७ ) बंगरूळचें रक्षण करणें कठिण जाणून शहाजीनें तो प्रांत म्हैसूरकरास विकण्यास काढला; परंतु तितक्यांत अवरंगझेबाच्या सैन्यानें तो काबीज केला. यामुळें शहाजीचें फार नुकसान झालें. पुढें राजाराम जिंजीस आला तेव्हां याची त्याला मदत असे; त्यामुळें झुल्फिकारखानानें त्याच्यावर स्वारी करून त्याकडून अवरंगझेबाची ताबेदारी कबूल करविली व राजारामास मदत करणार नाहीं असें जबरीनें लिहून घेतलें ( १६९६ ). यापुढें शांतपणें राज्य करून शहाजी हा १७११ त वारला.

स र फो जी ( १७११–२८ ).—शहाजी निपुत्रिक असल्यानें त्याचा धाकटा भाऊ सरफोजी हा राजा झाला. परंतु त्याच्या कारकीर्दीची माहिती बिलकूल उपलब्ध नाहीं. मात्र तो शांत व निरुपद्रवी असून पाळेगारांचीं बंडें मोडण्यांत व अर्काटचा नवाब आणि त्रिचनापल्लीकर नायक यांजकडून आपलें राज्य राखण्यांत त्याचा काळ गेला. त्याचा धाकटा भाऊ तुकोजी हा याच्यापासून वेगळा निघून महादेव पट्टणास राही; त्यास संतति पुष्कळ होती. सरफोजीला सुलक्षणा, अपरूप व राजसबाई अशा तीन राण्या असून संतति झाली नाहीं. अपरूपबाईनें राज्यलोभानें गरोदर राहिल्याचें ढोंग करून नऊ महिन्यानंतर एक तोतया मुलगा निर्माण केला. पण हें सरफोजीस समजलें व त्याला तें न आवडून त्यानें त्याचा निकाल लाविला. शेवटीं १७२८ सालीं सरफोजी वारला व त्याच्या बरोबर सुलक्षणा व राजसबाई सती गेल्या.

तु को जी ( १७२८–३५ ).—सरफोजीनंतर हा गादीवर आला; याचीहि खात्रीलायक माहिती आढळत नाहीं. हा सरफोजीपेक्षां अधिक राजकारणी, कुशाग्र व विद्याभिलाषी होता. त्याला संस्कृत, तामील, मराठी व फारशी भाषा अवगत असून तो विद्वानांचा पोषिंदा होता. एका अरब पंडितानें खूप होऊन त्याला दोन उत्कृष्ट तरवारी दिल्या होत्या. यावेळीं कर्नाटकांत अनेक कारस्थानी पुरुष आपली सत्ता स्थापण्यास धडपडत होते. सादतअल्ली, निजाम, इंग्रज, फ्रेंच, या सर्वांचा डोळा कर्नाटकावर होता. त्या सर्वांस तुकोजी पुरून उरला व त्यानें आपल्या राज्यास या बुभुक्षितांचा धक्का लागूं दिला नाहीं. अखेर तो स.१७३५त वारला. त्याला लग्नाच्या पांच व कट्यारीबरोबर लग्न लाविलेली एक ( अन्नपूर्णा ) मिळून सहा स्त्रिया होत्या; लग्नाच्या स्त्रियांस बाबासाहेब, सयाजी, अण्णासाहेब व नानासाहेब हे चार व अन्नपूर्णेस एक प्रतापसिंग असे पांच पुत्र झाले.

बाबासाहेब (१७३६).—याचें खरें नांव येकोजी; तुकोजीनंतर हा राज्यावर आला; परंतु एका वर्षांतच तो वारला. आपला जीव घेण्यास आपले भाऊ टपले असल्याचा संशय त्यास नेहमीं येई, त्यामुळें तो वेडसर बनला; आणि राज्यकारभारहि विस्कळीत झाला. तें पाहून चंदासाहेबानें तंजावरावर स्वारी केली; परंतु तेथील स्वामिनिष्ठ सरदारांनीं त्याचा पराभव केला. यानंतर लवकरच बाबासाहेब वारला ( १७३६ ); त्यास अपत्य नव्हतें. त्याची राणी सुजानबाई ही फार हुषार व दक्ष असल्यानें कारभाऱ्यांनीं तिच्याच नांवाची द्वाही फिरविली.

सुजानबाई ( १७३६–३९ ):—हिची कारकीर्द महत्त्वाची झाली. ताराबाई, अहिल्याबाई यांच्यासारखी ही हुषार निपजली. तिनें तीन वर्षे कारभार केला. ती उदार, स्फूर्त असून तिचें दरबारी मंडळीवर वजन होतें. गादीवर हक्क सांगणारे अनेक लोक तिच्या कारकीर्दींत उत्पन्न झाले परंतु तिनें त्यांचें कांहीं चालू दिलें नाहीं. अखेर सवाई शहाजी म्हणून एक तोतया कोयाजी घाटग्याच्या साहाय्यानें पुढें आला व त्यानें फितुरीनें तंजावरचा किल्ला घेऊन गादी बळकाविली ( १७३९ ).

काटराजा ( १७३९ ):—या तोतयास काटराजा म्हणत; तो रानांतून आला म्हणून त्यास काट म्हणत. मार्गे अपरूपेनें जें खोटें मूल तयार केलें होतें त्याचें नांव सवाई शहाजी होतें, पण त्याचा नाश मार्गेच झाला होता. त्याचाच हा तोतया निघाला. इंग्रजानें याला मदत केली व याप्रमाणें तंजावरच्या राजकारणांत आपला हात पहिल्यानें घुसविला. कांहीं दिवसांनीं हा रुपी वटकीचा लेक सुभान्या असून सवाई शहाजी नव्हे असें समजलें तेव्हां दरबारीमंडळानें त्याला काट देऊन, तुकोजीचा दुसरा पुत्र सयाजी यास गादीवर बसविलें.

सयाजी ( १७४० ):—हा केवळ नाममात्र राजा असून सर्व कारभार तंजावरचा मुसुलमान किल्लेदार सय्यदखान व त्याचा भाऊ कासम हे पहात होते. याप्रमाणें लष्करशाही सुरू होऊन सर्वत्र बेबंदशाही माजली. तेव्हां मल्हारजी गाडेराव, मानाजी जगताप वगैरे जुन्या सरदारांनीं त्याला पदच्युत करून तुकोजीचा दासीपुत्र प्रतापसिंह यास गादीवर बसविलें ( १७४० ).

प्रतापसिंह ( १७४०–६३ ):—याची कारकीर्द महत्त्वाची असून तिनेंच तंजावरच्या इतिहासाचा बराचसा भाग आक्रमिला आहे. प्रतापसिंह गादीवर आल्यावर वरील सय्यद बंधूंनीं त्यानें आपल्या मुठींत असावें म्हणून पुष्कळ खटपटी केल्या, परंतु राजा बुद्धिवान व स्वाभिमानी असल्यानें त्यानें त्यांचें कांहीं चालू दिलें नाहीं. तेव्हां ते त्याला गादीवरून काढण्याची खटपट करूं लागले. लष्कराच्या जोरावर ते अतिशय जुलमी बनले होते. त्यांनीं हिंदु देवालयांत अनाचार केले व तेथील देवदासी भ्रष्ट केल्या. सर्व राज्यांतील फौजदारी, राजाची चिटणिसी व तंजावरगडची किल्लेदारी त्यांच्याकडे असल्यानें ते भारी बनले होते. त्यांनीं चंदासाहेबास आपला व्याही करून त्याच्या मदतीनें तंजावरचें राज्य स्वतः बळकवावें असा गुप्त कट केला. परंतु प्रतापसिंहानें त्याच्यापैकीं कासम यास फोडून, सय्यदखानास आयत्यावेळीं पकडून त्याचा वध केला व हें खूळ मोडलें. परंतु हें समजतांच व्याह्याचा सूड घेण्यासाठीं चंदासाहेबानें ( याचें खरें नांव हुसेन दोस्तखान होतें ) एकाएकीं चालून येऊन किल्ल्यास दोन महिने वेढा दिला. तेव्हां प्रतापसिंहानें कठिण समय जाणून सातार्‍यास शाहूकडे मदत मागितली. शाहूला तंजावरचा पूर्ण अभिमान असल्यानें त्यानें फत्तेसिंग भोंसले व रघूजी भोंसले यांनां तिकडे पाठविलें ( १७४० ). त्यांनां प्रख्यात सेनापति मुरारराव घोरपडे हाहि सामील झाला. मराठ्यांनीं प्रथम अर्काट घेऊन तंजावरकडे मोर्चा फिरविला तेव्हां तंजावरचा वेढा उठवून चंदा त्रिचनापल्लीस पळून गेला. त्यामुळें मराठे तिकडे वळले. यावेळीं कर्नाटकांतील सर्व हिंदु पाळेगारहि त्यांनां मिळाले. प्रतापसिंहानें शाहूस १५ लक्ष रुपये ( स्वारी खर्च व खाशांस नजर मिळून ) देण्याचा करार करून, रघूजीस फौज व दारूगोळ्याची मदत केली. मराठ्यांनीं मोठा पराक्रम करून त्रिचनापल्ली काबीज केली व चंदास कैद केलें ( २६ मार्च १७४१ ) आणि तंजावरचें संकट टाळलें.

पुढें अनवरुद्दीन ( अर्काटचा नबाब ) यानें त्रिचनापल्ली घेऊन तंजावरावर स्वारी केली, तींत त्याचा पराभव झाला ( जून १७४४ ). तेव्हां त्यानें पुन्हां पुढल्या वर्षी स्वारी केली पण तींत तो पराभव पावून प्रतापसिंहाच्या हातीं लागला असतां त्यानें त्याला उदारपणें सोडून दिलें. यानंतर चार वर्षें प्रतापसिंहानें शांतपणें राज्य केलें. त्यानंतर इंग्रजांनीं आपला हात या राज्यांत शिरकविण्यासाठीं वर उल्लेखिलेल्या सयाजीस ( काट राजाप्रमाणें ) हातीं धरून, राजाच्या देवीकोटा किल्ल्यावर स्वारी केली. वास्तविक राजानें इंग्रजांची कांहींहि कुरापत काढली नव्हती; परंतु इंग्रजांनां कर्नाटकांत फ्रेंचांविरुद्ध आपली वळकटी करावयाची असल्यानें व त्या प्रांतांत देविकोट्यासारखें बंदर हस्तगत असावें म्हणून त्यांनीं अन्यायानें राजाविरुद्ध ( आपसांत मैत्री असतांहि ) उचल केली. राजानें त्यांनां तोंड दिलें, पण अखेर देविकोटा पडलें व त्याबरोबरच त्याच्या आसपासचा ३१५०० रु. उत्पन्नाच्या प्रांतास राजास मुकावें लागलें ( २५ जून १७४९ ).

याच वेळीं चंदासाहेब सातार्‍याच्या कैदेंतून मोकळा झाला व त्यानें पेशव्यांनां दिलेलें वचन ( तंजावरकरास उपसर्ग न देण्याबद्दलचें ) विसरून फ्रेंचांच्या मदतीनें तंजावरावर चढाई केली. त्यावेळीं प्रतापसिंहानें कारीकल बंदर देण्याचें कबूल करून फ्रेंचांनां फोडलें व नासिरजंगास मदतीस आणिलें, तेव्हां चंदा पळून गेला. पुढें महंमदअल्ली व चंदा यांच्या झगड्यांत राजानें महंमदचा पक्ष स्वीकारला. त्याचा सेनापति मानाजी जगताप यानें, श्रीरंग येथील लढाईंत चंदाचा पराभव होऊन तो पाडाव झाला असतां व इंग्रज व महंमद हे त्याला जिवंत मागत असता (चंदाच्याच सांगण्यावरून) चंदाचा शिरच्छेद केला (जून १७५२). इतक्यांत त्रिचनापल्लीसाठीं म्हैसुरकर, इंग्रज व मुरारराव घोरपडे हे गुप्तपणें खटपट करून प्रतापसिंहास दपटशा देऊं लागले; तेव्हां त्यानें नानासाहेब पेशव्यांकडे मदतीचें सूत्र लाविलें, पण त्याचा उपयोग झाला नाहीं. तेव्हां मानाजीनें स्वतःच मुराररावाचा मोड केला. तोंच दुसरीकडे फ्रेंचांनीं तंजावरच्या राज्यांत धुमाकूळ घातला व मुराररावानें त्यांनां मदत केली. तेव्हां नाइलाजानें प्रतापसिंहानें इंग्रजांची मदत मागितली. या सुमारास अनेक राजकारणें होऊन शेवटीं महंमदअल्ली अर्काटकर याच्या मध्यस्थीनें तंजावरावरील हें अरिष्ट टळलें ( १७५४–५५ ). त्याबद्दल तंजावरनें अर्काटकरास सालीना खंडणी देण्याचें ठरलें. परंतु पुन्हां (१७५८) फ्रेंचांनीं, प्रतापसिंहावर ( तो इंग्रजांचा दोस्त बनल्यावरून ) स्वारी केली, तेव्हां मानाजीनें इंग्रजांच्या मदतीनें त्यांनां पिटाळून लाविलें, यानंतर फ्रेंचांच्याविरुद्ध चिनापट्टणाच्या

संरक्षणासाठीं प्रतापसिंहानें तीन वेळां इंग्रजांनां मदत केली. यापुढें फ्रेंचांचें वजन कर्नाटकांतून नाहींसें झालें. तेव्हां महंमद अल्ली व इंग्रज यांनां देश बळकाविण्याची इच्छा होऊन ते आतां प्रतापसिंहाच्या राशीस विनाकारण लागले(१७६१). सिद्दसावकपणा करून त्यांनीं राजास लुटण्याचा धंदा चालविला. त्यांनीं रामनाथपूरच्या राजास प्रतापसिंहाविरुद्ध उठविलें परंतु मानाजीनें त्याचा पराभव केला. तेव्हां महंमदनें खंडणीची बाकी काढून राजावर स्वारीचा घाट घातला, मग इंग्रजानें मध्यस्थीचा आव आणून त्या दोघांचा समेट केला ( १७६२ ). मात्र तंजावरकरानें अर्काटकरास द्यावयाची खंडणी आपल्या तर्फे द्यावी असें ठरविलें.

यानंतर प्रतापसिंहास फारसा त्रास झाला नाहीं; तो १७६३ सालीं मरण पावला. त्याला यमुना, सकवार, अहिल्या यशवंताबाई, या चार राण्या व सात नाटकशाळा होत्या; दोन मुली, दोन लेकवळे व एक तुळजा राजे नांवाचा औरस मुलगा अशीं त्याला अपत्यें झालीं.

तुळजाराजा ( १७६३—८६ )—बापाच्या पश्चात हा गादीवर आला. पहिलीं चार पांच वर्षे त्याच्या राज्यांत शांतता होती. पुढें रामनाथपुरच्या राजानें गडबड केली, ती यानें मोडली. नंतर दुर्मन्त्र्यांच्या सल्ल्यानें यानें महंमदकडे दोन वर्षे खंडणी पाठविली नाहीं; म्हणून त्यानें तंजावरावर स्वारी केली: परंतु स्वारीखर्च ( ५०१६० लाख ) व एक दोन किल्ले देऊन तुळजानें त्याला परत लाविलें. हा राजा दुबळा होता व मुत्सद्दीहि नव्हता. त्यानें दानधर्मांत देवळें, मशिदी बांधण्यांत, लग्नकार्ये व तीर्थयात्रा करण्यांत अतोनात पैसा उधळला. त्यामुळें फौजेचा पगार थकला जुने मुत्सद्दी जाऊन नवीन लोकांच्या हातीं कारभार आला. त्यांनीं क्रूर कृत्यें केलीं त्यामुळें पदरचे सरदार व प्रजाहि विटली व ती बेदील झाली. याचा फायदा घेऊन महंमदच्या मनांत तंजावरचें राज्य घेण्याचें आलें व त्यानें राजाचे लष्करी अधिकारी फितूर करून, एकदम तंजावरच्या किल्ल्यावर हल्ला करून तो घेतला व पुष्कळ लूट नेली. त्यानें राजास बंदींत ठेवून तेथें आपला कारभारी नेमला. याप्रमाणें तंजावरचें राज्य दोन वर्षे त्याच्या ताब्यांत होतें. पुढें राजानें इंग्रजांस मदतीस बोलाविलें; त्यांनीं महंमदची समजूत करून पुन्हां तंजावरचें राज्य तुळजाच्या हवालीं करविलें. मात्र यावेळेपासून तंजावरकर हा अर्काटकराला सोडून इंग्रजांचा मांडलिक बनला. तंजावर किल्ल्याची किल्लेदारी व फौजदारी इंग्रजांनां मिळाली व तैनाती फौजेच्या खर्चास नागूर बंदरासह वराचसा मुलूखहि मिळाला. या मोबदल्यांत राजानें महंमद यास खंडणी देऊं नये असें इंग्रजांनीं ठरविलें व तेच स्वतः त्याचे मालक बनले.

यापुढें तुळजानें शांतपणें राज्य चालविलें. त्यास राजस, राजकुंवर, मोहना व सुलक्षणा या स्त्रिया होत्या; त्यांच्या पोटीं तीन मुलगे व दोन मुली झाल्या. मुलगे लहानपणींच वारले व मुलीहि त्याच्या देखतच वारल्या. त्यामुळें राजा विरक्त बनला. इतक्यांत हैदर नायकानें इंग्रजांनां शह देण्यासाठीं तंजावर प्रांतीं स्वारी केली व पुष्कळ मुलूख जिंकला. याच वेळीं देशांत भयंकर दुष्काळ व सांथ पसरून अनेक लोक मेले. तुळजानें मुंगीकर भोंसल्यांपैकीं एकास दत्तक घेऊन, त्याचें नांव सरफोजी ठेवून, तंजावरच्या इंग्रज रेसिडेंटाच्या व इतर पांच सहा अधिकाऱ्यांच्या देखत दत्तविधान केलें. त्यानंतर दोन तीन दिवसांनीच तुळजाराजा वारला (१७८६).

अमरसिंह( १७८६–९८ ).— हा तुळजाचा सावत्र भाऊ; व प्रतापसिंहाच्या राखेचा पुत्र. यानें लटपटी करून मद्रासकर इंग्रजांनां सरफोजीचें दत्तविधान खोटें भासवून आपण गादी बळकाविली. या कामीं तत्कालीन मद्रासकर व तंजावरकर इंग्रज अधिकाऱ्यांनीं बरीचशी मिळकत मिळविली असें म्हणतात. मात्र त्यांनीं सरफोजीस अमरसिंहाच्या ताब्यांतून काढून मद्रासेस आपल्या नजरकैदेंत ठेविलें व त्यास स्वार्झ नांवाचा एक पाद्री शिक्षक नेमून दिला.

पुढें इंग्रजांनीं अमरसिंहावर कडक अटी लादून अनेक तऱ्हेनें त्याच्याकडून प्रांत व पैका काढला, किल्ल्यांत आपले फौजीसरदार ठेवून फितूर केला, व वाटेल तसे करारनामे जबरदस्तीनें करून घेतले. त्यांनीं स. १७८७ त त्याच्यावर जबरीनें एक तह लादून २४॥ लाखांची वार्षिक खंडणी बसविली व वेळेवर खंडणी मिळाली नाहीं म्हणून सर्व राज्यकारभार हातीं घेतला. याबद्दल खुद्द अमरसिंहानें उल्लेख केला आहे (इति. सं. तंजावर राजघराणें). टिप्पूनें तंजावर प्रांतांत स्वाऱ्या केल्या त्यावेळीं इंग्रजांनीं त्यांच्या प्रतिकाराच्या सबबीवर सर्व राज्याचा वसूल मुखत्यारानें आपणच करून व इतरहि राज्यकारभार ताब्यांत घेऊन अमरसिंहास सुसर्ते बाहुलें बनविलें शेवटीं राजानें पुण्यास पेशव्यांकडे संधान बांधलें आणि मग नाना फडणीस व महादजी शिंदे यांच्या दपटशानें इंग्रजांनीं अमरसिंहाशीं दुसरा तह केला ( १७९२ ). त्यांत खंडणी १६ लाखांवर ( वार्षिक ) उतरली व सरफोजी आणि त्याच्या आया यांसाठीं सालिना ५०१६० हजार रुपयांची नेमणूक ठरली. यावेळीं मद्रासकर इंग्रजानें राजास थोडेंसें लुबाडलें तर कलकत्तेकरानें ज्यास्तच लुबाडलें होतें. अमरसिंह गव्हर्नरजनरलास लिहितो “ लॉर्ट पिकट यांणे आम्हां चार लाख होन सालीना द्यावे असा करार केला... तर आपण चार लक्ष साठ हजार होन देत जावे म्हणता. दुसरा गव्हर्नरजनरल आला तर तो आणखी मागेल”(इति.सं. तंजावर राजघराणें पृ. १०७). हें राजाचें पत्र पाहिलें असतां तत्कालीन इंग्रजांनीं आपलींच वचनें कशीं धुडकावलीं व सूक्ष्मासूक्ष्म मार्गानें सत्ता कशी बळकावली हें ध्यानांत येतें. इंग्रजी फौजेच्या खर्चास (तोडून दिलेला प्रांत सोडून) दरमहा पंधरा हजार होन द्यावे लागत, खेरीज

खंडणी, टिप्पूच्या स्वाऱ्या इत्यादि कारणांनीं संस्थानास कर्ज झालें, वसूल तटला, रयत नागावली व बेबंदशाही झाली.

या सुमारास सरफोजींचा पक्ष प्रबळ झाला; अमरसिंहापासूनहि यापुढें फलप्राप्ति होण्याची आशा दिसेना म्हणून कार्नवालीसनें, त्याला राज्य नीट चालवितां येत नाहीं असा आरोप करून शरफोजींचें दत्तविधान आतां कायम केलें (१७९६). त्यास कंपनीच्या डायरेक्टरांनींहि अनुमति दिली (१७९८). अखेर बिचारा अमरसिंह पदच्युत झाला. त्यास तंजावर जवळील मध्यार्जुन गांवीं ठेवून सालीना पाऊण लाखाची नेमणूक केली. तेथें तो १८०२ सालीं वारला. त्याचा प्रतापसिंह नांवाचा एक मुलगा स. १८४९ पर्यंत हयात होता. त्यानें थेकोजी म्हणून दत्तक घेतलेला पुत्र स. १८८३ पर्यंत विद्यमान होता, त्याला दरमहा हजार रुपये मिळत असत. अमरसिंह सात्त्विक, दयाळु व उदार होता पण मुत्सद्दी नसल्यानें त्याचा अखेर असा परिणाम झाला.

सरफोजी (१७९८–१८३२).—याला गादीवर बसवून इंग्रजांनीं जो त्याच्याशीं तह केला, त्या अन्वयें तंजावर संस्थान हें पूर्णपणें इंग्रजी अंमलाखालीं जाऊन, राजानें फक्त सालीना साडेतीन लाखांची (११८३५० पौंड) नेमणूक घेऊन किल्ल्यांत स्वस्थ रहावें, त्याचा मानमरातब कायम रहावा व राज्यकारभार त्याच्या नांवानें इंग्रजांनीं चालवावा असें ठरलें (२५ आक्टो० १७९९). याप्रमाणें तंजावरचें मराठी राज्य संपुष्टांत आलें. या सुमारास कर्नाटकांतील इंग्रजांचे सर्व शत्रू नष्ट झाल्यानें सरफोजीच्या ३४ वर्षांच्या कारकीर्दीत आणीक भानगडी उत्पन्न झाल्या नाहींत. त्यानें आपला वेळ ग्रंथसंग्रह, विद्याप्रसार व विद्वान्यासंगांत घालविला; त्याला इंग्रजी भाषा चांगली येत होती. त्यानें अनेक ग्रंथ (काव्यें, नाटकें वगैरे) विद्वानांकडून तयार करविले; तंजावरच्या बृहदीश्वराच्या देवळांत आपल्या घराण्याचा संपूर्ण इतिहास त्यानें मराठींत कोरविला आणि राजवाड्यांत एक सरस्वतिमंदिर स्थापून तेथें अनेक विषयांवरील प्राचीन ग्रंथ, ताडपत्रें, भूर्जपत्रें व ताम्रपट जमवून ठेविले. हा संग्रह अप्रतिम व प्रचंड आहे; डॉ. बर्नेलनें वर्षेंच्या वर्षें खर्चून याच्या याद्या तयार केल्या आहेत. सरफोजीला शिल्प, संगीत, वैद्यक, ज्योतिष हीं अवगत होतीं व त्यांना त्यानें उत्तेजनहि दिलें होतें. पाश्चात्यशिक्षणाचा परिणाम झाल्यानें त्यानें त्या दृष्टीनें सामाजिक, धार्मिक व शैक्षणिक सुधारणा केल्या. त्याला भेटावयास येणाऱ्या बऱ्याच पाश्चात्य लोकांनीं आपल्या हकीकती लिहून ठेविल्या आहेत, त्यावरून त्याची योग्यता ध्यानांत येते. त्याला लंडनच्या रॉयल एशियाटिक सोसायटीनें आपले सन्माननीय सभासद करून घेतलें होतें (१८२८). तंजावरास पाद्री लोकांच्या ज्या अनेक संस्था होत्या त्यांना याची सढळ मदत असे. हा स. १८३२ त वारला. त्याला मुक्तांबा व अहिल्या अशा दोन राण्या होत्या. अहिल्याबाईस तीन मुली व एक मुलगा शिवाजी नांवाचा झाला.

शिवाजी (१८३३–१८५५).—हा या घराण्यांतील शेवटचा राजा होय. स. १७९९ च्या तहामुळें तंजावरचा राजा म्हणजे नुसता एक नेमणुकदार बनला होता. याला सालीना १०८०९९३ रु. नेमणुकीबद्दल व तंजावरच्या वसुलाच्या पांचव्या हिश्श्याबद्दल मिळत असत. त्यामुळें यानें आपलें सारें आयुष्य चैनींत घालविलें. वडिलाप्रमाणें याला विद्येची गोडी नव्हती; मात्र तो उदार व दाता होता. म्हणून दक्षिणेकडे त्याला कर्ण म्हणत असत. तो वारल्यावर (२९ आक्टो० १८५५) त्याला औरस संतति नसल्यानें डलहौसीनें त्या सबबीवर तंजावरचें राज्य खालसा केलें. राजाला सयदंबा, पद्मांबा व कामाक्षीअंबा अशा तीन राण्या होत्या. पहिल्या दोन त्याच्या हयातींतच वारल्या. कामाक्षी ही स. १८९२ त वारली. सयदंबा हिला दोन मुली होत्या. पुत्र होईना म्हणून राजानें आणखी १७ लग्नें केलीं; त्यांपैकीं ११ राण्या त्याच्या मागें बऱ्याच काळपर्यंत जिवंत होत्या. कामाक्षाबाईंनीं आपलें राज्य परत मिळविण्यासाठीं फार खटपटी केल्या; थेट कंपनीच्या डायरेक्टरापर्यंत दाद पोहोंचविली; परंतु त्याचा कांहीं उपयोग न होता त्यावेळीं कंपनीच्या ठरलेल्या (साम्राज्यविस्ताराचें) धोरणाप्रमाणें राणीच्या विरुद्ध निकाल लागला व दख्खनमधील हें मराठी राज्य नामशेष झालें.

शिवाजीच्या दोन्ही मुली कोल्हापुरकर सखारामराव मोहिते हंबीरराव यास दिल्या होत्या; पहिली लवकर वारली. दुसरीचें नांव विजयमोहना मुक्तांबा होतें; तिला इंग्रजसरकारनें तंजावरकन्या असा किताब; दरमहा ६ हजारांचें पेनशन व तेरा तोफांच्या सलामीचा मान दिला होता. हिची मुलगी बडोद्याचे विद्यमान राजे श्री सयाजीराव गायकवाड यांना दिली होती. त्यांचें नांव लक्ष्मीबाई होतें, त्या अल्पवयांत वारल्या. त्यांचे पुत्र फतेसिंहराव होते तेहि अल्पवयांत वारले; त्यांचे चिरंजीव युवराज प्रतापसिंह व दोन कन्या विद्यमान आहेत. पैकीं एक कन्या (इंदुमतीबाई) कोल्हापूरचे विद्यमान राजे श्री. रामराजे यांना व दुसरी लक्ष्मीबाई सावंतवाडीचे विद्यमान राजे श्री. बापूसाहेब यांना दिली आहे. तंजावरच्या राजघराण्याचा आजचा एवढाच (कन्येचा) अवशेष वंश उरला आहे.

शिवाजीच्या पश्चात १५ राण्या जिवंत होत्या; त्यांपैकीं शेवटची राणी जिजांबा ही ३ मे १८९२ रोजीं वारली. यांचे दोन दत्तक राजपुत्र श्री. शिवाजीराजे व श्री. प्रतापसिंहराजे विद्यमान आहेत. राण्यांना व इतर आप्तांना नेमणुका होत्या; सन १८६० त ५४२८२० रुपयांची रक्कम या कामीं खर्ची पडली होती; हल्लीं ही रक्कम अगदींच कमी झाली आहे; तथापि अद्यापि खाजगी मोकाशाचीं १९० गांवें व जमीनी वगैरे मिळून बरेंच खाजगी उत्पन्न चालू आहे. मध्यंतरीं सरस्वतीमहालसंग्रहालय तंजावर येथून हलवून

लंडन येथें नेण्याची खटपट चालू होती, शेवटीं बऱ्याच खटपटीअंतीं तें येथेंच ठेवण्याचें ठरलें.

[ संदर्भग्रंथः—डफ; वील; तंजावरचा शिलालेख; शिवदिग्विजय; म्याकेंझी—हिस्टरी ऑफ कर्नाटक; क्ल्युन्स—नेटिव्ह स्टेट्स ऑफ इंडिया; प्रतापवंशावळीः विल्क्स—हिस्टरी ऑफ म्हैसूर; टेलर—ओरिएन्टल हिस्टॉरिकल म्यान्सक्रिप्ट्स; हिको—तंजावर; रंगापिल्ले—डायरी; व्यंकास्वामीराव—तंजावर मॅन्युअल; ऑर्म—हिस्टरी ऑफ कर्नाटक. ]

**तडवी**—मुसुलमानी भिल्लांचा हा एक वर्ग असून अशिरगडापासून चोपड्यापर्यंत सातपुड्याच्या पायथ्यावरील खेड्यांत आढळून येतो. मुसुलमान व भिल्ल स्त्रीपुरुष यांपासून झालेली ही प्रजा असून औरंगझेबाच्या कारकीर्दींत ( १६५८–१७०७ ) असली प्रजा दृग्गोचर होऊं लागली. हे दिसण्यांत उंच व सुदृढ असून इतर भिल्लांपेक्षां गोरे असतात यांचा पेहेराव साधारणतः खानदेशी कुणब्यांप्रमाणें असतो. सधन तडवी मुसुलमान शिपायाप्रमाणें क्वचित् पेहेराव करतात. हे मुसलमानाप्रमाणेंच आळशी असून त्याखेरीज अमितपानी असतात. एकंदरींत पाहतां हे लष्करी पेशाला लायक असून शेतकी कामास नालायक आहेत. यांचे आचारविचार मुसुलमानांप्रमाणेंच आहेत. परन्तु पूर्वीचा हिंदुत्वाचा संस्कार असल्यामुळें हिंदु देवतांना पूज्य मानतात. विवाहविधि काजी चालवितो. अडावद या भागांतील तडवी देवी मानाबाई हीस फार पूज्य समजतात. अडावदपासून ५ मैलांवर मानापूर येथें मानाबाईचें एक मोठें देवालय आहे. जातिप्रमुखाला खानसाहेब असें म्हणतात. रखवालदार या नात्यानें प्रमुखाला सरकारी वेतन मिळतें. यांनां धर्माचें ज्ञान मुळींच नसतें.

**तंडागांव**—बंगालमध्यें माल्डा जिल्ह्यांत हें एक गांव आहे. गौरच्या नंतर हें बंगालच्या राजधानीचें ठिकाण होतें. स्टुअर्टच्या म्हणण्याप्रमाणें अफगाण लोकांचा शेवटून दुसरा राजा सुलेमानशाह करानी यानें १५६४ मध्यें गौर राजधानी बदलून तंडागांव राजधानीचें ठिकाण केलें. याच गांवाजवळ औरंगझेबाचा सेनापति मीरजुमला यानें शहाशुजा याचा १६६० सालीं पराभव केला.

**तंडो**—मुंबई. सिंध हैद्राबाद जिल्ह्याचा हा एक पोटविभाग आहे. गुनी, बदिन, टंटोबगो, आणि डेरो मोहबत हे तालुके मिळून हा पोटविभाग झाला आहे.

**तंडोअडाम**—मुंबई, सिंध. जिल्हा हैद्राबाद, अलाहयार तालुक्यांत हें गांव आहे. या गांवांत रेशीम, कापूस, धान्य, तेल, साखर आणि तूप यांचा व्यापार चालतो. या गांवांत ४मुलांच्या व १ मुलींची शाळा व १ दवाखाना आहे.

**तंडोअलाहयार**—मुंबई. सिंध. जिल्हा हैद्राबाद. त्याच नांवाच्या तालुक्याचें हें गांव मुख्य ठिकाण आहे. येथें, साखर, हस्तीदंती काम, रेशीम, कापड, कापूस, तेल, आणि धान्य यांचा व्यापार चालतो. याच्या जवळपास अतिशय कापूस उत्पन्न होतो. रेशमाचें विणकाम व हस्तीदंती काम हे मुख्य धंदे आहेत.

**तंडोबागो**—मुंबई, सिंध, हैद्राबाद जिल्ह्यांत हा एक तालुका आहे. या तालुक्यांतील जमीन सुपीक असून पाणी पुष्कळ आहे. बहुतेक जमीनीला कालव्यांचें पाणी पुरविलें जातें. येथील मुख्य पीक म्हटलें म्हणजे गहूं, तांदूळ, बाजरी, ऊंस आणि कापूस हें होय.

**तंडोमहमदखान**—मुंबई, सिंध हैद्राबाद जिल्हा. गुनी तालुक्याचें हें गांव मुख्य ठिकाण आहे. येथील स्थानिक व्यापार म्हटला म्हणजे तांदूळ, इतर धान्य, रेशीम, धातू, तंबाखू, रंग, जोगीर, चटया व औषधें यांचा आहे. यांशिवाय या गांवांत तांबें, लोखंड, मातीचीं भांडीं, रेशीम, सूत, घोंगड्या, कापड, जोडे, देशी दारू आणि लांकडी सामान यांचे कारखाने आहेत. यांत एक दवाखाना, २ मुलांच्या व एक मुलींची शाळा आहे.

**तत्रक**—यूरोपांत यांचें सुमक असें नांव आढळतें. हें छोटें झाड कॅनरीज व मदीरा बेटें आणि भूमध्यसमुद्राचा कांहीं भाग व पूर्वेस अफगाणिस्तानापर्यंतच्या प्रदेशांत रानटी स्थितींत आढळतें. कित्येक ठिकाणीं याची मोठ्या प्रमाणावर लागवडहि करतात. ह्याच्या पानांत रंजक द्रव्य असतें. यूरोपमध्यें पानें व डहाळ्या या दोन्हींचा कातडीं कमाविण्याकडे उपयोग करतात. यूरोपमध्यें मोठमोठ्या कारखान्यांत कातडीं कमाविण्यासाठीं बाहेरून विशेषतः सिसिलीमधून पानें व हिंदुस्थानांतून डहाळ्या आणवितात. याच्यापासून मोरोक्को कातडें कमावितात. पुस्तक बांधणीला लागणारें कातडें यांच्यापासून उत्तम प्रकारें कमावितां येतें. ऑगस्टच्या सुमारास या झाडाचीं पानें पिकतात. नंतर झाडें कापून वाळत ठेवितात. वाळल्यानंतर पानें छाटतात. नंतर पानांची पूड करितात. ही पूड शुद्ध केल्यावर कातडीं कमाविण्याकरितां योग्य होते. या रोपासारखें 'कोरिआ‌‌ ‌फेमिनेल्ला' नांवाचें दुसरें एक झाड आहे. याचीं पानें लहान व हलक्या प्रतीचीं असून कधीं कधीं तत्रक झाडाच्या पानांत यांची भेसळ करतात.

**तंत्रग्रंथ**—हे हिंदूंच्या धार्मिक वाङ्मयापैकीं असून योग्यतेच्या दृष्टीनें श्रुति, स्मृति, पुराणें व तंत्रें असा त्याचा चवथ्या नंबरचा दर्जा आहे. तंत्रग्रंथांतील विधिनियम पाळणारे लोक तर यांनां पांचवा वेद मानतात. कांहीं तंत्रग्रंथ पुराणांनंतरचे आहेत व कांहीं त्यांच्याहि पूर्वींचे आहेत. तथापि त्यांचा रचनाकाल निश्चित झालेला नाहीं. कांहीं ग्रंथ ६ व्या व ७ व्या शतकांतील आहेत. 'तंत्र' याचा मूळ अर्थ जाळें असा आहे. धार्मिक विधि व नियम असा अर्थ नंतर आला; व या ग्रंथानुसार वागणारा असा एक धर्मपंथ निर्माण झाला. हिंदूंतील दत्तात्रयाचा जो त्रैमूर्ति अवतार त्यानें हे ग्रंथ लिहिले अशी समजूत आहे. तथापि प्रत्यक्ष ग्रंथांची रचना शिवपार्वतीसंवाद अशा स्वरूपाची आहे. कुल्लूकभट्ट म्हणतो 'ईश्वरप्रणीत ग्रंथ दोन

प्रकारचे आहेत; एक वैदिक व दुसरे तांत्रिक. बंगालमधील शाक्तपंथीयांमध्यें या ग्रंथांना वेदांहूनहि अधिक मान आहे, कारण शाक्तपंथाचे हेच मुख्य धर्मग्रंथ होत. या ग्रंथांतील शिकवण भक्तिमार्गी असून हा मार्ग ज्ञान किंवा कर्म मार्गापेक्षां अधिक योग्यतेचा मानतात. तंत्रग्रंथप्रणीत पंथांत जातिभेद किंवा स्त्रीपुरुष भेद मानीत नाहींत म्हणजे ईश्वरोपासनेच्या बाबतींत सर्वांचा दर्जा समान मानतात. सतीच्या चालीचाहि निषेध या ग्रंथांत केला आहे.

तां त्रि क वा ङ्‌ म य—या सदराखालीं येणारे वरेच ग्रंथ असून ते शारदा लिपींत लिहिलेले आहेत. त्यांपैकीं वामकेश्वर तंत्र नांवाच्या ग्रंथांत चौसष्ट तंत्रांचीं नांवें पुढीलप्रमाणें दिलीं आहेतः—

| | | |
|---|---|---|
| १ महामायाशंवर | ३७ मातृभेद | ५२ कुलचूडामणि |
| २ योगिनीजालशंवर | ३८ गुह्यतंत्र | ५३ सर्वज्ञानोत्तर |
| ३ तत्त्वशंवरक | ३९ कामिक | ५४ महापिशामत |
| ४–११ भैरवाष्टक | ४० काळपाद | ५५ महालक्ष्मीमत |
| १२ १९बहुरूपाष्टक | ४१ कालसार | ५६ सिद्धयोगीश्वरमत |
| २० ज्ञान | ४२ कुब्जिकामत | ५७ कुरूपिकामत |
| २१-२८ यमलाष्टक | ४३ नयोत्तर | ५८ रूपिकामत |
| २९ चंद्रज्ञान | ४४ वीणू (णा) ख्य | ५९ सर्ववीरमत |
| ३० वासुकि | ४५ तोत्तल | ६० विमलामत |
| ३१ महासम्मोहन | ४६ तोत्तलोत्तर | ६१ उत्तम |
| ३२ महोच्छुश्म | ४७ पंचामृत | ६२ आरुणेश |
| ३३ महादेव | ४८ रूपभेद | ६३ मोदनेश |
| ३४ वाथु ( तु ? ) ल | ४९ भूतोड्डामर | ६४ विशुद्धेश्वर |
| ३५ नयोत्तर | ५० कुलसार | |
| ३६ हृद्‌भेद | ५१ कुलोड्डीश | |

वरील यादींत नयोत्तर दोनदां आलें आहे, त्यांपैकीं पहिलें ( ३५ वें ) वातुलोत्तर असावें असें वाटतें. वरील यादींतील आणि यज्ञेश्वरशास्त्री यांनीं आपल्या आर्यविद्यासुधाकर नामक ग्रंथांत दिलेल्या यादींतील व प्रोफेसर ऑफ्रेक्ट यांनीं ऑक्सफर्ड कॅटलागांत दिलेल्या यादींतील नांवांत बराच फरक आहे. वरील यादींतील महोच्छुश्म याऐवजीं वामजुष्ट असें इतर ठिकाणीं असून तें वामकेश्वर किंवा वामिकेश्वर याबद्दल आलें असावें. म्हणून महोच्छुश्म हें नांव येथें चुकीनें आलें असावें.

शांवरतंत्र नामक ग्रंथांत संस्कृत, हिंदी, गुजराथी व मराठी या चारी भाषांत जादूचे व दैवतसिद्धीचे मंत्र लिहिले आहेत. त्यांचा उपयोग शत्रूंचा नाश, संकटनिवारण, अद्भुत शक्तीची प्राप्ति व इच्छित वस्तूची प्राप्ति वगैरे गोष्टी साधण्याकरितां करतात. या मंत्रांनांच एक दोन ठिकाणीं शावर मंत्र असें म्हटलें आहे. आरंभीं बारा कापालिकांचीं पुढीलप्रमाणें नांवें दिलीं आहेतः—

| | |
|---|---|
| १ आदिनाथ | ७ महाकाल |
| २ अनाथ | ८ कालभैरवनाथ |
| ३ काल | ९ वाटुक |
| ४ अतिकालक | १० भूतनाथ |
| ५ कराल | ११ विर (वीर ?) नाथ |
| ६ विकराल | १२ श्रीकंठ |

बारा शिष्य, निरनिराळे मार्गप्रवर्तक यांचीं नांवें पुढील प्रमाणें त्याच ग्रंथात दिलीं आहेतः—

| | |
|---|---|
| १ नागार्जुन | ७ चर्पट |
| २ जडभृत | ८ अव (?) घट |
| ३ हरिश्चंद्र | ९ वैराग्य |
| ४ सप्तनाथ | १० कंथाधारी |
| ५ भीमनाथ | ११ जलंधरी |
| ६ गोरक्ष | १२ यमलार्जुन |

कुलार्णवतंत्र, रुद्रयामलतंत्र, ब्रह्मयामल, भैरवयामल, संम्मोहनतंत्र, विश्वोद्धारतंत्र, सुदर्शनसंहिता वगैरे आणखी तंत्रग्रंथ आहेत.

पार्वतीपुत्र नित्यनाथ यानें केलेल्या मंत्रसार नामक ग्रंथांतील सिद्धखंडांत दुसऱ्यांनां आपल्या इच्छेप्रमाणें वागण्यास लावण्याचे, मृतांनां पुन्हां जिवंत करण्याची वगैरे अद्भुत शक्ति प्राप्त करून घेण्याचे मंत्र दिलेले आहेत. पुण्यानंदाचा कामकलाविलास व भास्कररायाचा वरिवस्यारहस्य असे दोन दुसरे ग्रंथ आहेत. दुसरा ग्रंथ १७ व्या शतकांतला आहे. त्या दोघांचा विषय एकच असून त्यांपैकीं पहिलें तंत्र अधिक जुनें आहे व पहिल्यांतील उतारे दुसऱ्यांत आलेले आहेत. त्यांमध्यें देवीच्या उपासनेच्या विविध पद्धतींचा गूढज्ञानपर अर्थ सांगितलेला आहे; व त्यांतून निष्पन्न होणाऱ्या तात्त्विक सिद्धांतांचा उपनिषदांतील विवेचनाशीं मेळ घातलेला आहे.

शां भ व द र्श नां तील त त्त्व ज्ञा न.—या तत्त्वज्ञानपद्धतीला शांभवदर्शन असें नांव दिलेलें आढळतें. त्यांत शिव आणि शक्ति अशीं दोन मूलद्रव्यें कल्पिलीं आहेत. शिव हा प्रकाशरूपानें विमर्श किंवा स्फूर्तिरूपांत असलेल्या शक्तीमध्यें प्रवेश करतो व बिंदुरूप बनतो. त्याचप्रकारें शक्ति शिवामध्यें शिरते आणि तो बिंदु वाढूं लागतो. नंतर त्यांतून नाद नामक स्त्रीजातीय तत्त्व निर्माण होतें. हें भातकणाच्या अग्राएवढें बारीक असतें, पण त्यांत सृष्टींतील छत्तीस मूलतत्त्वें बीजरूपांत असतात. पुढें बिंदु व नाद एकत्र होऊन त्यांचा एक बिंदु बनतो. हा पदार्थ म्हणजे स्त्रीपुरुषस्वरूपी शक्तींमधील आत्यंतिक स्नेहभावाचा पुतळा होय. यालाच काम(प्रेम)म्हणतात. त्या दोन बिंदूंपैकीं पुरुषत्त्वदर्शक बिंदूचा रंग पांढरा व स्त्रीत्वदर्शक बिंदूचा रंग तांबडा असून त्या दोन बिंदूंनां कला म्हणतात. काम म्हणजे सूर्य, व दोन बिंदूंपैकीं एक चंद्र दुसरा अग्नि, असे मानले आहेत. काम व दुसरे दोन बिंदु हे एकत्र होऊन त्यांचा तिसराच पदार्थ

बनतो, त्याला कामकला म्हणतात.त्यांतूनच सर्व वाक् म्हणजे शब्द व अर्थ म्हणजे पदार्थ यांची उत्पत्ति होते. वरिवस्या-रहस्यांत कामकला याच्यामध्यें पुढील तीन पदार्थ असल्याचें सांगितलें आहेः—पहिला, मिश्रबिंदु अथवा काम; दुसरा स्त्री आणि पुरुषजातीय बिंदु; आणि तिसरा, हार्धकला, हा काम किंवा पहिला बिंदु यांमध्यें शक्तीनें प्रवेश केल्यावर वाढ होऊन उत्पन्न होतो, व त्याचें स्वरूप गुरुमुखांतूनच समजावून घेतलें पाहिजे, त्याचें ग्रंथांत वर्णन देतां येत नाहीं असें भास्करराय म्हणतो. कामकला-विलास ग्रंथावरील टीकेंत उल्लेखिलेल्या एका ग्रंथांत, कामकला ह्या सर्वश्रेष्ठ देवतेचा सूर्य ( मिश्रबिंदु ) हा चेहरा असून चंद्र व अग्नि ( पांढरा व तांबडा हे दोन बिंदू ) हे तिचे स्तन आहेत व हार्धकला हें तिचें जननेंद्रिय होय, असें म्हटलें आहे. कामकला याच देवतेचीं परा, ललिता, भट्टारिका आणि त्रिपुरसुंदरी हीं आणखी नांवें आहेत. संस्कृतभाषेच्या लिपीचें 'अ' हें अक्षर म्हणजे शिव आणि शेवटचें अक्षर 'ह' म्हणजे शक्ति असें रूपक कल्पिलें आहे व म्हणूनच प्रथम बिंदूपासून निघालेलें स्त्रीजातीय तत्त्व नद यालाच हार्धकला म्हटलें आहे. म्हणजेच कलेचें अर्ध याचें 'ह' या अक्षराशीं साम्य कल्पिलें आहे. शिव व शक्ति यांच्या संयोगानें उत्पन्न झालेली कामकला किंवा त्रिपुरसुंदरी हिचें निदर्शक गूढाक्षर अ आणि ह यांच्या संयोगानें झालेलें आहे, तें अह् अथवा अहं म्हणजेच अहं='मी' हें होय. म्हणूनच त्रिपुरसुंदरीला अहंता उर्फ मीपणा असें म्हटलें आहे. अर्थात् तिच्यापासून उत्पन्न झालेल्या सर्व वस्तुमात्रांत अहंभाव किंवा मीपणा भरलेला असतो. येणेंप्रमाणें सर्व जीवात्मे हे त्रिपुरसुंदरीचींच रूपें असून ते जेव्हां कामकला-विद्या व देवीचक्रें यांचा अभ्यास करून तदनुसार आचरण करतात तेव्हां ते स्वतःच त्रिपुरसुंदरीच्या स्वरूपाप्रत पोहों-चतात. ज्याप्रमाणें त्रिपुरसुंदरीपासून सर्व वस्तुमात्रांचा उगम होतो त्याप्रमाणें अ आणि ह या आद्यंत अक्षरांमध्यें सर्व शब्दब्रह्माचा अन्तर्भाव होत असल्यामुळें सर्व भाषेचा उगम तिच्यापासूनच होतो. म्हणून तिला परा म्हणजे चार भाषणप्रकारांपैकीं पहिला, प्रकार म्हटलें आहे. भास्करराय म्हणतो कीं, सर्व सृष्टि हा एक परिणाम किंवा मूळ बिंदू-पासून झालेली वाढ आहे. वेदांतशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें विवर्त म्हणजे केवळ मिथ्याभास किंवा खोटा देखावा नाहीं. या पंथांत सांगितलेलीं मूळ छत्तीस तत्त्वें पुढें दिलीं आहेत.

मूलतत्त्वें

| | | |
|---|---|---|
| १ शिव | १३ प्रकृति | २५ पायु |
| २ शक्ति | १४ अहंकार | २६ उपस्थ |
| ३ सदाशिव | १५ बुद्धि | २७ शब्द |
| ४ ईश्वर | १६ मन | २८ स्पर्श |
| ५ शुद्धविद्या | १७ श्रोत्र | २९ रूप |
| ६ माया | १८ त्वक् | ३० रस |
| ७ कला | १९ नेत्र | ३१ गंध |
| ८ विद्या | २० जिव्हा | ३२ आकाश |
| ९ राग | २१ घ्राण | ३३ वायु |
| १० काल | २२ वाक् | ३४ तेज |
| ११ नियति | २३ पाणी | ३५ अप |
| १२ पुरुष | २४ पाद | ३६ पृथ्वी |

यांपैकीं पाहिलीं अकरा हीं याच पंथांतील विशेष मानलेलीं तत्त्वें असून बाकीं सर्व सांख्यशास्त्रांतल्याप्रमाणें आहेत. यांपैकीं १७–२१ हीं पंच ज्ञानेंद्रियें व २२–२६ हीं पंच कर्मेंद्रियें असून १६ वें मन हें ज्ञान व कर्म या दोहोंचें इंद्रिय आहे. २७–३१ हीं पंच तन्मात्रें म्हणजे सूक्ष्म तत्त्वें असून ३२–३६ हीं वृद्धिंगत झालेलीं तत्त्वें आहेत.

शाक्तदर्शनांतील तत्त्वज्ञान याप्रकारचें आहे.त्यांत आरंभीं जरी पुरुषतत्त्व मान्य केलेलें असलें तरी पुढें त्याला गौणत्व देऊन स्त्रीतत्त्वच श्रेष्ठ ठरविलें आहे व तदनुसार त्रिपुरसुंदरी ही सर्व श्रेष्ठ देवता असें मानलें आहे; आणि या पंथांतील प्रत्येक भक्ताचें परम कर्तव्य म्हणजे आपल्या त्रिपुरसुंदरी देवतेच्या स्वरूपाप्रत पोहोंचणें हें आहे, व त्याकरितां तिच्या भक्तानें करावयाच्या धार्मिक अभ्यासामध्यें स्वतः आपण स्त्रीस्वरूप आहोंत अशी भावना आपणांत पूर्ण बाणेल, असा प्रयत्न करावयाचा असतो. पुणें शहरनजीकच्या एका खेड्यांत एक शाक्तपंथीय जोगी असून तो स्त्रियांचीं वस्त्रें परिधान करीत असतो असें ऐकण्यांत आहे.

दे वी च्या उ पा स ने चे प्र का र.—वरिवस्यारहस्य ग्रंथांत शक्तिपूजेविषयीं सविस्तर अशी माहिती दिलेली असून तिचा गूढार्थ काय हेंहि तेथें सांगितलें आहे. कामकलाविलास ग्रंथावरील टीकेंत शेवटीं हें सांगितलें आहे कीं, ब्रह्मज्ञान किंवा शिव अथवा त्रिपुरसुंदरी यांशीं एकरूपता होण्याकरितां या पंथाची दीक्षा घेतलीच पाहिजे. ही दीक्षा म्हणजे एक प्रकारचा धार्मिक अभ्यास आहे. या दीक्षेचे तीन प्रकार आहेत ते आणवी, शाक्ती व शांभवी हे होत. परंतु दीक्षा प्राप्त होण्याकरतां परमदेवतेची भक्ति करावी लागते. ही भक्ति करण्याचेहि तीन मार्ग आहेत ते–परा, अपरा व परापरा. त्यांपैकीं पहिल्या म्हणजे परा मार्गामध्यें महापद्मवनामध्यें वास करणाऱ्या शिवाच्या अंकावर बसलेल्या देवीच्या आनंदमय स्वरूपाचें एकाग्र मनानें ध्यान करून ती देवी सर्व सृष्टिनिर्माणकर्त्री असून आपण स्वतः तद्रूपच आहोंत, अशी भावना दृढ करावयाची असते. दुसरा मार्ग चक्रपूजेचा; यांत कांहीं गूढार्थक चक्रांच्या द्वारें पूजा करावयाची असते. हा बाह्ययाग म्हणजे भक्तीचा भौतिक मार्ग आहे; आणि तिसरा मार्ग या पंथांतील तात्त्विक ज्ञानाचा अभ्यास करणें हा होय.

चक्रपूजेच्या मार्गानें करावयाच्या देवीच्या [illegible] मुख्य गोष्ट म्हणजे देवीला अमृतरूप मद्य अर्पण

मांस व मत्स्य हेहि पदार्थ अर्पण करावयाचे असून देवीच्या आराधनेकरितां 'म' अक्षरानें आरंभ होणाऱ्या एकंदर पांच गोष्टी करावयाच्या असतात त्या— मद्य, मांस, मत्स्य, मुद्रा व मैथुन. मोक्षप्राप्तीची इच्छा करणाऱ्या प्रत्येक भक्ताला या शांभवदर्शनाचा आश्रय करावा लागतो. महामायाशंबर वगैरे इतर तंत्रांत जे मार्ग सांगितलेले आहेत ते सर्व शिवानेंच उपदेशिलेले आहेत, पण त्यांचा अवलंब करावयाचा नसतो. कारण ते केवळ दुष्ट लोकांना भुलविण्यकरितां सांगितलेले असून फक्त हलक्या दर्जाचे लोक त्यांचा आश्रय करतात. तंत्रग्रंथांमध्यें परम देवतेचीं परस्परविरोधी अशीं अनेक स्वरूपें वर्णिलीं असून त्यांपैकीं कित्येक कृष्ण व भयानक आहेत. देवीभक्तांचे अनेक निरनिराळे पंथ असून प्रत्येकानें हेतुपूर्वक आपला आराधनामार्ग भिन्न भिन्न ठरवून ठेवलेला आहे.

ऑर्थर ॲव्हॅलॉननें तंत्रवाङ्मय प्रसिद्ध करून त्या विषयाबद्दल बरेच श्रम केले आहेत. एच्. एच्. विल्सन, मॉनिअर विल्यम्स व ए. बार्थ यांनींहि तंत्रें व शाक्तधर्मासंबंधीं आपल्या समजुतीप्रमाणें अभ्यास केला आहे. डॉ. भांडारकर यांनीं शाक्तधर्मास फारसें महत्त्व दिलेलें आढळत नाहीं. तंत्रें व शाक्तपंथ अनीतिमूलक आहेत, अशी जनसमजूत आहे, परंतु ऑर्थर ॲव्हॅलॉननें मूळग्रंथ प्रसिद्ध करून व सूत्रांचे अर्थ देऊन व मार्मिक प्रस्तावना लिहून वरील समजुती नाहींशा करण्याचा प्रयत्न केला आहे.

तंत्रवाङ्मय हें बाह्यतः बाष्कळ अथवा हास्यास्पद व अनीतिमूलक असें दिसतें तथापि तें एक गूढशास्त्र आहे व हें गूढ उकलणाऱ्या जिज्ञासूला असें आढळून येतें कीं, औपनिषद तत्त्वज्ञान हेंच सर्व तंत्रांचें व शाक्तधर्माचें अधिष्ठान आहे. ब्रह्म ही कांहीं तरी एक अगम्य वस्तु नसून तें आदि सामर्थ्य आहे व त्यांपासूनच जगाची उत्पत्ति, स्थिति व लय होत असतो. शक्ति हा शब्द व्याकरणदृष्ट्या स्त्रीलिंगी आहे. जगाचा अनुभवहि असाच आहे कीं सर्व उत्पत्तीचें आदिकारण स्त्री होय. एतावता प्रकृति हेंच आदिकारण होय. पुराणांत तरी ती पुरुषाची म्हणजे शिवाची पत्नी म्हणून प्रसिद्ध आहे. या जगन्मातेंत सर्व देवांची शक्ति एकवटलेली आहे. तिच्यांत ब्रह्मा, विष्णु व महेश यांचा अन्तर्भाव होतो. जगाची उत्पत्ति, स्थिति व लय तिच्यामुळेंच संभवतात. महानिर्वाणतंत्रामध्यें या शक्तिदेवीचें उत्कृष्ट वर्णन आढळतें.

या देवीच्या उपासनेला 'पंचतत्त्वें' जरूर असतात. मद्य, मांस, मत्स्य, मुद्रा आणि मैथुन हीं पंचतत्त्वें संस्कारित शाक्तमंडळानेंच आचरणांत आणावयाचीं असतात. या पंचतत्त्वांचा दुरुपयोग केला जाऊं नये असा महानिर्वाणतंत्राचा कटाक्ष आहे. मनसोक्त सुरापान करणारा हा देवीचा भक्त होत नाहीं. कलियुगांत फक्त स्वभार्याच शक्ति म्हणून उपभोगिली जावी व मद्याऐवजीं दूध, साखर, मध इत्यादि वस्तूंचाच उपयोग केला जावा, स्वेच्छाचार सोडून देऊन कलियुगांत फक्त कमलपाद देवीचीच अर्चा करावी इत्यादि अनेक सुधारणा महानिर्वाणतंत्रांत पंचतत्वासंबंधीं केल्या आहेत. पंचतत्त्वांचें अनुष्ठान फक्त वीराला अथवा खऱ्या अधिकारी साधकालाच शक्य आहे, इतरांस नाहीं असाहि इषारा आहे.

या देवीच्या उपासनेचीं साधनें मंत्र, बीज, यंत्र, मुद्रा व न्यास इत्यादि आहेत. या साधनावलंबानें देवी साधकावर प्रसन्न होते. इतर धर्मपंथांप्रमाणेंच शाक्तांचें मोक्ष हेंच साध्य आहे. वेदस्मृतिपुराणें व इतिहास हे गतकालीन धर्मग्रंथ होत, परंतु कलियुगांत तंत्रें हेंच एक मोक्षाचें साधन होय. वेदस्मृतींपेक्षां तंत्रवाङ्मय बरेंच आधुनिक कालानें आहे. महानिर्वाणतंत्रांत वर्णन केलेल्या देवीच्या उपासनेंत भौतिक व आध्यात्मिक गोष्टींचें मधुरमीलन झालेलें आहे असें आढळून येतें. कारण त्यांत बाह्योपकरणांच्या थाटाबरोबरच ध्यान अथवा मानसपूजेसहि बरेंच महत्त्व देण्यांत आलें आहे.

शाक्तधर्माचा हिंदु धर्मांत अन्तर्भाव करण्यांत येत असतो. शाक्तासारखे अनेक पंथ मूळ ब्राह्मणधर्माहून विकृत स्वरूपांत प्रचलित झाले आहेत. तथापि शिव व विष्णु यांची उपासना करणारे जे पंथ आहेत त्यांना ब्राह्मणधर्म हेंच अधिवेशन आहे. तंत्रवाङ्मयांत वेदान्त व सांख्यतत्त्वें बरींच आढळतात. महानिर्वाणतंत्रांतील आठव्या अध्यायांतील नीतिशास्त्रगीता ही मनु व बुद्ध यांची आठवण करून देते. शाक्त धर्मांत फारसा कडक जातिभेद नाहीं. त्यांच्यांत सर्व जातींची एक पांचवी जात मानण्यांत येते. मनूनें चार आश्रम सांगितले आहेत. परंतु शाक्तांमध्यें गार्हस्थ्य व संन्यास हे दोनच आश्रम मानण्यात येतात. प्रत्येक जातीचीं कर्तव्यें, स्त्रीपुरुष कर्तव्यें, कौटुंबिक कर्तव्यें, सर्व संस्कार, विवाह व श्राद्धादि विधी वगैरेंचा तंत्रामध्यें पूर्ण ऊहापोह करण्यांत आला आहे.

तंत्रवाङ्मयाबद्दल आजपर्यंत लोकांचें दुर्लक्ष्य व पूर्वग्रह होते, परंतु हें वाङ्मय अभ्यासिलें जाणें आवश्यक आहे. महायान, बुद्धधर्म व तिबेटांतील बौद्धधर्म यांवर तंत्रांचा परिणाम झालेला आहे. या गोष्टीचें महत्व धर्मांच्या इतिहासांत बरेंच मानलें जाईल. एकंदर १९२ तंत्रें आहेत असें म्हणतात. ऑर्थर ॲव्हॅलॉनचे तंत्रवाङ्मयाचे तीन विभाग प्रसिद्ध आहेत. तंत्रवाङ्मयांत मंत्राभिधान हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. एकाक्षरकोश पुरुषोत्तमदेवानें केला आहे, व बीजनिघंट हा भैरवकृत एक ग्रंथ आहे. महीधर व माधव यांनीं मातृकानिघंटु नामक ग्रंथ लिहिले आहेत. मुद्रानिघंटु हा वामकेश्वरतंत्राचा भाग आहे. श्रीतत्त्वचिंतामणीच्या सहाव्या अध्यायांत षट्चक्रनिरूपण आहे, व हा तत्त्वचिंतामणी ग्रंथ पूर्णानंदस्वामीनें लिहिला आहे. 'प्रपंचसारतत्त्व' हा ग्रंथ शंकराचार्यांनीं लिहिला आहे असें म्हणतात. तथापि यासंबंधीं बराच मतभेद आढळतो. या ग्रंथांत सृष्टीची उत्पत्ति,

देहाची उत्पत्ति, काल, संस्कार, होम, गायत्रीमंत्र इत्यादि विषयांचा उहापोह केलेला आहे. सर्वांत निर्वाण, बृहन्निर्वाण व महानिर्वाण हीं तंत्रें प्रसिद्ध आहेत. त्याचप्रमाणें नील, बृहन्नील व महानील हीं तंत्रेंहि प्रसिद्ध आहेत. महानिर्वाण व प्रपंचसार या तंत्रांत उत्तान शृंगार फार आहे असा एक आक्षेप आहे. परंतु त्यांत बीभत्स असें कांहींच नाहीं असा डॉ. विंटरनिट्झ यांनीं आपला अभिप्राय व्यक्त केला आहे.

बौ द्ध तं त्रें—बौद्ध धर्माच्या पूर्ण आध्यात्मिक अवनतीचा पुरावा या दृष्टीनें या बुद्ध–वाङ्मयशाखेकडे म्हणजे तंत्राकडे लक्ष देणें, योग्य व जरूर आहे. त्यांतील कांहीं भाग धर्मविधि ( क्रियातंत्र ) व आचारविधि (चर्यातंत्र )यांविषयीं आहे व कांहीं योग्यांकरतां योगशास्त्राविषयीं ( योगतंत्र ) आहे. ह्या ग्रंथांपैकीं पहिल्या प्रकारचे ग्रंथ उत्तम आहेत, कारण त्यांत जुन्या ब्राह्मणधर्मांतील विधींचें पुनरुज्जीवन केलें आहे. आदिकर्मप्रदीप हा अशा प्रकारचा आहे. त्यांत ब्राह्मणांच्या ( गृह्यसूत्रें, कर्मप्रदीप ) विधि-प्रयोग ग्रंथांतल्याप्रमाणेंच धर्मकृत्यें व विधी यांचें वर्णन आहे; आणि हे धर्मविधी " आदिकार्मिक–बोधिसत्वाला ", म्हणजे महायानपंथाच्या लोकांनां आणि दिव्यदृष्टि–मुमुक्षूंनां करावे लागतात. या ग्रंथांत मूळ सूत्र व त्यावरील साग्र टीका असून त्यांत शिष्याच्या (तो बुद्ध असूं शकेल किंवा सामान्य जन असूं शकेल ) प्रवेशसंस्काराचीं वचनें, परिमार्जन, प्रक्षालन आणि प्रार्थना व शिवाय मुखप्रक्षालन, दंतधावन, प्रातःसायंप्रार्थना, पितृतर्पण, भिक्षादान, भोजन, बुद्धादि पूज्यांचें पूजन, प्रज्ञापारमितांचें वाचन, ध्यान आणि इतर कर्मांचे मंत्र दिलेले आहेत, आणि मुमुक्षूला ( पूर्ण योगी न बनलेल्याला ) नित्य विवक्षित कालीं त्या गोष्टी करावयाच्या असतात.

क्रियातंत्रग्रंथांमध्येंच अष्टमीव्रतविधान हें असून त्यांत प्रत्येक पक्षांतील अष्टमीला करावयाच्या संस्कारांबद्दल नियम दिलेले आहेत. यामध्यें गूढार्थक आकृती व हस्तविक्षेप उपगांत आणले आहेत, आणि यज्ञान्तर्गत दानें व प्रार्थना ( गूढार्थक पूर्णाक्षरयुक्त ॐ ऱ्हूम ऱ्हूम ऱ्हूम फट फट फट स्वाहा ) बुद्ध व बोधिसत्त्व यांबद्दलच नव्हे तर शैवपंथीय देवतांबद्दलहि आलेल्या आहेत.

तंत्रांपैकीं मोठी संख्या दुसऱ्या प्रकारच्या म्हणजे योगतंत्रांची आहे. हे ग्रंथ माध्यमिका व योगाचार या पंथांतील गूढार्थवादांतून निर्माण झालेले आहेत. यांत योगी जें परमोच्च ज्ञान मिळवूं पहातात त्या शून्यतेच्या ज्ञानाविषयीं वर्णन आहे. तो योगी हें ज्ञान मिळविण्याचा संन्यास व ध्यानमार्गानें प्रयत्न करतो इतकेंच नव्हे तर मंत्रतंत्र, जादूटोणा, मूर्च्छनावस्था व अंगांत येणें या मार्गांनींहि प्रयत्न करतो. या शेवटच्या प्रकारांत मांसभक्षण, सुरापान व संभोग यांचें साहाय्य घेतात. याप्रमाणें आपणांस तंत्रांमध्यें गूढविद्या, जादू व शृंगार तिहींचें मिश्रण झालेलें आढळतें. प्रत्यक्ष बुद्धधर्माबद्दल या तंत्रांमध्यें माहिती क्वचितच आहे; उलट शैवपंथीय तंत्रांशीं त्यांचें फारच साम्य आहे; फक्त बाह्य रचना आणि तंत्रें " बुद्धप्रणित " असल्याबद्दल वचन, एवढ्याच बाबतींत फरक आहे. या संप्रदायांत योगिनी, डाकिनी इत्यादि स्त्रीदैवतांनां जें महत्त्व आहे तें विशेष आहे. या ग्रंथांमध्यें शहाणपणाचा आणि अर्थाचा भाग शोधून काढण्याचा प्रयत्न करणें निरर्थक होय. या ग्रंथांचे कर्ते बहुतकरून चेटकें लोक आहेत; व त्यांनीं व्यावहारिक आणि स्वार्थी हेतूनें ते केलेले आहेत. तथापि यांपैकीं पुष्कळ ग्रंथांनां मोठा मान मिळत आहे. उ॰ तथागतगुह्यक अथवा गुह्यसमाज हा ग्रंथ नेपाळी बौद्धांच्या ' नवधर्मां ' मध्यें मोडतो. या ग्रंथांत आरंभीं ध्यानाच्या अनेकविध प्रकारांविषयीं वचनें आहेत हें खरें; पण पुढें लवकरच बुद्धाच्या पूजनामध्यें जरूर असलेल्या गूढार्थक आकृती व वचनें यांचा माहिती दिलेली आहे; आणि जादूचे शब्द आणि कृत्यें यांतील छांछू व हातचलाखी या गोष्टी देऊनच ग्रंथकार थांबत नाहीं, तर पुढें परमोच्च सिद्धीकरितां गज, अश्व, श्वान यांचें मांस भक्षण करण्याचा, व त्याचप्रमाणें तरुण चांडालकन्यांबरोबर नित्य मैथुन करण्याचाहि उपदेश केला आहे. महाकालतंत्र हें शाक्यमुनि व एक देवता यांच्यामधील संवाद अशा स्वरूपांत लिहिलें आहे; आणि हें " बुद्धप्रणित " असल्याचें म्हटलें आहे. यांत महाकाल ( म्ह॰ शिव ) या नांवांतील अक्षरांच्या गूढार्थाविषयीं, गुप्तधनप्राप्तीविषयीं, राज्यप्राप्ती व इच्छितवधूप्राप्ती यांविषयीं आणि लोकांनां वेड लावून गुलाम करणें किंवा ठार मारणें यांविषयीं माहिती दिलेली आहे. संवरोदयतंत्र याला जरी बुद्ध आणि बोधिसत्व वज्रपाणि यांच्यामधील संवादाचें स्वरूप आहे तरी तो ग्रंथ बौद्धधर्मीयापेक्षां शैवपंथीच अधिक आहे; कारण त्यांत लिंग व शैवपंथीय दैवता यांचें पूजन करण्याविषयीं स्पष्टपणें सांगितलें आहे. कालचक्रग्रंथ आदिबुद्धानें सांगितला असें जरी म्हणतात तरी त्यांत मक्का व मुसुलमानी धर्म यांविषयीं उल्लेख आहे. मंजुश्रीमूलतंत्रामध्यें शाक्यमुनि इतर गोष्टींबरोबर हेंहि सांगतो कीं, नागार्जुन हा त्याच्यानंतर चारशें वर्षांनीं होणार आहे. तेव्हां हे सर्व ग्रंथ नागार्जुन आणि महायानसूत्रें यानंतर बऱ्याच कालानें लिहिलेले असले पाहिजेत; आणि माध्यमिक पंथाचा संस्थापक नागार्जुन यानेंहि एखादें तंत्र लिहिलें असलें पाहिजे याबद्दल वाद करणें जरूर नाहीं. तथापि पंचक्रमांतील सहापैकीं पांच भाग त्यानें लिहिले असें म्हणतात. या ग्रंथांत तांत्रिक संस्कारांपेक्षां योगाबद्दल अधिक माहिती आहे. ग्रंथनामावरून जो बोध होतो त्याप्रमाणेंच या पंचक्रमांत पांच अवस्थाबद्दल सांगितलें असून पांचवी अवस्था म्हणजेच परमोच्च योगप्राप्ति होय. प्राथमिक अवस्थांमध्यें काया, वाचा आणि मन यांची शुद्धि करून बुद्धाच्या काया, वाचा आणि मन यांच्या 'प स्वभावाचें ग्रहण करण्याची तयारी करावयाची असते. या पांच अवस्था प्राप्त करण्याचीं साधनें म्हणजे

वर्तुळें, जादूचे मंत्र, गूढार्थक उच्चार आणि महायानीय व तंत्रगत देवतांचें पूजन, या रीतीनें योगी अत्यंत श्रेष्ठ अवस्थेप्रत पावतो; व त्या अवस्थेंत सर्व भेदभाव नष्ट होऊन कोणत्याहि प्रकारचें द्वैत म्हणून शिल्लक राहत नाहीं. अशा योग्यांबद्दल विशेष वर्णनहि दिलें आहे.

या ग्रंथाचा नागार्जुन हा जर खरोखरच कर्ता असेल तर महायानपंथाच्या संस्थापकाहून हा भिन्न असावा. तिसऱ्या भागाचा कर्ता शाक्यमुनि असें सांगितलें आहे, आणि बंगालचा देवपाल (सुमारें इ. स. ८५०) याचा समकालीन म्हणून तारानाथनें ज्याचा उल्लेख केला आहे तोच हा असावा. तो सर्वच ग्रंथ बहुतकरून या कालांतला असावा. तारानाथनें जें म्हटलें आहे कीं, बंगाल्यांतील पालघराण्याच्या वेळीं म्हणजे ९ व्यापासून ११ व्या शतकापर्यंत योग व जादू यांचें प्रवर्तस्व होतें, तें म्हणणें विश्वसनीय दिसतें, आणि तंत्रग्रंथांचा आरंभ याच्या अगोदरच्या कालांत झाला असें म्हणण्यापेक्षां याच कालांत झाला असें म्हणणें हें अधिक संभवनीय आहे. नागनाथानें आपल्या " हिंदुस्थानांतील बौद्धधर्माचा इतिहास " या ग्रंथामध्यें तंत्र-बौद्धधर्मांतील भावार्थाची चांगली कल्पना दिली आहे. त्यामध्यें महायान व त्रिपिटक आणि बोद्धिशास्त्र व बौद्धस्वार्थत्याग यांबद्दल मजकूर आहे हें खरें आहे, तथापि सिद्धि, मंत्र व तंत्रें यांनीं प्राप्त होणाऱ्या जादूगिरीबद्दलच पुष्कळ भाग आहे.

या तंत्रग्रंथांतील संस्कृतभाषा बहुतकरून त्यांतील माहितीइतकीच रानटी असते. या तंत्रग्रंथांचा उत्तरहिंदुस्थान, तिबेट व नंतर चीन या देशांत फार प्रसार झाला आणि संस्कृतीच्या इतिहासांत त्यांचें फार महत्त्व आहे; नाहीं तर त्यांच्यांतील रानटीपणामुळें मौन स्वीकारून पुढें जावें असेंच कोणालाहि वाटलें असतें.

[ संदर्भ ग्रंथः—एच्. एच्. विल्सन–एसेज अँड लेक्चर्स ऑन दि रिलिजन ऑफ दि हिंदूज ( १८६२ ); मोनियर विल्यम–ब्रह्मॅनिझम अँड हिंदुइझम ( १८९१ ); एन्. मॅकनिकल–इंडियन थिइझम ( १९१५ ). डब्ल्यू. जे. विल्किन्स–मॉडर्न हिंदुइझम ( १९०० ). आर्थर आव्हालोन–प्रिन्सिपल्स ऑफ तंत्र ( १९१६ ); आर. डब्ल्यू. फ्रेझर–इंडियन थॉट, पास्ट अँड प्रेझेंट ( १९१५ ). ]

**तत्त्वज्ञान**—हा शब्द इंग्रजींतील " फिलासफी " या शब्दाचें भाषांतर म्हणून प्रचलित झाला आहे. तत्त्वज्ञान म्हणून कांहीं निश्चित विषय आहे असें नाहीं. यूरोपांतील वैचारिक आणि शास्त्रीय इतिहास पहातां ज्या ज्ञानक्षेत्रास विशिष्ट नांव नाहीं त्यास फिलासफीमध्यें दडपण्याचा प्रचार आहे. जेव्हां शास्त्रें पृथक झालीं नव्हतीं तेव्हां अन्वित असलेल्या विचारमालिकेस फिलासफी म्हणण्याची पद्धति सुरू झाली. अजूनहि ज्या लोकांस फिलासफी या शब्दाचा मोह सुटला नाहीं ते लोक जीं निरनिराळीं शास्त्रें या शब्दाखालीं आणतात तीं येणेंप्रमाणेः ( १ ) एपिस्टिमालजी ऊर्फ विज्ञानशास्त्र, ( २ ) एथिक्स म्हणजे नीतिशास्त्र व ( ३ ) सायकॉलजी ऊर्फ मानसशास्त्र वगैरे.

आयुष्याचा हेतु काय इत्यादि गोष्टींचें विवरण करणें आणि तें मानसशास्त्राच्या किंवा पूर्वगत सृष्टिविकासाच्या साहाय्यानें करणें या तऱ्हेची विचारमाला जेव्हां प्रगट केली जाते तेव्हां त्यासहि फिलासफी म्हणण्याचा प्रघात आहे. स्पेन्सरनें फिलासफी हा शब्द एका निश्चित अर्थानें वापरला होता. तो अर्थ म्हटला म्हणजे " शास्त्रांचें शास्त्र. " अनेक भौतिक शास्त्रांवरून सृष्टिविकासात्मक जे सिद्धांत निघतात, त्या सिद्धांतांसहि कांहीं नियमांत घालतां येईल तर पहावें या दृष्टीनें स्पेन्सरनें प्रयत्न करून जे सिद्धांत काढले त्यांस तो फिलासफी अगर तत्त्वज्ञान म्हणे. कांहीं इंद्रियातीत ज्ञानाच्या अभिमान्यांनीं या स्पेनरच्या प्रयत्नफलास शास्त्र असेंच म्हणून त्याला फिलासफर म्हणजे तत्त्ववेत्ता न म्हणतां सायंटिस्ट म्हणजे शास्त्रज्ञ असें म्हणण्याचा प्रयत्न केला आहे. केवळ प्रत्यक्षमूलक जें ज्ञान असेल त्याच्या अनुमानपरंपरेनें केलेल्या विकासाला फिलासफी या सदरांतून वगळावें असा " फिलासफी "च्या कित्येक अभिमान्यांचा आग्रह आहे. पण त्यांनीं अन्य दिशेनें कांहीं निश्चित प्रगति केली आहे असें वाटत नाहीं. ज्ञानकोशकारांस फिलासफी हें शास्त्रांतील ज्ञानक्षेत्र म्हणून संमत नाहीं; व शास्त्रांचें शास्त्र या पलीकडे जर फिलासफीचा अर्थ घेतला जाईल तर तो प्राचीन परंपरेचा त्याग करण्याची नाखुषी असलेल्या लोकांचा एक वेडी आवड याच्या पलीकडे त्यास फारसें महत्त्व द्यावेसें वाटत नाहीं. ज्या निरनिराळ्या विचारपरंपरा आज प्रसिद्ध आहेत त्यांचें वर्गीकरण आम्हीं दर्शनें, मतें व संप्रदाय असें करतो आणि त्या विशिष्ट नांवाखालीं देण्यांत आल्या आहेत. उदाहरणार्थ " अद्वैत " वगैरे.

यूरोपीय विज्ञानेतिहासामध्यें " फिलासफी "नें निरनिराळ्या काळीं कसकशीं रूपें धारण केलीं याविषयीं थोडेसें विवेचन केलें म्हणजे या विषयावर अवश्य विवेचन केलें असें होईल.

फिलासफी या विषयाची व्याख्या व विषयविवेचनाची मर्यादा ही निरनिराळ्या काळांत व निरनिराळ्या लेखकांची भिन्न भिन्न आढळते. पाश्चात्त्य देशांत प्राचीन काळीं ग्रीक विद्वानांनीं सर्वसामान्य ज्ञानांतून तत्त्वज्ञान हा विषय हळूहळू निराळा काढला. ' तत्त्वज्ञान ' या अर्थाचा ग्रीक शब्द प्रथम पायथॅगोरसनें ( सुमारें ख्रि. पू. ५८२ ) उपयोगांत आणला असें म्हणतात; पण त्यांत तथ्य नाहीं. तो शब्द ' तत्त्वज्ञान ' या विशिष्ट अर्थानें प्रथम प्लेटोनें वापरला व ' तत्त्ववेत्ता ' ( फिलॉसफर ) म्हणजे जो मनुष्य मानवप्राणी ज्या इंद्रियांनां भासमान होणाऱ्या जगांतील वस्तुमात्रांत वावरत असतो त्यांचें मूळ सत्यस्वरूप काय आहे हें जाणतो तो,

अशा अर्थाची व्याख्या त्यानें केली आहे. " या जगांत सनातन, अविकारी व अविनाशी असें काय आहे हें जो जाणतो तो तत्त्ववेत्ता " किंवा " प्रत्येक वावतींत वास्तविक जें सत्यस्वरूप असतें त्यावर प्रेम करणारा तो तत्त्ववेत्ता " असें प्लेटोनें आपल्या रिपब्लिक नामक ग्रंथांत म्हटलें आहे. तथापि प्लेटोनें तत्त्वज्ञान हा शब्द नैतिक व धार्मिक ज्ञानाच्या क्षेत्रांनां उद्देशून विशेषतः वापरला होता असें म्हणावें लागतें. तर्कशास्त्र, नीतिशास्त्र व भौतिकशास्त्र, मानसशास्त्र, विज्ञानशास्त्र व अतींद्रियविज्ञान ( मेटॅफिजिक्स ) या सर्व विषयांच्या क्षेत्रांचें स्पष्ट पृथक्करण प्लेटोनें केलेलें नाहीं. प्राचीन काळांतील 'ज्ञानकोशकार' ( एन्सायक्लोपेडिस्ट )ही संज्ञा ज्याला यथार्थतेनें देतां येईल असा विद्वान् अरिस्टॉटल यानें तर्कशास्त्र, मानसशास्त्र, नीतिशास्त्र व सौंदर्यशास्त्र यांच्या विषयमर्यादा प्रथम ठरविल्या; आणि सर्व दृश्य जगाच्या मूळाशीं असलेलीं जीं आद्य तत्त्वें ( फर्स्ट प्रिंसिपल्स ) त्यांविषयींच्या ज्ञानाला त्यानें 'फर्स्ट फिलॉसफी' असें नांव दिलें. पण याच विषयाला नंतरच्या लेखकांनीं 'मेटॅफिजिक्स' हा शब्द रूढ केलेला आढळतो. 'दृश्य जगाविषयींचें ज्ञान' हा विषय 'फिजिक्स' या नांवानें संबोधिला जाऊन भौतिक जगाचा त्याच्या मूळ उत्पादकाशीं असलेला संबंध ज्यांत येतो त्याला 'फिलॉसफी' किंवा 'मेटॅफिजिक्स' असा अर्थ निश्चित झाला. 'रॅशनल कॉस्मॉलजी' हा शब्द बराच काल रूढ होता पण त्यांत मेटॅफिजिक्सपैकीं कांहीं विशिष्ट भागाचा समावेश होतो. फिलॉसफी या विषयांत तुल्फच्या बराच काळ रूढ असलेल्या योजनेप्रमाणें पाहतां, आत्म्याविषयींचें ज्ञान देणारें 'मानसशास्त्र' (सायकॉलजी), जगाविषयींचें ज्ञान देणारें 'विश्वज्ञान' (कॉस्मॉलजी ) आणि ईश्वराविषयींचें ज्ञान देणारें दैवतविज्ञान ( थिऑलजी ) या तिहींचा अंतर्भाव होतो. मुख्य शास्त्र मेटॅफिजिक्स किंवा फिलॉसफी या विषयाला दुय्यम प्रतीचे असलेले विषय तर्कशास्त्र, नीतिशास्त्र व सौंदर्यशास्त्र हे होत, कारण त्यांत वस्तुस्थितीचें ज्ञान नसून केवळ ध्येयात्मक गोष्टींची चर्चा असते.

फि लॉ स फी आ णि नॅ च र ल सा य न्स.—तत्त्वज्ञान या विषयाचें क्षेत्र स्पष्टपणें लक्षांत येण्याकरितां त्याचें तत्सदृश विषयांशीं असलेलें भिन्नत्व तुलनेनें दर्शविलें पाहिजे. 'फिलॉसफी म्हणजे आपल्याभोंवतीं दिसणाऱ्या सृष्टीविषयींचें ज्ञान' असा अर्थ आहे तर याच सृष्टीविषयीं ज्ञान देणारें सृष्टिविज्ञान (नॅचरल सायन्स) किंवा भौतिकशास्त्रें यांमध्यें व फिलासफीमध्यें फरक काय हा प्रश्न उद्भवतो. त्याचें उत्तर असें कीं, भौतिकशास्त्रें फक्त वस्तुस्थितीचें ज्ञान करून देतात. परंतु या निरनिराळ्या भौतिकशास्त्रांचा तात्त्विकदृष्ट्या परस्पर संबंध जोडणें, तसेंच या दृश्य जगाची मानवी आत्म्याला जी जाणीव होते तिचें तात्त्विक स्वरूप जाणणें, आणि या दृश्य जगाची उत्पादक अदृश्य शक्ति कोणती आहे हें ठरविणें या गोष्टी तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत येतात.

सा य कॉ ल जी, ए पि स्टि मॉ ल जी व मे टॅ फि जि क्स.—तत्त्वज्ञान ( फिलॉसफी )व मानसशास्त्र ( सायकॉलजी ) यांचा अगदीं निकट संबंध आहे; कारण जीव, जग व जगदीश्वर याविषयींचे सर्व विचार मानवी मनाच्या द्वारें चालतात. पण मन ही चीज काय आहे, त्याचे व्यापार कसे चालतात, मनाचा आणि मेंदूचा संबंध काय वगैरे गोष्टींचें ज्ञान हा स्वतंत्र व मोठा विषय असून त्याला मानसशास्त्र म्हणतात. मनांतील विचारांचा मेंदूंतील व्यापारांशीं निकट संबंध असल्याचें अलीकडे सिद्ध झाल्यापासून या मानसशास्त्र विषयाला प्रत्यक्ष तत्त्वज्ञान या विषयापेक्षांहि अधिक महत्त्व आलें आहे. इंग्रज तत्त्ववेत्त्यांमध्यें ह्यूमपासून ही प्रवृत्ति दिसते. सर. डब्ल्यू. हॅमिल्टन या तत्त्ववेत्त्यानें 'सायकॉलजी उर्फ मेटॅफिजिक्स' अशी शब्दयोजना एके ठिकाणीं केली असल्यामुळें त्यालाहि मानसशास्त्राच्या क्षेत्राची स्पष्ट कल्पना नव्हती असें म्हणावें लागतें. सायकॉलजी व एपिस्टिमॉलजी (विज्ञानशास्त्र ) यामधील स्पष्ट फरक प्रथम कांट या जर्मन तत्त्ववेत्त्यानें दाखविला. त्याचा 'क्रिटिक ऑफ प्युअर रीझन' हा ग्रंथ ज्ञानोपपत्तीबद्दलचा आहे; आणि कांटनंतर कांहीं काल तत्त्वज्ञानविषयक विवेचनाला 'विज्ञानशास्त्रा'चें स्वरूप प्राप्त झालें होतें. लॉक या तत्त्ववेत्त्यानें 'थिअरी ऑफ नॉलेज,' याच विषयावर लिहिलें; पण त्यानें आपल्या लेखनांत विज्ञानशास्त्र व मानसशास्त्र यांचा घोंटाळा केला आहे. बार्कले व ह्यूम यांच्या ग्रंथांत तोच दोष आढळतो.

हेगेलनें एपिस्टिमॉलजी व मेटॅफिजिक्स यांचा घोंटाळा केला आहे. ज्ञानाची उपपत्ति ( एपिस्टेमालजी ) नीट लागण्याकरितां जीवाची ( मानवाच्या अस्तित्वाची ) उपपत्ति नीट लागली पाहिजे व म्हणून हे दोन विषय अगदीं संलग्न आहेत; तथापि ते एक नाहींत. पण हेगेल व हर्बर्ट स्पेन्सर यांनीं या दोन अलग विषयांची गुंतागुंत केली आहे. त्यामुळें हर्बर्ट स्पेन्सरच्या तत्त्वज्ञानाला मानवी अज्ञानविषयक तत्त्वज्ञान उर्फ अज्ञेयवाद व ( डॉक्ट्रिन ऑफ दि अनूनोएबल ) असें स्वरूप प्राप्त झालें. कांट व कोम्ट यांच्याहि तत्त्वज्ञानाला 'अज्ञेयवाद' ( ॲग्नॉस्टिसिझम ) असें म्हणतां येईल. या मोठमोठ्या तत्त्ववेत्त्यांच्या तत्त्वज्ञानाला ही दिशा लागण्याचें कारण असें कीं, शुद्ध तत्त्वज्ञानविषयक प्रश्नांकडे हे लोक विज्ञानशास्त्रांतलि सिद्धांतांच्या दृष्टिकोनानें पाहतात. सबब तत्त्वज्ञान व विज्ञानशास्त्र यांच्यामधील फरक स्पष्टपणें ध्यानांत घेतला पाहिजे.

लॉ जि क, ए स्थे टि क्स व ए थि क्स.—तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र ( लॉजिक ) या दोन विषयांचाहि असाच घोंटाळा केला जातो. हिंदी तत्त्वज्ञानामध्यें न्याय व वैशेषिक हीं दोन मतें याचीं सुप्रसिद्ध उदाहरणें आहेत. सत्यनिर्णय येण्याकरितां आपण आपले विचार एकमेकांनां कसे जोडले पाहिजेत, हें तर्कशास्त्र सांगतें. त्यामुळें तर्कशास्त्राचा [illegible] निकट संबंध आहे. तत्त्वज्ञानविषयक विवेचनाला त[illegible]

अत्यंत अवश्यकता असली तरी हे दोन विषय अगदीं भिन्न आहेत.

एस्थेटिक्स ( सौंदर्यशास्त्र ) हा विषय मानसशास्त्राचा किंवा शारीरशास्त्राचा भाग आहे. पदार्थांना सुंदर किंवा भव्य ( ब्यूटिफुल ऑर सब्लाइम ) अशीं विशेषणें ज्या भावनामुळें आपण देतों त्या भावना कोणत्या प्रकारच्या शारीरिक किंवा मानसिक चळवळीमुळें उत्पन्न होतात असा प्रश्न केला म्हणजे सदरहू विवेचनाला सुखदुःखादि भावनांचें ज्ञान असें स्वरूप येतें. परंतु हाच प्रश्न निराळ्या तऱ्हेनें केला पाहिजे. वस्तू कशामुळें सुंदर दिसतात व या सौंदर्यगुणाचा विश्वाच्या अंतिम स्वरूपाशीं काय संबंध आहे ? असा प्रश्न केला म्हणजे सौंदर्यशास्त्र हें तत्त्वज्ञानाची एक शाखा बनतें. परंतु निरनिराळ्या कलांची सुधारणा व वाढ हाहि सौंदर्यशास्त्राचाच विषय असल्यामुळें तत्त्वज्ञानाहून हा विषय अगदीं भिन्न ठेवणें जरूर आहे.

नीतिशास्त्राबद्दल असेंच म्हटलें पाहिजे. नीतिशास्त्राचे पुष्कळसे विषय असे आहेत कीं त्यांचा तत्त्वज्ञानविषयाशीं कांहीं संबंध नाहीं. नीतिविषयक कल्पनांची वाढ कशी झाली या प्रश्नाचा निकट संबंध मानसशास्त्राशीं येतो; समाजशास्त्राच्या ( सोशिऑलजी ) निरनिराळ्या अंगांशींहि हा विषय संलग्न आहे. तसेंच मनुष्यामधील नैतिक बुद्धि उर्फ सदसद्विवेकबुद्धि हिचें स्वरूप काय आहे, मनुष्याला इच्छास्वातंत्र्य ( फ्रीडम ऑफ वुईल ) कितपत आहे, वगैरे प्रश्नहि मानसशास्त्राच्या क्षेत्रांतले आहेत. हा भाग वगळल्यास नीतिशास्त्राकरितां दोनच प्रश्न शिल्लक राहतात ते (१) कर्तव्य म्हणजे काय आणि मानवी क्रियांनें ध्येय काय असावें ? आणि (२) या ध्येयानुसार निरनिराळ्या कर्तव्यांचा दर्जा कसा ठरवावा ? वास्तविक कर्तव्याकर्तव्य ( कर्मा कर्म ) विचार हाच नीतिशास्त्राचा मुख्य विषय होय. पण पुष्कळशा नीतिशास्त्रावरील ग्रंथांत या विषयाचा अभावच दिसून येतो. मानवी क्रियांचें ध्येय ठरविणें,या नीतिशास्त्रांतील पहिल्या प्रश्नाचा तत्त्वज्ञानाशीं निकट संबंध आहे. इतकेंच नव्हे तर तो तत्त्वज्ञान या विषयाचाच एक भाग आहे; आणि म्हणूनच या भागाला कांटनें 'मेटॅफिजिक्स ऑफ एथिक्स ' असें म्हटलें आहे तें यथार्थ आहे.

फि लॉ स फी ऑ फ दि स्टे ट (पोलिटिकल फिलॉसफी), फि लॉ स फी ऑ फ हि स्ट्री, व फि लॉ स फी ऑ फ रि लि ज न.—प्लेटो व अरिस्टॉटल यांच्या ग्रंथांत नीतिशास्त्र आणि राजनीतिशास्त्र हीं अगदीं अविभाज्यरीतीनें एकत्र केलीं आहेत. मानवाला आपलें अंतिम हित,समाजांत राहिल्यानेंच साधतां येतें असें दिसून आल्यामुळें या तत्त्ववेत्त्यांनीं राज्यकारभाराची उत्तम पद्धति हेंच सदाचरणाचें साधन ठरविलें. प्लेटोचें रिपब्लिक व हेगेलचें फिलॉसफी डेस् रेच्टस हीं पुस्तकें याच अनुसंधानानें लिहिलीं आहेत. तथापि नीतिशास्त्र, राजनीतिशास्त्र व तत्त्वज्ञान हे विषय अगदीं पृथक् पृथक् आहेत. ही गोष्ट वरील विवेचनावरून स्पष्टपणें ध्यानांत येईल.

तत्त्वज्ञान या विषयाचें पूर्ण विवेचन होण्याकरितां अखिल मानव जातीचा इतिहास अवलोकन करून त्यांत उत्क्रांतितत्त्व कितपत दृग्गोचर होतें हें पाहिलें पाहिजे.या विषयाला ऐतिहासिक तत्त्वज्ञान (फिलॉसफी ऑफ हिस्ट्री) हें नांव देण्यांत येतें.

शेवटीं दैवतविज्ञान ( थिऑलजी ) आणि तत्त्वज्ञान ( फिलासफी ) किंवा धर्म ( रिलिजन ) आणि तत्त्वज्ञान यांचा परस्पर संबंध काय आहे हें पहावयाचें. परमेश्वराचें स्वरूप काय व परमेश्वरासंबंधानें मानवाचें कर्तव्य काय, हे प्रश्न धर्म किंवा दैवतविज्ञान या विषयांमध्यें येतात. यासंबंधानें तत्त्वज्ञान या विषयांतहि विवेचन कांहीं अंशीं येतें. परमेश्वरप्राप्ति, मुक्ति, शाश्वत शांति व आनंद हे धर्माचे विषय आहेत; आणि या बाबतींत मानवजातीच्या कल्पना कोणत्या आहेत त्याची आजपर्यंतची माहिती देणें व त्यांतून उत्क्रांतितत्त्व व सत्यस्वरूप कसें बाहेर पडत आहे हें दाखविणें, हें 'फिलासफी ऑफ रिलिजन ' या विषयाचें काम आहे.

याप्रमाणें फिलॉसफी ( तत्त्वज्ञान ) या मूळ अत्यंत व्यापक अशा विषयाचें वर्गीकरण होतां होतां केवळ 'तत्त्वज्ञान ' या विषयाखालीं येणारी माहिती अगदीं संपुष्टांत आली आहे; आणि उलटपक्षीं 'फिलॉसफी ' हा एक सामान्य अर्थी शब्द असून 'फिलॉसफी आफ स्टेट ' 'फिलॉसफी ऑफ हिस्ट्री ', 'फिलॉसफी ऑफ रिलिजन ' वगैरे अनेक शब्दप्रयोग रूढ होत आहेत; इतकेंच नव्हे तर 'ज्ञाना ' च्या अगदीं आधुनिक वर्गीकरणांत 'हिस्ट्री ' ( इतिहास ) व 'फिलासफी ' ( तत्त्वज्ञान ) हीं प्रतीक ज्ञानविषयाचीं दोनदोन अंगें समजलीं जातात.

**तनकपूर**—संयुक्त प्रांत, जिल्हा आलमोरा, चंपावत तहशीलींत हिमालयाच्या पायथ्याशीं शारदा नदीजवळ हें एक गाव व व्यापाराचें ठिकाण आहे. भोतिया लोक या ठिकाणीं बोरॅक्स व लोंकर विणण्याकरिता आणतात; व साखर आणि कपडा घेऊन जातात. चिनी व्यापार व हिंदुस्थानांतील श्रीमंत लोकांमधील व्यापार याच ठिकाणीं मुख्यत्वें चालतो.

**तनखा**—हें रुपयासारखेंच एक जुनें नाणें होतें. मुसलमानी अंमलांत हेंच चालत असे; हिंदुस्थानांतील प्रत्येक सुभा, सरकार, महाल, कर्यात, कसबा व गांव यांच्या वसुलाची बादशाहींत जी आकारणी झाली होती तिलाच तनखा–वसूल म्हणत असत. पेशव्यांनीं सरदारांस जहागिरी दिल्या त्या पूर्वीचा त्या त्या प्रदेशाचा तनखा–वसूल–पाहून अजमासें दिल्या होत्या. परंतु थोरल्या माधवरावांच्या कारकीर्दींत जहागिरींचीं उत्पन्नें तनख्यापेक्षां अधिक येत असून सरदार लोक हा वाढाव्याचा पैसा सरकारांतहि देत नसत किंवा सरकारचाकरीकरितां करारांपेक्षां अधिक फौजाहि ठेवीत नसत. याकरितां सर्व जहागिरदारांकडून जहागिरीचे वसुलाचे हिशेब मागून आणून ते तपासून ज्यांकडे वाढावा

निघत असेल त्याकडून तो वसूल करावा याप्रमाणें पेशव्यांनीं रीत पाडली. [ ऐ. ले. संग्रह. पत्र ८०८. ]

**तनावल**—वायव्यप्रांत, हजारा जिल्ह्याच्या वायव्य-कोंपऱ्यांत हा एक लहानसा डोंगराळ प्रदेश आहे. अकबराच्या कारकीर्दीच्या अखेरीस हा भाग यूसफझई पठाणांनीं काबीज केला होता व हल्लींहि बरेच पठाण या भागांत रहातात. हा भाग प्रथम मोंगल अंमलाखालीं होता.पण पुढें 'पुलआल' व 'हंडोआल' अशा दोन प्रकारच्या लोकांत वांटला गेला.पुढें हंडोआल लोकांचा मुख्य नवाबखान यानें दुराणी लोकांनां झुगारून दिलें. परंतु सन १८१८ मध्यें सरदार अझीमखान यानें नवाबखानास ठार मारिलें. पुढें याचा मुलगा पईंदखान याच्या शीख लोकांबरोबर बऱ्याच झटापटी झाल्या. त्यांत 'अंब'गांवच्या जवळपासचा थोडासा मुलुख खेरीज सर्व प्रांत यानें गमावला. हल्लींच्या इस्टेटीचे दोन भाग आहेत. एक भाग अंबगांवचा नवाब सर महंमदखान, के. सी. एस. आय. याच्याकडे असून दुसरा भाग फुलऱ्याचा खान अटा महमदखान याच्याकडे आहे.

**तनुकु तालुका**—मद्रास, कृष्णा जिल्ह्यांत हा एक नदीमुखप्रदेशांतील तालुका आहे १९२१ सालीं येथील लोकसंख्या २८६४४२ होती. हा तालुका फार सुपीक असून येथील जमीनीला गोदावरी नदीचें पाणी पुरविलें जातें. मुख्य पिकें तांदूळ, डाळी, गळिताचीं धान्यें आणि ऊंस हीं होत.

**तपकीर**—तपकीर किंवा नस ही तंबाखूपासून तयार करतात हें सर्वांस माहीत आहेच. तपकीर ओढणें हें एक प्रकारचें व्यसन आहे. यापासून दृष्टीस मांद्य येऊन कपडेहि खराब होतात. इतकें असूनहि आपल्या हिंदुस्थानांतच नव्हे परंतु यूरोपांतहि हजारों लोक तपकिरीचा उपयोग करतात. १७ व्या शतकांत तपकीर ओढण्याचें व्यसन इंग्लंडमध्यें सुरू झालें व १९ व्या शतकाच्या आरंभापर्यंत त्याचा बराच प्रसार झाला. पुढें मात्र तें कमी होत जाऊन आतां बहुतेक नामशेष होत आलें आहे. तथापि अद्यापीहि श्रीमंत व वडया घराण्यांत सोन्याचांदीच्या तपकिरीच्या डब्या, ज्यांवर सोनाराचें व इतर कारागिरांचें कलाकौशल्य दृष्टीस पडतें अशा आढळतात

हिंदुस्थानांत माळवा, राजपुताना, मद्रास इत्यादि ठिकाणची नस ( तपकीर ) फार प्रसिद्ध आहे. पुण्यासहि उत्तम प्रतीची तपकीर पूर्वी तयार होत असे. पुण्याची कृष्णंभट्टी अथवा वर्तकी तपकीर प्रसिद्ध आहे. तपकिरीचा कारखाना उभारण्यास फारसें भांडवल लागत नाहीं व मानगडीच्या यंत्रसामुग्रीचीहि जरूर नसते. तीव्र आणि झणझणीत तंबाखू मात्र लागते.

ह ल क्या प्र तीची त प की र.—तंबाखू कुटून तिचें चूर्ण करावें व बारीक कपडयांतून गाळावें. गाळल्यानंतर खालीं जी बारीक भुकटी राहते तीच तपकीर होय. ह्या कृतीनें केलेली तपकीर हलकी समजली जाते.

उंची त प की र. कृति पहिली—ह्रिच्याकरितां तंबाखू मात्र चांगली असावी लागते.तर्शी तंबाखू आणून जुडयापासून पानें मोकळीं करावीत. ही तंबाखू उन्हांत वाळवून तिचा हातानें चुरा करावा. तो चुरा एका लोखंडी पात्रांत घालून भिजवावा. तसाच तो ३–४ दिवस राहूं द्यावा, म्हणजे आंबवा तयार झाला. हा आंबवा उन्हांत सुकवावा व त्यांतील सर्व पाणी आटलें म्हणजे त्याचें जात्यांतून दळून पीठ करावें व तें बारीक वस्त्रांतून गाळावें म्हणजे उंची तपकीर होईल. ही तपकीर करतांना तंबाखूच्या काडया मात्र घालूं नयेत.

कृति दुसरी:—तंबाखु आणून जुडी मोकळी करते वेळीं पानें अलग काढावीं व काडया अलग काढाव्या. नंतर अलग काढलेल्या काडयांत ८ पट पाणी घालून त्यांचा अष्टमांश काढा करावा. तंबाखूच्या पानास या काढयाचीं ५–७ पुटें द्यावीं. नंतर वाळवून बारीक चूर्ण करावें व तें चूर्ण जात्यांतून दळून वस्त्रगाळ करून घोटावें म्हणजे उंची तपकीर तयार होईल.

अ ति उं ची त प की र.—वर सांगितल्याप्रमाणें तयार झालेल्या तपकिरीस तंबाखूच्या काढ्याचीं पुटें देतात व सुकवून पुन्हां घोटून वस्त्रगाळ करतात. अशा प्रकारची तपकीर उंची होऊन तिला किंमतहि जास्त येते.

सु गं धी त प की र.—तपकीर तयार झाली म्हणजे गुलाब, वाळा, केवडा, हिना, इत्यादि अत्तरें घेऊन तीं तपकिरींत मिसळून बराच वेळ घोटतात. या रीतीनें अत्तरांचा सुवास तपकिरींत मिसळून सुगंधी तपकीर तयार होते. कस्तुरीचा वास देणें असल्यास उत्तम कस्तुरीची पुरचुंडी तपकिरीच्या भांड्यांत ठेवितात व तिच्या वरखालीं तपकीर घालतात; व तिसऱ्या चवथ्या दिवशीं तिची उलथापालथ करितात. चांगला वास येईपर्यंत पुरचुंडी तपकिरींतच राहूं देतात. या योगानें कस्तुरींतील सुगंधी परमाणु तपकीरींत मिसळून तीस कस्तुरीचा सुवास येतो.

म द्रा सी का ळी त प की र.—हिचा दिवसेंदिवस खप जास्त होत आहे. ही ओढल्यानें शैत्याचा नाश होऊन मगजशुद्धि होते. कारण ही तपकीर तयार करतांना गाईचें तूप व बदामाच्या तेलाचा उपयोग करतात. उत्तम तंबाखूचीं पानें घेऊन त्यांचें चूर्ण करावें; तें चूर्ण १० तोळे घेऊन त्यांत एक तोळा गाईचें तूप व एक तोळा बदामाचें तेल मिसळून लोखंडी कढईत तळावें; नंतर खालीं उतरून त्यांत एक तोळा चुन्याच्या कळ्या घालून बारीक खल करावा व कल्हईच्या डब्यांत किंवा बाटल्यांत भरावी.

**तपागच्छ** त पा ग च्छा ची प ट्टा व ली.—महावीरापासून खरतरगच्छाचा ३८ वा सूरि उद्योतन यापर्यंत जे प्राचीन आचार्य होऊन गेले तेच आचार्य

पट्टावलींत निर्दिष्ट केले आहेत. मात्र त्या दोहोंत कांहीं विशेष भेद आहेत. प्रथमतः महावीर हा आचार्यांत गणला गेला नाहीं.

( १ ) सुधर्मन्ः—प्रथमोदयाचा पहिला आचार्य. ( २ ) जम्बूः—हा फार सद्वर्तनी होता. ( ३ ) प्रभव.

( ४ ) शय्यंभवः—ह्यानें दशवैकालिक नांवाचा ग्रंथ केला. ( ५ ) यशोभद्र. ( ६ ) संभूतविजय आणि भद्रबाहु. हे दोघेहि सहावे पट्टधारी होते. ( ७ ) स्थूलभद्रः—हा गृहांत ३०, व्रतांत २४, व युगप्रधानाप्रमाणें ४५ वर्षें राहून वयाच्या ९९ व्या वर्षी वी. नि. २१५ त (ह्याचवर्षी चंद्रगुप्तानें ९ व्या नंदाला मारिलें. ) मृत्यु पावला ( हीं वर्षें खरतरपट्टवलीं- तील वर्षांहून भिन्न आहेत. ).

( ८ ) आर्यमहागिरि व आर्य-सुहस्तिन् गुरुभ्रातरः— पहिला गृहांत ३०, व्रतांत ४० व युगप्रधानांप्रमाणें ३० असा एकंदर १०० वर्षें राहिला.

( ९ ) सुस्थित आणि सुप्रतिबद्धः—सुहस्तीचे शिष्य. ह्यांचें उपनांव कोटिक व काकंदिक असें होतें त्यावेळेपासून निर्ग्रंथाचें नांव कोटिकगच्छ असें पडलें.

( १० ) इंद्रदिन्न. ( ११ ) दिन्न. ( १२ ) सिंहगिरी ( १३ ) वज्रः—वी. नि. ४९६ सालीं जन्मला. वी. नि. ५८४ सालीं मरण पावला. ( १४ ) वज्रसेनः—हा गृहांत. ९, व्रतांत ११६ व युगप्रधानाप्रमाणें ३ वर्षें राहून वयाच्या १२८ व्या वर्षी वी. नि. ६२० सालीं मरण पावला.

( १५ ) चंद्रः—त्याच्यापासून चंद्रगच्छ हें तिसरें नांव उत्पन्न झालें आहे.

( १६ ) सामंतभद्रः—याच्यापासून वनवासी हें चवथें नांव उत्पन्न झालें.

( १७ )वृद्धदेवः—कोरण्टकामध्यें नाहड मंत्र्यानें निर्माण केलेल्या प्रासादांत मारुतीची प्रतिष्ठा ह्यानें केली. ती प्रतिष्ठा १२५ सालीं केली असें गुर्वावलींत लिहिलें आहे. तसें म्हटलें तर वी. नि. ५९५ होतो हें ठीक नव्हे. कारण त्याच ग्रंथांत वी. नि. ६२० सालीं वज्रसेन मरण पावला असें दिलें आहे. त्यानंतर चन्द्रसूरि व सामन्तभद्रसूरि हे होऊन गेले. पट्टधर म्हणून वृद्धदेवसूरिनें वी. नि. ५९५ सालीं प्रतिष्ठा केली, हें म्हणणें असंगत आहे. ( १८ ) प्रद्योतन. ( १९ ) मानदेव.

( २० ) मानतुंगः—मालवदेशचा राजा चौलुक्यवयर- सिंह ह्याचा अमात्य वाण व मयूर यांच्या जादूनें फसलेल्या राजाला वाराणसी येथें भक्तामरस्तवनानें धर्मदीक्षा दिली, आणि भयहरस्तवनानें नागराजाच्या मनाची खात्री केली. भक्तिभरानें सुरू झालेलें एक स्तवनहि त्यानें रचिलें आहे. प्रभावकचरित्रांत प्रथम मानतुंगाचें व नंतर मानदेवाचें चरित्र सांगितलें आहे. हा मानदेव वृद्धदेवसूरीचा शिष्य असून प्रद्योतनसूरि त्याचा शिष्य होता.

( २१ ) वीरः—नागपूर येथें नेमिभवनांत प्रतिष्ठा केल्या- मुळें ह्याचें हस्तसौभाग्य पूजित झालें होतें. ( २२ ) जयदेव. ( २३ ) देवानंद. ( २४ ) विक्रम. ( २५ ) नरसिंह.

( २६ )समुद्रः—हा खोमाण राजकुलांतला होता. तो उदार व अधिकारपूर्ण होता. त्यानें गच्छ राजाची स्तुति केलेली आहे. त्यावेळीं त्यानें जैन भिक्षूंनां जिंकून नागसरोवरां- तील भुजंगनाथाचें पूज्य तीर्थ स्वतःच्या ताब्यांत आणिलें. ( २७ ) मानदेव. ( २८ ) विबुधप्रभ. ( २९ ) जयानंद.

( ३० ) रविप्रभः—यानें नड्डुलपूर येथें वी. नि. ११७० ( सं. ७०० ) त नेमिनाथांचें देवालय बांधिलें. वी. नि. ११९० सालीं युगप्रधान उमास्वाति होऊन गेला.

( ३१ ) यशोदेवः—वी. नि. १२७२ सालीं ( सं. ८०२ ) वनराजानें अणहिलपुरपट्टण स्थापन केलें. वी. नि. १२७० सालीं (सं. ८०० ) बप्पभट्टि जन्मला. त्यानें आमराजाल धर्मांतराची दीक्षा दिली. तो वी. नि. १३६५ ( सं. ८९५ ) सालीं मृत्यु पावला. ( ३२ ) प्रद्युम्न.

( ३३ ) मानदेवः—उपधानवाच्य व इतर ग्रंथांचा कर्ता. ( ३४ ) विमलचंद्र.

( ३५ ) उद्योतनः—अर्बुद पर्वतावरील तेली नामक गांवाच्या मर्यादेवर असलेल्या एका मोठ्या वटवृक्षाखालीं सर्व देवसूरीला ( इतर ग्रंथकारान्वयें ८ सूरींनां ) ह्यानें वी. नि. १४६४ त ( सं. ९९४ ) दीक्षा दिली. ह्यापासून बृहत् अथवा वट गच्छ उत्पन्न झाला ( पांचवें नांव. ).

( ३६ )सर्वदेवः—हा बृहद्गच्छाचा पहिला आचार्य होय. सुधर्मस्वामीपासून ३५ वा पट्टभृत व चंद्रगच्छाला ज्याच्या- पासून नांव मिळालें त्या चंद्रसूरीपासून हा २१ वा होता. सं. १०२९ त धनपालानें देशी नाममाला रचिली. सं १०९६ त थारापद्रगच्छाचा वादिवेताल नांवाचा शांतिसूरि मरण पावला.त्यानें उत्तराध्ययन सूत्रावर एक टीका लिहिली आहे.

( ३७ ) देवः—ह्याचें नांव रूपश्री होतें. ( ३८ ) सर्व- देव. ( ३९ ) यशोभद्र आणि नेमिचंद्र गुरुभ्राते. सं. ११३५ मध्यें ( इतर ग्रंथकारान्वयें सं. ११३९ त ) ९ अंगांवर वृत्ति करणारा अभयदेवसूरि मृत्यु पावला. तदनंतर, कुर्च- पुरगच्छाचा चैत्यवासी जो जिनेश्वरसूरि त्याचा शिष्य जिन वल्लभ ह्यानें चित्रकूटांत सहाव्या कल्याणकाचें वर्णन करून विधिसंघ विधिधर्म इत्यादि नांवानें आपल्या मतांचें प्ररूपण करून प्रवचन बाह्य झाला. तें प्ररूपण वि. ११४५ त किंवा ११५० त झालें असावें असा संभव आहे.

( ४० ) मुनिचंद्रः—नेमिचंद्राचा गुरुभ्राता जो विनयचंद्र त्याचा हा शिष्य होता.

सौवीरपायी हें ह्याचें विरुद होतें. त्यानें सप्तग्जिकादि- पद्या हा ग्रंथ रचिला. सं ११७८ त तो मरण पावला. मुनिचंद्राचा एक शिष्य देवसूरि नांवाचा होता. अणहि- लपूरपट्टणाचा राजा जयसिंहदेव याच्या समोर एका वादांत दिगंबर कुमुदचंद्राचार्याला त्यानें जिंकलें व त्यायोगानें त्या

शहरांत दिगंबराच्या येण्याला अडथळा केला. सं. १२०४ त देवसूरीनें एक चैत्य स्थापन केलें व फलवर्द्धिग्रामांत एक बिंब उभारिलें ( तें तीर्थ अजून देखील प्रसिद्ध आहे ), आणि आरासण येथें नेमिनाथप्रतिष्ठा केली. त्यानें स्याद्वाद रत्नाकर नांवाचा एक प्रमाण ग्रंथ रचिला. त्यापासून चतुर्विंशतिसूरि शाखा उत्पन्न झाली देवसूरि सं. ११४३ त जन्मला; दीक्षा ११५२; सूरिपद ११७४; स्वर्ग सं. १२२६ त. त्याच काळीं हेमचंद्रसूरि होऊन गेला. हा देवचंद्रसूरिचा शिष्य होता. देवचंद्रसूरीनें राजा कुमारपाल याला दीक्षा दिली होती. तो त्रिकोटिग्रंथांचा कर्ता होता. सं. ११४५ त जन्मला; दीक्षा सं. ११५० त; सूरिपद सं. तो ११६६ त व स्वर्ग सं. १२२९ त.

( ४१ ) अजितदेव. *यांच्या कारकीर्दींत जिनवल्लभापासून* खरतरांची उत्पत्ति झाली. जिनवल्लभानें स्थापिलेला विधिसंघ हाच जिनदत्तदौष्ट्रिक, खरतर वगैरे नांवें असलेला होय. त्याचप्रमाणें वि. १२१३ मध्यें विउणपगांवांत पौर्णिमीयक एकाक्षनरसिंहोपाध्याय व नाठीश्राविक या दोघांपासून आंच*लिकमताची उत्पत्ति झाली.*

( ४२ ) विजयसिंहः—यानें विवेकमंजरी शुद्ध केली.

( ४३ ) सोमप्रभा आणि मणिरत्न.

( ४४ ) जगच्चंद्रः—तपागच्छाचा सुप्रसिद्ध संस्थापक. कर्म करण्यास शिथिल असा मुनिसमुदाय आहे हें जाणून गुरूच्या आज्ञेनें वैराग्यरसाचा मुख्य सागर अशा चैत्रगच्छाच्या देवभद्र उपाध्यायाला मदतीला घेऊन यानें कर्माविषयीं उग्रता दाखविली म्हणून हीरलाजगच्चंद्रसूरि हें नांव त्याला प्राप्त झालें. कांहीं असें प्रतिपादन करतात कीं आघाट पुरांत ३२ दिगम्बराचार्यांबरोबर वाद करणारा तो हिऱ्याप्रमाणें अभेद्य राहिला म्हणून राजानें त्याला हीरलाजगच्चन्द्रसूरि असें म्हटलें. त्याचप्रमाणें जन्मभर आचामाम्लतप करणारा तो बारा वर्षांत तप नांवाचें बिरुद ( विशिष्ट नांव, उपलक्षण ) मिळवितां झाला. म्हणून वि. १२८५ त सहावें नांव तपा असें प्रसिद्ध झालें. तसेंच, निर्गन्थ, कौटिक, चन्द्र, वनवासि; बृहद्गच्छ व तपा हीं सहा नांवें प्रचारांत येण्याला जें कारण झालें ते आचार्यक्रमानें सुधर्मस्वामी, सुस्थित, चन्द्र, सामन्तभद्र, सर्वदेव, व जगच्चन्द्र या नांवाचे सहा सूरि होते.

( ४५ ) देवेंद्रः—याच्या काळीं विजयचंद्र जिवंत होता. विजयचंद्र हा वस्तुपालाच्या घरीं लेख्यकर्मकृन्मंत्री ( लेख्यकर्म करणारा मंत्री ) होऊन गेला व जगच्चंद्रानें त्याला सूरि केलें.

मोठ्या सभागृहांत असल्यामुळें विजयचन्द्रसमुदायाला वृद्धशालिक हें नांव लोकांनीं दिलें. त्याचप्रमाणें लहान सभागृहांत राहिल्यामुळें देवेन्द्रसूरि ज्यांत आहे अशा समुदायाचें लघुशालिक असें नांव पडलें (ज्याप्रमाणें, पौर्णिमीयकमताची उत्पत्ति झाल्यानंतर त्याच्या विरुद्ध पक्षाच्या तीर्थाचें चतुर्दशीयक हें नांव पडलें तसें ). सं. १३०२ मध्यें उज्जयिनी येथें महेभ्यजिनचंद्राचे पुत्र विरहवल व भीमसिंह यांनां देवेंद्रानें दीक्षा दिली. सं. १३२३ त ( क्वचित् १३०४ त ) वीरधवलाला विद्यानंदसूरि ह्या नांवानें सूरिपद देवेंद्रानें दिलें व भीमसिंहाला धर्मकीर्ति ह्या नांवानें उपाध्यायपद त्यानें दिलें. विद्यानंदानें एक व्याकरण रचिलें आहे. त्या व्याकरणाचें नांव विद्यानंद असें आहे. तें सर्वोत्तम, स्वल्पसूत्र आहे व त्यांत पुष्कळ अर्थ संकलित केला आहे. देवेंद्रानें खालील ग्रंथ रचिले आहेतः—(१) श्राद्धदिनकृत्यसूत्रवृत्ति२; (२)नव्यकर्मग्रंथपंचकसूत्रवृत्ति२;( ३ ) सिद्धपंचाशिकासूत्रवृत्ति (४) धर्मरत्नवृत्ति१; सुदर्शनाचरितम; (५)त्रीणि भाष्याणि३; ( ६ ) सिरिउसहवद्धमाणप्रभृतीस्तवादय. कांहीं जणांचें असें मत आहे कीं, श्रावकदिनकृत्यसूत्र हें चिरन्तनाचार्यांहून वेगळ्या अशा दुसऱ्या ग्रंथकारानें केलें आहे.

देवेंद्र मालवदेशांत सं. १३२७ त मृत्यु पावला. त्याच्या पाठीमागून नेमलेला विद्यानंदसूरि या देवेंद्रानंतर१३ दिवसांनीं विद्यापूर येथें मृत्यु पावला. म्हणून विद्यानंदसूरीचा बंधु धर्मकीर्त्युपाध्याय ह्याला धर्मघोष ह्या नांवानें सूरिपद मिळालें.

( ४६ ) धर्मघोष. यानें खालील ग्रंथ रचिलेः—( १ ) संघाचाराख्य भाष्यवृत्ति; ( २ ) सुअधर्मेतिस्तव; ( ३ ) कायस्थितिभवस्थितिस्तवौ; ( ४ ) चतुर्विंशतिजिनस्तवः २४; ( ५ ) शास्ताशर्मेति आदिस्तोत्रम् ( ६ ) देवेंद्रैः अनिशम् इतिश्लेषस्तोत्रम्; ( ७ ) यूयम् युवात्वम् इति श्लेषस्तुतयः; ( ८ ) जयवृषभेति. आदिस्तुत्यादाः. तो सं. १३५७ त मृत्यु पावला.

( ४७ ) सोमप्रभः—सं.१३१० त जन्मला.व्रत सं.१३२१ त घेतलें. सूरिपद सं. १३३२ त मिळालें. हा सं. १३७३ त मृत्यु पावला. त्याचे ग्रंथ खालीलप्रमाणें आहेतः—( १ ) नमिउणभणाई एवम् इति आदि आराधनासूत्रम्; ( २ ) सविस्तरयतिजितकल्पसूत्रम्; ( ३ ) यत्राखिलेति आदि २८ स्तुतयः, ( ४ ) जिनेन येनेति स्तुतयः, ( ५ )श्रीमच्छर्मेत्यादयः.सं. १३५७त त्यानें आपला शिष्य विमलप्रभ याला सूरिपद दिलें; आणि विमलप्रभाच्या मृत्यूनंतर त्याचे शिष्य परमानन्द व सोमतिलक यांनां त्यानें सूरिपद दिलें. सोमतिलक सोमप्रभाच्या मागून पट्टावरील अधिकारी झाला.

( ४८ ) सोमतिलकः—हा सं. १३५५ त जन्मला. दीक्षा सं.१३६९ त घेतली. सूरिपद सं. १३७३ त मिळालें.स्वर्गाप्रत सं. १४२४ त गेला. त्यानें अनेक स्तोत्रें व टीकाग्रंथ रचिले. शिवाय त्यानें क्रमानें खालील मनुष्यांनां सूरिपद दिलें— पद्मतिलक, चंद्रशेखर, जयानंद आणि देवसुंदर. पद्मतिलक एक वर्षानें मरण पावला.

चंद्रशेखरः—हा संवत १३७३ मध्यें जन्मला. सं.१३८५ त त्यानें व्रत घेतलें. सं. १३९३ त (मुनिसुंदराच्या गुर्वावली प्रमाणें सं. १३९२ त ) सूरिपद मिळालें. सं. १४२३ त ... पावला. त्यानें खालील ग्रंथ रचिलेः—( १ ) उषित...

कथा ( ह्याला दुसरें नांव वासिकभोज्यकथानक आहे ); (२) यवराजर्षिकथा;( ३ ) श्रीमत्–स्तम्भनकहारबंधादिस्तवनानि ( ह्याला दुसरें नांव, शत्रुंजय–रैवतस्तुति ).

जयानंदः—सं. १३८० त जन्मला. व्रत सं. १३९२ त धारा येथें घेतलें. सूरिपद सं. १४२० त अणहिल्लपट्टण येथें मिळविलें. सं. १४४१ त मृत्यु पावला. त्याचे ग्रंथः—( १ ) स्थूलभद्रचरित्र; ( २ ) स्तोत्रें.

( ४९ ) देवसुंदरः—सं. १३९६ त. जन्मला. महेश्वर ग्रामांत सं. १४०४ त व्रत मिळविलें. त्याचे पांच शिष्य होते. ते ज्ञानसागर, कुलमंडन, गुणरत्न, साधुरत्न आणि सोमसुंदर.

ज्ञानसागरः—सं. १४०५ त जन्मला. दीक्षा १४१७ त घेतली. सूरिपद १४४१ त घेतलें. सं. १४६० मृत्यू पावला अवश्यक आणि ओघनिर्युक्त ह्या ग्रंथांवर अवचूर्णी ( संक्षेपावृत्ति, सारग्रंथ ) लिहिल्या, व श्रीमुनि–सुव्रतस्तव, घनौघन व खंडपार्श्वनाथस्तव, इत्यादि ग्रंथांवर देखील अवचुर्णि लिहिल्या.

कुलमंडनः—सं. १४०९ सालीं जन्मला.व्रत स.१४१७ त घेतलें; सूरिपद सं.१४४२त घेतलें.आणि सं. १४५५ त मृत्यु पावला. त्याचे ग्रंथः— ( १ ) सिद्धांतालापकोद्धार; ( २ ) विश्वश्रीधरेत्याष्टादशारचक्रबंधस्तव; ( ३ ) गरीयो......हार बंधस्तव, इत्यादि.

गुणरत्नः—याचे ग्रंथः— ( १ ) क्रियारत्नसमुच्चय;(२) षड्दर्शनसमुच्चयबृहद्वृत्ति. इत्यादि. साधुरत्नः—यतिजितकल्पावर ( अंक ४७ पहा. ) एक वृत्ति व इतर ग्रंथ ह्यानें लिहिले.

(५०) सोमसुंदरः—सं १४३० त जन्मला.व्रत सं.१४३७ त घेतलें. वाचकपद सं. १४५० मिळालें. सूरिपद सं. १४५७ त मिळालें. सं. १४९९ त मृत्यु पावला. त्याचे ग्रंथः—( १ ) योगशास्त्रावरील बालावबोध;(२ )उपदेशमाला;( ३ ) षडावश्यक; ( ४ ) नवतत्व इत्यादि. त्याचे शिष्य मुनिसुंदर, कृष्णसरस्वती हें विरुद असलेला जयसुंदर ( ह्याचें नांव जयचंद्र असेंहि होतें. ) भुवनसुंदर आणि दीपालिकाकल्पाचा कर्ता जिनसुंदर हे होते.

( ५१ ) मुनिसुंदर ( विरुद–कालीसरस्वती ):— हा सं. १४३६ त जन्मला; व्रत सं. १४४२ त घेतलें, वाचकपद १४४६ त घेतलें. सूरिपद सं. १४७८ घेतलें. सं. १५०३ त मरण पावला. त्याचे ग्रंथः—( १ ) उपदेशरत्नाकर; ( २ ) शांतिकरम् इति समहिमशांतिस्तव; ( ३ ) गुर्वावली. इत्यादि.

( ५२ ) रत्नशेखर ( विरुद बालसारस्वत):—सं. १४५७ ( क्वचित् १४५२ ) त जन्मला. व्रत १४६३; पंडितपद १४८३; वाचकपद १४९३; सूरिपद १५०२; सं. १५१७ त मृत्यु पावला. त्याचे ग्रंथः – ( १ ) श्राद्धप्रतिक्रमणवृत्ति, ( २ ) श्राद्धविधिवृत्ति, व ( ३ ) आचारप्रदीप. सं. १५०८ लुंकाक अथवा लुंपाकमत लेखक लुंका यानें स्थापिलें, आणि ह्या मतापासून सं. १५३३ त वेषधारांचा उदय झाला.

( ५३ ) लक्ष्मीसागरः—सं. १४६४ त जन्मला. दीक्षा १४७०. पन्यासपद १४९६; वाचकपद १५०१, सूरिपद १५०८, गच्छनायक पद १५१७. ( ५४ ) सुमतिसाधु.

( ५५ ) हेमविमलः—सं. १५६२ त कटुक मत त्रिस्तुतिकमतापासून विभक्त झालें. कटुक मत हें गृहस्थ–कटुकाचा पाया होय. संवत १५७० त वेषधरवीजा ह्याच्या प्रभावाचा लुंकामतावर परिणाम होऊन लुंकामतापासून वीजमत भिन्न झालें. सं. १५७२ त उपाध्याय पार्श्वचन्द्र ( किंवा पाशचंद्र ) ह्याच्या प्रभावाचा परिणाम होऊन त्याच्या नांवानें प्रचलित असलेलें मत नागपुरीय तपागणापासून विभक्त झालें.

( ५६ ) आनंदविमलः—ईलादुर्ग येथें सं. १५४७ त जन्मला. व्रत १५५२. सूरिपद १५७०. सं.१५९६ त. अहमदाबाद येथें मृत्यु पावला.

( ५७ ) विजयदानः—सं. १५५३ त जन्मला. दीक्षा १५६२. सूरिपद १५८७. सं. १६२२ त वटपली येथें मृत्यु पावला.

( ५८ ) हीरविजयः—ह्यानें अकबर बादशहाला धर्मांतराची दीक्षा दिली. तो सं. १५८३ त प्रल्हादनपुरांत जन्मला. दीक्षा पाटणा येथें सं. १५९६ त घेतली. नारदपुरींत १६०८ सालीं वाचकपद मिळालें. सिरोहि येथें १६१० सालीं सूरिपद मिळालें. उन्नानगरांत सं. १६५२ त मरण पावला.

( ५९ ) विजयसेनः—हा संवत १६०४ मध्यें नारदपुरींत जन्मला. दीक्षा १६१३. अकबरबादशहापासून कालीसरस्वताविरुद मिळविलें. स्तम्भतीर्थ येथें सं. १६७१ त मृत्यु पावला.

( ६० ) विजयदेवः—सं. १६३४ त जन्मला. दीक्षा १६४३. पन्यासपद १६५५. सूरिपद १६५६. जहांगीर बादशहापासून महातापा हें विरुद मिळविलें. उन्नानगर येथें सं. १७१३ त मरण पावला. त्याच्या पाठीमागून येणारा अधिकारी म्हणून विजयसिंहास नेमिलें होतें. परंतु विजयसिंह हा विजयदेवाच्या अगोदर मरण पावला.

विजयसिंहः—मेडटा येथें सं. १६४४ त जन्मला. दीक्षा १६५४. वाचकपद १६७३. सूरिपद १६८२. सं. १७०९ त मृत्यु पावला.

( ६१ ) विजयप्रभः—कच्छ प्रांतांतील मनोहरपुर येथें सं. १६७७ त जन्मला. दीक्षा १६८६. पन्यासपद १७०१. सूरिपद सं. १७१० त गंधारबंदिरा येथें मिळालें. नागोरा येथें सं. १७३२ त विजयरत्नाला अनुगामी अधिकारी नेमिलें. [ पट्टावलीसारोद्धार पुढील माहिती मिळाली नाहीं ].

**तपून**—दक्षिण ब्रह्मदेश, थरावड्डी जिल्ह्याचा हा एक तालुका आहे. १९०१ सालीं येथील लोकसंख्या ६७,५८९ होती. यांत ३२७ खेडीं असून तपून हें मुख्य ठिकाण